


## अंतरंग परिचय.

प्रस्तुत विभागांत 'ख' चीं पृष्ठें २३ ते १५०, आणि 'ग' चीं १ ते ३१६ आलीं आहेत. या विभागांत 'ग' संबंध आला आहे. विषयाचें वर्गीकरण असें:—

### खर्ते—खैरस्य

**हिंदुस्थान—**

**इतिहास**, पौ रा णि क.—खर, खरोष्ट्र ऋषि, खाण्डव-वन. जै न.—खरतरगच्छ. हिं दु.—खिळिंगिला, खोम्माण. मु स ल मा नी.—खानखानान, खानजहान, खानजहान कोकलताश, खानजहान लोदी, खालसादिवाण, खिलजी, खुश्रू सुलतान. म रा ठे.—खासगीवाले, खुश्रुशेट मोदी, खेम सावंत, खेळोजी भोंसले, खोलेश्वर. इ ति हा स सा हि त्य.—खरे.

**जातीतिहास**—खत्तर, खत्री, खवास, खाटीक, खानजादा, खारल, खारवा, खारिया, खालपा, खालसा, खासी, खैरवार, खोरवार, खोजा, खो जात, खोंड.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल—**

**मुंबई इलाखा**, म हा रा ष्ट्र.—खर्डे, खादेरी, खानदेश, खानापूर, खेड. सिं ध सिसो गु ज रा थ.—खाराघोडा, खेडा, खेरालु. का ठे वा ड.—खंबायत, खंभलाव, खंभाळ, खंभालिय, खांडिया, खिजरिया, खिराली. द को दे.—खेरालु. म हा ड. खर्जी, खामगांव, खोलापूर. म ध्य प्रा त.—खांडवा, खापा, खारगवान, खुईखदान संस्थान, खुटगांव, खुरई, खुरिया, खैरागड, खैरी. इं दू र.—खरगोण. हैं द्रा बा द.—खम्मम्-मेट, खुलदाबाद. बं गा ल.—खरकपूर, खरार, खर्डा, खानाकुल, खिरपई, खुंटी, खुर्दा, खुलना, खेत्री, खेतूर, खोनोम. बि हा र ओ रि सा.—खरगपूर, खरसावन, खिचिंग, खोंडमाल्स. आ सा म.—खमटी डोंगर, खासपूर, खासी आणि जैंटिया डोंगर, खोवई. सं यु क्त प्रां त.—खागा, खुताहन, खुदागंज, खुर्जा, खेका, खेरी, खैर, खैरागड, खैराबाद. पं जा ब.—खन्ना, खरर, खानगड, खानगाडोग्रान, खानपूर, खुदियन, खेमकरन, खैरपूर, खैरीमूरत. म ध्य हिं दु स्था न.—खनियाधान, खाक्रोड, खातुआ, खिचलीपूर, खेत्री. वा य व्य स र ह द्दी चा प्रां त.—खायबर, खैरागली.

**आशिया, हिंदुस्थानेतर**, ऐ ति हा सि क.—खाल्डून, खैरुद्दिन. प्रा दे शि क.—खरप्रात, खारान, खीवा, खुजदार, खोकंद, खोतान, खोरेयाबाद. जा ती ति हा स.—खिलजी.

**यूरोप**, ऐ ति हा सि क.—खिथिआना. प्रा दे शि क—खोल्म, खिथिआना.

**आफ्रिका**, प्रा दे शि क.—खरगा, खार्टुम.

**प्राचीन जग**—खरोष्ट्र, खाल्डिया.

**शास्त्रें—**

**वनस्पती**—खरबूज, खसखस, खिरणी-रायण, खिरा, खुरासणी, खैर.

**कृषिशास्त्र**—खतें, खार पाडणें.

**औद्योगिक**—खळ.

**खनिजविज्ञान**—खनिखोदनशास्त्र, खनिजविज्ञान.

**ज्योतिष**—खिस्तीशक. च रि त्रें—खानापूरकर.

**सामाजिक**—खोत, खानेसुमारी.

**वाङ्मय**—उ र्दू.—खुशतर, खुश्रुअमीर. हिं दी—खत्री. अ र बी.—खन्सा, खलील, खुदादभाई. फा र सी.—खोंदमीर.

**खेळ**—खेळ, खोखो.

**सांप्रदायिक**—खलीफ, खाकी, खादिजा, खुदवा, खिस्त येशू, खैरस्य.

**अर्थनिश्चय**—खान, खानगी, खिलात.

### ग—ग्वेनेसे

**हिंदुस्थान—**

**इतिहास**, वै दि क—गणेश किंवा गणपति, गंधर्व, गय, गर्ग, गांधार, गायत्री, गार्गी, गुरु, गौतम. पौ रा णि क.—गंधमादन, गरुड, गांधारी, गाधि, गालव, गिरिव्रज, गुरुहा नदी, गुह, गोपीचंद, गोवर्धन, गोशीर्ष, गौरी. र ज पू त.—गुहिलोट. हिं दु.—गंगघराणें, गजपती, गजबाहु, गणपति नागराज, गणपतिराजे, गर्दभील, गहरवार, गांगेयदेव, गुप्त गुप्तघराणें. मु स ल मा नी.—गाजीउद्दीनखान, गाजीउद्दीन हैदर, *गिरिधर*, *गुलामकादर*, गुलामघराणें, गोकुळजाट, ग्यासबेग. म रा ठे.—गणेश वेदान्ती, गणोजी शिर्के, गदाधरपंत प्रतिनिधी, गागाभट्ट, गायकवाड, गोखले घराणें, गोखले बापू, गोपिकाबाई पेशवे, गोपीनाथपंत बोकील, गोविंदपंत काळे. गोविंदपंत बुंदेले. शी ख.—गुरुगोविंद. इं ग्र जी अ म दा नी.—गोखले गोपाळ कृष्ण, गोपीनाथ दीक्षित, गौरीशंकर उदयाशंकर.

**जातीतिहास**—गंडा, गदरिया, गदी, गद्दी, गंधमाळी, गरोडा, गवंडी, गवळी, गाभा, गानिगा, गावडी,

गामवक्कल, गारपगारी, गारुडी, गावड, गिधिया, गुजर,गुरखा, गुरव, गोंड, गोंड-गोवारी, गोंधळी, गोप, गोला, गोवर्धन ब्राह्मण, गोसावी, गौड ब्राह्मण, गड्डविप्र.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल**, मुं ब ई इ ला खा.—महाराष्ट्र.—गारोडी, गाळणा, गुणवंतगड, गोवर्धन-गंगापूर. गु ज रा थ.—गुजराथ, गोघा, गोभ्रा. का ठे वा ड—गंधका, गधाड, गधाली, गधिया, गधुला, गधोल, गरगली, गावस, गिगासारण, गिरनार, गुंढयाली गुंडा, गेडी, गोंडल, गोरखमठी, गोहिलवाड. सिं ध.—गढीयासीन, गुणि. क र्ना ट क.—गदग, गंधर्वगड, गलगनाथ, गलगली, गुत्तल, गुळदगुड, गेर्साहळळी, गोकर्ण, गोकाक, गोळीहळ्ळी को ल्हा· पू र.—गडहिंग्लज, गिरसप्पा. व डो दे.—गणदेवी. ग्वा ल्हे र.—गारिसपूर, गुना, गोहद, ग्वाल्हेर. व ऱ्हा ड.—गाविलगड, गेहमाटरगाव. इं दू र —गरोठ, गौतमपुरा. म ध्य- प्रा त.—गंगासरा, गंगाळुर, गडचिरोळी, गडिया पहाड, गढकोटा, गवररा, गाडरवाडा, गिलगाव, गुर्दा, गेवर्धा, गोंड-उमरी, गोंदिया. है द्रा बा द.—गंगाखेर, गंगापूर, गंगावती, गडवाल, गुरमतकाल, गुलबुर्गा, गेवराई, गोवळकोंडा म्है सू र —गंगवाडी, गुंडुलपेठ, गुब्बी, गोरीबिदनूर, गोवर्धनगिरी. वं गा ल.—गंगटोक, गंगासागर, गारुलिया, गुमला, गुरुंग, गोपालगंज, गोपालपूर, गोलुंदो, गौड, गौडीपूर. बि हा र व ओ रि सा —गया, गरवा, गरुडस्तंभ, गिधौर, गिरीदीह, गोड्डा, गोविंदपूर. आ सा म.—गंगपूर, गरभूर, गारो टेकड्या, गोलपाडा, गोलाघाट, गौहत्ती. सं यु क्त प्रा त.—गंगानदी, गंगाकालवा, गंगोत्री, गंगोह, गंडकी, गढमुक्तेश्वर, गढवाल, गरौथा, गाझिआबाद, गाझीपूर, गिरोधा, गुन्नौर, गुलावथी, गोकुल, गोम्रा, गोंडा, गोमती, गोरखपूर, गोला, गोवर्धन, गौराबऱ्हाज. पं जा ब.—गडशंकर, गढी इक्तीआरखान, गढीवाल, गुगेरा, गुजरखान, गुजराणवाला, गुरगाव, गुरुदासपूर, गोलेर, गोहान, ग्रे कॅनॉल. का श्मी र.—गिलजित. म द्रा स.—गंगैकोंडपुरम्, गजपतीनगरम्, गंजम, गंडीकोट, गंतूर, गुंटकल, गुडियात्तम, गुडीवाडा, गुडूर, गुणुपूर गुंटुपल्ली, गुदलूर, गुमसूर, गुर्रमकोंडा, गोदावरी, गोदीचेट्टी, गोपिचेट्टिपालैयम्, गोव्ळकोंडा. ब्र ह्म दे श.—गंगाव, ग्योविंगाक, ग्वा. सी लो न.—गॅले. म ध्य हिं दु स्था न —गढेमंडल, गढोली, गन्हा, गाम्रौन, गोगुंडा, गोविंदगड, गौरीहर. पो र्तु गी ज हिं दु स्था न —गोवें, ने पा ळ.—गौरीशंकर.

**आशिया हिंदुस्थानेतर**, ऐ ति हा सि क.—गझनी-घराणें प्रा दे शि क.—गझनी, गॅलिली, गॅलिलीचा उपसागर, गॅलेशिया, गाझा, गिरिष्क, गोमलघाट, गोर्डियम, ग्वादर. जा ती ति हा स.—गख्खर.

**आफ्रिका**, प्रा दे शि क.—गॅंबिया, गिनी, गोंडार, गोरी, गोल्डकोस्ट, ग्वाडा. जा ती ति हा स.—गल्ल.

**यूरोप**, ऐ ति हा सि क.—ग्वीलोटीन. च रि त्रें.—गॅम्बेटा लीऑन, गॅरिबाल्डि, गीझो, गुस्टाव्हस, ग्लॅडस्टन, ग्रिडो, ग्वीचिआर्डीनी, ग्वेनेव्हीअर, ग्वेरिकआटोव्हान. प्रा दे शि क गर्गोव्हिया, गॅलॅट्झ, गॅलिपोली, गॅलिशिया, गॅल्वे, गॉटिंगे गार्डा, गॉल, गोझो, गोथा, ग्रॉडनो, ग्रीनलंड, ग्रीनिच, ग्रे ग्रेटनाग्रीन, ग्रेटब्रिटन, ग्लासगो, ग्लूस्टर, ग्वाडलक्विव नदी. ग्वेर्नसे. जा ती ति हा स.—गॉथ लोक.

**अमेरिका**, च रि त्रें.—गारफील्ड. प्रा दे शि क. गालापागास बेटें, ग्रेनाडा, ग्रेनाडाइन्स, ग्वाटिमाला, ग्व लोपी, ग्वाम, ग्वायना, ग्वायना बॅंकोआ.

**शास्त्रें—प्राणिशास्त्र**—गरुडपक्षी, गवा गाई व म्ह गोमलगाय, गोचीड

**वैद्यक**—गजकर्ण, गंडमाळा गर्भधारण, गर्भविज्ञान गलग्रंथिदाह, गात्रसंकोचन, गात्रोपघात, गालगुंड, गुडघे मोडीचा ताप, ( डेंग्यू ) गुल्म, गोंवर, ग्रंथिरोग.

**वनस्पती**—गरमल, गवत, गवती चहा. गवार, गव्हला गहूं, गांजा व भांग, गुग्गुळ, गुलछबु, गुलतुरा, गुलबाशी, गुलाब, गुळवेल, गेळ, गोकर्णी, गोखरु, गोमाटी, गोरखचिंच, गोगडू, गोराण.

**रसायन**—गंधक, गंधकाम्ल, गंधकिलाम्ल, गंधकिसल. च रि त्रें.—गन्हार्ट, गिब्ज, गुईम, गेबर, गेलुसॅक, ग्मेलिन, ग्राहाम, ग्लॅडस्टन, ग्लॅसर, ग्लायर.

**पदार्थविज्ञान**—गुरुत्वाकर्षण, गोलमापक. च रि त्रें.—गिलबर्ड, गेस्लर, ग्रुव्ह, ग्रे.

**गणितशास्त्र**—गणितशास्त्र. च रि त्रें.—गौस.

**खनिजविज्ञान**—गोमेद, ग्रॅफाइट, ग्रानाइट.

**औद्योगिक**—गटापर्चा, गालिचे, गंगावन, गुलाल, गूळ, गोंद, गिलसरिन. च रि त्रें.—गणपत कृष्णाजी.

**तत्त्वज्ञान**, च रि त्रें.—ग्रीन.

**ज्योतिष**—गुरु, ग्रह, ग्रहण. च रि त्रें.—गंगाधर, गणेश दैवज्ञ, गॅलिलीओ, ग्रॅट रॉबर्ट.

**सांस्कृतिक व सामाजिक**—गुलामगिरी, गोंदणें.

**सांप्रदायिक**—गणेशचतुर्थी, गर्भाधान, गाणपत्य, गुरुकुल, गृहस्थाश्रम, गैबीनाथ, गोकुलाष्टमी, गोत्रें, गोरखनाथ, गोरक्षण, गोराकुंभार, गोसावीनंदन.

**वाङ्मय**, सं स्कृ त —गंगाधरकवि, गणेशपुराण, गरुडपुराण, गीता, गृह्यसूत्रें, गोपथब्राह्मण, गोवर्धनाचार्य, गोविंद टक्कुर, गौडपादाचार्य, गौतमधर्मसूत्र. म रा ठी.—गंगाधर सरस्वती, गिरिधर रामदासी, गुंजीकर, गुणे, गोडबोले, गोखले. गु ज रा थी.—गुजराथी वाङ्मय. पो र्तु गी ज.—गॅरेट. गॉ थि क.—गॉथिक वाङ्मय. पै शा च.—गुणाढ्य. ज र्म न —गोएटे. य हु दी.—गोल्डस्टकर आ ग्ल.—गोल्ड स्मिथ, ग्रीन, ग्रे. **नाट्यशास्त्र**, च रि त्रें.—गॅरिक.

**इतिहास**, च रि त्रें.—गार्डिनर, गिबन, ग्रीन, ग्रोट. ग्रॅंटडफ.

**कायदा**—गहाण, ग्रंथप्रकाशनाचा मालकी हक्क (कॉपीराइट)

**शासनशास्त्र**—गणसत्ताक राज्यपद्धति.

**अक्षरविकास**—ग.

येणेंप्रमाणें.—खनिज द्रव्याची झाडाच्या वाढीला अति वश्यकता असून ऊन, पाऊस, वारा व हवा वगैरेंचा द्रित ( डॉर्मंट ) असलेल्या पोषक द्रव्यावर मोठा परि-म होऊन तीं झाडास मिळण्याजोगीं होतात. पोटॅश, स्फेरस् व नायट्रोजन याची झाडाच्या पोषणास फार वश्यकता आहे या करवतांचें महत्व पहिल्यान जर्मन लोकाना नून आलें, व त्यानीं लिपूझिग्जव ऽ मोकर्न येथें १८५१ लीं एका प्रयोगक्षेत्राची स्थापन केली. व आता तेथें सलीं क्षेत्रें १०० वर आहेत. सर्व जगभर प्रसिद्ध असलेलें देमस्टेड् प्रयोगक्षेत्र हें सन १८४३ सालीं स्थापन झालें. र लो यानें आपल्या प्रयोगास राघ्यापूर्वी १० वर्षे सुरुवात लेली होती. इ. स. १८४३ सालीं त्यास गिल्बर्टचें हाय्य मिळालें. इ. स. १८८९ सालीं सर जेलॉज यानें हें योगक्षेत्र ब्रिटिशसरकारच्या स्वाधीन केलें इ. स. १८४७ सून या प्रयोगक्षेत्रामार्फत सुमारें ८०–९० निबंध प्रसिद्ध ाले आहेत याप्रमाणें पाश्चात्य देशातील खतासंबंधीं ोधाची पूर्वपीठिका झाली. आपल्याकडे वेदकालापासून री खताचें महत्व अवगत आहे तरी अशा तऱ्हेचे शोध वीं केलेले आढळून येत नाहींत.

हलीं झाडात अनेक मिश्र जातीचे पदार्थ कार्बन्, हाय-ड्रोजन्, ऑक्सिजन व नायट्रोजन याच्या मिश्रणानें झालेले ाढळत त. हे वाळलेल्या झाडपाल्याच्या पदार्थांत सुमारें ेकडा ९५ या प्रमाणात आढळतात, व बाकी राहिलेलें ेकडा ५ हें प्रमाण खनिज द्रव्याचें असून तें जमिनींतून मेळतें. हीं द्रव्यें झाडाच्या वाढीला अत्यावश्यक आहेत हीं र नसतील तर वातावरणातील कार्बन्, पाण्यातील ायट्रोजन् व ऑक्सिजन् व जमिनींतील अगर वातावर-ातील नायट्रोजन् हे झाडात वाढू शकणार नाहींत. एकं-रींत असें दिसून येतें कीं, जगातील वाढणाऱ्या वस्तूंतील र्व पदार्थ वातावरण, पाणी व जमीन यातून येतात.

वर निर्दिष्ट केलेल्या द्रव्यापैकीं वातावरणातील मिळ-ाऱ्या वस्तूंचा साठा इतका प्रचंड आहे कीं, तो केतीहि पे पिकें घेतलीं तरी संपावयाचा नाहीं, परंतु जमिनींतून मेघणाऱ्या पदार्थांचा साठा हा पुरेसा नसून तो सर्वस्वी शेत ारणाऱ्या मनुष्याच्या मेहनतीवर अवलंबून असतो, ाकरिता शेतकऱ्याला जमीन ही आवश्यक व फार महत्वाची ाहे.

आपण जर एखाद्या चागल्या एक एकर जमिनींत ८ च खोल थर खणला व त्यातील मातीचें पृथक्करण केलें तर यात दर एकरीं ४०० पौंड नायट्रोजन, ६००० पौंड फास्फे-रिक् ॲसिड् व २०,००० पौंड पोटॅश सापडतो, व खालील ारात इतकींच आणखी पोषक द्रव्यें सापडतात अशा परि-स्थितीचा विचार केल्यास आपल्याला हजारों वर्षेपर्यंत विन ातानें चागलीं पिकें आलीं पाहिजेत असें वाटतें, परंतु तसें ोत नाहीं. याचें कारण हीं वरील सर्व द्रव्यें द्राव्य स्थितींत नसतात, तीं जमिनीची मशागत केल्यानें मातीच्या कणावर हवा, उष्णता व पाणी याचा परिणाम होऊन दरवर्षी थोड-थोडीं निद्रित द्रव्यें विद्राव्य ( जागृत ) होऊन पिकास घेता येतात. या द्रव्याना भर घालण्याकरिता जमिनीला दर वर्षी थोडथोडें खत दिलें पाहिजे. पिकें पोषक द्रव्यें कोणत्या प्रमाणात घेतात याचा खुलासा खालीं दिलेल्या आकड्यावरून सहज होईल

| एकरीं उत्पन्न | पौंड | नायट्रोजन् | फास्फेरिकॲसिड | पोटॅश |
|---|---|---|---|---|
| गहूं धान्य | १८०० | ३३ | १६ | ९ ८ |
| " काड. | ...... | १५ | ४ ७ | २५ ९ |
| वाल धान्य | १८०० | ७७ | २२·८ | २४ ३ |
| " पाला | ...... | २९ | ६ ३ | ४२ ८ |
| बटाटे | १३४४० | ४७ | २१ ५ | ७६·५ |

वरील आकड्यावरून असें सिद्ध होतें कीं, निरनिराळ्या वर्गां-तील पिकाना निरनिराळ्या प्रकारचीं पोषक द्रव्यें कमी जास्त प्रमाणात लागतात व तीं जमिनींत असणाऱ्या पोषक द्रव्याच्या साठ्याच्या मानानें फारच थोडी असतात गव्हासारख्या तृण धान्याना नायट्रोजन जास्त लागतो, वालासारख्या द्विदल धान्यांना पोटॅश व नायट्रोजन् जास्त लागतो, परंतु या वर्गां-तील पिकाना हवेंतून नायट्रोजन घेता येतो बटाट्याच्या वर्गां-तील पिकाए पोटॅश जास्त लागतो

झाडाच्या राखेंत पोटॅश, चुना, मॅग्नेशिया, फॉस्फेट्स वगैरे अनेक पदार्थ सापडतात, परंतु त्यापैकीं मुख्य नऊ आहेत. झाडें हे पदार्थ दोन तऱ्हेनें घेतात. पाणी, नायट्रेट्स, पोटॅश्, फॉस्फेट्स, चुना, मॅग्नेशिया, व लोखंड हीं पानातून घेतात. वरील अनेक पदार्थ जरी झाडात सापडतात तथापि जमि-नींत पिकाच्या वाढीसाठीं मुख्यत्वकरून कमतरता नायट्रोजन्, फॉस्फरिक् ॲसिड् व पोटॅश या तिहींची भासते. याकरिता ज्या पदार्थांत हीं तीन पोषक द्रव्यें सापडतात मग तीं सर्व पदा-र्थांत सापडोत किंवा वेगवेगळालीं निरनिराळ्या पदार्थांत साप-डोत.या सर्व पदार्थांना खत ही संज्ञा द्यावी याप्रमाणें जे पदार्थ जमिनींत घातले असता जमिनीची सुपीकता वाढते त्यानाहि खत म्हटलें तरी चालेल खतें पाण्यात विरणारीं किंवा काहीं विवक्षित स्थितींत असलेलीं झाडाच्या उपयोगी पड-तात खतापासून जमिनीचा पोत सुधारण्यास किंवा ओलावा राखून ठेवण्यास अथवा जमिनींत असलेलीं द्रव्यें झाडाच्या उपयोगीं पडतील अशा स्थितींत आणण्यासहि मदत होते वर जीं मुख्य तीन द्रव्यें सांगितलीं त्यापैकीं नायट्रोजन हें द्रव्य झाडाचा मुख्य जीव आहे. फॉस्फरस व गधक हीं ओपट द्रव्य तयार होण्यास लागतात पोटॅश हा पदार्थ पिष्टमय पदार्थ तयार होण्यास लागतो व झाडाचा हिरवा रंग हा जमिनींत भरपूर लोखंडाचा पुरवठा असल्याशिवाय यावयाचा नाहीं एकदरीनें पहाता पिकें वाढण्यास व भरपूर पीक होण्यास खत हें

साधन आहे. शरीरास जसें अन्न तसें वनस्पतींच्या पोषणास खत होय. खतांतील द्रव्यें मात्र पिकास सुलभ रीतीनें मिळतील अशा स्थितींत असलीं पाहिजेत. जमिनीचा सुपीकपणा एकसारखीं पिकें करीत गेल्यामुळें नाहींसा होतो व कांहीं वर्षांनीं त्या जमिनींत फायदेशीर पिकें घेणें दुरावास्त होतें. या करिता जमिनीचा सुपीकपणा कायम राखण्यास जमिनींत खत घातलें पाहिजे. कोणी असें म्हणेल कीं, खत घातल्याशिवाय व जमिनीची मशागत केल्याशिवाय रानावनात मोठमोठीं झाडें कशीं होतात, त्याचीं कारणें वेगळीं आहेत. बहुधा डोंगराळ प्रदेशात पाऊस पुष्कळ पडतो; त्यामुळें जमीन हलकी असली तरी झाडें वाढतात, वीं येतें, फळें येतात व वाढ पुरी झाल्यावर हीं झाडें जमिनीवर मरून पडतात, झाडपाला कुजतो व जास्त चागल्या तऱ्हेचीं झाडें होण्यास जमीन तयार होतें. या रीतीनें रानातील जमिनीची सुपीकता नाहींशी होत नाहीं. परंतु ज्या जमिनींत शेती करून पिकें काढून घेतात त्या जमिनीची गोष्ट निराळी पडते. पिकें काढल्यानें कांहीं खनिज द्रव्यें व इतर पोषक द्रव्यांचा साठा कमी होतो या करिता प्रत्येक प्राण्याचा व वनस्पतींचा भाग जर जमिनींत मिसळून टाकिला तर जमीन सुपीक राहील. किंवा माणसाची व जनावराची विष्ठा, शेण व मूत हीं जर पुन्हा जमिनींत मिळवून टाकिलीं तरीसुद्धा जमिनीचा सुपीकपणा फारसा कमी होणार नाहीं. परंतु ज्या ठिकाणीं पीक उत्पन्न होतें त्याच ठिकाणीं धान्य व चारा जनावरास चारून त्याचें शेण व मूत त्याच जमिनींत टाकितात, असें उदाहरण क्वचितच आढळून येईल.

सर्व सुधारलेल्या देशात प्राण्यांचें व वनस्पतींचें उत्पन्न फार लांबपर्यंत विकीला जातें. विष्ठा तर बहुतेक नाल्यात, ओढ्यात, अगर नदीच्या पाण्यात मिसळून सरते शेवटीं समुद्रात जाऊन पडते. याकरिता विष्ठा, शेण, व मूत हीं सर्व काळजीनें राखून जमिनींत घातलीं तर जमिनीची सुपीकता कायम राहील. जे प्राणी पिकावर पोसले जातात त्यांच्याकडून आपण दूध दुभतें, लोंकर, कातडीं, मांस वगैरे घेतों व त्याचा उपयोग विक्रीकडे, खाण्याकडे, वस्त्रप्रावरणाकडे वगैरे करतों. त्यापैकीं जमिनींत फारच थोडा भाग जातो. वनस्पतींच्या उत्पन्नाकडे पाहिलें तर, गहूं, जोंधळा, बाजरी भाजीपाला, फळफळावळ इत्यादि पदार्थ माणसें खातात, जनावरें चाऱ्यावर पोसलीं जातात, यापैकीं जमिनीला परत जाणारें म्हणाल तर थोडेंसें शेण होय, व तेंहि त्याच प्रमाणावर गोवऱ्या करून विकण्यांत, सर्पणाप्रमाणें उपयोग करण्यांत जमिनी सारविण्यांत व घरें व कामी लिंपण्यांत खर्चिलें जातें. शेतें गाळण्यासाठीं गोवऱ्याचा किती खर्च होतो हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे मुताची काळजी कोणी घेत नाहीं. याकरितां खताच्या अभावीं जमिनी निकस झाल्या आहेत.

ज्या खतांपासून झाडास लागणारीं पोषक द्रव्यें मिळतात त्यास पोषक खतें म्हणतात व कांहीं पदार्थ जमिनींत घातले असता त्यापासून पोषक द्रव्यें न मिळता त्याचा परिणाम जमिनीचा पोत सुधारण्यात, ओलावा राखण्यात वगैरे होतो, त्याना उद्धारक खतें म्हणतात

*खतांचे प्रकार.*—खतें मुख्यत्वेंकरून तीन प्रकारचीं असतात: प्राणिजन्य, वनस्पतिजन्य व कृत्रिम अगर रासायनिक प्राणिजन्य खतात शेणखत, मूत व इतर प्रवाही खतें, बकऱ्यामेंढ्याचें खत, सोनखत, पक्ष्यांची विष्ठा, अस्थिजन्य खत, मासळी, कसाईखान्यातील रक्त वगैरे मोडतात. वनस्पतिजन्य खतात झाडांचीं पानें व काड्या, ताग, उडीद, मूग, हुलगे, गवारी, खुरासनी वगैरेंचीं हिरवळ खतें, पाचटाचें खत, निरनिराळ्या प्रकारची पेंड वगैरेंचा समावेश होतो. कृत्रिम खतात नायट्रोजन, पोटॅश व फॉस्फेरिक ॲसिड असणारे क्षार मोडतात. याशिवाय कांहीं कांहीं ठिकाणीं राख, चुना, मीठ, भाजलेली माती, तळ्यातील गाळ वगैरे पदार्थांचा खताकडे उपयोग करतात. ज्या मोठमोठ्या शहरात ड्रेनेजची पद्धत चालू आहे, त्या शहरातील सांडपाणी लांब नेऊन त्या पाण्यावर निरनिराळ्या प्रकारचीं पिकें करण्यात येतात. अशीं सांडपाण्याचीं शेतें पुणें, अहमदाबाद, कराची, अमृतसर, अलाहाबाद वगैरे ठिकाणीं आहेत.

याखेरीज मुंबई इलाख्यातील पुष्कळ पावसाच्या भागात (कोंकणपट्टीत) भात, नाचणी व वरी यांचीं रोपें टहाळ, गोंवऱ्या व गवत वगैरेंनीं भाजून तयार करतात त्याला राब असें म्हणतात. शेणखत, लेंड्यांचें खत व सोनखत हीं मुख्य प्राणिज खतें होत. त्यापैकीं हिंदुस्थानात शेणखताचाच जास्त प्रमाणानें उपयोग करतात व तें प्रत्येक शेतकऱ्याला सर्वांत सुलभ रीतीनें मिळण्याजोगें आहे. हें खत प्रत्येक खेड्यात दरएक शेतकऱ्याचे घरीं गाई, म्हशी, बैल, रेडे व कांहीं कांहीं ठिकाणीं मेंढ्याबकऱ्या ठेवितात तेथें उपलब्ध होतें हें खत शेतीच्या जनावराचें शेण, मूत, गव्हाटा व थोडीशी घरातील राख या पदार्थांचें बनलेलें असतें. परंतु हें खत तयार करण्याच्या कामीं शेतकरी लोक फार निष्काळजी असतात. जनावरें गवत, सरकी, पेंड, चूण, कांहीं धान्यें व कडवा खातात; यामुळें धान्यास अवश्य अशा पदार्थांचा त्याच्या शेणमुतात भरपूर अंश असतो. प्रत्येक पिकाकडील नायट्रोजन, पोटॅश व फॉस्फरिक ॲसिड् याची आवश्यकता असते व हीं पोषक द्रव्यें सर्व शेणखतात असतात. नायट्रोजन पैकीं ⅓ शेणात असतो व ⅔ मुत्रात असतो. सर्व पोटॅशपैकीं ⅓ हिस्सा शेणात व ⅔ हिस्सा मुतांत व फॉस्फरिक ॲसिड् सर्व शेणात असून मुतात फारच थोड्या प्रमाणात सापडतें. त्यापैकीं मुतातील सर्व पोषक द्रव्यें पाण्यात वाहवतात विरघळणारीं असल्यामुळें तें शेणाबरोबर साठविण्याची तजवीज केल्यास शेणखताची किंमत कमी राहील

शेणखतापासून नुसतीं पोषक द्रव्येंच मिळतात इतकेंच नसून त्यात वनस्पतिजन्यहि बराच भाग असतो. त्याच्या योगानें जमिनीचा पोत सुधारतो. चिकण जमीन भुसभुशीत होते, व पोकळ जमिनीच्या अंगीं ओलावा धारण करण्याची शक्ति येते. असे अनेक गुण शेणखतात असल्यामुळें तें साठवून ठेवण्यात हल्लींपेक्षा विशेष खबरदारी घेतली पाहिजे. शेतकऱ्याची सांपत्तिक स्थिति खताच्या साठ्यावर अवलंबून असते. ' जर खताचा साठा तर पैशाला काय तोटा! ' अशी एक म्हण आहे, ती खत चांगलें काळजीनें साठवून ठेवल्यास सर्वस्वी लागू पडते.

बहुतेक शेतकरी मुताची मुळींच काळजी घेत नाहींत, तें बहुतेक सर्व वाया जातें. ते शेणहि व्यवस्थेशीर ठेवीत नाहींत. बहुतेक भागात गोवऱ्या अगर शेणी करून विकण्याचीं किंवा जाळण्याची पद्धत आहे. मोठमोठ्या शहराशेजारील गावात तर गोवऱ्या करून विकण्याचा स्वतंत्र धंदा झालेला आहे. ही पद्धत ज्या ठिकाणीं सर्पणाचा तोटा अगर अति महर्घता असते त्या ठिकाणीं जास्त प्रमाणावर आढळून येते. गोवऱ्या जाळल्यावर जी राख राहते ती सुद्धा राखून जमिनींत घातल्यास जमीन भुसभुशीत होते व पोटॅशचा साठा वाढतो. राखेनें खत लवकर विरघळतें व त्याचा पिकास तावडतोब उपयोग होतो.

हल्लीं शेणखत ठेवण्याची पद्धत पाहिली असता तिच्यापासून पुष्कळ नुकसान होत आहे असें आढळून येतें. ताज्या खताचा पिकावर तात्काळ व हवा तसा उपयोग होत नाहीं. शिवाय खत तयार होताक्षणींच शेतास घालणें अनेक वेळा गैरसोयीचें असतें. यामुळें खत साठवून ठेवणें फार अगत्याचें आहे. खत जितकें कुजवून पिकवावें तितकें चांगलें. परंतु तें कुजत असताना जीं पोषक द्रव्यें तयार होतात त्यापैकीं काहीं हवेंत उडून जातात व काहीं जमिनींत झिरपून जातात, याकरिता तें अशा रीतीनें साठविलें पाहिजे कीं त्यातील अतिशय महत्वाचे पदार्थ नाहींसे न होता ते पिकाच्या उपयोगी पडतील अशा स्थितींत ते राखले पाहिजेत. खेड्यात शेतकरी लोक घराच्या मागें अगर गावाबाहेर एखादा लहान खड्डा करून त्यात शेण, काडी, कचरा वगैरे नेऊन टाकतात. तेथें तें खत उन्हानें वाळतें व पावसाच्या पाण्यानें धुपून जातें. खत कुजत असताना जीं द्रव्यें तयार होतात त्यापैकीं बरीच उन्हाच्या तापानें हवेंत उडून जातात व काहीं पावसाच्या पाण्यात मिसळून वाहून जातात. ही गोष्ट खताच्या ढिगातून येणाऱ्या उग्रट वासावरून सहज लक्षात येईल. अशा दोन्ही बाजूंनीं होणारें नुकसान थोडासा खर्च व जरासी मेहनत घेतल्यास टाळता येईल.

बहुतेक शेतकरीलोक गुरांचें मूत वाया दवडतात, हे मूत शेणाइतकेंच महत्वाचें आहे. गुरांच्या गोठ्याची जागा उंच व टणक जाग्यावर असावी. गोठ्यातील जमीन मुरूम टाकून ठोकून घट्ट करावी. गुरें बांधण्याच्या मागील बाजूस जमिनीला थोडा ढाळ द्यावा व लहानसें गटार करावें व त्याच्या शेवटीं एक लहानसा हौद बांधावा. असें केल्यानें गुरांचें सर्व मूत गटारांतून वाहून हौदात जमा होईल. हें मूत रोजच्यारोज खताच्या खड्ड्यावर नेऊन ओतावें. गटार वगैरे बांधण्याची सोय नसल्यास गोठ्यातील जमीन तयार झाल्यावर तिजमध्यें बाहेरच्या बाजूनें चार फळ्या बसवाव्या व कोपऱ्यात मेखा मारून त्या मजबूत कराव्या. फळ्या मारून झाल्यावर रस्त्यावरील बारीक धूळ अगर शेतांतील भुसभुशीत माती किंवा वाळू व माती यांचें मिश्रण करून तिचा थर या फळ्यांच्या आंत द्यावा. अशा गोठ्यांत जनावरें बांधल्यास त्यांचें सर्व मूत मातींत राहील व त्यातील अति महत्वाच्या पोषक द्रव्याचा संचय वाढेल. ही माती घट्ट झाल्यास रोजच्यारोज जनावरें बाहेर गेल्यावर खुरप्यानें अगर दाताळ्यानें वरचा थर भुसभुशीत करावा. असें केल्यानें मातीची मूत शोषून घेण्याची शक्ति वाढेल. ही मुताची माती दोनतीन आठवड्यानीं काढून खताच्या खड्ड्यात टाकावी व पुन्हा गोठ्यात नव्या मातीचा थर द्यावा. मातीच्या बदली दगडी कोळशाच्या टरफलाचा चांगला उपयोग होतो. खत साठविण्यास खड्ड्याची आवश्यकता आहे. खड्डा आजूबाजूच्या जागेपेक्षां थोडा उंचवट्यावर असावा. तो पाच सहा फूट खोल असावा; परंतु त्याचा आकार शेतकऱ्याजवळ असणाऱ्या जनावरावर अवलंबून आहे. एकंदरींत खड्डा सहा महिन्यात भरेल अशा आकाराच असावा. दोन खड्डे असल्यास बरे. ते आळीपाळीनें भरता येतील. खताचा खड्डा कठिण जागेंत खणावा. त्याचा तळ व बाजू कठीण मुरमाच्या असाव्या. तशी सोय नसल्यास तळ व बाजू शेण व चिकणमातीनें लिपाव्या; परंतु सवडीनुसार तळाला व बाजूला चुनेगच्ची करावी. चुनेगच्ची करण्यात थोडा खर्च येईल परंतु तो सर्व एकदोन वर्षांत भरून येईल. कारण खत कुजत असताना जीं पोषक द्रव्यें तयार होतात तीं जमिनींत झिरपून जाऊन त्याचा नाश होणार नाहीं. ज्याप्रमाणें पोषक द्रव्यें जमिनींत झिरपून जातात त्याचप्रमाणें काहीं हवेंतहि वायुरूपानें उडून जातात. याकरता ज्या ठिकाणीं वार्षिक पावसाचें मान ५० इंचाहून जास्त असेल त्या ठिकाणीं खड्ड्याला लहानसें छप्पर करावें. छपराची पश्चिमेकडील बाजू जमिनीस टेकावी व इतर बाजू मोकळ्या ठेवाव्या. ज्या ठिकाणीं २० ते ३० इंच पर्यंत पाऊस पडतो त्या ठिकाणीं उघड्या हवेंत खड्डा करण्यास हरकत नाहीं. अशा ठिकाणीं दर आठ दिवसानीं खतावर सुमारें चार इंच जाडीचा मातीचा थर दिल्यास पोषक द्रव्यें उडून जाणार नाहींत, तीं मातींत राहतील. खड्ड्यातील खत कुजत असताना फार उबून त्यातील द्रव्यें उडून जाऊं नयेत म्हणून खत दडपून ठेवावें व खताच्या अंगीं कुजण्यास जेवढा ओलसरपणा पाहिजे असेल तेवढाच ठेवावा. एखादे

वेळी खड्डयातील खताची फार घाण सुटत आहे असें वाटल्यास खड्डयात थोडें पाणी ओतावें. या पद्धतीनें खत व मूत राखल्यास शेतकऱ्याजवळ असलेल्या जनावरापासूनच दुप्पट खताचा पुरवठा होण्याचा संभव आहे. या पद्धतींत थोडा जास्त त्रास व खर्च मेहनत आहे.

काहीं ठिकाणीं दिपवाळीपासून पुढें शेतावर आलटून पालटून जनावरें बांधण्याची चाल आहे. प्रत्येक ३–४ दिवसांनीं तळ बदलतात या पद्धतींत मुताचा पूर्ण फायदा मिळतो. ज्यांचीं शेतें गावाजवळ आहेत त्यानाच ही पद्धत अनुकरणीय आहे. मेंढ्या शेतात बसविल्यापासून असाच त्यांच्या लेंड्या व मूत याचा फायदा मिळतो. खानदेश, नाशिक, मध्यप्रांत येथें व कोंकणात काहीं काहीं ठिकाणीं ही पद्धत प्रचलित आहे. ह्या पद्धतींत गुराचा पालट केल्यावर ती जमीन नांगरून टाकावी म्हणजे तीतील पोषक द्रव्यें उन्हाच्या तापानें हवेंत उडून जाण्याला प्रतिबंध होईल.

याशिवाय खत तयार करण्याची दुसरी एक पद्धत आहे. ती इंग्रजींत बॉक्स सिस्टिम म्हणतात. याचा प्रयोग मद्रास येथील सरकारी प्रयोगशाळेंत (सैदापेट) करून पाहिला आहे. या पद्धतींत थोडीशी जास्त जागा व शेण लागतें. सर्व खत व मूत एकाच ठिकाणीं रहातें. या पद्धतींत पाहिल्यानें जमिनीच्या सपाटीपेक्षा सुमारें २॥ फूट खोल सारखा खड्डा करावा व त्याचा तळ व बाजू मजबूत करून बाजूच्या जमिनीपेक्षा एक फूट उंच बांधून काढावा, आणि वर लोखंडी गजाचा पिंजरा करून बसवावा किंवा बाजूला बांबूच्या अगर लाकडाच्या दांड्या माराव्या. कोणीकडून जनावरें बाहेर निघून जाऊं नयेत अशी तजवीज करावी. एका बाजूला जनावरास आत जाण्याला दार ठेवावें व वर छप्पर करावें. असा खड्डा एका जोडीला १० फूट लांब व सुमारें ८ फूट रुंद असला पाहिजे. ह्या खड्डयात बैल बांधावयाचे नसून ते मोकळे ठेवावयाचे असतात. प्रत्येक जोडीला पडद्या घालून वेगवेगळे गोठ्याचे भाग केले पाहिजेत. या खड्डयात एका बाजूला गव्हाण करून जनावरास चारा वगैरे घालावा. रोजचें खत व मूत जें पडतें तें तेथेंच सारखें करून त्यावर रोज नवीन शेण पसरावें. जनावरें आत मोकळीं असल्यामुळें त्यांच्या पायाखालीं केरकचरा व शेण चांगलें तुडवून दडपून बसतें. असा खड्डा तळापासून परपवेतों म्हणजे दोन फूट भरून येण्यास चारपासून सहा महिने लागतात. खड्डा भरला म्हणजे हें खत एकदम काढून वापरण्यास तयार होतें; पुन्हा कुजत ठेवण्याची जरूरी नाहीं. या पद्धतींत प्रत्येक जोडीमागें १० ते १२ गाड्या पावेतों दरवर्षी खत तयार होतें या पद्धतींत खर्च जास्त असून गोठ्याला जास्त जागा लागते. मुबलक जागा असून पाण्याची टंचाई नाहीं असा शेतकऱ्यांनीं ही पद्धत फायदेशीर आहे. नेहमींच्या पद्धतीनें खत सांठविल्यास एका जोडीपासून एका वर्षांत सुमारें पाच गाड्या खत मिळतें, तें या पद्धतीनें दुपटीहून जास्त मिळूं शकतें.

मुंबई इलाख्यातील कारवार जिल्ह्यात शिरसी, सिद्दापूर वगैरे तालुक्यात सुपारीची व वेलदोड्याची लागवड बरीच आहे. तेथें एक एकर बागाईत करणारास ९ एकर फॉरेस्टातील जमीन दिलेली असते. या जमिनीला बेट्टा जमीन अशी संज्ञा आहे. या जमिनींतील वाळलेला झाडपाला व झाडाच्या डहाळ्या तोडून नेण्याची शेतकऱ्याला मुभा असते. येथील बागाईती लोक झाडपाचोळा व शेण यापासून तयार केलेलें खत वेलदोड्याना व सुपारीच्या झाडास देतात. तिकडील खत तयार करण्याची रीति पुढील प्रमाणेः-जनावरें बांधण्याचे गोठे इतर ठिकाणाप्रमाणेंच असतात. परंतु चराऊला मुबलक असल्यामुळें प्रत्येक शेतकरी बरींच जनावरें पाळतो. गुरांना शेज डाहाळ्याची घालतात व तींतच खत व मूत रोज पडतें. हे डहाळ व खत दर दोन दिवसांनीं शेणखळींत नेऊन टाकितात व गुराच्या खालीं नव्या डाहाळ्याची शेज घालतात. शेणखळी दहा बारा फूट खोल असते. हें खत एक वर्षानें उपसतात व दोन झाडाना एक पाटी (४० पौंड) या हिशेबानें खुडल्याना खत देतात. खत खड्डयातून काढितात तेव्हां तें अगदीं ओलें असतें. या पद्धतींत खड्डयावर आच्छादन करून बाजूनें चर खणून पावसाचें पाणी काढून दिल्यास खत जें अगदीं चिखलासारखें होतें व काहीं भाग पाण्याबरोबर वाहून जातो तो जाणार नाहीं.

शेणखतास जास्त महत्व देण्याचें कारण त्यात सर्व प्रकारचीं पोषक द्रव्यें असतात, तथापि सर्व जनावरांचें शेण खत सारखें नसतें. इतर गाईबैलांपेक्षा ज्याना पेंड, धान्य वगैरे चारतात त्यांचें खत जास्त सत्वशील असतें. दुभत्या जनावरांचें खत कमी दर्जाचें असतें. कारण दुधामध्यें महत्वाचीं द्रव्यें जातात. यावरून असें दिसून येईल कीं, शेणखताची किंमत जनावराच्या वयावर, त्याच्या खुराकावर व त्याच्या उपयोगावर अवलंबून असते, इतकेंच नव्हे तर खत चीं किंमत तें सांठविण्यावर व कुजत असतांना काळजी घेण्यावरहि आहे.

प्र वा ही ख त—प्रवाही खत देण्याची चाल मालवण तालुक्यात व महाबळेश्वर येथें आढळून येते. मालवण ( जिल्हा रत्नागिरी ) येथें काथ्याच्या पिकाला प्रवाही खताचा उपयोग करतात. एक चार फूट औरस चौरस व तितकाच खोल खड्डा करून ( तो चुनेगच्ची असल्यास चांगला ) त्यात ओल्या माशाचे तुकडे तुकडे करून घालितात. नंतर खड्डयात पाणी सोडून तें मिश्रण हालवून तयार करितात. हें पाणी रोज पाटानें काथ्याच्या पिकास घालतात. महाबळेश्वरास भाजीपाल्याला गुराच्या मुतात पाणी मिसळून थोडथोडें वर खत प्रत्येक हंगामात तीन चार वेळ देतात. मिलिटरी दुधाच्या कारखान्यात जेथें पाण्याचा पुरवठा मुबलक आहे तेथें गुराच्या मागील गटारांत सारखें पाणी सोडून शेण व मूत दोन्हीहि प्रवाहात मिसळून तें पाणी शेतावर नेऊन त्यावर कडवळाचीं पिकें करितात. असा

प्रपात खडकी ( पुणें ) येथील मिलिटरी डेअरी फार्मांत चालू आहे.

मेंढ्या व बकऱ्यांचें खत — हें खत सुद्धां शेतकरी लोकांच्या आटोक्यांतलें आहे. सर्व शेतकरी मेंढ्या ठेऊ शकत नाहीत. कारण त्यांना चरण्यास व फिरावयास मुबलक जागा लागते. यासाठीं बकऱ्या मेंढ्यांचे कळप बहुतकरून धनगर लोकच ठेवितात व उपजीव्या दिवसांत कळप घेऊन जेथें खताची वाण असेल तेथें जातात व ज्यांना खताची जरूरी असेल त्यांच्या शेतांत मारडून पालटून रात्रीं जाळीं लावून तळ देतात. त्यांचे तळ शेतांत बसविलें असतां त्यांच्या लेंड्या पडून उत्तम खत होतें. लेंड्यापेक्षां त्यांच्या मुतांत विशेष गुण आहे. एक जमीनीचा तुकडा खतावून झाला म्हणजे दुसऱ्या तुकड्यांत जाळीं लावून बकरीं बसवितात. याप्रमाणें सर्व शेत खपेपावेतों क्रम चालतो. या बसविण्याबद्दल शेताच्या मालकास निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या दरानें धनगरास धान्य किंवा रोकड पैसे द्यावे लागतात. गुजराथेंत ५०० मेंढ्या एक रात्रभर बसविण्यास ४८ शेर बाजरी द्यावी लागते. साताऱ्याकडे ८०० मेंढ्या २४ दिवस बसविण्यास पांच मण ज्वारी द्यावी लागते व तिची किंमत सुमारें ३० रुपये होते. मेंढ्यांचें खत व मूत जागच्या जागींच पडत असल्यामुळें त्याचा परिणाम पिकावर चांगला होतो. शेणखतापेक्षां हें खत जास्त पोषक असतें. शेतांत मेंढ्या बसविल्या म्हणजे रात्रींतून त्यांना दोन तीन वेळ उठवितात. असें केल्यानें दर खेपेस मेंढ्या मुततात, व अशा योगानें द्राव्य खताची जमीनींत जास्त भर पडते. एक एकर जमीन चांगल्या तऱ्हेनें खतविण्यास ३०० मेंढ्यांचा कळप सुमारें १० दिवस पावेतों बसवावा लागतो. मेंढ्यांचा तळ जसजसा हालेल त्या प्रमाणें जमीन नांगरणें चांगलें. नांगरटीनें खत जमीनींत चांगलें मिसळलें जातें व पोषक द्रव्यांचा नाश होत नाहीं. एका मेंढऱ्या एका रात्रीच्या लेंड्यांचें वजन १ पौंड ४ औंस होतें व एका रात्रीच्या मुताचें वजन १३ औंस भरतें.

घोड्यांची लीद — या खताचा पाश्चात्य देशांत उपयोग करितात. कारण तिकडे शेतें ओढण्याला मुख्यत्वेंकरून घोडेच लावितात. यामुळें हें खत तिकडे जास्त प्रमाणावर उपलब्ध असतें.

डुकरांची विष्ठा — पाश्चात्य देशांत डुकरें त्यांच्या मांसाकरितां पाळितात व त्यामुळें त्यांची विष्ठा तिकडे विशेष मिळत असून तिचा शेताकडे उपयोग करितात, हिंदुस्थानांतून ठिकठिकाणीं वडार जातीचे लोक डुकरें पाळितात व तीं दक्षिण हिंदुस्थानांत विशेष आढळतात. मद्रास इलाख्यांत कॉइल पट्टीकडे डुकरांची विष्ठा गोळा करून खतासाठीं वापरतात. पाश्चात्य देशांत घोडा, गाय, डुकर व मेंढ्या यांचें खत वापरतात. त्यांच्या पोषक द्रव्यांचें तुलनात्मक आकडे उपयुक्त असल्यामुळें पुढें दिले आहेत. हे आकडे डॉ. विल्यम्. पी. ब्रुक्स यांच्या शेतकी विषयावरील दुसऱ्या भागांतील पृष्ठ २२० यांतून घेतलेले आहेत (आकडे पौंडाचे आहेत ).

हजार पौंड ताज्या विष्टेचें पृथक्करण

| प्राणी | पाणी | नायट्रोजन | फास्फ असिड | अल्कली ( पोटॅश ) |
|---|---|---|---|---|
| घोडा | ७६० | ५० | ३५ | ३ |
| गाय | ८४० | ३० | २५ | १० |
| डुकर | ८०० | ६० | ४५ | ५० |
| मेंढी | ५८० | ७५ | ६० | ३० |

हजार पौंड ताज्या मुताचें पृथक्करण

| प्राणी | पाणी | नायट्रोजन | फास्फ असिड | अल्कली ( पोटॅश ) |
|---|---|---|---|---|
| घोडा | ८९० | १२० | | १५० |
| गाय | ९२० | ८० | | १४० |
| डुकर | ९७५ | ३० | १२५ | २० |
| मेंढी | ८६५ | १४० | ०५ | २०० |

सोनखत — हें प्रत्येक गावांत मिळण्याजोगें आहे. याच्यावर बागाइत पिकें फार उत्तम येतात व कोरडवाहू जमिनीसहि याचा उपयोग करतां येतो. माणसें चांगलें अन्न खातात म्हणून त्याचें खत जास्त कसदार असून तें व्यवस्थित असतें. सरासरी एका मनुष्याची विष्ठा रोज सहा औंस धरल्यास एक वर्षांत उत्पन्न १३५ पौंड भरेल व त्यांत सुमारें एकपूर्णांक तीनदशांश पौंड नायट्रोजन सांपडेल. हें खत कोरडवाहू जमिनीस दर एकरीं सुमारें २६ पौंड नायट्रोजन ( सुमारें शेणखताच्या पांच गाड्यांइतकें ) असणारें द्यावयाचें असल्यास २७०० पौंड द्यावें लागेल म्हणजे वीस माणसांची एक वर्षांची विष्ठा द्यावी लागेल. याहि हिशोबानें मुंबई इलाख्याच्या १,४१,६८,६७१ लोकसंख्येपासून उत्पन्न होणारें खत ७,२८,३३४ एकरांना पुरेल असा अजमास आहे. या हिशोबांत फक्त मैलाच धरलेला आहे. मूत्र वगैरे धरलेलें नाहीं. दोन्ही धरल्यास हें खत जवळ जवळ दीडपट क्षेत्रास पुरेल. या आकड्यावरून सोनखताची किंमत किती आहे हें सहज लक्षांत येईल.

सोनखत तयार करणें — पूर्वीं जेव्हां लोकवस्ती पातळ होती व जमीन मुबलक होती तेव्हां लोक जेथें राहात तेथेंच त्यांची विष्ठा पडे. पुढें वस्ती जास्त होऊन लोक खेड्यापाड्यांत व शहरांत एकजुटीनें राहू लागले तेव्हां विष्ठेची घाण कशी काढावी हा प्रश्न पुढें आला. ती घाण नाहींशी करण्याचे प्रयत्न तऱ्हेतऱ्हेनें झाले. विष्ठेशीं माती मिसळणें, राख मिसळणें, गवताचा केरकचरा मिसळणें वगैरे प्रयत्न झाले. मुंबई इलाख्यांत व त्याप्रमाणेंच मध्यप्रांतांत विष्ठेचा शेताकडे उपयोग माहीत नव्हता. पूर्वीं भंगी लोक विष्ठा ( मैला ) शेतकऱ्यास विकत असत. ही गोष्ट म्युनिसिपालिटी स्थापन होण्याच्या पूर्वींची झाली. परंतु सोनखत तयार करून वाळवून वगैरे विकणें हें अलीकडील आहे.

सुरत फार्म वरील दर एकरी खत व उत्पन्न
( ६ वर्षांची सरासरी )

| खत. | एकरी गाड्या | ज्वारी पौंड | कडबा पौंड | कापूस पौंड |
|---|---|---|---|---|
| मैलाखत | ८४॥ | १४१८ | ३५६२ | ५६२ |
| शेणखत. | ४० | १०३१ | २४७६ | ४१६ |
| ताजा मैला | ४० | १८०८ | ७२०० | ३७४ |
| बिनखती | ... | १०५५ | ११८६ | १३१ |

रत्नागिरी फार्म वरील दर एकरी खत व उत्पन्न

| खत | एकरी गाड्या | भात पौंड | भातेण पौंड. |
|---|---|---|---|
| सोनखत | ३००० | ३१६० | ३०२० |
| बिनखती | ... | २६८० | २३८५ |

जळगाव फार्म वरील दर एकरी खत व उत्पन्न

| खत | एकरी गाड्या | कापूस पौंड |
|---|---|---|
| ताजा मैला | ३४॥ | ९९८ |
| बिनखती | ... | २१३ |

कि त्ये क मा सा हा री प क्ष्या ची वि ष्ठा.—हें गत म्हणजे जलचर पक्ष्यांचें मलमूत्र मिळून झालेली विष्ठा होय. या विष्टेचे ढीगच्या ढीग पेरू देश (दक्षिण अमेरिका) व त्याच्या आसपासच्या बेटांच्या सर्व किनाऱ्यावर आढळतात. हे ढीग तयार होण्यास कित्येक शतकें गुदरल्या असल्या पाहिजेत. या ठिकाणीं पाऊस बिलकुल पडत नाहीं यामुळें त्यातील द्रव्यें वाहून जात नाहींत हें खत गव्हास चांगलें मानतात. हें दर एकरीं दोन तीन हंड्रेड-वेटपर्यंत घालावें. हिंदुस्थानात अशा तऱ्हेचं खत फक्त ब्रह्मदेश व अंदमान बेटात सापडतें व असलें खत आसामांतील मळेवाले लोक निकोबार बेटातून आणितात

हिंदुस्थानात कोंबडी, बदकं, कबुतरें वगैरे पक्ष्याची विष्टा इकडे तिकडे पडून वाया जाते. ती मिळेल त्या ठिकाणीं साठवून ठेऊन खताकडे तिचा उपयोग केल्यास फायदा होईल. एका कोंबडीपासून एका वर्षात सुमारें १२पौंड एका टर्कीपासून सुमारें २५ पौंड व एका बदकापासून १८ पौंड खत मिळू शकतें या खताच्या पृथक्करणाचे शेकडा प्रमाणाचे आकडे पुढील प्रमाणें आहेत

पक्ष्याच्या ताज्या विष्टेचें पृथक्करण.

| प्राणी | पाणी | नायट्रोजन | फॉस्फॉरिक ॲसिड | अल्कली पोटॅश वगैरे |
|---|---|---|---|---|
| कोंबडी | ५६ | १.६० | १.५० १.०० | ०.८–०.९० |
| टर्की | ७३.१० | ५५ | ०.५४ | ०.९५ |
| बदक | ५६-६० | १.०० | १.४० | ०.६२० |
| कबुतर | ५२-७० | १-७१ | १ ७५,२.०० | १.००ते १-२५ |

फ ला ई खा न्या तीं ल र क्त व गै रे.—हें रक्त हल्ली वाळवून परदेशी रवाना होतें. यात शेकडा सुमारें पाच ते १० टक्के नायट्रोजन असतो या रक्ताचा उसाला वर खत दिल्यास चांगला उपयोग होतो

हा डां चें ख त.-हिंदुस्थानातील प्रत्येक मोठमोठ्या ठिकाणाहून शेकडों खंडी हाडें परदेशीं जातात व त्यामुळें या देशातील एक मोठें उपयोगी असें खताचें द्रव्य नाहींसें होतें. मेलेली गुरें व दुसरीं बहुतेक सर्व जनावरें यांची हाडें दऱ्याखोऱ्यात पडलेलीं असतात, हीच हाडें बाहेर देशीं जातात. हाडांचा व्यापार करणारे बहुतेक मुसलमान, महार, यूरोपियन हेच असतात. ते लोकांकडून आसपासच्या ठिकाणाहून हाडें वेंचून आणवितात अशा जमा करून आणलेल्या हाडाचे ढीग काहीं स्टेशनावर दृष्टीस पडतात हा व्यापार फायद्याचा असल्यामुळें दिवसें-दिवस वाढतच आहे. पूर्वी खेडेगावानिहाय हाडकी आणि हाडवळा ( मेलेलीं गुरें फाडण्याच्या जमिनी ) या नांवाचीं शेतें असत या शेतात इतर शेतापेक्षा पीक चांगलें येऊन सकस व जोरदार उत्पन्न येत असे हल्ली शेतकरी लोक प्रत्यक्ष हाडाचा शेतीस खरा उपयोग करीत नाहींत फार्ही काहीं ठिकाणीं आपोआपच हाडें कुजून जें काय खत मिळत असेल तेवढेंच. कारण जातिभेद व देवभोळेपणाच्या जुन्या समजुतीमुळें हिंदू लोकाच्या हातून हाडाच्या पुडीचा दुसऱ्या कोणत्याहि रीतीनें खत तयार करण्याच्या प्रयत्न झाले नाहींत. हिंदुस्थानात हाडें पुष्कळ आहेत हाडात नायट्रोजन व फॉस्फरस असतो. या द्रव्याचा इकडील जमिनीस फार उपयोग होतो हल्ली कोंकणात व बंगाल्यात या खताचा भातशेतींत थोडा थोडा उपयोग दिसून येऊं लागला आहे. बंगाल्यात हें खत भात, बटाटे, ऊंस या पिकास चांगलें मानतात. त्याचप्रमाणें या खताचा नारळीच्या बागाना फळ झाडाना, त्याप्रमाणेंच चहा व काफीच्या मळ्यात जास्त उपयोग होतो असें अनुभवास येत आहे परंतु हाडाना बाहेर जास्त भाव येत असल्यामुळें तीं येथें फारसें परवडत नाहीं.

जमिनींत हाडाचें खत घालावयाचें असल्यास हाडाची जितकी बारीक पूड होईल तितकी चांगली, कारण ती लवकर कुजते. युरोप, अमेरिका व इतर सुधारलेल्या देशात हाडाचें खत करावयाचें असल्यास त्याच्यावर गंधकाम्ल ओतून तीं विरवतात. या मिश्रणानें झालेल्या खतास सुपर-फास्फेट ऑफ लाइम म्हणतात हा पदार्थ पाण्यात फारच लवकर विरघळतो; कारण हाडातील सेंद्रियद्रव्यें गंधकाम्लानें लवकर द्रवतात. या रीतीनें तयार केलेल्या हाडाच्या खताचा जसा उपयोग होतो तसा दुसऱ्या कोणत्याहि रीतीनें केलेल्या हाडाच्या खताचा उपयोग होत नाहीं. हिंदुस्थानात गंधकाम्ल तयार करण्याचे कारखाने फार थोडे आहेत व यामुळें येथें हें अम्ल फार महाग पडतें. जों जों हें खत येथें पुष्कळ तयार होईल, व मिळेल तों तों त्याचा खप जास्त जास्त होत जाईल पीठ व सुपरफॉस्फेट ऑफ लाइम या दोनांहि ॰

जमिनीस दिलें असता त्यापासून जमिनीवर सारखाच परिणाम होतो. परंतु हा परिणाम जमिनीवर होण्यास दोन प्रकारच्या खतास वेळ मात्र कमी जास्त लागतो. सुपरफॉस्फेट्चा परिणाम पिकावर त्वरित होतो. या खताची पूड भरड असते व ती बीं पेरताना त्या बियांत मिसळावी म्हणजे त्यापासून पिकास चांगला उपयोग होतो हाडाच्या पिठाची स्थिति सुपरफॉस्फेटच्या खताच्या उलट आहे. हें खत जमिनीस दिल्यापासून एक दोन वर्षांनंतर त्याचा उपयोग पिकास होऊं लागतो याकरता हें खत फळ झाडास चांगलें

हा डा चें ख त त या र क र ण्या ची सोपी री त — दोन टोपल्या हाडाचा चुरा, तीन टोपल्या ताजा भाजलेला चुना व सहा अगर आठ टोपल्या लाकडाची अगर गोवऱ्याची राख याप्रमाणें घेऊन एका मोठ्या खड्ड्यात थरावर थर क्रमानें घालावेत खड्डा भरत आला म्हणजे वर गवताचा चुरा व मातीचा एक थर घालावा. नंतर त्या खड्ड्यात पाणी सोडून द्यावें असें केल्यानें खत सुमारें सहा महिन्याच्या आत तयार होतें.

मा स ळी चें ख त —खताचे मासे मुंबई इलाख्यात कोंकण, कारवार, रत्नागिरी, कुलाबा आणि ठाणें व मद्रास, बंगाल वगैरे समुद्रकिनारी भागात मुबलक सापडतात. या खताचा कोंकण प्रांतीं भात, नाचणी, नारळ व इतर बागाईत पिकें करण्याच्या कामीं जास्त उपयोग करितात मासळीचें खत उसाकरता घाटावर जास्त प्रमाणांत जातें. घाटावर उंसाला इतर खतें देऊन मासळीचें खत पावसाळी दर एकरीं एक टन पावेतों वरखत (टॉपड्रेसिंग) देतात. हें खत दिल्याबरोबर तावडतोब जमिनींत मिसळून टाकिलें पाहिजे, नाहींपेक्षा कोल्हे, कुत्रे, पाखरें, रानडुकरें वगैरेंपासून अति त्रास होतो. हल्लीं मद्रास इलाख्यात मलबार किनाऱ्यावर माशाचें तेल काढण्याचे शेंकडों कारखाने निघाले आहेत. त्या कारखान्यात तेल काढून तें बाहेर पाठवितात व मासळीचा बाकी राहिलेला कुटा 'फिश गुऑनो' या नावाखाली विकला जातो याचा खताकरिता चांगला उपयोग होतो. मासळीचें खत लवकर द्राव्य स्थितींत येतें व त्यात पिकास लागणारीं सर्व पोषक द्रव्यें कमीजास्त प्रमाणांत असतात. या खतात नायट्रोजन, पोटॅश, फॉस्फरिक ॲसिड आणि चुना हीं सर्व द्रव्यें असून तीं सर्व द्राव्य स्थितींत असतात बाजारात पाच प्रकारचें मासळीचें खत मिळतें. ढोमा, सुकट, टारली, चिंगली व पंचमेळ या प्रत्येक जातीच्या खताचा वेगवेगळा भाव असतो. त्या सर्वांत चिंगळी जास्त पोषक असून ती जास्त महाग विकली जाते. मि मिगेट यानीं केलेलें पृथक्करण पुढें दिलें आहे.

| माशाचें नाव | नायट्रोजन शेंकडा | फॉस्फरिक ॲसिड शेंकडा | पोटॅश शेंकडा |
|---|---|---|---|
| ढोमा | ८.२८ | ६.२५४ | १.८८ |
| सुकट (पिवळा वार्णाक) | ६.०२ | ३.१७५ | १.१६ |
| भुईमासा (टारली) | ६.०३ | ५.७३० | २.१२ |
| चिंगळी | ७ ६७ | ४.४२१ | १.६८ |
| पंचमेळ | ४.५४ | २.९७४ | १.३१ |

हि र व ळ ख तें, तागः—ताग हें पीक इतर पिकापेक्षा जमिनींत नागरून टाकण्यास फार उपयोगी आहे. अशा पद्धतीस कोठें कोठें वेवड करणें असें म्हणतात. ताग इतर पिकापेक्षा लवकर वाढतो, वजनात पुष्कळ भरतो व लवकर कुजतो साधारणपणें हें पीक दोन महिन्यानीं तयार होतें व त्याचें ओलेपणीं दर एकरीं १८००० तें २८००० पौंडपर्यंत वजन भरतें यात आठ ते पंधरा शेण-खताच्या गाड्यात सापडतील इतकीं पोषक द्रव्यें जमिनींत परत बुजविलीं जातात. शिवाय या खतानें जमिनीचा पोत सुधारतो. तागाचें पीक करून त्याचा खता ऐवजीं उपयोग करणें कमीजास्त प्रमाणानें सर्वत्र आढळतें. परंतु त्याच्या बुजवणींत अनेक प्रकार आढळून येतात. उदाहरणार्थः—कोणी भातखाचरात एक महिन्याचा ताग झाला म्हणजे बैलाकडून तो पाण्यात तुडवितात. कोणी रब्बीच्या पिकासाठीं ताग करितात तेव्हां उभ्या पिकात नागर घालितात, कोणी ताग काठ्यानीं झोडून पाडून त्याच्या मागे नागर घालितात. कोणी उभें पीक कुळवाच्या दिंडानें पाडून मग तें नागरानें मोडितात. कोणी अगोदर ताग कापून अगर उपटून मग तो नागराच्या तासात टाकितात. या सर्व प्रकारापैकीं कापून अगर उपटून मग तासात मूठ-मूठ टाकणें फायदेशीर आहे. अशा रीतीनें ताग गाडल्यास बाहेर काडी कुडी उघडी रहात नाहीं, तो लवकर कुजतो व त्याचा त्याच्या मागून पेरलेल्या पिकास जास्त उपयोग होतो. ही बुजवणी लाकडी नागरानें करितात, व त्याला खर्च बराच येतो याकरिता बुजवणी लोखंडी नागरानें केल्यास खर्च कमी येऊन बुजवणीहि उत्तम प्रकाराची होते.

हलक्या जमिनींत वेवड करण्यास मूग, कुळीथ, खुरासणी यासारखीं पिकें चांगलीं समजतात. भारी जमिनींत गाडण्यासाठीं ताग, उडीद, नीळ, गोवारी यासारखीं पिकें, पसंत करावीं. मद्रासेकडे भात खाचरात धइंन नावाची शेवरीची जात आहे, तिचें पीक करून तें गाडतात.

उं सा क रि ता पा च टा चें ख त.—उसाच्या वाळलेल्या पानास पुण्याकडे पाचट म्हणतात. याचा उंसाच्या रानात जमिनीचा पोत सुधारण्याकडे भरीच्या खताऐवजीं चांगला उपयोग होतो तागाचें पीक करून तें गाडण्याचीहि वहिवाट आहे, परंतु हें पोत सुधारण्याचें काम पाचट गाडल्यानें बऱ्याच कमी खर्चांत भागतें. ऊस चांगला असल्यास दर एकरीं सुमारें पाच टन पावेतों पाचट निघतें.

याकरिता गूळ राखून जें पाचट शिल्लक राहील तें शेतांत जाळून न टाकतां त्याचा भरीच्या खताप्रमाणें उपयोग केल्यास शेणखताची काही अंशीं तरी उणीव भरून येईल. याचे तुलनात्मक प्रयोग भरीच्या खताऐवजीं पाच वर्षे पावेतों मांजरी फार्म ( पुणें जिल्हा ) येथें करून पाहिले त्यांची पाच वर्षांची सरासरी पुढें दिल्याप्रमाणें:—शेणखत ३० गाड्या घातलें तर गूळ दर एकरी ९९५० पौंड वजनी होतो. व पाचटाचें खत पाच टन ( एक एकरांतून निघालेलें ) घातल्यास एकरी गूळ ९६०० पौं. वजनी होतो. पाचट हें साधारणपणें शेणखताची बरोबरी करितें. वरील उत्पन्न नुसतें भरीच्या खतावर झालेलें नव्हतें. शिवाय इतर वरखतें दिलेलीं होतीं.

*पाचट गाडण्यापूर्वी खताच्या खड्यात एक थर पाचट व एक थर माती अशा प्रमाणें घालून तें एक पावसाळा कुजूं द्यावें व दुसऱ्या वर्षी शेतात पसरावें अगर उंसापूर्वी खरीपाचें पीक काढल्याबरोबर त्याची ताग्याप्रमाणें लोखंडी नांगरानें गाडणी करावी.* जमिनींत भरपूर ओलावा असल्यास हें सर्व एक दोन महिन्यात कुजून जातें.

तेलाची पेंड:—शेणखत, सोनखत, लेंड्या वगैरेंशिवाय प्रत्येक शेतकऱ्यास मिळण्याजोगीं दुसरीं खतें म्हटलीं म्हणजे सर्व तऱ्हेच्या पेंडी होत. पेंडीचीं खतें बागाईत पिकांना चांगलीं. या खताची किंमत जास्त असल्यानें अशा महागाईच्या पेंडी घेऊन त्या कोरडवाहू पिकांना घालणें पुरवणार नाहीं. पेंडींत तेल जितकें कमी असेल तितकी ती खताला चांगली. पेंडींत तेल असल्यानें ती कुजत नाहीं. पेंड जितकी जुनी असेल तितकी चांगली. गुजराथ, पुणें व ठाणें जिल्ह्यात जेथें जेथें बागाईत आहे तेथें तेथें एरंडी व करंजीच्या पेंडीना जास्त उपयोग करितात. बाजारांत दोन तऱ्हेच्या पेंडी मिळतात. *एक देशी घाणीच्या व दुसऱ्या संचाच्या. या दोहोंपैकीं घाणीच्या पेंडीचा पिकावर लवकरच परिणाम होतो. संच्यातील पेंड तयार करितांना पहिल्यानें वाफ भरवून तें वापरतात, यामुळें त्यातील अल्ब्युमिनाइड्स अद्राव्य स्थिति पावतात;* सबब त्याचा पिकावर परिणाम होण्यास दिरंगाई लागते. पेंडी दोन तऱ्हेच्या आहेत. गुरांना खाण्यालायक व खाण्यास नालायक. *या दोहोंचा खता*करिता चांगला उपयोग होतो. करडई, कारळे, भुईमूग तीळ, सरकीची पेंड वगैरे गुरांच्या खाण्यालायक पेंडी उंसाला नेहमीं वापरण्यात असलेल्या एरंडी व करंजी यांच्या *पेंडीपेक्षा जास्त फायदेशीर पडतात असा अनुभव मांजरी* येथील सरकारी शेतावर आलेला आहे. याशिवाय रायन ( खिरणी ), मोहा, उंडी, निंब वगैरे पेंडी खताला चांगल्या आहेत. गुजराथेंत एरंडीची पेंड स्वस्त मिळते. खानदेशात सरकी स्वस्त मिळते. देशावर करडई, कारळा, भुईमूग वगैरेंच्या पेंडी माफक दरानें मिळतात. याकरितां जेथें जेथें जी *पेंड स्वस्त मिळत असेल तेथें ती वापरावी. पेंडीचे प्रकार व गुणधर्म पुढें दिले आहेत.*

*एरंडी:—ही स्वस्त असते. हिचा पिकावर परिणाम कर*डईच्या पेंडीप्रमाणेंच लवकर होतो. ही पेंड कडू असल्यामुळें वाळवी कमी होते. करंजी.-हिचाहि गुण एरंडीप्रमाणेंच होतो. करडई:—दोन तऱ्हेच्या पेंडी मिळतात. एकींत बीं भरडून टरफलें काढून मग पेंड करतात; ही पेंड जास्त जोमदार असते. *टरफलासहित केलेली पेंड कमी दर्जाची* असते. ही लवकर खराब होत नाहीं. व ती टिकाऊ असून गुरांना चारतात. खुरासणी अगर रामतीळ:—ही गुरांना चारतात. हिला लवकर बुरसा चढतो. एरंडीपेक्षा परिणाम पिकावर लवकर होतो तिळाची पेंड:—ही गुजराथ, खानदेश वगैरे ठिकाणीं गुरांना जास्त चारतात. भुईमूग:-ही पेंड सर्व पेंडींत जास्त पोषक असते. ही सर्व ठिकाणीं गुरांना चारतात. तेल *काढतांना शेंगदाण्यांत करडई मिसळतात.* या पेंडीला बुरसा लवकर चढतो. सरकीची पेंड:—ही सर्व पिकांना चांगली असते. गुरांना सरकीपेक्षा सरकीची पेंड उत्तम. सोवन्याची पेंड:—ही बहुतेक गुरांना चारतात; पण ती खवट झाली म्हणजे खताकडे उपयोग करण्यास हरकत नाहीं. हींत शेंकडा तीन नायट्रोजन असतो. निंबाची पेंड:—ही गुजराथेंत व सातारा जिल्ह्यात मिळते. ही कडू असते. या पेंडीनें *वाळवी कमी पडते.या पेंडींत शेंकडा५पर्यंत नायट्रोजन असतो.* उंडी-ही कोंकणात मिळते. हिचा खताकडे जुजबी उपयोग होतो. मोहा:—ही गुजराथेंत मिळते. पंचमहाल *जिल्ह्यांतहि* थोड्या प्रमाणानें गुरांना चारतात. ही पेंड देऊन तावडतोब ऊंस लावल्यास पेराचे डोळे मरतात ऊंस उगवून आल्यावर ती दिल्यास वाईट परिणाम होत नाहीं.

पेंडींतील मुख्य पोषक द्रव्य नायट्रोजन हें होय. त्याची वर्गवारी पुढीलप्रमाणें आहे. तुलनेकरितां शेणखत, *सोनखत, मेंढ्याचें खत, घोड्याची लीद व कृत्रिम खतें वगैरेंचे आंकडे दिले आहेत.*

| खताचें नांव | नायट्रोजन | बाजारभाव दर टनास | नायट्रोजन दर पौंडास |
|---|---|---|---|
| | शेंकडा | रु. आ. पै | रु. आ. पै |
| शेणखत | ०. ७ | ६— ८—० | ०— ५—६ |
| सोनखत | १. ० | ११— ४—० | ०— ८—० |
| मेंढ्याचें खत | १. ० | ११— ४—० | ०— ८—० |
| घोडेखत | ०. ५ | ५— ८—० | ०— ८—० |
| एरंडीची पेंड | ४. ० | ६५— ४—० | ०—११—८ |
| करडई | ६. ५ | ९३— ४—० | ०—१०—३ |
| भुईमूग पेंड | ७. ० | ६५— ४—० | ०— ६—८ |
| कारळा पेंड | ५. ० | ४२—१२—० | ०— ६—८ |
| सरकी „ | ५ ० | ४६—१२—० | ०— ६—८ |
| करंजी „ | ४. ० | ३७— ४—० | ०— ६—८ |

| खताचें नांव | नायट्रोजन | बाजारभाव दर टनास | नायट्रोजन दर पौंडास |
|---|---|---|---|
| मासळी | ७. ० | ८४– ०–० | ०– ८–७ |
| कसाईखान्यातील रक्त वगैरे | १०. ० | १६०– ०–० | ०–११–५ |
| सल्फेट ऑफ अमोनिया | २०. ० | २६५– ०–० | ०– ९–७ |
| नायट्रेट ऑफ सोडा | १४ ० | २८०– ०–० | ०– ०–० |
| नायट्रेट ऑफ पोटॅश | १२ ० | १६८– ०–० | ०–१०–० |
| नायट्रेट ऑफ लाईम | १३. ० | २००– ०–० | ०–११–० |

कृ त्रि म ख तें—सर्व तऱ्हेच्या पिकास मुख्यत्वेंकरून तीन पोषक द्रव्यांची जरूरी असते. तीं नायट्रोजन, पोटॅश व फॉस्फेरिक ॲसिड हीं होत या तिन्हींपैकीं हिंदुस्थानातील जमिनींत नायट्रोजन द्रव्याचा फार तुटवडा आहे. अशीं एक किंवा दोन पोषक द्रव्यें असणारी खतें यास कृत्रिम खतें म्हणतात अशा खताचा उपयोग यूरोप, अमेरिका वगैरे ठिकाणीं फार प्रमाणानें होत असून तिकडील शेतीचें उत्पन्न बरेंच वाढलें आहे आपले इकडे जेथें यूरोपियन मळेवाले आहेत अशा ठिकाणींच फक्त कृत्रिम खताचा उपयोग होऊं लागला आहे. अशीं ठिकाणें सीलोन, म्हैसूर, कूर्ग, आसाम, बहार, बंगाल वगैरे होत. हल्लीं सर्वमान्य जें शेणखत त्याचा फार तुटवडा भासूं लागला आहे आणि ज्या ठिकाणीं पाऊस पुरेसा पडतो किंवा कालव्यावर पिकें करतात तेथें हें खत फारच महाग होत चाललें आहे नीरा कालव्यावर जेथें जास्त बागाईत आहे तेथें तर वाळलेलें शेणखत व मेंढ्या-बकऱ्यांच्या लेंड्या या बाहेर गांवाहून पोत्यांत भरून विकण्यास येतात दर पोत्यास ४ ते ६ आणे किंमत पडते. ज्या ठिकाणीं उंसाच्या पिकाला दर एकरीं ५०।६० गाड्या खत घालावें लागतें तेथें खत देणें फार खर्चाचें झालें आहे. पैसे असले तरी सुद्धां खत मिळत नाहींसें झालें आहे शेणाच्या ऐवजीं गोवऱ्या सर्पणाकरितां लावतात. व जेथें सर्पणाचा तुटवडा आहे तेथें हें सर्पण वापरणें बंद होणें शक्य नाहीं जेव्हां शेणखत मिळेनासें झालें तेव्हां लोक सहजच पेंड, मासळी, हाडाची पूड, खाटकाच्या येथील रक्त वगैरेचा उपयोग करूं लागले.पण जसजसा पेंडीचा,मासळीचा वगैरे जास्त खप होऊं लागला तसतशीं खतें महाग होऊं लागलीं गळिताच्या धान्याच्या पेंडी येथें जास्त प्रमाणांत होऊं लागल्याशिवाय पेंडीचे भाव उतरत नाहींत. ज्या अर्थी शेणखताची महर्गता होऊं लागली आहे, पेंडीचा व मासळीचा भाव वाढूं लागला आहे, हाडांना परदेशांत जास्त किंमत येऊं लागली आहे त्याअर्थी हिंदुस्थानांत कृत्रिम खताचा प्रसार झाल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. ह्या खताकरितां हिंदुस्थान सर्वस्वी यूरोपवर अवलंबून राहील, कारण हिंदुस्थानांत सांपडणारीं खतें म्हणजे उत्तरहिंदुस्थानांत सांपडणारा हलक्या दर्जाचा सुरासार, मध्यप्रांतांत फारच थोड्या प्रमाणावर तयार होणारें सल्फेट ऑफ अमोनियाचें खत व दक्षिण हिंदुस्थानांत सांपडणारें फॉस्फरिक ॲसिडचे खनिज पदार्थ होत. ( असें जरी आहे तरी नायट्रेट तयार करण्याचे कारखाने इकडे निघण्यासारखे आहेत ) बाकी सर्व खतें बाहेरूनच येतात, व पुढें दिलेल्या आंकड्यांवरून हें प्रमाण वर्षानुवर्ष वाढतच आहे असें दिसून येईल

| सन. | टन |
|---|---|
| १९०९।१० | ८९३ |
| १९१०।११ | १३३५ |
| १९११।१२ | ३७७४ |
| १९१२।१३ | ५४०० |
| १९१३।१४ | ८२३४ |

कृत्रिम खताची आयात बहुतेक कलकत्ता व मद्रास या बंदरांतच झालेली आहे. सन १९१३।१४ सालची कृत्रिम खताच्या आयातीची छाननी केली तर खालीं नमूद केलेलीं खतें आलीं असें दिसून येईल. (१) सल्फेट ऑफ अमोनिआ २२६टन, पैकीं शेंकडा ८० मद्रासेस खपला. (२) नायट्रेट ऑफ सोडा १८० टन, (३) नायट्रेट ऑफ लाईम ६०३ टन, हें सर्व मद्रास इलाख्यांत खपलें (४) नायट्रोलिम १२८॥ टन. (५) फॉस्फेट्स् ( बेसिक स्लॅग खेरीज); सुपर फास्फेट्स् ८५० टन, (६) बेसिकस्ल्याग १८७४॥ टन. हें बहुतेक मद्रासेस खपलें (७) पोटॅश खतें १८५९ टन बहुतेक मद्रासेंत खपलीं. (८) मिसळलेलीं वगैरे खतें २३९० टन, सर्व कलकत्त्यांत उतरलीं गेलीं. वरील खतांपैकीं पहिलीं चार नायट्रोजन द्रव्य पुरविणारीं आहेत. सल्फेट ऑफ अमोनिया या खताचा हिंदुस्थानांत जास्त उपयोग होण्याचा संभव आहे हें खत कोळशाच्या खाणी व धुराचे कारखाने वगैरे जेथें आहेत तेथें तयार करता येतें. मुंबई इलाख्यांत हें खत तयार होण्याची सोय दिसत नाहीं. मुंबई येथील गॅसवर्क्समध्यें प्रयत्न करण्यांत आले होते परंतु खत तयार करण्यास लागणारा खर्च परवडत नसल्यामुळें हें खत करण्याचें काम बंद झालें. मध्यप्रांतांत साकची येथें टाटांच्या लोखंड व पोलादाच्या प्रचंड कारखान्यांत सल्फेट ऑफ अमोनियाचें खत तयार होऊं लागलें आहे, परंतु माल फार थोडा तयार होतो. बंगाल्यांत सुद्धां हें खत तयार होतें, तथापि याचा खप जसजसा वाढेल तसतसें या खताकरितां सर्वस्वीं बाहेरील देशावर अवलंबून रहावें लागेल मद्रास इलाख्यांत याचा प्रसार बराच झाला आहे व मुंबई इलाख्यांतहि कांहीं पिकें या खतानें फायदेशीर पडूं लागलीं आहेत नायट्रोजनयुक्त खतांपैकीं हें खत जास्त महत्त्वाचें आहे. चांगल्या नमुन्यांत शेंकडा २० पेक्षां वेतीं नायट्रोजन

असतो. याचा परिणाम हें खत स्वतंत्र रीतीनें अगर इतर खतांशीं मिसळून दिल्यास तीन चार आठवड्यांत पिकांत फरक दिसून येतो. पिकें हिरवीं गार दिसूं लागून जोरात वाढूं लागतात. ज्या जमिनींत चुना व फॉस्फेट्स भरपूर असतात तेथें हें खत देणें चांगलें. तृणधान्यासारख्या पिकांना हें खत दर एकरीं ½ हंड्रेडवेट पुरें आहे. हल्लीं हें खत इतर खतांशीं मिसळून पुष्कळ ठिकाणीं जास्त प्रमाणांत उपयोगांत आणितात. हें उंसाला पेंडी वगैरे इतर खतांबरोबर मिसळून दिल्यास उत्पन्न जास्त येतें, असें साधारणपणें पुणें व नीरा कालव्यावरील प्रयोगांत सिद्ध झालें आहे.

उंसाला या खताचें दर एकरी प्रमाण पुढीलप्रमाणें आहे. ३०–३५ गाड्या शेणखत सरी काढण्यापूर्वी देणें. ३३६ पौंड सल्फेट ऑफ अमोनिया. यापैकीं ११२ पौंड पहिली खुरपणी झाल्यानंतर व २४ पौंड ऊसबांधणीच्या वेळीं. १२०० पौंड करडीची अगर २४०० पौंड एरंडीची पेंड हें खत ऊस बांधणीच्या वेळीं देणें.

देशावरील मिरच्या वगैरे इतर बागाईत पिकानांहि हें खत इतर खतांबरोबर मिसळून दिल्यास चांगला परिणाम होतो.

मिरच्याः—मिरच्या लावण्यापूर्वी ३ टन शेणखत व मागाहून दर एकरीं सल्फेट ऑफ अमोनिआ ६० पौंड, सुपरफॉस्फेट २२४ पौंड, सल्फेट ऑफ पोटॅश १८० पौंड. या खतांचें मिश्रण करून पीक उभें असतांना थोडें तीन वेळ द्यावयाचें.

कांदे.—प्रथम दर एकरीं १० टन शेणखत; मागाहून दर एकरीं ३७१ पौंड सल्फेट ऑफ आमोनिया; तीन वेळ वरखत द्यावयाचें. नायट्रेट ऑफ सोड्याचा उपयोग सल्फेट ऑफ आमोनियाप्रमाणेंच होतो.

लसूणघासः—प्रथम दर एकरी ४ टन शेणखत व मागाहून सुपर फॉस्फेट २४३ पौंड व सल्फेट ऑफ आमोनिया १५ पौंड याचें मिश्रण दिल्यास पीक चांगलें येतें.

केळीः—रेताड जमीन, रहाटाचें पाणी ( जि. ठाणें ). १०० केळींच्या झाडांना खालील प्रमाणांत खत फायदेशीर आहे. एरंडीची पेंड ४०० ते ४५० पौंड. सल्फेट ऑफ पोटॅश ७० पौंड. सुपर फास्फेट ८० पौंड या सर्वांचें मिश्रण करून पहिले तीन महिने दरमहा थोडथोडें देणें.

नायट्रेट ऑफ पोटॅश—यांत नायट्रोजन व पोटॅश हीं दोन्हीं पोषक द्रव्यें आहेत. हें उत्तर हिंदुस्थानांत व बहार, संयुक्तप्रांत व मद्रास इलाख्यांत तयार करितात. यांत शेंकडा १३ आणि १४ नायट्रोजन, ४०–४६ पावेतों पोटॅश असतो. याचा स्फोटकद्रव्यें तयार करण्याकडे विशेष उपयोग होत असल्यामुळें तें महाग विकतें.

नायट्रेट ऑफ सोडा.—हें खत दक्षिण अमेरिकेंत चिली प्रांतांत सांपडतें. यांत शेंकडा १५.५ नायट्रोजनचें प्रमाण असतें. हल्लीं चार पांच वर्षें याचा उपयोग बंगाल व आसाम येथें वाढत्या प्रमाणावर होऊं लागला आहे. लढाईपूर्वी मुंबई येथें याचा भाव दर टनीं २१० रुपये होता. नायट्रोजन देणाऱ्या व सर्वांत लवकर द्राव्य स्थितींत येणाऱ्या खतांपैकीं नायट्रेट ऑफ लाइम सोडून याचा पहिला नंबर लागतो. खत दिल्यापासून ८–१० दिवसांनीं पीक हिरवेंगार दिसूं लागतें. व जोरास लागतें. या खतांत दोन अवगुण आहेत. पहिला हें खत दमट हवेंतील ओलावा तात्काल शोषण करून घेतें व दुसरा हें खत दिल्याबरोबर जर जोराचा पाऊस पडला तर तें पाण्याबरोबर वाहून जातें. याकरितां खत दिल्यावर चार दोन दिवस पाऊस पडणार नाहीं अशी उघाडी पाहून खत द्यावें.

ज्या पिकास सल्फेट ऑफ अमोनियाचा उपयोग होतो त्या सर्वांस हें खत उपयोगाचें आहे. हें खत बंगाल्यांत भाताला फायदेशीर पडतें. या खताचा इतर खतांशीं मिसळून काळ्या जमिनींत बागाइतांत व तंबाखूला चांगला उपयोग झाला आहे. दर एकरीं मिश्रणाचें प्रमाणः–

नायट्रेट ऑफ सोडा ७८५ पौंड. सुपर फॉस्फेट ३३६ पौंड. सल्फेट ऑफ पोटॅश २२४ पौंड बटाट्यालाहि याचा चांगला उपयोग होतो.

ज्या ठिकाणीं पाऊस खात्रीचा आहे व जेथें पाण्याची सोय आहे अशा ठिकाणीं कापसाला पुढील खताचा चांगला उपयोग होतो शेणखत; दर एकरीं १५ गाड्या. कृत्रिम खत–दर एकरीं नायट्रेट ऑफ सोडा १७० पौंड, सुपर फास्फेट ११२ पौंड, सल्फेट ऑफ पोटॅश १५० पौंड.

नागरटीच्या पूर्वी दर एकरीं दोन टन शेणखत, नंतर बीं पेरण्याच्या वेळीं २०० पौंड सुपर फास्फेट व पीक दोन महिन्यांचें झालें म्हणजे ११५ पौंड नायट्रेट ऑफ सोडा द्यावा. या खतानें पीक लवकर तयार होतें असा अनुभव आहे.

नायट्रेट ऑफ लाइम.—हें खत विजेच्या योगानें हवेंतील नायट्रोजन घेऊन तयार करितात. या खताचा नायट्रेट ऑफ सोड्याप्रमाणेंच उपयोग होतो. हें खत हवेंतील ओलावा लवकर शोषण करून घेतें. या खतांत शेंकडा ११.५ नायट्रोजन असतो. या खताला दर टनाला १४० रुपये पडतात. खतांत भेसळ पुष्कळ असते म्हणून खात्रीशिवाय हें खत घेऊं नये याचा अद्यापि फारसा प्रसार झालेला नाहीं.

नायट्रोलिम.—( कालशियम सायनामाइड ) हें कृत्रिम खत अगदीं नवीन आहे. हें इ. स. १९०८ सालीं पहिल्यानें प्रचारांत आलें. हें खत हवेंतील नायट्रोजन घेऊन तयार करितात. यांत चुना बराच असतो. या चुन्याचा जेथें जास्त पाऊस पडतो, अगर जेथें जमिनींत ओलावा रहातो अशा ठिकाणीं जास्त उपयोग आहे. या खताचा सल्फेट ऑफ अमोनियापेक्षां पिकाना जरा उशिरा उपयोग होतो. या खतांत शेंकडा १०,१२ टक्के व कित्येक वेळीं १५

पावेतों नायट्रोजन असतो. लढाईपूर्वी कलकत्त्यास या खतास दर टनीं २०० रुपये किंमत होती. यांत कित्येक वेळां भेसळ असते. या खताचा खप हिंदुस्थानांत झपाट्यानें होत आहे इ. स १९१३-१४ सालीं मद्रास बंदरांत हें खत ११३ टन आलें इ. स १९१५ सालीं कलकत्त्यास हें खत ११०० टनावर चहाच्या मळेवाल्यांत खपलें. या खताचा चरख-ताच्या कामीं फारसा उपयोग होत नाहीं. तें झाडाच्या भोंवतालचा जमीन खोल खणून त्यांत घालावें व खड्डा परत भरून टाकावा. इतर पिकाकरितां हें खत सुमारें एक महिना बी पेरण्यापूर्वी घालावें. हें खत दर एकरीं १५० पौंड घालावें. याचें मिश्रण सुपरफॉस्फेटबरोबर दिल्यास पिकांना चागलें मानवतें

फॉस्फेट्स - फॉस्फेट व बेसिक याचा उपयोग हल्लीं सिलोन, दक्षिणहिंदुस्थान, बंगाल व आसाम येथें युरोपियन मळेवाले चहा, कॉफी वगैरे पिकांना करतात. हें खत इतर पिकांना देण्याची अद्याप फार वहिवाट नाहीं तथापि मुंबई इलाख्यांत सुपरफास्फेट जेव्हां इतर कृत्रिम खतांशीं मिसळून तंबाखू, बटाटे, मिरच्या, कांदे, लसूणघास व केळीं या पिकांना दिलें तेव्हां त्याचा चांगला परिणाम झालेला आहे. काळ्या जमीनींत नायट्रोजनच्या खालोखाल फॉस्फेट व नायट्रोजनयुक्त खतें जेव्हां मिळून वापरण्यांत येतात तेव्हां त्यांचा चांगला उपयोग होतो

फॉस्फोरिक ॲसिड पुरविणारीं खतें —सुपर फॉस्फेट ऑफ लाईम.-हें खत फॉस्फोरिक खडकाचा भुगा करून त्यावर सल्फ्युरिक ॲसिड घालून तयार करतात. हे खडक इतर देशांत पुष्कळ सापडतात. हिंदुस्थानांत यमुना नदीच्या कांठीं कांहीं भागांत हे आढळतात.

डिझॉल्व्हड् बोन्स :—हें खत वरच्याप्रमाणेंच आहे. पण यांत हाडाच्या ५ भाग पिठावर एक भाग ॲसिड घालून तयार करितात. हें एकरीं १ ते २ हंड्रेडवेट्स् द्यावें.

हाडें:—यांत शेंकडा चार नायट्रोजन, पन्नास फॉस्फेट ऑफ लाइम व चोवीस फॉस्फरिक ॲसिड असतें.

बेसिक स्लॅग-बेसिक स्लग नांवाचें फास्फरिक ॲसिड पुरविणारें खत लोखंडापासून पोलाद तयार करीत असतां जो फास्फरस् बाहेर पडतो तो चुन्यांत धरतात. नंतर त्याचें खत तयार करितात. हें एकरीं ५ हंड्रेडवेट्सपावेतों द्यावें. यांत शेंकडा १५ ते १७ पावेतों फॉस्फरिक ॲसिड असतें.

पोटॅश खतें.-आपल्याकडे पोटॅश मिळणारें खत म्हटलें म्हणजे चुलींतील, गिरण्यांतील, रेल्वेंतील (लांकडें जाळतात तेथील) व गुऱ्हाळांतील राख होय. परंतु ही राख फारच थोडी उपलब्ध असते. या खतापासून बटाटे, मिरची, वांगीं टमाटे वगैरे पिकांना जास्त फायदा होतो. हें खत एकरीं २ते४ हंड्रेडवेट्सपर्यंत द्यावें. जगामध्ये पोटॅश खताचा मोठा साठा म्हणजे जर्मनींतील स्टॅस्फर्ट येथील खाणी होत. लढाई सुरू झाल्यापासून हें खत येणें बंद झालें आहे इ. स. १९१४ सालीं दक्षिण हिंदुस्थानांत हें खत १९०० टन आलें. हें खत इतर खतांशीं मिसळून दिल्यास चांगला उपयोग होतो. देशावर तंबाखूला व रेताड जमीनींत वसई वगैरेकडे केळींच्या पिकाला या खताचा चांगला उपयोग होतो गोवा प्रांतांत नारळीच्या झाडांना हें खत मानवतें.२५ पौंड शेणखत,२पौंड पेंड, १॥ पौंड हाडाची पूड, १ पौंड सल्फेट अगर म्यूरिएट ऑफ पोटॅश व अर्धा पौंड साधें मीठ या सर्वांच्या मिसळीचें खत दर झाडास द्यावें

ही जर्मन खतें निरनिराळ्या नांवाखालीं मिळतात. कायनीट, यांत शेंकडा १२-१२॥, म्यूरिएट ऑफ पोटॅश, यांत ५० ते ५७, सल्फेट ऑफ पोटॅश, यांत ४४ ते ५२; सिल्व्हानाईट पोटॅश, यांत १६ ते १७ टक्के पोटॅश असतो.

अलीकडे पोटॅश खताची खाण ॲबिसीनिया येथें सापडली आहे. त्या खाणींत ८५००९० टन खत मिळेल असा अंदाज आहे. त्यांत पोटॅशचें शेंकडा प्रमाण ५५ असतें.

एक टन केळीच्या खुंटांत १८८ पौंड घनपदार्थ असतो व त्यांत पोटॅश शेंकडा ११.७ अगर अमेरिकेंत पॅसिफिक किनाऱ्यावर सापडणाऱ्या केल्प नामक तणाच्या ⅓ असतो. केळ्याच्या सालींत सर्व पोटॅश शेंकडा १.०५ असून घनपदार्थांत ९.०३ पौंड पोटॅश असतो

समुद्रांतील शेवाळ.-या खताचा त्यांतील पोटॅश-करितां विलायतेकडे जास्त उपयोग करितात. लढाई सुरू झाल्यापासून पोटॅश तयार करण्याचे तिकडे मोठमोठे कारखाने उभारण्यांत आले आहेत. कांहीं कांहीं शेवाळीच्या जातींत तर शेंकडा ५·२० पावेतों पोटॅश व थोडा नायट्रोजन सांपडतो. शिवाय त्यांत फास्फेट्स, चुना, मॅग्नेशिया व साधें मीठहि असतें. हें खत बीट, असपरागस् वगैरे पिकांना चांगलें मानवतें असून शिवाय त्याच्या अंगीं कृमिनाशक गुण आहे. आपल्याकडील समुद्रकिनारीं कांहीं भागांत शेवाळ सापडतें.

केल्प नांवाच्या शेवाळीच्या जातींत पोषकद्रव्यें जास्त प्रमाणावर असतात. केल्पच्या एक टन खतांत ४·६ पौंड नायट्रोजन, १ २ पौंड फास्फेरिक ॲसिड व ६·२ पौंड पोटॅश असतो.

राख:—प्रत्येक शेतकऱ्याला मिळण्याजोगें दुसरें खत म्हटलें तर ' राख ' होय राखेंत फॉस्फेट्स, पोटॅश, चुना, मॅग्नेशिया व गंधक हे पदार्थ कमी जास्त प्रमाणानें असतात. यांत पोटॅश हा महत्त्वाचा आहे. उंसाच्या रानांत खंडोगणती राख मिळण्याजोगी असते. खतांतील खड्ड्यांत राख न मिसळतां ती जर वेगळी ठेविली तर त्या खतापासून साधारण सर्व पिकांस फायदा होतो. यांतील द्रव्यें द्राव्यस्थितींत असतात. राखेंत क्षार असल्यामुळें पिकास नुकसान करणाऱ्या किड्यांचा नाश होतो. राखेच्या खताचा द्विदल धान्यास त्याप्रमाणेंच बटाटे, मिरच्या, वांगीं, टमाटे वगैरे पिकांस

सोडीत यातील पाणी जास्त स्वच्छ होई व त्याला घाण येत नसे. सेप्टिक टँकमध्यें आल्ब्युमिनाइड नायट्रोजनचा अमोनियास्ल नायट्रोजन बनतो. तेंच पाणी बॅक्टेरिया बेड्समध्यें ठेविलें म्हणजे अमोनियाचे नायट्रेटस् तयार होतात. सन १९०५ साली प्रसिद्ध झालेल्या सुवेझ फार्मच्या रिपोर्टांवरुन खालीं दिलेले आकडे फक्त सेप्टिक-टँकमधून एकदम शेतात पाणी नेऊन त्यावर केलेल्या पिकाचे आहेत या आकड्यावरून मुतारीच्या पाण्यावर बहुतेक सर्व तऱ्हेचीं पिकें होतात असे सिद्ध होतें.

## सुवेझ फार्म-सांडपाण्यावरील पिकें

| साल | सांडपाणी एफ्लुअंट दर एकरीं गॅलन्स | एफ्लुअंट किती वेळा दिलें | साधें पाणी किती वेळा दिलें | दर एकरी उत्पन्न वजन पौंड | दर एकरी उत्पन्न रुपये | दर एकरी खर्च रुपये. | पिकाचें नाव. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १९०२।०३ | २०,५८,००० | ३० | ७ | ७९८८८ ऊ ९६७८गूळ | ४८७ | २९१ | नवा उंस |
| १९०३·०४ | १५,०७,४९५ | २६ | १२ | ५९१२४ ,, ७५२३ ,, | ३८० | १५७ | खोडवा उंस. |
| १९०४ ०५ | ५,६१,९३५ | १० | ९ | ३५१७<br>२९३० | १३८ | ९४ | ½ मिरची<br>½ आलें |
| १९०२·०३ | ११,९५,१०० | १३ | ३ | ३१६०७ | १५१ | १६५ | कांदे. |
| १९०२ ०३ | ४,३७,५०० | ५ | ७ | ३६४७ | १२२ | ११० | भुईमूग |
| १९०३ ०४ | ९,३८,८७० | १२ | २ | २८४७० | १३३ | १२५ | हळद. |
| १९०३·०४ | १४,५१,०६४ | १६ | ६ | २३९२७ | १५२ | ८१ | रताळीं. |

याशिवाय चाऱ्याचीं पिकें या पाण्यावर करण्यात आलीं त्यांचें दर एकरीं उत्पन्न( पौंडात) पुढें दिलें आहे.—

लसूण घास, ४१३३०, गिनी गवत, ५६३०८, निळवा ( कडवळ ), ८४८९६; सॉरगम ( कडवळ ), ५५३३२, (मका) कडवळ (उतावळी), ५५१९२,

राब व त्या च्या ऐव जीं रा तें.—भाताचें रोप तयार करण्याच्या दोन पद्धती आहेत एक राब भाजून रोप तयार करणें व दुसऱ्यात राबाऐवजीं तरव्यात खत घालून रोप तयार करणें. ज्या ठिकाणीं रोप तयार करण्याकरिता शेण, डहाळ ( झाड झुडपाच्या लहान लहान फांद्या ),गवत, पाचोळा वगैरे पसरुन जमीन भाजतात त्यास राब करणें असें म्हणतात. ही राब करण्याची पद्धत कोंकण, मावळ, घाट वगैरे ज्या ठिकाणीं पाऊस पुष्कळ पडतो तेथें प्रचलित आहे. कित्येक ठिकाणीं शेळ्या व मेंढ्या बसवून त्यावर रोप तयार करितात. दक्षिण व उत्तर कोंकणात कोठें कोठें तरव्याच्या ठिकाणीं उन्हाळ्यात गुरें बांधितात. सुरत, अमदाबाद जवळ फक्त शेणखतावर रोप तयार करण्याची चाल आहे कर्नाटकात व उत्तरगुजराथ प्रांतात जेथें जेथें 'परभात' करण्याची पद्धत आहे तेथें सबध शेतालाच शेणखत देतात दक्षिण कोंकणांत वेंगुर्ले, मालवणकडे काहीं ठिकाणीं मासळीवरहि रोप तयार करण्याची पद्धत आहे दिवसानुदिवस भाजावळीकरिता पुरेसा राब मिळेनासा झाला आहे. उत्तरकोंकणांत राबाच्या उपयोगाकरिता मालकीचे गंवर असत. ते तोडून उध्वस्त झाले व जंगलाचा नाश झाला. राबाकरिता पुरेसा डहाळ मिळेनासा झाला कुमरी अगर डाली पद्धतीच्या लागवडीमुळें पहीचरी रानें नागोमागी —शीं झालीं राब करण्याचे चारपांच प्रकार आहेत, त्याच्यापैकीं मुख्य दोन आहेत. एक डहाळाचा व दुसरा शेणाचा. शेणाचा राब सर्वांत उत्तम. परंतु शेण जाळल्याने एक अतिउपयुक्त अशा पोषक द्रव्याचा नाश होतो. भातशेतीकरिता राब करणें अवश्यक व फायदेशीर आहे असें प्रत्ययास आलें आहे. डॉ. मॅन साहेब पुणें शेतकी कॉलेजचे प्रिन्सिपाल यानीं दोनतीन वर्षे यासंबधीं प्रयोग करून पाहिले. ते म्हणतात राब भाजण्यापासून तरव्यावर मुख्य परिणाम म्हटला म्हणजे अर्ध्या इंचापासून एक इंचापर्यंत जमीन भाजणें हा होय. ती चांगली तापल्यामुळें तिचा पोत सुधारतो व पोषक द्रव्यें जास्त द्राव्य स्थितींत येतात. भाजावळीचा शेंकडा ६० हिस्से परिणाम पोत सुधाण्याकडे होतो. पोत सुधारला म्हणजे जमिनींतून पाण्याचा झिरपा होऊन रोपट्याना त्यापासून अपाय होत नाहीं. राब न मिळेल तर जमीन भाजण्यास उपाय डॉ मॅन साहेब सुचवितात तो असा —ज्या ठिकाणीं रोप तयार करावयाचें असेल तेवढ्या सर्व तुकड्यात राब पसरण्याच्या ऐवजीं ठिकठिकाणीं मातीचे ढीग करून ते भाजून काढिले असता वरचेवर फुकट जाणारी उष्णता वांचविता येईल व तेणेंकरून कार्यभाग साधून राबहि कमी पुरेल हल्लींची तरवे भाजण्याची पद्धत पाहिली तर ती मार्च महिन्यापासून ते मे महिनाअखेर ( फाल्गुन, चैत्र, वैशाख ) पावेतों चालू असते. डॉ. मॅन म्हणतात, रोपावर चांगला परिणाम होण्यास तरवे भाजल्यापासून निदान सहा आठवड्याच्या आत त्यात बीं टाकलें पाहिजे. जसजसे जास्त दिवस होत जातील तसतसा भाजावळीचा उपयोग कमी होत जातो हल्लींची भाजावळ पाहिली तर ती नावाला राहिली आहे. कारण डहाळ किंवा गोवऱ्या पुरेशा मिळत नाहींत व भाजावळहि फार निष्काळजीनें करतात राबाच्या पूर्वी कित्येक ठिकाणीं जमीनहि हालवीत

नाहींत व मळ्यावर राखहि इकडे तिकडे वाऱ्यानें उडून जाते. एकदा जमीन भाजून काढिली पाहिजे म्हणून ती पाहिजे त्यावेळीं वेळ सापडेल तेव्हां भाजून काम उरकून घेण्याची पद्धत पडली आहे.

शेतकी खात्यानें १० वर्षेपर्यंत राब करून व राबाऐवजीं इतर खतें वापरून भाताचें आवण तयार करण्यासंबंधानें प्रयोग लोणावळें ( पुणें जिल्हा ), रत्नागिरी व अलिबाग येथें केले, व अनुभवानें असें ठरलें कीं, रोपट्याला राबाची जरूरी आहे. परंतु ज्या ठिकाणीं राब मिळत नाहीं त्या ठिकाणीं राबाइतक्या, किंबहुना त्यापेक्षा कमी खर्चात इतर खतें वापरून राबाइतकींच किंत्येक वेळा राबाहून अधिक जोमदार रोपें तयार करतां येतात. अशा तऱ्हेचीं उपयुक्त खतें, तीं वापरण्याचें प्रमाण व त्याचा राबाशीं तुलनात्मक खर्च खालील कोष्टकांत दिला आहे.

| खताचा प्रकार | गुंठ्यास खत | गुंठ्यास खर्च किती | एक गुंठ्यातील रोप गुंठ्यांस पुरेल. |
|---|---|---|---|
| | पौंड. | रु. आ पै. | |
| मासळी | ३० | १-४-० | ७ |
| पेंड | ५० | १-४-० | ७ ½ |
| सल्फेट ऑफ अमोनिआ. | १२ | १-८-० | ८ ¼ |
| सोनखत. | २ गाड्या. | २-०-० | ६ |
| शेणा वा राब | १००० शेण. ४०० तागें गवत १०० बारीक गवत | × ३-०-० | ६ ½ |
| टहाळ | ५०० टहाळ ३५० जाडें गवत ८० बा० गवत | × २-२-० | ५ |

[ × ]यांत गुरांनी वाहून आणण्याची मजुरी धरली आहे. राख शेण व टहाळ याना किंमत द्यावी लागत नाहीं

ज मि नी ला ख त दे ण्या च्या प द्ध ती —जमिनीस जें खत घालावयाचें तें फार विचार करून घातलें पाहिजे. सर्व जमिनी एकाच प्रकारच्या नसतात. काहीं फटींग, काहीं मऊ, काहीं चिकण, कांहीं रेताड, काहीं चुनखडीयुक्त तर कांहीं दलदलीच्या अशा असतात जमिनींमध्यें अनेक प्रकार असल्यामुळें त्यांत निरनिराळीं द्रव्यें निरनिराळ्या प्रमाणांत असतात. याकरितां खत देणें तें जमिनीस व तिजवर होणाऱ्या पिकास योग्य असें व पाहिजेल तेवढेंच दिलें पाहिजे. असें न केल्यास जमिनीस अगर तिजवर होणाऱ्या पिकास बिल्कुल फायदा होणार नाहीं. हिंदुस्थानदेशांत उन्हाचा ताप विशेष असल्यामुळें जमिनींतील सेंद्रिय द्रव्यें हळुहळु नाहींशीं होतात. तीं वनस्पतींच्या वाढीस व पोषणास जरूर आहेत यामुळें तीं जेणेंकरून जमिनींत जतन होतील असे उपाय अवश्य योजले पाहिजेत. चिकण जमीन असल्यास तिच्यांत सेंद्रिय द्रव्यें फार हळुहळु कुजतात; कारण अशा जमिनींत हवेचा प्रवेश लवकर होत नाहीं. तसेंच असल्या जमिनीच्या अंगीं कोणतेंहि शोषून घेतलेलें द्रव्य राखून ठेवण्याची विशेष ताकद असते, रेताड अगर खडे असलेल्या जमिनींत राखून ठेवण्याची शक्ति फारच कमी असते; म्हणून अशा जमिनींत खत थोडथोडें पुष्कळ वेळा दिलें पाहिजे. परंतु ज्या जमिनीच्या अंगीं दिलेलें खत पुष्कळ काळपर्यंत राखून ठेवण्याची शक्ति असते अशा जमिनीस एकदा खत दिलें म्हणजे तें लागोपाठ तीन वर्षें होणाऱ्या पिकास उपयोगीं पडतें. याकरितां काळ्या ( चिकण ) व मध्यम काळ्या जमिनीस तिची लागवड करण्यापूर्वीं बरेच दिवस अगोदर जरी शेणखतासारखें खत दिलें तरी त्यापासून तोटा होत नाहीं. शेणखत शेतांत नेण्यापूर्वी तें बाहेर काढून त्याचा खड्ड्याजवळ ढीग करावा. तें चांगलें कुजलें असेल तर त्याचा ढीग घट्ट दाबून ठेवावा, म्हणजे त्यातील पोषक द्रव्यें हवेंत वायुरूपानें उडून जाणार नाहींत. जर तें चांगलें कुजलें नसेल तर तो ढीग न तुडविता पोकळ ठेवावा व कुजण्यास सुरवात झाली म्हणजे तो तुडवावा. तो कोरडा असल्यास त्यात थोडें पाणी टाकावें. जर १०० पौंड शेणखत घेतलें तर त्यात पंच्याहत्तर पौंड पाणी असतें व बाकी राहिलेल्या वाळलेल्या २५ पौंड खतांत दीड पौंड सत्वांश असतो, यामुळें हें खत तयार करण्याला, वाहून नेण्याला, पसरण्याला व जमिनींत मिसळून टाकण्याला जास्त खर्च लागतो परंतु हा खर्च व्यर्थ होतो असें समजूं नये. कारण या खताच्या अंगीं दुसरे गुण असल्यामुळें चिकण जमिनींत हें खत घातल्यास ती भुसभुशीत होते व हलक्या जमिनींत ओलावा राहतो. शेणखतांतील पोषक द्रव्यें पिकाला तावडतोब मिळत नसून तीं थोडथोडीं लागतील त्याप्रमाणें मिळत असतात. शेणखताचा उपयोग दोन तीन वर्षेंपर्यंत होत असतो.

जमिनीला शेणखत दर एकरीं ४०।५० गाड्या दिल्यास तें कुजत असतांना जमिनीची उष्णता १०।१५ अंशापर्यंत वाढते व ही उष्णता सुमारें महिना दीड महिन्यापर्यंत टिकते. यामुळें एखाद्या वर्षी पेरणीच्या वेळीं जमीन खताऊन जर वेळेवर पुरेसा पाऊस पडला नाहीं तर पीक जळूं लागतें, व बिनखतावलेल्या जमिनींत तें बरें येतें. असें होऊं नये म्हणून कोरडवाहू जमिनींत खत द्यावयाचें असल्यास तें उन्हाळ्याच्या दिवसांत पीक पेरण्याच्या अगोदर सुमारें तीन महिने खत देऊन जमीन नांगरून टाकावी म्हणजे खताचा परिणाम पिकावर वाईट होणार नाहीं. सोनखत ऊंस, विलायती गवत ( घास ), भाजीपाला वगैरे पिकांस फार मानवतें. या खताचें साधारणपणें दर एकरीं प्रमाण १५

गाड्या असावें. उसाला तें ८० गाड्यापर्यंत देतात. एका गाडीला सरासरीनें ३१४ रुपये पडतात. पेंडीचें खत द्यावयाचें असेल तेव्हां पेंड चुन्याच्या घाणींत घालून मळावी व नंतर सरीखत द्यावें. हें खत उंस, केळीं, आलें, हळद, मिरच्या, कांदे वगैरे पिकांना चांगलें मानवतें. उंसाला हें खत दर एकरी शेणखताशिवाय एक ते दीड टनपावेतों देत असून इतर पिकांना अर्धा टनपर्यंत देतात.

पाण्यात त्वरित विरघळणारीं खतें—नायट्रेट ऑफ सोडा, सल्फेट ऑफ अमोनिआ व सुपरफॉस्फेट हीं होत. हीं खतें बारीक करून फक्त जमिनीवर पसरून टाकण्याची काय ती मेहनत आहे. ज्या खतांत द्राव्य होण्याची शक्ति कमी आहे तीं खतें (सल्फेट ऑफ अमोनिया व सुपर-फॉस्फेट) पेरणीपूर्वी सुमारें एक महिना शेतभर पसरून कुळवावीं केव्हा केव्हा जमिनींत पीक उभें असताना खत देतात त्याला 'उपरीखत' 'वरखत' असें म्हणतात अशीं थोडीं खतें जमिनींत घालणें असल्यास तीं दुप्पट तिप्पट राखेंत, रेतींत अगर मातींत मिसळून घालावीं. म्हणजे थोडें खत पुष्कळ जमिनीला पुरेल. नायट्रेट ऑफ सोडा व नायट्रेट ऑफ पोटॅश हीं खतें जमिनींत लवकर विरघळणारीं असल्यामुळें पीक उभें असताना जेव्हा पाहिजे तेव्हांच द्यावीं. बाकी पोटॅश व फॉस्फेटिक खतें यातील द्रव्यें जमिनीला शोषण करून राखून ठेवण्याची शक्ति असते. याला अपवाद हलकी जमीन, अति पाऊस अगर पाटाचें अतिशय पाणी हे आहेत.

इंग्लंड, जर्मनी वगैरे देशांत फार करून कृत्रिम खताचा जास्त उपयोग करतात. कारण ते देश थंड आहेत व जीं खतें पिकांना तत्काळ शोषून घेता येतील अशीं खतेंच त्याना तेथें उपयोगांत आणावीं लागतात शेणखत, केरकचरा वगैरे खतांचें रूपांतर होण्यास जास्त वेळ लागतो, यामुळें हीं खतें देऊन शिवाय कृत्रिम खताचा जास्त उपयोग करतात. याशिवाय शेतांत फेरपालटीनें गुरें बांधणें, मेंढ्या बसविणें, सरीखत देणें, घुडकें खत देणं वगैरे खत देण्याचे अनेक प्रकार आहेत.

खत देण्याचें प्रमाणः—हें प्रमाण जमीन, हंगाम, पिकें, पाणभरती किंवा कोरडवाहू यांवर अवलंबून असतें. चिकण जमिनीला नुसतें शेणखतहि चालतें. रेताड असल्यास कुजलेलें खत असावें. पावसाळ्यांत शेणखत, सोनखत वगैरे चांगली. रब्बी पिकांना पेंडी वगैरे चांगल्या. पाणभरती पिकांना जास्त खत चालतें.

पिकें व त्यांना घालावयाच्या शेणखताचें दर एकरी प्रमाणः—

| पीक | खताच्या गाड्या. |
|---|---|
| जोंधळा, बाजरी | ५ |
| गहूं | ५–१० |
| भात | १५–२० |

(पुढें चालू)

| | |
|---|---|
| बागाईत पिकें | ३०–४० |
| ऊंस | ४०–६० |

वरील पिकांना कृत्रिम खतें घालावयाचें दर एकरी प्रमाण (हंड्रेडवेट)—

| खतें | हंड्रेडवेट् |
|---|---|
| सल्फेट ऑफ अमोनिया | १–१। |
| नायट्रेट ऑफ सोडा | १–१॥ |
| सल्फेट ऑफ पोटॅश | १–२ |
| सुपरफॉस्फेट | २–३ |

**खत्तर**—पंजाबांतील एक जात. लो. सं. (१९११) १४,८१७. हे सर्व मुसुलमान असून अटक व रावळ-पिंडी जिल्ह्यामध्यें आढळतात. खत्तर शब्दाची व्युत्पत्ति सशयित आहे. या लोकांच्या व हिंदूंच्या चालीरीतींत बरेंच साम्य आहे. यावरून ही जात मूळची हिंदुस्थानांतली असून नंतर बाटली असावी [ रोझची ग्लॉसरी, सेन्सस रि. १९११ पंजाब ]

**खत्री**—एक कोष्टी जात. यांच्यांत एक क्षत्रियखत्री व एक ब्रह्मी (कोष्टी) खत्री असे दोन पोटभेद असून पहिल्याची लो. सं. ५,९९,१५९ इतकी असून दुसऱ्याची ११९९८४ इतकी आहे (१९११). या नावाखालीं हिंदु, शीख, मुसुलमान, जैन इतक्या जाती येतात त्यांची मुख्य वस्ती बंगाल, बहार, ओरिसा, पंजाब, संयुक्त प्रांत, काश्मीर, मुंबईइलाखा इकडे आहे हे लोक पंजाबांत ४। लाख तर मुंबई इलाख्यांत १॥ लाख आहेत. महाराष्ट्रांत यांची संख्या बरीच असून यांचा इकडील मुख्य व्यवसाय जर व कलाबतू काढणें व पितांबर वगैरे रेशमी वस्त्रें तयार करणें हा होता परंतु हल्लीं परदेशांतून जर कलाबतू येऊं लागल्यानें त्यांचा हा धंदा बसला आहे. रेशमी वस्त्रेंहि हल्लीं कमी निघूं लागलीं आहेत. त्यामुळें हे हल्लीं सावकारी करतात. यांच्यांत मौंजीबंधन करितात; विधवाविवाह यांच्यांत निषिद्ध आहे. खालीं मद्रासकडे यांच्या चालीरीति तिकडील पटवेगार जातीप्रमाणें असून, त्यांच्यांत रोटीव्यवहार चालू आहे. हे खत्री आपल्यास रेणुकापुराणाच्या आधारानें क्षत्रिय म्हणवितात. परशुरामाच्या भयानें क्षत्रियांच्या गर्भवती स्त्रिया कालीमातेच्या आश्रयास गेल्या. त्यांना संतति झाल्यावर कालीनें तिच्या हातीं चरखे दिले. तेव्हांपासून ही जात विणकामाचा धंदा करूं लागली अशी दंतकथा सांगतात. तिकडे हिला पटनूलकर व भुमराज क्षत्रिय (सहस्रार्जुनाचे वंशज) अशींहि दुसरीं नांवें आहेत. यांची कुलदेवता रेणुका असून यांच्या पोट जातींचीं नांवें हुलेगार, पोवार, मुद्गल, बोजागिरी वगैरे आहेत, आणि त्यांच्यांत गोत्रेंहि आहेत. यांच्यांत लग्नविधी सात दिवस चालून त्यांतदेखीं ब्राह्मण अवश्य लागतो. लग्नसमारंभ हे निरनिराळे गोंधळ घालतात. आणि या सात दिवसांत

मांसाहार वर्ज करितात. यांच्या पंचायतींतील पुढाऱ्यास ग्रामणी व दुय्यमास पंजा म्हणतात. हे शैवपंथी आहेत.

जयपूर एजन्सींतील खत्री हे शेती करितात. यांच्यात सूर्य, भाग, कोचिचमो व नाग अशा चार पोटजाती आहेत. यांची मुंज लग्नाच्याच वेळीं होते. यांना पात्रो असें दुसरें नाव असून, यांची भाषा उडिया आहे. गुजराथेंत यांची मुख्य वस्ती भडोच, सुरत, अहमदाबाद इकडे आहे. त्यांचें म्हणणें असें आहे की, आपण मूळचे सिंधमधले असून १६ व्या शतकाच्या सुमारास गुजराथेंत व्यापारानिमित्त उतरलों व आपण ब्रह्मक्षत्रिय आहों. त्यांचा नीटस चेहरा व गौरवर्ण पाहून त्यांचें म्हणणें खरें असावें असें १९११ च्या खानेसुमारीच्या रिपोर्टांत म्हटलें आहे. यांचें मुख्य दैवत सिंधच्या पश्चिमसरहद्दीवरील हिंगळजदेवी होय. हे बहुतेक शाकाहारी आहेत. हे मद्यसेवन करितात. व दक्षिणेकडे काहीं खत्री मासे खातात. यांचा धंदा लहंगे, ओढण्या वगैरे सुती कापड विणण्याचा आहे. परंतु परदेशी कापडाच्या आयातीमुळें हल्लीं हा हातमागाचा धंदा बसत चालला आहे. सुरत जिल्ह्यांत हे लोक जर व कलाबतू काढतात. या कामात यांच्या बायकाहि त्यांना मदत करतात. हे वैष्णवपंथी असून मंत्रतंत्रावर भरंवसा ठेवणारे आहेत. यांच्या चन्याचरा चालीरीती इकडील वाण्याप्रमाणें आहेत. यांच्यात शिक्षणाचा अभाव फार असून नवीन उद्योगधंदे काढण्याची धमकहि नाहीं. सुरत जिल्ह्यांत यांच्या दोन पंचायता आहेत. त्यांतील सभासदांना शेटिया किंवा कारभारी म्हणतात. दंड व जातिबहिष्कार या यांच्या शिक्षा होत. ज्ञातीच्या पैशांची व्यवस्था धाकट्या पंचायतीकडे असते. काठेवाडांत यांच्या कायमच्या मध्यवर्ती पंचायती, जामनगर, भावनगर, पोरबंदर व गोंडळ येथें आहेत. पंचायतींतील निकालाविरुद्ध पंचायतीचे मुख्य जे पटेल त्यांच्या मेळ्यांत ( पटेलमेळा ही एक पंचायतीच्या वरची सभा असते ) अपील दाखल करतां येतें. येथील निकाल सार्वत्रिक कायम व शेवटचे समजले जातात. पंजाबांत हे हिंदु व शीख या दोन्ही धर्मांचे असून तिकडे त्यांना वरिष्ठ दर्जाचे मानतात. यांचा मुख्य धंदा व्यापार आहे, परंतु हल्लीं सरकारी अगर खाजगी नोकरींत हे शिरूं लागले आहेत. हिंदु खत्र्यांत सोधी, बेदी वगैरे पोटजाती आहेत.

काश्मीरांतहि हे लोक असून तेथें ते हिंदु, शीख, जैन या धर्मांचे असून वर्णानें वैश्य आहेत. यांचा धंदा व्यापार व सावकारी असून हल्लीं संस्थानच्या मुलकी खात्यांतून नोकरीच्या निमित्तानें यांचा भरणा बराच होत चालला आहे. मध्यप्रांतांत यांची वस्ती ५ हजारांपर्यंत असून ती तुरळक तुरळक सर्व प्रांतांत पसरलेली आहे हेहि आपल्यास क्षत्रिय म्हणवितात. क्रुकच्या मतें यांच्या गौर वर्णावरून व घाऱ्या डोळ्यांवरून हे क्षत्रियोत्पन्न असावेत. यांच्या स्त्रिया सुंदर असतात. परशुरामाच्या सपाट्यांत एक गर्भवती क्षत्रिय स्त्री एका सारस्वत ब्राह्मणाच्या आश्रयास राहिली होती व त्यानें परशुरामाची खात्री करण्याकरितां ही मुलगी माझी आहे असें सांगून तिच्याबरोबर तो एका ताटांत जेवला अशी एक कथा हे सांगतात व तिच्या मुलापासून खत्री जन्मले असें म्हणतात. अद्यापि सारस्वतब्राह्मण हे यांच्या हातची कच्ची रसोई खातात; त्यावरून ही ब्राह्मण अगर क्षत्रिय यांची संतति असावी असें म्हणतात. सर ब्रयाबेल म्हणतो की, हे पंजाब, अफगाणिस्तान व तुर्कस्तान इकडे व्यापार करतात. शिखांचे गुरु नानक व गुरु गोविंद हे खत्री होते असें म्हणतात. रणजितसिंगाचे बरेचसे अधिकारी, दिवाण सावनमल, मूलराज हेहि खत्री होते. शिखांचे गुरु जरी खत्री होते तरी ही जात साधारण हिंदूच राहिली. फारच थोड्यांनीं शीखधर्म स्वीकारला यांच्यातील शेर अगर शेरा नावाची जात गोव्यकाची आहे असें ते मानतात. तथापि त्यांचें रंगरूप यांच्याच सारखें आहे यांच्यात विधवाविवाह व घटस्फोट निषिद्ध आहे. अनेक बायका करण्याची जरी यांच्यात चाल नाहीं तरी दासी म्हणून अनेक स्त्रिया हे घरीं बाळगूं शकतात व यांच्यापासून होणाऱ्या संततीलाच गोळक म्हणतात नेमाडांत हे लोक शिकाम व रंगाऱ्याचें काम करतात आणि बऱ्हाणपुरास कलाबतू व जरीचें काम करतात.

यांच्यांतील लग्नांत पुढील विधि लक्षांत ठेवण्यासारखा आहे. वर हा वधूमंडपांत आला म्हणजे एका बंद केलेल्या पालखीला सात प्रदक्षिणा घालतो व प्रत्येक प्रदक्षिणेला वधूचा भाऊ कण्हेरीच्या फांदीनें त्याला फटका मारतो. या पालखींत आंतील मुसलमानी पद्धतीचा ( पायजमा वगैरे ) पोषाख घालून वधू बसलेली असते या सर्व दिवसांत वधू आपले डोळे घट्ट मिटून ठेवते व जेव्हां बोहोल्यावर तिला आणतात तेव्हांच वराला पाहण्यासाठीं म्हणून ती डोळे उघडते. सोमवारीं, गुरुवारीं व शुक्रवारीं वराला शेजारीपाजारी जेवावितात व तिला वरानें शोधून काढावें लागतें तिला धुंडाळून लग्नमंडपांत आणल्यानंतर तीं दोघें परस्परांचे केस विंचरतात. सुरतेंत छाती पिटण्याची गुजराथी पद्धत ( एक वर्षपर्यंत ) यांच्यातहि थोड्याफार फरकानें असून विधवेनें वर्षभर फक्त वरण व राळ्याची भाकर खावी लागते. [ ठाणें ग्याझे, सेन्सस ऑफ इंडिया. १९११ व्हॉ. ७,१४, २०; धर्स्टन—कास्ट्स् ॲंड ट्राइब्ज् ऑफ सदर्न इंडिया; रोझ—ग्लॉसरी. व्हॉ. २; क्रुक—कास्ट्स ॲंड ट्राइब्ज इन यु. पी. आणि रसेल व हिरालाल—कास्ट्स् ॲंड ट्राइब्ज् इन सी. पी. ]

**खत्री, बाबू कार्तिकप्रसाद** ( १८५२-१९०४ )— एक हिंदी पंडित व ग्रंथकार. यांचे आजे बाबू गोविंदप्रसाद फार नावाजलेले वैद्य होते. वडील बलदेवप्रसाद हेहि वैद्य असून शब्दकल्पद्रुम नांवाचा वैद्यकावरील संस्कृत कोश त्यांनीं ग्रथित केला. कार्तिक प्रसादजींनीं लहानपणीं वैद्यक ग्रंथ मुखोद्गत केले. बंगाली भाषा त्यांना चांगली अवगत

होती व इंग्रजीहि सात इयत्तापर्यंत शिकले होते यांना सर्वांत जास्त आवड हिंदी भाषेची होती 'प्रेमविलासिनी' व 'हिंदी-प्रकाश' ही दोन हिंदी पत्रें कांहीं दिवस यांनी चालविलीं होतीं हिंदी गद्य लेखनाचा प्रघात यानींच घालून दिला. हिंदी नंदकोश व केशवसेनकृत वैद्यकनिघंटु अकारादि वर्णानुक्रमें त्यांनीं जुळविला व सारस्वतदीपिका प्रसिद्ध केली. त्यांनीं आसामांत कांहीं दिवस राहून तेथें हिंदीचा थोडाबहुत प्रसार चालविला. सर्व हिंदी पत्रांना त्यांची मदत असे. ते 'भारतजीवन' पत्राचे कांहीं दिवस संपादक होते १९०० सालीं इंडियन प्रेस( प्रयाग )मधून 'सरस्वती' पत्रिका निघूं लागली तिच्या संपादकमंडळींत बाबू महाशय होते. काशी येथील नागरीप्रचारिणी सभेचे ते एक सभासदहि होते उपाहरण, जया, प्रमिला, दीनानाथ, मधुमालती, कुलटा, दलितकुसुम, शिवाजी, पारराज, विक्रमादित्य, अहल्याबाई, मीराबाई, ईला, प्रातस्मरण, सतीसत्वरक्षा, श्रृंगारदान, वनिताबधु इत्यादि स्वतंत्र पुस्तकें कार्तिक प्रसाद यांनीं लिहिलीं आहेत याप्रमाणें हिंदी भाषेची अखंड सेवा करून बाबूजी १९०४ सालीं काशी येथें वारले वेंकटेश्वर समाचार, नागरी प्रचारिणी सभा वगैरे संस्थांकडून त्यांचें चरित्र लिहिलें गेलें आहे [ वि विस्तार पु ४४ ]

**खनिखोदनशास्त्र**—जमीनीच्या पोटांतील खनिजद्रव्यें शोधून व खणून काढण्याचें शास्त्र या शास्त्राची व्याप्ति केवळ भूगर्भातील खनिज पदार्थ शोधून काढण्यापुरतीच नसून भूपृष्ठावरील पदार्थांचें खनन करण्याचाहि या शास्त्रांत अंतर्भाव होतो खननशास्त्राचे मुख्यत तीन पोटभाग पडतात (१) खनिजपदार्थ शोधून काढणें (२) खनिजपदार्थांचें शास्त्रीय संशोधन करणें व खनिखोदनाची सामग्री जमविणें व (३) खाणी चालविणें या तिसऱ्या पोटभागांत खनिजपदार्थ खणून वर काढण्याचीं साधनें व पद्धति, खनिजपदार्थ काढणाऱ्या लोकांसाठीं सरकारनें केलेले कायदे, खाणी खणतांना होणारे अपघात व तन्निवारणार्थ उपाय इत्यादि बाबींचा समावेश होतो.

**खनिज पदार्थ शोधन**—खनिज पदार्थांचा शोध काढणें हें काम फार अवघड आहे कोणत्या ठिकाणीं कोणता खनिज पदार्थ सांपडूं शकेल याचा अंदाज करण्याला भूस्तरशास्त्राचें खोल ज्ञान असावें लागतेंच पण त्या बरोबरच रसायनशास्त्राचेंहि ज्ञान आवश्यक आहे खनिज पदार्थांचा शोध काढण्याचें काम साहस संशोधकाशिवाय दुसऱ्याच्या हातून होणें अशक्य आहे अशा प्रकारच्या साहसी संशोधकाला डोंगरांतील खडकांचें सूक्ष्म अवलोकन करावें लागते व जमीनींतील मातीचें पृथक्करण करावें लागतें कांहीं विशिष्ट प्रकारच्या जमीनींत विशिष्ट प्रकारचीं झाडें उगवतात त्या झाडांवरून त्याला त्या जमीनीच्या गर्भांत कोणती खनिज संपत्ति असूं शकेल याचाहि विचार करावा लागतो पाण्याच्या प्रवाहीं साचलेल्या गाळावरूनहि त्याला एखाद्या खनिज पदार्थाच्या स्थानाविषयीं तपास लागण्याचा संभव असतो. तात्पर्य खनिज पदार्थांचा अंदाज काढणें हें अतिशय सूक्ष्म बुद्धीचें व प्रयासाचें काम आहे

**खनिज पदार्थांचें संशोधन व सामग्री**—अशा रीतीनें खनिज पदार्थ अमक्या ठिकाणीं सांपडूं शकेल असा अंदाज काढल्यानंतर त्या स्थानाची संपूर्ण माहिती मिळविणें हें दुसरें काम होय यासंबंधीं खालील प्रकारची माहिती मिळविणें जरूर आहे (१) खनिजसंपत्ति असलेल्या स्थानाचें क्षेत्रफळ, खनिज द्रव्याची व्याप्ति व त्याचें मूल्य, (२) खनिज पदार्थांच्या स्थानापैकीं खणण्याला योग्य असलेला भाग, (३) खननकामाला लागणारा खर्च व खननासाठीं स्वीकारावयाच्या पद्धती खनिजपदार्थांचें संशोधन करण्याची सर्वांत सुलभ पद्धति म्हणजे संशोध्य स्थानाचा पृष्ठभाग बारकाईनें तपासणें होय. जमीनीचा पृष्ठभाग थोडासा खणून पाहिला असतां क्वचित् प्रसंगीं पुष्कळ महत्वाचा शोध लागण्याचा संभव असतो निदान संशोध्य स्थान हें खणण्याला योग्य आहे किंवा नाहीं ही तरी माहिती बहुतेक मिळूं शकते पण कांहीं वेळा या भूपृष्ठखननाचा बिलकुल उपयोग होत नाहीं अशा वेळीं भूगर्भखननाची जरूरी उत्पन्न होते. उदाहरणार्थ कांहीं खनिज पदार्थांच्या अगर धातूंच्या शिरा चटकन लागत नाहींत. त्या जमिनीच्या खालीं बऱ्याच खोल असतात. अशा वेळीं जमिनींत बरेंच खोल भोंक पाडून नंतर तेथील थर तपासणें अधिक उपयुक्त असतें उदाहरणार्थ मीठ, लोखंडाचे दगड इत्यादि पदार्थांचें संशोधन करावयाचें असल्यास, जमिनीच्या गर्भांत भोंक पाडणें जरूर असतें. संशोध्य स्थानामध्यें निरनिराळ्या ठिकाणीं भोकें पाडून त्यावरून खनिज पदार्थांचें संशोधन करावें. म्हणजे साधारणतः अंदाज चुकत नाहीं भूपृष्ठखननानें जेव्हां आपल्याला खनिज पदार्थासंबंधीं पूर्ण माहिती मिळते अशा वेळींहि भूपृष्ठखननाचा मार्ग स्वीकारला असतां त्याचा उपयोग अधिक होतो एखादे वेळीं असें घडतें कीं, नुसत्या भूपृष्ठखननाच्या योगानें आपल्याला धातूंच्या शिरा लागतात, त्यावरून आपण अंदाज करतो. पण तो अंदाज एखाद्या वेळीं चुकीचा ठरण्याचा संभव असतो. कारण भूगर्भांत या धातूंच्या दगडाबरोबरच दुसरे कांहीं अवशेष मिसळलेले असतात, व हे आपल्याला केवळ भूपृष्ठखननानें कळून येत नाहीं. अशा वेळीं भूगर्भखननाचाच अधिक उपयोग होतो. कांहीं प्रसंगीं हे भूगर्भखनन फार खोलपर्यंतहि न्यावें लागतें.

अशा रीतीनें खनिज पदार्थांचें संशोधन झाल्यानंतर, त्या भागापर्यंत जाण्यासाठीं खड्डे, अगर बोगदे खणण्याच्या कामाला सुरवात होते. ज्या ठिकाणीं खाणीच्या क्षेत्रांत पुष्कळशा खोल दऱ्या असतात अशा ठिकाणीं बोगदे खणण्यापासून उपयोग होतो पण खाणीच्या पृष्ठभागाच्या खालीं खनिज पदार्थ असतो त्या वेळीं खड्डा खणणें जरूर होतें. जेव्हां खनिज पदार्थांच्या शिरा वरवर लागतात त्या वेळीं

आडवा खड्डा खणणें अधिक सोईचें पडतें इतर वेळीं मात्र उभा खड्डा खणावा लागतो खनिज पदार्थांच्या थराची जाडी वरीच असेल तर पायर्‍याच्या भिंतींमध्यें खड्डा अगर बोगदा खणणें आवश्यक होतें खाणीचा मुख्य भाग सुरक्षित रहा ण्याकरितां मध्यतरीं खनिज पदार्थाचे खांब सोडण्याची पद्धत आहे

अशा रीतीनें खाणी खणण्यापूर्वीची सर्व तयारी झाल्यावर मग प्रत्यक्ष खाणी खोदून खनिज पदार्थ काढण्याला सुरवात होते खनिखोदनाचे पुष्कळ प्रकार आहेत पुष्कळ प्रकारांपैकीं कोणता प्रकार अमलात आणावयाचा हें खनिज पदार्थाचे गुणधर्म, खडकाची जाडी,इत्यादिकांची तपासणी करून ठरवावें लागतें जो प्रकार कमी खर्चाचा होईल तोच प्रकार अमलात आणणें अत्यंत जरूर आहे खाणी खोदण्याच्या बाबतींत खाणी खोद-णार्‍या मजुरावर होणारा खर्च महत्वाचा आहे. याशिवाय खनिज पदार्थ वर नेण्यासाठीं लागणारे श्रम व खर्च याहि गोष्टी महत्वाच्या आहेत या सर्व गोष्टी लक्ष्यांत घेऊन कमी खर्चाची पद्धति स्वीकारणें अत्यंत जरूरीचें आहे

खाणी खोदण्याची जागा शक्य तितकी विस्तृत असणें जरूरीचें आहे पण खडकाची जाडी व खालील भागाची वरचें वजन तोलून धरण्याची शक्ति यावरून खाणी खोदण्याच्या जागेची मर्यादा ठरवावी लागते खडक जर फार जाड व कठिण असतील तर खाणींतील काम कर-ण्याचें क्षेत्र १०० ते २०० फूट रुंदीचें असावें लागतें खडक पातळ असतील तर क्षेत्राची रुंदी २० ते ३० फूट असते क्षेत्राच्या लांबीची मर्यादा, ही खाणी खोदण्यास लाग-णारा वेळ, खाणी खोदण्याचा वेग व खनिज पदार्थ वर नेण्याला लागणारा वेळ यावरून ठरविली जाते 'लॉंगवॉल' अथवा मोठी दालनें ठेवून खणण्याच्या पद्धतीमध्यें व ज्या खाणींमध्यें खांब मध्यें ठेवून मधून मधून खणण्यात येतें अशा खाणींमध्यें काम करण्याचें क्षेत्र बरेंच लहान असतें

खाणींतील खनिज पदार्थ पूर्णपणें खोदून काढणें हें जरी इष्ट आहे तरी तसें करण्याला अतिशय खर्च येतो ज्या खाणींत खनिज पदार्थ विपुल असतो अशा खाणींत खाणीचा वरचा भाग तोलून धरण्यासाठीं बराचसा खनिज पदार्थाचा भाग खांब ठेवण्यासाठीं वगळावा लागतो खनि-खननाचा पूर्वेतिहास पाहिला असता खनिखोदन हें पद्धत-शीर रीतीनें होत असल्याचें आढळून येत नाहीं पण हल्लीं पद्धतशीर रीतीनें खाणी खणण्याची पद्धत अस्ति-त्वात आली आहे व त्यामुळें श्रम व खर्च या दोन्ही दृष्टीनें खाणी खोदण्याचें काम अधिक किफायतशीर झालें आहे हल्लींची खनिखोदनाची पद्धत फार सोपी आहे एखादी मोठी खाण खोदावयाची असल्यास हल्लीं खाणीच्या क्षेत्रात अनेक ठिकाणीं एकदम खणण्यास सुरवात करतात खाणींचा बराच भाग तोलून धरण्यासाठीं मध्यतरीं मोठ मोठे खांब उभारलेले असतात व बाकीची सर्व खाण खोदून झाली कीं नंतर मध्यंतरीं सोडलेले खांब खोद-ण्यात येतात उथळ खाणींमध्यें हे खांब लहान आकाराचे असतात ते पाडण्याला व त्यांतील खनिज पदार्थ काढ ण्याला फारसा त्रास पडत नाहीं पण, खोल व विस्तृत खाणींतील खांब फार मोठे असल्यानें ते पाडणें फार जोख मीचें असतें अशा वेळीं सागवानी लाकडाचे भले मोठे खांब उभारून वरचा भाग तोलून धरून नंतर मग खनिज पदार्थांचे खांब पाडण्याचें काम करतात

खनिज पदार्थ जर फारसा कठिण नसेल तर अशा खनिज पदार्थाच्या खाणींत मोठमोठे खांब असावे लाग-तात उदाहरणार्थ कोळशाची खाण अशा खाणी खोदण्याच्या कामात 'रूम ॲन्ड पिलर' अथवा खोलीपद्धत अमलात आणावी लागते ( या पद्धतीविषयींची माहिती 'कोळसा' या लेखात दिली आहे ) लोखंडाच्या खाणींत देखाल साधा रणत हीच पद्धत स्वीकारण्यात येते धातूच्या खाणी खोद ण्याची सर्वसामान्य पद्धत म्हणजे 'स्टूप' अथवा जिन्याची पद्धति होय या पद्धतीप्रमाणे निरनिराळ्या मजुरांच्या तुकड्यांना निरनिराळीं खणण्याचीं क्षेत्रें नेमून देण्यात येतात पण तीं क्षेत्रें विषम उंचीवरचीं देण्यात येतात, म्हणजे कांहीं मजुरांना अगदीं खाणीच्या तळाशीं, तर कांहीं मजुरांना त्यापेक्षा थोड्याश्या उंचीवरची जागा खोद-ण्यासाठीं देण्यात येते अशा रीतीनें जिन्याच्या पायर्‍या प्रमाणें खाणी खोदण्यात येतात खनिज पदार्थांचे थर ज्यावेळीं फार जाड असतात, त्यावेळीं खालच्या व वरच्या भागामध्यें निरनिराळे आडवे भाग पाडण्यात यतात हे दिसण्यात मजल्याच्या आकारासारखे दिसतात या मज-ल्याच्या मधील जागा खणून झालेली असते अशा रीतीनें भाग पाडण्यात आल्यावर मग खालून अथवा वरून खोद-ण्याचें काम सुरू होतें मजले खणताना देखील 'रूम ॲन्ड पिलर' ची पद्धत स्वीकारण्यात येते. खनिज पदार्थ जमी नीच्या पृष्ठभागापासून फारसे खोल नसतील तर, भूगर्भ पद्धतीप्रमाणें वर आच्छादन राखून नंतर खाणी खोदण्यात न येता, एकदम भूपृष्ठापासूनच खनिखोदनाला सुरुवात होते खनिज पदार्थ मृदु असेल तर पहारीनें व कुदळीनें खडक फोडण्यात येतात व प्रसंगीं सुरुंगाचाहि उपयोग करण्यात येतो

खाणींतील खनिज पदार्थ खणून काढताच तो डब्यामध्यें अगर गाड्यामध्यें घालून वर आणण्यात येतो या गाड्या जनावराकडून अगर माणसाकडून ओढल्या जातात गाड्याचा आकार खाणींतील रस्त्याच्या लांबीरुंदीवर अवलंबून असतो. युनायटेड स्टेट्समध्यें दोन ते चार टन माल मावू शकेल अशा गाड्या असतात यूरोपमध्यें १००० ते १५०० पौंड वजन नेऊ शकणार्‍या गाड्या वापरण्यात येतात तांबे, शिसें अगर इतर मौल्यवान् धातूच्या खाणींत १२०० ते २००० पौंड माल नेणार्‍या गाड्या

वापरण्यात येत असून त्या माणसाकडून ओढल्या जातात. या गाड्या रुळांवरून ओढण्यात येतात व अतिशय मोठ्या धातूंच्या खाणींत जनावरांच्या साहाय्यानेंहि गाड्या ओढण्यात येतात. मोठमोठ्या खाणींतून वाफेच्या साहाय्यानेंहि गाड्या चालविण्यात येतात. पण विजेच्या साहाय्यानें चालणाऱ्या गाड्या किफायतशीर असल्याचें आढळून आल्यावरून हल्लीं त्याचा बराच प्रसार होऊं लागला आहे. अशा प्रकारच्या गाड्यांची गति ताशीं सहा ते सात मैल असते. खाणींतील मार्गांत ज्यावेळीं भयंकर चढउतार असतो त्यावेळीं विजेच्या गाड्यांच्यापेक्षा दोरीनें अगर साखळीनें गाड्या ओढण्याचा उपाय अमलांत आणणें जरूरीचें होतें. दोन रुळांच्यामध्यें एक साखळी असून ती साखळी रुळावर ठेवलेली असते व ही साखळी एका एंजिनाला बांधण्यात येते व हें एंजिन ही साखळी ओढूं लागलें कीं गाडी हळू हळू वर येऊं लागते. अशा प्रकारच्या साखळीनें ओढल्या जाणाऱ्या गाड्या कोळशाच्या खाणींमध्यें हल्लीं सरसहा वापरण्यात येऊं लागल्या आहेत.

खड्याच्या द्वारा ज्या खाणी खोदण्यात येतात अशा खाणींतील माल नेण्यासाठीं व तसेंच माणसें व उपकरणें यांची नेआण करण्यासाठीं पाळण्याच्या आकाराचीं यंत्रें उपयोगांत आणावीं लागतात. या यंत्राची रचना अशी असते — दोन आडवीं पवनारें (सिलिंडरें) एका दांड्याशीं जोडण्यात येतात. या दांड्याच्या खालच्या भागाशीं एक अगर दोन पडघमच्या आकाराचीं पंचपात्रें असतात. यांचा व्यास बराच मोठा असतो. हीं पंचपात्रें वाटोळीं फिरविण्याकरितां जे पेंच असतात त्यांच्या योगानें एंजिन पाहिजे तेवढें अधिक सहज वर ओढूं शकतें. दातांचीं चक्रें जेव्हां पाळण्याला असतात त्यावेळीं हीं पडघमच्या आकारांचीं पंचपात्रें एका स्वतंत्र दांड्याला जोडलेलीं असतात. जितका अधिक वेग पाहिजे असेल तितक्या प्रमाणांत हीं पंचपात्रें काहीं ठिकाणीं कोनाकृति असलीहि असतात. एंजिन चालू झालें कीं दोरी गुंडाळावयास सुरवात होते व या पंचपात्राच्या साहाय्यानें खालील माल वर नेण्यात येतो. या एंजिनाला चांगले ब्रेक ठेवलेले असतात अगर उलट्या दातांचीं चक्रें लावलेलीं असतात.

या पाळण्याच्या दोऱ्या पूर्वीं तागाच्या करण्यात येत असत. पण मोठ्या वजनाचे पाळणे उचलण्याच्या कामीं या दोऱ्या कुचकामाच्या ठरूं लागल्यामुळें लोखंडाच्या साखळ्या वापरण्यात येऊं लागल्या. खोल खड्यांतून वर माल काढताना या साखळ्यांवर फार भार पडत असे तो कमी करण्याकरितां त्या साखळ्यांभोंवतीं अतिशय लवचिक अशी पोलादी तार गुंडाळण्यात येऊं लागली. या साखळ्या वाटोळ्या व चपट्या अशा दोन्हीं प्रकारच्या असतात. काहीं ठिकाणीं वाटोळ्या व काहीं ठिकाणीं चपट्या साखळ्या वापरण्याचा प्रघात आहे. पण चपट्यापेक्षा वाटोळ्या साखळ्या अधिक टिकाऊ असतात असें आढळतें.

खनिज पदार्थ जसजसा खणून काढण्यात येईल तसतसा तो लवकर वर नेणें अत्यंत जरूरीचें असतें. मालाच्या गाड्या मधेंच तो पुष्कळ वेळ ठेवणें खर्चाच्या दृष्टीनें फार महाग पडतें कारण मालानें भरलेल्या या गाड्यांची पुन्हां खालचा माल वर नेण्यासाठीं जरूरी असते. यामुळें खनिज पदार्थ बाजारांत विकीला जाण्यापूर्वी, एके ठिकाणीं साठविण्यासाठीं मोठमोठीं कोठारें बांधलेलीं असतात.

खाणींतील मजुरांना खालीवर येण्यासाठीं पूर्वीं साध्या शिड्यांचा उपयोग करण्यात येत असे. पण यंत्रांच्या साहाय्यानें मजुरांना खाणींत उतरविणें व वर आणणें हें अधिक सोईस्कर पडूं लागल्यामुळें हल्लीं हीच पद्धत अंमलांत आली आहे. ही पद्धत उथळ खाणींत जितकी उपयुक्त आहे तितकी खोल खाणींत उपयोगी पडत नाहीं. ज्या खाणी खोदण्यासाठीं उभे खड्डे खणण्यात आलेले असतात अशा खाणींमध्यें, मजुरांना खालीवर आणण्याकरितां पिंजरे तयार केलेले असतात. या पिंजऱ्यांत १५।२० माणसें मावतात. अशा प्रकारचे पिंजरे यूरोपमध्यें व युनायटेड स्टेट्समधील बऱ्याच खाणींत अद्यापिहि प्रचारांत आहेत. पण ज्या खाणी खणण्यासाठीं आडवे खड्डे खणण्यात येतात, अशा ठिकाणीं या पिंजऱ्यांचा म्हणावा तसा उपयोग होत नाहीं. अशा वेळीं व्हिंचिसच्या साहाय्यानें लोकांना वरखालीं नेण्यात येतें. पण खाणी अतिशय खोल असल्यास या व्हिंचिस ऊर्फ पाट्यापेक्षा २०।३० माणसें मावतील अशा गाड्या उपयोगांत आणतात. 'लेक सुपीरियर कॉपर डिस्ट्रिक्ट' मधील खाणींमध्यें अशा प्रकारच्या गाड्या अद्यापिहि वापरण्यात येत आहेत.

खाणींतील पाणी वर नेण्याची पद्धति.— पुष्कळ खाणींमध्यें साचलेलें पाणी आपोआप वाहून जावें यासाठीं पूर्वीं लांबलचक बोगदे खणीत. पण हल्लीं ही पद्धत त्याज्य ठरविण्यात आली आहे. यांत्रिक साहाय्यानें खाणींतील पाणी वर नेण्यानें खर्चामध्यें पुष्कळ बचत होते असें आढळून आल्यामुळें हल्लीं बहुतेक खाणींमधून याच पद्धतीचा अवलंब होऊं लागलेला आहे. जमिनीच्या पृष्ठभागापासून खाणींत पंप नेऊन या पंपाच्या योगानें पाणी वर नेण्यात येतें. या पंपाच्या योगानें जें पाणी वर काढण्यात येतें तें साठविण्यासाठीं एक पाण्याचा हौद तयार केलेला असतो. खडक जर फारशा उंचीचे नसतील तर पंपाचा उपयोग न करितां वक्र नलिकेच्या द्वारानें पाणी वर काढण्यात येतें. खाणीमध्यें येणारें पाणी बहुधा जमिनीच्या पृष्ठभागावरूनच येत असल्याकारणानें हें पाणी खाणींमध्यें जाऊं नये यासाठीं हें पाणी साठविण्याकरितां खळगे खणण्यात येतात. पाणी वर काढण्यासाठीं पंप, बादल्या अगर टाकी या तिन्हीं प्रकारांचा अवलंब करण्यात येतो. ज्या ठिकाणीं उथळ खड्डे असतील

त्या ठिकाणीं ३५ ते १०० गॅलन पाणी वर टाकण्यात येतें. पण खोल खड्डयामधील पाणी काढण्याकरतां टाक्यांचा उपयोग करण्यात येतो. खाणीमध्यें ज्यावेळीं अतिशय पाणी साचूं लागतें अशा वेळीं या टाकीचा जलदीनें पाणी काढण्याच्या कामीं फार उपयोग होतो.

खाणींतून पाणी काढण्याच्या पंपाचे दोन प्रकार आहेत. ( १ ) कॉर्निश पद्धतीचा पंप व (२)वॉदिंग्टननें तयार केलेला पंप पाहिल्या प्रकारात पंप चालूं करण्यासाठीं जें एंजिन असतें तें जमिनीच्या पृष्ठभागावर ठेवलेलें असतें व दुसऱ्या प्रकारात पंप व एंजिन हीं स्वतंत्र नसून पंपामध्येंच तो आपोआप चालू होण्याची योजना केलेली असते. कॉर्निश पद्धतीचा पंप खर्चाच्या दृष्टीनें सोईचा आहे. पण आरंभीं तो खाणींत बसविण्यासाठीं बराच खर्च करावा लागतो. वॉदिंग्टनचा पंप हा वाफेवर चालणारा असतो व कॉर्निश पंपापेक्षा या पंपानें पाणी वर जलद काढतां येते हल्लीं विजेच्या साहाय्यानें पंप चालूं करण्याची पद्धत सर्वत्र रूढ झाली आहे. सेंट्रिफ्यूगल अगर केंद्रोत्सारी पंपहि क्वचित वापरण्यात येतात. खाणींतील पाण्यामध्यें अम्लाचा बराच भाग असल्यास, पंपाचे भाग हे मिश्र धातूचे अगर दुसऱ्या लवकर न गंजणाऱ्या धातूचे केलेले असतात, अगर पाणी साठविण्यासाठीं केलेल्या हौदात चुन्याची निवळी घालून अम्लाचा परिणाम नाहींसा करण्यात येतो.

खाणींत हवा खेळविण्याची पद्धत.—खाणीमध्यें पुष्कळ माणसें व जनावरें असल्यामुळें, तसेंच असंख्य दिवे लावावे लागत असल्याकारणानें खाणींतील हवा दूषित होते. सुरुंगांतील दारूमध्येंहि विषारी वायू असल्यामुळें त्या वायूच्या अल्पांशानेंहि शरीरावर फार अनिष्ट परिणाम घडतात. याशिवाय खडकाच्या फटींतून अगर इतर खनिज पदार्थांतून निघणाऱ्या वायूंमुळें या अनिष्ट परिणामामध्यें भरच पडते. दगडी कोळशाच्या खाणींत स्फोटापेक्षा अभिजन्य प्राणघातक वायूमुळें व अनूप( मार्श )वायुमुळेंच प्राणहानि अधिक होते असें दृष्टोत्पत्तीस आलें आहे. अशी स्थिति असल्यामुळें खाणींतील हवा शुद्ध राखण्याची अतिशय जरूर असते व त्याकरितां खाणीमधून शुद्ध हवा खेळविण्याची साधनेंहि निर्माण करण्यात आलीं आहेत. पण धातूंच्या खाणींमध्यें कृत्रिम हवा खेळविणेंहि अतिशय जड होतें. हवा खेळविण्यासाठीं शुद्ध हवा आंत येण्यासाठीं एक व दूषित हवा बाहेर येण्यासाठीं एक अशा दोन जाळ्या करण्याची पद्धत असते.

भूगर्भांतील खाणींमध्यें हवामान बहुतेक सर्व ऋतूंत सारखेंच असतें. बाहेरील हवेपेक्षा उन्हाळ्यांत या खाणींमधील हवा अधिक गार व हिंवाळ्यांत अधिक उष्ण असते. अशी स्थिति असल्यानें खाणींत हवा खेळण्याकरतां केलेली धुराडीं निरनिराळ्या उंचीवर असतील तर, आंतील हवा व बाहेरील हवा यांच्या उष्णमानामध्यें बरेंच अंतर पडून प्रापणप्रवाह सुरू होऊन खाणींमध्यें हवेचा प्रवाह आपोआपच लागेल याप्रमाणें हिंवाळ्यात तर पुष्कळच हवा खेळत असते. उन्हाळ्यात मात्र हवा साहजिकच कमी खेळत असते.

खाणींतील हवा उष्ण करून ती खाणींत खेळविण्याचा एक उपाय आहे. हवा येण्याच्या द्वाराच्या तळाशीं एक भट्टी करून हवा उष्ण केली म्हणजे खाणींत हवा खेळूं लागते पण हा उपाय फारसा उपयुक्त नाहीं. शिवाय ज्या खाणींत अग्निजन्य प्राणघातक वायु पसरण्याचा संभव, असतो त्या ठिकाणीं हा उपाय अमलात आणणें धोक्याचें असतें. कारण एखाद्या वेळीं हवेचा प्रवाह उलट दिशेनें वाहूं लागल्यास खाणींत कर्बद्विप्राणिद ( कार्बानिक ॲसिड गॅस ) मोठ्या प्रमाणात पसरून खाणींत आग लागण्याचा संभव असतो अशा प्रकारचा उपाय बराच घातुक असल्यानें पुष्कळ देशात कायद्यानें हा उपाय बंद करण्यात आला आहे.

वरील मार्ग टाकाऊ ठरल्यानें हवा खेळविण्याचे कृत्रिम उपाय निर्माण करण्यात आले आहेत. १८५० च्या सुमारास केन्द्रोत्सारी ( सेंट्रिफ्यूगल )हवा खेळविणारी यंत्रें प्रथम उपयोगात आलीं. पंख्यांच्या द्वारें खाणींत हवा खेळण्याची दुसरीहि एक युक्ति अमलात आली आहे. या यंत्राची रचना असते ती.—खाणींत जाण्याच्या खड्डयामध्यें आच्छादनयुक्त असे अनेक वातकूट ( एक प्रकारचा पत्रा ) एकावर एक बसविलेले असतात. वरून येणारी हवा या पंख्यावर आदळताच हे पखे फिरूं लागतात व सर्वत्र हवा खेळूं लागते. आच्छादनविरहित पंख्यामुळें हवा अधिक खेळते. या पंख्याचा खाणींत हवा पसरविण्याच्या कामी व खाणींतली दूषित हवा नाहींशी करण्याच्या कामींहि उपयोग होतो. खाणींतील दूषित हवा नाहींशी करणाऱ्या पंख्यात गुइबल पंखा हा विशेष वापरण्यात येतो. याशिवाय रेट्यू, श्रील, पेल्झर वगैरे अनेक नावाचे पंखे हल्लीं वापरण्यात येतात. आच्छादनरहित पंख्यात वॅडेलचा पंखा प्रसिद्ध आहे. मंदगति पंख्याचा व्यास तीस ते पंचेचाळीस फूट असतो व त्याच्या योगानें दर मिनिटाला एक लाख घनफूट हवा खेळविता येते. कोळशाच्या खाणीसारख्या भयंकर खाणींतील खड्डयामध्यें दोन पंख्यांची योजना करून ठेवण्यात आली असते. वेळेस अपघाताच्या वावतींत एखादा पंखा बंद पडला तर दुसरा पंखा चटकन सुरू करता येतो.

हवेचा प्रवाह खाणींमध्यें खेळविणारी ही जी यांत्रिक प्रवर्तक शक्ति असते तिला खाणींतील घर्षणात्मक प्रतिबंधामुळें बराच अडथळा होतो हा अडथळा नाहींसा करण्याकरतां हवेचा कांहीं भाग खर्ची घालावा लागतो या प्रतिबंधाचें मान कमी करण्यासाठीं निरनिराळ्या भागात निरनिराळे मार्ग करण्यात येतात. निरनिराळे मार्ग केल्यानें हवा अधिक खेळूं लागते. पण त्याबरोबरच हवेचा प्रवाह एखाद्या वेळीं उलट्या दिशेनें वाहून स्फोट होण्याचा संभव असतो अशा वेळीं खाणीच्या ज्या भागातील हवा उलट्या

दिशेनें वाढते तेवढ्याच भागाचा नाश होतो. बाकीच्या भागाला फारसा उपसर्ग पोहोंचत नाहीं.

खाणी खणण्याचें काम किती खोलपर्यंत नेता येईल यासंबंधीं खनिशास्त्रज्ञांचे तर्क चालू आहेत. खाणी खोल खणण्याच्या कामीं खाणींतून पाणी वर काढण्याच्या बाबतींत होणारी गैरसोय व खाणींतून खनिज पदार्थ वर नेण्याची अडचण या बाबी प्रमुख आहेत. पण त्याशिवाय खडकाचें उष्णमान व वरील थराचें वजन याहि बाबी लक्षांत घेणें अपरिहार्य आहे. जगांतील सर्वांत खोल खाण म्हणजे मिचिगन संस्थानांतील हुटन परगण्यातील टामरकची खाण होय. ही खाण ५२०० फूट खोल आहे. या टमरक कंपनीच्या इतर तीन व त्यानजीकच असलेल्या कॅलुमेट व हेलका येथील खाणींची खोली ४००० ते ५००० फुटांच्या दरम्यान आहे हूटन परगण्यातील किन्सी येथील खाणींची खोली ४००० फुटापर्यंत गेली आहे. इंग्लंडमधील व बेलजमधील काहीं कोळशाच्या खाणी तीनचार हजार फूट खोल आहेत. ऑस्ट्रेलियांतील व्हिक्टोरिया ब्राटेस्र खाण ही ४३०० फूट खोल आहे ट्रॅन्सव्हाल येथील काहीं सुवर्ण खाणींची खोली ६००० फूट पर्यंत गेली आहे या वरील खाणी अद्यापि पुष्कळ खोल खणता येतील असा तज्ज्ञाचा अभिप्राय आहे. खाणींतून खनिज पदार्थ वर काढण्याची व पाणी वर नेण्याची अडचण दूर करता येणें शक्य आहे असें नज्ज्ञानीं ठरविलें आहे. फक्त खडकाचें उष्णमान व खाणीच्या वरच्या भागातील थराचें वजन यासंबंधीं काय तजवीज करता येईल यासंबंधीं हल्लीं प्रयत्न चालू आहेत. दर ५० ते १०० फूट खोलीला एक डिग्री उष्णता वाढते असें प्रयोगानें सिद्ध झालेलें आहे. मिचिगन व ट्रॅन्सवालमधील खोल खाणींमध्यें २०० अगर त्याहीपेक्षा अधिक फूट खोलीला एक डिग्री प्रमाण वाढतें असा तेथील अनुभव आहे. व्हर्जीनिया शहरांतील कामस्टाकच्या खाणी १३० फारनहीट डिग्रीपर्यंत खोल खणता येणें शक्य आहे असें विद्वानाचें मत आहे. पण अतिशय खोलीपर्यंत खणण्यांत आलें असता, मृत्यूचें प्रमाण वाढत जातें असें दृष्टोत्पत्तीस येतें. आल्प पर्वतांतील खाणींतील हवा दमट असल्यानें ९० डिग्रींपर्यंत खणणें देखील कठिण होतें साधारणतः खडकाचें उष्णमान ५०° फारनहीट धरलें व १०० ते २०० फूट खोलीला एक डिग्री उष्णमान अधिक वाढतें असें मानलें तर १२०° उष्णमान होण्याला ८००० ते१६००० फूट खोल खणावें लागेल पण इतक्या खोलीपर्यंत खाणी खणावयाच्या म्हटलें तर वरील भाग तोलून धरण्याकरिता जे खांब मध्यें उभारलेले असतात त्याना वरील भागाचें वजन असह्य होतें व हे खांब वाकूं लागतात. अशी स्थिति असल्यामुळें, खडकाचें उष्णमान व वरील वजन या दोहोंच्या कारणानें खाणींची खोली पुष्कळ ठिकाणीं ८००० ते १०००० फुटांपुढें नेता नशक्य होईल असा तज्ज्ञाचा अंदाज आहे.

खाणीविषयक कारभार — खाणी खणण्याचा धंदा हा कायमचा नसून तो काहीं कालपर्यंत टिकणारा आहे. खाणींतील खनिज पदार्थांचें पूर्ण खनन झालें कीं त्या खाणीचा कारभार संपला. ही गोष्ट खाणी खोदण्याकरतां कंपनी स्थापन करताना लक्ष्यांत ठेवण जरूर आहे. शिवाय खाणी खोदण्याचा धंदा हा इतर धंद्यापेक्षा अधिक धोक्याचा आहे. ही गोष्ट विसरता उपयोगीं नाहीं काहीं खाणी खणण्यात फायदा होण्याऐवजीं नुकसानच होतें काहीं खाणी फारशा फायदेशीर होत नाहींत शिवाय खाणी खणताना स्फोट होऊन पुष्कळ नुकसान होतें यासाठीं जें कर्जाऊ भांडवल उभारावें लागतें त्यातून दरवर्षी कर्जाची रकम फेडण्याकरता स्वतंत्र कर्जफेडीचा फंड साठविण्यात आला पाहिजे खाणी खणण्यात जें नुकसान येण्याचा संभव असेल त्यासाठीं घुडीत भांडवलहि निराळें काढून ठेवलें पाहिजे या सर्व गोष्टी खाणी खणण्याकरता स्थापन झालेल्या कंपनीनें पूर्णपणें लक्ष्यात ठेवल्या पाहिजेत.

खाणीची अंदाजी किंमत —साधारणतः एखाद्या जिंदगीचें मूल्य ठरवावयाचें तें वार्षिक नफ्यावरून ठरवावयाचें असतें. पण खाणींच्या बाबतींत नफ्याचें प्रमाणच अनिश्चित असल्यानें वार्षिक नफ्यावरून खाणींची अंदाजी किंमत ठरविता येणें अशक्य असतें. शिवाय खाणी खोदण्याला सुरुवात करण्याच्या अगोदरच खाणी उघडण्याच्या कामीं पुष्कळ पैसा खर्च करावा लागतो. अशी परिस्थिति असल्यामुळें, खाणींची अंदाजी किंमत ठरवितांना खालील गोष्टी विचारात घेणें जरुर आहे. ( १ ) खनिज पदार्थांचे नमुने व त्याची अंदाजी किंमत. ( २ ) खाणींचा जेवढा भाग उघडलेला असेल त्याचें परिमाण. ( ३ ) उघडलेल्या भागातील खनिज पदार्थांचें अंदाजी परिमाण. ( ४ ) खाणी खणण्याला लागणारा वेळ, त्यातील खनिज पदार्थांची अंदाजी किंमत व त्यावर होणाऱ्या फायद्याचें अंदाजी प्रमाण. खाणींतील खनिज पदार्थ खाणींतील सर्व भागात सारखा पसरला असेल तर थोडेच नमुने घेऊन त्यावरून खाणीची अंदाजी किंमत साधारणतः निश्चितपणें ठरवितां येते. पण काहीं खाणींत हा खनिज पदार्थ सर्व भागात सारखा पसरत नाहीं. अशा वेळीं खाणींतील निरनिराळ्या भागातील नमुने जमवून त्याची पारख करून नंतर त्यावरून अंदाजी मोल ठरवावें लागतें.

खाणीविषयक शिक्षण — या खाणींच्या धंद्यात खाणीविषयक शिक्षण हें प्रमुख अंग आहे. खाणी खणण्याच्या बाबतींत पुढाकार घेणारे लोक त्या शास्त्रात तज्ज्ञ असले पाहिजेत. या शास्त्राच्या अभ्यासकाला भूस्तरशास्त्राची पूर्ण माहिती असली पाहिजे. निरनिराळ्या देशांत खाणी खणण्याच्या ज्या पद्धती अमलांत असतील त्या सर्वांशीं यानें परिचय करून घेणें आवश्यक आहे. याशिवाय खनिज पदार्थांचे गुणधर्म भूगर्भांतील खाणी उघडण्याकरिता

लागणारें सर्व साहित्य, रसायनशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र इत्यादिकांचेंहि ज्ञान त्याला जरूर असलें पाहिजे यासाठीं ज्या ज्या भागांत बऱ्याच खाणी असतील अशा भागांत या शास्त्राचें ज्ञान देण्याकरितां शाळा उघडण्यांत आल्या आहेत. याखेरीज खाणींत काम करणाऱ्यांकरितां म्हणूनहि शाळा स्थापन झालेल्या आहेत या लोकांना रसायनशास्त्र, यंत्रशास्त्र, 'खननशास्त्र' भूस्तरशास्त्र यांचीं मूलतत्त्वें शिकविण्यांत येतात पण अशा रीतीनें या शास्त्राचा पूर्ण अभ्यास केलेल्या विद्वानांना देखील अनुभवासाठीं म्हणून कांहीं वर्षें काम करण्यांत घालवावीं लागतात

*खाणींतील अपघात* — खनिखोदनाचा धंदा अतिशय धोक्याचा आहे, व त्यामुळें अपघात होण्याचा संभव असतो हे अपघात कमी करण्यासाठीं कायदे करण्यांत आले आहेत हे कायदे सकृद्दर्शनीं कडक आहेत असें वाटतें पण सर्वसाधारणतः हे कायदे जरूरीचे व उपयुक्त आहेत खाणींवर देखरेख करण्याकरितां अधिकारी नेमण्यांत आले आहेत. इंग्लंड, स्कॉटलंड व आयर्लंड येथील खाणींमधील अपघाताचें प्रमाण पाहिलें असतां या कायद्यामुळें ते अलीकडे कमी होत चाललें आहेत असें दिसून येईल १८७८ मध्यें या अपघाताचें प्रमाण हजारीं २ ७८ होतें तर सन १८०९ मध्यें हजारीं २ हें प्रमाण होतें १९०० मध्यें हेंच प्रमाण हजारीं १ २५ इतकें पडलें खाणींतील अपघात ज्वालाग्राही पदार्थांच्या स्फोटापेक्षां खाणींतील खडक अगर खनिज पदार्थ एकदम ढासळून पडल्यामुळें अधिक होतात असें आढळून आलें आहे याशिवाय कामकऱ्यांच्या हलगर्जीपणामुळेंहि अपघात घडून येतात. खाणीविषयक कायदा अमलांत आल्यानें खाणींत शुद्ध हवेचा पुरवठा करणें, सुरक्षित कंदिलाचा सार्वत्रिक प्रचार वगैरे गोष्टींकडे विशेष लक्ष्य देणें खाणीवाल्यांना भाग पडूं लागलें आहे

*खाणींतील अनूप वायूमुळें खाणींत प्राणघातक वायू* उत्पन्न होतात व खनिजपदार्थांच्या कणांशीं त्यांचा संयोग होतांच स्फोट होतो. कित्येक वेळां दगडी कोळशाच्या कणामुळेंच स्फोट होतो. खाणींतील दिवे जर सुरक्षित असे नसतील तर अनूपवायु व साधी हवा यांच्या संयोगामुळेंहि स्फोट उत्पन्न होतो कोरड्या व कणविहीन खाणींमध्यें जिकडे तिकडे पाणी शिंपून अपघाताचें प्रमाण कमी करतां येतें. ज्या ठिकाणीं अग्नीमुळें प्राणघातक वायु पुष्कळ उत्पन्न होण्याचा संभव असतो अशा ठिकाणीं सुरक्षित दिव्यांचा उपयोग करणें अत्यावश्यक आहे खाणींमध्यें आगपेट्या व साधे दिवे वापरणें अत्यंत घातुक आहे

*खाणींमध्यें अगदीं साध्या कारणामुळें सुद्धां आग* लागण्याचा संभव असतो पण त्याशिवाय अग्नीमुळें उत्पन्न होणाऱ्या प्राणघातक वायूमुळें, अगर दिव्यांतील गॅस सोडण्याकरतां केलेल्या नळीशीं दगडी कोळशाच्या कणाचा संयोग झाल्यामुळेंहि आग लागते कांहीं खाणींत केवळ कोळशाच्या कणाच्या घर्षणानेंच आग लागते भूगर्भांतील खाणींत आग लागली असतां ती पाण्यानें विझवणें पुष्कळ वेळां अतिशय अवघड जातें अशा वेळीं आग विझेपर्यंत खाणी बुजविण्याशिवाय गत्यंतरच नसतें. पण ज्यावेळीं हेंहि शक्य नसतें त्यावेळीं खाणींच्यावर पाण्याचा साठा करून तो खाणींमध्यें सर्व मार्गांनीं सोडून देण्याची युक्ति अमलांत आणावी लागते म्हणजे खाणी जलमय करून टाकणें हा अगदीं शेवटचा उपाय होय

कांहीं वेळां खाणींमध्यें एकदम पाणी येऊन खाणी पाण्यानें भरून जातात व खाणींचें फार नुकसान होतें भयंकर पर्जन्यवृष्टीमुळें अगर नद्यांना पूर आल्यामुळें असे प्रकार घडून येतात. भूगर्भांत पाण्याचे संचय पुष्कळ असले तरी देखील खाणींमध्यें पाणी येण्याचा संभव असतो. भूपृष्ठावरील पाणी खालीं शिरूं नये यासाठीं ठिकठिकाणीं पाणी सांचवून तें खाणींच्या क्षेत्राच्या बाहेर सोडण्याची सोय केलेली असते नद्यांच्या अगर समुद्राच्या खालीं खाणी खणण्याचें काम शक्य असतें असें प्रत्यक्ष अनुभवानें सिद्ध झालें आहे

ज्या वेळीं खाणी खणण्याचें क्षेत्र विस्तृत असतें पण वरचा भाग तोलून धरण्याकरतां मधून मधून ठेवलेले खांब बारीक असून वरील वजन तोलून धरण्याला असमर्थ असतात त्यावेळीं वरचे खडक कोसळून विवर पडतें एखादे वेळीं खाणींत माणसें काम करीत असतांनाच वरून कांहीं भाग कोसळून पडतो व खाणींतल्या वाटा बुजल्या जातात पण अजीबात सर्व वाटा बंद झाल्याचे प्रसंग फारच क्वचित येतात

खा णी वि ष य क आ रो ग्य शा स्त्र —खाणींतील हवा मूळच्या व आगंतुक कारणांनीं दूषित होत असल्यानें अगर *ज्या प्रदेशांत खाणी खणण्याचें काम चालू असतें त्या प्रदे*शांतील हवामानामुळें खाणींत काम करणाऱ्या लोकांना कांहीं रोग होतात. कॉर्नवाल, दक्षिण आफ्रिका इत्यादि ठिकाणच्या खाणींत काम करणाऱ्या लोकांत क्षयाचें प्रमाण उत्तरोत्तर वाढत चाललेलेंच आढळून आलें आहे. खाणींत काम करतांना जी धूळ उडते तिच्यामुळें हा रोग मुख्यत्वेंकरून जडतो खाणी उघडण्याचें काम शक्य तितक्या लवकर व्हावें या हेतूनें अनेक ठिकाणीं यंत्राच्या योगानें खड्डे खणण्याची जी प्रवृत्ति खाणीवाल्यांत दिसून येते त्यामुळें सुरुंग उडतांच दारू व धूळ पूर्णपणें नाहींशी होण्याच्या पूर्वीच मजुरांना काम करणें भाग पडतें. त्यामुळें वाईट श्वासोच्छ्वास केल्यामुळें शरीरावर वाईट परिणाम घडून येतो. कर्बएकप्राणिद (कार्बन मॉनॉक्साइड)मुळें मजुरांच्या शरीरावर फार घातुक परिणाम होतो असें अनुभवास आलें आहे. खालील दमट हवेंत काम करून वर येतांच एकदम गार हवा लागली असतां शरीरप्रकृतीला तें अत्यंत अपायकारक

होतें. कांहीं खाणींमध्यें, 'अँकीलस्टोमियासिस' हा रोग अतिशय फैलावला आहे.

अर्वाचीन अशा प्रकारच्या रोगाला प्रतिबंध करण्याकरितां शक्य ते उपाय अमलांत आणण्यांत आले आहेत. खाणी-विषयक आरोग्यशास्त्रांत पारंगत असे वैद्य प्रत्येक खाणींत नेमण्यांत आलेले आहेत. खाणींत काम करणाऱ्यांना आरोग्यशास्त्राचें थोडेसें शिक्षण देण्याची व त्यांना आरोग्यशास्त्राचें महत्त्व समजावून देण्याची कल्पना हल्लीं खाणीवाल्यांमध्यें पसरत चालली आहे.

खाणीविषयक कायदा.—खाणी या स्थावर मालमत्तेंत मोडत असल्याकारणानें स्थावर जिंदगीला जो कायदा लागू तोच खाणींतहि लागू आहे. इंग्लंडांतील 'कॉमन लॉ' प्रमाणें अविभाज्य मालकाची जमिनीच्या गर्भांतील खाणी-वरहि मालकी असते पण प्राचीन काळापासून सोन्याचांदीच्या खाणींवर मात्र राजाची सत्ता होती. सार्वजनिक अगर सरकारी जमिनीच्या खालीं असलेल्या खाणींवर सरकारची मालकी असते व अशा प्रकारची जमीन दुसऱ्याला विकत देतांना जमिनीखालील खाणींचा हक्क आपल्याकडे सक्तरीनें ठेऊन घेतल्याचीं उदाहरणें आहेत. खाणींतील खनिज पदार्थ बाहेर न काढतां तसेच राहूं देणें हें लोकहिताचें नसतें हें तत्त्व प्राचीन काळापासूनच सर्व-मान्य असल्याचें दिसतें, व याकरितां खनिखोदनाला उत्तेजन देण्याकरितां मुद्दाम सवलतीचे कायदेहि सर्व देशांत करण्यांत आलेले आहेत. पुष्कळदां खनिखोदनाच्या कार्यांत सरकारनें अगर एखाद्या राजानें आपला हिस्सा ठेवल्याचीं उदाहरणेंहि आढळतात. पण खाणीवाल्यांनाच त्यांनीं खणून काढलेल्या संपत्तीचा उपभोग घेऊं देणें हें सरकारच्या व लोकांच्या दृष्टीनें फायदेशीर असतें असें अनुभवास आलें आहे. सुधार-लेल्या राष्ट्रांतल्या खाणीविषयक कायद्याचें पर्यालोचन करतां हल्लीं बहुतेक सर्व राष्ट्रांत वरील तत्त्व असल्याचें आढळून येतें व याचा परिणामहि चांगला झाल्याचें रॉकी माउंटनमधील खाणींच्या व आस्ट्रेलिया व अलास्का येथील खाणींच्या इतिहासावरून आढळून येतें.

हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून खनिखोदनाचा धंदा चालू होता असें दिसतें. खि. पू. चौथ्या शतकामध्यें कौटिल्यानें आपल्या अर्थशास्त्र नामक ग्रंथांत खनिखोदनाच्या संबंधीं एक स्वतंत्र प्रकरण घातलें आहे त्यांत खनिज पदार्थांचे गुणधर्म, खनिज पदार्थांच्या जाती वगैरेंसंबंधानें विवेचन आलें असून राजानें आपले अधिकारी नेमून खनिखोदनाचें काम चालू करावें असें कौटिल्यानें म्हटलें आहे त्यावरून त्याच्यापूर्वीपासूनच खाणी खोदण्याचा धंदा हिंदुस्थानांत चालू असावा असें दिसून येतें. खनिखोदनाच्या कामीं राजानें जो अधिकारी नेमावयाचा तो 'शुल्बधातुशास्त्र' तांबें व इतर धातू यासंबंधाच्या शास्त्राची माहिती असणारा, अशुद्ध धातू शुद्ध करणें, रत्नांची परीक्षा करणें इत्यादि शास्त्रांत पारंगत असणारा असला पाहिजे असें कौटिल्यानें म्हटलें आहे. तसेंच या अधिकाऱ्यानें आपल्या हाताखालीं खोदनशास्त्रपारंगत अशा तज्ज्ञांना नेमून नंतर कोणत्या ठिकाणीं कोणत्या खाणी उपलब्ध होतील यासंबंधाचा शोध केला पाहिजे असेंहि त्यानें म्हटलें आहे. पुढें त्यानें आपल्या ग्रंथांत खाणी शोधून काढण्याचे निरनिराळे प्रकार सांगितले आहेत. त्यावरून खनिखोदनासंबंधीं पूर्वीं हिंदुस्थानांत बरीच प्रगति झाली होती असें दिसून येतें. अशोकाच्या कारकीर्दींत खनिखोदनाचें स्वतंत्र खातें होतें अशी आपल्याला माहिती मिळते.

हिंदुस्थानांत आलेले चिनी प्रवासी, अशोकाच्या खनि-खोदन खात्यासंबंधानें फार चांगले उद्गार काढतात. अशो-कानें या खात्यांत उत्तम प्रकारचे खनिशास्त्रज्ञ व खाणींवर देखरेख करणारे अधिकारी नेमले होते. खनिखोदनाला लागणारी प्रयोगशाळाहि त्यानें स्थापन केली होती. खनि-खोदन खात्यांतील आपल्या अधिकाऱ्यांच्या उपयोगार्थ अशोकानें एक चोपडें तयार केलें होतें हें चोपडें हल्लीं साप-डलेलें आहे व त्याचें भाषांतर म्हैसूर सरकाराच्या मार्फत होत आहे. चिनी प्रवाशाच्या हकीकतीवरून असें दिसून येतें कीं अशोकाच्या वेळीं ओरिसांत पुरी हें बंदर फार प्रसिद्ध असून, त्या ठिकाणीं चिनी व्यापारी येत असत व त्या ठिकाणीं सोन्याचांदीची देवाणघेवाण होत असे.

[ संदर्भ ग्रंथः—गॅलोवे-लेक्चर्स ऑन माइनिंग ( कार्डिफ १९००), ह्यूजेस-कोल माइन ( लंडन १९०४ ), इलसिंग-ए मॅन्युअल ऑफ माइनिंग ( न्यूयॉर्क १९०५), लॉन-माइन अॅकाउंटस् अँड माइन बुक कीपिंग (लंडन १८९७ ), हटन-माइनिंग ( लंडन १८९९); टी. ए. रिकर्ड-दि सॅंपलिंग अँड एस्टिमेशन ऑफ ओअर इन माइन (न्यूयॉर्क १९०४ ), एंजीनिअरिंग अँड माइनिंग जर्नल ( न्यूयॉर्क वीकली ); माइन्स अँड मिनरल्स ( मासिक—स्क्रँटन, पेन्सिल्व्हानिया ), दि माइनिंग अँड सायंटिफिक प्रेस ( साप्ताहिक सान-फ्रान्सिस्को ) ].

खनिजविज्ञान.—पृथ्वीच्या पाठीवर सापडणाऱ्या खनिज द्रव्यांच्या जाती व वर्गीकरण, तीं सापडण्याचीं स्थानें, त्यांचे गुणधर्म व उपयोग यासंबंधींच्या सामान्य तत्त्वांचें या शास्त्रांत विवेचन केलेलें असतें. हीं खनिज द्रव्यें कोणत्या घटकांचीं ( किंवा मूल द्रव्यांचीं ) बनलेलीं असतात हा रसायन शास्त्राचा विषय आहे. खनिजद्रव्यांच्या ठिकाणीं असणारे पार-दर्शकत्व व दुसरे तत्सदृश गुणधर्म यांच्या संबंधाची माहिती पदार्थविज्ञानशास्त्राच्या साहाय्यानें प्राप्त होते. खनिज स्फटिका-संबंधानें स्फटिकशास्त्रां( क्रिस्टलोग्रफी )त माहिती संगृहीत केलेली असते, हीं खनिज द्रव्यें कशीं तयार होतात व त्यांच्याजवळ सापडणारीं इतर द्रव्यें व त्यांचे निरनिराळे प्रकार ( पर्याय ) इत्यादिकांबद्दलची माहिती भूस्तरशास्त्रांत दिलेली असते आणि विशिष्ट द्रव्यें पृथ्वीच्या कोणत्या भागांत





१-२ कोळशाच्या खाणीचा उभा व आडवा छेद



३. खनिखोदन

(१) वर इंजिनची खोली आहे. या इंजिनानें पाळणे चालतात, कोळसा वर ओढून घेतात व खाणींत वारा खेळवितात. खाणींत ओघाप्रमाणें एकावर एक रस्ते आहेत.

(२) सर्वत्र कोळसा एका भागांत नसतो, त्यामुळें ठिकठिकाणीं पोखरावें लागतें. बरेचसे थर एकावर एक समांतर असून त्यांमध्यें दगडमातीचे थर असतात. यामुळें कोळशाची खाण एका विस्तीर्ण शहरासारखी दिसते; तींत रस्ते व त्यांवर वाहतूक असते. रस्ते एकावर एक पांच सहा मजलेपर्यंत सुद्धां असतात.

(३) कोळशाचे थर कोणत्या जातीचे व किती खोलीवर आहेत हें समजण्यासाठीं जमीनींत छिद्र पाडावें लागतें [खनिखोदनशास्त्र, पृ. ४० पहा].

सापडतात याबंधाची माहिती भूगोलशास्त्रात दिलेली असते. हे पदार्थ कोणत्या रीतीनें खणून काढावेत, अशुद्ध धातूपासून शुद्ध धातू कसे तयार करावेत, त्या धातूंचा इमारती, अलंकार इत्यादिकाकडे उपयोग व त्याचा निरनिराळ्या देशात खप वगैरेसंबंधानें खनिखोदनशास्त्र, अर्थशास्त्र इत्यादि शास्त्रात विवेचन केलेलें असतें. प्रस्तुत स्थली खनिज पदार्थांसंबंधी ठोकळ माहिती दिली आहे.

इ ति हा सः—कित्येक खनिज द्रव्यांचा अनेक प्रकारें मनुष्यास उपयोग होत असल्याकारणानें व अलंकारात यातील काहीं वापरले जात असल्यानें फार प्राचीन काळापासून मानवी प्राण्यांचें लक्ष या पदार्थांकडे वेधलें आहे. पाषाणाचीं आणि ब्रॉंझ ( पंचरसी ) धातूचीं शस्त्रें हल्लीं उपलब्ध झालीं आहेत; व हीं शस्त्रें प्रागैतिहासिककालीन मनुष्यांचीं आहेत असें तज्ज्ञाचें मत आहे. यावरून फार प्राचीन काळापासून मनुष्यास खनिज विज्ञानाचें थोडें फार ज्ञान होतें असें दिसून येतें. या शास्त्रावर सर्वांत जुना व सध्या उपलब्ध असलेला असा एक ग्रंथ थिओफ्रेस्टस यानें इसवी. स. पूर्वी ३१५च्या सुमारास लिहिला, या ग्रंथाच्या काहीं भागाचें इंग्रजीत भाषांतर झालें आहे. त्या काळीं खनिज द्रव्यांचें तीन भाग केले होते ते पाषाण, धातु आणि मृत्तिका हे होते. इ. सन ७७ च्या सुमारास प्लिनी या नांवाच्या प्रसिद्ध ग्रंथकर्त्यानें हिस्टोरिआ न्याचर्यालिस या नावाचा एक महत्त्वाचा ग्रंथ तयार केला, या ग्रंथाचा अनेक खंड आहेत. त्यातील शेवटच्या पांच खंडात धातु, अशोधित धातु, रत्नें आणि मृत्तिका यांच्या संबधाची माहिती दिली आहे. अरबी सत्ता विस्तृत पसरली असता अरब लोकानीं जुन्या ग्रीक आणि रोमन ग्रंथाचें भाषान्तर करून अनेक शास्त्राचा अभ्यास सुरू केला व त्यानीं शास्त्रीय ज्ञानात बरीच भर घातली. सन १२६२ च्या सुमारास अल्बर्टस म्याग्नस यानें या विषयावर एक ग्रंथ लिहिला या ग्रंथाचें नाव डी मिनरॅलिबस असें आहे. १६ व्या शतकात आजिअस अग्रिकोला यानें याच्या संबंधानें कित्येक ग्रंथ प्रसिद्ध केले. यात खाणी, धातु, अशोधित धातु, इत्यादिकांसंबंधानें बरीच माहिती दिली होती. याच सुमारास ( १५६५ ) के. गेस्नर यानें एक ग्रंथ लिहून खनिज द्रव्यासंबंधानें पद्धतशीर माहिती दिली आहे. सन १६०९ साली अॅन्सेल्म बोइथस डी बूट यानें मौल्यवान रत्नासंबंधानें ग्रंथ लिहिला आहे. इरास्मस बार्थोलिनस यानें आइसलॅंड-स्पारसंबंधानें शोध करून त्यासबंधाची माहिती देणारें पुस्तक प्रसिद्ध केलें. सन १७२५ साली जे. एफ हेन्केल यानें आणि सन १७३५ साली सी. लिनिअस यानें प्रत्येकी एकेक पुस्तक प्रसिद्ध करून या शास्त्रासंबंधानें जास्त माहिती उपलब्ध केली. या काळपर्यंत खनिज द्रव्याच्या बाह्य आकारावरून त्याचें वर्गीकरण केलें जात असे. जे. जी. वालेरिअस या स्वीडिश शास्त्रज्ञानें रासायनिक गुणधर्मांकडे लक्ष्य (१७४७) पुरविलें. परंतु एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत रासायनिक पद्धतीकडे लक्ष्य पुरविलें गेलें नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभास स्फटिकशास्त्राचा पाया घालण्यात आला. रोमे डील आस्ले आणि आर. जे. हाउयें यानीं स्फटिकशास्त्रास सुरवात केली त्या योगानें रसायन शास्त्राचा खनिजविज्ञानात मोठ्या प्रमाणात प्रवेश झाला. सन १८०९ साली डब्ल्यू. एच. वॉल्यास्टन यानें परावर्तक कोनमापक ( रिफ्लेक्टिंग गॉनिओमीटर ) शोधून काढल्यापासून स्फटिकाचे कोन अगदीं बरोबर मोजता येऊं लागले व त्या योगानें स्फटिकशास्त्रास अत्यंत मदत झाली. समाकारत्व ( इसोमॉर्फिझम ) आणि ध्याकारत्व ( डायोमॉर्फिझम ) याच्या संबधानें इ. मिस्सरलिश यानें अनुक्रमें १८१९ आणि १८२१ साली सिद्धान्तस्वरूपानें माहिती प्रसिद्ध केल्यापासून या शास्त्रातील बऱ्याच गोष्टींचा उलगडा झाला व त्या योगानें या शास्त्राचें पाऊल पुढें पडण्यास पुष्कळ मदत झाली. याच सुमारास इ. एल. मालूस यानें असें दाखवून दिलें की, कांहीं खनिज स्फटिकाच्या योगानें प्रकाशाचें ध्रुवीभवन होतें व सन १८६७ साली ए. डेस्. क्लॉइझो यानें स्फटिकाचे अति पातळ छेद सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं तपासण्याचें काम करून त्या त्या द्रव्याचे प्रकाशगुणक ( ऑप्टिकल कॉन्स्टंट ) निश्चित केले. या पोटविषयासंबधानें जरूर तेथें ऐतिहासिक माहिती देण्याचें योजिलें आहे.

ख नि ज द्र व्या चे वि शे ष गु ण ध र्म.—प्रथमतः आपणास खनिज पदार्थांमधील महत्त्वाचे गुणधर्म कोणते आणि गौण गुणधर्म कोणते याबद्दल विवेचन केलें पाहिजे. महत्त्वाच्या गुणधर्मांत रासायनिक घटना, स्फटिकाचा विशेष आकार व स्फटिकविशिष्टगुणधर्म आणि गुरुत्वविशिष्टत्व याचा समावेश होतो एकाच जातीच्या निरनिराळ्या नमुन्यात हे गुणधर्म बहुतेक सारखे असतात व त्यात फरक पडल्यास विशिष्ट मर्यादेपेक्षा जास्त प्रमाणावर फरक पडत नाहीं. गौण गुणधर्मांत रंग, तेज, काठिण्य, आकार ( अर्थात् स्फटिकरहित आकार ) इत्यादि गुणधर्मांचा समावेश होतो. हे गुणधर्म त्या पदार्थांत असणाऱ्या अशुद्ध द्रव्यावर अवलंबून असतात अगदीं शुद्ध स्वरूपात व परिणत स्फटिक रूपात खनिज द्रव्य घेतल्यास ( किंवा तयार करविल्यास ) हे सारे गुणधर्म एकसारखे असतात. परंतु अगदीं शुद्ध असें खनिज द्रव्य नैसर्गिकरीत्या सृष्टींत सापडणें बरेंच अशक्य असतें व असले स्फटिक ज्या रीतीनें तयार झाले असतील त्या रीतीवरहि हे गुण काहीं प्रमाणावर अवलंबून असतात

आकारवैशिष्ट्यः—जर द्रव्य स्फटिक स्वरूपात असेल तर आकारवैशिष्ट्य गुण दिसून येतो; परंतु कोणत्याहि द्रव्याच्या ठिकाणीं स्फटिकत्व असेलच असें नाहीं. ज्याची रासायनिक घटना एक आहे त्या द्रव्याचे स्फटिक अगदीं सारखे असतात. परंतु दोन स्फटिकांच्या ठिकाणीं समाकारत्व असल्यास त्या दोन स्फटिकाची रासायनिक मूळ

द्रव्यें एकच असतात असें यावरून कोणीहि समजूं नये. उदाहरणार्थः—सिल्व्हर आयोडाइड, झिन्क आक्साइड आणि झिंक सल्फाइड स्फटिक अगदीं सारखे असतात परंतु त्यांचे रासायनिक घटकावयव अगदीं भिन्न आहेत हें उघड आहे. स्फटिक मोठे आणि उत्तम प्रकारें विकास पावलेले असे असल्याखेरीज त्याचा आकार किंवा त्याच्या बाजूचा कोन यथायोग्यपणे समजत नाहीं. असो. स्फटिकाच्या आकारावरून ढोकळ मानानें खनिज द्रव्याच्या सहा जाती केल्या आहेत.

**पदार्थविज्ञानशास्त्रदृष्ट्या गुणधर्म.**—खनिज द्रव्यांतून प्रकाश गेला असता त्या प्रकाशावर जो परिणाम होतो तो शास्त्राच्या दृष्टीनें अत्यंत महत्वाचा आहे. जें खनिज द्रव्य अपारदर्शक असतें त्या खनिज द्रव्याचे अगदीं पातळ पापुद्रे ( थर ) घेऊन त्यांतून प्रकाश पाठवितात व प्रकाशावर काय परिणाम होतो हें पहातात. वक्री भवनाचा गुणक ( रिफ्रॅक्टिव्ह इंडेक्स ) द्विवक्रीभवनाचें ( डबल रिफ्रॅक्शन ) सामर्थ्य, प्रकाश-अक्षाचा ( ऑप्टिक ॲक्शल ॲंगल ) कोन व द्रव्याच्या काहीं बाजूवर प्रकाशकोनाचा अभाव इत्यादि गुणधर्मांचें अगदीं बरोबर रीतीनें मोजमाप करता येतें. पारदर्शकत्व या गुणाचें मापन करून त्या योगानें खनिज द्रव्याच्या जातीसंबंधीं अनुमान काढतात. रंगाकडेहि विशेष लक्ष पुरवावें लागतें. परंतु रंग हा महत्वाचा गुणधर्म नसून त्याची गौण गुणधर्मांत गणना केली आहे; कारण रंगाचे प्रकार आणि छटा अनेक आहेत व एकाच द्रव्याच्या अंगीं भिन्न भिन्न रंग व छटा असूं शकतात. एखाद्या द्रव्यांत भिन्न भिन्न जातींचीं विभिन्न द्रव्यें अति सूक्ष्म प्रमाणांत असतात व या सूक्ष्म द्रव्याच्या योगानेंहि पदार्थांत निरनिराळे रंग व छटा येतात. द्रव्यास रंग आणणारे पदार्थ इतक्या सूक्ष्म प्रमाणांत असतात कीं, त्यांचे पृथक्करण करून ते निश्चित प्रमाणांत ठरविणें कठिण असतें. हिरे आदीकरून मौल्यवान वस्तूंची किंमत त्यांच्या रंगावर आणि पाण्यावर अवलंबून असते. वर सांगितलेंच आहे कीं, रंग हा खनिज द्रव्याच्या संबंधानें क्षुल्लक गुणधर्म गणला आहे, म्हणजे रंगावरून खनिज द्रव्याची योग्य पारख होऊं शकत नाहीं. पारदर्शक स्फटिकाकडून निरनिराळ्या दिशेनें येणारे प्रकाश-किरण भिन्न भिन्न प्रमाणांत अपशोषण केले जातात, यामुळें स्फटिकाकडून निरनिराळ्या दिशेनें भिन्न भिन्न रंगाचीं किरणें बाहेर पडतात; याला द्विवर्णत्व ( डायक्रोइझम ) किंवा बहुवर्णत्व ( प्लिओक्रोइझम ) असें नांव दिलें गेलें आहे. खनिज द्रव्याचा खरा रंग कळण्याकरितां त्या द्रव्यावर घर्षणानें चरा ( रेघ ) पाडून त्याचा रंग पहाण्याचा प्रघात आहे. एखाद्या खनिज द्रव्याची चरावी किंवा तेज पाहून त्यावरूनहि त्या द्रव्याच्या विषयीं अनुमान काढतां येतें. परंतु या योगानें शास्त्रीय परीक्षा योग्य प्रकारें होईलच असें नाहीं. कित्येक खनिजद्रव्यें लोहचुंबकाकडून जोरानें आकर्षिलीं जातात. तसेंच भिन्न भिन्न खनिज द्रव्यें भिन्न भिन्न प्रमाणांत विद्युत्प्रवाहास विरोध करितात. ज्या द्रव्याच्या अंगीं धातूप्रमाणें तेज असतें. त्या खनिज द्रव्यांपैकीं बऱ्याच द्रव्याच्या अंगीं विद्युद्वाहक गुण असतो; इतरांच्या अंगीं बहुतकरून विद्युद्विरोधक गुण असतो. उदाहरणार्थ ग्राफाइटच्या अंगीं विद्युद्वाहक गुण आहे, परंतु हिऱ्याच्या अंगीं विद्युद्विरोधकत्व आहे कित्येक खनिज स्फटिक उष्णतेच्या किरणास आपल्यांतून अव्याहत जाऊं देतात. काहीं खनिज द्रव्यांचे वितळण्याचे बिंदू पुढें दिले आहेत—

| | | |
|---|---|---|
| स्टिब्नैट | ५२५° | शतांश |
| नाट्रोलैट | ९६५ | ,, |
| आल्मान्डाइन | १२६५ | ,, |
| आक्टिनोलाइट | १२९६ | ,, |
| आर्थोक्लेज | ११७५ | ,, |
| ब्रान्झाइट | १३०० | ,, |
| क्वार्टझ | १४३० | ,, |

यांपैकीं पहिला स्टिब्नैट हा मेणबत्तीच्या ज्वालेंत वितळूं शकतो, परंतु शेवटचा क्वार्टझ हा अति प्रखर ज्वालेंत सुद्धां ( भट्टीच्या ज्वालेंत ) सुद्धां मोठ्या कष्टानें वितळूं शकतो.

**अण्वाकर्षणावर अवलंबून असणारे गुणधर्म**—कित्येक खनिज द्रव्यांच्या अंगीं उत्तम प्रकारची स्थितिस्थापकता असते, असलीं द्रव्यें वांकविलीं असतां वाकतात परंतु त्यांच्या वरील दाब काढून घेतला असतां तीं मूळचा आकार धारण करितात. अभ्रक हें अशा प्रकारचें द्रव्य आहे. दुसरीं कांहीं द्रव्यें सहज वांकवितां येतात; परंतु हीं परत पूर्वस्थितीला जात नाहींत. अशा प्रकारच्या द्रव्यांना लवचीक द्रव्यें म्हणतात. टाल्क हें या वर्गांतील द्रव्य होय. क्लोरार्गिराइटसारखीं काहीं द्रव्यें सुरीनें कापतां येतात. कांपतां कापतां हीं द्रव्यें फुटत नाहींत. या छेदनशीलतेच्या गुणाशीं संबद्ध असे दुसरे गुण म्हणजे घनवर्धनीयता ( उदाहरण आर्जेन्टाइट ) व तन्तुभवनयोग्यता ( उ० चांदी ) हे होत. निरनिराळ्या खनिज द्रव्यांच्या चिवटपणांत अथवा ठिसूळपणांत पुष्कळच फरक दिसून येतो. खनिज द्रव्य फुटलें असतां फुटलेल्या तुकड्याचें छेदांग द्रव्यभेदाप्रमाणें भिन्न स्वरूपाचें दिसतें. या कारणानें छेदांगाच्या स्वरूपावरून द्रव्य कोणतें तें निश्चित करण्यांत मदत होते. स्फटिकीभूत खनिजाचा असा एक महत्वाचा नैसर्गिक धर्म आहे कीं, त्यांना फोडल्यानें जे त्यांचे खंड होतात त्यांचा प्रत्येकाचा काहीं विशिष्ट निश्चित आकार असतो व द्रव्यभेदाप्रमाणें तो भिन्न भिन्न असतो. उदाहरणार्थ गलीना द्रव्याचे खंड नेहमीं घनाकार पडतात. या खंडधर्मावरून खनिज द्रव्यें ओळखण्यास फार मदत होते. खनिजाचा आणखी एक महत्वाचा गुण म्हणजे टणकपणा, दार्ढ्य किंवा काठिण्य होय.

खनिजपरीक्षणाच्या कामीं या कमी अधिक गुणाचा उपयोग करण्याचा फार प्रघात आहे. द्रव्याचें कमीअधिक काठिण्य एका पदार्थानें दुसऱ्या पदार्थावर चरा उठण्याच्या क्रियेवरून ठरविलें जातें. एका स्फटिकाचें काठिण्य व त्याच जातीच्या मृत्तिकायुक्त स्फटिकसमूहाचें काठिण्य वेगवेगळें असतें ही गोष्ट परीक्षण करताना लक्षात ठेवावी लागते एफ् मोह यानें १८२० मध्ये एक काठिण्यक्रमपत्रक तयार केलें या पत्रकावरून खनिजाचें कमीअधिक काठिण्य आकड्यांनीं सांगता येतें.

मोह यांचें काठिण्यक्रमपत्रक —१ टाल्क (संगजिरा) २ जिप्सम (शिरगोळा), ३ काल्साइट (चुना, खडू इत्यादि), ४ फ्लुअर स्पार (गारगोटीसारखें एक द्रव्य),५ अॅपाटाइट, ६ आर्थोक्लेज, ७ क्वार्ट्झ् (चकमकी वगैरे), ८ टोपॅझ (पुष्कराग)९ कोरंडम (नीलमणि), १० हिरा या यादींत टाल्क सर्वांत नरम (काठिण्य = १), जिप्सम त्याहून कठिण (काठिण्य = २) व या क्रमानें हिरा सर्वांत कठिण (काठिण्य = १०) समजावा. जिप्समच्या तुकड्यानें टाल्कला खरवडलें तर चरा उठतो. याप्रमाणें प्रत्येकासंबंधानें समजावें शेवटचा हिरा हा सर्वांत जास्त कठिण आहे हें उघड आहे या यादीप्रमाणें एखाद्या खनिजानें जिप्समवर चरा पडत असला व काल्साइटचा या खनिजावर चरा पडत असला तर त्याचें काठिण्य २ व ३ याच्यामध्यें म्हणजे अडीच आहे असें मानतात.

विशिष्टगुरुत्वः—घनत्व किंवा विशिष्टगुरुत्व हा गुण फार महत्वाचा आहे. खनिज द्रव्याची (रासायनिक) घटना सारखी असेल तर विशिष्टगुरुत्व मापून त्यायोगानें पदार्थाविषयीं अनुमान काढता येतें. हें विशिष्टगुरुत्व मापण्याच्या मुख्य तीन रीती आहेत जलाचा उपयोग करून मापण्याची पद्धत, पिक्नामिटर नावाचें गुरुत्वमापक यंत्र व जड द्रवरूप पदार्थाचा उपयोग करून विशिष्टगुरुत्व काढण्याची रीत खनिज द्रव्याचा तुकडा मध्यम आकाराचा असेल तर जलाचा उपयोग करून विशिष्टगुरुत्व काढता येतें. जर खनिज द्रव्याचे अगदीं बारीक तुकडे असतील तर पिक्नामिटरचा उत्तम उपयोग होतो द्रवरूप जड पदार्थाच्या योगानें लवकर आणि अतिसुलमतेनें विशिष्टगुरुत्व काढता येतें हें कसें काढतात याविषयीं थोडक्यात पुढें माहिती दिली आहे. मिथिल आयोडाइड नांवाचें स्वच्छ, प्रवाही जड द्रव्य आहे याचें विशिष्टगुरुत्व ३ ३३ आहे. यात बेन्झिन नावाचा द्रव थेंबथेंब घालून त्याचें विशिष्टगुरुत्व वाटेल तितकें कमी करता येतें खनिज द्रव्याचा एक लहानसा तुकडा घेऊन तो मिथिल आयोडाइडमध्यें घालतात. जर त्या तुकड्याचें विशिष्टगुरुत्व मिथिल आयोडाइडपेक्षा कमी असेल तर तो तुकडा त्या द्रवावर तरंगतो, परंतु त्या द्रवात बेन्झिन थेंब थेंब घालून त्या द्रवाचें गुरुत्व योग्य तितकें कमी केलें तर तो तुकडा त्या मिश्रणात बुडूं शकतो अशा प्रकारें त्या मिश्रणात बेन्झिनचे किती थेंब मिळविले असतां योग्य त्या प्रकारचें विशिष्टगुरुत्व येतें हें कळतात व त्यावरून त्या मिश्रणाचें विशिष्टगुरुत्व काढता येऊन त्या योगानें खनिज द्रव्याचें विशिष्ट गुरुत्वहि निश्चित करता येतें मिश्रणाचें गुरुत्व निश्चित करण्याची दुसरी एक पद्धत आहे, त्या मिश्रणाचें वजन करितात व त्यातून मिळविलेल्या बेन्झिनचें वजन वजा करितात, त्या योगानें मिथिल आयोडाइड आणि बेन्झिन याचें प्रमाण कळतें व त्यावरून त्या मिश्रणाचें विशिष्टगुरुत्व कळतें. याखेरीज ज्याचें विशिष्ट गुरुत्व निश्चितपणें माहीत आहे असे काहीं तुकडे जवळ ठेवलेले असतात. उदाहरणार्थ पुढील द्रव्याचे तुकडे विशिष्ट गुरुत्व निश्चित करणारे शास्त्रज्ञ बहुधा जवळ ठेवितात.

| द्रव्याचें नाव | विशिष्ट गुरुत्व |
|---|---|
| जिप्सम | २.३२ |
| कोलेमानाईट | २.४२ |
| आर्थोक्लासे | २ ५६ |
| क्वार्टझ | २.६५ |
| काल्साईट | २ ७२ |
| आरागोनाईट | २.९३ |
| स्वेलाइट | ३.०२ |
| अपाटाईट | ३.२० |
| डायोटासे | ३.३२ |

वरील द्रव्याचे तुकडे बुडण्याइतकी मिथिल आयोडाइडची स्थिति प्राप्त झाली असता त्या तुकड्याच्या विशिष्टगुरुत्वाइतक विशिष्टगुरुत्व किंवा जवळ जवळ तितके विशिष्टगुरुत्व त्या मिश्रणाचें असतें हें उघड आहे

स्पर्श चव आणि वास —खनिज द्रव्याचा स्पर्श, चव किंवा वास घेऊन कित्येकदा त्याची पारख करतां येते. उदाहरणार्थ टाल्क म्हणजे संगजिरा हा हातास मऊ लागतो. परंतु ट्रिपोलाईट व ग्राफाइट हे हातास खरखरीत लागतात कित्येक सच्छिद्र खनिज द्रव्यें जिभेस चिकटतात या प्रकारच्या खनिज द्रव्यात वाळलेला चिखल आणि हायड्रोफेन हे येतात. रत्नें चकाकतात, व त्याचा स्पर्श कांचेच्या रत्नापेक्षा जास्त थंड असतो. बिटुमेन आणि काहीं चिखल हे पाण्यात भिजविले असतां त्याचा एक विशिष्ट वास येतो व त्या योगानें त्याची पारख करता येते. पायराइट्स आणि दुसरीं स्त्यिक खनिज द्रव्यें घासलीं असता गंधकमय वास येतो जीं खनिज द्रव्यें पाण्यात विरघळू शकतात त्यास चव असते.

रा सा य नि क वि शे ष गु ण ध र्म.—रासायनिक गुणधर्म हे फार महत्वाचे आहेत या रासायनिक गुणधर्माच्या सहाय्यानें आधुनिक खनिजविज्ञानातलि द्रव्याचें वर्गीकरण करावेलें आहे तथापि केवळ रासायनिक घटनेच्या योगानें कोणत्याहि द्रव्याची वर्गवारी लावता येणार नाहीं कारण

नैसर्गिक स्फटिकापेक्षां थोडासा लहान असतो. परंतु त्याच्या अंगीं नैसर्गिक स्फटिकाचे सारे गुणधर्म आढळून येतात.

खनिज द्रव्यांची मूळस्थानें आणि उत्पत्ति.— कित्येक खनिज द्रव्यें अग्निजन्य खडकांत सांपडतात. या अग्निजन्य खडकांत हीं खनिज द्रव्यें नाना प्रकारांनीं तयार होतात. या अनेक प्रकारांत दाब, उष्ण, वायुरूप द्रव्याचें घनरूप द्रव्यांत रूपांतर होणें, उष्णतेच्या सहाय्यानें रासायनिक क्रिया घडणें, द्रव्य शीत होत असतांना त्याचे स्फटिक तयार होणें इत्यादि अनेक प्रकारांचा समावेश होतो. ज्वालामुखाचा उद्रेक किंवा दुसऱ्या काहीं कारणानें पृथ्व्यंतर्गत द्रव्य बाहेर पडणें किंवा शीत होणें इत्यादि कारणांनीं अग्निजन्य खडक तयार होतात व त्यायोगानेंच हीं द्रव्यें तयार होतात.

आकारवैशिष्ट्यजन्य खडकांत तयार झालेलीं खनिज द्रव्येंः—पृथ्व्यन्तर्गत दाहाच्या योगानें सभोंवतालच्या खडकावर परिणाम होतो व त्यायोगानें सभोंवतालचे खडक भाजून निघतात; या भाजण्याच्या क्रियेनें अनेक प्रकारचीं रूपांतरें होतात.

गाळाच्या थरानें तयार झालेले खडकः—पाऊस, द्रव, हिम, उष्णता, वारा इत्यादि अनेक नैसर्गिक कारणांनीं पृथिवीच्या पृष्ठभागावरील खडक झिजतात व पावसानें हे झिजलेले भाग धुवून जाऊन खोलगट भागांत गाळाच्या रूपानें जमतात; हे एक प्रकारचे खडकच होत. समुद्रादिकांत विशीर्ण झालेलीं खनिज द्रव्यें पाण्यांतून खालीं बसतात व त्याचे कठिण किंवा मृदु खडक होतात.

रेघास्वरूपाचीं खनिज द्रव्येंः—निरनिराळ्या खडकांतून पाणी पाझरतें. हें पाणी निरनिराळ्या द्रव्यांतून फिरत असतांना त्याबरोबर अनेक द्रव्यें विद्रुत होतात किंवा नुसतीं मिश्रित होतात. नंतर हीं विद्रुत झालेलीं किंवा मिश्रित झालेलीं द्रव्यें खडकांच्या भेगांतून बसतात व त्या योगानें अनेक प्रकारच्या खनिज द्रव्यांची उत्पत्ति होते.

खनिज द्रव्यांच्या घटनांतील फेरफार.—वरील प्रकारांपैकीं कोणत्या तरी एखाद्या प्रकारानें खनिज द्रव्यें उत्पन्न झाल्यानंतर त्यांवर, दाब, उष्णता व विद्रुत स्वरूपांत विशिष्ट द्रव्यें यांच्या योगानें त्या खनिजद्रव्यांच्या स्फटिकाकारांत फेरफार होतात किंवा त्यांच्या रासायनिक घटनेंत बरेच बदल होतात, किंवा मूळचीं खनिज द्रव्यें किंवा त्यांतील काहीं भाग विद्रुत होतात व नवीन खनिज द्रव्यें तयार होतात.

खनिज द्रव्यांचें नामकरण आणि वर्गीकरण.— खनिज द्रव्यांचा स्फटिकाकार आणि रासायनिक घटना यांच्यावर खनिज द्रव्यांचें वर्गीकरण अवलंबून असतें. ज्या खनिजद्रव्याची रासायनिक घटना निश्चित असते त्यांच्या जाती थोड्या असतात; परंतु ज्या ठिकाणीं खनिज द्रव्यांच्या घटकावयवांची अदलाबदल झालेली असते त्या ठिकाणीं त्या अदलाबदलीच्या योगानें इतक्या जाती उत्पन्न होतात कीं, खनिज द्रव्यांतील भिन्नभिन्न द्रव्यांचें वैशिष्ट्य दाखवून त्यांचें स्पष्ट वर्गीकरण करणें फारच कठिण जातें व कित्येक ठिकाणीं हें बहुतेक अशक्य आहे.

काहीं स्फटिकांचीं नांवें—चौरस ( घन ), चतुष्कोण, सरल चतुष्कोण, एकवलनात्मक, षट्कोनाकृति, विषमपार्श्व, असमभुज चतुष्कोण इत्यादि.

खनिज द्रव्यांचें वर्गीकरण.—निसर्गसिद्ध मूलतत्त्वें (अ) अधातुवर्गः—हिरा, ग्रफाइट, गंधक. (आ) अर्धधातुवर्ग — आर्सेनिक, अँन्टिमनी, बिस्मथ. ( इ ) धातुवर्गः—सोनें, रुपें, तांबें, प्लाटिनम. या प्रकारानेंच सल्फाईड, ऑक्साईड वगैरेंचें वर्गीकरण करतात.

[संदर्भग्रंथः—डाना—मिनरल्स ॲंड हौ टु स्टडी देम; मीन्स-दि मिनरल्स किंगडम; इड्डिंग्स—रॉक मिनरल्स, दि मिनरॅलॉजिकल मॅगेझाईन ॲंड जर्नल ऑफ दि मिनरॅलॉजिकल सोसायटी; लंडन, ग्रेटब्रिटन, आयर्लंड, फ्रान्स, जपान वगैरे मोठमोठ्या देशांतील खनिज द्रव्यासंबंधीं विवेचनात्मक ग्रंथ स्वतंत्र लिहिलेले आहेत. ]

खनियाधान—मध्यहिंदुस्थान एजन्सींतील एक सनदी संस्थान. क्षेत्रफळ सुमारें ६८ चौ. मै. याच्या पूर्वेस झांशी जिल्हा व बाकीच्या बाजूंस ग्वाल्हेर संस्थानचा प्रदेश येतो. ग्वाल्हेरचा रेसिडेंट ब्रि. सरकारतर्फे यावर देखरेख ठेवितो. प्रथम खनियाधान ओर्छाचा एक भाग म्हणून असे, पण १७२४ त ओर्छाचा महाराजा उद्योतसिंग यानें आपला मुलगा अमरसिंग याला हें जहागीर म्हणून देऊन टाकिलें. मराठ्यांनीं ओर्छा संस्थान उध्वस्त केल्यावर १७५१त पेशव्यांनीं अमरसिंहाला सनद देऊन जहागिरीवर कायम केलें. तेव्हांपासून झांसी व ओर्छा संस्थान यांमध्यें याच्या स्वामित्वाविषयीं तंटे माजूं लागले. १८५४ त झांशी खालसा झाल्यावर त्या वेळच्या खनियाधानच्या संस्थानिकानें तिजकडे स्वातंत्र्याची मागणी केली; पण पेशव्याचे राजकीय वारसदार म्हणून ब्रिटिशांनीं आपलें स्वामित्व प्रस्थापित करून १८६२ त एक सनद करून दिली. दत्तक घेण्याचा हक्कहि यावेळीं देण्यांत आला. संस्थानिक बुंदेला रजपूत असून त्यांना जहागीरदार म्हणतात.

संस्थानची लो. सं. (१९११) ५५२८. लोकांच्या बोलण्यांत वाढती आहे असें मागील खानेसुमारीवरून दिसून येतें. मुख्य भाषा बुंदेलखंडी आहे. शिक्षणाचें प्रमाण शेंकडा एक आहे. मुख्य जाती ठाकुर व रजपूत असून या सर्व शेतकीवर उपजीविका करतात. संस्थानांत ४१ खेडीं आहेत. जमीन खडकाळ असून दऱ्याखोऱ्यांतून मात्र चांगली जमीन आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें २५००० आहे. संस्थानिक स्वतः सर्व राज्यकारभार पहातात. खनियाधान हें मुख्य ठिकाण असून त्यांत एक किल्ला आहे. २११२. गावांत एक शाळा व दवाखाना

खन्ना—पंजाब. लुधियाना जिल्ह्याच्या समराळ तहशिलींतील एक शहर. उ. अ. ३०°४२ व पू. रे. ७६°१३'. लो.सं.(१९०१)३८३८. भोंवतालच्या गांवीं होणाऱ्या शेतकीवस्तूंच्या सांठ्याचें हें ठिकाण म्हणता येईल. सरकी काढण्याच्या व दळणाच्या गिरण्या, एक इंग्रजी-संस्कृत शाळा व एक सरकारी दवाखाना येथें आहे. १८७५ त येथील म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. तिचें अबकारी उत्पन्न सर्वांत अधिक असतें.

खन्सा—ही कवयित्री अरब लोकांतील सुलैम जातीची असून सहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत जन्मली. ती वयांत येताच दुरेंद इब्न अस् सिम्म नावाच्या एका राजपुत्रानें तिला मागणी घातली. पण तिनें तो झिडकारिली व मीरदास नावाच्या एका गृहस्थाशीं तिनें लग्न केलें. मीरदासापासून तिला तीन मुलगे झाले. मीरदास वारल्यानंतर तिनें पुन्हा दुसरें लग्न केलें. इस्लामी धर्माच्या प्रसारापूर्वी सख्र व मोआविय असे तिचे दोघे भाऊ मरण पावले त्याच्या व आपल्या बापाच्या निधनाविषयीं तिनें फारच सुंदर अशीं शोकगीतें लिहिलीं व त्यामुळें तिचा चोहोंकडे बोलबाला झाला. युकाझ नांविचच्या जत्रेच्या प्रसंगीं धुबियानीनें अश या कवीला कवींमध्यें पहिला मान देऊन त्याच्या खालोखाल हिला दुसरा मान दिला. आपल्या जातीबरोबरच इनेंहि इस्लामी धर्म स्वीकारला.पण इस्लामाच्या आज्ञाविरुद्ध तिनें मूर्तिपूजक लोक सुतकाची जी खूण धारण करतात ती धारण केली. इस्लामच्या धर्मप्रसाराच्या कामीं झालेल्या लढायांत तिचे चारी मुलगे कामास आले. तिच्या मुलांनीं गाजविलेल्या शौर्याबद्दल अभिनंदनपर असें पत्र ओमरनें तिला लिहिलें व तिला तनखा तोडून दिला. ती ६४५ त मरण पावली. तिची मुलगी अमरा हीहि कवयित्री होती. अरब लोकांतील दुसरी एक कवयित्री जी लैला ती व खन्सा यांच्यामध्यें कोण अधिक श्रेष्ठ आहे यासंबंधीं विद्वानांत मतभेद होत असे. हिच्या आख्यायिका किताब उल् अघानीमध्यें दिलेल्या आहेत. हिचें काव्य छीको यानें संपादित केलें असून त्याचें भाषांतर डि कोपीयर यानें फ्रेंच भाषेत केलें आहे.

खंबायत—मुंबई इलाख्यांत खेडा पोलिटिकल एजन्सीमधील संस्थान. हें गुजराथच्या पश्चिम भागांत खंबायतच्या आखातालगत आहे. उत्तरअक्षांश २२° ९' ते २२° ४१' आणि पूर्वरेखांश ७२° २०' ते ७३° ५'. क्षेत्रफळ ३५० चौरस मैल. उत्तरेस खेडा जिल्हा, पूर्वेस खेडा व बडोदें संस्थान. दक्षिणेस खंबायतचें आखात व पश्चिमेस साबरमती नदी. ह्या संस्थानाची चतुःसीमा निश्चित नाहीं. प्रदेश सपाट असून जागोजाग आंबराई आहेत. हवा समशीतोष्ण आहे. पाऊस ३१ इंच पडतो. अकराव्या व बाराव्या शतकामध्यें खंबायत हें अनहिलवाडच्या राज्याचें मुख्य बंदर होतें. मुसलमानांनीं जेव्हां १२९८ सालीं हें राज्य काबीज केलें तेव्हां खंबायत हें एक हिंदुस्थानांत फार धनसंपन्न शहर होतें असें म्हणतात.

गुजराथच्या राज्याची भरभराट झाल्यावर खंबायतलाहि चांगले दिवस आले व १५ व्या शतकाच्या प्रारंभीं पश्चिम हिंदुस्थानांत हें शहर व्यापाराचें केंद्र होतें. सन १५३८ मध्यें पोर्तुगीज लोकांनीं हें शहर लुटलें व तदनंतर १५७३ पावेतों एकंदर प्रांतात अव्यवस्था माजली होती. पण अकबरानें तो प्रांत काबीज केला. पुढें सुरतेस व्यापाराच्या दृष्टीनें महत्व मिळूं लागल्यामुळें खंबायत अगदींच मागें पडलें. पण तेथें जुने कारखाने असल्यामुळें १६१५ त इंग्रजांनीं व १६१७ त डच लोकांनीं येथें वखारी स्थापिल्या. औरंगझेबाच्या मरणानंतर जेव्हां मोंगल सत्तेस उतरती कळा लागली तेव्हां मराठ्यांनीं ह्या प्रांतावर स्वाऱ्या करून लोकांकडून बराच पैसा नेला. १७३० सालीं खंबायत हें एक वेगळें स्वतंत्र संस्थान बनलें. सध्या राज्याधिकार हातीं असलेला राजा गुजराथच्या मोमिनखानचा वंशज आहे. ज्या वेळीं मोमिनखान गुजराथच्या गादीवर होता तेव्हां त्याचा जावई निझामखान याच्या हातीं खंबायतचें राज्य होतें. परंतु मोमिनखानचा पुत्र मुफ्ताखीर ह्यानें निझामखानास ठार मारून खंबायतचें राज्य बळकाविलें. वसईच्या तहामुळें खंबायत इंग्रजांच्या हातीं गेलें. येथील राजा शिया जातीचा एक मुसलमान आहे. तो सरकारास २१,९२४ रु. खंडणी देतो. मुसलमानी कायद्यान्वयें त्याला दत्तक घेण्याची किंवा कायदेशीर वारसहि नेमण्याची सनद मिळाली आहे.

ह्या संस्थानात एकंदर लहान मोठीं ८७ गांवें आहेत. १९११ सालीं येथील लोकसंख्या ७२,६५३ होती. शेंकडा ८० लोक हिंदु आहेत. महत्वाचें शहर असें खंबायतच आहे. कोळी, कुणबी, रजपूत वगैरे जातीचे लोक आहेत व बहुतेक सर्व शेतकीवर उदरनिर्वाह करणारे आहेत. उत्तरेस व पश्चिमेस जमीन गाळी, कापूस व गहूं पिकविण्यास उत्तम अशी आहे. पूर्वेस दोन पिकें निघतात. एकंदर ९०३ एकर जमीन पाण्याखालीं आहे. तांदूळ, गहूं, कापूस, नीळ, तंबाखू व बाजरी हीं मुख्य धान्यें होतात. आतां नीळ काढीनातसे झाले आहेत. नरेश्वर नांवाचा एक मोठा तलाव आहे. पिण्यास पाणी बहुतेक विहिरींचेंच वापरतात. खंबायत शहराजवळ माही व साबरमती नद्यांच्या कांठीं मोठ्या खारी आहेत. मीठ, कापड, सतरंज्या, कलाबतूचें काम सुंदर गुलाबी दगड चोरणें हीं कामें या संस्थानांत होतात. कांहीं कापसाचे जीन असून विणकाम शिकविण्याकरितां कांहीं शाळा आहेत.

१५ व्या शतकांत व त्यापूर्वीच्या दोन शतकांत खंबायतची व्यापारी दृष्टीनें फार ख्याति होती. आणि १६ व्या शतकाच्या आरंभीं तर हिंदुस्थान, इराण, अरबस्तान आणि पूर्व आफ्रिका इत्यादि देशांचे खंबायतशीं व्यापारी दळणवळण होतें. नंतर मात्र सुरतेची भरभराट होऊं लागल्यानें

इकडे उतरती कळा लागली व १८०२ साली खंबायत एक सर्वसामान्य शहर बनलें. ५० टनापेक्षा जास्ती वहनशक्तीचीं जहाजें धक्क्याला लागत नाहींत. १९०७ सालीं सर्व संस्थानांत एकच पोष्ट व एक टेलिग्राफ आफिस होतें. नबाबाला राज्यव्यवस्थेचा व न्याय करण्याचा सर्व अधिकार आहे. पण संस्थानांतील गोरे लोकांचा इनसाफ पोलिटिकल एजन्टच्या परवानगीशिवाय करण्याचा अधिकार नाहीं. अक्टोबर १९२२ सालीं विजेचा पुरवठा करण्यात आल्यामुळें खंबायत संस्थानांतील औद्योगिक व्यापारास मोठी चालना मिळाली. तेथील विजेचा पुरवठा करणाऱ्या कंपनीनें व औद्योगिक कंपनीनें, तीन पिठाच्या गिरण्यास व एका विणकाम-कारखान्यास विद्युत्शक्ति पुरविण्याचें काम घेतलें असून १९२१ सालीं विजेनें चालणारा बर्फाचा कारखाना व काड्यांच्या पेटीचा कारखाना सुरू करण्यात आला. अगेट व कॉर्नेलियन नावाच्या दगड-कामामुळें हजारों मजुरास साधारणतः नेहमीं वेतन मिळे. परंतु १९२२ मध्यें हा कारखाना बंद करावा लागला; कारण वरील दगड-कामास बाहेरून मागणी येण्याचें बंद झालें.

बी. बी. व सी. आय रेल्वे कंपनी चालवीत असलेली 'तारापूर कॅम्बे रेल्वे' ही बंदरहेडपर्यंत गेली असून संस्थानच्या मालकीची आहे. तिला सुमारें २ लक्ष रु. खर्च आला. १९२२-२३ सालीं जलमार्गानें होणारा संस्थानचा व्यापार वाढला व खाडीहि जास्त खोल केल्यामुळें नाविकांना सवलत मिळून सोयीचें झालें. माही नदी मिळते त्या ठिकाणी खाडीच्या मुखानजीक सृष्टिक्रमानुसार एक इष्ट फरक पडून आला आहे व त्यामुळें त्या नदीचा प्रवाह बंदरहेडकडे वळला आहे १९२२ त बंदरहेडपासून अर्ध्या मैलाच्या आत संगम झालेला आहे. पण पूर्वी तो दोन मैलावर होता. अशा रीतीनें खाडींतील नौकासंचाराच्या अडचणी बऱ्याच कमी झाल्या आहेत. संस्थाननें एक विहीर खणून पाणी काढण्याचें यंत्र २५००० रुपयास घेतलें आहे. पश्चिमेकडील खेड्यात पिण्याच्या पाण्याबद्दल नेहमींचीच जी तक्रार असते ती दूर करून पाणीपुरवठा करण्याचा त्यात हेतु आहे. तारापुरास त्या यंत्राचा प्रथम प्रयोग करण्यात आला.

आखात.—मुंबईच्या उत्तरकिनाऱ्याला काठेवाडपासून वेगळें पाडणाऱ्या एका समुद्राच्या त्रिकोनी आकृतीस हें नाव आहे. येथें पूर्वी अरब व्यापारी फार येत असत. आखाताच्या मुखाच्या पूर्वेस सुरत असून पश्चिमेस पोर्तुगीज लोकांचें दीव नांवाचें ठाणें आहे. खंबायत शहर उत्तर भागात वसलेलें आहे.

या आखातात पूर्वेकडे तापी व नर्मदा या नद्या येऊन मिळतात. उत्तरेकडून मही व साबरमती येऊन मिळतात व पश्चिमेकडून काठेवाडातून बऱ्याच लहान लहान नद्या येऊन मिळतात. किनाऱ्यावर असलेल्या भडोच व सुरत या प्रसिद्ध बंदरात आतां परदेशांतून माल येणें बंद झालें आहे.

शहर.—मुंबई इलाख्यांतील खंबायत नामक संस्थानाचें राजधानीचें शहर. हें उत्तर अक्षांश २२°८' व पूर्व रे. ७२°४०' यावर माहीच्या उपनदीच्या उत्तरेस वसलेलें आहे. हें अहमदाबादपासून ५० मैल दूर आहे. लोकसंख्या १९११ सालीं २८०९८ होती व त्यात हिंदू लोकांचाच भरणा अधिक आहे. शहराभोंवतीं तीन मैल घेराचा तट आहे. त्यावर तोफा लागण्याचीहि व्यवस्था आहे. महमदशहाच्या वेळचीं १३२५ सालांतील येथें एक जामा मशीद आहे.

आखाताच्या चिंचोळ्या भागात मुखाशीं समुद्राच्या भरती ओहोटीनें त्याचप्रमाणें नद्यांच्या जोराच्या प्रवाहानें, वाळू जमल्यामुळें मालाचीं जहाजें बंदरात येण्यास अडचण पडूं लागली व हळूहळू या बंदराचें महत्त्व कमी झालें. खंबायत येथें सुंदर रंगीत दगडावरचें काम फार सुंदर होतें. येथें म्युनिसिपालिटी आहे. येथें एक लॉर्ड रे नांवाचें पुस्तकालय आहे. एक विणकाम शिकविण्याची शाळा असून दोन इस्पितळें व एक हायस्कूल आहे.

खंभलाव—काठेवाड. भोइका टाण्यातील एक स्वतंत्र खंडणी देणारें संस्थान. खंभलाव व चमार्डी हीं गांवें तालुक्यात आहेत. खंभलावपासून सात मैलावर लिंबडी स्टेशन आहे. तालुक्दार लिंबडी घराण्यातील भायाद व झाला रजपूत आहेत.

खंभाल—काठेवाड. गोहिलवाड जिल्ह्यातील एक स्वतंत्र खंडणी देणारें संस्थान. यात चार गावें असून खंभाल हें सर्वात मोठें आहे. तालुकदार खाचर जातीचे काठी आहेत. संस्थान सर्व डोंगराळच आहे.

खंभालिय—काठेवाड. नवानगरच्या हद्दींतील नवानगरच्या खालोखाल महत्त्वाचें शहर. उ. अ. २२° १२' व पू. रे. ६९° ४४'. शहराजवळच घी व तेली या दोन नद्यांचा संगम होतो. सलाय बंदर येथून दहा मैलावर आहे. येथें न्यायाधीश व वहिवाटदार कचेऱ्या आहत. व मुलांमुलींच्या शाळा व दवाखाने आहेत. लो. सं. (१९११) १३८७. गावाला म्युनिसिपालिटी आहे. पूर्वी हें शहर वाघेलाच्या ताब्यात असून जाम रावळानें तें जिंकून घेतलें. यात बरींच जुनीं देवळें आहेत. याच्या हद्दींतील पिंडतारक देवस्थान फार प्रसिद्ध आहे.

खमटी डोंगर—आसामाच्या सरहद्दीवरील एक डोंगराळ प्रदेश. हा ब्रह्मपुत्रा खोऱ्याच्या पूर्व टोंकाशीं पसरला आहे. यात शानवंशातील खमटी जात राहाते. ८ व्या शतकाच्या मध्यकाळात जेव्हा मही राजानें मोगँग जिंकून घेतलें तेव्हा खमटी लोक उत्तरेकडे सरकले. त्याच्यापैकीं काहीं आसामात गेले व सदियाजवळ वसाहत करून राहिले. तेथें त्याच्या पुढाऱ्यानें भोंवतालच्या प्रदेशावर आपली सत्ता प्रस्थापित करून ब्रिटिशांनीं अहोम राजाचा मुलूख घेतल्यावेळीं त्याकडून आपल्या राज्याला मान्यता [illegible].

पण त्याच्या मुलाला गादीवरून काढल्यावेळी खमटी लोकांनीं इंग्रजाविरुद्ध बंड केलें ( १८३९ ). पण तें लवकरच मोडलें.

खमटी लोकांचें मुख्य ठिकाण चोरखमटी आहे. पुटीं हूंच मोठें चोरखमटी गाव असून सदियापासून १९७ मैल दूर आहे. याच्या शेजारीं एक विटांचें देऊळ आहे.त्यातील कांहीं बुद्ध मूर्ती सुरेख घडविलेल्या आहेत. आसामात खमटींची संख्या ( १९११ ) १८६८ आहे. कर्नल डाल्टनच्या 'एथ्नॉलॉजी ऑफ बेंगाल' या ग्रंथात यांची विशेष माहिती सांपडेल

**खम्ममेट्ट**—हैद्राबाद संस्थान. वारंगळ जिल्ह्याचा दक्षिण तालुका क्षे. फ ७००चौ मै. जहागिरी धरून लो सं (१९११) १,३५,९७५ आहे. तालुक्यात १६१ गावें असून १३ जहागीर गावें आहेत. खम्ममेट्ट हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. या प्रदेशात तांदूळ फराच पिकतो. संस्थानची रेल्वे तालुक्यातून दक्षिणोत्तर जाते

**खर**—रावणाचा सापत्न भ्राता. शूर्पणखेची रामाकडून विटंबना झाल्यामुळें हा रामावर चालून गेला व त्याच्या हातून मरण पावला [ वा. रा अरण्यकांड स. १९ ].

**खर प्रांत**.—इराणमधील एक छोटा पण अत्यंत सुपीक प्रांत. याला छोअर अगर छोअरेन असें नाव होतें. १९१० मध्यें याची लो. संख्या सुमारें १०,००० होती. या प्रांताचा सुभेदार तेहरानपासून ६२ मैलांवर असलेल्या किशलख खर या खेड्यात अगर त्याच्याच जवळ असलेल्या अर्देन या खेड्यात रहातो. या प्रांतांत पाण्याचा मुबलक पुरवठा असल्यानें गहूं, तांदूळ इत्यादि धान्यें खूप पिकतात. इराणच्या बादशहाला हा प्रांत ६००० पौंड खंडणी देतो. त्यांपैकीं ४००० पौंड धान्यरूपानें देण्यात येतात.

**खरकपूर**—बंगाल मिदनापुर जिल्ह्यातील एक गाव. उ. अ. २२° २०' व पू. रे. ८७° २१'. लो. सं. ( १९११ ) ३५२६. हे बंगाल नागपूर रेल्वेवरचें महत्वाचें जंक्शन आहे. मिदनापूरपासून खरकपूर ८ मैल आहे. गावात पीर लोहानीची कबर असून हिंदू व मुसुलमान दोघेहि याला भजतात.

**खरगपूर**—बिहार ओरिसा. मोंघीर जिल्ह्यातील एक गाव. उ. अ. २५° ७' व पू रे. ८६° ३३'. लो. सं. ( १९०१ ) २४४२. खरगपूर परगणा दरभंगा संस्थानात मोडतो. पाटबंधाऱ्याच्या कामासाठीं हें गाव प्रसिद्ध आहे. या ठिकाणीं मान नदीला बंधारा घातला आहे.

**खरगा**—ईजिप्तमधील वाळुकामय प्रदेशातील सर्वांत मोठी ओलवणीची जागा. ही जागा अगर हें स्थान लिबियाच्या वाळुकामय प्रदेशात आहे. नाईल नदीच्या खोऱ्यातील खरगा जंक्शनपासून या ओलवणीच्या स्थानापर्यंत छोटयाशा रेल्वे लाइनने जाता येतें. या स्थानाची दक्षिणोत्तर लांबी शंभर मैल व पूर्वपश्चिम १२पासून ५० मैल आहे लो. सं. १९०७) ८३४८. पूर्वी या स्थानाच्या मोठया भागात सरोवर होतें. हल्लीं या ठिकाणीं पाऊस पडत नाहीं किंवा एकहि सरोवर नाहीं पण विहिरी मात्र पुष्कळ आहेत. खजुरीच्या बऱ्याच बागा या ओलवणींत आहेत. तांदूळ, गहूं, बार्ली हीं मुख्य पिकें होत. येथील लोकांचा शेतकीशिवाय टोपल्या व चटया करण्याचा धंदा चालतो. प्राचीन काळीं फारोहाच्या अमदानींत या ठिकाणीं बरीच वस्ती होती. आज त्या काळचे कांहीं अवशेष सापडतात. त्यांपैकीं अॅमोनचें देऊळ मुख्य असून त्याची लांबी १४२ फूट, रुंदी ६३ फूट व उंची ३० फूट आहे.येथे एका रोमन किल्ल्याचा कांहीं भाग दिसतो व इतर रोमन व ख्रिस्ती अवशेषहि आढळतात. खरगा शहर ताडीच्या बनामध्यें वसलें असून फार टुमदार दिसतें. लो. सं ( १९०७ ) ५३६२. [ मुरे-जिऑलाजिकल अँड टोपोग्राफिकल रिपोर्ट ऑन खरगा ओॲसिस ( १८९९ )]

**खरगोण**—इंदूर संस्थान. निमार जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. उ. अ. २१° ५०'. व पू. रे. ७५° ३७'. नर्मदेला मिळणाऱ्या कुंडी नदीवर हें वसलें आहे. लो सं. (१९११) ९४२३. मोंगलाच्या अमदानींत हें गांव प्रसिद्धीस आलें असावें प्रथम माळवा सुभ्यातील बिजागड सरकारच्या एका महालाचें हें मुख्य ठिकाण होतें. नंतर बिजागड सरकारचें मुख्य ठिकाण बनलें. त्यावेळचीं कांहीं घरें व कबरी अद्याप दिसतात. जिल्हा व परगणा यांच्या कचेऱ्यांखेरीज शाळा, तुरुंग, दवाखाना, लायब्ररी वगैरे या गावांत आहेत. स्थानिक कारभार म्युनिसिपालिटी पहाते.

**खरतरगच्छ**—एक जैन गच्छ. जैन गच्छाची कल्पना उपकेशगच्छाच्या आरंभीं दिली आहे. खरतरगच्छ व तपागच्छ यामधील भेद अंचलगच्छात सांगितला आहे. ( उपकेशगच्छ व अंचलगच्छ पहा. )

**खरतरगच्छाची पट्टावली**—हींत पहिला महावीर याचा पहिला शिष्य गौतम होता. त्याच्या नंतरः—

२ सुधर्माः—हा कोल्लाक ग्रामात जन्मला. गोत्र अग्निवेश्यायन. हा धम्मिल्ल व भद्दिला याचा पुत्र. वीरानंतर २० वर्षांनी व वयाच्या १०० व्या वर्षी निर्वाणाप्रत गेला.

३ जंबूः—हा राजगृहात जन्मला. गोत्र काश्यप. श्रेष्ठी ऋषभदत्त व धारिणी याचा पुत्र. वीरानंतर हा ६४ वर्षांनी वयाच्या ८० व्या वर्षी निर्वाणाप्रत गेला.तो शेवटचा केवलिन् होता.

४ प्रभवः—कात्यायन गोत्र. जयपूरच्या विंध्य राजाचा पुत्र. वयाच्या ८५ ( अथवा १०५) व्या वर्षी वीरनिर्वाणाब्द ७५ मध्यें मृत्यु पावला.

५ शय्यम्भवः-वात्स्य गोत्रोत्पन्न. 'शांतिदेवी'चा साक्षात्कार होऊन यानें धर्माची दीक्षा घेतली त्याच्या मुलगा मनक याकरिता यानें दशवैकालिकसूत्र नावाचा ग्रंथ रचला वयाच्या ६२ व्या वर्षी वीरनिर्वाणाब्द ९८ मध्यें हा मृत्यु पावला

६ यशोभद्रः—तुंगियायन गोत्र. वयाच्या ८६ व्या वर्षी वीरनिर्वाणाब्द १४८ मध्यें मृत्यु पावला.

७ संभूतिविजयः—माटरगोत्रज. वयाच्या ९० व्या वर्षी वी .नि. १५६ मध्यें मृत्यु पावला.

८ भद्रबाहुः—प्राचीनगोत्रीय. त्यानें उपसर्गहरस्तोत्र, कल्पसूत्र आणि आवश्यक, दशवैकालिक वगैरे दहा शास्त्रांवरील निर्युक्ति रचल्या. वयाच्या ७६ व्या वर्षी वी. नि. १७० मध्यें मृत्यु पावला.

९ स्थूलभद्रः—गौतम गोत्र बाप नवव्या नंदाचा मंत्री शकडाल. आई लच्छलदेवी. पेसकोशाचें यानें रुपांतर केलें.

१० आर्य महागिरिः—ऐलापत्यगोत्रीय. तो गृहात ३०, व्रतात ४०, व सूरीपदांत ३० वर्षे राहून वयाच्या १०० व्या वर्षी वी. नि २४९ मध्यें मरण पावला.

११ सुहस्तिन्—वासिष्ठगोत्रीय. वयाच्या १०० व्या वर्षी वी. नि. २६५मध्यें मरण पावला. त्यानें संप्रति राजाला धर्मदीक्षा दिली. सुहस्तीनें अवंतिसुकुमाल व दुसरे पुष्कळ लोक याना धर्मदीक्षा दिली.

१२ आर्यसुस्थितः—याला कोटिशः सूर्यमंत्राचा जप केला म्हणून कोटिक व काकंदी नगरीत जन्मला म्हणून काकंदिक अशीं दोन बिरुदें होतीं. हा व्याघ्रापत्य गोत्राचा होता. ९६ व्या वर्षी वीरनिर्वाणाब्द ३१३ त मरण पावला. यापासून कोटिकगच्छ उत्पन्न झालें. सुप्रतिबुद्ध त्याचा लघुभ्राता होता.

१३ इंद्रदिन १४ दिन.

१५ सिंहगिरि, जातिस्मरणज्ञानवान्—त्या काळीं पादलिप्ताचार्य, वृद्धवादिसूरि व त्याचा शिष्य कुमुदचंद्र हें दीक्षानाम मिळालेला सिद्धसेन दिवाकर हे जिवंत होते. सिद्धसेन दिवाकरानें उज्जयिनी येथील महाकालेश्वराच्या देवळांतील रुद्राचें लिंग फोडिलें व कल्याणमंदिरस्तवनामक ग्रंथानें पार्श्वनाथाच्या एका मूर्तीचा स्तव केला. वी. नी. ४७० मध्यें विक्रमादित्याला त्यानें धर्मदीक्षा दिली.

१६ वज्र—गौतमगोत्रीय. धनगिरि व सुनंदा तुंबवन ग्रामांत रहात होते. त्यांचा हा पुत्र होता. हा वी. नि. ४९६ त जन्मला. वयाच्या ८८ व्या वर्षी वी. नि. ५८४ मध्यें तो मरण पावला. सिंहगिरीनें त्याला ११ अंगें शिकविलीं. त्यानंतर दृष्टिवाद नावाचें १२ वें अंग शिकण्यासाठीं अवंती ( उज्जयिनी ) ला भद्रगुप्ताकडे दशपुराहून वज्र गेला. पूर्ण १० पूर्वे माहित असलेला शेवटचा मनुष्य तो होता. त्यानें बुद्धाच्या राज्यांत दक्षिणेकडे जैन धर्माचा विस्तार केला. त्याच्यापासून वज्र शाखा निघाली.

१७ वज्रसेन.—उत्कौशिकगोत्र श्रेष्ठी. जिनदत्त व ईश्वरी ह्यांचे चार पुत्र चार कुलाचे स्थापक होऊन गेले त्यांचीं नावें नंद, चंद्र, निवृत्ति, आणि विद्याधर अशीं होतीं. त्या चार पुत्रांना सोपारक येथें वज्रसेनानें धर्माची दीक्षा दिली

१८ चंद्र.—यांच काळीं आर्यरक्षित जिवंत होता दशपुर येथें रहाणारे पुरोहित सोमदेव व रुद्रसोमा ह्यांचा तो पुत्र होता वज्रापासून तो ९ पूर्वे व दहाव्याचा थोडा भाग शिकला व तीं पूर्वें आपला शिष्य दुर्बलिकपुष्पमित्र ह्याला शिकविलीं.

१९ सामंतभद्रः—ह्याला वनवासिन् म्हणतात. २० देवः—ह्याला वृद्ध म्हणतात २१ प्रद्योतन. २२ मानदेवः—शांतिस्तवाचा कर्ता. २३ मानतुंगः—भक्तामरस्तोत्र व भयहरस्तोत्र ह्यांचा कर्ता.

२४ वीरः—लोहित्यसूरीचा शिष्य देवर्द्धिगणिक्षमाश्रमण. यानें वी. नि. ९८० मध्यें वलभीच्या दरबारीं सिद्धांत ग्रंथाचा लेख केला. देवर्द्धीच्या वेळीं फक्त एक पूर्व शिल्लक राहिलें.

२५ जयदेव, २६ देवानंद, २७ विक्रम, २८ नारसिंह, २९ समुद्र, ३० मानदेव, ३१ विबुधप्रभ, ३२ जयानंद, ३३ रविप्रभ, ३४ यशोभद्र, ३५ विमलचंद्र ३६ देव — हा सुविहितपक्षगच्छाचा संस्थापक होता. ३७ नेमिचंद्र.

३८ उद्द्योतन.—याच्या शिष्यांपासून हल्लीं अस्तित्वांत असलेले ८४ गच्छ उत्पन्न झाले ऋषभाची पूजा करण्याकरितां मालवक देशाहून शत्रुंजयाकडे यात्रा करीत असतां तो मरण पावला.

३९ वर्धमान.—हा पहिला सूरि असून चैत्यवासिन् जिनचंद्राचा शिष्य होता परंतु उद्योतनाकडे गेला सोमेश्वराणाचे शिवेश्वर व बुद्धिसागर नांवाचे दोन पत्र व कल्याणवती नांवाची कन्या ह्यांना धर्माची दीक्षा दिली त्यानें शिवेश्वराला दीक्षेच्या वेळीं जिनेश्वर हें नांव दिलें. वर्धमानसूरि विक्रम संवत् १०८८ मध्यें होऊन गेला.

४० जिनेश्वरः—चैत्यवासिन् लोकांबरोबर वादविवाद करण्यास मरु देशाहून गुर्जर देशाप्रत जिनेश्वर आपला बंधु बुद्धिसागर यांच बरोबर गेला. विक्रम संवत् १०८० मध्यें अनहिल पुराचा राजा दुर्लभ याच्या राजसभेंत त्यानें चैत्यांचा पराभव केला व खरतर हें बिरुद नाव मिळविलें.

४१ जैनचंद्रः—हा संवेगरंग शाळाप्रकरणाचा कर्ता होय

४२ अभयदेवः—हा जिनचंद्राचा लघुभ्राता धारानगरचा श्रेष्ठी धन व धनदेवी यांचा पुत्र होता. त्याचें मूळ नाव अभयकुमार होतें. शरीराला त्रास दिल्यामुळें त्याला कुष्ठरोग झाला, परंतु दैवी चमत्कारानें तो बरा झाला जयतिहूयण स्तोत्रानें त्यानें स्तम्भनकाजवळील पार्श्वमूर्तीचा स्तव केला. नऊ अंगावर त्यानें टीका लिहिल्या व गुर्जर देशांतील कपडवंजग्रामांत मरण पावला.

४३ जिनवल्लभ.—जिनेश्वर सूरींना पहिला शिष्य, कूर्चपुरगच्छाचा एक चैत्यवासिन् नंतर हा अभय देवाचा शिष्य झाला पिंडविशुद्धिप्रकरण, गणधरसार्धशतक, षडशीति वगैरे त्याचे ग्रंथ आहेत संवत् ११६७ मध्यें देवभद्राचार्यांनें त्याला सूरि म्हणून अभिषेक केला. त्यानंतर ६ महिन्यांनीं तो मरण पावला. त्याच्या (धार्मिक व्यवस्थेच्या) कारकीर्दीत

मधुखरतरशाखा निर्माण झाली, आणि हा पहिला गच्छभेद होय.

४४ *जिनदत्तः*—वाछिगमंत्री व बाहड देवी यांचा पुत्र. संवत् ११३२ त जन्मला. गोत्र हुंबड. याचें मूळ नाव सोमचंद्र होतें. संवत् ११४१ मध्यें त्याला दीक्षा मिळाली. संवत् ११६९ वैशाख वद्य पाडव्या दिवशीं चित्रकूट येथें देवभद्राचार्यांपासून त्याला *सूरिमंत्र मिळाला.* पुष्कळ शहरांत दैवी चमत्कार करून त्यानें जैनधर्माचा विस्तार केला. संदेहदोलावली व दुसरे पुष्कळ ग्रंथ त्यानें रचिले. तो आषाढ शुद्ध ११ संवत् १२११ रोजीं अजमेर येथें मरण पावला. संवत् १२०४ मध्यें रुद्रपल्ली येथें जिनशेखराचार्यांनें खरतरशाखा स्थापिली हा दुसरा गच्छभेद होय.

४५ जिनचंद्रः—भाद्रपद शुद्ध ८ संवत् ११९७ रोजी हा जन्मला साह रासल व देल्हणदेवी यांचा पुत्र फाल्गुन वद्य ९ संवत् १२०३ रोजीं अजमेर येथें दीक्षा मिळाली वैशाख शुद्ध ६ संवत् १२११ ( वयाच्या १४ व्या वर्षी ) रोजीं *विक्रमपूर येथें त्याला जिनदत्तानें* आचार्य केला. भाद्रपद वद्य १४ संवत् १२२३ रोजी दिल्ली येथें मरण पावला. याच्या स्मरणार्थ दिल्ली येथें एक स्तूप उभारला आहे. त्याच्या डोक्यांत एक रत्न होतें असें मानतात.

४६ *जिनपतिः*—संवत् १२१० त जन्मला. साहयशोवर्धन व सुहवदेवी यांचा पुत्र. दिल्ली येथें संवत् १२१८ त दीक्षा घेतली. संवत् १२२३ त जयदेवाचार्यांनें त्याची पदस्थापना केली. संवत् १२७७ त वयाच्या ६७ व्या वर्षी *पाल्हणपुरांत तो मरण पावला. चित्रावालगच्छाच्या जगच्चंद्र* सूरीपासून सं. १२१३ त आर्चलिकमत व सं. १२८५ त तपागण उत्पन्न झाले.

४७ *जिनेश्वरः*—मरोटा *येथें सं. १२४५ त जन्मला.* भांडागारिक नेमिचंद्र व लक्ष्मी यांचा पुत्र होय. मूळचें नाव अंबड.सं. १२५५ त खेडनगरांत दीक्षा घेतली तेव्हां वीरप्रभ नाव यास मिळालें सर्वदेवाचार्यांनें जालोर नगरांत सं. १२७८ पदस्थापना केली तो सं. १३३१ *त मृत्यु पावला. त्याच* वर्षी लघुखरतरशाखा जिनसिंहसूरीनें स्थापिली. हा तिसरा गच्छभेद होय.

४८ *जिनप्रबोधः*—दुर्गप्रबोध व्याख्येचा कर्ता साह श्रीचंद्र व सिरियादेवी यांचा पुत्र. हा सं. १२८५ त जन्मला. मूळ नाव पर्वत. सं. १२९६ त धीरापद्रनगरांत दीक्षा व प्रबोधमूर्ति हें नाव घेतलें. सं. १३३१ त पट्टाभिषेक झाला व त्याच वर्षी पदमहोत्सव झाला. मृत्यु सं. १३४१

४९ *जिनचंद्रः*—समीयाणाग्रामांत सं. १३२६ त जन्मला. छाजहडगोत्राचा मंत्री देवराज व कमलादेवी यांचा पुत्र. मूळ नाव *खंभराय* जालोरा येथें सं. १३३२ त दीक्षा घेतली. सं. १३४१ त पदमहोत्सव. *यानें चार राजांना* दीक्षा दिली. कलिकालकेवलिन् हें बिरुद ( उपपद ) त्याला होतें. तो कुसुमाणाग्रामांत सं. १३७६ त मृत्यु पावला.

५० *जिनकुशल*—हा दादोजी या नांवानें प्रसिद्ध होता. समीयाणाग्रामांत सं. १३३७ त जन्मला. छाजहडगोत्राचा मंत्री जिल्हागर व जयतिश्री यांचा पुत्र. सं १३४७ त दीक्षा. सं. १३७७ राजेंद्राचार्यांपासून सूरिमंत्र घेतला. सं. १३८९ त मृत्यु पावला.

५१ जिनपद्मः—छाजहडवंशांतला होय. पंजाबांत जन्मला. *तरुणप्रभाचार्यांपासून सूरिमंत्र घेतला व पाटणा येथें* सं १४०० मध्यें मृत्यु पावला.

५२ जिनलब्धि—नागपुरांत सं. १४०६ मृत्यु पावला.

५३ जिनचंद्रः—स्तंभतीर्थांत १४१५ मध्यें मृत्यु पावला.

५४ जिनोदयः-पाल्हणपुर येथें राहणारा. साह-रुद्रपाल व धारलदेवी यांचा पुत्र. सं १३७५ त जन्मला. मूळ नाव समरक. स्तंभतीर्थ येथें तरुणप्रभाचार्यांनें त्याची पदस्थापना सं. १४१५ त केली. त्याच स्थळीं त्यानें अजिताचा एक चैत्य स्थापिला. आणि शत्रुंजयावर पांच प्रतिमा केल्या. तो पाटण येथें संवत. १४३२ मध्यें मरण पावला. त्याच्या काळांत सं. १४२२ मध्यें धर्मवल्लभगणीनें *स्थापिलेल्या* वेगडखरतरशाखेचा उदय झाला. हा ४ था गच्छभेद होय.

५५ जिनराजः—पाटण येथें सं. १४३२ त सूरिपद मिळालें व देवलवाड येथें सं. १४६१ त मृत्यु पावला.

५६ जिनभद्रः—सं. १४६१ त प्रथम जिनवर्धनसूरि. हा जिन राजाच्या गादीसाठी गादीवर बसणारा म्हणून नेमला गेला होता. परंतु त्यानें चतुर्थ व्रत मोडलें म्हणून *तो अयोग्य ठरला* जाऊन त्याची जागा सं. १४७५ त जिनभद्राला दिली गेली जिनभद्र हा *भणशालिक गोत्राचा* होता. त्याचें नाव भाडो होतें. त्यानें पुष्कळ मूर्ती बसविल्या. *पुष्कळ* देवळें व ग्रंथसंग्रहालयें स्थापन केली. कुंभलमेरु येथ सं. १५१४ त तो मृत्यु पावला. वर निर्दिष्ट केलेल्या जिनवर्धनसूरि यांनें सं. १४७४ त पिप्पलक खरतरशाखा स्थापिली हा पाचवा गच्छभेद होय.

५७ *जिनचंद्रः*—चम्मगोत्राचा साह वच्छराज व वाहलादेवी यांचा पुत्र. जेशलमेर येथें सं. १४८७ मध्यें जन्मला सं. १४९२ त दीक्षा. सं. १५१४त सूरिपद. जेशलमेरु येथें सं. १५३० त मृत्यु.

५८ *जिनसमुद्रः—पारखगोत्राचा देको—साह व देवलदेवी* यांचा पुत्र. बाहडमेर येथें सं. १५०६ मध्यें जन्मला. दीक्षा सं. १५२१. पदस्थापना सं. १५३०. अहमदाबाद येथें सं. १५५५ मध्यें मृत्यु.

५९ *जिनहंसः*—चोपडागोत्राचा साहमेघराज व कमलादेवी यांचा पुत्र सं. १५२४ त जन्मला. दीक्षा सं. १५३५. अहमदाबाद येथें सं. १५५५ त पदस्थापना. *पाटण* येथें सं १५८२ त मृत्यु. मेरुदेशांतील आचार्य शांतिसागर यांनीं स्थापन केलेली *आचार्यीय खरतर शाखा* सं १५६४ त निर्माण झाली हा ६ वा गच्छभेद होय.

६० जिनमाणिक्यः—कुकडचोपडा गोत्राचा साह जीवराज व पद्मादेवी यांचा पुत्र सं. १५४९ त जन्मला. सं. १५६० त दीक्षा. सं. १५८२ त पदस्थापना. सं. १६१२ त मृत्यु.

६१ जिनचंद्रः—रीहड गोत्राचा साह–श्रीवन्त व सिरीयादेवी याचा पुत्र. तिमरीनगराजवळील वडली ग्रामात सं. १५९५ त जन्मला. सं. १६०४ मध्यें दीक्षा. जेशलमेरु येथें सं. १६१२ त सूरिपद. असें म्हणतात कीं ह्यानें अकबर बादशहाला जैनधर्माची दीक्षा देऊन त्याचें धर्मांतर करविलें. समयराज, महिमराज, धर्मनिधान, रत्ननिधान, ज्ञानविमल वगैरे त्याचे ९५ शिष्य होते. तो वेणातट येथें सं. १६७० त मृत्यु पावला. भावहर्षोपाध्यायानें स्थापिलेली भावहर्षीय खरतर शाखा सं. १६२१ मध्यें निर्माण झाली. हा ७ वा गच्छभेद होय.

६२ जिनसिंहः—गणधर चोपडा गोत्राचा साह–चापसी व चतुरंदेवी याचा पुत्र. खेटासर ग्रामात सं. १६१५ त जन्मला. मूळ नाव मानसिंह. बिकानेर येथें सं. १६२३ त दीक्षा घेतली. जेशलमेरु येथें सं. १६४० त वाचकपद मिळालें. लाहोर येथें सं. १६४९ त आचार्यपद मिळालें. वेणातट येथें सं. १६७० त सूरिपद मिळालें. मेडथा येथें सं. १६७४ त तो मृत्यु पावला.

६३ जिनराजः—बोहिथ्यरागोत्राचा साह धर्मसी व धारलदेवी याचा पुत्र. सं. १६४७ त जन्मला. बिकानेर येथें सं. १६५६ त दीक्षा घेतली. दीक्षानाम राजसमुद्र असें होतें. सं. १६६८ त वाचकपद मिळालें. सं. १६७४ त मेडटा येथें सूरिपद मिळालें. त्यानें पुष्कळ प्रतिष्ठा केल्या. उदाहरणार्थ, शत्रुंजयावर ऋषभ व दुसऱ्या जैनांच्या ५०१ मूर्ती सं. १६७५ त स्थापन केल्या. त्यानें जैनराजी नावाची नैषधीय काव्यावर एक वृत्ति लिहिली व दुसरे ग्रंथ रचिले. तो पाटण येथें सं. १६९९ त मृत्यु पावला. सं. १६८६ त आचार्य जिनसागरसूरीपासून लघ्वाचार्यीय खरतरशाखा निर्माण झाली. समयसुंदराचा शिष्य हर्षनंदन ( ऋषिमंडल टीकेचा कर्ता ) ह्यानें ती शाखा स्वतः निमित्तभूत होऊन उपस्थित केली होती. हा आठवा गच्छभेद होय. स. १७०० त रंगविजयगणीपासून रंगविजयखरतरशाखा निर्माण झाली. हा नववा गच्छभेद होय. आणि ह्या शाखेपासून श्रीसारोपाध्यायानें स्थापिलेली श्रीसारिय खरतरशाखा उत्पन्न झाली. हा दहावा गच्छभेद होय. अकरावा गच्छ भेद बृहत्खरतर नावाचा मूलगच्छ आहे. याप्रमाणें खरतरगच्छाचे अकरा भेद आहेत.

६४ जिनरत्न—लुणीया गोत्राचा साह तिलोकसी व तारादेवी याचा पुत्र. मूळ नाव रूपचंद सं. १६९९ त सूरिमंत्र घेतला. अकब्बराबाद येथें हा सं. १७११ त मरण पावला.

६५ जिनचंद्र.—गणधर चोपडा गोत्राचा साह–आसकरण व सुरियारदेवी यांचा पुत्र. मूळ नाव हेमराज. दीक्षानाम हर्षलाभ. सं. १७११ मध्यें पदस्थापना झाली. हा सुरत येथें सं. १७६३ त मृत्यु पावला.

जिनसौख्य.—लेचाबुहरा गोत्राचा साह रूपसी व सुरूपा यांचा पुत्र फोगपट्टण येथें सं १७३९ त जन्मला. पुण्यपालसरग्रामात सं. १७५१ मध्यें दीक्षा घेतली. दीक्षानाम सुखकीर्ति. सं. १७६३ त सूरिपद मिळालें. सं १७८० त ऋणी येथें मरण पावला.

६७ जिनभक्ति.—सेटगोत्राचा साह हरिचंद व हरिसुखदेवी याचा पुत्र. इंद्रपालसर ग्रामात सं. १७७० मध्यें जन्मला. मूळ नाव भीमराज. सं १७७९ मध्यें दीक्षा घेतली. दीक्षानाम भक्तिक्षेम. सं. १७८० त ( वयाच्या दहाव्या वर्षी ) ऋणी येथें सूरिपद मिळालें. सं. १८०४ मध्यें कच्छ देशातील माडवी येथें मृत्यु पावला.

६८ जिनलाभ.—बिकानेर येथें राहणारा बोहिथ्यरा गोत्राचा साह पचायणदास व पद्मादेवी यांचा पुत्र. सं. १७८४ त वापीउ ग्रामात जन्मला मूळ नाव लालचंद. जेशलमेरु येथें सं १७९६ त दीक्षा घेतली. दीक्षानाव लक्ष्मालाभ. माडवी येथें सं. १८०४ मध्यें पदस्थापना झाली. त्यानें पुष्कळ यात्रा व प्रतिष्ठा केल्या. तो गुढा येथें सं १८३४ त मृत्यु पावला.

६९ जिनचंद्र—बिकानेर येथें राहणारा बच्छावत मुम्हता गोत्राचा रूपचंद व केसरदेवी याचा पुत्र. कल्याणसर ग्रामात सं १८०९ त जन्मला. मूळ नाव अनूपचंद. मंडोवर येथें सं १८२२ त दीक्षा घेतली. दीक्षानाम उदयसागर. गुढा येथें सूरिपद सं. १८३४ त मिळालें. सुरत येथें सं. १८५६ त मृत्यु पावला.

७० जिनहर्ष.—मिथाडियाबहुरा गोत्राचा साह–तिलोकचंद्र व तारादेवी याचा पुत्र. वाळीग्रामात जन्मला. सं. १८४१ त ओग्रामात दीक्षा घेतली. सुरत येथें सं. १८५६ त सूरिपद मिळालें. मृत्यु सं. १८९२.

७१ जिनसौभाग्य.—जन्म सं. १८६७ दीक्षा सं. १८८५ सूरिपद सं. १८९२. मृत्यु सं १९१४.

७२ जिनमुक्ति,—जन्म सं. १८८७. दीक्षा सं. १९०७ सूरिपद सं. १९१५.

[ माइल्स–ट्रॅन्झॅक्ट. आर. ए. सो. पु. ३ टाड राजस्थानः वेबर–बर्लिन ॲकॅ. १८८२; क्लिटॉनचा रिपोर्ट १८८०–८१ इं. ॲं. पु. १ ( अनु ). याकोबी–क्षेइ. डी. एम्. जी. पु. ३३; पीटर्सनचा रिपोर्ट ४. ( बॉ. ब्र. आर. ए. सो. १८९४ )]

खरबूज—याला खरबूज, कर्बूज, खरमूज, टरबूज इत्यादि नावें आहेत.

इतिहास—खरबुजाचे वेल मूळचे हिंदुस्थानांतील नाहींत, त्याचें बीं परदेशातून आलेलें आहे.. ऐन बरीमध्यें बदकशान अथवा काबुली ५२ ... ...

आहे. हिंदुस्थानांतील खरबुजें हीं इराणमधील बियापासून झालेलीं आहेत. सदा नावाचें खरबूज सर्वांत उत्तम असून तें व बुखारमध्यें होतें. हें हिंदुस्थानांत पिकत नाहीं. इतर खरबुजांपेक्षा सर्दा खरबूज पिकण्याला फार वेळ लागतो. सफेदा किंवा पांढरीं खरबुजें हीं लखनौ प्रांतात वाळवंटावर होतात. याचा रंग पांढरा असून आकार मोठ्या नारिंगासारखा असतो. डॉ. वोनाव्हियाने लखनौच्या निरनिराळ्या खरबुजांविषयीं उपयुक्त माहिती दिलेली आहे.

कुकरबिटेसी वर्गापैकीं खरबुजा व कुकुमिस(काकडी)वर्गाची एक महत्त्वाची जात असून या वर्गात १८ जाती आहेत. त्यापैकीं फक्त ३-४ हिंदुस्थानांत वाढतात. हिंदुस्थानांत वाढणाऱ्या जातींपैकीं खरबुज व काकडी ह्या दोन मुख्य आहेत. खरबुजाची लागवड हिंदुस्थानांत नद्यांच्या काठच्या वाळवंटांत करतात. गंगेचें व यमुनेचें पाणी ओसरून गेल्यावर त्यांच्या वाळवंटावर खड्डे खणून त्यांत खत भरतात व नंतर खरबुजाचें बीं पेरतात. वेलाचा बचाव करण्याकरितां खड्ड्यांच्या सभोंवतीं गवत लावितात व काटेरी झुडुपें लावतात. नदीच्या गाळांत कसदार माती आलेली असल्यामुळें खत फार कमी लागतें. अहमदाबादमध्यें व इतर कांहीं ठिकाणीं खड्ड्यांच्या ऐवजीं चर खणून त्यांत हीं झाडें लावितात. ह्या वेलांना एप्रिलपासून जूनपर्यंत फळें येतात.

ह्या वेलांचें बीं चपटें असून त्यापासून गोडें तेल काढतात. बियांत तेलाचा अंश शेकडा ३० असतो. चीनच्या चेफू बंदरांतून याचा मोठा व्यापार चालतो. बियांचें तेल पातळ व हलकें असतें. हें तेल खाण्याच्या पदार्थांत घालतात. साबण करण्याकरितांहि याचा उपयोग करतात. पूर्वी सायरालिओन व लॅगोस येथून हें तेल परदेशीं जात असे. दाहहारक औषधी म्हणून याच्या बियांचा उपयोग होतो. भागलपुरामध्यें खरबुजाच्या बिया टाकितात.

काकडीच्या वर्गांतील इतर फळांप्रमाणें खरबुजालाहि किडा लागतो. किडा लागूं नये म्हणून झाडावर राख फेंकतात परंतु त्यापासून नुकसान होत असलें पाहिजे. हें फळ पिकल्यानंतर खातात. हिरवेपणीं भाजी करतात ती काकडी भोंपळ्याप्रमाणें करतात. फार कोंवळें असतांना त्यास कडूपणा असतो तो नाहींसा झाल्यानंतर भाजी करतात.

मो म र डि या.—यांचीं फळें काकडीसारखीं असून तीं लांबट व गुळगुळीत असतात. फळावर हिरवे व पिवळे ठिपके असतात. याचे निरनिराळे प्रकार असतात. त्यांपैकीं कांहीं उन्हाळ्यांत व कांहीं पावसाळ्यांत तयार होतात. हे वेल कापूस व मका यांच्या शेतांत पेरतात. यांचीं फळें पिकलीं म्हणजे तीं फुटतात. त्याचा गीर पिठूळ असून थोडा गोडी असते. कच्च्या फळाची भाजीहि करतात.

ट र का क डी.—ही जात काकडीप्रमाणेंच असते. हिचीं फळें कांहीं अर्धवर्तुलाकार असतात व कांहीं लांबट असतात. कांहींचा लांबी तीन फुटांपर्यंत असते. कच्चीं फळें हिरवट असून त्यावर लव असते. हीं फळें वाढत चाललीं म्हणजे तीं हिरवीं होतात व पिकलीं म्हणजे नारिंगी होतात. बंगाल, संयुक्तप्रांत, पंजाब, पश्चिम हिंदुस्थान इत्यादि भागांत यांची लागवड उन्हाळ्यांत व पावसाळ्यांत करतात. कोरड्या व भुसभुशीत जमिनींत हे वेल चांगले होतात. जमिनींत खत टाकून वाफे करतात व प्रत्येक वाफ्यांत तीन फुटांच्या अंतरावर ३-४ बिया टाकितात. काकडीपेक्षा यांच्या फळाची गोडी कमी असते. उन्हाळ्यांत गरीब लोक ह्या फळावर राहतात. मध्यम वाढीचीं फळें लोणच्याच्याच उपयोगी असतात. याच्या बिया वाळवून त्यांचें पीठ करतात. बियांचें तेल खाण्याच्या पदार्थांत घालतात व दिव्यांतहि जाळतात. हें तेल औषधी असतें. [वॅट]

खरड.—पंजाब. अंबाला जिल्ह्यांतील एक तहशील. ही हिमालयाच्या पायथ्याशीं वसलेली असून हिचें क्षेत्रफळ ३७२ चौ. मै. आहे. लो. सं. (१९११) १,३३,२८३. हींत २ शहरें व ३७१ खेडीं आहेत. राज्यव्यवस्थेसाठीं कसौली व कालका हीं शहरें या तालुक्यांत घेतलीं आहेत. मध्यभागची व पश्चिमेकडील जमीन पिकाला बरी आहे. १९०३-४ साली जमीन महसूल व इतर कर वसुली ३०१ लाख रुपयांची होती. खरड हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे.

खरसावान—बिहार-ओरिसा. छोटा नागपूर संस्थानांपैकीं एक. उ. अ. २२° ४१' आणि २२° ५३' व पू. रे. ८५° ३८' आणि ८५° ५५' यामध्यें हें संस्थान पसरलें असून त्याचें क्षेत्रफळ १५३ चौ. मै. आहे. उत्तरेस रांची व मानभूम जिल्हे, पूर्वेस सराईकेला संस्थान व दक्षिण आणि पश्चिम या बाजूंस सिंघभूम जिल्हा आहे. सोनई नदी वायव्य-आग्नेय वहाते. हिच्या उत्तर व दक्षिण बाजूंस जंगलांनीं झाकलेले डोंगर आहेत. मुख्य पीक तांदूळ हें आहे. बहुतेक डोंगरांतून लोखंड सापडतें. सोनई नदींतील वाळूंत थोडेसें सोनें सापडतें. शिवाय तांबें सापडत असावेंसें दिसतें. संस्थानचा सुमारें ४० चौरस मैलांचा प्रदेश जंगलानें व्यापिला आहे; त्यांत साल, आसन, गम्हार, कुसुम, विजासाल, जामुन व बबू हीं मुख्य झाडें आहेत. वाघ, चित्ते, अस्वल हरिण, ससे वगैरे जनावरें जंगलांत आहेत. निरनिराळ्या जातींचे साप सर्वत्र आहेत.

खरसावानचा संस्थानिक पोराहाट राजघराण्याच्या धाकट्या पातींतील आहे. मूळ पुरुष विक्रमसिंग. त्याचा वडील मुलगा सराई केलाच्या गादीवर व धाकटा खरसावानच्या गादीवर बसला. १७९७ त प्रथम ब्रिटिशांशीं संस्थानचा संबंध आला. ब्रिटिश सरकाराला संस्थानाकडून खंडणी जात नाहीं. तरी प्रसंगविशेषीं ब्रिटिश सरकारला मदत द्यावी लागते. १९१७ त संस्थानिकाला ब्रिटिश सरकारनें नवी सनद दिली. छोटा नागपूरचा कमिशनर व सिंघभूमचा डेप्युटी कमिशनर यांची संस्थानावर देखरेख

असे. संस्थानची लो. सं. (१९२१) १०,३०५ आहे यांत मुसलमानांची व यक्षा पन्यांच भरणा आहेत. संस्थानांत एकंदर १८६ गांवें आहेत. सर्वांत खरसावन मोठें गांव आहे शेतकी हा लोकांचा प्रमुख धंदा आहे. तांदूळ, मका, कडधान्यें, कंस व तंबाखू हीं मुख्य पिकें होत. जाडें कापड व सायंपाकाचीं लोखंडी भांडीं या ठिकाणीं तयार होतात. संस्थानच्या हद्दींत १२ मैल लांबीची बंगाल-नागपुर रेल्वे आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें ४५ हजार आहे. एक दुय्यम शाळा, कांहीं प्राथमिक शाळा, दवाखाना हीं संस्थानच्या खर्चानें चालतात.

खरार—बंगाल मिदनापुर जिल्ह्याच्या घाटाळ पोटविभागातील एक शहर. उ. अ. २२° ४०' व पू. रे. ८७°-४८'. लो. सं. (१९११) ८८३९. कशिदीं व पितळेचीं भांडीं येथें फार होतात. १८८८ त येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली मालमत्तेवरील कराचें उत्पन्न फार मोठें आहे.

**खरे, वासुदेव वामन शास्त्री**—(१८५८-१९२४) महाराष्ट्रीय ग्रंथकार इतिहाससंशोधक. हे कोंकणातील गुहागरचे रहिवासी असून यांचा जन्म ८ आगष्ट १८५८ रोजीं झाला. यांचें घराणें शास्त्रविद्येविषयीं प्रसिद्ध आहे. हे घाटावर आल्यानंतर यांनीं सातार्‍यास अनंताचार्य गजेंद्रगडकर यांच्या जवळ संस्कृत विद्येचा अभ्यास केला. नंतर ते पुण्यास येऊन त्या वेळीं निघालेल्या विष्णुशास्त्र्यांच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें संस्कृत शिक्षक म्हणून राहिले या वेळीं त्यांचा व के. लो. टिळक यांचा दृढ परिचय व स्नेह जमला. केसरी-मराठा संस्थेशीं शास्त्रीबुवांचा संबंध संस्थेच्या जन्मापासूनच जडला होता पुढें मिरजेस नवीन हायस्कूल निघाल्यामुळें लो. टिळकांच्या सांगण्यावरून शास्त्रीबुवांना तेथें संस्कृत शिक्षक म्हणून नेमण्यांत आलें. तेथेंच शास्त्रीबुवांनीं ३० वर्षे नोकरी करून विश्रांति घेतली. मिरजेस गेल्यावर त्यांनीं इंग्रजी भाषेचा अभ्यास स्वतः मेहनत करून केला. तेथें असतांना त्यांनीं इतिहाससंशोधनाचा उद्योग हातीं घेतला आणि सतत २७ वर्षें राबून पटवर्धनी दप्तरांतील अमूल्य इतिहाससामुग्री बाहेर काढून, ऐतिहासिक लेखसंग्रह नांवाच्या पुस्तकाच्या द्वारा महाराष्ट्राच्या हातीं दिली. या कामीं त्यांना अतिशय श्रम होऊन शीणहि सोसावी लागली. त्यांत त्यांना पैशाची मदत अशी फारशी कोणाकडून झाली नाहीं. नोकरी संभाळून त्यांनीं हें काम केलें. अशा अडचणींतहि त्यांनी श्रेष्ठ इतिहाससंशोधक व उत्तम ग्रंथकार म्हणून नांव कमाविलें हेंच त्यांच्या बुद्धिमत्तेचें व उद्योगनिष्ठेचें लक्षण होय. त्यांना लहानपणापासून कविता करण्याचाहि नाद होता. त्यांची फुटकळ कविता बरीच असून यशवंतराव नांवाचें एक महाकाव्यहि प्रसिद्ध आहे. शाळेंत संस्कृत श्लोक वगैरे शिकवितांना तेथल्या तेथें त्यांचें समवृत्त मराठी भाषांतर ते करीत असत. शिक्षक या नात्यानें ते जरा कडक असत. ऐतिहासिक पत्रांच्या भाराभर गठ्ठ्यांतून नेमकीं पत्रें वेंचून काढून तीं ते प्रसिद्ध करीत व अशा पत्रांचा प्रकरणवार सारांश ते प्रारंभीं देत. त्यामुळें त्यांचे ऐ. ले. सं. हें मासिक लोकप्रिय झालें. मासिकाचें रूपांतर पुढें ग्रंथांत झालें आतांपर्यंत याचे एकंदर १२ भाग प्रसिद्ध झाले आहेत आणि त्यांत स. १७६१ पासून १८०० पर्यंतचा मराठ्यांचा इतिहास आलेला आहे. शास्त्रीबुवा हे रसिक व विद्वान् असल्यानें त्यांच्या तोंडून प्रसंगीं बरीच नवीन माहिती ऐकण्यास सांपडे त्यांनी कांहीं नाटकेंहि लिहिलीं आहेत गुणोत्कर्ष, शिवसंभव, तारामंडळ, उग्रमंगल, वगैरे त्यांचीं ऐतिहासिक व सामाजिक नाटकें प्रसिद्ध आहेत. याशिवाय नानाफडणीस यांचा अधिकारयोग, हरिवंशाची बखर, इचलकरंजीचा इतिहास वगैरे पुस्तकेंहि त्यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत.

त्यांना बहुतेक आयुष्य गरिबींत काढावें लागलें त्यांनीं दोन तपें जें इतिहाससंशोधनाचें भरीव व सुव्यवस्थित आणि सूत्रबद्ध काम केलें तें कोणत्याहि उच्च प्रतीच्या विद्वानाला शोभण्यासारखें व अभिमानास्पद होतें. त्यांची विवेचक व सारग्राही बुद्धि अत्यंत प्रखर होती व मोठ्या पायावर ते लहान इमारत रचीत, त्यामुळें त्यांचीं विधानें नेहमीं अबाधित रहात दीर्घ परिश्रमामुळें त्यांची प्रकृति ढासळून त्यांना क्षयाची व्यथा जडली आणि शेवटीं ता. ११ जून सन १९२४ रोजीं मिरज येथें त्यांना देवाज्ञा झाली.

**खरोष्ट्र**—एका चिनी लेखांत काशगरला जुनें नांव खरोष्ट्र होतें असा आधार मिळतो खरोष्ट्री लिपि काशगारियापासून उत्पन्न झाली असावी असें विधान लेव्ही करितो त्यास पिशेल व फ्रांके आक्षेप घेतात अधिक माहिती मिळवून व विचार करून हेडव्हाय असें सांगतो कीं काशगर, खोतान इत्यादि प्रदेशाच्या आसपासच्या बर्‍याच भागाला खरोष्ट्र हें नांव होतें व त्या देशाची लिपि तीच खरोष्ट्री होय.

अवतंसक सूत्राच्या चिनी भाषांतरांत या देशास 'पिएनयि' व 'चौले' अशीं नांवें आढळतात व 'चौले' याबद्दल सूर्यगर्भसूत्रांत 'यूनदा' (खोतान) हें नांव येतें. यावरून खरोष्ट्र हें नांव पूर्वी हल्लींच्या खोतान प्रांतास व आजूबाजूच्या डोंगरी मुलखास लावीत असावें. खरोष्ट्र याचा अपभ्रंश खोतन या शब्दामध्यें होणें स्वाभाविक आहे.

आतां सूर्यगर्भाच्या तिबेटी रूपांतरावरून पहातां असें दिसतें कीं, खोतान हा प्रांत खश देशामध्यें होता. खश हें नांव संस्कृत वाङ्मयांत व महाकाव्यामधून व धर्मशास्त्रावरील ग्रंथांतून आढळतें नेपाळ देशांतील गुरखे लोक आपणास 'खश' म्हणवून घेण्यांत भूषण मानतात व त्यांची भाषा खश अथवा पर्वतीय या नांवानें प्रसिद्ध आहे खास अथवा खश हीं नांवें हल्लीं हिंदु लोक हिमालय पर्वतांतील प्रदेशांत

लिपीचाहि संबंध जोडणें शक्य आहे असेंहि ते म्हणतात. [ सं. अँ. १९०६ ]

**खर्जी.**—वऱ्हाड-मध्यप्रांत. भंडारा जिल्हा. अर्जुनीच्या उत्तरेस ही एक लहानशी जमीनदारी आहे हींत दोन खेडीं असून एकंदर क्षेत्रफळ ४३०० एकर व लोकसंख्या १३०० आहे. देवगडच्या बख्त बुलंदनें प्रतापगड किल्ल्याचा किल्लेदार अमरसिंग यास इनाम दिली पुढें रघोजीरावानें त्याच्या नातवाकडेच ही जमीनदारी ठेवली. उत्पन्न २००० रुपये. टाकोळी ६०० रुपये. येथें एक मोठा तलाव मुद्दाम बांधण्यांत आला आहे.

**खर्डा.**—बंगाल, चोवीस परगणे जिल्हा बराकपूर पोट-विभागांतील एक गांव ईस्टर्न बंगाल स्टेट रेल्वेचें हें स्टेशन असून हुगळी नदीच्या डाव्या तीरावर वसलें आहे. उ. अ. २२° ४४′ व पू. रे. ८८° २२′, लो. सं. (१९०१) १७७७ चैतन्याचा शिष्य नित्यानंद याचें हें क्षेत्र असून वैष्णवभक्त येथें यात्रेला येतात. नित्यानंदाच्या वंशजांना गुरु म्हणून मान देण्यांत येतो. श्यामसुंदराचें येथील देऊळ फार सुरेख आहे. दक्षिण बराकपूरच्या म्युनिसिपालिटींत हें गांव येतें.

**खर्डे**—मुंबई, अहमदनगर जिल्हा जामखेड तालुक्यांतील एक गांव. उ. अ. १८° ३८′ व पू रे. ७५° २९, लो. सं. (१९११) ७१३३. अहमदनगरपासून हें आग्नेयेस ५६ मैलांवर आहे. इ स. १७९५ त निजाम व मराठे यामध्यें येथें मोठी लढाई झाली. येथें ५०० वर मोठे व्यापारी, दुकानदार व सावकार आहेत. निजामाचा सरदार निंबाळकर याकडे हा गांव होता. त्याचा सुंदर वाडा अद्याप गांवच्या मध्यभागीं मोडकळीस आलेला दिसतो. गांवाच्या आग्नेयेस निंबाळकरांनीं बांधलेला एक किल्ला आहे किल्ल्याभोंवती एक खंदक आहे. मंगळवारीं येथें भरणारा गुरांचा बाजार सबंध जिल्ह्यांत फार मोठा असतो. येथील म्युनिसिपालिटी १८९० त स्थापन झाली.

**खर्ड्याची लढाई**—बाळाजी विश्वनाथ पेशव्यांनीं व्यवस्था केल्याप्रमाणें, हैदराबादकर निजामच्या मुलुखांत चौथसरदेशमुखीचा वसूल सालदरसाल घेण्याचा हक्क मराठ्यांना प्राप्त झाला होता; हें पेशव्यांनीं ठरलेलें ओझें कधींहि पसंत निजामला कबूल न व्हावयाचें होतें. पेशवाईच्या स्थापनेपासून थोरल्या माधवरावाच्या अखेरीपर्यंत मराठे व निजाम यांच्यात जीं जीं युद्धें झालीं, त्या सर्वांचें मूळ कारण हेंच होय स. १७९४ पर्यंत या चौथसरदेशमुखीची बाकी जवळ जवळ दोन कोटींवर होऊन गेली. या वेळीं टिपूकडील भांडण मिटलें होतें, तेव्हां मराठ्यांनीं आतां आपल्या मागणीचा तगादा निजामकडे लावला. या कामांत इंग्रजांनीं पडून बाकी देण्याची कांहीं तडजोड करावी असा निजामअल्लीचा हेतु होता, पण इंग्रजांनीं तें नाकारलें. तेव्हां निजामअल्लीचा दिवाण मुशीरुल उर्फ मशीरउल्मुल्क यानें त्याला युक्ति सुचविली कीं, मराठे हे तीन कोटी तीस लक्षाचा मुद्दल मागतात, तो त्यांना निमूटपणें देण्याऐवजीं तेवढ्या रकमेंत फौज जमवून मराठ्यांशीं लढाई देऊन कां पाहूं नये? ही मसलत निजामास आवडली व त्यानें मराठ्यांच्या युद्धाची पाहणी सुरुवात केली. वऱ्हाडच्या उत्पन्नाची वाटणी नागपूरकर भोसल्यास देण्याचें त्यानें मना केलें, पुण्यास त्याचे लोक येऊन मराठी फौजेंत फितूर करूं लागले; त्यानें आपल्या कवायती पलटणींची संख्या दोन होती ती वाढवीत वाढवीत तेवीस-वर आणून ठेविली, पेशव्याचे वकील गोविंदराव काळे यांनीं दोन कोटी साठ लक्षाच्या बाकीची मागणी केली असतां हैदराबादच्या दरबारांत निजामनें श्रीमंताची व नानाची सोंगें आणवून त्याचा व नानास उपमर्दकारक भाषा वापरली व त्याचा उघड उपमर्द केला. याच सुमारास महादजी शिंदे व हरिपंत तात्या फडके हे वारल्यानें निजामनें लढाईची तयारी अधिक जोरानें व निर्भयपणें चालविली. तरी पण दुसरीकडून त्यानें पुणेदरबाराशीं समेटाची बोलणीं शेवटपर्यंत चालविलींच होतीं. निजाम अल्लीनेंच प्रथम युद्धास तोंड लाविलें, बेदर येथें त्यानें स्वतःच्या देखरेखी-खालीं सैन्याची तयारी चालविली (८ नोव्हेंबर १७९४). त्याची एकंदर फौज १ लक्ष १० हजार जमली, तिच्या-सह तो बेदरहून निघून मांजरानदीच्या काठाकांठानें मराठ्यांच्या सरहद्दीकडे डिसेंबरांत येऊं लागला. इकडे पेशव्यांनींहि तयारी चालविली. दौलतराव शिंदे पुण्यांत होते, त्यांची फौज हिंदुस्थानांतून आणविण्यास पेशव्यांनीं त्यांना हुकूम सोडला.

नागपूरकर भोसले, होळकर, रास्ते, पटवर्धन, विंचूरकर, मालेगांवकर, राजेबहाद्दर, घोरपडे, पाटणकर, प्रतिनिधि वगैरे कित्येक सरदार आपापल्या पथकांसह पुण्यास येऊन दाखल झाले. मुसा रेमू यानें निजामाकरितां कवायती पायदळाची पलटणें तयार केलीं होतीं त्याच धर्तीवर पेशव्यांनींहि मि. बॉइड नांवाच्या इंग्रज नोकराकडून कांहीं पलटणें उभारलीं होतीं. शिंद्याचीं कांहीं पलटणें पुण्यास होतीं, तीं डिबाईन्च्या हाताखालीं तयार झाल्यामुळें त्यांची तयारी उत्तम प्रकारची होती. त्यांची कवायत गुलटेकडीजवळ शिपायांनीं करून दाखविली, ती पाहून श्रीमंत व नाना हे खूष झाले. गोविंदराव काळ्यांनीं हैदराबादेहून काढलेली फौज पाठविली होती. या वेळेस खुद्द श्रीमंतांची स्वारी नानांच्या सह मोहिमेवर निघावयाची होती. यामुळें रावसाहेब आनंदवल्लीस होते, ते कांहीं मसलत करतील म्हणून त्यांचा बंदोबस्त करण्या-साठीं त्यांना चिमाजी आप्पा व अमृतराव यांच्यासह शिवनेरीस आणून ठेविलें. प्रथम तुकोजी होळकर डिसेंबरांत दाखल झाले नंतर ८ डिसेंबरास नाना व १४ डिसेंबरास खुद्द श्रीमंत डेरेदाखल झाले तुकोजी होळकर हे सातारच्या वाटेनें निघाले होते, ते १० हजार फौजेसह

भडिमार केला. पेरों यानें आपल्या ३५ तोफा एका टेंकडी-वर ठेवल्या होत्या. तेथून त्याची सरवत्ती मोंगलावर केली. त्याच वेळीं भोसल्याकडूनहि बाणांची वृष्टीवर वृष्टी रेंमूवर होऊं लागली. असा दोहींकडून मारा होऊं लागताच तो मागें हटूं लागला. शिंद्यांकडील लोकांनीं नबाबाचें तोंड माघारें सारलें. तेव्हा मराठे सर्व एक होऊन नबाबावर चालून गेले. 'सरकारची हुजरात सुद्धां चाळीस हजार तरवार उठली। करोली ( बंदुकीचा भडिमार ) बहुत अपूर्व झाली. नबाबाचे लोक बहुतेक मेले.' शीवबादादा यांनी 'तीनशें तोफाचा सरारा पुढें लावला. आणि बावीस हजार नवी पलटणाची उभी राहिली. एकून तडाखा तोफांचा उसळला. संध्याकाळच्या दिवस ६ घटका राहिला. इतक्यांत त्याला ( निजामाला ) वारा सोईचा होता. धूर आमच्या ( मराठ्याच्या ) लष्करांत येऊं लागला. भाऊंनीं श्रीमंतांचें स्मरण करून वाऱ्याची प्रार्थना केली, तेव्हा वारा तिकडे सरला. मग पानसे यांनीं थोरल्या सतरा तोफा पुढें आणल्या. त्या बहुत मोठ्या; एक एक तोफेस दोनशें बैल ओढावयास लागत.त्या सुरू झाल्या-वर दणाण झाला. तों अस्तमान झाला. मग मशाला व हवाया लागल्या. मग विठ्ठलपंत सुभेदार यांनीं बाणांचें छत करून सोडलें आणि सर्वांनीं एकदाव हरहर महादेव करून एकदाच उड्या घेतल्या! मोठी लढाई मातबर झाली. मोठी ख्याति झाली! पठाण मागें पाय घेऊं लागले प्रहर रात्र झाली असें पाहून नबाब मागें फिरला,मशुल्मुलुखहि पळाला.' याप्रमाणें निजामाचा मोड झाला.अंधारामुळें त्याच्या सैन्यात अधिक गोंधळ माजला. मराठ्यांनीं त्याचा पाठलाग करून पाचसातशें घोडे पाडाव केले. 'श्रीमंतांच्या प्रतापें मोठें यश सरकारच्या फौजेस आलें. शिंद्यांनीं शर्थ केली. सकाळच्या चारसहा घटका दिवसापासून शिंद्याकडील कंपूची मारगिरी होत होती. ती बारा घटका रात्रीपर्यंत.' इतक्यात मराठ्याच्या पेंढाऱ्यांनीं निजामाचें लष्कर चोहोंकडून घेरून लुटून फस्त केलें. 'नबाबाची ओझीं लादलीं होतीं तीं उतरूं पावलीं नाहींत.' तेव्हा निजाम घाबरून खर्ड्याच्या गढींत शिरला. त्याच्या तोफा, दारूगोळ्याचे २१४ शें छकडे, बाजार वगैरे सर्व लष्कर मराठ्यांनीं रात्रभर लुटलें 'मोठी दौलत समयानुसार श्रीमंताचे प्रतापेंकरून पेंचात आली'. दुसऱ्या दिवशीं मराठ्यांनीं गढीस वेढा दिला. आंत निजामाचे अन्न-पाण्याशिवाय हाल होऊं लागले. वर सांगितल्याप्रमाणें त्याचा बाजार वगैरे लुटल्यामुळें एक रुपयास अच्छेर धान्य व बारा रुपयास एक पखाल पाणी मिळूं लागलें. मराठ्यांनीं पुन्हा त्या किल्ल्यावर तोफा डागण्यास प्रारंभ केला.तेव्हां निजामा-कडून बोलणें आलें कीं, आम्हा तोफा मारीत नाहीं. तुम्हीहि मना कराव्या. तुमच्या मर्जीप्रमाणेंच तहाचा जाबसाल उल-गडून देण्यांत येईल. पुढें श्रीमंतांनीं तहाच्या वाटाघाटींच्या वेळीं पुढील मागण्या केल्या. ( १ ) पूर्वी सदाशिवराव भाऊ-साहेबानीं उदगीरच्या लढाईत जिंकलेला मुलूख होता. त्यापैकीं परांड्यापासून तहत तापी नदीपर्यंतचा जितका मुलूख गेल्या ३५ वर्षात निजामास परत देण्यात आला असेल तो सर्व त्यानें पेशव्यांना परत द्यावा. ( २ ) गंगथडीमध्यें घास-दाण्याचा भोसल्याचा हक्क आहे, त्याबद्दल भोसल्यास निजा-मानें ३ लाख १८ हजार रुपये उत्पन्नाचा मुलूख निराळा तोडून द्यावा. तसेंच भोसल्यांची वऱ्हाडच्या वाटणीपैकीं बाकी तुंबली आहे, तीबद्दल त्यांस निजामानें २९ लक्ष रुपये द्यावे; व पुढें वऱ्हाडात भोसल्याचा अंमल पूर्ववत् चालू ठेवावा (३) चौथसरदेशमुखीच्या बाकीबद्दल निजामानें पेशव्यांना तीन कोटी रुपये द्यावे.( ४ )मशीरुल्मुल्क यास पेशव्याच्या हवालीं करावें. याप्रमाणें कलमें पाठविलीं. तीं शेवटच्या कलमाखेरीज बाकीचीं सर्व निजामानें कुरकूर न करतां मान्य केलीं. मशी-रास हवालीं करणें त्याच्या जिवावर आलें तेव्हा तो दिवा-णच आपण होऊन श्रीमंतांच्या लष्करात आला.श्रीमंतांनींहि त्याचा योग्य तो सत्कार करून करारप्रमाणें त्यास इतमामानें नजरकैदेंत ठेवलें. मग तहाच्या यादीवर परस्परांची मख-लाशी होऊन निजाम भागानगरास गेला व श्रीमंत पुण्याकडे वळले.

मराठ्याच्या इतिहासात सवाई माधवराव साहेबाच्या कारकीर्दीत जिच्यामध्यें साऱ्या मराठे सरदारांनीं भाग घेऊन शत्रूचा पूर्ण पराभव करून मराठ्यांचें शौर्य सर्वत्र गाजविलें अशी ही शेवटची लढाई होय.या प्रसंगावर त्या वेळीं शाहीर लोकांनीं बरींच कवनें केलीं आहेत. ॲकवर्थ व शाळीग्राम यांनीं तीं ऐतिहासिक पोवाडे या पुस्तकात छापिली आहेत. अद्यापपर्यंतहि हे वीरसोत्पादक पोवाडे पुणें, सातारा, सोलापूर या भागात गोंधळ्याच्या तोंडून ऐकण्यांत येतात.

या लढाईचें वर्णन ग्रांट डफनें आपल्या इतिहासात दिलें आहे. त्यात, निजाम उगीचच्या उगीच पळून गेला, जय मिळाल्याबद्दल मराठ्यांची फुशारकी अगदीं व्यर्थ होती, साऱ्या लढाईत उभयपक्षीं दोनशें सुद्धा माणूस दगावलें नसेल असें म्हटलें आहे. याबद्दल कै. वासुदेवशास्त्री खरे म्हणतात कीं, "डफ साताऱ्यास होता, त्या वेळीं खर्ड्याच्या लढाईत लढलेल्या पुष्कळ लोकांशीं त्याच्या गाठी पडल्या होत्या. परंतु त्याची हकीकत साहेबाला खरी वाटली नाहीं. आणि लढाईच्यावेळीं इंग्रजांचा वकील हैदराबादेस होता, त्यानें लिहून ठेवलेली हकीकत त्यानें अक्षरशः खरी मानली, त्याचा हा परिणाम होय. मराठे व मोंगल या दोघांविषयीं त्या हैदराबादेच्या इंग्रज वकिलाच्या मनात तुच्छबुद्धि होती, तीच डफाच्या लिहिण्यांतहि प्रतिबिंबित झालेली दिसते [ ग्रांट डफ; खरे–ऐति. लेखसंग्रह भा. ९; खर्ड्याच्या स्वारीची बखर. ]

**खलीफ**—या अरबी शब्दाचा अर्थ, धर्मगुरु किंवा 'मागून येणारा' असा होतो. धार्मिक व्यावहारिक व राज-कीय बाबतींत मुसलमान लोक ज्याची आज्ञा मानितात त्या

पुरुषाला खलीफ असें अभिधान आहे. महमद पैगंबरानंतर चार पुरुषानाच केवळ नव्हे तर उमईद व अब्बासी वंशातील राज्यकर्त्यांनाहि खलीफ म्हणत या खलीफाचा इतिहास मुद्दोत्तर जग या विभागात ( प्र. १० वें खलीफत व इस्लामाचा प्रसार ) दिलाच आहे. केमालिस्टांनी सध्याचा खलीफ जो तुर्कस्थानचा सुलतान त्याची राजकीय सत्ता काढून घेतली एवढेंच नव्हे तर त्यालाहि तुर्कस्थानातून पार हाकलून दिला तेव्हा सध्यां राजसत्ताधारी किंवा अवतार खलीफ देखील राहिला नाहीं.

खलील इब्न अहमद—( ७१८–७९१ ) हा अरबी भाषाशास्त्रज्ञ ओमनचा रहिवासी होता. अरबी भाषेचा कोश यानेंच पहिल्यानें तयार केला तसेंच अरबी काव्यातील वृत्तांचें यानेंच प्रथमतः शास्त्रीय पद्धतीनें वर्गीकरण करून छंदःशास्त्राचे नियम तयार केले यामुळें तो प्रसिद्धीस आला. हा स्वतः कवीहि होता याची रहाणी फारच साधी असे. व्याकरणशास्त्रासंबंधीं त्यानें मार्मिक अभ्यास केला होता. किताब अल ऐन हा कोश करण्याला यानेंच सुरवात केली असें म्हणतात. पुढें हा कोश त्याच्या एका शिष्यानें पूर्ण केला. या कोशांतील शब्द अक्षरविरहेनें दिले नसून इंद्रियविज्ञानशास्त्रविषयक तत्वाच्या आधारें दिलेले आहेत. या कोशाला 'ऐन' या शब्दानें प्रारंभ झाला असून, 'य' शब्दानें त्याची समाप्ति झाली आहे. हा ग्रंथ १४ व्या शतकापर्यंत उपलब्ध होता, पण हल्लीं तो पूर्ण उपलब्ध नाहीं. खलीलाच्या नावावर पुष्कळ व्याकरणविषयक ग्रंथ मोडतात पण त्याच्याबद्दल अद्यापि खात्रीलायक पुरावा सापडत नाहीं.

खलीलाबाद—संयुक्त प्रांत बस्ती जिल्ह्याची आग्नेय तहशील. क्षेत्रफळ ५६४ चौ. मै. लो. सं. ३५४६७५. या तालुक्यात १३८८ गावें व मेहंदावल शहर आहे. एकंदर उत्पन्न ४॥ लाखावर आहे. सर्व जमीन बहुतेक सुपीक आहे. तळीं व विहिरी यांच्या पाण्यावर पिकं निघतें.

खवास—खवास हा आरबी शब्द असून त्याचा अर्थ चाकर किंवा अंगरक्षक असा आहे. या जातीस खवास, हजुरी, वजीर, गोळ, छंद अशींहि नावें असून त्यांची वस्ति बहुतेक काठेवाडाकडे आहे आणि त्याची लो. सं. २७ हजारांवर आहे. याचा धंदा सेवकऱ्याचा. हे रजपुत राजे व महागीरदार याचे घरीं नोकर असतात. या खवासांत कोळी मुसलमान वगैरे सर्व जातीचे लोक असतात. यांना पूर्वीच्या गुलामाप्रमाणें विकतां अगर बदलतां येतें. थोडे मण धान्य देऊन हे लोक पूर्वी विकत घेता येत असत. खवास व गोळ हे पूर्वी एकाच दर्जाचे असत. हल्लीं गोळ्यापेक्षा खवास हे उच्च दर्जाचे मानले जातात. परंतु परिस्थितीनें गोळ हा खवास होऊं शकतो. खवासानी आपल्या बुद्धीच्या व धाडसाच्यामुळें आपली स्थिति इतकी सुधारून घेतली आहे कीं, कांहे त्याच्या मुली रजपुतसरदार करूं लागले आहेत. यांतल अशा रजपुतसरदाराचे वंशज आहेत; परंतु रजपुत मात्र आपली मुलगी खवासास देत नाहींत. खवास पुरुषांप्रमाणें बादशाहि सेवावृत्ति करतात; त्यांना खवासान अथवा गोळी म्हणतात. यांच्या मुलींना छोकरी किंवा डावरन हें नाव असून त्याहि नौकरीच करतात. मात्र यांच्यावर आईबापाचा ताबा असतो. स. १८७८ पर्यंत भाट व चारण लोक लहान मुली विकत घेऊन त्या रजपुत सरदारास विकण्याचा धंदाच करीत होते. अशासाठीं ते मुली चोरण्याचा, फुसलावून आणण्याचा अगर कर्जबाजारी आईबापापासून थोड्या किंमतीत घेण्याचा प्रयत्न करीत. त्या वेळीं अशा मुली पुष्कळ खपत जाडेजा रजपुतात नवरीबरोबर आंदण म्हणून दासी देण्याची चाल असल्यानें यांचा फार खप होई. परंतु पुढें सरकारी कायद्यानें ही खरेदी विक्रीची चाल बंद पाडली. तरीहि अद्याप या गोळींवर धन्याचा हक्क असतो. गोळ हे सहसा विवाह करीत नाहींत, कदाचित् केल्यास त्याचें विवाहबंधन फार शिथील असतें. धन्यानें गोळास नोकरावरून काढल्यास त्याला आपल्या बायकोस नेता येत नाहीं; ती धन्याकडेच रहाते. गोळी स्त्रीशीं संबध ठेवणाऱ्यास फार हलके मानतात. गोळीणीस गोळाविरहीत इतर जातीच्या पुरुषापासून संतती झाल्यास तिला दोष लागत नाहीं, मात्र त्या पुरुषास दंड देणें वगैरे शिक्षा मिळते. परंतु अशा रीतीनें गोळाची संख्या वाढत जाते. खवास स्त्रीपुरुष हे दिसण्यांत रजपूत व गिरासियासारखे असून कांहीं स्त्रिया तर रजपूत स्त्रिया इतक्या सुरेख असतात. यांची भाषा गुजराथी व कच्छी असून हे मांसाहारीहि आहेत ( अहमदाबादेकडील खवास निवृत्तमांस आहेत). हे दारू पितात व अफीणबाजहि आहेत. यांचा पोषक रजपुतांसारखा असतो. मालकाचे कपडे ठेवणें, चिलीम भरणें वगैरे कामें हे करतात. हल्लीं शेती व मजुरीहि हे करूं लागले आहेत. पूर्वी गोळ हा आपल्या धन्याच्या प्रेताबरोबर स्वतःस जाळून घेई व गोळीण ही आपल्या विधवा धनिणीबरोबर स्वतःच्या बांगड्या फोडी. यांना धन्याच्या घरीं अन्नवस्त्र, डागदागिने वगैरे सर्व मिळत असल्यानें त्यांची स्थिति चांगली असते. स. १८१४ चे सुमारास नवानगरचा जाम मेल्यावर त्याच्या खवासांनीं बंड केलें होतें. खवासात मेरु, मावजी, राघो, लद्धो वगैरे नामांकित पुरुष होऊन गेले [ बॉम्बे ग्याझे. व्हॉ. ९ भा. १; व्हॉ. १. भा. १. ].

खसखस—हें अफूच्या झाडाचें बी आहे. हें उत्तम खाण्याच्या पदार्थामध्यें गणलें जातें. याचा अनरशाना लावण्यासाठीं, मिठाई करण्यासाठीं व इतर रीतीनें स्वयंपाकात उपयोग करितात. यांत मादकपणा मुळींच नसून उलट एक प्रकारची चव असते. खसखशीचें तेल काढतात. ज्या बोंडांतून अफू काढलेली नसते, त्यांतील खसखशींतून जास्त तेल निघतें. खाण्याचे पदार्थ करण्यासाठीं, तेल जाळण्यासाठीं, औंगण व साबण तयार करण्यासाठी हें तेल उपयोगी पडतें. याची पेंड गोड व पौष्टिक असते.

व गरीब लोकांनां व गुरांना उपयोगी पडते हें तेल उन्हांत ठेवल्यानें अगदीं स्वच्छ पांढरें होतें. म्हणून रंगांत टाकण्यास हें विशेष उपयोगी पडतें. पण हें महाग असल्यामुळें खप विशेष होत नाहीं. यात केलेला सफेदीचा रंग लवकर विटत नाहीं. गंधकाम्लात मिळविलें असता उष्णमान ८०पासून९० पर्यंत चढतें. हिंदुस्थानात इराणातूनहि खसखस येते पण अलीकडे कमी येऊं लागली आहे. खसखसीची निर्गतहि बरीच होते १९०६—७ साली ८०२६९५ हंड्रे. किं. रु.६५५७०२३१ची खसखस परदेशीं गेली. खसखसीच्या किंमतींत बरेच फेरबदल होतात असें दिसतें. फ्रान्स, बेलजिअम आणि जर्मनी या देशांत बराच माल जातो. निर्गत बहुतेक मुंबईहून व काहीं कलकत्याहून होते. ( 'अफू' पहा ).

खळ—खळीचा उपयोग कागद चिटकाविण्याकडे, कपड्याला जिल्हई येण्याकरिता कपड्यास लावण्याकडे व विणकामात सूत ताण सहन करण्याइतकें मजबूत व्हावें म्हणून त्यास लावण्याकरिता करतात. मुख्यतः हा शेवटचाच उपयोग जास्त महत्वाचा आहे. सुतास खळ लावण्याच्या क्रियेस सायझिंग ( खळ देणें ) म्हणतात. कापड विणण्याच्या कामांत स्पिनिंग ( कातणें ), वाइंडिंग (गुंडाळणें), वॅरपिंग ( ताणा लावणें ) साइझिंग ( खळ देणें ), ड्राइंग (सुकविणें ), वीव्हिंग (विणणें), फिनिशिंग ( जिल्हई देणें ), फोल्डिंग ( घड्या करणें ) या ज्या मुख्य मुख्य क्रिया असतात त्यातील साइझिंग अथवा खळ देण्याची क्रिया ही एक महत्वाची क्रिया आहे. म्हणून तिचें विस्तृत विवेचन पुढें दिलें आहे. बाकीच्या क्रियांचें वर्णन विणकाम या लेखात येईल.

पाजणी.—पांजण अथवा साइझिंग. कापड विणण्यास जें सूत लागतें त्याला खळ दिल्याशिवाय तें विणण्याच्या कामालायक मजबूत होऊं शकत नाहीं. या कारणासाठीं सुतास खळ देण्याच्या क्रियेस मूळ सुरवात झाली. पूर्वी सर्व कापड हातानें विणला जात असे. तेव्हा हातमागावर विणणारामध्यें पाजण करण्याची जी तऱ्हा होती व हल्लींहि प्रचारात आहे. तिचें आधीं वर्णन देऊन मग मिलमध्यें वाफेच्या शक्तीनें चालणाऱ्या साइझिंग मशीनचें ( पाजणीचें यंत्र ) वर्णन करूं. हातानें विणणाराच्या कामास मिलपेक्षां कमी मजबूत सूत चालू शकतें. व त्यामुळें तें नेहमीं मिलमधील सुतापेक्षा कमी पिळाचें व कमी मजबुतीचें असतें. व त्यास खळहि पण थोडीशी दिली म्हणजे तें विणण्याच्या लायक होतें. ही खळ अनेक तऱ्हेची करण्याची हिंदुस्थानात निरनिराळ्या प्रांतात निरनिराळी रीति आहे. काहीं ठिकाणीं जमिनींत एक प्रकारचे कंद उगवतात, ते शिजवून त्याची खळ करतात. परंतु जोंधळे, मका, तांदूळ व गहूं हीं धान्यें सामान्य उपयोगात आहेत. यापैकीं कोणत्याहि धान्याच्या पिठाची खळ सर्वत्र करतात. ही चांगली पातळ करून कढईतून गाळून घेतात. हातमागवाले आपला ताणा पसरून दोन्हीकडे तो ताणून भरतात. मग एक प्रकारच्या गवताच्या मुळ्या असतात त्यांचा मोठा कुंचला ( ब्रश ) बांधलेला असतो. हा कुंचला खळींत बुडवितात व ताण्यावरून तो फिरवितात. ताणा चांगला ओला झाला म्हणजे मग तो वाळेपर्यंत नुसताच त्यावर कुंचला फिरवीत असतात. अर्धा हिस्सा वाळत आला म्हणजे सांधीच्या तळावर मधून मधून तारा सुट्या करतात व मधून मधून कुंचला फिरवितात. अशा रीतीनें तारांहि सर्व सुट्या होतात व कुंचलाहि फिरतो. कुंचला नेहमीं एकाच दिशेनें फिरवितात त्याच्या योगें करून सुताच्या अंगावर असलेले सर्व तंतू त्याच्या अंगावर चिकटतात व ताण्याच्या सुतास एक प्रकारचा गुळगुळीतपणा व चकाकी येते. ब्रश मारीत असता पाऊण हिस्सा ब्रश मारून झाला म्हणजे ब्रशाला थोडासा तेलाचा हात मारून मग ब्रश मारतात. त्यायोगें सुत एकमेकांपासून लवकर सुटें होतें व चकाकीहि जास्त येते. काहीं ठिकाणीं हातमागावर खादी वगैरेसारखें कापड विणतात, तेव्हा त्याचा ताणा रात्रभर काजींत भिजवून ठेवतात. म्हणजे खळ सुताच्या पोटात शिरते. व सकाळीं त्याला लाकडाच्या मोगरीनें बडवून मग तो ताणा पसरून कुंचल्यानें त्याला साफ करून वाळवून मग विणण्यास घेतात. यायोगें सुतात थोडी काजी जास्त शिरते व खादीसारखें कापड जास्त भरदार दिसतें. हातमागवाले हें पाजणीचें काम बहुधा पहाटेस अगर संध्याकाळीं करतात. कारण ताणा लवकर न वाळून कुंचला जेवढा जास्त फिरेल तेवढा त्यांना पाहिजे असतो. मिलमध्यें सुताच्या पोटात काजी भरण्याचें काम वाफ करते.व सूत सुकविण्याचें कामहि वाफच करते त्यायोगेंकरून त्याचें पाजणीचें यंत्र सारा दिवस चालू असतें आतापर्यंत हातानें पाजण करण्याची माहिती दिली आता मिलमध्यें पाजण करितात त्याला साइझिंग म्हणतात, त्याकडे वळूं.

मिलमध्यें पाजणीचा विषय फारच महत्वाचा आहे. कारण मालकाचें सर्व नफानुकसानच त्यावर अवलंबून आहे मिलचा बहुतेक कपडा वजनानें रत्तलाच्या भावावर विकण्याची वहिवाट आहे. त्यामुळें ज्या कापडात सर्वांत जास्त खळ असेल तें कापड स्वस्त भावात पडतें. उदाहरण— एक दहा रत्तल वजनाचा ताणा आहे. तो एका मिलनें ८ रत्तल सूत व २ रत्तल काजी घालून बनविला. एकानें ९ रत्तल सूत व १ रत्तल काजी घालून बनविला तर कोणता ताणा स्वस्त पडतो तें पाहूं. त्या कापडात २० नंबर सूत लागतें असें हिशोबाला धरलें व त्याचा भाव ८ आ. रत्तल आहे असा धरला व काजीचा भाव १ आ. रत्तल धरला तर पहिल्या कापडाची किंमत ४ रु. २ आ. झाली व दुसऱ्याची ४ रु. ९ आ. झाली. यामुळें जो कारखानदार सुतावर जास्त खळ चढवून कापड काढील तो जास्त फायदा कमवूं लागेल. सुमारें ३५-४० वर्षांपूर्वी मुंबईस जेव्हा नवीनच गिरण्यांची स्थापना झाली त्यावेळीं

ताण्याच्या सुतावर २०-२५ टक्के कांजी चढविली म्हणजे बस होत असे आता मुंबईचें कांजीचें प्रमाण ४०-५० टक्के झालें आहे व सोलापूरकडे तर हेंच प्रमाण ६०-७५ पर्यंत गेलें आहे व अहमदाबादनें कमाल करून हें प्रमाण १०० पासून १५० पर्यंत नेलें आहे व विलायतेंत क्वचित् कापडावर २०० टक्के कांजी चढवितात कापड वापरते वेळीं ते धुवूनच वापरलें जातें व त्यामुळें धुतल्यानंतर कांजी सर्व निघूनच जावयाची पण पहिल्यानें घेताना कापड जाड दिसलें पाहिजे ही पुष्कळशा अडाणी लोकांची समजूत असते व शिवाय कपडा स्वस्त मिळावा अशीहि लोकांची इच्छा असते त्यामुळें जास्त खळ घालण्याचें प्रचारात आलें नाहींतर मूळ जो उद्देश की कापड विणता येईल इतकें सुत मजबूत व्हावें त्याला १० टक्क्यापासून २० टक्क्यापर्यंत खळ पुरेशी होते पुष्कळ वेळा चांगली मनुष्यें कापडाची परीक्षा नसल्यामुळें बाहेरच्या स्वरूपावर जाऊन फसतात.

हें वर्णन कापड विणण्याच्या पूर्वी सुतावर चढविण्याच्या खळीचें झालें पण कापड विणल्यानंतरहि त्या कापडावर जास्त खळ चढवून त्याला जास्त जाड दिसल असें करितात. या कृतीला फिनिशिंग असें म्हणतात. अशा रीतीनें फिनिश केलेला कपडाच कांहीं लोक पसंत करतात हें त्यांचें अज्ञानच होय पण याला इलाज नाहीं गिरणीवाल्यांनीं ही तऱ्हा आधीं सुरू केली, व ती लोकांना पसंत पडली व ते तशाच तऱ्हेचा कपडा मागूं लागले पुढें ती तऱ्हा रूढ झाली व इतरहि गिरणीवाल्यास तसें करणें भाग पडलें वऱ्हाडांत ही तऱ्हा बरीच प्रचारात आहे. धोतरजोडा हातात घेतला असता ताठ उभा राहिला पाहिजे, जाड दिसला पाहिजे, उचलून पाहिलें तर हाताला वजन लागलें पाहिजे व पुन्हा स्वस्त पाहिजे. अशा तऱ्हेचा माल वऱ्हाडात पुष्कळ प्रचारात आहे. असा माल खालच्या वर्गाच्या अशिक्षित लोकांत फार खपतो

आता आधीं साइझिंगच्या यंत्राबद्दल थोडी माहिती सांगून मग कांजी तयार करण्याविषयीं माहिती सांगूं. साइझिंगच्या यंत्राचे मुख्य तीन भाग केले जातात. एक भाग सिलेंडरच्या (पंचपात्राच्या) पुढचा, ज्याला 'हेडस्टक' असें म्हणतात. दुसरा भाग दोन्ही सिलेंडर्स मिळून व तिसरा भाग कांजीच्या टाकीचा यापैकीं पहिल्या भागाचें वर्णन आधीं देऊं पुढच्या भागाच्या माथ्यावर एका शाफ्टिंग (लट)वर एक कोन ( शंक्वाकृति ढोल )बसविलेला असतो व याच शाफ्टिंगच्या एका तोंडावर साचाला चालविणाऱ्या पुल्या बसविलेल्या असतात. या पुल्या तीन असतात. यांहेरच्या बाजूस फास्ट (शीघ्रगति ) पुली असते. ही शाफ्टिंगवर पक्की बसविलेली असते. व हिच्यावर पट्टा आला असता साचा जोरानें चालूं लागतो. मध्यें एक कमी रुंदीची पुली असते तिला स्लो मोशन ( मंदगति ) पुली म्हणतात. यावर पट्टा आला असता साचा फार हळू हळू चालूं लागतो त्याच्याच बॉसवर आतल्या बाजूस लूज ( सुटी ) पुली असते. हिच्यावर पट्टा आला असता साचा बंद रहातो व पट्ट्याबरोबर लूज पुली नुसती फिरत रहाते याच शाफ्टिंगवर मध्यें एक कोनड्रम बसविलेला असतो म्हणून वर सांगितलें आहे त्याच्याच समोर साच्याच्या पुढच्या बाजूस दुसरी एक शाफ्टिंग ( लाट ) बसविलेला असून तिच्यावरहि याच मापाचा एक कोनड्रम बसविलेला असतो मात्र तो या कोनड्रमच्या उलट दिशेंत असतो कोनड्रम म्हणजे ज्याचें एक तोंड मोठें आहे व दुसरें तोंड लहान आहे असा एक ढोल याची कल्पना यावयास पाहिजे असल्यास पखवाज मध्यें जाड असतो व तो दोन्ही तोंडास बारीक असतो. तेव्हा जर मध्यंतरीं सर्वांत जाड भागावर त्याला कापून दोन तुकडे केले तर त्या तुकड्याना जो आकार येईल त्याला कोनड्रम म्हणता येईल. याच आकाराचा पण सुमारें ३॥-४ फूट लांब असा हा बिडाचा ढोल बोल्ट मारून या शाफ्टिंगवर घट्ट बसविलेला असतो. व त्याच्या समोर दुसऱ्या शाफ्टिंगवर असाच कोन-ड्रम उलट दिशेनें बसविलेला असतो. व या पहिल्या ड्रमवरून पट्टा दुसऱ्या ड्रमवर नेलेला असतो. पहिला ड्रम फिरूं लागला कीं या पट्ट्याचे योगें दुसराहि ड्रम फिरूं लागतो. त्यामुळें हे कोन उलटसुलट समोरासमोर बसविण्याचा मतलब हाच कीं पट्टा ड्रमवर कोणत्याहि ठिकाणीं असला तरी तितकाच घट्ट रहातो, ढिला पडूं शकत नाहीं. या दुसऱ्या कोनड्रमच्या एका तोंडावर एक लहानसें दातांचें चाक बसविलेलें असतें व त्यावर मध्यें एक कॅरिअर व्हील ( गतिवाहकचक्र ) देऊन त्याच्यावर मोठें चक्र असतें कोनशाफ्ट फिरूं लागल्याबरोबर मधलें 'कॅरिअर व्हील' फिरतें व त्याच्याबरोबर हें वरचें चाकहि फिरूं लागतें. याच्याच एका तोंडावर वाकड्या दातांचें एक ( वेव्हील ) चक्र दिलेलें असतें व त्याच्या योगें सायझिंगच्या एका अंगावर एक लांबच लांब साइड शाफ्ट नावाचा शाफ्ट असतो तो फिरूं लागतो. वरती हें मोठें चाक फिरूं लागतें म्हणून सांगितलें तें चाक पुढें एक बिडाचा सुमारें १ फूट जाडीचा रूळ असतो त्याच्या अंगावर कायम बसविलेलें असतें. त्यामुळें हें मोठें चाक फिरूं लागल्याबरोबर हा बिडाचा रूळहि फिरूं लागतो या बिडाच्या रूळाचे अंगावर बनात गुंडाळलेली असते व हा रूळ मागाहून कांजी लागून आलेल्या सुताला पुढें ओढून नेण्याचें काम करितो याच्याच अंगावर वरच्या बाजूस बिडाचा आणखी एक रूळ असतो त्याला टिनरोलर हें नाव आहे. व पुढच्या बाजूस आणखी एक बिडाचा रूळ असतो. या तिन्ही रूळाच्या मधून सुत येऊन तें पुढें साच्यावर लागणाऱ्या ब्यावर गुंडाळलें जातें. वरती जें मोठें चाक फिरतें म्हणून सांगितलें तें पुढच्या बाजूला घर्षणपट (फ्रिक्शन प्लेट) म्हणून जो

रचना बीम भरण्याकरिता केलेली असते त्याला चालवितें. या फ्रिक्शनप्लेटमधील मुख्य तत्व हेंच आहे कीं बीम ज्या वेळीं नवीन लावतात त्यावेळीं त्याच्या मधल्या रुळाची जाडी लहान असते. त्यामुळें बीम लवकर फिरून पुढें येणारें सर्व सूत त्यावर गुंडाळलें जातें. व सूत गुंडाळून बिमाची जाडी जशी वाढत जाते तशी त्याची गति सावकाश व्हावी लागते व ती रचना या फ्रिक्शनप्लेट मोशनमध्यें साधलेली आहे. तसेंच बिमावर गुंडाळणारें सूत जास्त घट्ट (टाईट) भरावयास पाहिजे असेल तर या फ्रिक्शनप्लेटच्या रचनेशीं जोडलेला एक तरफ असते. तीवरील वजन जसजसें पुढें सरकवावें तसतसें सूत घट्ट भरतें. कारण त्या वजनाच्या योगें फ्रिक्शनप्लेटवर जोर येऊन बीम लवकर फिरण्याचा प्रयत्न करिते. बीमावर भरलें जाणारें सूत जास्त घट्ट भरलें जाऊन त्याची जाडी सर्व ठिकाणीं सारखी व्हावी म्हणून खालच्या बाजूनें दोन फिरते लोखंडी रूळ. बीम भरणें सुरू झालें म्हणजे त्याला दाबूं लागतात व या रुळाच्या बैठकीला वर खालीं करणारी तरफ खालीं एका आडव्या शाफ्टवर बसविलेली असते व याच शाफ्टच्या दुसऱ्या टोंकाला उलट दिशेला दुसरी एक लांब लिव्हर लावून त्याच्यावर एक वजन अडकविलेलें असतें. त्याच्या योगानें या खालच्या दाबणाऱ्या रुळावर वजन पडून ते रूळ वरील बिमाच्या अंगावर जोरानें टेंकून रहातात व बीम फिरूं लागलें म्हणजे हे रूळहि फिरूं लागतात. आतां वरती जे तीन रूळ असतात म्हणून सांगितलें–कीं ज्याच्यामधून सूत दबून पुढें ओढलें जातें–त्यामध्यें, व ज्याचें नाव टिनरोलर म्हणून सांगितलें त्याच्यास एका तोंडावर एक चाक दिलेलें असून या चक्राच्या योगें दुसरीं चक्रें चालून त्याच्यावर, बिमावर जितक्या वारावर खूण पाहिजे तितक्या वारावर खूण करणारी एक 'मार्किंग मोशन' लाविलेली असते. या टिनरोलरवरील चक्र व त्याच्या खालीं एक स्टॅंड व्हील म्हणून असतें, हीं दोन चक्रें कांहीं हिशेबानें बदलून आपणास वाटेल तितक्या अंतरावर रंगाची खूण पाडतां येते. त्या योगेंकरून साच्यावर विणतांना साचेवाला ही खूण पाहून तीवर रंगीत आडवीं सुतें घालतो. ह्या कृतीला हेडिंग असें म्हणतात हीं चक्रें काय हिशेबानें बदलावयाचीं त्याचा हिशेब असाः—

(स्टॅंडव्हील × बेलव्हील × टिनरोलराचा घेर) / टिनरोलर व्हील = खुणेची लांबी.

गतीमध्यें रोलरव्हील असतें म्हणून सांगितलें, त्यासाठीं एक स्टॅंड व्हील असतें. व या दोहोंचा संबंध जोडणारें एक बाजूला कॅरिअर (गतिग्राहक) चक्र असतें. स्टॅंडव्हीलच्या आसावर एक 'वर्म' असून तो वर्म एका चक्रास चालवितो. त्याला बेलव्हील (घंटाचक्र) म्हणतात. कारण या चक्रावरूनच खूण पडण्याच्या पूर्वी एक घंटाहि वाजत असते. हें बेलव्हील बहुधा ४५ दातांचें असतें. आतां या टिन रोलरच्या मागच्या बाजूचे दोन फिरते रूळ असतात–ज्यांना टेन्शनबार्स (ताणदंड) असें म्हणतात–त्यांतील मागच्याच्या वरून व पुढच्याच्या खालून सूत पुढें येतें. हे सुताच्या ओढीनें फिरतात. याच्या मागें एक फणी बसविलेली असते, तिचे दांत वरून उघडे असतात. मागून बाजी लावून येणारीं सुतें सिलेंडर्सवर वाळून पुढें खळ्याच्या योगें सुटीं झाल्यानंतर मग तीं या फणीमध्यें सारखीं वाटून भरलेलीं असतात त्याच्या योगें पुढें ज्या मापाचें बीम लाविलेलें असेल तितकाच सुताचा पन्हा या फणीच्या योगें ठेवितां येतो. साइझिंगच्या पुढच्या बाजूला दोन्ही हाताला दोन दांडे असतात. एक दांडा फिरविला असतां फणी लहान मोठी होते दुसरा फिरविला असतां फणी उजव्या अगर डाव्या बाजूस सरकूं शकते; हें फणीचें वर्णन झालें. आतां त्याच्या मागें थोड्या अंतरावर सिलेंडर्सच्या पुढें दोन्ही बाजूला लहान लहान ब्रॅकेट्स बसविलेले असतात. त्याच्यामध्यें लोखंडी नळांच्या शिगा बसविण्याची योजना केलेली असते हे नळ दोन्ही बाजूनीं चपटे केलेले व अतिशय गुळगुळीत केलेले असे असतात. त्यायोगें कोठेंहि न अडकतां हे सुतामधून आरपार घालतां येतात. याचा उपयोग मागून कांजी लागून येणारीं सुतें चिकटलेलीं असतात तीं एकमेकांपासून सुटीं करण्याच्या कामीं चांगला होतो. यामध्यें एक नळ सुमारें २ इंच जाडीचा असतो व बाकीचे १ इंच जाडीचे असतात. मागें कीलवर जितकीं बिमें लाविलीं असतील त्यापेक्षां हा एक कमी लागतो. याचें कारण याचा उपयोग प्रत्येक बिमाच्या तारा एकमेकांपासून सुट्या करण्यासाठीं असतो. तेव्हां जर मागें दोन बिमें असतील तर त्याच्या तारा वेगळ्या करण्यास एकच शीग (बाट) पुरे आहे. तीन बिमें असल्यास दोन शिगा पुरे होतील आपल्या हाताला पांच बोटें आहेत. पण त्या बोटांच्या मधील सांचा चारच आहेत. या शिगांच्या बैठकीच्या मागें एक टिनचा रूळ असतो. पूर्वी मार्किंग मोशन या रुळाला लावलेली असल्यामुळें या रुळावर बसविल्या जाणाऱ्या चक्रास टिनरोलर व्हील असें म्हणण्याची चाल पडली आतां या रुळावरील मोशन काढून पुढच्या बिडाच्या रुळावर नेली तरी त्या रुळावर लागणाऱ्या चक्राला टिनरोलर व्हील म्हणण्याचीच वहिवाट पडली आहे. या रुळाच्या खालच्या बाजूस एक अगर दोन पंखे बसविलेले असतात व ते कोनडूम शाफ्टवरून पट्टा घेऊन फिरविले जातात. ताणा जो लहान सिलेंडराच्या खालून येतो तो या दोन्ही पंख्याच्या खालून येऊन मग बाजूनें थोडा वर जाऊन मग उलट मागच्या बाजूला वर सांगितलेल्या टिन रुळावरून पुढें जातो.

येथपर्यंत वर्णन पुढील हेड स्टॉकचें झालें आतां मधले दोन सिलेंडर्सविषयीं पाहूं. हे सिलेंडर्स दोन असतात. एक मोठा असतो व दुसरा लहान असतो. मोठा सिलेंडर वर जो टिनरोलर सांगितला त्याच्याच मागें बसविलेला असतो व याच्या मागें व कांजीच्या टाकीच्या पुढें

असा लहान सिलेंडर बसविलेला असतो. कांजीच्या टाकींतून जें सूत बाहेर पडतें तें अर्धी मोठ्या सिलिंडरवर येत व त्याला फेरा देऊन मग लहान सिलिंडरावर जातें. । लहान सिलिंडराला सबंध फेरा देऊन मग खालच्या बाजूनें मोठ्या सिलिंडराच्या पुढें पंख्याच्या खालून त्याच्या पुढच्या रुळावर जाऊन मग वरच्या दिशेस जातें हें वर सांगितलेंच आहे या सिलिंडराच्या बाजूस जाड लोखंडी पत्रा असून मध्य त्याला आधारासाठीं लोखंडी टायबार्स ( जोडदांडे ) दिलेले असतात व या लोखंडी पत्र्यावर दोन्ही बाजूला चिकटून सबंध फेरावर तांब्याचा पत्रा बसविलेला असतो. पूर्वी तांब्याच्या जागीं कल्हईच्या टिनचा पत्रा बसवीत असत, पण त्यावर वाफेचा दाब हल्लीं इतका घेता येत नसे. शिवाय त्याला लवकर भोकें पडून सिलेंडर खराब होई म्हणून अलीकडे तांब्याचा पत्रा बसवूं लागले त्यायोगें सिलेंडर जास्त दिवस चालतो व दाब जास्त घेता येतो हे सिलेंडर २५ ते ३० पौंडापर्यंत दाब सहन करतील अशी परीक्षा करून घेतात. व कामासाठीं १२ पासून १५ पौंड पर्यंत दाब घेता येतो. या सिलेंडर्समध्यें जेथून वाफ येते त्या नळीवर वाफेचा प्रेशर दाखविणारें घड्याळ बसविलेलें असतें. कांहीं दुरुस्ती करण्याकरितां सिलेंडरच्या आंत जाण्याचा प्रसंग आल्यास त्यासाठीं प्रत्येक सिलेंडरला एक मॅनहोल ( मोठें भोंक ) ठेविलेलें असतें. या सिलेंडर्सवर कांजींत भिजलेलें सूत वाळण्यासाठीं येत असतें व या सिलेंडर्सच्या आंतील वाफेच्या उष्णतेच्या योगानें सिलेंडर तापलेला असतो व त्यामुळें हें सूत सुकतें. पण यामुळें या सिलेंडरच्या एका तोंडातून आंत वाफ सोडलेली असते. त्या वाफेचें या वरील ओल्या सुतामुळें वरचेवर पाणी होऊन ते या सिलेंडरमध्यें जमा होत असतें. तें बाहेर काढून टाकण्याची योजना या सिलेंडरांत केलेली असते. या सिलेंडरच्या दुसऱ्या तोंडाकडे टिनाची अगर तांब्याची बकेट्स ( बादल्या ) बसविलेली असतात. त्यायोगें रहाटगाडग्यानें जसें विहिरींतील पाणी वर काढावें त्या प्रमाणें ही बकेट्स खालीं आलीं म्हणजे त्यांत पाणी भरतें व ती वर गेलीं म्हणजे तें पाणी दुसऱ्या बाजूच्या तोंडात उतरतें व बाहेर पडूं लागतें. त्याबरोबर वाफ येऊं लागतें. म्हणून बाजूला एक पेटी बसवून तिच्याशीं एक नळी या सिलेंडरच्या तोंडापासून जोडलेली असते. या पेटींत एक खालींवर होणारा गोळा बसवून अशी योजना केलेली असते कीं, तिच्या योगें वाफ बाहेर जाऊं शकत नाहीं. फक्त पाणी मात्र बाहेर जातें. हिला स्टीमवेस्ट ( बाष्पपेटिका) म्हणतात. सूत जितकें जड असेल व त्यावर कांजी जितकी जास्त प्रमाणानें चढविलेली असेल त्या मानानें सूत सुकण्यास वेळ लागतो व वाफहि सिलेंडरमध्यें जास्त ठेवावी लागते. जितकें बारीक असेल त्या मानानें त्यावर कांजीहि पण कमी चढवितात. व त्यामुळें तें सुकण्यास वाफ कमी पुरते न सूत लवकर सुकल्यामुळें यंत्रहि जोरानें चालविता येतें ४० ते ५० नंबरचें सूत असल्यास सिलेंडरमध्यें २-३ पौंड दाबाची वाफ पुरते. बारीक सुताला ५ पौंडावर दाबाची वाफ कधीं घेऊं नये उन्हाळ्याचे दिवस असल्यास लहान सिलेंडरचा स्टीम व्हाल्व ( बाष्प पडदा ) बंद ठेवावा. म्हणजे सूत जास्त सुकून कडक होणार नाहीं. आतां याच्या मागला भाग जी कांजीची टाकी ( साईझ बॉक्स ) तिची माहिती देऊं या कांजीच्या टाकीच्या दोन्ही बाजू बिडाच्या ओतलेल्या असतात व या मधील टाकी लाकडाची केलेली असते व सबंध टाकीला बहुधा आंतून तांब्याचा पत्रा बसविलेला असतो. व टाकी मजबूत रहाण्यासाठीं टाकीच्या दोन्ही बाजूला व खालीं बाहेरून टायबार्स लावून टाकी मजबूत केलेली असते या टाकीच्या आंत एक लोखंडी पडदा लावून या टाकीचे दोन भाग केलेले असतात एक भाग लहान असतो व एक भाग मोठा असतो. लहान भागांत नवीन येणारी कांजी पडण्याची व्यवस्था केलेली असते. मोठ्या भागांत मध्यें तांब्यानें मढविलेले दोन रूळ बसविलेले असतात. व याच्याच वर कांजी पिळून काढणारे बिडाचे वजनदार स्क्वीझिंग रोलर्स असतात. या रुळाच्या बाजूला सुताला कांजींत बुडविणारा ( इमर्शन रोलर ) रूळ असतो. हा रूळ पाहिजे तेव्हां कांजींत बुडविता येतो व पाहिजे तेव्हां कांजीच्या बाहेर काढिता येतो. ज्यावेळीं यंत्र चालू असतें त्यावेळीं त्याला कांजींत बुडवितात. ज्यावेळीं यंत्र बंद असतें त्यावेळीं याला कांजीच्या बाहेर उचलून ठेवितात. हा इमर्शन रोलर केव्हां केव्हां तांब्याच्या नळीचा बनविलेला असतो व केव्हां केव्हां एका गोल रहाटाचा बनविलेला असतो. कांजी जास्त चढविणें असल्यास रहाट असलेला बरा. हे जे दोन तांब्याचे रूळ आंत असतात म्हणून सांगितले त्यांच्या तोंडावर वेव्हल व्हील्स दिलेलीं असून पूर्वी पुढच्या भागाच्या वेळीं बाजूला एक लांबच लांब शाफ्ट असतें म्हणून सांगितलें. त्या शाफ्टवर वेव्हल चक्रें असून ती या रुळांना चालवितात. म्हणजे मागें बीमवर जी वॉर्पिंगचीं बिमें ठेविलेलीं असतात त्यांच्या वरील तारी उलगडत्या जाऊन त्यांना कांजी लागून, याच रुळावर स्क्वीझिंग रोलर्स असल्यामुळें याच्या योगें ओढून पुढें दिल्या जातात त्यामुळ यांना डिलिव्हरी रोलर्स म्हणण्यास हरकत नाहीं. मागून जितकें सूत पुढें दिलें जाईल तितकें पुढें घेण्याचें काम पुढें जे तीन रूळ असतात म्हणून सांगितलें आहे ते करीत असतात. मागल्या रुळापेक्षा या पुढच्यातील खालचा रूळ ज्याला मूळ गती मिळते त्याची जाडी ( डायमेटर ) सुमारें एक द्वितीयांश इंच कमी असते व ती मागच्याच्याबरोबर करण्याकरितां या रुळावर बनात गुंडाळतात. ती पक्की रहावी म्हणून या बिडाच्या रुळांत एका ओळींत मध्यें मध्यें लहान लहान भोकें पाडून त्यांत लाकडाच्या खुंट्या बसविलेल्या असतात.

बनातीच्या पहिल्या फेऱ्यावर या सुंटयाच्या ठिकाणी बारीक टेकस मारून मग बनात लपेटली जाते. पहिल्यानें सरासरी तीन फेरे बनात गुंडाळून मग साचा चालू करून पहातात. साइझिंगचा मोठा सिलिंडर व ताम्याचा रूळ यामध्यून ढिलें पडूं लागल्यास बनात अपुरी पाहिजे असें समजावें व जर तेथें सूत टाइट येऊं लागलें तर बनात जास्त झाली असें समजून ती कमी करावी. सूत जास्त ढिलें न पडतां जरा जरा झोले खात चालूं लागल्यास बनात बरोबर आहे म्हणून समजावें. या ठिकाणीं सूत ओलें असतां तेंवर जर तें टाईट राहून ओढ बसेल तर तें विणतांना जास्त तुटेल. कारण ओलेपणीं सूत ओढलें असतां जास्त लांबेल. आणि तसेंच ओढलें असतां, न तुटतां लांब होण्याची जी शक्ति (स्थितिस्थापकता)—जशी रबराच्या अंगीं असते त्या प्रकारची—सुताच्या अंगीं रहाणार नाहीं. ओव्या वरती खालती होतांना त्या ठिकाणीं सुतावर ताण पडत असतो. त्यावेळीं जर ही ताणण्याची शक्ति त्याच्या अंगीं नसेल तर तें अर्थात जास्त तुटणार, म्हणून ही सुताच्या अंगची शक्ति त्याच्यात कायम राखावी लागते. ताम्याचे जे रूळ सांगितले त्याच्यावर जे स्क्वीझिंग रोलर्स असतात ते जड बिडाचे सरासरी ६ इंच जाड पण्याचे असतात. याच्या अंगीं मऊपणा यावा म्हणून याच्यावर बनात गुंडाळतात. ती त्याच्यावर रहावी म्हणून आधीं रुळाला व्हाइट लेड म्हणून सफेत रंग असतो तो लावितात. त्याचे एक दोन थर वाळले म्हणजे त्यावर पुन्हा एक थर देऊन त्यावर साध्या कापडाचा तुकडा चिकटवितात. या कापडाच्या तुकड्याचे सुमारें दोन फेरे व्हाइट लेडनें चिकटवून झाले म्हणजे मग त्यापुढें सुमारें ६ इंच कपडा नुसता सुटा ठेवितात व या कपड्यास वाळूं देतात. रंग चांगला वाळला म्हणजे या सहा इंच कपड्याच्या खालीं बनातीचें टोंक घालून बनातीचा एक फेरा लपेटून घेतात व मग चालूं यंत्रामध्यें हा रूळ ताम्याच्या रुळावर ठेवून साचा हळू हळू चालवून बनात त्यावर जास्त गुंडाळीत जातात. बनातीचा पहिला फेरा सरासरी चार वाराच्या तुकड्याचा घेतात व मग त्याच्यावर दोन दोन वाराचे तुकडे गुंडाळतात. अशा रीतीनें त्याची जाडी ९ इंचाची करतात. चालू केल्यावर साच्यामध्यें बनात खराब झाल्यास वरचा एक तुकडा काढून त्या जागीं दुसरा एक नवा तुकडा गुंडाळतात. आतां या टाकीबद्दल एकच गोष्ट सांगावयाची राहिली ती ही कीं, साचा चालू असतां कांजी चांगलीच गरम म्हणजे उकळती राहिली पाहिजे व यासाठीं या टाकीमध्यें वाफेचा नळ बसवितात कांजी उकळती असली म्हणजे ती सुताच्या पोटांत भिनते. ही एक गोष्ट जर उपयोगांत आणली नाहीं, तर सूत विणण्याच्या कामास निरुपयोगी होईल, इतकी ही गोष्ट महत्त्वाची आहे. टाकीच्या आंत जी नळी असते ती ताम्याची असते व बाहेरून तिला लोखंडी नळी जोडतात. आंतल्या ताम्याच्या नळीला सुमारें तीन तीन इंचांच्या अंतरानें बारीक भोकें पाडलेलीं असतात. वाफ सोडली म्हणजे या भोकांवाटें बाहेर पडून ती कांजींत मिसळते व त्यायोगें कांजी गरम होत असल्यामुळें गरम होतांना ती आटून कमी होत नाहीं. केव्हांहि पाजण सुरू करण्याच्या पूर्वी मात्र आधीं वाफेच्या नळांतलें पाणी नीट काढून टाकावें लागतें व मग वाफ कांजीच्या टाकींत सोडावी लागते; नाहींपेक्षां वाफेचें पाणी कांजींत शिरून कांजी पाहिजे त्यापेक्षां पातळ होते. त्याच प्रमाणें सकाळीं आल्याबरोबर कांजी गरम करून त्यांतली पाच सात बादल्या कांजी काढून तेवढीच त्यांत नवी कांजी घालावी व मग काम सुरू करावें म्हणजे बीम वजनाला हलकें येत नाहीं. वरती स्क्वीझिंग रोलर्स असतात म्हणून सांगितलें त्याच्या वरचा बनातीचा एक तुकडा रोज संध्याकाळीं काम बंद केलें म्हणजे काढून पाण्यांत भिजत घालावा व सकाळीं त्यांतील पाणी नीट पिळून मग तो त्या रुळावर गुंडाळावा. ही बनात गुंडाळतेवेळीं त्या रुळावरील बनातीच्या वरचा थर थोडें पाणी घालून भिजविण्याची चाल आहे. यायोगें वर लाविलेल्या बनातींत नरमपणा राहून कांजी कमी पिळून निघते म्हणजे सुतावर कांजी जास्त बसते. व बनात धुतल्याच्या योगें जास्त टिकते. असें न केल्यास बीम हलकें येऊं लागतें व हलकें बीम आलें कीं बनात नवी लावावी लागून शिवाय बनातीचा खर्च जास्त पडतो. गिरणीच्या कामांत प्रत्येक लहान सहान बाबतींतहि शक्य तेवढी काटकसर करणें हें वरच्या अधिकाऱ्याचें काम आहे. मात्र ही काटकसर फाजील होऊन कामाच्या चांगलेपणास धक्का बसतां कामा नये. साच्याला घालण्याच्या तेलांत पुष्कळ लोकांची काटकसर करण्याची चाल आहे. पण ही नेहमीं घातुक होते. साच्याचे भाग लवकर झिजून साच्याचें आयुष्य कमी होतें. व पुष्कळ वेळा साच्याचे भाग गरम होऊन आग लागण्याचाहि संभव असतो. येथें मुख्य पाजणीच्या यंत्राचें (साइझिंग मशीन) वर्णन संपलें. आतां या यंत्राचे मागें वॉर्पिंगच्या साच्यावरील बिमें ठेवण्याची कील असते तिचें थोडें वर्णन देऊं. ही कील म्हणजे बिमाची बैठक यंत्राबरोबर येते ती. ही बहुधा सहा बिमें ठेवण्याची असते. नेहमीं बहुधा सहा बिमाच्या आंतच काम भागतें. परंतु केव्हां केव्हां सहाच्या जागीं आठ अगर नऊहि बिमें लावावीं लागतात. त्यासाठीं मशीन आणणाराकडून एक लहान तीन बिमापुरती कील मागविली असल्यास बरें, नसलीच तर मग एक लाकडी कील तयार करून घेऊनहि पण काम भागतें. या कीलची रचना अशी असते कीं, एक बीम खालीं बसावें तर त्याच्या मागचें बीम वरच्या बाजूला बसावें. पहिलें, तिसरें व पांचवें बीम खालीं बसलें तर दुसरें, चौथें व सहावें हीं बिमें वर बसतात. हीं बिमें वरखालीं बसविण्यात मुख्य हेतु कमी जागा लागावी हा होय नाहींतर एका ओळींत एका मागें एक बिमें ठेवूनहि काम भागूं शकेल. ही

बिमें अशा रीतीनें कीलवर ठेवितात कीं, पहिलें बीम पुढच्या बाजूनें खालून वर उलगडावें तर दुसरें बीम वरून खालीं व मागून पुढें असें उलगडत जावें. तिसरें बीम पुनः पहिल्या सारखें उलगडतें तर चौथें बीम दुसऱ्या सारखें उलगडतें. त्यायोगें चौथ्या बिमाच्या तारी तिसऱ्या बिमाच्या खालून येऊन पुढें येतल्या म्हणजे चौथ्या व तिसऱ्या दोन्ही बिमाच्या तारी एक जागीं होऊन सारख्या उलगडूं लागतात. या दोन्ही बिमाच्या तारी पुनः दुसऱ्या बिमाच्या वरून येऊन त्या बिमाच्या तारी मिळून पहिल्या बिमाच्या खालून पुढच्या बाजूस येतात व अशा रीतीनें चारी बिमाच्या तारी एका जागीं येऊन त्या सर्व पहिल्या बिमाच्या पुढच्या बाजूनें पुढें येऊन उलगडत असतात. नवीन बिमें कीलवर ठेविलीं म्हणजे पहिल्या बिमाच्या तारींची व दुसऱ्या बिमाच्या तारींची गाठ मारतात. आणि तिसऱ्या बिमाच्या तारींची चौथ्या बिमाच्या तारींशीं गाठ मारतात. या गाठी नेहमीं चार मारण्याची पद्धत आहे. याप्रमाणें वार्पिंगवरून एकंदर तारींचे चार भाग करून पाठविले जातात. त्यामुळें सर्व तारींचा मध्यभाग आपोआप वेगळा होतो. त्या योगें पुढें साइझिंगची फणी भरताना मध्यावरून सुरवात केली म्हणजे अर्ध्या तारी इकडे व अर्ध्या तिकडे अशा सारख्या भरल्या जातात. वर सांगितल्याप्रमाणें गाठी मारून झाल्या म्हणजे एक लांब काठी घेऊन ती दोन माणसें तिसऱ्या व चौथ्या बिमाच्या गाठीवर धरून त्या दोन्ही बिमाच्या तारी खालीं दाबतात व दोन्ही बिमाच्या तारी तिसऱ्या बिमाच्या खालून पुढें वर घेतात व ती काठी त्या तारींसकट पुनः पहिल्या व दुसऱ्या बिमाच्या गाठीवर दाबतात व पहिल्याप्रमाणेंच सर्व तारी पहिल्या बिमाच्या खालून घेऊन पुढच्या बाजूनें वर घेतात त्यायोगें चारी बिमाच्या तारी एकत्र होऊन पुढून उलगडूं लागतात.त्या तारींची पहिल्या तारींचीं जीं शेवटें साच्यावर असतात त्यांच्याशीं गाठ मारून मग यंत्र सुरू करितात सहा बिमें अगर आठ बिमें असलीं तरी कृति हीच करावी लागते. यंत्र चालू केलें म्हणजे गाठी ताण्याच्या रुळाच्या पुढें जाऊं देऊन मग स्क्वीझिंग रोलर्स वर उचललेले असतात ते खालीं ठेवितात व कांजींतील रहाट हा वर घेतलेला असतो तो कांजींत बुडवितात. या वेळीं तो फारच थोडा कांजींत बुडवावा. गाठी आणखी थोड्या पुढें जाऊं देऊन मग रशा टाकण्यास सुरवात करावी. या रशा टाकावयाच्या त्या अशासाठीं कीं, प्रत्येक दोन बिमाच्या तारी एकमेकांपासून वेगळ्या करता याव्या. या रशा टाकून झाल्या व त्या कांजीच्या टाकींतून बाहेर पडल्या म्हणजे इमर्शन रोलर कांजीच्या टाकींत थोडासाच बुडलेला असतो तो जास्त खालीं घ्यावा. ह्या वेळीं सिलिंडर्स गरम केलेले असावेत. मग सिलिंडरमधील वाफ बंद करावी व साइझिंग चालवून सूत सुकूं द्यावें. रशा 'लीज् रॉडस्'च्या जागीं आल्या म्हणजे कांजींतील रूळ वर घेऊन साचा बंद करावा. मग पुढील फणी भरून रशांच्या जागीं लीज रॉडस् टाकून व जितक्या वारावर खूण पाहिजे असेल ( याला कामवाले लाउन असें म्हणतात ) त्या हिशेबानें चक्र लावून कांजीच्या टाकींतील कांजी गरम करून यंत्र सुरू करावें. लीज रॉडस् टाकण्याचा क्रम असा कीं सर्व रशा एके ठिकाणीं असतात व पाहूं गेलें असता एका रशाखालीं दुसरी, तिच्या खालीं तिसरी, तिच्या खालीं चौथी असा क्रम असतो या लीजरॉडसमध्यें टिनरोलरच्या जवळ असणारा लीजरॉड आकारानें मोठा असतो म्हणून सांगितलें हा नेहमीं मधल्या रशी वर टाकावा. पहिल्यानें सर्वांत वरच्या रशीमध्यें लीज रॉड टाकून तो पुढच्या बाजूस ठेवावा. तीनच रशा असल्यास मग खालच्या रशींत रॉड घालून तो त्याच्या मागें ठेवावा व मधल्या रशींत मोठा रॉड घालून तो त्याच्या जागीं ठेवावा चार रशा असल्यास वरच्या दोन रशांत आधीं रॉड घालावा, मग खालच्या रशींत व मग तिसऱ्या रशींत मोठा रॉड घालावा.या ज्या तारी एकाखालीं एक येतात त्या पैकीं कोणत्या बिमाची कोणती तार हें सांगतों.सर्वांत वर असणारी तार पहिल्या बिमाची होय. तिच्या खालीं तिसऱ्या बिमाची येते. तिच्या खालीं पाचव्या बिमाची येते. तिच्या खालीं सहाव्या बिमाची येते. तिच्या खालीं चौथ्या बिमाची येते व तिच्या खालीं दुसऱ्या बिमाची तार येते. याचा उपयोग रंगीत कपडा काढणें असल्यास कोणतें बीम कोठें ठेवावें या बाबतींत होतो.

आता फणी कशी भरतात तें पाहूं. बहुधा फणीला १०० दात असतात. फणी एकदा अगदीं लहान करून पहावी व एकदा मोठी करून पहावी व दोन्ही वेळा एका इंचांत फणीचे दात किती बसतात तें पहावें व दोन्हींच्या मधली संख्या घ्यावी. ही पुष्कळशा फण्यांत सहा ही येते. या संख्येनें जितक्या इंचाचें बीम साइझिंगवर लावावयाचें असेल त्या इंचास गुणावें व त्या संख्येनें एकंदर तारींच्या संख्येस भागावें. जो भागाकार येईल तितक्या तारी प्रत्येक फणीच्या घरांत घालाव्या, हा ठोकताळा झाला. आता साइझिंगचें बीम वजनाला हलकें अगर भारी करणें असल्यास कसें करावें तें पाहूं. इमर्शन रोलर कांजीच्या जितका आंत घ्यावा तितकें बीम भारी येईल व इमर्शन रोलर जितका वर ठेवावा तितकें बीम हलकें येईल. बीम हलकें येत असल्यास स्क्वीझिंगरोलरवर नवीन बनात लावावी भारी येत असल्यास नवी बनात असल्यास ती काढून टाकावी. कांजी पातळ असल्यास बीम हलकें येईल व कांजी घट्ट असल्यास बीम भारी येईल. कांजी घट्ट असून बीम भारी येत असल्यास कांजींत थोडें पाणी घालावें. तसेंच कांजी पातळ असल्यामुळें बीम हलकें येत असल्यास थोडी पातळ कांजी काढून घेऊन नवी घट्ट कांजी घालावी. स्क्वीझिंग रोलरच्या बनातीवर साधा कपडा गुंडाळला असला तरी बीम

थोडें हलकें येतें. या सर्व गोष्टी रोजच्या काम करणाऱ्या नेहमींच्या परिचयातल्या आहेत. व जो थिंमें वजनात बरोबर काढून देईल त्यालाच हुशार सायझर समजतात. आतां कांजी तयार करण्यासंबंधी थोडी माहिती सांगून हें प्रकरण संपवूं.

कांजी तयार करणें.—मिलमधील कांजीचें यंत्र प्रचारांत आल्यापासून कांजीचें एक शास्त्रच बनून बसलें आहे. हातमागवाला सूत विणता येईल अशी पाजण तयार करितो व विणावयास बसतो. येथें ५० टक्के कांजी चढीव, ६० टक्के चढीव, १०० टक्के चढीव, १५० टक्के चढीव व २०० टक्के चढीव अशी चढाओढ होऊन बसली आहे. व त्यासाठीं कांजी बनविण्याचे निरनिराळे पदार्थ शोधणें व निरनिराळ्या कृती शोधून काढणें असे शोध नित्य चालू आहेत. कांजी बनविण्याच्या जिनसाचें पुढीलप्रमाणें भाग करितां येतील:—

( १ ) कांजीमध्यें चिकटपणा देणारे.—या सदराखालीं इंग्रजींत ज्याला स्टार्च म्हणतात म्हणजे धान्याचें सत्व अशा तऱ्हेचे पदार्थ येतात. २ कांजीमध्यें नरमपणा आणणारे, या सदराखालीं चरबी वगैरे जिनस येतात. ३ कांजीमध्यें वजन देणारे, या सदराखालीं चायनाक्लेसारखे जिन्नस येतात ४ इंग्रजींत ज्याला अँटिसेप्टिक म्हणतात ते म्हणजे कापडावर खळ चढविल्यानंतर त्यावर बुरशी येऊं नये यासाठीं वापरावयाचे जिन्नस. या चार सदराखालीं कांजीमध्यें घातले जाणारे सर्व जिन्नस येतात.

*या विषयावर इंग्रजींत स्वतंत्र ग्रंथ आहेत.* पण आपणाला नेहमींच्या प्रचारात काय आहे येवढेंच येथें पहाणें आहे. १ कांजीमध्यें चिकटपणा देणारे पदार्थ या सदराखालीं पुढील जिन्नस येतात:—गव्हाचें सपीठ, फरीना ( बटाट्याचें सत्व ) सॅगो फ्लोअर ( साबूदाण्याचें पीठ ), मेझ स्टार्च ( मक्यासारख्या एका धान्याचें सत्व ), साइझिंग कॉंपोझिशन ( हा एक चिकट पदार्थ फरीन्यापासून तयार करितात. ) वरील *सर्व जिन्नस नेहमींच्या उपयोगांत आहेत. त्यांपैकीं गव्हाचें* पीठ वापरतांना तें आधीं भिजवून ठेवून मग वापरावें लागतें. यासाठीं लांकडाच्या टाक्या बनविलेल्या असतात. सरासरी ४ फूट लांब, ४ फूट रुंद व ४ फूट खोल येवढ्या टाकीमध्यें गव्हाच्या पिठाचीं आठ पोतीं मावतात. हें पीठ कमींतकमी १५ दिवस तरी भिजावें म्हणजे त्यांत आंबूसपणा उत्पन्न होतो व तें फुगून वर येतें. इंग्रजींत या कृतीला फरमेंटेशन म्हणतात. *या योगें गव्हाच्या* पिठाचे सर्व बारीक कण फुगून त्यायोगें ते जास्त चिकटपणा देतात. हें पीठ भिजविण्याची कृति पुढीलप्रमाणें आहे. टाकीच्या प्रमाणानें जितके थैले टाकींत भिजत घालावयाचे असतील त्याच्या निमे थैले *पहिल्या दिवशीं घालावे. टाकीच्या एकद्वितीयांश* उंचीइतकें पाणी आधीं घ्यावें व त्यात १० पौंडापर्यंत क्षिक टाकून मग त्यात पिठाचे थैले टाकण्यास सुरवात करावी. या टाकींत एक पंखा सतत फिरत रहावा. पीठ अशा तऱ्हेनें



फसरून थोडें थोडें टाकावें कीं त्याचा एकत्र ठिकाणीं गोळा होऊं देऊं नये. आधीं एक थैला टाकावा मग मध्यें तासभर जाऊं देऊन मग दुसरा थैला टाकावा. अशा रीतीनें दिवसभरात ते थैले टाकावे. एकंदर आठ थैले टाकावयाचे टाकींत पहिले दिवशीं चार, दुसऱ्या दिवशीं दोन, तिसऱ्या दिवशीं एक व चौथ्या दिवशीं एक या प्रमाणात आठ थैले टाकावेत. मोठी टांकी बहुधा सोळा थैल्याच्यापेक्षा मोठी असत नाहीं. पहिले चार थैले टाकून झाल्यावर मग पुढील थैले टाकताना पंखा फिरूं शकेल अशा बेतानें थोडें थोडें पाणी घेत जावें. ४८ इंच उंचीच्या टाकींत, सर्व थैले टाकून झाले म्हणजे ४० इंच पाणी व आंब मिळून उंची करावी म्हणजे पंखा फिरताना पीठ वर उडत नाहीं. खळ वापरण्याच्या पूर्वी टाकींत आणखी ४ इंच पाणी घेऊन ४४ इंच करावें म्हणजे प्रत्येक थैल्यामागें ५ इंच उंची वापरण्यास येते व शेवटीं ४ इंच पीठ टाकींत रहातें हें चार इंच पीठ टाकींत नेहमींच राहूं देऊन पुन्हा तींत नवीन पीठ घालावें. *फरीना सॅगो हे वापरताना अयत्या वेळीं पाण्यात* कालवून कांजींत घालतात. साइझिंग कॉम्पोझिशन वापरणें झाल्यास ज्या टाकींत चायना क्ले शिजवितात त्या टाकींत आधीं थोडें पाणी घेऊन त्यात साइझिंग कॉम्पोझिशन घालून अर्धापाऊण तास शिजवावें.

(२) कांजीमध्यें नरमपणा आणणारे पदार्थ:—चरबी(टॅलो), मेण, एरंडेल तेल, खोबरेल तेल, सॉफ्ट सोप, पामीन, मॅग्निशिअम् क्लोराइड इत्यादि पदार्थ येतात. चरबी व एरंडेल तेल पुष्कळ लोक वापरतात. खोबरेल तेल महाग असल्यामुळें कोणी वापरीत नाहीं. मेण प्याराफिन वॅक्स म्हणून असतें तें अलीकडे फार वापरतात. सॉफ्ट सोप शिजवितांना जास्त वाफ झाल्यास उतू जातो म्हणून तो क्वचित कोणी वापरतात. *पामीन वगैरे नावाखालीं अलीकडे बऱ्याच* जिनसा प्रचारात आल्या आहेत. पण त्यात मूळ द्रव्य तेल *असतें. त्यामुळें ते कोणी वापरीत नाहींत.* असले जिन्नस वापरणाऱ्यास जिन्नस बनविणाराकडून पुष्कळ वेळा भरपूर कमिशन मिळतें. मॅग्निशिअम् क्लोराइड हा खार आहे. याला कामवाले लोक थंडा खार म्हणतात. याच्यामध्यें हवेंतील पाणी शोषून घेण्याची फार मोठी शक्ति आहे. व त्या योगें याचा कांजीच्या कामात विशेष उपयोग होतो. हा खार जास्त प्रमाणात वापरून त्यापासून कापडाचें वजन वाढविण्याच्या कामात याचा उपयोग होऊं लागला आहे. मात्र हा खार वापरला असता हवेंत पाणी असलें पाहिजे तर हा तें शोषून घेईल. यासाठीं हवेंत पाणी सोडून हवा थंड करण्याचे पुष्कळ प्रकार प्रचारात आले आहेत.

(३) कांजींत वजन वाढविणारे या सदराखालीं चायना क्ले नावाची माती येते. ही विलायतेंत जमिनीच्या पोटात सांपडते. अलीकडे अहमदाबादेकडेहि हिच्या खाणी सांपडल्या

आहेत. ह्या जिनस वापरतांना येवढेच पहावयाचें कीं यांत रेतीचा अंश कमी असावा. याचा लहानसा . खडा तोंडात टाकून लाळेवरोबर विरघळूं दिल्यास रेती असल्यास आपो-आप समजून येते. अगर पाण्यात कालविल्यास जास्त पाणी घालून पातळ केलें असता रेती बुडीं रहाते. वर सांगित-लेल्या मॅग्निशियम क्लोराइड पाराचाहि समावेश या सदरात होईल.

(४) ॲन्टिसेप्टिकः-या सदराखालीं क्लोराइड ऑफ झिंक हा पदार्थ मुख्यत्वेंकरून येतो. कॉस्टिक सोडाहि याच सदरा-खालीं येतो. त्याचा उपयोग थोड्या ठिकाणीं होतो. आता हे पदार्थ मिळून कांजी कशी तयार करितात तें पाहू. कांजी तयार करण्यास मुख्यतः तीन टाक्या लागतात. एकामध्यें चायना क्ले शिजवितात ती, एकीमध्यें गव्हाचें सपीठ भिजत घालतात ती व तिसरी जींत कांजी शिजवून तयार करावयाची ती. कांजी शिजविण्याची टाकी निदान जमानीपासून सात आठ फुटाच्या उंचीवर बसविलेली असते. व जीमध्यें चायनाक्ले शिजवितात ती याच्याहीवर ७-८ फुटावर या वरील टाकीच्या डोक्यावर बसविण्याची योजना केलेली असते. म्हणजे शिजविलेला चायना क्ले सहजीं या खालच्या टाकींत नळ उघडल्यावरोबर पडावा. पिठाच्या टाक्याहि या चायनाक्लेच्या टाकीच्या उंचीलाच बसविलेल्या असल्या म्हणजे ठीक म्हणजे पीठ घेताना आपोआप नळ उघडल्यावरोबर टाकींत पीठ पडूं शकेल. ज्या ठिकाणीं पिठाची टाकी कांजीच्या टाकीच्याच उंचीवर असते. त्या ठिकाणीं पीठ या टाकींत पडावें म्हणून पिठाच्या टाकीला एक पंप लावलेला असतो परंतु वर दिलेली पहिली योज-नाच बरी. तयार कांजी साइझिंग मशीनमध्यें पडण्यासाठींहि असाच नळ लावून योजना केलेली असते. कांहीं ठिकाणीं बादल्या भरून हातानें कांजी टाकण्याची रीत आहे. कांहीं ठिकाणीं कांजीच्या टाकीलाहि पंप लावून त्या पंपाच्या योगें कांजी साइझिंगच्या टाकींत येऊन पडावी अशी योजना केलेली असते. चायनाक्लेच्या टाकींत साईझिंग काम्पौंझिशन वापरीत असल्यास तें आधीं शिजवून घ्यावें. नंतर त्यात चायनाक्ले घालावा व पुनः शिजवावें चायनाक्ले सरासरी दोन तास शिजवावा. नंतर त्यात चरबी, मेण, तेल वगैरे जे कांहीं जिनस घालावयाचे असतील ते घालवेत व सुमारें एक तास शिजवावें. या योगंकरून सर्व जिनस एकरस होऊन त्याला पांढरा सफेत रंग येतो. नंतर पंखा चालू ठेवून स्टीम बंद करावी. ज्या टाकींत तयार कांजी शिजवावयाची असेल तिच्यांत गव्हाचा आटा (चांगला भिजवून फरमेंट झालेला ) जितका घेणें असेल तेवढा घ्यावा. तीमध्यें वरील टाकींत शिजलेले चायनाक्ले चरबी वगैरेंचे मिश्रण सोडावें. नंतर त्यात क्लोराइड ऑफ मॅग्निशिया व क्लोराइड ऑफ झिंक हे घालवेत. तसेंच सॅगोफ्लोअर व यापैकीं जें घालणें असेल तें घालावें. हें सुसतें पाण्यात कालवून घालावयाचे असतात. व नंतर त्यात निळा रंग घालावा. हा "सोल्युबल ब्लू' म्हणून विरघळ-णारा निळा रंग मिळतो तो वापरतात. त्या योगें करून कांजीला सफेतपणा येऊन साइझ झालेल्या सुताला देखील सफेतपणा येतो व कापडहि त्यामुळें सफेत दिसतें. ब्लू रंग टाकून झाला म्हणजे एकंदर मिश्रण किती इंच करावयाचें तें टाकीच्या प्रमाणानें ठरलेलें असतें. ते एक इंचाच्या खुणा केलेली काठी असते, तिनें मापून पाहून जर कमी असेल तर आणखी पाणी घेऊन तेवढे इंच उंचीवरो-बर करून मग कांजींत स्टीम सोडून शिजवावी. हें शिजवि-ण्याचें प्रमाणहि प्रत्येक वीव्हिंग मास्तरचें निराळें असतें. कोणी थर्मामिटर हातात घेऊन त्यानें कांजीची उष्णता पहातो; कोणी त्या बरोबरच तिची जाडी ( ट्वाडल पहातो. दुसरी एक पद्धत अशी आहे कीं, कांजी आधीं एकदम पक्व शिजवावयाची व मग पंखा बंद झाला म्हणजे पट्टा अर्धा-फास्ट व अर्धा लूज पुलीवर ठेवावयाचा व कांजींत थोडीशी स्टीम ठेवावयाची याच्या योगें कांजी हळू हळू पातळ होऊन पंखा आत फिरूं लागतो. पंखा फिरूं लागला कीं स्टीम बंद करावयाची. ही पूर्ण शिजविलेली कांजी होय. कोणी वरील टाकींत कांजी अर्धवटच शिजवितात व मग ती पुढें कांजीच्या टाकींत मध्यें जो पडदा असतो म्हणून वर सांगितलें त्याच्या बाजूच्या लहान टाकींत ती कांजी घ्यावयाची व तेथें स्टीम ठेवून तेथें ती शिजवावयाची.या पार्टिशनला म्हणजे पडद्याला बुडाला भोकें असतात त्यातून कांजी दुसऱ्या बाजूला येत असते. कांजीमध्यें तीन प्रकार आहेत. लाइट साईझ, मीडियम साईझ व हेवी साईझ. ही वर सांगितलेली कांजी अर्धवट शिजविण्याची पद्धति पहिल्या तऱ्हेच्या व दुसऱ्या तऱ्हेच्या कांजीला ठीक पडेल.पण ही हेवी साइझिंगला उपयोगी नाहीं. निदान तसा अनुभव नाहीं असें लेख-कांचें मत आहे. पण हें मत प्रत्येक वीव्हिंग मास्तर आप आपल्या अनुभवावर बनवीत असतो. तेव्हा चांगली अगर वाईट न म्हणता दोन पद्धती आहेत असें म्हणणें हेंच बरें. लाइट साइझ म्हणजे ५ टक्क्यापासून १५ टक्क्या-पर्यंत, मध्यम साईज म्हणजे २० टक्क्यापासून४० टक्क्या-पर्यंत व हेवी साईझ म्हणजे ५० टक्क्यापासून वर. याशिवाय प्युअर साईझ म्हणून आहे ती लाइट साईझच्याच वर्गांत येतें म्हणजे पाच टक्क्यापासून पंधरा टक्क्यापर्यंत ही चढवि-तात. ही धुवट मालाला व रंगीत मालाला वापरतात. हिनें सुताला ताकत चांगली येते. हिच्यामध्यें फक्त सॅगो फ्लोअर व चरबी आणि कॉस्टिक सोडा येवढेच जिनस असतात. त्यांचें साधारण प्रमाण पुढीलप्रमाणें आहेः—१००रत्तल सॅगो, १ रत्तल कॉस्टिक सोडा व ५ पौंडापासून १० पौंडापर्यंत चरबी. आपणाला जेवढी जाडी पाहिजे असेल त्या प्रमाणात पाणी घ्यावें कांजीच्या प्रमाणाविषयीं प्रत्येक ग्रंथकारानें हेंच म्हट-लेलें आहे कीं प्रत्येक कारखान्यातील कांजीचें प्रमाण निराळें

असतें. तेव्हां ज्याला जें अनुभवानें आवडेल तें त्यानें वापरावें. हें स्वयंपाक करण्याप्रमाणें आहे. मुख्य तत्त्व कापड विणतांना सूत तुटूं नये. चढविलेली कांजी सुतावर रहावी, गळून पडूं नये. त्याला ड्रेसिंग म्हणतात. कापडावर कांजी सारख्याप्रमाणें न दिसतां ती कापडाच्या अंगात भिनून जावी म्हणजे कापडावर खुमास चांगली येते. याला फच्दर म्हणतात. आतां कांजीचीं प्रमाणें दोनचार सांगून हें प्रकरण संपवूं.

लाइट साइझ ( पातळ कांजी. )

| मिश्रण नं. १ | मिश्रण नं. २. |
|---|---|
| १०० पौंड गव्हाचा आटा | ५० पौंड सॅगो फ्लोअर |
| ५ „ चरबी | ५० „ फरीना |
| | १० „ चरबी |

मिडिअम साइझ ( मध्यम कांजी. )

| | |
|---|---|
| १०० पौंड गव्हाचा आटा | मिश्रण नं. ३ |
| ५० „ चायनाक्ले | |
| २० „ चरबी | |
| २५ „ क्लोराइड ऑफ मॅग्निशिया | |
| ५ „ झिंक क्लोराइड | |
| २ „ पेनिवेट ब्लू | |

हेवी साइझ ( भारी कांजी. )

| | |
|---|---|
| १०० पौंड गव्हाचें पीठ | मिश्रण नं. ४. |
| १२५ „ चायनाक्ले | |
| १५ „ साइझिंग कॉम्पोझिशन | |
| ६० „ चरबी | |
| ६० „ मॅग्निशिया क्लो. | |
| १० „ झिंक क्लो. | |
| ३ „ पेनिवेट ब्लू रंग | |

पाण्याचें प्रमाण टाकीच्या आकारावर, कांजीच्या जाडीवर व किती परसेंटेज चढवावयाचें त्यावर अवलंबून राहील. नेहमीं काम करणाराला हें तेव्हांच समजतें.

*खडीचा माती ( फुलर्स अर्थ )*—ही हिरव्या रंगाची माती आहे. ती वाळल्यावर तिचा रंग फिकट होतो. कापडाला खळ लावण्यापूर्वीं, कापडावरील तलकटपणा काढून टाकण्याकरितां हिचा उपयोग करीत असत व कोठें कोठें अजूनहि करतात. ही विशेष चिकट नसते. हिची सुकी मुष्टी जिभेवर टाकल्यास ती चिकटते. पाण्यात घालताच हिचे बारीक तुकडे होतात. हे वाळूचे गुणधर्म पुष्कळ प्रकारच्या मातींत आढळतात. परंतु स्निग्धपणा काढून टाकण्याचा गुण याच मातींत आढळतो. हिचें वि गु. १.७ते २.४ पर्यंत असतें. हिची जमिनीवर ओढलेली रेघ चकाकते. ही हातास स्निग्ध लागते. हिच्या रासायनिक पृथक्करणावरून असें दिसतें की, स्निग्धपणा काढून टाकण्याचा गुण हा तिचा सच्छिद्रपणा व थोडासा चिकटपणा यावरच अवलंबून आहे. हिचें पृथक्करण केलें असतां अनेक प्राणिद्रव्यें तींत सांपडतात

खडीचा माती पृथ्वीवर पुष्कळ ठिकाणीं सांपडते. विशेषत. इंग्लंड व अमेरिकेंत ही पुष्कळ सांपडते कॅरोलिना येथें सांपडते ही माती यंत्रानें किंवा कुदळीनें खणून सुकवितात काहीं ठिकाणीं तिची वाळल्यानंतर पूड करतात मग ती पाण्यात घालून त्यांतील जाडीभरडी माती काढून टाकतात. म्हणजे खडीच्या मऊ मातीची चिखल बनते. ही चिखल साफ केलेल्या जमिनीवर पसरून वाळवितात. मग त्याचे तुकडे करून परदेशीं पाठवितात. सध्या कापडाला व लोकरीला खळ देण्याकरिता हिचा आजकाल फार उपयोग करीत नाहींत. परंतु खनिज तेलें गाळण्याकरिता व वनस्पतिजन्य तेलांना ओप आणण्याकरिता हिचा आजकाल फार उपयोग होतो. साबण करण्याकरिता व भांडीं साफ करण्याकरितांहि हिचा उपयोग होतो काहीं ठिकाणीं विटा व गिलावा करण्याकरिता हिचा उपयोग करतात.

*खाकी*—हा उत्तर हिंदुस्थानातील एक वैष्णव पंथ आहे. रामानंदाचा शिष्य अनंतानंद, त्याचा शिष्य कृष्णदास पयअहारी, त्याचा शिष्य कीलद, यानें या पंथाची १६ व्या शतकांत स्थापना केली असें म्हणतात खाकी हें नांव फारशी ' खाक '(खाक) = राख या शब्दापासून बनलें आहे रामचंद्र वनाला जाण्याच्या वेळीं लक्ष्मणानें दुःखी होऊन अंगाला राख फासली व म्हणून त्याला 'खाकी' हें नांव पडलें; त्याच्या अनुयायांनीं हेंच नांव धारण केलें व तेव्हांपासून हा पंथ अस्तित्वांत आहे असें कोणी म्हणतात. या लोकांचें आदिपीठ अयोध्येला असून नवाब सुजाउद्दौल्याच्या कारकीर्दीत तेथें चित्रकूट( बुंदेलखंड )च्या कोणी दयाराम नावाच्या पुरुषानें यांचा एक आखाडा स्थापिला. १९०५ सालीं या आखाड्यांत १८० लोक असून त्यांपैकीं ५० स्थानिक होते. त्या वेळचा महंत संस्थापकापासून ओळीनें आलेला अकरावा गुरु होता. याच शहरातील हनुमानगढीच्या देवळाच पुजारीपण खाकी वैराग्याकडे असतें दुसरा एक आखाडा रेवाकांठा संस्थानात लुनावाडा येथें आहे. त्याचें नांव ' नाथबावानो अखाडो ' असें असून त्याची त्या ठिकाणीं बरीच प्रसिद्धि आहे. याची अहमदाबादेस ' नीळकंठनो अखाडो ' नावाची एक मोठी शाखा आहे. हे मुख्यत. रामभक्त असतात. तथापि भस्म लावणें, जटा राखणें, दिगंबर रहाणें, आपल्या संस्थापकाच्या गादीला 'समाध' अशी संज्ञा योजणें, यासारख्या बाबतींत शैवाचार पाळीत असल्याचें दिसून येतें. जे एका जागींच रहातात ते बहुधा इतर वैष्णवांप्रमाणें पोषाख करतात, पण सदोदित भटकणारे खाकी नग्न, पुष्कळ वेळां कमरेभोंवतीं जाड काळा दोरा बांधून व अंगाला राखमाती फासून फिरतात [ रिलिजिअस सेक्टस ऑफ दि हिंदूज शेरिंग-हिंदू ट्राइब्स अँड कास्टस ३ ( कलकत्ता १८८१. ) ]

*खागा*—संयुक्त प्रांत. फत्तेपूर जिल्ह्यातील पूर्व तहशील. क्षेत्रफळ ४८४ चौ. मै. लो. सं ( १९११ ) २,२३,१७७.

हींत एक शहर (विशालपुरा) व ४९२ गांवें आहेत. उत्पन्न ४॥ लाखांवर आहे. तहशिलीच्या उत्तर व दक्षिण बाजूस गंगा व यमुना वहातात. पण त्यांच्याशेजारील जमीन पिकांना निरुपयोगी ठरते. तहशिलीचा मध्य भाग फार सुपीक आहे

खाचरोद—मध्यहिंदुस्थान. ग्वाल्हेर संस्थानच्या उज्जन जिल्ह्यातील एक शहर. उ. अ. २३° २६' व पू रे. ७५° २०'. लो सं. १९११मध्यें ६४९६ व १९०१साली ५१८६ होती. बॉंबे-बरोडा रेल्वेच्या रतलाम-गोधा फांट्यावरचें हें स्टेशन असून समुद्रसपाटीपासून १७०० फूट वर आहे उज्जन सरकारातील एका महालाचें मुख्य ठिकाण म्हणून ऐने इ-अकबरींत याचा उद्देश आहे. रेल्वेमुळें याचें महत्त्व वाढत आहे. रंगीत लाकूडकाम व तंबाखू याविषयीं खाचरोद गांव प्रसिद्ध आहे.

खाटिक—यांची वस्ती संयुक्तप्रांतात सुमारें दोन लक्ष आहे. खट्टिक या संस्कृत शब्दावरून खाटिक हा शब्द झालेला असून त्याचा अर्थ कसाई अथवा व्याध असा आहे. शेती करणारी, मजुरी करणारी व भाज्या विकणारी ही एक जात आहे. हिचा पासी नावाच्या जातीशी निकट संबंध असूनहि त्यांची एक पोटजात आहे असेंहि म्हणतात. अयोध्यावासी, सहार बकरकसाब, चलनमहाराव व पोरचराव अशा यांच्या मुख्य पोटजाती आहेत. यांपैकीं बकरकसाब अथवा कसाई हे मांस विक्रयाचें काम करतात. चलन महाराव हे कातड्याचें काम करतात व पोरचराओ, हे पेशेदार असतात.

खानेसुमारीच्या एकंदर अहवालावरून पहातां ८१६ हिंदूंच्या व सात मुसलमानांच्या अशा खाटिक जातीच्या पोटविभागांची संख्या आहे त्यांपैकीं बहुतेक स्थानिक आहेत. एखाद कुटुंबाशीं चार पिढ्यापर्यंत अंतर्विवाह करण्याची चाल नाहीं. लग्नसंबंध जुळवून आणण्याच्या वेळीं, दुसरा पशु धंदा करणारे कसाई, चांभार, किंवा खताची गाडी हाकणारा असल्यास ही गोष्ट गौण मानली जाते. त्यांची पंचायत असून तिचा मुख्य असा एक चौधरी असतो. पंचायतीत अपराध्यास शासन करून दंड करण्यात येतो. विधवेस दिराशीं विवाह करण्याची मोकळीक आहे. परंतु सक्ती नाहीं. विधवाविवाह या जातींत रूढ आहे. लग्न ठरवितांना उभय पक्ष मद्यपान करितात. मिरवणूक, कलशपूजा, यांचे पाय धुणें व सीमान्त पूजन वगैरे समारंभ करण्यांत येतात. बराखीर ही मुख्य देवता असून जौनपूर हें तिचें स्थान आहे. हा बराखीर अहीर जातीचा होता. व मुसुलमानी धर्मांत जाण्याचे नाकारल्यानें प्राणदान पतकरला असें मानतात. जौनपुरच्या काजी पारख्यात व अन्यत्र बराखोट व दार मोठ्या थाटानें नवें मिळाली आहेत असें सांगतात. बामद, बामण अथवा ब्राह्मण नांवाच्या देवाची हि पूजा हे करितात. त्यांना बकरीं व मद्य नैवेद्यांत अर्पण्यात येतें. कित्येक भवानीची पूजा करितात व शितला नांवाच्या शक्तीला भजतात.

देवीची सांथ उद्भवतांच सीतळा माईला पुजितात. चैत्र नवरात्राच्यावेळीं भवानीची पूजा करून तिला डुकरपुरी व हलवा अर्पिण्यात येतो. गंगा, देवी व अमरोहाचा मिरान साहेब यांना खाटिक लोक अत्यंत पूज्य मानतात.

स्त्रिया बाहूवर गोंदून घेतात त्या नथ आणि चुडे घालीत नाहींत. तरीपण कानांतील अलंकार, कांकणें व मळ इत्यादि अलंकार त्या वापरतात. चांभार, डोम, धारकर, मुसाहर, पासी व धोबी यांच्या हातच्या अन्नास ते स्पर्श करीत नाहींत. नाओबारी व अहीर यांनीं स्पर्श केलेलें अन्न त्यास चालतें. त्यांचा मुख्य धंदा म्हणजे डुकरांची खरेदी विक्री करणें व कोहरी लोकांपासून खरेदी केलेलीं फळें विकणें हा असतो. एकंदरींत हे लोक फार निरुपद्रवी व सुस्वभावी आहेत.

मध्यप्रांतात सुमारें १३००० खाटिकांची वस्ती आहे. हे मांस विक्रय करितात. मराठी जिल्ह्यात वऱ्हाडी व झाडीतील असे खाटिकांत दोन भेद आहेत. जबलपुराकडे डुकरें पाळणाऱ्यांस हलके समजून त्यांस लेंडा म्हणतात. एकाच आडनावाच्या लोकांत लग्नव्यवहार होत नाहींत. यांच्यात देवकेंहि आहेत. वर लहान निघाला म्हणजे त्याची आई त्यास स्तनपान करविते. उच्च जातीशीं व्यभिचारापासून झालेल्या संततीस जातींत घेतात नीच जातींची संतति घेत नाहींत. विजातीय रखेली ठेवणारास जातीबाहेर टाकतात.

काश्मीर व पंजाबातहि हिंदु व मुसुलमान खाटीक असून हिंदु डुकरें पाळतात व मुसुलमान कातडीं कमावितात. ('कसाई' पहा) [कृ; रसेल व हिरालाल, सेन्सस रिपोर्ट].

खांडववन-वनविशेष हें अर्जुनानें अग्नीस भक्षणार्थ दिलें होतें. हें जळत असतां तक्षकाचा पुत्र अश्वसेन त्यांतून कसा तरी वांचला. मयासुर शरण येऊन वांचला व शार्ङ्ग पक्ष्याचीं चार पाळकें अग्नीनें वांचविलीं. (भार. आदि. अ. २२४). हें वन कोठें असावें याविषयीं तर्क पुष्कळ आहेत. हें यमुनेच्या तीरावर असून पांडवांनीं या वनांत इंद्रप्रस्थनगर वसविलें असें भारतावरून दिसतें.

व्युत्पत्तीवरून प्रत्येक ठिकाणचा छडा लावूं पाहणाऱ्यांनीं या विषयीं खालील विचार व्यक्त केले आहेत.

सध्या हिंदुस्थानच्या पूर्वेकडील देशांत खांड म्हणून लोक आहेत. त्यांचें पूर्वीचें म्हणजे भारतकालीं तरी खांडव असें नांव असावें. या खांडववनांत सध्याचें खांडवा शहर आहे. भीमाशंकराच्या पायथ्याशीं वायव्यकोणांत कर्मलपासून सहा कोसांवर खेड म्हणून गांव आहे. तेथें सध्यां कोळी उर्फ कोळ लोक रहातात. या कोळ लोकांच्या प्रदेशाला 'कोळवन' म्हणतात. कोळावरून जसें कोळवन तसें गोंडावरून 'गोंडवन'. कोळवन, गोंडवन व खांडवन अशीं वनशब्दान्त नामें हीं कोळ, गोंड व खांड लोकांच्या प्रदेशाला फार पुरातन कालापासून असलेलीं दिसतात.

वह उत्तरपद लागून खांडवह त्यानें प्राकृत खांडवा (ग्रामनाम) मत्स्यपुराणहन्ताच (४ २-१२२) मुद्दा सैंधवा, हीं रूपें हि अशाच सादृश्याचीं होत (भा इ सं म १८३२)

तथापि खांडव व खांडव यांचें ऐक्य सिद्ध करू पहाणारें हें सर्व विवेचन स्थलनिर्णायक होत नाहीं. खांडाची वस्ती अनेक ठिकाणीं अनेक काळीं असावी. एखादा पुरावा वरील विवेचन देईल पण त्यापैकीं अर्जुनकालीन खांडव स्थान हें कळण्याजोगें नाहीं

खांडवा, त हू शी ल—मध्यप्रांतातील निमार जिल्ह्याच्या वायव्य भागातील एक तहशील या तहशिलीचें क्षेत्रफळ १९११ सालीं १८७१ चौ मै होतें लोकसंख्या १८३७४४ होती

या तहशिलींतील मुख्य शहर खांडवा हें होय या तहशिलींत १९११ सालीं ४७३ खेडीं होतीं सरकारच्या ताब्यांत असलेल्या ६७१ चौरस मैलांचा जंगलाचा टापू सोडून देतां १९०३-४ सालीं या तहशिलींत ७१३ चौरस मैल पेरीक जमीन होती १९०३-४ सालीं जमीनीचें उत्पन्न १६७००० रुपये होतें व १८०५० रुपये सरकारी सार्‍याचें उत्पन्न होतें या तहशिलींत उथळ अशी पडीच जमीन असून उत्तरेस व पश्चिमेस बर्‍याच टेकड्या आहेत या तहशिलींतून अजनाळ व सुक्ता या दोन नद्या वहात गेल्या आहेत.

श ह र—खांडवा तहशिलीचें व निमार जिल्ह्याचें मुख्य ठिकाण मुंबईहून हें ३५३ मैल असून या ठिकाणाहून राजपुताना माळवा रेल्वेचा फाटा महूकडे गेला आहे हें शहर समुद्रसपाटीपासून १००७ फूट उंचीवर वसलेलें आहे या शहराच्या आसपास बॅसाल्ट पाषाण मुबलक सांपडतो अर्थात्‌च या ठिकाणीं हाडेखुडपें फारच थोडीं आहेत या शहराची लोकसंख्या इ स १९११ सालीं २११०४ होती

*खांडवा हें पुराणप्रसिद्ध शहर आहे या ठिकाणीं उत्तर हिंदुस्थानांतून व पश्चिम हिंदुस्थानांतून दक्षिणेकडे जाणारे रस्ते मिळाले असल्याकारणानें या ठिकाणाला पूर्वीपासूनच फार महत्त्व आहे टालमी व अलबेरूणी यांनीं याचा आपल्या ग्रंथांत उल्लेख आढळतो १२व्या शतकांत जैनधर्माचें हें केंद्र होतें व या ठिकाणीं जैन शिल्पकलेचे नमुने अद्या*पीहि पहावयास सांपडतात या शहरांत चार मोठे तलाव असून या चारी तलावांना चांगले दगडी घाट बांधलेले आहेत १५१६ मध्यें खांडवा हें माळव्याच्या सुभेदाराचें राजधानीचें शहर होतें असें फेरिस्तानें म्हटलें आहे यशवंतराव होळकरानें १८०२ सालीं हें शहर जाळून टाकलें व १८०८ मध्यें तात्या टोपीनें पुन्हा या शहराच्या बर्‍याच मोठ्या भागाला आग लावून दिली

इ स १८६७ सालीं खांडव्याला स्वतंत्र म्युनिसिपालिटी देण्यांत आली इ स १९०३-४ सालीं या म्युनिसिपालिटीचें उत्पन्न १०७००० रुपये व खर्च १०४०१० रुपये होता या शहराच्या जवळ मोहू घाटाचा तलाव आहे तेथून या शहराला पाण्याचा पुरवठा होतो या ठिकाणीं कापसाची मोठी बाजारपेठ आहे या ठिकाणीं ९ जिन (कापसांतील सरकी काढण्याचें यंत्र) व ५ गठ्ठे करण्याच्या गिरण्या आहेत येथें गांजाचो मोठी पखार आहे खांडवा हें एक रावें विश्रांतिस्थान आहे येथें १९०३-४ सालीं एक हाय स्कूल व सहा प्राथमिक शिक्षणाच्या शाळा होत्या रोमन कॅथॉलिक धर्मोपदेशकांनीं व मेथॉडिस्ट एपिस्कोपल धर्माच्या उपदेशकांनीं या ठिकाणीं शाळा व अनाथगृह स्थापन केलें १९०३ सालीं येथें तीन दवाखाने व एक गुराचा दवाखाना होता

खाडिया—काठेवाड स्वतंत्र खंडणी देणारा एक तालुका यांत खाडिया हें एकच गांव आहे हें झालावाड मध्यें मोइका टप्प्यांत आहे लिमडीच्या आग्नेयेस ८ मैलांवर खाडिया वसलें आहे तालुकदार लिमडीचे भायाद व झाला रजपुतांपैकीं आहेत.

खादिजा—महमदाच्या पहिल्या बायकोचें नांव ती विधवा असून व्यापार करी अपलें उट हांकण्याकरितां म्हणून कांहीं काळ तिनें महमदास आपल्या नोकरींत घेतलें व नंतर त्याच्याशीं लग्न लावलें तिच्यापासून महमदास पुष्कळ मुलें झालीं परंतु तीन कन्यांशिवाय सर्व मुलें अल्पवयांत मरण पावलीं महमदच्या या तिन्ही मुलींपैकीं फातिमेचें लग्न अलीशीं झालें महमदाशीं लग्न झाल्यानंतर खादिजा बावीस वर्षें जगली हिज्री शकाच्या आरंभापूर्वी तीन वर्षे इ स ६१९ ऑगस्टमध्यें ६२ वर्षांची होऊन ती मक्का येथें मरण पावली अलीचा बाप व महमदाचा चुलता अबु तालिब याच्या मरणानंतर तीनच दिवसांनीं खादिजाचा मृत्यु झाला *खादिजाचें थडगें अजून कायम असून यात्रेकरू त्या ठिकाणीं नियमानें जतात हें थडगें एका चौरस भिंतीनें परिवेष्टिलेलें असून थडग्याच्या शिलेशिवाय अद्भुत प्रेक्षणीय* अशी दुसरी वस्तु या ठिकाणीं नाहीं या शिलेवर क्यूफिक लिपीमध्ये सुरत्-अल्-करमी नांवाचें कुराणमधील सर्ग कोरलें आहे

खांदेरी—मुंबई कुलाबा जिल्ह्यांत, अलिबाग तालुक्यांतील एक लहानसें बेट उ अ १८° ४२' आणि पू रे ७२° ४९' कुलाब्याच्या मध्यभूमीपासून हें बेट अडीच मैल दूर असून उंदेरी बेटापासून सव्वा मैलाच्या अंतरावर आहे लोकसंख्या (१९०१) १३० होती खांदेरी बेटाची लांबी सरासरी दीड मैल व रुंदी अर्धा मैल आहे १८६७ सालीं बांधलेलें एक दीपगृह बेटाच्या अत्युच्च भागीं आहे १८ मैल इतक्या अंतरावरून हें दीपगृह दृष्टीस पडतें इ स १६७९ सालीं शिवाजीनें या बेटांत तटबंदीचें काम सुरू करण्याकरितां ३०० शिपाई व तितकेच मजूर लोक पाठविले तत्पूर्वी या बेटांत वस्ती नव्हती परंतु जेव्हां शिवाजीनें तटबंदी करण्यास सुरवात केली असें इंग्लिश व पोर्तुगीज लोकांस सम-

झालें तेव्हां दोघेहि खांदेरी बेटावर आपला हक्क सांगूं लागले इंग्लिशांच्या सरदारानें तें बेट सोडून जाण्याविषयी मराठ्यांस निरोप पाठविला परंतु मराठ्यांनीं त्याला दाद दिली नाहीं. नंतर शिवाजीचा सरदार दौलतखान हा मोठें आरमार घेऊन चौलाहून येत आहे असें वर्तमान इंग्लिशांस कळल्याच त्यांनीं आपलें आरमार वाढविलें इ. स. १६७९ च्या आक्टोबरमध्यें मराठ्यांनीं इंग्रजांचें एक व्यापारी जहाज पकडलें. परंतु पुढें मराठ्यांच्या आरमाराचा पराभव होऊन त्यांचीं कांहीं जहाजें शत्रूंनीं पकडलीं. तथापि खांदेरीच्या तटबंदीस इंग्लिशांकडून कांहींहि अडथळा झाला नाहीं पुढें मोंगलांचा शिद्दी मोठें आरमार घेऊन इंग्लिशांस येऊन मिळाला. परंतु खांदेरी बेट इंग्लिशांस देण्याचा शिद्दीचा बेत नाहीं असें दिसून येताच इंग्लिशांनीं शिद्दीला मदत करण्याचें नाकारलें पुढें शिद्दी व मराठे यांच्यामध्यें युद्ध माजून त्यांच्यामधील झगडा फार वर्षेंपर्यंत चालला होता. इ. स. १७०६ साली मुंबईचा डेप्युटी गव्हर्नर स्ट्रट लिहितो कीं "आंग्र्यानें खांदेरीची तटबंदी बांधली असून आत कांहीं घरें आहेत" इ. स. १७१३ त हा किल्ला शाहूमहाराजांनीं कान्होजी आंग्रे यास दिला. इ. स. १७४० त इंग्लिश व शिद्दी यांच्यांत तह होऊन त्यांत असें ठरलें कीं 'दोघांनीं मिळून खांदेरी किल्ला घ्यावा व शिद्दीनें पुढें तो इंग्लिशांस द्यावा." इ. स. १७७५ त राघोबा दादा व इंग्लिश यांच्यामध्यें सुरतेचा तह झाला, तेव्हां खांदेरी इंग्लिशांस मिळाली. परंतु पुढें लवकरच पुरंदरच्या तहांत तो किल्ला मराठ्यांनीं परत घेतला. १७८७ त किल्ला रघोजी आंग्र्याच्या ताब्यांत होता असा लेख सांपडतो. स. १७९९ च्या सुमारास जयसिंग आंग्र्याची बायको सखूबाई हिनें हा किल्ला घेतला. पुढें दौलतराव शिंद्याच्या सेनापतीनें सखूबाईस असें कळविलें कीं, "तुम्ही हा किल्ला माझ्या स्वाधीन कराल तर मी तुमचे नवऱ्यास बंधमुक्त करतो." परंतु किल्ला हातीं येताच त्यानें जयसिंगास ठार मारलें व सखूबाईस कैदेंत टाकलें. इ. स. १८१३ त मानाजी आंग्र्यानें हा किल्ला पेशव्यांना देऊन टाकला इ. स. १८१८ त पेशव्यांचें राज्य इंग्लिशांनीं खालसा केलें तेव्हां तो इंग्लिशांच्या हातीं आला.

**खान**—मुसुलमानांमधील ही एक बहुमानाची पदवी आहे. मोंगलांमध्यें तुर्कस्तानमधील तातरी भाषेंत, 'खाखान' हा शब्द 'बादशहा' या शब्दाचा वाचक आहे. या खाखानचें खान हें संक्षिप्त स्वरूप आहे. मोंगलांचा मुख्य जो चिंगीझखान हा खान ही पदवी आपल्याला लावून घेत असे. पुढें त्याच्या वंशजांनादि दूरोपर्यंत मोठे खान असें नांव देण्यांत आलें. इतकेंहि स्वतंत्र असा लहान लहान राजांना खान हा शब्द लावण्यांत येतो. उदाहरणार्थ रशियन तुर्कस्तानचे खान. त्याचप्रमाणें तुर्कस्तानचा सुलतान हा देखील खान म्हणून घेतो. इराण तर 'खान' ही पदवी खान व अफगाणिस्तानांतील डोंगरचादि अन्य मुसुलमान गृहस्थाला लावण्यांत येते. हिंदुस्थानांत पठाणांच्या जातींतील प्रत्येकाला खान हा शब्द लावण्यांत येतो. तात्पर्य हल्लीं खान हा शब्द आपल्याकडील श्रीयुत अगर राजमान्य राजश्री अगर इंग्लिश भाषेंतील 'एस्क्वायर' या अर्थी वापरला जात आहे. ब्रिटिश सरकारकडून हल्लीं पारशी अगर मुसुलमान लोकांतील सरकारच्या हितकर्त्या मोठ्या माणसांना खानसाहेब, खानबहादुर अशा पदव्या देण्यांत येतात

**खानखानान**—मीर्झा अब्दुर्रहीम हा बहिरामखानाचा मुलगा व एक दिवाण होता अहमदनगरावर स्वारी केल्यानंतर अकबरानें याची दक्षिणच्या सुभ्यावर नेमणूक केली होती तो दहा वर्षें दक्षिणेंत होता मलिकंबरानें खानखानाचा पाडाव करून अहमदनगर घेतलें तेव्हां हा बऱ्हाणपुरास परत आला दक्षिणचा कारभार याच्या हातून नीट होत नाहीं, हा शत्रूंत सामील होतो अशा प्रकारचे बातमी मंडळ जहांगिरास येऊन त्यानें खानखानाला दक्षिणेंतून परत बोलाविलें. १६२७ त हा लाहोर येथें मरण पावला खानखानान फार विद्वान् असून संस्कृत उत्तम जाणत असे खानखानान या पदवीचा अर्थ श्रेष्ठ खान असा असून ही पदवी पुष्कळ मुसुलमान सरदारांस मिळाली होती.

**खानगड**—पंजाब. मुझफरगड जिल्हा व तहशिलींतील एक शहर. उत्तर अक्षांश २९° ५५' व पूर्व रे. ७१° १०'. मुझफरगड शहरच्या दक्षिणेस ११ मैलावर हें शहर आहे १९११ साली लोकसंख्या २३४९ होती. खानबीबी नामक मुझफरखानाच्या बहिणीनें हें शहर वसविलें शहराचा विस्तार अलीकडे बराच झाला आहे. १८४९ साली हें शहर मुझफरगड जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें. परंतु चेनाबच्या महापुरामुळें शहराचें नुकसान होऊं लागलें म्हणून १८५९ सालीं राजधानी बदलण्यांत आली. १८७३ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. उत्पन्न मुख्यतः म्युनिसिपल करापासून होतें. शहरांत कापसांतील सरकी काढण्याची एक गिरणी आहे.

**खानगा डोग्रान, तहसील.**—पंजाब प्रांत गुजराणवाला जिल्ह्यांतील तहसील उ. अ. ३१°२१' ते ३१°५९' आणि पू. रे. ७३°१८' ते ७४°१'. हिचें क्षेत्रफळ ८७३ चौरस मैल आहे. हाफिजाबाद या आद्य तहसिलींतून इ. १८९३ साली ही तहसील विभागून आली. १९०१ सालीं तहसिलीची लोकसंख्या २,३७,८४२ होती या तहसिलींत ३३९ गावें आहेत. खानगाडोग्रान (लोकसंख्या ३३४९) हें मुख्य शहर आहे १९०३–०४ सालीं जमीनमहसूल ३४१००० रुपये होता तहसिलींतील जमीन चिकण मातीची आहे.

**गांव**—पंजाब प्रांत. गुजराणवाला जिल्ह्यांतील खानगा डोग्रान तहसिलीचें मुख्य ठिकाण. उ. अ. ३१°४९' व पू. रे. ७३°४१'. महंमदी लोकांच्या देवळाकरितां फंड

हापर्यंत या गावांची प्रसिद्धि होती. कारण जून महिन्यांत येथें जत्रा भरते. इ. स. १८१३ साली हें गांव नवीन वसविण्यांत आलेल्या तहशिलीचें मुख्य ठिकाण झालें व तहशिलीचेंच नाव या गांवास देण्यांत आलें. चेनाब कालव्याच्या पाण्यामुळें लागवडीस आलेल्या प्रदेशाच्या मध्यवर्ती भागांत हें गांव असल्यामुळें दिवसें-दिवस गांवास अधिक महत्त्व प्राप्त होत आहे. १८८१ सालची लोकसंख्या ८७७, १८९१ सालची १६४६ व १९०१ साली ५३४९ होती. यावरून लोकसंख्येचें प्रमाण वाढत आहे असें दिसून येईल. येथें एक कापसातून सरकी काढण्याची गिरणी आहे.

खानगी—राजाच्या स्वतःच्या खाजगी कामासाठीं जें खातें असतें त्याला खानगी (खाजगी) खातें म्हणतात. या खात्याकडे मुख्यतः राजाच्या वार्षिक नेमणुकीची व्यवस्था असते. राजाच्या वसनागार, पाकशाळा ( मुदपाकखाना ), आप्तवर्गाचें पालनपोषण, देवधर्म वगैरे निरनिराळ्या कामकाजाचा कारभार हेंच खातें पहातें. अष्टप्रधानांत या खात्याचें काम सचिवाकडे असे. तो आपल्या हाताखालीं खानगी कारभारी नेमी. रामायणांत सुमंत नावाच्या प्रधानाकडे हें काम होतें असें तेथील वर्णनावरून दिसतें. रूलर्स ऑफ बडोदा या पुस्तकांत खंडेराव गायकवाडाच्या कारकीर्दींतील बडोदें राज्याच्या जमाखर्चाचें पत्रक दिलें आहे; त्यांत खानगी खात्याच्या पोटीं पुढील बाबी असलेल्या आहेत. (१) सरकारखर्च (२) आप्तवर्ग (३) हत्तीखाना (४) गाडीखाना (५) अश्वशाळा (६) मर्जींतले लोक व गुप्त सल्लामसलत देणारे लोक (७) नोकरचाकर (८) आप्तवर्गांतील पेनशनर लोक (९) शिपाई प्यादे १० गवळी व गोशाळा ११ ब्राह्मणवर्गाचे व माळी १२ खोटखर्च (राजवाड्याकरतां आणलेल्या कापड वगैरे सामानातील तोटा) (१३) रणवार (१४) नर्तक कंपनी वगैरे (१५) लग्नसमारंभ (१६) फरासखाना (१७) दानधर्म.

*बाराव खानगी खात्याच्या नांवाखालीं राज्यातील उत्पन्नापैकीं बरेंचसें उत्पन्न खर्च पडत असतें. ही रीत एकमुखी राजसत्तेत सर्वत्र प्रचारांत आहे. प्रजासत्ताक राज्यांत अध्यक्षाची अगर प्रतिनिधींची खानगीची नेमणूक लोकसभा ठरवीत असते.* *या रीतीनें प्रजेचा पैसा अनाठायीं* खर्च होत नाहीं. वरील बडोदें येथील जमाखर्चाच्या तक्त्यांत राज्याच्या जमानेदीपैकीं जवळजवळ एक चतुर्थांश रकम खानगी खात्याच्या नांवावर पडलेली आढळते.

खान जहान—हा अकबराच्या वेळीं पंचहजारी असून याला १५७६मध्यें बंगालचा सुभेदार नेमला होता. याचें मूळ नांव हुसेनकुली बेग असून खान जहान ही त्याची पदवी होती. बंगालचा नबाब दाऊदखान यानें अकबराविरुद्ध बंड केल्यामुळें यानें त्याचा पराभव करून व त्याला ठार मारून त्याचें डोकें आग्र्यास अकबराकडे पाठविलें. हा टांडा येथें १५७८ त मेला [बील–ओरिएंटल बायो. डिक्श.].

खान जहान कोकलताश—याचें खरें नांव मीर मलिक हुसेन असें असून हा औरंगझेबाचा दूधभाऊ होता त्यानें याला प्रथम बहादुरखान ही पदवी दिली होती आणि बहादुरखान याच नावानें तो मराठ्यांना माहीत होता. तो आपल्या वेळच्या सर्व सरदारांत स्वतःस श्रेष्ठ समजत असे. तो प्रथम ७०० घोडेस्वारांचा सरदार होता. त्याची बढती होत होत तो १६७४ त सातहजारी बनून त्याला त्या वेळीं खानजहान बहादुर कोकलताश जफरजंग हा किताब मिळाला. याला प्रथम दक्षिणची सुभेदारी १६७० त मिळाली. या वेळीं शिवाजी महाराजांनी थेट औरंगाबाद व नगरपर्यंत स्वारी करून मुसलमानांचा मोड केला होता, म्हणून त्याच्या पारिपत्यास हा मुद्दाम औरंगझेबानें इकडे नेमिला होता. यानें १६७१ च्या उन्हाळ्यात चार महिने साल्हेरीस वेढा दिला, पण किल्ला न पडता उलट याची फजिती होऊन याला परत फिरावें लागलें. त्यामुळें याला औरंगझेबानें परत बोलावून शहाजाद्यास सुभेदार नेमिलें. परंतु त्यानें १६७२ त महाराजांशीं तह केला. त्यानंतर याला पुन्हा सुभेदार केलें व शहाआलमनें केलेला तह मोडून महाराजांशीं युद्ध करण्यास त्यास औरंगझेबानें फर्मावलें, व त्याच्या हाताखालीं सत्तर हजार फौज दिली. तरीहि याच्यानें महाराजांशीं टिकाव धरवेना. तेव्हा यानें त्यांच्याशीं गुप्तपणें तह केला. पुढें १६७६ त यानें विजापुरकराचा हल्ला येथें पराभव करून १६७७ त त्याचें कलबुर्गें घेतलें. नंतर १६७८ त त्याला इकडून दुसरीकडे बदललें. परंतु पुन्हा १६८० त इकडे सुभेदार नेमलें. इकडे येताच पुन्हा तो मराठ्यांच्या खोडीस लागला. यावेळीं संभाजी गादीवर होता. यानें अहिवंतगडास वेढा दिला. परंतु याचा तेथें पराभव झाला. शेवटीं त्यानें मराठ्यांचा नाद अजिबात सोडला आणि भीमाकाठीं पाडेपेडगाव येथें एक भुईकोट किल्ला बांधून त्याचें नाव बहादूरगड ठेवलें व तेथेंच त्यानें आपली कायमची छावणी केली. या ठिकाणीं यापुर्वी चाळीस वर्षें मोंगलांनी छावणी केली होती. पुढें सन. १६८५ त यानें हैद्राबादेवर हल्ला करून तें लुटलें. स. १६९० त जंजिऱ्याचा किल्ला तेथील फत्तेखान सिद्दी आपण होऊन शिवाजी महाराजांना देत होता. पण यानें जंजिरेकरास मदत करून जंजिरा राखला. हा स. १६९७ त मेला. तारीख-ई-आझम या बखरीचा हा कर्ता असावा असें म्हणतात. [ग्रँट डफ, बखरावली, बील–ओरि. बायो. डिक्श.]

खान जहान लोदी—हा मोंगलकालीन अफगाण सरदार दौलतखान लोदीचा मुलगा असून त्याचें मूळचें नांव पीरखान होतें. जहांगीरनें त्याला खानजहान ही पदवी दिली. जहांगीर बादशहाच्या कारकीर्दींत तो लष्करावरचा मोठा अधिकारी असून त्याला ५००० ची मनसबी होती (१६०९). शहाजहान बादशहा गादीवर आला तेव्हा त्यानें माळव्याची सुभेदारी याला देऊं करून दिल्लीस बोलाविलें. त्याला दिल्लीस आपल्या नाशाविषयीं

बादशहाचा कट फसतांच तो दक्षिणेंत पळून शहाजी भोंसल्यास मिळाला. पण शहाजहानच्या फौजेनें त्याचा पराभव केला. महंमद अदिलशहा किंवा मूर्तजा निजामशहा यांच्याकडून आश्रयाची निराशा झाल्यावर तो बादशाही फौजेस चुकवून बुंदेलखंडांत शिरला. पण तेथेंहि त्यास मदत न मिळतां कालिंजर किल्ल्यानजीक लढत असतां मारला गेला ( १६३१ ) त्याच्या पाठलागाचा व वधाचा वृत्तांत फार हृदयद्रावक आहे. नैमतखानानें 'तारीख खानजहान लोदी ' नांवानें त्याच्या आठवणीचा ग्रंथ लिहिला आहे ( १६०८ ). [ डफचा इतिहास-वील मुसुलमानी रियासत ]

खान झादा:--मुख्यत: यांची वस्ती संयुक्त प्रांतांत आढळते. खानाचे वंशज व गुलामाचे वंशज अशा दोन्ही नांवांनीं हे लोक ओळखले जातात. ते मूळचे जादोन रजपूत असून, भरतपुरांतील तहानगड येथील लखनपाल व सुमित्रपाल हे त्यांचे पूर्वज फिरोझशहाच्या कारकीर्दींत इस्लामधर्मानुयायी झाले होते फिरोझशहानें त्यांना अनुक्रमें नाहरखान व बहादुरखान अशीं नांवें दिलीं. त्यांचें उच्च कुळ लक्षांत घेऊन त्यांना मेवाडचे अधिपति केलें, व त्यास खानझादा म्हणून नांव ठेविलें. अकबरच्या वेळेपर्यंत ते मेवाडचे अधिपति होते यांत शंका नाहीं. मेओ लोकांशीं त्यांचा निकट संबंध असल्याबद्दल संशयास जागा आहे. किरयेक खेड्यांतील मेओ लोक आपण पूर्वी खानझादे होतो पण प्रत्युद्वाहामुळें पुनः मेओ झालों असें सांगतात. मेओ हे धर्मांतर केलेले मिना आहेत हें सिद्ध असल्यास खानझादा हे उच्चवर्णीय होते यांत शंका नाहीं. जनरल कनिंगहॅम म्हणतो कीं मेवाडचे पूर्वी एकदा राजे असलेले खानझादा हे जादोन(जाधव, यादव)राजा तहनपाल याला आपला मूळ पुरुष मानतात. अलवार व भरतपूर येथील हिंदूंच्या हातांत मेवाड प्रांत गेल्यापासून खानझादांच्या जादोन वंशासंबंधीं शंका उपस्थित करण्यांत येत असते व खानझादांचा गुलामाकडे संबंध जोडण्यांत येत असतो. परंतु हिंदुराजांशीं त्यांना असलेला संबंध केवळ तर्कावर दिसून येतो म्हणजे वस्तुस्थितीचा अपलाप करण्यासारखें आहे. राणाह वंशांतील सुरासिंहाचा मुलगा गवनंदसिंह म्हणून एक सरदार होता. त्याचा मुलगा तिलोकचंद हा बाबरच्या समकालीन असून कांहीं संटकावरून बाबरानें त्यास कैद केलें. त्यावेळीं नाइलाजानें त्यास धर्मांतर करावें लागलें व बाबरानें त्याचें नांव लखनखान असें ठेविलें. त्याचे मुलगे कादिरखान व जमालखान यांनी खानझादा अशी पदवी स्वीकारली अशी स्थानिक दंतकथा आहे. खानझादांनें धर्मांतर मोंगल काळापूर्वीच होऊन गेलें असें सर एच्. एम्. इलियट म्हणतो. फिरोझशहा सोदीच्या राजपुत्राच्या कारकीर्दींत त्यांचें धर्मांतर झालें असावें असाहि तर्क आहे.

लाड येथील खानझाद्यांमध्यें किरयेक रजपुत वंशांचाहि समावेश होतो. शेख व खानझादा यांच्यांत बरेच मुसलमानी रिवाज रूढ झाले आहेत. किलसीरिया व भालेसुलतान खानझादा हे आपल्या ज्ञातींत लग्न लावणारे असून इतर पंथ भिन्नगोत्रविवाह लावणारे आहेत. बहुतेक लोक स्वत:स ' शेख ' म्हणवितात ते सुनी पंथाचे आहेत तरी त्याच्या कित्येक स्त्रिया देवीची उपासना करतात. यांची पंजाबांतहि थोडी वस्ती आहे.

**खानदेश जिल्हा:**— हा मुंबई इलाख्याच्या मध्यभागांतील एक जिल्हा आहे. या जिल्ह्याच्या उत्तरेस सातपुडा पर्वत व नर्मदा नदी असून पूर्वेस वऱ्हाड प्रांत व निमारचा जिल्हा आहे. या जिल्ह्याच्या दक्षिणेस सातमाल चांडोर व अजंठा हे डोंगर असून पश्चिमेस बडोदें संस्थान व रेवाकांठा जहागीर आहे. नैर्ऋत्येस नाशिक जिल्हा आहे.

भौगोलिकवर्णन—दख्खनच्या पठाराचा खानदेश हा अगदीं उत्तरेकडील भाग होय खानदेशांतील मुख्य नदी तापी ही होय ती सातपुडा पर्वतांत बैतुलाजवळ उगम पावून, पूर्वखानदेश व पश्चिम खानदेश या जिल्ह्यांतून वहात जाऊन सुरतेजवळ खंबायतच्या आखातास मिळाली आहे. याशिवाय गिर्णा, बोरी, पांजरा या लहान लहान नद्या खानदेशांत आहेत. निमारपासून नंदुरबारपर्यंतचा १५० मैलांचा टापू सपाट मैदान असून त्यांतील जमीन उत्तम मळ्याची आहे या टापूंत पुष्कळ संपन्न शहरें व खेडीं आहेत. या शहरांच्या व खेड्यांच्या सभोंवार आंबराया व बागा आहेत या टापूच्या उत्तरेकडील प्रदेश उन्नत आहे. खानदेशाचा मध्यभाग व पूर्वभाग बहुतेक सपाट असून तो सुपीक नाहीं. उत्तर भाग व पश्चिम भाग डोंगराळ असून त्यांत गर्द अरण्यें आहेत. या भागांत भिल्लांची वस्ती असून ते आपला उदरनिर्वाह जंगलांतील धंद्यांवर करतात. खानदेशामध्यें मुख्यतः चार डोंगराच्या रांगा पसरलेल्या आहेत. उत्तरेस सातपुडा पर्वताची रांग नर्मदा व तापी यांच्या मधून गेली आहे. या पर्वतावर तोरणमाळचें इतिहासप्रसिद्ध पठार असून त्याची उंची ३३०० फूट आहे. येथेंच पंचपंडु नांवाचें एक शिखर असून तें समुद्रसपाटीपासून ३००० फूट उंच आहे. आग्नेयेस हस्ती डोंगराची रांग आहे. दक्षिणेस सातमाळ, चंदोर अगर अंजरा या डोंगराची पसरली असून या रांगेमुळें खानदेश व दख्खनपठार हीं अलग झालीं आहेत. पश्चिमेस खानदेश व गुजराथ यांना विभक्त करणारी पश्चिमघाट पर्वताची उत्तर टोंकाकडील रांग आहे. अर्व व गाळणा या टेंकड्यांमुळें खानदेश व नाशिक हे पृथक झाले आहेत. सातपुडा पर्वत व तापी नदी यांच्या मधील टापूंतील जमीन सुपीक आहे. याशिवाय टेंकड्यांवर व तापी नदीच्या दऱ्याखोऱ्यांत बेसाल्ट पाषाण सांपडतो. बऱ्हाणपुराहून पांच मैलांवर सुलतान खेड्याच्या ईशान्येस,एक मैलावर गाडूचे दगड सांपडतात. पण या ठिकाणाशिवाय खानदेशांत दुसरीकडे कोठेंहि गाडूचा दगड सांपडत नाहीं. खानदेशांत चार ऊन पाण्याचे झरे असून

त्यापैकीं तीन चोपडें गावात व एक शिरपूर गावात आहे. खानदेशमध्यें अनेक प्रकारचीं झाडें झुडपें होतात. तापी नदीच्या खोऱ्यात मोठमोठीं जगलें असून त्यात वृक्षाची समृद्धि आहे. त्याचप्रमाणें सातपुडा पर्वतामध्येंहि प्रचंड अरण्यें आहेत या ठिकाणीं अंजन व शाल झाडाचें वैपुल्य आहे. शिरपूर व चोपड्यान्च्या आसपासच्या भागात साग मुबलक सापडतो शाहड्याच्या जंगलात रोराची झाडें विपुल असून अक्राणीमध्यें अंजन झाडाची समृद्धि आहे. पश्चिम घाटाच्या माथ्यावरहि अंजन वृक्षाची रेलचेल असून, सावळ्याच्या आसपास गर्द वृक्षराजी आहे. खानदेशात सामान्यतः वड, पिंपळ, पळस, महू, आम्र, उंबर व टेंभुर्णी इत्यादि झाडें आहेत.

खानदेशमध्यें हिंस्र पशूंची समृद्धि आहे. वाघ, चित्ता, अस्वल, लांडगा, गवा, सांबर, हरिण, नीलगाय, गझेल इत्यादि पशु पुष्कळच सांपडतात खानदेशाच्या उत्तर भागात पूर्वी हत्ती फार सांपडत असत. ब्रिटिशराज्य सुरू झाल्यापासून खानदेशमधील वाघाची संख्या हल्लीं फारच कमी झाली आहे.

ह वा मा न.—खानदेशातील प्रदेश उंचसखल असल्याकारणानें, ठिकठिकाणचें हवामान भिन्न आहे. पश्चिम भागातील टेंकड्याच्या टापूत व सातपुड्याच्या पर्वतात पर्जन्य खूप पडतो पण खानदेशाच्या मध्य व दक्षिण भागात पर्जन्याचें मान फार कमी आहे. तरी पण खानदेशात दुष्काळ फारच क्वचित पडतो. खानदेश जिल्ह्यात वार्षिक पर्जन्यमान २०–४५ इंच आहे. आक्टोबर ते जानेवारी महिन्यापर्यंत खानदेशची हवा फार चागली असते पण उन्हाळ्यात हवा फारच उष्ण असते खानदेशातील पूर्व व मध्य भागातील हवा चागली आहे पण पश्चिमेकडील हवा अधिक उष्ण असल्यानें त्या भागातील लोकांना हवेचा त्रास फार होतो.

क्षे त्र फ ळ व लो क सं ख्या—खानदेश हा १९०६ पूर्वी एकच जिल्हा होता पण १९०६ सालापासून खानदेशचे पूर्व व पश्चिम असे दोन जिल्हे करण्यात आले आहेत. पूर्व खानदेशाचें क्षेत्रफळ १९१५ सालीं ४५२५ चौरसमैल व पश्चिम खानदेशाचें क्षेत्रफळ ५५२५ चौरस मैल होतें १९२१ सालीं पूर्व खानदेशची लोकसंख्या १०,७५,८२७ व पश्चिम खानदेशची ६४१८८७ होती.

मु ख्य श ह रें—पूर्वखानदेशमध्यें अमळनेर, भुसावळ चाळिसगांव, चोपडा, एरंडोल, जळगाव, जामनेर, पाचोरा रावेर व यावल असे १० तालुके व पारोल, एदलाबाद, व भडगांव हे तीन पेटे आहेत पश्चिमखानदेशांत धुळें, नंदुरबाद, पिंपळनेर, शाहादा, शिरपूर, सिंदखेड व तलोदें असे ७ तालुके व नवापूर पेटा आहे. पूर्वखानदेशचें जळगाव व पश्चिम खानदेशाचें धुळें हें मुख्य ठिकाण आहे. पूर्व खानदेशांत अमळनेर, भुसावळ, चाळीसगांव, चोपडा, धरणगाव, एरंडोल, जळगाव, पारोल, नासिराबाद रावेर इत्यादि प्रमुख शहरें व पश्चिम खानदेशात धुळें, नंदुरबार, तलोदें, शाहाडा इत्यादि शहरें आहेत

खानदेश जिल्ह्यात शेकडा ९० लोक हिंदू असून मुसलमान, जैन व ख्रिश्चन लोक फार थोडे आहेत मुसलमानाची संख्या १९११ सालीं खानदेशात सव्वालाख होती.

भा षा.—तापीच्या उत्तरेकडील खानदेशी मुलखात शेतकरी लोक गुजराथी भाषा बोलतात, व सर्व जिल्ह्यात हीच व्यापारी भाषा आहे. पण खानदेशाच्या पश्चिम व दक्षिण भागात मराठी भाषा प्रचारात आहे. कचेऱ्यातून व शाळातून मराठी भाषा प्रचारात आहे खानदेशातील लोकांची घरगुती भाषा खानदेशी असून ती मराठी, गुजराथी, नेमाडी, हिंदुस्थानी इत्यादिकांचें मिश्रण आहे खानदेशी भाषेला अहिराणी असेंहि नाव आहे

जा ती—खानदेशातील मुख्य जाती म्हणजे कुणबी, भिल्ल महार, मराठा, माळी, कोळी, ब्राह्मण, वाणी, तेली, सोनार, रजपूत, धनगर, वंजारी, न्हावी, चांभार, सुतार, शिंपी व मांग या होत. ब्राह्मणाच्या १३ पोटजाती आहेत. त्यातील १० जाती मराठी भाषा बोलतात बाकीच्या तीन जातींना मराठी कळतें पण ते ती बोलत नाहींत या पोटजातींत बेटीव्यवहार होत नाहीं.

कुणबी, गुजराथी व वाणी या जातींचे लोक मुख्यतः शेतकीवर आपला उदरनिर्वाह करतात बहुतेक व्यापारी लोक मारवाडी, गुजराथी अगर भाटिया हे आहेत. खानदेशात अनार्य लोकांची संख्या पुष्कळ आहे हे लोक एके ठिकाणीं कायमची वस्ती करून कधींच रहात नाहींत पोलीस शिपायात व भिल्ल रेजिमेंटातील शिपायात भिल्लांचा भरणा आहे महार लोकाचा धंदा मजुरीचा आहे निरधी लोकाची वस्ती सातमाल टेंकडीच्या आसपास असून ते फार भयंकर व क्रूरकर्मा लोक आहेत. वंजारी लोकांपैकीं काहीं लोक व्यापरी आहेत पण बहुतेक लोक नेहमीं टोळ्याटोळ्यानीं भटकत असतात. त्यांचा धंदा गवत अगर लाकडें विकण्याचा असतो खानदेशातील पुष्कळसे मुसलमान हे मूळचे हिंदूच असून ते मुसुलमानानीं जुलमानें बाटविल्यामुळें जे पूर्वी मुसलमान झाले त्याचे वंशज आहेत. याशिवाय पठाण लोकाचीहि येथें बरींच वस्ती आहे. या मुसलमानातील पुष्कळ लोक शतकीचा धंदा करतात ख्रिश्चन लोकांपैकीं रोमन कॅथॉलिक व अँग्लिकन या दोन पंथाचे लोक खानदेशात आहेत. त्याचीं धुळें, भुसावळ व धरणगाव या ठिकाणीं ख्रिस्तालयें आहेत. नंदुरबाद येथें स्कँडिनेव्हियन अमेरिकन मिशनरीची संस्था असून धुळ्यास चर्च मिशनरी सोसायटीची संस्था आहे. अमेरिकन अलायन्स मिशनच्या संस्था भुसावळ, जळगाव, पाचोरा व चाळिसगाव या ठिकाणीं आहेत याशिवाय तापी व्हॅली रेल्वे इंडस्ट्रियल मिशनची संस्था नवापूर येथें असून पेनियल मिशनची संस्था धरणगाव येथें आहे

शिक्षण —१९११ च्या खानेसुमारीत पूर्व खानदेशामध्यें ५०२९३ लोक साक्षर असलेले आढळून आले. त्यापैकीं ३१२८ लोकांना इंग्रजी लिहिता वाचता येत होतें पश्चिम खानदेशमध्यें साक्षर लोकांची संख्या २४२७० असून त्यापैकीं १३७३ लोकाना इंग्रजी लिहिता वाचता येत होतें. मुंबई इलाख्यातील सर्व जिल्ह्यातील साक्षरतेच्या दृष्टीनं खानदेशचा बारावा नंबर लागतो. १९०३-४ त ५३८ शाळा असून त्यापैकीं १ हायस्कुल, १२ माध्यमिक शाळा व ४०१ प्राथमिक शिक्षणाच्या शाळा होत्या धुळें येथें ट्रेनिंगस्कूल व औद्योगिक शाळा आहे. १९०३-४ सालीं खानदेशात शिक्षणावर एकंदरीत सवादोनलाख रुपये खर्च झाले. १९०३-४ सालीं खानदेशमध्यें २० दवाखानें, एक इस्पितळ व दोन वैद्यकीशिक्षणाच्या संस्था होत्या.

जमीन.—खानदेशातील जमीनीचे काळी, पाढरी, खारंन व बर्की असे चार प्रकार आहेत. तापीच्या खोऱ्यातील जमीन काळी आहे. खानदेशात बहुतेक सर्व भागात रयतवारी पद्धत अमलात आहे. इनाम जमीनीचें प्रमाण शेंकडा २ आहे. खानदेशात ज्वारी, बाजरी व कापूस हीं मुख्य पिकें आहेत त्याच्या खालोखाल गव्हाचें उत्पन्न आहे विशेषतः तापीच्या खोऱ्यात गव्हाचें पुष्कळ उत्पन्न आहे याशिवाय तूर, हरभरा, उडीद, कुळीथ, मूग इत्यादि धान्येंहि येथें पिकतात. तीळ व जवस याचा तेल काढण्याच्या कामीं उपयोग करतात. ऊंसाचें पीक फारच थोड्या ठिकाणीं होतें

पाळीव जनावरें.—खानदेशातील गाई व बैल फार सुरेख असतात. वऱ्हाड व निमार जिल्ह्यातून याची पैदास होते. पश्चिम खानदेशातील खिलारी बैल दख्खनमध्यें फार प्रसिद्ध आहेत. उन्हाळ्यात या गुराढोराचे फार हाल होतात व त्यामुळें तीं अगदीं रोडकीं बनतात. खानदेशातील घोडे अगदींच खुजे असतात. घोड्याची चागली निपज व्हावी यासाठीं धुळें, चाळिसगाव येथें सिव्हिल व्हेटरनरी खात्यानें दोन वळू मुद्दाम ठेविले आहेत.

पाणीपुरवठा—जमीनीला पाणी मिळण्याची सोय मुख्यतः कालव्याच्या द्वारें केलेली आहे. गिर्ना व पाजरा या नद्याना बाध घालून तेथून कालवे नेण्यात आले आहेत. याशिवाय पुष्कळशा तलावाचें पाणीहि कालव्याच्या द्वारें नेण्यात आलें आहे. खानदेशात अशा प्रकारचे चार कालवे असून त्यामुळें जवळ जवळ २०,००० एकरांना पाणी मिळतें. तरीपण कालव्यांचें पाणी फारच थोड्या जमीनीला मिळतें. बहुतेक सर्व जमीन पावसावरच अवलबून असते. खानदेशात १९०३-४ सालीं विहिरींची संख्या २५०३१ इतकी होती.

जंगल.—जंगलाच्या बाबतींत कानडाच्या खालोखाल मुंबई इलाख्यात खानदेशचा नंबर लागतो. पूर्वी जंगल संरक्षणाचा कायदा नसल्यानें भिल्ल लोकानीं या जंगलाची नासाडी केली पण हल्लीं जंगलसंरक्षणाचा कायदा सुरू झाल्यानें जंगलाची वाढ बरीच झाली आहे. १९०३-४ सालीं सरकारच्या ताब्यात २९६८ चौरस मैल जंगल होतें व गुराना चराऊ रानें २८४ चौरस मैलाचीं होतीं. महूच्या फुलाचें उत्पन्न या जंगलात फार होतें याशिवाय साग, बाभूळ, इत्यादि झाडेंहि मुबलक आहेत. १९०३-४ सालीं खानदेशातील जंगलाचें उत्पन्न २.३ लाख रुपये झालें. खानदेशातील जंगलखात्याचे दोन भाग पाडण्यात आले असून प्रत्येक भागावर एक एक अधिकारी नेमण्यात आला आहे.

खनिजसंपत्ति.—खानदेशातील खनिज संपत्ति फारच अल्प आहे. इमारतीला लागणारे दगड चोहोंकडे सापडतात. वाघूर नदीच्या पात्राजवळ एक इमारतीला उपयोगी दगडाची खाण आहे. कंकर हा खनिज पदार्थ पुष्कळ ठिकाणीं सापडतो यान्यापासून चागला चुना तयार करता येतो. विटा तयार करण्याला लागणारी मातीहि या जिल्ह्यात मुबलक सापडते.

उद्योगधंदे —खानदेशातील उद्योगधंदे विशेष महत्वाचे नाहींत पूर्व व पश्चिम खानदेशात सरकी काढण्याच्या व गद्दे बाधण्याच्या १७५ गिरण्या आहेत. जळगाव येथें १८७४ सालीं स्थापन झालेली एक कापडाची गिरणी आहे. लोकरी जाडी भरडी ब्लँकेटें खानदेशात सर्वत्र तयार होतात. भुसावळ येथें रेल्वेचे मोठमोठे कारखाने आहेत. अमळनेर येथेंहि एक सुताची गिरणी आहे. अंमळनेर, फैजपूर व जळगाव हीं शहरें विणकामाबद्दल प्रसिद्ध आहेत.

आयातनिर्गत—खानदेशातून कापूस, धान्य, लाख, लोणी, नीळ इत्यादि माल बाहेर जातो. विशेषतः कापूस तर मोठ्या प्रमाणात बाहेर जातो. आयात मालात मीठ, मसाला, धातू, साखर हे जिन्नस प्रमुख होत. पश्चिमखानदेशात धुळें व पूर्वखानदेशात जळगाव व भुसावळ या व्यापाराच्या मुख्य पेठा आहेत. याशिवाय जत्रामध्यें व धार्मिक उत्सवप्रसंगीं मोठे बाजार भरतात.

दळणवळणाचे मार्ग.—ब्रिटिश अंमलापूर्वी खानदेशात बाधीव रस्ते नव्हते म्हटले तरी चालेल. पण ब्रिटिश अमलानंतर मुंबई ते आग्रा हा रस्ता बाधण्यात आला हा रस्ता मालेगाव, धुळें व शिवापुर या गावावरून गेला आहे. या सडकेच्या बाजूनें झाडें लावण्यांत आलेलीं आहेत. जी. आय पी. रेल्वेचा फांटा नायडोंगरी ते भुसावळपर्यंत असून तेथून जबलपुराकडे एक व नागपूरकडे एक असे दोन फाटे फुटलेला आहेत. या शिवाय चाळीसगाव ते धुळे, जळगाव ते अमळनेर असे दोन छोटे फाटे गेले आहेत. तापी नदी व्हॅली रेल्वेचा फाटा सुरत ते अमळनेरपर्यंत गेलेला आहे

राज्यव्यवस्था—खानदेशची व्यवस्था तीन सिव्हिलियन व दोन डेप्युटी कलेक्टर याच्या मार्फत चालविली जाते. जिल्हा न्यायाधीश व जज्जाची कचेरी धुळें येथें

आहे व सर्व जिल्ह्यात १० सबार्डिनेट न्यायाधीशांची कोर्टें फौजदारी गुन्हे चालविणारी १० मॅजिस्ट्रेट कोर्टें आहेत. चोरी, दरवडा व घरफोड हे गुन्हे या जिल्ह्यात विशेष पडतात व जिल्ह्यातील२१शहरात म्युनिसिपालिट्या आहेत. जिल्ह्यात पोलिसखात्याची संख्या १९०३-४साली ३० होती. शिपायांची संख्या १६३६ होती. या शिपायांच्यावर चार इन्स्पेक्टर, तीन असिस्टंट व एक जिल्हापोलिससुपरिंटेंडेंट असे अधिकारी असतात.

धुळें येथें मोठा तुरुंग असून त्यात ४०० कैद्यांची सोय होऊं शकते. या शिवाय या जिल्ह्यात २३ लहान तुरुंग व २१ अंधारकोठड्या आहेत.

सन १८८६ मध्यें खानदेशमधील जमिनीच्या मोजणीचें काम सुरू झालें व तें १९०४ साली संपलें. याच्या पूर्वी १८५२ मध्यें एकदां जमीनीची मोजणी झाली होती. त्यापेक्षा या मोजणीच्यावेळीं शेंकडा ४ प्रमाणानें लागवडीची जमीन वाढली असें आढळून आलें व त्यामुळें दर वर्षी ३१ ते ४० लाखापर्यंत अधिक उत्पन्न येऊ लागलें. १९०३-४ मध्यें खानदेशातील जमीनमहसूल ४८,१०,००० रुपये होता व एकंदर उत्पन्न ६७,९९,००० इतकें होतें.

इतिहास.—खानदेशाच्या प्राचीन इतिहासाला ख्रि. पू. १५० या वर्षापासून सुरवात होते. याच्यापूर्वी एके ठिकाणीं खानदेशातील तोरणमाल व असीरगड यांचा उल्लेख आलेला आहे. तोरणमाल व असीरगड येथें अश्वत्थाम्याचें स्थान आहे. ख्रिस्ती शतकापूर्वी आंध्रच्या रजपूत राजघराण्याचे वंशज खानदेशावर राज्य करीत होते ही गोष्ट निःसंशय आहे. ख्रि. पू. १५० सालच्या एका शिलालेखावरून वरील विधानाला ऐतिहासिक पुराव्याची जोड मिळाली आहे. रजपूत घराण्यांनीं दोन तीन शतकें खानदेशावर आपलें स्वामित्व गाजविल्यावर आंध्रांनीं खानदेश जिंकून घेऊन तो आपल्या ताब्यांत आणला. नंतर कांहीं काळानें पश्चिमेकडील क्षत्रपांनीं आंध्र राजाला येथून हुसकावून लावलें. पांचव्या शतकामध्यें चालुक्यवंशीय राजाचा खानदेशावर अंमल बसला. अल्लाउद्दीन खिलजीनें १२९५ साली खानदेशावर स्वारी केली. त्यावेळीं खानदेश हा चव्हाणवंशीय राजाच्या ताब्यांत होता.

अल्लाउद्दीन खिलजीनें खानदेशावर स्वारी केल्यापासून तो १७६० मध्यें असीरगडचा किल्ला मराठ्यांनीं जिंकीपावेतों, खानदेश हा मुसलमानी वर्चस्वाखालीं होता. दिल्ली येथें जें मुसुलमानी घराणें राज्य करीत असे त्या घराण्यातील राजे खानदेशावर आपला सुभेदार नेमीत असत. महंमद तघलखाच्या कारकीर्दीत, खानदेशाची व्यवस्था एलिचपूर येथें असणाऱ्या सुभेदाराकडून पाहिली जात असे. इ. स. १३७०-१६०० याच्या दरम्यान खानदेश हा फरुकी घराण्यांतील राजाच्या ताब्यात होता. हे फरुकी राजे जरी आपल्याला गुजराथच्या सुलतानाचे मांडलीक म्हणवीत तरी ते जवळ जवळ स्वतंत्रच असत. इ. स. १५९९ सालीं अकबरानें जातीनें खानदेशावर स्वारी केली व असीरगड जिंकून घेऊन तेथील राजा बहादूरखान याला कैद करून किल्ल्यात पाठविलें. खानदेश हा या वेळेपासून अकबराच्या राज्यात मोडूं लागला. अकबरानें या प्रदेशाचा कारभार पहाण्याकरिता आपला मुलगा दानियाल यास सुभेदार नेमलें. याच्या नांवावरून कांहीं काळपर्यंत खानदेशाला दानदेश हें नाव पडलें. १७ व्या शतकाच्या मध्यकालात खानदेशाची भरभराट झाली होती. दख्खनमधून वर हिंदुस्थानात जाण्याचा व्यापारी मार्ग खानदेशामधून जात असल्यानें खानदेश सधन बनला होता.

१६७० मध्यें शिवाजीमहाराजांनीं आपला अधिकारी खानदेश येथें पाठवून चौथाई वसूल केली. पुढें त्यांनीं साल्हेरचा किल्ला जिंकला. शिवाजी, संभाजी व औरंगझेब या तिघांनींहि आपल्या अमदानींत खानदेशावर स्वारी केली. इ. स. १७२० मध्यें निझामउल्मुल्क यानें खानदेश आपल्या राज्याला जोडला. १७६० मध्यें निजामाला मराठ्यांनीं हाकलून लावलें व पेशव्यांनीं खानदेश आपल्या ताब्यात घेऊन त्या मुलखापैकीं कांहीं भाग शिंदे व होळकर यांना जहागीर दिला. इ. स. १८०२ मध्यें होळकराच्या सैन्यानें खानदेश लुटण्यास आरंभ केला. त्यावेळी याच्या बेबंद कारभारामुळें खानदेशात जिकडे तिकडे अव्यवस्थेचें साम्राज्य माजलें होतें. पुढें १८१८ मध्यें खानदेश हा ब्रिटिशांच्या ताब्यात आला. पुढें कांहीं वर्षांनीं भिल्ल लोकांनीं बंडाचें निशाण उभारलें पण अलफिस्टन साहेबानें तें मोडून टाकलें. औट्रम यानें भिल्लांना पोलीसखात्यात नोकऱ्या देऊन त्यांची पथकें बनविलीं. १८५२ व १८५७ मध्यें पुन्हा भिल्लांनीं बंडें केलीं पण तीं ताबडतोब मोडण्यात आलीं.

खानदेशामध्यें, 'हेमाडपंती' पद्धतीची दगडी देवालयें, तळीं, विहिरी जिकडे तिकडे दृष्टीस पडतात. 'हेमाडपंत' याला खानदेशामध्यें गवळीराजा असें म्हणतात. अशा हेमाडपंती इमारती खानदेशामध्यें ३९ असून त्यापैकीं ३१ देवळें, ६ पायऱ्यांच्या विहिरी व २ तळीं आहेत. या इमारती १३ व्या शतकातल्या किंबहुना कांहीं त्याच्या पूर्वीच्याहि आहेत असें वाटतें. या हेमाडपंती इमारती मोठमोठ्या दगडाच्या असून हे दगड चुना न लावता जोडण्यात आलेले असतात. कांहीं कांहीं इमारतींचे दगड तर फारच मोठे असतात. या हेमाडपंती इमारतींशिवाय खानदेशामध्यें कांहीं मुसलमानांच्या वेळच्या इमारतीहि आहेत. त्यांमध्यें सर्वात प्रसिद्ध म्हणजे फरकांडे येथील हलते मनोरे होत. चाळिसगाव तालुक्यातील पितळखोऱ्यामध्यें बौद्धकालीन एक चैत्य व कांहीं विहार आढळतात. पण ते हल्लीं जीर्णावस्थेंत आहेत. हा चैत्य व हे विहार ख्रि. पू. २ शतकांमधील असावे असें दिसतें. खोऱ्याच्या पायथ्याशीं पाटण नांवाचें

एक ओसाड खेडें आहे. या खेड्यात काहीं देवालयें व शिलालेख आहेत. प्रसिद्ध भास्कराचार्य ज्योतिषाचा नातू येथें रहात असे त्याचें ज्योतिषविषयक विद्यापठ येथें होतें. यावळी येथें दहाव्या शतकातील एक महादेवाचें मंदिर असून त्या मंदिराच्या भिंतीवर तीन शिलालेख आढळतात.

खानदेशाला कन्ह ( कृष्ण ) देश असेंहि प्राचीन नाव आहे. अश्मक म्हणून जो प्रांत महाभारतात येतो तोच खानदेश असें काहींचें म्हणणें आहे. खानदेशात ख्रिस्ताच्या पहिल्या शतकात अहार नावाचे राजे होते. यानाच हलीं तिकडे गवळी राजे म्हणतात. प्रख्यात ३ जिठवाची लेणीं खानदेशात खानदेशवऱ्हाडच्या सरहद्दीवर आहेत.

खानपूर, तहशील.—पंजाब प्रांत. बहावलपूर संस्थान. खानपुर निझामतींतील मुख्य तहशील. हा तहशील सिंधु-नदीच्या डाव्या तीरावर आहे. उ. अ. २७° ४३' ते २९° ४ व पू. रे. ७०° २७' ते ७०° ५३'. क्षेत्रफळ २४१५ चौरस मैल. १९११ सालीं या तहशिलीची लोकसंख्या ९२९७१ होती. खानपूर हें राजधानीचें शहर आहे. गढी इख्तयारखान आणि धाडसपुर हीं दोन शहरें व ९२ लहान गावें या तहशिलींत आहेत. तहशिलीच्या उत्तरेस सिंधु नदीकाठच्या सुपीक जमिनी आहेत. अलाहाबाद तहशीलीच्या खालोखाल हीच तहशील सर्वांत अधिक सुपीक असून खजुरीच्या झाडाकरिता विशेषत: प्रसिद्ध आहे. १९०५–०६ सालीं जमीनमहसूल व पट्टी मिळून वसूल १·८ लाख रुपये होता.

शहर.—खानपुर निझामत आणि तहशिलींतील मुख्य शहर. उ. अ. २८° ३९' व पू. रे. ७०° ४१'. नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवर बहावलपूर शहराच्या नैर्ऋत्येस ६३ मैलावर हें शहर आहे. १९११ सालीं लोकसंख्या ९१९२ होती. इ. स. १८०६ मध्ये नबाब बहावलखानानें या शहराची स्थापना केली. या संस्थानातील शेतकींपासून निर्माण झालेल्या पिकाचा व्यापार या शहरीं मुख्यत्वेंकरून चालतो. येथें तीन भात सडण्याच्या व भाताचें फोलकट काढण्याच्या वाफेनें चालणाऱ्या गिरण्या आहेत. त्यापैकीं एका गिरणींत कापसातील सरकी काढण्याचेंहि काम चालतें. येथें एक शाळा व दवाखाना आहे.

खानाकुल.—बंगाल इलाखा. हुगळी जिल्ह्यात आरामबाग पोटविभागातील एक खेडें. कान नदीच्या पश्चिम तीरावर हें खेडें वसलें आहे. उ. अ. २२° ४३' व पू. रे. ८७° ५२'. १९०१ सालीं येथील लोकसंख्या ८८६ होती. पितळेच्या भांड्याचा येथें बराच व्यापार चालतो. आसपासच्या प्रदेशात उत्तम प्रतीचें सुती कापड तयार होतें. कलकत्ता शहरातील मार्केटकरिता येथें मोठ्या प्रमाणावर भाजीपाल्याची लागवड होते. नदीच्या काठावर शिवाचें प्रचंड देवालय आहे.

खानापूर तालुका.—मुंबई इलाखा बेळगाव जिल्ह्यातील अगदीं दक्षिणेकडील तालुका. उ. अ. १५° २२' व १५° ४७' आणि पू. रे. ७४° ५' व ७४° ४४'. क्षेत्रफळ ६३३ चौ. मै. तालुक्यात २१९ खेडीं आहेत. नंदगड ( लोकसंख्या ६२५७ ) हें त्यापैकींच एक होय. १९११ सालची या तालुक्याची लोकसंख्या ७२३०४ होती. बेळगाव जिल्ह्यातील अतिशय विरळ लोकवस्तीचा हाच तालुका आहे. मुख्य कचेऱ्या खानापूर येथें आहेत. तालुक्याचा दक्षिण व नैर्ऋत्यभाग टेंकड्या व दाट अरण्य यांनीं व्यापला आहे. या भागात रहिवासी फार थोडे आहेत. वायव्येकडे उंच पर्वत आहेत. तालुक्याच्या मध्य, ईशान्य व पूर्व भागात सपाट व सुपीक मैदान असून, पुष्कळ लोकवस्तीचीं सधन शहरें याच भागात विशेषेंकरून आहेत. उन्हाळ्यात येथील हवा समशीतोष्ण व आरोग्यकारक असते. हिवाळ्यात हवा किंचित् रोगट असते. वार्षिक पर्जन्याचें मान सरासरी ७१ इंच असून, इतर तालुक्यापेक्षा या तालुक्यात पर्जन्य जास्त पडतो.

शहर.—उ. अ. १५° ३७' व पू. रे. ७४° ३४'. बेळगावच्या दक्षिणेस सुमारें १६ मैलावर मलप्रभा नदीच्या तीरावर हें खानापूर तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. इ. स. १७२० च्या सुमारास येथें गोव्याशीं मोठा व्यापार चालत असे. हा व्यापार इ. स. १८२० सालीं कित्तुरकर देसायानीं नंदगड येथें नेल्यामुळें येथील व्यापार बंद झाला. हा गाव घांटेपासून १० मैल अंतरावर आहे. याच्या जवळच भोपालगड असल्यामुळें पूर्वी हें राज्यकारभार पहाण्याचें एक मुख्य ठिकाण असावें. येथील जमीन कृष्णा दरीच्या पेक्षा सरासरी २५० फूट उंच आहे. पूर्वेस मान दरी ५०० खोल आहे. पश्चिमेस व नैर्ऋत्येस उथळ दऱ्या व ओहोळ आहेत. खानापूर तालुक्याच्या इतर ठिकाणापेक्षा येथें पावसाचें मान चांगलें असल्यामुळें गहूं बरा पिकतो.

खानापूर, तालुका.—मुंबई इलाखा सातारा जिल्ह्यातील एक तालुका. उ. अ. १७° ८' व १७° २७' आणि पू. रे. ७४° १४' व ७४ ५१. क्षेत्रफळ ५०२ चौ. मै. तालुक्यात एकंदर ९० खेडीं असून त्यातच खानापूर आणि विटें याचा समावेश होतो. १९११ सालीं तालुक्याची लो. सं. ८३९२१ होती. १९०३–०४ सालीं जमीन महसूल १.६ लक्ष रुपये होता. पश्चिमेकडील कऱ्हाड खोऱ्याच्या सपाटीपासून खानापूर तालुका ९०० फुटापेक्षा अधिक उंच आहे. हवा समशीतोष्ण आहे. वार्षिक पर्जन्यमान फक्त २४ इंच असून पर्जन्य अनियमित असतो. त्यामुळें उन्हाळ्यात अनेक वेळा पाण्याची फार टंचाई पडते, कारण पाणी क्वचित् मिळतें. जमीन काळी व मुरमाचीहि आहे. दुसऱ्या काहीं प्रकारच्याहि जमिनी आहेत.

**खानापूरकर विनायक पांडुरंग**—एक महाराष्ट्रीय ज्योतिष गणितग्रंथकार. याचा जन्म शके १७८० त झाला. हे जामदग्न्य गोत्री ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण सातारा जिल्ह्यांतील खानापूर येथें राहणारे. यांचें संस्कृतभाषा, ज्योतिष इत्यादिकांचें अध्ययन जुन्या पद्धतीनें झालेलें असून शिवाय यूरोपियन गणित आणि ज्योतिष यांचेंहि अध्ययन केरोपंत छत्रे व रावजी मोरेश्वर देवकुळे यांजपाशीं त्यांनीं केलेलें होतें.

वैनाशीय द्वादशाध्यायी नांवाचा ताजक ग्रंथ वर्षफल करण्यात फार सोयीचा असा त्यांनीं केला आहे. तसेंच कुंडसार, अर्धकांड, युक्लिडच्या दोन भागांतील सिद्धांताच्या प्रतिज्ञांचा पृत्तबद्ध संस्कृत अनुवाद, सिद्धांतसार हे संस्कृत ग्रंथ त्यांनीं केले आहेत. भास्करीय लीलावती, बीज गोलाध्याय, गणिताध्याय यांचें मराठींत भाषांतर यांनीं सोपपत्तिक केलें आहे आणखी यांनीं वरेच ग्रंथ रचिले पण ते हस्तलिखितातच अद्याप असल्यानें लोकांसमोर नाहींत. ज्ञानकोशांत त्यांनीं आर्यज्योतिषशास्त्रशाखेचें संपादकत्व पत्करून आर्य ज्योतिषांतील अनेक अंगावर लेख लिहिले आहेत. इ. स. १९१९ त याचा काळ झाला.

**खानुआ**—राजपुताना. भरतपूर. रूपवास तहशीलींतील एक गांव उ. अ. २७° २' व पू. रे. ७७° ३३'. बाणगंगा नदीच्या डाव्या तीरालगत हें गांव वसलें आहे. भरतपूर शहराच्या दक्षिणेस १३ मैलावर हें गांव आहे. १९०१ सालीं या गावची लोकसंख्या १८५७ होती. याच गांवीं स. १५२७ च्या मार्चमध्यें बाबर व मेवाडचा राणा संग्रामसिंह व त्याचे रजपूत सैनिक यांच्यामध्यें मोठी लढाई झाली. प्रथम प्रथम ज्या चकमकी झाल्या त्यांत रजपूत विजयी होत. तेव्हां रजपुतांपुढें आपला निभाव लागणें कठिण असें पाहून बाबरानें मद्य पिण्याचें अजिबात सोडून दिलें. १५२७ च्या मार्चच्या १२ व्या तारखेस झालेल्या अखेरच्या लढाईंत रजपुतांचा पूर्ण पराभव होऊन स्वतः राणा जखमी झाला. धारातीर्थी पतन पावलेल्या लोकांत डुंगरपुरचा राजा उदयसिंग हा एक होता.

**खानेसुमारी**—अलीकडील काळांत नियमित कालावधीनें केवळ लोकसंख्या मोजण्याचें किंवा इसमवार उद्योगधंदे व शेतकीचीं साधनें मोजण्याचें किंवा मागील काळांत करविभागणी करण्याच्या हेतूनें घरदार, गुरेंढोरें, शेतवाडी वगैरे सर्व प्रकारची मालमत्ता मोजण्याचें जें काम सरकारतर्फे करण्यांत येत असतें त्याला खानेसुमारी हा शब्द लावतात.

पू र्वे ति हा स.—अशी खानेसुमारी करण्याचे उद्देश निरनिराळे असल्याचें प्राचीन काळापासून दिसून येतें. जमाबंदीच्या अधिकाऱ्यानें कर देणारी व न देणारी अशी घरें वेगळीं मोजून प्रत्येक गांवातील चारहि वर्णांच्या लोकांची संख्या मोजावी. शेतकरी, गुराखी, व्यापारी, कसबी, मोलकरी, गुलाम, द्विपाद व चतुष्पाद प्राणी यांची नक्की मोजदाद करावी. प्रत्येक घरांत तरुण व वृद्ध माणसें किती, त्यांचें चरित्र, धंदा, उत्पन्न व खर्च यांची माहिती काढावी त्याचप्रमाणें भ्रमणशील लोकांच्या स्थलांतराचीं कारणें वगैरे शोधावीं असें कौटिलीय अर्थशास्त्रात ५४-५५ व्या अधिकरणांत सांगितलें आहे. या गणतीचा हेतु मुख्यतः राज्याचें उत्पन्न वाढविण्याचा असे. पूर्वी एकदा इस्रायल लोकांतील वीस वर्षांवरील सर्व पुरुषवर्गाची खानेसुमारी करण्यांत आली होती, तिचा उद्देश त्यावेळीं त्या समाजांत युद्धोपयोगी माणसें किती आहेत तें ठरविण्याचा होता डेव्हिडच्या आज्ञेवरून जोआबनेंहि याच उद्देशानें एकदा खानेसुमारी केली होती, आणि त्यामुळें जे अनिष्ट परिणाम भोगावे लागले त्याचा उच्चार १८ व्या शतकाच्या मध्यापर्यंत खानेसुमारीविरुद्ध असणारे लोक करीत असत. इराणच्या प्राचीन राज्यांत खंडणी ठरविण्याच्या कार्याकरितां प्रत्येक प्रांताची खानेसुमारी घेण्याची योजना अमलांत होती असें दिसतें. यानमध्येंहि प्रांतवार करवसुलीच्या व सैन्यभरतीच्या कार्याकरितां लोकसंख्येची व मालमत्तेची गणना करण्याची पद्धति पूर्वापार चालू होती. ईजिप्तमध्यें प्रत्येक मनुष्याचा धंदा नोंदून ठेवण्याची वहिवाट असे त्याचा उद्देश अनीतीच्या मार्गांनीं उदरंभरण करणाऱ्यांना आळा घालून सार्वजनिक नीतिमत्ता सुधारावी असा होता आणि हीच पद्धति पुढें सोलननें आपल्या राज्यपद्धतींत समाविष्ट केली असें हिरोडोटसचें म्हणणें आहे. तथापि पुढें उपर्युक्त उद्देश मागें पडून मतदारांची नोंद करणें हा खानेसुमारीचा उद्देश बनला.

प्राचीन रोममध्यें खानेसुमारी करण्याची व्यवस्थित पद्धति प्रथम सुरू झाली. अगदीं पहिली खानेसुमारी प्राचीन रोमन राजा सर्व्हियस ट्यूलियस यानें केली आणि त्यानें केलेल्या एका कायद्यावरून असें दिसतें कीं, सर्व लोकांची त्यांच्या मालमत्तेसुद्धां-जमीन, गुरेंढोरें, गुलाम व इतर नोकर यांसुद्धां-खानेसुमारी दर पांच वर्षांनीं करावी असा नियम त्यानें घातला. पुढें पुढें या खानेसुमारीला कर वसुलीचें साधन इतकेंच आर्थिक स्वरूप आलें. आगस्टस बादशहाच्या वेळेपासून खानेसुमारी सर्व साम्राज्याची होऊं लागली. सेंट ल्यूकच्या गॉस्पेलमध्यें तर असे शब्द आहेत कीं, त्यानें (आगस्टसनें) "सर्व पृथ्वीवरील मनुष्यमात्रावर कर बसवावा व त्याकरितां सर्वांची खानेसुमारी करावी" असा हुकूम सोडला होता एवढें अवाढव्य गणनेचें काम पार पाडण्याच्या कार्यांत मरेपर्यंत तो बादशहा व्यग्र झालेला होता, परंतु तें कार्य त्याच्या हातून पुरें झालें नाहीं. त्यानंतरच्या मध्ययुगांत इंग्लंडमध्यें पहिल्या वुइल्यमचें डुम्स डे बुक व पार्लमेनचें मेन्झियरी हीं नोंदबुकें तयार झालीं. तीं रोमन खानेसुमारीच्या पद्धतीवरच हुबेहुब होतीं.

आधुनिक पद्धति.—खानेसुमारीच्या प्रचलित पद्धतीचा पाया यूरोपात १७ व्या शतकाच्या उत्तरार्धात घातला गेला. या कामात पुढाकार स्वीडननें घेतला. त्याकरता पॅरिसमध्यें (खेड्यात) क्लर्जी (पुरोहित) लोकांनीं जन्म, मृत्यु व विवाह यांची नोंद करून ठेविली पाहिजे असा सक्त नियम करण्यात आला. पुढें याच नोंदवुकांत खेड्याच्या हद्दींतील सर्वच रहिवाशाची नोंद करून ठेवावी असा कायदा करण्यात आला फ्रान्समध्यें कोलवेरनें १६७० त पॅरिसमध्यें जन्म-मृत्यूची नोंद करून ती माहिती ठराविक मुदतीनें प्रसिद्ध करण्याची फार वर्षे चालू असलेली पद्धति गावोगावीं सुरू केली या सालच्या पूर्वीच पाच वर्षे नियतकालिक कुटुंब व लोक गणनेची पद्धति न्यू फ्रान्स नामक वसाहतींत सुरु करण्यात आली होती. क्विबेकमध्यें १६६५ पासून ती सुरु झाली. याप्रमाणें आधुनिक खानेसुमारीची पद्धति अस्तित्वात आली.

खानेसुमारीच्या वेळीं कोणकोणत्या बाबींसंबंधींची माहिती पुष्कळशी बिनचुकपणानें मिळविता येईल व अशा माहितीची प्रातवारीनें परस्पर तुलना करता यावी म्हणून ती कोणत्या स्वरूपात नोंदून ठेवावी, या दोन मुद्यासंबंधानें आकडेशास्त्रातील पंडितात १८७२ पासून बरीच भवति न भवति झालेली आहे यापैकीं पहिल्या मुद्यासंबधानें असें ठरलें आहे कीं, कुटुंबातील प्रमुखावर या बाबतींत भिस्त न ठेवता जर सरकारनें लायक अधिकारी नेमून माहिती मिळविली तर पुष्कळ प्रकारची माहिती मिळविणें शक्य आहे. हें ध्येय साधण्याकरिता प्रत्येक खानेसुमारीच्या वेळीं अधिकाधिक दक्षता ठेवण्याचे प्रयत्न अलीकडे करण्यात येत आहेत. राष्ट्राराष्ट्रांची व देशादेशाची तुलना करणाच्या दृष्टीनें वय, स्त्रीपुरुषभेद, सापत्तिक स्थिति, जन्मठिकाण, शारीरिक व्यंगें, धंदा इतक्या गोष्टींचा खानेसुमारीच्या माहितीपत्रकात समावेश करणें जरूर आहे. याच नमुन्यावर जर्मनी, फ्रान्स, बेल्जम,कानडा व युनायटेड स्टेट्समध्यें खानेसुमारी करण्यात येत असते. धार्मिक पंथ किंवा संप्रदाय कोणता हें कलमहि घालण्याची कित्येक देशात जरूरी असते तसेंच राष्ट्रजाति किंवा मातृभाषा कोणती हें कलम पुष्कळ ठिकाणीं घालतात. याप्रमाणें बहुतेक मुद्यासंबंधानें हल्लीं सर्वत्र एकवाक्यता झालेली आहे.

ग्रेट ब्रिटन व आयर्लंड.—१९व्या शतकापर्यंत येथील लो. सं. किती यावद्दल केवळ अंदाजी माहिती असे. १७५३ मध्यें लोकसंख्येची वार्षिक गणना करावी अशाबद्दल एक सूचना कामन्ससभेंत मांडली गेली होती, परंतु 'यानें इंग्रज रयतेचें उरलेंसुरलें तेंहि सर्व स्वातंत्र्य जाईल' तसेंच या गणतीमुळें 'काहीं तरी मोठें अरिष्ट किंवा रोगाची साथ खास उद्भवेल.' असले आक्षेप घेऊन कित्येक सभासदांनीं सदरहू सूचनेला जोराचा विरोध केला. तथापि कामन्ससभेनें सूचना [illegible] पण लॉर्डांच्या सभेनें ती साफ फेंटाळून लावण्यात सूचनेला महत्वाचा आक्षेप असा होता कीं, असल्या गणतीमुळें इंग्लंडजवळ युद्धोपयोगी मनुष्यबळ किती आहे हें शत्रूंना कळेल पुढें लवकरच माल्थसचे लोकसंख्ये संबंधाचे निबंध प्रसिद्ध होऊन लोकसंख्या व अन्नाचा पुरवठा याचें परस्पर प्रमाण काय आहे तें मधून मधून नक्की समजणें जरूर आहे असें मत लोकांत उत्पन्न झालें आणि १८०० मध्यें खानेसुमारीसंबंधान एक सूचना पार्लमेंटात येऊन ती बिलकुल विरोध न होता पास झाली. त्याअन्वयें ग्रेटब्रिटनची खानेसुमारी पुढील सालच्या मार्च महिन्यात करण्यात आली त्या कामाकरिता इंग्लंडात जस्टिसेस ऑफ पीस,कान्स्टेबल्स व स्कॉटलंडात शाळामास्तर, शेरीफ याची मदत घेण्यात आली होती शिवाय प्रत्येक खेड्या( पॅरिस ) मधील जन्म, मृत्यु व विवाह याचे आकडे उपाध्यायांनीं ( क्लर्जीनीं ) पार्लमेंटकडे पाठवावे असें ठरलें पुढें १८११, १८२१, १८३१, १८४१ याप्रमाणें दहा दहा वर्षांनीं खानेसुमारीचें काम करण्यात येऊन प्रत्येक वेळीं माहितीच्या सदरात कामाच्या पद्धतींत आणि बिनचुकपणात सुधारणा होत गेली. १८५१ ची खानेसुमारी सर्व बाजूंनीं व्यवस्थित होऊन तीच व्यवस्था अद्याप चालू आहे. १८७१ मध्यें मेंदू बिघडलेल्या पण वेड्याच्या इस्पितळात नसलेल्या लोकांच्या नावाची स्वतंत्रपणें नोंद करण्यात आली इ. स. १८९१ मध्यें वडिलोपार्जित इस्टेटीवर निर्वाह करून निरुद्योगी रहाणाऱ्या लोकांची स्वतंत्र नोंद केली गेली. याप्रमाणें प्रत्येक वेळीं एखाददुसरी माहिती स्वतंत्रपणें नोंदविण्याची सुधारणा होत असते. स्कॉटलंडमध्यें खानेसुमारी इंग्लंडबरोबरच व त्याच पद्धतीवर होत आलेली आहे एखादे वेळीं एकाद्-दुसरें सदर अधिक दाखल करण्यात येतें. उदा १८६१मध्यें एक किंवा एकाहून अधिक खिडक्या असलेल्या खोल्या किती आहेत याची नोंद करविण्यात आली व त्यावरून मनुष्यवस्तीस योग्य अशी जागा किती व दर खोलीस माणसांचें प्रमाण किती वगैरे सरासरी ठरविली गेली.

आयर्लंडमध्यें १६७२ त व नंतर १७१२मध्यें शिरगणति करण्यात आली पण तिचा मुख्य उद्देश शेगडी पट्टी ( हार्थमनी ) जमा करण्याला मदत हा होता. खरा व्यवस्थित प्रयत्न १८११ व १८२१ मध्यें करण्यात आला पण काम नीट झालें नाहीं १८३१ मध्यें गणतीदारांना नोंदीच्या संख्येच्या मानानें मेहेनताना देण्याचा नियम केल्यामुळें आकडेवाढ लबाडीनें दाखविण्यात आली यामुळें तीन वर्षांनीं पुन्हां गणति व दुबार खर्च करावा लागला. १८४१तील खानेसुमारी मात्र नीट व्यवस्थितपणें पार पडली. तेव्हांपासून इंग्लंडपेक्षाहि अधिक सदरें घालून विस्तृत माहिती मिळविण्यात येत असावी. धार्मिक पंथ, शिक्षणमर्यादा, वसतिस्थानाचा तपशील वगैरे अधिक सदरें ऐरिश नोंदवुकात असतात.

ब्रिटिश वसाहती व ब्रिटन शासित देश.—ब्रिटिश साम्राज्याच्या सर्व विभागात एकाच वेळीं एकाच

पद्धतीवर खानेसुमारी व्हावी अशी पुष्कळांची इच्छा आहे परंतु त्या कामीं अडचणी फार येतात उदा वेलेसवर्थाने पाहता ब्रिटिशसाम्राज्य भूपृष्ठावरील सर्व भागात असल्यामुळे इंग्लंड, कानडा, आस्ट्रेलिया व आफ्रिका येथ एकाच वेळी सारखे ऋतु व हवामान नसतं त्यामुळे इग्लंडात खानेसुमारीला सोयीची जी तारीख ती उष्णकटिबंधातील किंवा दक्षिण गोलार्धातील साम्राज्यविभागात गैरसोयीची ठरते शिवाय राज्यकारभ रपद्धति प्रत्येक विभागात निरनिराळी असल्यामुळे नोंदणीपुस्तकातील सदरेंहि थोडीफार बदलावीं लागतात तथापि १९०५ मध्ये स्त्रीपुरुषभेद, वय, सांपत्तिक स्थिति, जन्मठिकाण, धदा व शक्य तेथें शिक्षण, धार्मिक पथ व शारीरिक व्यग इतकी सदरें भरून सर्व साम्राज्यविभागाची माहिती प्रसिद्ध करण्यात आली

का न डा —या भागात पहिली खानेसुमारी १६६५ त झाली होती त्यावेळीं कुटुंबवार नोंद करून कुटुंबातील प्रत्येक व्यक्तीबद्दल लिंगभेद, वय, सांपत्तिक स्थिति व धदा यानद्दल माहिती घेतलेली होती पुढें ब्रिटिश सत्तेखाली कानडा आल्यावर १७६५ व १७८४ मध्यें खानेसुमारी करण्यात आली १८२४ ते १८४२ पर्यंत दरसाल गणना करण्यात येत असे १८७१ त सयुक्त कानडाची पहिली खानेसुमारी झाली व तेव्हापासून दशवार्षिक गणना चालू आहे कोष्टकाचा नमुना युनायटेड स्टेटसच्या पद्धतीवर व विशेष तपशीलवार असतो व प्रत्येक गृहस्थाला ५६१ प्रश्नाची उत्तरें द्यावीं लागतात ही माहिती भरून देण्याचें काम घरवाल्यावर न सोंपवता स्वतंत्र नोंदणीदाराकडून करविण्यात येतें येथें अतर्गमन नेहमीं चालू असल्यामुळें खानेसुमारीच्या वेळीं प्रत्येक व्यक्तीची आई व बाप यांचें जन्मठिकाण, राष्ट्रजाति व अतर्गमनाची तारीख,सन वगैरे नमूद करण्यात येत असते

आ स्ट्रे लि या —येथ प्र।म मोठी वसाहत गुन्हेगाराचीच असल्यामुळें थोड्याशा स्वतंत्र वसाहतवाल्यापुरती १७८८ पासून खानेसुमारी होऊ लागली. पण १८५० पर्यंत त्यात पद्धति व बिनचूकपणा मुळींच नव्हता १८२८ मध्यें प्रथम सर्व लोकाची व्यवस्थेशीर खानेसुमारी करण्यात आली १८४१ मध्यें न्यूझीलड व टॅस्मानिया याची पृथक खानेसुमारी झाली १९०१ पासून आस्ट्रेलियातील प्रत्येक स्टेटची खानेसुमारी पृथक्पणें होते

द क्षि ण आ फ्रि का —केप ऑफ गुड होप व आसपासचा प्रदेश हस्तगत केल्यापासून नेदर्लंड्स ईस्ट इंडिया कपनी' ही तेथील लोकसख्या गुरेंढोर व शेतींचें उत्पन्न याची दरसाल गणना करीत असे १६८७ पासून पुढील शभर वर्षांचे असलेले रिपोर्ट उपलब्ध आहेत पुढें ब्रिटिशानी तीच पद्धत चालू ठेवली १८६५ पासून दशवार्षिक गणनापद्धति सुरू झाली बोअर युद्धाच्या गडबडीमुळें १९०१ ची खानेसुमारी १९०४ साली करण्यात आली माहितीपत्रकातील सदरें आस्ट्रेलियातील पद्धतीवर असतात नाताळची खानेसुमारी १८९१ पासून स्वतंत्र होत असते त्यात प्रथम काफीर लोकाची गणती करीतच नसत, पुढें करू लागले पण काफीर व हिंदी मजूर याची गणना गोऱ्या वसाहतवाल्यापासून पृथक् व त्याची माहिती थोडक्या सदरात दिलेली असते. शिवाय इकडे अडाणी मजुराची वस्तीच पुष्कळ असल्यामुळें खानेसुमारीच्या कामाला भरपूर माणसेंच मिळत नाहीं म्हणून उत्तर होडेशिया, ब्रिटिश पूर्व आफ्रिका, नायगेरिया, गॅबिया, सीरा लिऑन व लॅगॉस येथील खानेसुमारी १९०६ पर्यंत मुळींच करण्यात आली नव्हती

वि वे स्ट इ डी ज.—या द्वीपसमुदायापैकीं प्रत्येक पृथक् राजकीय विभागाची खानेसुमारी पृथक् होत असते. १८७१ पासून ती साधारणपणें एका ठराविक तारखेच्या सुमारास मात्र होते माहितीचीं सदरें प्रत्येक विभागात भिन्न असतात क्वचित् असा भेद क्वचित् आहे हिंदी मुदतबद्ध मजुराची माहिती मात्र तपशीलवार जमवितात

इ त र दे श.—करवसुलीच्या कामाकरिता म्हणून स्थानिक अधिकाऱ्याकडून देशातील लोकाची गणति करण्याची पद्धति यूरोपखडात इ स १४ व्या शतकापासून अस्तित्वात असल्याचा पुरावा आहे उदा फ्रान्समध्ये चुलपट्टी (हार्थ टॅक्स ) निमित्त अशी गणती करीत असत. राज्यकारभारविषयक कामानिमित्त लोकगणना करीत असल्याचें उदाहरण यूरोप खडाबाहेर दूर चीनदेशात आढळतें येथें शिरपट्टी वसूल करण्याकरिता म्हणून लोकाची गणति १७११ मध्यें केली, तेव्हा लोकसख्या अवघी २८० लक्ष भरली. पुढें चाळीस वर्षांनीं दुष्काळपीडित दश झाला त्या वेळीं दुष्काळमदत देण्यास लायक अशा लोकाची मोजदाद करण्याकरिता गणति केली आणि आश्चर्य असें कीं त्यावेळीं लोकसख्या १०३० लक्ष भरली करवसुली इत्यादि राजकीय हेतूव्यतिरिक्त नियतकालिक लोकगणना करण्याची कल्पना प्रथम १६८६ मध्यें स्वीडन देशात उद्भवली, तथापि तेथेंहि प्रथम खेड्याच्या उपाध्याया( पॅरिशच्या क्लर्क)मार्फत जन्ममृत्यु नोंदीच्या स्वरूपात गणति होत असे तेथें स्वतंत्र अशी खानेसुमारी प्रथम १७४९ मध्यें झाली पुढल्या साली स्वीडनचें अनुकरण फिनलडनें केलें व त्यानतर वीस वर्षांनीं नार्वेनें केलें १८ व्याच शतकांत दुसऱ्या अनेक देशानीं खानेसुमारी केली यापैकीं स्पेन हा एक होता पण येथें भरवशालायक आकडे १८८७ पर्यंत सुद्धा मिळत नसत इटालीतील काहीं लहान लहान सस्थानात १७०० च्या सुमारापासून खानेसुमारी करीत असत पुढें इटली स्वतंत्र होऊन सर्व इटलीचें एक राज्य बनल्यावर १८६१ पासून सर्व इटलीची खानेसुमारी होऊ लागली आस्ट्रियात १७५४ मध्यें पॅरिशच्या क्लर्कांकडून गणती करण्यात आली पुढें वीस वर्षांनीं हंगेरीच्या कांहीं भागांत करण्यात आली तथापि १८५७ पर्यंत व्यवस्थित खानेसुमारी आस्ट्रियाहगेरींत होत नव्हती सर्व

साधारणपणें असें म्हणतां येईल कीं, १८२५ ते १८६० च्या दरम्यान यूरोपांतील सर्व देशांत नियमित खानेसुमारी होण्यास सुरवात झाली. सर्व जर्मन संस्थानचें एक साम्राज्य बनलें. त्या वेळेपासून पंचवार्षिक गणति तेथें होऊं लागली. खानेसुमारी सुरू करण्याच्या बाबतींत शेवटचा नंबर रशियाचा आहे. १७२१ पासून रशियांत सैन्यभरती, करवसुली किंवा पोलीसभरती वगैरे राजकीय कारणाकरितां लोकांची गणति नियमित कालावधीनें करण्यांत येत असे. १८९७ सालीं प्रथम सर्व देशांत खानेसुमारी करण्यांत आली. त्या वेळीं रशियाची लोकसंख्या हिंदुस्थानच्या खालोखाल आहे असें निदर्शनास आलें. चीनचा नंबर लोकसंख्येंत पहिला आहे, पण त्या वेळीं चीनची लोकसंख्या नक्की कळली नव्हती. हिंदुस्थानांतल्याप्रमाणें रशियांतहि भाषा अनेक असल्यामुळें खानेसुमारीचीं नोंदबुकें अनेक भाषांत छापावीं लागतात. याशिवाय बाकी राहिलेले तुर्की साम्राज्य, अफगाणिस्तान, इराण, चीन, इंडोचायना हे आशियांतील देश, २/३ आफ्रिकेचा भाग आणि दक्षिण अमेरिकेचा बराचसा भाग या प्रदेशांतील लोकसंख्या किती आहे हें अद्यापहि निश्चितपणें सांगण्याची सोय झालेली नाहीं.

**युनायटेड स्टेटस्**—खानेसुमारीची अर्वाचीन पद्धति युनैटेड स्टेटस्मध्यें निघाली असें म्हणावें लागतें. स्वीडन व नार्वे देशांत १७४९ पासून पॅरिशमधील धर्मोपदेशकांकडून सक्तीनें जन्ममृत्यूची नोंद करवीत असत व नोंदबुकांतील माहिती खानेसुमारीच्या माहितीप्रमाणें विश्वसनीय असे. तथापि १८१५ पर्यंत नार्वेमध्यें खऱ्या स्वरूपाची खानेसुमारी झाली नव्हती. नार्वे, स्वीडन व युनायटेड स्टेटस् या तीन देशांपैकीं खानेसुमारीचा आद्यप्रवर्तक कोण असा प्रश्न आहे. युनायटेड स्टेटस् मध्यें १७९० त पहिली खानेसुमारी करण्यांत आली हें निश्चित असल्यामुळें अग्रमान या देशालाच देणें भाग आहे. खानेसुमारीचा प्रश्न निश्चित स्वरूपांत या वेळीं युनायटेड स्टेटस्मध्यें उपस्थित होण्याचें कारण असें कीं स्वातंत्र्यप्राप्तीनंतर लवकरच त्या देशाची राज्यघटना निश्चित करण्याच्या वेळीं कायदेमंडळांतील प्रतिनिधींच्या संख्येसंबंधानें प्रश्न निघाला. लोकसंख्येच्या मानानें प्रतिनिधी असावे असें मोठाल्या संस्थानांचें म्हणणें पडलें त्याला छोट्या संस्थानांनीं विरोध केला. तेव्हां तडजोड अशी झाली कीं, काँग्रेसचे दोन भाग असावे व त्यांच्या पैकीं प्रतिनिधिसभेचे सभासद लोकसंख्येच्या मानानें पाठविण्याचा हक्क संस्थानांना असावा असा ठराव झाल्यामुळें अर्थातच लोकगणना करणें जरूर झालें. यामुळें १७९० मध्यें पहिली खानेसुमारी करण्यांत आली. त्या वेळीं गुलाम व स्वतंत्र असे लोकांचे दोन मुख्य वर्ग पडून नंतर स्वतंत्र लोकांचे गोरे व इतर असे भेद, नंतर स्वतंत्र गोऱ्या लोकांत स्त्री-पुरुष, आणि स्वतंत्र गोऱ्या पुरुषांमध्यें सोळा वर्षांच्या आंतले असे वर्गीकरण करण्यांत आलें. १८०० च्या खानेसुमारींत वयोमानानुसार स्त्री व पुरुष यांचे पांच वर्ग पाडण्यांत आले. १८१० च्या गणतीमध्यें कला व उद्योगधंदे याच्यासंबंधानें सविस्तर माहिती नोंदण्यांत आली. १८२० मध्यें शेतकी, उद्योगधंदे व व्यापार अशा सदराखालीं पृथक् नोंद करण्यांत आली. १८३० मध्यें परके लोक, बहिरे, मुके व आंधळे यांची पृथक् नोंद झाली. १८५० च्या खानेसुमारीकरितां कायद्यानें एक स्वतंत्र सेन्ससबोर्ड स्थापण्यांत आलें. १८५० सालची खानेसुमारी फार विस्तृत प्रमाणावर झाली. या वेळीं सहा पृथक् तक्ते करून एका तक्त्यांत स्वतंत्र रहिवाशी, दुसऱ्यांत गुलाम, तिसऱ्यांत गतसालचे मृत्यू, चवथ्यांत शेतकी, पांचव्यांत औद्योगिक कारखाने व सहाव्यांत सामाजिक गोष्टींसंबंधानें आंकडे अशी माहिती जमविण्यांत आली. १८६० ची खानेसुमारी पूर्णपणें मागील नमुन्यावर झाली. १८७० ची खानेसुमारी गुलामांच्या स्वातंत्र्यानिमित्त झालेल्या युद्धानंतर झाली पण ती बरीच सदोष झाली. १८८० च्या खानेसुमारीच्या वेळीं खानेसुमारीच्या कायद्याची दुरुस्ती करण्यांत आली व स्वतंत्र सेन्सस ऑफिस उघडण्यांत आलें. यावेळेची एकंदर सविस्तर माहिती प्रसिद्ध करण्यास वीस पुस्तकें लागलीं. हा सेन्सस-रिपोर्ट म्हणजे एक मोठा ज्ञानकोशच झाला. पुढील खानेसुमाऱ्या याच नमुन्यावर होत गेल्या. तथापि १८९० ची गणती चुकीची झाली असा प्रथम फार गवगवा झाला. कारण त्या गणतींत लोकसंख्या अनुमानाच्या मानानें फार कमी भरली. १८८०, १८६०, १८५० वगैरे मागील आठदहा खानेसुमाऱ्यांत लोकसंख्या दर वेळीं शेंकडा २५ ते ३० पर्यंत वाढत असल्याचें सिद्ध झालें होतें, आणि १८९० सालीं ही वाढ फारच अल्प झाल्याचें खानेसुमारींत दिसून आलें, आणि वाढ मागील प्रमाणाच्या मानानें न होण्याचीं कांहीं विशिष्ट कारणेंहि सेन्ससच्या अधिकाऱ्यांना दाखवितां आलीं नाहींत. अर्थात गणतींत चुका झाल्या अशी ओरड झाली. सदरहू रिपोर्टांत दहा वर्षांखालील मुलांचा आंकडा स्वतंत्र दिलेला असल्यामुळें व हा आंकडा मागच्यामानानें फार कमी भरल्यानें १८८० ते १८९० च्या दहा वर्षांत जन्म फार कमी झाले व त्यामुळें लोकसंख्या मागील मानाप्रमाणें वाढली नाहीं असें ठरलें. १९०० च्या खानेसुमारींतहि लोकसंख्येंत फारशी वाढ झाल्याचें आढळलें नाहीं तेव्हां गणती चुकली हा आक्षेप फोल ठरला व वाढ मागील प्रमाणांत न होण्याचीं कारणें निराळींच असलीं पाहिजेत असें निश्चित झालें.

युनायटेड स्टेट्समध्यें लोकसंख्येनुसार प्रतिनिधी पाठवावे असा कायदा असल्यामुळें लोकसंख्येचे आंकडे मुद्दाम वाढवून सांगितले जाण्याचा संभव होता, तो टाळण्याकरितां प्रत्यक्ष कराचा बोजा लोकसंख्येनुसार बसविण्याचें काँग्रेसनें त्याच वेळीं ठरविलें. या दोन परस्परविरुद्ध अशा हितसंबंधांमुळें लोकांची वृत्ति समतोल राहून लोकसंख्या कमीअधिक न

होती बरोबर नोंदली जाईल अशी योजना करण्यात आली होती. सेन्ससचें स्वतंत्र ऑफिस व तज्ज्ञ अधिकारी नेमून खानेसुमारीचें काम बिनचूक व निर्दोष होण्याबद्दल पूर्ण खबरदारी घेण्यात येऊं लागली.

खानेसुमारीच्या वेळीं जमविलेल्या विविध व विस्तृत माहितीची संकलित मांडणी वीस पंचवीस पुस्तकात करण्याच्या एकंदर कामाला कालावधि बराच लागू लागल्यामुळें एकंदर कामाचे मुख्य व दुय्यम असे भाग करण्यात आले व मुख्य माहिती तावडतोब प्रसिद्ध करून दुय्यम माहिती दहा वर्षांत प्रसिद्ध व्हावी असें ठरलें. दुय्यम भागातील माहिती सदोष व चुकीची असण्याचा फार संभव असतो. उदा० शेतकीविषयक माहितींत मुख्य मुख्य पिकें शेतात किती पिकतील व त्याची किंमत काय येईल हें पुष्कळशा शेतकऱ्याना बिनचुक सागता येणें शक्य नसतें. कारखान्यासंबधानें माहितीहि चुकीची असण्याचा संभव फार असतो.कारण अशी माहिती लोकात जाहीर प्रसिद्ध झाल्यानें इतराना चढाओढ करण्यास सोईचें होईल अशा भीतीमुळें तसेच हिशोब ठेवण्याची पद्धति सर्व कंपन्या व कारखानदार याची एकच नसल्यामुळें बरोबर माहिती मिळत नाहीं. सेन्सस-कामगाराच्या मार्गांत या अडचणी आहेत. तथापि उत्तरोत्तर बिनचूक माहिती मिळविण्याची खटपट चालू आहे. आणि अनेक महत्वाच्या बाबतींत आकडेवार माहिती पुष्कळ देशात मुळींच उपलब्ध नसते त्या मानानें पाहता अमेरिकेला असल्या ठोकळ आकड्यानींहि पुष्कळ व्यावहारिक उपयोग करून घेता आला आहे.

खानेसुमारीच्या कामात आकड्याचे तक्ते भरणें व ते तपासून पाहणें हीं कामें फार त्रासदायक व फार वेळ खाणारीं असतात, हीं कामें विद्युद्यंत्राच्या साहाय्यानें सुलभ रीतीनें करण्याची युक्ति अमेरिकेनें काढून सेन्ससच्या कामात मोठी सुधारणा केली आहे. या युक्तीनें विद्युत्प्रवाहाच्या साहाय्यानें आकडे तावडतोब तपासून पाहता येतात व फार वेळ वाचतो. युनायटेड स्टेट्समधील खानेसुमारीसंबंधानें दुसरी महत्त्वाची गोष्ट ही कीं, सदरहु कामाला खर्च इतर देशाच्या मानानें फार अधिक लागतो व हा खर्चाचा आकडा १७९० मध्यें ४४,३७७ डॉलर होता तो १९०० मध्यें १,११,१६,९३० डॉलरवर गेला. इंग्लंडमध्यें १९०० च्या खानेसुमारीबाबत माणशीं खर्च २.२४ सेंट व युनायटेड स्टेट्समध्यें २१.१६ सेंट आला म्हणजे इंग्लंडचा खर्च अमेरिकेच्या खर्चाच्या अजमासें एकदशांश पडला. या खर्चाचें मुख्य कारण असें कीं, युनायटेड स्टेट्स मधील गणति पगारी नोकराकडून करवितात तर इंग्लंडमध्यें बहुतेक काम कुटुंबातील प्रमुख माणसाकडून बिन मोबदल्यानें करून घेतात. शिवाय युनायटेड स्टेट्समध्यें सेन्सस ऑफीस कायमचें असून त्यामार्फत अनेक प्रकारचीं माहितीपुस्तकें सरकार प्रसिद्ध करवितें. सरकी काढण्याच्या गिरण्या, त्यातील मजुराची संख्या व मजुरीनें दर याची माहिती देणारे रिपोर्ट त्या त्या हंगामात या आफीसकडून प्रसिद्ध होतात ' रस्त्यातील व विजेच्या आगगाड्या, धातूच्या व दगडाच्या खाणी, विजेच्या शक्तीनें व उष्णतेनें तयार होणारीं झाडें व वनस्पती, धर्मार्थ संस्था, वेड्याची व भिकाऱ्याची संख्या वगैरे अनेक प्रकारची माहिती याच आफीसकडून प्रसिद्ध होत असते. अलीकडे काँग्रेसनें आणखीहि कित्येक आकडेविषयक माहिती प्रसिद्ध करण्याचें काम या आफीसकडे सोंपविलें आहे. तात्पर्य, बर्लिनमध्यें सर्व जर्मन साम्राज्यासंबंधीं आकडेविषयक माहिती पुरविणारें जसें आफीस आहे तशाच प्रकारचें हें सेन्सस आफीस आहे.

सी लो न.—एकाच वेळीं सीलोनात व हिंदुस्थानात खानेसुमारी होत असते, कारण या दोन देशात लोकाची परस्पर जा ये सारखी चालू असते. सीलोनमध्यें कोष्टकात जात या सदराऐवजीं वंश सदर असतें. शिवाय १९०१ पर्यंत सीलोनात स्वतंत्र गणतीदाराकडून गणती न करविता ग्रेटब्रिटनमधील पद्धतीप्रमाणें ठरलेल्या तारखेच्या पूर्वी तक्ते घरोघर वाटून कुटुंबातल्या प्रमुख माणसाकडून ते भरवून घेत असत हल्लीं स्वतन्त्र गणतीदाराकडून तक्ते तयार करविले जातात

हिं दु स्था न —एका वेळीं व एकाच प्रकारच्या पद्धतीनें गणती केली जाणारा सर्वांत अत्यंत मोठा लोकसमुदाय हिंदुस्थानातला होय ब्रिटिश साम्राज्यातील एकंदर लोकसंख्येपैकीं ३/४ लोकसंख्या हिंदुस्थानात आहे. आणि पृथ्वीच्या पाठीवरील एकंदर लोकसंख्येचा १/५ एकट्या हिंदुस्थानात आहे. १८५२ आणि १८८१ याच्या दरम्यान प्रत्येक प्रांतात पृथक् खानेसुमारीचें काम करण्यात येत असे. १८८१ मध्यें वरिष्ठ सरकारमार्फत खानेसुमारीचें काम करण्यात आलें व तीच पद्धति तेव्हापासून चालू आहे दर खानेसुमारीच्या वेळीं नवा नवा प्रदेश समाविष्ट होत असतो. तसेंच रानटी व मागासलेल्या जातींमध्यें गणतीचे तक्ते विशेष तपशीलवार नसत, ते उत्तरोत्तर लोकाची समजूत पटू लागून तपशीलवार होऊं लागले आहेत काम करणारी माणसेंहि अधिकाधिक वाकबगार मिळू लागलीं असून काम अलीकडे बरच चोख होऊं लागलें आहे. हिंदुस्थानात ज्याना लिहिता वाचता येतें असे कुटुंबी शेंकडा ५ हून अधिक सापडत नाहींत, आणि खानेसुमारीचा तक्ता सर्व नीट भरून देता येईल असे इसम त्याहूनहि कमी आहेत यामुळें सुशिक्षित असलेल्या अत्यंत अल्प वर्गांतून या कार्याला लागणारे इसम मिळवावे लागतात. उपलब्ध होणाऱ्या थोडक्या गणतीदाराकडून एका रात्रींत सर्व नोंद होणें शक्य नसल्यामुळें कामाचे दोन भाग पाडतात. ठरलेल्या रात्रीं या पूर्वी थोडे दिवस सर्व तक्ते कच्चे भरून घेतात आणि ठराविक रात्रीं पुन्हा प्रत्येक घरीं जाऊन त्यात कमजास्त करून तक्ता पुरा करतात प्रत्येक गणतीदाराकडे अजमासें

३०० इसमाची नोंद करण्याचें काम येतें. याप्रमाणें १९०१ च्या खानेसुमारीत जवळ जवळ १० लाख गणतीदार लागले होते. शिवाय गणतीदाराच्या मदतीला, त्याच्यावर देखरेखीला, सर्व तक्ते गोळा करून खानेसुमारीच्या स्थानिक कचेरीकडे रवाना करण्याला आणखी एक लाखापर्यंत माणसें लागतात. तथापि येवढे इसम हल्लीं मिळू शकतात या कार्याला सरकारी आफिसें, म्युनिसिपालिटया, शाळा, कालेजें वगैरे संस्थांतील नोकरांची मदत होते. शिवाय विद्यार्थी व सुशीक्षित यांची स्वखुषीनें फुकट मदत मिळते खानेसुमारीच्या तक्त्यात स्त्रीपुरुष, वय, सांपत्तिक स्थिति, जन्म ठिकाण, धंदा शरीरव्यंग, मातृभाषा, धर्म व धार्मिक ग्रंथ, जात व पोटजात इतकीं सदरें असतात. हे तक्ते निरनिराळ्या वीस भाषांत छापविलेले असतात.

खानेसुमारीची तारीख चांदणी रात्र असेल, धार्मिक उत्सव, जत्रा, यात्रा वगैरे गोष्टी नसतील असें पाहून नेमावी लागते. खानेसुमारीच्या कामाच्या नियमाचें स्वतंत्र पुस्तक छापून वाटण्यात येतें तरी गणतीदाराच्या प्रत्यक्ष कामात चमत्कारिक अडचणी येतातच गणतीच्या रात्री बाहेरेसुके व वेडे इसम भटकताना आढळल्यास त्याच्याजवळून तक्त्यातील सर्व माहिती कशी विचारून घेणार ? दुसरी अडचण ही कीं कित्येक प्रांतात मौनव्रत धारण केलेले कित्येक संन्यासी असतात त्यांचें व्रत कोण व कसें मोडणार? भिल्ल वगैरे रानटी जातीचे लोक गणती करणाऱ्या इसमास घरात येऊंनच देत नसत. दुष्काळात मदत मिळेल वगैरे फायदे दाखवून त्यांची गणति करण्यास संमति मिळवावी लागते. इतर अडचणी म्हटल्या म्हणजे आगगाडयांतील प्रवासी, कित्येक दिवस बंदरास न लागणाऱ्या बोटींतून प्रवास करणारे लोक किंवा झाडें तोडण्याकरिता कित्येक दिवस जंगलातून जाऊन राहणारे लांकूडतोडे वगैरे लोकांची ठराविक रात्रीं गणति कशी करावयाची? या सर्व अडचणींवर सेन्सस अधिकाऱ्यांनीं उपाय काढलेले आहेत. उदाहरणार्थ, खानेसुमारीच्या दिवशीं संध्याकाळीं ७ वाजल्यानंतरच्या सर्व गाडया स्टेशनावर थांबवून तेथें गणति करण्याची व्यवस्था करतात

गणतीच्या कामाकरिता ३० ते ५० घराचा एक गट करून त्या ब्लॉकच्या गणतीकरिता एक गणतीदार नेमतात. असे १० ते १५ गट मिळून एक सर्कल बनवितात त्यात सुमारें ५०० घरें असून त्यावर सुपरव्हायझर नेमतात तालुक्यातील किंवा तहशीलींतील सर्व सर्कलवर अधिकारी चार्ज सुपरिंटेंडेंट म्हणून असतो. गणतीच्या दुसऱ्या दिवशीं गणतीदार फक्त लोकसंख्येचा आकडा सुपरव्हायझरला तावडतोब कळवितात. सुपरव्हायझर सगळे आकडे बेरीज करून चार्ज सुपरिंटेंडेंटकडे व ते तशीच बेरीज करून जिल्हाधिकाऱ्याकडे कळवितात. जिल्ह्यातील सर्व आकडयांची बेरीज करून ती एकूण संख्या तारेनें प्रॉव्हिन्शियल सुपरिंटेंडेंट व सर्व हिंदुस्थानचे कमिशनर याजकडे कळवितात. याप्रमाणें आठ दहा दिवसात सर्व हिंदुस्थानातील आकडे एकत्र होऊन गणतीच्या दिवसापासून पंधरा दिवसात लोकसंख्येचे आंकडे लोकांच्या माहितीकरिता प्रसिद्ध केले जातात. इतक्या जलदीनें काम होऊनहि शिवाय .०३ इतक्या अल्प प्रमाणात म्हणजे २९,४२,६६,७०१ या लोकसंख्येच्या एकूण आकड्यात ९४,३५५ इतकीच चूक १९०१ सालीं सांपडली होती हें पहिलें काम झाल्यावर प्रत्येक प्रांतांत स्त्री-पुरुष, विवाह, वय, शिक्षण वगैरे प्रत्येक सदराचे आकडे एकत्र करून त्याचे स्वतंत्र तक्ते तयार करणें व प्रत्येक सदरासंबंधानें चर्चात्मक माहिती लिहून सर्व रिपोर्ट तयार करण्याचें काम प्रांतोप्रांताचे सुपरिंटेंडेंट करतात. निरनिराळ्या सदरानुसार तक्ते तयार करण्यात १९०१ पूर्वी एक जुनी 'टिक' पद्धति म्हणून प्रचलित होती. ती फार भानगडीची असल्यामुळें चुका होण्याचा संभव फार असून कलाविधीहि फार लागत असल्यामुळें १९०१ च्या खानेसुमारीच्या वेळीं एच एच रिस्ले सेन्सस कमिशनर. यांनीं 'स्लिप' ( चिट्ठी ) पद्धति सुरू केली या स्लिप्स ( चिठ्या ) धर्म दर्शविण्याकरिता निरनिराळ्या रंगाच्या घेऊन स्त्रीपुरुषभेद व सांपत्तिक स्थिति ( सिव्हिल कंडिशन ) दर्शविण्याकरिता विवक्षित चिन्हें केलीं असतात. यामुळें ही माहिती लिहावी लागत नाहीं. शिवाय इतर माहितीकरिता संक्षेप उपयोगात आणतात. यामुळें एक मनुष्य एका दिवसात ५०० स्लिपा लिहून तयार करूं शकतो. स्लिप्सवरील माहिती तपासूनहि लवकर पहाता येते. यामुळें काम लवकर व बिनचूक होतें. आकडे तपासण्याकरिता हॉलेरिथ यंत्र वगैरे अमेरिकेंतील साधनें येथें वापरीत नाहींत.कारण हलक्या स्वरुपाचें कारकुनी काम करण्याला हिंदुस्थानात थोडक्या पगारावर भरपूर लोक मिळतात. उलटपक्षीं तज्ज्ञ लोक अल्प असल्यामुळें 'स्लिप्स' पद्धतीनेंच काम थोडक्या खर्चात व बरेचसें बिनचूक होतें. इ. स. १९११ सालच्या खानेसुमारीला हिंदुस्थान सरकारला २०.३ लाख रुपये ( १,३५,००० पौंड ) खर्च आला. म्हणजे माणशीं प्रमाण सरासरी हजाराला पाच सहा रुपये पडतें. हिंदुस्थानच्या खानेसुमारींत ब्रिटिश बलुचिस्तान, वायव्य सरहद्दीवरील प्रांत, ब्रिटिश ब्रह्मदेश, अंदमान निकोबार बेटें, सर्व देशी संस्थानें यांचाहि समावेश होतो.

१९०१ सालच्या रिपोर्टांत धर्मानुसार व मानवजातिवर्णनशास्त्रानुसार फार बारकाईनें माहिती देण्याचा प्रयत्न केलेला आहे. बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतासंबंधानें मिस्टर गेट याचा रिपोर्ट, मिस्टर रसेल यांची मध्यप्रांतातील जाती व रानटी लोकसंबंधींची चर्चा, मिस्टर एन्थोवेन यांची मुंबईतील विविध समाजाबद्दलची माहिती व मिस्टर रोज यांचा पंजाबातील विविध धर्मप्रसार व पोटजातींतील मिश्रविवाह या संबंधाचा उहापोह फार वाचनीय झालेला आहे.

*खापा*—मध्यप्रांतातील नागपूर जिल्ह्याच्या रामटेक तहशिलींतील एक शहर उत्तर अक्षांश २१° २५′ व पूर्व रेखांश ७९° २′. हें नागपूर शहराच्या उत्तरेस २२ मैलांवर कन्हान नदीवर वसलेलें आहे. हें नदीच्या कांठीं उंचवटयावर वसलेलें असून त्याच्या तीन बाजूंनीं गर्द झाडी आहे. इ. स. १८६७ मध्यें या शहराला म्युनिसिपालिटी देण्यांत आली. तीस चाळीस वर्षांपूर्वी हें शहर संपन्नस्थितींत होतें, पण हल्लीं त्याला उतरती कळा लागली आहे. जिकडे तिकडे गिरण्या निघूं लागल्यामुळें येथील हातमागाचा धंदा अगदींच बसून गेला आहे. अद्यापिहि या ठिकाणीं बायकांना लागणारीं रंगीत लुगडीं तयार होतात. याठिकाणीं आठवड्यातून दोन वेळां बाजार भरतो. येथें एक माध्यमिक शिक्षणाची व एक मुलींची शाळा असून एक दवाखाना आहे. पाटणसावंगीपासून खाप्यास जाण्यास खडीचा रस्ता आहे.

*खामगांव, तालुका*.—इ. स. १९०५ पर्यंत हा तालुका अकोला जिल्ह्यांत होता, पण नंतर हा तालुका बुलढाण्यांत गेला. उ. अ. २०° २६′ ते २०° ५५′ व पू. रे. ७६° ३२′ ते ७६° ४८′. क्षेत्रफळ ४४२ चौरस मैल अकोला जिल्ह्यांतील बाळापुर तालुक्यांत हा तालुका होता. परंतु इ. स. १८७० सालीं १४४ खालसा आणि ४ जहागिरीचीं गांवें निराळीं करून त्याचा खामगाव तालुका केला. इ. स. १८७२ सालीं आणखी एक सरकारी गांव जहागिरीचें केलें त्यामुळें हल्लीं या तालुक्यांत १४३ खालसा आणि ५ जहागिरीचीं गांवें आहेत. याच्या उत्तरेस जळगाव तालुका, पश्चिमेस मलकापूर तालुका, दक्षिणेस चिखली तालुका व पूर्वेस बाळापुर तालुका आहे. लोकसंख्या (१९११) १,०१,०६८. बुलढाणा जिल्ह्यांतील याच तालुक्यांत फक्त लोकसंख्येची वाढ झालेली दिसते. बरेच लोक व्यापारानिमित्त या तालुक्यांत आल्यामुळें ही वाढ झाली आहे.

जमीन खरीप आणि रबी पिकास योग्य आहे. महत्वाचीं पिकें कापूस, ज्वारी इत्यादि. या तालुक्यांत जलंबपासून खामगावपर्यंत रेल्वेचा फाटा आहे.

*शहर*.—खामगाव तालुक्याचें मुख्य ठिकाण. उ. अ. २०° ४३′ व पू. रे. ७६° ३८. जी. आय. पी. रेल्वेच्या जलंब स्टेशनापासून खामगावपर्यंत ८ मैल रेल्वेचा फाटा आहे. लोकसंख्या १९०१ सालीं १०,१२३ होती. इ. स. १८७० स येथील कापसाचा बाजार हिंदुस्थानांत सर्वांत मोठा होता, परंतु हल्लीं ती स्थिति नाहीं. येथें बरेच सरकी काढण्याचे व रुई दाबण्याचे कारखाने आहेत. आठवड्याचा बाजार दर गुरुवारीं भरतो. गावाच्या आसपास झाडी बरीच असून गांव बराच चांगला दिसतो. सिव्हिलकोर्ट, दवाखाना, पोष्टऑफीस इंग्रजी शाळा वगैरे येथें आहेत. येथें एक देशमुखाचा किल्ला आहे. गावाबाहेर एक वेस असून ती पूर्वी गावाभोंवती असलेल्या तटापैकीं असावी. या तटापैकीं कांहीं अवशेष अजून आहेत. इ. स. १८६७ सालीं येथें म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. गावांत अलीकडील तऱ्हेनें बांधलेल्या इमारती फारशा नाहींत. जरी व्यापार पुष्कळ आहे तरी दुकानें व्यवस्थित रीतीनें बांधलेलीं नाहींत. गावाच्या दक्षिणेस सुमारें २॥ मैलावर एक तलाव आहे. त्याचें पाणी गावांत आणलें आहे. गावाला पाण्याची टंचाई आहे. तलावाजवळच म्युनिसिपालिटीचा एक मोठा बाग आहे.

*खायबर*.—हिंदुस्थान आणि अफगाणिस्तान यामधील एक अतिशय महत्त्वाचा मार्ग. हा वायव्य सरहद्द प्रांतांतल्या पेशावर जिल्ह्यातून सुरू होतो. याचा मध्य उ. अ. ३४° ६′ व पू. रे. ७१° ५′ यावर आहे. हा मार्ग ज्या डोंगराच्या रांगामधून जातो त्यानांहि हेंच नांव लावितात. वार्टत अली मस्जीद ( पहा ), लंडी कोटल व तोरखमल हीं मुख्य स्थळें लागतात. ही वाट फार चढउताराची व बिकट आहे. पुरातन काळापासून हें हिंदुस्थानचें महाद्वार म्हणून प्रसिद्ध आहे. इराणी आणि ग्रीक सेल्युक, तार्तर मोंगल आणि दुराणी विजेते याच द्वारातून शिरले अलेक्झांडर, गझनीचा महमद, बाबर, हुमायून, नादिरशहा आणि अहमद शहा अब्दाली याच मार्गानें इकडे आले हा ऐतिहासिक मार्ग आताप्रमाणें मागेंहि आफ्रिडी पठाणाकडे असे. मोंगल बादशहांनीं आपल्या कब्जांत हा मार्ग ठेवण्याचा फार प्रयत्न केला होता. पण त्यांना त्यांत फारसें यश आलें नाहीं. १८३९ त ब्रिटिशांनीं प्रथमच हा मार्ग चोखाळला त्यावेळीं शहा सुजाचा पुत्र शहा तीमूर शहा याला काबूलला नेऊन सोडण्याचें काम कॅप्टन वेडनें केलें अफगाणयुद्धांत या मार्गानें जाणाऱ्या ब्रिटिश सैन्याला आफ्रिडी लोकांनीं चांगलाच हात दाखविला. १८७९ त ब्रिटिश सरकार व अमीर याकुबखान यामध्यें जो तह (गंडमक) झाला त्या अन्वयें खायबर मार्गाचा ताबा ब्रिटिशाकडे गेला व त्यांनीं आफ्रिडी लोकांना याची व्यवस्था ठेवण्यासाठीं दरसाल द्यावयाची रक्कम ( रु ८८५४० ) ठरवून टाकिली १८९७ सालीं आफ्रीडींनीं बंड केल्यावरून त्यांचा सैन्य पाठवून मोड करण्यांत आला व पुन्हा नवा करार करून घेतला. [सर रॉबर्ट वारबर्टन—एटीन ईयर्स इन् दि खायबर ]

*खारगवान*—कोरिया संस्थानातील ७२ खेड्यांची दक्षिणेकडील जमीनदारी. जमीनदार जुन्या गोंड घराण्यांतील असून ७७२ रु संस्थानास खरोळी देत असतो. येथील जंगलांतील उत्पन्नावर जमीदाराचा हक्क असून चराईपैकीं फक्त ½ उत्पन्न संस्थानचें असतें. खारगवांत गावाभोंवतीं बांबूचें रान असून गावांत पोलीस चौकी व शाळा आहे.

*खार पाडणें*—खार पाडणें म्हणजे समुद्राच्या भरतीच्या पाण्यानें खराब झालेल्या जमीनीचा पुनरुद्धार. मुंबई इलाख्यांत कोंकणपट्टींत रत्नागिरी. कारवार, कुलाबा व ठाणें वगैरेंच्या समुद्रकिनाऱ्यावरील बऱ्याचशा भागांत खारी पाडण्यास योग्य अशा जागा आढळतात. कुलाबा जिल्ह्यांतील

पेण तालुक्यांत व ठाणें जिल्ह्यांतील साष्टी व वसई तालुक्यांत बऱ्याच खारी पाडलेल्या आहेत अशा तऱ्हेच्या खारी कोंकणपट्टीत खाड्यांच्या आजूबाजूस पूर्ण भरतीच्या खालीं असलेल्या जमिनींना बांध घालून तयार केलेल्या असतात. अशा खारींचा शेतीच्या अगर मीठ तयार करण्याच्या कामीं उपयोग करितात.

खारी पाडण्याचें काम सुरू करण्यापूर्वी बऱ्याच गोष्टींचा विचार करणें अत्यंत अवश्य आहे. जसे —(१) थोडक्या खर्चात काम होणें शक्य आहे किंवा कसें, (२) खर्चाच्या रकमेवर व्याज सुटेल किंवा नाहीं, (३) खार पाडल्यावर जमिनींत पीक होईल किंवा कसें या गोष्टींचा पूर्ण विचार करून मग त्या जमिनीची मोजणी करावी व नकाशा काढावा. पूर्ण भरतीचें पाणी कोठपावेतों येतें तें पाहून त्याप्रमाणें लेव्हल्स घ्याव्या व बांध घालण्याची नक्की दिशा नकाशावर दाखवावी.

बां ध घा ल णें —बांधाची रुंदी व उंची किती ठेवावयाची वगैरे गोष्टी भरतीचें पाणी किती उंचीपर्यंत पोंचतें, लाटा जोराच्या अगर कमजोराच्या असतात, यावर अवलंबून असतात लाटा जोरानें धडकत असल्यास बांधाची रुंदी जास्त ठेवावी लागते, कारण तशी न ठेविल्यास बांध वाहून जाण्याचा संभव असतो. साधारणपणें बांधाची तळची रुंदी १८ फूट व वरची ६ फूट असावी व तसेंच उंचीहि ६ फूट असावी. बांधाला खाडीकडील बाजूला जास्त उतार दिल्यास माती वाहून जाण्याचा संभव कमी असतो.

बांध असा आखावा कीं त्यांत लहानमोठीं खाड्यांचीं टोंकें येऊं नयेत व भरतीचें पाणीहि खारींत फार वेळ राहूं नये. बांधाची लांबी मात्र बऱ्याच अंशीं जमिनीच्या ठेवणीवर अवलंबून राहील, व मध्यें खाडी आल्यास बांधास वळण द्यावें. असें करणें शक्य नसल्यास खाडींचीं मध्यें आलेलीं खोलगट तोंडें मातीनें भरून काढावींत. बांध घालणें सुरू करण्यापूर्वी दोरीनें लाइन मारावी व बांधापासून सुमारें २५ते ३० फुटांच्या अंतरावर दहावीस फुटांचे औरस चौरस खोड करून पेंडसानें ( खणण्याचें हत्यार ) चिखलाचे गोळे काढून ते आखलेल्या ठिकाणीं टाकून ते पायांनीं सारखे तुडवावे व ह्याच पद्धतीनें बांध पुरा करावा.

ओहटीच्या वेळीं कोरडाया होणाऱ्या मोठ्या खाडीच्या भागांत खार पाडण्याचा असल्यास बांध घालण्याचें काम महिन्याच्या पहिल्या व दुसऱ्या पंधरवड्यांत षष्ठीपासून द्वादशीच्या आंत केलें पाहिजे कारण या तिथींत अमावस्येपौर्णिमेच्या ताणाइतकें पाणी चढत नाहीं.

मोठ्या व उथळ खाड्यांना बांध घालण्यापूर्वी पाया दगडांनीं भरून काढावा हे धोंडे काढतांना खालची रुंदी अजमासें चार फूट ठेवावी व वर चढवितांना पाण्याच्या बाजूला थोडा ढाळ द्यावा व वरची दगडाची रुंदी दान फूट असली तरी बस होते. असे धोंडे टाकून मग चिखलाचे गोळे टाकिल्यास पाण्यानें माती वाहून जात नाहीं. नंतर, त्याला लागूनच तिवरीचें ( खाऱ्या पाण्यांत होणारें एक झाड ) अगर वेळूचें कुंपण करावें व ताण येण्यापूर्वी बांध घालण्याचें काम पुरें झालें नसल्यास जागजागीं सुमारें चार फूट रुंदीची जागा ठेवून द्यावी. धोंडे टाकून झाल्यावर चिखल टाकण्याचें काम दोन्ही बाजूंनीं सुरू करावें. चिखलाचे खड्डे मात्र बांधापासून ५० फूट अंतरावर अडीच दोन फुटांपेक्षा खोल करूं नयेत. केव्हां केव्हां मातीनें पोतीं भरून बांधाच्या दोन्ही बाजूंला त्यांची भिंतीसारखीं एकावर एक ठेऊन थडी मारितात व त्यामध्यें मातीचे गोळे टाकतात हे गोळे पोत्याच्या आधारामुळें विरघळत नाहींत व पाण्यातील काम भरती आली तरी फुकट जात नाहीं आतापर्यंत उथळ पाण्यांत बांध घालण्याबद्दल विचार झाला परंतु ज्या खाडींत आठ पासून दहा फूट खोलीचें नेहमीं पाणी राहतें तेथें बांध घालणें झाल्यास पूर्वी वर सांगितल्याप्रमाणें धोंडे टाकून शिवाय मोडक्यातोडक्या होड्या घेऊन त्यांत माती, धोंडे भरावे व त्या आखलेल्या लाईनीवर ठेऊन द्याव्यात. अशा रीतीनें बांध भरून काढिला म्हणजे टाकिलेला चिखलहि पाण्यांत विरघळत नाहीं व बांधहि मजबूद होतो.

बांध घातल्यानंतरचें काम पावसाचें पाणी काढून देण्याकरितां मोऱ्या करणें हें होय. मोऱ्या किती व कोठें ठेवावयाच्या हें जमिनीच्या ठेवणीवर अवलंबून राहील त्यांचा आकार जमिनींतील पाणी सर्व निघून जाईल एवढा असावा कारण जास्त वेळ पाणी राहिल्यास जमीन दलदलीत होऊन बांधहि पाण्याच्या जोरानें जागजागीं फुटण्याचा संभव असतो. बांध एक वेळ फुटूं दिल्यास पिकाचा अतोनात नाश होतो व बांध नीट करण्यास बराच खर्च येतो.

ज्या ज्या ठिकाणीं जमिनींतील पाण्याचा आपोआप निकाल होतो तेथेंच मोऱ्या ठेवाव्यात. दीनानाथखारींतील बऱ्याच वर्षांच्या अनुभवावरून असें ठरतें कीं, मोऱ्यांना झडपें लावावयाचीं तीं आपोआप उघडणारीं असलीं पाहिजेत. तीं अशीं असलीं म्हणजे भरतीच्या पाण्यानें बंद होतील व पावसाळ्यांत डोंगरांतील पाण्याच्या लोंढ्यासरशीं तीं सहज उघडूं शकतील झडपांचा आकार ४॥ फूट लांब व ३॥ फूट रुंद असा असावा. त्यांना वरच्या बाजूला बिजागरें लावून तीं पडतीं ठेवावीं. अशी तजवीज केल्यास स्लूच्या उघड्या( दारें )साठीं जसा पावसाळ्यांत मुद्दाम उघडझाप करण्यासाठीं मनुष्य ठेवावा लागतो, तसा ठेवण्याची जरूरी नाहीं खारींच्या बांधाला स्लूचीं झडपें ठेविलीं व त्यावरील रखवालदार एखादेवेळीं हजर न राहिला किंवा त्यानें पुराच्या वेळीं आळस केला तर जागजागीं बांध फुटून जाऊन सर्व खारीचा नाश होण्याचा संभव असतो. परंतु आपोआप उघडझापाचें दार ठेविल्यास असें नुकसान होणें संभवनीय नाहीं. मात्र ह्या दाराची चौकट बिजागरें वगैरे मजबूद करून ती

मजबूत काँक्रीटात बसवावी नाहींपेक्षा खाम लेचेपेचें असल्यास पावसाच्या पाण्याच्या जोरानें सहज निघून जाईल. अशा दाराला वार्षिक खर्च सुमारें एक दोन रुपये येतो. तो फक्त वर्षांतून एक वेळ डांबर लावण्याचा होय. बांध व मोऱ्या बांधून झाल्यानंतर पुढचें काम म्हणाल तर मोठया बांधाच्या आतल्या बाजूला सुमारें १० ते १५ फूट अंतरावर आणखी एक लहानसा सुमारें खालीं ३ फूट व वर १॥ फूट रुंदीचा व सुमारें २ ते २॥ फूट उंचीचा बांध घालणें होय. ह्या बांधाच्या योगानें भरतीचें पाणी जरी थोडयाबहुत प्रमाणानें मोठया बांधातून झिरपून आत आलें तथापि तें सुधारलेल्या जमिनींत येण्याचा संभव या बांधाच्या योगानें अजीबात नाहींसा होतो. हें भरतीचें पाणी आत आल्यास पुनः जमीन खारट बनते.

खा च रें पा ड णें.—यानंतर जमिनींतील तिवराची झाडें तोडून काढून पीक करण्याचें असेल त्या मानानें खारीचे लहान लहान चौकोनी तुकडे पाडावे. ही जमीन पिकाला लायक होण्यास दोन तीन वर्षें लागतात. कारण पाण्याची वाफ होतांना जे मिठाचे बारीक कण रहातात ते सर्व पीक करण्याच्या पूर्वी पावसाच्या पाण्यानें धुवून जाणें अवश्य आहे. नवीन काढलेल्या जमिनींत जर बरेच खोल खाडीच्या पाण्यानें खाचखळगे झालेले असतील, तर ते भरून काढून जमीन सारखी करणें जरूर आहे. अशा खोलगट जमिनींत सुमारें शंभर शंभर फुटावर लहान लहान बांध घालावेत म्हणजे पावसाळ्यांत पाण्याबरोबर जी खळमळ वाहून येते ती यांत बसते व थोडक्याच वर्षांत ही जमीन भरून येऊन बाकीच्या जमिनीसारखी होते. उलट या खळमळीनें ती जास्तच सुपीक होते.

लागवड—अशा या सुधारलेल्या जमिनींत कांहीं वर्षेंपावेतों खारें भात पिकवितात. याचें तूस खारट लागतें व आंतील तांदूळ तांबड्या रंगाचा असतो. अशा जमिनींत कांहीं वर्षें जमिनीची नांगरट न करताहि पिकें घेता येतात. पुढें पुढें या जमिनींत गोडें भातहि पिकूं लागतें. यांत भाताचा पेरा पावसाळा सुरू होण्यापूर्वी हातानें बीं फेंकून अगर रोहू करून तो दोन तीन चांगले पाऊस झाल्यावर फेंकितात, परंतु जास्त वहिवाट रोहू करून पेरण्याचीच आहे. पेरणीयानंतर भाताची निगा करणें म्हणजे पिकांतून तण उपटून काढणें व बांध फुटून बाहेर पाणी न जाऊं देणें हीं होत. कांहीं लोक पावसाळा सुरू झाल्यावर तण मारण्याकरितां नांगरट करितात. परंतु असें करण्यापासून फायदा न होतां कित्येक प्रसंगीं उलट तोटाच होतो. कारण खालीं असलेलें मीठ वर येतें व तें जमिनींत मिसळून पिकाला अपायकारक होतें. निदान पहिलीं कांहीं वर्षें तरी नांगरटीच्या भानगडींत पडूं नये. जास्त पाणी झाल्यास तें मात्र बाहेर काढून टाकण्याची खबरदारी घेतली पाहिजे. अशा जमिनींत रोप करून लागण करीत नाहींत. दाट झाल्यास तें पातळ करून जेथें नांगे असतील तेथें भरून काढितात. पीक तयार झाल्यावर त्याची कापणी, मळणी, उपसणी वगैरे नेहमींप्रमाणेंच करितात. सरासरी मानानें दर एकरी उत्पन्न २० फरे किंवा १ खंडी होतें. बाजार भाव मुडयास (१ मुडा = २५ फरे) गेल्या दहा वर्षांत ३८ रुपयांपासून ५७ रुपयेपावेतों होता व त्या वेळीं गोड्या जात्या भाताचा भाव ४८ पासून ६० रुपये होता.

जमिनीची स्वाभाविक रीतीनें सुधारणा व्हावी म्हणून दर तीन वर्षांनी भातखाचरांत सुमारें सहा सहा फूट अंतरावर एक एक घनफुटाचे खाडे पाडावे. असें केल्यानें पावसाळ्यांत डोंगरांतील पाण्यात येणारें खळमळ या खड्यांत बसतें व जमिनीचा खत घातल्याशिवाय भगदूर वाढतो.

खाचरांतील जमीन कांहीं वर्षांनीं सुधारते व ती गोड झाल्यावर चांगल्या जातीचें भातहि तींत पिकूं लागतें. जमीन गोडी झाल्यावर तींत नारळ व आंब्याचीं झाडेंहि होऊं शकतात. परंतु यांना गोड्या पाण्याची जरूरी आहे. तशी विहिरीची वगैरे सोय नसल्यास पावसावर होणाऱ्या भाताच्या पिकावर अवलंबून रहावें लागतें. खारींत भातच पिकणें असल्यास कुदळ व पहार येरीज करून बाकी दुसऱ्या आउताची किंवा बैलाची जरूरी पडत नाहीं.

खार पाडण्यांत यश अपयश येणें हें सर्वस्वी बाहेरील बांधाच्या बांधबंदस्तीवर अवलंबून असतें. बांधाची दुरुस्ती निदान दोन तीन वर्षांनीं बांधाच्या बाहेरील बाजूला व वर नवीन चिखल घालून करावी लागते. व तो पावसांत धुवून जाऊं नये म्हणून वर गवत, कचरा वगैरे घालण्याची खबरदारी घ्यावी अशा दुरुस्तीला दर ५० फुटास सुमारें अडीच रुपये खर्च येतो. याशिवाय दर अवचितप्रसंगीला थोडीशी दुरुस्ती करावी लागते. कारण खेकडे व इतर प्राणी बांधात भोंकें पाडतात व ती मोठीं झालीं म्हणजे बांधांतून पाणी पाझरूं लागतें व कित्येक प्रसंगीं बांधहि फुटतो. खेकड्यानें पाडलेल्या भोंकाला नेऊर असें म्हणतात. ह्या नेऊरांत पेंढा दडपून वर चिखल लाविला म्हणजे पाणी जाण्याचें बंद होतें. बांधाची आतील बाजू कांहीं वर्षांनीं गवत व इतर झाडझुडपें आपोआप वाढून सुरक्षित रहाते. परंतु बाहेरील बाजू धुवून जाऊं नये म्हणून कांहीतरी उपाय केला पाहिजे. ज्या ठिकाणीं, तिवरीसारखीं झाडें आपोआप होत नाहींत तेथें तीं मुद्दाम लाविलीं पाहिजेत. केव्हां केव्हां अशा ठिकाणीं दगडानीं बांधून काढितात, परंतु हें फार खर्चाचें काम आहे. बांधाच्या वरच्या बाजूचा बचाव व्हावा म्हणून गवत लावून त्याला खाचरांतील माती घावी म्हणजे ते जोरानें वाढेल.

एकंदरींत खाऱ्या जमिनी वेळेवर पाऊस पडल्यास मोठ्या फायदेशीर आहेत. मात्र बांधाची चांगली व वेळेवर दुरुस्ती करून काढलेल्या खारींत पुन्हा खारें पाणी शिरणार नाहीं अशी खबरदारी घेणें अवश्य आहे. [ हुंदराव दिनानाथ नवलकर यांनीं पाठविलेल्या माहितीवरून ]

**खारल**—पंजाबातील एक शेतकरी जात. हे सर्व मुसुलमान आहेत. लो. सं. (१९११) ३४,८५५. हे मुख्यतः मॉन्ट गॉमरी, मुलतान, झंग, लाहोर व फेरोजपूरजिल्हे व भावलपूर संस्थान यांत आढळतात. ते रजपूत लोकांचे वंशज आहेत हें स्पष्ट दिसतें. वायव्य सरहद्दप्रांतातहि वीस हजारावर खारल आहेत.

**खारवा**—खारवी. मुंबई इलाख्यातील एक जात. एकंदर लोकसंख्या (१९११) ४५,२८९. कच्छ, काठेवाड, खंबायत, गुजराथ, ठाणें व मुंबई येथें हे लोक आहेत. याना "खारपाटील" अशीहि एक मानाची पदवी आहे. आपण रजपूत आहों असें हे म्हणतात. हे नावाडी असून यांची सर्व हिंदुस्थानभर उत्तम पूल बांधणारे म्हणून ख्याति आहे. मुंबई व गुजराथमधील शहरांत व खेड्यांत घरें शाकारण्याचें बहुतेक काम जवळ जवळ हेच करतात. यांच्या बायका काथ्याच्या दोऱ्या व मासे विकतात. यांचे (१) रजपूत, (२) कोळी, (३) खंबाइती, (४) हान-सोटी, (५) सुरती व (६) भडोची असे सहा पोट भेद असून त्यांमध्यें बेटीव्यवहार होत नाहीं. रजपूत खारव्यांच्या चालीरीती रजपुतांप्रमाणें आहेत. कोळी खारवी हे दक्षिण काठेवाड किनाऱ्यावरचे चाचे लोकांचे वंशज असून यांच्या चालीरीती कोळी लोकांच्या प्रमाणेंच आहेत. इतर चार पोट भागांतील लोकांचीं नांवें रहाण्याच्या ठिकाणावरून पडलेलीं आहेत. मुलामुलींच्या लग्नासंबंधीं नियम नाहींत; तरी मुली वयांत आल्यानंतर लग्न करणें त्यांना पसंत नसतें. मुलाचा बाप मुलीबद्दल ३० रु किंमतीचे दागिने देतो. होमाभोंवतीं प्रदक्षिणा घालणें हा लग्नांतील मुख्य भाग समजला जाऊन, या संस्काराला ते "मंगलफेरो" असें नांव देतात. विधवाविवाह प्रचलित आहे परंतु तो बहुधा दिराशीं होतो. घटस्फोटाची चाल आहे. हे मास खातात व दारूहि पितात. अंबाजी, बहुचरा व हरसाद या देवींची ते मुख्यत्वेंकरून पूजा करितात. सुरतमधील खारवा लोकांच्या दोन तऱ्हेच्या पंचायती आहेत. समस्त नावाच्या पंचायती स्थानिक आहेत. चोरासि पंचायती हा खेड्यांच्या प्रतिनिधींच्या सार्वजनिक संस्था आहेत. सामाजिक खटल्याचे निकाल पटेल देतो. अपराधाबद्दल १० रु. वर दंड होत नाहीं. परंतु दंड न दिल्यास जातीबाहेर टाकिलें जातें. जातीबाहेर टाकलेल्याना जातींत घ्यावयाचें असल्यास ३॥ रु. दंड भरावा लागतो. काठेवाड खारवामध्यें कायमच्या मध्यवर्ती पंचायती असून त्यामध्ये २—५ सभासद असतात. दंड पंचायतीच्या मुख्य अधिकाऱ्या कडे ठेवले जाऊन जातजेवण व धर्म याकडे ते खर्चिले जातात. पोरबंदर खारवा हे सर्वांत श्रेष्ठ समजले जाऊन, सर्व महत्वाचे खटले पोरबंदर येथील पंचायतीकडे येतात. या पंचा- [त]ी निकाल कायम समजले जातात व काठेवाडमधील [खा]रवे लोक त्याना मान देतात

**खाराघोडा**—मुंबई इलाख्यातील अहमदाबाद जिल्ह्याच्या विरमगाव तालुक्यातील एक खेडेंगाव. कच्छाच्या रणाच्या सरहद्दीवर हें वसलेलें आहे. इसवी सन १८७५ साली खाराघोडा येथें एक मिठागर उघडण्यात आलें. पण मिठाची वाढती मागणी होऊं लागल्यामुळें १८८१–८२ मध्यें खाराघोडापासून ६ मैलावर ऊरू या गावीं बरींच मिठागरें उघडण्यात आलीं. १९०४–५ मध्य खाराघोडा व ऊरू येथें २५,४५,५२१ मण मीठ तयार झालें व २३,१३,९६५ मण विकलें गेलें खाराघोडा येथें दोन असिस्टंट कलेक्टर असून त्याच्याकडे या मिठागराची देखरेख करण्याचें काम आहे. या शहरामध्यें एक दवाखाना, एक लायब्ररी, एक धर्मशाळा व एक मार्केट अशा इमारती आहेत. शहराच्या उत्तरेस एक मैल अंतरावर असलेल्या तलावातून शहराला पाणीपुरवठा केला आहे.

**खारान**—बलुचिस्तानातील कलात संस्थानाचा एक अर्धवट स्वतंत्र जातीचा मुलुख. याचें क्षेत्रफळ १४,२१० मैल आहे. हा मुलुख उंचसखल असून ईशान्येस समुद्रसपाटीपासून २५०० फूट व पश्चिमेस १६०० फूट उंच आहे. याच्या उत्तरेस रासकोटचा डोंगर, दक्षिणेस सिपाहान डोंगराचा राग व पूर्वेस गरचा डोंगर असून पश्चिमेस पर्शियाची व याची सरहद्द एकच आहे. या प्रदेशातून बदो व मालकेल या नद्या वहात गेल्या आहेत. या नद्याच्या काठच्या जमीनी लागवडीला योग्य आहेत. तसेंच डोंगराच्या पायथ्याशीं असलेली बरीचशी जमिनीहि लागवडीस योग्य आहे असें असलें तरी एकंदरीत हा मुलुख पडीकच आहे असें मानण्यात येतें व त्यात बरेंच तथ्यहि आहे. कारण वरील लागवडीला योग्य असलेल्या थोड्याशा टापूशिवाय बाकीचा सर्व प्रदेश वालुकामयच आहे. बदो व मालकेल या दोन नद्याखेरीज गर्क अथवा सराफ व कोरकान या दोन लहान नद्या या प्रदेशातून वहात गेल्या आहेत. येथील हवा कोरडी पण आरोग्यदायक आहे. उन्हाळ्यात दिवसा फार उकाडा होतो पण रात्रीं थंडी पडते. या प्रदेशात फारच थोडा पाऊस पडत असून तो जानेवारी ते मार्चच्या मध्यंतरी पडतो.

१७ व्या शतकाच्या अखेरीपर्यंतचा या प्रदेशाचा इतिहास अज्ञात आहे. यावेळीं खारानचा नौशेरवाणी संस्थानिक इब्राहिमखान कंदाहारच्या खिलजी घराण्याचा माडलिक होता १७३४ त खारानच्या पुरदिल खानावर नादिरशहानें स्वारी केली. या काळात खानारचा किर्मानमध्यें समावेश होत असे. पहिल्या नासीरखानानें हा मुलुख किलातच्या अमलाखालीं आणिला. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यकाळात खारानच्या अझादखानाला अफगाणिस्तानच्या हातात जावें लागलें. नंतर खानार ब्रिटिशांच्या संरक्षणाखालीं आलें संस्थानिकाला दरसाल६०००रु.देण्यात येतात. त्याशिवाय डोईपट्टी, जनावरपट्टी, दंड, बेवारसी संपत्ति वगैरेंचें

उत्पन्न त्याला मिळतें. सैन्य व पाहुणे यावर मोठा गर्च होतो. खारानात वस्ती सुमारें २२००० आहे. बहुतेक लोक भटके आहेत. कायम गांवें सुमारें २० असून शहर-इ-कारेज किंवा खारान कलात हें मुख्य ठिकाण आहे. मुख्य भाषा बलुची आहे पुराच्या पाण्यावर फोरड्याहू शेती होते. खजुराची झाडें पुष्कळ होतात. शेळ्यामेंढ्या, लोकर व तूप हा निर्गतीचा माल आहे.

खारिया—एक जंगली जात. कोलजातीची ही एक शाखा आहे. याची वस्ती बिहार ओरिसांत सुमारें एक लाख आहे. बंगाल, आसाम, मध्यप्रांत यातून प्रत्येकीं दहा पंधरा हजार आहे. हिंदुस्थानांतील एकंदर १,४८,३५८ ( १९११ ) खारियांपैकीं ९७,६०१ हिंदु व बाकीचे वन्यधर्मीय आहेत. खारिया शब्दाची व्युत्पत्ति खरखरी म्हणजे पालखी या शब्दापासून झाली असावी असें हिरालाल ( कास्ट्स अँड ट्राइब्स इन सी. पी. ) म्हणतात. उडिया देशांत पालखी उचलणाऱ्या ओरावन लोकांस खारियाच म्हणतात. व खरखरी याचाच अपभ्रंश खारिया झाला असावा असें वाटतें. हे लोक स्वतःला वडील भावाची संतति म्हणवितात व मुंडा लोक धाकट्या भावाची संतति आहे असें म्हणतात. व नागवंशी राजाच्या घरात हे प्रवेश सुद्धा करीत नाहींत. कारण त्याच्या राण्या या याच्या धाकट्या भावजया आहेत म्हणून यांनीं परस्परांचें तोंड पाहता कामा नये. मुंड लोक मात्र याच्या बरोबर अनुलोमसंबंध करतात रिस्ले म्हणतो कीं, खारिया लोक मुंडालोकास वडील बधु म्हणतात. बिहार ओरिसांत याच्यात दोन पोटजाती आहेत. गोमांस खाणारे ( चोट गोहंडी ) व न खाणारे ( बार गोहंडी ) याच्यात एक कर्नाह असून तो बहिष्कृत खारियांना प्रायश्चित्त देऊन जातींत घेतो.बायकांनीं पुरुषाच्या कामाला मुळींच शिवावयाचें नाहीं. जर एखादी बाई नांगराला शिवली तर तिला नांगराला जोडून काहीं पावलें नांगर ओढावयास लावितात. घरमालकाच्या वयात आलेल्या मुलीनें किंवा बहिणीनें गोठ्यात सुद्धा जावयाचें नाहीं. याच्या जातीत निरनिराळ्या देवकाचीं अनेक कुळें आहेत. जसें मुद्र ( कासव ), किरो ( वाघ ), नाग, कंकुल ( चित्ता ), कुरो ( मगर ) इत्यादि. हीं कुळें आपापल्या देवकाच्या प्राण्याचा घात कधीं करीत नाहींत. एकाच देवकाच्या लोकात लग्नें जरी मना आहेत तरी कधीं कधीं होतातच. भावाच्या मुलीनें बहिणीच्या मुलास वरावें पण भावाच्या मुलानें बहिणीची मुलगी वरूं नये. लग्नें बहुधा मोठेपणींच होतात. बारा बैलांचें शुल्क वधूस पूर्वी द्यावें लागे. पण याची स्थिति आता खालावलेली असल्यामुळें आता १२ बैलाच्या कणकीच्या प्रतिमा करून पानावर ठेऊन वधूपक्षाकडे पाठवितात वधूपक्ष दोन प्रतिमा ठेवून १० परत करतो. गरीब लोक फक्त चार रुपयावर दोन बैलांचें काम भागवतात. पुरुष मिरवणुकीत भाग घेत नाहींत. वऱ्हाच्या टेम्भ्यांच्या ( आलेल्या नवऱ्याच्या ) खांद्यावर बसून वधू येते. वर तिला सामोरा जातो; तिला स्पर्श करतो व दोघेहि नाच करतात. वर नांगराच्या जुवावर उभा राहतो व वधू पाटावर उभी राहते. व देवदूत त्याच्याभोंवती आंब्याच्या पानानें पाणी शिंपीत ७ प्रदक्षिणा घालतो. हा लग्नाचा विधि होय. वधूवरास रात्रीं एका खोलींत एकांत करूं देतात. सकाळीं वधू नवऱ्याचे कपडे धुण्यास नदीवर जाते. ती परत आली म्हणजे कोंबडा बळी देऊन त्याच्या रक्ताचे दोन थेंब हळदीच्या पाण्यात टाकून पितात. मग एक बकरा मारून त्याच्या रक्तात पाय भिजवून वधूवर घरात शिरतात. कोणत्याहि बाईनें वडील दिरास स्पर्श करूं नये व त्याचा स्वयंपाकहि करूं नये अशी चाल आहे. विधवाविवाह जातीला एक भोजन घातल्यानें व विधवेच्या कुटुंबातल्या माणसास काहीं पैसे दिल्यानें होतात. विधवेबरोबर तिचीं पहिलीं मुलें नव्या नवऱ्याकडे आलीं तर त्याच्या संपत्तीचा अर्धा वाटा त्यास मिळतो. घटस्फोटाची जरी चाल आहे तरी व्यवहारात ती फारशी रूढ नाहीं. याचा 'बंद' नावाचा पूर्वज जातिदेव आहे. या लोकानीं गोमांस खाणें सोडलें आहे. पूर्वी हे माकडें जात व टोपनोकुल जात अद्याप खाते. जर न्हावी किंवा धोबी यानें याचे कपडे धुतले तर यास बहिष्कार होतो. हिंदूलोक यास नीच समजत म्हणूनच यानींहि त्यास प्रत्युत्तर देण्याची ही पद्धति काढिली असेल. कायस्थ, मुसुलमान, कोष्टी व न्हावी याची पालखी नेण्यानें किंवा तांबूल उचलण्यानेंहि बहिष्कार होतो

याच्या जातीच्या मुख्यास परधान म्हणतात. त्याच्या मदतगारास नेगी म्हणतात व बातमी पोंचविणार गाड असतो. परधान नेहमीं सामर कुळाचा असावा, नेगी सुमेर कुळाचा व गाड बर्वा कुळाचा असावा. परधानानें प्रायश्चित्तविधींत पतितास पाणी देऊन शुद्ध करावें, नेगीनें भोजनाची व्यवस्था करावी व गाडानें सर्वांस निमंत्रण करावें. याशिवाय द्रव्यदंड देखील घेतात व त्याचा अर्धा भाग जातींतल्या लोकांस मुरी लाह्या सकाळीं घराच्या वाटेवर पुरण्यास देतात व अर्धा भाग परधान, नेगी व गाड लोक वाटून घेतात. पुरुष आपले केस उजवीकडे बांधून ठेवतात व बायका डावीकडे बांधून ठेवतात. यांचें नृत्य फारच मनोरंजक असते. लग्नप्रसंगीं नृत्यात स्त्रीपुरुष संगासंबंधीं अश्लील गाणीं म्हणतात व अभिनय करतात. त्या नृत्यातून वधूवरास त्यांचे दोन मित्र पाठीवर बसवून फिरवितात. याचें नृत्य फार जोरदार व उल्हास उत्पन्न करणारें असतें. याची भाषा मुंडर भाषेशीं संबद्ध आहे. पण आता ती फार जलद नष्ट होत आहे. याची लिपीहि होती. [ रसेल व हिरालाल; सेन्सस रि. ( १९११ ) पु ५].

खार्टुम—आंग्लो-इजीप्शियन सुदानची राजधानी. हें शहर ब्ल्यू नाइल व व्हाइट नाइल याच्या संगमावर आहे. हें

पोर्ट सुदानच्या नैर्ऋत्येस आगगाडीनें ४३२ मैल आहे व कायरोच्या दक्षिणेस आगगाडीनें व आगबोटीनें १३४५ मैलावर आहे. याची लो. सं. १९०७ मध्यें ६९३४९ होती.

या शहराची मांडणी फार सुंदर आहे. बगीच्यांनीं व तालवृक्षांनीं वेष्टिलेल्या दगडी व विटांच्या इमारतींनीं शहराला फार शोभा आणली आहे. किल्ल्यापुढील मैदानाच्या मध्यभागीं गव्हर्नर जनरलचा राजवाडा आहे. ही भव्य इमारत तिमजली आहे. इमारतीच्या पुढच्या अंगास गॉर्डनचा ब्राँझ धातूचा उंटावर बसलेला पुतळा आहे इमारतीच्या पूर्व बाजूस सुदानक्लब, लष्करी दवाखाना व गॉर्डन मेमोरियल कॉलेज इत्यादि इमारती आहेत या ठिकाणीं अँग्लिकन चर्च, ग्रीकचर्च व आस्ट्रियन रोमन कॅथोलिक मिशन इत्यादि धर्मसंस्था आहेत.

खार्टूममधील लोकसंख्या संमिश्र प्रकारची आहे. जेवढे म्हणून व्यापारी आहेत तेवढे सारे ग्रीक लोक सीरिअन व कॉप्ट लोक आहेत. सुदानमधील सर्व राष्ट्रजातींचे निग्रो व अरब रहिवाशी हे प्रतिनिधी होत असें म्हटलें तरी चालेल.

ईजिप्तनें सुदान काबीज केलें त्यावेळीं खार्टूम हें एक लहानसें खेडें होतें. १८२२ त ईजिप्शियननीं तेथें कायमची छावणी बांधली. या छावणीचें पुढें खार्टूम शहर होऊन १८३० त तें सुदानच्या राजधानीचें शहर करण्यात आलें. १८९८ त किचनेरनें महादींचा पराभव करून हें शहर घेतलें.त्यावरून त्याला खार्टूमचा किचनेर अशी पदवी मिळाली ( ' किचनेर ' पहा ). ब्ल्यू व व्हाईट नाईल यांच्या संगमाजवळील भूशीराच्या हत्तीच्या धडासारख्या आकारावरून या शहराला खार्टूम ( अरबी = हत्तीचें धड ) हें नाव मिळालें आहे असें म्हणतात.

**खालपा**—मुंबई इलाख्यांतील एक चाम्भार जात. लो. सं. ९३५८. भडोच, सुरत व रेवाकांठा येथें हे लोक आहेत. हे कातडीं कमावितात व चामड्याचीं कामें करतात. रजपूताना शूद्र जातीच्या स्त्रियांपासून झालेली ही संतति आहे असें म्हणतात. यामध्यें ६ पोटभाग असून त्यामध्यें बेटीव्यवहार होत नाहींत यामध्यें रहाण्याच्या ठिकाणावरून कुळें झालेलीं आहेत परंतु यामध्यें रजपूत नांवेंहि आहेत.वयांत येण्याच्या अगोदर मुलींचीं लग्नें केलीं जातात व मुलांचीं लग्नें ५ वर्षांपासून होतात. पुनर्विवाह व घटस्फोट हे यामध्यें आहेत. हे मांस खातात व दारूहि पितात. भंगी मांग व इतर अस्पृश्य जातींतील लोकांखेरीज इतर उच्च जातींचे लोक हे आपल्या जातींत घेतात. गारुड किंवा कलातिया ब्राह्मण यांचे धार्मिक विधी करतात. महार, मांग व भंगी यांच्या हातची पक्की रसई हे खातात. हे रामानंदी, कबीर, रोहिदास या पंथांचे असून यांचा वारसाचा कायदा हिंदूप्रमाणेंच आहे. सुरत जिल्ह्यातील खालपा लोकांच्या देवाचे वर्ग (चौरा)केले असून त्याच्या अधिकाऱ्यापुढें सामाजिक व घरगुती प्रश्नांचे निकाल दिले जातात.चौराच्या सभेंत ५ पंच निवडले जाऊन ते सबंध जातीशीं संबंध असलेल्या खटल्यांचे निकाल देतात. पंचांचे निकाल अखेरचे असतात. भडोच जिल्ह्यात १७५ खेड्यांची एक मध्यवर्ती संस्था आहे. खेडा जिल्ह्यांतहि सुरत जिल्ह्यातील संस्थाप्रमाणें संस्था आहेत [ एन्थोवेन ]

**खालसा**-पंजाबातील एक जात लो स.१६६१०.खालसा हें नाव फार जुनें आहे त्याचा अर्थ गुरुगोविंदसिंग याचा खरा शिष्य असा होतो परंतु पूर्वी हा शब्द शिखधर्माच्या निरनिराळ्या जातींच्या लोकांच्या धर्ममताला लावीत असत. अगदीं अलीकडे स्वतंत्र जात या अर्थी या शब्दाचा उपयोग होऊं लागला आहे. खालसा पंथी जातीबंधनें मानीत नसून सर्व शीख लोकांचा सामाजिक दर्जा सारखा करण्याकरितां झटत आहेत. आपल्या निरनिराळ्या जाती न सांगता ते आपणास खालसा म्हणवून घेतात याचा परिणाम असा झाला आहे कीं त्याची एक नवीनच जात बनली आहे. दीक्षा होण्याच्या वेळेस प्रत्येक मनुष्यास असें सांगण्यात येतें कीं,गुरु गोविंदसिंग हा तुझा बाप आहे,मायसाहेब दिवाण ही आई, पाटणासाहेब जन्मभूमि आणि सोधभान ही तुझी जात. शेवटल्या आज्ञेप्रमाणें हलक्या जातीचे कांहीं लोक आपणास खालसा सोधभान जातीचे म्हणूं लागले आहेत ही जात अजून लहान आहे आणि तिच्या मताचा प्रसार फारसा नाहीं.

**खालसादिवाण**—नवीन मुलूख जिंकून घेतला म्हणजे तेथील वसूल गोळा करण्यास मोंगल बादशहा ज्या अधिकाऱ्याची योजना करीत त्याला खालसा दिवाण म्हणत. फौजदाराकडे लष्करी बंदोबस्ताचें व पोलिसचें काम, व दिवाणाकडे फक्त मुलकी कारभार अशी कामाची विभागणी केलली असे. एका सुभ्यात कित्येक फौजदार असत व त्या प्रत्येकाच्या मदतीस एक एक दिवाण असे दक्षिण हिंदुस्थानात अवरंगझेबानें जे दिवाण नेमले होते ते फौजदाराच्या मदतीनें परगण्याच्या ( तालुक्याच्या ) निरनिराळ्या देशमुखांना किंवा देसायांना जमिनी इजाऱ्यानें देऊन मग त्यांच्यापासून वसूल गोळा करीत असत [ ग्रांटडफ. व्हॉ.१]

**खाल्डिया**—खाल्डिया व खाल्डियन हीं नावें जुन्या करारात बाबिलोनिया व बाबिलोनियन लोक यांच्याऐवजी वारंवार योजिलेलीं आढळतात. खाल्डिया हें खरोखर एका देशाचें नाव असून तें द्व्यर्थी योजतात. एका अगदीं दक्षिणेकडील देशाला हें नांव लावीत. याची राजधानी बितयकीन असून तें प्रसिद्ध खाल्डियन बंडखोर मेरोडक बलादन याचें मुख्य निवासस्थान होतें. खाल्डियनाचा प्रदेश नक्की कोणता हें आज ठरविता येत नाहीं. तरी पूर्वी निरनिराळ्या वहात असलेल्या तैग्रीस व युफ्रेटिस नद्यांच्या मुखाजवळच कोठें तरी हा अथांग प्रदेश असावा.

असीरियन राजा तिसरा रम्मानिरारी ( ख्रि पू ८१२ ते ७८३ ) याच्या वेळेला ' मतकाल्डू ' ही संज्ञा सर्व बाबिलोनियाला लावीत बाबिलोनियन या खाल्डियन लोक

यांच्या वंशातील फरक बरेच दिवस मानिला जात असे. त्याचप्रमाणें ऐनावेरिष ( खि. पू. ७०५–६८१ ) खाल्डियन लोक व अरब लोक आणि आर्मेनियन लोक यांच्यामध्यें फरक मानीत असे. असीरियाचा ऱ्हास व नव-बाबिलोनियाचा उदय ज्या काळांत झाला त्या काळीं 'मत काल्डू' हें नांव असिल बाबिलोनियालाच लावीत असें नव्हे तर कांहीं परकीय राष्ट्रांनांहि या नांवाखालीं ओढीत. एझेकिलांत ( २३ २३ ) या राष्ट्राचा खाल्डियांत समावेश केलेला आहे.

खाल्डियन हे बहुतेक सेमिटिक वंशाचे लोक असावेत. अरबस्तानांतून आल्यानंतर त्यांनीं उरच्या जवळपास वसाहत केली असावी. हे लोक इतर सेमिटिक बाबिलोनियन लोकांवर हल्ले करून त्यांचे प्रदेश बळकावूं लागले. शेवटीं नेबोपोलासर व त्याचा मुलगा यांच्या आधिपत्याखालीं खाल्डियन साम्राज्याचा उदय झाला. नेबोपोलासर हा रक्तानें खाल्डियन होता किंवा नाहीं याची शंका आहे तरी पण त्याचा मुलगा नेबुचेद्रझर याच्या अमलाखालीं खाल्डियन व बाबिलोनियन या भिन्नवंशीय लोकांचा पूर्ण मिलाफ झाला असावा. शिवाय खाल्डियन लोकांची भाषा सामान्य सेमिटिक बाबिलोनियन वाक्प्रचारापेक्षां फारशी निराळी नव्हती. तेव्हां पुढील काळांत 'खाल्डियन' हा शब्द 'बाबिलोनियन' या अर्थी उपयोजिण्यांत आली असल्यास नवल नाहीं.

खाल्डियन शब्दाची उपपत्ति अनिश्चित आहे. क्सेनोफोन ज्या काळ्या समुद्रावरील लोकांना खाल्डियन म्हणतो ते व बाबिलोनियांतील खाल्डियन एक नाहींत. डॅनियलमध्यें व त्याचप्रमाणें हिरोडोटस, स्ट्रेबो यांच्या ग्रंथांत खाल्डियन शब्द 'ज्योतिषी' या अर्थानें योजीत. डॅनियलमध्यें हा शब्द दोन अर्थांनीं वापरला आहे. बाबिलोनियन लोकांबद्दल एक व दुसरा म्हणजे विशेष प्रकारचे अथवा सर्व सामान्य जादूगार या अर्थी. बॅबिलोनियन व खाल्डियन हे एकत्र झाल्यावर सुद्धां खाल्डियन हा शब्द 'ज्ञाते' या अर्थानें योजीत. दक्षिण बाबिलोनियांतील उपाध्याय 'खाल्डियन' या नांवानें प्रसिद्ध असून त्यांना सर्व मोठमोठ्या दरबारीं जावें लागे. पुढें बाबिलोनियांतील भिक्षुक वर्गाला हें नांव सामान्यतः लावूं लागले. [ 'बाबिलोनिया' पहा ]

खाल्डून—( १३३२–१४०६ ) एक अरब इतिहासकार. याचें खरें नांव अबुझइद इब्न महमद इब्न महमद खाल्डून होतें. हा ट्युनिस येथें जन्मला. त्यानें अनेक विषयांचें अरबी भाषेवरून शिक्षण मिळविलें. वयाच्या विसाव्या वर्षी मोरीनिड सुलतान अबु इनान याच्या हाताखालीं त्याला फेझ येथें नोकरी मिळाली. पण लवकरच त्याच्यावर कटाचा आरोप येऊन त्याला कैदेंत ठेवण्यांत आलें. सुलतान मरण पावल्यावर त्याची सुटका झाली व त्यानें सुलतान अबुसालेम याचा चांगल्या प्रकारें नोकरी केली, पण मुख्य प्रधानाचा त्यामवर रोष झाल्यामुळें त्यानें स्पेन देशांत जाण्याची परवानगी मिळविली. स्पेनमध्यें असतांना राजाची अत्यन्त कृपा संपादन केल्यामुळें वजिराच्या मनांत मत्सर उत्पन्न झाला व त्यास आफ्रिकेंत जावें लागलें. आफ्रिकेंत बोगीचा सुलतान अबु अबदल्ला यानें त्याचें प्रेमानें स्वागत केलें. अब्दुल्ला पदभ्रष्ट झाल्यावर इब्न खाल्डून यानें जंगली अरबांचें सैन्य उभारलें व तो सुलतान त्लेमसेन याजजवळ नोकर राहिला. यानंतर कांहीं वर्षांनीं अब्दुल अझीझ यानें सुलतानाचा पराभव करून इब्न खाल्डून यास कैद केलें. नंतर एका मठांत जाऊन तेथें तो अनेक विषयांचा अभ्यास एखाद्या विद्यार्थ्याप्रमाणें करूं लागला. अब्दुल अझीजच्या मरणानंतर तो फेझ येथें राहूं लागला. इ. स. १३७८ सालीं तो ट्युनिसच्या सुलतानाजवळ नोकर राहिला, तेथें त्यानें फक्त आपला अभ्यासक्रम चालू ठेवून बर्बर देशाचा इतिहास लिहिण्यास प्रारंभ केला. पण लवकरच त्यानें येथून मक्केस जाण्याची परवानगी मिळविली व वाटेंत त्याला कायरो येथें मलकाइट पंथाचा कादि करण्यांत आलें. या अधिकारावर असतांना त्यानें आपलें काम चोखपणें बजाविलें, याच वेळीं त्याची बायको व कुटुंब त्यास भेटण्यास येत असतां जहाज फुटून सर्व माणसें बुडून मरण पावलीं. कादीचा अधिकार निघाल्यामुळें व या दुःखामुळें त्यानें आपलें लक्ष्य इतिहास लिहिण्याकडे अधिक दिलें. यानंतर तीन वर्षांनीं तो मक्केस गेला व पुन्हां त्यास कादि नेमण्यांत आलें ( १४०० सालीं त्याला दमास्कस येथें तैमूर विरुद्ध स्वारीवर पाठविण्यांत आलें पण त्यास यश मिळालें नाहीं ) तो ता. १४ मार्च १४०६ इ. रोजीं मरण पावला. 'जगाचा इतिहास लिहिणारा' म्हणून तो प्रसिद्ध आहे.

खासगीवाले—यांचें मूळ उपनांव लिमये असून हे रत्नागिरीजिल्ह्यांतील मौजे करलें येथील रहाणारे होत. यांचा मूळपुरुष भानसाली नांवाचा होता. त्याचा पुत्र बाळाजी, त्याला गणेश व कृष्ण अशीं दोन मुलें होतीं. कृष्णाजी हे कोंकणांतून घाटावर आले. त्याच्याचबरोबर इचलकरंजीकरांचे मूळपुरुष नारो महादेव व पटवर्धन घराण्याचे मूळपुरुष हरभट हेहि निघाले होते. कोल्हापुराजवळ जोतिबाच्या डोंगरावर देवापुढें तिघांनीं शपथा घेतल्या कीं, ज्याचा अभ्युदय प्रथम होईल त्यानें बाकीच्या दोघांस सांभाळावें. नारोपंतास कापशीकर सेनापति यांनीं आश्रय दिल्यावर त्यांनीं या दोघांना आपल्याजवळ ठेविलें. कृष्णाजी व गणेश यांचीं मुलें शिवराम व जिवाजी हीं नारोपंताकडे होतीं. त्यांना नारोपंतांनीं पेशव्यांच्या इकडे नोकरीस पाठविलें. श्रीमंतांनीं त्यास मौजे पाडळीची कमाविस ( स. १७३० ) व साताऱ्याच्या सरकारी वाड्याचें काम ( स. १७३१ ) सांगितलें. वरील काम शिवरामपंतांनीं चांगलें केल्यामुळें बाजीरावसाहेबांनीं त्यास आपलें खासगीचें काम सांगून ( १७३२ ) पुण्याच्या शनिवारवाड्याचेंहि काम सुपूर्द केलें. पुढें १७४१ त शिवरामपंत काशीस गेले, त्या

नंतर त्याचे भाऊ जिवाजीअण्णा हे खासगीचा कारभार पाहूं लागले शिवरामपंत हेच खासगीवाले घराण्याचे मूळ संपादक होत. ते काशीहून परत येऊन ( १७४२ ) पंढरपुरास राहिले व तेथें त्यांनीं पांडुरंगाची एक चांदीची मूर्ति करून देवाचें संस्थान स्थापून ( १७४८ ) त्याच्या खर्चाबद्दल पेशव्याकडून पंढरपूर तालुक्यांतील कौठळी गांव इनाम मिळविला. हल्लीं आषाढी व कार्तिकी शुद्ध एकादशीस याच पांडुरंगमूर्तीचा रथोत्सव होतो. खासगीवाल्याचें हें खासगत देवस्थान असून त्यास सालीना साडेसहा हजाराचें उत्पन्न आहे. शिवरामपंताची वहीण ही परशुरामभाऊ पटवर्धन याच्या मुलाला दिली होती. शिवरामपंताचा वडील मुलगा रघुनाथ हा तरुणपणीं वारला, तेव्हां त्याचा मुलगा शिवराम यांस राघोबादादा पेशवे यानीं खासगीची वस्त्रें दिलीं ( १७७३ ) सवाईमाधवरावाच्या कारकीर्दींत शिवरामभाऊस अंबारीसहित हत्तीचा मान मिळाला तोपर्यंत वर सांगितल्याप्रमाणें जिवाजीपंतअण्णा हेच खासगीचा कारभार पाहत असत हे घोड्यावर बसणारे फार पटाईत होते. निजामानें धाडलेल्या एका मस्त घोड्यावर यानीं स्वारी करून त्याला नरम केल्याच्या व याच्या दांडग्या आहाराच्या व अचाट शक्तीच्या अनेक गोष्टी प्रसिद्ध आहेत. थोरल्या शिवरामपंताचा दुसरा मुलगा गोविंदराव तात्या यानीं बराच नावलौकिक मिळविला. त्यांनीं सोळाव्या वर्षींच खासगीची समग्र माहिती मिळविल्यानें नानासाहेब पेशव्यानीं त्यास इंग्रज, होळकर, भोंसले, निजाम यांच्याकडे वकिलीच्या कामावर नेमिलें होतें. यानाहि स्वाराचा सरंजाम व तैनात मिळाली असून, जुवाटी, हिपर्गी, पाडेटाग हीं इनाम गांवें व पैठणचें कुळकर्ण मिळालें होतें. राघोबादादा व थोरले माधवरावसाहेब यांच्यामधील मध्यस्थी हेच करीत असत. यानीं पेशव्याच्या बरोबर बऱ्याच मोहिमा केल्या. हे इ. स. १७७२ मध्यें वारले याचे सख्खे भाऊ हरिपंत हे पानपतात पडले. गोविंदरावानीं पुण्याचें रामेश्वराचें देऊळ बांधलें. याची बायको सती गेली. याना नीळकंठ नावाचा मुलगा झाला. त्याला दोन पुत्र गोविंद व हरि म्हणून होते. नीळकंठरावा बरोबरहि त्यांची स्त्री सती गेली. गोविंद नीळकंठ यास १७९२ त इसी मिळाला हे खर्ड्याच्या लढाईत हजर होते. बाजीरावाच्या पुढें यांची गैरमर्जी होऊन त्यानीं यांचा अर्धा सरंजाम व साडेचोवीस हजारांची जहागीर आणि साडेसहा हजारांची खासगीची नेमणूक श्रीमंतानीं जप्त केली गोविंदपंत १८४५ त वारले. यानीं शुक्रवार पेठेंत रामेश्वराजवळ ( पुण्यास ) विष्णूचें एक देऊळ बांधलें शिवराम रघुनाथ याचा भाऊ नारोपंत यांस सवाई माधवरावांनीं शिवरामाच्या मृत्यूनंतर खासगीची वस्त्रें दिलीं होतीं गोविंद नीळकंठाचा मुलगा नीळकंठ नावाचा असून त्याच्यावर १८१८ त बंडाचा आरोप आला होता, ते त्यांतून १८४० होऊन १८५९ त वारले गोविंद नीळकंठास हरिपंत नावाचे एक भाऊ होते. त्याना माधवराव नावाचा पुत्र झाला. या माधवरावाना एकंदर आठ अपत्यें झालीं. त्यांतहि काशीनाथपंत तात्या हे पुण्याच्या म्युनिसिपालिटीचे सभासद, पुणें येथील पर्वतीसंस्थानचे व पंढरपूरच्या देवस्थानकमेटीचे एक पंच होते ते धार्मिक प्रवृत्तीचे असून गणेशोत्सवात लो टिळकाच्याबरोबर त्यानीं प्रथम प्रथम भाग घेतला होता पंचहौद प्रकरणात हे व श्री. बाळासाहेब नातू हे प्रमुख होते हे सन १९१९ त वारले याचे वडील चिरंजीव गोविंदराव हे दामोदरगुरु नावाच्या प्रख्यात मल्लविद्याविशारदाचे शिष्य होते हे स. १९००मध्यें वारले याचे धाकटे भाऊ हरिहरराव उर्फ नानासाहेब हे हल्लीं विद्यमान असून पंढरपुरास रहात असतात. *जिवाजीपंतअण्णाचे वंशज अश्व*विद्येंत निष्णात असून त्याना शिरगांव वगैरे गांवचें उत्पन्न आहे. याच्या जागेंतच हल्लींच्या न्यू पूना कॉलेज व नूतन मराठी विद्यालय या संस्थाच्या इमारती आहेत थोरल्या कृष्णाजीपंतास शिवरामपंताशिवाय रामचंद्र, ज्योतिपंत व बाळाजी असे तीन पुत्र ( शिवरामास दत्तक घेतल्यानंतर ) झाले त्याच्या वंशजास खासगीवाले हे नाव न मिळतां लिमये याच आडनावानें ते हल्लीं प्रसिद्ध असून त्याच्या शाखा सोलापूर, तासगाव, रामदुर्ग या भागात आहेत. [ श्री हरिहर काशीनाथ खासगीवाले यानीं पाठविलेल्या माहितीवरून ]

**खासपुर**—आसाम. काचार जिल्ह्यातील एक खेडें. उ. अ. २४ ° ५५' व पू. रे. ९० ° ५७'. १८ व्या शतकाच्या आरंभापासून १८३० त शेवटाचा राजा मृत्यु पावेपर्यंत हें काचार राजाच्या राजधानीचें शहर असे. याच ठिकाणीं काचारी लोकावर हिंदुधर्माचा संस्कार झाला. व १७९० त राजा व त्याचा भाऊ तांब्याच्या गोयोनींतून बाहेर निघून क्षत्रियत्व पावले असें म्हणतात. चार देवळें, दोन इतर इमारती व तीन तलाव हींच कायतीं प्राचीन राजधानीचीं चिन्हें येथें दिसतात आज या गावाला कांहीं महत्व नाहीं.

**खासी**— आसामातील या जातीची लोकसंख्या १२०८९४ आहे. ह्या राष्ट्रजातीचे लोक खार आणि सिन्टें राष्ट्रजातीप्रमाणें खासी व जैंटिआ डोंगरांतून राहतात. याची भाषा मोन- ख्मेर भाषेप्रमाणें वाटते ( याच लेखांतील खासी भाषा पहा ). पण याच्या सभोंवार असणाऱ्या मोंगोलाइड जातींशीं याच्या शरीराच्या ठेवणींत मुळींच साम्य नाहीं. यांचा रंग पिंगट असून नाक जरा बसकें असतें. कपाळपट्टी रुंद असते. खासींचा आकार ठेंगणा असला तरी ते शरीरानें धष्टपुष्ट असतात. याना गाणें विशेष आवडतें. याचा समाज मातृसत्ताक पद्धतीचा आहे. बापाचा मुलाशीं संबंध कांहीं नसतो; मुलें आईच्या कुळांत पडतात. बापानें मिळविलेलें सर्व त्याच्या स्वतःच्या आईच्या वंशांत जातें. ही जात हिंदु नसून हिंदुस्थानाबाहेरील वाटते. हे बहुतेक दैतवर्षा व मोरभट्टा करून रहातात याचा लोक पूर्वी लोमेड तयार

करण्याचा धंदा करीत पण आतां तो सुटला आहे. बायका देशी दारू गाळतात. यांचा राष्ट्रीय मेळ म्हणजे तिरंदाजीचा. यांचा मुख्य धर्म पितृपूजेचा आहे. शिवाय हे भुताखेतांचीहि आराधना करितात. यांच्यात मृतांना जाळण्यात येते व त्यांची राख आणि हाडें जमा करून डोंगराच्या बाजूस लहान किस्तवएनमध्यें ठेवितात. मृतांची स्मारकें म्हणून मोठाले दगड उभे करून ठेवितात.

गर्भवती स्त्रीस सहावा महिना लागल्यापासून तिला अपवित्र समजतात व तिच्या हातचें अन्न तिचे नातलग खात नाहींत. आठव्या महिन्यात जन्माच्या पूर्वीचा विधि होतो. त्यात नातलगबायको मिळून पूजा करतात. गर्भवती बायकांचे कष्ट कमी करण्याचे निरनिराळे उपाय आहेत ( अ ) नवऱ्यास अगदीं नग्न होऊन संगमाचें पाणी आणावें लागतें ( ब ) खून झालेलें हत्यार गर्भवतीच्या बिछान्यात ठेवतात; ( क ) काशी देण्याच्या दोराचा तुकडा ( ड ) अथवा अस्वलाचें जननेंद्रिय उशाखाली ठेवतात, ( इ ) मुसळाची लोखंडी कडी चोरून त्याची आंगठी गर्भवतीच्या बोटात घालतात; ( फ ) पुरुषानें शेंडी सोडून कांहीं गवत उपटावें व तें सुतानें गर्भवतीच्या कमरेभोंवती बांधावें. मुलाचें नाव उपाध्याय ज्योतिषावरून ठरवितो. नाळ पुरीत नाहींत परंतु घराचे अथवा कचेरीच्या दरवाज्यावर ठेवतात.

लहानपणीं मूल वारल्यास पुरतात. बाळंतीण एकटी असते. तिच्या खोलींत विस्तव पेटविलेला ठेवतात. बाळंतिणीनें उडदाची डाळ, भाजीपाले, मास खाऊं नये. मीठ घेतानें सांतें पेज खावी. बाळंतिणीनें पहिल्या, पाचव्या, सहाव्या, सातव्या, नवव्या, अकराव्या व बाविसाव्या दिवशीं स्नान करावें.

मूल सहा महिन्याचें झाल्यावर अन्न खाऊं घालण्याचा विधि होतो प्रथम मुलगा व नंतर मुलगी अशीं जुळीं मुलें निपजल्यास अपशकुन समजतात, परंतु मुलगी नंतर मुलगा अशीं जुळीं मुलें जन्मल्यास इतकें वाईट समजत नाहींत. मुलीस ऋतु प्राप्त तिच्या नवऱ्याच्या घरीं झाला पाहिजे. बापाच्या घरीं झाल्यास तिच्या भावास दारिद्र्य येतें.

पहिलीं मुलें मेल्यास नंतर झालेलें मूल जोग्यास देऊन नंतर त्याच्यापासून विकत घेतात व याला जोग्या म्हणतात.

ल ग्न चा ली.—बहुभर्तृत्व म्हणजे पुष्कळ नवरे करण्याची चाल तिबेटाच्या सरहद्दीपलीकडे आहे. जोहार,दर्म, चौंदा व बियान या भोटपरगण्यात बहुभर्तृत्वाची चाल नाहीं. अस्कोट परगण्यातील राजी लोकामध्यें ही चाल आहे. हिंदु लोकांमधील नियोग ही पुरातन चाल यांच्यात आहे. स्त्रिया योगानें निपुत्रिक विधवेला मृत पतीच्या धाकट्या भावापासून पुत्रप्राप्ति करून घेता येते आल्मोरा जिल्ह्यातील जमीनदार लोकात विधवा बहुधा मृत पतीच्या धाकट्या भावाची बायको होते, परंतु पुनर्विवाह संमत नाहीं.

ब ला त्का रा नें ल ग्न.—दर्म, चौंदा व बियान या परगण्यातील भोटिया लोक आपल्या तरुण मुलामुलींना रंगभग नावाच्या जागीं एकत्र जमून नाचणें, गाणें व खाणेंपिणें करूं देतात व या ठिकाणींच वधूवर आपली निवड करतात. परंतु एखाद्यास झिडकारलें असेल तर तो व त्याचे मित्र त्या तरुणीची रात्रीं वाट पहातात व जबरीनें तिच्या तोंडात मास व मिठाई घालतात. नंतर ती त्याची कायदेशीर लग्नाची बायको होते. परंतु ती बायको न झाल्यास तिला मुक्त केल्याशिवाय दुसरीशीं लग्न करता येत नाहीं.

रजपूत जमीनदार लोक खासिया आहेत. यांच्यामध्यें मामा कन्यादान करीत असे कोणाहि इसमाची बहीण व त्याच्या बायकोच्या भावाची बायको एकच असते.

चु ल त भा वं डां चीं ल ग्नें—बापाच्या भावाचीं आईच्या बहिणींचीं मुलें स्वतःच्या मुलाप्रमाणें मानलीं जातात व त्यांना परस्पर लग्नें करण्याची मनाई आहे. परंतु बापाच्या बहिणींचीं मुलें व आईच्या भावाचीं मुलें स्वतःच्या मुलाप्रमाणें मानलीं जात नाहींत व त्यांना लग्न करण्याची मुभा असते.

कालिकेचा धबधबा, डिंगिंहवा डोंगर, रूपतिळीनदी वगैरे सर्वांच्या खासी लोकात बऱ्याच आख्यायिका प्रचलित आहेत.

खा सी भा षा.—खासी जिल्हा व जेंटिया टेंकड्या यांचें मुख्य ठिकाण शिलाँग हें खासी भाषेचें मूळ ठिकाण होय. त्याशिवाय सिल्हेट व काचर या शेजारच्या जिल्ह्यातहि ही भाषा बोलणारे लोक आहेत. सर्वांत शुद्ध खासी भाषा चरापुंजीभोंवतालचे लोक बोलतात याशिवाय गारो टेंकड्यानजीकची लिंगनगम् भाषा, शिलाँगच्या पूर्वेकडील जोवई भागातील सिंटेंग उर्फ प्नार भाषा आणि सिल्हेटच्या बाजूच्या भागातील वारभाषा, अशा आणखी तीन भाषा या विभागात आहेत. यापैकीं सिंटेंग भाषेचें खासीशीं सर्वांत अधिक साम्य आहे

हिंदुस्थानातील इतर मूळ देशी भाषाहून खासी ही अगदीं स्वतंत्र निराळी भाषा आहे, यामुळेंच तिला फार महत्व आहे. शब्दांचे मूळ धातू व उच्चार या बाबतींत खासीचें मोंगोलियन भाषाशीं साम्य आहे; आणि शब्दांच्या रूपाच्या बाबतींत हिंदुस्थानातील इतर भाषाहून ती फार भिन्न आहे.

खासी व हिंदुस्थानातील इतर अनार्य भाषा यात मुख्य फरक पुढीलप्रमाणें आहेः—

लिंगविचार खासी भाषेत पूर्णतेनें आहे. प्रत्यक्ष स्त्रीपुरुष असा भेद त्या पदार्थांत असो वा नसो, प्रत्येक नामाचें ( निर्जीव वस्तूंच सुद्धा ) स्त्रीलिंग किंवा पुल्लिंग असें विशिष्ट लिंग ठरलेलें असतें. असाच लिंगभेद त्याच्या विशेषणात व क्रियापदातहि उपसर्ग लावून दर्शविला जातो.

हिंदुस्थानातील अनार्य भाषातल्याप्रमाणेंच शब्दामधील संबंध शब्दयोगी अव्ययाच्या मदतीनें दर्शविले जातात. परंतु अनार्य भाषा व खासीभाषा यात

असा आहे कीं, खासी भाषेंत हीं शब्दयोगी अव्ययें शब्दांच्या पूर्वी उपसर्गाप्रमाणें जोडतात. परंतु द्रविडी मुंडा, तिबेटी-ब्रह्मी या भाषांत तीं प्रत्ययाप्रमाणें पुढें जोडतात. खासीप्रमाणेंच इतर मोन—ख्मेर वर्गांतील भाषांत नियम आहेत. तसेंच दोन शब्दांतील षष्ठीचा संबंध दर्शवितांना खासी, तई, व इतर मोन-ख्मेर भाषांत षष्ठयन्त शब्द पुढें येतो; पण वर सांगितलेल्या द्रविडी वगैरे अनार्य भाषेंत तो अगोदर येतो. या सर्व प्रत्ययाचा असा परिणाम होतो कीं, खासीभाषेंतील वाक्यांतील शब्दानुक्रम व तिबेटी-ब्रह्मी भाषेंतील शब्दानुक्रम यामध्यें फार मोठा फरक पडतो आणि शब्दानुक्रमावरूनच विचारानुक्रम निदर्शित होत असल्याकारणानें या निरनिराळ्या लोकांची विचारक्रमपद्धतीहि भिन्न भिन्न असली पाहिजे हें उघड आहे.

खासी भाषेंत कावोजी, अनामी व तईप्रमाणें संबंधी सर्वनाम आहे. हिंदुस्थानांतील बहुतेक अनार्य भाषांत हें सर्वनाम नाहीं. हा या दोन भाषावर्गांत मोठा फरक आहे.

खासीभाषा व मोन-ख्मेर भाषा यांचा परस्पर संबंध असल्याचें प्रथम १८५३ मध्यें लोगन यानें दाखवून दिलें. त्यानें " ब्रह्मी-तिबेटी,गंगाप्रदेशीय व द्रविडी या भाषाबद्दल सामान्य गोष्टी " असा एक निबंध लिहिला. पण त्यांतील मुख्य प्रमेयाकडे कित्येक विद्वानांचें दुर्लक्ष्य झाल्यासारखें दिसतें, कारण खासीभाषा इंडो-चिनी भाषांपैकीं एक असून ती दूर एका बाजूस पडलेली आहे असें मत पुष्कळ दिवस चालू होतें. पुढें १८८९ मध्यें कूहननें पुन्हा खासी व मोन-ख्मेर यांचा खरोखर संबंध आहे हें निखालस सिद्ध केलें.

[ संदर्भ ग्रंथः—अॅड्मिनिस्ट्रेशन रिपोर्टः डाल्टन-डिस्क्रिप्टिव्ह एथ्नॉलॉजी ऑफ बेंगाल, मिल्स—रिपोर्ट ऑन दि खासी अँड जैन्टिया हिल्स. यूल—नोट्स ऑन दि खासी हिल्स अँड पीपल; गुर्डान—दि खासीज्; इं. ॲ. पु. ४० ]

**खासी आणि जैंटिया डोंगर**—आसाम, सुरमा दरी व डोंगराविभाग यांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ६०२७ चौ. मै. येथील लोकसंख्या ( १९२१ ) २,४३,२६३ आहे. या जिल्ह्यांत एकसारख्या पूर्वपश्चिम डोंगराच्या रांगा असून मधून मधून उंच पठारें आहेत. अति उंच डोंगरांवर मोठमोठीं साग्वानी झाडें असतात; पण तीं कांहीं जुन्या धर्मसमजुतीमुळें तोडीत नाहींत. प्राचीन काळापासून तळबंगालला चुन्याचा सर्व पुरवठा खासी डोंगरांतून होई. या ठिकाणीं कोळसाहि निघतो. ब्रिटिशांनीं १८३३ त खासी डोंगर जिंकून घेतले. यांतून खासी ( पहा ) लोक राहतात. खासी लोकांनीं निवडलेले राजे ब्रिटिश सरकारचे मांडलिक म्हणून वागतात. असे २५ राजे ( सीम ) असून ते स्वतंत्रपणें कारभार चालवितात. जैन्टिया डोंगर १८३५त छोट्या हिंदु संस्थानाकडून ब्रिटिशांनीं घेतले. सिन्टेंग लोकांची यात वस्ती असून उत्पन्नावर कर बसविल्यावरून त्यांनीं १८६० व १८६२ या दोन सालांत बंड केलें; पण तें मोडण्यांत आलें. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण पूर्वी चेरापुंजी होतें. तें शिलांग करण्यात आलें. चेरापुंजीपासून गौहट्टीपर्यंत चांगला रस्ता आहे. १८९७ त या जिल्ह्यांत मोठा धरणीकंप होऊन बरींच घरें व रस्ते पडून गेले. व पुष्कळ प्राणहानि झाली.

**खिचिंग.**—बिहार-ओरिसा. मयूरभंज संस्थानांतील एक खेडें. उ. अ. २१° ५५ व पू. रे. ८५° ५०'. लो. सं. ( १९०१ ) २६९. याठिकाणीं दगडी मूर्ती, खाब, समाधी व कित्येक दगडविटांच्या देवळांचे अवशेष यासारख्या पुराणवस्तू सांपडतात. गांवाजवळच असणारा देवालयसमूह फार महत्वाचा आहे. यांतील एक शिवालय अकबराचा सुभेदार मानसिंग याच्या वेळेस दुरुस्त केलेलें दिसतें. [ आर्किऑलॉजिकल सर्व्हे रिपोर्ट, पु. १३ ].

**खिजदिया**—काठेवाड. गोहिलवाड जिल्ह्यांतील स्वतंत्र खंडणी देणारा एक तालुका. या तालुक्यांत खिजदिया हें एकच गांव आहे. त्याचे पुन्हा दोन भाग असून एक एका सय्यदाकडे व दुसरा वालकाठीकडे आहे.

**खि ज दि या दो स्त जी.**—गोहिलवाड जिल्हा. हा स्वतंत्र खंडणी देणारा दुसरा तालुका सोनगड ठाण्यात आहे. तालुका एकाच गांवाचा असून तालुकदार लाठीचे भायाद व गोहिलरजपुतांपैकीं आहेत.

**खि ज दि या ना गा नी.**—लाखापादर ठाण्यांतल्या या स्वतंत्र खंडणी देणाऱ्या तालुक्यांत खिजदिया हें एकच गांव आहे. तालुकदार वालकाठी आहेत.

**खिप्रो.**—मुंबई, सिंधप्रांत थर आणि पारकर जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ २२४९ चौ. मै. असून लो. सं. (१९११) ४६१७१ आहे. तालुक्यांत १२५ गांवें असून खिप्रो हें मुख्य ठिकाण आहे. जमीन महसूल व इतर पट्टया यांचें १९०३-४ सालीं उत्पन्न सुमारें २ लाख रुपये होतें. रानाहुतप या वाळवंटाखेरीज बाकीचा सर्व प्रदेश मिथराव कालवा व धोरो नारो यांनीं भिजला जातो.

**खिरणी-रायण**—खिरणी अथवा रायणीचीं झाडें बाकुळीसारखींच असून तीं मुंबई इलाख्यात बहुतेक सर्व ठिकाणीं होतात. विशेषतः गुजराथेंत रस्त्याच्या कडेला खिरणीचीं झाडें पुष्कळच दृष्टीस पडतात. यांना उष्ण व कोरडी हवा चांगली मानवते. झाडें बीं लावून करतात व तीं बहुतेक सर्व प्रकारच्या जमिनींत होतात. फळ एप्रिल व मे महिन्यात तयार होतें. गुजराथी लोकांना हें फळ फार आवडतें. खिरणीचीं झाडें रस्त्याच्या बाजूला लावण्याला फार चांगल्यापैकीं आहेत. कारण एकदा लावल्यावर त्याची पुन्हा काळजी घ्यावी लागत नाहीं, झाडाची पालवी झडत नाहीं. लाकूड उत्तम व कणखर असतें. फळहि रुचकर

असतें, यामुळें उन्हाळ्यात व दुष्काळाच्या दिवसांत गरीब लोकांचा या फळावर बराच गुजारा होतो. [ वनो. गुणा. ]

**खिरपई**—बंगाल, मिदनापूर जिल्ह्यातील एक शहर. उ. अ. २२° ४३' व पू.रे. ८७° ३७ लो. सं (१९०१) ५०४५. येथें १८७६ त म्युनिसिपालिटी स्थापन झाली. लोकांच्या मालमत्तेवरील करांचें उत्पन्न म्युनिसिपालिटीला सर्वांत जास्त आहे.

**खिरा**—खिरा, काकडी, वालुक हीं नावें काकडीच्या जातींच्या फळांस देतात परंतु या नावांमध्यें बराच घोंटाळा आहे. कोणी खिऱ्यास काकडी म्हणतात व वालुकहि म्हणतात. नावाचा घोटाळा होण्यास निरनिराळे प्रकार निरनिराळ्या प्रांतात होतात हें एक कारण असावें. पुण्यांत जे पांढरे खिरे उन्हाळ्यात व पावसाळ्यारंभीं मिळतात, ती जात दुसऱ्या जिल्ह्यात करीत नाहींत म्हणून खिऱ्यास त्या जिल्ह्यात होणाऱ्या काकडीचें नाव देतात

हें फळ पांढरें अगर हिरवट पांढरें, तीन ते नऊ इंच लांब असून पिकल्यावर पिवळें होतें. यास उंसाच्या शेतांत अगर निराळें लावितात. याचे वेल ६ फूट वाढतात ते जमिनीवर पसरतात. ही जात पुर्णप्रांतीं व उत्तर हिंदुस्थानात पिकवितात. पुण्यास वालुकासहि खिरा हेंच नाव प्रचलित आहे. खिरे टिकाऊ नसतात. ते तोडल्यावर लवकर कांसुसतात व नंतर सडतात. [ वनो गुणा.]

**खिलचीपूर, संस्थान**—मध्यहिंदुस्थान. भोपाळ एजन्सींतील एक मांडलिक संस्थान. क्षेत्रफळ २७३ चौ. मैल याच्या उत्तरेस कोटा संस्थान, पूर्वेस राजगड, पश्चिमेस इंदोर व दक्षिणेस नरसिंगगड आहे. हवा समशीतोष्ण असून पाऊस सरासरी ३२ इंच पडतो. संस्थानिक प्रसिद्ध चौहान वंशातील खीची रजपूत आहेत १५४४ त उग्रसेनानें गागरोनच्या खीची राजधानींतून इकडे येऊन हें संस्थान स्थापिलें. शिरापूर व माचलपूर परगणे याची जहागिरी दिल्लीच्या बादशहानें त्याला दिली. १७७० त या संस्थानचा कांहीं मुलूख कमी झाला. संस्थानिकाला रावबहादुर अशी पदवी आहे.

संस्थानची लोकवस्ती ( १९०१ ) ३११४३. यात खिलचीपूर हें एकच शहर असून बाकी २८३ गावें आहेत. सोंधिया, धाकड, देसवाली, चांभार, डांगी, लोध व रजपूत या मुख्य जाती आहेत. संस्थानच्या नैर्ऋत्येकडील प्रदेश चांगला सुपीक आहे. मुख्य पीक ज्वारीचें आहे.

संस्थानात एकंदर तीन तहसिली आहेत. मुलकी व जमाबंदीच्या बाबतींत संस्थानिकाला पूर्ण अधिकार आहेत. मोठ्या गुन्ह्याचे खटले भोपाळचा पोलि. एजंट चालवितो. संस्थानी उत्पन्न एक लाखावर आहे.

**शहर**—खिलचीपूर संस्थानची राजधानी. विंध्याद्रीच्या एका शाखेच्या पायथ्याशीं डोंगराळ प्रदेशात हें वसलें आहे. याचें मूळ नाव खीचीपूर लो. सं. ( १९११) १८५८. एक ब्रिटिश पोस्ट ऑफिस, एक शाळा, एक तुरुंग व एक दवाखाना या गावात आहे.

**खिलजी**—किंवा घिलझइ एक अफगाण जात. दक्षिणेस कलत-इ-घिलझइपासून उत्तरेस काबूल नदीपर्यंत आणि पश्चिमेस गुलकोह रांगेपासून पूर्वेस हिंदुस्थानच्या सरहद्दीपर्यंत ही जात पसरली आहे. अनेक ठिकाणीं या सरहद्दीहि ओलांडून पलीकडे हे खिलजी लोक गेलेले दिसतात एकेकाळीं सिरदर्या नदीच्या उत्तर भागातील जिल्ह्यातून जे तुर्कवंशीय खिलजी रहात त्यांच्यापासून ही जात निघाली व दहाव्या शतकांत सबक्तगीननें या लोकांस अफगाणिस्तानात आणिलें असें एक मत आहे. कोणी अफगाणिस्तानातील खल्ज गावावरून खिलजी नाव पडलें असें म्हणतात. खिलजी लोक लष्करी बल व व्यापारी धाडस या बाबतींत कोणालाहि हार जात नाहींत. हे लोक चांगले मर्दानी असून पोविंद व्यापाऱ्यांची मुख्य भरती यांच्यातील सुलेमानखेल, नासिरखेल, खरोती इत्यादि अतिशय बळकट घराण्यांतूनच झालेली आहे इ. स. १२८९ ते १३२० या अमदानींत हिंदुस्थानात जें खिलजी घराणें राज्यारूढ होतें तें याच्यापैकींच होय. [ सरदेसाई. ]

**खिलजी घराणें**—या घराण्याचा संस्थापक जलालुद्दीन नावाचा मुसुलमान सरदार होता. अफगाणिस्तानातील खल्ज नावाच्या प्रांतातील रहिवाश्यांना खिलजी असें म्हणतात, त्या जातीचा हा जलालुद्दीन होता. गुलाम घराण्याच्या वेळीं राज्यातील मोठमोठ्या जागा तुर्कांना मिळत. त्यामुळें तुर्कांचा व खिलजी जातीचा वेबनाव असे. बंगाल जिंकण्यात या लोकांनीं पुष्कळच शौर्य दाखविलें होतें. गुलाम वंशाच्या अखेरीस हे लोक बरेच शिरजोर झाले होते. कैकोबाद हा गुलाम घराण्याचा शेवटचा राजा होता. तो जुलमी असल्यानें व त्याच्या वजीराचा शिरच्छेद झाल्यामुळें बंडखोर खिल्ज लोकांनीं त्यांचा पुढारी जलालुद्दीन याच्या चिथावणीवरून कैकोबादचा निर्दयपणें खून केला. पुढें लोकांच्या डोळ्यावर येऊं नये म्हणून कैकोबादच्या अल्पवयी शम्सुद्दीन नावाच्या मुलास जलाल यानें गादीवर बसविलें, परंतु थोड्याच दिवसात त्याचाहि खून करून जलालनें तख्त बळकावून स्वतःस फिरोजशाह नाव घेतलें (फेब्रु. १२९० ). यावेळीं त्याचें वय ७० होतें या घराण्यात सहा राजे होऊन त्यांनीं एकंदर तीस वर्षें राज्य केलें, त्यात अल्लाउद्दीन हा प्रख्यात झाला.

जलालुद्दीनाबद्दल सरदारदरकदार व प्रजा यांचें चांगलें मत नव्हतें म्हणून तो धांवरून दिल्लीस न रहाता जवळच किलुखेडी येथें राजवाडा बांधून राहिला व त्या खेड्यास नौशहर ( नवें शहर ) असें नाव दिलें त्याचा राज्यकारभार फार ढिलाईचा होता, वयमानानें त्याला कडक शिस्त राखता आली नाहीं. त्यामुळें सर्वच पेंढाऱ्यांचा व लुटारूंचा सुळसुळाट झाला. इ स १२९१ त उत्तरेंत

दुष्काळ पडला असता सिद्दी मौला नावाच्या एका फकीरानें त्याचा जीव घेण्याचा कट केल्यानें यानें त्याला फाशीं दिलें. या विरहित त्यानें कोणास कडक शिक्षा केली नाहीं. पुढें १२९२त मोंगलानीं पंजाबवर स्वारी केली तेव्हा स्वतः जलाल त्यावर चालून गेला. लढाई होऊन दोघात तह झाला. स्मिथ म्हणतो कीं, जलालनें मोंगलास खंडणी दिली कडामाणिकपुर येथील सुभेदार मलीक छज्जु यानें बंड केल्यानें तें मोडून जलालनें तेथें आपला पुतण्या व जावई अल्लाउद्दीन यास नेमलें ( १२९१ ). जलालनें दोन वेळा रणथंबोरच्या किल्ल्यास वेढा दिला पण तो किल्ला पडला नाहीं, तेव्हा जलालनें माळव्यात जाऊन लुटालूट करून व उज्जैनहि लुटून आणि माळ्व्यातील देवळें फोडून तो परत दिल्लीस गेला ( १२९१ ) वरील मोंगलाच्या स्वारींत चेंगीझखानाचा नातू उल्घूखान हा जलालच्या हातीं लागला असता त्यास त्यानें त्याच्या तीन हजार मोंगल लोकांनिशीं दिल्लीस ठेविलें, या सर्वांनीं पुढें मुसुलमानी धर्म स्वीकारल्यामुळें त्याना नवे मुसुलमान म्हणू लागले पुढें ( १२९२ ) अल्लाउद्दीनानें पूर्वमाळवा जिंकल्यानें जलालनें त्याला अयोध्या (कडा माणिकपुर) प्रांताची सुभेदारी जहागीर दिली व त्याचा सुमारास आपला मुलगा अर्कलीखान यास मुलतानचा व नसरतखानास सिंधचा सुभेदार नेमलें. अल्लाउद्दिन पुढल्या वर्षी देवगिरीवर गेला. प्रथम माळव्यातून निघून गेल्यावर खानदेशातून तो देवगिरीवर उतरला. रामदेवरावाचा नाश होण्याची वेळ आली होती, पण त्याचा मुलगा शंकरदेव हा एकाएकीं मदतीस आल्यानें अल्लाउद्दिनाचें कांहीं न चालता त्यानें तह करून व खंडणी घेऊन परत माळव्याकडे प्रयाण केलें. या स्वारींत त्यानें बरीच लूट मिळविली व पुष्कळ सैन्य पदरीं ठेवलें आणि त्याची वार्ता जलालुद्दिनास लागूं न देण्याची खटपट केली. याबद्दल जलाल यास पुष्कळ लोकांनीं सांगून पाहिलें परंतु त्याचा अल्लावरील विश्वास उडाला नाहीं. अल्ला हा परत कडामाणिकपुरास आल्यावर त्यानें जलालास भेटीस बोलावलें आणि जलाल हा इतरांचें न ऐकता भेटीस गेला. तेव्हा अल्लानें त्याची भेट घेत असता विश्वासघात करून मारेकऱ्याकडून त्याचा खून केला ( जुलै १२९६ ). त्याचें डोकें भाल्यास खोंचून सर्व फौजेंत फिरविलें व फौजेला भरपूर बक्षिसें वाटलीं. जलाल हा दुर्बळ मनाचा राजा होता तो चोराना अगर दरवडेखोराना कडक शिक्षा देत नसे. त्याच्या वेळीं ठगानीं सर्वत्र सुळसुळाट केला असता त्यानें एक हजार ठग लोकाना पकडून त्याना शिक्षा न करता फक्त बंगालमध्यें हद्दपार केलें. त्यामुळें पुढें पुष्कळ दशकें बंगालमध्यें या ठगाचा व चोऱ्याचा उपद्रव होत होता. चोरानी चोरी करणार नाहीं अशी नुसती शपथ घेतली कीं हा त्याना सोडून देई ही त्याची दुर्बलवृत्ति खिलजी लोकासहि आवडली नाहीं. त्यानें विद्वानास आश्रय दिला होता त्याच्या यानें दरबारात व बाहेरहि त्याच्याविरुद्ध कट सुरू झाले व त्याचा मुख्य अल्लाउद्दीन बनला जलाल मेल्यावर त्याच्या बेगमेनें वडील पुत्र अर्कलीखान हा मुलतानास असल्यानें धाकटा पुत्र रुक्नुद्दीन इब्राहिम यास गादीवर बसविलें. परंतु अल्लाउद्दीन हा दिल्लीस फौजेसह आल्यावर बेगम आपल्या मुलासह मुलतानास पळून गेली व अल्लाउद्दीन हा मुहम्मदशहा हें नाव घेऊन २१ आक्टोबर १२९६ त तख्तावर बसला अल्लाउद्दीन याचें चरित्र ज्ञानकोशाच्या सातव्या भागात विस्तृत आलें आहे तेथें तें पहावें. त्याशिवाय विशेष मजकूर येथें दिला आहे अल्लाउद्दीनानें मुलतानास आपला भाऊ उल्घुखा यास पाठवून व अर्कली रुक्नुद्दीन व ( जलालुद्दीनचीं मुलें ) याना ( वचन देऊन ) पकडून आणवून त्याचे डोळे काढले पुढें १२९६ त मोंगलानीं पंजाबवर स्वारी केली असता जालंधर येथें त्याचा उल्घुखान व झाफरखान यानीं पराभव केला याच उल्घुखानानें इ स १२९८ त गुजराथच्या स्वारींत सोमनाथाचें देऊळ लुटून व तेथील मूर्ति फोडून खंबायत व अनहिलपट्टण काबीज केलें परत जाताना उल्घूनें फौजेजवळ लुटीचा एकपंचमांश भाग मागितल्यानें सैन्यानें बंड केलें परंतु तें मोठ्या मुष्किलीनें मोडलें गेलें. याच वेळीं खंबायत येथें उल्घूनें पुढें फार प्रसिद्धीस आलेल्या मलिक काफर नावाच्या गुलामास कैद केलें. याच वेळीं ( १२९८ ) पुन्हा मोंगलानीं सल्दीच्या हाताखालीं सिविस्तानवर स्वारी केली, तेव्हा त्याचा पराभव जाफरखानानें केला. रणथंबोरच्या लढाईंत अल्लाउद्दिनाचा सरदार नसरतखान मारला गेला व मुसुलमानाचा पूर्ण पराभव झाला तेव्हा अल्लाउद्दिन स्वतः रणथंबोरवर गेला याच वेळीं दिल्लीस त्याचा पुतण्या सुलेमानशाह आकतखान यानें बंड करून स्वतःस बादशहा म्हणून जाहीर केलें व अल्लाउद्दिनास ठार मारण्याचा कट केला तेव्हा अल्लाउद्दिनानें त्याला पकडून ठार मारिलें पुढें रणथंबोरचा वेढा चालू असता, मंगूखान व उमरखान या दोघा पुतण्यानीं बदाऊन येथें व दिल्लीस हाजी मौलानें बंडें उभारलीं. अल्लाउद्दिनानें त्या सर्वांना पकडून ठार मारून शांतता स्थापन केली. रणथंबोर पडल्यावर तेथें उल्घुखानाची नेमणूक केली पण तो पुढें सहा महिन्यानीं मरण पावला. याचवेळीं ( १३०२ ) दाऊद मोंगलानें लाहोरवर स्वारी केली होती. यानंतर ( १३०३ ) अल्लाउद्दिनानें मलिक छज्जू व फकिरुद्दीन याना तेलिंगणावर पाठविलें व स्वतः चितोडला जाऊन ( २८ जाने. इ. स. १३०३ ) किल्ल्यास वेढा दिला. परंतु मोंगल दिल्लीकडे आल्यानें त्याला परतावें लागलें. पुढें २६।८।१३०३ रोजीं अल्लाउद्दिनानें चितोड घेतलें व तेथें खिजरखान ( वडील मुलगा ) यास सुभेदार नेमलें. पुढल्याच वर्षी चितोडचा पकडून आणलेला राणा कैदेंतून पळून गेला. मोंगल हे ख्वाजा ताशच्या हाताखालीं हिंदुस्थानात अमरोहपर्यंत चालून आले ( १३०४ ) तेव्हा गाजीबेगनें त्याचा पराभव केला, पुन्हा १३०५ त ऐबक

खान हा मोंगलामध्ये चालून आला परंतु त्यानाहि गाझीनें पराभव केला. याच वेळीं अलपखान यानें कारेथचा किल्ला घातला. नंतर अल्लाउद्दिनानें ३ जुलै १३०८ रोजीं सिवानला वेढा देऊन १० सप्टेंबर रोजीं तें घेतलें व तेथील राजास ठार मारिलें, याच सालीं त्यानें झालवाडहि घेतलें पुढें मलिककाफूर यानें वरंगळास वेढा देऊन एक महिन्यानें तें घेतलें ( १७ फेब्रुवारी १३१० ) व तेथील प्रताप रुद्र राजाशीं तह करून व लूट घेऊन तो परत दिल्लीस गेला ( १० जून ), परंतु पुन्हा द्वारसमुद्रावर स्वारी करण्यास निघून तेथें तो २५ फेब्रु १३११ रोजीं पोहोंचला तेथचा राजा वीरवल्लाळ हा त्याला शरण आला तेव्हां तेथून काफूर हा रामेश्वरापर्यंत जाऊन व तेथें एक मशीद बांधून परत दिल्लीस गेला याच सुमारास ( १३११ ) दिल्लीस राहिलेल्या नव्या मुसुलमानांनीं ( पूर्वीचे मोंगल लोक ), त्यांना अल्लाउद्दिनानें सैन्यातून कमी केलें म्हणून त्याचा खून करण्याचा कट केला, परंतु तो उघडकीस आल्यानें त्यानें त्या सर्वांची कत्तल केली. अल्लाउद्दिनाचा वडील मुलगा खिजरखान यानें मामेबहिणीशीं लग्न लाविलें ( १३१२ ) तेव्हां मलिक काफूरनें चिथावल्यावरून अल्लाउद्दिनानें त्यास कैद केलें व त्याच्या मेव्हण्यास गुजराथचा सुभेदार अलपखान यास ठार मारिलें त्यामुळें गुजराथेंत बंड झालें, त्यावर कमालुद्दीन यास पाठविलें असता, बंडखोरांनीं त्याला ठार मारिलें पुढें अल्लाउद्दीन मरण पावला याच्या पदरीं झियाउद्दीन बराणी म्हणून इसम होता,त्यानें याच्याबद्दल पुढील प्रमाणें लिहून ठेविलें आहे.राज्यावर बसल्यापासून तीन वर्षांच्या आंत त्यानें राज्याचा चांगला बंदोबस्त केला. त्यामुळें त्याला चैनींत दिवस घालवितां येऊं लागले त्याच्या फौजेस भराभर जय मिळाले, दरेक वर्षी त्याला दोनतीन मुलें होऊं लागलीं, तिजोरींत भरपूर पैसा जमला, हिरेरत्नांच्या पेट्या जमूं लागल्या व हजारो हत्ती पीलखान्यांत झुलूं लागले. त्यामुळें तो ऐश्वर्यमदानें उन्मत्त बनला, गर्वानें व अज्ञानानें त्याचें डोकें बहकून तो भलतीं कृत्यें करूं लागला त्याला विद्येचा गंधहि नसल्यानें विद्वानांची संगति याला आवडत नसे तो हट्टी निष्ठुर व उर्मट होता. परंतु त्याला दैव अनुकूल होतें नवीन धर्म स्थापून आपण त्याचे पैगंबर बनावें असें तो म्हणूं लागला, त्यानें आपणास दुसरा शिकंदर ( अलेक्झांडर ) असें नाव धारण केलें लोकांनीं बंडें उभारलीं तेव्हां त्यानें लोकांचा छळ केला हिंदूंनीं हत्यारें घेऊं नयेत, घोड्यावर बसूं नये. उंची पोशाख करूं नये असे नियम केले त्याच्या या कडकपणानें राज्यांत बरवर स्वस्थता दिसत असे

अल्लाउद्दिनाच्या पश्चात काफूरनें त्याच्या बेगमेस हाकलून देऊन त्याचा मुलगा खिजरखान व त्याचा एक भाऊ याना आंधळे करून शिहाबुद्दीन नांवाच्या त्याच्या एका भावास तख्तावर बसविलें ( १३१६ ) परंतु पुढें एक महिन्यानें काफूर याचा खून त्याच्या जुलमानें त्रासलेल्या दरबारी मंडळींनीं पाईक लोकांच्या एका टोळीकडून करविला. तेव्हां मुबारकशहा म्हणून अल्लाउद्दिनाच्या दुसऱ्या एका मुलानें शिहाबुद्दिनास पदच्युत करून आपण तख्तारोहण केलें ( १३१७ ) त्यानें गुजराथेंतील बंड मोडून तेथें आपला सासरा मलिक दिनार उर्फ झाफरखान यास सुभेदार नेमलें. देवगिरीकर शंकरदेवाचा मेव्हणा हरपाळदेव यानें यावेळीं उचल केली, तेव्हां मुबारकानें त्याच्यावर स्वत जाऊन त्याचा पराभव केला ( १३१८ ) मुबारक दुर्व्यसनी व चैनी होता. त्यानें हलक्या लोकांस मोठमोठ्या जागा दिल्या हसन नावाच्या आपल्या एका आवडत्या गुलामास त्यानें वजीर करून त्यास मलिक खुश्रू पदवी दिली खुश्रूनें मलबारवर स्वारी करून पुष्कळ लूट आणिली ( १३१९ ). अल्लाउद्दिनानें निष्कारण कैदेंत टाकिलेल्या लोकांना मुबारकनें मोकळ करून रयतेच्या जप्त केलेल्या जमिनी सोडल्या व जुलमी कर बंद केले खुश्रूच्या हातीं सर्व कारभार आल्यानें त्यानें करडा अंमल गाजविला. मुबारक आळशी व व्यसनी बनला. राज्यांत दारूचीं दुकानें चाललीं, सर्वत्र महागाई झाली; देशांत बंडें उठलीं, त्यामुळें बादशहानें दडपशाही सुरू केली, निरपराध्यांना ठार मारिलें, शेवटीं मलिक खुश्रूनें आपल्या मदतनिसाकरवीं मुबारकचा खून केला ( १३२० ) येथें खिलजीघराण्याचा शेवट झाला

मलिक खुश्रू हा मूळचा हिंदू होता त्यानें १ वर्षपर्यंत दिल्लीचें राज्य केलें. त्याच्या मनात पुन्हा दिल्लीस हिंदूचें राज्य स्थापावयाचें होतें त्यानें आपल्यास नासीरउद्दीन हें नाव घेतलें होतें. त्यानें खिलजीघराण्यातील लोकांची कत्तल केली व मुबारकाच्या मुख्य बेगमेशीं ( ही सुद्धा मूळची हिंदु होता)लग्न लाविलें मुसुलमानाविरुद्ध त्यानें एकदम उचल केल्यानें ते चिडले व त्यांनीं बंड केलें. शेवटीं गाझीबेग तघलख यानें ( हा पंजाबचा सुभेदार होता ) दिल्लीवर स्वारी करून, मलिक खुश्रूचा पराभव केला लढाईंत खुश्रू ठार होऊन गाझीबेग घियासुद्दीन तघलख नाव धारण करून तख्तावर बसला ( १३२१ ) खुश्रूस जर त्या वेळच्या सर्व हिंदु राजांनीं मदत केली असती तर दिल्लीस हिंदूचें राज्य पुन्हा स्थापन झालें असतें

[संदर्भग्रंथ—ताझीयतुल्—अम्सीर, झिआउद्दीन बिराणी—ता. ई फिरूझशाही, माबेल डफ—इंडियन क्रॉना०, स्टॅन्ले लेनपूल—मिडीव्हल इंडिया, मिरात ई अहमदी, तारीख ई अलई, तुहफत उल कीरान, फेरिस्ता, व्हि. स्मिथ.]

**खिलात**—याचा मूळ अर्थ बहुमानाचा झगा किंवा पोपाख असा असून, तो बादशहाकडून सरदारास बक्षीस म्हणून मिळत असे शिवाय त्याबरोबरच देणारा व घेणारा यांच्या दर्जाप्रमाणें घोडा, हत्ती, तलवार वगैरे युद्धोपयोगी वस्तु आणि पागोटें, पायजमा, अंगरखा, शेला वगैरे वस्त्रें व

शिरपेच,कंठा इ. जवाहीरहि देत. दिल्लीवर पातशहानें थोरल्या बाजीरावसाहेबांस जो खिलात दिला होती ( १७३९ ) तींत वरील वस्त्राशिवाय, दोन शिरपेंच, एक मोत्याचा कंठा, एक घोडा व एक हत्ती इतक्या वस्तू होत्या. पुढें दिल्लीकरानें ( १०५२ ) त सवाईमाधवराव यांना वकील-इ-मुतलक या जागेची सनद पाठविली त्यावेळींहि पुढीलप्रमाणें खिलात पाठविली होती बहुमानाच्या पोषाखाचीं नऊ वस्त्रें, पाच बहुमोल जडावाचे अलंकार, ढाल, तलवार, कलमदान, शिक्का, दऊत, दोन मोर्चेलें, नालखी, पालखी व एक हत्ती आणि बादशाही निशाणाचे सहा हत्ती [ मोलस्वर्थ-डिमक व मॅट्टफ. व्हॉ. १, व्हॉ ३. ]

**गिळिगिला**—कोल्हापूरच्या शिलाहार राजापैकीं इ स. १०५८ च्या सुमारास राज्य करणारा मारसिंह हा राजा खिळिगिला किंवा खिळिगिलो या अद्रिदुर्गा( किल्ल्या )वर राज्य करीत होता असें एका शिलालेखात म्हटलें आहे. या लेखात गूवल किंवा गूहल हा या किल्ल्याचा किल्लेदार असल्याचेंहि नमूद आहे. या किल्ल्याचा दुसरीकडे कोठेंहि उल्लेख नाहीं डॉ. सर भांडारकर याच्या मतें खिळिगिला म्हणजे पन्हाळा होय ते म्हणतात कीं, मारसिंहाच्या पूर्वीचे व नंतरचे शिलाहार पन्हाळ्यास राज्य करीत होते म्हणून गिळिगिला म्हणजे पन्हाळा होय. काहींच्या मतें खिळगिला म्हणजे खेळणा ( विशाळगड ) होय निसर्गतः काहीं बाबतींत खेळणा हा पन्हाळ्याहून श्रेष्ठ आहे. मारसिंहाच्या ( गोंका नांवाच्या ) बापानें बरेचसें कोंकण जिंकिलें होतें, मारसिंह राज्यावर आल्यानंतर त्यानें कोंकण व देश दोन्हीं ठिकाणीं बंदोबस्त करतां यावा म्हणून खेळणा किल्ला पसंत केला असावा. गूहल हा त्याचा मुलगा होता, त्यास त्यानें खेळण्याचा किल्लेदार नेमलें असावें. [ डॉ. भांडारकर—अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन, विविधज्ञानविस्तार अंक जून १९१८ ]

**खीवा**—मध्य आशियांतील एक संस्थान. एके काळीं हें आशियांतील महत्वाचें राज्य होतें, पण सध्या रशियावर अवलंबून असलेलें हें लहानसें खानराज्य ( खानेट ) आहे. याची दक्षिणोत्तर लांबी २००मैल असून पूर्वपश्चिम रुंदी १०० मैल आहे. क्षेत्रफळ २४००० चौ. मै.व लो. सं. सुमारें ६४६०००. ज्वारी, गहूं, तांदूळ, कापूस, द्राक्षें, वगैरे जिन्नस येथें उत्पन्न होतात. येथील रानटी लोक उंट, मेंढ्या, घोडे, गुरें, इत्यादि प्राण्यांची पैदास करतात. उझबेग, सार्ट, टाजिक, तुर्कोमन व कारा कालपाकन, असा चार प्रकारचे लोक येथें राहतात. कापड, रेशीम व कानटे यांवर कशिदा काढणें हा येथील महत्वाचा घरगुती धंदा होय.

सध्याचें खानेट हें गतकालीन वैभवशाली राज्याचा एक क्षुद्र अवशेष आहे. पूर्वीच्या राज्यास कोरासमिआ, खोरेझम, उरगेंज अशी निरनिराळी नांवें होती हिरोडोटस यानें चोरासमि-याचा उल्लेख केला आहे. त्या वेळीं तें इराणच्या साम्राज्यांतील एक प्रांत होता. खिस्तानंतर ६८० या वर्षी अरबांनीं चोरासमिआ काबीज केलें. खलीफाची सत्ता नष्ट झाल्यानंतरचा पहिला ऐतिहासिक राजा मामुन-बिन्-महंमद हा होय. १०१७ त खारेझम हें गझनीच्या महंमदाच्या हातीं गेलें. पुढें तें सेलजुक तुर्कांच्या ताब्यात गेलें. १०९७ त कुतुबुद्दीन हा गव्हर्नर स्वतःच येथील राजा झाला. १३७९ मध्यें तैमूरनें खीवा जिंकिलें. १५१२ तें उझबेगसत्तेखालीं गेलें.

१७ व्या शतकात रशियानें खीवाशीं हितसंबंध जोडले. कोसॅक्स लोकांनीं खीवावर बऱ्याच स्वाऱ्या केल्या. १७१७ पीटर दि ग्रेटनें खीवावर सैन्य रवाना केलें त्या लढाईत रशियाचा जय झाला. १९ साव्या शतकात १८३९ त मास्को सरकारनें पुन्हा खीवावर स्वारी केली पण त्याचें भयंकर नुकसान झालें १८४७ त रशियानें सिरदर्या नदीच्या मुखाजवळ एक किल्ला बांधला. १८६९ त कास्पियन समुद्राच्या पूर्व किनाऱ्यावर रशियानें क्रॅनोव्होडस्क हें ठाणें बांधलें. १८७१-७२ त रशियन तुर्कस्तानकडून खीवाला जाणारे निरनिराळे रस्ते शोधून काढले. १८७३ त रशियन सैन्यानें खीवावर चाल केली, व तें काहीं एक प्रयास न पडता काबीज करण्यात आलें. अखेरीस आक्ससच्या दक्षिणतीरावरील सर्व प्रदेश रशियास जोडण्यात आला.

**खुइखदान संस्थान**—मध्यप्रांत. २१° ३०′ आणि २१° ३८′ उत्तर अक्षांश व ८०° ५३′ आणि ८१° ११′ पूर्व रेखांश. क्षेत्रफळ १५४ चौरस मैल. खुई म्हणजे पांढरी माती व खदान म्हणजे खाण. या दोन शब्दावरून संस्थानाचें नाव बनलें आहे. या लहानशा संस्थानाचे चार तुकडे असून ते सर्व रायपुर जिल्ह्याच्या पश्चिमेस आहेत. त्या चार तुकड्यांचीं नावें:—खुइखदान, योरतारा, बिदोरा, सिमई. या संस्थानात नद्या नाहींत. पावसाची सरासरी दर वर्षाची सुमारें ४० इंच असून हवा साधारण बरी आहे. हिंवाळ्यांत हिंवतापाची साथ उद्भवते.

इतिहास.—संस्थानचा पूर्वीचा इतिहास अज्ञात आहे. पारमोडीचा जमीनदार व येथील संस्थानिक यामध्यें बरेच दिवस शत्रुत्व होतें. अखेरीस नागपूरकर भोंसल्याच्या मदतीनें तुळसीदास नांवाच्या इसमास ही जमीनदारी मिळाली. त्यावेळीं बोंडका हें मुख्य ठिकाण होतें. बोंडका पारमोडीच्या फार जवळ असल्यामुळें तुळसीदासानें खुइखदान हें आपलें मुख्य ठिकाण केलें. तुळसीदासाच्या मरणानंतर महन्त लछमनदासास गादी मिळाली व ब्रिटिश सरकारनें त्यास आपली मान्यता दिली. १८६५ सालची सनद त्यास मिळाली.

सन १८६७ साली विशोरदासास गादी मिळाली. परंतु यानें संस्थानची व्यवस्था बरी न ठेवल्यामुळें ब्रिटिश सरकारनें आपल्या तर्फे एक दिवाण नेमला. सन १८९६ साली हा मरण पावला व त्याचा मुलगा राधावल्लभ किशोरदास यास गादी मिळाली. परंतु दोन वर्षांनतर

यास व त्याचा एक १२ वर्षांचा मुलगा यास त्याच्या नातलगांपैकीं एकानें विषप्रयोग करून ठार मारलें. अपराध्यास व त्याच्या साथीदारास पकडण्यांत येऊन त्यास फाशी देण्यात आले. व राधावल्लभाचा वडील मुलगा दिग्विजयी किशोरदास यास कायदेशीर वारस ठरविण्यांत आलें. परंतु त्यावेळीं तो अज्ञान असल्यामुळें सर्व व्यवस्था ब्रिटिश सरकारच पहात होतें. परंतु हा फार अशक्त असल्यामुळें इ. सन १९०३ सालीं मरण पावला; व त्याचा धाकटा भाऊ महन्त भूदर किशोरदास यास गादी मिळाली. याचा जन्म इ. स. १८९१ सालीं झाला येथें प्राचीन अवशेष फारसे नाहींत. लोकवस्ती ( १९११ )३११५०.येथील भाषा छत्तिसगड हिंदी आहे. शेंकडा पंचाहत्तर लोकांचा धंदा शेतकी आहे. बाकीचे नोकर व रोजावर काम करणारे आहेत. यांचा धर्म शाक्त आणि वैष्णव आहे. येथें राहणाऱ्या जाती गोंड, लोधी, तेली, अहीर या होत. सुमारें ११४ चौरस मैल जमीन स० १९०८ सालीं लागवडीखालीं होती. पैकीं ५३ चौरस मैल जमिनीवर कोदन, १९ चौ. मैल जमिनीवर गहूं व सुमारें ५००० एकरवर भाताचें पीक होतें. दर वर्षी लागवडीखालीं येणाऱ्या क्षेत्राची वाट होत आहे. स्थानिक गुरें लहान बांध्याचीं व अशक्त आहेत. संस्थानात उद्योगधंदे मुळींच नाहींत असें म्हटलें तरी चालेल. एकंदर जंगल सुमारें १५ चौरस मैल आहे. खनिज संपत्तीचा शोध कोणी केला नाहीं. इमारती दगड व पांढरी माती संस्थानात पुष्कळ सांपडते. संस्थानात जमीनपट्टाणी, अबकारी, शिक्षण, तुरुंग वगैरे नेहमींचीं खातीं आहेत. जमा ( इ. स. १९०८ ) ६३८००रुपये व खर्च ६५६०० रु. आहे. खंडणी १२००० रुपये आहे.

खुझदार—बलुचिस्तानातील कलात संस्थानच्या झलवान भागातील मुख्य शहर. या ठिकाणीं नेटिव्ह असिस्टंट व कलातच्या खानाचा नायब रहातो. सिंधी लोकांत या शहराला कोहियार असें नाव आहे. या शहराची रचना एका लांबट व अरुंद अशा दरीसारखी असून या दरीच्या वरच्या टोंकावर १८७० सालीं एक किल्ला बांधण्यात आला. उत्तरेकडून कलातहून, दक्षिण दिशेने कराची व बेलाहून, पूर्वेकडून कच्चीहून, व पश्चिमेकडून मकान व खारानहून असे चारी बाजूनी येणारे रस्ते या ठिकाणीं मिळाल्यामुळें या ठिकाणाला फार महत्व प्राप्त झालें आहे. उन्हाळ्यामध्यें या ठिकाणची हवा वाईट असते. येथें एक तोफखाना असून ७ गोलंदाज, एक तोफ व ४५ लोकांची लष्करी तुकडी आहे. नेटिव्ह असिस्टंटच्या हाताखालीं २० लोकांची लष्करी तुकडी आहे. खुझदारच्या नायबतीमध्यें भागवान, सिडी, कोलाची, नबीचें खोरें, कर्ख व चकु यामधील जमीनींचा अंतर्भाव होतो.

खुटगांव—मध्यप्रांत. जिल्हा चांदा. क्षेत्रफळ १५७ चौरस मैल. उत्तरेस धनोरा आणि दूधमळा जमीनदारी, दक्षिणेस आहेरी जमीनदारी पूर्वेस झारचापा जमीनदारी, पश्चिमेस चांदाल आणि गिलगांव जमीनदारी. एकंदर खेडीं ५६, पैकीं १८ओसाड. बहुतेक खेडीं ठेकेदारांकडे आहेत. लागवडीखालीं जमीन ३६०० एकर. जमीन साधारण प्रतीची आहे. जमीनदारींत जंगल बरेंच आहे. लोकसंख्या ( १९०१ ) २३६९. एकंदर उत्पन्न २५५८. टाकोळी ७५ रु. इतर कर ७५ ते ८० रु. सन १९०९-१० पासून टाकोळी १००रुपये ठरविली आहे. घराणें राजगोंड जातीचें आहे.

खुंटी, पोटविभाग.—बंगाल इलाख्याच्या रांची जिल्ह्याचा आग्नेय पोटविभाग. या पोटविभागाचें क्षेत्रफळ ११४०चौ. मैल होतें. १९०५ मध्यें हा पोटविभाग पाडण्यांत आला. हा विभाग पठारावर वसलेला आहे. हें पठार मधून मधून तुटलेलें असून, मध्येंच मोठ्या टेंकड्या व दऱ्या आहेत. १९११ सालीं या पोटविभागाची लोकसंख्या, २२७५४७ होती. या विभागांत, खुंटी हें एकच शहर असून ५०९ खेडीं आहेत. खुंटी हें या पोटविभागाचें मुख्य ठिकाण आहे.

शहर.—खुंटी पोटविभागाचें मुख्य ठिकाण. याची लोकवस्ती १९०१ सालीं १४४६ होती. रांचीपासून चैबासला जाणाऱ्या रस्त्यावरील हें एक व्यापारी गाव आहे.

खुतबा—मशीदींत नमाज पढल्यानंतर दर शुक्रवारीं हा खुतबा मुसलमान लोक पढत असतात. महम्मद पैगंबर व त्याच्या मागून त्याच्या गादीवर बसलेले चार पुरुष ( खलीफ ) यांची स्तुति या खुतब्यांत गाइलेली असते. त्याचप्रमाणें त्यावेळीं देशावर जो मुसुलमान राजा राज्य करीत असतो त्याचेंहि नाव वरील पाच नावामध्यें दाखल करण्याची चाल आहे. मुसुलमान पातशहा तख्तारूढ झाला कीं त्याच दिवशीं व त्याच वेळेस वरीलप्रमाणें खुतबा पटतात. आपलें नाव खुतब्यात दाखल करावें या साठीं बऱ्याच मुसुलमान राजांनीं मुसुलमानी प्रजेस छळलें आहे असें मुसुलमानी इतिहासावरून दिसून येतें. हल्लीं तुर्कांच तुर्कस्तानच्या लोकसत्ताक राज्यांत इस्तंबूलच्या मुख्य खलिफाचेंच उच्चाटण झालें आहे, त्यामुळें या खुतब्याच्या वेळीं खलिफाच्या नामोच्चारणाच्या प्रसंगीं काय करावें हा एक प्रस्तुतच्या मुसुलमानांना प्रश्नच पडत असेल. [ मोलस्वर्थ–डिक्श; फेरिस्ता. ]

खुताहन—संयुक्तप्रांतातील जौनपूर जिल्ह्याच्या उत्तरभागातील तहशील. हिचें क्षेत्रफळ १९११ सालीं ३६१ चौ. मै होतें. या तहशिलींत उंगली, रारी, कर्यात, मेंदा व चांदा हे पाच परगणे आहेत. प्रतापगड व सुलतानपूर जिल्ह्यातील थोडासा भाग या तहशिलींतच मोडतो. या तहशिलीची लोकवस्ती १९११ मध्यें २५०८८९ होती. या तहशिलींत शहागंज हें एकच शहर असून७०० खेडीं आहेत. शहागंज हें या तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. १९०३–४ सालीं या तहशिलीचें खान्याचें उत्पन्न ३,२७,००० होतें व कराचें उत्पन्न ५०,००० होतें. गोमती ही एकच नदी या

तहशिलींतून वहात जाते. तहशिलींतील कांहीं भागांत गादूळ उत्तम पिकतो पण बराच भाग ओसाड आहे. एकंदर लागवडीची जमीन २८८ चौरस मैल असून १२९ चौरस मैलास विहिरी व तलाव यांच्या मुळें पाणीपुरवठा होतो.

**खुदागंज**—संयुक्तप्रांतामधील शहाजहानपूर जिल्ह्याच्या तिल्हर तहशिलींतील शहर. हें शहाजहानपूर शहराच्या वायव्येस २४ मैलावर असून त्याचा लोकसंख्या १९०१ त ६५३५ होती. १८ व्या शतकांत व्यापारासाठीं हें शहर वसविण्यांत आलें. १८५० पर्यंत हें तहशिलीचें मुख्य ठिकाण होतें. अद्यापिहि व्यापाराच्या बाबतींत हें फार भरभराटीचें शहर आहे. येथें एक माध्यमिक शाळा आहे. १८५६ च्या २० या कायद्याप्रमाणें याचा कारभार पाहिला जातो.

**खुदियन**—पंजाबमधील लाहोर जिल्ह्याच्या चूनियन तहशिलींतील शहर. मुलतान फेरोझपूर रस्त्यावर, कसुरच्या नैऋत्येस १२ मैलावर हें शहर वसलेलें आहे. या शहराची वस्ती १९११ सालीं २९९२ होती. हा मुख्यत शेतकीचा प्रदेश आहे. सतलज नदीचा कटोरा कालवा हा या शहराच्या जवळून गेला आहे. १८७५ सालीं या शहराला म्युनिसिपालिटी देण्यांत आली. शहरांत एक दवाखाना आहे.

**खुरई तहशील**—मध्यप्रांतांतील जिल्ह्याच्या वायव्य भागांतील एक तहशील. १९११ सालीं हिचें क्षेत्रफळ ९०० चौ. मै. होतें. लोकसंख्या १,११,०७० होती. या तहशिलींत खुरई व एटवा हीं दोन शहरें असून ४५० खेडीं आहेत. या तहशिलींतील १२४ चौरस मैल सरकारी जंगल असून बाकीच्या उरलेल्या क्षेत्रफळापैकीं जवळजवळ निम्मा भाग लागवडीला योग्य आहे. १९०३-४ सालीं या तहशीलींतील २३८ चौरस मैल जमिनीची लागवड करण्यांत आली. जमिनीचा महसूल ७७,००० रुपये व कर ८००० रुपये होता. या तहशीलींतील जमीन उंचसखल असून उत्तरेकडील भागांत बरेच दगड आहेत, बीना व बेटवा नद्यांच्या कांठीं जंगलें पसरलीं आहेत.

**शहर**—खुरई तहशिलीचें मुख्य ठिकाण बीना शहराकडे जाणाऱ्या रेल्वेच्या फाट्यावर हें वसलेलें असून सौगरशहरापासून ३१ मैल दूर आहे. याची लोकवस्ती १९११ सालीं ६०६८ होती. या शहरांत एक जुना पुराणा किल्ला असून तेथेंच हल्लीं कचेऱ्या भरतात. येथें जैन लोकांची बरीच वस्ती आहे व जैनांचीं सुंदर देवालयें आहेत. १८६७मध्यें या शहराला म्युनिसिपालिटी देण्यांत आली. या ठिकाणीं दर आठवड्यास गुरांचा बाजार भरतो, व येथून मध्यदेशास पुष्कळ माल रवाना होतो. येथें माध्यमिक शिक्षणाची शाळा असून दोन मुलींच्या शाळा व एक स्वीडिश ल्यूथेरन मिशननें चालविलेली एक शाळा आहे. येथें एक दवाखाना आहे.

**खुरासणी**—या झुडुपास लॅटिनमध्यें गुइझोटिया अबिसिनिका, मराठींत कारळा रामतीळ, खुरासणी, गुजराथींत रामतळ कानडी-गुरेलू हिंदी-जगनी इत्यादि नांवें आहेत. मुंबई इलाख्यांतील गुजराथेंत कारळा फारसा होत नाहीं. पंचमहाल जिल्ह्यांत थोडथोडा होतो. देशावर व कर्नाटकांत सर्वत्र होतो. परंतु हें पीक नाशिक व विजापूर जिल्ह्यांत महत्वाचें आहे. कोंकणांत व मावळांत वरकस जमिनींत आणि मध्यप्रांत व तेलंगणांत डोंगराळ भागांत याचा पेरा जास्त असतो.

हें पीक हलक्या, भुरभुशीत अशा जमिनींत चांगलें होतें. कारळे कधीं स्वतंत्र व कधीं बाजरींत मिसळून पेरितात. मिसळीच्या पेऱ्यांत दर एकरीं बियाचें प्रमाण एक पौंड असून स्वतंत्र पेऱ्यांत चार ते सहा पौंड असतें. बीं पाभरीनें पेरितात. ओळींमध्यें अंतर सुमारें एक फूट असतें. पीक नोव्हेंबर डिसेंबरांत तयार होतें. फांद्यांनीं झोडून बीं तयार करितात. याचें दर एकरी स्वतंत्र पीक अजमासें ४०० ते ५०० पौंड येतें व मिसळीचें पीक अजमासें ५० ते ७५ पौंड असतें. कर्नाटकांत कित्येक वेळां हें पीक तागाप्रमाणें हलक्या जमिनींत करून हिरवळ खताकरितां गाडितात. याचें तेल स्वयंपाकांत उपयोगी पडतें. पेंड गुरांना खाण्यास व खताकरितां उपयोगी आहे.

**खुरिया**—मध्यप्रांत जशपूर संस्थानचा वायव्य भाग व्यापणारें पठार व इलाखदारी. उ. अ. २३ ° ०'ते २३°१४' व पू. रे. ८४ ° ३०' ते ८३ ° ४४'. या पठारावर मोठमोठीं कुरणें असल्यामुळें मिर्झापूरच व इतर ठिकाणचे बरेच गोपाल व अहीर धाराने कळपच्या कळप येथें चारावयास आणतात. अशा कांहीं अहीरांनीं येथें कायमची वस्ती केली आहे. येथील मुख्य वस्ती 'पहाडी कोरवा' लोकांची असून जमीनदार त्याच जातीचा आहे. कांहीं काळापूर्वी त्यास कोरवाचा 'मांझी' असें म्हणत असत. त्यास 'दिवाण' ही स्थानिक पदवी आहे. परंतु तो बाघेला रजपूत व खुरिया राणीचा वंशज आणि रतनपूरच्या हैहयवंशी राजाचा संबंधी असून रतनपूरहून येथें आला असल्याचें सांगतो. या जमीनदारींत ७९ गांवें असून ५६० रुपये टाकोळी आहे.

**खुर्जा, तहशील**—संयुक्त प्रांतांतील बुलंदशहर जिल्ह्यांतील दक्षिण तहशील. हिचें क्षेत्रफळ १९११ सालीं ४६० चौ. मै. होतें. या तहशिलींत जेवर, खुर्जा व पहासू हे तीन परगणे आहेत. १९११ सालीं याची लोकसंख्या २,५८,८४० होती. तहशिलींत ७ शहरें व ३४८ खेडीं आहेत. १९०३-४ सालीं या तहशिलीचें उत्पन्न ५०,७०,०० रुपये व कराचें उत्पन्न ८०,००० रुपये झालें. तहशिलीमध्यें पूर्वकाली, करवन व पटवाहा बाहू या नद्या आहेत. पश्चिम सरहद्दीवरून यमुना नदी वहात गेली आहे. काली नदीच्या पूर्वेस व पटवाहीच्या पश्चिमेस रेताड जमिनीचे पट्टे

आहेत. तहशिलीच्या मध्यभागांतील प्रदेश फार सुपीक आहे. या भागात कापूस फार पिकतो. १९०३-४ साली ३४५ चौ. मै. जमीनीची लागवड करण्यांत आली होती. त्यापैकीं १५२ चौ. मै. ला पाण्याचा पुरवठा विहिरी व कालवे यांच्यामुळें होत होता.

शहर.—खुर्जा तहशिलीचें मुख्य ठिकाण. ईस्ट इंडियन रेल्वेच्या फांट्यावर हें वसलेलें आहे. या शहराची लोकसंख्या १९११ सालीं २८३८७ होती. त्यापैकीं हिंदू १४४८५ व मुसुलमान १२०४५ होते. या शहराचें नाव 'खारीज' (इनाम) या शब्दावरून पडलें. फिरोजशाह तघलखनें भाले सुलतान रजपुतांना हा प्रदेश इनाम दिल्यानंतर त्यांनीं हें शहर वसविलें असें म्हणतात. पुढें १७४० मध्यें भरतपूरचा राजा सुरजमल्ल यानें त्यापैकीं बराच भाग हिरावून घेतला. व १८ व्या शतकाच्या अखेरीस दौलतराव शिंद्यानें त्यांतला बराच भाग परत घेतला. या शहरात ४०० वर्षांच्या पूर्वीचें जुनें असें मखदुम साहेबाचें थडगें आहे. याशिवाय तहशिली दवाखाना व टाऊन हॉल अशा आणखी तीन इमारती आहेत. या शहरात कसाई, पठाण व चुरवाल जातीचे वाणी यांची पुष्कळ वस्ती आहे. चुरवाल वाण्याचा जैन धर्म असून ते मोठे धनाढ्य आहेत. त्यांनीं चाळीस वर्षांपूर्वी आपल्या ज्ञातीच्या खर्चानें एक उत्कृष्ट जैन मंदिर बांधविलें आहे. त्यातील कलाकुसरीचें काम प्रेक्षणीय आहे. मंडई, धर्मशाळा, वगैरे इमारतीहि खोदीव दगडानें बांधलेल्या आहेत. अमेरिकन मेथॉडिस्ट, झनाना बायबल व मेडिकल मिशन या संस्थांनीं आपल्या शाखा येथें उघडल्या आहेत.

खुर्जा शहराला १८६६ मध्यें म्युनिसिपालिटी देण्यात आली. १९०३-४ सालीं या म्युनिसिपालिटीचें उत्पन्न ३८,००० व खर्च ४२,००० रुपये होता. जिल्ह्याच्या व्यापाराचें हें ठिकाण असल्यानें येथें कापसातील सरकी काढण्याच्या व गठ्ठे बांधण्याच्या गिरण्या आहेत. तसेंच येथून धान्याची निर्गत बरीच होते. नीळ, साखर, तूप हेंहि जिन्नस बाहेर गांवीं पाठविण्यात येतात. येथील भांडकामहि चांगलें होतें. इंग्लिश कापड, धातु, पितळेचीं भांडीं हीं बाहेरून या शहरात येतात. या शहरीं ८ शिक्षणाच्या शाळा आहेत.

**खुर्दा, पोटविभाग.**—बंगाल इलाख्यातील पुरी जिल्ह्याचा पश्चिम पोटविभाग. याचें क्षेत्रफळ १९११ सालीं ९७१ चौरस मैल होतें. लोकसंख्या ३६७६०४ होती. हा पोटविभाग छोटा नागपूर प्रदेशाच्या आग्नेय सरहद्दीशीं भिडलेला आहे. या भागात पुष्कळ लहान टेकड्या असून त्यात जंबूर दगड मुबलक सापडतो. या टेकड्यांच्या मधील सपाट जमीनींत कुरंद व पुळणी आहे. या पोटविभागात १२१२ खेडीं आहेत व खुर्दा हें या पोटविभागाचें मुख्य ठिकाण आहे. भुवनेश्वर येथें लिंगराजाचें सुप्रसिद्ध देवालय असून शिवाय लहान लहान देवालयें पुष्कळ आहेत. खानगिरी व उदयगिरी डोंगरामध्यें पुष्कळ दऱ्या व खडकामध्यें खोदलेलीं देवालयें आहेत.

ओरिसाच्या हिंदुराजघराण्याच्या ताब्यात शेवटपर्यंत असणारा मुलूख हाच होय. हा डोंगराळ व जंगलव्याप्त असल्यानें मराठ्यांनां हा प्रदेश जिंकतां आला नाहीं. १८०४ पर्यंत येथील राजघराण्यानें आपलें स्वातंत्र्य राखलें पण १८०४ सालीं घराण्यातील राजानें ब्रिटिशसरकारविरुद्ध बंड केल्यामुळें त्या राजाच्या ताब्यात असलेला प्रदेश जिंकून तो ब्रिटिशसरकारनें आपल्या ताब्यात घेतला. १८१७-१८ मध्यें येथील शेतकरी वर्गानें बंड केलें पण तें लवकरच मोडण्यांत आलें व त्यांच्या मागण्या शक्य तितक्या मंजूर करण्यात आल्या. हल्लीं या विभागात पूर्ण सुव्यवस्था व शांतता नांदत असून यांचें उत्पन्न ३.७७ लाख आहे. खुर्देचा हल्लींचा राजा जगन्नाथाच्या देवालयाची व्यवस्था पहातो.

शहर.—खुर्दा पोटविभागाचें मुख्य ठिकाण. कटकपासून गंजमकडे जाणाऱ्या राजरस्त्यावर हें वसलेलें असून या गावावरून बंगाल नागपूर रेल्वेचा फाटा गेला आहे. या खेड्याची लोकवस्ती १९०१ सालीं ३८२४ होती. १८१८-२८ पर्यंत पुरी जिल्ह्याचें हें मुख्य ठिकाण होतें. येथें एक छोटेखानी तुरुंग असून १० कैद्यांची व्यवस्था त्यात होऊं शकते.

*खुर्दादमाई*—याचें सर्व नाव अबुल कासीम उबेदुल्ला बिन अहमद असें होतें. ह्या ग्रंथकारासंबंधीं यूरोपीय पंडितामध्यें फार वाद आहे. ह्या ग्रंथकाराचा आजा खुर्दाजिन हा जादूगार असून त्याला बॅरमॅसिडनीं मुसुलमानी धर्माची दिक्षा दिली होती. अबुल कासिमची जाबल पर्वताशेजारच्या प्रांतात संदेशखात्यावर नेमणूक झाली. नंतर तो खलिफा मोतामिडच्या दरबारीं येऊन त्याचा एक प्रधान झाला. त्यानें पुष्कळ पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यापैकीं कांहीं खालीं लिहिल्याप्रमाणें:-(१) किताब अबाब-अल-समा (ह्या पुस्तकांतूनच मसउदीनें मी टॅमिडच्या चरित्रात उत्तम उतारा घेतला आहे) (२) किताब जमहुर अनसाब अल-फर्स, यामध्ये पर्शियन लोकांच्या वंशाची फार उत्तम माहिती दिली आहे. (३) किताब—अल—मसालिक वाल—मुमालिक हें पुस्तक राज्यें व रस्ते ह्यासंबंधीं भौगोलिक माहितीचें आहे. (४) किताब-अल-शराब हें पुस्तक पेयासंबंधीं आहे. (५) किताब-अल-लहवल-मलाहि हें पुस्तक खेळ व करमणूक ह्यावर आहे (६) किताब-अल-अनवा हें पुस्तक ताऱ्यासंबंधीं आहे. (७) किताब-अल-नुडमा-वल जुलसा हें पुस्तक दरबारी लोकांसंबंधीं आहे. ह्या ग्रंथकाराचें फक्त एक पुस्तक आपणास उपलब्ध होतें असें इलिअटनें म्हटलें आहे. तें इब्न-खुरदाझिबचा भूगोल हें होय. ह्याची फक्त एक प्रत यूरोपात आहे त्याचें हस्तलिखित प्राचीन असून त्याच्यावर १२३० हा सन आहे. पण त्याच्यावर भिन्नोच्चारदर्शक खुणा नाहींत. तें ऑक्सफोर्डच्या बॉड्लिअन लायब्ररींत

ठेवलें आहे. हा इस खुरदाशिव इ. स. ९१२ त मरण पावला.

खुलदाबाद, ता लु का.—हैद्राबाद संस्थानातील औरंगाबाद जिल्ह्याच्या वायव्य भागांतील हा तालुका आहे. १९११ त या तालुक्याची लोकसंख्या २५०२३ होती. याचें क्षेत्रफळ १२९ चौरस मैल होतें. या तालुक्यात ७८ खेडीं आहेत त्यांपैकीं ९ खेडीं जहागीर आहेत १९०१ त या तालुक्याचा महसूल ८३३०० रुपये होता. या तालुक्याचा पूर्वेकडील व उत्तरेकडील भाग डोंगराळ आहे

गा व.—खुलदाबाद तालुक्याचें मुख्य ठिकाण औरंगाबाद शहरापासून १४ मैलावर हें ठिकाण असून तें २७३२ फूट उंचीवर वसलेलें आहे १९०१ मध्यें याची लोकसंख्या २८४५ होती येथें औरंगझेब, अझमशहा, हैद्राबादसंस्थानचा मूळ संस्थापक असफजाह, अहमदनगरचा निजामशहा नासीरजंग, मलिक अंबर, तानशहा इत्यादि प्रसिद्ध पुरुषांचीं व पुष्कळ साधूंचीं थडगीं आहेत या खेड्याचें पूर्वीचें नाव रौझ होतें पण औरंगझेबाच्या मरणानंतर औरंगझेबाला खुल्दमकान हा किताब देण्यात आला त्यावरून खुलदाबाद हें नाव प्रचारात आलें या खेड्याच्या नजीकच्या पठारावर भद्रवती या इतिहासप्रसिद्ध हिंदू शहराचे जीर्ण अवशेष अद्यापि पहावयास मिळतात येथें तालुकाकचेरी, पोस्टऑफिस, शाळा व पोलिसठाणें आहे. हें खेडें आरोग्यस्थान म्हणून प्रसिद्ध आहे.

खुलना, जि ल्हा — बंगाल इलाख्यातील प्रेसिडेन्सी पोटविभागांपैकीं एक जिल्हा. या जिल्ह्याचें क्षेत्रफळ, दक्षिणेकडील सुंदरबनाचें क्षेत्रफळ सोडून देता, १९११ साली ४७६५ चौ.मै होतें.या जिल्ह्यात हुगळी व मेघना नद्यांच्या मुखामधील टापूच्या दक्षिणेकडील भाग येतो या जिल्ह्याच्या उत्तरेस जेसोर जिल्हा, पूर्वेस बकरगंज, पश्चिमेस चोवीस परगण्याचा मुलुख व दक्षिणेस बंगालचा उपसागर आहे. या जिल्ह्याचे वर्णनाच्या सोईसाठीं चार भाग पाडता येतील. ते वायव्य, ईशान्य, मध्य व दक्षिण या दिशेकडील भाग होत. वायव्य भागांतील जमीन उन्नत आहे तर ईशान्य भागांतील जमीन सखल व दलदलीची आहे. मध्यभागांतील जमीन सखलच आहे व हल्लीं ती लागवडीखालीं आणण्यांत आली आहे. दक्षिणेकडील भागात नद्यांचें जाळेंच असल्यानें व दलदलीच्या जागा फार असल्यानें त्या ठिकाणची जमीन लागवडीला अयोग्य झाली आहे. या भागात स्थिर लोकवस्तीहि नसते. हा जिल्हा म्हणजे एक पुळणीयुक्त सपाट प्रदेश असून या प्रदेशातून उत्तरेकडून दक्षिणेकडे पुष्कळ नद्या वहात गेल्या आहेत. मधुमती ही नदी या जिल्ह्यातून वहात जाऊन व पुढें बलेश्वर हें नांव पावून, हरिणघाता या मुखानें समुद्राला मिळाली आहे. याशिवाय इच्छामती, यमुना, कपदक, भैरव या नद्या प्रमुख असून शेंकडो छोट्या नद्या तर पुष्कळच आहेत. या टापूंत सरोवर असें मुळींच नाहीं. पण दलदलीच्या जागा मात्र फार असून त्यांपैकीं वायव्येकडील या दलदलीच्या जागेची लांबी ४० मैल आहे पण त्यांपैकीं बराचसा भाग हल्लीं लागवडीखालीं आणण्यात आला आहे. जिल्ह्याच्या वायव्यभागात खजूरीच्या झाडांचीं वनेंच्या वनें आहेत. ईशान्येकडील भाग व मध्यभाग हे पावसाळ्यामध्यें पाण्यात बुडून जातात. नद्यांचीं तीरें हीं उंचावर असल्यानें तेवढीच काय तीं पाण्यावर रहातात. या तीरावर मोठमोठीं दाट जंगलें आहेत व त्यात अनेक प्रकारचे वृक्ष, व वनस्पती आहेत. बाबु, माड, ताड, इत्यादि झाडांची येथें समृद्धि आहे. पाण्यानें बुडलेल्या प्रदेशात काहीं ठिकाणीं तांदूळ पेरण्यात आलेला दिसतो. पण बहुतेक भागात शेवाळ, कमळें, इत्यादींचाच सुकाळ आढळतो दक्षिणेकडील सुंदरबनाच्या टापूंत सागवान व इतर प्रकारचें लाकूड भरपूर मिळतें.

सुंदरबनामध्यें वाघ, चित्ते, रानम्हशी, डुकरें, हरिण, काळवीट, माकडें, इत्यादि पशू विपुल आढळतात. विशेषतः वाघाचा या भागात फार उपद्रव असल्यानें या भागात जमीनीची लागवड करण्याला लोक फारसे धजत नाहींत. मधुमती,भैरव व सुंदरबनातील सर्व नद्यांमध्यें सुसरी आढळतात. त्याप्रमाणें या जिल्ह्यात निरनिराळ्या प्रकारचे सापहि भरपूर सापडतात. या जिल्ह्यामध्यें पावसाचें वार्षिक प्रमाण ६५ इंच आहे. जिल्ह्यात नद्यांचा सुकाळ असल्यानें वरचेवर मोठमोठे पूर येऊन नासधूस होते अशा प्रकारचे पूर १८८५ १८९० व १९०० साली आले होते. हल्लीं, मधुमती नदीचे कालवे निघाल्यापासून व छोट्या नद्यांचे प्रवाह आटल्यामुळें पूर वरचेवर येण्याचें कमी झालें आहे.

इतिहासः—प्राचीन काळीं या जिल्ह्याचा बंगाल्याच्या अगर समतटाच्या राज्यात अंतर्भाव होत असे. पुढें बल्लाळसेनानें बंगालचे जे भाग पाडले त्यांपैकीं बागरी पोटविभागात हा जिल्हा मोडूं लागला. सुमारें पाच शतकांपूर्वी, खानजी अली नावाच्या एका सरदाराला गौडच्या राजानें हा जिल्हा जहागिर दिला. त्यानें सुंदरबनातील बरीच झाडें मुळें तोडून टाकून तेथें राहण्याजोगी व्यवस्था केली. तो या जिल्ह्याचा राजाच होता म्हटलें तरी चालेल. त्यानें आपल्या जहागिरीत असंख्य मशीदी व थडगीं बांधली. त्यांपैकीं कांहीं अद्यापि बागेरहाट व मासजरकुर येथें जीर्णावस्थेंत असलेलीं पहावयास सापडतात. बंगालचा शेवटचा राजा दाऊदखान याच्या विक्रमादित्य नावाच्या आपल्या प्रधानानें दिल्लीच्या राजाकडून सुंदरबनची जहागिर मिळविली व ईश्वरीपूर नावाचें एक शहर वसविलें. या शहरापासून हल्लींच्या जेसोर जिल्ह्याला 'जेसोर' हें नाव पडलें. विक्रमादित्यामागून त्याचा मुलगा प्रतापादित्य हा सुंदरबनचा कारभार पाहूं लागला. त्यानें दक्षिणबंगालमधील छोट्या संस्थानिकांना आपल्या ताब्यात आणलें पण पुढें

अकबराचा सेनापति मानसिंग यानें त्याचा पराभव केला व त्याला बंदिवान केलें. हल्लींचा खुलना जिल्हा हा १८८२ मध्यें पाडण्यांत आला. ब्रिटिशांच्या ताब्यांत हा जिल्हा आल्यापासून त्यांनीं या जिल्ह्याच्या दक्षिण, मध्य, नैर्ऋत्य भागांतील लागवडीची जमीन वाढविण्यास सुरवात केली व त्यामुळें या भागांतील लोकवस्ती वाढूं लागली. वायव्येकडील भाग मात्र फार दलदलीचा असल्याकारणानें त्या भागांतील वस्ती उत्तरोत्तर कमी होत चालली आहे. उत्तरेकडील भागाची हीन स्थिति झाली या भागात हिंवतापाची साथ नेहमीं असते. याशिवाय अमांश, अतिसार, अग्निमांद्य या रोगांचाहि फैलाव येथें फार आहे. खुलना जिल्ह्यांत खुलना बाघेरहाट व सातखिरा या पोटविभागांचा समावेश होतो. या जिल्ह्यांत एकंदर लोकसंख्या १९११ सालीं १३,६६,७६६ होती. खुलना, देभाट व सातखिरा हीं तीन मुख्य शहरें आहेत. जिल्ह्यांत हिंदु व मुसुलमानांची सारखीच वस्ती आहे. पूर्व-बंगाली उर्फ मुसुलमानी व बंगाली या भाषा प्रचलित आहेत मुसलमानांत शेख, अजलाफ व जोलाह या जातींचे लोक पुष्कळ आहेत. यांतील बहुतेक मुसुलमान हे मुळचे हिंदु होते. हिंदूमध्यें कायस्थ, कैवर्त व ब्राह्मण या जाती प्रमुख आहेत.

मधियाल जमीनींत तांदूळ पुष्कळ पिकतो. याशिवाय कडधान्यें, सुपारी, इत्यादि जिन्नस 'दोआशिय' जमीनींत पिकतात. खजुरीची झाडेंहि पुष्कळच होतात. जिल्ह्यांत कुरणें फारच थोडीं आहेत. गुरांना भरपूर चारा मिळणें देखील अशक्य होतें. येथील गुरांची निपजहि फारच हलक्या दर्जाची आहे. सुंद्री, पशुर, अमुर, केवडा, गराव, जोआ हीं झाडें सुंदरवनांतील जंगलांत मुबलक आहेत.

जिल्ह्यांतील मुख्य धंदा साखर व काकवी तयार करण्याचा आहे. कालीगंज येथील माशांच्या भाड्याचा धंदा, तसेंच चाकू, कातऱ्या तयार करण्याचा धंदा व शिंगापासून निरनिराळ्या वस्तु तयार करण्याचा धंदा प्रसिद्ध आहे. तांदूळ, भात, चणे, डाळ, जूट, तंबाखू, साखर, सरपण, सागवान, विड्याचीं पानें, नारळ, सुपारी, मासे इत्यादि जिन्नस बाहेर गांवीं जातात. कापूस, कांचसामान, परदेशी कापड, कातड्याचें सामान, कोळसा इत्यादि जिनसांची आयात होते. खुलना, दौलतपूर, फुलतला, अलिपूर, कपिलमुनी, चक्रनगर, चलवा, बाघेरहाट, जात्रापूर, बारदल, कालीगंज, देभाट, वसंतपूर वगैरे ठिकाणीं बाजारपेठा आहेत. खुलना, जेसोर कलकत्ता यामधून ईस्टर्न बंगाल स्टेट रेल्वेचा फाटा गेला आहे. खुलना जेसोर व बाघेरहाट यामधून एक मोठा रस्ता गेला आहे. १९०३–४ मध्यें या जिल्ह्यांत ४९० मैल रस्ता होता. पैकीं १२ मैलाचा रस्ता सडकेचा होता. जिल्ह्यांतील मोठ्या नद्यामधून बोटी जाऊं शकतात व जलमार्गानें व्यापार बराच चालतो.

राज्यकारभाराच्या सोयीकरितां जिल्ह्याचीं खुलना बाघेरहाट, सातखिरा हीं तीन मुख्य ठिकाणें केलीं आहेत. खुलना पोटविभागावर एक मॅजिस्ट्रेट व त्याच्या हाताखालीं चार डेप्युटी मॅजिस्ट्रेट असतात. बाकीच्या दोन पोटविभागावर एक कलेक्टर व त्याच्या हाताखालीं एक डेप्युटी कलेक्टर असतो सुंदरवन विभागाची व्यवस्था पहाण्याकरितां एक स्वतंत्र जंगलअधिकारी व त्याच्या दिमतीला दोन दुय्यम अधिकारी असतात व ते खुलना येथें रहातात. न्यायखात्यावर डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज हा मुख्य अधिकारी असून त्याच्या हाताखालीं, खुलना पोटविभागावर दोन मुनसफ व एक सबॉर्डिनेट जज्ज व इतर विभागावर तीन मुनसफ असतात. जिल्ह्यामध्यें एकंदर १० फौजदारी कोर्टें आहेत.

बंगालमध्यें ज्यावेळीं कायमधारापद्धति सुरू झाली त्यावेळीं या जिल्ह्याच्या पुष्कळ 'जमीनदारी' पाडण्यांत आल्या. या सर्व जमीनदारींचें मिळून ६.९ लाख उत्पन्न येतें. जिल्ह्याचें एकंदर उत्पन्न १९०३–४ सालीं १४,२३,००० रुपये होतें. खुलना, सातखिर व देभाट येथें म्युनिसिपालिट्या स्थापन झाल्या आहेत जिल्ह्यात एकंदर १३ पोलिसठाणीं आहेत. व त्यांच्यावर डिस्ट्रिक्ट सुपरिंटेंडेंट हा मुख्य अधिकारी असतो खुलना, बाघेरहाट व सातखिर येथें एक तुरुंग आहे.

शिक्षणाच्या बाबतींत खुलना जिल्हा बराच मागासलेला आहे. १९०३-४मध्यें या जिल्ह्यांत ३४००० मुलें व ३०० मुली शिक्षण घेत असून १००९ शिक्षणसंस्था होत्या. १९०३–४ सालीं जिल्ह्यांत ११ दवाखाने होते

पो ट वि भा ग— क्षेत्रफळ ६४९ चौ. मै. लोकसंख्या ४,४१,२४५ या पोटविभागांत खुलना हें शहर असून ९२९ खेडीं आहेत खुलना, अलीपूर, दौलतपूर, डमरिया, फुलतला कपिलमुनि या ठिकाणीं बाजारपेठा आहेत.

श ह र—खुलना जिल्ह्याचें मुख्य ठिकाण भैरव नदी ज्या ठिकाणीं सुंदरवन येथें शिरते त्या ठिकाणीं हें वसलेलें आहे. याची लोकसंख्या १९११ सालीं १,५९,८३० होती. खुलना हें सुंदरवनाची राजधानी असून हें व्यापारी शहर आहे. ईस्टइंडिया कंपनी ज्यावेळीं मीठ तयार करीत होती त्या वेळीं खुलना येथें मिठाचें कोठार होतें. येथून नारायणगंज, बारीसाल, मादारीपूर इत्यादि ठिकाणीं जलमार्गानें व्यापार चालतो. तांदूळ, साखर, सुपारी, नारळ इत्यादि जिनसांची येथून निर्गत होते. १८८४ सालीं खुलन्याला म्युनिसिपालिटी देण्यात आली. येथें दिवाणी, फौजदारी व रेव्हेन्यु कोर्टें आहेत याशिवाय जिल्हातुरुंग, शाळा व दवाखानाहि येथें आहे.

खुशातर—हें लखनौचा कायथ मुनशी जगन्नाथ याचें टोपण नांव होतें. हा कवि उर्दू रामायणाचा कर्ता

असून हें रामायण तुळसीदासच्या रामायणाचें भाषांतर आहे. हें इ. स. १८५२ मध्यें केलें आहे

खुशाब, त ह शी ल—पंजाबमधील शहापूर जिल्ह्याची एक तहशील. या तहशिलीचें क्षेत्रफळ २५३२ चौरस मैल आहे. याच्या पूर्वेकडून झेलम नदी वहात गेली आहे. १९११ त या तहशिलीची लोकसंख्या १,७५,८२४ होती. खुशाब हें तहशिलाचें मुख्य ठिकाण आहे. या तहशिलीत एकंदर २०६ खेडीं आहेत. या तहशिलीचें उत्पन्न १९०३–४ साली २.४ लाख होतें. याच्या उत्तरभागातून साल्ट-रेंज'ची टेंकडी पसरली असून त्या टेंकडावर सकेशरचें शिखर आहे. झेलम नदीच्या काठची जमीन बरीच सुपीक आहे.

श ह र.—खुशाब तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें झेलम नदीच्या उजव्या तीरावर वसलें असून या शहरावरून नॉर्थ वेस्टर्न रेल्वेचा सिंदसागर शाखेचा फाटा गेला आहे. या शहराची लोकवस्ती १९११ साली १०,५९ होती. हें मोठें व्यापारी शहर आहे. या ठिकाणाहून बाहेर देशीं कापूस, लोकर, सुती कापड, तूप, गहूं हे जिन्नस जातात. या शहराला १८६७ सालीं म्युनिसिपालिटी देण्यात आली. येथें इंग्रजी शिक्षणाची एक माध्यमिक शाळा असून एक दवाखाना आहे.

खुर्शेद मोदी—हा पारशी जातीचा असून पेशव्याच्या दरबारीं असलेला इंग्रज रेसिडेंट क्लोज याचा एजंट होता. याचा उपयोग पेशव्याकडील कामकाजांत होत असे. हा हुषार, धोरणी आणि लटपट्या होता. इंग्रजांना व पेशव्यांना दोघानाहि खूप ठेवून आपला फायदा करावयाचा हें त्याचें धोरण असे. यास्तां रावबाजी यांनीं १८०२ त गुजरायेंतलि राळेज वगैरे पाच हजाराचे गाव इनाम दिले होते. याचें संबंध नाव खुसरवानजी बहद जमशेटजी असें होतं. क्लोजचा याच्यावर फार भरंवसा असे. सर्व हिंदी कारभार तो याच्या मार्फतच करीत असे. पुढें रावबाजीनें दिवाण सदाशिव माणकेश्वर व विश्वासू हुजऱ्या बयाजी नाईक यांनीं पुष्कळशीं सधान बांधून रावबाजींची समजूत केली कीं, मोदींच्या तर्फे इंग्रजाशीं व्यवहार केल्यास फायदा होईल. पेशव्यांची बाजू इंग्रजास समजावून देणारे सदाशिव माणकेश्वर होते. मोदी व माणकेश्वर यांनीं या प्रसंगाचा फायदा घेऊन स्वतः बरीच पुंजी मिळविली. रावबाजींचा कोणावरहि पुरा विश्वास नसे. तथापि त्यांचा विश्वास मोदींवर जास्त बसत चाललासें पाहून माणकेश्वर हे मोदींचा द्वेष करू लागले. पुढें गुप्तरूप खूप टेंवण्यास कर्नाटकची सुभेदारी श्रीमंतांनीं त्याला दिली (१८१०) यावेळीं क्लोज जाऊन रसेल हा रेसिडेंट आला होता. परंतु त्यानें पूर्वीच्या या इसमाकडे नोकरी करण्याच्या पद्धतीला अडथळा केला नाहीं. पुढें माणकेश्वरानीं श्रीमंतांच्या सल्ल्यानें मोदींवर इंग्रजाकडे लांच खाल्याची फिर्याद गुदरविली. परंतु यामुळें मोदी हा आपली बिंग इंग्रजास सांगेल असें वाटून पुढें श्रीमंतांनीच फिर्याद काढून टाकण्यास रसेलला सांगितलें. यामुळें मोदी श्रीमंतावर फार खूष झाला त्याच्याच ताब्यात १८०५ ते १८२१ पर्यंत रेसिडेन्सी होती असें म्हटलें तरी चालेल. मात्र पुढें जेव्हां एलफिन्स्टन आला तेव्हां त्यानें शेटजींची मध्यस्थी काढून सर्व कारभार आपल्याच हातीं घेतला. त्या वेळीं शेटजीनें श्रीमंताना सावध केलें. परंतु त त्याच्या लक्षात आलें नाहीं. पुढें पुन्हा माणकेश्वरानीं मोदींवर लांच घेतल्याची फिर्याद रेसिडेन्सींत केली. तेव्हां पुन्हा मोदींचें रक्षण करण्याचें ठरवून श्रीमंतांनीं फिर्याद काढून टाकण्यास अलिफ-ष्टनला कळविलें व त्यानें त्याप्रमाणें ती काढून टाकली, पण या व इतर अनेक कारणानीं अलिफष्टनला मोदींचा संशय येऊं लागला. पेशवाई नामशेष करण्याचे बेत अलिफष्टनचे चालले होते, ते मोदींच्या तोंडून बाहेर पडण्याची त्याला भिती वाटूं लागली. शेटजीलाहि अलिफष्टनचा स्वभाव समजला व त्यानें श्रीमंतास सावधगिरीच्या सूचना केल्या. त्याप्रमाणें त्यांनीं सैन्य गोळा करण्याची तयारी चालविली. पुढें अलिफष्टननें मोदीस सरसुभेदारी अगर एजंटीकारभार या दोन हुद्यांपैकीं एक हुद्दा सोडण्यास सक्तीनें सांगितल्यावर मोदीनें पेशव्यापेक्षा इंग्रजाचा कारभार टिकाऊ या दृष्टीनें कर्नाटकची सरसुभेदारी सोडिली (१८१३) याच सुमारास गंगाधरशास्त्री पटवर्धन हा पुण्यास गायकवाडाचा तंटा तोडण्यास आला होता. त्यानें पाहिलें कीं आपल्या कामात बिब्बा घालणारा हा मोदी आहे. तेव्हां त्यानें अलिफष्टनास मोदी हा पेशव्यांना फितूर आहे असें सांगून त्याला नोकरीवरून दूर करण्यास सुचविलें. अलिफष्टननेंहि त्याला तें पाहिजेच होतें–मोदीस कामावरून काढिलें. मात्र त्याची कामगिरी लक्षात घेऊन त्याला दरमहा पाचशें रु चें पेनशन दिलें. वसईच्या तहानें इंग्रज बलाढ्य होऊन पेशवे हतप्रभ झाले हें शेटजीनें जाणलें होतें व पेशव्यांनीं पुन्हा स्वतंत्र व्हावें म्हणून प्रयत्न करण्यास त्यानें श्रीमंतास व त्रिंबकजी डेंगळ्यास सुचविलेंहि होतें. त्याच्यावर फितुरीचा आरोप करून तो शाबीत करणें अलिफष्टनास मुळींच शक्य नव्हतें. नोकरी सोडल्यावरहि शेटजी पुण्यास राहिल्यास भानगडी उपस्थित करील म्हणून अलिफष्टननें त्याला खंबायतेकडे त्याच्या इनामगावीं जाण्यास सांगितलें. शेटजीनें पेशव्याकडे संधान बांधून पुण्यास रहाण्याचें योजलें होतें. मात्र पुढें मागें गुजरायेंत जायाचें ठरविलें. कारण श्रीमंत अनिश्चित, अलिफष्टनचा जाण्याचा तगादा, गंगाधरशास्त्री वाईटावर टपलेला हें त्याला ठाऊक होतें शेटजी थोड्याच दिवसात निघणार इतक्यात एके दिवशीं रात्रीं एकाएकीं मरण पावला. विषप्रयोगानें तो मेला असें सर्वजण म्हणतात. परंतु विष कोणी घातलें याचा नक्की शोध लागत नाहीं. पेशव्यानीं विष देण्याचें कारण दिसत नाहीं. कारण तो पेशव्याच्याच मर्मीतील होता असें इंग्रजच कबूल करीत होते मॉर्गन रिड्यूच्या १९२२ च्या मार्चच्या अंकांत (दि लास्ट ऑफ दि पेशवाज) गुद अलिफष्टननेंच

निषप्रयोग केला असें स्पष्ट म्हटलें आहे कारण त्याचे पेशवाई नष्ट करण्याचें सारें श्रेय शेटनी पेशव्याना मागेल ही भीति त्याला होती शेटजीस वाचा होऊन मेल्याचाहि उल्लेख एके ठिकाणीं आहे यानेंच हल्लीं पुण्यास नारायण पेठेंत मोदीचा गणपति या नांवानें प्रसिद्ध असलेलें गणपतीचें देऊळ बांधिलें, याची बागहि पूर्वी पुण्यास होती

[ संदर्भग्रंथ.—ग्रँटडफ व्हॉ. ३; पेशवाईची अखेर; पेशव्यांची बखर; भा. इ. सं. अहवाल १८३८, दुसरे बाजीराव याची रोजनिशी ]

खुश्रु अमीर—हा हिंदुस्थानातील एक प्रसिद्ध कवि होता यानें दिल्लीच्या पुष्कळ बादशहाच्या अमदानींत काम केलें यानें ९९ काव्यें लिहिलीं आहेत. याचा बाप अमीर महमद सैफ उद्दीन हा एक तुर्क असून तो बल्खहून हिंदुस्थानांत आला व पतियाळा येथें राहिला येथेंच खुश्रुचा इ. स. १२५३ त जन्म झाला. खुश्रु निजाम उद्दीन औलिआनंतर सहा महिन्यांनीं मरण पावला हा निजाम त्याचा पारमार्थिक गुरु होता खुश्रूची कबर जुन्या दिल्लींत घायासपूर येथें औलिआच्या कबरीजवळ आहे. खुश्रु इ स. १३२५ च्या सप्टेंबरमध्यें मरण पावला एच्. एम्. इलीअट म्हणतो ' दुर्दैवानें खुश्रू अशा काळांत उत्पन्न झाला कीं, त्यावेळीं हिंदुस्थानांत दुर्गुणानें साम्राज्य होतें ' त्यांतल्या त्यांत त्याच्या आयुष्याच्या शेवटीं शेवटीं दिल्लीच्या तख्तावर घियास उद्दीन तघलख हा न्यायी राजा बसल्यानें त्याला जरा आनंद झाला या राजाची हकीकत त्यानें आपल्या तघलखनामा नावाच्या इतिहासांत लिहिली आहे हा राजा खुश्रूच्या मरणापूर्वी थोडे दिवसच मरण पावला त्याचीं काव्यें विशेषतः त्याच्या देशबांधवांना पसंत पडलीं होतीं, व तीं त्यावेळच्या इतर पर्शियन कवींच्या काव्यांच्या तोडीचीं होतीं त्याचीं मुख्य काव्यें —तुआफत-अल-सघिअर, वस्ट-अल हयात, घुरत-अल-कमाल, बकिआ नाकिआ, हश्त बेहिश्त, सिकंदरनामा व रिसल नस्र ह्याच्या शिवाय दुसरींहि पुष्कळ काव्यें आहेत त्याचें नुह सिपेह्र अथवा नऊ गोल नावाचें एक अद्भुतकथात्मक काव्य आहे. याशिवाय त्याचीं पुढील काव्यें आहेत किरान-अस-सैदान-नावाचें काव्य सुलतान मुइझ उद्दीन कैकुबाद नांवाच्या दिल्लीच्या राजाच्या व त्याचा बाप नासिरुद्दीन भग्रखान, बंगालचा राजा, ह्यांच्या स्तुतिपर आहे. मजाला नावाचा ग्रंथ पहिल्या चार खलिफासबंधाचा आहे. इष्किआ नावाचा ग्रंथ प्रेमविषयक आहे त्याचा एक मट्ल-अल-अनुवर नावाचा ग्रंथ असून तो सफी तत्त्वज्ञानविषयक आहे. त्याचा दिवाण नावाचा ग्रंथ हिंदुस्थानांत सर्वमान्य असून तो दैवी प्रेमकथांनीं भरलेला आहे. त्यांतील कविता हिंदुस्थानांतील पुष्कळ सफीचे भक्त अजून गातात राहत नावाचा खुश्रूचा पुत्र प्रभु आहे.

खुश्रू सुलतान—हा बादशहा जहांगीरचा सर्वांत वडील मुलगा असून ऑगस्ट इसवी सन १५८७ त त्याचा जन्म लाहोर येथें झाला त्याची आई राजा मानसिंगाची बहीण होती. खुश्रूच्या जन्मानंतर तिला शहा बेगम ही पदवी मिळाली हा दक्षिणेंत असता १६ जानेवारी १६२२ मध्यें मरण पावला. मरताना त्याचें वय ३६ वर्षांचें होतें. मेल्यानंतर त्याच्या अस्थी अलाहाबाद येथें नेऊन पुरण्यात आल्या त्याच्या आईस तेथेंच पुरलें असून त्या जागीं हल्लीं एक बाग आहे, तिला खुश्रुबाग असें म्हणतात. त्याच्या कबरीवर पुष्कळ पर्शियन भाषेंतील करुणरसपूर्ण कविता खोदल्या आहेत तसेंच त्याच्या मरणाची तारीखहि खोदली आहे 'मासीर कुत्तबशाही' नावाच्या ग्रंथात शहाजहाननें रेझा नावाच्या इसमाकडून खुश्रुस मारविलें असें म्हटलें आहे [ बील—ओरि. बायॉ डिक्श. ]

खेकडा—संयुक्तप्रांतातील मीरत जिल्ह्याच्या बाघपट तहशीलींतील शहर हें मीरतच्या पश्चिमेस २६ मैलावर आहे १९११ सालीं याची लोकवस्ती २४०२ होती. अहीर लोकांनीं हें शहर १६०० वर्षांपूर्वी वसविलें असें म्हणतात या अहीर लोकाना जाट लोकांनीं हाकून लाविलें १८५७ त जाट लोकांनीं इग्रजाविरुद्ध बंड केलें. व त्यामुळे ब्रिटिशांनीं हें शहर आपल्या ताब्यात घेतलें या शहराचा कारभार १८५६ च्या २० व्या कायद्याप्रमाणें चालविला जातो या ठिकाणीं धान्याचा व साखरेचा मोठा व्यापार चालतो येथें एक छोटीशी शाळा आहे

खेजुरी—बंगाल इलाख्यातील मिदनापूर जिल्ह्याच्या कांटाइ तालुक्यातील खेडें हें हुगळी नदीच्या काठीं वसलेलें आहे याची लोकसंख्या १९०१ सालीं १४५७ होती या ठिकाणीं पूर्वी हुगळी नदींत येणारी जहाजें नागरत असत हें यूरोपियन लोकांचें दफनस्थान होतें.

खेड, ता लु का—मुंबई इलाख्यातील पुणें जिल्ह्यातील एक तालुका या तालुक्याचें क्षेत्रफळ १९११ सालीं ८७६ चौ. मै होतें लोकसंख्या १,६४,६४८ होती या तालुक्यांत अंबेगाव पेटयाचाहि समावेश होतो तालुक्यात एकंदर २ शहरें व २४३ खेडीं आहेत. १९०३-४ मध्यें या तालुक्याचें उत्पन्न २ ३ लाख होतें याच्या उत्तरेस व दक्षिणेस दोन डोंगरांच्या रांगा गेल्या आहेत. पूर्वेस डोंगरपठारें पुष्कळच आहेत. या तालुक्यातील जमीनें तावडी अगर भुरी आहे. पुणें जिल्ह्यातील सर्व तालुक्यापेक्षा या तालुक्यात जंगल पुष्कळ आहे हवा सर्वसाधारण बरी असते. वार्षिक पर्जन्यमान अदमासें २६ इंच आहे

गा व—पुण्याच्या उत्तरेस २१ मैलावर भीमातटाकीं खेड तालुक्याचें हें ठिकाण असून लो सं. ( १९११ ) ८०५६ आहे येथें १६१३ सालीं बांधलेलें मोंगल सेनापति दिलावरखान याचें थडगें आहे

तुकाई देवीचें सिद्धेश्वराचें व विष्णूचें अशीं तीन देवालयें येथें आहेत. तुकाई देवीचें मंदिर तुकाईवाडींत आहे. तेथें महाशिवरात्रीस यात्रा भरते. भीमेच्या काठीं चंडीराम-बुवानीं बांधलेलें विष्णूचें देवालय आहे. तेथें श्रावण वा। अष्टमीस जत्रा भरते.

१७०७ मध्यें खेड येथें ताराबाई व शाहु यांमध्यें लढाई झाली होती. त्यावेळीं धनाजीनें पंतप्रतिनिधींस मदत करण्याचें नाकारलें.

गेड, ता लु का.–मुंबई इलाख्यातील रत्नागिरी जिल्ह्याच्या ईशान्येकडील तालुका यांचें क्षेत्रफळ १९११ सालीं ३९२ चौ. मै होत. या तालुक्यात १४१ खेडीं आहेत. १९११ सालीं याची लोकसंख्या १,०१,५२६ होती. या तालुक्याचें उत्पन्न सुमारें ८६००० आहे. तालुक्यातील जमीन नापीक असून खडकाळ आहे. याच्या ईशान्येस महिपतगड, सुमारगड व रसाळगड असे तीन डोंगर असून वायव्येस मोठ्या खिंडी आहेत. हातलोट व अम्बोली हे घाटातील प्रसिद्ध रस्ते आहेत. जगबुडी नावाची नदी या तालुक्यातून वहात गेली असून तींतून नावा चालतात. या तालुक्याचें वार्षिक पर्जन्यमान १८३ इंच आहे.

गा व.—खेड तालुक्याच मुख्य ठिकाण हें जगबुडी-काठीं वसलें असून याच्या आसपास चोहोंबाजूंने डोंगराच्या रांगा पसरल्या आहेत. या खेड्याची लोकसंख्या १९०१ सालीं ५००३ होती. या गावापासून पूर्णेकडे जाण्याचा बैलगाडीचा रस्ता आहे. दाभोळ व अंजनवेलपासून या गेव्यापर्यंत नावा येतात व जातात. गांवाच्या पूर्वेस तीन खडकात खोदलेलीं देवालयें आहेत. गावात एक दवाखाना व दोन शाळा आहेत. येथें लुगडीं व भांडीं चांगलीं होतात.

खेड ब्रह्म.(किंवा ब्रह्मखेड)—मुंबई. महीकांठा. ईडरच्या ( महीकाठा, मुं इ ) उत्तरेस ३० मैलावर हरनाथ नदीच्या तीरावरील ठिकाण. हें बरेंच मोठें असून प्राचीन काळापासून यात्रेचें ठिकाण म्हणून प्रसिद्ध आहे. शहराच्या उत्तरेकडील जंगलात फार उत्तम नक्षीचें काम केलेलें एक देऊळ आहे. या देवळातील एका खांबातून बाहेर निघत आहे असें एका पाचें खोंदीव चित्र काढलें आहे तें इतर देवळातून दिसणाऱ्या चित्रापेक्षा अगदीं भिन्न आहे. येथें दरवर्षी चैत्रवारीत जत्रा भरते.

खेडा, जि ल्हा.—मुंबई इलाखा. उत्तर भागातील एक जिल्हा. उत्तर अक्षांश २२° १४' ते २३° ७' व पूर्व रेखांश ७२°३०' ते ७३° २३'. क्षेत्रफळ १५९५ चौरस मैल याच्या उत्तरेस अहमदाबाद जिल्हा, महीकांठा; पश्चिमेस अहमदाबाद जिल्हा व 'खंबायतचें संस्थान; दक्षिणेस आणि पूर्वेस मही नदी व गायकवाडी मुलूख.

उत्तरेकडील कोपरा भरा डोंगराळ आहे. बाकी सर्व प्रदेश सपाट आहे. उत्तरेस व आग्नेयीस मातरमीन आहे. जिल्ह्याच्या मध्यभागीं 'चरोत्तर' नावाची जमीन फार सुपीक असून या भागातील लागवड उत्कृष्ट असते.

या जिल्ह्यातील मही नदी प्रमुख आहे. व सुमारें १०० मैल ही नदी या जिल्ह्यातून वहाते. भूस्तरशास्त्रदृष्ट्या या जिल्ह्याची अद्यापि फारशी तपासणी करण्यात आलेली नाहीं. मही नदीच्या काठावर ८०ते११० फूट खोलीवर पाणी लागतें. पूर्वी या भागात जवळ पाणी लागत असे परंतु इ. स १८१९ सालीं झालेल्या धरणीकंपानें पाण्याची खोली बरीच खोल गेली असें म्हणतात. त्यामुळें पुष्कळ जुन्या विहिरी फुकट गेल्या आहेत. कपडवंजच्या आग्नेयीस १० मैलावर लसुंद्रा येथें दहा बारा उन्हाळीं आहेत. त्यापैकीं एका कुंडाचें उष्णमान ११५° श. पर्यंत असतें. या पाण्यात गंधकाचा अंश असल्यामुळें खरूज वगैरे रोगावर हें पाणी फार गुणकारी आहे असें मानण्यात येतें

या जिल्ह्यात जगल मुळींच नाहीं वाघ इत्यादि हिंस्र प्राणी या भागात हल्लीं फारच क्वचित् दिसतात.

येथील हवा उन्हाळ्यात जरा जास्त कडक असते. दरवर्षी पावसाची सरासरी सुमारें ३८ इंच आहे.

इ स. १८०२ सालीं पेशव्याशीं जो वसईचा तह झाला त्याअन्वयें काहीं भाग ब्रिटिशाकडे आला. इ. स १८०३ आणि १८१७ सालीं गायकवाडाकडून काहीं भाग आला. तो मिळून हा जिल्हा बनविण्यात आला आहे. या भागावर रजपुतानीं इ स. ७४६ ते १२९० पर्यंत राज्य केलें चवदाव्या शतकाच्या अखेरीस खेडा अहमदाबादच्या मुसुलमान पातशहाकडे आला. इ. स. १७२० मध्यें मराठ्यांची दृष्टि या भागावर वळली व इ. स. १७१२ सालीं अहमदाबादची पातशाही लयास जाईपर्यंत येथें मराठे व मुसुलमान यांच्यात बऱ्याच चकमकी झाल्या. यात मराठ्यांचा अखेरीस जय झाला व इ. स. १७५३ सालीं हा मुलूख पेशवे व गायकवाड यानीं आपसात वाटून घेतला. यापैकीं ब्रिटिशाकडे काहीं भाग इ. स. १८०३ सालीं आला व बाकीचा इ स. १८१७ सालीं आला.

या जिल्ह्यात हिंदु व मुसुलमानानीं बांधून ठेवलेल्या पुष्कळ जुन्या इमारती आहेत. सजोळ येथील मुबारक सय्यद (हा इ स. १६६ सालीं येथें मरण पावला) याचा रोझा प्रेक्षणीय आहे. कपडवंज येथें बऱ्याच पुरातन इमारती असून रास-माला नावाची सुंदर कमान, एक पवित्र कुंड, मशिद, एक विहीर व भुयारात असलेलें महादेवाचें देऊळ इत्यादि पहाण्यासारखीं आहेत. अगदीं अलीकडे बांधलेलें एक मंदिर फार सुंदर आहे. लोकसंख्या (१९२१) ७१०९८२. इ. स. १८९९–१९०० सालीं पडलेल्या दुष्काळामुळें येथील लोकसंख्या शेकडा १८ या प्रमाणात कमी झाली आहे. या जिल्ह्यात ११ गावें व ५९८ खेडीं आहेत. नडियाद, कपडवंज, खेडा, आनंद आणि मेहमदाबाद हीं गावें प्रमुख होत. यात सात तालुके आहेत त्यांचीं नावें.–

कपडवंज, मेहमदाबाद, थासरा, मातर, नडियाद, आनंद बोरसद हीं होत.

या जिल्ह्यातील शेतकरी आपल्या कामात फार हुषार आहेत. एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा ६७ लोक शेतकीवर अवलंबून आहेत. मुख्य पिकें—बाजरी, कोद्रा, भात, ज्वारी आणि गहूं. पश्चिम हिंदुस्थानात खेडा जिल्ह्यातील तंबाखूची लागवड फार प्रख्यात आहे. येथें तंबाखू, कापूस वगैरे पिकाचे निरनिराळे पुष्कळ प्रयोग करून पाहिले आहेत. काठेवाड व उत्तर गुजराथेंतील काकेजमधून गुरें या जिल्ह्यात शेतीकरिता आणावीं लागतात. इ. स. १९०३–४ सालीं एकंदर ११३१ चौरस मैल जमीन लागवडीखालीं होती. पैकीं ३७ चौरस मैल बागाइती होती. बागास पाण्याचा पुरवठा विहिरीपासून होतो. कपडवंजजवळ पूर्वी खाणींतून लोखंड काढीत असत.

अहमदाबाद व नडियाद येथें गिरण्या सुरू झाल्यामुळें हातमागाच्या धंद्यास उतरती कळा लागली आहे. साबण व कागदपत्र तयार करण्याचे कारखाने या जिल्ह्यात आहेत. या जिल्ह्यात खडीचे रस्ते जिकडे तिकडे असून बी. बी. सी. आय. रेल्वे या जिल्ह्यातून गेली आहे. शिवाय लहान लहान फाटेंहि या जिल्ह्यात महत्वाच्या ठिकाणीं खेळवले आहेत. या जिल्ह्यातील दहा गावात म्युनसिपालिटया आहेत. कैरा, कपडवंज, मेहमदाबाद, नडियाद, डाकोर, बोरसद, आनंद, उमरेठ, ओड आणि महुवा हीं तीं गांवें होत.

गा व–मुंबई इलाखा. खेडा जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश २२° ४५' व पूर्व रेखांश ७२° ४१'.जी. आय. पी. रेल्वेच्या मेहमदाबाद स्टेशनच्या नैर्ऋत्येस ७ मैलावर व अहमदाबादच्या नैर्ऋत्येस २० मैलावर हा गाव आहे. लोकसंख्या ( इ स. १९०१ ) १०३९२. खेडा हा फार पुरातन गाव असून या गावाचा संबंध महाभारतातील उल्लेखिलेल्या ठिकाणाशीं लावण्यात येतो. येथें पाचव्या शतकातील ताम्रपट सापडले आहेत. इ. स. १७५३ सालीं दमाजी गायकवाडानें हा गाव सर केला. इ. स. १८०३ सालीं आनंदराव गायकवाड यानें हा गाव ब्रिटीशाच्या हवालीं केला. येथील हवा अलीकडे बरीच सुधारली आहे असें म्हणतात. धरणीकंपाचे धक्के इ. स १८६० व १८६४ सालीं येथें बसले होते. इ स. १८५७ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें एक कांचेचा कारखाना आहे

खेतूर—बंगाल इलाख्यातील राजशाही जिल्ह्याच्या पोटविभागातील एक खेडें. १९०१ मध्यें या खेड्याची वस्ती ४०० होती चैतन्य या खेड्यात काहीं दिवस राहिला होता, एवढ्याच कारणावद्दल हें शहर क्षेत्र मानिलें जात असून या खेड्यामध्यें चैतन्याच्या प्रीत्यर्थ एक देवालय बांधण्यात आलें आहे. या खेड्यात आक्टोबरमध्यें मोठी यात्रा भरते.

खेत्री—राजपुतान्यातील जयपूर संस्थानातील खेत्री जहागिरीचें मुख्य ठिकाण. हें जयपूर शहरापासून उत्तरेस ८० मैलावर आहे. याची लोकवस्ती १९११ सालीं ७,१२२ होती. हें शहर चारपाच टेंकड्यांच्या मध्यमागीं वसलेलें असून त्यामुळें शहराचा देखावा फार रमणीय दिसतो या शहराकडे जाण्याला एक लहानसा गाडीरस्ता आहे. याच्या वरच्या बाजूस एका टेकडीवर एक किल्ला आहे. येथें एक हायस्कूल, एक माध्यमिक शिक्षणाची शाळा व एक दवाखाना आहे. याशिवाय ५ प्राथमिक शिक्षणाच्या शाळा आहेत. या शहराच्या नजीक ताब्याच्या खाणी असून त्यापासून १८५४ सालीं ३०००० रुपयाचें ताब काढण्यात आलें पण पुष्कळ वर्षांत त्या खाणी खोदण्यात आलेल्या नाहींत. तसेंच शहराच्या दक्षिणेस सात मैलावर बबई येथें निकल व कोबाल्ट या धातूंच्या खाणी आहेत. खेत्री जहागिरीचा काहीं भाग शेखवती व काहीं भाग तोरावती निझामतच्या हद्दींत आहे. या जहागिरींत खेत्री, चिराव व कोटपुतळी हीं ३ शहरें व २५५ खेडीं आहेत. १९११ मध्यें या जहागिरीची लोकवस्ती ६९९६१ होती. या जहागिरींतील प्रजा बहुतेक हिंदूच आहे. कोटपुतली हा परगणा ब्रिटिशसरकारकडून इनाम आहे. बाकीचा जहागिरींतील मुलूख जयपूरदरबारच्या ताब्यातील असून या जहागिरीचा अधिपति जयपूरच्या राजाचा मांडलिक आहे जहागिरीचें वार्षिक उत्पन्न ५.२ लाख रुपये असून खर्च ३.५ लाख आहे.

खेमकरन—पंजाबातील लाहोर जिल्ह्याच्या कासूर तहशिलींतील एक शहर. कासूर शहरापासून सात मैलावर नॉर्थ वेस्टर्न रेल्वेच्या फाट्यावर हें वसलेलें आहे १९११ सालीं याची लोकसंख्या ५७३२ होती. शहराजवळून बारीदोआब कालव्याचा फाटा गेला आहे येथील लोकाचा शेतकी हा मुख्य धंदा असून लोक सुखी आहेत. या शहराला १८६७ सालीं म्युनिसिपालिटी देण्यात आली. म्युनीसिपालिटीच्या खर्चानें येथें एक प्राथमिक शिक्षणाची शाळा उघडण्यात आली आहे

खेम सावंत—सावंतवाडीचा राजा दुसरा खेम सावंत हा पराक्रमी होता याच्या बापाचें नाव फोंड सावंत होतें. हा इ. स. १६७५ च्या सुमारास गादीवर आला. यानें फौज फार वाढविली; मात्र त्याचा उपयोग शिवाजीमहाराजांविरुद्ध औरंगझेबाला मिळण्याच्या कामीं केला यानें गोंवेकर फिरंग्याच्या मुलखावर स्वाऱ्या करून आपलें राज्य वाढविलें. शाहुमहाराज गादीवर येईपर्यंत सातारकर छत्रपतींना सावंताकडे लक्ष्य देण्यास सवड झाली नाहीं, त्यामुळें खेम यानें त्याचा बराच मुलूख काबीज केला. पुढें ताराबाई व शाहु याच्या भांडणात यानें शाहूचा पक्ष घेतला होता. इ. स. १७०९ मध्यें हा वारला. [ मराठी रियासत. भा. २ ].

खेराली—काठेवाड. वटवाण टाण्यातील एक स्वतंत्र खंडणी देणारा तालुका. खेराली व वाडला अशीं दोन गावें यांत आहेत. जवळचें रेल्वे स्टेशन वटवाण कँप होय.

खेरालु, ता लु का.—बडोदे संस्थानातील कडी प्रांताचा ईशान्य भागातील तालुका. या तालुक्याचें क्षेत्रफळ २४६ चौ. मै. आहे. १९११ सालीं या तालुक्याची लोकवस्ती ७०६४१ होती. या तालुक्यात खेरालु, वडनगर व उमटा हीं तीन शहरें व ८८ खेडीं आहेत. या तालुक्यात जंगल बरेंच आहे. या भागातील जमीन बहुतेक रेताड असून फारच थोडी काळ्या मातीची आहे. सारी नदी या तालुक्यातून पूर्वपश्चिम वहात गेली आहे. तालुक्याचें उत्पन्न १९०४–५ सालीं ४२००० रुपये होतें.

श ह र.—खेरालु तालुक्याचें मुख्य ठिकाण. याची लोकसंख्या १९११ सालीं ६५७४ होती. शहरामध्यें मॅजिस्ट्रेट कोर्ट, दवाखाना, दोन धर्मशाळा, शाळा व इतर कचेऱ्या आहेत. वल्लभाचार्य हा येथें रहात असे व त्यानें येथें एक देवालय बांधविलें आहे. येथ म्युनिसिपालिटी स्थापन झाली असून तिला संस्थानकडून १६०० रुपये देणगीदाखल मिळतात.

खेरावाड—गुजराथ. महीकांठा एजन्सींतील व साबर कांठातील एक संस्थान. संस्थानिक मकवान कोळी असून दरसाल गायकवाडाला घासदाणा व ईडरच्या महाराजाला खिचडी म्हणून कांहीं रक्कम देतात.

खेरी, जि ल्हा.—संयुक्त प्रांतांतील लखनौ विभागाच्या उत्तरभागांतील एक जिल्हा. याचें क्षेत्रफळ १९११ सालीं २९७६ चौ. मै. होतें. याच्या उत्तरेस मोहन नदी, पूर्वेस कौरियाल नदी, दक्षिणेस सीतापूर व हर्दोई जिल्हे व पश्चिमेस पीलीभीत व शहाजहानपूर जिल्हे आहेत. उल नदी या जिल्ह्याच्या मध्यभागातून गेली आहे. या नदीच्या ईशान्येकडील भाग जंगलवजा असून उत्तरेस तर मोठमोठीं जंगलें आहेत. या जिल्ह्याच्या दक्षिण सरहद्दीवरून शारदा अथवा चौका नदी वहात गेली आहे. उल नदीच्या नैर्ऋत्येस असलेला या जिल्ह्याचा भाग सपाट असून त्या भागातून सरायन, कठना, गोमती इत्यादि पुष्कळ नद्या वहात गेल्या आहेत. जिल्ह्यामध्यें पुष्कळ सरोवरें आहेत. या जिल्ह्यात दलदलीचीं बरींच ठिकाणें असल्यामुळें भाजीपाला खूप पिकतो. जंगलात साल, आम्याचीं झाडें, धाक इत्यादि झाडें मुबलक आहेत. जंगलामधून, वाघ, अस्वलें, लांडगे, चित्ते, रानटी कुत्रे, तरस, रानमांजरें, कोल्हे हे प्राणी आढळतात. नाना प्रकारच्या पक्ष्यांचीहि येथें समृद्धि आहे. सर्पच या जिल्ह्यांत मोठाचाहि सुकाळ आहे. उल नदीच्या नैर्ऋत्येकडील भाग हवेच्या दृष्टीनें चांगला आहे. पण ईशान्येकडील भाग दलदलीचा असल्यामुळें हिंवतापाची धोप येथें नेहमी जोरात चालू असते. या जिल्ह्यातील पर्जन्य ४६ इंच आहे

इतिहास.—प्राचीन काळीं या जिल्ह्याचा प्रदेश हस्तिनापूरच्या सोमवंशीय राजाच्या अंमलाखालीं होता अशी आख्यायिका आहे. पण ती कितपत विश्वसनीय आहे, याबद्दल जबरदस्त संशय आहे. १० व्या शतकांत या जिल्ह्याचा उत्तरभाग रजपुताच्या ताब्यांत होता. पुढें मुसुलमानांची सत्ता या भागावर प्रस्थापित झाली. १४ व्या शतकात, नेपाळी लोकांनीं या भागाला त्रास देण्यास सुरवात केली. तेव्हा हा उपद्रव होऊं नये याकरितां जिल्ह्याच्या उत्तरसरहद्दीवर पुष्कळ किल्ले बांधण्यात आले. अकबराच्या कारकीर्दींत हा जिल्हा खैराबादसरकारमध्यें मोडूं लागला. १८०१ मध्यें ब्रिटिशांना रोहिलखंड प्रांत देण्यात आला. त्यावेळीं त्यांत या जिल्ह्याचा भाग ब्रिटिशाकडे आला. पण १८१४–१५ च्या नेपाळी युद्धानंतर हा भाग पुन्हां अयोध्यासरकारला परत देण्यात आला. पुढें १८५६ मध्यें अयोध्या प्रांत खालसा झाल्यावर या जिल्ह्याच्या पश्चिम व पूर्वभागाचे महमदी, व मल्लानपूर असे स्वतंत्र जिल्हे बनवण्यात आले. १८५७ सालीं महमदी जिल्ह्यातील लोकामध्यें असंतोष पसरला व त्यानीं तेथील ब्रिटिश सैन्याची कत्तल केली. पण पुढें लवकरच तो असंतोष शमवण्यात येऊन या दोन्ही जिल्ह्याचा एक जिल्हा करण्यात आला व लक्ष्मीपूर हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण झालें.

या जिल्ह्यात जागजागीं प्राचीन इमारतींचे अवशेष सांपडतात व त्यावरून प्राचीन खोदकामाची कल्पना आपल्याला करता येते. अशा प्रदेशांपैकीं, बलमियारबरखार व खैरीगड हे दोन प्रमुख अवशेष होत. खैरीगडापाशीं समुद्रगुप्ताचा एक शिलालेख सापडला आहे. गोला येथें एक प्रसिद्ध देवालय आहे.

या जिल्ह्यात ४ शहरें व १६७७ खेडीं आहेत. या जिल्ह्याची लोकसंख्या १९११ सालीं ९५९२०८ होती. महमदी, निघासन व लक्ष्मीपूर अशा तीन तहशिली आहेत. शेंकडा ८५ हिंदू असून बाकीचे मुसुलमान व इतर जातींचे लोक आहेत. पूर्व हिंदी भाषा ही मुख्य भाषा आहे. हिंदूंमध्यें ब्राह्मण, रजपूत, चांभार, कुर्मी, अहीर, लोध या जाती प्रमुख आहेत. मुसुलमानांत, जुलाह, पठाण, शेख इत्यादि जातींची संख्या अधिक आहे.

जिल्ह्याच्या नैर्ऋत्य भागातील जमीन चिकणमातीनें युक्त आहे. कठना व उल नद्यामधील टापूंतील जमीन फार सुपीक आहे. खेरी जिल्ह्यात अयोध्याप्रांताप्रमाणेंच धारापद्धति आहे. जिल्ह्यातील बहुतेक जमीन तालुकदाराच्या ताब्यात आहे. गहूं हें जिल्ह्याचें मुख्य पीक आहे. त्याच्या खालोखाल तांदूळ, मका, चणे, कोदन, कदधान्य हीं पिकें आहेत. या जिल्ह्यात उंसाचें उत्पन्नहि बरेंच होतें. संयुक्तप्रांतांतील इतर जिल्ह्यापेक्षा या ठिकाणीं गुराची निपज चांगली होते. बैल फार सुजे पण चपळ असतात. येथील घोडीं हलक्या जातींचीं असतात. शेळ्या व मेंढ्याचीहि येथें मुबलक पैदास होते.

जिल्ह्यामध्यें कंकर येवढाच खनिजपदार्थ आहे पण तो सुद्धा फार सापडत नाहीं. या कंकराचा सडकांचे रस्ते करण्याच्या कामीं उपयोग करतात. साखर तयार करणें हा मुख्य धंदा आहे. ओइल येथें पितळेचीं भांडीं तयार होतात. धान्य, साखर, लाकूड, गुरें, तूप हे जिन्नस या जिल्ह्यातून बाहेर जातात व कापड, धातु, मीठ या पदार्थांची आयात होते. नेपाळमधून तांदूळ, सागवान व मसाल्याचे पदार्थ या जिल्ह्यात येतात. लक्ष्मीपूर, महमदी व गोला हीं तीन व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत.

उलच्या नैर्ऋत्य भागातून लखनौ–बरेली स्टेट रेल्वे गेली आहे. या रेल्वेचे फांटे मैलानीपासून सोनारीपुरापर्यंत व धुडवा ते नेपाळच्या सरहद्दीपर्यंत गेले आहेत. या जिल्ह्यातील रस्ते चांगले नाहींत. सीतापूर ते शहाजहानपुरापर्यंतचा रस्ता तेवढाच बरा आहे.

या जिल्ह्यावर डेप्युटी कमिशनर हा मुख्य अधिकार असून त्याच्या हाताखालीं तीन डेप्युटी कलेक्टर असतात. तहशिलीवरचा तहशीलदार हा मुख्य अधिकारी असतो. जंगलखात्याचा अधिकारी लक्ष्मीपूर येथें रहातो या जिल्ह्याच्या न्यायखात्यावर सीतापुर जिल्ह्याचा डिस्ट्रिक्ट व सेशन्सजज्ज हा मुख्य अधिकारी आहे. खुद्द जिल्ह्यात मुनसफ व सबॉर्डिनेट जज्ज हे न्यायकाम पहातात य जिल्ह्यातील गुन्ह्यांचें प्रमाण फार अल्प आहे.

१८५७ च्या बंडानंतर जिल्ह्याची 'समरी सेटलमेंट' करण्यात आली. पण ती बरोबर न झाल्यामुळें १८९७ सालीं पुन्हा या कामास सुरवात झाली व १९०० मध्यें हें काम झालें. १९०४–५ सालीं या जिल्ह्याचें १४,४७,००० रुपये उत्पन्न होतें.

शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा फारच मागसलेला आहे. १९०३–४ सालीं या जिल्ह्यात १६६ शाळा होत्या यापैकीं ३ शाळा सरकारच्या खर्चानें चालल्या असून बाकीच्या जिल्हा व म्युनिसिपल बोर्डातर्फे चालल्या आहेत. १९०३–४ सालीं या जिल्ह्यात ८ इस्पितळें व दवाखाने होते.

श ह र —खेरी जिल्ह्याच्या लक्ष्मीपुर तहशीलींतील एक शहर. याची लोकवस्ती १९११ सालीं ६९२४ होती. हें शहर फार जुनें आहे. सय्यदखुर्दचें येथें एक थडगें आहे. या शहराचा कारभार १८५६ च्या २० व्या कायद्यान्वयें चालविला जातो. येथें दररोज बाजार भरतो. या ठिकाणीं अमेरिकन मेथॉडिस्ट मिशनची एक शाळा आहे.

**खेळ**—खेळाचा प्रधान हेतु करमणुक हा असतो. मग करमणुक साधून व्यायाम झाल्यास उत्तमच. पण व्यायामाचा अंश त्यात फार असता कामा नये. निरनिराळ्या देशात निरनिराळ्या प्रकारचे खेळ असतात. खेळाची प्रवृत्ति मनुष्यामध्यें स्वभावत:च असल्यामुळें आपणास अगदीं प्राथमिक अवस्थेंत असलेल्या मानवसमाजात करमणुकीचे प्रकार व खेळ दृष्टीस पडतील. वैदिक काळात फाशाचा खेळ फार प्रामुख्यानें दृष्टीस पडतो. ऋग्वेदातील दहाव्या मंडळात द्यूतकाराचें आत्मगत भाषण त्याची स्थिति उत्तम प्रकारें दाखविते. यज्ञामध्यें रथाच्या शर्यती, दोर ओढण्यासारखा चामडें ओढण्याचा खेळ वगैरे असत. ( वेदकालांतील शब्दसृष्टि, बुद्धपूर्व जग. प्र. ५ खेळ, पा ३५०–३५२ पहा). पुराणकालात त्याबरोबर धनुर्विद्याहि दृष्टीस पडते. घोड्याच्या शर्यती वेदकाळांत सुरू असाव्यात असें कांहीं ऋग्मंत्रावरून वाटूं लागतें. ( ऋग्वेद १. ६३, ५; ९. ३२, ५; ४७, ५; १०. ६८, २ ), शिकार करणें हा व्यवसाय मानवोत्पत्तीच्या समकालीनच असून प्रथम हे वृत्तीचें साधन असून अलीकडे यास एका मर्दानी करमणुकीचें स्वरूप प्राप्त झाल आहे. प्राचीन ईजिप्तमधील लोकात सोंगट्या बुद्धिबळासारखे खेळ असत. राणी हतसुचा खेळण्याचा पट संशोधिला गेला आहे. वेदकालानंतर लवकरच हिंदुस्थानात अर्वाचीन बुद्धिबळाच्या खेळाचें मूळ स्वरूप जो चतुरंग नावाचा खेळ तो प्रचारात आला असावा, त्यानंतर शतरंज आला. नवव्या शतकातील अबुल आबास व दहाव्या शतकातील फिरदौसी यानीं बुद्धिबळाच्या खेळासंबंधीं आपल्या ग्रंथातून माहिती दिली आहे. चीन, जपान, सयाम, ब्रह्मदेश वगैरे प्राच्य देशातून हा खेळ पुरातन म्हणून गणला जातो. फासे सोंगट्याचा खेळहि राजवाडे, जनाने व सामान्य लोकाचे अड्डे यातून रूढ असे मोंगलकालीन हिंदुस्थानात सोंगट्या व कवड्याच्या खेळाला पचीसी म्हणत. फत्तेपूर शिक्रीच्या राजवाड्यात अकबर बादशहा मोठ्या थाटानें खेळत असे असें रुसेलेट सांगतो ( इंडिया अँड इट्स नेटिव्ह प्रिन्सेस १८७६ ) त्या राजवाड्याच्या फरशींत एक सोंगट्याचा पट बसविला आहे. या पचीसीचे चौरस व चौपट असे दोन प्रकार असत.

याप्रमाणें फार प्राचीन कालापासून खेळाची परंपरा सर्वत्र अव्याहत चालत आली आहे. सध्याच्या प्रचलित खेळाचें वर्गीकरण आपणास अनेक तऱ्हानीं करता येईल उदाहरणार्थ स्त्रियाचे व पुरुषाचे खेळ, बैठे व मैदानी खेळ तसेंच एकच खेळ लहानपणीं, तरुणपणीं व म्हातारपणीं उपयोगी पडत नाहीं तेव्हा या तीन अवस्थातील खेळहि निरनिराळे असतात. तसेंच खोखो, आट्यापाट्या यासारखे साधिक, बुद्धीबळासारखे वैयक्तिक असहि खेळाचें वर्गीकरण करता येईल.

( १ ) स्त्रियाच्या सध्याच्या खेळात मुलींचे ( अ ) फुगडी, झिम्मा, कवड्या, सागरगोटे, भातुकली, आवळीकोशिंबीर, लपंडाव, खोखो हे खेळ दृष्टीस पडतात व ( आ ) बायकामध्यें पत्ते, सोंगट्या, टेनिस, बॅटमिंटन व इतर पाश्चात्य स्त्रियाचे खेळ आढळतात आपल्या समाजात लग्न झाल्यावर सामान्य बायकाना खेळावयास मिळत नसल्यानें त्यांच्यात फारसे खेळ नाहींत. अलीकडे सुशिक्षित स्त्रिया खेळात बहुधा इंग्रजी स्त्रियाचें अनुकरण करतात व बहुधा

पाश्चात्य खेळ खेळतात. तथापि पोहणें, धावणें वगैरे शक्तीचे खेळ अद्याप खेळत नाहींत.

( २ ) पुण्याच्या खेळात ( अ ) मुलाचेः—विटीदांडू, गोट्या, लगोऱ्या, खोखो हे खेळ प्रचलित असून ( आ ) तरुणाचे.-आट्यापाट्या, खोखो, बुद्धिबळ, पत्ते, क्रिकेट, टेनिस, हॉकी , फुटबॉल, मलखांब, कुस्त्या, दांडपट्टा, बोथाटी इत्यादि देशी व मैदानी तसेंच शरीरसामर्थ्यवर्धक खेळ आवडतात. ( इ ) वृद्धाचे.-टेनिस, बिलियर्ड, गंजिफा, बुद्धिबळें, सोंगट्या, पत्ते हे खेळ विशेष आवडीचे असतात. क्रिकेट, टेनिस, फुटबॉल वगैरे खेळ पाश्चात्य लोकाचे असून भारतीयाच्या आता ते पूर्णपणें अंगवळणी पडले आहेत. आट्यापाट्या, खोखो, दांडपट्टा या खेळासहि व्यवस्थित स्वरूप, दिलें असून त्याचे अलीकडे बरेच सामने वगैरे पहावयास सापडतात कुस्त्या, पळणें, पोहणें, लांब व उंच उड्या मारणें यासारखे मर्दानी खेळ सार्वराष्ट्रीय सामन्याचे विषय झाले आहेत मुष्टियुद्ध अद्याप आपल्याकडे सुरु झालेलें नाहीं स्काउट ( बालवीर अथवा बालचर ) चळवळीमुळें नवीन नवीन देशी खेळ मुलात बरेच शिरले असून त्यांतील व्यावहारिकतेकडेहि बरेंच लक्ष देण्यात येतें. मुलाकरिता विदेशी देशी खेळाची माहिती बडोद्याच्या सेंट्रल लायब्ररी खात्यानें प्रसिद्ध केली आहे. या ठिकाणीं केवळ खेळाविषयीं सामान्य विवेचन देऊन विशिष्ट खेळावर स्वतंत्र लेख दिले आहेत

पाश्चात्यातहि सार्वजनिक व वैयक्तिक खेळाची परंपरा फारच जुनी आहे.

सा र्व ज नि क खे ळ —प्राचीन ग्रीक, रोमन लोकाच्या सार्वजनिक खेळात मल्लयुद्धाच्या सामन्यासारखे अनेक प्रकार व खेळ असून एखाद्या धार्मिक कृत्याशीं अथवा सणाशीं त्या सर्वांचा संबंध असे. ग्रीक वाङ्मय व कला यामध्यें आदर्शभूत होणारें राष्ट्रीय शील आणि शारीरिक व बौद्धिक सौंदर्य या गुणाचा विकास होण्याला जर कोणती गोष्ट कारणीभूत झाली असेल तर ती म्हणजे ग्रीक लोकाचे सार्वजनिक खेळ व सामने वगैरे गोष्टी होत. म्हणूनच प्राचीन खेळाची उत्पत्ति व वाढ कशी झाली हें जाणण्यास ग्रीक लोकाच्या इतिहासाचें अवलोकन केलें पाहिजे. रोमन लोकाच्या ‘ सरकस ’ व ‘अॅम्फीथिएटर ’ वगैरे संस्था या जुन्या ग्रीकाच्या ‘ ऑलिंपिया ’ व ‘ पायथिया ’ वगैरे संस्थाच्या केवळ नकला होत यात संदेह नाहीं.

ग्री क —अगदीं आरंभीं ग्रीक खेळाचा धर्माशीं निकट संबंध असे धार्मिक प्रार्थना, संकटनिवारण,यशप्राप्ति व प्रायश्चित्त वगैरे प्रसंगीं खेळाचे सामने होत असत व प्रत्येक खेळाच्या स्थानाचा कोणी तरी एक देव किंवा एखादा पौराणिक वीर असे. इलिअड व ऑडिसी या महाकाव्यात उल्लेखिलेले खेळ पाहिले असतां त्याकाळीं मुष्टियुद्ध, कुस्ती, ओढी उचलणें, धावण्याची शर्यत व रथाची शर्यत वगैरे खेळाच्या बाबतींत ग्रीकाची प्रगति झाली होती हें आढळून येतें या एकंदर चार राष्ट्रीय उत्सवात ऑलिंपिअन खेळाची फार प्रसिद्धि होती. एलिअसच्या मैदानानजीक एका जागेला ऑलिंपिया असें नांव असून त्या ठिकाणच्या अलताइ उद्यानात ऑलिंपिअन झीअस नावाच्या देवाचें एक देऊळ असून यशस्वी व प्रसिद्ध मल्लाचे त्या ठिकाणीं पुतळे ठेवलेले असत. तेथील देवळात आयफिटस व लायकरगस याचीं नांवें व खेळाचे नियम कोरलेले होते.ऑलिंपिअड हा एक राष्ट्रीय उत्सव असून तो दर चार वर्षांनीं पाळला जात असे व त्यावेळीं अनेक खेळाचे सामने होऊन बक्षिसें दिलीं जात असत.या खेळाच्या सामन्यास सुरुवात झाली म्हणजे चोहोंकडे उत्साह दिसून येत असे निर्णय देणारे १० न्यायाधीश असून खेळाडूंच्या तालमीमध्य योग्य शिक्षण घेतल्याचा दाखला पुढें करावा लागत असे खेळाडूंच्या कुलशीलाबद्दल विशेष चौकशी करण्याची पद्धत असून सामन्यात कपटाचरण होणार नाहीं अशी त्याना शपथ घ्यावी लागत असे. सुरुवातीस शिंग फुंकून नंतर खेळास सुरुवात होत असे. ( १ ) पळण्याची शर्यत, ( २ ) कुस्ती, ( ३ ) उड्डाण मारणे, ( ४ ) मुष्टियुद्ध व (५) रथाची शर्यत इतके महत्वाचे खेळ व सामने त्यावेळीं अमलात होते. रथाच्या शर्यतींत हल्लींच्या घोड्याच्या रेसमधील जॉकीपेक्षा तत्कालीन सारथ्यास अधिक कौशल्य व चपळपणा अंगीं आणावा लागत असे. चाळीस पन्नास रथाची शर्यत लागे व या खेळात राजे लोकाचें अंग असे. वरील कोणत्याहि खेळात यशस्वी झालेला खेळाडू झिअसच्या देवळाकडे वाजतगाजत जाताना लोक त्याला अनेक देणग्या फुलें व अलंकार वगैरे अर्पण करीत असत. पिंडार, युरिपिडीससारखे कवी त्याचा सन्मान करीत असत व त्याच्या नावानें मोठीं स्मारकें बांधली जात. सिसेरो म्हणतो कीं, एखाद्या सेनापतीपेक्षाहि यशस्वी खेळाडूस अधिक सन्मान प्राप्त होत असे. वरील पाच प्रकारच्या खेळाप्रमाणेंच पिथिअन, नेमिअन व इस्थमिअन असे ग्रीकाचे तीन प्रकारचे खेळ होते. डेल्फी येथें होणाऱ्या पिथिअन अपोलो देवाच्या उत्सवातच पिथिअन खेळाचें मूळ सापडतें. या खेळात गाण्याची चढाओढ असते. नेमिअन खेळ, नेमिअनझिअस नावाच्या उत्सवापासून सुरू झाले असून त्यात अनेक सामने होत असत. इस्थमिअन खेळ हे कॉरिन्थच्या संयोगभूमीत होत असून या खेळात मल्लविद्या, संगीत वगैरेंचा अंतर्भाव होत असे.

रो म न —ग्रीस देशाप्रमाणेंच रोममध्येंहि खेळाचा धर्माशीं निकट संबंध असे. वर्षारंभीं देशाची सुरक्षितता रहावी म्हणून देवास खेळ नवसासारखे मागून घेतले जात व त्याचा खर्च सरकारतर्फे होई. तथापि खासगी पैशातूनहि लोक खेळाच्या कामीं पैसे खर्चून धार्मिक पुण्य व करमणूक या दोन्ही गोष्टी साधून घेण्यास कमी करीत नसत. सीझरनंतर जे राजे झाले त्यानीं तर या कामीं फार खर्च केला.

रोमन इतिहासात व रोमन लोकांच्या राजकीय व सामाजिक व्यवस्थेत खेळांचें मोठें महत्व आहे हें खरें, परंतु मल्लयुद्ध व शर्यती वगैरे गोष्टींत समंजस मनुष्य सर्वदा अगदीं तल्लीन कसा होतो याविषयीं प्लिनीनें आश्चर्य प्रकट केलें आहे. ग्रीक व रोमन खेळ पाहून भिन्न विकार उत्पन्न होतात. याच कारण असें कीं, ग्रीक लोक मूळचेच नाटकी व रोमन लोक हे केवळ प्रेक्षक असें त्यानें वर्णन करता येईल. डीनोफानीज म्हणतो कीं, एखाद्या मल्लाच्या देहसामर्थ्याचें एखाद्या तत्वज्ञाच्या ज्ञानापेक्षांहि त्या काळीं जास्त चीज होत असे. कितीहि उच्च दर्जाचा मनुष्य असला तरी ऑलिंपिक खेळात भाग घेणें ग्रीकांना कमीपणाचें वाटत नसे. परंतु उच्च कुळांतील रोमन लोकांना मात्र असल्या खेळात भाग घेणें कमीपणाचें वाटत असे. रोमन खेळ हे बहुधा नवस म्हणून मानून घेऊन नंतर खेळले जात असत तथापि त्यांचें वर्गीकरण स्थानाप्रमाणें अर्थात सरकस व ॲम्फीथिएटर या ठिकाणाप्रमाणें करण्यात येतें. लूडी मॅग्नी हा उत्सव म्हणजे मूळचा एका ज्युपीटर देवाला नवसार्थ केलेली मेजवानीच होय. सेनापती युद्ध करून परत आल्यावर ती करण्यात येत असे. कॅपिटॉलपासून फोरमपर्यंत व नंतर सरकसकडे एक लष्करी मिरवणूक निघत असे व त्या वेळीं खेळ होत असत. (१) रथांची शर्यत (२) लूडस ट्रॉइ, (३) लष्करी पाहणी व (४) मल्लयुद्धें असे चार महत्वाचे खेळ होते. रथांच्या शर्यतींत पूर्वी दोन रथांची शर्यत होत असे. परंतु अनेक घोडे जुंपून अनेक रथांच्या शर्यती पुढें होऊं लागल्या. तत्कालीन सारथ्यास आधुनिक जॉकीपेक्षांहि फार मान मिळत असे. त्या सरकस नावाच्या स्थानीं अनेक पक्ष असत. व ते सारथ्यांच्या कपड्यांच्या रंगावरून ठरविले जात. लूडस ट्रॉईं या खेळात पॅट्रिशियन लोक भाग घेत असत. अश्वारोहण करून एखादी छोटी लढाई देण्याचा हा खेळ आहे वरील खेळ सरकसमध्यें होत, परंतु ॲम्फिथिएटरातहि वरील खेळ होत असत. " वेनाती ओ " नावाच्या खेळात पशूंची परस्परात किंवा मनुष्य व पशु यांचीं युद्धें करविलीं जात असत. त्या ठिकाणीं मोठाले वाघ, सिंह, हत्ती, रेडे व बैल वगैरे आणून त्यांचे व मनुष्यांचे किंवा पशुपशूंचे सामने होत असत. "नॅऊमॅची" खेळांत समुद्रांतील छोटें युद्ध करण्याची पद्धत असे. परंतु ॲम्फीथिएटरात विशिष्ट खेळ म्हणजे ' म्यूनस ग्लॅडिएटोरिम ' नावाचा खेळ होय. मार्कस व डेसिमस ब्रुटस यांच्या स्मशानयात्रेच्या वेळीं होणाऱ्या खेळापासून वरील खेळ सुरू झाला. यात मनुष्यांचीं युद्धें होत व गुलाम व कैदी यांची असहाय स्थिति कशी होती हें यात दिसून येई. ' लूडि अपालोनरीज ' व ' मेगॅलेन्सीज ' हे खेळहि प्रतिवर्षी होत असत

सा स गी खे ळ.—यांचें वर्गीकरण बाहेर खेळण्याचे खेळ व घरगुती खेळ असें करता येईल जगात मोठ्या माणसाच्या खेळापेक्षा मुलांच्या खेळात चोहोंकडे साम्य असलेलें आढळून येतें. होमरमध्यें मुलें वाळूवर किल्ले बांधीत असें वर्णन आहे. ग्रीक व रोमन मुलांचेंहि बाहुल्या, चाके, उड्या मारण्याच्या दोऱ्या, घोडे, पतंग, रस्सीखेंच, उन्हाळी पावसाळी, चेंडूफेक व लपंडाव इत्यादि अनेक खेळ होते. परंतु क्रिकेट, टेनिस, गोल्फ अथवा पोलोसारखे खेळ त्यावेळीं नव्हते. कवड्याची झुंज हा खेळहि ग्रीस व रोम देशात चालू असे. फाशासारखा ' टेसेरा ' म्हणून एक खेळ, जुगार, फाशाचा खेळ, डयूओ डेसिमस्क्रिप्टा व कॅटॅक्स इत्यादि अनेक खेळ ग्रीस व रोम देशात खिस्तशकापूर्वीच्या काळात चालू असत असें दिसतें.

कांहीं अर्वाचीन खेळांना राष्ट्रीय व सार्वराष्ट्रीय महत्व येत चाललें आहे. खेळाचे सार्वराष्ट्रीय सामने दरवर्षी होत असतात व त्यात आपलें राष्ट्र मागासलेलें दिसूं नये म्हणून प्रत्येकाची खटपट असते व त्यामुळे खेळाकडे विशेष लक्ष दिलें जातें ही चांगली गोष्ट आहे.

**खेळोजी भोंसले**—शहाजीचा हा चुलतभाऊ असून विठोजीचा पुत्र होता हा वेरूळकडे आपल्या जहागिरीच्या प्रांतीं रहात असे. त्याला निजामशाहींतून मनसब होती. शहाजहान जेव्हा निजामशाही बुडविण्याच्या नादीं लागला तेव्हा निरुपायानें जसा शहाजी हा शहाजहानला मिळाला तसाच खेळोजीहि आपले भाऊ मालोजी व परसोजी यांच्यासह शहाजहानला मिळाला (१६२९). शहाजहाननें त्याला पंचहजारी मनसब दिली पुढें (१६३३) मोंगल हे जेव्हा दौलताबाद काबीज करूं लागले, तेव्हा खेळोजीनें त्यांची नोकरी सोडून आदीलशाहींत नोकरी धरली व मोंगलाशी लढूं लागला. या प्रसंगीं एकदा त्याची बायको गोदावरीवर स्नानास जात असता तिला मोंगलांनीं पकडलें तेव्हा चार लाख रुपये दंड भरून त्यानें तिला सोडविलें. शहाजहानचा व आदिलशहाचा तह झाल्यावर आदिलशहानें खेळोजीस नोकरीवरून दूर केलें तेव्हा तो पुन्हा आपल्या जहागिरींत राहून मोंगलांच्या मुलुखात धुमाकूळ घालू लागला तेव्हा दख्खनचा सुभेदार औरंगजेब यानें मोठ्या मुष्किलीनें खेळोजीचें गुप्त ठिकाण शोधून काढून युक्तीनें त्याला पकडून १६३९ च्या आक्टोबरात ठार मारलें. खेळोजीचा वंश वेरूळ प्रांतीं अद्यापि आहे. [ मराठी रियासत–पूर्वार्ध ]

**खैर**—हा एक अरण्यवृक्ष आहे यास संस्कृतात खदिर, मराठींत खैर, गुजराथींत खेर, हिंदींत खदिर, इंग्रजींत काटेचू (कातांचें झाड ) इत्यादि नांवें आहेत लॅटिनमध्यें यास अकॅशियाकॅटेचु म्हणतात. या झाडाच्या तीन जाती आहेत

खै र अ थ वा खो य रः—हें झाड बहुते ळतें. यापासून किरमिजी रंगाचा कात नि

खै र, को मी र, अ थ वा शा'—बंगाल, आसाम व ब्रह्म देशात हीं झाडें आढळतात, त्यांच्यापासून निघणाऱ्या काताला पेगूचा कात म्हणतात.

ला ल खै र:—हें झाड दक्षिणेकडे व पश्चिमेकडे सापडतें. या झाडापासून उत्पन्न होणारा कात मद्रासी अथवा मुंबईचा कात या नांवानें प्रसिद्ध आहे

या तिन्ही जातींच्या झाडाचे गुणधर्म व उपयोग सारखेच आहेत त्यासर्वांपासून गोंद, तुरट निर्यास व इमारतीस उपयोगी असें लाकूड मिळतें.गोंद, फिक्ट पिंवळया रंगाचा असून त्याचे खडे एक इंचपर्यंत जाडीचे असतात हा खाण्यास गोड असून पाण्यात विरघळतो. व त्यापासून पिंगट रंगाचा चिक्ट द्रव पदार्थ बनतो. बाभळीच्या डिकासारखा या झाडाच्या गोंदाचा उपयोग करता येतो. हिंदुस्थानातील बहुतेक अरबी डिंक याच झाडापासून काढतात

ला कू ड—खैरीच्या खालच्या लाकडाचा रंग पिवळट पाढरा असतो व गाभ्याचा रंग गर्द किंवा फिकट लाल असून लाकड चांगलें कणखर टिकाऊ असून त्याला पॉलीश उत्तम बसतें. या लाकडाची शेतकीचीं आउतें करतात ब्रह्मदेशात घराच्या खांबाकरिता या लाकडाचा उपयोग करतात खैराचे कोळसे इतर लाकडाच्या कोळशापेक्षा फार उत्तम असतात व रेल्वेच्या रुळाखालीं घालण्याकरिता स्लीपर करितांहि हें लाकूड चांगलें असतें. याचे कोळसे सोनाराच्या फार उपयोगी पडतात. पहिल्या जातीच्या खैराच्या लाकडाच्या दर घनफुटाचें वजन ५० ते ६० पौंड, दुसऱ्या प्रकारच्या लाकडाचें ६० ते ७० पौंड व तिसऱ्या प्रकारच्या लाकडाचें थोडेंसे अधिक वजन भरतें. या झाडाचे मुख्य महत्व त्यापासून मिळणाऱ्या कातामुळें आलें आहे. काताचे औषधी उपयोगहि बरेच आहेत.( कात पहा).

खैर,त ह शी ल-संयुक्त प्रांत. अलीगड जिल्ह्याची वायव्य तहशील. या तहशिलींत खैर, चंडोस, व टप्पल हे तीन परगणे आहेत. हिचें क्षेत्रफळ १९११ सालीं ४०७ चौ. मै. होतें. लोकसंख्या १,७९,१५२ होती.या तहशिलींत ३ शहरें व २७२ खेडीं आहेत. खैर शहर हें तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. या तहशिलीचें उत्पन्न १९०३-४ सालीं ४,११,००० रुपये होतें.हिच्या पश्चिमेस यमुना नदी असून या भागांतील जमीन 'खादर' आहे. या जमिनींत गवताशिवाय दुसरें कांहीं पीक येत नाहीं. 'अपर गंजीस'चा 'माट' कालवा या भागातून वहात गेला असून त्यामुळें या तहशिलींतील जमीनीला पाणी पुरवठा होतो.१९०३-४ सालीं या तहशिलींत लागवडीच्या जमीनीचें क्षेत्रफळ २९२ चौ. मै. होतें.

खैरपूर, त ह शी ल —पंजाबमधील बहावलपूर संस्थानच्या मिनिनाबाद निझामतींतील तहशील. हिचें क्षेत्रफळ १९११सालीं२३००चौ. मै. होतें. लोकसंख्या ८७,२८६ होती. हिच्यांत खैरपूर व हासिलपूर हीं दोन शहरें असून १०८ खेडीं आहेत. १९०५-६ सालीं तहशिलीचें उत्पन्न २.२ लाख होतें.

श ह र.—खैरपूर तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें बहावलपूर शहराच्या ईशान्येस ३८ मैलावर आहे. याची लोकसंख्या १९०१ सालीं ५०१३ होती. या शहरात एक शाळा व दवाखाना आहे. शहराला म्युनिसिपालिटी असून तिचें उत्पन्न ६२०० रुपये आहे.

खैरपूर शहर—पंजाबमधील मुझफरगड जिल्ह्याच्या अलीपूर तहशिलींतील शहर. हें मुझफरगड शहराच्या दक्षिणेस ५७ मैलावर असून सिंधू व चिनाब नद्याच्या संगमावर वसलेलें आहे याची लोकसंख्या १९०१ सालीं २२५७ होती, १९ व्या शतकात बुखारी सय्यद जातीच्या खैर शहानें हें वसविलें असें म्हणतात. या शहराला १८७३ मध्यें म्युनिसिपालिटी देण्यात आली. या शहरातील लोक धाडसी व्यापारी असून सक्कर, मुलतान वगैरे शहराशीं यांचा व्यापार चालतो. लोकर, कापूस व धान्य यांची या शहरातून निर्गत होते कापड व इतर किरकोळ वस्तूंची आयात होते.

खैरपूर सं स्था न—सिंधमधील एक संस्थान. क्षेत्रफळ ६५०० चौ. मै. याच्या उत्तरेस सक्कर जिल्हा, पूर्वेस जेसलमीर संस्थान, दक्षिणेस हैद्राबाद, थर, व पारकर जिल्हे, व पश्चिमेस सिंधु नदी आहे. सिंधमधील इतर प्रदेशाप्रमाणेंच याहि संस्थानची जमीन सपाट व पुळणीची आहे सिंधु नदाच्या कांठीं असलेली जमीन फार सुपीक आहे. पण नदीच्या काठचा बहुतेक भाग जंगलाकरिता राखून ठेवलेला आहे. सिंधुनदीच्या काठचा भाग सोडून दिल्यास बाकीचा सगळा भाग रेताड दगडांनीं भरलेला असून या भागात पीक अजीबात येत नाहीं म्हटलें तरी चालेल. संस्थानच्या उत्तरभागात चुन्याच्या दगडाची टेंकडी आहे. रोहरी येथून धार नावाची एक डोंगराची रांग गेली आहे व त्या टेंकडीवर पश्चिमभागीं दिजी नावाची एक टेंकडी आहे. संस्थानच्या ईशान्य भागातहि चुन्याच्या दगडाच्या टेंकड्याची रांग आहे. या टेंकड्यांवर पुष्कळ चिंपा सापडतात. संस्थानातील जंगलात कांडी व तांली हीं झाडें विशेष दृष्टीस पडतात. याशिवाय, इतर झाडा झुडपांची हि समृद्धि आहे. तरस, लांडगा, कोल्हा, खेकडा, डुकर, हरिण, नीलगाय इत्यादि पशू व निरनिराळ्या प्रकारचे पक्षी या संस्थानात आढळतात. खैरपूर संस्थानची हवा हिंवाळ्याचे चार महिने चांगली असते, पण बाकीचे आठ महिने येथील हवा फार उष्ण असते. येथें पाऊस फार कमी पडतो.

इतिहास.—१७८३ पूर्वीचा संस्थानचा इतिहास सिंधच्या इतिहासात मिसळून गेला आहे. संस्थानच्या स्वतंत्र इतिहासाला यानंतर सुरुवात होते. १७८३ मध्यें कल्होरा राजघराणें संपुष्टात आलें व तालपुर घराणें उदयास आलें. या वर्षी मीर फत्ते अलीखान तालपुर हा

सिंधचा स्वामी झाला, व त्यानंतर थोड्याच दिवसांनीं अलीखानाचा पुतण्या मीर शोराबखान यानें खैरपूर येथें आपली गादी स्थापन केली नंतर त्यानें मुलुखगिरी करून आसपासचा बराच भाग जिंकून घेतला १८११ मध्यें शोराबनें आपला मुलगा रुस्तुम यास गादीवर बसविलें पुढें रुस्तुम व त्याचा भाऊ अली मुराद याच्यामध्यें गादी संबंधानें भांडणें उत्पन्न होऊन इंग्रजांना आपला हात मध्यें घालण्यास चांगलाच संधि सांपडला १८३२ मध्यें इंग्रजांनीं खैरपूर संस्थान स्वतंत्र असल्याचें कबूल केलें व संस्थानकडून सिंधुनदी व सिंधमधील रस्ते यांची वहिवाट त्यांनीं मिळविली काबूलच्या मोहिमेत अली मुरादनें ब्रिटिशांना चांगलीच मदत केली त्यामुळें काबूलच्या मोहिमेनंतर सिंधप्रांत इंग्रजांनीं खालसा केला असतां फक्त खैरपूरचें संस्थान मात्र त्यांनीं खालसात काढलें नाहीं १८८६ मध्यें इंग्रजांनीं मीरला वारसाची सनद दिली मीर अली हा १८९४ मध्यें मरण पावला व त्याच्या मागून मीर फैज महमदखान हा त्याचा मुलगा गादीवर बसला याला स्वत करितां १७ तोफांचा व राजा या नात्यानें १५ तोफांचा मान आहे संस्थानामध्यें १ शहर व १२६ खेडीं आहेत लोकसंख्या १९११ सालीं २,२३,७८८ होती मुसुलमान हे जवळजवळ हिंदूंच्या तिप्पटीनें आहेत हिंदूंमध्यें लोहाणा जातीचे लोक फार आहेत. मुसुलमानांत अरब बलुची, जाट, मोहानो या जातीचे लोक विशेष आढळतात संस्थानांतील बहुतेक लोकांचा शेतकी हा धंदा आहे संस्थानांत मुख्यत सिंधी, फारसी, सिरैकी व बलुची या भाषा प्रचलित आहेत

१९०३-४ सालीं या संस्थानांतील लागवडीची जमीन १५५० चौ मै होती ज्वारी, बाजरी, गहूं, कडधान्य हीं मुख्य पिकें आहेत निळीचें पीकहि बरेंच होतें आंबा, तुती, नारिंगें, डाळिंब, खजूर हीं फळें विशेष आढळतात नवीन नवीन कालवे काढण्यांत आल्यापासून लागवडीची जमीन वाढत चालली आहे संस्थानांत, उंट, घोडे, म्हशी, बैल, गाढव, खेचर, मेंढी हीं पाळीव जनावरें आढळतात संस्थानांत कालवे पुष्कळ आहेत हे सर्व सिंधुनदाचे आहेत सर्वांत मोठा कालवा ' मीरवाह ' हा होय मीर शोराबच्या कारकीर्दीत तो काढण्यांत आला याशिवाय अली मुरादनें आपल्या कारकीर्दींत सयीबीवाह व अबदुलवाह हे दोन कालवे काढविले हाँच्या मीरच्या कारकीर्दींत यासाठीं एक स्वतंत्र खातें निर्माण करण्यांत आलें असून त्या खात्यानें फैजवाह, फैजबक्ष, फैजगंग, फैजबहार, फैजमज इत्यादि कालवे काढले आहेत १९०३-४ सालीं २४६ चौ मै जमीनीला या कालव्यांमुळें पाणी मिळत होतें. संस्थानांत ३३१ चौरस मैल जंगल असून, त्यापैकीं २०० चौरस मैल मीरच्या शिकारीसाठीं राखून ठेवण्यांत आलें आहे याच्यावर स्वतंत्र अधिकारी नेमण्यांत आला आहे १९०४ मध्यें या जंगलाचें उत्पन्न २६००० रुपये झालें

संस्थानांत सर्व प्रकारचें कापड, चादीचें सामान, लांकूडकाम, बूट, जोडे, जीन, तलवारी, मातकाम वगैरे धंदे आहेत गॉम्बट येथ ' खेस ' ऊर्फ पलंगपोस उत्तम होतात खैरपूरमध्यें गालिचाचा कारखाना आहे शिवाय येथें रंगाचें काम उत्तम तऱ्हेनें होतें संस्थानांतून कापूस, लोंकर, धान्य, नीळ, कातडी, तंबाखू इत्यादि जिनस निर्गत होतात खैरपूरमध्यें कार्बोनेट ऑफ सोडा उत्पन्न होतो व तो सगळा मुंबईचे व्यापारी विकत घेतात एकंदर निर्गत वस्तूंच अदाजीं उत्पन्न ६ लाखाचें व आयातीचें उत्पन्न सहा लाखांवर आहे हैद्राबादहून रोहरीला जो रेल्वेचा फाटा जातो तो या संस्थानच्या हद्दींतून गेला आहे याशिवाय किरकोळ रस्ते पुष्कळच आहेत पोस्ट ऑफिसांची संख्या १० आहे सिंधु नदीमध्यें संस्थानच्या मालकीच्या सहा बोटी आहेत

संस्थानांतील राज्यपद्धति अनियंत्रित आहे तरी पण हल्लीं तींत बऱ्याच सुधारणा झालेल्या आहेत कारभाराच्या सोईसाठीं संस्थानचे ५ तालुके पाडण्यात आले आहेत प्रत्येक तालुक्यावर एकेक नायब वझीर नेमण्यात आला आहे मीरचा मुख्य वझीर हा ब्रिटिश सरकारनें नेमलेला असतो सक्करचा कलेक्टर संस्थानवर देखरेख करण्याचें काम करतो मीरला न्यायाच्या बाबतींत पूर्ण अधिकार आहेत, पण ब्रिटिश प्रजाजनांना पोलिटिकल एजंटच्या परवानगीशिवाय फांशी देण्याचा अधिकार नाहीं वझीराला डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व सेशन्स जजाचे अधिकार आहेत नायब वझीरांना सबडिव्हिजनल मॅजिस्ट्रेटचे अधिकार आहेत ब्रिटिश राज्यांतील फौजदारी कायदाच येथें रूढ आहे संस्थानामधील महसूल बटई नावाच्या जुन्या पद्धतीनें गोळा केला जातो. उत्पन्नाच्या एकतृतीयांश भाग मीर स्वत साठीं घेतो १९०३-४ सालीं संस्थानचें उत्पन्न १३ लाख झालें व खर्च ११६ लाख रुपये झाला १९०२ पर्यंत संस्थानचीं स्वत चीं नाणीं प्रचारात होतीं पण हल्लीं ब्रिटिश नाणें चालू असून हेंच राजमान्य नाणें होऊन बसलें आहे मीरला सरकारास कांहींहि खंडणी द्यावी लागत नाहीं संस्थानचें लष्कर ३७७ शिपायांचें असून त्यात १६३ स्वार आहेत १९०३-४ सालीं पोलिसांची संख्या ३२० होती कोटदिर्जी येथें एक मोठा तुरुंग व खैरपूर येथें एक छोटा तुरुंग आहे खैरपूर संस्थान शिक्षणाच्या बाबतींत फार मागसलेलें आहे १९०३-४ सालीं संस्थानात ९५ शाळा होत्या व ४५८६ विद्यार्थी शिकत होते खैरपूर येथील सर अलिमुराद टेक्निकल शाळेंत, सूत व रेशीम विणकाम नुकतेंच सुरू करण्यात आलें आहे त्या ठिकाणीं मुलांना सुतारकी, लोहारकी, कातकाम, कशीदाकाम व गालिचाकाम, तसेंच लाखरोगणाचें लाकूड करणें, चकचकीत भांडीं करणें व हातमागावर विणणें हीं सर्व कामें शिकविण्यात येतात १९०३-४ सालीं संस्थानात ३ इस्पितळें व ३ दवाखाने होते

खैरपूर शहराकरिता शुद्ध पिण्याच्या पाण्याची नुकीच सोय करण्यात आली. ८६ फूट खोलीतून हें पाणी नळानें वर आणलें आहे. १९२० ते १९२३ च्या दरम्यान पाण्याच्या पाटाची बरीच दुरुस्ती व सुधारणा करण्यात आली. अलीनवाझवाह नावाचा एक नवीन कालवा सुरू करण्यात आला. त्यास खर्च सुमारें १,००,००० रुपये झाला. १९२२ सालीं संस्थानात एकच सामान्य कारखाना निघाला. धान्य दळणें, धान्य निवडणें, पाणी शुद्ध करणें, बर्फ करणें इत्यादि कामें या कारखान्यात करण्यात येतात

जानेवारी १९२४ सालीं बर्मा ऑइल कंपनीला पेट्रोलियम तेलाकरिता धातूच्या खाणी शोधण्याचा परवाना देण्यात आला. परंतु संस्थाननें इतर सापडणाऱ्या खनिज पदार्थांवरील आपला हक्क कायम ठेविला पाच वर्षांत कंपनीला जर तेल सापडलें तर तिला तीस वर्षांचा कौल मिळावा व या मुदतींत कंपनीनें कच्च्या तेलाच्या प्रत्येक ४० गॅलनास आठ आणे दरानें राजकीय कर द्यावा असें ठरलें हा परवाना देणें म्हणजे संस्थानच्या उत्पन्नवाढीच्या बाबतींत एक पाऊल पुढें टाकणेंच होय हें उघड आहे.

ब्रिटिश अधिकाऱ्यांशीं सहकार्य करून कारबोनेट ऑफ सोडा या पदार्थाची मोठी बखार पुन. बाटवावी अशा सूचना करण्यात आल्या आहेत.

शहर—खैरपूर संस्थानची राजधानी. याची लोकसंख्या १९११ सालीं १४६८९ होती. बहुतेक वस्ती मुसुलमानांचीच आहे. शहरांतील घरें मातीचीं असून फार गचाळ आहेत. या शहरात राजवाड्याची इमारत चांगली आहे. पण स्वतः मीर हा येथें क्वचितच रहातो. शहराच्या नजीक पीरहसन, झियाउदिन व हाजी जाफर सय्यद यांचीं थडगीं आहेत. शहरात दोन इस्पितळें असून त्यांपैकीं एक खास स्त्रियांकरिता आहे. तालपुर घराण्याच्या भरभराटीच्या काळीं या शहराला फार महत्व होतें पण हल्लीं तें महत्व कमी होत चाललें आहे. शहरात कपडे रंगविण्याचा धंदा मोठ्या प्रमाणावर आहे. हल्लीं ज्या जागीं हें शहर वसलेलें आहे त्या जागीं १८८७ पूर्वी बोबरा नावाचें एक खेडें होतें असें म्हणतात.

**खैरवार**—खरवार. बिहार-ओरिसात याची वस्ती सर्वात जास्त( सुमारें ८५ हजार) आहे. मध्यप्रांतात याची संख्या २००० आहे. डाल्टनच्या मतें यांचा व चेरो लोकांचा फार निकट संबंध आहे. यांच्यात परस्परविवाह होऊं लागला आहे. पलामऊ व रायगडचे राजे या प्रकारचे मिश्र लग्नसंबंध जोडतात व अलीकडे मोठा खर्च करून रजपूत मुली देखील करतात. यामुळें यांतील बरेच तुराणी अवशेष नाहींसे होत आहेत. ही जात एकदर सुधारणेच्या मार्गावर आहे. यांचा व संताळ लोकांचाहि संबंध आहे असें डाल्टन म्हणतो. या जातींत ४ उपवर्ग आहेत. भोगता, माहतो, रावत व मांझी माहतो म्हणजे गावाचा मुख्य, रावत म्हणजे राजा, मांझी म्हणजे होडी वल्हवणारा. संताळ लोकात गावाच्या मुख्यास मांझी म्हणतात. बंगालमध्यें भोगता ही महत्वाची जात आहे मध्यप्रांताचे जमीनदार लोक जानवें घालतात, स्वतःस सूर्यवंशी म्हणवितात व आपसातच लग्नें करतात. दुसऱ्या वर्गाचें नाव दुवालबंधी असें आहे. हे लोक घराच्या भिंती बाधतात. पाटबंधी लोक रेशमाचे कोश पाळतात. वेलदा व माटकोरा हे मातीचें काम करतात. सर्वांत शेवटीं खैरचुरा वर्ग आहे. हाच कातकाम करतो.

याची परस्परनिषिद्धविवाह कुळें बरींच झालीं आहेत. कुळाचीं नावें पशुपक्षी व इतर पदार्थांवरून पडल्यामुळें ते ते प्राणी व पदार्थ त्यांचीं देवकें आहेत. वधुवराचें खरें लग्न होण्यापूर्वी दोघांचेंहि लग्न आंब्याच्या झाडाबरोबर झालें पाहिजे.व दोघांनीं परस्परांचें रक्त काढून त्यात शेंदूर मिसळून कपाळाला लावला पाहिजे. खऱ्या लग्नात फक्त शेंदूरच वधूच्या अंगाला लावतात बिरहोर लोकात तर वधुवरांचीं बोटें टोंचून त्यातून निघालेल्या रक्ताचा तिलक वधूवर परस्परास करतात.

बिलासपुरात लहान मुलें आईबापाच्या प्रेताचें थोडें मास कापून खातात व त्यामुळें आईनें ९ महिने पोटात वागविलें त्याबद्दल उतराई झालों असें समजतात. फ्रेजर म्हणतो कीं त्याना पिशाच्चाची बाधा न व्हावी म्हणून ते हा विधि करतात. [ रसेल व हिरालाल. से. रि. १९११ ( बंगाल ) ].

**खैरागड, तहशील**— संयुक्त प्रांतातील आग्रा जिल्ह्याची नैर्ऋत्य तहशील. इचें क्षेत्रफळ १९११ सालीं ३०९ होतें. लोकसंख्या १२११७६ होती. या तहशिलींत जगनेर हें एकच शहर असून १५२ खेडीं आहेत. खैरागड हें खेडें या तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. १९०३–०४ सालीं या तहशिलीचें उत्पन्न २८५००० रुपये होतें. या तहशिलीमधून उतनगान ही नदी वहात गेली आहे. या नदीच्या नैर्ऋत्येकडील भागात विंध्यपर्वताची रांग गेली आहे व दक्षिण भागात लहान लहान टेंकड्या पसरल्या आहेत. या टेंकड्या तांबड्या रेताड दगडाच्या आहेत. त्यांचा इमारतीला फार उपयोग होतो. या टेंकड्यांच्या पायथ्याशीं जमीन रेताड व नापीक आहे. उतनगान नदीच्या पूर्वेकडील मुलखातील जमीन चिकण मातीनें युक्त असून सुपीक आहे. या भागातून पुष्कळ गोरीं आहेत. जमीनीला पाणी मिळण्याचें साधन म्हणजे विहिरी होत. या तहशिलींत एक देखील कालवा नाहीं.

**खैरागड, संस्थान**.—मध्यप्रांत. उ. अ. २१° ४' ते २१° ३४' व पू. रे. ८०° २७' ते ८१° २२'. क्षेत्रफळ ९३१ चौरस मैल. लोकसंख्या १३७५५४. या संस्थानचे तीन निरनिराळे भाग आहेत. ( १ ) खैरागड आणि डोंगरगड ( २ ) खामारिया व (३) खोलवा. जंगलात वाघ, चित्ते, नीलगाई, अस्वलें, लांडगे, गवे, डुकरें, वगैरे रानटी जनावरें दिसतात. गेल्या १९ वर्षांची पावसाची सरासरी ४४ इंच आहे.

संस्थानची हवा साधारण निरोगी आहे उष्णमान ३८° पासून १०४° पर्यंत असतें.

इतिहास—छोटा नागपूरचा नागवंशी रजपुतराजा लक्ष्मीसिंग या राजघराण्याचा मूळपुरुष होता असें मानण्यांत येतें. लक्ष्मीसिंगाचा श्यामघन नावाचा वंशज सन १७८० सालीं खोल्वाचा जमीनदार होता. पुढें खोलव्याच्या राजास भोंसल्याचें माडलिकत्व कबूल करावें लागलें व खंडणी ५०० ( नागपूर नाणें ) रुपये ठरली. संस्थानची राजधानी खोलवा होती परंतु यानें खैरागड येथें आपलें मुख्य ठाणें केलें. सन १७५५ सालीं खंडणी १५०० रुपये झाली नंतर ८००० रुपयांपर्यंत चढवली. सन १७८४ च्या सुमारास कवर्धाचे उजियारसिंग आणि सरदारसिंग यांचा खामारिया परगण्याच्या मालकीसंबंधें तटा उपस्थित झाला. खैरागडच्या राजानें सरदारसिंगास मदत केली व दिलेल्या कर्जाची फेड म्हणून तो परगणा मिळाला. यावेळीं भोंसल्यास ३५००० रुपये खंडणी द्यावी लागत असे. इ. स. १८१६ सालीं डोंगरगडच्या जमीनदारानें भोंसल्याच्या विरुद्ध बंड केलें, त्याचा नाश संस्थानिक टिकाइतरायानें नांदगावच्या संस्थानिकाची मदत घेऊन केला त्यामुळें ती जमीनदारी खैरागड संस्थानांत सामील झाली व खंडणी एकंदर ४४००० रुपये करण्यात आली.

सन १८५४ सालीं नागपुरचें राज्य ब्रिटिशांनीं खालसा केलें व या संस्थानची खंडणी ३९००० (कंपनी नाणें) ठरली सन १८६५ सालीं खैरागड माडलिक संस्थान आहे असें ठरवून संस्थानिकास दत्तक वगैरेसंबधींची सनद देण्यांत येऊन सन १८६७ सालीं खंडणी ४७००० पर्यंत वाढविली गेली. तीच सन १८८८ सालीं ७०००० रुपये केली व १ एप्रिल सन १९०९ पासून पुढील ३० वर्षेपर्यंत खंडणी ८०००० रुपये ठरली.

पुराणवस्तुसंशोधन—खैरागड येथें एक व डोंगरगड येथें एक अशीं दोन प्राचीन देवळें आहेत. खैरागड येथील देऊळ दत्तस्वामींचें आहे. ( दत्तस्वामी शब्द पहा )

डोंगरगड येथील देऊळ तेथील राजा कामसेन यानें बांधलें आहे हा उज्जनीचा राजा विक्रमादित्य याचा समकालीन होता. या देवळास बोमलाईचें देऊळ असें म्हणतात. डोंगरगड येथें कामकंदला नांवाचें तळें आहे कामसेनाच्या रखेलीच्या नावावरून तळ्यास हें नाव दिलें आहे. बोमलाई डोंगरावरील मोतियाचीर तलावाच्या काठावर एक दहा फूट उंचीचा दगड सांपडला असून त्यावर एक फारसी लिपींत लेख आहे देवरबीज येथें एक काळ्या दगडाचें महादेवाचें लिंग असून तें फार जुनें आहे त्यावर मकरध्वज जोगी असें नाव खोदलेलें आहे

या संस्थानांत खैरागड व डोंगरगड येथें म्युनिसिपालिट्या आहेत. या संस्थानात एकंदर ५२१ खेडीं आहेत पैकीं ८९६ मध्यें वस्ती आहे व बाकीची ओसाड पडलेली आहेत

भाषा—छत्तिसगड हिंदी भाषेची उपभाषा शेकडा ९५ लोक बोलतात मराठी भाषा बोलणारांची संख्या सुमारें ४००० आहे लागवडीखालीं जमीन सन १८९४ सालीं सुमारें ७०० चौरस मैल होती त्यांपैकीं सुमारें ⅔ खरीफ व ⅓ रब्बी. मुख्य पिकें कोद्रन, भात, गहूं, हरभरा इत्यादि

बंगालनागपूर रेल्वेचीं या संस्थानात तीन स्टेशनें आहेत तीं—डोंगरगड, बोरतलाव आणि मुसरा डोंगरगड येथें मोठा व्यापार चालतो

जंगलाचें क्षेत्रफळ सुमारें १६५ चौरस मैल असून सन १९०७ सालीं जंगलाचें उत्पन्न ४०००० रुपये होतें व खर्च ३५०० रुपये होता

जमीनपहाणी, तुरुंग, अबकारी, पोलिस, रजिस्ट्रेशन, सार्वजनिक कामें, जंगल, शिक्षण, दवाखाना वगैरे खातीं संस्थानात आहेत.

गांव—मध्यप्रांत खैरागड संस्थानच्या राजधानीचा गाव. बंगालनागपूर रेल्वेच्या डोंगरगड व राजनांदगाव स्टेशनपासून हा गाव पक्क्या सडकेनें २३ मैल आहे क्षेत्रफळ १६५ एकर व लोकसंख्या ४६५६ येथें संस्थानिकाचा राजवाडा, व्हिक्टोरिया-हायस्कूल दवाखाना, कचेऱ्या, तुरुंग वगैरे आहेत. इसवी स १९०० सालीं म्युनिसिपालिटि स्थापन झाली आहे. येथील तुरुंगात उत्तम सतरंज्या होत असून गावांत पितळेचीं भांडीं व लाकडी सामान तयार होतें

खैरागली—वायव्य सरहद्दीवरील प्रांताचा हजारा जिल्ह्यातील छोटासा कँटोनमेंट उन्हाळ्याच्या दिवसात ब्रिटिश लोकांचा डागरी तोफखाना येथें असतो

खैराबाद—संयुक्त प्रांतातील सीतापुर जिल्ह्याच्या सीतापूर तहशिलींतील शहर 'लखनौ–बरेली रेल्वेच्या मार्गावर हें वसलेलें असून याची लोकसंख्या १९११ सालीं १२७६९ होती. पासी जातीच्या खैरा नावाच्या एका पुरुषानें हें शहर १० व्या शतकात वसविलें असें म्हणतात पण कांहींच्या मतें खैरानें वसविलेलें शहर हें नसून मसन्छत्र नावाचें जें शहर खैराबादच्या नजीक आहे तें होय हल्लींचें खैराबाद हें नाव मुसुलमानांनीं दिलें असें म्हणतात. दिल्लीच्या प्राचीन राजांनीं या शहरावर सुभेदार नेमला होता अकबराच्या कारकीर्दीत खैराबाद हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें. १९ व्या शतकाच्या पूर्वार्धात खैराबाद हें औध निझामतीचें मुख्य ठिकाण होतें पुढें औध स्वतंत्र झाल्यावर खैराबाद हा एक जिल्हा बनला येथ देवालयें व थडगीं पुष्कळ आहेत. त्यांपैकीं कांहीं अकबराच्या काळचीं आहेत सन १८६९ सालीं खैराबाद म्युनिसिपालिटी स्थापन करण्यात आली. येथें दररोज बाजार भरतो. आनेवारीमध्यें एक मोठी यात्रा भरते. येथ ५ शाळा व २ दोन दवाखाने आहेत

खैरी—मध्यप्रांत जिल्हा भंडारा. तहशील साकोली साकोलीच्या उत्तरेस कांहीं मैलावर ही लहानशी जमीनदारी आहे हींत एकंदर ८ खेडीं असून क्षेत्रफळ १४ चौरस मैल।

आहे त्यापैकी ½ भाग जंगल आहे. रानटी पशूंचा नाश केल्याबद्दल ह्यांच्या मान घराण्याच्या पूर्वजास ही जमीनदारी मिळाली असें म्हणतात कदाचित् तुर्मापुरीच्या जमीनदारीचा हा एक भाग असेल,कारण तेथील जमीनदार देखील मान घराण्यातीलच आहेत. इ. स. १७७५ साली नागपूरच्या राजानीं ही जमीनदारी याच घराण्याकडे कायम केल्याची सनद दिली आहे. हल्लींचा जमीनदार अनंतराम मान घराण्यातील (वय ५५ वर्षे) असून अशिक्षित आहे यास कर्ज फार आहे. त्यानें आपलें कर्ज फेडण्याकरिता गीदलपार नावाचें खेडें विकून टाकलें पहाणीच्या वेळचें उत्पन्न १६०० रु. होतें टाकोळी ५५० रु हल्लींचें अनमानलेलें उत्पन्न १३५० रुपये आहे

**सैरीमूरत**—पंजाबमधील अटक जिल्ह्याच्या फतहजंग तहशिलींतील एक डोंगराची रांग ही रांग सोहान व काळा चित्र या नद्यांच्या मधून गेली आहे सिंधू नदीपासून ३० मैलावर ही सुरू होऊन पूर्वेकडे २४ मैलपर्यंत ही पसरली आहे या डोंगरात रेताड दगड व चुन्याचे दगड सांपडतात. या रांगेच्या उत्तरेस मोठें पठार असून त्यात मधून खोल दऱ्या आहेत. दक्षिणेस ५ मैलपर्यंत लहान लहान टेकड्या व खिंडी आहेत या डोंगरावर पूर्वी फार मोठीं जंगलें होतीं पण हल्लीं तीं बहुतेक नाहींशी करण्यात आलीं आहेत.

**खैरुद्दिन**—( खैरुद्दिन. याचा अर्थ धर्मानंद असा आहे ). खैरुद्दिन हा तुर्कस्तानचा एक प्रसिद्ध मुत्सद्दी होऊन गेला. याच्या जन्माबद्दल व कुलासंबंधीं काहींच माहिती उपलब्ध नाहीं. हा सिरकेशियन वंशाचा होता तूनेशियातील गुलामांचा व्यापार करणाऱ्या एका गृहस्थाच्या ताब्यात हा लहानपणीं होता पुढें त्या व्यापारानें याला ट्यूनिसमधील हमूदपाशा नांवाच्या एका सुभेदाराला विकलें. या सरदारानें खैरुद्दिन यास स्वतंत्र केलें व त्याला फ्रेंच भाषेचें शिक्षण दिलें पुढें खैरुद्दिनचा शिक्षणक्रम आटोपल्यानंतर हमूदपाशा यानें त्याला आपल्या शिद्यांचा व्यवस्थापक नेमलें हमूदपाशाचा दिवाण महमद बिन अयद यानें खजिन्यातील द्रव्य उडून फ्रान्सला पलायन केल्यावेळीं हमूदपाशानें त्याला धरून आणण्यासाठीं खैरुद्दिन यास फ्रान्समध्यें धाडलें. खैरुद्दिनच्या हातून ही कामगिरी पार पडली नाहीं तथापि तो फ्रान्समध्यें सहा वर्ष महमदाच्या शोधार्थ राहिला असता, फ्रेंचाच्या शासनपद्धतीचें व त्यांच्या राज्यकारणविषयक कल्पनांचें त्याला चांगलें ज्ञान झालें फ्रान्समध्यें तो सर्वांना परिचित झाला. खैरुद्दिन हा फ्रान्समध्यें असतांना हमूदपाशा मरण पावला. त्याच्या नंतर १८३७ मध्यें अहमदपाशा गादीवर आला. खैरुद्दिन हा तूनेशियात परत आला व अहमदपाशानें त्याला पागेची अधिकाराची जागा दिली अहमद, महमद व सदोक या तिन्ही सुभेदाराच्या कारर्कीर्दींत खैर-द्दिन तूनेशियामध्ये चांगलाच मान्यतेस आला. यानें तूनेशियात पुष्कळ सुधारणा घडवून आणल्या तुर्कस्तानच्या सुलतानाकडून महमूदपाशाच्या वंशजाना वंशपरंपरा सुभेदारी खैरुद्दिन यानें मिळवून दिली. तूनेशिया प्रांत आपल्या छत्राखालीं यावा अशी फ्रेंच सरकारची फार इच्छा होती पण या त्यांच्या महत्वाकांक्षेला खैरुद्दिन यानें जोराचा विरोध केला, पण सदोकचा दिवाण मुस्ताफाबिन इस्मायल नावाच्या यहुद्याला फ्रेंचाच्या ताब्यात हा प्रांत जावा असें वाटत होतें. त्यामुळें त्यानें सदोकच्या मनात खैरुद्दिनविषयीं वाईट मत भरवून दिलें त्यामुळें सदोकच्या मनातून खैरुद्दिन हा पूर्णपणें उतरला पुढें अबदुल हमीद हा तुर्कस्तानचा सुलतान झाला. तेव्हा खैरुद्दिननें तुर्कस्तानमध्यें येण्याची आपली इच्छा हमीदपाशी प्रदर्शित केली व त्याप्रमाणें तो १८७७ मध्यें तुर्कस्तानात आला याच सुमारास टोकेन येथें सुधारणा कमिटी बसली होती. त्या कमिटीवर सुलतानानें याची नेमणूक केली १८७९ मध्यें तो सुलतानचा मुख्य वझीर झाला. तुर्कस्तानमध्यें सनदशीर राज्यपद्धति अमलात यावी यासाठीं त्यानें एक योजना तयार केली पण त्या योजनेला संमति देण्याचें सुलताननें साफ नाकारलें त्यामुळें १८७९ च्या जुलै महिन्यात त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला. सुलतानानें अनेकदां त्याला मुख्य वजीरीची जागा देऊं केली पण त्यानें ती नाकारली त्यामुळें सुलतानचा त्याच्यावर रोष झाला. खैरुद्दिन हा १८९० मध्यें मरण पावला

**खोकंद**—एशियाटिक रशियातील एक शहर. हें फरघन प्रांतात समरकंदपासून अंडिजानला जाणाऱ्या आगगाडीच्या रस्त्यावर आहे. येथील हवा फार रुक्ष असते. प्रतिवार्षिक पाऊस ३.६ इंच असतो. शहरांत मोठाले रस्ते, विस्तृत चौक व सुंदर बाजार आहेत. हें व्यापाराचें महत्वाचें केंद्रस्थान आहे. येथें 'रम्य खोकंद' मुद्रालेख असलेलीं नाणीं पूर्वी प्रचारात होतीं व अद्यापहि आहेत.

१८ व्या शतकांत या खानेटचा उदय झाला. १७३२ त अबदुर रहीम यानें या शहराची स्थापना केली. याच्याहि पूर्वी म्हणजे १० व्या शतकात खोकंद हें होकंद या नावानें अरब व्यापाऱ्यांना माहीत होतें. १७५८–५९ त फरघन येथील राजानीं चीनचें मांडलिकत्व कबूल केलें १८०७ किंवा १८०८ मध्यें नरबुताचा मुलगा अलीम यानें ताशकंद व चिम्केंट हीं शहरें जिंकलीं व फरघनच्या राजावर आपलें वर्चस्व स्थापिलें त्याचा भाऊ ओमर याच्या अनुयायानीं १८१७ त त्याला ठार केलें. ओमर यानें किरगिझ लोकांच्या स्वाऱ्यांपासून फरघन प्रांताचें रक्षण करण्याकरितां सिरदर्यावर एक किल्ला बांधिला यामुळें रशियाशीं वैमनस्य उत्पन्न झालें सिरदर्यांमधील प्रदेशाचें स्वामित्व मिळविण्याकरितां १८४७ नंतर रशियानें पुष्कळ लढाया केल्या. याचा परिणाम असा झाला कीं, १८६६ त बुखारापासून खोकंदनें खानेट वेगळें करण्यांत आलें १८६० त अलीमकुल यानें रशियाविरुद्ध 'पवित्र युद्ध' ( गझावत ), पुकारलें

परंतु तो १८६५ त मारला गेला. १८६८ त खुदागर-खान यानें रशियाशीं व्यापारी तह केला. १८७५ त फिरून रशियाशीं युद्ध पुकारण्यात आलें. याचा परिणाम खोकंदचें व बुखाराचें स्वातंत्र्य नष्ट होऊन, रशियाला नारायिन नदीच्या उत्तरेकडील सर्व मुलुख मिळाला. १८७६ त खोकंद खानेट रशियास जोडण्यात आलें व यातूनच रशियन फरघन प्रांताची उत्पत्ति झाली.

खोखार—पंजाबातील एक जात. लो. सं. ( १९११ ) ५९,९५७. हे मुख्यतः मुसुलमान असून फेरोजपूर, लाहोर, गुजराणवाला, शियालकोट जिल्हे, रावळपिंडी, मुलतान प्रांत व भावलपूर संस्थान यांत आढळतात. ते चांगले शेतकरी असून जाट, रजपूत लोक व आपण जवळ जवळ एकाच वंशाचे आहोंत असें त्यांचें म्हणणें आहे.

ग्रंथामधून खोखार व गखार यांविषयीं जे उल्लेख येतात ते दोन्ही एका जातीविषयीं नसून निरनिराळ्या जातींविषयीं आहेत असें मत आतां प्रचलित झालें आहे. गुरुदासपूर येथील कटील रजपुतांपैकीं जे प्रथम मुसुलमान झाले ते खोखार होत असें या जातीच्या वृत्तांत लिहिलें आहे. कटील जातीच्या रजपुतांनीं जम्मू राज्यांत मंगलदेवीच्या किल्ल्यांत वसाहत केली आणि पुढें सैरपूर जिंकलें त्या सैरपुरावरून पुढें महमूद गझनवीच्या काळांत ते मुसुलमान झाल्यानंतर खोखार हें नांव त्यांना मिळालें. महमूद गझनवीच्या सहाव्या स्वारीच्या वेळेस ते हिंदु होते आणि त्यांनीं गझनवीस आनंदपाळ ( अनंगपाळ ) याच्या नेतृत्वाखालीं अड थळा केला. इसवी १२०५ मध्यें यांनीं चिनाब आणि झेलम याच्या दुआबांत धुमाकूळ केला व कांहीं काळ तो प्रांत कब्जांत ठेवला. त्यावेळच्या पुढारी "कोकर राई" यानें १२५९ मध्यें जम्मूच्या राजाविरुद्ध मुसुलमानांच्या साहाय्यानें बंड केलें. इ. स. १२२३ मध्यें सुलतान जलालुद्दीनास एका खोखार राजानें आपली मुलगी दिली व पुष्कळ फौजेसह तो त्यास मिळाला. १२८१ मध्यें खोखार व त्याच्या बरोबर अनेक हिंदु 'गबर'नीं लाहोर घेतली. १२४६–४७ मध्यें बलबन यास फौजेसह दिल्लीच्या बादशहानें पाठविलें खोखारांनीं लाहोर घेतल्याचा काळ दुसऱ्या एका तवारिखकारानें इ. स. १३९४ दिला आहे.

तैमूरलंगाच्या स्वारीच्या वेळेस दोन खोखारांशीं तैमूराचा प्रसंग पडला अशी वियानें निरनिराळ्या ग्रंथांत आहेत तैमूर जाल येथें असतां जवळच्या एका किल्ल्यावर खोखराचा 'नूसरात' रहात होता. त्याचा तैमूरनें पराभव केला व मलिक शैखाचाहि पराभव केला. शैखा यास 'काफिराचा सेनापति' असें म्हटलें आहे. दुसऱ्या एका शैखास ( नूसरातच्या भावास ) दिल्लीवर स्वारी करतांना तैमूरलंगानें नोकरीस ठेवलें होतें. शैखाचा मुलगा जसरथ हा १४२० मध्यें रणभूमीवर आला. यानें सिंधवर चाल करून गाणाऱ्या काश्मीरच्या राजास लुटलें आणि दिल्लीवर चाल करण्याची व्यर्थ खटपट केली. यानें गोखार लोकांच्या सहाय्यानें लाहोरला वेढा दिला, त्यांत त्यास अपयश आलें जम्मूच्या भीम राजानें तेरखेर किल्ला घेतला व एकदा योचा पराभव केला पण दुसऱ्या लढाईत भीमाचा मोड करून जसरथ यानें पुष्कळ युद्धसाहित्य मिळविलें. अकबराच्या वेळीं लाहोर प्रांताच्या ५२ महालांपैकीं पांच महाल खोखारांच्या ताब्यांत होते [ रोजची ग्लॉसरी. से. रि. १९११ पंजाब)].

खोखो—एक महाराष्ट्रीय खेळ. आट्यापाट्याप्रमाणें या खेळास खर्च लागत नाहीं. शिवाय आट्यापाट्याप्रमाणें पाट्या आखण्याचा यांत फारसा त्रास पडत नाहीं ( आट्यापाट्या पहा ) शिस्तीचा व चुरशीना खेळ करावयाचा असेल तर मात्र पुढीलप्रमाणें जागा आखून घ्यावी व गडी बसवावेत. पुण्याच्या डेक्कन जिमखान्यानें या खेळास बरेंच व्यवस्थित स्वरूप देऊन तो, त्याचे नियमबद्ध व व्यवस्थित सामने करतां येतील असा केला आहे. या खेळांत पळण्याचा व्यायाम चांगला होऊन चलाखीहि अंगीं येते. या खेळासंबंधीं पुढें दिलेले नियम, मापें व आकृती हीं डेक्कन जिमखान्यानें प्रसिद्ध केलेल्या नियमपुस्तकांतून घेतलीं आहेत. खोखोकरितां आंगण चौकोनी आखून घ्यावें. बाहेरील चौकोन ८२×११ चा करून कमी अजमासें ९६'—७" चा घ्यावा ( आकृति पहा ). नतर पुढील जागेंत मापें घ्यावीं.

जागा व मापें—(१) 'ट' 'ठ' हीं अर्धवर्तुळ काढून त्याचा व्यास प्रत्येकीं ५१ फूट घ्यावा.(२) 'क' 'ख' या छोट्या चौरसाच्या मध्यामध्यें,खुंट पुरण्याच्या जागीं या वर्तुळाचे मध्यबिंदू घ्यावेत. (३) गडी बसण्याचा व खुंट पुरण्याचा प्रत्येक छोटा चौरस एक फुटाचा असावा ( ४ ) एका छोट्या चौरसाच्या मध्यापासून दुसऱ्या छोट्या चौरसाच्या मध्यापर्यंतचें अंतर ९फूट असावें ( ५) 'प व' यांमधील उभ्या पट्याची एकंदर लांबी १३२ फूट असावी. (६) आकृतीमधील आडव्या पाट्या प्रत्येकीं ५१ फूट लांब असून गडी बसण्याच्या छोट्या चौरसाच्या योगानें त्याचे दोन बरोबर समानविभाग होतात.

व्याख्या व नियम.—( १ ) खेळण्याची जागा आकृतींत दर्शविल्याप्रमाणें आखावी. ( २ ) प्रत्येक बाजूस ९ गडी असावेत. ( ३ ) ज्या बाजूचे गडी आखून दिलेल्या चौरसांत बसतात व विरुद्ध बाजूच्या गड्यांना धरण्याचा प्रयत्न करतात त्या पक्षास बसणारा, पिटाळणारा अथवा मारणारा पक्ष व उलट बाजूस खेळणारा पक्ष असें म्हणतात. ( ४ ) बसणाऱ्या गड्यांपैकीं ८ जणांनीं अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ऐ, या ठिकाणीं आखलेल्या छोट्या चौरसांत बसावें व बसल्यावर लगतच्या दोन गड्यांचीं तोंडें एकाच दिशेस असूं नयेत ( ५ ) 'क' व 'ख' हे दोन लोखंडी खांब ( खुंट ) जमिनीपासून सुमारें ३ फूट उंचीचे पुरावेत व बसणाऱ्या गड्यांपैकीं नवव्या गड्यानें एका खुंटापाशीं पिटाळण्याकरितां उभें रहावें ( ६ ) खेळणारे गडी त्यांना आखलेल्या मर्यादेच्या आंत कोणत्याहि जागेंत उभे राहण्यास

हरकत नाहीं ( ७ ) 'प' 'फ' 'ब' 'भ' ही एकंदर खेळण्याच्या जागेची मर्यादा आहे व खेळ चालू असताना खेळणाऱ्या गड्यांपैकीं कोणीहि मर्यादा उल्लंघूं नये. ( ८ ) पिटाळणारा ( मारणारा ) जो गडी असेल त्यानें आपलें, दोन खुंट जोडणाऱ्या 'क-ख' या पाटीत अगर पलीकडे एकहि पाऊल जाऊं देतां कामा नये. परंतु एका बाजूस उभे राहून दुसऱ्या बाजूकडील गडी हातानें मारण्यास हरकत नाहीं ( ९ ) 'खो' देणें झाल्यास तो बसणाऱ्या गड्याच्या पाठीकडूनच दिला पाहिजे. तसेंच ज्या गड्यास खो द्यावयाचा त्या गड्याशेजारीं पिटाळणाऱ्या गड्यानें येऊन नंतर खो द्यावा, लांबून खो म्हणून ओरडूं नये. खो देणें तो खेळणाऱ्या गड्यांना ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें द्यावा खो दिल्याशिवाय कोणत्याहि बसणाऱ्या गड्यानें उठूं नये. ज्या गड्यास खो द्यावयाचा तो गडी सोडून, म्हणजे त्या गड्याच्या इकडील शरीराचा कोणताहि भाग न राहून, मारणारा गडी पुढें गेला तर त्यास खो देतां येणार नाहीं. ( १० ) ज्या गड्यास 'खो' मिळेल त्या गड्यानें उठल्यावर ज्या दिशेस तो प्रथम जाईल त्याच दिशेनें त्यानें पुढें गेलें पाहिजे, विरुद्ध दिशेस मुळींच परत जातां कामा नये. ( ११ ) पिटाळणाऱ्या गड्यानें एकदा 'क' अगर 'ख' या खुंटाकडे तोंड केलें म्हणजे, त्यानें त्याच दिशेस खुंटापर्यंत गेलें पाहिजे, अगर बसणाऱ्या गड्यांपैकीं कोणास तरी खो दिला पाहिजे. विरुद्ध दिशेस त्यानें मुळींच परत येऊं नये. तसेंच खुंटापासून निघताना एकदा तो 'क-ख' रेषेच्या एका बाजूला आला म्हणजे त्यानें दुसऱ्या बाजूला जातां कामा नये. पिटाळणाऱ्या गड्याचा हात अगर पाय खुंटास लागलेला असला तर तो खुंट सोडून निघाला असें होत नाहीं. ( १२ ) मारणारा गडी ज्या दिशेस जात असेल, त्याच दिशेकडे त्याचें तोंड असलें पाहिजे; फार झालें तर त्या दिशेच्या काटकोनापर्यंत तोंड फिरविण्यास हरकत नाहीं. (१३) खुंटापलीकडील 'ट' 'ट' या अर्धवर्तुळात तोंड फिरविण्याबद्दल कोणतेहि नियम लागू नाहींत. ( १४ ) खेळणाऱ्या गड्यानें बसणाऱ्या कोणत्याहि गड्याला केव्हांहि स्पर्श करूं नये, केल्यास तो गडी मेला असें समजावें; तसेंच तो जर 'प फ ब भ' या मर्यादेबाहेर गेला तरीहि तो मेला असें समजावें. ( १५ ) पिटाळणाऱ्या गड्यानें खेळणाऱ्या गड्यास हातानें स्पर्श केला म्हणजे खेळणारा गडी मेला असें समजावें.

खोजा—एक मुसुलमान जात. हिंदुस्थानात यांची विशेष वस्ती पंजाब व मुंबई इलाखा यांतून आहे. एकंदर लो. सं. ( १९११ ) १,२४,२१५. पैकीं अदमासें अर्धी वर्धी वरील दोन प्रांतांतून आढळते. हे मुसुल्मान व्यापारी असून यांच्यात पुष्कळ हिंदु चाली अद्याप शिल्लक आहेत. हे शिया पंथाचे मुसुल्मान आहेत. हे पूर्वी सिंधमधील लोहाना 'शौरे हिंद ( काठ्या गाजी ) असावेत. खोजा शब्द ख्वाजा म्हणजे ठाकुर शब्दाचा समानार्थक शब्द आहे. हे ईजिप्तच्या इस्माइल पंथाचे आहेत ११ व्या शतकांत हसन सबाह नावाच्या एका इराणी माणसानें फिदवी पंथ स्थापिला. यानें ईजिप्तच्या खलीफाची सत्ता झुगारून दिली व स्वतःला 'शेखुल जबल' म्हणवूं लागला. लोक यास 'डोंगरांतील म्हातारा' म्हणत. याचा तिसरा वंशज हसन नावाचा होता ( इ. स. ११६३ ) पुढें होणारा इमाम मीच आहे असें तो म्हणूं लागला व माझ्यावर विश्वास ठेवणाराचें कोणतेहि कृत्य कधींहि पाप असूं शकत नाहीं असें सर्वांना शिकवूं लागला. याच्याच पंथापैकीं पीर सदरुद्दीन यानें लोहाना हिंदूंना हसन हाच १० वा विष्णूचा अवतार ( कल्की ) आहे व आदम हा विष्णू, महंमद हा शिव, पांच इमाम हे पांडव असा फेरबदल करून नवीन धर्म घेण्यास लाविलें. इ. स. १८४५ सालीं आगा शाह हसन अली—जो आपणास पुढे होणारा इमाम मीच असें म्हणवी तो—हिंदुस्थानात आला व यानें वस्ती केली. सध्याचे आगाखान हे याचेच वंशज आहेत [ आगाखान पहा ].

खोजाच्या मुलाचे कान टोंचतात. हे शेंडी ठेवतात व पुढें कोणत्या तरी पिराच्या थडग्यावर ती अर्पण करतात. सुंता करणें किंवा दाढी ठेवणें हें खुषीवर आहे. करबल्याहून आणलेल्या मातीची १०१ मण्यांची माळ करून पिराचें नामस्मरण करतात. प्रत्येक शुद्ध द्वितीयेला रकम ठरवून आगाखानाला दक्षणा देतात. अंत्यविधींत सुद्धां आगाखानाला दक्षिणा मिळते. मरणोन्मुख माणसाची इच्छा असली तर त्याजपासून ५ ते ५०० रुपये घेऊन 'समर छंद' विधि करून त्याच्या आत्म्यास शांति मिळेल असें करतात. एक अधिकारी करबल्याची माती पाण्यांत कालवतो व मरणोन्मुखाच्या ओठावर तिचा लेप करतो, कांहीं त्याच्या तोंडावर शिंपडतो गळ्याला व छातीला लावतो. जर मरणोन्मुख माणूस अगदींच म्हातारा असला तर त्याचे केस मेंदीनें रंगवितात, त्याच्या गळ्यांत करबल्याच्या मातीच्या गुळ्यांची माळ घालतात, हुसेनच्या थडग्यावरील कापडाचे दोन तुकडे त्याच्या डोळ्यावर ठेवतात. सधन खोजे आपल्या प्रेताची प्रेटी हवा न जाण्यासारखी बंद करण्याची व्यवस्था करून समुद्रमार्गानें बगदादकरून करबल्यास पाठवून तेथें पुरतात. हे लोक मोठे व्यापारी आहेत. सिलोन, ब्रह्मदेश, सिंगापूर, चीन, जपान, इराणी आखातांतील बंदरें, अरबस्तान व पूर्व आफ्रिकेबरोबर हे व्यापार करतात. यांचीं मुलें दूरदूर देशीं उमेदवार म्हणून २०० पासून २००० रुपये दरसाल वेतनावर जातात. हिंदुस्थानाबाहेर अरबस्तान व झांझिबार या प्रदेशात खोजांची वस्ती आहे [ मुं. गॅ. रसेल व हिरालाल. ]

खो जात—हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवर निम्रळ खोऱ्यांत आणि पामिरच्या दक्षिणेस असलेल्या ग्यासगतच्या प्रदेशांत राहणारी एक जात पूर्वेस यासीन आणि

गिलगिट आहेत. त्या ठिकाणीं शिन भाषा चालते. पश्चिमेस काफिरिस्तान असून त्यांत निरनिराळ्या हिंदु काफिरी पोटभाषा बोलतात उत्तरेस पामीर पठार आहे. येथें इराणी भाषा आढळते, आणि दक्षिणेस अनेक लहान लहान, मुख्यतः शिन वंशाच्या व कांहीं पठाणी जाती आहेत. "खो" (वास्तविक हो) व गिलगिटचे शिन आणि काफिरिस्तानचे काफीर या सर्वांना दरद असें नाव देण्यात येतें, पण वास्तविक हें नाव फक्त शिन लोकांस लावतात. या तिन्ही जाती प्राचीन पैशाच्य जाती असाव्यात हो भाषेचा उल्लेख चिनी बौद्ध वाङ्मयात येतो. शिन (शिन) हा चीनवाचक शब्दहि अनेक ठिकाणीं येतो. तसाच दरदांचा उल्लेख महाभारत वगैरे संस्कृत वाङ्मयात अनेक ठिकाणीं येतो. हे त्यावेळीं डोंगरी मुलुखात रहाणारे लोक म्हणून प्रसिद्ध होते. खो लोकांचे पेहेराव व चालीरीती खऱ्या दरदाप्रमाणें असल्यानें प्रस्तुत लेखात दरदाहून भिन्न अशा प्रश्नाचाच विचार केला आहे. (दरद पहा)

चित्रळमध्यें खो ही जात राजसत्ताविभ्रित नाहीं. राज्य करणाराची जात यांना तिरस्कारानें 'फकिर मुष्कीन' किंवा "गरीब भिकारी" असें म्हणते. याच्याहून वरच्या दर्जाची जात चित्रळच्या राजा मेहतर याचे पगारी नौकरअसून त्यांना 'एरबाब झादा' (मालकाचे मुलगे) असें नाव आहे या दोन दर्जांच्या लोकांमध्यें लग्नव्यवहार होतो. या प्रदेशाचे नुकतेच झालेले जेते जे 'आदमजादा' (माणसांचीं मुलें) त्यांच्या उत्पत्तीविषयीं चांगलीशी माहिती नसून त्यांच्यापैकीं कांहीं इ. स. १६ व्या शतकात पामीर ओलांडून उत्तरेकडून आलेले दिसतात. खो यानीं आपली भाषा त्यांच्यावर लादली.

दंतकथा, पौराणिक कथा वगैरेंवरून पाहता एकदा सबंध चित्रळ खोरें काफिरांनीं व्यापलें होतें. आतापिहि कांहीं काफीर जाती (उदा॰ कलाशा) त्या ठिकाणीं राहतात. काफिर पोटभाषांवरूनहि हेंच दिसतें. पूर्वी एकदा काफिरिस्तान, चित्रळ आणि गिलगिट हा सबंध प्रदेश एकाच जातीच्या लोकांनीं व्यापलेला असून पुढें खो लोकांच्या धाडीमुळें त्यांचे दोन वर्ग पडले असा साहजिक तर्क होतो.

सातव्या शतकात खरोष्ट्र शब्दाचा लोप झाला असावा आणि त्या प्रदेशास आणि तेथील लोकांस "होऊ" हें नाव त्या वेळेस मिळालें असावें. या सुमारास बौद्ध संप्रदायानें व हिंदु संस्कृतीनें परिवेष्टिलेलें यूएचीं राष्ट्र दुर्बल होऊन हा प्रदेश पुन्हा चीनच्या ताब्यात गेला आणि पुन्हा चिनी नावें सुरू झालीं.

"होऊ" या शब्दाखालीं चीनच्या सरहद्दीवरील अनेक जातींचा समावेश होई. अरल समुद्र, पामीर, पीत नदी, सैबीरिया इत्यादि प्रदेशात संचार करणाऱ्या अस्थिर टोळ्यांस 'होऊ' हें नाव मिळालें होऊमध्यें हिंदुस्थानांतील लोकांसहि चिनी लेखकांनीं अमा धरलें नाहीं याचें कारण म्हटलें म्हणजे हिंदुस्थान हा देश बुद्धधर्मी आहे हें होय. होऊ व हिंदू याच्या चालीरीती जरी कांहीं बाबतींत चिनी लोकांस एक दिसल्या तरी होऊ व हिंदू यातील भेद ते विसरले नाहींत. होऊ लोक गुडघे टेंकीत त्यामुळें "होऊ पद्धतीनें" असें चिनी लोक म्हणत. त्याविषयीं इत्सिंग म्हणतो कीं, 'होऊ पद्धति' असें आपण उगाच म्हणतों, का कीं हिंदु देखील गुडघे टेंकतात. [सि. ले ही इं अँ. १९०९]

बिडुल्फ (ट्राइब्स ऑफ दि हिंदुकुश, पान ७३) म्हणतो कीं, खो लोकांच्या ठिकाणीं त्यांच्या दरद आप्तांहून भिन्न अशीं कांहीं शारीरिक वैशिष्ट्ये आहेत. स्वरूपावरून त्यांना इरदाप्रमाणेंच उच्च दर्जाचे आर्य म्हणता येईल पण ते ज्यास्त सुंदर, उमंट चेहेऱ्याचे, चांगल्या ठेवणींचे आणि मोठाले सुरेख डोळे असलेले असे दिसतात; इतके कीं यूरोपात सुद्धा सौंदर्यामध्यें त्यांचा उच्च दर्जा लागेल. लांब केसाविषयीं त्यांची प्रसिद्धि आहे व त्याबद्दल त्यांना अभिमानहि वाटतो. उलट त्यांच्या काफिर शेजाऱ्यांना ते 'टकले' म्हणून संबोधितात. कारण त्यांचे केस आखूड असतात. प्राचीन काळीं काबूल, पेशावर आणि बदकशान येथील गुलामांच्या बाजारात खो स्त्रियांच्या सौंदर्यामुळें त्यांना अतोनात मागणी असे.

पुरुष टोपी घालून तिच्या भोंवती बारीकसा फेटा गुंडाळतात. अंगात सदरा, पायात अगदीं सैल विजार व खालीं रंगीत पायमोजे आणि मऊ कातड्याचे बूट घालतात. बायका डोक्याला पांढरी रेशमी कलावतूची टोपी, अंगात गुडघ्यापर्यंत पोहोंचणारा सैल खमीस आणि पायात रुंद विजार असा पेहेराव करतात. प्रवासाच्या वेळीं पुरुषाप्रमाणें त्या पायमोजे व बूट घालतात (बिडुल्फ पान ७५, ओब्रायन— ग्रामर अँन्ड व्होक्याबुलरी ऑफ दि खोवार डायलेक्ट पान ६) यांच्यात तरुण बायका व मुली शिंगाच्या कोळशाच्या पुडीनें आपलीं तोंडें काळीं करतात. त्यापासून उन्हाचा त्रास होत नाहीं व कातडेहि मऊ पडतें असा त्याचा समज आहे वागणुकीमध्यें शिष्टाचारावर फार भर देण्यात येतो. भेटीच्या वेळीं स्नेही एकमेकांना आलिंगन देतात. वरिष्ठ मनुष्य भेटण्यास कनिष्ठ मनुष्य खालीं उतरून त्याच्या हाताचें चुंबन घेतो (बिडुल्फ पान ७५, ओब्रायन पान ८). चित्रळ नावाच्या ग्रंथांत (लंडन १८९८) रॉबर्टसननें खो लोकांचें चांगलें वर्णन केलें आहे विषयासक्ति, खून, भयंकर निष्ठुरपणा, विश्वासघात, भयंकर मृत्यु हीं मानसिक पापें यास शिवत नाहींत. याच्याहून ज्यास्त साधे, सभ्य व आनंददायी लोक दुसरे कोणीहि सापडणार नाहींत. प्रत्येकजण इतका सुखी दिसतो, लहान मुलें इतकीं गोजिरवाणीं असतात, व सर्वत्र नैसर्गिक शालीनता इतकी पहावयास मिळते कीं, जर अन्नान्नदशा झालेले गुलाम हे फळावर रहात असलेले किंवा उपाशी मरत असलेले कोठ कोठें दिसतात ते दिसत

नसते,तर एखाद्या अनोळखी प्रवाशाला आपण एका हर्षोत्फुल्ल स्वप्नसृष्टींत आहों अशी कल्पना झाली असती. या लोकांचा पोलो हा राष्ट्रीय खेळ असून त्याच्यात यांचें प्राविण्य दिसून येतें. गिलजिट येथील पोलोहून हा थोडा निराळा आहे. प्रत्येक गांवीं अनाली नांवाचें पोलोक्रीडांगण असतें. घोड्यावर बसून पोपटासारख्या पक्ष्यांवर गोळ्या झाडण हाहि एक याचा आवडता खेळ आहे. गाणें व नाचणें हींहि करमणुकीच्या प्रकारांत येतात. सण, वाढदिवस, लग्न किंवा अशाच एखाद्या समारंभाच्या वेळीं नाच होतो. गाणें तर नेहमीं पोलो खेळण्याच्या वेळीं चालूंच असतें.

पूर्वीच्या काळीं या देशाचा धर्म बौद्ध असे. चित्रळच्या उत्तरेस वीस मैलावर खडकांत एक बौद्ध मूर्ति सापडली आहे. तीवरील संस्कृत किंवा पाली लेख इ. स तिसऱ्या शतकांतील असावा. हल्लीं लोक हे सुनी पंथाचे मुसुलमान आहेत. पण उत्तरखोऱ्यातील लोक उत्तर गिलजिटातल्या-प्रमाणें मौलवी पंथाचे आहेत. इस्लामी धर्माचा प्रवेश येथें चवदाव्या शतकाच्या सुमारास झाला, व हल्लींचा मुसुलमान वंश १६ व्या शतकांत खोरासानकडून इकडे आला. हे लोक सात दिवस वृद्धि पाळतात. कांहीं उच्च चित्रळ जातींतून प्रत्येक तान्ह्या मुलाला जातींतील प्रत्येक स्त्रीनें स्तनपान करविलें पाहिजे अशी चाल आहे. त्यामुळें जातींत एकी होण्याकडे चांगली प्रवृत्ति होते. लग्नसमारंभ शेजा-रच्या जातींतल्याप्रमाणेंच उरकण्यांत येतात. पण खालील कांहीं प्रकार चित्रळमध्यें नवीन आढळतात. मुल्लानें विवाह मंत्र म्हटल्यावर सासू जावयाच्या हातीं मुलीला देऊन त्याच्यापासून कांहीं पारितोषिक मिळविते. नंतर नवरा बायकोला घेऊन घरीं जावयास निघतो. हिंदुकुशाच्या उत्त-रेस नवऱ्यामुलाला नवरीच्या घरीं आणण्यांत येतें. बहु-पत्नीत्वाची चाल याच्यांत आहे. व नियोगपद्धति रूढ आहे पण सक्तीची नाहीं. गिलगिटमध्यें ती सक्तीची आहे. पातिव्रत्याकडे मुळींच लक्ष नसून पुरुष देखील आपल्या पत्नीविषयीं क्वचितच संशय घेतात. हुंझानगर या शेजा-रच्या संस्थानांत जारकर्म हा गुन्हा मानीत नसून आपली बायको पाहुण्याच्या उपयोगाकरितां द्यावयाची पूर्वापार चाल आहे. संस्थानच्या मुख्याच्या नजरेंत आपली बायको ठेवावयाची व त्यांचें तिजकडे लक्ष जात असल्यास अभिमान बाळगावयाचा ही याच्यांत जुनी वहिवाट आहे. चित्रळमध्यें यच्याच जोडीस नवऱ्याला असा अधिकार देऊन ठेविला आहे कीं आपली बायको जारकर्म करीत असतांना नवऱ्यानें पाहिल्यास एकदम दोघांनाहि त्यानें ठार करावें. जर त्यानें एकाला मारून दुसऱ्याला सोडलें तर त्याच्यावर गुन्हाचा आरोप येत असे. [ संदर्भग्रंथ लेग्नान पहावेत ]

**खोंड**—दिवा कंध. मुख्यतः बिहार—ओरिसा व मद्रास प्रांत्यांत ही जात आहे. पूर्वी बरेचसे खोंड मध्यप्रांतांत देखील असत पण उडिया भाषा चालू असलेला संबलपूर जिल्हा, पाटणा व कलाहंडी संस्थान मध्यप्रांतातून ओरिसा दर्दीत गेल्यावर ओरिसामधील खोंडाची संख्या वाढली. १९११ च्या खानेसुमारींत यांची संख्या ६,७३,३४६ भरली. पैकी ३,५५,१२० मद्रासेंत ३०२८८३ बिहार ओरिसांत व बाकींचे बंगाल, मध्यप्रांत आणि आसाम यांतून होते. यांच्या नरमेधाच्या चालीमुळें पुष्कळ संशोधकांचें याकडे लक्ष वेधिलें आहे. हे स्वतः आपल्यास कुइलोक किंवा कुइंगू म्हणवितात. यांची व्युत्पत्ति तेलगू को किंवा कु शब्दाशीं जोडतात. कु शब्द डोंगर शब्दाचा वाचक आहे. कोणी खाड ( खड्ग ) शब्दाशीं याचा संबंध जोडितात.तेथील राज्यकर्ते याच्या दंत-कथांवरून पूर्वी हे या प्रदेशांतील सत्ताधारी असावे असें दिसतें. अद्यापपर्यंत कलाहंडीच्या राजाचा अभिषेक खोंडाच्या मांडीवर बसून ति असे. खोंड जातीच्या वृद्ध-माणसाकडे राजास मांडीवर घेऊन राज्यारोहण करण्याचा अधिकार असे व केसरीसिंहदेव राजापर्यंत याचा हा अधि-कार चालू होता केसरीसिंहाच्या पूर्वीचा राजा इंग्रजांनीं पदच्युत केला व केसरीसिंहास गादीवर बसविलें पण वृद्ध खोंड त्यास मांडीवर बसवीना, कारण तो म्हणाला कीं, एक राजा जिवंत असता मी दुसऱ्यास अभिषेक करणार नाहीं. खोंडात दोन मुख्य वर्ग आहेत (१) कुरिया खोंड, हे डोंगरातले लोक आहेत व याच्यात पुष्कळ जुन्या चाली शिल्लक आहेत. (२) मैदानात रहाणाऱ्या खोंडात पोटवर्ग आहेत. हे सर्व जरी सवर्णविवाही म्हणवितात तरी तो नियम ते कडकपणें पाळतातच असें नाहीं.

याच्यात राजखोंड म्हणून एक फारच श्रेष्ठ वर्ण आहे. हे लोक मालगुजर व जमीनदार आहेत व जमीन असल्या-खेरीज राजखोंड समजला जात नाहीं. पण राजखोंडानें नीच कुलांतील किंवा एखाद्या वर्गातील मुलगी केली तर तो त्याच दर्जाचा समजला जातो व नीच वर्गांतल्या मुलीबरोबर लग्न केलें तर तो बायकोच्या जातीचा होतो. दलखोंड हे कदाचित पूर्वी शिपाई असावेत. याना आदिखोंड म्हणतात व यानाहि दर्जा उच्च आहे. यास वालुसुदिया म्हणतात. हे नेहमीं क्षौर करतात. व जातीचें पौरोहित्य याच्याकडेच असतें. यानीं कांहीं कांहीं हिंदू चालीरीती उचलल्या आहेत. हे कोंबड्याचें व रेट्यांचें मांस खात नाहींत व आपल्या देवास तुळशी वाहतात. कंध लोक हळद पेरतात. नागला लोक नागवे असतात. उतार किंवा सतनईया लोक कमी दर्जाचे आहेत. ही गोळक संतति समजली जाते. यास खोंड मुली देत नाहींत पण याच्या मुली खोंड करतात. खोंडाचे ३२ अगोत्रविवाही वर्ग आहेत पण त्याची संख्या आता वाढली आहे. एका वर्गाचे लोक एका गावात किंवा मोंवताली राहतात. याच्या मुख्य वर्गाचे आणखीहि पोटभेद झाले आहेत व त्याची निर-निराळी देवकेंहि झाली आहेत. कधीं कधीं दोन निराळ्या वर्गात एकाच देवकांची कुळ असतात. एकाच कुलांत किंवा एकाच देवकाच्या कुलांत लग्नें करीत नाहींत पण हे

प्रतिबंध पुरुषाकडून नातें असेल तेवढ्यांस ( सपिंड, समानोदकास )च फक्त लागू असतो स्त्रियाकडून नातें असेल त्यास ( बांधव ) लागू नाहीं. मामाची मुलगी व कलाहंडीत तर मावशी सुद्धा बायको करता येते. लग्नें मोठेपणींच होतात. १२ पासून २० जनावरापर्यंत वधूशुल्क देतात वधूवर आपल्या मित्राच्या खांद्यावर बसून लग्नास येतात वर वधूला आपल्या जवळ ओढतो नंतर वधूवरांवर एक वस्त्र टाकून त्यांना दोघास सुतानें सातदां गुंडाळून बांधून टाकतात. एक कोंबडा बळी देतात. जळक्या पोळीनें वधूवराचे गाल चोळतात. त्या दिवशींची रात्र ते घराच्या सोप्यात घालवितात. दुसऱ्या दिवशीं त्यास तळ्यावर नेतात तेथें वरास धनुष्यबाण देऊन गोवऱ्यावर बाण सोडवितात. प्रत्येक बाण सोडल्यावर वधू त्यानें कपाळ धुते व त्यास दात घासण्यास एक काडी देते. लग्नापूर्वी निषिद्ध असा नातेसंबंध नसलेल्या कोणत्याहि मुलानें मुलीबरोबर संग केला तर त्यास क्षमा करतात. कलाहंडी संस्थानात तर असे संग बहुतेक नेहमीचेच आहेत

मलीनें एकाबरोबर संग केला व लग्न दुसऱ्याबरोबर झालें तर तिचा पहिला मित्र तिच्या नवऱ्यास ७ ते १२ रुपये देतो. संबलपुरात मुलें व मुली शेतात काम करता करता प्रणय करून एकमेकास निवडतात. अशा लग्नास उधालिया म्हणतात. जर आईबापानीं प्रतिबंध केला तर तीं दोघे पळून जातात व नवराबायको बनून परत येतात व जातीस एक भोजन घालतात जर मुलगी कोणास दुसऱ्यास देण्याचा ठराव पूर्वीच झाला असला तर हा नवरा त्याची काहीं तरी भरपाई करतो अशा लग्नास ' पैसामोली ' म्हणतात. धाकट्या भावास त्याचें लग्न होईपर्यंत वडील भावाच्या बायकोशीं संग करता येतो. विधवाविवाह व घटस्फोटाची पूर्ण परवानगी आहे.

प्रेताना दहन करण्याची चाल हळूहळू वाढत आहे प्रेतास पुरल्याबरोबर त्यानें परलोकास निर्धन जाऊं ये म्हणून त्याच्या बरोबर कपड्यात एक पैसा बांधून देतात. १० व्या दिवशीं मृताचा प्राण परतविण्यास चौरस्त्यावर दाणे टाकून ते कोंबड्यानें खाल्ले तर मृताचा प्राण परत आला असें समजतात.

शेतकी, शिकार व युद्ध यांखेरीज इतर धंद्याची खोंड लोकास आवड नाहीं हे लोक इतर रानटी लोकाप्रमाणें मद्याचे फार शौकी असून नेहमीं कफल्लक असतात यांचीं शस्त्रें धनुष्यबाण, लांब पात्याची तरवार व एक कुऱ्हाड अशीं असतात. यांच्या देवता अनेक असून त्यास ते बळी वगैरे देतात

सर जेम्स फ्रेजरच्या गोल्डनबाऊ या पुस्तकात यांच्या नरमेधाचें जें वर्णन केलें आहे तें फार मनोरंजक आहे. रोगनिवारणार्थ व सुबत्ता रहाण्यासाठीं ' तारी पेनु ' भूदेवीला मेरीहा लोक खोंडाकडून बळी दिले जात १८८२ साली कलाहंडी संस्थानांत खोंड लोकाचें बंड झालें होतें. त्या बंडाचें कारण कलाहंडीच्या राजानें कोल्ट लोकास आणून संस्थानात वसविलें हें होय. हे लोक हुशार असल्यामुळें पुष्कळ खोंडास यानी कर्जबाजारी केलें व त्यामुळें खोंड लोकास आपली फार हीन अवस्था झाली असें वाटून एक गाठी बांधलेली दोरी त्यानी सर्व कोल्टांत पसरून बंडाची निशाणी दिली व जितके कोल्ट सापडले तितके कापून काढले बेरी नावाचा इंग्रज ऑफिसर त्याचा बंदोबस्त करण्यास पाठविला. त्याला यानीं आपली सर्व गाऱ्हाणीं सांगितलीं तीं हीं कीं, आम्ही येथील जमीनीचे मालक असता कोल्टानीं आम्हास अगदीं हीन अवस्थेस पोंचविलें व आमच्या जमीनी चोरल्या, त्या परत मिळविण्याकरिता आम्हीं प्रयत्न करीत आहों. बेरीनें यांच्यापैकी ७ पुढारी फाशी दिले व यांच्या सर्व तक्रारी ऐकून त्याची व्यवस्था करून सर्वत्र शांतता केली. खोंड भाषा यापैकीं अर्ध्याहून अधिक लोक बोलतात तिला लिपी नाहीं. ती गोंडी भाषेपेक्षा तेलगू भाषेचीं जास्त निकट संबंधी आहे.

[ संदर्भग्रंथ —कॅंपेल—थर्टीन ईयर्स सर्व्हिस अमंग दि वाईल्ड ट्राइब्स ऑफ खोंडिस्तान, डाल्टन—एथ्नॉ. ऑफ बेंगाल, हंटर—ओरिसा; थर्स्टन्, रसेल व हिरालाल; ऑप्पर्ट—ओरिजिनल इन् हॅबिटंट्स ऑफ भारतवर्ष. ].

**खोंडमाल्स**—ओरिसा प्रांतातील अंगूळ जिल्ह्याचा एक पोटभाग. क्षेत्रफळ ८०० चौ मै. लोकसंख्या ७४,२१८. खोंडमाल्सचा टापू म्हणजे डोंगरपठार असून तें १७०० फूट उंचीवर आहे या पठाराच्या मधून मधून छोट्या टेंकड्या पसरल्या आहेत. पठाराचा बराचसा भाग गर्द जंगल असून टेंकड्यांच्या पायथ्याशी असलेली जमीन तेवढीच लागवडीला योग्य आहे. खोंडमाल्स व गंजम जिल्हा यांच्यामध्यें ३००० फूट उंचीचा एक डोंगर असून त्या डोंगरावरून पडणाऱ्या महानदीचा धबधबा आहे या पोटजिल्ह्याचें मुख्य ठिकाण फुलबानी हें असून या पोटजिल्ह्यात १००२ खेडीं आहेत या भागात खोंड लोकाची पुष्कळ वस्ती आहे या लोकांची भाषा, आचारविचार, धर्म हीं सर्व स्वतंत्र आहेत या भागातील राज्यव्यवस्था प्राचीन पद्धतीप्रमाणेंच अद्यापिहि चालू आहे. कांहीं घरें मिळून एक मठ होतो व प्रत्येक मठावर या घरानीं निवडलेला एक मुख्य मठपति असतो व तो सर्व प्रकारची व्यवस्था पहातो. या सर्व भागावर खोंड लोक आपला मालकी हक्क सागतात. बौद राजाच्या सत्तेखालीं हे लोक होते, तरी पण ते जवळ जवळ स्वतंत्रच होते. यांच्यामध्यें मनुष्ययज्ञाची चाल असे; व या लोकाचे पान नावाचे गुलाम आसपासच्या भागातून बळी देण्याकरिता मनुष्य धरून आणीत. ही दुष्ट चाल मोडून टाकण्याकरता इंग्रजसरकारला फार प्रयास पडले. खोंड लोक हे ब्रिटिश सरकारचे रयत असून ते कोणत्याहि प्रकारचा कर देत नाहीत. तारुपेनु उर्फ पर्वतदेवता व तारूपेनु उर्फ भूदेवता असे यांचे दोन मुख्य देव आहेत.

याच्यात बालविवाह व प्रौढविवाह हे दोन्ही प्रकार रूढ आहेत.

**गोंडमीर**—( १४७५-१५३५ ) एक फारसी इतिहासकार. याचा हिरात येथें जन्म झाला तो अमीर खावंदशाह ( मिर्खोंद ), याचा मुलगा असून " खुलासत्-उल अखबार" ( १४९८ ) व " हबीब-उस्सियर " इत्यादि ग्रंथांचा कर्ता होता इ. स. १५२६-२७ साली हिरात सोडणें भाग पडल्यामुळें तो मौलाना शिहाबुद्दीन, आणि मिर्झा इब्राहिम वानूनी याच्यासह हिंदुस्थानात आला १५२८ साली हा आग्रा येथें येऊन पोहोंचला व बाबरच्या बरोबर मदूवरील मोहिमेवर गेला असताना मरण पावला ( बील, माबेल डफ )

**खोत**—कुलाबा व रत्नागिरि जिल्ह्यांत हे खोत लोक बरेच आहेत. यांचें काम खेड्यातील शेतकऱ्यापासून सारा गोळा करून तो सरकारात एका ठराविक रकमेंन भरावयाचा खोतीचा हक्क वंशपरंपरा चालत आलेला आहे खोताला देशावरील देशमुख देशपांड्याप्रमाणें कांहीं हक्क असतात, त्यास खोतवेठ म्हणतात मोबदला न देता कुळयाकडून चाकरी करून घेणें, धान्य वगैरे माल घेणें, शेतास वरवंच्या घालणें, गवत वेनणें, पेंढा तयार करणें, घराच्या छपराची शाकारणी करणें, पाटी, सूप, हवसा, शिंपली, रवळी, वाडवण, झातरी, झातर, तट्टा, नागरजोत, लाकूडफाटी, मानाचा नारळ, बावभाडे, अर्धोलीतिर्धोली वगैरे हक्क खोताचे असतात. कांहीं ठिकाणीं शेतकऱ्यासहि खोत म्हणतात पण सर्वसाधारण खोत म्हणजे जमीनदार मालगुजार या सारखा एक अधिकारी होय हा अधिकारी सरकारहि नेमीत असे कमी दरानें खोतानें लागवडीस दिलेल्या वैराण जमिनीस खोतसरावा म्हणतात. खोत हा कुळ्यांकडून जो सारा घेतो त्यास खोतधारा असें नाव आहे. खोताच्या खाजगी साठीं जी पट्टी (कर) कुळें देतात तीस खोतपट्टी म्हणतात. खोतापासून ठराविक साऱ्यानें कांहीं घेतलेल्या जमिनीस खोतसज्जा असें नाव आहे. याच्या उलट रकमी जमीन असते व तिचा धारा प्रत्यक्ष सरकारात भरावा लागतो. शेतकऱ्याना बीं बियाण्याकरिता खोत आगाऊ जें धान्य देतो त्यास वाढीदिढी म्हणतात.

इ. स. १८८० त ब्रिटिश सरकारनें खोती सेटलमेंट ॲक्ट नावाचा एक कायदा पास केला व खोताचे सरकारशीं व कुळांशीं असलेले संबंध निश्चित केले व खोतानें सरकारास वसूल किती द्यावयाचा व कुळांपासून किती घ्यावयाचा हें ठरवून टाकलें. या कायद्यात वेळोवेळीं दुरुस्त्या करण्यात आल्या. अगदीं अलीकडे म्हणजे १९१३ साली या कायद्यात कांहीं दुरुस्त्या झाल्या आहेत. जीं कुळें अनेक दिवस म्हणजे १८४५-४६ सालापूर्वीपासून एखादी जमीन वंशपरंपरा वहात होती त्यांना कायमचीं कुळें म्हणून ठरविण्यात आलें व त्याचा ती जमीन वंशपरंपरा वहाण्याचा हक्क मान्य करण्यांत आला यांखेरीज जीं धारेकरी कुळें असत त्याजजवळून खोतानें साऱ्यावर काय रक्कम घ्यावी हेंहि ठरविण्यात आलें. जेव्हा एखाद्या गावीं एकापेक्षा अधिक खोत असत तेव्हा त्यापैकीं एक खोत सर्व वसूल देण्याबद्दल सरकारास कबुलायत लिहून देई व त्यास कबुलायतदार खोत म्हणत तो इतर खोताजवळून व धारेकऱ्याजवळून सारा वसूल करून सरकारात भरीत असे. अलीकडे ही कबुलायत काढून टाकण्यात आली आहे व जेथें अनेक खोत असतील तेथें सरकार लोकांच्या संमतीनें अगर संमति मिळाल्यास आपल्या अधिकारानें एक वहिवाटदार खोत नेमून त्या मार्फत सर्व सारा वसूल करतो. जेव्हा एकाद्या गावाचे घडेवाटप झालेलें असतें तेव्हा प्रत्येक खोतानें आपल्या धड्याचा सारा भरावयाचा असतो खोत कुळाकडून आरंभीं पिकाची निमपट धान्यातच वसूल करीत असत. याखेरीज फसकी, वेठ, वगैरे खोताचे हक्क असत परंतु आता सरकारनें हे सर्व हक्क काढून घेतले आहेत व कोणत्याहि खेड्यातील लोकांनीं सरकारकडे अर्ज केल्यास प्रांत किंवा सरकारनें नेमलेला कोणी अधिकारी त्या अर्जाची चौकशी करून धान्याच्या ऐवजीं नक्त पैशात कुळाकडून घ्यावयाची रक्कम ठरवून देतो ही नक्त रक्कम ठरवितांना पिकाच्या अर्धेलीची सुमारें बारावर्षांची जी सरासरी किंमत येईल ती रक्कम सारा म्हणून ठरवावयाची असा नियम आहे व सरासरीनें ही किंमत भातजमीनीच्या बाबतींत साऱ्याच्या तिप्पट व वरकस जमीनीच्या बाबतींत साऱ्याच्या दुप्पट समजावी असें नमूद करून ठेवलें आहे. जेव्हा जेव्हा जमाबंदीची फेरतपासणी होईल तेव्हा तेव्हा या साऱ्यातहि कमीजास्त वाढघट होईल असाहि नियम आहे.

जेव्हा एखाद्या गावचा खोत स्वतः वहिवाट करून सारा भरणार नाहीं तेव्हा सरकार तो गाव जप्त करून त्यावर तलाठी नेमतें व सारा व तलाठ्याचा पगार वगैरे खर्च वजा करून वसुलातून जी रक्कम शिल्लक राहील ती खोतास देतें खोतानें आपल्या गावचे जमाबंदीचे हिशेब वेळचेवेळीं व बरोबर ठेवून ते सरकारचे अधिकारी तपासावयास येतील तेव्हा दाखवयाचे असतात व कुळाना वसुलाच्या पावत्या द्यावयाच्या असतात. खोतीचा हक्क हा वंशपरंपरा व खरेदी विक्री अगर गहाण टाकता येण्यासारखा समजला जातो. मध्यंतरी खोत हे जमीनीचे मालक असून सर्व कुळें उपरी असून त्यांचा जमीनीवर कांहीं हक्क नाहीं असें खोताकडून पुढें मांडण्यात आलें होतें परंतु खोत हे केवळ सारा वसूल करून सरकारात भरणारे अधिकारी असून या कामाकरिता म्हणूनच त्यांना विशिष्ट हक्क व खोतफायदा मिळतो असें ठरलें व त्यांना कायमच्या कुळास काढून टाकावयाचा हक्क नाहीं असेंहि ठरलें कुळाचा जमीनवहिवाट करण्याचा हक्क वंशपरंपरा मान्य करण्यात आला पण त्यास खोताच्या परवानगीशिवाय गहाण, विक्री वगैरे करतां येत नाहीं

**खोतान**—पूर्वतुर्कस्तानमधील एक शहर. हें खोतान दर्या नदीवर क्युनलन पर्वताच्या उत्तर पायथा व टक्ल-माकन वाळवंटाची एक बाजू यांमध्यें वसलें आहे. लोकसंख्या सुमारें ५००० आहे. शहरांतील रस्ते नागमोडीचे, अरुंद व गलिच्छ असे आहेत. या ठिकाणीं जवळ जवळ सहा विद्यालयें (मदसे), बौध्दांच्या मशीदी व तितकीच मुसुलमान साधूंची थडगीं आहेत. खोतान हें कित्येक शतकापासून मगेड (जेड) नावाच्या मौल्यवान रत्नाविषयीं फार प्रसिद्ध असे या रत्नाच्या सुंदर पेटया, सुबक पेले, व त्याचप्रमाणें बागच्या करीत असत. अजून हा दगड चीनमध्यें पाठविण्यात येतो.

खोतान याला संस्कृतात कुस्तान व चिनी भाषेंत यूथान अथवा खोओतान अशीं नांवें आहेत. खिस्तपूर्व दुसऱ्या शतकांतील चिनी इतिहासात याचा उल्लेख आला आहे. खिस्तानंतर ७३ व्या वर्षी हें चीननें जिंकलें व तेव्हांपासून हें चिनी साम्राज्याचें मांडलिक आहे

खोतानचा प्राचीन उल्लेख बौद्धवाङ्मयात येतो. अशोकाच्या राज्याचा विस्तार या प्रांतापर्यंत झाला होता. खोतानी दंतकथेवरून अशोक हा गौतमबुद्धाच्या निर्वाणानंतर २५० वर्षांनीं झाला. खोतनी दंतकथा बऱ्याच संशयास्पद आहेत. तेथील राजवंशाबद्दल पुढील दंतकथा सांगतात:— अशोकानें आपला मुलगा कुनाल याला त्याच्या कांहीं वाईट कृत्यांत मदत केल्याच्या आरोपावरून तक्षशिला येथील कांहीं सरदार दरकदाराना हिमालयाच्या पलीकडील खोतान प्रांतात हद्दपार केलें या लोकांनीं आपल्यापैकीं एका पुरुषास राजा बनविलें; त्यानें पुष्कळ वर्षे राज्य केलें, पुढें त्याला चीनमधील एका अशाच हद्दपार केलेल्या राजपुत्रानें हाकलून देऊन आपण राज्य बळकाविलें दुसरी अशी दंतकथा आहे कीं, खोतानच्या राजवंशाचा मूळ संस्थापक स्वतः कुनालच होता. त्यालाच तक्षशिलेहून अशोकानें हद्दपार केलें होतें. परंतु या कथेला फारसा ऐतिहासिक आधार नाहीं. एवढें मात्र खरें कीं, खोतान येथील संस्कृतीला मूळ आधार हिंदुस्थान व चीन येथील संस्कृतीचा होता. पुढें बौद्धधर्मीयाचा जेव्हां हिंदुस्थानात छळ होऊं लागला तेव्हांच्या (७४) कांहीं दंतकथा खोतानमध्यें प्रसिद्ध आहेत. अशोकाच्या वेळीं व पूर्वीहि खोतान व तिबेट यांचा हिंदुस्थानाशीं निकटचा संबंध होता. मध्यंतरीं (स. ७३) चीनचा प्रख्यात सेनापति पनचौ यानें जो दिग्विजय करण्यास प्रारंभ केला, त्यात प्रथमच खोतानचा राजा त्याला शरण येऊन चिनी बादशहाचा मांडलिक बनला होता. त्यानंतर कनिष्कानें सन९०च्या सुमारास काशगर व यारकंद यांच्या बरोबरच खोतानप्रांत जिंकून घेतला. ह्युएनत्संग हा हिंदुस्थानातून आपल्या देशीं परत जाताना पामीर पर्वताच्या घाटांतून खोतानमध्यें गेला होता. खिस्तानंतर ४०० वर्षांच्या दरम्यानच्या काळात ही फार महत्वाची व भरभराटीची जागा होती. नंतर इ स. ४०० च्या सुमारास या ठिकाणीं बौद्धधर्म चांगलाच भरभराटला होता. ५ व्या शतकापासून बौद्धधर्मास उतरती कळा लागली. ८ व्या शतकात अरबानीं खोतान जिंकलें व तेथें इस्लाम धर्माचा प्रसार झाला १२२० त मंगोल लोकानीं त्याचा विध्वंस केला. १२७४ त मार्कोपोलो हा या शहरातून गेला होता त्याच्या लिहिण्यावरून येथील व्यापारधंदे त्यावेळीं फार भरभराटले होते. लोकांत शिपाईगिरी मुळींच नव्हती. इ. स १८६४-७१ च्या चीन विरुद्ध झालेल्या डुंगन बंडानें या शहराची फार खराबी झाली. [ बायना, स्टोरी ऑफ नेशन्स सेरीज, रॉकहिल—लाइफ ऑफ बुद्ध; शरच्चंद्रदास-तिबेटियन हिस्टरी, स्टीन-एन्शन्ट खोतान ].

**खोनोमा**—पूर्वबंगाल व आसामधील ' नागाटेकडी ' जिल्ह्यातील एक संपन्न खेडें. १८७९ मध्यें डॅमेंट नांवाच्या एका इंग्रज अधिकाऱ्याचा या खेड्यातील लोकानीं खून केला. तेव्हा इंग्रजानीं या खेड्यावर हल्ला करून हें खेडें आपल्या ताब्यात घेतलें पण या खेड्यातील लोक जाप्वो नावाच्या एका टेकडीवरील आश्रय च्या जागीं पळून गेले. १८८० च्या जानेवारीमध्यें या नागा जातीच्या लोकानीं काचारमधील बालधान मळ्यावर अचानक छापा घालून तेथील ब्लिथ नावाच्या अधिकाऱ्याला व १६ यूरोपीयन लोकाना ठार केलें. पण पुढें इंग्रजाच्या पुढें त्याचा टिकाव न लागल्यामुळें त्यांना शरण यावें लागलें

**खोम्माण**—चितोडच्या गुहिलोत राजघराण्यात तीन खोम्माण राजे होऊन गेले. तिसरा खोम्माण हा महायकानंतर गादीवर बसला होता. प्राचीन शिलालेखात खोम्माण याच्या पराक्रमाची विशेष वर्णनें आढळतात. आटपुरा लेखात आणखी दोन खोम्माणाचा उल्लेख येतो. त्यापैकीं एक कालभोजाचा व दुसरा सिंहराजाचा मुलगा असावा. यातील कालभोजपुत्र खोमाणानें फार पराक्रम केला, त्यानें इ. स. ८२५च्या सुमारास अरबाशीं घनघोर संग्राम करून त्यांना हाकलून लाविलें या कृत्यावर खोम्माणरासा नावाचें एक काव्य प्रसिद्ध आहे. त्याच्या आधारानें टॉडनें या युद्धात चितोडच्या बाजूनें कोणकोणत्या देशाचे राजे लढले त्याची यादी दिली आहे व मुसुलमानाच्या निरनिराळ्या स्वाऱ्यांचाहि अहवाल दिला आहे. असल्या प्रकारची सर्व रजपुतांची एकी पुढें पृथ्वीराजाच्या वेळीं झाली होती. [ वैद्य मध्ययुगीन भारत भा २ ].

**खोरेमाबाद**—खोरेमाबाद हें इराणात लुरिस्तान प्रांताचें राजधानीचें शहर आहे. तें उत्तर अ ३३ ° ३२ व पू. रे. ४८ ° १५' यांचे दरम्यान ४२५० फूट उंचीवर आहे. लोकसंख्या सुमारें ६००० आहे. हें शहर खोरेमाबाद नदीच्या उजव्या तीरावर इस्पहानपासून १३८ मैलावर व कर्मनशहाचे आग्नेयीस ११० मैलांवर आहे शहर व

नदी याच्या दरम्यान एका अलग असलेल्या टेंकडीवर दिझ इ-सिया नावाचा एक पडका किल्ला आहे किल्याच्या पायथ्याशीं गव्हर्नरचें निवासस्थान व विस्तृत सभामंदिरें व बगीचे आहेत नदीच्या डाव्या किनाऱ्यावर शहराच्या समोर जुन्या साम्हा शहराचे पडके भाग आहेत. येथें ६० फूट उंचीचा एक मनोरा, एका मशिदीचे भाग, पाण्याचा नळ, इतर इमारतींच्या भिंती व एक चौकोनी एकाच दगडाचा खांब आहे हा खांब ९½ फूट उंच, ३ फूट लांब व २⅓ फूट रुंद असून, सेलजुक राजा मलिकशहाचा नातू महमूद याच्या स्मरणार्थ उभारलेला आहे याच्यावरील खोदीव लेख काहींसा अस्पष्ट आहे पश्चिमेस असलेल्या शापूरखास्त या शहराकडे जाणारा रस्ता व साम्हा याचेमधील नदीवरील पुलाच्या दहा कमानी अजून शिल्लक आहेत

**खोलापूर**—वऱ्हाड जिल्हा उमरावती तालुका उमरावती लो स (१९११) ५५०१ उमरावतीच्या पश्चिमेस १८ मैलावर हें गाव आहे येथें दवाखाना, हिंदुस्थानी आणि मराठी शाळा, मुलींची शाळा हीं आहेत येथील रेशमी कापड विणकरी बहुतेक नाहींसे झाले आहेत लुगडीं व खादी विणण्याचे धंदसुद्धा मागासत चालले आहेत येथें एक सरकी काढण्याचा कारखाना असून दर बुधवारीं आणि शनिवारीं बाजार भरतो वार्षिक जत्रा आगष्ट महिन्यांत असते पूर्वी या गावाला बरेंच महत्व होतें इ स १८०९ साली एलिचपूरचा सुभेदार विठ्ठल भागदेव यानें या गावावर एक लाख रुपयाचा कर बसविला व गाव लुटला त्यावेळेपासून या गावाचें वैभव नाहींसें झालें.

**खोलेश्वर**—यादवकालीं बऱ्याच ब्राह्मणांनीं तरवार उचलली होती. त्यांपैकीं खोलेश्वर ही एक प्रख्यात व्यक्ती होती हा सिंघण यादवाचा सेनापति असून मुद्गलगोत्री ब्राह्मण होता यानें गुजराथेवर पुष्कळदा स्वाऱ्या करून तेथील वाघेल राजसत्ताधाऱ्याचा पराभव केला व वराचसा प्रांत सिंघणाच्या ताब्यांत आणला याचा काल १२०० —१२५० येतो यानें संघकदेश (हल्लींच्या पूर्व खानदेशचा अजिंठ्याच्या डोंगरालगतचा भाग) जिंकून तेथें आपली वस्ती केली होती पू खानदेशांतील शेंदुर्णी या गावीं या खोलेश्वरानें एक महादेवाचें देऊळ बांधिलें आहे,व देवाचें नावहि खोलेश्वर असून तेथें खोलेश्वराच्या नांवाचा एक शिलालेख आहे या खोलेश्वराचा एक पुत्र राम म्हणून होता व दुसरा विच्चण (विजगल ?) म्हणून होता हे दोघेहि यादवाचे सेनापती असून राम यानें गुजराथेवर स्वाऱ्या केल्या होत्या व एका स्वारींत गुजराथचा वाघेलराजा वीरधवल याचा मुलगा वीसलदेव याच्या बरोबरच्या लढाईत राम मरण पावला विच्चणानें दक्षिण महाराष्ट्र व कोकण प्रांत जिंकिले व तो त्या देशाचा राजप्रतिनिधीहि होता याप्रमाणें खोलेश्वराचें घराणें क्षात्रकर्मांत प्रसिद्ध होतें [मराठी रियासत पूर्वार्ध विविध ज्ञानविस्तार, जुलै १८९६]

**खोल्म**—खोल्म हें पोलंडमध्यें एक शहर आहे येथील लोकसंख्या १८९७मध्यें १२२३६ होती हें फार जुनें शहर आहे

**खोवई**—आसाममधील नदी ही हिल टिप्पेरा संस्थानांत उगम पावून वायव्य दिशेनें सिल्हेट जिल्ह्याच्या हबीगंज पोटविभागांतून वहात जाऊन हबीगंजजवळ बराक नदीला मिळते या नदीच्या काठीं मुचिकांडी, हबीगंज इत्यादि महत्वाची व्यापारी शहरें आहेत या नदींतून पावसाळ्यांत ४ टन वजनाचीं जहाजें बाल्लानझारपर्यंत जातात व इतर ऋतूंतहि या नदींतून दोन टनी जहाजें जाऊं शकतात या नदीची एकंदर लांबी ८४ मैल आहे

**ख्रिश्चिआना**—ख्रिश्चिआना हा नॉर्वेचा राजधानी आहे येथील लोकसंख्या सुमारें २,६०,००० आहे ही आग्नेय किनाऱ्यावर असून अकार नदीच्या पश्चिम तिरावर आहे या शहराची ठेवण फार सुंदर आहे हें शहर बहुतेक अलीकडच वसलेलें आहे, कारण एकोणिसाव्या शतकाच्या दुसऱ्या अर्धांतच हें शहर वाढलें हें राज्यकारभाराचें, पार्लमेंटचें, मुख्य वरिष्ठ कोर्टाचें व विश्वविद्यालयाचें ठिकाण आहे येथील बंदराचे दोन भाग आहेत व या दोन भागाच्या दरम्यान उंचवटयावर अकरशस नावाचा किल्ला आहे त्याचा तुरुंग व दारूच्या कोठारासाठीं उपयोग करतात १७१९ पर्यंत त्याचा राजवाड्यासाठीं उपयोग होत होता येथील विश्वविद्यालयास "फ्रिडेरिसिआना युनिव्हर्सिटी" असें म्हणतात हें विश्वविद्यालय डेन्मार्कचा राजा ६ वा फ्रेडरिक यानें १८११ सालीं स्थापिलें या विश्वविद्यालयात धर्मशास्त्र, कायदा, वैद्यक, इतिहास, भाषाशास्त्र, व गणित, सृष्टिशास्त्रें ह्या पाच शाखा आहेत

ख्रिश्चिआना येथें दोन रेल्वे स्टेशनें आहेत हें शहर व्यापाराचें मुख्य ठिकाण असून प्रवाशांचें आवडतें ठिकाण आहे हल, लंडन, न्यूकॅसल, हम्बर्ग, आमस्टरडॅम वगैरे ठिकाणाहून प्रवाशांच्या बोटी येथें येतात येथें कापसाचा व लोंकरीचा माल, कागद, साबण, तेल, विटा, आगपेट्या, खिळे, तंबाखू, कमावलेलें कातडें, कांच, बंदुकीची दारू, रसायनें वगैरे तयार करण्याचे कारखाने आहेत येथील आयात निर्गतीपेक्षा फार जास्त आहे धान्य, कणीक, कापसाचा व लोंकरीचा माल, कॉफी, लोखंड, वगैरे माल मुख्यत या देशात येतो इमारतीचें लांकूड, खिळे कागद, लोणी, आगपेट्या वगैरे माल परदेशी जातो येथील बंदर हिंवाळ्याचे ३।४ महिने बर्फाच्छादित असतें, परंतु त्याकरितां हिमच्छेदकाचा उपयोग करतात

हल्लीं ज्याला आस्लो असें म्हणतात, तेथें अप्सलो नावाचें जुनें शहर होतें तें १०४८ त हॅराल्डनें स्थापिलें १४ व्या शतकाच्या शेवटीं हें नॉर्वेचें मुख्य शहर झालें या शहरांतील पुष्कळ घरें लाकडी बांधणीचीं होतीं म्हणून येथें पुष्कळ अग्निप्रलय झाले अशा एका प्रलयानंतर सें ६ व्या ख्रिश्चियन

राजानें पुन्हा वसवून त्याला ख्रिश्चिआना नांव दिलें ( १६२४ ). आता पुन्हा ऑस्लो नाव प्रचारात आहे.

ख्रिश्चिआना.—१६२६–१६८९ ही स्वीडनची राणी व गुस्टॅव्हस आणि ब्रँडेनबर्गची मराय यांची मुलगी असून स्टॉकहोम शहरीं १६२६ त जन्मला. ती सहा वर्षांची असतांना तिचा बाप वारला. तिचें शिक्षण मुख्यतः जोहॅन्स मॅथाई या विद्वानाजवळ शक्य तितकें मर्दानी पद्धतीनें झालें. व ऑक्सेंस्टर्जेनो यानें तिला राजकारणाची माहिती करून दिली. १८६४ मध्यें वयाच्या अठराव्या वर्षींच तिनें राजदंड हातीं घेतला आणि कौन्सिलबोर्डाच्या अध्यक्षस्थानीं बसूं लागल्यापासूनच तिनें मोठमोठ्या कसलेल्या मंत्र्यांसुद्धा आपल्या तीव्र बुद्धिसामर्थ्यानें दिपवून टाकलें. परंतु दुर्दैवानें या तिच्या अंगच्या तेजस्वी व भारदस्त गुणावर तिच्यामधील गर्व व अहंकार या दोन दोषामुळें सारवण पडलें. आपल्या घमेंडींत ती लोकमताला अगदीं तुच्छ लखूं लागली व प्रजेच्या गरजांकडे लक्ष न पुरविता वाटेल तशी पैशाची उधळपट्टी तिनें सुरू केली. तिनें मुत्सद्दी म्हणून प्रसिद्ध असलेल्या आपल्या मुख्य प्रधानाला हलक्या दर्जानें वागविलें, पण लोकांत त्याचें वजन व कीर्ति कमी होईना, तेव्हां मरसर बुद्धीनें तो जगातून केव्हां नाहींसा होईल अशी ती वाट पाहूं लागली. यावेळीं त्रिशद्वार्षिक युद्ध चालू असल्यामुळें त्याला कामावरून दूर करणें तिला शक्य नव्हतें. म्हणून तें लवकर संपावें असा प्रयत्न तिनें चालविला, आणि तहाच्या वाटाघाटींत प्रधानानें योजलेल्या सर्व्या फायदेशीर कारस्थानात नसती ढवळाढवळ करून तिनें देशाचा तोटा मात्र करून घेतला. मंत्रीमंडळाच्या सभेंतहि ती प्रधानावरोबर हमरीतुमरीवर येत असे. प्रधानाचा मुलगा तिच्या पक्षाचा होता. तिनें बापलेकांत भांडण लावून दिलें होतें. मुलावर तिची प्यार मर्जी असे. ख्रिश्चिआनानें सुधारणाहि पुष्कळ केल्या. शहरांना नवे नवे हक्क दिले, व्यापार व उद्योगधंदे यांना उत्तेजन दिलें, विशेषतः डेल्सप्रांतात खाणींच्या कारखान्यांची विशेष वाढ केली, सर्व राज्यांत शाळा स्थापन करण्याबद्दल फर्मान काढलें, परदेशीय विद्वानांना स्वीडनमध्यें रहाण्यास उत्तेजन दिलें व स्वदेशांत शास्त्रें व वाङ्मय याच्या अभिवृद्ध्यर्थ पूर्वीच्या सर्व कारकीर्दीपेक्षा जास्त सढळ हातानें साहाय्य केलें. प्रॉटेस्टंट धर्माचा ती द्वेष करी. तिनें स्पेन देशाशीं मित्रत्वाचा तह केला होता. ख्रिश्चिआना अद्यापि अविवाहितच होती, तेव्हां तिच्यामागून राज्याला फायदेशीर वारस असावा अशा हेतूनें सेनेटनें व लोकसभेनें तिला लग्न करून घेण्याचा आग्रह चालविला व तिच्या योग्य असा चार्लस गुस्टेव्हस हा तिचा चुलतभाऊ वर म्हणून सुचविला. याप्रमाणें सर्व मंत्र्यांनीं वरचेवर आग्रह चालविला. पण ख्रिश्चिनाला लग्न करून स्वतःवर पुरुषाचें वर्चस्व सुरू करून घेण्याचा उपजतच तिटकारा होता. अशा पेचांत तिनें गुस्टेव्हस याला वंशपरंपरेनें आपला वारस म्हणून जाहीर करून टाकलें व लग्नाची आपत्ति टाळली. राज्यत्याग करण्याच्या या गोष्टीचा पुन्हां नीट विचार करण्याबद्दल पुष्कळांनीं तिला सुचविलें पण तिनें आपला निश्चय बिलकुल ढळूं दिला नाहीं. पुढें दोनतीन वर्षांनीं तिच्या प्रजेचीहि खात्री पटली कीं, तिनें गादीवरून दूर होण्यामध्येंच राष्ट्राचें खरें हित आहे. व त्याप्रमाणें १६५४ त लोकसभेमध्यें तिनें राज्याचें जूं खालीं ठेवलें. तत्पूर्वी कांहीं काळ तिच्या कडक अमलामुळें व उधळपट्टीनें प्रजाजन तिच्यावर नाखुषच होत चालले होते; शिवाय तिला स्वतःलाच राज्यकारभाराच्या दगदगींचा कंटाळा येत चालला होता. विवाहाचा सीनेटनें आग्रह चालविल्यामुळेंहि तिला चीड आली होती, स्वस्थपणें काव्यशास्त्रग्रंथ वाचीत बसावे असाहि तिचा हेतु होता. आणि सर्वांत मोठें कारण हें कीं, तिच्यासारख्या बलाढ्य राणीनें आयुष्याच्या ऐन उमेदींत राज्यसंन्यासासारखें अश्रुतपूर्व कृत्य करून जगाला थक्क करून सोडणें या चमत्काराची नुसती कल्पनाहि तिच्या गर्विष्ठ मनाला अत्यंत रमणीय वाटत होती. वरील योजना मनात आल्यापासूनच ती बेफिकीरपणें वागूं लागली होती. अखेरचीं दोनचार वर्षे तिनें केवळ आपल्या परदेशीय प्रेमीजनांबरोबर मनसोक्त चैनींत व उधळपट्टींत घालविलीं शेवटीं राज्यत्याग केल्यावर कांहीं दिवस पॅरिसमध्यें व पुन्हा कांहीं दिवस स्वीडनमध्यें राहून शेवटीं ती रोम येथें कायम जाऊन राहिली व तेथेंच गरीबींत व एकांतवासात १६८९ एप्रिल १९ रोजीं मरण पावली.

ख्रिस्त येशू.—ऐतिहासिक दृष्ट्या पहातां ख्रिस्ती संप्रदायसंस्थापक जीझस याचें चरित्र फार थोडें माहीत आहे. कारण तत्कालीन ज्यू व रोमन इतिहासकारांच्या ग्रंथांत त्याच्या चरित्राला फारसें महत्व दिलेलें नाहीं. अर्वाचीन काळांत ख्रिस्ताचें विश्वसनीय चरित्र जाणण्याची इच्छा फार वाढली आहे, पण ती पुरी होण्याच्या मार्गांत दोन अडचणी आहेत. पहिली अडचण पुराणमतवादी लोकांच्या मनातील पूर्वग्रह आणि दुसरी विश्वसनीय साधनांचा अभाव. ख्रिस्ताच्या चरित्राची माहिती मिळण्याचीं साधनें ख्रिस्ताच्या शिष्यांपैकीं चौघांनीं लिहिलेलीं 'गॉस्पेल' नावाचीं चार पुस्तकें आहेत. हे चार शिष्य अनुक्रमें मॅथ्यू, मार्क, ल्यूक व जॉन हे होत. या पुस्तकांच्या हल्लीं उपलब्ध असलेल्या स्वरुपावरून पहातां त्यांपैकीं एकांतहि प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेल्या माणसानें लिहिलेली अशी एकहि गोष्ट नाहीं. सेंट जॉनचें गॉस्पेल हें लेखकानें स्वतः पाहून लिहिलेलें आहे असा सामान्य समज आहे, पण तें अधिक अर्वाचीन असावें असें संशोधकाचें मत आहे. आणि हें गॉस्पेलहि चरित्राचें ऐतिहासिक साधन या नात्यानें अयोग्यच आहे. कारण तें कल्पित गोष्टींनीं भरलेलें आहे. शिवाय या चार गॉस्पेलांत आजपर्यंत फार फरक झाले आहेत, आणि त्यांत शिष्यांना वाटेल तशा प्रकारचा अर्थ लावून ख्रिस्ताचें चरित्र लिहिलें आहे। शिवाय त्यात ख्रिस्ताचें चरित्र संगतवार

नसून यांत मध्यें बरींच खिंडारें आहेत त्यामुळें या बायबल ग्रंथावरून आपणास निश्चयात्मक माहिती मिळूं शकत नाहीं.

च रि त्र.—येशू हा ज्यूडिया प्रांतांतील बेथ लेहेम येथें ज्यू लोकांचा राजा हेरॉड दि ग्रेट आणि रोमन बादशहा ऑगस्टस सीझर यांच्या कारकीर्दींत जन्मला त्याचा बाप जोसेफ हा सुतार होता. येशू हा आपल्या आईच्या गर्भी तिच्या कौमार्यावस्थेंतच राहिला असा समज आहे. त्याच्या आईचें नाव मेरी. ही 'व्हर्जिन मेरी' या नावानें प्रसिद्ध आहे. ज्यू लोकांचा राजा हेरॉड याला पौरस्त्य देशांतील विद्वान लोकांनीं असें भविष्य सांगितलें होतें कीं, इस्रायल लोकांचा अधिपति बेथ लेहेम येथें उत्पन्न होईल ह्या भविष्यकथनानें घाबरून जाऊन हेरॉडनें दोन वर्षांचीं व त्याहून लहान वयाचीं सर्व अर्भकें मारून टाकविलीं. तथापि जीझसच्या आईबापांना या भावी आपत्तीबद्दल स्वप्नांत दृष्टांत झाला होता. व त्या सूचनेवरून तीं जीझसला घेऊन ईजिप्तमध्यें पळून गेलीं होतीं. पुढें हेरॉड राजा मरण पावल्यानंतर जीझसचे आईबाप परत येऊन गॅलिली प्रांतांतील नाझारेथ शहरीं राहिले जीझसला लहानपणांतच ज्यू लोकांचें धर्मशास्त्र शिकविण्यांत आलें होतें; आणि या ग्रंथासंबंधीं त्याचें ज्ञान व अर्थ लावण्याची हुषारी पाहून त्याचे शिक्षक थक्क होत असत. तो वयांत आल्यावर त्याला जॉन दि बॅपटिस्ट यानें बाप्तिस्मा दिला. त्यावेळीं एक कबूतर आकाशांतून खालीं उतरून जीझसच्या नजीक आलें व हा परमेश्वराचा पुत्र आहे अशी आकाशवाणी झाली! त्यानंतर जीझसनें चाळीस दिवस व चाळीस रात्रीं उपवास करून चिंतन करण्यांत घालविल्या.

जीझसनें वयाच्या तिसाव्या वर्षी धर्मप्रचारक म्हणून कामास सुरुवात केली असा समज आहे त्यानें प्रथम गॅलिली समुद्राच्या किनाऱ्यावरील कॅपरनम शहरीं उपदेशाचें कार्य आरंभिलें. नंतर तो इतर शहरांत गेला, परंतु तेथें त्याला धर्मश्रद्धा फारशी आढळून न आल्यामुळें तो गॅलिली प्रांतांतील लहान सहान गावांतहि हिंडला याप्रमाणें फिनिशिया आणि समरिया यांच्या सरहद्दीपर्यंत फिरून त्यानें धर्मोपदेशाचें कार्य केलें व त्याच वेळीं अनेकांचे अनेक रोगहि बरे केले त्यामुळें त्याच्यावर श्रद्धा बसून पुष्कळ लोक त्याचे अनुयायी बनले. ह्या खिस्ताच्या धर्मोपदेशाचा काळ एक वर्षाहून काहीं अधिक होता असें कित्येक म्हणतात, तर तो सुमारें तीन वर्षांचा होता असें इतर म्हणतात. धर्मोपदेशाच्या या कार्यामुळें ज्यू धर्मोपाध्याय वृद्ध गृहस्थ यांच्या मनांत मत्सर उत्पन्न होऊन ते त्याचा द्वेष करूं लागले. आणि अखेर त्यांनीं त्याला कैद करून त्या वेळचा ज्युडियाचा प्रोक्यूरेटर पॉंटियस, पायलेट ( इसवी सन २६–३६, ) याच्याकडे चौकशीकरितां पाठविलें यावेळीं रोमन बादशहा टायबेरिस सीझर ( इ. स.१४–३७ )राज्य करीत होता. जीझसविरुद्ध मुख्य आरोप असा होता कीं, तो स्वतःला " ज्यू लोकांचा राजा " म्हणवितो स्वतः पायलेट जीझसवर आरोप शाबीद करण्यास नाखूष होता. परंतु जीझसला आरोपी ठरवून क्रूसावर फांशी दिलाच पाहिजे अशी ज्यू लोकांनीं फार ओरड केली. तेव्हां स्वतःची लोकप्रियता नष्ट होईल अशी भीति वाटून पायलेटनें येशूला मरणाची शिक्षा सांगितली. तेव्हां जीझसला निळ्या रंगाचे कपडे घालून व त्याची फजिती करण्याकरितां त्याच्या डोक्यावर काटेरी मुकुट चढवून त्याचा अपमान करीत करीत व त्याच्या अंगावर थुंकत थुंकत शिपायांनीं व लोकांनीं मिळून त्याला वधस्थळापर्यंत नेला आणि तेथें त्याच्या अंगावरील सर्व कपडे काढून ठेऊन एका क्रूसावर त्याच्या शरीरांत खिळे ठोकून इतर दोन आरोपींबरोबर त्याचा प्राण घेण्यांत आला येशू हा " ज्यू लोकांच्या " परमेश्वराचा धावा करीत करीत मरण पावला त्याच्या शवावर दगडी थडगें बांधण्यांत आलें असें सांगतात कीं त्याला फाशीं दिलेल्या क्रॉसवर पॉंटियस पायलेटस यानें जे एन. आर जे. ( म्हणजे येशू नाझारेथचा, राजा, ज्यूंचा ) हीं अक्षरें लिहून ठेविलीं होतीं.

खि स्ता चा उ प दे श.—खिस्तानें केलेल्या उपदेशास विशिष्ट उपपत्तीचें निश्चित स्वरूप नाहीं, किंवा फार विचारपूर्वक ठरलेलीं धार्मिक तत्त्वेंहि त्यांत नाहींत. त्याचा सर्व उपदेश त्याला प्रत्यक्ष आलेल्या अनुभवांतील सत्य गोष्टींनीं भरलेला आहे त्यानें मोझेइक कायद्याला नांवें ठेविलीं नाहींत तर त्या कायद्याचा धर्मोपाध्यायांनीं व वृद्ध लोकांनीं जो संकुचित अर्थ केला होता त्याबद्दल त्याचें सर्व भांडण होतें. ज्यू लोकांच्या ओल्ड टेस्टॅमेंटमधील वचनावर निरुपयोगी म्हणून हल्ला न करतां त्याच वचनाचा अधिक योग्य असा अर्थ सांगण्याचा त्यानें प्रयत्न केला तसेंच त्या धर्मग्रंथांतील केवळ शब्दावर जोर न देतां त्याच्या मूलभूत उद्देशाकडे लक्ष देण्याविषयीं त्यानें लोकांना उपदेश केला देवदूत आणि सैतान यासंबंधीच्या येशूच्या दृष्टांतांना ओल्ड टेस्टॅमेंटचाच आधार होता ख्राइस्ट म्हणजे परमेश्वराचा पुत्र अशी पदवी त्यानें अगदीं नाखुषीनें व बऱ्याच वर्षांनंतर घेतली.

येशूच्या उपदेशांतील मुख्य गोष्टी सुप्रसिद्ध " डोंगरावरील व्याख्यान " या भागांत दृष्टांतरूप रूपांत आलेल्या आहेत. त्यानें सांगितलेल्या दृष्टांतरूप कथा अगदीं अशिक्षित लोकांच्या मनावर फार परिणाम करीत असत येशूनें धर्माच्या क्षेत्रांत व्यक्तिविषयक देव या गोष्टीला फार महत्त्व दिलें आहे देव म्ह. आकाशांतील बाप असा उल्लेख तो नेहमीं करतो ईश्वर आणि मनुष्यप्राणी यांच्यामधील संबंध दोन मनुष्यप्राण्यांतील परस्पर प्रेमासारखा आहे. मनुष्यांनीं स्वर्गांतील देवाच्या राज्यांत प्रवेश होण्याकरितां खटपट करणें हें मनुष्यजातीचें धार्मिक ध्येय आहे या स्वर्गांतील राज्यांत नम्रपणा, दयाळुपणा, मनाचा पवित्रपणा आणि कळकळ या

गुणाना फार मान असतो. आणि उलट गर्व, ढोंगीपणा, द्रव्याचा गैरवाजवी लोभ या दुर्गुणाची फार निंदा करण्यात येते. येशूनें मुख्यत. गुन्हेगार लोक आणि समाजबहिष्कृत लोक याना उपदेश करण्यावर भर दिला आहे. त्याना तो "हरवलेल्या चुकलेल्या मेंढरें" असें संबोधितो त्यानें संपत्ति आणि सामाजिक दर्जा यामुळें उत्पन्न होणारे भेदभाव यांकडे दुर्लक्ष करून सर्वांना सारखेपणानें लेखिलें आहे. मोझेसच्या दहा आज्ञाचा त्यानें थोडक्यात दोहोंमध्यें समावेश केला आहे. त्या दोन आज्ञा, ईश्वराबद्दल प्रेम आणि आपल्या शेजाऱ्याबद्दल प्रेम ह्या होत त्यानें लोकाना असा कळकळीचा उपदेश केला आहे की, शत्रूंनाहि क्षमा करावी. दान देणें तें गुप्तपणानें द्यावें आणि ईश्वराची प्रार्थना करणें ती जाहीर ठिकाणीं मोठ्यानें ओरडून न करता कोणाला न समजेल अशा रीतीनें करावी. तसेंच प्रार्थना सोप्या शब्दात करावी साध्या प्रार्थनेचा नमुना म्हणून "दी लॉर्ड्स् प्रेअर" या नावाची एक येशूची प्रार्थना प्रसिद्ध आहे. त्यानें सांगितलेल्या दृष्टातरूप कथामध्यें,बी पेरणारा आणि वी,खडकावर बाधलेलें घर, मोहरीचें बी आणि मूर्ख कुमारिका या कथा फार प्रसिद्ध आहेत.

चमत्कार—जीझसनें अनेकाचे रोग बरे केले. माणसानां लागलेलीं भूतपिशाच्चें नाहींशीं केलीं आणि मृताना पुन्हा सजीव केलें अशा तऱ्हेच्या गोष्टी बायबलात आहेत पण या सर्व गोष्टी केवळ श्रद्धेमुळें झाल्या असें तो म्हणतो. याशिवाय दुसऱ्या कित्येक चमत्काराच्या गोष्टी आहेत. त्यापैकी कांहीं पुढीलप्रमाणें -जीझसनें थोडेसे पाव आणि मासे एवढ्या अन्नानें शेकडों लोक जेऊं घातले, एका विवाह-भोजनाच्या प्रसंगीं पाण्याची दारू बनविली आणि मोठें वादळ झालें असता समुद्रावर तो चालत गेला जीझसनें आपल्या ह्यातींत मूर्तिपूजकाना ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्याचा सुव्यवस्थित प्रयत्न सुरु केला नव्हता त्यानें फक्त ज्यू लोकाच्या भागधुरीतील गोष्टींचें अंतरगपरीक्षण केलें. तथापि त्यानें आपल्या १२ शिष्याना ख्रिस्ती धर्माचा प्रचार कसा करावा याबद्दल सूचना दिल्या होत्या. इतकेंच नव्हे तर कित्येकाचें मत असं आहे की, त्यानें स्वत सत्तर शिष्य धर्मोपदेशाच्या कार्याकरिता पाठविले हिब्रू भविष्यकथनासंबंधानें जीझसनें असें जाहीर केलें होतें कीं, "स्वर्गांतील राज्यात अब्राहाम, ऐसॅक व जेकब याच्याबरोबर भोजन करण्याकरिता पूर्वेकडील व पश्चिमेकडील देशातील पुष्कळ पुण्यवान पुरुष येतील. जीझसला क्रुसावर चढवून ठार मारल्यानंतर तिसऱ्या दिवशीं (ईस्टरसंडे) तो थडग्यांतून बाहेर आला आणि एका ढगामधून वर स्वर्गांत गेला. त्याला क्रुसावर चढविला तेव्हा सर्व आकाश ढगानीं व्याप्त झालें होतें आणि येरूशेलम येथील देवालयावरील आवरण पायथ्यापासून डोक्यापर्यंत फाटून गेलें असें सागतात जीझसचे मगदीं आरमीनें अनुयायी ज्यू लोकांपैकीं होत ते जीझस हा डेव्हिड राजाच्या अनौरस वंशज होता असें मानीत असत इतर धर्मातीत लोकानीं ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यावर ते जीझस परमेश्वराचा अवतार होता असा उपदेश करू लागले. सेंटजॉनच्या गॉस्पेलमध्यें जीझस परमेश्वराचा अवतार होता अशी जी उपपत्ति सागितली आहे आणि जी उपपत्ति दुसऱ्या शतकात ग्रीक चर्चनें मान्य केली होती ती तिसऱ्या शतकात रोमन बिशपानीं त्याज्य ठरविली कारण तीमुळें अनेकेश्वरीमताचा पुरस्कार होतो असा त्याचा आक्षेप होता. तथापि हीच उपपत्ति पुढें अधिकाधिक मान्य होत गेली. आणि ती निसा येथें इ स ३२५ मध्यें चर्च कौन्सिलनें मान्य केली. आणि तिलाच पुढें कॉन्स्टांटिनोपल येथें ३८१ मध्यें चर्च कौन्सिलनें कायमची मान्यता दिली.

ख्रिस्ताचे कार्य—कर्मवादाच्या विरुद्ध आरण्यकीय ब्रह्मवेत्त्यानीं जी चळवळ केली तीप्रमाणेंच येशूची चळवळ होती कदाचित् त्या चळवळीचा प्रेरक हेतु रामकीयहि असूं शकेल ही गोष्ट मागें सविस्तर वर्णन केली आहे (बुद्धोत्तर जग पृ. २५,२९,३३) यहुदी लोकाना त्याच्या विधिविषयक धार्मिक कल्पनामुळें जगाच्या धडपडीत अपयश येतें ही जाणीव असून शिवाय हा विधिविशिष्ट धर्म अध्यात्मिक उन्नतीस कारक होत नाहीं आणि ही अध्यात्मिक उन्नति अधिक महत्वाची आहे असें त्यास वाटत असावे. शिवाय बोलून चालून तो सुताराचा मुलगा, त्यामुळें त्यास यहुद्याच्या उपाध्यायाच्या भिक्षुका उत्पन्नाचें रक्षण करावें ही आस्था नसणार. उलट त्याविषयीं त्यास तिटकाराच असणार. यामुळें त्याचे राज्यकर्ते व भिक्षुक हे दोन्ही शत्रु बनले आणि भिक्षुकाच्या लावालावीचें निमित्त होऊन त्यास शासनसंस्थेकडून मरणाची शिक्षा झाली. या संप्रदायाला जर पालधारख्या प्रचारको भिक्षुकी अकलेचा मनुष्य मिळाला नसता तर येशूचें नाव तरी आज टाऊक असतें किंवा नाहीं याविषयीं सशयच आहे. [ 'ख्रैस्त्य' पहा ]

ख्रिस्तीशक—इसवी सन या कालगणनापद्धतीची सविस्तर माहिती 'विज्ञानेतिहास' (ज्ञानकोश वि. ५ वा पा १२१-१२२) या ग्रंथात दिली आहे

ख्रैस्त्य—ख्रैस्त्य म्हणजे ख्रिस्ताचा संप्रदाय याचा इतिहास द्यावयाचा म्हणजे ख्रिस्ताच्या उपदेशाचेहि अर्थ कसकसे निघत गेले, त्याच्या अनुयायानीं आपल्या आवडीच्या कोणत्या गोष्टी घातल्या, अनुयायी मडळींतील मुख्य कार्यकर्त्या अधिकाऱ्यानीं चर्चची रचना कशी केली, आणि सत्ता मिळविण्याचा आणि वाढविण्याचा प्रयत्न कसा केला, संप्रदायाचा प्रसार जगभर कसा केला इत्यादि गोष्टींचा इतिहास द्यावा लागेल हा देण्यासाठीं या लेखाचे कांहीं भाग केले पाहिजेत ते असे —

(१) चर्चचा इतिहास (२) प्रसाराचा इतिहास (३) मतांचा इतिहास या सर्व गोष्टींवर क्रमवार विवेचन करू आणि नंतर भारतीय ख्रिस्ती वर्गाकडे विशेष लक्ष देऊं

चर्चचा इतिहास.—ख्रिस्ती संप्रदायाची व त्याच्या शासनसंस्थेची समग्र हकीकत सांगावयाची असल्यास तिचे सोईसाठीं तीन विभाग पाडता येतील (१) पुरातन चर्चपासून तों ग्रेगरी दि ग्रेट पोपच्या कारकीर्दीपर्यंत (२) मध्ययुगीन चर्च आणि (३) आधुनिक चर्च.

पूर्वकालीन चर्च, उत्पत्ति आणि वाढ.—येशू ख्रिस्ताला सुळावर चढविल्यामुळें त्याच्या अनुयायामध्यें फाटाफूट झाली परंतु थोडक्याच काळात तो धडक्यातून उठला आहे अशी त्याची खात्री होऊन तो 'मेसाया'चें राज्य स्थापण्यासाठीं व अशा रीतीनें मेसायाचें अर्धवट उरलेलें काम तडीस नेण्यासाठीं लवकरच या जगात अवतीर्ण होणार असा त्याना विश्वास वाटूं लागला अशा प्रकारची श्रद्धा त्याच्या मनात उद्भूत झाल्यामुळें ख्रिस्त हाच मेसाया होय अशी लोकाना खात्री पटवून देण्याची व आपल्या शुद्धाचरणानें व पश्चात्तापानें लवकरच अस्तित्वात येणाऱ्या मेसायाच्या राज्यस्थापनेची तयारी करण्याची जबाबदारी त्याच्यावर येऊन पडली. यामुळें यहुदी संस्कृतीचें राजकीय व धार्मिक केंद्र जें यरुशलेम त्याच ठिकाणीं हे ख्रिस्तानुयायी पुन्हा जमा झाले. ही नवीन चळवळ ज्या अर्थी यरुशलेम येथेंच सुरू झाली त्याअर्थीं तेथील चर्च हें ख्रिस्ती जगाचें आद्य चर्च या नात्यानें प्रसिद्ध आहे हें योग्यच आहे. उपलब्ध माहितीवरून यहुदी ख्रिस्त्याचा जीवितक्रम त्याच्या इतर बांधवाप्रमाणेंच होता असें निश्चयेंकरून सांगता येतें ते यहुदी उपासनामंदिरात जाऊनच ईश्वरोपासना करीत असत. आपला नवा पंथ काढण्याचा किंवा इस्राएलच्या कुटुंबातून विभक्त होण्याचा विचार त्याच्या मनात आला नव्हता. धार्मिक व नैतिक बाबतींत देखील त्याच्यामध्ये व त्याच्या इतर विचारी देशबांधवामध्यें काहीं भेद होता असें मानण्याला काहींहि आधार नाहीं. येशू हाच मेसाया असून तो लवकरच मेसायाचें राज्य स्थापणार हा जो त्याची श्रद्धा होती तेवढ्याच बाबतींत या दोघात मतभेद होता. ख्रिस्त हाच मेसाया आहे हें सिद्ध करणें त्याना भाग होतें व या आपल्या मताचें मंडन त्यानीं पुनर्जन्माच्या आधारावर केलें. मेसायाचें भविष्य पिकविण्याची व यहुदी बायबल हेंच ख्रिस्ती बायबल असें लोकाना पटविण्याची त्याच्यावर जबाबदारी पडली. मेसायाचें राज्य लवकर येण्यासाठीं पश्चात्तापाचा व नीतिशुद्ध आचरणाचा पुरस्कार केला पाहिजे असें ते प्रतिपादन करूं लागले. उपलब्ध माहितीवरून येशूची जी शिकवणूक की ईश्वर सर्वांचा बाप आहे व आपण एकमेक बघू आहोंत ती पूर्वीच्या काळीं लोकाना पटली नव्हती असें दिसतें.

मध्यंतरीं हीच चळवळ पॅलेस्टाइनच्या बाहेर पसरली व पुष्कळ यहुदी व यहुदी नसलेले या चळवळींत सामील झाले यहुदी राष्ट्राबाहेरील लोकामध्यें चळवळ पसरविण्याच्या कामीं पॉलनें अतिशय खटपट केली पॉलचा संप्रदायप्रवेश ही गोष्ट प्राचीन चर्चच्या इतिहासात अत्यंत महत्वाची आहे. यानें ख्रिस्ती संप्रदायास नवीन स्वरूप देऊन सर्व जगाला रुचतील असे त्यात फेरफार केले व त्याचें संकुचित स्वरूप काढून टाकून त्यास व्यापक स्वरूप दिलें म्हणजे यहुदी लोकाची राष्ट्रीय महत्वाकांक्षा साधणारा संप्रदाय न बनविता केवळ विशिष्ट आचारविचार पसरविणारा संप्रदाय बनविण्याची त्यानें खटपट केली. जुन्या मताप्रमाणें येशू हा यहुदी लोकाचा मेसाया होता व त्याचें राज्य स्थापणें हें मुख्य ध्येय होतें पण ख्रिस्त हा ईश्वर आहे व तो पापी लोकाचा उद्धार करण्यासाठीं जगामध्यें आला होता असें तो प्रतिपादन करूं लागला. ख्रिस्ती संप्रदाय हा अमक्याचा नसून तो सर्वांचा आहे असें त्यानें सांगितलें पूर्वीचे यहुदी लोक जें मेसायाचें राज्य स्थापन होणार असें म्हणत तें एखादें प्रत्यक्ष स्वराज्य नसून शुद्ध आचरणाचें, शांततेचें व आत्मानंदाचें स्वराज्य होय, असें पॉलचें मन होतें. शिवाय स्वतःच्या आत्मिक अनुभवानें व मोक्षतत्वाच्या आधारें त्यानें कोणत्याहि ख्रिस्त्याला यहुदीलोकाचे कायदे पाळण्याची जरुरी नाहीं असें प्रतिपादन केलें. उदाहरणार्थ, मोठ्या वयात लोक ख्रिस्ती होणार त्याना सुंतेची दुःखापत सहन होणार नाहीं म्हणून त्यानें भौतिक सुंतेच्या ऐवजीं "आध्यात्मिक सुंता" उपदेशिली. अशा रीतीनें त्यानें यहुदी व यहुदी नसलेल्या लोकामधील मुख्य भेद नाहींसा करून टाकला. ख्रिस्ती भक्ताला साक्षात्कार झाला असता त्याला प्रीति, आनंद व शांति ह्याचाच अनुभव येतो, या मुद्यावर बराच मतभेद व खटका उडाला होता. व दुसरींहि पॉलचीं तत्वें मान्य झालीं नाहींत.

ख्रिस्ती संप्रदायाचा रोमन साम्राज्यात प्रवेश.—ख्रिस्ती संप्रदायाच्या नव्या व्यापक स्वरूपामुळें त्यानें अनेक विजय मिळविले, व रोमन जगामध्यें त्याची कायमची स्थापना झाली. यावेळीं लोकाची धार्मिक, सामाजिक, नैतिक वगैरे सर्व बाबतींत सुधारणा करण्याकडे मनोवृत्ति होती व या सर्व बाबींमध्यें ख्रिस्ती धर्मभावनानीं त्याची जी इच्छा होती ती तृप्त करून त्याना भासत असलेली उणीव भरून काढली. पूर्वीच्या शतकात ही धार्मिक चळवळ केवळ मध्यम व हलक्या स्थितींतील लोकांच्या बाबतींतच चालू होती, पण ख्रिस्ती संप्रदायाची नैतिक उच्चता पाहून सरदार व वरिष्ठ दर्जाचे लोकहि या संप्रदायाच्या बाबतींत मन घालूं लागले, व अशा रीतीनें ही चळवळ व्यापक स्वरूपाची झाली.

पण ही यशस्विता मिळविण्यासाठीं ख्रिस्ती संप्रदायाला फार झगडावें लागलें परंपरागत धार्मिक समजुतीमुळें, मत्सरामुळें, गैरसमजामुळें व इतर कारणामुळें या संप्रदायावर अनेक संकटें आलीं व काहीं वेळ तर खुद्द सरकारकडून हा संप्रदाय चिरडून टाकण्याचा प्रयत्न केला गेला या धर्माला चिरडून टाकण्याचा पद्धतशीर प्रयत्न डीशिअसच्या कारकीर्दीत ( २५०-५१ ) झाला, व हेंच धोरण पुढें डायोक्लीशिअननेंहि ( ३०३ पासून पुढें ) स्वीकारिलें तथापि या

विरोधाला न जुमानतां चर्चची सत्ता हळू हळू वाढत गेली. ३११ सालीं गालेरिअस बादशहानें आपल्या मृत्यूसमयीं या संप्रदायाला अंशतः स्वातंत्र्य दिलें व त्याचा होत असलेला छळ बंद केला. ३१३ सालीं कॉन्स्टंटाईननें व लिसीनीयसनें ख्रिश्चन संप्रदायाला पूर्ण स्वातंत्र्य दिलें, व त्या अर्थाचा मिलान येथें एक शिलालेख कोरला. हा संप्रदायेतिहासातील फारच महत्वाचा टेरा होय. कॉन्स्टंटाईननें या संप्रदायाची वाढती भरभराट पाहून त्याला आपला पूर्ण आश्रय दिला, व मृत्युशय्येवर ( ३३७ ) असताना त्यानें स्वतःहि ख्रिस्ती संप्रदायाची दिक्षा घेतली. अशाच प्रकारचा वाढता आश्रय फक्त ज्यूलिअनखेरिज करून त्याच्या मागून गादीवर येणाऱ्या सर्व राजाकडून मिळाला. यामुळें ज्यूलिअनला ख्रिस्ती लेखकांनीं अनेक शिव्याशाप दिले आहेत. थीओडोशिअसच्या कारकीर्दींत या संप्रदायास राजदरबारी मान्यता मिळाली, ख्रिस्तेतर लोकांवर बहिष्कार पडूं लागला. जेव्हां रोमन साम्राज्याचे तुकडे झाले तेव्हां या चर्चचेहि तुकडे होऊन पूर्वेकडील भागांत ग्रीक कॅथोलिक व पश्चिमभागात रोमनकॅथोलिक असे भेद पडले व त्यानीं स्वतंत्र रीतीनें संप्रदायप्रसार करण्यास सुरवात केली.

अशा रीतीनें ख्रिस्ती संप्रदायास राजदरबारी मान्यता मिळाली तरी साम्राज्यांतील लोकाचा पैतृक धर्म नामशेष न होता पुष्कळच भागात तो प्रचलित राहिला. व काहीं ठिकाणीं तर त्याचे अनुयायी ख्रिस्ती लोकापेक्षाहि अधिक होते. तथापि नावांनं का होईना ख्रिस्ती संप्रदाय हा सर्व राज्याचा संप्रदाय म्हणून गणला गेला. मध्यंतरीच्या काळात तिसऱ्या शतकाच्या आरंभापूर्वी ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार आशियामध्यें झाला होता; व त्याचा पुढें एकसारखा प्रसार होत जाऊन तो चार पाच शतकात आर्मेनिया, इराण, अरबस्तान व याच्याहि पुढें पूर्वेकडील प्रदेशात पसरत गेला. चवथ्या शतकाच्या सुरुवातीसच गॉथ हे ख्रिस्ती झाले होते व इतर जातीचे रानटी लोकहि क्रमाक्रमानें ख्रिस्तीसंप्रदायात शिरूं लागले. व ज्या वेळेस पाश्चात्य देशाचें पुढारपण या रानटी लोकांकडे आलें त्यावेळींसुद्धा ही चर्चची सत्ता अबाधीतच राहिली. तेव्हांपासून कित्येक शतकेंपर्यंत पाश्चात्य राष्ट्रांमध्यें चर्च हें केवळ पारमार्थिक साधनच नव्हे तर सुधारणेची व संस्कृतीची एक शाखाच होऊन बसली होती.

ख्रिस्ती लोकाचा जीवनक्रम.— प्राचीन ख्रिस्ती लोकाची अशी पक्की समजूत होती कीं आपण दैवी प्रसादाचे अधिकारी आहोंत. त्याच्या मतें चर्च ही मानवानीं स्थापलेली संस्था नसून ती ईश्वरनियंत्रित आहे. हें जग नश्वर आहे व यांत आपलें कल्याण नाहीं असें त्याना वाटत असल्यानें त्यांनीं जगांतील व्यवहार सोडून एक प्रकारं संन्यासधर्मच पत्करला होता. प्रथमतः पुष्कळांची ख्रिस्त हा पुन्हां या जगात येणार अशी खात्री होती. पण ही आशा पुढें लवकरच त्यानीं सोडून दिली. पवित्र आत्म्याचें अस्तित्व निरनिराळ्या अद्भुत मार्गांनीं व्यक्त होतें अशी या लोकाची प्रथम कल्पना होती. पॉललाहि ही गोष्ट मान्य होती पण त्यानें ख्रिस्ती मनुष्याच्या प्रत्येक व्यवहारात या आत्म्याचें अस्तित्व व्यक्त होतें अशी त्या कल्पनेस पुस्ती जोडली, व त्यामुळें ख्रिस्ती लोकाना एक प्रकारची स्फूर्ति मिळाल्यासारखें झालें. पुढें कालांतरानें ही स्फूर्ति व उत्साह नाहींसा होत जाऊन प्रत्येक गोष्टींतील आत्म्याच्या अस्तित्वाबद्दलची त्याची श्रद्धा कमी कमी होत चालली; व नास्तिकमतवाद्याशीं झालेल्या झगड्यामध्यें चर्च हें स्वतंत्र न राहता अधिकाऱ्याच्या ताब्यात गेलें. मॉंटेनिझम या नावानें प्रसिद्ध असलेली दुसऱ्या शतकाच्या अखेरीस झालेली चळवळ चर्चची ही परवशता नाहींशी करून पूर्वीप्रमाणें त्यास ईश्वरनियंत्रित करण्यासाठीं झालेली होती. पण ती यशस्वी न होता चर्चची परवशता उत्तरोत्तर वाढतच गेली. या जगातील चालीरीतींना अनुसरून चर्चनें आपली पुनर्घटना केली व अशा रीतीनें स्वतःला पुष्कळ काळ टिकविण्याचा प्रयत्न केला. याचा अर्थ चर्च ही अतिमानुषी सं नाहीं असें याच्या अभिमान्याना वाटत होतें असा नसून हा अतिमानुषीपणा चर्चनें निराळ्या रीतीनें व्यक्त केला एवढेंच कायतें. चर्चच्या या नूतन परिस्थितींत देखील प्रत्येक ख्रिस्ती मनुष्याला असेंच वाटत असे कीं, परमेश्वरी कृपा संपादन केल्याशिवाय मोक्ष मिळणें शक्य नाहीं; तसेंच या जगातील आपल्या आयुष्यक्रमात व पुढील स्वर्गांतील आयुष्यक्रमात फार अंतर आहे. व ज्या मानानें चर्च ही संस्था लौकिक होऊं लागली त्या मानानें ही श्रद्धा 'संन्यास' रूपानें व्यक्त होऊं लागली. ही मठसंस्था म्हणजे परलोकीचें सुख अधिक सुलभ करण्याचा व अशा रीतीनें स्वतःला मोक्ष सुलभरीतीनें साध्य करण्याकरिता केलेला एक प्रयत्न होय. हें साध्य साधून घेण्यासाठीं प्रत्येकानें आपलें आचरण शुद्ध ठेवलें पाहिजे अशी प्रवृत्ति सुरू झाली. परंतु जगातील या चर्चमध्यें राहून स्वतःला मोक्ष प्राप्त करून घेण्याचें ज्याना अवघड वाटूं लागलें त्यांनीं समाजापासून दूर जाऊन एकान्तवासात राहून तें मिळविण्याचा क्रम चालू ठेवला. तिसऱ्या शतकामध्येंहि ख्रिस्ती भिक्षु झाले होते, पण चवथ्या शतकाच्या अखेरीस मात्र सर्व यूरोपभर ही भिक्षुसंस्था पूर्णपणें प्रस्थापित झाली. भिक्षूस व भिक्षुणींस समाजात फार मान मिळूं लागला व त्यामुळें धर्मगुरू नाहि होतां होईल तो भिक्षु होणें भाग पडत असे. या भिक्षुसंस्थेनें लोकांपुढें एक उच्च नैतिक ध्येय ठेविलें होतें. ज्याना भिक्षु होता येईना असे लोक सुद्धा आपापल्या घरी आपल्या जिविताच्या मोक्षासाठीं खटपट करूं लागले. याचा परिणाम असा झाला कीं ब्रह्मचर्याचा बराच प्रसार झाला, व स्वतःची शुद्धि करून घेण्यासाठीं उपवास करणं,

दानधर्म करणें, अशा प्रकारचे प्रकार अस्तित्वांत आले. येशू ख्रिस्तानें सांगितलेलें प्रेमाचें तत्व जास्त व्यापक करून सर्व ख्रिस्ती बांधवांबद्दलचें प्रेम असा त्याचा अर्थ मानण्यात येऊं लागला, अनाथास मदत, अतिथिसत्कार वगैरे उदार तत्वें आचरणांत येऊं लागलीं, व स्वतःच्या धर्मबांधवांना मदत करणें हें तर एक अत्यावश्यक कर्तव्यच होऊन बसलें.

उपासना.— परमात्मा हा आपल्या सान्निध्यांत असतो ही जी प्राचीन श्रद्धा होती तिचा परिणाम चर्चमधील उपासनेवर झाल्याशिवाय राहिला नाहीं उपासना हा खेळच होऊन बसला. प्रत्येकानें मनास वाटेल त्याप्रमाणें उपासना करावी व मी हें ईश्वराच्या प्रेरणेनेंच करीत आहे असें म्हणावें अशी स्थिति अस्तित्वांत आली यामुळें वारंवार घोटाळा होऊं लागला व अंदाधुंदी माजली तेव्हां उपासनेसंबंधीं कांहीं नियम करण्यात येऊन कांहीं विशिष्ट व्यक्तींच्या हातांतच उपासनेचा अधिकार देण्यात आला. या बाबतींत कसकशी वाढ होत गेली तें सविस्तर सांगणें शक्य नाहीं; परंतु उपासना जास्त कठिण, गुंतागुंताची व अवडंबरयुक्त करण्याची एकीकडे प्रवृत्ति वाढत होती, तर दुसरीकडे उपासना जास्त गंभीर व गूढ करून पापी माणसाला त्या गूढोपासनेंत न घेण्याची मनोवृत्ति वाढत होती. असे गूढ प्रकार म्हणजे दीक्षाविधि व प्रभुभोजन हे होत. व यांना वाटेल त्या इसमास हजर राहतां येत नव्हतें. प्रार्थना म्हणण्याचेहि अशाच रीतीनें दोन भाग पडले एक सार्वजनिक व सर्वांना खुला असा भाग व दुसरा गूढ भाग. यापैकीं सार्वजनिक प्रार्थना दिवसेंदिवस जास्तच गुंतागुंतीची व अवडंबरयुक्त होत चालली.

चर्च व प्रभुभोजनादि संस्कार.—पॉलच्या मतें मनुष्य हा मांसादि वस्तूंचा गोळा असल्यानें तो नश्वर आहे. जेव्हां तो ख्रिस्ताशीं एकरूप होईल व अशा रीतीनें दैवी जीव होईल तेव्हां तो मुक्त होईल. तसेंच ख्रिस्ती चर्च हें शरीर असून ख्रिस्त हा त्याचा आत्मा आहे असेंहि कांहीं सूक्तांतून म्हटलें आहे. या दोनहि कल्पना एकत्र करून इरेनिअसनें असें प्रतिपादिलें कीं चर्चचा सभासद झाल्याशिवाय कोणत्याहि ख्रिस्ती मनुष्याला मुक्ति मिळणार नाहीं. हीच स्थिति संस्काराची झाली दुसऱ्या शतकाच्या सुमारास दीक्षाविधी हा एक महत्वाचा विधि गणला जात होता. दीक्षा घेतली असतां त्या मनुष्याला दुसरा ईश्वरी जीव प्राप्त होतो असें सर्वांना वाटत असे, व प्रभुभोजन केलें असतां अमरत्व प्राप्त होतें असेंहि तत्व प्रसृत झालें होतें. पूर्वकालीं चर्च म्हणजे साधु लोकांची संस्था होती, व त्याचे सभासद पवित्र आहेत अशी भावना होती अपवित्र लोकांना चर्चमध्यें घेण्यातच येत नसे. नंतर प्रत्येक व्यक्तीला तिचीं पूर्वींची पातकें नाहींशीं करण्यासाठीं दीक्षा द्यावी असें मत प्रचारात आलें व यामुळें वाटेल त्या व्यक्तीला दीक्षा घेतल्यानंतर चर्चचा सभासद होतां येऊं लागलें या संस्काराप्रमाणेंच धर्मगुरूबद्दलचे कांहीं विधीहि नवीन अस्तित्वांत आले इग्नेशिअसनें धर्मगुरूच्या परवानगीशिवाय प्रभुभोजन करतां येत नाहीं असें प्रतिपादन केलें होतें आणि हेंच तत्व दीक्षेच्या बाबतींतहि अमलांत आलें.

ख्रिस्ती संप्रदायाची शिकवणूक.—पूर्वींच्या चर्चच्या विचारांत दोन भावना दृग्गोचर होत होत्या. ख्रिस्ती संप्रदाय हा मनुष्याच्या जीवितावर ताबा चालवून मोक्ष भावना प्राप्त करून देतो अशी एक भावना होती, व दुसरी हा संप्रदाय पापी मनुष्याला त्याचें पाप नाहींसें करून एक दैवी तनु प्राप्त करून देणारें साधन आहे अशी भावना होती ही पहिली भावना नव्या करारांत व दुसऱ्या शतकांतील 'अॅपॉलोजिस्ट' लोकांत दृष्टीस पडते दुसरी भावना पॉल, इग्नेशिअस इत्यादिकांचे लेख व शुभवर्तमान वगैरेंमध्यें दृष्टीस पडते. या दोन भावना परस्परावलंबी नव्हत्या असें मात्र नव्हे. पण प्रत्येक लेखांत अगर विचारांत यापैकीं एक विशिष्ट भावना प्रामुख्यानें दृष्टीस पडत असे एवढेंच. दुसऱ्या शतकाच्या अखेरीस इरेनिअसनें या दोन्ही भावनांचें एकीकरण केलें. त्याच्या मतें मोक्ष म्हणजे सैतानापासून आपली सुटका करून घेणें व ईश्वराच्या कृपाप्रसादानें नवी तनु धारण करणें होय. ही त्याची कल्पना पुढील शतकांत चर्चमध्यें प्रसृत झाली. या दोनहि भावनांच्या दृष्टीनें ख्रिस्ती संप्रदाय हा अतिमानुष संप्रदाय आहे व त्याच्या मदतीशिवाय मोक्ष प्राप्त होणें अशक्य आहे.

या दोन्ही भावनांचा ख्रिस्तासंबंधीं भावनेवर परिणाम झाल्याविना राहिला नाहीं. ख्रिस्ताबद्दलची पहिली कल्पना म्हणजे साक्षात्कार करून देणारा हा देवदूत असून परमेश्वर व जग यामधील हा दुवा आहे. परंतु वरील दोन भावनांचा परिणाम असा झाला कीं, ख्रिस्त व परमेश्वर हे एकच आहेत व ख्रिस्तरूपानें परमेश्वर जगांत अवतरत असून या अवतारानें तो मानवाची उन्नति करतो असें मत ख्रिस्ताविषयीं प्रचलित झालें. ही कल्पना तिसऱ्या शतकाच्या अखेरीस प्रसृत झाली. पण त्या वेळीं मूर्तिपूजा कोणाहि करीत नसत. तथापि शेवटीं चवथ्या शतकांत या प्रश्नावर रण माजून ३२५ सालीं नायसीआच्या कौन्सिलनें ख्रिस्ताच्या मूर्तीला पूर्णपणें परवानगी दिली व कांहीं कालानंतर तिचा जिकडे तिकडे प्रसारहि झाला. पुत्र या देवतेमध्यें परमात्मा, पिता व पुत्र हे तिन्ही अंतर्भूत असतात अशी समजूत होती व हेंच ट्रिनिटीचें (त्रैत) तत्व नायसिआच्या तत्वज्ञानांत दिसत होतें.

ख्रिस्त हा या पुत्राचा मूर्तिमंत अवतार आहे या समजुतीमुळें चवथ्या व पुढील कांहीं शतकांत असा वादग्रस्त प्रश्न निघाला कीं ख्रिस्तामध्यें असलेल्या मानवी अंशाचा व दैवी अंशाचा परस्पर संबंध काय आहे. सन ४५१ सालीं

भरलेल्या काल्सीडॉनच्या परिषदेंत असें ठरलें कीं ख्रिस्तामध्यें दोन्ही अंश असून त्यांचा संयोग झाल्यावर सुद्धा त्यांचे गुणधर्म अबाधित रहातात. सन ६८० सालीं भरलेल्या कान्स्टांटिनोपल येथील मंडळानें ख्रिस्तामध्यें मानवी इच्छा व दैवी इच्छा या दोन्ही असतात असें ठरवून वरील मतास दुजोरा दिला. अशा रीतीनें ख्रिस्ताबद्दलचें त्रिमूर्तित्व पूर्णपणे प्रस्थापित झालें. मध्यंतरीं पश्चिमयूरोपांतील चर्चमध्यें पाप व प्रसाद यासंबंधीं व मनुष्याला मोक्ष कसा मिळतो याबद्दलचा वाद होऊन ५२९ मध्यें ऑरेंज येथील दुसऱ्या बैठकीनें असें ठरलें कीं, मनुष्य हा मूळचा पतित असून त्याला दीक्षेमध्यें दिल्या जाणाऱ्या प्रसादामुळें तो मोक्षप्राप्तीचा अधिकारी बनतो व अशीच परमेश्वरी कृपा, चर्चमध्यें राहून मिळविल्याशिवाय त्याला मोक्षप्राप्ति होत नाहीं. दुसरा बोनिफेस या पोपनें याच निकालास पुष्टि दिली. मध्ययुगांत पश्चिमयूरोपमध्यें हें तत्त्व प्रचलित होतें. सारांश हिब्रू, ख्रिस्ती, पौर्वात्य, ग्रीक, रोमन इत्यादि धर्मांतून चर्चनें आपलीं तत्त्वें घेतलीं व हीं तत्त्वें ज्या स्वरूपांत प्रगट झालीं तें स्वरूप ग्रीक तत्त्वज्ञानापासून घेतलें.

संघटना.—चर्चमधील संघटनेची उत्पत्ति किंवा वाढ कोणत्या प्रकारें झाली हें समजण्याला साधन नाहीं, कारण हें ज्ञान करून देणारी साधनसामुग्री अगदींच तुटपुंजी असून ती सुद्धां इकडे तिकडे विखुरलेली आहे. अगदीं प्राचीन काळीं चर्च ही आध्यात्मिक संस्था होती व प्रत्यक्ष परमेश्वराचाच तिच्यावर ताबा होता. त्या वेळची अशी समजूत होती कीं, परमेश्वर हा निरनिराळ्या भक्तांना निरनिराळ्या *विशिष्ट देणग्या देतो व त्यांचा भक्तानें लोकहितासाठीं* उपयोग करावयाचा असतो. त्यापैकीं प्रमुख देणगी म्हणजे उपदेशकाची होय. व या उपदेशकांना अपॉसल म्हणजे आद्य ख्रिस्तसंप्रदायप्रचारक अशी संज्ञा असे. हे लोक परमेश्वरी इच्छेचें व स्वरूपाचें ज्ञान देणारे मिशनरी लोक असत. व असे संप्रदायप्रसारक पूर्वीच्या चर्चमध्यें पुष्कळ होते. तथापि ही संज्ञा फक्त पॉल व आणखी १२ जण यांनाच लावण्यांत आली. या लोकांना चर्चमध्यें कांहीं अधिकाराची जागा मिळत असे असें नाहीं. तरी पण त्यांना फार मान मिळत असे यांत शंका नाहीं. शिवाय त्यांच्या शिष्यांनीं त्यांना एकदां अपॉसल म्हणण्यास सुरुवात केली म्हणजे तेंच नांव रूढ होत असे. या योगानें अर्थातच कांहीं ढोंगी व खोटे अपॉसल या वेळीं निर्माण झाले. अशा खोट्या लोकांचा निर्देश पॉलनेंच केला आहे. या अपॉसलांविषयीं डायाडोचीमध्यें एक सुंदर उतारा आहे. 'प्रत्येक अपॉसल हा तुमच्याकडे आला असतां त्याला तुम्ही देवाप्रमाणें भजा. पण तो जर एक दिवसापेक्षां जास्त दिवस एके ठिकाणीं वास करील तर तो खोटा आहे असें समजा.'

बिशपांचा उदय.—अपॉसल म्हणजे आद्य संप्रदायप्रचारक, वक्ते व उपदेशक यांमध्यें फारसा भेद दाखविता येत नाहीं. तथापि हे तीन वर्ग चर्चमध्यें होते. फार प्राचीन काळापासूनच पुष्कळ चर्चमध्यें कांहीं कामगार लोक नेमीत असत व दुसऱ्या शतकामध्यें आशियामायनरमध्यें बिशप म्हणजे धर्माध्यक्ष, प्रेसबिटेर व डीकन अशा तीन कायमच्या जागा अस्तित्वांत होत्या व यांचें काम अनुक्रमें चर्चच्या दानधर्माची व्यवस्था पहाणें, धार्मिक कृत्यामध्यें अव्यवस्था असल्यास ती काढून टाकणें व पतित लोकांना शिस्त लावणें हें होतें. अर्थातच हीं कामें ताब्यांत घेण्यासाठीं चर्चला धर्मप्रसारक, धर्मोपदेशक व धर्मशिक्षक यांची जरूरी भासली. पण हे लोक नेहमींच मिळत नसल्याकारणानें त्यांची जागा रिकामी पडल्यास दुसऱ्याला देण्यांत येत असे. व अशा रीतीनें कायमचे कामगार नेमण्यांत येऊं लागले व क्रमाक्रमानें या कामगारांच्या ताब्यांत चर्चच्या सर्व चळवळी येऊं लागल्या. अर्थात या चर्चच्या कामगार मंडळाच्या ताब्यातच सर्व सत्ता आली व या कामगारांवर पैशाची, शिस्तीची, व धर्माची व्यवस्था लावण्याची सर्व जबाबदारी येऊन पडली व नोकरशाही संप्रदायाच्या शासनसत्तेंत पूर्णपणें प्रस्थापित झाली.

या चर्चचा सर्व अधिकार एकाच्या ताब्यांत होता कीं पुष्कळांच्या ताब्यांत होता हें नक्की सांगता येत नाहीं. तरी पण जी कांहीं माहिती उपलब्ध आहे तीवरून दुसरेंच मत खरें असावें असें दिसतें. तरी पण ही पद्धत सार्वत्रिकच होती असें मात्र नाहीं. इग्नेशिअसच्या सूक्तामध्यें एकाच कामगाराच्या ताब्यांत चर्चची व्यवस्था असल्याचा स्पष्ट उल्लेख आहे व त्याच्या हाताखालीं अनेक असल्याचा उल्लेख आहे. हीच व्यवस्था दुसऱ्या शतकाच्या अखेरीस सर्वत्र पसरली. ज्या चर्चमध्यें एक बिशप व पुष्कळ प्रेसबिटर व पाद्री असतील त्यावेळीं ते धर्मोपाध्याय धर्माध्यक्षाचें मंडळ असे व या धर्मोपाध्यायाच्या हाताखालीं पाद्री असत.

पण ज्ञेयवादाचा उदय व वाढ झाल्यावर दुसऱ्या शतकामध्यें चर्चची फार बिकट परिस्थिति झाली व चर्चमधील संघटनेवर त्याचा फार परिणाम झाला. या ज्ञेयवाद्यांचीं मतें ख्रिस्ती लोकांतील पुष्कळांना गॉस्पेलवर घाला आणणारीं वाटलीं. हे ज्ञेयवादी लोक इतराप्रमाणेंच आपल्याला ख्रिश्चन म्हणवून घेत. त्यामुळें त्यांना आपल्यांतून कोणत्या रीतीनें वगळतां येईल याचा विचार करतां करतां कॅथोलिक चर्चची स्थापना करण्याची पहिली पायरी म्हणजे पॉल आणि त्याचे बारा अपॉसल्स यांची शिकवणूक मान्य करणें ही होय व ही जो मान्य करील तोच ख्रिश्चन होय असें ठरलें. याचा परिणाम नवा करार व दुसरे धर्मग्रंथ तयार करण्यांत झाला. ज्ञेयवादी आपल्याला देखील धर्मप्रसाराचा व उपदेशाचा पूर्ण हक्क आहे असें सांगत असत. त्याविरुद्ध धर्मप्रसारक *त्यांचा खरेपणा ठरविण्यासाठीं* दोन अटी घालण्यांत आल्या. तरी पण या दोन अटी अपुऱ्या पडल्या. व त्याच्यानें कार्यभाग झाला नाहीं यासाठीं असें सांगण्यांत येऊं

ॲपासलनीं आपला सर्व हक्क धर्माध्यक्षाच्या ताब्यात दिला असून धर्माध्यक्ष हेच त्यांची शिकवणूक स्पष्ट व खरी सांगण्याला पात्र आहेत हा वाद 'धर्मप्रसारकाच्या गादीच्या हक्काचा वाद' या नावानें प्रसिद्ध आहे अशा रीतीनें चर्च हें या अपॉसलच्या तत्त्वाच्या तज्ज्ञान जाऊन शिवाय त्या तत्त्वाचा प्रसार करण्यास नेमलेल्या कामगाराच्या ताब्यात गेलें ही कल्पना आणि सरकारची कल्पना या दोन्ही कल्पना एकत्र केल्या म्हणजे कॅथोलिक चर्चची पुरी कल्पना होते चर्चच्या अस्तित्वाला बिशप कारणीभूत असून त्याच्या शिवाय अपॉसलचें तत्त्वसमजत नाहीं व त्यामुळें मोक्ष मिळणार नाहीं अशी या चर्चची रूपरेषा होऊन बसली

प्रत्येक लहान अगर मोठ्या चर्चला बिशप हा असेच व याचा निर्देश इग्नेशिअस व सायप्रियन यांनीं केला आहे हीच पद्धति कित्येक वर्षे अमलांत होती परंतु तिसऱ्या शतकाच्या मध्यास चर्चची सत्ता जास्त वाढत जाऊन व त्या मानानें बिशपाची ही सत्ता एका चर्चवर न राहतां अनेक चर्चांवर पसरल्यामुळें पूर्वीची बिशपची जागा धर्मोपाध्यायाकडे आली व बिशपची सर्व व्यवस्था याच्याकडे आली तरी पण बिशप याच्याप्रमाणें पूर्ण स्वातंत्र्य या धर्मोपाध्यायाला मिळालें नाहीं फक्त तो बिशपाचा प्रतिनिधि या नात्यानें काम करीत असे, दीक्षा देण्याचा हक्क याला मिळाला नाहीं अशा रीतीनें बिशपची सत्ता अनेक चर्चांवर चालू लागल्यामुळें त्याच्या हाताखालील चर्चमध्ये ऐक्य उत्पन्न होऊं लागलें व या ऐक्याची कल्पना जास्तच वाढत जाऊन सर्व ख्रिस्ती जगांतील चर्चें एकत्र होऊन एक चर्च निर्माण झालें व चर्चला ख्रिस्ताचें शरीर असें मानण्यात आलें व या चर्चमधील सर्व लोक परमेश्वराचे पुत्र आहेत असें मानण्यात आलें या ऐक्याचा अतोनात फायदा झाला चर्चमधील आपापसांतील सख्य वाढत गेलें, एका चर्चमधील माणसें दुसऱ्या गांवीं गेली असतां तेथील चर्चकडून त्यांना चांगली सहानुभूति मिळूं लागली धर्मपुस्तकाचा झपाट्यानें प्रसार सुरू झाला व निरनिराळ्या भागांतील चर्चमधील वाढ एकाच पद्धतीनें होऊं लागली. दुसऱ्या शतकाच्या समाप्तीपूर्वी आशियामायनरमध्यें स्थानिक सभा भरत असत तिसऱ्या शतकामध्यें प्रांतिक सभा भरूं लागल्या व निकेयाच्या मदतीनें त्या दोन वर्षांच्या अंतरानें भरत जाव्या असें ठरवलें याहिपेक्षा मोठ्या सभा व सर्व पश्चिम यूरोपमधील धर्मसभा ही चवथ्या शतकात आर्लेसमध्यें भरली ३२५ सालीं निकेया येथें अखिल ख्रिस्ती जगातील चर्चनें धाडलेल्या प्रतिनिधींची सभा भरली या व अशाच इतर सभा सर्व बादशहाकडून बोलावल्या जात असत व त्यांत जे नियम ठरतील ते तो अमलांत आणीत असे अशा रीतीनें चर्च ही राज्याश्रित संस्था आहे अशी जी जुनी कल्पना तिचा येथेंहि प्रवेश झाला

बिशप हे अपॉसलचे प्रतिनिधी असून त्यानाच काय तो गूढ तत्त्वें सांगण्याचा हक्क आहे असें जें वर सांगण्यात आलें त्यावरून हें उघडच सिद्ध होतें कीं सर्व बिशपाच्या मतांत एकी होती. पण हा समज चुकीचा आहे त्याच्यामध्यें पुष्कळ मतभेद होत असे व याच्यामधील वाद मिटविण्यासाठीं एक सार्वत्रिक धर्ममंडळ अस्तित्वांत आलें व त्यानीं अपॉसलचीं तत्त्वें अगदीं सत्य आहेत, त्यांत ढवळाढवळ करण्याचा कोणासहि बिलकुल अधिकार नाहीं असें जाहीर केलें

या अखिल चर्चमधील ऐक्याचा परिणाम नगरपद्धतीच्या स्थापनेंत झाला एका प्रांतांतील सर्व चर्चें एका बिशपाच्या ताब्यात असून तो राजधानीमधील चर्चचा धर्माध्यक्ष असे व या पद्धतींत चर्चनें राजकीय विभागणीच्या पद्धतीचाच अवलंब केला ही पद्धत पूर्वयूरोपमध्यें पूर्वींच अस्तित्वांत होती पश्चिमयूरोपमध्यें मात्र ही पद्धत हळूहळू अमलांत आली याच नगरपद्धतीचा विकास होऊन एकमेकालगत असणाऱ्या पुष्कळ प्रांतांतील चर्चचा संघ बनून त्या सर्व प्रांतांतील सर्वांत मोठ्या राजधानीच्या शहराच्या धर्माध्यक्षाच्या ताब्यात बाकी सर्व चर्चें असावयाची अशी पद्धत निर्माण झाली निकेयाच्या मंडळामध्यें अलेक्झांड्रियाच्या रोमच्या व अँटिओकच्या धर्माध्यक्षाची सत्ता पुष्कळ प्रांतावर मानली गेली व दर बैठकींत आणखी काहीं मुख्य मुख्य धर्माध्यक्षांना सत्ता देण्यात आली

बिशपांत रोमच्या बिशपास प्रामुख्य —पण या अवधींत रोमन धर्माध्यक्षाची सत्ता वाढत जाऊन तिचें पोपच्या सत्तेंत रूपांतर झालें रोमच्या बिशपला अधिकाधिक अधिकार मिळत गेले याचें कारण रोमन बादशहा आपला सर्व धर्मविषयक पत्रव्यवहार रोमच्या बिशपामार्फत करीत असत यामुळें म्हणजे बादशाही अधिकाराच्या अंतेवासित्वामुळें रोमच्या बिशपला इतर बिशपावर अधिकार मिळाला व सर्व ख्रिश्चन चर्चांवर त्यानीं आपली सत्ता गाजावण्याचा हक्क सांगण्यास सुरुवात केली व ५ व्या शतकात पश्चिम यूरोपवर ती गाजवण्यास सुरुवात केली ही चळवळ ऑगस्टाइननें नेटानें चालविली व चर्च ही सर्वांत वरिष्ठ सत्ता आहे असें प्रतिपादन केलें हें ऑगस्टिनचें तत्त्व पश्चिम यूरोपमध्यें मान्य झालें, व मध्ययुगांत चर्च हें निवळ मोक्षाच्या बाबतींतच नव्हे तर सर्व राजकीय व सामाजिक बाबतींत सत्ता गाजवूं लागलें याच तत्त्वावर ऑगस्टिनच्या नंतर पोपची सत्ता स्थापित करण्यांत आली देवाच्या खालोखाल रोमच्या धर्माध्यक्षाची सत्ता मानण्यात येऊं लागली

पूर्वकालीन चर्च हें रोमन साम्राज्याचें चर्च होतें चवथ्या शतकापासून रोमन साम्राज्य सर्व बाजूंनीं पसरूं लागलें तरी पण इराण अगर ॲबिसीनियामधील जीं चर्चें उदयाला आलीं तीं रोमन साम्राज्यामध्यें सामील झालीं नाहींत. वास्तव आपण त्याचा विचार न करतां केवळ रोमन साम्राज्यांत

मध्ययुगीन चर्चची स्थिति काय होती त्याचें ऐतिहासिक दृष्टीनें निरीक्षण करूं.

ज्याला आपण मध्ययुग म्हणतों त्यावेळीं लोंबार्ड, पश्चिमगॉथ, फ्रँक व अँग्लोसॅक्सन या लोकांनीं अनुक्रमें इटली, स्पेन, फ्रान्स व ब्रिटनिया येथें आपलीं राज्यें स्थापन केलीं होतीं. ज्या आशियाखंडांतील व आफ्रिकेंतील प्रांतावरील सत्ता पूर्वी अलेक्झांडरच्या हातांत होती ती नष्ट होऊन महंमदी सत्ता त्या प्रांतावर या युगांत पसरलेली होती. तेव्हां अशा अनेक प्रचंड पडामोडींच्या युगामध्यें चर्चची काय परिस्थिति होती हें पहाणें फार मनोरंजक होईल. या प्रश्नाचा विचार करण्यापूर्वी आपणाला हें लक्ष्यांत ठेवणें जरूर आहे कीं, सर्व रोमन साम्राज्यान्तर्गत चर्चचा विचार यापुढें न करता पूर्वयूरोपीय व पश्चिमयूरोपीय चर्चची स्वतंत्र रीतीनें परिस्थिति अवलोकन करणें अत्यावश्यक आहे. कारण या दोन्ही चर्चची वाट अगदीं स्वतंत्र रीतीनें व विपमतेनें झाली.

पूर्वेकडील चर्चची स्थिति, (अ) पुराणमतवादी चर्च.— पश्चिमेप्रमाणें पूर्वेकडे पूर्व, प्राचीन व मध्ययुगांतील चर्चच्या परिस्थितींत फारसा बदल झाला नाहीं. कारण पूर्वेकडे रोमन साम्राज्य अजून अस्तित्वात होतेंच. पूर्वकालीन चर्चमधील व्यवस्थाच इकडच्या चर्चमध्येंहि होती. बादशहाची सत्ता चर्चवर या युगांतहि होती हें त्याचें कारण नव्हे तर बादशहाची स्थिरता कायम होती व पुढें मुसुलमानी राज्य झालें हें होय. चर्चचा धर्माध्यक्ष हा स्वतंत्र नसून तो बादशहाच्या ताब्यांत होता.

कॉन्स्टंटाईनच्या कालानंतर झालेल्या चर्चच्या विकासाचें फळ म्हणजे पूर्वयूरोपीय चर्चचें पुराणमतवादित्व होय. मतांबद्दलच्या झगड्यांत ग्रीक लोकांचें ज्ञानविषयक तत्त्व थोडें फार पटूं लागलें होतें व ज्ञानावरील विश्वास पूर्वयूरोपीय चर्चमधून अगदींच उडाला नव्हता. मध्ययुगाच्या सुरवातीस ग्रीक लोकामध्यें इतर राष्ट्रांपेक्षा ईश्वरविषयक ज्ञानाचा व इतर ज्ञानाचा फार प्रसार झाला होता व या काळीं पश्चिमयूरोपमध्यें असा एकहि मनुष्य नव्हता कीं जो ज्ञानाच्या व कलाप्रावीण्याच्या बाबतींत फोटियसबरोबर स्पर्धा करूं शकला असता, परंतु ७ व्या शतकाच्या अखेरीस हा मताविरुद्ध चाललेला लढा शेवटास गेला. या वादविवादानंतर जें व तत्त्वें निश्चित झालीं त्‍ तीं कायम ठेवणें हें आता जरुरीचें होतें, ईश्वरविषयक ज्ञानाच्या शास्त्राचें काम पूर्वीच्या प्रमाणग्रंथांचें एकीकरण करून पुनः तें स्पष्ट लोकांपुढें मांडणें एवढेंच काय तें शिल्लक राहिलें. जॉन ऑफ डमॅस्कसनें इ. स ६९९-७५३ मध्यें अशा प्रकारचा प्रयत्न केला. त्यानंतर युथेमिअस झगैरेनें अशाच धर्तीवर थोडे फार प्रयत्न केले व अशा प्रकारच्या प्रमाणभूत ग्रंथाच्या आधारें बनविलेल्या तत्त्वांना मानहि मिळूं लागला. तरी पण याच्यापेक्षाहि धार्मिक वृत्तीचे लोक देवाच्या पूजेच्या प्रकाराला जास्त मान देऊं लागले व अशा प्रकारच्या पूजेमुळें आपल्याला ईश्वराची प्राप्ति लवकर होते अशी कल्पना त्यांच्या मनात येण्याबरोबर त्यांनीं सर्व उत्साह या कामाकडे लावला, व ग्रीकमधील मोठमोठ्या विद्वानांचीं मनें या मूर्तिपूजेवरील वादविवादाकडे आकर्षिलीं गेलीं. हा वाद एक शतकपर्यंत चालून शेवटीं मूर्तिपूजेचें तत्त्व पूर्णपणें मान्य झालें मूर्ति ही केवळ साधन अगर दृश्य चिन्ह नसून प्रत्यक्ष परमेश्वरच सगुणरूपानें या मूर्तींत अवतरला आहे अशी त्यावेळची भावना होती. खिस्ताची मूर्ति केल्याशिवाय खिस्ताचें दृश्य स्वरूपांत आपल्याला दर्शन मिळावयाचें नाहीं अशी त्याची श्रद्धा होती. यामुळें मूर्तिपूजा अधिकच भरभराटीस आली. अशा प्रकारच्या कल्पना पसरल्यामुळें अर्थातच परमार्थविवेचें मुख्य कार्य म्हणजे या मतमतांतराचा पूर्ण परिचय करून देणें हें झालें. पांचव्या शतकामध्यें एका खिस्ती मनुष्यानें या कामाला सुरवात केली, त्या नंतर मॅक्झीमस कनफेसर (मृत्यु ६६२), सीमियन ( मृत्यु १०४० ) व निकोलस कॅबे सिलॅस ( मृत्यु १३६१ ) वगैरे विद्वान या मानिकतात्मक पद्धतीचे प्रतिनिधी होते. त्यांची महत्त्वाकांक्षा साक्षात्कार करून घेण्याची होती

ही साक्षात्काराची तळमळ या मध्ययुगीन वैराग्य वृत्तीमधील एक विशेष होय. ५-६ व्या शतकामध्यें ईजिप्शियन पॅलेस्टाईन हें साधु व मठ यांचें आश्रयस्थान होतें. परंतु अरब स्वारीमुळें खिस्ती जगाचा व याचा जेव्हां संबंध तुटला तेव्हां अर्थातच ही वैराग्यवृत्ति लोपली. मध्ययुगात कॉन्स्टांटिनोपल व माउंट एथॉस याना बरेंच महत्त्व प्राप्त झालें. ग्रीसमध्यें ईश्वराला शरण जाणें व विरक्ति प्राप्त करून घेणें हीं दोन्हीं निश्रेयसाला अवश्य आहेत, असें मानलें गेलें व अशा रीतीनें या वैराग्यवृत्तीला एकप्रकारचें गूढत्वाचें वळण लागलें सिमिऑनचीं जीं तत्त्वें 'दिव्यूथिऑलॉजियन मध्यें मथित केलीं होतीं तीं या मठामध्यें प्रवृत्त झालीं व हेसिचॅस्टसनें १४ व्या शतकात या सिमिऑनच्या तत्त्वावरून साक्षात्काराबद्दलचें एक सिद्धांतरूप मत प्रतिपादन केलें, व पुष्कळ वादविवादानंतर, ईस्टर्न चर्चनें त्याचा अंगिकार केला. सारांश या पूर्वेकडील चर्चनें मध्ययुगामध्यें पूर्वीचेंच रूप कायम ठेवलें. पश्चिमेकडील चर्चप्रमाणें या चर्चमध्यें कोणताहि फरक पडून आला नाहीं फक्त पूर्वीचींच मतें त्यांनीं निराळ्या स्वरूपात पुढें ठेवून त्याचा प्रसार केला व अशा रीतीनें सर्व दिशेनें या मतांचा विकास झाला. यावरूनच हें पूर्वेकडील चर्च जिवंत होतें असें सहज कळून येईल. या चर्चचा विस्तार सारखा होऊं लागला. या मध्ययुगाच्या सुरवातीला, रशियन या सामान्य जातिनामाखाली येणारीं बल्गेरिअन, सर्व्हिअन वगैरे अनेक लोकांचीं राष्ट्रें उदयाला आलेलीं होतीं व पूर्वेकडील चर्चला प्रयत्नांतीं हे सर्व लोक मिळाले, ग्रीकांच्या नंतर येणाऱ्या

लोकांत व या रशियन लोकांत कोणतेंहि साम्य नव्हतें. तरी पण त्यांच्यामध्यें ग्रीक धर्म व त्याच्या भावना या अजूनहि दृष्टीस पडत होत्या. यावरून ग्रीक लोकांमध्यें परकीय तत्त्वें देखील आपल्यामध्यें शोषून घेऊन जिरवून टाकण्याची किती शक्ति होती हें दिसून येतें. याचा एक परिणाम असा झाला कीं, पूर्वेकडील चर्चचा पश्चिमेकडील चर्चशीं मिलाफ घडून आलाच नाहीं. दोघांनाहि हा वियोग इष्ट नव्हता पण पूर्वेकडील व पश्चिमेकडील चर्चची वाढ भिन्नभिन्न मार्गांनीं होत असल्याकारणानें त्याला इलाजच उरला नाहीं. कॉन्स्टांटिनोपल पडल्यापासून मात्र पूर्वेकडील चर्चमधील जो जिवंतपणा होता त्याला थोडा धक्का बसला.

(आ) नेस्टोरियन व एकप्रकृति वादाचा पुरस्कार करणारीं चर्चें:—जेव्हां पूर्व सीरियामधील चर्चनें सीरीयन वेदाऱ्यांनीं सांगितलेल्या—अर्थात नेस्टोरियनच्या शिक्षणपद्धतीला व तत्त्वाला चिकटून राहण्याचें ठरविलें त्याच वेळेस पश्चिम सीरिया, ग्रीक व लॅटिन देशांत चर्चशीं त्याचा विरोध येऊन तें निराळें झालें, तरी पण त्याची सत्ता कमी झाली नाहीं. उलट त्यानें आपला मोर्चा पर्शियन चर्चकडे वळविला. पर्शियन चर्चनें कांहीं एक विरोध केला नाहीं व बार्सौमसच्या (४५८-४९१) कारकीर्दीपासून पर्शियन चर्च हें नेस्टोरियन बनलें. तसेंच अरबी ख्रिश्चन लोक व मध्यआशियामधील लोक यांनीं देखील नेस्टोरियन चर्चशीं संबंध ठेवला. नेस्टोरियन तत्त्वज्ञानी व वैद्यांनीं मध्य युगामध्यें पुढें जे तत्त्वज्ञ उदयाला आले त्यांना शिकविलें व मध्ययुगीन तत्त्वज्ञांनीं ग्रीक तत्त्वांचा सीरियन भाषेंतील भाषांतरावरून अभ्यास केला.

मध्ययुगामधील राजकीय परिस्थितीमुळें नेस्टोरियन चर्चला अनुकूल परिस्थिति येऊन, अरब लोकांनीं ईजिप्त, पॅलेस्टाईन, सीरिया हे प्रदेश जिंकल्यामुळें तेथील ख्रिस्ती चर्चवर नेस्टोरियन चर्चनें आपलें वर्चस्व स्थापन केलें. याहीपेक्षां महत्त्वाचा फायदा हा झाला कीं, यामुळें मध्यआशिया व आत्यंतिक पूर्वेकडील देश यांच्यामध्यें दळणवळण वाढू लागून नेस्टोरियन लोकांना चीनमध्यें जावयास मार्ग मिळाला. सि गॅ फू (इ. स. ७८१) च्या शिलालेखावरून या देशांत नेस्टोरियन चर्चनें ख्रिस्ती विचारांचा केवढा प्रसार केला होता हें दिसून येतें. तसेंच दक्षिण सायबेरियामध्यें व मंगोलियामध्येंहि यांचा प्रवेश झाला होता. या प्रत्येक देशांत ख्रिस्ती धर्माला पुष्कळच अनुयायी मिळाले. तेराव्या शतकाच्या आरंभीं मंगोलियन साम्राज्य प्रस्थापित झाल्यानें नेस्टोरियन चर्चच्या सत्तेला कांहीं अडथळा आला नाहीं. परंतु मंगोलियन साम्राज्यास उतरती कळा लागून इस्लामी सत्ता उदयाला येत असतां इस्लाम धर्मानें सर्व सत्ता बळकावली. परंतु नेस्टोरियन चर्चपेक्षां देखील एकप्रकृतिवादाचा पुरस्कार करणाऱ्या चर्चला या मध्ययुगामध्यें फार [illegible] आलें. ईजिप्तमध्यें हा धर्म जास्त प्रचलित होता व सीरियामध्यें देखील थोडा फार पसरलेला होता. एडेसाच्या जाकोबमुळें या धर्माचा रोमनचर्चपासून बचाव झाला व एवढ्याचसाठीं त्या धर्माच्या अनुयायांनीं आपल्याला जाकोबाइट्स असें म्हणून घेतलें. या रोमन चर्चच्या जुलुमापासून अरब सत्तेनें ६३५ नंतर सुटका केली व हें चर्च तसेंच जिवंत राहिलें. पुढें त्याची फारशी भरभराट झाली नाहीं. ईजिप्तमधील या धर्माच्या चर्चची अशीच स्थिति झाली. ६४१ मध्यें या ठिकाणीं देखील या धर्माची रोमन चर्चच्या जुलुमापासून अरब सत्तेनें सुटका केली पण या चर्चची देखील व्हावी तशी वाढ झाली नाहीं व या धर्माचे अनुयायी कॉप्टिक लोक यांची उत्तरोत्तर कमी संख्या होऊं लागली. १५१७ मध्यें टर्की सत्तेचा उदय झाल्यावर या धर्माचे अनुयायी फारच कमी झाले होते व १८७० सालीं या अनुयायांची संख्या केवळ ६०,००,००० च होती. ॲबिसीनियामध्यें मात्र या कॉप्टिक चर्चनें आपला धर्म जिवंत ठेविला.

पश्चिमेकडील चर्च (अ) मध्ययुगाचा आरंभ काल—पूर्वेकडील चर्चनें जरी मध्ययुगांत पूर्वीच्याच धर्मतत्त्वांना चिकटूनच कांहीं कांहीं सुधारणा केल्या तरी पण पश्चिमचर्चला मात्र एका अतिशय भयंकर कालाशीं झगडावें लागलें. ६ व्या शतकाच्या अखेरीस ख्रिस्ती जगाचे निरनिराळे प्रांत अलग होऊन त्यांनीं आपलीं स्वतंत्र राज्यें स्थापिलीं होतीं व त्यामध्यें जर्मनवंशीय लोकांची सत्ता बलाढ्य होती व त्यांत जर्मन रक्ताचींच राष्ट्रें पुष्कळ होतीं. फक्त रोमच्या ताब्यांत असलेला जर्मनीचा भाग व इंग्लंड यामध्यें मात्र ट्यूटन शाखेचें साम्राज्य होतें. इतर राज्यामध्यें मात्र रोमन सत्तेनें या जर्मनवंशीय सत्तेला पूर्ण आत्मसात् केलें. लोंबार्ड, पश्चिमगॉथ, स्वाबियन, फ्रँक वगैरे जातींचे लोक हे रोमन संस्कृतीचे पूर्ण अभिमानी बनलेले होते. तरी पण या ख्रिश्चन चर्चला थोडा फार धक्का बसला यांत शंका नाहीं. जर्मन स्थलांतरामुळें यूरोपच्या इतिहासाच्या प्रवाहाला जरी अडथळा आला तरी पण त्यायोगानें ख्रिस्ती चर्चच्या प्रसाराला अडथळा आला नाहीं. फक्त ब्रिटनमध्यें मात्र ख्रिस्ती धर्माला अगदीं पश्चिमभागांत जावें लागलें व ऱ्हाईन व डान्यूब या नद्यांच्या प्रदेशांत कांहीं चर्चें बुडालीं तरी पण यांचें फारसें महत्त्व नाहीं कारण पुन: चर्चनें गमावलेला प्रांत काबीज करण्याचा निश्चय केला. मध्ययुगाच्या आरंभीच्या व मागील युगाच्या शेवटच्या काळाच्या सरहद्दीवर चमकणारी व्यक्ति ग्रेगरी दि ग्रेट. यानें ऑगस्टिन नावाच्या साधूला इंग्लंडला पाठविलें व तेथील अँग्लो सॅक्सन लोकांनीं मग ख्रिस्ती धर्माकडे [illegible] सांगितलें, व त्याच्या परिश्रमानें इंग्लंडमध्यें अँग्लो-सॅक्सन चर्चची स्थापना होऊन ख्रिस्ती धर्माचा प्रसार होऊं लागला. यूरोपमध्यें इतर ठिकाणींहि [illegible] दिवसानुदिवस ख्रिस्तीधर्म हा अधिकाधिक प्रसृत होऊं

लागला. पूर्वींच्या सर्व लुप्तप्राय झालेल्या चर्चची पुनःस्थापना होऊन विशप नेमण्यांत आले इतकेंच नव्हे पण फ्रान्सनें मेन नदीच्या दोहीं बाजूला आपल्या वसाहती केल्यामुळें ख्रिस्तीधर्म शुद्ध जर्मनांच्या मुलखांत पसरला नाहीं. सरतेशेवटीं स्वेबियन व बव्हेरियन लोकं ताब्यांत आल्यावर फ्रँकांनीं त्याहि मुलखांतून ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला. या कामांत सेल्टिक मिशनऱ्यानींहि फ्रँकांना मदत केली. इंग्लंडमध्यें जुनी ब्रिटिश व नवी अँग्लो सॅक्सन चर्चें यांची दोस्ती जमली नाहीं. तरी पण सेल्ट लोकांनीं ख्रिस्ती धर्माच्या प्रसारासाठीं जिवापाड श्रम केले व त्याबद्दल सर्व यूरोपखंडानें त्यांचें ऋणी राहिलें पाहिजे. सारांश मध्ययुगाच्या आरंभींचें पहिलें शतक संपण्याच्या पूर्वी ख्रिस्ती चर्चनें आपला पूर्वींचा सर्व प्रदेश मिळविला एवढेंच नव्हे तर आणखी दुसराहि मिळविण्यास सुरवात केली होती. तरी पण हें करतांना ख्रिस्ती धर्मानें आपलें जुनेंपण कायम ठेवून त्यांत थोडेफार फेरफार केले होते. चर्चचें क्रीड (तत्त्वें, उद्देश) व मतें हीं पूर्वी प्रमाणेंच कायम होतीं. पुराणकालीन चर्चनें जीं धोरणें आखलेलीं होतीं व जीं मतें प्रतिपादलीं होतीं तीं पूर्ण असून त्यांत फेरफार करण्याचें कांहींच कारण नाहीं असें ठरलें. उपासनेचा प्रकार देखील अबाधितच राहिला. लॅटिनभाषा लोकांना कळत नव्हती तरी देखील मंत्रतंत्रामध्यें व प्रार्थनेमध्यें तीच भाषा ठेवली. चर्चची संघटना देखील पूर्ववतच होती व चर्चचें उत्पन्न व त्याचा दर्जा हीं देखील पूर्वींप्रमाणेंच राहून ख्रिस्ती मनुष्यानें आपलें जीवित पूर्ण करण्यास वैराग्यवृत्ति धारण केली पाहिजे हें पूर्वींचें तत्त्वहि जसच्या तसेंच राहिलें. तथापि जे कांहीं नवीन बदल करण्यांत आले त्यांचा चर्चवर बराच परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं.

रोमीचर्चच्या ऐक्यास विघातक परिस्थितींची अंगें.—अँग्लो सॅक्सन व सेल्ट प्रचारकांतील द्वैत मागें सांगितलेंच आहे. लॅंबार्ड, गॉथ, अँग्लो सॅक्सन चर्च हीं आपल्याला कॅथॉलिक म्हणवून घेत असत. परंतु कॅथॉलिक चर्चची स्थिति फार बदललेली होती. तिच्यामध्यें संघटनेचा अभावच होता व त्यामुळें सार्वजनिक स्वरूप लयाला जाऊन त्याचें स्थानिक चर्चांत रूपांतर झालें होतें व सार्वत्रिक चर्चच्या बैठकीहि होत नव्हत्या. रोमच्या धर्माध्यक्षाला प्रत्येक चर्च जरी मान देत असे, तरी रोमच्या धर्माध्यक्षाचा इतर स्थानिक चर्चवर कोणताहि कायदेशीर हक्क राहिला नव्हता.

आर्थिक अधिकार आणि तात्त्विक अधिकार.—सर्वांवर आर्थिक स्थितीचा परिणाम व्हावयाचाच. ज्याचा पैसा त्याचें मत परिणामकारी व्हावयाचें हें सहज आहे. राजाचा अधिकार प्रत्यक्ष चर्चच्या तत्त्वावर जरी चालत नसला तरी एकंदर अंतर्गत व्यवस्थेवर चालत होता. राजाच्या संमतीशिवाय कोणत्याहि बिशपची निवड होत नसे. स्थानिक धर्माध्यक्षाच्या एकत्र सभा होत असत व या सभा राजाच्या संमतीनें बोलावण्यांत येत होत्या व त्यांनीं केलेले ठराव राजा अमलांत आणीत असे.

अशा स्थितींत धर्मसभेच्या अधिक रोट राजाचा अंश असल्यामुळें त्यांत जर्मन परिस्थितीचा परिणाम कसा झाला हें सहज दिसून येईल. ख्रिस्ती जगामध्यें सर्व चर्चें व त्यांची मालमत्ता ही धर्माध्यक्षाच्या ताब्यांत असे पण जर्मन देशांत मात्र त्या त्या गांवचे सरदार हे त्या त्या गांवांतील चर्चचे मालक म्हणून समजण्यांत येऊं लागले. याचा परिणाम असा झाला कीं, ते सरदार लोक उपाध्याय नेमण्याबद्दलचा आपला हक्क सांगूं लागले व त्या चर्चवरील उत्पन्नावरची मालकी दाखवूं लागले. कांहीं कांहीं चर्चचा हक्क त्यांनीं मिळाला व ज्यांना तो हक्क मिळाला त्यांनी आपापले धर्माध्यक्ष निवडले. हा जो फेरफार जुन्या चर्चच्या संघटनेंत झाला तो ख्रिस्ती चर्चमध्यें जें जर्मन वर्चस्व झालें त्याचा पहिला महत्त्वाचा परिणाम होय व तोच आजवर चालू असलेला दृष्टीस पडतो.

इंग्लंडची ख्रिस्ती इतिहासांत कामगिरी.—मध्ययुगाच्या चर्चमध्यें सुधारणा करण्याचें काम प्रथमतः इंग्लंडांत सुरू झालें. मध्ययुगांतील ख्रिस्ती वाङ्मयाचें व तत्त्वज्ञानाचें माहेरघर इंग्लंड होतें. ॲलडेल्म (मृत्यु ७०९) व बीड (मृत्यु ७३५) हे या युगांतील पहिले विद्वान होते. विनफ्रिड बोनीफेशियस (मृत्यु ७५७) हा इंग्लंडमध्येंच जन्मला तो मुख्यतः मिशनरी म्हणून प्रसिद्ध आहे. परंतु मध्यजर्मनींतील लोकांना ख्रिस्ती बनवणें हें जें काम त्यानें केलें तें त्याचें अगदींच कमी महत्त्वाचें काम आहे. याहीपेक्षा त्याची कामगिरी म्हणजे त्यानें केलेली बव्हेरियाच्या व फ्रान्सच्या चर्चची पुनर्घटना ही होय. तसेंच इंग्लंडमधील धार्मिक वाङ्मयहि त्यानेंच प्रथमतः जर्मनीमध्यें नेलें.

फ्रान्सची कामगिरी.—अशा रीतीनें विनफ्रिडनें तयार केलेल्या पायावर पिप्पीन आणि शार्लमेन यांनीं आपली इमारत बांधली. शार्लमेनचें महत्त्व त्यानें चर्चची सत्ता इतर प्रदेशांवर वाढवली यांत नसून त्यानें फ्रँक चर्चाला धर्मप्रसाराचें काम व जबाबदारी आळसावयास लावून न करावयास लावलें यांत आहे. धर्मासंबंधीचे जे नियम त्यानें अमलांत आणले त्याचा हेतु हाच होता. उपाध्यायांना त्यानें लोकांना मनापासून शिकविण्यास व धर्मज्ञान देण्यास सांगितलें व धर्माध्यक्षाला धर्मगुरूंवर चांगल्या प्रकारें देखरेख करण्यास सांगितलें. तसेंच उत्तम प्रकारचें धार्मिक वाङ्मय उत्पन्न करून चर्चची कामगिरी करण्याचेंहि काम वृद्धिंगत होऊं लागलें.

या कल्पना तडीस नेण्यासाठीं शार्लमेननें आपल्या पदरीं अनेक विद्वान लोकांचा संग्रह केला. सर्वांत ॲलक्युइन (मृ. ८०४) हा अँग्लोसॅक्सन विद्वान त्याचा विशेष सहकारी होता. पण त्याशिवाय जोसेफस्कॉटस व डंगल हे

केल्टिक विद्वान, पॅलीनास व पॉलस डायाकोनस हे लॉंबार्डियन विद्वान व इतर फ्रेंच विद्वान हे देखील त्याचे सहकारी होते व यांच्या देखरेखीखालीं तत्त्वज्ञानाची भरभराट झाली. त्यात विशेष नावीन्य होतेंच असा भाग नाहीं. परंतु नवीन स्वरूपात मात्र पूर्वीचेंच वाङ्मय लोकांपुढें मांडण्यात आलें. तसेंच पूर्वेकडील चर्चमध्यें व या चर्चमध्यें मूर्तिपूजेवर जो वादविवाद झाला त्यावरून ह्या लोकांना आपलें तत्त्वज्ञान ख्रिस्ताइतकेंच उच्च दर्जाचें आहे असें वाटत असावेंसें दिसतें व हें खरेंहि होतें.

रिरनी संप्रदायाची प्राचीन जर्मन पांडित्याकडून सेवा.—या फ्रेंच विद्वानांनंतरच्या दुसऱ्या पिढीनेंहि आपली कामगिरी योग्य तऱ्हेनें बजावली. रॅबॅनस हा विद्वत्तेंत व ॲलक्युइनपेक्षां देखील श्रेष्ठ होता. जर्मनीचा हा पहिलाच तत्त्वज्ञ होता. स्ट्रॅबो नावाच्या त्याच्या शिष्यानें 'ग्लासा ऑर्डिनेरिया' नावाचा ग्रंथ लिहिला व तो बायबल वरील एक प्रमाणग्रंथच या मध्ययुगामध्यें झाला.

फ्रान्समध्यें तर पुष्कळच विद्वान झाले. त्यांपैकीं मुख्य मुख्य असे हिंकमार (मृत्यु ८८२), प्रुडेन्शस (मृत्यु ८६१), सर्व्हटसलपस (मृत्यु ८६२), व आणखी काहीं होत. या सर्व लोकांची प्रवृत्ति बायबलमधील विचारांची पुनरावृत्ति करण्याकडे दिसून येत असे. तरी पण त्या शतकामध्यें हिंकमार व गॉट शॅल्क यामधेंच पुनर्जन्मासंबंधीं जो वादविवाद झाला त्यावरून त्या काळांत देखील पुष्कळ बुद्धिमत्तादर्शक वादविवाद होत असत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

रोमच्या धर्माध्यक्षाच्या मदतीनें धर्मासंबंधीं नियम ठरविण्यांत शार्लमेननें आपल्या बापाचा कित्ता गिरवला यात शंका नाहीं. त्यानें पिपिनची देणगी पुनः सुरू केली. ॲड्रियन पोपापासून 'डॉयोनिसो हॅड्रियाना' नावाचें धर्मनियमावरील ग्रंथभांडार मिळविलें. परंतु ८०० नंतर रोमवर देखील फ्रेंच साम्राज्य प्रस्थापित झाल्यावर सुद्धां फ्रेंच धर्मनियमांमधील ट्युटॉनिक वृत्तीचा छटा अद्याप नष्ट झाली नव्हती. शार्लमेननें साम्राज्य स्थापन केल्यामुळें रोमच्या धर्माध्यक्षाला मेंचाच्या राजधानीत रहावें लागे.

याला विरोधी अशा चळवळी चालू होत्या, हें ९ व्या शतकांत धर्मनियमाचा भंग केल्याबद्दल जे काहीं खटले झाले त्यावरून दिसून येतें. परंतु ही चळवळ यशस्वी झाली नाहीं. परंतु यांतूनहि महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे, पूर्व स्वरूपाची व पूर्वकालीन हक्कांची रोमला जाणीव होऊं लागली हीं होय. लिओ, ग्रेगोरिअस, ग्रेगरी यांच्या कल्पनांचा विकास करून निकोलस (८५८-६७) यानें रोमच्या धर्माध्यक्षाना ईश्वरदत्त हक्क व अमर्यादित सत्ता यांचें सुंदर चित्र रंगविलें व त्यासाठीं खटपट केली पण अद्याप पोपच्या सार्वत्रिक सत्तेचा काळ यावयाचा होता. कारण जरी शार्लमेनची सत्ता हळू हळू लयाला जाण्याच्या मार्गाला लागली होती तरी पण रोमच्या पक्षभेदांत धर्माध्यक्ष गुंतल्यामुळें धर्मसत्तेला एकप्रकारचें नादान स्वरूप प्राप्त होऊन ही सत्ता लयाला जाते कीं काय अशी भीति वाटूं लागली.

( आ ) मध्ययुगातील मध्यकाल व रोमन धार्मिक सत्तेचा कळस, राजनियुक्त धर्माध्यक्ष.—सॅक्सनांचेंच घराणें राज्यारूढ झाल्यावर स्थानिक धर्माध्यक्ष नेमण्याची चर्चेची पद्धति जोरानें अमलात आली. ९६२ त जर्मन राजाशीं ऑटोचा जो सलोखा जडला त्यामुळें रोममधील पद्धतीशीं जर्मन स्थानिक पद्धतीचा संसर्ग होऊं लागला. पण त्यायोगानें एकमेकामध्यें केव्हाना केव्हा तरी खटका उडणार हें उघडच दिसूं लागलें, व हा विरोध धर्माध्यक्षाच्या जागेच्या निवडणुकीच्या बाबतींत दिसू लागला. रोममध्यें धर्मनियमाप्रमाणें धर्माध्यक्ष निवडण्याची पद्धत होती तर जर्मनींत राजानें धर्माध्यक्ष निवडण्याची पद्धत होती. धर्माध्यक्ष [illegible] निवडलाच जात असे. परंतु राजा जो धर्माध्यक्ष निवडून येईल त्याला एक आंगठी व दंड हे देत असे व अशा रीतीनें आपली संमति दाखवीत असे, व यांत वास्तविक गैर काहींच नव्हतें.

जर्मनींत अमलात असलेली ही पद्धत रोममध्येंहि अमलात आली. अकराव्या शतकातील रोमच्या धर्मसत्तेची फार विलक्षण पेंचाची स्थिति होऊन तिसऱ्या हेनरीला त्यामध्यें आपलें लक्ष घालावें लागलें. ज्यावेळीं धर्माध्यक्षाच्या जागेसाठीं तिघा उमेदवारामध्यें तंटे सुरू झाले त्यावेळीं हेनरीनें या तिघाना ही धर्माध्यक्षाची जागा न देता सुइझगर नावाच्या बॅबर्गच्या धर्मगुरूला धर्माध्यक्ष नेमलें व तें जर्मनीमधील पद्धतीला अनुसरून नेमलें, व हाच नियम पुढें प्रस्थापित झाला. हेनरीनें धर्माध्यक्ष निवडण्याची सत्ता आपल्या ताब्यात घेतली व दुसऱ्या क्लेमेंट नतरच्या धर्माध्यक्षाना त्यानें नेमलें. अशा रीतीनें तो मध्यें पडल्यामुळें रोमची धर्मसत्ता संकटांतून बचावली. कारण त्यानें नेमलेल्या धर्माध्यक्षांमध्यें लिओ(नववा)सारखे चांगले सदाचरणी व उदार लोक होते व पूर्वे धर्माध्यक्षाप्रमाणें त्यानीं वाटेल तसा अधिकार न गाजवितां मोठ्या विचारानें आपला हक्क बजाविला. अशी जरी स्थिति होती तरी पण हेनरीनें ही जी पद्धत अमलात आणली ती फार वेळ टिकणेंच शक्य नव्हतें.

धर्माध्यक्षावरील राजकीय सत्तेचा संकोच.—पुढें लवकरच जी सुधारणेची चळवळ सुरू झाली तिची मुळें फार मागील काळात रुजलेली होती. मागें सांगितलेंच आहे कीं शार्लमेननें आपल्या पदरीं निरनिराळ्या विद्वान साधूंना आणून ठेवलें हा त्याचा प्रयत्न स्तुत्य होता पण यामध्यें साधूंच्या निर्दुंष्ट वैराग्याचें ध्येय तें यामुळें मागें होत चाललें. पुष्कळ काळपर्यंत या शार्लमेनच्या पद्धतीविरुद्ध चळवळ झाली नाहीं. पण ८०१ मध्यें बेनिडिक्टनें पूर्वीची भिक्षुंची ध्येयें शिकवून अमलात आणण्याचा प्रयत्न केला. तदनंतरच्या शतकात

क्लुनी येथील बेनेडिक्टिन मठामध्यें ही चळवळ फार फैलावली. व या मठामध्यें जी कर्तृत्ववान भिक्षूंची परंपरा निर्माण झाला तीमुळें ही चळवळ दुसऱ्या मठामध्येंहि पसरूं लागली अशा रीतीनें पुनः पूर्वीची ध्येयें स्थापित झालीं. क्लुनीच्या मठाला अनेक मठ जोडले गेले व यामुळें त्यांनीं पूर्वीच्या धर्माध्यक्षाच्या सत्तेला झुगारून दिलें. अशा रीतीनें क्लुनीच्या मठाचें महत्त्व वाढूं लागलें असतांना अशाच प्रकारच्या सुधारणेच्या चळवळी दुसरीकडेहि होऊं लागल्या व थोड्याच काळांत या क्लुनीच्या मठाची सत्ता इटलीमध्यें आणवूं लागली. या मताचा प्रतिपादक इटलीमध्यें पापो (मृत्यु १०४८) हा होता. व इंग्लंडमध्यें डन्स्टन हा होता. प्रथमतः या चळवळीचें लक्ष धार्मिक बाबतींत जी अव्यवस्था चालली असतात तिकडे लागलें नव्हतें, पण धर्माचे कायदे धाब्यावर ठेवून जे अनाचार पाद्र्यांकडून केले जात ते मोडून काढण्यावर त्यांनीं तिकडे लक्ष्य देण्यास सुरवात केली. 'धर्माच्या नियमाप्रमाणें वागा' असा जिकडे तिकडे ध्वनि ऐकूं येऊं लागला. सारांश या सुधारणेच्या चळवळीमुळें राजाच्या अधिकारापासून चर्चची सुटका, चर्चच्या मालमत्तेचें पुनश्च संपादन, व धर्माध्यक्षाची पूर्ववत सत्ता हे तीन महत्त्वाचे परिणाम घडून आले.

परंतु या नवीन चळवळीचा पुराणमतवाद्यांशीं विरोध आला. परंतु अत्यंत नवव्या लिओ हा सुधारणेला अनुकूल असल्यामुळें, हिल्डेब्रँट हंबर्ट वगैरेंच्या सहाय्यानें त्याचीं तत्त्वें रोममध्यें प्रस्थापित झालीं. परंतु या सुधारणा अमलांत आल्यावर लगेच तंटया बखेड्यास सुरवात झाली व पहिला तंटा आज्ञापत्राच्या विक्रीसंबंधानें झाला.

आरंभीं सायमनी याचा अर्थ आज्ञापत्राची विक्री एवढाच होता. नवव्या शतकामध्यें कोणतीहि धर्मसंबंधींची वस्तु असा विस्तृत अर्थ करण्यांत आला. जमीनीच्या मालकानीं चर्चेस अथवा त्यांतील अधिकाऱ्यांच्या जागा विकल्या अगर राजांनीं धर्माध्यक्षाच्या जागा अगर मठ यांची विक्री केली तरी कांहीं लोकांना ही एक सायमनीच वाटूं लागली. यासाठीं अकराव्या शतकांत याहि पेक्षा अधिक विस्तृत अशी व्याख्या करण्यांत आली व राजानें धर्मराज्यांतील जागा मनास वाटेल त्यास देणें अगर एखाद्या मोठ्या इनामदारानें यावाबत पैसे घेणें ही एक प्रकारची सायमनीच मानण्यांत आली. प्रथमतः चर्चनें या मोठ्या इनामदारांकडे लक्ष दिलें नाहीं तर वाटेल त्याला बिशप अगर धर्माध्यक्ष करण्याचा जो राजाला हक्क होता, त्याच्यावरच प्रथम हल्ला करण्यास प्रारंभ केला. १०५९ त नव्या तत्त्वाप्रमाणें दुसऱ्या निकोलसचीं, सुधारणेला अनुकूल अशा पोपला निवडण्याची इच्छा दिसत होती. १०७४ त सातव्या ग्रेगरीनें अशा प्रकारच्या पोपच्या निवडणुकीला हरकत केली. यानंतर जे बखेडे झाले त्यांत ग्रेगरीचा उद्देश थोडा फार उच्च प्रकारचा होता त्याची इच्छा म्हणजे पोपच्या द्वारास सर्व धार्मिक सत्ता देऊन परमेश्वरी सत्तेच्या खालो-खाल जगावर पोपची सत्ता चालविण्याची होती. हीच इच्छा ऑगस्टिनचीहि होती परंतु ती साध्य झालेली पहाण्याचें ग्रेगरीच्या नशीबीं नव्हतें. ११११ त या बखेड्याचा निकाल लागला व त्या निकालान्वयें त्याच्या सत्तेचे ऐहिक व धार्मिक असे दोन भाग केले परंतु हें तत्त्व व्यवहारांत आणणें कठिण होतें व याच्यावर अनेक वादविवाद व भांडणें होऊन शेवटीं ११२२ त 'कन्कॉर्डेट ऑफ वर्म्स' नें या प्रश्नाचा निकाल समेटानें झाला. त्याचा सारांश असा कीं राजानें बिशपची धर्माच्या नियमाप्रमाणें निवडणूक व्हावी या म्हणण्याला संमति दिली व बिशपला अधिकारदर्शक अंगठी देण्याचा नागरिकांना हक्क दिला. तसेंच चर्चनें बिशपची ऐहिक सत्ता राजाकडून स्पर्श करवून घेण्याला रुकार दिला. इंग्लंडमध्यें, जर्मनीमध्यें व फ्रान्समध्यें देखील वरील निकाल सर्वांना मान्य झाला व अशा रीतीनें राजानें धर्माध्यक्षाला निवडण्याचें जर्मन तत्त्व पार ल्यास गेलें.

चर्च आणि जर्मन कामगिरीः—शार्लमेन राजाच्या काळापासून जर्मनांचें प्रस्थ पश्चिमेकडे फार माजलें होतें. ९ व्या शतकापासून तों १२ व्या शतकापर्यंत ख्रिश्चन धर्माची प्रगति करण्याचें सर्व श्रेय या ट्यूटन राष्ट्राकडे आहे. जर्मन पाद्री व धर्माध्यक्ष यांनीं ख्रिस्ती धर्माचा हंगेरींत पोल लोकांत प्रसार करण्यासाठीं अतोनात मेहनत केली व स्वतः साठीं व धर्मासाठीं एल्बे व ओडर या नद्यांमधील मुलूख मिळविला. तसेंच स्कँडिनेव्हियन देशांतील लोकांचें धर्मांतर करविणारे लोक जर्मनच होते व पुढें हें काम इंग्लिश पाद्र्यांनीं केलें.

चर्च आणि लॅटिन जातींची कामगिरी—परंतु अशा रीतीनें ट्यूटन शाखेच्या लोकांनीं धर्मप्रसारार्थ जरी पुष्कळ मेहनत केली तरी पण लॅटिन शाखेच्या लोकांत देखील अशा प्रकारची जागृति उत्पन्न होऊं लागली होती. जर्मनांची संप्रदायसेवा, संप्रदायावर लौकिक सत्तेचा अधिकार वाढविणें आणि औत्सुक्यानें प्रसार करणें ही होती, तर लॅटिन राष्ट्राची संप्रदायसेवा संप्रदायशुद्धीकरण, ज्ञानरचना, आणि लौकिक सत्तेचा अधिकार कमी करणें व संन्यासधर्मविकास या बाबतींत दृग्गोचर होते. मठामध्यें सुधारणा करण्याची चळवळ या लॅटिनांनीच उत्पन्न केली, व त्यापेक्षांहि महत्त्वाची गोष्ट म्हणजे ही एक नवीन 'स्कूलमेन'च्या संप्रदायाची स्थापना झाली ती प्रथमतः या लॅटिन देशांतच उत्पन्न झाली.

परमार्थ, श्रद्धा आणि विचारशक्तिः—ॲरिस्टॉटलची तर्कविद्या शाळेंतून शिकविण्यांत येत असे, व वेदान्तविषयक ज्ञानाला तर्क व श्रद्धा हीं दोन्हीहि अत्यंत आवश्यक आहेत असें त्यावेळपर्यंत मानण्यांत येत असे. नवव्या व दहाव्या शतकांत देखील हीच पद्धत अमलांत होती. तदनंतर बॅरेंगर (मृत्यु १०८८) यानें तर्क व श्रद्धा या दोहोंची जरूरी नसून, सत्याचें ज्ञान होण्याला फक्त तर्काचीच आवश्यकता आहे असें प्रतिपादन केलें. यामुळें तर्क " असा प्रश्न उपस्थित झाला. लॅनफ्रँक बरेंगर

११०९) प्रथम या विषयाचें विवेचन केलें. त्यानें रूढीपरंपरागत श्रद्धा हीच वेदान्तज्ञानाला कारणीभूत होते अशी सुरवात केली पण पुढें त्याची अशी खात्री पटली कीं, श्रद्धेमधील तत्त्वाचा अनुभव असल्याशिवाय तीं तत्वें मनुष्याला समजावयाचीं नाहींत या पद्धतीप्रमाणें त्यानें ईश्वरविषयक ज्ञानाचा मार्ग विशिष्ट तत्वें युक्तिवादानें पटवून देणें हा ठरविला. अशा प्रकारची कल्पना अंधश्रद्धामूलक मध्ययुगामध्यें पचणें अवघड होतें व त्यामुळें ॲनसेल्मची पद्धति त्या वेळेस प्रमुख म्हणून गणली गेली नाहीं. स्कोलॅस्टिक पद्धतीचा जनक वास्तवीक हा नसून ॲबेलार्ड (मृत्यु ११४२) हा फ्रेंच विद्वान होता त्यानें देखील प्रथम परंपरेवर भिस्त ठेवली पण परंपरागत तत्वांवरील श्रद्धेंतील दोष युक्तिवादात काढून टाकून दोहोंचा मेळ बसविण्याचें काम त्यान केलें, व अशा मतप्रतिपादनामुळ १२ व्या व १३ व्या शतकातील स्कूलमेनच्या संप्रदायाचा पाया व सामुग्री तयार केली. पीटर लोंबार्ड (मृत्यु ११६०), अलेक्झांडर ऑफ हेल्स (मृत्यु १२४५) ॲलबर्टस मॅग्नस (मृत्यु १२८०) व थॉमस ॲक्विनास (मृत्यु १२७४) हे या दोन शतकातील नामांकित विद्वान होत त्यांनीं ख्रिस्ती धर्माचीं तत्वें तर्कपद्धतीच्या कसोटीला लावून पाहिलीं व अशा रीतीनें त्यांनीं धर्ममतांची वाढ केली. संस्कारांबद्दलचें कॅथोलिक लोकांचें जें तत्व तें यांनीच प्रथमतः प्रस्थापित केलें.

मीमांसा व सूत्रें यांचा अन्योन्याश्रय—मीमांसेसारखें तत्वज्ञान आणि सूत्रकाल यांचा ख्रिस्ती वाङ्मयविकासात दिसून येणारा संबंध अन्यत्र सदृश वाङ्मयाचें पौर्वापर्य जुळवितांना विचार करण्याजोगा आहे. धर्मसूत्रें हीं स्कूलमेनच्या तत्वाची जुळी बहीण होय. ज्या वेळेस पीटर लोंबार्ड हा बायबलमधील वाक्यें नीटनेटकीं लावण्यात गुंतला होता, त्याच वेळेस ग्रेशियन हा सूत्राचा नवा समग्र करात होता. त्यानें जी महत्वाची गोष्ट केली ती धर्मग्रंथामध्यें जो परस्पर विरोधीपणा दिसून येतो तो आपण तर्कानें मिटविणें जरूर आहे असें प्रतिपादिलें व अशा रीतीनें धर्मसूत्रशास्त्राचा ग्रेशिअन हा जनक म्हणून प्रसिद्धीस आला

संन्यासधर्माचा विकास— नवीन वेदांतसंप्रदाय व नवीन धर्मसूत्रशास्त्राप्रमाणेंच या लॅटिन देशात भिक्षुपथाची स्थापना झाली. जे नवीन पंथ निर्माण झाले त्यांपैकीं पहिला पंथ सिस्टर्शिअनचा होता व त्यामध्यें पूर्वीचीच तत्वें अस्तित्वात होतीं ११२० मध्यें नॉरबर्ट यानें स्थापलेल्या प्रीमॉन्स्ट्रेटेन्शिअन पंथानें नवीनच तत्वें स्थापित केलीं. भिक्षूचें काम निवळ स्वत मोक्ष मिळविण्याचेंच नसून, दुसऱ्यांना ज्ञान देऊन त्यांची आत्मशुद्धि करणें हेंहि त्याचें काम होतें हीच कल्पना डॉमिनीकनें काढलेल्या (१२१८) पंथांत प्रामुख्यानें होती. तसेंच १२१० मध्य ल फ्रॅन्सिस्कन पंथांतहि हीच कल्पना होती कारण हा पंथ फिरत्या भिक्षूंचा स्थापन झालेला होता, व फ्रॅन्सिस्कनइतका दुसऱ्यासाठीं क्लेश सोसण्याच्या आवश्यकतेची खात्री कोणालाच पटली नव्हती दुसऱ्याची आत्मशुद्धि करणें हेंच त्याचें ध्येय होतें. याच कल्पनेबरोबर प्रत्येक भिक्षूनें नम्रपणा व दारिद्र्यहि पत्करिलें पाहिजे ही कल्पना त्यानें आणली. पूर्वीपासूनच स्वतःची मालमत्ता भिक्षूनें टाकून देण्याची वहिवाट अस्तित्वात होती पण फ्रॅन्सिस्कनची एवढ्यावरच तृप्ति झाली नाहीं त्याला भिक्षूला कोणत्याहि प्रकारचा म्हणजे चर्चमधील देखील मालमत्ता असू नये असें वाटत असे व या योगेंच ख्रिस्ताचा उपदेश पाळण्यासारखें होईल असें तो म्हणत असे याचा परिणाम इतका प्रचंड झाला कीं, डॉमीनिकन पंथानें लगेच या पंथाचीं तत्व स्वीकारिलीं.

यावरून लॅटिन देशामध्यें धर्माचें मूळ किती खोलवर रुजलेलें होत हें कळून येईल याचा आरंभ अकराव्या शतकात झाला व १२ शतकात या नवीन भूतदयामूलक चळवळीचा बर्नार्ड हा प्रमुख पुरस्कर्ता झाला त्यानें लोकांना ख्रिस्ताला भजण्यामुळें देव मिळतो असें शिकविलें त्याच्या समकालीन ह्यू व रिचर्ड यानीं दयामूर्ति असा जो ख्रिस्त त्याला शरण जाण्यास व परमेश्वराशीं अशा रीतीनें तादात्म्य पावण्यास शिकवलें. अशा रीतीनें या भूतदयेचें तत्व फक्त चर्चमध्येंच पसरलें असें नाहीं तर त्याबाहेर देखील त्याचा फार प्रसार झाला.

भूतदयेचें तत्व चर्चच्या नियमाविरुद्ध अगर उपाध्याच्या धर्माविरुद्धहि नव्हतें. अथवा साधुपूजा संन्यास अगर इतर तत्वानाहि त्यानें झिडकारलें नाहीं हें तत्व व्यवहारोपयोगी होतें. ह्या तत्वानेंच ख्रिस्ती धर्माच्या प्रसारासाठीं अनेक युद्धें घडवून आणलीं अकराव्या आणि बाराव्या शतकामध्यें, स्पेन व दक्षिण फ्रान्सनें मूर लोकाशीं 'धर्म-युद्ध' केलें. इ स. १०९६ मध्यें फ्रान्स, इंग्लंड इटलीमधील सरदार लोकानीं नास्तिक लोकांना हाकलून लावण्याच्या इच्छेनें लढाया केल्या व एका शतकापर्यंत अथवा अधिक, ख्रिस्तमय जग करण्याचा ध्वनी जिकडे तिकडे ऐकूं येऊ लागला होता.

पोपच्या सत्तेचा अधिक विकास—या सर्वांचा अर्थ असा कीं, धर्मसत्ता या वेळीं इतकी प्रबळ झाली होती कीं, याइतकी पूर्वीं कधींहि धर्मसत्ता दांडगी झाली नव्हती. चर्चचें महत्व फार वाटलें अर्थातच पोपच्या सत्तेवर याचा परिणाम झाल्यावाचून राहिला नाहीं. फ्रेडरिक (पहिला) व त्याचा मुलगा सहावा हेनरी या जर्मन बादशहांनीं, जर्मन साम्राज्याची सत्ता पोपवर देखील चालवण्याचा व पोपची सत्ता राजसत्तेहून खालच्या दर्जाची करण्याचा प्रयत्न केला. पण कर्मधर्मसंयोगानें फ्रेडरिकला अपयश येऊन ११७७ च्या व्हेनिसच्या तहानें पोपची सत्ता त्याला कबूल करावी लागली. अशा रीतीनें पोपची सत्ता, विरोधाचा नाश झाल्यावर वाढूं लागली व तिसऱ्या इनोसेंटच्या कारकिर्दींत (११९८-१२०२) पोपच्या

सत्तेचा कळस झाला इनोसेंट हा आपल्यास ख्रिस्ताचा प्रतिनिधि असें समजत असे व म्हणून ऐहिक व पारमार्थिक सत्ता आपल्या ताब्यात आहे असेंहि तो समजे, व यासाठीं त्यानें राजा राज्यपदावर आरूढ होण्याच्या वेळेस, त्यास राजपदाचा अधिकार धर्मगुरूकडून मिळण्याची पद्धत अमलांत आणली व जुने कायदे रद्द करण्याची व नवे करण्याची देखील सत्ता पोपला आहे असें त्यानें ठरवलें व वेळप्रसंगीं राजाला पदच्युत करण्याचाहि पोपचा अधिकार आहे असें त्यानें प्रतिपादन केलें या नवीन तऱ्हेच्या पोपच्या सत्तेला पुष्टि देण्यासाठीं कॅथोलिक धर्मपंथानें आपल्या धार्मिक कायद्यात थोडाफार फरक केला ११२३ पासून पुढें पोपनें साधारण सभा बोलावण्याची पद्धत सुरु केली व तिनें केलेले ठराव स्वतः संमति देऊन कायम करण्याची वहिवाट पाडली धर्माध्यक्षाची सांप्रदायिक नियमानीं निवडणूक न होतां धर्मोपदेशक मंडळीकडून त्याची निवड होऊं लागली पुढें कालांतरानें पोपच्या हातांत फौजदारी सत्ता देखील आली

अशा रीतीनें चर्चवर पोपची सत्ता पूर्णपणें स्थापित झाली पण पोपची ऐहिक सत्ता कायम टेवणें कठिण जाऊं लागलें फ्रेडरिक (दुसरा) याच्याशीं नववा ग्रेगरी व चवथा इनोसेंट यानीं केलेल्या लढायांत ग्रेगरीला व इनोसेंटला यश आलें नाहीं, व राजाच्या सत्तेत ढवळाढवळ करण्याचा पोपला मुळींच अधिकार नाहीं असें ठरलें व पुढें बोनीफेस (आठवा) व चवथा फिलिप यांच्यांत राजसत्तेबद्दल भांडण सुरू झालें त्यावेळेस बोनीफेसला राजसत्तेचें उच्चाटन करणें अशक्य आहे असें स्पष्ट रीतीनें आढळून आलें

मध्ययुगाचा शेवट व फाटाफूट —अशा रीतीनें पश्चिम चर्चच्या सत्तेचा कळस झाला असतांना ज्या ऐहिक व पारमार्थिक सत्तेच्या ऐक्यामुळें पश्चिमेकडील चर्चचें जीवित चाललें होतें त्यामध्यें बिघाड होण्याची चिन्हें दिसूं लागलीं व्यावहारिक राजसत्ता आपला योग्य तो हक्क मागूं लागली साम्राज्यसत्ता यावेळीं मंदावलेली होती तरी पण यामुळें छोटीं छोटीं राज्यें (विशेषतः इंग्लंड व फ्रान्स) स्थापन होऊन तीं भराभर वाढूं लागलीं पूर्वेकडे व्यापारामुळें अगर धर्मयुद्धामुळें दळणवळण वाढल्यानें बौद्धिक कल्पना वाढूं लागल्या, प्राचीन तत्वज्ञान व वाङ्मय यांचा अभ्यास पुन: जोरानें सुरू झाला आर्थिक अडचण चर्चच्या पुढें उभी राहिल्यामुळें चर्चवर याचा परिणाम झाला, व तो पोपच्या 'जगावरील सत्ते' वरहि होण्याचा रंग अधिकाधिक दिसूं लागला तात्विक दृष्ट्या ही सत्ता अद्यापि अढळ होती किंबहुना थोडी फार जास्तच समत झाली पण आठव्या बोनिफेसनंतर येणाऱ्या धर्मगुरूंनीं ही सत्ता व्यवहारांत आणण्याबद्दल विशेष खटपट केली नाहीं व एका दृष्टीनें तरी सत्ता व्यवहारांत आणणें अशक्यच झालें होतें कारण फ्रेंच साम्राज्यावर पोपला अवलंबून रहाणें भाग पडत असे तरी पण आतां तत्वाला देखील हळू हळू विरोध होऊं लागला फ्रान्समध्यें चवथ्या फिलिपच्या कायदे पंडितांनीं ऐहिक सत्तेचा पारमार्थिक सत्तेशीं काहींच संबंध नाहीं असें जाहीर केलें इटलीमध्यें डान्टेनें राजसत्तेची दृढ घेतली जर्मनींत चवथ्या लुईचे स्नेही मारीसिलियो व जॉन यानींहि शास्त्रीय रीत्या राजसत्तेचें वर्चस्व प्रतिपादन केलें व कॉन्स्टन्स विल्यमनें प्रसंग पडल्यास राजकीय सत्तेनें पारमार्थिक सत्तेत हात घालावा असें म्हणण्यापर्यंत मजल मारली

अशा रीतीचे विद्वान मंडळींचे विचार सुरू असतां या चर्चच्या सत्तेला विरोधी असणारा पक्ष बळावतच होता व याला कारणेंहि वरीच होतीं एक तर पोपची जमाबंदीची पद्धत फार वाईट होती, शिवाय धर्मसत्तेच्या संरक्षणादि हक्काचा दुरुपयोग होऊं लागला होता धर्माच्या नांवाखालीं वाटेल त्या अन्यायान्या गोष्टी होऊं लागल्या होत्या तरी पण पोपवर सत्ता गाजवण्याला कोणताहि उपाय नव्हता पण १३७८ मध्यें पोपच्या धर्मसत्तेतच दुफळी होऊं लागली, व या पोपच्या जागेसाठीं धडपडणाऱ्या प्रतिस्पर्ध्यांवरहि ताबा चालविणारी सत्ता असली पाहिजे अशी जरूर भासूं लागला आणि पोपवर देखील एक अधिकार मंडळ असावें अशी तजवीज करण्याचें ठरलें या मंडळाच्या हातांत सत्ता देण्यात यावी, अशा प्रकारची तजवीज सुचविणारे कानराड (मृत्यु १३९०), हाइनरिक (मृत्यु १३९७) हे जर्मन, व पिरे व जॉन हे फ्रेंच विद्वान होते या करितां पिसा येथें बोलावलेल्या सभेचा कांहीं उपयोग झाला नाहीं १४१८ मध्यें भरलेल्या सभेनें हें भांडण मिटवलें परंतु या सभेनें ठरवलेल्या सुधारणा यशस्वी झाल्या नाहींत सारांश पोपची सत्ता पूर्वीप्रमाणेंच अबाधित राहिली अशा रीतीनें कौन्सिलच्या योगानें चर्च सुधारण्याचा प्रयत्न फसला परंतु या अपयशामुळेंच हें चर्च सुधारण्याची फार जरूरी भासूं लागली तसेंच अनेक प्रसंगामुळें ती चळवळ जिवंत राहिली असें म्हणतां येतें पोप यूजेनियस (१४३१-४७) नें बॅसेलच्या कौन्सिलवर जय मिळवला पण कौन्सिलनें मंजूर केलेले ठराव फ्रान्सनें व जर्मनीनें मुळींच सोडले नाहींत अशा रीतीनें पोपची सत्ता थोड्या तरी अशानें अमान्य केली गेली

पोपची सत्ता अमान्य करणाऱ्या थोड्या फार चळवळी पूर्वीपासूनच झाल्या होत्या पण पोपची सत्ता त्या वेळेला फार बलाढ्य असल्यानें या चळवळी जवळ जवळ नामशेषच झाल्या होत्या. उलट पक्षीं फ्रान्समध्यें, जर्मनींत व सर्वत्र थोड्या फार चळवळी पोपच्या ऐहिक सत्तेच्या विरुद्ध अद्यापि होत्या असें म्हटलें तरी हरकत नाहीं इंग्लंडमध्यें ल्यूथरच्या पूर्वी पहिला विरोधक जॉन विक्लिफ यानें प्रथमतः उपाध्यायावर व पोपच्या सत्तेवर कडकडीत टीका केली पोपचें चर्च ही धार्मिक व मोक्षाचें ज्ञान देणारी संस्था राहिली नसून एक राजकीय संस्था झाली आहे असें त्यानें प्रथम सांगितलें या विक्लिफच्या कल्पना यूरोपमध्यें प्रसार पावताच

बोहेमियामध्यें एक प्रकारची चळवळ उठून गेली. कौन्सिल ऑफ कॉन्स्टन्सनें विक्लिफची शिकवणूक चुकीची आहे असें प्रतिपादून व ह्यासचा शेवट करून ही चळवळ हाणून पाडण्याचा यत्न केला. पण याच्या योगानें कार्यभाग न होतां उलट त्या चळवळीला जोरच आला.

ही चळवळ अगदीं उघड उघड होती. पण याहीपेक्षा दुसरी एक चळवळ अस्तित्वात होती तिनें कधीं उघडपणें विरोध केला नव्हता. ही चळवळ १४ व्या शतकात इटली-मध्यें जन्मास आली. या चळवळीच्या पुरस्कर्त्यांचा उद्देश चर्चच्या सत्तेपासून आपले जगातील व्यवहार सोडविण्याचा होता. त्यांनां ऐहिक शिक्षण मिळवून जगात चैन करावी व जगाचा पूर्ण उपभोग घ्यावा अशी इच्छा होती. व अशा रीतीनें पोपच्या व यांच्या मतामध्यें पुष्कळसा विरोध होता. ह्या ' रेनायन्सस 'च्या चळवळीचें इटालीमधील स्वरूप उत्तरे-कडच्या देशांतील या चळवळीच्या स्वरूपासारखें नव्हतें तरी पण या दोन्ही चळवळी पोपच्या सत्तेला नामशेष करण्याचा प्रयत्न करीत होत्या यांत शंका नाहीं.

डन्स स्कॉटस (मृ. १३०८) च्या वेळेपासून ईश्वरविषयक शास्त्रावरील विद्वानांना आरिस्टॉटलच्या तत्वज्ञानामध्यें व धर्म-मतामध्यें व्यंग आढळून आलें होतें. तर्कपद्धतीवरील श्रद्धा अशा रीतीनें उडूं लागली. व ' फिलासफिक नॉमिनॅलिझम ' नावाचा एक सिद्धांत गृहीत धरणाऱ्या पद्धतीनें या तर्क-पद्धतीचें उच्चाटन केलें. या पंथाचा मुख्य पुरस्कर्ता वुइल्यम ऑफ ओकॅम हा होता. पण हा सिद्धांत नवीन ईश्वरविष-यक ज्ञानाची स्फूर्ति देणारा नव्हता.

याशिवाय गूढविद्या वगैरेसारख्या विद्याहि पूर्वीची पोपची सत्ता पुनः मिळवून देण्याला असमर्थच होत्या.१५ वें शतक निरनिराळ्या धार्मिक विषयावर भल करण्यातच गेलें; व अंततः विसावा कांहीं मिळाला नाहीं.

कौन्सिलचे नियम पोपनें मोडून आपली सत्ता त्याच्यावर लादून आपलें स्वतःचें एक कौन्सिल त्यानें बोलावलें. त्याचें पहिलें कौन्सिल फेरारा येथें जमलें व दुसरें फ्लारेन्स येथें जमलें. फ्लारेन्सच्या कौन्सिलमध्यें त्याला पुष्कळच यश आलें. अकराव्या शतकामध्यें पूर्व व पश्चिम चर्चमध्यें भांडणें झाल्या-मुळें रोम व कॉन्स्टांटिनोपलमधील धार्मिक बंधनें पार तुटलीं होतीं; व ही स्थिति १०५४ पर्यंत होती. पण फ्लारेन्स-मध्यें त्या दोन्ही चर्चेची एकी झाली.इ.स.१५१२मध्यें दुसऱ्या ज्यूलियसनें एक सार्वजनिक सभा बोलावून पोपची सत्ता ख्रिस्ती जगावर जाहीर केली.

परंतु या धर्मसत्तेचे या वेळचे प्रमुख व पूर्वीच्या वेळचे प्रमुख निराळे होते. आठवा इनोसेंट, दुसरा ज्यूलियस हा जरी प्रसिद्ध व्यक्ति होऊन गेले तरी पण त्यांनीं ख्रिस्ती संप्रदाय ज्याकडे मोठें पार दुर्लक्षच केलें. १४९८ मध्यें फ्लारेन्समध्यें सॅव्होनॅरोलचा खून त्यांच्या चिथावणीमुळें झाला व ही अतिशय निंद्य गोष्ट पुढें फार भोंवली.

सॅव्होनॅरोलच्या मरणानंतर वीस वर्षांनीं मार्टिन ल्यूथरनें ' इंडल्जन्सेस ' विरुद्ध लेख लिहिले. इंडल्जन्स याचा अर्थ चर्चला पैसा देऊन पातकें करण्यास मोकळीक मिळविणें असा होता. अशा रीतीनें 'सुधारणेची'चळवळ सुरू झाली.ही चळवळ एक तऱ्हेनें पोपच्या धर्मसत्तेला फायदेशीरच झाली. कारण त्या योगें तरी पोपच्या धर्मसत्तेला आपलीं खरीं कर्तव्यें ओळखणें भाग पडलें व ट्रेंटच्या कौन्सिलनें प्रॉटेस्टंट धर्मा-वरून अर्वाचीन कॅथोलिक धर्माची मध्ययुगीन मतांच्या पायावर स्थापना केली.

अर्वाचीन चर्च.—ट्रेंट येथील कौन्सिलमध्यें म्हणजे १५६४ मध्यें जीं तत्वें निश्चित झालीं त्यामुळें ख्रिश्चन चर्चच्या इतिहासाला एक नवीनच पण निश्चित असें धोरण लागलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्या वेळेपर्यंत पूर्वदेशीय चर्चमध्यें व पश्चिमदेशीय चर्चमध्यें जरी पुष्कळ भांडणें झालीं तरी सुद्धा चर्चच्या मूलभूत तत्वाची अगर संघटनेच्या दृष्टीनें सनातनत्वाची कल्पना दोघानांहि पूर्णपणें होती. धर्मसुधारकांना देखील कॅथोलिक धर्मांतील मध्ययुगीन व्यंगें काढून टाकण्याचीच इच्छा असल्याकारणानें त्यांना दुसरा धर्म व दुसरीं चर्चें प्रस्थापित करण्याची इच्छा नव्हती. पश्चिम युरोपमध्यें जी चर्चमध्यें फाटाफूट झाली ती या सुधारणेच्या चळवळीमुळें झाली नसून राजकीय गोष्टींमुळें झाली होती. त्यावेळेस प्रत्यक्ष तत्वामध्यें कांहीं फेरबदल करण्याचा रोमन चर्चकडून रंग दिसेना, त्यावेळीं सुधारकांनीं राजे लोकांकडे धाव घेतली, व छोटया छोटया संस्थानच्या राजांनीं आपल्या देशकालपरिस्थितीला जुळेल त्या मानानें धर्माचा स्वीकार केला. अशा रीतीनें सर्व यूरोपभर कॅथोलिक चर्चचे लहान लहान स्वतंत्र व स्थानिक तुकडे होऊन चर्चचे निराळे घटक होऊं लागले व जसजसे राष्ट्राराष्ट्रामध्यें तटके उडत गेले त्या त्या मानानें त्या त्या राष्ट्रामधील चर्चोचा संबंध कमी कमी होऊं लागला.इ. स. १६४८ मधील वेस्ट फालिआच्या तहानें ही चर्चची स्थानिक घटना दृढमूल झाली. ही पद्धत इंग्लंड व स्कॉटलंडमध्यें पूर्वीच स्थापित झाली होती. दक्षिण-जर्मनीमध्यें, बोहेमियामध्यें व पोलंडमध्यें सुधारणेच्या चळवळीविरुद्ध मिशनरी लोकांनीं चळवळ चालू ठेवल्यानें ती पद्धत सेर्थ विजयी झाली नाहीं. तरी पण या पद्ध-तीला ट्रेंटच्या कौन्सिलनें ठरविलेल्या तत्वामुळें दुजोरा व चलन मिळालें. परंतु ड्रिडेन्टाईन येथें ठरलेल्या निकाला-मुळें नवीन व जुन्या धर्मामध्यें समेट होण्याची आशा राहिली नाहीं. रोमन चर्चनें या सुधारकांचा संप्रदायतत्वांत फेर करण्याचा हट चालूं दिला नाही व स्कूलमेनची जी कल्पना होती तीच चर्चची सत्ये म्हणून अंमिकारण्यांत आली. रोमन ' मण्पत्ती संघटने ' चें तत्व स्वीकारून व सांगलें

काम करून सर्व पश्चिम यूरोपभर ज्या लॅटिन चर्चनें सत्ता-पर्यंत ताबा चालविला होता त्याचा सर्व वाढ, पाद्री व कला या बाबतींत वाढत जाणाऱ्या ग्रीकांशीं विरोध वाढत चालला, व पुढें पुढें १०५४ मध्यें सर पोपनें त्या चर्चवरहि बहिष्कार घातला. जगाच्या व्यापक स्वरूपाच्या दृष्टीनें पहातां प्रॉटेस्टंट चर्चप्रमाणेंच पण फार मोठें वजन असलेलें असें रोमन चर्च आहे असें म्हटलें असतां वावगें होणार नाहीं. व जगांतील प्रत्येक चळव-ळीच्या घडामोडींत अर्वाचीन चर्च पूर्ववत भाग घेत नाहीं असें म्हटलें तरी चालेल. अशी जेथ रोमन चर्चची स्थिति तेथें सुधारणेच्या चळवळीमुळें जे काहीं किरकोळ पंथ अस्तित्वांत आले होते त्याची काय स्थिति सांगावी ! या पंथांतील अँग्लिकन चर्च कॅथोलिक संघटनेला चिकटून राहिलें व आपण कॅथोलिक चर्चच्या तीन शाखांपैकीं एका शाखेचे आहोंत असें त्यांनीं प्रतिपादन केलें पण रोमनचर्चनें तें मान्य केलें नाहीं. यूरोपभर पसरलेलीं दुसरीं काहीं प्रॉटे-स्टंट चर्चें होतीं, त्यांनीं तसा काहीं आपला हक्क सांगितला नाहीं. पण त्यांचीं तत्वें जवळ जवळ रोमन चर्चच्या तत्वा-सारखींच होतीं. त्यांना बायबल काय तो प्रमाणभूत ग्रंथ होता व त्याची संघटना, ही राजाच्या अंमलाखालीं होती, थोडक्यात म्हणजे तीं स्थानिक चर्चें होतीं. याच्याहि पुढची तिसरी वाट म्हणजे ' स्वतंत्र चर्चाची ' स्थापना होय. ह्या नवीन कल्पनेचा गंध देखील पूर्वीच्या सुधारकांना नव्हता म्हटलें तरी चालेल.या नवीन चर्चच्या मतें कॅथोलिक चर्च हें एका विशिष्ट पंथाचेंच नसून जगामध्यें जितक्या प्रकारचे ' श्रद्धावान धार्मिक लोक ' आहेत त्यांचें आहे. कोण-ताहि मनुष्य वाटेल त्या मताचा असला तरी त्याला पुढें मागें इतर धर्मांमध्यें जातां येईल अथवा दुसऱ्या मतांचा स्वीकार करतां येईल असें या नवीन पंथाचें म्हणणें होतें. म्हणजे हा पंथ चर्चपेक्षा व्यक्तीला जास्त मान देत होता असें म्हटलं तरी चालेल हें मत आजकाल अमेरिका, ग्रेटब्रिटन वगैरे देशांत फार मान्य आहे व त्यामुळें अनेक पंथ निर्माण झाले आहेत. वरील माहितीवरून हें सहज करून येईल कीं, अर्वाचीन चर्चच्या इतिहासाची सगळवार माहिती देणें शक्यच नाहीं. कारण चर्चच्या इतिहासाचा प्रवाह हा फार भिन्न भिन्न झालेला आहे व त्याचे अनेक प्रवाह झालेले आहेत. फक्त हे सर्व पंथ 'ख्रिश्चन धर्म' या सर्वसामान्य नांवाखालीं मोडतात एवढेंच काय तें त्यांत साम्य आहे.

विचारघटना आणि मतप्रसार'—ख्रिश्चॅनिटी ऊर्फ ख्रिश्चन धर्म याची सुटसुटीत शब्दांत व्याख्या करावयाची म्हटल्यास असें म्हणतां येईल कीं ख्रिश्चन धर्म म्हणजे ख्रिस्तप्रणीत धर्म होय. पण ही व्याख्या दोषरहित नाहीं. कारण ख्रिश्चनधर्माची हल्लींची कल्पना ख्रिस्तानें प्रतिपादन केलेल्या धर्माहून अधिक व्यापक आहे. बौद्ध धर्माची व्याख्या ' बुद्धप्रणीत धर्म ' एवढीच त्याप्रमाणें करून भागणार नाहीं त्याचप्रमाणें ख्रिश्चन धर्माचीहि स्थिति आहे. कारण ख्रिस्तानें प्रतिपादन केलेल्या धर्माहून इतर तत्वांची पुष्कळ भरती होऊन हल्लींचा ख्रिश्चन धर्म बनलेला आहे. हल्लींच्या ख्रिश्चन धर्माची व्याख्या, ' ख्रिस्ताद्वारें ज्यामध्यें मनुष्याचा व देवाचा संबंध निश्चित करणारा नैतिक असा नीतितत्वांचें विवेचन करणारा, सार्वत्रिक, एकेश्वरी, जगातील दुःखापासून सोडविणारा, ऐतिहासिक धर्म' अशी करतां येईल.

वर दिलेल्या व्याख्येंतील प्रत्येक शब्द महत्त्वाचा आहे. व प्रत्येक शब्दावर पृथक् विवेचन करतां येण्यासारखें आहे. ख्रिश्चन धर्म हा सार्वत्रिक धर्म आहे असें म्हणण्यांत येतें. एका अर्थानें हें म्हणणें खरें आहे व एका अर्थानें खोटेंहि आहे ख्रिस्त या व्यक्तीनें प्रतिपादन केलेला हा धर्म असल्यामुळें याला सार्वत्रिक धर्म म्हणणें गैर होईल. बौद्ध धर्म, इस्लामी धर्म हे ज्याप्रमाणें सार्वत्रिक धर्म नाहींत त्याचप्रमाणें हा ख्रिश्चन धर्महि सार्वत्रिक नाहीं. पण यांतील मुख्य तत्वें जगातील कोणत्याहि राष्ट्रांतील माणसांना आपली जातीयता न सोडतां स्वीकारतां येण्यासारखीं आहेत असें या ख्रिश्चन धर्मीयांचें म्हणणें असल्यानें या धर्माला सार्वत्रिक धर्म असें संबोधण्यांत येऊं लागलें आहे. वास्तविक कोणत्याहि धर्माचीं सामान्य तत्वें हीं सार्वत्रिक स्वीकार होण्याला योग्य असतात व अशा रीतीनें विचार केल्यास ख्रिश्चन धर्माला सार्वत्रिक धर्म असें नांव देण्यांत काहींच वैशिष्ट्य उरत नाहीं

काहींच्या मतें ख्रिश्चन धर्म हा स्वाभाविक धर्म आहे. पण याहि म्हणण्यांत काहीं अर्थ नाहीं. जगांतील कोणताहि पंथ स्वाभाविक नाहीं.परिस्थितीच्या दडपणानें धर्मानें ही रूपें घ घावलें. ख्रिस्तानें जो धर्म प्रतिपादन केला तो केवळ स्वयं-स्फूर्त असा धर्म नसून त्याच्या मुळाशीं त्याच्या पूर्वी होऊन गेलेल्या धर्मांतील तत्वें होतीं. ख्रिस्तानें परिस्थितीप्रमाणें व आपल्या दैवी स्फूर्तीनें त्याला नवीन वळण लावून त्यांत नवीन तत्वांची भर घालून तो ओळखणी केला. आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या भविष्यवाद्यांची उर्फ धर्मप्रचारकांचीं तत्वें व तीं विशद करण्याकरितां वापरलेले शब्द हे त्यानें जसेच्या तसे कायम ठेवले. फक्त त्या शब्दांना त्यानें नवीन अर्थानें उपयोग करण्यास सुरवात केली सारांश ख्रिश्चन धर्माची भूमिका ही ख्रिस्तनिर्मित नसून ख्रिस्तपूर्व धर्मप्रतिपाद-कांच्या तत्वांची होती असें दिसून येतें.

ख्रिश्चन धर्माची प्राणप्रतिष्ठा आशियाखंडांत झाली. पण थोड्याच काळांत त्याचा प्रसार रोमनसाम्राज्यांत व त्याच्या पलीकडे असलेल्या राष्ट्रां मधील झाला. चौथ्या शतकांत रोमन साम्राज्य हें ख्रिश्चनधर्मीय बनलें व त्याचा परिणाम असा झाला कीं सर्व पश्चिम जगांत ख्रिश्चनधर्म यूरोपियन लोकांनीं जेथें जेथें वसाहती केल्या तें

आपला धर्म बरोबर नेला. पण पौरस्त्य देशांत त्याच्या धर्माचा प्रसार झाला नाहीं व होणें शक्यहि नव्हतें. कारण या वेळीं आशियाखंडात इस्लामी धर्माचें प्राबल्य होतें.

ख्रिश्चनधर्म हा व्यक्तिप्रणीत धर्म असल्यानें ख्रिस्त व त्याचें चरित्र यांच्याशीं त्या धर्माचा निकट संबंध येणें स्वाभाविकच आहे. किंबहुना त्याचें चरित्र हें त्यानें प्रतिपादन केलेल्या तत्वाचा मूर्तिमंत आदर्शच होय असें म्हटलें असता वावगें होणार नाहीं. पण आपल्या इकडील अवतारी पुरुषाप्रमाणेंच त्याच्याहि चरित्रांत बऱ्याच अतिमानुष गोष्टी भरल्या असल्यानें, त्यानें प्रतिपादन केलेलीं धर्मतत्वें त्यांतील गोष्टीमुळें प्रामुख्यानें नजरेस येत नाहींत. खुद्द त्याच्या शिष्यानांहि त्याचा दैवी संदेश कळला नाहीं. ख्रिस्ताचें गुन्हेगार या नात्यानें मरण व त्याचें पुनरुत्थान या गोष्टींमुळें ज्यू लोकांना आपल्या धर्मांत सांगितलेला 'मेसाया' म्हणजे हाच असें वाटूं लागलें व हे ज्यू लोक त्याच्या तत्वापेक्षा ख्रिस्त या व्यक्तीलाच मान देऊं लागले. ख्रिस्ताच्या तत्वावर सेंट पाल यानें प्रथमत: प्रकाश पाडला, पण त्याचें म्हणणें हे ज्यू लोकांना पटेना व ज्यू लोकांनीं ख्रिश्चन धर्माचा त्याग केला.

अशा रीतीनें ज्यू लोकांनीं या धर्माचा त्याग केला तरी ख्रिश्चन धर्म हा खुंटला न जाता उत्तरोत्तर प्रसारच पावूं लागला, व रोमन साम्राज्यांत तर या धर्माचा फारच झपाट्यानें प्रसार झाला. पण त्याच्या प्रसाराबरोबरच त्या धर्मांतील तत्वानांहि निराळें स्वरूप प्राप्त झाल्याशिवाय राहिलें नाहीं. रोमन साम्राज्यांत त्यावेळीं ग्रीकांचा समावेश होत असे. ग्रीक लोकांत ख्रिस्ताच्या पूर्वीपासूनच तत्वज्ञानाचा उदय झाला होता. हे जग कोणी निर्माण केलें, ईश्वराचें स्वरूप काय आहे वगैरे अनेक गहन प्रश्नावर त्याच्यांत विचार चालू झालेले होते. प्लेटो, ॲरिस्टॉटल यासारख्या तत्वज्ञानीं ईश्वरप्राप्ति ही सामान्य माणसाच्या आटोक्यांत नसून ज्ञानी माणसालाच ती शक्य आहे असें प्रतिपादन केलें होतें. दुसऱ्या काहीं तत्वज्ञानीं ईश्वर हा सर्वत्र पसरला आहे असें प्रतिपादन केलें होतें. तात्पर्य ग्रीक लोकांत या काळीं अनेक तत्वज्ञानपंथ निर्माण झाले होते. ग्रीक लोकांची ही तत्वज्ञानविषयक चळवळ बौद्धिक होती; त्यामुळें सामान्य लोकांना त्यांत विशेष आस्था वाटण्यासारखें काहींहि नव्हतें सामान्य लोक मनास पटेल त्या तऱ्हेनें एकेश्वरी पंथाचे अगर अनेकेश्वरी पंथाचे अनुयायी झाले होते. ग्रीक तत्वज्ञानांत श्रद्धेचा ओलावा नव्हता, व सामान्य लोकांना आपलें म्हणणें पटवून देण्याचा सहेतुक प्रयत्न या ग्रीक तत्वज्ञानीं केला नाहीं. अशी स्थिति ग्रीक लोकांत व तत्कालीन रोमन साम्राज्यांत होती. अशा आणीबाणीच्या वेळीं ख्रिश्चन धर्माचा रोमन साम्राज्यांत चंचुप्रवेश झाला व त्याचा प्रसार झाला.

या झटपट प्रसाराचीं कारणें उघडच होतीं. रोमन साम्राज्यांत विचारी माणसें व सामान्य माणसें यांच्यांत वर सांगितल्याप्रमाणें फारकत झाली होती. सामान्य लोकांना कोणता पंथ स्वीकारावा यासंबंधीं सुचेनासें झालें होतें. अशा स्थितींत 'तूं माझ्यावर विश्वास ठेव म्हणजे तूं माझ्याप्रत पोहोंचशील' असें ठासून प्रतिपादन करणारा, सामान्य जनाच्या बुद्धीला पटणारा असा धर्म तत्काल लोकप्रिय व्हावा यांत आश्चर्य नाहीं. पण सामान्य जनांना ज्याप्रमाणें हा धर्म प्रिय झाला त्याचप्रमाणें तत्वज्ञानांहि या धर्मांत, त्यांना भावावून टाकणाऱ्या तात्विक प्रश्नांचें उत्तर आहे असें आढळून आलें. ईश्वराचा व मनुष्याचा परस्परसंबंध काय आहे, आत्म्याचा व जड देहाचा तसेंच परमात्म्याचा व जीवात्म्याचा कशा प्रकारचा संबंध आहे या गूढ प्रश्नांचें उत्तर ख्रिस्त धर्मांत त्यांना सांपडलें. पॉलनें व त्याच्या काळच्या इतर विद्वानांनीं ख्रिस्त हा परमेश्वराचा मानसपुत्र आहे व त्याच्या द्वारें परमेश्वर हा जगाच्या उद्धारार्थ अवतीर्ण झाला आहे असें सांगण्यास सुरवात केली होती. ग्रीक तत्वज्ञानीं ही अवताराची कल्पना या धर्मांतून घेतली. परमेश्वर हा पृथ्वीपासून अमित अंतरावर आहे तो ज्ञानसागरच आहे या तत्वाच्या जोडीला, परमेश्वर हा मनुष्यप्राण्याच्या उद्धारार्थ, या पृथ्वीवर प्रकट होतो हें तत्व प्रतिपादन करण्यास त्यानीं सुरवात केली व परमेश्वर व भू मात्र यांच्यामध्यें ख्रिस्त हा दुवा आहे असें सांगण्यास आरंभ केला. अर्थात याचा परिणाम पुढील ग्रीक तत्वज्ञावर अतिशय झाला. पण त्याचबरोबर ग्रीकांच्या विचारसरणीचा परिणामहि ख्रिश्चन धर्मावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. तात्पर्य ख्रिश्चन धर्माचें अंतरंग म्हणजे ज्यू लोकांच्या धर्मस्थापकाची सुधारून वाढविलेली आवृत्ति होय. व ग्रीक विचारपद्धति ही त्या धर्माचें बाह्य स्वरूप होय असें म्हणावयास हरकत नाहीं.

त्रैतत्व ( ट्रिनिटी मत ).— ज्यू लोकांत परमेश्वर हा सर्व जगाचा पिता आहे असें मानीत असत. ख्रिस्त हा मेसाया अगर प्रेषित असून तो परमेश्वराचा मानसपुत्र होय, असें त्याचें मत होतें. 'आत्मतत्व' हा शब्द देखील त्याच्या ग्रंथांत वारंवार वापरलेला आढळून येतो. स्वतः ख्रिस्तानें 'आत्मतत्व' उर्फ स्पिरिट हा शब्द कधींच वापरला नाहीं. सेंट पॉलनें जरी हा शब्द वापरला होता तरी त्यानें हा शब्द कोणत्या अर्थानें वापरला हें स्पष्ट होत नाहीं. पण ग्रीक लोकांच्या तात्विक विचारसरणीचा ख्रिस्तमतानुयायांना परिचय झाल्यामुळें त्यांनीं ग्रीक पद्धतीनें वरील प्रश्न सोडविण्यास सुरवात केली 'परमेश्वर हा एकमेवाद्वितीयम्, अज, अनंत, असून, या नश्वर व सांत जगतात तो अंशरूपानें अवतरला असून सर्व मनुष्यजातीमध्यें तो आत्मस्वरूपांत वास करतो' अशा तऱ्हेनें त्यांनीं परमेश्वर, पुत्र व आत्मतत्व या तीन्ही कल्पनांची सांगड घातली.

तात्विक दृष्ट्या अशा तऱ्हेनें तीन्ही तत्वांचा मेळ जमला व याला त्रैताचें तत्व असें नाव पडलें धार्मिकदृष्ट्या

देखील या त्रैततत्त्वाचें महत्व कायम राहिलें. परमेश्वर हा ख्रिस्ताच्या रूपानें सर्व प्रजांच्या उद्धारार्थ आला आहे, व ख्रिस्ताच्या स्वरूपात सर्वांनीं परमेश्वराला भजलें असता जगातील पापापासून मनुष्याचा आत्मा मुक्त होतो अशी धार्मिक दृष्ट्या उपपत्ति लावण्यात आली. अशा रीतीनें तत्वज्ञाच्या तात्विक दृष्टीनें व श्रद्धाळू लोकांच्या धार्मिक दृष्टीनें हें त्रैततत्त्व दोषरहित व सर्वमान्य ठरलें

त्रैततत्त्व ख्रिश्चन धर्मांतील सर्वांत महत्त्वाचें तत्व समजण्यात आल्यामुळें त्या तत्वावर निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळीं मार्में काढावीत हें स्वाभाविकच आहे. कांहींना ख्रिस्ताच्या स्वरूपात परमेश्वराला भजणें पसंत नाहीं ख्रिस्त हा केवळ मार्गदर्शक महात्मा असून त्यानें जो मार्ग दाखविला त्या मार्गानें म्हणजे शुद्ध आचारविचारानें वागलें असता परमेश्वरस्वरूपीं लीन होता येतें व हेंच मनुष्याचें अंतिम ध्येय होय असें त्यांचें मत आहे. इतर कांहीं लोकांच्या मतें, हीं तिन्हीं तत्त्वें स्वतंत्र असून परमेश्वराच्या ठायीं एकसमयावच्छेदेंकरून वास करितात.

मुक्तितत्व.—या त्रैततत्त्वाच्या इतकेंच किंबहुना कांहींच्या मतें अधिक महत्वाचें तत्व म्हटलें म्हणजे मुक्तितत्त्व होय. याला इंग्लिशमध्यें 'डॉक्ट्रिन ऑफ दि क्रॉस' असेंहि म्हणतात. ख्रिस्ताला सुळावर चढविण्यात आलें व तें सुद्धा गुन्हेगार म्हणून. परमेश्वर हा जर सर्व जगाचा शास्ता आहे तर ही गोष्ट देखील त्याच्याच इच्छेनें घडून आलेली असली पाहिजे ख्रिस्तासारख्या भक्ताला सुळी चढविण्यात परमेश्वराचा काय हेतु असावा असे विचार प्रत्येकाच्या मनात येणें स्वाभाविकच होतें. तेव्हां या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर देणें अत्यावश्यकच होऊन बसलें. अर्थात पुष्कळांनीं पुष्कळ तऱ्हेनें या प्रश्नाचें उत्तर देण्याचा प्रयत्न केला. त्यांतील महत्वाचें उत्तर म्हणजे ख्रिस्त हा स्वतःच्या अपराधाकरितां मेला नसून मनुष्य जातीच्या पापाकरितां बळी गेला हें होय. ख्रिस्त हा पापी लोकांचें पाप वहाणारा देवाचा दूत आहे असें इसैयामध्यें म्हटलेलें आहे.

पण या उत्तरानें वरील प्रश्नाचा उलगडा समाधानकारक तऱ्हेनें होत नाहीं. परमेश्वर हा जर परमदयाळू आहे तर तो पापी माणसांना क्षमा कां करीत नाहीं? पापी माणसासाठीं ख्रिस्तानें सुळीं जावयाचें काय कारण? इत्यादि अनेक प्रश्न उद्भवतात व वरील उत्तरानें हे प्रश्न सुटले जात नाहींत. पण धर्मग्रंथात या प्रश्नांना उत्तरें देण्याचा प्रयत्नहि झालेला दिसत नाहीं सेंटपॉलनें मात्र या प्रश्नांना निराळ्या तऱ्हेनें उत्तर देण्याचा प्रयत्न केला. स्वार्थत्यागाचा ख्रिस्त हा अत्युच्च आदर्श असून त्यागाची परमोच्च कल्पना ख्रिस्तामध्यें केंद्रीभूत झाली आहे; धर्मगुरु व त्याग हीं ख्रिस्ताचीं दृश्य स्वरूपें असून साक्षात्कार होण्याच्या समयाला हीं बाह्य स्वरूपें नाहींशीं होतात असें सेंट पॉलनें वरील प्रश्नाचें धार्मिक दृष्टीनें उत्तर दिलें आहे. याशिवाय इतर विद्वानांनीहि ख्रिस्ताच्या मरणाविषयीं आपापले तर्क लढविले आहेत. ख्रिस्ताचें मरण म्हणजे क्रॉसवरील वध अगर सैतानाला संतुष्ट करण्याकरता दिलेली लांच असें ओरिजेन म्हणतो, तर मनुष्याची जी च्युति झाली ती नाहींशी करून मनुष्याला पुन्हा पूर्वीच्या स्थितीत आणण्याचें तें साधन आहे असें हेनियस म्हणतो व मनुष्यानें परमेश्वराच्या आज्ञेचें उल्लंघन केल्याचें प्रायश्चित असें ॲनसेल्म आणि रिफॉर्मर्स म्हणतात परमेश्वराचें राज्य पृथ्वीवर प्रस्थापित व्हावें यासाठीं मनुष्याला केलेली शिक्षा असें सोसिनसनें म्हटलें आहे मनुष्याच्या स्थितीविषयीं परमेश्वराला वाटत असलेली सहानुभूति असा बुशनेलनें तर्क लढविला आहे. अशा एक ना दोन अनेक तऱ्हांनीं ख्रिस्ताच्या मरणाचें खरें रहस्य काय आहे हें उकलण्याचा विद्वानांनीं प्रयत्न केला आहे.

मुक्तीचा मार्ग व त्याच्यासंबंधींचे निरनिराळ्या विद्वानांनीं केलेले तर्क याबद्दलचें वर विवेचन केलें आता मुक्तिकल्पनेसंबंधीं थोडा विचार करणें जरूर आहे. रोमनसाम्राज्यात ख्रिस्ती धर्माचा पूर्ण प्रसार होण्यापूर्वी ख्रिस्त हा मेसाया असून, त्याचें आदर्शभूत राज्य पृथ्वीच्या पाठीवर प्रस्थापित होणार या तत्वावर व ख्रिस्ताच्या पुनरुत्थानावर तत्कालीन लोकांचा पूर्ण विश्वास होता. पण रोमन साम्राज्याच्या काळात या तत्वावरील लोकांचा विश्वास उडत चालला. पृथ्वीवर देवाचें राज्य होणार व त्यामुळें सर्व जगाचा उद्धार होणार ही मुक्तीच्या संबंधींची कल्पना जाऊन साधु पुरुषाचें आकाशातील बापाच्याकडे गमन म्हणजे मुक्ति होय अशी नवीन कल्पना उदयास आली. तसेंच 'ख्रिस्ताचें पुनरुत्थान' याचा अर्थ ख्रिस्त हा पुन्हा खरोखर जिवंत होणार असा नसून, आत्म्याचें अमृतत्व सिद्ध करण्यासाठीं वरील शब्दयोजना रूढ झाली असा करण्यात येऊं लागला. जगाच्या अंतीं सर्व लोक पुन्हा जिवंत होऊन त्याच्या पापपुण्याचा निवाडा जगाच्या शेवटच्या दिवशीं होणार ही कल्पना मात्र नाहींशीं झाली नाहीं. ख्रिस्तीधर्मामध्यें जे विचार करणारे विद्वान होते त्यांनीं वरील मुक्तिकल्पनेचा लाक्षणीक अर्थ करण्यास सुरवात केली. पृथ्वीवर देवाचें राज्य लवकरच होणार याचा अर्थ, ख्रिस्ताच्या तत्वाचा जगभर प्रसार होणार असा करण्यास त्यांनीं सुरवात केली. पापी मनुष्याला नेहमीं यातना भोगावयास लागतात अशी कल्पना ख्रिस्ती लोकात पूर्वी होती पण ही कल्पना हळू हळू नाहींशी होत चालली असून तिच्या जागीं परमेश्वर हा परमकारुणिक असल्यामुळें तो कोणालाहि कायम नरकात टाकणार नाहीं ही कल्पना रूढ झाली. तसेंच स्वतःच्या आत्मोन्नतीपुढें सर्व जग हें तुच्छ आहे ही विचारसरणी अस्तित्वात आली

धर्मसंस्कारः—ख्रिश्चन चर्च हें ख्रिस्ताचें भौतिक शरीर असून त्यामध्यें ख्रिस्ताचा आत्मा वास करतो अशी

ख्रिस्ती लोकांची भावना असे. ख्रिस्ती लोकांची चर्चविषयीं अशी भावना असल्यामुळें चर्चसंस्थेला फार महत्व प्राप्त झालें कालांतरानें या चर्च संस्थेनें ख्रिस्ती लोकांनीं कोणते धर्मसंस्कार पाळणें आवश्यक आहे याबद्दल नियम करण्यास सुरवात केली. रोमन कॅथोलिक पंथाच्या मतें प्रत्येक ख्रिस्ती मनुष्याचे सात संस्कार झाले असले पाहिजेत. या सात संस्कारांमध्यें बाप्तिस्मा व प्रभुभोजन हे मुख्य संस्कार होत. या बाप्तिस्म्याच्या संस्कारामुळें मुलाच्या जन्माबरोबर जे कांहीं दोष आले असतील त्याचा परिहार होतो असें रोमन कॅथोलिक पंथाचें मत आहे. प्रॉटेस्टंट लोकाच्या मतें हा संस्कार म्हणजे प्रत्येक मूल ख्रिस्ताच्या कृपेला पात्र आहे याची बाह्य खूण असून,आईबापांनीं आपलें मूल देवाला अर्पण केल्याचा हा संस्कार निदर्शक होय. प्रभुभोजनाच्या संस्कारामुळें मनुष्याच्या पंचमहाभूतात्मक देहाचें ख्रिस्ताच्या शरीरात व रक्तात रूपांतर होतें असें रोमन कॅथोलिक पंथातील लोकांचें म्हणणें आहे. ल्यूथरच्या पंथाच्या मतें या संस्कारामुळें या भौतिक देहामध्यें ख्रिस्त हा वास करूं लागतो. कॅल्व्हीन पंथाचे लोक हा संस्कार ख्रिस्ताच्या कृपेची बाह्य खूण मानितात.

ख्रिस्ती धर्माचीं मुख्य तत्वें कोणतीं आहेत याचें आतापर्यंत विवेचन केलें. त्यानंतर ख्रिस्ती धर्मामध्यें नीतितत्वें कोणतीं आहेत हेंहि सांगणें जरूर आहे. ख्रिस्ती धर्मांतील तत्वें धर्मपर नसून विशेषतः नीतिपर आहेत असें म्हटलें असता वावगें होणार नाहीं. कांहीं पंथांच्या मतें ख्रिस्ती धर्माचें महत्व ख्रिस्तानें प्रतिपादन केलेल्या नीतितत्वांवरच अवलंबून आहे. मनुष्यजात ही परमेश्वराची संतति असल्याकारणानें मनुष्यानें परमेश्वरावर अनन्यभक्ति केली पाहिजे व त्याबरोबरच आपल्या बांधवावर व शेजाऱ्यापाजाऱ्यावरहि प्रेम केलें पाहिजे हें अत्युच्च तत्व ख्रिस्तीधर्मात आढळून येतें. परमेश्वराची अनन्यभक्ति करणें म्हणजे त्याला अनन्य भावानें शरण जाणें व अहंभावाची वृत्ति विसरून जाणें होय. येशू ख्रिस्त हा स्वतः या तत्वाचा मूर्तिमंत आदर्श होता. त्यानें हें तत्व प्रस्थापित करतांना स्वतःचा बळी देखील दिला. 'अनन्यभावानें तूं जगाचा स्वामी जो परमेश्वर त्याची भक्ति कर व आपल्या शेजाऱ्यावर प्रेम कर' असा ख्रिस्ताचा उपदेश आहे असें ख्रिस्ती सांप्रदायिकांचें म्हणणें आहे.

सर्व लोक हे आपले बांधव आहेत अशा प्रकारची बंधुत्वाची भावना चर्चच्या पूर्वेतिहासात आपल्याला आढळून येते पण पुढें ही व्यापक व उच्च भावना हळू हळू लुप्तप्राय होत चालली व त्याच्या जागीं वैयक्तिक उन्नतीकडे लोकांचें लक्ष्य वेधलें. संसाराचा त्याग करून, भिक्षुवृत्तीनें एखाद्या मठात राहून, स्वतःची आत्मोन्नति करण्यापलीकडे जगात उच्च [illegible] नाहीं अशी कल्पना रूढ झाली. ख्रिस्ताच्या सार्वत्रिक [illegible] शिकवण मागें पडली, तरी पण भिक्षूलोकांचा वर्ग वाढत चालल्यानें लोकांच्या आचारविचारात बरीच शुद्धता येत चालली. ख्रिस्ताप्रमाणें अगदीं निर्धन होऊन रहाण्यांत कित्येकानां आपल्या जीविताचें ध्येय आहे असें वाटूं लागलें; व तशा प्रकारचा उपदेशहि करण्यांत येऊं लागला.

उपासनाविधि—परमेश्वराची अनन्यभक्ति हें ख्रिस्तनीतीचें प्रमुख अंग आहे असें वर सांगितलें. ही भक्ति कशी करावयाची यासंबंधीं ख्रिस्ती धर्मांत कोणते विधी आहेत हें आपण पाहूं. परमेश्वर व भक्त यामधील संबंध हा वैयक्तिक स्वरूपाचा असतो. ज्याला जसें वाटेल त्या प्रकारानें परमेश्वराला भजण्याची प्रत्येकाला मोकळीक असावी हें उचित होय. ख्रिस्ती धर्माच्या प्रारंभीं प्रत्येकाला परमेश्वराची उपासना करण्याच्या बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य असे पण पुढें उपासनेच्या बाबतींतील स्वातंत्र्य हळू हळू नष्ट होत जाऊन उपासनेच्या बाबतींत बरेच निर्बंध घालण्यात आले व अशा रीतीनें उपासनेला सांप्रदायिक स्वरूप देण्यांत आलें. चर्चमधील धर्मगुरु ठरवितील त्या मार्गानेंच उपासना करण्याचा प्रघात अमलात आला. रोम व ग्रीसमधील चर्चमध्यें उपासनेचे ठराविक नियम करण्यात आले. इंग्लंडच्या चर्चनें आपला उपासनाविधि निश्चित केला. इतर चर्चनींहि आपापले उपासनाविधी ठरवून टाकले. सर्व लोकांनीं चर्चमध्यें जमून प्रभुभोजन केलें असता मनुष्याला पुण्यप्राप्ति होते, सांप्रदायिक प्रार्थना केली असता मनुष्याचें पाप परमेश्वर जाळून टाकतो अशा प्रकारच्या कल्पना धर्मगुरूंनीं प्रसृत केल्या व त्यामुळें या विधींना एक प्रकारचें पावित्र्य प्राप्त झालें. या उपासनाविधींच्या विरुद्ध पुष्कळदा आक्षेप घेण्यांत आले पण त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं.

सारांश ख्रिस्ती धर्म हा भक्तीचा पंथ आहे. आपल्या देशांतील भक्तिमार्गाशीं याचें पुष्कळ साम्य दिसून येतें. ख्रिस्त हा देवाचा अवतार असून त्याची भक्ति केली असता परमेश्वराची प्राप्ति होते,हें या धर्माचें मुख्य अंग आहे विश्वप्रेम हें या धर्माचें नैतिक अंग आहे. इतर धर्मांतील तत्वाचा खरा अर्थ लावण्यासाठीं ज्याप्रमाणें पुष्कळ श्रेष्ठ पुरुषांनीं प्रयत्न केले त्याचप्रमाणें ख्रिस्ताच्या धर्मांतील मुख्य तत्वासंबंधींचें विशदीकरण करण्याचा पुष्कळांनीं प्रयत्न केला. ख्रिस्ताच्या मूळ धर्मतत्वामध्यें कालांतरानें कांहीं तत्वांची भर पडली. या धर्माचे आज अनेक पंथ झाले आहेत व पुढें आणखीहि होतील. पण या सर्व भूत व वर्तमान पंथांच्या मुळाशीं ख्रिस्त हा परमेश्वराचा अंश असून त्याच्या भक्तीमुळेंच परमेश्वराची प्राप्ति मनुष्याला करून घेता येते हेंच सामान्य तत्व ग्रथित केल्याचें आढळून येतें.

ख्रि स्ती सं प्र दा य, शा स न सं स्था व मा न वी स्वा तं त्र्य. —ख्रिस्ती संप्रदायामध्यें जे शिरले ते ख्रिस्ती संप्रदायाच्या आद्य मताप्रमाणें रहावयास तयार झाले आणि संप्रदायाचीं आद्यमतें सर्वांस बंधनकारक आहेत असें त्याबरोबर गृहीत धरण्यात येतें. संप्रदायाचे ग्रंथ विशिष्ट आज्ञारूप किंवा

सूत्ररूप नसल्यामुळें ते ग्रंथ विधिनिषेधात्मक करण्यासाठीं त्याचा अर्थ काढणें अवश्य होतें हे अर्थ काढावयाचे झाले म्हणजे वाटेल तो मनुष्य वाटेल तो अर्थ काढणार या परिस्थितींत अर्थ काढण्यास कोणी अधिकारी मनुष्य पाहिजे अशा तऱ्हेचा युक्तिवाद कोणासहि पटणार. अर्थ काढण्याचा किंवा विधिनिषेधात्मक शेवटचे नियम देण्याचा अधिकार आमचा आहे असें रोमच्या पोपनें मांडण्यास सुरवात केली. रोमचा पोप हा, इतिहास पाहतां केवळ रोमचा बिशप होता पण त्यास रोमन साम्राज्याच्या अस्तित्वामुळें धार्मिक प्रामुख्य प्राप्त झालें, आणि रोमचें साम्राज्य जरी लयास गेलें तरी रोमच्या पोपचें महत्त्व कायमच राहिलें. याचा परिणाम असा झाला कीं, सर्व पाश्चात्य जग बौद्धिक आणि अध्यात्मिक बाबतींत रोमच्या तावडींत सापडलें, आणि राज्याचे म्हणजे पोलीसी अधिकार तेवढे राजाकडे राहिले राजावर व त्याच्या प्रजेवर अध्यात्मिक अधिकार पोपचा. पोपनें वाटेल त्या राजावरहि बहिष्कार घालावा आणि प्रसंग पडल्यास राजाच्या प्रजेसहि राजाचे हुकूम न मानण्यास सांगावें असा तऱ्हेची परिस्थिति उत्पन्न होऊन शासनसंस्था (म्हणजे राज्याधिकार) पोपच्या तावडींत पूर्णपणें सापडल्या. शासनसंस्थावरील पोपचें किंवा पंथाचें महत्त्व कमी करण्यास तीन पायऱ्यांनीं प्रयत्न झाले.

पहिला प्रयत्न प्रॉटेस्टांटिझम होय यामध्यें धर्मप्रथाचा आयुष्यावरील हक्क प्रधानतेनें झुगारला नाहीं, किंवा अधिकारयुक्त व्यक्ती किंवा संस्थानीं लावलेल्या अर्थांचें महत्त्व कमी करण्यांत आलें नाहीं, तर केवळ पोपचें वर्चस्व झुगारून लावलें. पहिले जे प्रॉटेस्टंट पंथ होते ते व्यक्तिस्वातंत्र्यवादी आणि मतस्वातंत्र्यवादी मुळींच नव्हते. ते स्वतः जरी पोपच्या मतापासून भिन्न असले तरी त्यांच्या मतापासून भिन्न असलेल्या लोकांचा ते फारच छळ करीत

अधिकारयुक्त अर्थस्पष्टीकरण मानावयास लावण्याची पद्धति जरी कांहीं दिवस चालू राहिली तरी लवकरच वैयक्तिक अर्थ लावण्याचा अधिकार मागणारे नानकन्फार्मिस्टांचे पंथ तयार झालेच. त्यामुळें चर्चचा पगडा बराच कमी झाला. तथापि ख्रैस्त्य हें शासनसंस्थेला आद्य कायदा आहे या प्रकारच्या समजास धोका पोहोंचला नव्हता. तथापि अमेरिकेनें जेव्हां आपली शासनसंस्थेचीं आयतनें लेखनेंविशिष्ट केलीं आणि चर्चचा किंवा ख्रैस्त्याचा शासनसंस्थेशीं संबंध तोडून टाकला तेव्हां शासनसंस्थेचें स्वातंत्र्य पूर्णपणें स्थापन केलें गेलें. अमेरिकेंत शासनसंस्थेशीं युक्त असा ख्रैस्त्य पंथ नाहीं एवढेंच नव्हे तर सार्वजनिक शाळांतून बायबलचें शिक्षण बंद केलें आणि बायबलास 'सेक्टेरियन' म्हणजे पक्षविशिष्ट पुस्तक ठरविलें

विवाहादि संस्कारावर ताबा ठेऊन म्हणजे मनुष्याच्या आयुष्याला कृत्रिम तऱ्हेनें जखडून टाकून धर्माचें अध्यात्मिक स्वरूप कमी करण्याच्या प्रयत्नाचा शेवट अजून लागला नाहीं अजून "ख्रिस्ती" लग्नें प्रचलित आहेतच हा सर्व पाश्चात्य भिक्षुकशाहीचा प्रयत्न होय. ख्रिस्त स्वतः लग्नें लावणारा भिक्षुक नव्हता. त्या पंथाला ही भिक्षुकी पाश्चात्य देशांत जोडली गेली ही जेव्हां नष्ट होईल तेव्हां धर्माचें खरें स्वरूप प्रगट होईल हिंदुस्थानांत ख्रिस्ती मत वाढत आहे. आणि जर लग्नासारखे संस्कार भावी रागीय ख्रिस्ती पंथातून हिंदुस्थानानें अजीबात हाकलून लावले तर ख्रिस्ती संप्रदायाचें अत्युच्च स्वरूप हिंदुस्थानांत प्रगट होईल असी जी जगाची आशा आहे त्या आशेस मूर्त स्वरूप येण्यास मदत होईल

हिंदुस्थानांतील ख्रिस्ती समाज—१९२१ सालीं एकंदर ख्रिस्ती लोक ४७,५४,०७९ होते १९११ सालीं ३८,७६,२०३ होते. १८७२ ते १९११ या ५ दशकांतल्या खानेसुमारीच्या आंकड्यावरून पहातां ख्रिस्ती समाज कसा झपाट्यानें वाढत आहे तें दिसून येईल

| काल | हिंदी ख्रिस्त्यांच्या संख्येंतील फेरबदलाची शेंकडेवारी |
|---|---|
| १८७२–१८८१ | +२२.० |
| १८८१–१८९१ | +३३.९ |
| १८९१–१९०१ | +३०.८ |
| १९०१–१९११ | +३४.२ |

१९११ च्या ख्रिस्ती लोकसंख्येंत ३५,७४,७७० हिंदी ख्रिस्ती म्हणजे शेंकडा ९२ हून अधिक व बाकीचे युरोपियन आणि आंग्लोइंडियन होते. हिंदी ख्रिस्त्यांपैकीं अदमासें २/५ रोमन कॅथॉलिक व १/५ रोमो सिरियन होते एकंदर संख्येच्या १/६ प्रत्येकीं आंग्लिकन व बाप्टिस्ट असून राहिलेल्या पंथांपैकीं शेंकडा सहा लुथरन, मेथॉडिस्ट व प्रेसबिटेरियन हे प्रत्येकीं शेंकडा पांचहून कमी व कॉन्ग्रेगेशनॅलिस्ट शेंकडा चार होते.

आतां प्रांतवार विचार करितां (१९११ च्या खानेसुमारीवरून) असें आढळून येतें कीं, हिंदी ख्रिस्त्यांच्या एकंदर संख्येपैकीं अदमासें २/५ लोक मद्रास इलाखा व त्यांतील हिंदी संस्थानें यांतून रहातात मद्रासेंतील कोचीन व त्रावणकोर संस्थानांत तर एकंदर लोकसंख्येच्या १/४ हूनहि जास्त ख्रिस्ती आहेत खुद्द मद्रास इलाख्यांतील ख्रिस्त्यांपैकीं निम्मे ख्रिस्ती दक्षिण जिल्ह्यांतून आहेत ते सेंट फ्रान्सिस झेविअर व त्याचे यांच्या अमदानींत झालेल्या ख्रिस्त्यांचे वंशज आहेत. इतर प्रांतांतील ख्रिस्तीमतप्रसार मद्रासेंतल्या प्रसारापेक्षां बराच मागाहूनचा आहे. मद्रासनंतर बिहार ओरिसा (२६८०००), मुंबई (२४६०००), ब्रह्मदेश (२१००००), पंजाब (२०००००) आणि संयुक्तप्रांत (१८००००) असा उतरता संख्यानुक्रम लागतो. प्रमुख प्रांतांत बंगाल (१३००००), वऱ्हाड मध्यप्रांत (५३०००) व (६७०००) यांत ख्रिस्ती अगदीं थोडे सांपडतात

निरनिराळ्या ख्रिस्ती मिशनरी पंथांचा वाढता प्रसार दृष्टीखालीं घातल्यास स्वसमाजबलवर्धनासाठीं प्रत्येक मिशनरी पंथ काय काय खटपटी करीत असेल याकडे लक्ष जाईल. १९०१-१९११ या दशकात आंग्लिकन कम्यूनिअनची वाढ शें. ९ ने झाली या वाढींत बिहार-ओरिसानें शेंकडा ६६, पंजाबनें ४७ व मद्रासनें ११ मिळवून दिले. पुष्कळसे प्रॉटेस्टंट आंग्लिकन म्हणून गणिले जातात, त्यामुळें वरील आकड्यात जरा फेरफार होईल बाप्टिस्ट पंथाचें मुख्य पीठ मद्रासेंत असून वरील दशकात तो शेंकडा २२ नें वाढला. लुथरन शें ४१ नें वाढले तर मेथॉडिस्ट दोन पूर्णांक एक चतुर्थांश पटीनें जास्त झाले. एकंदर मेथॉडिस्ट (१५२०००) पैकीं तीनपंचमांश संयुक्तप्रांतात आहेत. प्रेसबिटेरियनांची १९११ मधील १,८१,००० ही संख्या १९०१ मधील संख्येच्या तिप्पट आहे पंजाबात १९०१ सालीं सारे ५००० प्रेसबिटेरियन होते, तर दहा वर्षांनीं पाहू जाता ९५००० भरले रोमन कॅथोलिकाची वाढ बिहार ओरिसात शेंकडा ६८ झाली असून मद्रासेंत म्हणजे जेथें त्याची संख्या सर्वांत अधिक (६६४०००) आहे तेथें सारी शें. ९चं वाढ झालेली दिसते. साल्वेशनिस्ट(मुक्तिफौज)लोकाची संख्या १९ हजारावरुन ५२ हजारावर गेली या वाढीचें मुख्य कारण गुन्हेगार जाती व अस्पृश्यवर्ग याकडे या पंथाचें विशेष लक्ष आहे

*सरकारची ख्रिस्ती संप्रदायान्या वाढीस मदत.*—वन्याचक्षा प्रातातून या जातींना ख्रिस्ती कळपात ओढण्याला सरकारची मदत या पंथाला मिळते. पोलिसाच्या देखरेखीनें सुद्धा ज्याची वाईट प्रवृत्ति कमी होत नाहीं त्या जातींना ताळ्यावर आणण्याची विशेष व्यवस्था या पंथानें सरकाराकडून करून घेतली आहे. हलक्या जातींच्या लोकाची आर्थिक स्थिति सुधारण्यासाठीं उद्योगधंदे शिकविण्यात येतात.

मलबार किनाऱ्यावर धर्मांतराचें कार्य करणारा सीरियन पंथ फार प्राचीन ( इ स ६ वें शतक ) असून त्यात रोमोसिरियन, जॅकोबाईट, सिरियन व रीफॉर्मड ( सुधारलेले ) सीरियन असे तीन मुख्य वर्ग आहेत. इ स. १९०१-१९११ या दशकात सीरियनाची एकदर वाढ शें. २७ वर झाली. या समाजातील ⅘ हून अधिक लोक खुद्द त्रावणकोर संस्थानात आहेत.

*एतद्देशीय ख्रिस्त्यातील नवीन स्थानिक पंथ.*—हिंदुमुसलमान बाटून ख्रिस्ती बनल्यावर पूर्वसंस्कारामुळें किंवा अन्य कारणानीं नवीन आचारविचार सुरु करितात किंवा पूर्वधर्मातील काही संस्कार व विचार कायम ठेवून त्याना ख्रिस्त्याला फारसें विसदृश दिसणार नाहीं असें वळण देतात यामुळें त्यान्यात नवीन पंथ अस्तित्वात येतात.

*युगोमयम पंथ*—त्रावणकोर संस्थानामध्यें अशाच प्रकारचा एक पंथ गेल्या शतकाच्या अखेरीस अस्तित्वात येऊन त्यातील लोकाची संख्या (इ स १९११) ११११ पर्यंत गेली आहे उपासना, भोजन, विवाह, और्ध्वदेहिक वगैरे बाबतींत सामान्य ख्रिस्त्यापेक्षा या पंथाच्या चालीरीती वेगळ्या आहेत पंथसंस्थापकाच्या घराण्याहून जास्त श्रेष्ठ असा कोणीहि मानिला जात नाही यांचा हल्लींचा मुख्य उपाध्याय या घराण्यातील एक आहे नवा व जुना करार याना सारख्याच दर्जाचें मानण्यात येतें. जाहीर उपासनेचें स्थळ याना लागत नाहीं लग्नें घरातल्या घरात होतात. फक्त लग्नाचें रजिस्टर उपाध्यायानें ठेवावें लागतें. याच्यातील ' आशीर्वाद ' संस्कार महाग्गी धर्तीवर आहे

*अह्ल-इ-नसारा आणि आर सी दत्त पंथ.*—पंजाबातील प्रॉटेस्टंट ख्रिस्त्यात वरील पंथ आहेत. नावावरूनच ते नवीन म्हणून ओळखिले जातात हे पंथ प्रेसबिटेरियन आहेत अशी माहिती मिळते

*गुलाबशाही पंथ.*—पंजाबात आणखी हा एक विचित्र नामाचा पंथ आहे. त्याचा समावेश रोमन कॅथोलिकात करितात गुलाबशाही नावाचा एक मुसुलमान गुजर होता, तो बाटून ख्रिस्ती झाला. नंतर त्यानें हा पंथ स्थापिला. हा फकिरी पंथासारखा असून यांतील पुरुष व बायका दोघेहि मुंडण करून घेतात व ब्रह्मचारी वृत्तीनें राहतात.

ग—तिसरें व्यंजन याचे संस्कृत भाषेत (१) गंधर्व, (२) गणपति, (३) गुरु स्वर व (४) तीन ही संख्या असे अर्थ असून गर्व या अर्थी मराठीत योजतात, जसें, त्याला गर्वाची बाधा झाली आहे समासात शब्दापुढें जोडिला असता त्याचा अर्थ -' नें गमन करणारा ' असा होतो, जसें, उरग

अक्षरविकास—या वर्णाची पहिली अवस्था काक पदाकृति असून ती इ स च्या ३ ऱ्या शतकातल्या अशोकाच्या गिरनार शिलालेखात दिसून येते मौर्यांतहि ही अवस्था दिसते वर्तुलाकारासारखी दिसणारी ' ग ' ची दुसरी अवस्था व बाराखडींतील दीर्घ ई ( ी ) चें चिन्ह वाटणारी तिसरी अवस्था इ स पहिल्या व दुसऱ्या शतकातल्या मथुरा येथील लेखांत पाहावयास मिळते चवथी अवस्था जपानात होर्युजींच्या मठात सापडलेल्या ' उष्णीषविजयधारणी ' च्या ताडपत्री पुस्तकात संशोधिली गेली आहे या पुस्तकाचा काल इ स ६ वें शतक मानितात मानतर एक दोन शतकातच आजचा वळणदार ' ग ' तयार झाला [ प्राचीन लिपिमाला ]

**गक्खर**–इतिहासामध्यें या लोकाचा उल्लेख प्रथम बाबरच्या कालात आढळतो.'तबकात इ अकबरी'मध्यें याचा प्रदेश सिंधु नदीवरील नीलावप्रांत असल्याबद्दल म्हटलें आहे व याच्या ताब्यात शिवालिक पर्वतापासून काश्मीरच्या सरहद्दीपर्यंतचा सर्व प्रदेश असून त्या प्रदेशात याच्या सत्तेखाली खरी, जनुब, जनीध, भूक्याल व जाट वगैरे लोक रहात असत असें सांगितलें आहे बाबर यानें ' तुझुक-इ बाबरी ' मध्यें म्हटलें आहे कीं, नीलब व बहर ( भेरा ) प्रांतात गक्खर लोकांची सत्ता असून तेथें जाट, गुजर लोकहि रहातात

बाबरच्या काळीं या जातींची राजसत्ता तातार व हाती या दोन चुलतभावाच्या हातीं होती

अबुल फजल म्हणतो कीं काश्मीरवर झैन-उल-आबिदिन याचा अम्मल असताना गझनीचा एक सरदार मलिक कद यानें झेलम व सिंधु या नद्यामधील प्रदेश काश्मीरी लोकापासून घेतला याच्यानतर त्याचा वंशावळ खालील प्रमाणें आहे

मलिक कद

|

मलिक कलान

|




तातार हा परहाला किल्ल्यावर रहात असून हाती हा जवळील डोंगराळ मुलखात रहात असे पुढें हातीनें तातार यास ठार मारून त्याचें राज्य घेतलें इतक्यामध्यें बाबरनें स्वारी करून परहाला घेतला, तेव्हा हाती हा त्यास शरण गेला शीरशहानें हुमायुनास हाकून दिल्यावर मोंगलाच्या स्वाऱ्यास अडथळा करण्याकरिता आणि गक्खर लोकांस दाबांत ठेवण्याकरिता त्यानें रोहट किल्ला बांधण्यास सुरवात केली तेव्हा गक्खर लोकानी मजूर मिळण्यास अडथळे आणले तेव्हा शीरशहानें गक्खराचा राजा सारग याजवर सैन्य पाठविलें व त्या सैन्यानें सारंगचा पराभव करून मलनो टेकडी लुटली रायासारग याची मुलगी हस्तगत झाली. तिला शीरशहाचा सरदार खवासखान यानें बायको केली रायसारग हा कैदी झाला व त्याचें जिवतपणीं कातडें सोलून, व याचा मुलगा कमाल खान यास कैद करून सिवालिक पर्वतात ठेवलें यावरून रोहट किल्ला इ स १५४० मध्यें अर्धवट बांधला गेला होता असें दिसतें, तो पुढें ८।१० वर्षांनी पुरा झाला

इ स, १५४८ ( हि स ९५५ ) मध्यें सुलतान इस्लाम उर्फ सलीम शाहसूर यानें पराभव केल्यामुळें नियाझी लोक गक्खर प्रांतात सुलतान आदम याजकडे आश्रयार्थ आले तेव्हा सलीमशाहनें गक्खर प्रांतावर स्वारी करून सुलतान आदम यास शरण येण्यास भाग पाडिलें सेलीमशाहनें कमालखान यास सोडून देऊन त्यास पंजाबच्या सुभेदाराच्या मदतानें गक्खर ताब्यात ठेवण्यास पाठविलें इ स १५५२ मध्यें हुमायून यानें काबुलाहून हाकून दिलेला कामरान हा सारगच्या नतर गादीवर बसलेल्या सुलतान-आदम याजकडे आश्रयार्थ आला परतु त्यानें तो न दिल्यामुळें कामरान सलीमशाहकडे गेला पुढें त्याम आश्रयार्थ

गक्खर प्रांतांत येण भाग पडलें. त्यावेळीं सुलतान आदम यानें त्यास हुमायूनच्या स्वाधीन केलें व हुमायुनानें त्याचे डोळे काढले (इ. स. १५५३). नंतर हुमायुनानें भेऱ्याचा किल्ला घेऊन तो सुलतान आदम यास दिला. हुमायून गादीवर बसल्यानंतर त्यानें सारंग याचा मुलगा कमालखान यास सुलतान आदमचें अर्धें राज्य दिलें. हा हुकूम अमलांत आणण्याकरितां हुमायुनास सैन्य पाठवून आदम खान यास कैद करून कमाल याच्या स्वाधीन करावें लागलें तो पुढें जन्मभर कैदेंतच होता. कमालखान हा सर्व गक्खर प्रदेशाचा मालक झाला. अकबराच्या कारकीर्दींत गक्खर (खोखार ?) लोकांच्या ताब्यांत लाहोरसरकारच्या सिंधसागर दुआबांतील ४२ महालांपैकीं ७महाल होते.

गक्खर यांना खकर असेंहि नांव फेरिस्ता हा देतो. कै नी. ज. कीर्तने याच्या मतें वीरनारायण व वाग्भट चव्हाण याच्या वेळेस या खकर लोकांनीं हिंदुस्थानावर स्वारी केली होती हे लोक मोंगललोकांचीच एक शाखा असून न्यायचंद्रसूरीच्या हम्मीर काव्यांत ज्या लोकांना 'खर्पूरास' असें नांव दिलेलें आहे ते हेच लोक असावेत असेंहि कीर्तने म्हणतात 'खोखार' पहा [इंडियन अँटिक्वरी. १९०७, रॉबर्टी, अर्स्किन, एलफिन्स्टन, स्मिथ]

**गंग घराणें.**—हें राजघराणें म्हैसूरप्रांतावर आठव्या शतकाच्या अखेरीस राज्य करूं लागलें यावेळीं दख्खनमध्यें पल्लवघराणें मोडकळीस आलें होतें व चोलघराणें उदयास येऊं लागलें होतें. या गंगघराण्याची राजधानी कोलार व तलकद (तलकाड) या दोन ठिकाणीं निरनिराळ्या वेळीं होती. याची व पाण्ड्यराजाची नेहमीं झटपट होई गंग हे पूर्वी राष्ट्रकूटांचे मांडलिक होते परंतु पुढें राष्ट्रकूटांची सत्ता विस्कळित झाल्यानें गंग हे स्वतंत्र होऊं लागले. त्यांनीं या पाण्ड्यांना उत्तरेकडे राज्य वाढविण्यास अडथळा केला, तेव्हां वरगुण पाड्यराजानें गंगाचा कुंभकोणाजवळ तिरुप्परंबिय येथें पराभव केला. त्यामुळें चोळ घराण्याला आपली सत्ता वाढविण्यास सोपें होऊन त्याची सरहद्द गंगराज्याशीं येऊन भिडली. पुढें (९५०) राष्ट्रकूट कृष्णराज (तिसरा) यानें राजादित्य चोलावर स्वारी केली असतां पेरमानदी बूतुग या गंगराजाच्या कारवाईनें राजादित्य हा त्या लढाईंत मारला गेला, परंतु थोड्याच दिवसांत प्रख्यात राजराज चोलानें शत्रूपासून आपले प्रांत परत मिळविले त्यावेळीं गंगराजाचा त्यानें पराभव केला. गंगाचा गंगवडी प्रांत (उत्पन्न ९६ हजार) चोलानें काबीज केला. गंगघराण्यांत प्रख्यात असे पेरमानदी बूतुग व मारसिंह हे राजे झाले. अकराव्या शतकाच्या मध्यांत या गंगराजांनीं चोलराज राजादित्य याच्या राज्यविस्तारास अटकाव करून तकोलम येथें त्याचेवर स्वारी करून त्याचा पराभव केला व नोळम्बवाडी ३२ हजार वसुलाचा मुलुख सांप्रतचे तुमकुर व चितळदुर्ग काबीज केला दुसऱ्या मारसिंहाच्या गंगराजाचे वेळीं घडली.

या घराण्याचा मूळपुरुष काश्यपगोत्री कण्वऋषी होय असें म्हणतात. त्यानंतरचा प्रख्यात पुरुष म्हणजे सिंहनंदी असून त्याच्या वेळीं या घराण्यास बरेंच महत्त्व प्राप्त झालें. नंतर या वंशांतील कोंगणी नांवाच्या एका राजानें कुवलालपुर (कोलर ?) ही आपली राजधानी केली. याच्या पुढें शिवमार स. ६६८ व त्याचा पुत्र पृथुयश याचा अंमल बऱ्याच मोठ्या प्रांतावर असून अमोघवर्ष दिंडिकोंगेरिग या राजानीं आश्रय घेतला. पृथुयशानें वरगुण पाण्ड्यराजाचा श्रीपुर येथें पराभव केला व त्याला कैद केलें याच्या मागून याचा मुलगा मारसिंह (वरच्याहून भिन्न) गादीवर आला. याच्यानंतर त्याचा पुत्र केसरी अथवा पृथ्वीपति यानें आभीर राजाला आश्रय दिला होता. यानंतर या घराण्यांत पृथ्वीकोंगणी अथवा श्रीपुरुष हा राजा झाला. स इ ७२७ त किग्गटनाड (कूर्गप्रांत) येथील शिलालेखावरून इ. स. ८८७ मध्यें या घराण्यांत सत्यवाक्य कोंगुणीवर्मन परमाण्डी नांवाचा राजा होऊन गेला असें दिसतें उदयेंदिरम येथील ताम्रपटावरून इ स. ९०० च्या वेळीं गंगराज पृथ्वीपति हस्तिमल्ल हा हयात असून त्याला परांतक (चोल) यानें बाणराज्य काबीज करून तेथला कारभार सांगितल्याचें व हस्तिमल्ल हा परांतकाचा मांडलिक असल्याचें दिसतें. यापुढें आठकुरा येथील शिलालेखावरून पुढील माहिती निघते. सत्यवाक्य कोंगुणीवर्मन वरमानडी बूतुग हा राष्ट्रकूट कृष्ण राजा (तिसरा) चा मांडलिक असून त्यानें इरेयप्पाचा मुलगा राचमल्लास ठार मारून गंगावडी प्रांत हस्तगत केला. (९४९). हेब्बाळच्या शिलालेखावरून बूतुग यानें (९११ ते ९४० च्या दरम्यान) अमोघवर्ष बाद्दिग याच्या मुलीशीं लग्न लाविलें त्यावेळीं त्याला पुलीगर बेळवोल, किसुकाड आणि बागेनाड हे परगणे हुंड्यामध्यें मिळाले असें ठरतें, पुढें तिसऱ्या कृष्णराजा (राष्ट्रकूट) नें, बूतुग यानें राजादित्य चोलास मारल्याबद्दल बनवासी नांवाचा आणखी एक परगणा जहागीर दिला.

वर आलेला इरेयप्पा हाहि एक गंगराजा होता. त्याचे संबंधीचा शिलालेख म्हैसूर प्रांतांत बेगूर येथें आहे; पण त्यावर काल दिलेला नाहीं. बूतुग याचा पुत्र मारसिंह होय. हा त्याचा सावत्र भाऊ रच्छ (?) याचे मागून गादीवर बसला (९६३). तो दहा वर्षें राज्य करून ९७४ सालच्या सुमारास मेला (मेलागनी व कारध येथील शिलालेख). या मारसिंहानें गंगवाडी, पुलीनगर, बेळवोल, बनवासी, नोळंबवाडी व सांतलीग या प्रांतावर राज्य केलें. त्यानें गुजराथेवर स्वारी केली होती, नोळंबवाडीच्या पलवास जिंकून, मान्यखेट, गोनूर येथें मोठें विजय मिळविले (श्रवण बेळगोळचा शिलालेख) मारसिंहाचे नंतर पंचलदेव हा गादीवर आला (९७४ चा मुळगुंद शिलालेख), परंतु थोडेच दिवसांत पश्चिम चालुक्य दुसरा तैल यानें त्याला ठार केलें (अदरगुंची व गुंडूर येथील

शिलालेख ). पुढें ( ९७८ चा किग्गटनाडचा शिलालेख ) ९८० सालीं राचमल्ल हा गंगराजा गादीवर होता. त्याचे मागून (१०२१ मेळूरचा शि. ले.) परमानडि हा राजा झाला. याच सुमारास ( १०३८ ) पांचव्या कामार्णवाचा मुलगा, पाचवा वज्रहस्त गंगराज व सहावा मधुकामार्णव गंगराज यांचींहि नांवें आढळतात. पुढें १०५५ त ( येकापुर शि. ले. )परमानडी विक्रमादित्य हा राजा होता; यानें वनवासी व गंगवाडी येथें राज्य केलें होतें. पुढें १०७०त राजराजगग हा त्याचा बाप. पाचव्या वज्रहस्तानंतर आठ वर्षे यानें राज्य केलें याची बायको राजसुंदरी ही पहिल्या राजेंद्रचोळाची मुलगी होय. यानें वेंगीच्या विजयादित्याला आश्रय दिला. या ा मुलगा अनंतवर्म चोडगंग होता. पश्चिगंगकुळांतील ( वर आलेला ) परमानडी उदयादित्य हा पश्चिम चालुक्य दुसऱ्या सोमेश्वराचा मांडलिक होता. व तो वनवासी, सातळीग व मणदळी या प्रांतावर राज्य करीत होता ( १०७५ ). वरील अनंतवर्मचोड हा १०७८ त गादीवर आला. याप्रमाणें या म्हैसूरकडील गंगघराण्याचा थोडासा इतिहास आहे. याचा साग्र इतिहास अद्यापि उपलब्ध नाहीं या गंगघराण्याच्या शाखा हिंदुस्थानात निरनिराळ्या प्रांतात राज्य करीत होत्या; त्याचा उल्लेख त्या त्या प्रांताच्या इतिहासाचे वेळीं करूं [ मॅबेल डफ; इं. ॲ. व्हॉ. १३ ]

**गंगटोक**—बंगाल प्रांतातील सिकीम संस्थानची राजधानी. उ. अ. २७° २०' व पू. रे. ८८° ३८'. लो. सं. ( १९०१ ) ७४९. येथ राजवाडा व काहीं सार्वजनिकइमारती चांगल्या असून तीस्ताब्रिजपर्यंत बैलगाडीचा रस्ता जातो.

**गंगपूर**—ओरिसाचे एक मान्डलिक संस्थान. क्षेत्रफळ २४९२ चौ. मैल. याच्या उत्तरेस जशपूर व रांची जिल्हा; पूर्वेस सिंधभूम; दक्षिणेस बोनई, सम्बलपूर व बाम्रासंस्थानें; पश्चिमेस मध्यप्रांतातील रायगडचें संस्थान. हा प्रदेश डोंगरसपाटींचा असून काहीं ठिकाणीं उंच डोंगर आहेत. गंगपूर व व बाम्रा संस्थान यांच्यामध्यें महावीर नामक डोंगर आहे.

येथील नद्या इब, साख व दक्षिणकोयेल या आहेत. पैकीं साख व दक्षिणकोयेल यांचा गंगपूर येथें संगम होतो हा नदीस पुढें ब्राह्मणी हें नाव मिळालें आहे. ही जागा फारच रम्य आहे. असें सांगतात कीं, पराशर ऋषीनें मत्स्यगंधा नामक कैवर्तक कन्येशीं संभोग केला तें हेंच रम्य स्थान आहे. उन्हाळ्यांत बहुतकरून ह्या नद्यांचें पाणी आटतें. येथील श्वापदें वाघ, चित्ते, लांडगे गेंडे वगैरे होत. हें संस्थान एकदा संबलपूरचें मांडलिक होतें. त्यावेळीं संबलपूरचा नागपूरच्या मराठे राजाच्या राज्यात समावेश होत असे. देवगांवच्या तहाप्रमाणें १८०३ मध्यें तें ब्रिटिशसरकारास देण्यात आलें ण १८०६ मध्यें तें मराठा राजास परत मिळालें. १८२६ मध्यें हें ब्रिटिशास पुन्हा परत मिळालें. १८५७ मध्यें येथील संस्थानिकास प्रथम सनद देण्यांत आली व त्यानंतर १८९९ मध्यें पुन्हा नवीन सनद करून देण्यांत आली. १९०५ मध्यें हें संस्थान छोटानागपूरमधून ओरिसामध्यें घेण्यांत आलें. याचें एकंदर उत्पन्न २,४०,००० रु. असून ब्रिटिशसरकारास खंडणीदाखल रु. ११५० यांस लागतात. येथील संस्थानिकावर ओरिसाच्या कमिशनरची देखरेख आहे. कारण तो ट्रिब्युटरी महालाचा सुपरिटेन्डेंट आहे. येथील लोकसंख्या ( १९११) ३,०३,८२९ आहे. येथील राष्ट्रजाती गोन्ड, ओरा ओन, खरिया, भूया, मुन्डा या आहेत. इब नदीचा दक्षिणेकडील प्रदेश अत्यंत सुपीक आहे. उत्तरेकडील जमीन जरा कमी सुपीक आहे.

**गंगवाडी**—म्हैसूरमधील गंगराजाची राजधानी. गंगराजांनीं दुसऱ्या शतकापासून तों अकराव्या शतकापावेतों येथें राज्य केलें. हिच्या उत्तरेस मरंडले, पूर्वेस तोन्डनाद, पश्चिमेस समुद्र, दक्षिणेस कोन्गू आहे. येथील लोकास गंगडीकार म्हणतात.

**गंगा**—गंगा ही उत्तर हिंदुस्थानातील एक प्रमुख नदी आहे. हिचा उगम हिमालयाच्या दक्षिण उतरणीवर होतो. हिमालयात ज्या अनेक हिमनद्या आहेत, त्यापैकीं एका हिमनदीच्या शेवटाजवळ एका कोनाड्यातून जो जलप्रवाह निघतो त्यास गंगा म्हणतात. गंगेचा प्रवाह येथून निघून तो पश्चिमेकडे वहात वहात व हिमालयाच्या दक्षिणेकडील रांगेतील टेकड्यांचा भेद करीत दक्षिणेकडे वळतो. तेथून हा प्रवाह आग्नेयीकडे जाऊन अलाहाबादेजवळ पूर्वदिशेस वळतो. अशा रीतीनें पूर्वेकडे चारशें मैल वहात गेल्यानंतर तो दक्षिणेकडे वळतो व अनेक मुखांनीं बंगालच्या उपसागरास मिळतो. संयुक्तप्रांतामधून वहात जात असता या नदीला रामगंगा, यमुना, गोमती, इत्यादि प्रमुख नद्या मिळतात. बंगालच्या हद्दीवर घोग्रा ही तिला मिळते. पाटणाजवळ शोण नदीचा तिच्याशीं संगम होतो. त्यानंतर गंडकीचा व तिचा संगम होऊन ती बंगालच्या उपसागराला येऊन मिळत असता तिला ब्रह्मपुत्रा ही मोठी नदी येऊन मिळते. गंगेची लांबी १५५७ मैल असून तिच्या काठीं, हरिद्वार, कनोज, प्रयाग ( अलाहाबाद ), काशी, पाटणा, शोणपूर, नागरबेटे इत्यादि प्रमुख क्षेत्रें आहेत. गंगेचा जो मुख्य फाटा पूर्वेकडे गेला आहे त्यास पद्मा असें म्हणतात व गंगेचा जो फाटा कलकत्त्याजवळून गेला आहे त्याला हुगळी हें नाव आहे.

इतर नद्यांचें पाणी ज्याप्रमाणें उन्हाळ्यात कमी होतें त्याप्रमाणें गंगेचें पाणी कमी न होता या ऋतूंत तिला पूर येतो. याचें कारण गंगेचें मूळ हिमालय पर्वतात असल्यामुळें, उन्हाळ्यात हिमालयातील बर्फ वितळून नेहमीपेक्षा जास्त पाणी वाहूं लागणें हें होय. समुद्रसपाटीपासून गंगेचा उगम जवळ जवळ १३०० फूट उंचीवर आहे. त्यामुळें ती उंचीवरून वहात येत असल्यानें तिच्या प्रवाहाला हरिद्वार वगैरे ठिकाणीं फार जोर आहे. बाकीच्या ठिकाणीं तिचा प्रवाह संथ आहे. तिचें पाणी शुभ्र असून तिच्या काठचा भाग फार सुपीक आहे. गंगेचे अनेक कालवे काढलेले आहेत.

व ते बरेच रुंद असल्यानें मालाच्या वाहतुकीच्या कामीं त्याचा फार उपयोग होतो असा अनेक दृष्टींनीं गंगेला महत्त्व प्राप्त झालें कांहीं विशिष्ट कारणावरून तिला अनेक नांवें प्राप्त झालीं आहेत. ही नदी मूळची स्वर्लोकांत रहाणारी म्हणून हिला वियद्गा असें नांव आहे. कपिल ऋषीच्या शापानें जळून भस्म झालेल्या पूर्वजांचा उद्धार करण्याकरितां, भगीरथ नांवाच्या राजानें तिला स्वर्गलोकांतून पृथ्वीवर आणलें. यामुळें भगीरथाच्या नांवावरून तिला भागीरथी असें नांव पडलें. आकाशांतून तिचा प्रवाह विलक्षण गतीनें पृथ्वीकडे येत असतां हा वेग पृथ्वीला सहन होणार नाहीं हें जाणून शंकरानें तिला आपल्या जटेंत धारण केली व तेथून सात प्रवाहांनीं ती पृथ्वीवर वाहूं लागली म्हणून सप्तसिंधु हें तिचें नांव रूढ झालें जन्हु राजा हा यज्ञ करीत असतां तिच्या प्रवाहानें यज्ञाला अडथळा आला म्हणून त्या राजानें तिला प्राशन केलें व नंतर लोकहितार्थ आपल्या कानांमधून सोडून दिली म्हणून तिला 'जान्हवी' हा संज्ञा प्राप्त झाली. याशिवाय वरनदी, देवभूति, मंदाकिनी, त्रिपथगा, भोगवती किराती, भद्रसोमा, हरशेखरा इत्यादि अनेक नांवें आहेत

वैदिक काळांत तिला महत्त्व प्राप्त झालें नव्हतें ऋग्वेदामध्यें चौथ्या व दहाव्या मंडलांत मिळून, अवघा दोनदांच तिचा उल्लेख आलेला आहे पण वैदिक लोक ज्यावेळीं पूर्वेकडे गंगेच्या खोऱ्यांत पसरत चालले त्यावेळीं त्यांनीं गंगा व यमुना यांनद्यामधील प्रदेश आपल्या निवासासाठीं निश्चित केला. त्यामुळें गंगेला महत्त्व प्राप्त होऊं लागलें महाभारतकाळीं तर तिचें महत्त्व पूर्णपणें प्रस्थापित झालें होतें. बौद्ध वाङ्मयात तिचें फारसें महत्त्व आढळून येत नाहीं तथापि हिंदुधर्मांत मात्र तिला अलौकिक महत्त्व प्राप्त झालें इतकेंच नव्हे तर तें आजपर्यंत अबाधित रीतीनें टिकलेंहि आहे. मेगॅस्थिनीसच्या मार्फत तिची माहिती पाश्चात्यांना झाली

कोणत्याहि गोष्टीला महत्त्व प्राप्त झालें कीं त्या गोष्टीबद्दल निरनिराळ्या दंतकथा निर्माण होतात. गंगेच्याहि बाबतींत तोच प्रकार घडून आला. महाभारतकाळीं गंगा ही पवित्र नदी मानली जाऊं लागल्यामुळें तिच्या माहात्म्यविषयक निरनिराळ्या कथा उत्पन्न झाल्या. आपल्या पूर्वजांचा उद्धार करण्यासाठीं भगीरथानें गंगा खालीं आणिली व तींत आपल्या पूर्वजांची राख टाकून पूर्वजांना स्वर्गाप्रत नेलें ही गंगेची पावित्र्यपर कथा रचण्यांत आली. पुढें गंगा ही एक देवता आहे असें मानण्यांत येऊन, तिला देवतास्वरूप प्राप्त झालें पुढें अनेक ठिकाणीं तिचीं देवालयें बांधण्यांत आलीं. हरिद्वार येथील गंगेचें देऊळ फार मोठें व प्रसिद्ध आहे तिच्या मूर्ती पश्चिमेकडील भागांत खडकांतून कोरलेल्या आढळतात दक्षिणहिंदुस्थानांत तिची एक मूर्ति असून त्या मूर्तीचा वरचा भाग स्त्रीचा व खालचा भाग माशाचा आहे तिच्या डोक्यावर मुगुट असून तिचें कपाळ भस्मचर्चित दाखविलें आहे तसेंच ती हात जोडून प्रार्थना करते आहे असा देखावा दाखविला आहे. बंगालमध्यें तिची मूर्ति एका शुभ्रवस्त्रावृता नारीची असून, ती मकरावर बसलेली असून तिच्या उजव्या हातांत कमळ व डाव्या हातांत वीणा असा देखावा आहे. रामनगर येथील तिची मूर्ति वरील प्रकारची असून शिवाय तिला चार हात आहेत असें दाखविलेलें आहे.

यच्चयावत् हिंदु लोक गंगा ही अत्यंत पवित्र आहे व ती सर्व पापांचा नाश करते असें मानतात विशेषतः गंगेचा ज्या ज्या नद्यांशीं संगम होतो तीं संगमस्थानें तीर्थयात्रेचीं ठिकाणें होऊन बसलीं आहेत यात्रेच्या प्रसंगीं गंगेवर लाखों लोक स्नानाला आले असतांना, जो भव्य देखावा दिसतो तो खरोखरच अवर्णनीय होय यांत शंका नाहीं जन्माला यावें व एकदां तरी गंगेत स्नान करून पवित्र व्हावें अशी हिंदूंची समजूत असते. गंगेच्या तीरावर येऊन यात्रेकरू आपल्या पापक्षालनार्थ सक्षौर प्रायश्चित्त करतांना आढळतात. प्रयागास सुवासिनी स्त्रिया वेणीदान करतात. वैशाख शुद्ध ७ स व काशी येथें ज्येष्ठ शुद्ध ७ स गंगेच्या काठीं प्रचंड यात्रा भरते ज्येष्ठ शुद्ध दशमीस गंगेचा जन्मदिन फार थाटांत साजरा केला जातो.कुंभ राशीस गुरु असतां हरिद्वार येथें मोठी यात्रा भरते. असा आणखी पुष्कळ ठिकाणीं यात्रा भरतात.

मृताच्या अस्थी गंगेंत नेऊन टाकल्यानें मृतमनुष्याला स्वर्ग मिळतो अशी भाविक हिंदूंची श्रद्धा असते. यासाठीं पुष्कळ परप्रांतीय लोक देखील मृताच्या अस्थी गंगेंत टाकण्यासाठीं पाठवितात. गंगेच्या काठीं बसून कित्येक गोसावी, साधू व मुमुक्षु स्वर्गप्राप्तीसाठीं तपश्चर्या करीत बस-
[illegible]
[illegible]

[ अॅट्किनसन–हिमालयन गॅझेटियर, अलाहाबाद १८८२–८४, डौसन–हिंदू क्लासिकल डिक्शनरी, स्किनर–एक्सकर्शन्स इन इंडिया लंडन, १८३३, विष्णुपुराण, महाभारत. ]

**गंगाकालवा, वरचा (अप्पर)**—संयुक्त प्रान्तांतील सर्वांत मोठा व अत्यंत महत्त्वाचा कालवा गंगेच्या डाव्या तीराकडून हा घेतला असून अप्पर दुआबचा सर्व प्रदेश ह्या कालव्यामुळें भिजतो.

वेगवेगळ्या शाखा–याच्या (१) देवबंद (२) अनूपशहर (३)कानपूर व इटावा अशा तीन शाखा आहेत या कालव्यानें भिजणारें एकंदर क्षेत्र (१९०३-४) ३८,००,००० चौरस एकर आहे. ह्या कालव्याचें लोअरगंगा व आग्रा कालव्यास पाणी मिळतें. हा कालवा नाव्य आहे या कालव्यातून धान्य, कापूस, गळिताचीं धान्यें, इमारती लांकूड वगैरे सामान जातें.

**खालचा (लोअर)**—संयुक्त प्रान्तांतील दुआबाच्या पूर्व व दक्षिण भागांतील प्रदेशास पाणी देण्यासाठीं तयार केलेला एक कालवा बुलंदशहर जिल्ह्यामध्यें नरौरा येथें हा गंगानदीपासून घेतलेला आहे ह्याच्या शाखा—(१)फतेगड, (२) बिवर (३) कानपूर अशा तीन शाखा आहेत. ह्या कालव्यात १८७८ मध्यें पाणी येण्यास सुरवात झाली.

**गंगाखेर**—हैद्राबाद संस्थानातील परभणी जिल्ह्याच्या एक जहागिरीचें मुख्य ठिकाण.गोदावरीच्या दक्षिणतीरावर हें आहे लो. सं. (१९११) ५९९७ येथील नदीला घाट आहे.

**गंगाझरी**, ज मी न दा री.—मध्यप्रांत जिल्हा भंडारा. तहशील टिरोरा हींत एकंदर ७ खेडीं असून क्षेत्रफळ १८ चौरस मैल आहे. जमीनदार प्रधान आहेत. उत्पन्न ३४०० रुपये व टाकोळी १३०० रुपये गंगाझरी गाव हें रेल्वेचें स्टेशन असून येथें शाळा आहे.

**गंगाधर** ( १ )—या गंगाधराचा काळ शके १३५६. यानें चांद्रमान नावाचें तंत्र केलें आहे. श्रीशैलाच्या पश्चिमेस एकीकडे कृष्णावेणी आणि दुसरीकडे भागिरथी यांच्या मधील सगर नांवाच्या नगरात गंगाधराचें वास्तव्य होतें. त्याचें गोत्र जामदग्न्य होतें. त्याचा पिता इत्यादिकांचीं नावें चंद्रभट, भट्टार्य आणि विठ्ठल अशीं होतीं याच वंशात श्री चंद्रल नामक ज्योतिर्यी झाला. तो सौरमताभिमानी होता विद्यापुरचा राणा श्रीचंद्रलावर प्रेम करीत असे. त्याचा मुलगा विश्वनाथ नावाचा होता. गंगाधरार्चे चांद्रमान तंत्र फार कठिण म्हणून तेंच त्यानें सुबोध पद्यात रचिलें, त्याचा काल उपलब्ध नाहीं [ दीक्षित कृत भा ज्योति-शास्त्र. ]

( २ ) ( १५०८ )—मुहूर्तमार्तंडकार नारायण याचा गंगाधर हा मुलगा होय प्रह्लापवावर गंगाधरानें मनोरमा नावाची टीका केली आहे. याचें गोत्र कौशिक असून हा वाजसनेयीशाखीय होता दौलताबादे ( देवगिरी ) जवळ घृष्णेश्वर या नावाचें एक ज्योतिर्लिंग आहे. त्याच्या उत्तरेस टापर नांवाचें एक गाव आहे, गंगाधर तेथील मूळचा रहाणारा होता जनार्दन हरि आठल्ये यानीं मुहूर्तमार्तंड ग्रंथ मराठी भाषांतरासह शके १७७९ त छापला आहे. त्याच्या प्रस्तावनेंत ते लिहितात कीं, टापर गावीं व आसपास शोध करविला त्यावरून समजतें कीं, ग्रंथकाराचा मातुलवंश मात्र ह्यात आहे. [ दीक्षितकृत भा. ज्योति ].

**गंगाधर कवि**—एक संस्कृत कवि बाप मनोरथ, आजा चक्रपाणी, पणजा दामोदर, चुलता दशरथ, भाऊ महीधर आणि चुलतभाऊ पुरुषोत्तम इतक्या नावाचा उल्लेख शके १०५९ च्या गोविंदपूर येथील शिलालेखात आलेला आहे. हे कदाचित श्रीधरदासानें इ स १२०५ साली लिहिलेल्या " सदुक्ति कर्णामृत " या नावाच्या वगाँर्ग कवींचे वेंचे दिलेल्या ग्रंथातले कवी असावेत

**गंगाधरशास्त्री पटवर्धन**—' पटवर्धन ' पहा

**गंगाधर सरस्वती**—१५ व्या शतकाच्या अखेरीस होऊन गेलेले प्रख्यात साधु नृसिंह सरस्वती, त्यांचा हा शिष्य. गुरुचरित्र म्हणून जो ओंवीबद्ध ग्रंथ मराठींत प्रसिद्ध आहे तो यानेंच केलेला आहे यार्चे आडनाव साखरे

गु रु च रि त्र —सरस्वती गंगाधरानें आपला ग्रंथ सिद्ध व नामधारक यांच्या संवादरूपानें दिला आहे यांतील ओंव्या विवेकसिंधूंतील ओंव्यांशीं फार जुळतात. भाषा फारशी चांगली नसूनहि हा ग्रंथ महाराष्ट्रांत फार पूज्य झाला आहे. दत्तोपासकांना याच्याशिवाय आपल्या देवतेच्या आराधनेकरिता दुसरा चांगला ग्रंथ नसल्यामुळें याची लोकप्रियता वाढली आहे. वासुदेवानंद सरस्वती उर्फ टेंबे स्वामी यानीं याचें संस्कृत भाषांतर थोड्या वर्षांपूर्वी केलें [महा. सारस्वत, अ कोश.]

**गंगापूर**—(१) हैद्राबाद संस्थानातील औरंगाबाद जिल्ह्याचा एक नैर्ऋत्येकडील तालुका. क्षेत्रफळ ५४६ चौ मै लोकसंख्या (१९११) जहागिरींधरून ६४,६७२, खेडीं २००, जहागिरी १५.गंगापूर मुख्य ठिकाण जमीन रिगर जातीची आहे.

(२) राजपुतान्यातील जयपूर संस्थानाच्या गंगापूर नामक निझामत व तालुक्याचें मुख्य ठिकाण जयपूर शहराच्या आग्नेयीस ७० मैलावर हें आहे लोकसंख्या (१९११) ५७८०. येथें ३ शाळा आहेत

(३) संयुक्तप्रांतातील बनारस जिल्ह्याची एक पश्चिमेकडील तहशील हिचा बनारस इस्टेटमध्यें समावेश होतो क्षेत्रफळ ११८ चौरस मैल लो. स. (१९०१) ८८३१ खेडीं २८९. वर्णानदीच्या दक्षिणेकडील प्रदेश सुपीक आहे

**गंगालूर**—मध्यप्रांत बस्तर संस्थानात विजापूरपासून १४ मैलावर हें एक म्हाफीगाव असून संस्थानच्या पट्टराणीकडेस आहे लोकसंख्या १५८४ असून येथें प्राथमिक शाळा व पोलिस चौकी आहे.

**गंगावती**, ता लु का—हैद्राबाद संस्थानातील रायचूर जिल्ह्यातील एक तालुका क्षेत्रफळ ४५९ चौ मै लो स ६३७४० यात शहर गंगावती व खेडीं १४०, पैकीं३७ जहागिरी आहेत अनेगुंडी संस्थान ह्याच तालुक्यात आहे. मद्रासच्या बरेली जिल्ह्यात व ह्यामध्यें आग्नेय भागीं तुंगभद्रा नदी आहे येथील जमीन काळी व कापसास योग्य आहे ह्या तालुक्याच्या पश्चिमेस सालरजंग घराण्याकडे असलेला कोप्पळ नावाचा जहागीर तालुका आहे

गा व —हैद्राबाद संस्थानातील रायचूर जिल्ह्यात गंगावती तालुक्याचें मुख्य ठिकाण अनेगुंडीच्या उत्तरेस ५ मैलावर हें आहे. पूर्वेस दोन मैलावर तुंगभद्रा नदी वहाते. लो. सं ( १९११ ) ६६६३. येथें एक शाळा, एक दवाखाना, व दोन जुनाट देवालयें आहेत येथें धान्याचा व्यापार चालतो.

**गंगाव पे टा**—अपर ब्रह्मदेशातील पकोक्कु जिल्ह्याची उत्तरेकडील टौनशिप क्षेत्रफळ १४०० चौ. मै हींतून मिया व अपर चिंदविन नद्या वहातात. पश्चिमेस चिन टेंकड्या व पूर्वेस पाडौंग टेंकड्या असून मध्यें गंगावचें खोरें आहे. लोकसंख्या ( १९११ ) ३०,७३९. खेडीं १८ मुख्य गाव गंगाव हें मिथव नदीवर आहे

**गंगावन**—स्त्रियांचे केश हें एक महत्त्वाचें शिरोभूषण आहे शोभा आणण्यासाठीं त्यात जे कृत्रिम केश घालतात त्यास

गगावन म्हणतात हे केंस वनगाईच्या शेपटीचे असतात. या गाई नेपाळांत आढळतात तेथून त्यांच्या शेपट्याचे काढे इकडे येतात व त्याचे केस काढून १०ाची तिपदरी गगावनें विक्रावयास ठेवतात अवाड्याची चाल रूढ झाल्यामुळे आता गगावन मागें पडत चाललें आहे पाश्चात्य स्त्रियामध्यें केस सुदर नसल्यास त्या कृत्रिम केंसाचा टोप घालतात ही कृत्रिम केंस वापरण्याची चाल आपल्या इकडे पाश्चात्य लोकांच्या मानानें कमी आहे क्वचितप्रसगी पाश्चात्य पुरुषहि कृत्रिम केंसाचा उपयोग करितात

**गगासागर**—बंगालमधील चोवीस परगणे जिल्ह्यातील एक द्वीप ( 'सागर पहा )

**गगै कोन्डपुरम्**—मद्रास इलाख्यातील त्रिचनापल्ली जिल्ह्याच्या उदययार पालेयम् तालुक्यातील खेडें जयम कोन्ड चोलपुरम्च्या पूर्वेस ६ मैलावर हें आहे लोकसख्या ( १९०१ ) २७०२ इतिहासदृष्ट्या व प्राचीनवस्तुशास्त्र दृष्ट्या हें गाव फार महत्वाचें आहे याच्या नावाचा अर्थ 'गगेच्या थडीवरील शहर असा आहे बाणासुराच्या भक्तीकरिता शकरानें येथें गगा आणली अशी कथा आहे परतु ह्या गावाचें वास्तविक नाव 'गगै कोन्ड चोलपुरम् हेंच असावें कारण हें गाव चोलवशीय नृपानें स्थापिलें शहराचा अवशेष असूनहि दृष्टीस पडतो राजेन्द्र चोल ते कुलोत्तुग चोल पर्यंतचे राजे १०११-१२ ते ११९८ पर्यंत येथेंच रहात असत येथें एक जुनाट पण मोठें देवालय आहे, ते राजेन्द्र चोलचा पिता व राजराजा ह्यानें बाधिलें असें म्हणतात इलियटच्या मतें वीर राजेन्द्र चोल कोप्पर केशरीवर्मा यानें हें बाधलें असावें. फर्ग्युसन ह्या याचा काल १४ वें शतक ठरवितो १८३६ मध्यें ह्या देवालयाचें आवार वगैरे पाडून त्याचें साहित्य कोलेरूनचा लोअर अनिकट बाधण्यास नेलें [ ब्रॅन्किल—जे ए एस् बी पु ४९ ए रि ए ]

**गगोत्री**—सयुक्तप्रान्तातील गढवाल सस्थानच्या टिहरी जिल्ह्यातील एक पहाडावरील स्थान हें हिंदूचें प्रसिद्ध तीर्थस्थान आहे उ अ ३१ व पू रे ७८° ५७' उंची १०३१९ फूट भागीरथी नदीच्या सव्यतीरावर हें आहे येथून जवळ असणा या गौरीकुडा केदारगगा व भागीरथी याचा सगम होतो देवालयात गगा, यमुना व सरस्वती याच्या मूर्ती असून एकीकडे भागीरथी व दुसरीकडे शकराचार्य याच्या मूर्ती आहेत गगोत्री क्षेत्र हें गगेचें उगमस्थान मानितात पण खरें उगमस्थान गोमुख असून तें येथून ८।१२ मैलावर आहे तेथें जाणें कठिण आहे गढवालमधील गुरखा सेनापति अमरसिंगथप्पा ह्यानें १८०वा शतकात हें मदिर बाधिलें उन्हाळयात यात्रेकरूचे थवेच्या थवे दर्शनार्थ लोटतात त्याचे रहाण्याचे सोयीकरितां येथें बऱ्याच धर्मशाळा बाधण्यात आल्या आहेत पवित्र जलानें गगोत्री येथें भरलेली व बद केलेली भाडीं हिंदुस्थानच्या इतर भागात भाविक लोक घेऊन जातात हिंवाळ्यात मदिर बर्फाच्छादित असतें व पुजारी लोक मखब्यास जातात [ स्किनर-एक्स्कर्शन्स इन इडिया ' हिमालयातील तीर्थस्थानें ( लोकशिक्षण, वर्ष ४ ), तीर्थयात्राप्रबध ]

**गगोह**—सयुक्तप्रातातील सहारणपूर जिल्ह्याच्या नकूर तहसिलीतें एक गाव गगाह परगण्याचें मुख्य ठिकाण लो स (१९११) ११३७३ ह्या गावाचे नवा व जुना असे दोन भाग असून जुना भाग राजा गगनें वसविला व नवा भाग शेख अबदुल कद्दूस नावाच्या मुसुलमान साधूनें वसविला हुमायून बादशहानें बाधलेली ( १५३७ साली ) कद्दूसाची येथें कबर आहे येथें जुनाट मशीदी ( पैकीं दोन अकबरानें व जहांगिरानें बाधिलेल्या आहेत ), शाळा व दवाखानाहि आहे गाव फार स्वच्छ आहे

**गजकर्ण**—( *दद्रुरोग-रिंगवर्म* )हा *रोग होण्याचें कारण तीन अथवा चार तऱ्हेचे एकमेकाशीं साम्य असलेलें उद्भिज्ज बीज ( बिडज )* हें होय हा डोक्यास झाल्यास अर्धा ते तीन चार इ र्च्यासाच्या बहुधा वर्तुळाकार टक्कल पडलेल्या व वर तुटक केंस असलेल्या जागा नजरेस येतात त्यावरुन पाढऱ्या कोंड्याप्रमाणें त्वचेपासून सुटलेल्या खवल्याचें कीट जमलेलें असतें रोगी अशक्त व दुबळें पोर असल्यास या केंसाच्या मूळात पू होऊन केंस चिकटतात, खवडा बनतो व वर खपली धरते याचें बीज जें वर सांगितलें त्याचे असख्य परिमाण केंसाच्या मुळात प्रवेश करुन असतात आणि असला एखादा केंस उपटून तो लायकर पोटयाश या रासायनिक द्रवात भिजवून सूक्ष्मदर्शक यत्रानें तपासून पाहिला असता त्या केंसाचा बहुतेक भाग या बीजपरमाणूचा मध्यबिंदु स्पष्ट दिसत असलेल्या लाबच लाब रागानी भरुन गेलेला दिसून येतो हे सर्व परमाणू अगदी एकसारख्या आकाराचे असतात हेच परमाणू कधीं कधीं दाढीच्या केंसावर रोग उत्पन्न करितात शरीराच्या बिनकेंसाळ भागालाहि गजकर्ण किंवा दद्रुरोग होतो हे सुप्रसिद्धच आहे त्वचेवर लाल वर्तुळाकार जरा उचललेली एक कड व गाधी उठल्याप्रमाणें दिसणारा त्वग्रोग जर आपल्या पहाण्यात आला तर तो हा गजकर्ण रोग आहे अशी शका येणें साहजिक आहे नायटे वगैरे त्वग्रोग यापैकींच होत हा रोग सर्वसामान्य आहे व पूर्ण बरा होण्यास अत्यत कठिण आहे म्हणून यातून अर्धवट बरी झालेली, केंस गळत असलेली व टक्कल पडलेली माणसें बरींच पहाण्यात येतात हा रोग लवकर बरा न होण्याचें कारण हे जे रोगट व मृत केश डोक्यावर असतात ते समूळ काढल्याशिवाय हें बीजपरमाणूनाशक औषध अथवा मलम त्यात भिनून त्या किडीचा नाश होत नाहीं ते केंस गळून पडले तर तेथें औषध सहज भिनून गजकर्ण तेव्हाच बरा होतें तसें डोकें दाढी यावरील होत नाहीं हा रोग कित्येक महिनेपर्यंत (वर्षेहि) इलाज न केल्यास राहून मग आपोआप बरा होतो

उपचार.—कैंसाच्या पिंडातील मूळात रोगबीज परमाणूंची बेसुमार वृद्धि होत असल्यामुळें त्या पिंडात मलम पोंचणें अवश्य पण अवघड आहे. यासाठीं जतुघ्न मलम जें चोळावयाचें तें कडक व तीव्र शक्तीचें चोळल्यानें त्याच्या दाहामुळें केशपिंड सुजून फुगतो व त्यावरील त्वचाहि सुजते पण त्यामुळें आंतील रोगट केंस सुटून येतात व रोगबीज मरतें. या कामीं 'क्ष' किरणाचा उपयोग केल्यानें एकदशांश वेळांत हें कार्य होतें पण हें यंत्र सर्वांसच उपलब्ध नसतें ही त्यांत अडचण आहे. जें कोणतें जतुघ्न मलम लावावयाचें तें सकाळ संध्याकाळ तो भाग साबणानें स्वच्छ करून मग चोळचोळून लावावें. या कामीं पारदयुक्त मलमें विशेष उपयुक्त आहेत त्यांचीं व अन्य प्रकारच्या मलमांचीं व द्रवांचीं नांवें पुढें दिलीं आहेत —(१) हैड्रार्ज अमोनायाटाचें मलम (२) शेकडा ३ पासून शेकडा १० प्रमाणात हैड्रार्ज ओलिएट असलेलें मलम (३) ग्लिसरीन ॲसिड कार्बालिक (४) आयोडीन टिंक्चर (५) क्रोसारोबीन अगर गोवा पावडरचें मलम इत्यादि. रोग्याच्या फणी, रुमाल, टोपी इत्यादि वस्तु वापरल्यामुळें इतर माणसांत होणारा रोगप्रसार न होऊं देण्यासाठीं जपावें. टोपींत रोज नवा कागद घालून पहिला जाळावा. शरीरावरील इतर भागाच गजकर्ण वरील मलमाच्या किंवा द्रवाच्या योगानें बरें होतें.

**गजपती**—वंग (बंगाल) व कलिंग (आंध्र व गंजम) या देशांत पूर्वी फार हत्ती असत, त्यामुळें तेथील राजाच्या पदरीं गजदळ पुष्कळ असे. त्यावरून त्याच्या नांवापुढें गजपति हें एक विशेष उपपद नेहमीं लावण्यांत येऊं लागलें. बंगालच्या पाल राजांनाहि गजपती म्हणत असत. सोळाव्या शतकांत गजपति प्रतापरुद्र म्हणून एक प्रख्यात राजा कलिंगदेशांत होऊन गेला. त्यानें कामशास्त्रावर ग्रंथ लिहिला असून कायदेकानूवरहि एक ग्रंथ लिहिला. त्याला सरस्वति विलास असें नांव आहे. याच्या पदरीं कदंब नांवाचा एक कवि असून तो दिवाण होता. [कविचरित्र, वैद्य—मध्ययुगीन भारत भा. २. पिटर्सन—रिपोर्ट नं. ४]

**गजपतीनगरम्**—मद्रास इलाख्यांतील विजगापट्टम जिल्ह्यामधील एक तहशील ही घाटाला लागून आहे. क्षेत्रफळ ३०२ चौ. मै. लो. सं. (१९२१) १४९३६१ खेडीं १२९ महसूल व इतर पट्ट्या मिळून वार्षिक उत्पन्न ४० हजार आहे.

**गजबाहु**—हा सीलोनचा राजा असून याचा काळ प्रो. गैगरच्या मतें सं. १७३ किंवा १९१ हा आहे. हा पहिला पांड्यराजा जो नेदुम–चेलियन त्याचा समकालीन होता. तसेंच पराक्रमी चेर राजा शेनगुत्तुवन व नेदुमुदी किल्ली चोलराज हेहि गजबाहूचे समकालीन होते. चेरराजा शेनगुत्तुवन यानें पोला दिल्यावरून गजबाहु हा वनजी येथील पत्तिनीदेवीच्या स्थापनेच्या वेळीं हजर होता. सीलोनी दंतकथेप्रमाणें याचा काळ सं. ११३–१३५ असा येतो. याच्या कारकीर्दीतच शिलप्पदिकारम् हें तामील महाकाव्य निर्माण झालें. याच गजबाहूनें बहुधा तामीळराज्या (चोलाच्या)वर स्वारी केली असावी, कारण त्याच्या बापाच्या कारकीर्दीत चोलराजानें सीलोनवर स्वारी करून तेथील बारा हजार लोकांना कैद करून कावेरी नांवाची राजधानी वसविण्याच्या कामीं त्यांना मजूर म्हणून नेण्यांत आलें होतें. गजबाहूनें चोलावर चढाई करून हे कैदी सोडविले व त्याबरोबरच पट्टिणी देवीच्या पायांतील एक नूपुर व बुद्धाचें भिक्षापात्र आणि इतर अस्मरणीय वस्तु (ज्या पूर्वी चोलराजानें नेल्या होत्या) तिकडून पुनरपि सीलोनमध्यें आणिल्या. याच्याबद्दल महावंश या बौद्ध ग्रंथांत पुष्कळ माहिती आढळते. दुसरा एक गजबाहु सीलोनचा राजा झाला होता. त्याचा काल अकरावें शतक होय. [महावंश, अय्यंगार–एन्शन्ट इंडिया, स्मिथ–अर्ली व ऑक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया.]

**गंजम, जिल्हा**—(छत्रपुर) हा मद्रास इलाख्यांतला सर्वांत उत्तरेकडचा जिल्हा असून बंगालच्या उपसागराच्या किनाऱ्यानें वसला आहे. याचें क्षेत्रफळ ४८३५ चौरस मैल आहे. याच्या उत्तरेस ओरिसा व कांहीं संस्थानें, पूर्वेस बंगालचा उपसागर आणि पश्चिमेस विजगापट्टम जिल्हा आहे. बहुतेक भाग डोंगराळ व खडकाळ आहे. तरी पण इतस्ततः दरीखोरीं व सुपीक सपाट जमीनीहि आहेत.

या जिल्ह्यातून पूर्वघाट जात असून त्यामुळें मालिया (टेंकड्या) व मैदानें असे याचे दोन स्पष्ट विभाग झाले आहेत. समुद्रापासून घाटापर्यंत जास्तींत जास्त अंतर ५० मैल व कमींत कमी १५ मैल आहे, आणि याच ठिकाणीं त्याचीं सर्वांत जास्त उंच शिखरें आहेत. तीं बरूआ जवळ असून त्यांचीं नांवें सिंगाराजु आणि महेंद्रगिरी अशीं आहेत. दोहोंची उंची ५००० फुटाच्या जवळ आहे. देवगिरी शिखर (४५३५) याच्या खालोखाल उंच आहे. मालिया (टेंकड्या) या एजंटच्या ताब्यांत असल्यामुळें त्यांना गंजम एजन्सी असें म्हणतात. ह्या भागांत रानटी लोकांची वस्ती असल्यामुळें कलेक्टरला जादा अधिकार असतात.

या जिल्ह्यांत तळीं व सरोवरें क्वचितच दिसतात. परंतु कोठें कोठें कांहीं गोड्या (तपरास) व कांहीं खाऱ्या (सागरम्) पाण्याचीं तळीं आढळतात. उत्तरेच्या बाजूला चिल्का हें सर्वांत मोठें सरोवर आहे.

या जिल्ह्यांत तीन नद्या असून त्यांचा उपयोग कालवे काढून शेतीकडे करतात. ऋषिकुल्या ही जिल्ह्याच्या उत्तर भागांतून वहाते. महानदी आणि गोदा हद्दी या हिच्याच शाखा आहेत. वंशधर आणि लांगुल्य या थेट दक्षिण मर्यादेपर्यंत वहात जाऊन चिकाकोलजवळ समुद्रास मिळतात. लांगुल्य ही शेवटचे २० मैलपर्यंत गंजम जिल्ह्याची दक्षिण मर्यादाच आहे.

या जिल्ह्यांत किनाऱ्यापासून आंत गेल्यावर मोठ्या झाडांचीं अरण्यें आहेत व तेथ पाऊसहि पुष्कळ पडतो. गंजम जिल्ह्यांत शिकारहि साधारण बरी आहे. तरस फार असून लांडगे, चित्ते व वाघ हेहि

डोंगराच्या उतारावर हरिणाच्या वर्गातले म्हणजे सांबर, चितळ व भुंकणारे आणि जंगली जातीचे हरिण आढळतात नीलगाईसुद्धा क्वचित् याच उतारावर दिसतात. मैदानात काळवीट आढळतात पण चार शिंगाचे काळवीट, गवा व रानडुकर हीं कमी व विरळ आहेत. जंगली कुत्रे फार भयंकर आहेत व ते जमावानें श्वापदावर हल्ले करतात

किनाऱ्यालगतची हवा थंड व निरोगी (आरोग्यकारक) आहे व जिल्ह्यातील बहुतेक शहरें याच भागात वसलेली आहेत खुद्द गंजम शहर मात्र मलेरियाचें माहेरघर आहे, व म्हणून तेथून जिल्ह्याचें मुख्य ठाणें केव्हांच उठविलें गेलें आहे. मालिया (टेंकड्या) व बाजूचा भाग नेहमीं मलेरियानें दूषित असतो. येथें हिंवाळा फारच बहारीचा जातो व पावसाळा चांगलाच असतो सरासरी पावसाचें मान ४५ इंच असून पाऊस पडण्याचे दिवस ५९ भरतात.

इतिहास.— गंजम हा पूर्वीच्या कलिंगाचा एक भाग होता. २६० व्या वर्षी मौर्य राजा अशोक यानें हा जिंकून घेतला नंतर कांहीं दिवस वेंगीच्या आंध्र राजाच्या ताब्यात हा असावा. हे दोघेहि बौद्ध होते अशोकानें जौगडा येथें एक शासन खोदून (आदेश) ठेवलें आहे

इ. स च्या ३ ऱ्या शतकात आंध्र राजाच्या जागीं कलिंगाचे गंगवंशीय राजे आले यांचें कालमान व त्याचा वेंगीच्या चालुक्याशीं असलेला संबंध याविषयीं कांहाच निश्चित सांगता येत नाहीं. पण या चालुक्यांनीं सुद्धा गंजमच्या कांहीं भागावर तरी सत्ता गाजवली असावी. दहाव्या व अकराव्या शतकाच्या दरम्यान चोल राजानीं वेंगी व कलिंग देश जिंकले तेव्हा त्यातच गंजम अगर त्याचा पुष्कळसा भाग आला होता व महेंद्रगिरीवर प्रसिद्ध चोल राजा राजेंद्र याचे विजयाचे दाखले सांपडतात. चोलाची कलिंगावरील सत्ता किती काल व कितपत होती याविषयीं संशयच आहे , याच सुमारास गंगराजाची दुसरी एक शाखा उदयास आली व प्रथमतः चोलाचे मांडलीक म्हणून व नंतर स्वतंत्रपणानें त्यानीं चार शतकेंपर्यंत कलिंगावर राज्य केलें. त्यानीं आपली राज्यमर्यादा दक्षिणोत्तर बरीच विस्तृत केली पण शेवटीं त्याना केवळ अंतःकलहास बळी पडावें लागलें. पंधराव्या शतकात तत्कालीन प्रधान गजपती घराण्याच्या मूळ संस्थापकानें, आपल्या राजाचा वध करून तक्त बळकावलें जिल्ह्याचा बराच भाग अद्याप गजपती घराण्याकडेच आहे. १५७१ च्या सुमारास गोवळकोंड्याच्या कुतुबशहानें त्याना अधिकारच्युत केलें. पावणेदोनशेंपेक्षा जास्त वर्षेपर्यंत चिकाकोलच्या मुसुलमानानीं येथें अंमल गाजविला. त्याचें स्मारक म्हणून फक्त एक मशीद आज त्या गावीं अवशिष्ट आहे.

१६८७ मध्यें औरंगझेबानें गोंवळकोंड्याच्या राजास आपलें मांडलिकत्व कबूल करावयास लावलें व त्यानंतर चिकाकोलच्या सुभेदाराची नेमणूक दक्षिणचा सुभेदार करू लागला दख्खनच्या सुभेदाराना फ्रेंच लोकानीं दिलेल्या मदतीबद्दल १७५३ मध्यें त्याना सुभेदाराकडून जो मुलुख मिळाला त्यांत चिकाकोलसरकारचा व गंजमचा समावेश झाला होता. १७५७ मध्यें तेथें व्यवस्था करण्याकरितां बुसी आला होता; परंतु मद्रासेस मदतीकरिता म्हणून त्याला लालीनें बोलावल्यामुळें तो परत गेला. त्यानंतर क्लाईव्हनें फोर्ड याजबरोबर बरेंच सैन्य देऊन पाठवलें. त्यानें फ्रेंच अधिकाऱ्याचा पराभव करून त्याचें मुख्य ठिकाण मच्छलीपट्टण हें १७५९ च्या जानेवारींत घेतलें. त्यानंतर दक्षिणेच्या सुभेदारानें फ्रेंचाची बाजू सोडून इंग्रजाशीं तह केला. फ्रेंचास या भागात वसाहत करू न देण्याचें कबूल केलें १७६५ मध्यें बादशाही फर्मानानें हा तह पक्का होऊन सुभेदाराशीं झालेल्या १७६६ मधल्या दुसऱ्या तहानें सगळा उत्तरसरकार प्रांत इंग्रजाच्या पदरीं पडला.

इलाख्यातील सर्व भागात गंजममध्येंच स्थिरस्थावर होण्यास फार वेळ लागला. सुमारें ७० वर्षेपर्यंत तेथें कांहींतरी गडबड होतीच. पूर्वी गंजमचा विस्तार पुंडी नदीपर्यंत होता व या मुलुखात बरेच जमीनदार ३० किल्ले व ३२००० सैन्य बाळगून होते. यानीं आपसातील भांडणें व शेजारच्या खेड्यावर हल्ला चालवून सर्वत्र पुंडाई माजवून मागितलेला दंड व खंडणी देण्याचें ते नाकारीत. त्याच्यावर पुष्कळ वेळा स्वाऱ्या करून त्याना कह्यात ठेवावें लागे पण ही शांतता कायमची व खात्रीची नसे

१८०३ मध्यें गंजम जिल्ह्याला पार्लाकिमेडीच्या जमिनदारीसह चिकाकोल पोटविभाग जोडण्यात आला. या भागात १८१२ पासून १८३२ पर्यंत अशांतताच होती व तिचें कारण म्हणजे तेथील अकरा छोटेखानी संस्थानिक अथवा जमीनदार याची आपसातील दुही व भांडणें हें होय या संस्थानिकास बिसोई म्हणत. याना पूर्वीच्या जमिनदारानें कित्येक खेडीं बहाल केलीं होतीं. कारण सावरा जातीच्या डोंगरी लोकाचा बंदोबस्त करून त्याचे सपाटीवरील लोकावर येणारे छापे बंद करण्याचें त्यानीं कबूल केलें होतें. ही अट तर बिसोई यानीं पाळली नाहींच पण स्वतः त्यानींच पुंडपणा आरंभला आणि खेड्यापाड्यास सतावून सोडलें १८१६ मध्यें जयपूरकडून ४ । ५ हजार पेंढार लोटले व सर्व प्रदेश जाळून पोळून फस्त केला. १८३२ मध्यें बिसोई लोकानीं बरीच पुंडाई माजविल्यामुळें रसेल यास त्याच्यावर नेमून त्याचा बंदोबस्त करण्यात आला. लवकरच खोंड लोकातील नरमेधाची चाल बंद पडली.

१८३९ मध्ये स्वतंत्र कायदा पास होऊन गंजमच्या कलेक्टरला गव्हर्नरचा एजंट हा किताब व डोंगरी मुलुख व लोक यांजवर विशेष अधिकार मिळाले. त्या वेळच्या परिस्थितीचें व त्यावेळच्या गंजमचें वर्णन रसेलच्या लेखात व मिरिआ एजंटच्या रिपोर्टांत वाचावयास सांपडतें

जौगडा येथील शिलालेखाशिवाय वर्णनीय अशा प्राचीन वस्तू म्हणजे कित्येक पुरातन देवळें व कित्येक शिल्पशास्त्रीय व खोदकाम यांचे उत्कृष्ट नमुने येथें असून कलिंग घराण्याच्या पूर्वेतिहासावर प्रकाश पाडणारे लेखहि आढळतात. यापैकीं श्रीकुर्म येथील वैष्णवपंथी मठ व मुखलिंग येथील शैवमंदिर हीं दोन फार प्रसिद्ध आहेत.

लोकवस्ती.—लोकसंख्या १९२१ च्या खानेसुमारीत १८,३५,५९२ भरली. जिल्ह्यांत शहरें फक्त ९ असून बेरामपूर, चिकाकोल आणि पार्लाकिमेडी येथें म्युनिसिपालिट्या आहेत. शहरें मैदानावर वसलीं असून तेथील खेडींहि टेंकड्यांतरील संख्यापेक्षा मोठीं आहेत. एकंदर खेडीं ६१८५ आहेत. सपाट मुलुखात शेंकडा ९९ हिंदू आहेत. एजन्सीपट्ट्यात शेंकडा ६६ च्या वर वन्य हिंदू आहेत. सखल प्रदेशात वस्ती दाट असून टेंकड्याकडे विरळ आहे. सपाटीवर दक्षिणेकडे तेलगू व उत्तरेस उरिया भाषा प्रचलित असून एजन्सीपट्टयामध्यें खोंड भाषा चालते व तेथेंहि दक्षिण भागांत मालियाप्रावरा भाषेचा बराच उपयोग होतो. या जिल्ह्यात मुसलमान व खिश्चन फारच कमी आहेत. मैदानावर बहुधा तेलगू व उरिया जातीचेच लोक आढळतात. तेलगूंपैकीं शेतकाम करणारे कापु लोक (सुमारें दीड लाख) पुष्कळ असून त्याच्या खालोखाल कलिंग (एक लाख) लोक येतात. कलिंगाची एवढी मोठी वस्ती दुसऱ्या कोणत्याहि जिल्ह्यांत नाहीं. उरिया जातींत ब्राह्मण बरेच असून एकंदर लोकवस्तीशीं त्यांचे प्रमाण जवळजवळ ८ पडतें.

उपजीविकेचें साधन सामान्यतः शेतीच असून सपाटीवर शेंकडा ६६ शेतकी कामात गुंतलेले असून त्यापैकीं बहुतेक शेतीचे मजूर आहेत. एजन्सीपट्टयात बहुतेक सर्व लोक शेतीवरच रहात असून विणकामावर रहाणारे थोडे लोक आहेत.

जिल्ह्याच्या ४८३५ चौरस मैलांपैकीं ५२९८७० एकर जमीन रयतवारी व लहान इनामी गांवातील लागवडीतील व संबंध इनामी एकर १९५९९८ आहेत. एजन्सी पट्टा, जमीनदारी व इनाम जमीन याविषयीं सविस्तर माहिती संकलित नाहीं. तांदूळ व रागी हीं दोन मुख्य धान्यें होतात.

जंगल:—या जिल्ह्यातील बहुतेक जंगलें इनाम जमिनीत आहेत आणि सरकारी ताब्यातहि जीं जंगलें आहेत तींहि दुर्गम असल्यामुळे जंगलखात्याचा कायदा इकडे फारसा लागू केलेला नाहीं.

गंजममध्यें म्हणण्यासारख्या खाणी नाहींत. पोंपिराणीजवळ थोडेसें मॅंगनीज सापडतें. गुमसूर तालुक्यात व पार्लाकिमेडी येथें अभ्रक, ॲन्टिमनी व ग्रॅफाईट हीं सांपडतात. पण व्यापार करण्याइतका पुरवठा नाहीं. किनाऱ्यानें हुमा, सुरदा, नौपाडा आणि कलिंगपटम् येथें मीठ तयार करण्याचीं सरकारी मीठागरें आहेत.

व्यापार आणि दळणवळण—शेतीशिवाय मुख्य उद्योग म्हणजे विणकामाचा होय. सपाटीवरील बहुतेक सर्व खेड्यांतून सामान्य तऱ्हेचा कपडा विणला जातो व बेरामपूर येथें रेशमी कापड तयार होतें.

गंजमचा निर्यात व्यापार मुख्यतः धान्य, कमावलेलीं कातडीं, गळिताचें धान्य, हळद, लाकूड, खारे मासे आणि नारळ याचा चालतो. मुख्य आयात माल म्हणजे तांदूळ, कपडा, काचसामान, धातू व धातुसामान, मातीचें तेल, मसाल्याचे पदार्थ व गोण हा होय. गोपाळपूर, कलिंगपटम् व बारूव्हा हीं तीन बंदरें असून पहिलीं दोन मोठीं व परदेशाशीं व्यापार करणारीं आहेत.

बंगाल नागपूर रेल्वेची ईस्ट कोस्ट शाखा जिल्ह्यापासून दक्षिणोत्तर गेली असून नौपाडा येथून पार्लाकिमेडि जमीनदारींत एक अरुंद शाखा गेली आहे. येथून मिठागरापर्यंत एक फाटा काढला आहे.

१७६६ मध्यें इंग्रजांनी हा जिल्हा आपल्या ताब्यात घेतला तेव्हा जमीनदारी व हवेली असे यातील जमीनीचे दोन भाग होते. कंपनीच्या हुकमावरून एका अधिकाऱ्याची नेमणूक होऊन १८०४ मध्यें हा जिल्हा कायमधाऱ्याच्या पद्धतीखालीं आणला गेला. जमीनदारांना त्यांच्या वतनाची कायम धाऱ्यानें सनद देण्यात आली व हवेली जमीन लिलावानें जास्तीत जास्त किंमतीस विकण्यात आली. जमीनदार व खासगी लोक याच्याकडे कायम धाऱ्याची बाकी फुगत चालली व १८०९ ते १८५१ च्या दरम्यान सर्व जमीन पुन्हा सरकारात आली. त्याचे बेऱ्हामपूर, चिकाकोल व गुमसूर हे तीन तालुके करण्यात आले. चिकाकोलमध्यें इ. स. १८१७ मध्यें जमिनीची पाहणी व विभागणी करून रयतवारी पद्धत सुरू करण्यात आली. तथापि १८७८ पर्यंत हल्लींची समाधानकारक व्यवस्था करणें शक्य झालें नाहीं. १८६६ मध्यें सर्व सरकारी तालुक्यातून मोजणी व १८७५ मध्यें आकारणी सुरू होऊन १८९८ मध्यें काम पुरें झालें १९०६ मध्यें पार्लाकिमेडी एजन्सीमधील १२२ खेड्यात लोकलबोर्डाचा कायदा लावण्यात आला चिकाकोल, पार्लाकिमेडी व बेऱ्हामपूर येथें म्युनिसिपल कमिटी आहे. चिकाकोल, बेऱ्हामपूर व गुमसूर येथें तालुकाबोर्डे आहेत. व तीन डिस्ट्रिक्ट बोर्डे आहेत. मात्र एजन्सी पट्ट्यावर याचा ताबा नाहीं.

शिक्षण—जिल्ह्यातील सपाटीच्या प्रदेशाचा नंबर इलाख्यांत शिक्षणाच्या बाबतींत १७ वा आहे. दर दहा हजारी ६ व ८ लोकांनी लिहिता वाचता येतें. तसेंच दर १० हजार लोकात शेंकडा फक्त १२५ साक्षर (पुरुष १२३ व स्त्रिया २) इंग्रजी येतें. तेलगू लोकात इंग्रजी शिक्षण जास्त असून देशी शिक्षणात उरिया लोक वरचढ आहेत.

शहर.—(छत्रपूर) जिल्ह्याचें मुख्य उ. अ. १९° २३' व पू. रे. ८५° ५'...

नदीच्या मुखाजवळ वसलें आहे. येथून मुख्य सडक व ईस्ट-कोस्ट रेल्वे जाते. लोकसंख्या (इ स १९०१) ४३९७ शहर व किल्ल्याचा अवशिष्ट भाग ही उंचावर असून पूर्वी येथें बराच व्यापार चालत असे येथील किल्ला इ. स. १७६८ मध्यें मराठ्यांच्या हल्ल्यापासून बचाव करून घेण्याकरिता बांधलेला होता इ. स १८१५ मध्यें येथें तापाची भयंकर साथ आली, तिनें पुष्कळ युरोपियन आणि एतद्देशीय यांचा संहार केला तेव्हापासून जिल्ह्याचें मुख्य ठिकाण बेऱ्हामपूर येथें नेण्यात आलें व यामुळे शहराचें महत्व बरेंच कमी झालें येथील कित्येक सुंदर इमारती कालगतीनें पडून गेल्या व कित्येक तर पाडून टाकण्यात आल्या. पूर्वी हें बंदर होतें, पण व्यापार बंद झाल्यानें व बोंदाशी गाळ वसत चालल्यानें १८८७ पासून तें बंद करण्यात आलें येथून ओरिसामध्यें तांदूळ फार जातो.

**गजेंद्रगड**—मुंबई, धारवाड जिल्हा ह बदामीच्या पश्चिमेस २८ मैलावर एक खेडें आहे हें पूर्वी मुधोळच्या घोरपड्याकडे होतें. येथें शिवाजीनें बांधलेला एक किल्ला आहे. येथील उंचगिरी नावाचा दुसरा किल्ला १६८८ त दौलतराव घोरपड्यानीं बांधला. गावापासून ३ मैलावर एका खोऱ्यात यात्रा भरत असते या खोऱ्यात शंकराची मूर्ति आहे लोकसंख्या (१९११) ८३०९.

येथील घोरपड्याना हिंदुराव ही पदवी आहे. बहिरजी घोरपड्यानें शिवाजी महाराजाच्या कारकीर्दीत गजेंद्रगड व गुत्ती मिळविली संताजी हा प्रख्यात सेनापति या बहिरजीचा भाऊ होय. संताजीला पुढें कापशी गाव इनाम मिळाल्यानें त्याचे वंशास कापशीकर नाव पडलें व बहिरजी हा गजेंद्रगडास राहिल्यानें त्याच्या वंशास गजेंद्रगडकर म्हणू लागले याचा वडील मुलगा हा बावीस वर्षांचा असतानाच मुसुलमानावरोबरच्या एका लढाईत ठार झाला. त्याचा धाकटा भाऊ शिदोजी याला हिंदुराव ममलकतमदार जफ्तनमुल्क फत्तेजंग समशेर बहादूर सेनापति अशी पदवी होती कोल्हापुरची देवी मुसुलमानाच्या भयामुळें मध्यंतरीं दुसरीकडे ठेविली होती, ती पुन्हा कोल्हापुरच्या राज्याची स्थिरस्थावर होताच या शिदोजीनें स्थापिली त्यावद्दल त्याला देवीच्या प्रधानकीची वस्त्रें व पाच गावची सरदेशमुखी इनाम मिळाली शिदोजी हा पेशव्याना अनुसरून वागे. याचे मुरारराव, दौलतराव व भुजगराव असे तीन पुत्र होते. पैकी भुजगराव हा २० व्या वर्षी लढाईत मरण पावला. मुरारराव हा पराक्रमी होता. हा जवळ जवळ स्वतंत्र वागे, याच्या पदरीं कवायती पलटणें असल्यानें त्याचा दरारा निजाम, टिपू व इंग्रज यास त्या प्रांतीं चांगलाच असे हा पेशव्याच्या तर्फेनें तिकडे बंदोबस्त ठेवी त्यानीं त्याला सेनापतिपद दिलें होतें. हा बहुधा गुत्तीस राही. वीस पंच वीस लाखाचा प्रांत त्यानें काबीज केला होता अनेक कारणें त्यानें पाहिल्या होत्या. इंग्रजासहि यानें अडचणींत मदत केली होती. मुराररावाकडे गुत्ती व दौलतरावाकडे गजेंद्रगड अशी वाटणी पेशव्यानीं करून दिली. मुरारराव शेवटीं टिपूच्या हातीं लागले त्यानें त्याला शेवटपर्यंत त्याची बेडी पायात घालून कपालदुर्गास कैदेंत ठेविलें होतें टिपूनें गजेंद्रगडहि घेतला. पुढें हरिपंत तात्या टिपूवर चालून आले तेव्हा पेशव्याच्या मदतीनें दौलतरावानें गजेंद्रगड हस्तगत केला.त्यावेळी तीन लाखाचा सरंजाम किल्ल्याकडे चालत होता. परशुरामभाऊ पटवर्धन व दौलतराव यांची फार दोस्ती होती. दौलतरावहि शूर होता निजामाशीं तह झाल्यावेळी हरिपंततात्यानीं दौलतरावाची पावणेतीन लक्षाची जहागीर निजामाकडे देऊन दौलतरावास पंचवीस हजाराची जहागीर खर्चास ठेविली मध्यंतरीं थोरल्या माधवरावानीं गलगले, इंगलवगैरे ५०१६० हजाराची जहागीर याना दिली होती.रावबाजीच्या वेळीं पुन्हां घोरपड्याच्या जहागिरींपैकीं कांहीं गावें जप्त झालीं. दौलतरावास बहिरजं म्हणून पुत्र होता त्याचा पुत्र भुजगराव बहिरजी याच्या वेळीं इंग्रजी झाली त्यावेळीं गजेंद्रगड संस्थान तेरा हजाराचें होतें. [डफ; कैफियती, विजापूर ग्याझे राजवाडे. खं ७, १०]

**गझनी**—अफगाणिस्तानांतील गझनी जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें काबूलपासून ९२ मैल व कंदाहारपासून २२१ मैल समुद्रसपाटीपासून ७२७९ फूट उंचीवर वसलें आहे. गझनी हें गझनी घराण्याची राजधानी होय महमद गझनवीनें हिंदुस्थानावर बऱ्याच स्वाऱ्या केल्या. त्यानें समरकंद इस्पाहानपासून लाहोरपर्यंत राज्याचा विस्तार केला पण त्याच्या मागून या शहरास उतरती कळा लागली. महमदाच्या वेळीं गझनींत येथें भव्य इमारती होत्या व तें एक विद्येचें मुख्य पीठ होतें. ११५२ मध्यें अल्लाउद्दीन घोरीनें त्याचा विध्वंस केला. यापुढें गझनीला मूळचें स्वातंत्र्यमहत्व केव्हांहि प्राप्त झालें नाहीं व तें काबुलच्या कायमचें अंकित बनलें

पहिल्या अफगाण युद्धामध्यें (१८३९) इंग्रजानीं गझनी सर केलें व १८४१ पर्यंत तसेंच होतें. १८४१ मध्यें येथील इंग्रज सैन्यास अफगाणाना शरण जावें लागलें. १८४२ मध्यें पुन्हा इंग्रजी सैन्य तेथें गेलें होतें. गझनी हें आता लष्करी दृष्ट्या मुळीच महत्वाचें नाहीं. तेथें फक्त १००० घरें आहेत. बाजूनें गझनी नदी वहाते. जुनाट तट वगैरे किल्ल्याचा पडित भाग आहे. येथें वस्ती अफगाण हजारा व हिंदुव्यापारी यांची आहे. मुख्य व्यापार धान्य, फळें, लोंकर वगैरेचा आहे. येथें हिवाळ्यात फार बर्फ पडतें उन्हाळा व पावसाळा यात सार्थीचे ताप होतात तीन मैलावर जुन्या शहराचे कांहीं अवशेष व दोन १०० फूट उंचीचे मनोरे आहेत.

**गझनी घराणें**—इराणात सामानी नांवाच्या राजवंशानें सुमारें दोनशें वर्षें राज्य केलें, पुढें त्याच्या पडत्या काळात तुर्क लोकानीं आपलें महत्व पूर्वेकडे वाढविलें, सामानराज

अबदुल मलीक याच्या पदरीं अल्प-तेगीन नावाचा एक तुर्क गुलाम होता. त्याच्यावर अबदुलची मर्जी बसून त्यानें त्याला ९६७ त खुरासानप्रांताची सुभेदारी दिली. अबदूल हा ९६० त मेल्यावर त्याच्या मनसूर नावाच्या मुलाला गादी मिळूं नये म्हणून अल्प-तेगीननें खटपट केल्यावरून मनसूरनें त्याला सुभेदारीवरून काढून टाकलें, तेव्हां तो पळून गझनीकडे आला व तिकडे त्यानें फौज जमा करून गझनी येथें राज्य स्थापन केलें. या राज्याची पूर्व सरहद्द पंजाबास भिडली होती. पंजाबचा त्या वेळचा राजा जयपाळ म्हणून होता; त्या दोघांत अल्प-तेगीनच्या कारकीर्दींत मोठासा प्रसंग झाला नाहीं. सन ९७४ त हिंदूलोकांनीं गझनीवर स्वारी केली होती पण ती निष्फळ झाली. अल्प तेगीन हा ९७६ त मेला.

स व क् ते गी न.—हाहि एक तुर्क गुलाम असून अल्प तेगीनचा आवडता होता. त्यानें याला आपला जावई करून आपल्या राज्याचा वारस नेमिलें होतें. मावेल उर्फ म्हणतो कीं अल्प तेगीन यानें गझनीस स्वतंत्र राज्य न स्थापतां तें सबक् तेगीननें स्थापिलें. शेवटचा सामानी राजा दुसरा नूह हा मेल्यावर सबक् तेगीन स्वतंत्र झाला ( ९७७) तांत्काल तो व अल्प तेगीन हे सामानीचे मांडलीकच होते. स्वतंत्र झाल्यावर त्याला फारशी स्वस्थता मिळाली नाहीं. पंजाबातील हिंदूंनीं जयपाळाच्या हाताखालीं गझनीवर स्वारी केली ( ९७९ ) तेव्हां सबक् तेगीननें लघमान येथें हिंदूंना तोंड दिलें. परंतु दोघांचा समेट होऊन जयपाळ परत फिरला. सबकूनें ९८० त बस्त घेतलें पुढें काबूल शाह गख्खर हा त्याच्या प्रजेनें बंड केल्यामुळें सबक्च्या आश्रयास आला ( ९८३ ) सबक् तेगीनची हिंदुस्थानावरील पहिली स्वारी सन ९८६ त झाली. त्या वेळीं कुशधर ( काश्गर ) घेऊन त्यानें फक्त सरहद्दीवर किरकोळ मोहीम करून थोडीफार लूट नेली. पुढें स. ९८८ त त्यानें मोठी स्वारी करून जयपाळाचा लघमानच्या लढाईंत पराभव केला. तेव्हां जयपाळानें त्याला गझनीच्या बाजूचे चार किल्ले व शंभर हत्ती देण्याचें कबूल केलें यानंतर सबक् तेगीन यानें सिंधूपर्यंतचा प्रदेश ताब्यांत घेऊन पेशावर येथें आपला सुभेदार ठेविला तो परत देशीं गेल्यावर त्याचा मुलगा महमूद यानें कांहीं उचल घेतल्यामुळें सबकूनें त्याला गझनीस एक वर्ष कैदेंत ठेविलें ( ९९० ) होतें. पुढें बघ्राखाननें बुखाऱ्यावर चाल केली असतां, सबकूनें त्याचा पराभव केला ( ९९३ ) सामानी राजा दुसरा नूह याला हिरात, खुरासान व बल्ख या प्रांतांतील बंडाळी मोडण्यास सबकूनें मदत केली होती. त्यामुळें या तीन प्रांतावर नूह यानें सबक् याला व त्याचा मुलगा महमूद याला निशापुर येथें सुभेदार नेमिलें ( ९९४ ). पुढें स. ९९७ च्या आगस्टमध्यें बल्खजवळ सबक् तेगीन मेला. त्यानें आपल्या मागें आपला मुलगा इस्माईल याला वारस केलें, कारण महमूद हा दासीपुत्र होता.

म ह मू द.—याचा जन्म १३ नोव्हेंबर स. ९७० त झाला. यानें इस्माईल याला पकडून कालंजरच्या अरण्यात कैदेंत ठेवून आपण गादी बळकाविली ( जानेवारी ९९९ ). त्यानंतर लागलीच त्यानें सामानी संस्थानिकावर स्वारी करून बल्ख व हिरात हे प्रांत आपल्या कबज्यांत घेतले व मर्व्ह आणि निशापुर हे त्यांनां दिले ( मे ९९९ ). खुरासानप्रांतहि त्याला थोड्याच दिवसांत मिळाला; तेव्हां अल कादीर या खलीफानें त्याला त्या प्रांताचा सुभेदार केलें; त्याचवेळीं महमूदनें आपणास सुलतान म्हणवून घेतलें व बल्ख येथें आपली राजधानी केली(जुलै). पुढें त्यानें निशापूर हस्तगत करून सिजिस्तानवर चाल केली (१०००) प्रख्यात कवी फिर्दौसी व फरुखी हे महमूदचे चुलतभाऊ होते, त्याचा बाप बुघ्राखान याला सिजीस्तानच्या खलफ सरदारानें ठार मारल्यानें त्याचा सूड घेण्याकरितां महमुद तिकडे गेला होता. त्यानें आपला भाऊ नसरखान यास सेनापति व अहमद मैमंदी यास वजीर नेमिलें मैमंदी हा अठरा वर्षे वजीर होता पुढें त्याचा अपमान करून महमुदनें त्याला कैदेंत टाकिलें असतां महमुदचा मुलगा मसूदनें त्याची सुटका केली, महमुदच्या दरबारीं टूसी, अस्जुदी, अन्सुरी, फिर्दौसी वगैरे कवी होते महमुदानं पश्चिमेकडील प्रांत घेतल्यावर हिंदुस्थानाकडे दृष्टी वळविली. हिंदुस्थानांत धर्मवृद्धि करावी, सपाटून संपत्ति मिळवावी व पदरच्या मोठ्या फौजेचा खर्च परस्पर भागवावा या हेतूनें त्यानें यापुढें हिंदुस्थानावर एकंदर सतरा स्वाऱ्या केल्या हिंदुस्थानांत त्यावेळीं अनेक लहान लहान राज्यें होतीं व त्यांत एकी नव्हती त्यामुळें महमुदला बहुतेक यश येत गेलें. त्यानें आपल्या राज्याची सुव्यवस्था लाविली होती व सैन्याचें त्याच्यावर प्रेम होतें. त्यामुळें इतक्या स्वाऱ्या करण्यास त्याला सवड मिळाली. त्यानें गझनीहून आगस्ट १००१ मध्यें निघून हिंदुस्थानावर पहिली स्वारी केली व पेशावर येथें काबूल व लाहोर येथील राजा जयपाळ शाहीय ( काबूलच्या शाही घराण्यांतील ? ) याचा पराभव केला (२७ नोव्हेंबर १००१). याच सुमारास तिकडे निशापुर हें सामानी संस्थानिकानें काबीज केलें परंतु महमुदानें तिकडे जाऊन तें परत घेतलें व त्यामुळें त्याला सिविस्तानचा राजा म्हणून लोकांनीं कबूल केलें ( १००३ ) त्याच वेळीं त्यानें टाक हा किल्लाहि घेतला. पुढें १००६ त त्यानें हिंदुस्थानावर दुसरी स्वारी केली. ( मावेल उर्फ अनेक मुसुल्मानी तवारीखांच्या आधारें दुसऱ्या स्वारीचा सन १००६ देतो व रा. सरदेसाई १००४ देतात ) तत्पूर्वी त्यानें आपल्या ईलकखान नावाच्या चुलतभावाशीं तह करून ऑक्सस व ट्रान्सकाकेशिआ या प्रांतांची वाटणी केली या दुसऱ्या स्वारींत त्यानें भिराराए भटिआह ( भटीराजा विजयराय ) याचा पराभव

केला अनंगपाल खंडणी देई परंतु त्याचा साथीदार विजयराज हा देईना म्हणून महमूद त्यावेवर चालून गेला प्रथम रजपुतांनीं त्याचा पराभव केला तेव्हां त्यानें सैन्यास धार देऊन पुन्हां लढाई दिला, तींत मात्र विजयराज मुलतानजवळील भिटींच्या ( भटिंडा? ) किल्यात गेला, तो किल्लाहि महमूदनें घेतल्यावर विजयराज सिंधमध्यें पळून गेला व भटीराज्य महमूदनें खालसा केलें आणि परत गेला इतक्यात त्याचा मुलतानचा सुभेदार अबूल-फत्ते यानें अनंगपालाशीं सख्य करून बंड उभारलें तेव्हां महमूद पेशावरवर चालून येऊन त्यानें अबूलला काश्मीर-कडे पिटाळून बंड मोडलें ( १००६ ) ही त्याचा तिसरी स्वारी होय इतक्यात खुरासानात बंड झाल्यानें महमूदानें तिकडे जाऊन तें मोडलें ( १००७ ) इकडे महमूदचा पेशावरचा सुभेदार सुकपाल ( हा मूळचा हिंदु असून पुढें मुसुलमान झाला होता ) यानें धुमाकूळ सुरू केल्यानें महमूद तिकडून निघून पुन्हां इकडे आला व सुकपालाला पकडून त्यानें कैदेत टाकिलें ( १००७ ) ही चौथी स्वारी होय पुढील सालीं त्यानें आपला चुलतभाऊ ( इलकखान ) यास त्यानें बंडाळी केल्यावरून पकडून कैदेत ठेविलें या वेळीं अनंगपालानें पुष्कळ हिंदुराजे जमवून लढाईची तयारी केली, स्त्रियांनीं आपले दागिनेसुद्धा युद्धाकरिता देण्या म्हणून दिले होते गख्खर वगैरे डोंगरीलोकहि हिंदूच्या बाजूस होते, महमूदची ही पाचवी स्वारी असून तो भटिंडा येथें आला तेथें हिंदुमुसुलमानांचें युद्ध झालं॰ प्रथम हिंदूंचाच जय झाला, परंतु शेवटीं अनंगपाळाच्या हत्तीस तीर लागून तो पळत सुटला, तेव्हां राजा ठिकाणावर नाहींसे पाहून हिंदू सैन्य पळ लें व महमूद याला आपोआप जय मिळाला ( १००९ ) त्यानें परत जाताना नगरकोटचें देऊळ भ्रष्ट करून अपार संपत्ति लुटली फेरिस्ता म्हणतो कीं सात लाख सोन्याचे दीनार, सातशें मण दागिने, दोन हजार मण चांदी, दोनशें मण सोनें, वीस मण जवाहीर इतकी लूट त्याला मिळाली अरबी मण दोन शेराचा असे. तरी त्या मानानेंहि ही संपत्ती पुष्कळ होती महमूदानें गझनीस मोठा समारंभ करून ही संपत्ती सोन्याचांदीच्या मेजावर ठेवून लोकास दाखविली पुढें १०१० त त्यानें सहावी स्वारी करून (मत्स्य देशाची राजधानी)नारैन(नारायण) काबीज केलें राव्हर्टीच्या मतें भीमनगरच्या भीमनारायणावरील जी स्वारी ती हीच होय याच सालीं घूर प्रांत महमूदनें खालसा केला लगेच मुलतानवर येऊन( सातवी स्वारी ) अबुल फत्तेस कैद करून गझनीस नेलें तिकडे जशजानच प्रांत जिनवारस म्हणून ( १०११) व खुर्जिस्तान ( १०१२ ) प्रांतानें बंड केल्यावरून महमुदानें ते दोन्ही खालसा केले नंतर १०१३ त त्यानें हिंदुस्थानावर ( आठवी स्वारी ) व १०१५ त आपला मुलगा मसाउद याच्यासह घुर प्रांतावर स्वारी केली पुढे त्याच सालीं ( नववी स्वारी ) त्यानें स्थानेश्वरवर येऊन तेथील देऊळ लुटून गझनीस प्रयाण केलें, त्याबरोबर देवालयातील मुख्य मूर्ति नेली पुनः थोड्या दिवसानीं (दहावी स्वारी ) तो काश्मारवर चालून आला पण लोहकोट येथें हिंदूनीं त्याचा पराभव केला पुढच्या सालीं ( १०१६ ) ख्वारीझम प्रांतात बंड झालें तें त्यानें मोडून तेथें आपला खोजा अल्तुन-ताश याला सुभेदार नेमलें नंतर ( १०१७ ) त्यानें आपल्या ( मसउद ) मुलाला आपल्या चुलत भावाची ( ईलकखान ) मुलगी करून त्याला खुरासानचा सुभेदार केलें व हिरात ही त्याची राजधानी केली व मसाउदला आपला वारस नेमलें पुढें त्यानें हिंदुस्थानावर अकरावा स्वारी ( १०१८) केला इतके दिवस तो पंजाबच्या अलीकडे आला नव्हता, परंतु पंजाबच्या पुढें अनेक संपत्तिमान शहरें असल्याचें ऐकून बरोबर अफाट फौज घेऊन तो एकदम कनोजवर आला तेथील राजा कुवरराय हा त्यास शरण गेला तेथून त्यानें मथुरेस जाऊन तेथील व वाटेतील मज वगैरे गावातील श्रीमंत मंदिरें लुटलीं व प्रदेश बेचिराख करून गझनीस परत गेला तिकडे मसाउद यान घूर प्रांतात झालेलें बंड मोडून बंतर, झरात, झरस हीं ठाणीं व घर्जिस्तानातील सर्व किल्ले काबीज केले ( १०२० ) याच सालीं शाहनामा ग्रंथाचा कर्ता व तूसचा रहिवाशा आणि महमूदच्या दरबारचा प्रख्यात कवि फिर्दौसी हा मेला ( खल्फानें त्याचा मृत्यु १०२५ त दिला आहे ) कनोजचा राजा महमूदचा मांडलिक बनल्यानें इतर सर्व हिंदुराजांनीं कालजरच्या नंदराजाच्या हाताखालीं त्याच्यावर स्वारी केली, तेव्हां त्यानें महमुदास मदतीस पाचारण केलें परंतु महमूद यण्यापूर्वीच नंदराजानें कनोजच्या राजास लढाईत ठार केलें ( १०२१ ) महमूदनें कालजरवर चढाई केली ( बारावी स्वारी ) परंतु तेथें त्याचा पराभव झाला तेव्हां तो परत निघाला जाता जाता त्यानें अनंगपालाचा मुलगा त्रिलोचनपाल ( लाहोरचा राजा ) याचा राहिब येथें पराभव केला त्या लढाईत त्रिलोचन पडला व त्याचा मुलगा भीमपाल हा राजा झाला लाहोर हें गाव महमूदनें खालसा करून हिंदुस्थानात मुसुलमानी राज्याचा पाया घातला पुढें ( १०२२) महमूदनें नूर व किरात आणि लोहकोट यावर स्वाऱ्या केल्या पैकीं लोहकोट येथें याचा पराभव झाला ( तेरावी स्वारी ) दुसऱ्या वर्षी ( १०२३ चौदावी स्वारी ) त्यानें ग्वाल्हेर व कनोजवर स्वारी केली व तेथून खंडणी घेऊन तो परत गेला आणि ( १०२४ ) अफगाण लोकावर चालून त्याना लुटलें पुन त्यानें अफगाणावर स्वारी केला व ६ आक्टोबर १०२५ रोजीं सोमनाथाच्या प्रख्यात ( पंधरावी )स्वारीवर तो निघून मुलतानाकडे वळला गझनीहून हें १ हजार मैल दूर आहे येथील देवळाइतकें विख्यात व श्रीमान देऊळ त्या काळीं पश्चिम हिंदुस्थानात नव्हत झकेरिया कझिनी या फारशी

माणसानें (१२६३ त) सोमनाथाचें वर्णन ऐकीव माहिती-वरुन दिलें आहे (सोमनाथाची साग्र माहिती सोमनाथ या नावाखालीं पहावी) या प्रवासांत उन्हानें व इतर आपत्तींनें त्याच्या सैन्याचा पार नाश झाला वाटाड्यानीं भलत्याच वाटा दाखवून त्याला फसवून सोमनाथाचा सूड उगविला त्याच वेळीं हिंदु लोकानीं केलेल्या हल्ल्यांना मोठ्या कष्टानं तोंड देत देत तो सिंधु उतरून मुलतानास जाऊन तेथून गझनीस गेला

पुढें गझनीस मसाउदचें लग्न करून महमूद पुन (सोळावी स्वारी) जाट लोकांवर चालून आला (१०२७) कारण या लोकानीं सोमनाथाच्या स्वारींतून परत जाताना त्याचा खर-पूस समाचार घेतला होता या वेळींहि जाटानीं त्याचा परा-भव केला, परत जात.ना त्यानें मक्रर, ठठ्ठा व सीस्थान येथें स्वाऱ्या केल्या पुढें (१०२८) त्यानें नहर प्रांताचा वाटणी स्वत व तुर्कस्तान (आशियांतील) चा राजा या दोघात करून इराक प्रांतावर स्वारी करून तो खालसा केला व मसा-उदच्या ताब्यात दिला (१०२९) याच साली मसाउदची व चाकर रजपुताची एक लढाई झाली (सतरावी स्वारी) यानतर थोड्याच दिवसात (३० एप्रिल १०३०) महमूद हा मधुमेहाच्या विकारानें वयाच्या साठाव्या वर्षी मरण पावला तो शूर, महत्वाकांक्षी, अत्यत लोभी, चचल, मद्यपि, साहसी, व्यवहारज्ञ व विद्याव्यासगी होता त्यानें जवळ जवळ पंचवीस वर्षे हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्यानें हिंदुस्थानात येण्याची वाट मुसुलमानांच्या पायाखालची होऊन गेली त्यानें पजाब जिंकल्यानें पुढें आपल्याला हिंदुस्थानात राज्य स्थापता येईल असा मुसुलमानाना भरवसा वाटू लागला. महमुदाच्या लोभीपणाची पुढील गोष्ट प्रख्यात आहे मरणा-पूर्वी त्यानें आपली सारा सपत्ती एकत्र पाहिली व हिचा आता वियोग होणार हें पाहून तो रडला, पण त्यानें ती कोणास वाटली नाहीं त्यानें गझनीस एक पाठशाळा व एक पदार्थसंग्रहालय स्थापिलें काव्याचाहि हा भोक्ता होता हिंदु-स्थानातले कारागीर नेऊन त्यानें गझनीस सुदर इमारती बाधल्या त्याची लष्करी शिस्त कडक असून तो स्वत हि हुपार सेनापति होता त्याची खडी फौज ५०।६० हजार असे हिंदुस्थानात कायमचें राज्य स्थापण्याची त्याची इच्छा नव्हती फक्त लूट करण्याचा त्याचा परिपाठ असावा. लाहोर प्रांत त्याच्या ताब्यात होता बाकीच्या हिंदुस्थानचा व त्याचा काहीं सबध नसे त्याच्यानें जसा हिंदुस्थानात राज्यप्रसार झाला नाहीं, तसा धर्मप्रसारहि झाला नाहीं याच्या दरबारीं अल्बेरुणी हा प्रख्यात संस्कृत शिकलेला ज्योतिषी होता फराबी (विद्वान् साधु) उत्बी व बैहाकी (इतिहासकार) हेहि त्याचे नोकर होते विद्येच्या प्रसारा-प्रीत्यर्थ सालाना तो कांहीं लाख रुपये खर्च करी गझनी शहरात त्यानें कालवे, हौद व कारंजीं बांधलीं तो राज्यावर बसला तेव्हा गझनीच्या आसपासचा थोडासा डोंगराळ प्रांत त्याच्या ताब्यात होता, परतु मरणसमयीं उत्तरेस आरल व व कास्पियनसमुद्र, पश्चिमेस तैग्रीस नदी, पूर्वेस लाहोर इतका प्रदेश त्याच्या राज्यात मोडे. त्यानें आपल्या पश्चात राज्य टिकविण्याचे उपाय योजले नाहींत तो मुत्सद्दीहि नव्हता त्याच्या मागें त्याचें राज्य विस्कळित झालें याची कांहीं नाणीं ब्रिटिश म्युझियममध्यें आहेत

म हं म्म द व म सू द —महमूदच्या मागून झालेल्या गझ-नीच्या सुलतानाचा हिंदुस्थानाशीं फारसा सब र येत नाहीं, ते फारसे पराक्रमीहि नसून त्यानीं हिंदुस्थानात नवीन प्रांतहि काबीज केला नाहीं, उलट कांहीं गमावला महमूदास दोन जुळे पुत्र होते, त्यापैकीं महम्मदनें आपल्या मागें गादीवर बसवावें असें त्यानें ठरविलें होतें परंतु त्याचा भाऊ मसूद यान त्याच्याशीं लढा सुरू केला दोघाची गाठ तेगीनाबाद येथें पडली व महम्मदास त्याचे फितुरी सरदार हानीब व युसुफ यानीं विश्वासघातानें कैद करून (१०३० सप्टेंबर २) मसूदचे हवालीं केलें मसूद हा इस्पाहान येथ सुभेदार होता. त्यानें प्रथम महम्मदला इराणचें राज्य आपल्याला तोडून देण्याबद्दल सांगितलें होतें, परतु त्यानें तें कबूल केलें नव्हतें शिवाय प्रजा व फौज यांची मसूदवर प्रीति होती त्यामुळें महम्मद शेवटीं मसूदच्या हातीं सापडला त्यानें त्याचे डोळे काढून तक्त बळकाविलें मसूद हा आडदाड असून त्यान हिंदु-स्थानावर दोन स्वाऱ्या केल्या पहिली स्वारी १०३३ त करून काश्मीरातील सरस्वती किल्ला घेतला व दुसरी १०३९ त करून हसी किल्ला (शिवालिक पहाडांतील) काबिज केला व लाहोरास मौदूद नावच्या आपल्या पुत्रास सुभा नेमून परत गेला तिकडे तुघ्रलबेग नावाच्या खोरासानच्या एका सेल्जुक तुर्क सुभेदारानें बड उभारलें (१०३९), त्यावर मसूद चालून गेला, मव्हं येथें लढाई होऊन मसूद पराभव पावून गझनीस परतला तेथेंहि त्याच्या फौजेनें बड उभारलें,तेव्हा तो लाहो-रास आला, इकडेहि त्याची फौज त्याच्यावर उठली, तिनें त्याला कैद करून आधळ्या महम्मदला गादीवर बसविलें त्याचा कारभार त्याचा मुलगा अहमद हा पाहू लागला, त्यानें मसूदला १०४० त ठार मारिलें मसूद भाग्यहीन होता, तो फार शूर, मद्यपि व शक्तिमान् होता, हत्तीसहि तो जेर करीत असे विद्येचा व इमारतींचा तो शोकी होता बैहाकी नावाच्या त्याच्या एका समकालीन मुसुलमानानें त्याची हकीकत लिहून ठेविली आहे पजाबावर त्यानें शेवटीं तिलक नावाचा एक विद्वान हिंदु सुभेदार नेमला होता

मौ दू द व इ त र ग झ नी क र रा जे —हा मसूदचा मुलगा, बाप मारला गेला तेव्हा हा बलक प्रांतात होता तेथून तो निघून सर्व अफगाणिस्थान काबीज करून लाहोरास आला दतूर येथें लढाई होऊन महम्मद त्याच्या हातीं लागला त्यास त्यानें ठार मारून तो परत गझनीस गेला पुढें (१०४३) हिंदुस्थानातील (उत्तरेचे) सर्व रजपूत एक होऊन त्यांनी

हंसी, स्थानेश्वर, नगरकोट वगैरे ठिकाणें परत घेतलीं, फक्त लाहोर मुसुलमानाकडे राहिलें मौदूद हा १०४९ त मेला त्याच्या नंतर ५० वर्षे या घराण्यात पुष्कळ घालमेली, तटे व खून झाले मौदूदनंतर त्याचा मुलगा मसूद व त्याचे मागून त्याचा चुलता अब्दुल हसन हा गादीवर आला पुढे अब्दुल रशीद, फर्रुखजाद, इब्राहिम हे राजे झाले. इब्राहिम यानें ४० वर्षे (१०९८ पर्यंत) राज्य केलें, त्यानें १०७९ त पंजाबावर स्वारी केली होती याला ४० मुलगे व ३६ मुली होत्या। यानंतर मसूद, अर्स्लान व बहराम हे राजे गादीवर आले हे मधून मधून लाहोरास राहू लागले, कारण गझनीचा बहुतेक प्रांत सेल्जुक तुर्कांनीं बळकाविला होता बहरामनें ११९८—५२ पर्यंत राज्य केलें याच्या वेळीं तटे सुरू होऊन त्यांत गझनी घराण्याचा शेवट झाला पंजाबातील रजपूतानीं त्याला पुष्कळ त्रास दिला त्यानें आपला जांवई कुतुबुद्दीन घोरी यास, उभयतांत वैर उत्पन्न झाल्यानें पकडून ठार मारिलें तेव्हा त्याचा भाऊ सैफुद्दीन यानें गझनीवर चाल केली, त्यावेळीं बहराम हा कर्मानचे डोंगरांत पळून गेला पुढें हिंवाळ्यात बहरामनें स्वारी करून सैफुद्दीनचा पराभव केला व त्याला पकडून ठार मारिलें त्यामुळें त्याचा भाऊ अल्लाउद्दीन यानें बहरामवर चढाई केली लढाईंत बहरामचा पराभव होऊन तो पळून हिंदुस्थानात येऊं लागला, परंतु शेवटीं अर्ध्या वाटेंतच तो मरण पावला अल्लाउद्दीनानें गझनी घेऊन गावांत तीन दिवस अग्नि व तलवार यांचा प्रळय माजविला. सुल्तानाचें सारें वैभव, संपत्ति व इमारती वगैरे यांचा त्यावेळीं सर्वनाश झाला विद्वान निरुपद्रवी लोकांची कत्तल झाली मागील सुल्तानांची पडगीं उकरून त्यांतील हाडें कुत्र्यांनां खावयास घातलीं यामुळें अल्लाउद्दीनास 'जहान सोझ' (जग जाळणारा) असें नाव पडलें. बहरामचा मुलगा खुश्रू हा लाहोरास मरेपर्यंत (११६०) राहिला त्याचा मुलगा मलीक हा गझनी घराण्यातील शेवटचा राजा होय. महमद घोरीनें त्याच्यावर ११७८ त स्वारी करून व त्याचा पराभव करून त्याच्या मुलास पकडून नेलें. पुढच्या वर्षीहि त्यानें मलीकवर स्वारी केली, या वेळीं मलिक यास गक्कर लोक साहाय्य करीत होते त्यावेळीं महंमद घोरीनें मलीकशीं तह करण्याचें मीष दाखवून व त्याचा मुलगा त्याच्याकडे पाठवून तो बेसावध असता त्यास कपटानें सर्व कुटुंबासुद्धा पकडून गझनीस पाठविलें तेथें कांहीं दिवस कैद भोगल्यावर मलीकचा वध केला गेला व महंमद घोरीनें गझनीवंशाचें सर्व राज्य खालसा केलें (११८६) [फेरिस्ता, शाहनामा, मयेल इफ, सरदेसाई-मुसुलमानी रियासत. स्मिथ-अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया]

**गटापर्चा**—मलाया द्वीपसमूहांत आढळणाऱ्या कित्येक झाडांचा रस आटवून त्याचा पांढऱ्या रंगाचा घट्ट तयार करतात त्यास गटापर्चा हें नाव आहे मलायी भाषेतील गट (= गोंद) व पर्चा (= झाडाचें नाव) या दोन शब्दांचा मिळून हा शब्द तयार झाला आहे टपन या नावाच्या झाडापासून हा पदार्थ निघतो याच्या दोन जाती आहेत एक गटा टबनपेरा (सावळा) व दुसरा गटा टबन मुडा (रेशीम) गटापर्चाचीं झाडं ७० ते १०० फूट उंच वाढतात व त्याच्या खोडाचा व्यास २ ते ३ फूट असतो.

हें झाड मलाया द्वीपसमूहांत व त्याच्या आसपास सापडतें विषुववृत्ताच्या उत्तर व दक्षिण अक्षांश ६° व पूर्व रेखांश ९३° ते ११९° मध्यें जेथें उष्णतामान६६ ते ९० अंश (फॅ) असतें तेथें हीं झाडें सापडतात झाडाचीं कलमें जगतात व बीहि रुजतें हल्लीं आफ्रिकेच्या पश्चिमेस व सिलोनमध्यें या झाडाची लागवड करण्याचा प्रयत्न चालू आहे व तो यशस्वी होत आहे

**काढण्याची रीत**—झाडाच्या फांद्या तोडून झाड पाडतात व त्यास चक्राकार खांचे पाडतात म्हणजे त्याच्या अंतर्भागांतून गटा बाहेर येतो एका झाडांतून १ ते २ शेर गटा निघतो ३० वर्षांचीं जुनीं व पक्वदशेस आलेलीं झाडें हींच गटा काढण्यास उपयोगीं होत अपक्व झाडांतून निघालेला गटा कमी दर्जाचा असतो व ३० वर्षांहून जास्त जुनाट वृक्ष २ शेराहून जास्त गटा देऊं शकत नाहीं.

**उपयोग**—पाण्यात शिजविला असता हा लवचीक होतो व वाळल्यावर पुन्हा कठीण होतो याच्या चाकूच्या मुठी व हातीं धरावयाच्या कांड्या करतात. हा विद्युद्रोधक आहे, म्हणून पाण्याच्या खालून जाणाऱ्या तारा झाकण्याकरितां याचा उपयोग होतो याचा दात घासविण्याकडेहि उपयोग होतो व याचे ठसे कारितात

हिंदुस्थानात बंगालमध्यें आढळणारें ॲक्रस सॅपोटा, हुशांगाबाद व तिन्नवेल्लीमध्यें होणारें बॉसिया लॅटिफोला व कॅलोट्रोपिस गिगॅंटिया (मदर अथवा अर्कंद), आणि युफॉर्बिया ट्रिकोना (दहिंगण्डु) वगैरे झाडापासून गटापर्चा मिळण्याचा संभव आहे पण त्याचें प्रमाण फार थोडें असतें. इतर झाडापासून निघालेला चीक गटाच्या ऐवजीं उपयोगांत आणितात, परंतु तो कमी दर्जाचा असतो गंधक तेलात मिसळून त्याचाहि एक प्रकारचा गटा तयार करितात. परंतु तोहि गटा इतका चांगला होत नाहीं.

**गंडकी मोठी.**—उत्तर हिंदुस्थानातील एक नदी नेपाळच्या मध्यभागीं असलेल्या पहाडाच्या खोऱ्यातून हिचा उगम होतो हिच्या वेगवेगळ्या उगमास 'सप्त गंडकी' हें नांव आहे. ही धवलगिरी व गोसैनथान या पर्वतांतून वहाते त्यातील मोठ्या प्रवाहास "त्रिशूल गंगा" हें नाव आहे. हे सर्व प्रवाह त्रिवेणी येथें एक होतात. या नदीस नेपाळात शालिग्रामी हीं संज्ञा असून संयुक्तप्रांतात हीस नारायणी म्हणतात. ग्रीक भूगोलशास्त्र हीस कोन्डोचेटस म्हणत महाकाव्यातील सदानीरा ती हीच असें लासेन म्हणतो त्रिवेणी पुढामीं ही मिदीरा-मरहद ओलांडते पवाळण्या चंपारण जिल्ह्याचा व संयुक्त

प्रान्ताच्या गोरखपूर जिल्ह्याच्या सरहद्दीवरून वहाते. तदनंतर ही पाटण्याच गंगेस जाऊन मिळते. ही नदी १५२ मैल लांब असून १२ महिने नावा नेण्याजोगी असते. इमारती लाकूड, धान्य, साखर वगैरे माल जलमार्गानें या नदींतून पाठविला जातो. ह्या नदीस कोठेंच उतार नाहीं. ह्या नदीपासून त्रिवेणी व सारण हे दोन कालवे काढले आहेत. काठावरील महत्वाचीं गावें हाजीपूर व शोणपूर हीं आहेत.

ल हा न.—नेपाळच्या लहान पहाडांतून उगम पावणारी एक नदी. ही गोरखपूर जिल्ह्यांतून वहात जाऊन बंगालच्या सारण जिल्ह्यामध्यें घोगेस जाऊन मिळते.

**गडचिरोळी**, त ह शी ल—मध्यप्रांत. जिल्हा चांदा उत्तर अक्षांश १९°२३' ते २०°५०' व पूर्व रेखांश ७९°५६' ते ८०°३७'. *हल्लीं या तहशिलीचें क्षेत्रफळ खालसा* १४५७ व जमीनदारी १४१३ चौरस मैल आहे. उत्तरेस भंडारा जिल्हा, पूर्वेस द्रुग जिल्हा, दक्षिणेस शिरोंचा तहशील व पश्चिमेस चांदा आणि *ब्रह्मपुरी तहशील. या तहशिलींतील* बहुतेक भाग डोंगराळ असून दाट जंगल आहे. डोंगर फार उंच नाहींत. हींत कांहीं चांगले तलाव असून जमीन सुपीक आहे. *जंगल फार असल्यानें खेडीं* फक्त नदीतीरावर वसलेलीं आहेत. या भागांत मुख्य पीक भाताचें आहे. लो सं. (१९११) खालसामधील ९७७०५ व जमीनदारींतील ४६१७५. *या तहशिलींत एकंदर ७४८ खेडीं आहेत.* त्यापैकीं जमिनदारींत ४३२ व खालसांत ३१२. जमीनदारींत २०० ओसाड खेडीं असून खालसांत ६५ ओसाड आहेत.

सरकारधारा सरासरी १० आणे ९ पै दर एकरी. हींत शहर एकांहि नसून तहशिलीचें मुख्य ठिकाण गडचिरोळी आहे.

खे डें.—गडचिरोळी तहशिलीचें मुख्य ठिकाण. वैन *गंगा नदीच्या वामतीरापासून* एक दोन मैलावर हें खेडें आहे. इ. स १९०१ सालीं लोकसंख्या २०७७ होती. तसर रेशमी किड्याची वाढ येथें करीत असून थोडेंसें रेशीमहि येथें कातण्यांत येतें. परंतु गेल्या दुष्काळामुळें हा व्यापार बराच बसला आहे. शेती हा मुख्य धंदा असून भात हें पिक आहे. दर रविवारी येथें बाजार भरतो. *या गावाचे मालगुजार* नागपूरचे सर गंगाधरराव चिटणवीस हे आहेत

**गंडमाळा व अपची**-नि दा न.—कास, खांदे, मान, गळा आणि जांघसंधी या ठिकाणीं आवळ्याएवढ्या किंवा बोराएवढ्या मेद व कफ दुष्ट होऊन सावकाश *पिकणाऱ्या* ज्या पुष्कळ व माळेप्रमाणें गांठी उत्पन्न होतात त्यांस गंडमाळा *असें म्हणतात. ह्या गांठी पिकून* फुटतात आणि पहिल्या बऱ्या होऊन त्याच्या शेजारीं दुसऱ्या उठतात. त्या बऱ्या होऊन आणखी उठतात. असें होऊन पुष्कळ दिवस *हा क्रम चालूं लागला म्हणजे त्यास* अपची ( 'चयप्रकर्षादपची वदंति' ) असें म्हणतात गंडमाळेंत माळेप्रमाणें गांठी उठतात. ह्या अपचीरोगांत माळेप्रमाणें गांठी न उठतां मार्गें पुढें *कोठेंहि गांठी येऊन पिकतात* व फुटून बऱ्या होतात.

गंडमाळा व अपची हे दोन्ही विकार साध्य आहेत परंतु पडसें, बरगड्या दुखणें, खोकला, ताप, व ओकारी हीं लक्षणें *झालीं असतां ते असाध्य असतात*

चि कि त्सा-यावर वमनविरेचनाकरितां दंतीमूळ, निशोत्तर, कडू दोडका व देवडांगरी यानीं सिद्ध केलेलें तूप द्यावें. कफ व मेद याचा नाश करणारे *धूम, गुळणे, व नस्य हीं करावीं.* शीर तोडून रक्त काढावें व गोमूत्रांतून रसांजन द्यावें. कठिण गांठी सैंधवाच्या पुरचुंडीनें शेकाव्या व चोळाव्या.

पिकण्याच्या बेतास आलेल्या *गांठी, त्यांतील रक्त काढून* पित्तकफहारक औषधानीं बऱ्या कराव्या. किंवा त्या पिकण्यापूर्वी शस्त्रानें कापून टाकून क्षारानें किंवा अग्नीनें भाजाव्या. करंजाचें तेल औषधांत कढवून प्यालें व नाकांत घातलें असतां गंडमाळा बरी होते या उपायानीं गंडमाळा बरी न झाल्यास ज्या बाजूस ती असेल तिच्या दुसऱ्या बाजूच्या पोटरींत टाचेपासून *बारा अंगुलावर इंद्रबस्ती* नावाचें जें मर्म आहे त्याच्या खालीं किंवा वर कापून मेद *काढून अग्नीनें डाग द्यावा.*

रोग्यास उभा करून घोट्याच्यावर त्याच्या पावलाइतकें अंतर सोडून छेद करावा आणि त्यांतील मेदाचे गोळे *काढून टाकावे असें निमीचें मत आहे. या बाबतींत* पुष्कळ मतांतरें आहेत तीं वा उ स्था. अ. ३० मध्यें पहावीं.

**गडवाल** सं स्था न—अथवा केशवनगर. हैद्राबाद *संस्थानांतील रायचूर जिल्ह्याच्या पूर्वेकडील एक संस्थान किंवा* मांडलीक जमीनदारी. हींत गडवाल हा एकच गाव व ११८ खेडीं आहेत. क्षेत्रफळ ८१३ चौ. मै लो. सं (१९११) १,१३८,१८. एकंदर उत्पन्न तीन लाख निझामास खंडणीदाखल ८६८४० रु. द्यावे लागतात. हैद्राबाद संस्थान अस्तित्वांत *येण्याच्या पूर्वीपासून* गडवाल संस्थान आहे ह्या संस्थानाचा पूर्वेतिहास उपलब्ध नाहीं. येथील किल्ल्यांत सध्याचा राजा रहातो हा किल्ला १७०३-१७१० च्या दरम्यान *राजा सोमनाद्रीनें बांधिला उत्तर व दक्षिण भागांतून* अनुक्रमें कृष्णा व तुंगभद्रा ह्या नद्या असल्यामुळें येथील प्रदेश फार सुपीक आहे इतर भागाची जमीन 'मसब' आहे. येथें रेशमी *साड्या*, पागोटीं, उपरणीं व धोतरें वगैरे तयार होतात. बराच माल बाहेर गांवीं जातो

गा व —गडवाल संस्थानचें मुख्य ठिकाण. *हें रायचूर* गावाच्या पूर्वेस ३५ मैलावर आहे. लो.सं (१९११) १२०८२.

**गडशंकर**, त ह शी ल —पंजाब होशिआपूर *जिल्ह्यातला* एक तालुका उत्तरअक्षांश ३०° ५९' ते ३१°३१' आणि पूर्वरेखांश ७५° ५१' ते ७६° ३१'. हिचा ५११ चौरसमैल विस्तार असून लोकसंख्या (१९११) २३६८१४ आहे. ४७५ खेडीं हींत असून जयजन हें खेडेंसें ऐतिहासिक महत्वाचें आहे.

एकंदर होशिआरपूर जिल्ह्यापेक्षा येथल्या टेंकड्या सरळ उंच आहेत. व पाण्याचे प्रवाह कमी आहेत. गडशंकर शहर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. सतलज नदी या तालुक्याची दक्षिणमर्यादा आहे.

श ह र.—होशिआरपूर जिल्हा. उत्तरअक्षांश ३१° १२' व पूर्वरेखांश ७६° ९'; लोकसंख्या (१९११) ४९२२. गडशंकर तालुक्याचें मुख्य ठिकाण. येथील वस्ती रजपुतांची आहे. येथें साखर व तंबाखू यांचा बराच मोठा व्यापार चालतो. येथें एक व्हर्नाक्युलर मिडलस्कूल व एक दवाखाना आहे. १८८२ त म्युनिसिपालिटी देण्यात आली होती पण १८९१ त ती काढून घेतली.

**गडहिंग्लज**—मुंबई इलाख्यातील कोल्हापूर संस्थानाच्या गडहिंग्लज तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें हिरण्यकेशी नदीच्या डाव्या तीरावर असून संकेश्वर पारोळी सिंडीच्या रस्त्यापासून अगदीं नजीक आहे. लोकसंख्या (१९११) ५५०६. अदमासें तीनशें वर्षांपूर्वी पाण्याच्या दुर्भिक्षतेमुळें लोकांस येथून गाव हलवावा लागला होता असें म्हणतात. गावाच्या मध्यभागी काळेश्वराचें देवालय आहे. गावाच्या उत्तरेस तीन मैलांवर बहिरी देवालय आहे तेथें दरवर्षी मार्च महिन्यांत मोठी यात्रा भरते.

**गंडा**—कोष्टी मजूर जात. हिची वस्ती बिहार–ओरिसा व मध्यप्रांत यांतून आहे. एकंदर लो. सं. (१९११) ३६४८२६. बंगाल, बहार व ओरिसांत या जातीची लोकसंख्या २११०३९ इतकी असून वस्ती बहुधा संबळपूर व ओरिसांतील संस्थानें यांतून आहे. ही एक कोष्ट्याची अत्यंत हलकी जात असून या लोकांचा 'पाण' जातीशीं संबंध असावा असें दिसतें. परंतु वस्तुस्थिति उलट आहे. कापड विणण्याच्या धंद्याशिवाय गावरखवाली व ढोलकीवाजंत्री वगैरे वाद्यें वाजविण्याचें कामहि ते करितात. ओरिया, लारिया, कंधरिया व कबरिया असे यांचे चार पोटभेद आहेत. यांपैकीं, पहिल्या तीन विभागांचीं नांवें केवळ त्या त्या देशावरून पडलीं आहेत. कबरिया हें नाव या विभागांतील लोक कबीरपंथी असल्यावरून पडलें असावें. ओरिया व लारिया हे आपसांत रोटीबेटीव्यवहार करितात. परंतु कंधरिया व कबरिया यांच्याशीं फारसा संबंध ठेवीत नाहींत. गंडा लोक परजातींच्या मनुष्यास स्वजातींत घेतात, परंतु चांभार, घासी, हरि, मंगन व मेहतर या जातींचा प्रवेश होऊं देत नाहींत. इतकेंच नव्हे तर या जातींपैकीं, कोणाचा स्पर्श झाल्यास ते स्नान करून स्वतःची शुद्धि झाली असें मानतात. वरील जातींच्या बरोबर किंवा दुसरें अन्नव्यवहार करणाऱ्यास अर्थातच बहिष्कृत केलें जातें. मध्यप्रांतांत ही जाती अगदीं नीच व अस्पृश्य समजली जाते. त्या प्रांतांत हिची वस्ती दीड लाख असून हे रायपूर, बिलासपूर आणि रायगड संस्थानांत आहेत.

हे लोक पूर्वी मुलें चोरून नेत व कधीं कधीं तर स्वतःचीं मुलें सुद्धां बळी देण्याकरितां विकीत. छोटानागपूरच्या रानटी भागांत जेथें मजूर मिळणें कठिण तेथें स्वतःस विकून घेणें किंवा दुसरीं माणसें विकत घेणें ही चाल होती.

यांच्यांत इतर असंस्कृत जातींप्रमाणें, झाडें, पशू व पक्षी यांच्या नांवावरून कुळांचीं नांवें पडलेलीं आहेत. कुळांतल्या कुळांत विवाह होत नाहींत पण मामाचीं मुलें व बहिणीचीं मुलें यांचा आपआपसांत विवाह होतो. न्हाण आल्यावर सुद्धां कोणा मुलीस वर न मिळाला तर अंगणांत भाला रोवून त्याच्या बरोबर तिचें लग्न करतात व मग जो तिला ठेवील त्याला ती देतात. स्वजातीयाशीं व्यभिचार करणाऱ्या मुलीचें लग्न विधवेसारखें होतें व तिच्या आईबापास एक ज्ञातिभोजन द्यावें लागतें पण बाहेरच्या माणसाबरोबर व्यभिचार केल्यास पूर्ण बहिष्कार होतो.

लग्न करून वधूवर घरीं आले म्हणजे गवताचा हरिण करून वधूच्या कानामागें ठेवतात. वरानें गवताच्या बाणानें सात बाणांत त्याला उडवावा. न उडाल्यास वधूचा भाऊ तो हरिण घेऊन पळतो व वरानें त्याला धरून आणावा इतका लग्नांत विधी आहे. विधवांनीं पुनर्विवाह करावा पण दिरानें जर नाकारलें तरच इतरांस वरावें. जातीपंचाईती समोर नवऱ्यानें व्यभिचारिणी बायकोशीं काडी मोडावी आणि जर त्या बाईनें आपल्या जाराबरोबर लग्न केलें तर त्यानें नवऱ्याच्या लग्नाचा खर्च भरून द्यावा.

हे दुल्हा देवाची पूजा करतात. त्याला बकरी बळी देतात. दसऱ्यास आपल्या मागाची व हातमागाची पूजा करतात. तुळशी व वडाची पूजा हे लोक स्वतः अस्पृश्य असल्यामुळें करीत नाहींत.

**गंडिकोट**—मद्रास इलाख्यातील कडाप्पा जिल्ह्याच्या जम्मलमडुगु तालुक्यातील एक प्राचीन किल्ला. उंची समुद्र स. पासून १६७० फूट आहे. यामध्यांशी पेन्नार नदी वहाते. प्राचीन काळीं येथील बोमनपल्लेच्या कप्प नृपानें गंडिकोट गाव वसविलें व येथें किल्ला बांधिला. हरिहर नामक पहिल्या विजयानगरच्या राजानें येथें एक मंदीर बांधिलें. फेरिस्ता म्हणतो. हा किल्ला १५८९ मध्यें बांधण्यात आला.

गोंवळकोंड्याच्या सुलतानानें हा काबीज केला होता व कर्नाटक बालाघाटच्या पांच सरकारांपैकीं एका सरकारचें हें मुख्य ठिकाण होतें. हैदरअल्लीचा बाप फत्तेनाईक पहिल्यानें येथेंच नावलौकिकास चढला. १७९१ त टिपूशीं झालेल्या युद्धांत कॅप्टन लिटलनें हा किल्ला घेतला.

**गडिया पहाड**—मध्यप्रांत. कांकेर संस्थानच्या दक्षिणेस असलेली टेंकडी. हिच्या पठारावर असलेला किल्ला प्रसिद्ध असून येथें एक आंबराई व सोनादेही व रूपादेही नांवाचा तलाव आहे. किल्ल्यांत पूर्वी राहत असलेल्या राजाच्या कन्येच्या नांवावरून या तलावाचें हें नांव पडलें. किल्ल्यास दगडी दरवाजा असून आंत एक शिवालय आहे. या टेंकडीवर लोकांस

रहाण्यासारख्या प्रशस्त गुहा असून त्यांचीं द्वारें किल्ल्यांत आहेत, व पेंढारी लोकांच्या वेळीं राजा व त्याचे लोक या गुहांत लपून बसत असत

**गढमुक्तेश्वर**—संयुक्तप्रांत मीरत जिल्हा हापूर तालुक्यातलें एक शहर उ. अ. २८°४७' व पू. रे. ७८°६' औंध रोहिलखंड रेल्वे व दिल्ली मुरादाबाद हे रस्ते याजून जातात लोकसंख्या (१९०१) ७६१६ प्राचीन हस्तिनापूरचा हा एक भाग होता असें म्हणतात पण हस्तिनापूर म्हणून जो भाग दाखविण्यात येतो तो येथून २५ मैल दूर आहे येथें एक जुना किल्ला आहे गांवात ८० च्या वर सतीचे दगड दाखविण्यात येतात गंगेचीं चार देवळें येथें आहेत मुक्तेश्वर महादेवाचें एक मंदिर आहे मंदिराजवळच एक पापविमोचनी कुंड आहे कार्तिकी पौर्णिमेस येथें फार मोठी यात्रा (सुमारें २,००,०००) भरते व दर सहा, बारा व चाळीस वर्षांनीं येणाऱ्या यात्रेला भयंकर गर्दी होते यात्रेचा खर्च गाड्या, ढोरें व दुकानें यांवर बसविलेल्या करांतून होतो पूर्वी येथें उमदे घोडे फार येत असत आतां त्यांची संख्या कमी होऊन खेचर फार येतात येथें १२८३मध्यें *गियासुद्दीन बलबननें बांधलेली एक मशीद आहे* दून आणि गढवाल येथून नदीनें नावांतून येणाऱ्या इमारती लाकडाचा व बांबूचा बराच मोठा व्यापार येथें चालतो ह्या गांवची व्यवस्था १८५६ च्या २० व्या कायद्याप्रमाणें चालते उत्पन्न २००० आहे

**गढवाल, जिल्हा**—संयुक्तप्रांतातील कुमाऊन विभागामध्य हा उ. अ. २९° २६' ते ३१° ५' व पू. रे. ७८° १२' ते ८०° ६' यांच्या दरम्यान असून क्षेत्रफळ ५६२९ चौ. मैल आहे उत्तरेस तिबेट आग्नेयीस अलमोरा व नैनीताल, नैर्ऋत्येस बिजनोर व वायव्येस तेहरी संस्थान हिमालयाची मध्यशाखा यांतून गेली असून सतलज व गंगा यांच्या शाखा व उपशाखांच्या जाळ्यापर्यंत याचा विस्तार आहे धवलगंगा, विष्णुगंगा, अलकनंदा व मंदाकिनी या मुख्य नद्या असून रामगंगा ही बरीच मोठी नदी आहे हिमालयाची मध्यशाखा व दोन मोठाले फांटे मिळून कामेत (२५४१३ फूट), त्रिशूळ (२३३८२), बद्रीनाथ (२३२१०), दूनगिरी (२३१८१) आणि केदारनाथ (२२८५३) ही मुख्य शिखरें आहेत गोऱ्हा हें एकच साधारण नाव घेण्यासारखें तळें असून भावर नावाची अरण्याची निर्जल व २-३ मैल रुंदीची पट्टी एवढीच कायती जिल्ह्यातील सपाट जमीन आहे बाकी सर्वत्र टेंकड्या व दऱ्या आणि नद्या यांचें साम्राज्य आहे उंची व हवामानास अनुसरून अनेक प्रकारचीं झाडें या जिल्ह्यात आढळतात

भावरमध्यें हत्ती व वाघ सांपडतात चित्ते सर्वत्र आढळतात अस्वल, लांडगा, कोल्हा व रानकुत्रा वगैरे हिंस्र प्राणीहि आहेत सांबर व गुरल हरिण बरेच दिसतात पक्षीहि विविध व मनोहर असून नद्यांतून मासेहि सांपडतात

हवामानामध्यें स्थल व काल यांच्या मानानें फारच फरक पडतो नद्यांमधल्या दऱ्याखोऱ्यांतून उन्हाळ्यात अत्यंत कडक उन्हाळा व हिवाळ्यात अतिशय थंडी असते पुष्कळ जागेंत साधारणत समशीतोष्ण व एकस्वरूपाचें हवामान रहातें पावसाचें मान बरेंच असून तें उंच डोंगर ज्या भागात आहेत तेथें १०० इंचपर्यंत जातें उन्हाळ्यात १८००० फुटांपर्यंत बर्फ पडतें व हिवाळ्यात ४ हजार पासून ५ हजारपर्यंत खालीं येतें

**इतिहास**—गढवालचा पूर्वेतिहास अत्यंत दुर्बोध व गुंतागुंतीचा आहे ब्रह्मपुरराज्यात याचा कांहीं भाग असावा कलचुरी घराण्याचाहि येथें अंमल असावा पुढें त्या घराण्यात फूट पडून निरनिराळीं घराणीं झालीं अजयपालानें त्यांना एकत्र करण्याचा प्रयत्न केला पुढें महिपालानें १७ व्या शतकात श्रीनगर येथें गादी स्थापली

गढवालच्या राजांचा इसवी सन १६८१ च्या सुमारास प्रथमच अल्मोडाच्या चंद्रराजाशीं कलह झाला तेव्हां चंद्रराजानीं गढवाल घेण्याचे बरेच प्रयत्न केले शहाजहाननें १६५४त या राज्यातील डेहराडून प्रांत घेतला चंद्रराजानीं पुन्हा प्रयत्न करून तेथील राजाला हाकलून दिलें पुढें नजीबखाननें तेथें आपला अमल बसवला थोडेच दिवसात त्याचा पराभव होऊन गढवाल व कुमाऊन हे दोन्ही प्रांत प्रद्युम्न नावाच्या राजाच्या ताब्यात आले पुढें गुरख्यांचा त्रास सुरू झाला व १८०४ पासून १८१५ पर्यंत तेथें गुरख्यांचा अमल होता स. १८१५ मध्यें इंग्रज आले व तो प्रांत एका कमिशनरच्या हाताखालीं दिला १८३७ त तो सब *डिव्हिजन झाला व १८९१ मध्यें हल्लींचें जिल्ह्याचें स्वरूप* त्याला देण्यात आलें या जिल्ह्यात अनेक देवळें व क्षेत्रें आहेत बद्रीनाथ, केदारनाथ पाण्डुकेश्वर व जोशीमठ हीं त्यात मुख्य होत येथें नेपाळच्या राजाचें विजयचिन्ह म्हणून एक १० फूट उंचीचा त्रिशूळ आहे व ताम्रपट वगैरे ऐतिहासिक महत्वाच्या बऱ्याच वस्तू येथें मंदिरांतून ठेवलेल्या आहेत

**लोकसंख्या**—पावरी हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे यांत एकच तालुका असल्यानें पावरी तालुका असेंहि याला म्हणतात पावरी हें साधारण खेडेंच आहे लन्सडौन, श्रीनगर, कोटद्वार येथें लष्करी छावण्या आहेत तीन शहरें व ३६०० खेडीं असून वस्ती (१९२१) ४८५१८६ व क्षे. फ. ५६२९ चौ. मै. आहे शेती हाच मुख्य धंदा असून शेंकडा ८९ लोकांचा निर्वाह शेतीवर होतो हिंदी सैन्यातील दोन तुकड्या सर्वस्वी गढवाली लोकांच्या आहेत

**शेती**—यातील शेती अर्थातच विखुरलेली आहे नद्यांच्या बाजूनें व नद्यांचा प्रवाह बदलून गेल्यामुळें राहिलेल्या जागेवर शेती होते व डोंगराच्या उतारावर बांध घालून मळ्या करून शेती करतात उत्तरेच्या बाजूला एकच पीक काढतात सर्वत्र दोन पिकें होतात

१९०३—४ मध्ये ४१० चौ. मैल जमीन लागवडीत होती. मुख्य पीक तांदूळ, गहूं, बार्ली, मरुआ, झंगोरा. राखीव जंगल ५७९ चौ. मैल आहे. पूर्वी येथें तांबें व लोखंड या धातू निघत असत. कोठें कोठें नद्दींतून सोन्याचे कण सापडतात शिवाय शिसें, गंधक, तुरटी वगैरेहि आढळतात

व्यापार व दळणवळण:—या जिल्ह्यात फारसे महत्वाचे उद्योगधंदे नाहींत तागाचें जाडेभरडें कापड, दोऱ्या व काबळें, चामड्याचें सामान, चटया, बागड्या वगैरे स्थानिक खपापुरता माल येथें तयार होतो एक दोन ठिकाणीं दगडी खोदकामहि होतें. याचा व्यापार मुख्यत. तिबेटाशीं चालतो आयात माल मीठ, लोकर, मेंढ्या, सहे व टाकणखार हा असून धान्य व कपडा बाहेर जातात. सर्व व्यापार भूतिया लोकाच्या हातात असून फक्त त्यानाच हद्दीवरून जाण्यायेण्याची परवानगी आहे ते मालाची ने आण याक, जुवा, गाढवें, बकरी याच्यावरून व कधी कधीं स्वत हि करतात. पश्चिम भागाचा तेहरी संस्थानशी व्यापार चालतो तेथून धान्य येतें व तिबेटी मीठ तेथें पाठविलें जातें

कोटद्वारपर्यंत औध रोहिलखड रेल्वेचा फाटा नजीबाबादपासून जातो रस्ते फार खराब असून ओझ्याचे प्राणी मोठ्या कष्टानेंच जाऊं शकतात यात्रेकरूंचा मार्ग व कोटद्वार श्रीनगर रस्ता हे मुख्य रस्ते आहेत येथें म्युनिसिपल कमेट्या नाहींत. दोन शहरें १८५६ च्या विसाव्या कायद्याप्रमाणें वसलीं असून जिल्ह्याचें लोकलबोर्ड आहे. कोटद्वार व श्रीनगर येथें पोलीस ठाणीं आहेत. यात्रेच्या वेळीं आणखी ६ ठिकाणीं पोलीस ठाणीं बसवितात. पटवाऱ्याना सबइन्स्पेक्टरचे अधिकार आहेत. १९०१ मध्यें शेंकडा ६.४ ( १३ पुरुष व ०.२ स्त्रिया ) वाचूं लिहूं शकत. दोन सरकारी व १११ लोकल बोर्डाच्या शाळा आहेत. जिल्ह्यात १० दवाखाने आहेत. [ इंपीरियल ग्याझे. व्हॉ १२; सेटलमेंट रिपोर्ट १८९६ नॉर्थवेस्टप्रॉव्हिन्स ग्याझे. ]

**गढाकोटा**—मध्यप्रात, सागर जिल्हा. रेहली तालुक्यातील एक शहर. उ अ २३ ° ४६' व पू. रे. ७९ ° ९'. सागरपासून २८ मैलावर दमोह रस्त्यानें गधेरी व सोनार नद्यांच्या संगमावर हें शहर वसलें असून येथील लोकसंख्या ( १९०१ ) ८५०८ आहे. दोन नद्यांच्या मध्यें ( दुआबात ) एक किल्ला आहे शहरापासून दोन मैलावर बुंदेल राजाचा ग्रीष्मर्तूत रहाण्याचा राजवाडा असून तेथून सागर व दमोह दोन्ही दिसावे अशा अंदाजानें तो बाधला होता असें म्हणतात येथले स्थानिक सराज्याचे अधिकार काढून घेण्यात आले असून शहरव्यवस्थेकरीतां एक पद्धति चालविण्यात आली आहे. येथें दरसाल फेब्रुवारीमध्यें ढोराचा मोठा बाजार भरतो. येथें एक शाळा व दवाखाना आहे.

**गढी इख्तीआरखान**—पंजाबमध्यें भावलपूर संस्थान खानपूर तालुक्यातील शहर. उ. अ. २८°४०' व पू. रे. ७०°३९'. भावलपूरपासून ८४ मैलावर वायव्येच्या बाजूस हें आहे. लोकसंख्या ( १९०१ ) ४९३९. पूर्वी येथें हत्याराचे कारखाने असत. येथें खजुराचा मोठा व्यापार चालतो. येथील म्युनिसिपालिटीचें बहुतेक उत्पन्न जकातीचें आहे.

**गढी यासीन**—सिंधमधील सक्कर जिल्ह्यात नौशारो अबो तालुक्यातील एक शहर उत्तर अक्षाश २७° ५४' व पूर्व रेखाश ६८° ३३' लोकसंख्या ( १९११ ) ६५४९ येथें गल्लिताच्या धान्याचा मोठा व्यापार चालतो येथें १८७० त म्युनिसिपल कमेटी स्थापन झाली या शहरात एक दवाखाना व शाळा आहे

**गढीवाल**—पंजाब होशियारपूर जिल्हा व तालुका यातील साखरेच्या व्यापाराचें शहर उत्तरअक्षांश ३१°४५' व पूर्वरेखाश ७५° ४६' लोकसंख्या (१९०१)३६५२ १८६७ मध्यें म्युनिसिपालिटी स्थापन झाली येथें एक सरकारी दवाखाना आहे

**गढेमंडळ**—ह्या संस्थानापैकीं रेवा ( नर्मदा ) दक्षिणतीरचे सोळा महाल श्री नानासाहेब पेशवे यानीं नागपूरकर रघूजी भोसल्यास सरंजामासाठीं दिले होते. रघूजी हा पेशव्याच्या मर्जीप्रमाणें त्यावेळीं वागत होता. म्हणून वरील महालाशिवाय चौरागड हा महालहि त्याला दिला होता. या एकंदर महालाचा वसूल चार लक्षाचा होता. यासाठीं रघूजीनें पेशव्याच्या दरबारीं जो दरबारखर्च केला तो पुढीलप्रमाणें होता. पाच लक्ष रु नाना, पन्नास हजार गोविंद भगवंत, पाच हजार नारायण बापूराव ( वैद्य, भोसल्याचा वकील ) व किरकोळ तीस हजार. हा प्रात पूर्वी गडमंडला नावाच्या संस्थानात मोडत असे. हें संस्थान पुढें पेशव्यानीं ( सागरवाले बुंदेल्याकडून ) कायम केलें होतें. [ राजवाडे सं. १० ].

**गणदेवी**— बडोदा संस्थानांतील नवसरी भागातील गणदेवी तालुक्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या(१९११)६४८२. येथें हायस्कूल, दवाखाना वगैरे आहे.गावातील व्यापार बहुतेक जैनाकडे असून बाहेरगावचा व्यापार पारशामार्फत चालतो. सर्व तऱ्हेचीं धान्यें, गल्लिताचीं धान्यें, गूळ व तूप हे व्यापाराचे मुख्य पदार्थ आहेत. हातमागावरील कांहीं कापड व थोडी साखर येथें तयार होते.

**गणपत कृष्णाजी.**—गणपत कृष्णाजी हे (कोळी) भंडारी जातीचे होते. लहानपणीं विद्येचा संस्कार त्यास झाला नाहीं, त्यामुळें चरितार्थाकरिता त्यास मेहनत, मजुरी करावी लागे. प्रारंभीं एका मिशनरी छापखान्यात दोन रुपये दरमहावर टाईप पाडण्याच्या कामावर ते नोकर होते असें सागतात छापखान्यात काम करताना स्वतंत्र छापखाना काढण्याची कल्पना त्यांस सुचली असावी, असें मुंबई वर्णनांतील उताऱ्यावरून दिसतें. अमेरिकन मिशनरीनीं स १८१३ त छापखाना घालून ख्रिस्तीधर्मप्रकरणी मराठी

धर्मभाषेत शिळाछापावर पुस्तकें छापण्याचा कारखाना सुरू केला. हीं त्यांचीं पुस्तकें पाहून गणपत कृष्णाजी याच्या मनांत (१८२५–३०) आलें कीं, आपणहि असाच कारखाना काढून हिंदुधर्मप्रकरणीं व दुसरीं पुस्तकें छापावीं. परंतु छापावयाचीं साधनें त्यापाशीं कांहीं नव्हतीं, व तीं त्यावेळीं मुंबईत उपलब्धहि नसत. मग त्यांनीं अमेरिकन मिशनरींची कृति पाहून स्वत. आपल्या युक्तीनें प्रेस (छापखाना) तयार करण्याचे उद्योग माडले. प्रथम त्यांनीं लाकडी यंत्र आपल्या हातानें तयार केलें, आणि लहान शिळांचे तुकडे इकडून तिकडून जमवून त्यावर अक्षरें कशीं उठतात ही कृति पाहिली. मग शाई वगैरे कशी करतात त्याच्या शोधास ते लागले. प्रथम त्यांनीं आपल्या तर्कानें २१४ प्रकारची शाई करून पाहिली. मग त्यांनीं एक लोखंडी प्रेस करवून, मोठया शिळा विकत घेऊन लहान लहान ग्रंथ छापण्याचें काम सुरू केलें. इसवी सन. १८३१ त यांनीं आपण स्वत. लिहून त्या वर्षाचें मराठी पंचांग छापलें. त्यापूर्वीं मराठी छापील पंचांग कोणासच ठाऊक नव्हतें. मग त्यांनीं (गणपत कृष्णाजींनीं ) छापलेले कांहीं ग्रंथ नेऊन डॉ. विल्सन, पादी ग्यारेट व पादी मलव यास दाखविले. ते पाहून त्यांच्या उद्योगास उत्तेजन द्यावें म्हणून ते आपणाकडून त्यांना कांहीं छापखान्याचें काम देऊं लागले.

मराठी व्याकरणाचे कर्ते रावबहादुर दादोबा पांडुरंग तर्खडकर यांनीं आपल्या मराठी व्याकरणाची पहिली आवृत्ति इ.स.१८३६ त छापली आणि त्याच्या १००० प्रती काढल्या. तो ग्रंथ गणपतकृष्णाजींच्या शिळाछापखान्यात छापला होता असा उल्लेख त्यांच्या स्वरचित आत्मचरित्रात सापडतो. या वेळचीं इतर शालोपयोगी बरींच पुस्तकें इ स. १८४० पर्यंत याच छापखान्यात निघत असत.

इसवी सन १८४३ मध्यें त्यांनीं ( गणपत कृष्णाजींनीं ) टाईप करण्याचें कसब साध्य करण्याचा उद्योग केला आणि मोठ्या प्रयत्नानें अक्षराचे साचे तयार करून ते ओतविण्याचा कारखाना घातला, आणि सर्व प्रकारचीं अक्षरें तयार करून टाइपाचा छापखाना चालू केला. ह्याप्रमाणें त्यांनीं दोनहि छापखान्यात हजारों गुजराथी व मराठी ग्रंथ छापले. इसवी सन १८६० मध्यें या गृहस्थास देवाज्ञा झाली. परंतु हा त्यांचा कारखाना, त्याचे चिरंजीव कान्होबा गणपत त्याचप्रमाणें चालवीत होते १८६३ साली भायखळ्यास एज्युकेशन सोसायटीचा प्रेस, किल्ल्यात एक्सचेंज प्रेस, आणि डोंगरीवर गणपत कृष्णाजी प्रेस, हे छापखाने मोठे ( मुंबईत ) असून पाहण्याजोगे होते

ज्ञा प रा ना.—स १८६५ च्या सुमारास कान्होबा गणपत वारले तेव्हां त्यांचा मुलगा आत्माराम हा वयात आला नव्हता. छापखान्याचा मालक आत्माराम हा वयात येईपर्यंत त्याची देखरेख विश्वनाथ नारायण मंडलीक आणि गंगाधर गोविंद फडके या दोघा जिम्मेदाराकडे ट्रस्टी म्हणून सोंपविली. त्यांनीं त्या वेळीं मुख्य व्यवस्थापक आ नारो कृष्ण धुमाळे म्हणून होता, त्यासच त्या कारखान्यावर कायम ठेवलें आणि तो सर्व कच्चा कारभार वरील दोघा तपासनिसांच्या सल्ल्यानें करीत असे. त्याचा कारभार सुमारें ५।६ वर्षे (१८६५तें७०) चालला. या अवधींत जितके ग्रंथ या छापखान्यात छापले त्यावर वरील दोघा गृहस्थाचीं ट्रस्टी म्हणून आणि धुमाळे हे व्यवस्थापक म्हणून तीन नावें नमूद केलेलीं सापडतात.

पुढें स. १८७१-७२ सालीं आत्माराम कान्होबा वयात आला. तेव्हां त्यानें कारखाना आपल्या ताब्यात घेतला व तो सुमारें दहा वर्षे ( १८७१-१८८० ) नीट चालवून त्याचें पूर्वीचें महत्व बरेंच कायम राखलें. या अवधींत त्याच्या मुद्रणालयात बरेच चांगले चांगले ग्रंथ छापून निघाले. पण या कारखान्याच्या दुर्दैवानें स.१८८०त आत्माराम कान्होबा ऐन उमेदीच्या वयात वारला. त्यावेळीं त्याची सोंपवण रा. मारुती तुकाराम गवाणे आणि पुरुषोत्तम गोविंद नाडकर्णी यांच्या स्वाधीन आत्माराम कान्होबा याच्या हितचिंतकाच्या संमतीनें झाली पण १९०० त नाडकर्णी वारले, तेव्हां पुन्हा ही घडी जी विघडली ती मात्र पुढें सुधारली नाहीं.स १९०० नंतर या कारखान्याची वाताहात होण्यास प्रारंभ झाला. स. १९१४ सालीं त्यात कांहीं आक्षेपार्ह मजकुराचीं चोपडीं किंवा पत्रकें छापलीं.त्यामुळें हा छापखाना जप्त होऊन त्याचा लिलाव झाला [ विविधज्ञान विस्तार सप्टेंबर १९२२ अंक ९ पृ. ४१९–४२६ ]

**गणपति नागराज**—हा पद्मावतीचा राजा असून, याला प्रयाग समुद्रगुप्तानें आपल्या मुलुखगिरींत जिंकून मांडलिक बनविलें होतें ( स ३४० ) त्यावेळीं पद्मावती हें शहर प्रसिद्ध होतें हल्लीं शिंदेशाहीमधील नरवर नावाचें जें गाव आहे तेंच हें पद्मावती होय. कांहींच्या मतें समुद्रगुप्तानें याचें राज्य खालसाच केलें असें आहे [ स्मिथ-अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया. ]

**गणपति राजे**—वरंगळ येथील बाराव्या व तेराव्या शतकात राज्य करणाऱ्या राजवंशास काकतीय अथवा गणपति राजे असें नाव आहे त्याच्यावद्दलची थोडीशी माहिती ' काकतीय ' या शब्दाखालीं ज्ञानकोशाच्या दहाव्या भागात पहावी तिच्याशिवाय जास्त माहिती येथें देतों

या घराण्यावद्दल साग्र व खरी माहिती फारशी उपलब्ध नाहीं, आहे ती शिलालेख व मुसुलमानी बखरींवरून काढली आहे डॉ वॉकर याच्या यादींत जीं नावें आलीं आहेत त्यांचा मेळ इतर ठिकाणीं आढळणाऱ्या नावाशीं बसत नाहीं. त्याच्या म्हणण्याप्रमाणें या वंशातील मूळपुरुषानें ( बेटराज ) चोळदेश जिंकून सोलोनराजकन्येशीं लग्न लाविलें. याचा मुलगा वेडा झाला तेव्हां याच्या दोघा नातवानीं राज्य केलें. त्यांची राजधानी गोदावरीकाठीं नांदेड येथें होती.

मालकांचे राज्य ) विषयीं बोलत तरी वंशपरंपरागत हक्क असलेल्या राजाखेरीज राज्य करणें चालवावयाचें याची त्याना मुळींच कल्पना नव्हती. प्रजेच्या संमतीनें राज्यारूढ झालेला अधिपति ज्यावर आहे तें राज्य प्रजासत्ताक ( रिपब्लिक ) असाव आमपर्यंत सामान्य अर्थ लोक करीत आलेले आहेत. पोलंड, व्हेनिस, युनायटेडस्टेट्स, नेदर्लंड्स हीं राज्यें याच अर्थानें रिपब्लिक होत. तेव्हां या प्रजासत्ताक राज्याचे अनेक निरनिराळे प्रकार होऊं शकतील. म्हणून कोणतें राष्ट्र गणसत्ताक किंवा प्रजासत्ताक नाहीं हें सांगणें सोपें जाईल ज्याचा राज्यकर्ता खरोखरच असें सांगूं शकेल कीं, सर्व राजसत्ता माझ्या ठिकाणीं असून मी ईश्वरकृपेनें पूर्ण व स्वतंत्र राजा आहे, तें राज्य प्रजासत्ताक नाहीं एवढेंच दाखून सांगता येईल.

ग्रेटब्रिटनमध्यें राजा तात्विकदृष्ट्या ईश्वरकृपेनें राज्य करीत असला तरी पार्लमेंटच्या सनदेनें व ॲक्ट ऑफ सेटलमेंटवरहुकूम राज्याधिष्ठित आहे, पण ग्रेटब्रिटनचें हें प्रजासत्ताक राज्य अद्वितीय असल्यानें त्याचें उदाहरण सर्वसामान्य होणार नाहीं. कॉमनवेल्थ व लोकमताहून श्रेष्ठ अशा एखाद्या हक्कावर उभारलेली शासनसंस्था यांना एकच मिलाफ करणें अगदीं अशक्य आहे. कारण एक तर राज्यकर्ताच प्रजेचे सर्व हक्क बळकावून बसेल किंवा प्रतिनिधींमार्फत राज्य चालविणारी प्रजा मुख्य शासनाधिपतीला अगदीं बाजूस टाकील व तो ठराविक गोष्टींखेरीज कांहींच करूं शकणार नाहीं. पहिला प्रकार मध्ययुगाच्या अंतिमकाळीं बहुतेक यूरोपीयन राष्ट्रांतून घडून आला आहे.

ज्या प्रजासत्ताक राज्यात असंस्कृत व रानटी जातीच्या लोकांखेरीज सर्व पुरुषांना मताधिकार आहे असें राज्य प्राचीनांनीं किंवा मध्ययुगात देखील कधींच पत्करिलें नसतें. कारण मनुष्याच्या राजकीय हक्कांची त्यांना मुळींच कल्पना नव्हती. प्रत्यात स्कॉटिश सुधारणावादी जॉन नॉक्स यानें जेव्हां, आपण या राज्यात जन्मलेला एक प्रजाजन आहों म्हणून राज्यकारभारावर बोलण्याचा आपणाला हक्क आहे असें प्रतिपादिलें, तेव्हां त्याच्या पिढींतील लोकांना केवढें हें धाष्टर्य असें वाटूं लागलें पण या धाष्टर्यालाच पुढें मोठें महत्व प्राप्त झालें. अमेरिकेचा स्वातंत्र्याचा जाहीरनामा व १७८९ सालची फ्रेंच राज्यक्रांती यातून केवळ समाजाचा घटक म्हणून व्यक्तीला समाजशासनाच्या कार्मी असणारा जो अधिकार मानवी हक्कात अंतर्भूत होतो तो मिळविण्याचा प्रयत्न दिसून येतो. अर्वाचीन यूरोप आणि अमेरिका यातील प्रजासत्ताक राज्यांतून या उद्देशे सर्व मानवी हक्क विचारांत घेतलेले आहेत सर्व समाजाला लागूं असणाऱ्या बाबींत तत्वतः का होईना, पण सर्व समाजाचा विचार घेण्यात येतो.

आपल्या या हिंदुस्थान देशामध्ये प्राचीनकाळीं राजसत्ताक राज्यपद्धतीच अमलात होती, येथें लोकसत्ताक सत्ताक राज्यपद्धतीचा मागमूसहि नव्हता, अशीं विधानें पुष्कळांकडून करण्यात येतात. 'ना विष्णु पृथिवीपतिः राजा हा परमेश्वराचा अंश आहे, तो राज्य करील त्याप्रमाण त्याच्या अमलाखालीं प्रजेनें नांदलें पाहिजे' अशी हिंदूंची भावना असे या विद्वानांच्या म्हणण्यात तथ्यांश बराच आहे यात वाद नाहीं. पण त्याच्या बरोबर हेंहि लक्ष्यात ठेवलें पाहिजे कीं, हिंदुस्थानात कांहीं भागात तरी लोकसत्ताक राज्यपद्धति अंमलात होती. पुराणवस्तुसंशोधनशास्त्राच्या सहाय्यानें, कोणत्या कोणत्या भागात ही लोकसत्ताक शासनपद्धति अस्तित्वात होती हें आपल्याला समजून येतें.

वैदिक काळीं अशा प्रकारची गणसत्ताक शासनपद्धति अस्तित्वात होती ऐतरेय ब्राह्मणात वैराज्यें उर्फ गणसत्ताक शासनपद्धतीचा उल्लेख आढळतो व महाभारत काळीं त्याचप्रमाणें अर्थशास्त्र रचिलें गेलें त्याकाळीं कांहीं कांहीं भागात अशा प्रकारची शासनपद्धति होती हहि निर्विवाद आहे. पण त्यानंतरहि चवथ्या शतकापर्यंत कांहीं कांहीं भागात अशाच प्रकारची राज्यघटना होती असें पुराणवस्तुसंशोधनशास्त्राच्या द्वारें सिद्ध करता येतें

चवथ्या शतकात पंजाब, पूर्व राजपुताना व माळवा या देशात गणसत्ताकशासनपद्धति अंमलात होती असें दिसून येतें पंजाबच्या मध्यभागात मद्रकांचें वरील प्रकारचें गणसत्ताक राज्य होतें. सतलज नदीच्या दोन्ही तीरावर यौधेयांचेंहि अशाच पद्धतीचें राज्य होतें. चंबळा व बटवा याच्या दरम्यान आभीर आणि मालव लोकांमध्यें अशाच प्रकारची शासनपद्धति अमलात होती या वरील सर्व राष्ट्रांना समुद्रगुप्ताच्या दिग्विजयापुढें हार खावी लागली व त्याच्या अंकित व्हावें लागलें तरी पण त्यांनीं आपली शासनपद्धति टाकली नाहीं असें दिसून येतें.

पण खि. पू. चौथ्या ते सहाव्या शतकच्या कालीं भारतवर्षात पुष्कळच गणसत्ताक राष्ट्रे होतीं याबद्दल पुरावा मिळतो डायोनिससपासून चंद्रगुप्ताच्या कालापर्यंत हिंदुस्थानात तीन वेळ ही लोकसत्ताक शासनपद्धति प्रस्थापित झाल्याची आख्यायिका मेगॅस्थिनीसनें आपल्या पुस्तकात नमूद केली आहे. माल्लेकोरी, सिंधो, मोरुनी, मरोहो, रुंगी हीं वैराज्यें होतीं असें त्यानें म्हटल आहे

खि. पू. चौथ्या शतकातहि अशा प्रकारचीं वैराज्यें होतीं. शिकंदराच्या स्वारीच्या वेळचा भारत देश हा वैराज्यांचा मोठा होता. हल्लींच्या पाश्चात्य देशांतील लोकप्रतिनिधियुक्त सभासारख्याच त्या काळींहि सभा होत्या व अशा लोकांना जबाबदार असणाऱ्या संस्थांमार्फत त्या त्या शहराचा अगर राष्ट्राचा राज्यकारभार चालविला जात असे असें तत्कालीन लेखकांच्या ग्रंथावरून नजरेस येतें. अराष्ट्रकांचें अशा प्रकारचें राष्ट्र होतें व जस्टिन नावाच्या ग्रंथकारानें या लोकांना लुटारू असें हीन नाव दिलें असलें तरी याच लोकांचा चंद्रगुप्ताला त्याच्या स्वारींत पुष्कळ उपयोग झाला ही गोष्ट आहे. अशाच प्रकारचीं दुसरीं वैराज्यें *८*

मालव व क्षुद्रक या लोकांची होत. क्षुद्रकांना आपल्या वैराज्याचा फार अभिमान वाटत असे असें अरिअननें म्हटलें आहे. मालव व क्षुद्रक या दोन्ही जाती फार बलिष्ठ होत्या पण त्या दोघांतहि नेहमीं वैमनस्य असे अशा स्थितींतहि शिकंदराच्या स्वारीच्या वेळीं दोन्ही जातींनीं आपापसांतील वैमनस्य विसरून जाऊन शिकंदराच्या हल्ल्याला तोंड दिलें असें डायोडोरसनें–शिकंदराच्या स्वारीच्या इतिहासकारानें–लिहिलें आहे.

याशिवाय शिकंदराच्या स्वारीच्या इतिहासकारांनीं वैराज्यें या नावानें उल्लेख केलेलीं राष्ट्रें म्हणजे, संबस्ती, गेद्रोशी, ओरीटे, अबस्तनोइ, क्षत्रिय, अर्बितई या लोकांचीं होत. गेद्रोशी लोकांनीं राज्यकारभाराचा गाडा हाकण्यासाठीं एक मंडळ नेमलेलें असे असें डायोडोरस म्हणतो. संबस्ती लोक आपल्यापैकीं तिघांना लोकनायक नेमीत व त्यांच्या मार्फत कारभार चालविला जात असे असें कर्टियस म्हणतो वर उल्लेखिलेल्या इतर लोकांत आपापले नायक निवडण्याची पद्धत असे, असें अरिअनच्या हकीकतीवरून समजतें.

पण शिकंदराच्या सैन्याशीं ज्यांचा निकट संबंध आला तीं राष्ट्रें म्हणजे अगलसोई व नीसियन या लोकांचीं राष्ट्रें होत. अगलसोई लोक हाडाचे खरे क्षत्रिय होते. शिकंदराच्या सैन्यानें ज्यावेळीं त्यांचा पराजय केला त्यावेळीं शत्रूंकडून अपमान सोसण्याचें संकट टाळण्यासाठीं आपल्या गावाला आग लावून सर्वांनीं आपल्या पोराबाळांसह आपल्याला जाळून घेतलें ही गोष्ट संस्मरणीय आहे. नीसियन लोकांचें राष्ट्र हीहि लोकसत्ताकच होतें. त्यांचा कारभार तीनशें शहाण्या माणसांकडून चालविला जाई. त्याच्यावर एक अध्यक्ष नेमला जाई. वरील हकीकतीवरून पाहतां ख्रि. पू. चौथ्या ते सहाव्या शतकाच्या दरम्यान, भारतवर्षांत वैराज्याची पद्धति रूढमूल झाली होती असें आपल्याला आढळून येईल. ख्रि. पू. पांचव्या व सहाव्या शतकांत कुलसंघशासितपद्धति अस्तित्वांत होती व हीहि एक वैराज्याचा जुना व अपरिणत प्रकार होता. अशा प्रकारचीं राष्ट्रें म्हणजे भग, बुलि, कलम, मोर्य, कोलिय, भग्ग या लोकांचीं होत. पण या सर्वांत महत्वाचीं राष्ट्रें म्हटलीं म्हणजे शाक्य, विदेह व लिच्छवी या लोकांचीं होत. विदेह व लिच्छवी या दोन्ही लोकांचें पुढें वज्जि हें साधारण नाव पडलें.

शाक्य लोकांमध्येंहि लोकसत्ताकराज्यपद्धति प्रचलित होती. शाक्य लोक आपल्यामधीलच एकाला नायक म्हणून निवडीत असत. कांहीं गुंतागुंतीच्या प्रश्नाचा निकाल लावण्याचा प्रसंग आल्यास सर्व लोक एकत्र जमून त्या प्रश्नाचा विचार करीत असत. लोकनायकाला 'राजा' ही पदवी लावली जात असे.

वज्जि लोकांचें राष्ट्र, आठ जातींच्या लोकांचें संयुक्त राष्ट्र होतें. वैशाली ही या राष्ट्राची राजधानी होती या आठ जातीमध्यें विदेह व लिच्छवी या दोन जाती विशेष प्रमुख होत्या. या वज्जि लोकांचा कारभार लोकसत्ताकपद्धतीच्या धर्तीवर चालत असे. प्रत्येक जातींतील एक एक असें आठ जणांचें मंडळ व त्यावर सर्व जातींनीं मिळून निवडलेला एक नायक अशा नऊ लोकांचें मंडळ असे व न्यायदानाचें काम त्याच्याकडे असे. ग्रामव्यवस्थेच्या बाबतींत पुरुषांप्रमाणेंच बायकाहि भाग घेत असत. उद्यानांची व्यवस्था पहाणें, धर्मशाळा बांधणें इत्यादि कामांवर बायकाच देखरेख करीत असत अशा रीतीनें हिंदुस्थानामध्यें राजसत्ताकशासनपद्धती-प्रमाणेंच गणसत्ताकपद्धतिहि अस्तित्वांत होती हें वरील हकीकतीवरून आढळून येईल. लोकसत्ताकपद्धतीचा हिंदुस्थानांत अभावच होता हें म्हणणें सत्याला धरून नाहीं. उलट फार प्राचीन काळापासूनहि गणसत्ताकशासनपद्धतीचें मूळ हिंदु लोकांत नजरेस येते व या प्रजासत्ताक राष्ट्रांत मोठमोठे पुरुष निर्माण झाले, व नवीन नवीन शास्त्रेंहि उदयास आलीं. याची ग्वाही हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास देतो. [ विनॉय कुमार सरकार व मुकुंदलाल यांचे 'मॉडर्न रिव्ह्यू' तील लेख ( जानेवारी व मार्च १९२० ), कौटिलीय अर्थशास्त्र; महाभारत, वेदसंहिता; ब्राह्मणें; स्मिथ, ऱ्हीस डेव्हिड्स्–बुद्धिस्टिक इंडिया ].

**गणितशास्त्र**—भौतिक शास्त्रांतील या अत्यंत महत्त्वाच्या शास्त्राचा विचार विज्ञानेतिहास खंडात ( ज्ञानकोश वि. ५. प्र. १३ ) स्वतंत्र प्रकरण देऊन केलाच आहे. गणितशास्त्राचें एक प्रमुख अंग जें संख्यालेखन त्याची माहिती त्या विभागांतच ( प्र. ३ रें. ) दिली आहे. गणितशास्त्रांतील निरनिराळ्या शाखांवर (उदा. अंकगणित, गणितशास्त्र, भूमिति ) स्वतंत्र लेख या कोशांतच दुसरीकडे असल्यानें या ठिकाणीं विस्तृत विवेचनाची जरूरी नाहीं.

**गणेश किंवा गणपति**—शिवाचे सेवक जे गण, त्यांचा अधिपति असा या नामाचा अर्थ आहे. हा शंकराच पार्वतीपासून झालेला पुत्र होय. पार्वतीच्या अंगच्या मळापासून हा निर्माण झाला अशी एक दंतकथा आहे. गणेश ही विद्येची देवता व संकटांचें निवारण करणारी देवता म्हणून प्रसिद्ध आहे. एखाद्या महत्कार्याच्या आरंभीं 'श्री गणेशाय नमः' म्हणून गणेशाची स्तुति व आराधना करण्याचा प्रघात आहे, त्याचप्रमाणें अध्ययनारंभीं गणेशाचा नामोच्चार करतात. व्यास यांनीं सांगितलेलें महाभारत गणपतीनें लिहिलें अशी समजूत आहे. अंगानें स्थूल, किंचित पिंवळट रंगाचा, मोठ्या पोटाचा, चार हात असलेला व एकच दन्तयुक्त असें हत्तीचें डोकें असलेला असें गणेशाचें रूप पुराणांतरीं वर्णिलें आहे. त्यानें आपल्या चारहि हातांत शंख, चक्र, गदा व पद्म हीं आयुधें धारण केलीं आहेत. कधीं कधीं उंदरास आपलें वाहन करून त्यावर बसून चालला आहे असेंहि गणपतीचें वर्णन आढळतें. दक्षिण हिंदुस्थानांत गणपतीचीं अनंत देवळें आढळतात. गणपतीस हत्तीचें मस्तक कां लागलें

याबद्दल अनेक दन्तकथा प्रचारांत आहेत. शनीच्या कटाक्षापासून होणारा दुष्परिणाम अजीबात विसरून पार्वतीनें एकदा शनीला गणपतीकडे पहाण्यास सांगितलें. कारण तिला आपल्या पुत्राचा फार अभिमान असे. शनीनें गणपतीकडे दृष्टी फिरवताच गणपतीचें मस्तक जळून खाक झालें. तेव्हां पार्वतीला अतिशय दुःख होऊन तिनें ब्रह्मदेवास ही हकीकत कथन केली. ब्रह्मदेवानें तिला सांगितलें "तुला पहिल्या प्रथम ज्या प्राण्याचें मस्तक मिळेल तें मस्तक धडाला लाव म्हणजे गणपति पूर्ववत् होईल" या ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें ती मस्तकशोधार्थ निघाली असतां प्रथम हत्तीचेंच मस्तक तिला मिळालें. याप्रमाणें गणपति गजवदन झाल्याची एक दन्तकथा आहे.

दुसरी एक दन्तकथा अशी आहे कीं, पार्वती एकदां स्नानास बसली असतां, तिनें गणपतीस दरवाजावर रक्षण करण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें गणपति दारावर बसला असतां, शंकर तेथें आले. परंतु आंत जाण्यास गणपतीनें प्रतिबंध केल्यामुळें त्यांनीं गणपतीचें शिर उडविलें. त्यामुळें पार्वतीस फार दुःख झालें. तिचें सांत्वन करण्यासाठीं शंकरानीं पूर्वीच्या मस्तकाच्या जागीं हत्तीचें मस्तक बसवून गणपतीस सजीव केलें.

एकदा परशुराम शंकराची भेट घेण्याकरितां कैलासास गेला असतां शंकर निद्रिस्थ होते. तेव्हां परशुरामास अन्तर्गृहांत येण्यास गणपतीनें मज्जाव केला. त्यामुळें दोघांमध्यें वाचावाची होऊन दोघांमध्यें युद्ध जुंपलें गणपतीनें परशुरामास आपल्या सोंडेंत धरून गरगर फिरवितांच त्यास मूर्च्छा आली. सावध झाल्यानंतर परशुरामानें आपला परशु गणपतीवर फेंकला. आपल्या पित्याचा परशु फेंकला आहे असें समजून ( शंकरानींच तो परशु परशुरामास दिला होता ) गणपतीनें आदरानें तो आपल्या एका दन्तावर धारण केला. पण त्यामुळें तो दन्त गमावला. यामुळेंच गणपतीस ' एकदन्त किंवा एकदंष्ट्र' असें म्हणतात. ब्रह्मवैवर्त पुराणांत या सर्व दन्तकथा सविस्तर दिल्या आहेत.

गजानन, गजवदन, करिमुख, ( हत्तीचें मुख असलेला ) हेरंब, लंबोदर, द्विदेह, विघ्नेश, विघ्नहारी इत्यादि नांवानींहि गणपतीस संबोधितात. गणपतीचें स्वरूप चतुर्भुज म्हणून महाराष्ट्रांत एकसारखें प्रचलित नाहीं. शिवराम दशभुज गणपतीचें नमन करतो. दहांपैकीं चार पुरुषार्थांना चार भुजा देऊन (१) परशु, (२) अंकुश, (३) मोदक, (४) चौदमन संकेतु, (५) अभयकर व (६) वरदहस्त, हे सहा हात तो उल्लेखितो. अलीकडील काहीं लोक चतुर्भुज गणपतीचें स्तवन ज्ञानेश्वरानें केलें आहे असें मानतात. तें ह्या टीकेवरून चुकीचें आहे, असें कित्येक समजतात. ( भा. इ. सं. मं. अहवाल शके १८३३ ).

ही देवता वेदकालापूर्वीची दिसते. ' गणानां त्वा गणपतिं ' हा वैदिक मंत्र ( ऋ. २. २३, १ ) गणपतीला उद्देशून नाहीं. तरी मैत्रायणी संहितेंत ( २ ६, १ ) स्पष्टपणें हस्तिमुख, एकदंत या स्वरूपाचा उल्लेख केला आहे. रामायण व इतर काहीं प्राक्कालीन पुराणें यांतून गणपतीचा नामनिर्देश नाहीं. याज्ञवल्क्यांत ( १.२७०, २८९, २९३ ) उल्लेख आला आहे. तेथें मनुष्यांना झपाटणारा व त्याच्या कार्यांत विघ्नें आणणारा राक्षस असें त्याचें वर्णन केलें आहे. याला गणाचा ईश किंवा अधिपति म्हणतात. वास्तविक हा मान नंदीकडे जातो. पण विनायक म्हणून एक राक्षसवर्ग होता त्याचा प्रतिनिधि ही नवीन गणेश देवता असेल. गणपतीच्या संप्रदायाची माहिती ' गाणपत्य ' या लेखांत आढळेल.

ग ण प ति दे व ते ची प्रा ची न ता.—यासंबंधानें वि. विस्तार म्हणतो गणपति ही देवता १३ शें वर्षांचीच जुनी आहे. याला रा. राजवाडे आक्षेप घेतात आणि पुरावा आणतात तो असाः—

( १ ) बाणभट्टकृत हर्षचरित्राच्या तिसऱ्या उच्छ्वासांत गणपतीच्या देवळाचा उल्लेख आहे. हर्ष हा शके ५९० त होता, हें राजवाडेच सांगतात. अर्थात हा पुरावा गणपतीस मागें ढकलूं शकत नाहीं

( २ ) गाथा सप्तशतीच्या ५ व्या शतकाच्या ३ ऱ्या गाथेंत " गणपतीला सोंड आहे व त्याचा जयजयकार असो " असा उल्लेख आहे.

( ३ ) आपस्तंबाच्या नारायणांत " तत्पुरुषाय विद्महे वक्रतुंडाय धीमहि, तन्नो दंती प्रचोदयात् " असें आहे. या उताऱ्यास रा. राजवाडे श्रुति समजतात व त्यावरून एक दांताचा गणपति २३०० पासून २५०० वर्षांचा प्राचीन ठरवितात. आणि 'एकदंताय विद्महे' ह्या गणपत्यथर्वशीर्षाचाहि आधार देतात ( सरस्वतीमंदिर अंक २० ). वि. ज्ञान विस्ताराच्या ११।१९०६ च्या अंकांत घुले शास्त्री राजवाड्यावर टीका करतात व ५६० मध्यें गणपती होता हें मान्य करतात पण गाथेच्या पुराव्यावरून कांहीं सिद्ध होत नाहीं असें दर्शवितात. राजवाडे यांनीं डॉ. भांडारकर, भागवत, काव्यमालाकार यांच्या मतें सप्तशतीकार हाल हा इ. स १५० मध्यें झाला हें दाखविलें आहे व लासेन, विलसन, हाल वगैरेंचीं मतें डॉ. भांडारकराच्या पूर्वींचीं आहेत तरी तीं पोषक आहेत असें दाखविलें आहे. याशिवाय राजवाडे यांनीं आणखी एक उतारा सप्तशतींतून दिला आहे. चवथ्या शतकाच्या ७२ व्या गाथेंत उच्छिष्ट ( वाममार्गी ) गणपतीचा उल्लेख केला आहे. नारायणोपनिषद् हें शास्त्रीबोवांच्या मतानें अर्वाचीन कालांतील आहे. का कीं तें "खिलकांडरूप" आहे. शंकराचार्यांचें त्यावर भाष्य नाहीं आणि त्यांत रुद्र, दंति, नंदि, दुर्गि वगैरेंच्या गायत्री बनविल्या आहेत. परंतु "खिल" याचा अर्थ सायण 'किरकोळ' असा करतात व घुले कारण न देतां 'प्रक्षिप्त' असा करतात.

ऋग्वेदात गणपतीचें अस्तित्व नाहीं म्हणून ही देवता अर्वाचीन आहे असा जो प्रचलित समज, त्या समजाविरुद्ध आम्ही ही देवता वेदपूर्वकालीन आहे असें दिलें आहे. यात प्रत्यक्ष प्रमाण दोघांचें एकच असून अनुमानें मात्र भिन्न आहेत. वेदांत मात्रसंस्कृतीच्या देवता आहेत व पुराणात सूतसंस्कृतीच्या देवता आहेत सूत संस्कृति मात्रसंस्कृतीहून जुनी आहे आणि मात्रदेवता आणि मात्रधर्म हा हिंदुस्थानात रुजलाच नाहीं. तो नष्ट झाला आणि तो नष्ट होण्यापूर्वी श्रौतसंस्था या स्वरूपात विकास पावला आणि या विकासकालीं मात्रसंस्कृति आणि सूतसंस्कृति यानें म्हणजे वैदिक धर्मानें आणि पौराणिक धर्मांचें एकीकरण होत होतें आणि यामुळें मैत्रायणीसारख्या संहितांतून पौराणदेवतांचा उल्लेख येतो ( बुद्धोत्तरजग पृ. ११२ पहा ). पण त्या पौराण देवताच अस्तित्व त्याहूनहि जुनें आहे.

**गणेशचतुर्थी**—भाद्रपद शुद्ध चतुर्थीस ( गणेश जन्मदिवसापासून ) या सणाला आरंभ होतो. गणेशदेवता व शेतीचा हंगाम याचा अन्योन्य संबंध असावा, कारण पावसास उशीर झ.त्यामुळें आगामी पीकपाण्याबद्दल अनिश्चितता वाटूं लागल्यावर 'विघ्नहर्त्या' गणेशाचें पूजन करणें हें प्रसंगोचित व जरूरहि आहे.

विनायकी व संकष्टी चतुर्थी या व्रताचा संबंध चंद्राकडे नसून गणेशाकडेच आहे.परंतु गणेश व चंद्र याचाहि अन्योन्य संबंध आहे ही गोष्ट गणेशचतुर्थीस दिसून येते. कारण त्या दिवशीं चंद्र पाहणें अशुभ मानतात.कोणी चुकून चंद्र पाहिलाच तर त्यास शेजाराच्या घरावर धोंडे मारून व चार शिव्या खाऊन तें अशुभ टाळता येतें. 'चंद्रचवथिचा' पाहणें व विपद्ग्रस्त होणें या उभय गोष्टी मराठींत समानार्थी मानल्या जातात. याविषयीं कथा अशी आहे कीं, एकदा गणेशाची स्वारी मूषकारूढ होऊन वेगानें जात असता खालीं आली. हें पाहून साहजिक चंद्र हंसला. पण कोपायमान होऊन गजानन शापवचन बोलला कीं, चंद्राचें कोणीहि मुखावलोकन करणार नाहीं.पुढें उ:शाप दिल्यावर चतुर्थीची अट घालण्यात आली.

पेशव्याच्या राजवाड्यात प्रतिवर्षी भाद्रपद शुद्ध चतुर्थी ते दशमीपर्यंत गणेशोत्सव होत असे. त्याप्रसंगीं गणपतिरंगमहालात मोठा आरास करण्यात येई व सर्व कार्यक्रम तेथेंच होत असत. स्वच्छ हंड्या, झुंबरें, मोठाले आरसे व विविध चित्रें यामुळें त्या महालाचें सौंदर्य दुणावत असे व तेथील चकचकाटानें प्रेक्षकगण दिपून जाई मध्यावर सोन्याच्या भरजरीचें काम जिच्यावर केलें आहे अशी पेशव्याची 'मसनद' उर्फ गादी मांडलेली असे. दोन्ही बाजूस मुख्य मराठे सरदार, शिलेदार व दरबारी हे मध्य पोषाख घालून आपापल्या दर्जाप्रमाणें रांगेनें बसलेले असताना भालदार, चोपदार याच्या ललकारींत स्वारी दरबारांत प्रवेश करून मोठ्या ऐटीनें सिंहासनारूढ होत असे. त्या समयीं दरबारस्थानास वैचित्र्याची उत्कृष्ट तऱ्हेची खुलावट येत असे. गणपतिरंगमहालांत त्यावेळीं गाणें, नाच व कथाकीर्तन वगैरे कार्यक्रम होत असत.

१७९५ सालचा गणेशचतुर्थीचा खर्च पाहता, ह्या सालीं राजवाड्यात १८१ हरिदासाचीं कीर्तनें झालीं असून त्याना दिलेल्या बिदागीचा खर्च शेलापागोट्याशिवाय २१५५ रुपये झाला आहे ३९ गवयाचीं गाणीं झालीं व त्याना ३२९ रुपये मिळाले नर्तकींचे एकंदर ४३ ताफे असून त्याना १०२६ रुपये इनाम म्हणून देण्यात आले. पखवाज वाजविणाऱ्या ८३ जणाना १२१ रुपये देण्यात आले वाजंत्र्याच्या २५ ताफ्यास २४० रुपये देण्यात आले या उत्सवात सर्व नोकर चाकर मोठ्या हौसेनें मिसळत व त्याना पेशव्याकडून मिठाई वाटण्यात येत असे. ब्राह्मणभोजनें वरीच होत असत विसर्जनाच्या दिवशीं पुष्पानीं शृंगारलेल्या पालखींतून थाटानी मिरवणूक काढून गणपतिविसर्जन होई, व त्यावेळीं पेशवे जातीनें हजर असत.

महाराष्ट्रात अलीकडे गणेशोत्सवाला राजकीय वळण देण्याची एक नवी प्रवृत्ति उत्पन्न झाली आहे व विद्यार्थ्यांचें राजकारणाकडे अधिकाधिक लक्ष्य जाऊं लागल्यामुळें अखिल राष्ट्रीय चळवळीस गणेश देवतेचेंच अधिष्ठान देण्यात आलें आहे. याचें कारण असें कीं, सर्व हिंदु जाती व पंथ गणेशाची पूजा करितात. गणाचा म्हणजे लोकाचा जो ईश म्हणजे पुढारी,तो गणेश,म्हणजे लोकपुढारी(विनायक म्हणजे विशेष नायक, म्हणजे अद्वितीय पुढारी असा विनायक शब्दाचा अर्थ लावितात ). या उत्सवात शाळेंतील विद्यार्थी रस्त्यातून मिरवणुकी काढतात, सामाजिक व राजकीय विषयावरचीं पदें म्हणणारे मेळे निघतात; व्याख्यानें होतात व अशा तऱ्हेनें दहा दिवसपर्यंत हा राष्ट्रीय सण पाळला जातो. अशा रीतीनें या उत्सवास मोठें राजकीय स्वरूप प्राप्त झालें आहे.

**गणेशचतुर्थीव्रत.**—व्रतराज ग्रंथात या व्रताचा उल्लेख येतो. भाद्रपद शुद्ध चतुर्थीस गणेशाची सुवर्णाची मूर्ति करून तिची प्राणप्रतिष्ठेपासून पूजा करून हवनादि विधी करावे व नंतर ती मूर्ति ब्राह्मणास दान करावी इत्यादि विधि सांगितला आहे. या व्रताच्या कथेंत इतिहासभाग नसून पूजा व व्रत विधान कथन केलें आहे.

**गणेश दैवज्ञ**—हा मोठा नामांकित ज्योतिषी होऊन गेला. सांप्रत सर्व भरतखंडात याचे ग्रहगणितग्रंथ जितक्या प्रदेशात पसरले आहेत तितके दुसरे कोणाचे नाहींत. जन्म शक १४२०. याच्या पित्याचें नाव केशव, आईचें नाव लक्ष्मी, गोत्र कौशिक, वसतिस्थान नांदगाव. या दैवज्ञानें केलेले ग्रंथ ग्रहलाघव, लघुतिथिचिंतामणि, बृहत्तिथिचिंतामणि, सिद्धांत शिरोमणि टीका, लीलावती टीका, विवाहवृंदावनटीका, मुहूर्ततत्वटीका, श्राद्धनिर्णय, छंदोर्णवनिबंध, कृष्णाष्टमीनिर्णय, होलिकानिर्णय

इत्यादि. बृहच्चिंतामणि व लघुचिंतामणि हे दोन ग्रंथ गणेश दैवज्ञकृत होत. वेधाच्या कामात नर गणेश दैवज्ञ भास्कराचार्यांपेक्षा श्रेष्ठ होता. केशव आणि गणेश यांच्या वंशात आणखीहि विद्वान पुरुष उत्पन्न झाले. गणेशाचा धाकटा बंधु अनंत यानीं वराहमिहिरकृत लघुजातकावर टीका आहे. त्याचें अध्ययन त्याचा वडील बंधु गणेश दैवज्ञ याजपाशी झालेलें होतें. गणेशाचा पुतण्या नृसिंह याची ग्रहलाघवावर टीका होती. गणेश दैवज्ञाचा पणतु गणेश नावाचा होता. त्याची सिद्धांतशिरोमणीवर शिरोमणिप्रकाश नांवाची टीका आहे. [ दीक्षितकृत *भारतीय ज्योतिःशास्त्र* ]

**गणेशपुराण**—अष्टादश पुराणांच्या उपपुराणांतील एक पुराण. या गणेशपुराणातील साररूपानें वाचकास घेण्यासारख्या कोणत्या गोष्टी आहेत त्याचा थोडक्यात विचार करूं. गणेशपुराणाचे मुख्य दोन खंड; पहिला उपासना व दुसरा क्रीडा खंड. उपासनाखंडात गणेश-उपासनेचे विविध प्रकार सांगितले असून, क्रीडाखंडात गजाननानीं वेळोवेळीं अवतार घेऊन कसकशा क्रीडा केल्या त्याचें वर्णन दिलें आहे.

उ पा स ना खं ड.—उपासनाखंडातील अध्याय १ ते ९ पर्यंत सोमकांत नामक राजाची कथा सांगितली आहे. त्यातील ३ ऱ्या अध्यायात राजानें पुत्रास केलेला नीतिशास्त्राचा उपदेश प्रत्येक राजपुत्रानें व सर्वसाधारण गृहस्थाश्रमी मनुष्यानें मनन करण्यासारखा आहे. त्याच प्रमाणें सुधर्मा राणीची पतिनिष्ठा व पतिप्रेम सर्व गृहिणींनीं लक्ष्यात घेण्यासारखें आहे. तसेंच न्यायनीतीचा त्याग करून अन्यायानें परधनासक्त झालेल्या मनुष्याच्या मनाची कशी स्थिति होते, व त्यामुळें त्याच्या हातून कशीं महान् पातकें घडतात, आणि त्या पापांमुळें त्यास पुढें कशी दशा प्राप्त होते, हेंहि सोमकांत राजाच्या कथेंत उत्तम प्रकारें दाखविलें आहे. अध्याय १०,११ व १२ यात व्यासाच्या गर्वाचें निरसन करून गणेशस्वरूपाचें वर्णन दिलें आहे, त्यात श्रीगजानन ओंकारस्वरूप परब्रह्म असल्याचें दाखविलें आहे अध्याय १३,१४ व १५ यात गजाननानें आपल्या उदरात अनंत ब्रह्मांडें दाखवून ब्रह्मदेवाच्या गर्वाचें निरसन केल्याची कथा व्यवहारांत मिथ्या अभिमान बाळगणारांस बोधामृताप्रमाणें होणार आहे अ. १६ ते १८ पर्यंत मधु व कैटभ राक्षसांची कथा आहे. या कथेंत विष्णूसारखे सर्वमान्य देव सुद्धा प्रसंगीं इष्टकार्य साधण्यासाठीं हताश न होतां हवीं तीं कामें मानापमान बाजूस ठेवून करण्यास कसे उद्युक्त होतात त्याचा धडा घेण्यासारखा आहे. अध्याय १९-२१ यामध्यें निपुणिक भीम राजाची कथा आहे. देवतेच्या पूजनानें पतिताचा उद्धार कसा होतो, हें या कथाभागावरून कळून येतें. अध्याय २२ ते २३ मध्यें आलेली बल्लाळ नामक महान् भगवद्भक्त वैश्यपुत्र या लहान बालकाची कथा अत्यंत मनोरम आहे. अध्याय २४-२७ मध्यें गजाननाच्या वरप्रदानानें दक्षाला आकस्मिक राज्यप्राप्ति कशी झाली, तो इतिहास आहे. पुढें अध्याय २८-३५ यामध्यें दक्षवंशातील रुक्मांगद राजाची हकीगत असून तो राजा एकदां शिकारीस गेला असतां रानात त्याला वाचक्नवी ऋषीचा आश्रम आढळला. राजाला पाहून त्याच्या मुकुंदा नामक पत्नीला प्रबल कामविकारानें पीडिलें, राजानें तिचा धिक्कार केल्यामुळें, तिनें रुक्मांगदाला ‘कुष्ठी हो’ असा शाप दिला. या कथाभागावरून अनुकरणीय असें रुक्मांगदाचें धैर्य व दुर्जन संगतीपासून होणारे तोटे यांचें स्पष्ट चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें. अध्याय ३६-३८ मध्यें दुराचरणी मुकुंदेच्या पोटीं इंद्रापासून जन्मलेल्या गृत्समदाची कथा आहे. त्यात गजाननाच्या तपश्चर्येनें त्याला ब्राह्मणत्व कसें मिळालें ती हकीकत हृदयंगम आहे. अध्याय ३९ ते ४७ त त्रिपुरासुराची कथा आहे. गृत्समदानें त्याला ‘गणानांत्वा’ या मंत्राचा उपदेश केल्यावर गजाननाच्या वरप्रसादानें तो पूर्ण ऐश्वर्यसंपन्न झाला, परंतु अहंकारानें उन्मत्त होऊन वाटेल तीं दुराचरणें तो करूं लागला, त्यामुळें शेवटीं त्याचा नाश झाल्याचा उल्लेख आहे. धन, ऐश्वर्य वगैरे सर्व असूनहि दुराचारी मनुष्याचा अन्तीं कसा नाश होतो हें यावरून चांगलें लक्षांत घेण्यासारखें आहे पुढें अध्याय ४८—५३ पर्यंत त्रिपुरासुराच्या भयानें शंकरासह सर्व देव वाट सापडेल तिकडे पळून गेले असता, गिरिकंदरात लपून राहिलेल्या विरही पार्वतीला तिचा पिता हिमवान् यानें केलेला उपदेश विशेषतः स्त्रियांना फारच बोधप्रद आहे. या कथाभागांत हिमवानानें पार्वतीला इष्टहेतूच्या सिद्ध्यर्थ गणेशोपासना सांगून, त्याच्या उपासनेचे व पूजेचे प्रकार, तसेंच गणेशचतुर्थीव्रतमहात्म्य, गणेशाचें मूलपरब्रह्मस्वरूप, वरदगणेशाची कथा, नलराजाची दृढ गणेशभक्ति इत्यादि निवेदन केलें आहे, गणेशभक्तांना ही विधिपूर्वक प्रतिपादिलेली माहिती विशेष उपयोगी आहे. अध्याय ५७—५८ मध्यें एका बाटमाऱ्या भीवराची कथा असून त्याला मुद्गलऋषींचें दर्शन झाल्यानें तो गणेशभक्तीला लागला व शेवटीं तपश्चर्येच्या शुद्धीमुळें भुशुंडी ऋषी कसा झाला, तें कथानक विचक्षणास विचारणीय आहे. अध्याय ५९—६४ मध्यें संकष्टचतुर्थीमहात्म्य, अंगारकीचतुर्थीमाहात्म्य, दूर्वामाहात्म्य इत्यादिकांचें दृष्टांतासुद्धां विवरण असून गणेशदेवतेचा चंद्रासारख्यानें कुचेष्टा केली असता त्याला सुद्धां त्याबद्दल प्रायश्चित्त कसें भोगावें लागलें इत्यादि कथा मनोरंजक आहेत. अध्याय ६५ मध्यें दुष्ट अनलासुराचें हनन आहे. अध्याय ६६—६९ मध्यें मिथिला नगरीच्या जनक राजाचा [illegible] असून एकदा सिंधु नामक दैत्याच्या हननासाठीं पार्वतीचे उदरीं गजाननाला अवतार धारण करावा लागला, [illegible] पुढील अध्यायात आहे. अध्याय ७१ ते ८० पर्यंत स्वर्ग, भूमि व पाताळ इ. यांचें [illegible] कशी चालविली याचें दिग्दर्शन आहे. [illegible]

पर्यंत बालगजाननानें अनेक राक्षसांचा नाश कसा केला यासंबंधाचे पुष्कळ आश्चर्यजनक चमत्कार सांगितले आहेत. अध्याय १०४ यांत ब्रह्मदेवाचें गर्वनिरसन, १०५ यांत विष्णु व गणेश यांचें अभेदत्व,१०६ यांत सर्व गणाचा स्वामी म्हणून गजाननाला मिळालेलें 'गणेश' हें नामाभिधान व शंकराना आपल्या खऱ्या स्वरूपाचा साक्षात्कार, अ. १०७व १०८ मध्यें इंद्र आणि यम यांचें गर्वनिरसन,इत्यादि मनोरम कथाप्रसंग आहेत. पुढें अध्याय १०९–१२६ पर्यंत सिंधुदैत्याशीं झालेल्या युद्धाची हकीकत असून, गजाननाचा सिद्धि–बुद्धीशीं विवाह व अद्भुत गोष्टी यांचें रसभरित वर्णन आहे. सिंधूप्रमाणेंच सिंदुरासुराच्या नाशाकरितां द्वापारयुगात गजाननाला अवतार धारण करावा लागला तो कथाप्रसंग अध्याय १२७—१३७ पर्यंत आहे. १३८ ते १४८ पर्यंतच्या ११ अध्यायात गजाननानें वरेण्य राजाला गणेशगीता सांगितली आहे. शेवटीं अध्याय १४९ व १५० यात कलियुगामध्यें पुढें उत्पन्न होणाऱ्या धूम्रवर्णावताराचा उल्लेख करून अखेरीस १५२—१५५ या अध्यायात गणेशपुराणाच्या फलश्रुतीचें महात्म्य व तें कोणाकोणाला प्रत्ययास आलें तें सांगितलें, आणि याप्रमाणें गणेशपुराणांचें हें पहिलें सुमनोहर उपासनाखंड पूर्ण केलें आहे.

क्रीडाखंड.–क्रीडाखंडाच्या पहिल्या १तै४ अध्यायामध्यें रौद्रकेतु ब्राह्मणाच्या देवांतक व नरांतक नामक पुत्रांची हकीकत आहे.मातापितर ब्राह्मण असूनहि त्याच्या पोटीं दैत्य कसे निर्माण होतात हें या कथानकावरून कळून येतें, आणि दैत्य म्हणजे दुसरे कोणी नसून जे क्रियेनें घोर आचरण करतात, ते उच्च कुलोत्पन्न असले तरी दैत्यच होत हें या उदाहरणावरून स्पष्ट ठरतें. हे दैत्य महापराक्रमी असून त्यांच्या नाशासाठीं गणेशाला अवतार धारण करावा लागला आहे. त्याचप्रमाणें अदितीच्या स्तुतीला प्रसन्न होऊन तिला पूर्वी दिलेल्या वरास अनुसरून गजाननानें तिच्या पोटीं महोत्कटरूपानें अवतार धारण केल्याची अध्याय ५ व ६ मध्यें कथा आहे. पुढें अध्याय ७ ते ११ पर्यंत गजाननाच्या अनेक लीलांचें व चमत्कारांचें वर्णन आहे. 'यात मुख्य गोष्ट अशी आहे की, जे अनन्य भक्तीनें गजाननाला परब्रह्मस्वरूपी जाणून नम्र होत, त्यास त्यानें वैभवशिखरावर चढविलें, व उन्मत्ताचा नाश केल्याचें दाखविलें आहे. या कथेंत नम्रता व भक्ति यांची योग्यता दाखविली आहे. अध्याय २२ ते २८ पर्यंत शुक्ल ब्राह्मणाकडे महोत्कट भोजनास गेल्याची कथा असून, परमेश्वर दांभिक, डामडौली अशा लोकांचा मुळींच भुकेला नसून केवळ भक्तीचा व प्रेमाचा भुकेला आहे हें या कथेंत दाखविलें आहे.

पुढें २९ पासून ३८ पर्यंतच्या प्रत्येक अध्यायांत कथा सुरस व बोधप्रद आहेत. कश्यपऋषीला दिती व अदिती दोन भार्यांच्या निरनिराळ्या आचरणानें त्यास अनुक्रमें दैत्य व देवसंतती झाल्याचा जो कथाभाग आहे, त्यांत सुसंतति होण्यास नीतिमार्गाची आवश्यकता दाखविली आहे व तो भाग प्रत्येक गृहिणीस उपदेशपर असा आहे. अध्याय ४८ पासून ५४ पर्यंत भूतलोक, दानवलोक, गंधर्वलोक, सिद्ध, चारण, यक्ष, यांची स्थानें अमरावती,अग्निलोक, यमलोक, इंद्रलोक, वरुणलोक, कुबेरलोक, वायुलोक, सूर्यलोक, चंद्रलोक, गोलोक, सत्यलोक आणि त्या सर्वांपेक्षा रमणीय असा वैकुंठलोक व अखेरीस गणेशलोक यांचें वर्णन आहे. त्या वर्णनापासून खगोल व भूगोलविद्या यांचा आस्थापूर्वक अभ्यास करणारास बरेंच साह्य होण्यासारखें आहे. अध्याय ५५–७७ पर्यंत नरांतक व देवांतक यांच्याशीं गजाननानें केलेल्या संग्रामाचें वर्णन व अनेक बोधपर गोष्टी आहेत. विशेषतः एकदा ह्रास पेटलेला दुष्कर्मी मनुष्य उत्तरोत्तर खड्यातच कसा पडतो आणि अखेरीस कसा धुळीस मिळतो यांचें स्पष्ट चित्र यात दाखविलें आहे. शेवटीं अध्याय ७१ व ७२ यात विनायकाची अवतारसमाप्ति ग्रथित केली आहे.

इंद्रासारख्याचा गणेशानें सहज लीलेनें केलेला गर्वपरिहार सामान्य जनास बोधप्रद आहे. अध्याय ७०–७२ यामध्यें संकष्टचतुर्थिव्रताचें समग्र विधान आणि पार्वती, दमयंती, अगस्ती, चित्रलेखा, प्रद्युम्न, रुक्मिणी, श्रीकृष्ण, ब्रह्मदेव अशासारख्या मोठ्यामोठ्या उत्कर्षेच्छु मनुष्यांनीं पूर्वी हें व्रत कशा प्रकारें केलें, व त्यांना सिद्धी कशा प्राप्त झाल्या तें सांगितलें आहे. अध्याय ७३–८३ पर्यंत कार्तवीर्याची कथा आहे. जन्मतःच तो हस्तपादानीं व्यंग असून गणेशोपासनेनें त्याला सहस्र हस्त व पाय प्राप्त झाले. त्यामुळें त्याला आपल्या पराक्रमाची घमेंड वाटून त्यानें जमदग्नि ऋषीला मारून टाकिलें. गणेशाच्या प्रसादानेंच त्याच्या परशुराम नामक पुत्रानें कार्तवीर्याला जिंकिलें. हा सर्व कथाभाग अत्यंत मनोरम असून, त्यातच एका दुराचारी व वेश्यासक्त गौडपुत्राची उपकथा, नसत्या प्रकारच्या छंदी लोकांना उपदेशपर आहे. अध्याय ८४–८८ मध्यें तारकासुराची कथा आली आहे. त्या दुर्जनाच्या वधासाठीं महादेवासारख्या वीर पुरुषांना आणि पार्वती व मदनाची स्त्री रती यांच्यासारख्या स्त्रियांना किती कष्ट सहन करावे लागले, त्यांचें अश्रुतपूर्व वर्णन आहे. देवकार्यासाठीं मदनानें आपणास जाळून घेतल्याची उपकथा सार्वजनिक देहयष्ट किंवा मेहनत करूं इच्छिणाऱ्यांना 'खचित अल्हादकारक व प्रोत्साहनपर' वाटेल. तसेंच या उपासनाकांडातील शेवटच्या ८९ ते ९२ अध्यायात गजाननाची स्तुति वर्णिली आहे.

गणेशपुराणाच्या प्रती अनेक असण्याचा संभव आहे. आम्हां महाराष्ट्रास परिचित अशा रा. दातार यांनीं मूळ म्हणून मान्य केलेल्या व भाषांतरलेल्या प्रतीवरून वरील मजकूर घेतला आ .

**गणेश वेदांती**—हा महाराष्ट्रीय ब्राम्हण असून मराठयांच्या तर्फे अयोध्येचा नवाब सुजाउद्दौला याच्या दरबारीं वकील होता. पानिपत झाल्यानंतर रणांगणावरील मराठयांच्या वाजूच्या शवांचा और्ध्वदेहिक संस्कार यानें व काशीराज पंडित यानें फार परिश्रम घेऊन केला. सुजानेंहि त्या कामीं याना मदत केली. हा दयाई व परोपकारी असल्यानें याला वेदांती हें टोपण नाव पडलें असावें [इतिहाससंग्रह; जुन्या ऐतिहासिक गोष्टी भा ३; मराठी रियासत मध्यविभाग. ३ ].

**गणोजी शिर्के**—हा शिवाजी महाराजाचा जावई होय. महाराजाच्या मुलीचें नाव राजकुंवर असून ती याला दिली होती याची आत्या ( ? ) सोयराबाई ही महाराजाना दिली होती तसेंच याची सख्खी बहीण जिऊबाई ही संभाजी छत्रपतींची बायको ( येसूबाई ) होती गणोजी हा ज्या वेळीं संभाजीनें शिरक्यांचें शिरकाण केलें त्यावेळीं मराठयाना सोडून उघडपणें मोंगलास मिळाला. पुढें राजाराममहाराज हे जिंजीस वेढयात सापडले असता, वेढा घालणाऱ्या औरंगझेबाच्या सैन्यातच गणोजी होता. किल्याच्या नैर्ऋत्येस याचें पथक व मोर्चा होता. त्याला आपल्याकडे वळविण्यासाठीं किल्यातून खंडोवल्लाळ त्याच्याकडे गेला प्रथम गणोजीनें त्याचें म्हणणें कबूल केलें नाहीं. शिर्क्यांचें दाभोळचें वंशपरंपरागत वतन चिटणिसाकडे होतें तें गणोजीनें मागितल्यावरून खंडोबानें तें त्याच्या स्वाधीन केलें. त्याशिवाय शिर्क्यांना मोर प्रातात तीन व रत्नागिरी परगण्यात पाच गाव इनाम मिळाले तेव्हा आपल्या आत्ताचा कविला या मिषानें गणोजीनें राजाराममहाराजाना किल्ल्यावरून खालीं उतरवून आपल्या गोटात घेतलें व दुसरे दिवशीं शिकारीच्या निमित्तानें त्याना त्यानें काहीं कोसावर असलेल्या धनाजींच्या सैन्यात नेऊन पोहोंचविलें ( १६९७ दिसेंबर ). पुढें गणोजी हा मराठयाकडे येऊन मिळला. याचा मुलगा पिलाजी हाहि इतिहासात प्रसिद्ध आहे [ मरा रिया पूर्वार्ध]

**गंतूर**, जि ल्हा.—मद्रासइलाख्यातील एक जिल्हा.१९०४ साली कृष्णा जिल्ह्याचा काहीं भाग व नेलोरचा एक ( ओनगोल)तालुका मिळून हा बनविला.गंतूर हें याचें मुख्य ठिकाण आहे. रेव्हेन्यूकरिता गतूर, तेनाली, नरसराव पेठ व ओनगोल हे चार पोटविभाग पाडले आहेत. गंतूर सब डिव्हीजनमध्यें गंतूर व सत्तेनापाली हे दोन तालुके आहेत. पूर्वीचा हा जिल्हा१८५९ त मोडून गोदावरी व कृष्णा यांमध्यें विभागला होता. क्षेत्रफळ ५७३५ चौ मैल. लोकवस्ती ( १९२१ ) १८०९९. जमीनमहसूल व इतर पट्टया मिळून उत्पन्न सुमारें २० लाख आहे दर दहा हजारीं ६९३ लोक साक्षर आहेत व १२० इंग्रजी जाणतात. लोकाचा मुख्य धंदा शेतकी आहे

ता लु का.—मद्रास. गंतूर जिल्हा. क्षेत्रफळ ५०० चौरस मैल लो सं (१९२१) २१४९२३. गंतूर व मंगळगिरी हीं दोन शहरें व १०९ खेडीं आहेत. उंदवल्ली खेडें प्राचीन अवेशपाकरिता पहाण्याजोगें आहे. जमीनमहसूल व कर मिळून ६२४००० उत्पन्न आहे. दक्षिणभागाची जमीन काळी व सुपीक आहे, पण पाऊस थोडासा कमी पडला की अगदीं नापीक व ओसाड होते. तालुक्याच्या मध्यभागीं पुराचें भय असतें पण पूर गेल्यावर गाळाच्या योगानें ती जागा फार सुपीक होते रस्ते वगैरे बरे आहेत उत्तरेकडील भागातून बँक कालवा जातो. एप्रिल व मेमध्यें उन्हाळा फार भयंकर असतो. एरवीं हवामान ठीक असतें

श ह र—गंतुर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण उ अ० १६.° १८' व पू. रे. ८०°२८'. १८६६ पासून येथें म्युनिसिपालिटी आहे. वस्ती ( १९२१ ) ४८१८४ होती. येथील हवापाणी अत्यंत आरोग्यदायक आहे १७७८ मध्यें हा प्रदेश कंपनीसरकारनें बसालतजंग यापासून मक्त्यानें घेतला व तो १८२३ पासून त्याच्याकडे कायमचा राहिला. येथें मोठाले रस्ते मिळतात. त्यात बेझवाड्यावरून जाणारा सीतापूर मद्रास रस्ता मुख्य आहे. येथें एक आर्टस् कॉलेज आहे. हिंदु व मुसुलमान शिक्षकशिक्षकिणीकरिता ट्रेनिंग शाळा आहेत शिवाय शहर हायस्कूल, तालुका हायस्कूल, मुलींचे हायस्कूल यासारख्या इंग्रजी शिक्षणाच्या शाळा आहेत. तेलगू व इंग्रजी भाषेतली चार नियतकालिकें येथें प्रसिद्ध होतात. व्यापाराचें हें मोठें ठिकाण आहे हें सदर्न मराठा रेल्वेचें एक स्टेशन आहे. येथें कापसाचा व तादुळाचा व्यापार चालतो.

**गदग** ता लु का—मुंबई इलाख्यांतील धारवाड जिल्ह्याचा एक पूर्वेकडील तालुका क्षेत्रफळ ६९९ चौ मै. ह्यात मुन्डरगी परगण्याचा समावेश होतो. यात गदग व गुलगुड हीं २ गावें व १०२२ खेडीं असून हवा समशीतोष्ण व आरोग्यदायक आहे. वार्षिक पाऊस सरासरी २५इंच पडतो लो सं (१९११) १३१७४०. येथें कप्पट नावाची डोंगराची ओळ आहे. हवा समशीतोष्ण व आरोग्यदायक आहे पाऊस २५ इंच पडतो

श ह र–मुंबई इलाखा धारवाड जिल्हा.गदग तालुक्याचें मुख्य ठिकाण उत्तरअक्षांश १५° ९६' व पूर्वरेखांश ७५°४३'. लोकसंख्या (१९११) ३०४२९ येथें कापसाचा व्यापार मोठा असून येथील लुगडीं प्रसिद्ध आहेत. दर शनिवारीं येथें बाजार भरतो इ. स. १८५९ सालापासून येथें म्युनसिपालटी आहे. गदगच्या किल्ल्याभोंवतीं सुमारें १८ फूट तट असून कोठें खंदकहि दृष्टीस पडतो. इ स. १७५० सालीं हा किला चांगल्या स्थितींत होता असें वर्णन आढळतें. किल्यात एक हौद व काहीं विहिरी आहेत गदग येथील मामलेदाराच्या कचेरींत काहीं ताम्रपट असून येथील देवळात किंवा त्याच्या जवळपास पुष्कळ शिलालेख आहेत. त्रिकुटेश्वराच्या देवळात २० शिलालेख असून पैकीं १० इ. स. १००२ ते १५३९ च्या दरम्यानचे आहेत वीरनारायणाच्या देवळात असलेल्या ७ शिलालेखांपैकीं चार इ. स. १०२७ ते १५३० च्या दरम्यानचे आहेत.

इतिहास—याचें प्राचीन अगर संस्कृत नाव क्रतुक असें असावें. त्रिकूटेश्वर व वीरनारायण हीं देवळें दहाव्या अगर अकराव्या शतकांतील असावींत व तेथें सापडत असलेल्या निरनिराळ्या वेळच्या शिलालेखावरून असें स्पष्ट दिसतें कीं, हा भाग पश्चिमचालुक्य (९७३–११९०), कालचुरी (११६१–११८३), होयसल बल्लाळ (१०४७–१३१०), देवगिरीचे यादव (११७०–१३१०) आणि विजयानगरचे राजे (१३३६–१५८७) या निरनिराळ्या राज्याच्या अमलखालीं होता. इ. स. १६७३ च्या सुमारास बंकापुर सरकारमध्यें गदग हा मुख्य जिल्हा होता. टिपूच्या बाजूनें लढणाऱ्या धोंड्या वाघानें गदग येथील किल्ला पेशव्याच्या किल्लेदाराकडून घेतला होता. इ. स. १८१८ सालीं सर मनरो यानें दोन चार गोळे फेंकून किल्ला सर केला.

गदग ही कापूस, सूत याची मोठी पेठ आहे. येथें कापडाच्या, सरकी काढण्याच्या व कापूस दाबण्याच्या गिरण्या आहेत.

**गदरिया**—गरेरी. याची वस्ती संयुक्तप्रांत, मध्यहिंदुस्थान वगैरे भागांतून आहे. एकंदर लो. सं. (१९११) १३,६८,९९० पैकीं संयुक्तप्रांतातच ९,८३,०९९ आहे. गंगाधर अथवा कंदाहार या शब्दावरून गदरिया शब्दाची व्युत्पत्ति लावण्यात येते. गदरिया ही एक धनगराची व घोंगडी विणणाऱ्या लोकाची जात आहे. गुआल अथवा अहीर जातीशीं त्याचा निकट संबंध असावा, कारण गुआल जातीच्या हातची कच्ची व पक्की रसोई ते खाऊं शकतात. संयुक्तप्रांतात बाघेल, धाधनिया, चंडेल, धिंगर, हरनवाल, कच्छवाह, निखर, फुलीसधिय, राठोर, रैंडेल, सागर व सरस्वार अशा त्याच्या बारा पोटजाती आहेत. यापैकीं निम्मीं नावें रजपुतांतलीं आहेत. बनारस येथें धिनगर, निखर, जोनपुरी, अलाहाबादी, बकरकसाब, नामदावाला व चिकवा इत्यादि जाती प्रसिद्ध आहेत. यापैकीं पहिल्या चार जाती धनगराचा धंदा करतात व कांबळीहि विणतात. बकरकसाब व नामदावाला हे हाच धंदा करतात. चिकवा हे मुसुलमान जातीचे आहेत. वरील पोटजातींशिवाय भरारिया, बैकट, तासेल्हा, चाक, बारिया, पैगर व भैयातार अशाहि पोटजाती आहेत. पश्चिमेकडील गदरिया ग्वाल्हेरहून आल्यामुळें स्वतःस मराठे म्हणवितात व तेथील काली देवीच्या दर्शनार्थ जातात. गदरिया या ज्ञातीची एक पंचायत असते. बालविवाह, विधवाविवाह वगैरे गोष्टी या जातींत रूढ आहेत. त्याच्या लग्नांतील चालींत वधूस कपटानें व बलात्कारानें पळवून नेण्याच्या जुन्या चालीचा थोडासा अवशेष अद्यापहि पहावयास सापडतो. त्याच्यात कांहीं जन्मसंस्कार असून मृत्युसंस्कारात पिंड व श्राद्ध वगैरे विधी पाळण्यात येतात.

गदरिया हे जुन्या चालीचे हिंदू असून या जातीच्या मुसुलमान शाखेंत फारच थोडी संख्या आढळते. त्याची काली हीच मुख्य देवता होय. त्याशिवाय चामार व जोसाइ या विशिष्ट देवता असून त्याना बकरें व डुक्कर याचा बळी वहाण्यात येतो. बिहारमध्यें गदरियाचा दर्जा अहीरापेक्षा मोठा असतो. त्याचा मूळ धंदा धनगराचा व घोंगडी विणण्याचा असला तरी कांहीं लोक शेती व व्यापारहि करतात. [ क्रूक ]

मध्यप्रांतात याची संख्या सुमारें ४०,००० आहे. ही मिश्रजात असून हे आपल्या उत्पत्तीबद्दल पुष्कळ दंतकथा सांगतात. याच्या मुख्य निखार, धेन्गार व बारमैयान या तीन पोटजाती आहेत. याशिवाय कांहीं स्थानपरत्वें नामांतरें व पोटजाती पडल्या आहेत. याचीं लग्नें देवकाप्रमाणें होतात. निखार जात सर्वांत उच्च समजतात पण ते दुसऱ्या जातींतील मुलगी अडचणीच्या प्रसंगीं करतात. लग्नप्रसंगीं एक स्त्री नग्नावस्थेंत स्त्रियांमध्यें नाचत असते. याचीं नैतिक बंधनें शिथिल आहेत. विधवेनें दिराबरोबर त्याची बायको हयात असताहि लग्न करणें प्रशस्त मानतात. लग्नाची वयोमर्यादा निश्चित नाहीं. वरापेक्षा वधू वयानें मोठी असली तरी चालते. [ रसेल व हिरालाल–कास्ट्स अँड ट्राइब्स इन सी पी ]

**गदाधरपंत प्रतिनिधी**—शाहुमहाराज दक्षिणेंत यावयास निघाले असता गदाधर प्रल्हाद नाशिककर हे ब्राह्मण गृहस्थ येऊन त्याना मिळाले. प्रथम जी मंडळी महाराजाना मिळाली त्या (मोरोपंत सरनीस, कृष्णाजीपंत जोशी, परसोजी भोसले वगैरे) मंडळींतच गदाधरभट हे एक होते. पुढें राज्याभिषेक झाल्यानंतर परशुरामपंत किन्हईकर हे ताराबाईच्या पक्षाकडे राहिल्यानें महाराजानीं प्रतिनिधिपद गदाधरभट्टास दिलें (१७०८), परंतु हें पद पंताकडे फार दिवस राहिलें नाहीं. कारण 'गदाधरभटाचा भद्रोकारभार यथास्थित बंद न होय हें लक्ष महाराजानीं समजून' महाराजानीं बाळाजीपंत (थोरले) पेशवे याच्या सल्ल्यानें परशुरामपंतास सोडून त्याना प्रतिनिधीचीं वस्त्रें इ. स. १७११ त दिलीं. [ मराठी रियासत, मध्यविभाग ]

**गद्दी**—संयुक्तप्रांतात या जातीची वस्ती सर्वांत मोठी (५५,०२२) आहे. एकंदर लो. सं. (१९११) ६२,७८६. हे सर्व मुसुलमान आहेत. पंजाबात हे करनाळ व दिल्ली प्रांतात आढळतात. त्याच्यात व घोसीमध्यें फारच साम्य आहे व ते परंपरागत गवळी असल्यामुळें अहीरापैकींच असावेत असें सात्रींनें वाटतें. करनाळमध्यें हे लोक पुष्कळ आहेत. येथें ते शेतकऱ्याचा धंदा करतात व शेतकरी म्हणून समजले जातात. कधीं कधीं याना गद्दी असें म्हणतात. परंतु याचा डोंगरी गद्दीजातीशीं कांहीं एक संबंध नाहीं. [ रोजग्लॉसरी. पंजाब, से. रि. १९११ ]

**गद्दी**—पंजाबातील एक जात. लो. सं. २७,६१२. हे सर्व हिंदू असून कांगा जिल्हे आणि चाबा संस्थानें यात आढळतात. ब्राह्मण, खत्री, रजपूत व डोंगराळ प्रदेशातील राठी याना हें सर्वसाधारण नाव आहे. ते अर्धवट गुराखी व शेतकरी आहेत. त्याची स्वतःची

स्वतंत्र भाषा ( गादी ) आहे. कांग्रा जिल्ह्यामध्ये गद्दी ही शेतकऱ्यांची जात आहे असें मानण्यांत येतें. [ रोज—ग्लॉसरी; पंजाब, से. रि. १९११; क्रूक ].

**गंधक**—( परमाणु भाराङ्क ३२.०७ ) एक अधातुरूप रासायनिक मूलद्रव्य. हें लोकांना पुष्कळ दिवसांपासून माहीत असून याच्या ज्वालाग्राही गुणामुळें किमयागार लोक याला ज्वलनतत्व असें समजत असत. हें मूल द्रव्य स्वतंत्र व संयुक्त स्थितींत निसर्गांत पुष्कळ ठिकाणीं आढळतें. स्वतंत्र किंवा नैसर्गिक गंधक ज्वालामुखीजवळ सांपडतें.

सर्व जगातील गंधकाच्या खाणींपैकीं सिसिली बेटातील खाणी महत्वाच्या आहेत.यूरोपांत मायोसीन नांवाची चिकण-माती व चुनखडी यांत कापूर, शिलाजित व इतर कांहीं खनिज पदार्थांबरोबर गंधक आढळतो. रशियांत विशेषतः दाघेस्तानमध्यें गंधकाच्या मोठमोठाल्या खाणी आहेत. जपान, चिली, पेरू व युनायटेडस्टेट्स वगैरे देशांतहि गंधक पुष्कळ सांपडतो.

संयुक्त स्थितींत हें मूल द्रव्य मुख्यतः गंधाकिदें व गंधकितें या रूपांत आढळतें. पैकीं गंधाकिदें हीं व्यापारी दृष्टया फार महत्वाचीं आहेत. कारण त्यांपासून तांबें, शिसें, जस्त, पारा वगैरे धातू निघतात. गंधकितांपैकीं कर्पूर, शिलाजित, भाराथितें व मग्नगंधकितें हीं सांगण्यासारखीं आहेत. गंधक द्याम्लगिद व गंधकीकृतउज्जन हे वायुरूप पदार्थ ज्वालामुखांतून व खनिज पाण्यातून निघतात. प्राणिज व वनस्पतिज सृष्टींतहि गंधक आढळतो. केंस व लोंकर आणि प्राण्यांची बलकयुक्त शरीरें व लसूण आणि मोहरी याच्या तेलासारखीं इतर कांहीं तेलें यांत गंधक असतो.

**खा णीं तू न का ढ णें.**—खाणींतून काढलेल्या नैसर्गिक गंधकाबरोबर चुनखडी, कर्पूर, शिलाजित, माती वगैरे इतर पदार्थ असतात; त्यांपासून गंधक निराळा करणें फार कठिण नसतें. कारण त्या सर्वांना उष्णता लाविली असता गंधक वितळून वाहूं लागतो व इतर पदार्थ मागें रहातात.

**गु ण ध र्म.**—गंधकाचीं कित्येक रूपें आहेत.परंतु त्यांसंबंधीं सविस्तर विचार करण्यापूर्वी नेहमींच्या गंधकाच्या गुणधर्माचें विवेचन करणें बरें. बाजारी गंधकाचे पिवळे स्फटीक असून ते ११३° शतांश उष्णमानाला वितळतात. नेहमीच्या दाबाखालीं ४४४·५३° ला उकळूं लागतात. उकळूं लागल्यानंतर वाफेचा रंग प्रथम नारिंगी असतो; परंतु जास्त तापविल्यानंतर तो काळसर होत होत ५००° ला तांबडा लाल होतो. उष्णमान आणखी वाढविल्यास रंग फिका होत जाऊन ६५०° ला गवतासारखा होतो. रंग बदलण्याचें कारण अणूंचें विघटन घटन होतें हें होय. घनरूप गंधकाचें विशिष्टगुरुत्व २.०६२ ते २.०७० असतें. तें उष्णता व विद्युद्वाहक नाहीं व घर्षणानें त्यावर ऋण विद्युत् उत्पन्न होते. तें हवेंत ३६३° ला व प्राणवायूंत २७१° ते २८९° पर्यंत पेट घेत. त्याच्या ज्योतीचा रंग विशिष्ट तऱ्हेचा निळा असतो व ज्वलनापासून तीक्ष्ण वासाचें गंधकद्विप्राणिद तयार होतें. त्याच वेळीं थोडेंबहुत त्रिप्राणिदहि तयार होतें. गंधक बहुतेक दुसऱ्या सर्व मूलद्रव्यांबरोबर संयोग पावतें व त्यायोगें गंधकिदें बनतात.

**उ प यो ग.**—कलाकौशल्यांत जे गंधकाचे उपयोग होतात, ते अत्यंत महत्वाचे आहेत. मिठापासून पापडखार करणें, कपडे वगैरे रंगविणें व शुभ्र करणें, कांतडीं कमाविणें, दारू करणें, गंधकाच्या काड्या करणें या व अनेक कामांस गंधक व त्याचे संयुक्त पदार्थ यांचा उपयोग होतो. गंधक जलद पेटतो म्हणून आगकाड्यांचीं टोंकें वितळलेल्या गंधकांत प्रथमतः बुडवितात. असें केलें नाहीं तर फास्फरस फार जलद जळून जात असल्यानें काडी पेटली नसती. याच धर्मामुळें दारू करण्यासाहि गंधक घेतात. गंधकामुळेंच दारू यत्किंचित् ठिणगीनें पेट घेते. जळत्या गंधकापासून जी वाफ निघते, तिनें फुलें व रेशीम शुभ्र होतात. जहाजांत व कोंदट जागीं उंदीर व बाईट कृमी फार जमले तर त्यांचा नाश करण्यासहि गंधक जाळतात. विपाकक्रिया बंद करण्याचाहि गंधकाच्या अंगीं धर्म आहे. दारू ठेवण्याच्या पिपांस आतून गंधकाची धुरी दिली म्हणजे त्यातील बिअर वगैरे दारू विपाक पावत नाहीं. कपड्यातील जंतु व घाण घालविण्यासाठीं त्यांस गंधकाची धुरी देतात व त्याचप्रमाणें घरातील खोल्यातहि गंधक जाळून तेथील हवा स्वच्छ करतात. पदकें, नाणीं व दुसऱ्या पदार्थांचे ठाळ घेण्यास द्रवस्थितींत गंधकाचा उपयोग होतो. गंधकाच्या फुलाचा औषधांत उपयोग होतो. सल्फ्युरिक ॲसिड हा जाळणारा व खाणारा असा विषारी द्रव आहे, आणि तो दुसऱ्या पदार्थांबरोबर भट्टयांत गंधक जाळूनच करितात.

**गं ध का चीं दु स रीं रू पें**—स्फटिकाकार, पिठूळ व कदाचित प्रतिस्फटिकाकार, अशा रूपात गंधक आढळतो. ऐतिहासिक दृष्टया समभुज चतुर्भुजात्मक व ($ग_{अ}$) एकवलनात्मक (मॉनॉक्लिनिक) ($ग_{आ}$) हे प्रकार महत्वाचे आहेत. कर्बद्विगंधकिदांत गंधकाचें द्रावण करून त्याचें स्फटिकीभवन होऊं दिल्यास अथवा गंधकीकृत उज्जानें संपृक्त असें पायरिडाइन हवेंत ठेवून त्याचें प्राणिदीकरण होऊं दिल्यास समभुज चतुर्भुजात्मक गंधक मिळतो. तो पाण्यात विरघळत नाहीं. पण कर्बद्विप्राणिद, गंधकहरिद व टरपेंटाईन यांत द्रवतो. गंधकाचा रस अंशतः थंड करून व त्यावर बनलेली कवची फोडून आंतील रस ओतून टाकिला असता भांड्याच्या आतल्या बाजूला सुईसारखे स्फटिक तयार झालेले आढळतात. हे स्फटिक एकवलनात्मक गंधकाचे होत. $ग_{अ}$ प्रमाणें हा कर्बद्विगंधकिदात विरघळतो. या गंधकाचे आणखी तीन प्रकार सापडलेले आहेत.

पिठूळ गंधक किंवा $ग_{इ}$ हा दोन रूपांत आढळतो,पैकीं एक

कर्बद्विगधकिदात विद्राव्य व दुसरा अविद्राव्य आहे अम्लानें बहुगधकिदाचें विघटन केलें असता गधकाचें दूध मिळतें त्यात हे दोन्ही प्रकारचे गधक असतात गधक हरिदाचें पाण्यानें विघटन केल्यानेंहि अद्रावणीय गधक मिळतो त्याचें हळू हळू समभुजचतुर्भुज गधकांत रूपातर होतें जलमिश्रित गधकीकृत उज्ज व गधकद्विप्राणिद याच्या अत क्रियेपासून प्रतिस्फटिक गधक ( ग$_{८}$ ) मिळतो

ग ध का चा र स —द्रवण बिंदूच्यावर गधक तापविला असता कित्येक चमत्कार आढळून येतात रस प्रथम फिकट पिवळ्या रगाचा असतो, तो जास्त तापविल्यानतर काळसर व चिकट होत होत १८०° उष्णमानाला काळसर तांबड्या रगाचा व अत्यत चिकट होतो आणखी तापवीत राहिल्यास चिकटपणा कमी होतो परतु रग कायम रहातो चिकट प्रकारचा गधक एकदम थड केल्यास अथवा जास्त तापविलेला गधक एकदम पाण्यात टाकल्यास लवचीक गधक मिळतो हा पदार्थहि कांहीं वेळ ठेवल्यानतर ठिसूळ होतो

ग ध का चे स यु क्त प दा र्थ, गधकीकृत उज्ज ( उ$_2$ग) — उज्जच्या प्रवाहात गधक तापविल्यास २००° व ३५८° याच्या दरम्यान त्याचा सयोग होऊन हा वायू तयार होतो निरनिराळ्या धातुरूप गधकिदावरील अम्लाच्या क्रियेनें ( बहुधा लोहस गधकिद व पातळ गधकिकाम्ल याचा उपयोग करितात )हि गधकीकृत उज्ज तयार करता येतो गधकयुक्त सेंद्रिय पदार्थ कुजत असता हा वायू उत्पन्न होतो

हा वायु रगहीन असून त्याला अतिशय वाईट घाण येते तो फार विषारी आहे त्याच्या ज्वलनापासून गधकद्विप्राणिद व पाणी हे पदार्थ तयार होतात तो पाण्यात अल्प प्रमाणात द्रवतो व द्रावणाची प्रतिक्रिया अम्लासारखी असते नैलादि उपधातू व निविष्ट गंधकाम्ल याच्या योगानें त्याचें विघटन होतें तो पुष्कळ धातूशीं सयोग पावून गधकिदें तयार होतात तो धातव लवणाचेंहि विघटन करतो, या गुणामुळें रासायनिक पृथक्करणात त्याचा फार उपयोग होतो संस्कारक (रिड्यूसिंग एजट) म्हणूनहि याचा वारवार उपयोग केला जातो प्राणिदीकारकाचा यावर तात्काळ परिणाम होऊन पाणी व गधक हे पदार्थ मिळतात

याशी गधकद्विप्राणिद (ग, अ$_2$), गधकत्रिप्राणिद ( ग अ$_3$) इत्यादि प्राणिदें होतात द्विप्राणिद पुष्कळ दिवसापासून माहीत असून ज्वालामुखीतून निघणाऱ्या वायुरूप पदार्थांत सापडतें हवेंत किंवा प्राणवायूत गधक जाळला असता किंवा कित्येक धातवप्राणिदें भाजली असता हा वायु तयार होतो तो रंगहीन असून त्याच्या योगानें मनुष्य गुदमरून जातो हा स्वत जळत नाहीं व इतर पदार्थांच्या ज्वलनक्रियेला मदत करीत नाहीं तो पाण्यात व मद्यार्कांत (अल्कहलमध्यें) द्रवतो द्रावणाची प्रतिक्रिया अम्लासारखी असते प्रखर प्रकाशानें किंवा उष्णतेनें त्याचें विघटन होतें पाण्याबरोबर याचा कित्येक वेळा विरजक (ब्लीचिंग एजट) निर्रंगक म्हणून उपयोग करितात व पुष्कळ वेळा (अम्लाबरोबर) त्याची क्रिया संस्कारकासारखी असते उदाहरणार्थ याच्या योगानें परमगलितानें ( परमँगनेट ) सस्करण होऊन ममसक्षार तयार होतात

गधकाम्लाकरिता, हार्ग्रीव्हज्च्या पद्धतानें सिंधुगधकित तयार करण्याकरिता व विरजक, कृमिघ्न आणि नासू न देणारा पदार्थ म्हणून उपयोगात आणण्याकरिता हा वायु औद्योगिक प्रमाणावर तयार केला जातो पदार्थ नासू नयेत म्हणून थड करण्याकरिता व हा अदाह्य असून ज्वलनक्रियेला मदत करीत नाहीं म्हणून आग विझविण्याकरिता दाबलेल्या वायूचा उपयोग करितात ह्या वायूच्या पाण्यातील द्रावणाला गधकसाम्ल म्हणतात त्याच्या अगीं सस्कारक गुण आहेत व हवेंत त्याचें हळू हळू प्राणिदिकरण होऊन गधकाम्ल बनतें याचे पुष्कळ क्षार माहीत आहेत

त्रिप्राणिद —(गउ$_3$ ) सधूमगधकाम्ल किंवा निविष्टगधकाम्ल याचें स्फुरपचप्राणिदासह ऊर्ध्वपातन केल्यास अथवा प्लातिनयुक्त असबस्टासारख्या एखाद्या सान्निध्यविकारी पदार्थाच्या सानिध्यात, गधकद्विप्राणिद व प्राण याचा सयोग झाला असता गधकत्रिप्राणिद तयार होतें पाण्याशीं त्याचा फार जलद सयोग होऊन गधकाम्ल बनतें त्यावेळीं उष्णता बरीच उत्पन्न होते त्याचा गंधकाम्लाशीं प्रत्यक्ष सयोग होऊन तिग्मगधकाम्ल तयार होतें सेंद्रिय सयुक्त पदार्थांवर त्याची क्रिया फार जोरानें होऊन त्यातील पाणी निघून जातें पुष्कळ मूलद्रव्याशीं आणि सयुक्त पदार्थांशीं त्याचा प्रत्यक्ष सयोग होतो, व कित्येक वेळा त्याची क्रिया बलवान अम्लजनीकरकाप्रमाणें असते रगाच्या कारखान्यात याचा उपयोग होतो

गधकयुक्त गधकाम्ल –(उ$_2$ग$_2$उ$_3$) हें अम्ल स्वतन्त्र स्वरूपात करता येत नाहीं कारण त्याचें विघटन होतें परतु त्याचे क्षार स्थिर असून विशेषत सिंधु क्षाराचा प्रकाशलेखनाकडे (फोटोग्राफीकरिता) फार उपयोग होतो गधकाच्या फुलांचें सिंधुगधकाधितावरोबर पचन केलें असता किंवा चुन्याच्या निवळीबरोबर गधक उकळला असता हा क्षार मिळतो खनिज अम्लाच्या योगानें याचें तात्काळ विघटन होऊन गधकद्विप्राणिद निघून जातो व गधक साक्याच्या रूपानें खालीं पडतो त्यापासून पुष्कळ क्षार तयार होतात, व लोहिकहरिदाच्या द्रावणाबरोबर मिश्रण केल्यास त्याचा रग जांभळा होतो मिश्रण कांहीं वेळ तसेंच ठेवल्यानतर गधकाचा सांका पडून रग नाहींसा होतो

नैसर्गिक गधक व धातव गधकिदें याचा निरनिराळीं औषधें करण्याकडे उपयोग होता त्वग्भोगावर गधकाचा बाह्यत उपयोग होतो गधकाच्या गुलत्या पुटीचा कातडीवर कांहींच परिणाम होत नाहीं, परतु मलमात औषधी गुण

पुष्कळ आहेत. खरजेवर यापासून फार गुण येतो. पोटांत घेतल्यास गंधक हें सौम्य रेचक आहे. यकृताचा संकुचितपणा, संधिवात व मुतखडा (किंवा सिकता) यांवर गंधकयुक्त पाण्याचा चांगला उपयोग होतो. धाकट्या श्वासनलिकेसंबंधीं फार दिवसाच्या जुन्या विकारावरहि गंधक उपयोगी आहे. फार दिवसाच्या संधिवातावर गंधकाचें पाणी पोटांत घेतल्यास किंवा अंघोळीकरितां वापरल्यास चांगला परिणाम होतो. हवेंत किंवा अम्लजनांत गंधक जाळला असतां उत्पन्न होणारें गंधक द्व्याम्लजिद, बलवान, कृमिघ्न आहे. याकरितां संसर्गजन्य रोगान्या माणसांनीं वापरलेल्या खोलींत गंधकाचा धूर करतात.

**गधका**—मुंबई इलाख्यातील काठेवाडमधील एक संस्थान. हा एक स्वतंत्र खंडणी देणारा तालुका असून राजकोट हद्दींतला भायाद आहे. यांत सहा गावें आहेत.

**गंधकाम्ल**—हें सर्व औद्योगिक देशांत मोठ्या प्रमाणावर तयार केलें जात असून, त्याचा उपयोगहि पुष्कळ निरनिराळ्या कामाकडे होत असल्यामुळें सर्व रासायनिक द्रव्यांत तें अत्यंत महत्वाचें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. तें निसर्गत: स्वतंत्र स्वरूपांत फारसें सांपडत नाहीं, व जरी याचे क्षार, विशेषत: खट व भार गंधकितें पुष्कळ ठिकाणीं बऱ्याच प्रमाणांत आढळतात, तरी स्वतंत्र अम्ल त्यापासून केव्हांहि तयार करीत नाहींत. कारण, गंधक किंवा गंधकिदें जाळून तयार झालेल्या गंधकाद्विप्राणिदाचा प्राणबरोबर (व पाण्याबरोबर) संयोग केला असतां हें अम्ल फारच सुलभतेनें प्राप्त होतें. पूर्वीं तुरटी, मोरचूद किंवा दुसरें एखादें गंधकित तापवून गंधकाम्ल तयार करीत. किमयागार लोकांना त्याचा फार उपयोग होत असे. गंधकप्राणिद पाण्यांत मिळविलें असतां, गंधकप्राणिदाच्या जलयुक्त द्रावणाचें सावकाश प्राणिदीकरण झालें असतां, किंवा गंधक व सोरा यांचें मिश्रण कांचेच्या बरण्यांत जाळून व निघणारा धूर पाण्यांत शोषून घेऊन तें द्रावण निविष्ट केलें असतां सामान्य गंधकाम्ल, $उ_२ ग प्र_४$, तयार होतें (शेवटल्या रीतीला बेसिल व्हॅलेंटाईनची रीत असें म्हणत). डॉ जॉन रुबेक यानें कांचेच्या बरण्याऐवजीं शिशाच्या बरण्या वापरून अर्वाचीन कृतीचा पाया घातला.

**गुणधर्म**.—शुद्ध गंधकाम्ल ($उ_२ ग प्र_४$) हें रंग व वासरहित तेलासारखें द्रव असून १५° ला त्याचें विशिष्ट गुरुत्व १.८ असतें. तें ३३८° ला उकळतें, १०° ला तें गोठतें व त्याचा रंगहीन स्फटिकाकार गोळा होतो. तें फार आर्द्रताग्राही असून वातावरणांतील ओलावा फार जलद शोषून घेतें. यास्तव त्याचा शोषक म्हणून फार उपयोग केला जातो. तीव्र गंधकाम्लांत पाणी मिळविलें असतां पुष्कळ उष्णता उत्पन्न होते. चार भाग अम्लांत एक भाग पाणी मिळविलें असतां मिळणाऱ्या उष्णतेनें ०° पासून १००° पर्यंत उष्णमान चढतें (याचकरितां प्रयोगशाळेंत, अम्लांत पाणी न घालतां पाण्यांत अम्ल घालण्याची खबरदारी नेहमीं घेतली जाते) उष्णतेच्या उद्भवाबरोबरच त्याच आकारमानहि कमी होतें.

**प्रतिक्रिया**:—सर्व रासायनिक क्रियाकारकांत गंधकाम्लाचा व्यापारदृष्ट्या पुष्कळ उपयोग होतो. व्यापारीदृष्ट्या उपयुक्त अशाच प्रतिक्रिया येथें दिल्या आहेत. निरिंद्रिय रसायनांत त्याचा मुख्य उपयोग, त्याची धातू द्रवविण्याची शक्ति व इतर अम्लाच्या क्षारांतून तीं अम्लें काढून टाकण्याची शक्ती या दोन गुणांवर अवलंबून आहे. लोखंड किंवा जस्त आणि पातळ गंधकाम्ल, यापासून विमानें भरण्याकरितां, जाळण्याकरितां, किंवा संस्करण करण्याकरितां लागणारा उज्ज तयार करतात. बहुतेक धातू थंड व पातळ गंधकाम्लांत द्रवतात, आणि उज्ज मोकळा होतो परंतु, तांबें, पारा, ॲन्टिमनी, कथील, शिसें व रुपें ह्या धातू फक्त तीव्र व उष्ण अम्लांत द्रवतात, आणि त्यापासून गंधकद्विप्राणिद मिळतें. उज्जहरत, उज्जस्तम्भ, उज्जभिद, उज्जप्लव, नत्रक, स्फुर व दुसरीं पुष्कळ अम्लें, त्यांच्या क्षारावर गंधकाम्लाची क्रिया करून तयार करतात. अरक, हर आणि स्तम्भ व नैल यांच्या कारखान्यांत ह्या अम्लाचा मोठ्या प्रमाणावर उपयोग होतो.

गंधकाम्लाची पाण्यासंबंधीं रासायनिक प्रीति फार आहे. या गुणामुळें सेंद्रिय रसायनांतहि या अम्लाचा फार उपयोग होतो.

गंधकाम्ल हें द्विभस्मिक असल्यामुळें एकशक्तिक धातूबरोबर अम्ल गंधकितें व सामान्य गंधकितें असें दोन प्रकारचे क्षार बनतात. सामान्य गंधकितें महत्वाचीं असून खनिज सृष्टींत पुष्कळ प्रमाणावर आढळतात; उदा. अनार्द्र (अनाह्यड्राइट). कर्पूर शिलाजीत (जिप्सम), भारितें (बेराइटस), सेलेस्टाइट, व कायसेराइट सामान्यत: गंधकितें पाण्यांत विरघळतात व त्यांचे चांगले स्फटिक बनतात. भार, स्वात, व खट यांचीं गंधकितें पाण्यांत अद्राव्य आहेत. शिशाचें गंधकित पाण्यांत अत्यल्प द्रवतें. तीव्र गंधकाम्लांत द्रवतें आणि मद्यसारांत बहुतेक मुळींच द्रवत नाहीं.

सिंधुकर्बितमिश्रित क्षार (गंधकित) कोळशावर संस्कारक ज्वालेनें तापविल्यास सिंधुगंधकित तयार होतें, तें चांदीच्या तुकड्यावर ठेवून भिजविल्यास चांदीवर काळा डाग पडतो. या क्रियेनें गंधकिताचें अस्तित्व शोधून काढतां येतें. द्रावणांत तें शोधून काढण्याकरितां भारगंधकिताचा साका पाडतात. तो पाण्यांत व सर्वसामान्य प्रतिकारकांत अद्रावणीय आहे.

बाहेरून लाविलें असतां गंधकाम्ल हें फार दाहक आहे त्याच्या योगानें बलकाचा गोळा होतो. अल्काच्या योगानें विषप्रयोग झाल्यास त्यावर उतार म्हणून

पातळ गंधकाम्लाचा उपयोग करतात हें व सुगंधी द्रावण हीं दोन्हीं स्तंभक असल्या कारणानें विशेष दु साध्य अशा अतिसारावर उपयोगी आहेत शिशाच्या कारखान्यात काम करणाऱ्या मजुराना रोगप्रतिबंधक म्हणून व शिशाचें विष प्रयोग झाल्यास उतार म्हणून थोड्या प्रमाणांत हें अम्ल दिलें जातें त्यायोगें शिशाचे अद्रावणीय व म्हणून निरुप द्रवी असे गंधकित तयार होतात क्षयी रोग्याच्या अंगाला रात्रीं येणारा घाम बंद करण्याकरितां गंधकाम्लाच्या अति शय पातळ द्रावणानें अंग पुसून काढतात

गंधकाम्ल जास्त प्रमाणात पोटात गेल्यास आतड्याचा दाह होऊन तोंडापासून पोटापर्यंत भाजल्यासारख्या वेदना होतात व वांत्या होऊन श्लेष्मल व कॉफीच्या रंगाचे पदार्थ बाहेर पडतात या विषाचे परिणाम इतक्या जलद होतात कीं मरण एक दोन तासातहि येण्याचा संभव असतो चहाचा अर्धा चमचा तीव्र अम्ल पोटात जाऊनहि मुलें मेलेली आहेत, परंतु अर्धा औंस अम्ल घेऊनहि वाचल्याची उदा हरणें आहेत या विषावर उपचार म्हणजे त्याला शिथिल करण्याकरिता खडू, मॅग्नेशिया, साबण किंवा जो मिळेल तो अल्क पदार्थ तावडतोब देणें हा होय वांतिकारक औषध किंवा पोटाचा पंप यांचा उपयोग बिलकूल करू नये वेदना कमी करण्याकरिता अफूचा सत्वाश द्यावा या अम्लानें विषप्रयोग झालेल्यापैकीं दर ६० ते ७० लोक वाचत नाहींत मृत्यूनंतर सर्व चिन्हें दाहक विषासारखीं दिसतात अम्लाच्या दाहकगुणामुळें गालाची त्वचा करडी, पिंगट किंवा काळी होते

**गंधकिलाम्लें**—( सल्फोनिक ॲसिड्स ) सेंद्रिय रसायनशास्त्रांत श गप्र$_3$उ या घटनेच्या संयुक्त पदार्थांचा एक समूह आहे या सारणींत श = उत्कर्षिल किंवा आर्यिल ( ॲरिल ) मूलक समजावा

स र्वां ग पां ती ल ग ध कि ला म्लें (ॲलिफॅथिक सल्फॉनिक ॲसिड्स) —या वर्गांतील हे पदार्थ कांहीं अस्नेहिन(पॅरॉफिन) वर गंधकिलीकरण ( सल्फोनेशन ) केल्यानें तयार होतात, तसेंच रसबंधकावर (मरक्याप्टनर) तीव्र नत्राम्लानें प्राणिदी- करणाची क्रिया ( ऑक्सिडेशन ) केली म्हणजे हे पदार्थ तयार होतात हे निर्वर्ण तैलरूप किंवा स्फटिकरूप पदार्थ असून ते अत्यंत आर्द्रताशोषक असतात हे पाण्यात अति विद्राव्य असून त्यांच्या अंगीं तीव्र अम्लधर्म ( ॲसिड रि ॲक्शन ) असतो उष्ण अल्क किंवा अम्ल यांबरोबर हीं उष्ण केलीं असता तीं स्थिर राहातात, त्याचप्रमाणें तीव्र नत्राम्लाचीहि त्यांजवर कांहींहि क्रिया घडत नाहीं स्फुर पंचहरिदानें ( फास्फोरस पेन्टाक्लोराईड ) त्याचें रूपांतर अम्लहरिदांत ( ॲसिड क्लोराइड्स ) श गप्र$_2$ह होतें

गं ध क गां ती ल (ॲरोमॅटिक) गं ध कि ला म्लें —या वर्गा तील गंधकिलाम्लांचें साधर्म्य पहिल्या वर्गांतील गंधकिलाम्लांशीं [illegible] हीं अम्लें बहुतकरून गंधवर्गांतील दारवें ( हायड्रो कार्बन )—तीव्र गंधकाम्लाबरोबर उष्ण केलीं म्हणजे तयार होतात या गंधकाम्लाऐवजीं कधीं कधीं धूम्रभावी (फ्यूमिंग) गंधकाम्लाची योजना करावी लागते गंधकाम्लाची क्रिया पूर्ण झाली म्हणजे हीं अम्लें बहुतकरून त्यांत मीठ संपृक्त करून लवणक्रियेनें ( सॉल्टेड आउट ) निराळीं करतात यांत अम्लें सिंधुक्षाराच्या रूपानें निराळीं होतात गंधकिलभान लांचें(थियाफिनोल्स) गंधकसाम्लानें(सल्फ्यूरस ॲसिड )प्राणिदी करण केलें म्हणजे किंवा गंधकसाम्लान (सल्फ्युरस ॲसिड) द्विजीवाक्षारा (डाय ॲझोनियम) च्या पृथक्करणानें हीं अम्लें तयार होतात असंयुक्त स्थितींत गंधकिलाम्लें ( सल्फोनिक ॲसिड्स) बहुधा आर्द्रताशोषक, स्फटिकरूप, घन असतात व तीं पाण्यात सहज विद्रुत होतात तीव्र उद्‍हराम्लाबरोबर दाबाखालीं तीं १५०° उष्णमानावर उष्ण केलीं असता बहुतकरून पृथग्भूत होऊन त्यांतील उत्कर्ष व गंधकाम्ल हीं निरनिराळीं होतात क्षाराचें बहुधा चांगले स्फटिक होतात या अम्लाच्या अल्क धातूच्या क्षाराचा उपयोग भानलें ( फिनोल्स ) तयार करण्याकडे करतात हे क्षार दाहक अल्काशीं उष्ण केले म्हणजे त्यांतील गंधकिलाम्लाचें रूपांतर भानलात ( फिनोलात ) होतें पालाश कर्बिदाबरोबर ( पोट्याशिअम सायनाईड ) या क्षाराचें पातन केलें म्हणजे त्यापासून गंध वर्गांतील नत्राथिलें (नायट्राइल्स)तयार होतात या वर्गांतील गंधकिलाम्लाचें स्फुरपंचहरिदानें ( फास्फोरस पेन्टा क्लोराइड्स ) रूपांतर गंधकसिल हरिदांत ( सल्फो- क्लोराइड्स ) होते हीं गंधकिल हरिदें थंड पाण्यात स्थिर असतात अम्लक्रियेनें ( ॲक्शन ऑफ अमोनिया ) गंधकासिल अमिदें ( सल्फोन-अमाइड्स ) श गप्र$_2$ नउ$_2$ तयार होतात अल्कहलाच्या क्रियेनें गंधकिलाम्लाचीं संयुक्त इथें ( ईस्टर्स ) तयार होतात

ऊदिन गंधकिलाम्ल(बेंझिन सल्फोनिक ॲसिड)हें क$_6$उ$_5$ गप्र$_3$उ १½उ$_2$प्र या घटनेचें असतें याचे लहान चपटे पत्र्यासारखे चांगले स्फटिक होतात. हे फार आर्द्रताशोषक असतात ऊदिन गंधकसिल हरिद क$_6$उ$_5$गप्र$_2$ह हा निर्वर्ण धूम्रभावी व रसरूप पदार्थ आहे याचा उत्क्वथनबिंदु १२०° आहे अमिन ऊदिन गंधकिलाम्लें ( अमिनो बेन्झिन सल्फोनिक ॲसिड्स ) याचे मुख्यत्वेंकरून मित ( मेटा ) आणि पर ( पॅरा )संयुक्त पदार्थ हे अत्यंत उपयुक्त पदार्थ आहेत कारण यांचा उपयोग रंग तयार करण्याच्या कामीं फार होतो

भानिलीन ( अनिलीन ) चें साक्षात् गंधकिलीकरण केलें म्हणजे पर अम्ल ( पॅराॲसिड ), गंधकसिल अम्ल ( सल्फ ॲनिलिक ॲसिड ) क$_6$उ$_4$( नउ$_2$ ) ( गप्र$_3$उ ) हें अम्ल तयार होतें याचे लहान चपटे स्फटिक असतात, व ते थंड पाण्यात ईषद्‍द्राव्य असतात दाहक पालाशबरोबर हे वितळविलें असता त्यापासून भानिलिन ( अनिलीन ) तयार होतें आणि दुग्धाम्लायित ( फॉर्मिक ॲसिड ) प्राणिदीकरण

केलें असता उद्योकिनन ( येझोक्विनोन ) तयार होतें. घटनेच्या दृष्टीनें पहतां यास चक्रवलयित ( सायक्लिक ) अमोनिक्षार पुढें दिल्याप्रमाणें समजतातः—

$$क_६उ_४ < \begin{matrix} नऊ_३ \\ गप्र_३ \end{matrix} >$$

अम्लद्रवात याचें द्विअजीवीकरण ( डाय अॅसीटाइझ्ड ) केलें आणि द्विमर्धील नीलीन ( डाय मेथिल अनिलीन ) शीं संयुक्त केलें म्हणजे त्यापासून "हेलिअनथाइन" तयार होतो. हा सिंधुक्षारसूचक ( इंडिकेटर ) म्हणून वापरतात.

मितनीलिनाम्ल ( मेटा अनीलिक अॅसिड ) $क_६उ_४$ ( नउ$_२$ ) ( गप्र$_३$उ ) ( १:३ ) हें मित ननिलऊदिन ( मेटा नायटोबेंझिन ) गंधकिलाम्ला ( सल्फोनिक अॅसिड ) चें उद्भिदीकरण ( रिडक्शन ) केलें म्हणजे तयार होतें. याचे चतुष्कोणी स्फटिक असतात. याचा उपयोग विविध तऱ्हेचे अजीवि ( अॅझो ) रंग तयार करण्याकडे होतो

गंधकसिलाम्ल ( सल्फिनिक अॅसिड ) याची घटना ई.गप्र.उ अशी असते. गंधकिल हरिदाचें ( सल्फो क्लोराइड्स ) जसद(जस्त)चूर्णानें उज्जीकरण (रिडक्शन) केलें म्हणजे हीं अम्लें तयार होतात. हीं अम्लें असंयुक्त स्थितींत फार अस्थिर असतात. याचें प्राणिदीकरण सहज होतें व त्याचें रूपांतर गंधकिलाम्लांत होतें. उज्जीदीकरणानें रसबंधकात ( मरकॅप्टन ) रूपांतर होतें.

गंधकिसल ( सल्फोनल )—हा दारन ( अॅसिटोन ) द्विइथिल ( डायएथिल ) गंधकन ( सल्फोन ) ( कउ$_३$ )$_२$क ( गप्र$_२$ क$_२$उ$_५$ )$_२$ आहे हा अतिशय उपयुक्त, गुंगी आणणारा पदार्थ आहे. दारन( अॅसिटोन )चें घनीकरण ( कंडेन्सेशन) इथिल रसबंधकाशीं ( एथिल मरक्याप्टन ) उज्जहराम्लाच्या ( हायड्रोक्लोरिक अॅसिड ) सानिध्यात केलें म्हणजे रसबंधल ( मरकॅप्टोल ) ( कउ$_३$ )$_२$क( गक$_२$उ$_५$ )$_२$ तयार होतो. नंतर त्याचें पालाश परिमंगलितानें ( पोटपाशिअम परम्यांगनेट ) प्राणिदीकरण करावें.

याचे चतुष्कोणी स्फटिक होतात. ते १२५° श वर वितळतात. हे थंड पाण्यात बहुतेक अविद्राव्य असतात. परंतु १५ पट गरम पाण्यात विद्रुत होतात. तसेंच ते अल्कहल व इथ्र यातांहि विद्रुत होतात.

यास अम्लऔषधीशास्त्रात "सल्फोनॅलम" व अमेरिकेंत "सल्फो मेथानुम" असें म्हणतात. निद्रानाशाच्या रोगांत यानें चांगली निद्रा येते. त्याच प्रमाणें वेडात हें अत्युपयोगी आहे. बाभळीच्या डिंकाबरोबर हें औषध देतात किंवा कढत पाण्यात देतात. याची गुंगी आणण्याची शक्ति हरल ( क्लोरल ) इतकी नाहीं हें खरें, परंतु याच्या योगानें हृदयाची क्रिया मंद पडत नाहीं व श्वासोच्छ्वास क्रियेसहि अवरोध होत नाहीं. परंतु याची क्रिया फार सावकाश होते. हें झोपेच्या वेळीं घेतल्यानें तावडतोब झोंप येत नाहीं. कधीं कधीं दुसऱ्या दिवशींहि झोंप येते. हें लागोपाठ सतत घेणें हितकारक नाहीं.

गंधमादन.—मेरुपर्वताच्या पश्चिमेकडील पर्वत. हा दक्षिणोत्तर असून नील आणि निषध या दोन पर्वतास क्रमानें स्पर्शून आहे याच्या आणि पश्चिम समुद्राच्या मधील प्रदेशात भद्राश्ववर्ष असें नांव आहे. [ भाग. स्कं.५.अ १६]

( २) हिमालयाच्या एका शिखराचें नाव. युधिष्ठिर वनवासात असता येथें कांहीं काळ रहात असे. इंद्रलोकीं अर्जुन गेलेला परत आला असता येथेंच युधिष्ठिरास येऊन भेटला होता. [ भार. वन अ. १५८ ].

गंधमाळी—थानापत्ती, याची मुख्य वस्ती विहार ओरिसात पाच सहा हजारापर्यंत आहे संबळपूर व उडिया संस्थानांत हे महादेवाच्या मंदिराभोंल पुजारी लोक आहेत. हे मूळचे माळी असून महादेवाच्या मंदिरांत काम करतात म्हणून यांचा निराळा व॰ झाला आहे. हे आपला रजपुतांशीं संबंध जोडतात व जानवें घालतात व स्वतःस थानापत्ती म्हणवून घेतात थानापत्ती आता गंधमाळी वर्गाशीं लग्नसंबंध करूं नये अशी प्रवृत्ती दाखवूं लागले आहेत. याच्यात पुजारी, पांधादिया, झुंडझूल व सोमलाई असे वर्ग बनत आहेत सोमलाईच्या आंगात देवी येते व तो बळी घेत असताना आंगातील देवीच्या शक्तीनें बकऱ्याचें ताजें रक्त पितो याच्यात सवर्ग लग्न होत नाहीं. वधू वोहल्याजवळ आली म्हणजे ती वराच्या गळ्यात माळ घालते कारण फुलमाळ्याचा हा मुख्य धंदाच होता ऋतुप्राप्तीच्या पूर्वी मुलींचें लग्न करतात. वर न मिळाला तर थानापत्ती लोक तिचें खोटें लग्न तिच्या मातामहाबरोबर किंवा बहीणीच्या नवऱ्याबरोबर किंवा झाडाबरोबर करतात. मग तो काडी मोडतो व ती विधवा होऊन पुन्हा कोणाशीं तरी संबंध करते हे शैव आहेत, नागाची पूजा करतात, प्रेतें जाळतात व पुरतातहि. हे मास खातात पण मद्य पीत नाहींत. हे श्राद्धें करतात. ब्राह्मण याच्या हातचें पाणी पितात. [ रसेल व हिरालाल]

गंधर्व—ही एक देवयोनि होती अशी समजूत आहे. याचें ऋग्वेदात कांहीं वर्णन आलें आहे तें वेदविद्या या विभागात दिलें आहे ( पृ. ३४२ ) अथर्ववेदात अप्सरा व गंधर्व हे मनुष्यास भुरळ घालून वगैरे उपद्रव करतात, तो नाहींसा व्हावा म्हणून कांहीं मंत्रतंत्र दिले आहेत, त्यांचा उल्लेखहि वेदविद्या या भागात (पृ. ५८) केला आहे. शिवाय गंधर्व व अप्सरावाचक शब्द व त्यावरील टीपा बुद्धपूर्वजग या विभागांत वेदकालीन शब्दसृष्टीमध्यें ( पृ १६८ ) दिल्या आहेत. ऋग्वेदकालातच गंधर्व ही जात काल्पनिक असावी अशी समजूत व्यक्त होते गंधर्वाचा सोमाशीं संबंध जोडला आहे विवाहमंत्रातहि वधू ही सोमापासून गंधर्वास गंधर्वापासून अग्नीस व अग्नीपासून चवथ्या वेळेस मनुष्यास प्राप्त होते असें म्हटलें आहे. गंधर्वाबद्दलची कल्पना इण्डो इराणी

काळाइतकी तरी जुनी दिसते. कारण अवेस्तामध्ये गंदरेव याचा उल्लेख असून तो राक्षस होता व त्याला केरशास्प यानें नऊ दिवस युद्ध करून नंतर ठार मारलें असें म्हटलें आहे. रा. वि. का. राजवाडे गांधार देशाचा गंधर्वांशीं संबंध जोडूं पहातात, पण गंधर्व हा शब्द इंडोइराणी कालाइतका जुना असून गांधार शब्द बराच अर्वाचीन दिसतो. त्यामुळें हा संबंध सयुक्तिक दिसत नाहीं. रामायण, महाभारत व पुराणें यांमधून गंधर्वांबद्दलचे अनेक उल्लेख आढळतात. महाभारतामध्यें घोषयात्राप्रसंगीं चित्रसेनगंधर्वानें दुर्योधनाचा पराभव करून त्यास बद्ध केल्याचें व पांडवांनीं सोडविल्याचें वर्णन आहे. यानें अर्जुनास गान्धर्वविद्या दिली. अर्जुनाला चित्ररथगंधर्वापासून चाक्षुषी विद्या व संमोहनास्त्र प्राप्त झालें होतें व त्यानें अर्जुनास राजसूय यज्ञाकरिता घोडे दिले होते. कादंबरी व महाश्वेता या गंधर्वकन्या म्हणूनच वर्णन केल्या आहेत. अनेक गंधर्वांबद्दल ते ऋषिशापानें राक्षस अगर अन्य प्राणी झाल्याचीं वर्णनें पुराणातून अनेक ठिकाणीं आढळतात. गंधर्वांबद्दल अनेक विचित्र वर्णनेंहि आढळतात. त्यास पंख असून ते आकाशात दृश्य अगर अदृश्य रूपानें संचार करतात, ते विमानात बसून इतस्ततः संचार करितात, ते शरीरानें सुंदर व गायनवादन कलेंत निपुण असून इन्द्राच्या सभेंत त्यांच्याकडे गाण्याचें व वाजविण्याचें काम असल्याबद्दलहि वर्णन आढळतें. यांच्या स्त्रियास अप्सरा असें नाव आहे (अप्सरा पहा). त्याहि गीत, नृत्यवाद्य इत्यादि कलात कुशल असून रूपानें सुंदर असल्यामुळें मनुष्यास मोह पाडतात व स्वर्गांत पुण्यवान पुरुषाचा यांच्याशीं समागम होतो असें वर्णन आढळतें. पुरूरवा व उर्वशी यांचा प्रेमसंबंध गंधर्वांस पसंत नसल्यामुळें त्यानीं त्याचा व्रतभंग करून उर्वशीस पळवून नेल्याची संपूर्ण कथा शतपथ ब्राह्मणांत असून कथासूत्र ऋग्वेदातहि आढळतें. पुराणात विशेष आढळणारी गंधर्वांचीं नावें म्हणजे, अंगारपर्ण उर्फ चित्ररथ, विश्वावसु, चित्रांगद, चित्रसेन, हाहा, हूहू हीं होत. सामवेदाचा गांधर्ववेद अथवा गायनविद्या हा उपवेद मानला जातो. व गायन ही गंधर्वांची विद्या समजली जाते. अद्यापहि भरतखंडांत गायनावर उपजीविका करणारी गंधर्व या नावाची एक जात आढळते.

जा त.—संयुक्तप्रांतांत बनारस, अलाहाबाद व गाझीपूर या भागात गंधर्वजातीची अल्पशी संख्या असून ते लोक स्वतःस 'राई' म्हणवितात. अरास, सितळ, रामसी, शाहिमल, दिवान, पनभैया, व उधोमन अशीं त्यांचीं सप्तगोत्रें आहेत. त्यांच्यात सगोत्रविवाह होत नसून बालविवाह रूढ आहे. इतर जातींच्या लोकाना त्यांच्या जातीत घेत नाहीत. विधवाविवाहास मनाई असून बहुपत्नीत्व रूढ आहे. लग्नसंबंधी सर्व तंट्यांचा पंचायतीपुढें निकाल करण्यात येतो. घटस्फोट व स्त्रीस पुनर्विवाहाची मनाई असते. गंधर्व ही एक गाण्याचा धंदा करणारांची व वेश्यांची जात आहे. या जातीत गाण्याकडे कल असलेल्या व सुंदर अशा मुलींचीं लग्नें न करिता त्यास वेश्याचा धंदा करण्याकरिता राखून ठेवण्यात येतें. इतरांच्या लोकाकडून अशा मुली वेश्या म्हणून ठरविल्या जातात व प्रथम एखाद्या हिंदु पुरुषाबरोबर त्यांचे लग्नासारखे समारंभ व संस्कार करण्यात येतात. या लोकात हिंदु वारसाचा कायदा पाळला जातो व गृहस्थकुटुंबातील मुलींना वारसाहक्क प्राप्त होत नाहीं. परंतु नर्तकीवर्गात मुलगी व मुलगा यांचे समानहक्क असून एखादी नर्तकी मयत झाल्यास तिच्या इस्टेटीचा समान हक्क तिच्या सख्या नातेवाइकास प्राप्त होतो. मद्रास व पश्चिमहिंदुस्थान येथील नर्तकीवर्गात अशी चाल आहे कीं, नर्तकी मुलगी तिच्या आईचा धंदा चालविण्यास दत्तक घेतली जाते; व ती दत्तक घेणाऱ्या बाईच्या इस्टेटीचा वारसदारणिहि ठरते. गंधर्व हे वैष्णव धर्माचे आहेत. विवाहित स्त्रिया महादेवाची उपासना करितात व नर्तकीवर्ग गणेशाची पूजा करितो. ठाकूर देवतेचीहि गंधर्व हे पूजा करितात. या देवताना समर्पिलेला नैवेद्य बहुधा पंड्याकडे जातो. बाबा किनाराम म्हणून एक यतीहि पूज्य मानला जातो. बनारस जिल्ह्यात रामगड येथें त्याचें स्थान आहे. गंधर्वांचे सर्व समारंभ ब्राह्मणाकडून होतात. त्यांचा मुख्य धंदा गाणें व नाचणें हाच होय. बनारस जिल्ह्यात कित्येक गंधर्व शेती करून आहेत व खसखसीची लागवड करणें हाहि त्यांचा आवडता धंदा आहे. गंधर्व लोक मद्यप्राशन करितात.

मुंबई इलाख्यात गंधर्व अगर गवई बहुतेक सर्व दक्षिणगुजराथ प्रांतात राहतात. ते तेथें उत्तरेकडून आले असून, आपण चित्रोद शाखेचे नागर ब्राह्मण असल्याचें ते सांगतात. पुरुषांच्या लांब सोडलेल्या पागोट्यावरून व स्त्रियांच्या पोशाखावरून ते पूर्वी उत्तरेकडे रहात असावेत असें कळून येतें. गंधर्व स्त्रीपुरुष सुंदर असतात. ते मांसमच्छर खात नाहींत व दारू पीत नाहींत पण त्यांच्यात तंबाखू व तपकीर ओढण्याचें व्यसन फार आहे. ते अनेक वाद्यें वाजविण्यात निष्णात असतात, व सर्व प्रकारच्या नाचात नर्तकींना साथ करतात. ते यज्ञोपवीत धारण करतात. औदीच ब्राह्मण हे त्यांचे उपाध्याय आहेत. त्यांचें मौंजीबंधन, लग्न, व जातक आणि अंत्यकर्म हे विधी ब्राह्मणांच्या विधीसारखेच असतात. त्यांची लोकसंख्या फार लहान असल्यामुळें त्यांच्यात भावाभावाच्या व बहिणीबहिणींच्या मुलात विवाहसंबंध होऊं शकतो. घटस्फोट व विधवाविवाह त्यांच्यात होत नाहींत; ते सर्व हिंदु देवांना मानतात. त्यांच्यापैकीं काहीं शैव आहेत व काहीं वैष्णव आहेत. [ कृक; मुं. गॅ. ].

**गंधर्वगड किल्ला**—मुंबई इलाखा. बेळगाव जिल्हा. बेळगावच्या पश्चिमेस सुमारें २१ मैलांवर पायथ्यापासून ४०० फूट उंचीवर हा एक किल्ला आहे. किल्ल्याचें क्षेत्रफळ सुमारें १००० फूट चौरस असून किल्ला इ. स. १७२४ साली सावंत

वाडीच्या फोंड सावताचा मुलगा नाग सावत यानें बांधला. हल्लीं किल्ला पडक्या स्थितींत आहे. इ. स. १७७८ सालीं कोल्हापूर सरकारनें हा किल्ला सर केला होता परंतु इ. स. १७९३ सालीं शिंद्यांचें वजन पडल्यामुळें तो परत सावतवाडीकरास देणें भाग पडलें. इ. स. १७८७ सालीं नेसरगीच्या सरदारानें कोल्हापूर सरकारविरुद्ध बंड केलें होतें. त्यावेळीं त्यानें इतर किल्ल्यावरोबर हाहि किल्ला सर केला होता, परंतु लवकरच या बंडाचा मोड करण्यांत आल्यामुळें किल्ला परत कोल्हापुरकडे आला.

**गधाड.**—मुंबई इलाख्यातील काठेवाडच्या भावनगर संस्थानांतील एक गाव. लो. सं. ( १९११ )१०९०. सहजानंद नामक हिंदूनें संयुक्तप्रांतातून येथें येऊन १८०४ मध्यें ' स्वामी नारायण ' धर्मपंथाची स्थापना केली. ह्यानें बऱ्याच काठी, कोळी व भिल्ल लोकांस ह्या नूतनस्थापित धर्माची दिक्षा दिली. हा १८३० मध्यें ह्या गावींच मरण पावला. ह्या लोकाचें येथें एक भव्य देवालय आहे.

**गधाली.**—काठेवाड. गोहिलवाडांतील स्वतंत्र खंडणी देणारी एक जहागीर. येथील मालिया लाठीचे भायाद व लाठिया गोहिल आहेत

**गधिया**—काठेवाड. लाखापादर ठाण्यांतील एक स्वतंत्र खंडणी देणारी जहागीर. हींत गधिया व पाटला अशीं दोन गांवें आहेत. मालिया वाल जातीचे काठी आहेत.

**गधुला**—मुंबई इलाखा. काठेवाडमधील एक लहान संस्थान. हा स्वतंत्र खंडणी देणारा तालुका सोनगड ठाण्यात आहे. मालिया गोहिल व लाठीचे भायाद आहेत

**गंधोल**—मुंबई इलाखा. काठेवाडमधील एक लहान संस्थान.चोक ठाण्यातला एक स्वतंत्र खंडणी देणारा तालुका. मालिया गोहील, रजपूत व फलिमणाचे भायाद आहेत. गंधोल गांव भादवो टेंकडीच्या पायथ्याशीं आहे

**गॅंबिया**—ब्रिटिश वेस्ट आफ्रिकेंतील मांडलिक संस्थानापैकीं अत्यन्त उत्तर टोंकास असलेलें एक संस्थान. यावर अवलंबून एक संरक्षित संस्थान आहे.दोहोंचें क्षेत्रफळ(१९११) सुमारें ४१३२ चौरस मैल होतें. लोकसंख्या १९११ सालीं केलेल्या अंदाजाप्रमाणें १४६१०१ हजार होती वास्तविक वसाहतीचें क्षेत्रफळ ६९ चौरस मैलच आहे संरक्षित संस्थानांत पुष्कळ लहान लहान राज्यें आहेत या संस्थानांत गॅम्बिया ही नदी आहे व सिंह, चित्ते, हरिण,वानर इत्यादि प्राणी, मेहोगनी व ताडाचीं झाडें आहेत

ह वा मा न –नोव्हेंबर ते जूनपर्यंत येथील हवा चांगली असते. प्रतिवर्षी साधारण पाऊस सुमारें ५० इंच पडतो. जुलै व आक्टोबर याच्या दरम्यान सेरीज करून पाऊस क्वचितच पडतो. हींवताप उत्पन्न करणाऱ्या डासांना नाहींसे करण्याचे प्रयत्न जोरानें चालू आहेत

र हि वा शी–येथील रहिवाशी निग्रो वंशाचे आहेत. ते उद्योगी पण काटकसरी असतात. मॅंडिंगो जोलॉफ व गोला ह्या मुख्य जाती होत. ¾ लोक मुसुलमान आहेत.

उ त्प न्न–भुइमुग, रबर, कापूस, तांदूळ हे जिन्नस मुख्यतः उत्पन्न होतात. तांदूळ व ज्वारी हें लोकांचें मुख्य अन्न आहे. हे जिन्नस येथील लोकाना पुरेसे उत्पन्न होतात. बरेचसे लोक, मासे धरणें, बोटी बांधणें व सुती कपडा विणणें इत्यादि धंद्यांत गुंतलेले असतात. येथील भुइमुगाच्या धंद्याच्या एक विशेष असा कीं रोप लागवडीच्या सुरवातीस हजारों शेतकरी दूर दूर अंतरावरून या ठिकाणीं येतात. त्याना रहावयास घर, खावयास अन्न न लागवडीस एक एक शेत देण्यात येतें. पिकें निघालीं म्हणजे अर्धे उत्पन्न त्यास मालकास द्यावें लागतें. हें पीक काढण्यास लागणाऱ्या श्रमाच्या मानानें हा धंदा व्हावा तसा किफायतशीर होत नाहीं हल्लीं इतर देशांत वापरण्यात येत असणाऱ्या यंत्राच्या साहाय्यानें जमीनीची मशागत करविण्याकरीतां पुष्कळ प्रयत्न करण्यात आले पण ते सिद्धीस गेले नाहींत. १९१५ पर्यंत येथें होणारा भुइमुग बहुतेक फ्रेंच कारखानदार विकत घेत असत पण १९१६ पासून ही स्थिति बदलत चालली व हल्लीं बहुतेक सर्व भुइमूग इंग्लिश कारखानदारच विकत घेतात. १९१९ सालीं गॅंबियामध्यें ११७९००० पौंडाची आयात व निर्गत १२००००० पौंडाची झाली आयात मालात मसाल्याचे पदार्थ, रिकाम्या पोती,कापड, पीठ, धान्य हे जिन्नस मुख्य होत रोंगण, कातडीं, खोबरें याची गॅंबियातून निर्यात होते सर्व पडीत जमीन सरकारजमा करण्यात येते

रा ज्य व्य व स्था.–राज्यव्यवस्था पहाण्यासाठीं गॅंबियावर एक गव्हर्नर असतो. व त्याला सहायक म्हणून एक कार्यकारी व एक कायदेमंडळ आहे. कायदेमंडळात सरकारनियुक्त बिनसरकारी सभासद असतात १९१९ सालीं गॅंबियाचा वसूल १८०००० पौंड आला व खर्च १४३००० पौंड झाला. कोलनट व भुइमूग यावरील जकात या मुख्यतः उत्पन्नाच्या बाबी आहेत. बॅथर्स्ट येथें एक वरिष्ठ कोर्ट आहे. एक दिवाणी कोर्टहि आहे.प्राथमिक शिक्षणाच्या शाळा निरनिराळ्या धार्मिक पंथाच्या हातांत आहेत. येथ दुय्यम शिक्षणाच्या व धंदेशिक्षणाच्या काहीं शाळा आहेत. येथील शिक्षण मुख्यत. ब्रिटिश मिशनऱ्याच्या ताब्यात आहे

इ ति हा स –गॅंबिआच्या प्राचीन इतिहासाविषयीं फारच त्रोटक माहिती उपलब्ध आहे एके काळीं गॅंबिया हा क्रमानें घाना, मेली व सॉंघाय या संस्थानाचा भाग समजला जाई ११ व्या शतकाच्या सुमारास हा प्रांत महमदी सर्वेस्वाखालीं आला १५ व्या शतकात पोर्तुगीजांचे पाय या ठिकाणीं लागले १६ व्या शतकाच्या आरंभीं गंबिया नदीच्या खालच्या भागामध्यें ते व्यापार करीत होते पण याच शतकाच्या मध्याच्या सुमारास हा व्यापार बराच

खालावला. १५८८ मध्यें इलिझाबेथ राणीनें लंडन येथील कांहीं लोकांस गिनीमध्यें 'सेनेगा' व 'गँम्रा' येथें व्यापार करण्याकरितां सनद दिली. १६१८त पहिल्या जेम्सनें दुसऱ्या एका 'कंपनी ऑफ ॲडव्हेंचरर्स ऑफ लंडन ट्रेडिंग इन टु आफ्रिका' नावाच्या कंपनीस सनद दिली. या कंपनीच्या गुमास्त्यांनीं गँबिया नदी चढून जाऊन बराच मुलूख शोधला. गँबियाच्या मुखाजवळ या कंपनीनें एक किल्ला बांधला.१६६४ त नदीमुखापासून २० मैलांवर फोर्ट जेम्स किल्ला बांधण्यांत आला. १७८३ च्या व्हर्सेलीजच्या तहानें गँबियात व्यापार करण्याचा हक्क ब्रिटनला मिळाला. सेनिगालमधील व्यापार मात्र फ्रान्सकडे ठेवण्यात आला. इ स, १८५७ त गँबिया नदीचा खालचा भाग निव्वळ ब्रिटिशाधीन झाला. १७८३ व १८८५ च्या दरम्यान लहान लहान प्रांत एतद्देशीय राजापासून विकत किंवा मागून घेण्यात आले. १८०६ त सेंट मेरीज बेट मिळालें १८२३ त मॅक् कार्थीज् बेट, १८२६ त सीडेड मिली, व १८४० व १८५५ च्या दरम्यान ब्रिटिश कॉंबो हे प्रांत मिळाले. १८१६ सालीं कांहीं ब्रिटिश व्यापाऱ्यांनीं सेंट मेरीज बेटावर वखार घातली. गँबिआ वसाहतीच्या स्थापनेचें खरें वर्ष हेंच होय. १८२२ त गँबिआ वसाहत सेरालोनला जोडण्यात आली. १८४३ त गँबिआ स्वतंत्र वसाहत करण्यात आली. १८८८ मध्यें क्राउन कॉलनी या नात्यानें तेथील राज्यकारभार पाहण्यांत येऊं लागला. सेनिगालपासून पुढें फ्रान्स ब्रिटिश सरहद्दीकडे सरकतो आहे असें दिसल्यामुळें दोघांच्या मुलुखाची सरहद्द आखणें भाग पडलें, १८८९च्या आगस्टांत ही व्यवस्था झाली.१९०४च्या आंग्लो फ्रेंच करारानें यारबाटेंडा फ्रान्सला देण्यांत आलें. १८९२ त फोडी काबा या गुलामांचा व्यापार करणाऱ्या टोळीच्या नायकाला ब्रिटिश मुलुखांतून हद्दपार केलें. हद्दपारीच्या जागेवरूनहि हा ब्रिटिश मुलुखास उपद्रव देऊं लागल्यामुळें १९०१ च्या मार्चांत त्याला ठार करण्यात आलें. १९०६ मध्यें असा कायदा करण्यात आला कीं गुलामाच्या पोटीं जन्मलेलीं मुलें अतःपर स्वतंत्र आहेत व धन्याच्या मरणाच्या दिवशीं सर्व गुलामांनीं आपण स्वतंत्र आहोंत असें समजावें.

सर जॉर्ज डेंटन (१९०१–१९११) या गँबियाच्या गव्हर्नरनें संरक्षित मुलुखांत शांतता प्रस्थापित केल्यावर गँबियांत शांतता नांदू लागली. व्यापारधंद्याला उत्तेजन मिळूं लागलें. डेंटनच्या नंतर गॅलवे हा गँबियाचा गव्हर्नर झाला. याच्या कारकीर्दींत गँबियामध्यें बऱ्याच सुधारणा घडून आल्या. १९१४ मध्यें कॅमेरॉन हा गव्हर्नर झाला. याच्या कारकीर्दींत महायुद्ध सुरू झाल्यामुळें गँबियामधील आर्थिक परिस्थिति खालावली पण ती सुधारण्याचा कॅमेरॉननें प्रयत्न केला. महायुद्धांत गँबियाच्या रहिवाशांनीं ब्रिटिशांना चांगली मदत केली. कॅमेरून व जर्मन पूर्व आफ्रिकेंत त्यांनीं चांगली कामगिरी बजावली. १९२० मध्यें कॅमेरॉनच्या बदलीं कॅप्टन आरमिटेज हा गव्हर्नर झाला.

**गँबिया नदी**— ही पश्चिम आफ्रिकेंतील एक महत्त्वाची नदी असून हिच्या मुखातून समुद्रांत फिरणारीं मोठीं जहाजें वर जाऊं शकतात. हिचा उगम उत्तर अ.११° २५' व प. रे. १२°१५' येथें आहे. गँबियाच्या धबधब्यापासून सुमारें ३० ४० मैलांजवळ हिला उत्तरेकडून नेरिको व दक्षिणेकडून कुलंटू या नद्या मिळतात. हिची लांबी १००० मैल आहे. ह्या नदीच्या मुखाजवळ सेंट मेरी नांवाचें बेट आहे. ही नदी इंग्लंड व फ्रान्स यांच्या स्वामित्वाखालीं आहे. हिचा शोध बऱ्याच लोकांनीं केला पण १८१८ त गासपर्ड मॉलें या फ्रेंच मनुष्यानें तिच्या उगमापर्यंत प्रवास केला. याच्या नंतर पुढेंहि कांहीं भाग अधिक शोधला गेला आहे.

**गॅम्बेटा, लीऑन** (१८३८–१८८२)—या फ्रेंच मुत्सद्याचा जन्म काहोर्स येथें झाला. वयाच्या सोळाव्या वर्षी कांहीं अपघातामुळें त्याचा डावा डोळा गेला, तथापि काहोर्स येथील शाळेंत नाव मिळवून कायद्याचा अभ्यास करण्याकरितां १८५७ सालीं गॅम्बेटा पारीस येथें गेला. १८५९ त तो बॅरिस्टर झाला आणि उदारमतवाद्यातर्फे सरकारवर कडक भाषणें करणारा म्हणून त्याची प्रसिद्धि झाली. १८६९ मध्यें ॲसेंब्लीमध्यें तो निवडून आला. जर्मनीशीं युद्ध करूं नये असें त्याचें प्रथम मत होतें. परंतु देशाभिमानानें प्रेरित होऊन फ्रेंच वावटा रक्षण करण्याकरितां तो पुढें सरसावला नंतर प्रजासत्ताक राज्यातर्फे राष्ट्रसंरक्षक मंडळांत सामिल होऊन शत्रूस तोंड देण्यास त्यानें सुरवात केली. पॅरिस सोडण्याचा त्याचा सल्ला कोणी न ऐकिल्यामुळें विमानांतून तो टूर्स येथें आला व लढाईचीं व कारभाराचीं सूत्रें त्यानें हातीं घेतलीं. ऑर्लिअन्स येथें फ्रेंचाचा पराजय झाला व शेवटीं पॅरिसहि गेल्यानंतर गॅम्बेटास प्रिन्स बिस्मार्कबरोबर तह करणें भाग पडलें. तावडतोब त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला पण पुढें पुनः निवडून आल्यानंतर त्याच्या मनाविरुद्ध तह झाला हें पाहून त्यानें निषेध प्रदर्शित करून स्पेन देशाची वाट धरिली.

कांहीं दिवसांनीं तो फ्रान्समध्यें परत आला आणि प्रजासत्ताक राज्यपद्धतिविषयीं त्यानें चळवळ करण्यास सुरवात केली. १८७१ सालीं त्यानें 'ला रिपब्लिक फ्रँकेंवा' नावाचें एक नियतकालिक काढलें त्याची ॲसेंब्लींतील भाषणापेक्षा जाहीर व्याख्यानेंच अधिक परिणामकारक असत होत असत. मार्शल मॅक् महॉन नांवाच्या एका राजपक्षाच्या सभासदानें जेव्हां राज्यसूत्रें हातीं घेतलीं त्यावेळीं मोठ्या चातुर्यानें व धोरणानें गॅम्बेटा यानें नेमस्त धोरणाकडे आपल्या स्नेह्यास वळवून घेतलें व १८७५च्या घटनेला मतें मिळविलीं. प्रजासत्ताक राज्याच्या सुरवातीला त्यानें हेंच नेमस्तपणानें धोरण ठेवलें होतें व त्यास तो 'समर्यांचित्य-

थाइ' असें नांव देत असे. पुढें क्लेरिकल पक्षानें पोपची ऐहिक सत्ता परत मिळावी म्हणून चळवळ करण्यास सुरवात केली त्या वेळी 'क्लेरिकलिझम्' विरुद्ध त्यानें जोराचें भाषण केलें. पुढें मॅक्महॉन यास राजीनामा देणें किंवा अंतस्थ युद्ध माजविणें याशिवाय दुसरा मार्गच न राहिल्यानें नेमस्त प्रजासत्ताक प्रधानमंडळ ड्यूफ्यूरेच्या नेतृत्वाखाली मॅक् महॉन यानें स्थापन केलें.

ड्यूफ्यूरेच्या प्रधानमंडळानें राजीनामा दिल्यावर मार्शल मॅक् महॉन यास अधिकारत्याग करावा लागला. त्यावेळी गॅम्बेटानें चेंबर ऑफ डेप्यूटीजच्या अध्यक्षाचें काम स्वीकारलें. जवळ जवळ सर्व सत्ता त्याच्या हातीं असूनहि अखिल प्रजासत्ताक राज्याचीं सूत्रें आपल्या हातीं घ्यावीं असे त्याच्या मनांत होतें. तथापि त्यानें मौन स्वीकारलें होतें. त्याचे अंतस्थ हेतू गुप्त राहिल्यामुळें त्याच्यावर पुष्कळ टीका होऊं लागली व शेवटीं त्याचें प्रधानमंडळहि १८८१ सालीं मोडलें गेलें. जर तो अधिकारावर असता तर इंग्लंडाशीं त्यानें स्नेह जोडून आणला असता यांत संशय नाहीं. परंतु ३१ डिसेंबर १८८२ रोजीं चुकून बंदुकीची गोळी लागून तो गतप्राण झाला.

*गॅम्बेटानें फ्रान्स देशाची तीन प्रकारें अमोलिक सेवा केली.* जर्मन युद्धाच्या वेळीं सैन्याची तयारी करून फ्रान्सचा स्वाभिमान त्यानें जागृत केला. अनेक पक्षभेद झाले असतांना नेमस्त प्रजासत्ताक राज्य त्यानें सर्वांची समजूत करून अस्तित्वात आणलें. मॉर्शल मॅक् महॉन प्रभृतींनीं सत्ता बळकावण्याचा जो प्रयत्न केला तो त्यानें मोठ्या कौशल्यानें हाणून पाडला. वयाच्या ४४ व्या वर्षी घडून आलेल्या अकाली मृत्यूमुळें त्याच्या हातून मोठमोठ्या गोष्टी घडून आल्या नाहींत. वक्ता व खरा मुत्सद्दी म्हणून त्याची प्रसिद्धि आहे. लिऑनी नावाच्या स्त्रीवर त्याचें अत्यंत प्रेम होतें. राजकारणासंबंधीं या बाईची त्यास फार मदत होत असे. एम् मॅन्सिस लॉरच्या पुस्तकांत या बाईच्या कांहीं आठवणी प्रसिद्ध झाल्या आहेत. त्या पुस्तकांत गॅम्बेटा व प्रिन्स बिस्मार्क यांची मुलाखत झाली असा उल्लेख आहे पण तो संशयास्पद आहे. फ्रान्स व जर्मनीमध्यें सलोखा व्हावा म्हणून वेषांतर करून जर्मनीची खरी स्थिति अवलोकिण्यास तो तेथें गेला असेल हें संभवनीय असलें तरी लॉरनें केलेलें वर्णन अतिशयोक्तीचें दिसतें. गॅम्बेटाचें युरोपियन राजकारणासंबंधाचें विस्तृत धोरण व त्याचा दृष्टिकोण यासंबंधीं जास्त माहिती उपलब्ध होऊं लागली आहे. या थोर पुरुषाच्या मृत्यूमुळें फ्रान्स देशाची अत्यंत मोठी हानि झाली यांत शंका नाहीं.

**गमाजी मुतालिक**—औंधकर प्रतिनिधींच्या मुतालिक घराण्यांतील यमाजी शिवदेवाचा गमाजी हा मुलगा होय. यमाजीनें प्रतिनिधींचा पक्ष घेऊन पेशव्याशीं वैर धरिलें होतें. त्याच्या पश्चात् गमाजीनेंहि तोच क्रम आरंभिला. हा पेशव्यांविरुद्ध निजामाशीं नेहमीं सख्यानें करी व पेशव्याच्या मुलुखांत बंडाळी माजवून लोकांकडून सक्तीनें पट्टी वसूल करी. राक्षसभुवनच्या लढाईंत हा निजामातर्फे पेशव्याशीं लढत असतां लढाईंत मरण पावला ( १७६३ ). हा स्वभावानें क्रूर असल्यामुळें 'यमाजीस (काळास) न भ्यालें तरी गमाजीस भ्यालें पाहिजे' अशी म्हण मराठी मार्फत आली आहे. [ मराठी रियासत. मध्यविभाग ३ ]

**गय, वै दि क.**—ऋग्वेदांतील एक सूक्तद्रष्टा. याच्या संबंधानें माहिती बुद्धपूर्वजग विभाग ३ पृष्ठ ७३ व पृष्ठ ४८४ येथें पहा.

**पौ रा णि क**—(सो. वं) विजयकुलोत्पन्न मूर्ति अथवा अमूर्त याचा पुत्र. यानें बाहिरमालिनी नदी आणि ब्रह्मसर यासमीप अनेक यज्ञ केले होते. व त्यांत यानें ब्राम्हणास अपार दक्षिणा देऊन घृतकुल्या मधुकुल्या यांची समृद्धि करून दिली होती. अन्न तर इतकें होतें कीं, सर्वांचीं भोजनें झाल्यावर अनाच्या पर्वततुल्य अशी पंचवीस राशी अवशेष राहिल्या होत्या [ भारत वनप. अ. ९५ ]

**गया जि ल्हा**—बिहार–ओरिसा. पाटणा विभागांतील एक जिल्हा क्षेत्रफळ ४७१२ चौ.मै.लो. सं (१९२१) २१५२९३० जिल्ह्याचा दक्षिण भाग उंच आहे. या भागांत टेंकड्यांच्या बऱ्याच रांगा आहेत दुर्वास, महाबर वगैरे टेंकड्या मुख्य असून जास्तींत जास्त उंची २२०२ फूट इतकी आहे. जेठवण टेंकड्या बुद्धगयेजवळ आहेत. उत्तरभागाला उंची कमी होत जाते व म्हणून बहुतेक नद्या उत्तरवाहिनी आहेत. धनराजी तिलया, फल्गु, यमुना पुनः पुना ह्या मुख्य नद्या आहेत. यापैकीं दोन गंगेला मिळतात. बाकिच्यांचें पाणी शेतांच्या उपयोगाकडे लाविलें जातें. फल्गु व पुनःपुना या नद्या तीर्थे म्हणून मानल्या असून बुद्धगयेची यात्रा यांचें स्नान केल्याशिवाय पूर्ण होत नाहीं. शोण नदी मोठी व विशाल आहे. पण ती उन्हाळ्यांत कोरडी व पावसाळ्यांत फार ओढीची म्हणून व्यापाराच्या फारशी कामीं येत नाहीं. बरून व देहरी हीं दोन गांवें दगडी फरशीनें जोडलीं असून फरशीच्या थोडें वर शोणकालव्याकरिता बांधलेलें धरण आहे व खालच्या बाजूस जगांतील अत्यंत लांब पुलापैकीं एक रेल्वेचा पूल शोण नदीवर बांधिला आहे. यास १०० फूट रुंदीच्या ९८ कमानी आहेत. पूल बहुतेक लोखंडी असून खालीं आधाराला दगडी बांधकाम आहे.

उत्तरेकडील भागांत तांदुळाच्या शेतांत आढळणारीं गवतें आढळतात. खेड्यांच्या आसपास आंब्याची व इतरहि बरीच उपयुक्त झाडें असतात. येथें सरकारी राखीव जंगल नाहीं. तरी पण दक्षिण भागांत अत्यंत घनदाट अरण्यें आहेत. सर्पण विपुल आहे. लाखेच्या उद्योगापासून जमीनदारांना बरेंच उत्पन्न आहे. मुख्य झाडें पिंपळ, लिंब, वड, मोह, जांभूळ शिसवी, चिंच, साग वगैरे आहेत. पावसाळ्यानंतर चित्रविचित्र फुलझाडें उगवतात व एक प्रका-

रच्या रानमनुका आणि इतर फळझाडें उगवतात व कित्येक गरीब लोकांचा त्यावरच निर्वाह होतो.

वाघ, अस्वल, रानडुकर, वगैरे प्राणी बरेच आहेत. सांबर, हरणाच्या कांहीं जाती, काळवीट वगैरेहि दिसतात. लांडगे अगदींच कमी आहेत नीलगाई तुरळक आहेत बदकाच्या बऱ्याच जाती आहेत.

समुद्रापासून दूर अंतरावर असल्यामुळें येथें ऋतुमान फार कडक असतें. मेमध्यें ११०° पर्यंत उष्णता जाते, व या महिन्यात साधारण उष्णमान ९३° चें असतें उन्हाळयात हवेंत आर्द्रता ५३° असते पावसाचें मान ४२ इंच आहे टेंकडयातून वगैरे पाऊस फार झाल्यानें नद्यांना पूर येतात, कालवे फुटतात, व नद्यांच्या बाजूच्या खेडयांना धोका येतो. १८९६ मध्यें साकरी व १९०१ मध्यें शोण नद्यांनीं असेंच नुकसान केलें

पाटणा व शहाबाद जिल्ह्यांतील कांहीं भाग व हा जिल्हा पूर्वी मगधाच्या राज्यांत होता मुसुलमानाच्या वेळीं बिहार सुभ्यांत याचा समावेश झाला होता व १७६५ सालीं तो इंग्रजांच्या हातांत आला व पाटणा हें मुख्य ठिकाण झालें १८६५ सालीं पाटणापासून गया जिल्हा स्वतंत्र करण्यांत आला सर्व जिल्हाभर जुने अवशेष सांपडतात विशेषत: बौद्ध धर्मीयांचे त्यांत फार आहेत ठिकठिकाणीं बुद्धाच्या सुंदर मूर्ती व गुहा असून बुद्धधर्मकालीन मोठीं व महत्त्वाचीं अशीं ठिकाणें या भागांत आहेत जेठवन खेडें हें पूर्वीचें यष्टिवन व धांगरा टेंकडया म्हणजे प्राग्बोधीपर्वत होय. या पर्वतांतील गुहेंत गयेला जाण्यापूर्वी बुद्धानें विश्रांति घेतली होती. बराबर टेंकडयावर कौवाडोल येथें पूर्वीचा शिलाभद्र मठ असावा. इतरहि बऱ्याच ठिकाणीं कांहीं मोडकीं तोडकीं व कांहीं शाबूत बुद्धाचीं देवळें आहेत व कांहीं ठिकाणीं जैन आणि हिंदु देवळांचे अवशेष सांपडतात गुणेरी येथें श्री गुणाचरित मठ होता. पुनावत ( पुण्यवती ) पासून दोन मैलांवर असलेला दुसरा डोंगर हाच पूर्वीचा कुक्कुट पादगिरी असावा असें म्हणतात.

गया हें मुख्य ठिकाण असून तेथें टेकारी आणि दाऊदनगर येथें म्यु. कमेटया आहेत औरंगाबाद नवादा व जहानाबाद हीं मोठीं शहरें आहेत. मुख्य भाषा मागधी आहे. मुसुलमान लोक अयोध्येकडील हिंदी भाषा बोलतात. शेंकडा ६५ लोक शेती, १४ उद्योगधंदे, ०.६ व्यापार व १.९ इतर बौद्धिक धंद्यावर रहातात

उत्तरभागांतील जमीन सपाट असून ती बहुतेक लागवडीलायक आहे. दक्षिणेकडे टेंकडया व जंगलें यामुळें शेती जोगी जमीन कमी आहे पण रेल्वे व दळणवळणाचीं इतर साधनें यांच्या वाढीबरोबर तिकडेहि जमीन सुधारणा व वाढ होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. ४७१२ चौ. मै. पैकीं प्रत्यक्ष लागवडीखालीं २७१५ चौ. मै. आहे व २००० चौ. मै. लागवडींत येण्याजोगी आहे एकंदर लागवडीच्या जमीनीपैकीं ⅔ इतकी सरकारी व खासगी कालवे पाट वगैरे साधनांनीं भिजत असून त्यांतील ८५ मैल सरकारी कालव्यांनीं भिजते. मुख्य उत्पन्न तांदूळ असून त्याखालीं अर्ध्याहून अधिक जमीन येते. येथें दुष्काळाचो सहसा बाधा होत नाहीं याचें कारण येथें कालवे, पाट वगैरे बरेच असून जमीनीची मशागत करण्यांत येथील लोक फारच श्रम घेतात

येथील जनावरें आकारानें लहान पण मजबूत आहेत. दक्षिणेकडे वनचराईची जमीन पुष्कळ आहे.पण इतर ठिकाणीं बहुधा कडबा वगैरेच तोडून घालतात. गरेड जातीचे लोक मेंढ्या पाळतात व त्यांच्या लोकरीपासून गालीचे व घोंगड्या होतात गया हें याचेंच ठिकाण असल्यानें तेथें व इतर ठिकाणीं गुरें बाजारांत येतात गया येथें गुरांचा दवाखाना आहे.

सरकारी शोणभद्र कालव्याच्या पाटणा व मोंगीर कालवा अशा दोन शाखा आहेत पश्चिमेकडेहि दोन शाखा आहेत. याशिवाय या ठिकाणीं हंगामी तलाव आहेत व त्यांतूनहि पाण्याचा बराच पुरवठा होतो या पद्धतीला 'जेनरावंदी' म्हणतात व त्याचाहि बराच उपयोग करतात

खनिज पदार्थांत मुख्य अभ्रक आहे. याच्या बऱ्याच खाणी आहेत एक जातीचा काळा दगड गयेचा म्हणून प्रसिद्ध आहे.तो कोरीव कामाला चांगला असून त्याच्या मूर्ती, भांडीं, दागिने वगैरे करतात. मातकामाची माती व चुन्याचा दगड हीं बऱ्याच ठिकाणीं सांपडतात व सोरा जहानाबादमध्यें तयार करतात. येथें लाख, साखर, कपडा, पितळी भांडीं व लोकरी घोंगड्या वगैरेंचे कारखाने आहेत अरवल येथें पूर्वी चांगला व पुष्कळ कागद तयार होत असे. आता तो धंदा अगदीं नाहींसा झाला आहे व शुद्ध साखरेचा धंदाहि उतरत्या प्रमाणानेंच चालत आहे मानपूर येथें रेशमी कपडा होतो. पूर्वी येथें खोदकाम उत्कृष्ट दर्जाचें होत असे व त्याचे नमुने जुन्या कामावरून दिसतात पण आतां हें काम जाणणारे लोक अगदीं थोडे उरले आहेत. येथें दरसाल ५०००० मण लाख तयार होते व कलकत्त्याला जाते. निर्यात मालांत धान्यें, मिरीं, भांडीं, गूळ, तंबाखू, विड्याचीं पानें वगैरे मुख्य असून मीठ, कोळसा,कापूस, लाकूड, कपडा, फळें, राकेल, कागद, वगैरे जिन्नस आयात मालांत मुख्य आहेत. सर्व व्यापार कलकत्त्याशीं चालतो पण गूळ मात्र मध्यप्रांत, वऱ्हाड, राजपुताना व मध्यहिंदुस्थान येथें फार जातो. नवे नवे रस्ते बनत आहेत व व्यापाराचा ओघ रेल्वेरस्त्याकडे साहजिकच येत आहे. अंतर्भागात सपाटीवर गाड्यांतून व टेंकड्यांतून बैलांवरून व्यापार चालतो. रेल्वेच्या ६ लहान शाखा आहेत बैलगाडीचे व पायरस्तेहि बरेच व चांगले आहेत. २०२ मैल पक्की सडक असून ७१५ मैल कच्ची सडक व ६२८ मैल साधा रस्ता आहे पाटणा कालव्यांतुन एक बोट दर आठवड्यास जाते. ठिकठिकाणीं नद्यांवर पुलाची योजना नसेल तेथें होड्यांची योजना केलेली आहे. गया जिल्ह्याचे ५ तालुके पाडले आहेत तीन म्यु. कमिट्या

असून डिस्ट्रिक्ट व तालुकबोर्ड ही आहेत. गया जिल्हा शिक्षणाच्या बाबतींत मागासलेला आहे. शेंकडा ३·९ (७.२ पुरुष व ०.२ स्त्रिया) वाचणारांचें प्रमाण पडतें.

ता लु का.—गया जिल्ह्यांतील मुख्य तालुका क्षेत्रफळ ४२५ चौ. मै. लोकसंख्या इसवी सन (१९११) १९,१,४८४.

श ह र.—गया जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. उ. अ० २४° ४९' व पू. रे. ८५° १'. हें फल्गु नदीच्या काठीं वसलें आहे. नदीच्या एका कांठावर विष्णुपद अथवा जुनी गया आहे व तीर्थक्षेत्राचा हाच भाग होय. येथें गयावळ लोकाची वस्ती आहे. हे वतनदार उपाध्ये आहेत. यांच्या आशीर्वचनाशिवाय यात्रा पुरी होत नाहीं व यामुळें यांना पुष्कळ वेळा बरीच प्राप्ति करून घेतां येते. विष्णुपद हें मुख्य देऊळ अष्टकोनी आहे. जवळच एक अहिल्याबाईनें बांधलेला सभामंडप आहे. नदीच्या दुसऱ्या तीरावर नवी गया अथवा साहेबगंज आहे. येथें सरकारी कचेऱ्या वगैरे आहेत. बाजार, शाळा, लायब्ररी व दवाखाने वगैरे सर्व या नव्या वस्तींत आहेत. नवी वस्ती जुन्या वस्तीपेक्षां अर्थातच रुंद, खुली, व ऐसपैस आहे. येथील तुरुंगात बरेच जिन्नस तयार होतात लोकवस्ती (१९२१) ६७५६२.

इतिहासः—गया हें फार प्राचीन कालापासून प्रसिद्ध क्षेत्राचें ठिकाण असून त्यास विष्णुगया अथवा पितृगया असेंहि म्हणतात. या क्षेत्राच्या उत्पत्तीसंबंधीं इतिहास हरिवंशपर्व अध्याय १० मध्यें दिला आहे. सुद्युम्न किंवा इल याच्या गय नामक पुत्राला पूर्वेकडील देशाचें राज्य मिळालें. वर्तमान श्वेतवाराहकल्पांत या गय राजर्षीनें आपली राजधानी गयानगरी ही वसविली व शेजारच्या गयपर्वतावर उग्र तपश्चर्या केली, व तेथें ब्रह्मसरनामक पवित्र तीर्थ निर्माण केलें (महाभारत वनपर्व). हा गय राजर्षि इक्ष्वाकूचा समकालीन मानितात. या कथेवरून गया नगरीचें प्राचीनत्व ध्यानात येईल. गयाप्रदेश व उत्कलप्रदेश यास पूर्वी धर्मारण्य असें म्हणत असत. या धर्मारण्याच्या उत्पत्तीसंबंधीं स्कंदपुराणांत ब्रह्मखंडाचा पोटभाग धर्मारण्य खंड म्हणून ४० अध्यायांचा खंड आहे त्यांत बरीच विस्तृत माहिती आहे. वायुपुराण (अ. १०८-७३) मध्यें गयानगरी, राजगृह, च्यवनाश्रम, पुनःपुना नदी वगैरे पुण्यकारक स्थानें कीकट देशांत आहेत असें म्हटलें आहे.

वायुपुराणांत गयेची गोष्ट अशी आहेः—गय नावाचा एक राक्षस होता. तपाचरणानें तो पवित्र झाला. तो लोकांना पावन करी व त्यामुळें यमाचा दरबार रिता पडला. यमानें तक्रार केल्यावरून युक्ती लढवण्यात आली. यज्ञाकारितां गयाचा वध करण्यात आला. व त्याच्या डोक्यावर धर्मशिला ठेवण्यात आली व ती जागा 'गया क्षेत्र म्हणून पवित्र राहील, तेथें देव वस्ती करतील व तेथें जाणारे इसम पूर्वजांसुद्धा ब्रह्मलोकीं जातील' असें वचन श्री विष्णूनी त्याला दिलें व तेव्हांपासून गया क्षेत्र म्हणून प्रसिद्धीस आलें.

आर्यावर्तांतील गया, काशी व प्रयाग या त्रिस्थळी यात्रेचें महत्त्व फार मोठें मानितात. गयाक्षेत्रीं फल्गु नदीतीरावर श्राद्ध करून श्री विष्णुपदीं पिंडदान केल्यानें मनुष्य पितृऋणांतून मुक्त होतो अशी दृढ समजूत फार प्राचीन काळापासून चालत आलेली आहे.

द्वापारयुगांत श्रीरामचंद्रांनीं आपल्या पितराच्या प्रीत्यर्थ गयाक्षेत्रांत तिलोदक, पिंडदान वगैरे अर्पण करून तेथील गयावळांस रुप्याचे व सुवर्णाचे चिरकाल टिकणारे दोन पर्वत व मधुपेयाच्या दोन नद्या अर्पण केल्या. परंतु तेथील द्रव्यलोभी ब्राह्मणांनीं मिथ्याचार केल्यामुळें पुढें ते पर्वत पाषाणाचे झाले व नद्या गुप्तोदकानें वाहूं लागल्या. मधु नदीच्या उगम स्थानाला हल्लीं मधुस्रावतीर्थ असें म्हणतात. वर सांगितलेल्या पर्वतांना हल्लीं प्रेतपर्वत व रामपर्वत अशीं नांवें आहेत व फक्त त्यांवरच रौप्य सुवर्णाचें रेषाचिन्ह आहे. वायुपुराणाच्या अखेरीस (अध्याय १०५-११२) नारदाच्या विनंतीवरून सनत्कुमारानीं गयामाहात्म्य व गयासुराचा वृत्तांत कथन केला आहे. ललितविस्तरांत गयेचा उल्लेख आहे. राजगृहाहून उरुविल्वेला जातांना गौतम येथें प्रथम उतरला. येथें गौतमानें ६ वर्षे घोर तपाचरण केलें व बोधिप्राप्ति करून घेतली हें जर खरें असेल तर इ. स. पू. ५ व्या शतकांत गया हें एक मोठें बौद्ध धर्मस्थान असलें पाहिजे. इ. स. ५ व्या शतकांत फाहियानला हें अरण्यवत आढळून आलें, पण दोन शतकांनीं जेव्हां ह्युएनत्संग येथें आला तेव्हां त्याला हें शहर मजबूत नसलेलें पण थोड्या वस्तीचें असें दिसलें. पण त्यावेळीं सुमारें १०० ब्राह्मणाचीं घरें यांत असून हे ब्राह्मण अर्वाचीन गयावळांचे पूर्वज असावेत. यावरून गया हें प्रथम हिंदुक्षेत्र, नंतर बौद्धक्षेत्र व पुन्हां इ. स. ५ व्या ते ७ व्या शतकाच्या दरम्यान हिंदुक्षेत्र बनलें असावें असें दिसतें. बुद्धगयेची माहिती स्वतंत्र येईल. बौद्ध धर्मीयावरील विजयाचें हें क्षेत्र केवळ एक चिरस्थाई स्मारक आहे असें कित्येकांचें म्हणणें आहे. या भागांत बुद्धानुयायांचें साम्राज्य चांगलेंच असलें होतें. व म्हणूनच विजयी हिंदुधर्मीयांनीं ही जागा शोधून काढली असावी असें वरील लोकांचें म्हणणें आहे.

येथें एक शिलालेख आहे. त्याचा काल ६३८ चा असावा. कामदेवसिंहाचा मुलगा व जयतुंगसिंहाचा नातू पुरुषोतम सिंह याचा हा लेख असून त्यांत सपादलक्षाचा राजा अशोकवल्लभ याचा उल्लेख आहे.

पेशव्यांनीं दिल्लीच्या बादशहापासून स. १७५४ च्या सुमारास गया व कुरुक्षेत्र हीं दोन्हीं क्षेत्रें सोडवून आपल्या ताब्यांत घेतलीं व त्याची वमाशीस दामोधर महादेव हिंगणे यास सांगितली होती. [माबेल; डफ; राजवाडे खंड ६, महाभारत; पुराणें, राजेंद्रलाल मित्र-बुद्ध गया, कलकत्ता १८७८; गॅझेटीयर ऑफ गया].

**गरमल**—ह्या झाडाचें दुसरें नांव माइनमूळ असें आहे. गरमलाचीं झाडें सुमारें दोन फूट उंच वाढतात. व पानें तुळशीसारखी पण लांबट व जाड असतात. त्यास मसाल्यासारखा तिखट वास येतो व तीं रुचीसहि तिखट लागतात. झाडाचीं मुळें पिंगट रंगाचीं, ४–६ बोटें लांब व करंगळीसारखी जाड व झुपकेदार असतात. या मुळाचा लोणच्यात घालण्यास उपयोग करतात. जसा लोणच्यात आल्याचा स्वाद येतो तसाच गरमलाच्या मुळ्याचा एकप्रकारचा स्वादिष्ट वास येतो. भाटे, गुजराथी वगैरे लोकास याचा उपयोग माहीत आहे. झाडाची वाढ कलमें लावून होते. याचीं मुळें मुंबईच्या मार्केटात विकण्याकरिता येतात.

**गरमली, मों ही टी.**—काठेवाड. लाखापादर ठाण्यातील एक स्वतंत्र खंडणी देणारा तालुका. ग्रासिया वाल जातीचे काटी आहेत.

**ना ही नी.**—लाखापादर ठाण्यातील एक स्वतंत्र खंडणी देणारा तालुका. मोहोटीच्या दक्षिणेस हा ५॥ मैलावर आहे. ग्रासिया वाल जातीचे काटी आहेत.

**गरमूर**—आसाम. शिवसागर जिल्ह्यातील एक खेडें. हें उ.अ.२६ ° ५९' व पू रे ९४ ° ९' यावर माजुली बेटात असून आसामी लोकांनीं पूज्य मानलेल्या तीन सत्रापैकीं एक आहे. या सत्रा( मठा )चें गोसावी लोकावर बरेंच वजन असून ते राजनिष्ठ, सरकारला पाठिंबा देणारे व सुसंस्कृत आणि प्रागतिक आहेत असें सहज दिसून येतें. यांच्या चेल्याकडून मिळणाऱ्या देणग्यावर हे मठ चालतात. गरमूर येथील मठाला अहोमच्या राजाकडून एकंदर ४०,००० एकर जमीन साऱ्याच्या माफीनें मिळाली होती असें म्हणतात. परंतु सरकारी तपासणीच्या वेळीं हे "गोसाई" वृंदावनाला गेल्यामुळे व महत्वाचे पुराव्याचे कागद ब्रह्मी लोकानीं नाहीसे केल्यामुळें त्यापैकीं मठाला काहीं एक राहिलें नाही. हिंदुस्थान सरकारनें मात्र आता ३३१ एकर जमीन साऱ्याच्या माफीसह दिली आहे.

**गरवा**—बिहार–ओरिसा. पालामाऊ जिल्ह्यातील दानरो नदीवरील शहर येथें वस्ती सुमारें चार हजार आहे. जिल्ह्यांतील व सुरगुजा संस्थानातील बाहेर जाणाऱ्या मालाचा व्यापार येथूनच चालतो. निर्यात मालामध्यें लाख,चामडीं, तूप, कापूस, लोखंड वगैरे असून आयात मालात मुख्यतः धान्य, पितळी भांडीं, कपडे, ब्लँकेटें, मीठ, तंबाखू, मसाला वगैरे येतात. उन्हाळ्यात दानरो नदीच्या वाळवंटात बाजार भरतो.

**गॅरिक, डेव्हिड ( १७१७–१७७९ )**—हा प्रसिद्ध इंग्रज नट व नाटकाचा मॅनेजर एका फ्रेंच प्रॉटेस्टंट कुळांत जन्मास आला. लिचफील्ड येथील ग्रामर स्कूलमध्यें त्याचें प्राथमिक शिक्षण झाल्यावर एडिअल येथील सॅम्युअल जॉन्सनच्या शाळेंत त्यानें १७३६ त आपलें नाव घातलें. परंतु सहा महिन्यातच ती शाळा बंद झाल्यामुळें जॉनसन व गॅरिक अशी ही गुरुशिष्याची जोडी लंडन शहरीं गेली. त्याच सुमारास त्याचा बाप कॅप्टन गॅरिक वारला. पण त्याच्या चुलत्यानें हजार पौंड डेव्हिड यास दिल्यामुळें लंडन व लिचफील्ड या दोन्ही ठिकाणीं त्यानें दारूचा व्यापार सुरू केला. त्यात त्यास फारशी किफायत झाली नाहीं, उलट निम्में भांडवल डेव्हिड गमावून बसला.

गॅरिकला नाटकाचा अतिशय नाद लागला. नाट्यचर्चा व नाट्यनिर्मिति यासंबंधीं तो जास्त प्रयत्न करूं लागला. इसॉप इन् दि शेड्स नावाची त्याची नाट्यकृति १७४० मध्यें प्रथम रंगभूमीवर आली. १७४१ त तो प्रथम नट म्हणून रंगभूमीवर आला. नंतर एका नाटकमंडळीबरोबर तो इप्स-विच् येथें गेला लिडाल म्हणून त्यानें त्या ठिकाणीं भूमिका घेतली. त्यानंतर त्यानें तिसऱ्या रिचर्डची भूमिका घेतली व लोकप्रियता मिळविली. अबोअन, लिअर व ओटवेच्या एका नाटकातील पेरी अशा भूमिका त्यानें चागल्या वठविल्या. ड्यूक ऑफ अर्गाइल, कॉबहॅम, लिटलटन व पिट वगैरे पार्लमेंटच्या सभासदानींहि त्याची वाहवा केली दि लाइंग व्हॅलेट मधील प्रहसनात त्यानें शार्पचें काम केलें. पोप, मरे, हॅलिफॅक्स, सँडविच् व चेस्टरफील्ड इत्यादि बड्या लोकाशीं त्याचा फार स्नेह जुळला.

त्याची सांपत्तिक स्थिति १७४२ च्या सुमारास बरीच सुधारली होती. डब्लिन शहरीं गेल्यावर त्याची नट म्हणून फार कीर्ति झाली. १७४२ ते १७४५ पर्यंत ड्रुअरीलेन थिएटरमध्यें त्याचीं नाटकें होत असत. त्यानंतर डब्लिन येथें जाऊन स्मोकअॅलीमधील थिएटर रॉयलचा तो शेरिडनबरोबर सहकारी व्यवस्थापक झाला. १७४७ मध्यें गॅरिकच्या ताब्यात आलेल्या नवीन थिएटरमध्यें जॉनसननें केलेलें नाटक झालें. व त्यात गॅरिकनें काम केलें. शेक्सपियरच्या सतरा नाटकात व तत्कालीन ग्रंथकाराच्या अनेक नाटकात त्यानें विविध भूमिका घेतल्या व त्याच्या नाटकास जास्त प्रसिद्धि मिळविली. व्यवस्थापक म्हणून त्यानें चागलें काम केलें व अनेक नाटकाचीं रूपांतरें व नाटकांतून कमीजास्त दुरुस्त्या केल्या. १७६३ त तो पारिस येथें गेला व त्या ठिकाणीं त्यानें डिडरो व डी हॉलबॅच याची भेट घेतली. लंडन येथें परत आल्यानंतर १७७९ मध्यें तो वारला. 'मिस् इन् हर टीन्स', 'आयरिश विडो' वगैरे त्याचीं नाटकें प्रसिद्ध आहेत. त्यानें रंगभूमीचा दर्जा वाढवून अनेक सुधारणा घडवून आणल्या.

**गॅरिबाल्डि, गिघुसेप ( १८०७–१८८२ )**—या इटालियन देशभक्ताचा जन्म नाइस येथें झाला. कारकुनी पेशाच्या शिक्षणाचा त्रास चुकविण्याकरिता तो लहानपणीं घरातून पळून गेला पण पुढें तो बंदरावरील व्यापारधंद्यात आपल्या बापाचा मदतनीस म्हणून त्याच्याकडे जाऊन राहिला. सार्डिनियन आरमारखात्यात काम करीत असताना त्यानें आपल्या मित्रासह युरिडीस नावाचें जहाज

पुढें त्यास या दोन्ही गोष्टी स्वीकाराव्या लागल्या. रोममध्ये येणाऱ्या पुरामुळें जें नुकसान होतें तें टाळण्याकरितां टायबर्चें धरण बांधावें म्हणून त्यानें फार श्रम केले. नंतर त्यानें पुनः आपलें लग्न करून घेतलें. १८८० सालीं मेन्टाना स्मारकाच्या उत्सवासाठीं तो मिलन येथें गेला होता. १८८२ मध्यें नेपल्स व पॅलेरमो या ठिकाणीं सिसिलियन व्हेपर्सच्या उत्सवाकरितां तो निघाला होता परंतु आजारी पडल्यामुळें ज णें राहिलें ता. २ जून १८८२ रोजीं कॅप्रेरा येथें त्याचें देहावसान झालें आणि सर्व इटालियन राष्ट्र शोकसागरांत बुडून गेलें

**गरुड—**हिंदु पुराणांतून विष्णुवाहन गरुडाचें बरेंच वर्णन आढळतें. विष्णूच्या देवळांतून गरुडाच्या मूर्तीहि दिसतात तेव्हां हा पुराणांतील पक्षी कसा होता तें पाहूं. *अर्धें मानव शरीर व अर्धें पक्ष्याचें शरीर असलेला गरुड सर्व* पक्षांचा राजा होता. दक्षाची कन्या जी विनता, ती गरुडाची माता होय. गरुड हा सर्पांचा वडा शत्रु आहे. गरुडाच्या मातेचें तिच्या कद्रु नामक ज्येष्ठ सवतीशीं भांडण *होऊन सर्पांच्या कपटामुळें तिला दास्यत्व पत्करावें लागल्या*मुळें तिला सर्पांबद्दल (कद्रूच्या पुत्रांबद्दल) अतिशय द्वेष वाटे. तोच द्वेष गरुडाच्याहि मनांत वास करीत असल्यामुळें गरुड सर्पांचा वडा शत्रू झाला गरुड इतका तेजस्वी होता कीं, तो जन्मतःक्षणींच अग्नीसारखा भासल्यामुळें देवांनीं त्याची पूजा केली. गरुडाचें मस्तक, पंख, नखें व चोंच हीं गरुडपक्ष्याप्रमाणें व शरीर आणि अवयव माणसाच्या अवयवाप्रमाणें होते असें गरुडाचें वर्णन केलेलें आहे. त्याचें मुख पांढरें शुभ्र असून, पंख लाल व अंगकांति सुवर्णासारखी आहे. गरुडाच्या पत्नीचें नांव उन्नति अथवा विनायका असें असून तिच्यापासून गरुडास संपातिनामक एक पुत्र झाला. गरुडाच्या मातापितरांनीं गरुडास दुर्जनांचा नाश करण्याची मोकळीक दिली होती. परंतु ब्राह्मणास मात्र त्यानें स्पर्श करूं नये अशी अट होती, असें महाभारतांत सांगितलें आहे. एकदां गरुडानें ब्राह्मण व त्याची स्त्री या उभयतांस गिळिलें असतां, त्यांचा घसा इतका भाजला कीं त्या दोघांसहि ओकून टाकणें त्याला भाग पडलें. गरुडानें देवांपासून अमृत चोरून नेलें अशी एक कथा आहे. अमृत परत मिळविण्याकरितां इंद्रानें गरुडाबरोबर घोर युद्ध केलें व त्यानें घेतलेलें अमृत परत मिळविलें. परंतु युद्धांत इंद्राचें बरेंच नुकसान होऊन इंद्राचें वज्र भग्न झालें.

गरुडास अनेक नामाभिधानें व विशेषणें आहेत. त्याच्या मातापितरांच्या नांवावरून त्यास 'काश्यपि' आणि 'वैनतेय' अशीं नांवें मिळालीं. 'सुपर्ण' असेंहि गरुडाचें नांव असून सर्व पक्ष्यांचा राजा म्हणून गरुत्मान असेंहि गरुडास म्हणतात. तार्क्ष्य, खगेश्वर व विनायक इत्यादि नांवांनेंहि गरुडास संबोधितात. तार्क्ष्य, सितानन, रक्तपक्ष, श्वेतरोहित, सुवर्णकाय, गगनेश्वर, खगेश्वर, नागांतक व पन्नगनाशन, सर्पाराति, तरस्विन्, रसायन, कामचारिन्, कामायुस्, चिराद, विष्णुरथ, अमृताहरण व सुधाहर, सुरेन्द्रजित् आणि वज्रजित् अशीं गरुडाचीं प्रमुख विशेषणें आहेत.

**गरुडपक्षी—**एक पक्षी गरुड हें नांव सामान्यतः गिधाडवर्गांतील मोठमोठ्या पक्ष्यांना लावण्यांत येतें. गरुड दिवसा चपळ असणाऱ्या पक्ष्यांच्या वर्गांतीलच होत. बुझार्ड पक्ष्यापेक्षांहि कांहीं ठिकाणीं लहान असे गरुड आढळतात. दक्षिण अमेरिकेंत आढळणाऱ्या हारपीया नांवाच्या पक्ष्यांना जरी गरुड या नांवानें ओळखतात तरी बुझार्ड पक्ष्याच्या वर्गांतच त्यांची गणना करण्यांत येते

जगांतील कोणत्याहि प्रदेशांत अस्सल गरुडपक्षी आपली वस्ती करतात. युरोपमध्यें गरुडाच्या सात अगर आठ जाती आढळून येतात पैकीं दोन जाती ब्रिटिश बेटांत वारंवार दृष्टीस पडतात इंग्लंड व स्कॉटलंडमधील सखल प्रदेशांत हे मधून मधून आढळतात हे गरुड चोहोंकडे भटकतात. परंतु हायलंड्समधील कांहीं भाग व हेब्राइड्स बेटांत अद्यापहि गरुडपक्षी एकंदर विपुल सांपडतात, व त्यांची संख्या कमी न होतां वाढतच आहे असें दिसून येतें. गरुडाच्या अंड्यांना बाजारांत चांगली किंमत येते हें पाहून धनगर व रानांतील इतर रानटी लोक गरुडाच्या घरट्याचें संरक्षण करण्याची काळजी घेतात अशी घरटीं त्यांना रानांत कधीं कधीं आढळतात.

ब्रिटिश बेटांत आढळणाऱ्या गरुडांच्या दोन जातींपैकीं 'अर्न' किंवा समुद्रतीरीं रहाणारा गरुड म्हणून एक जात आहे या जातींतील पक्षी समुद्रतीरीं राहतात. ब्रिटिश बेटांमधील दुसरी जात डोंगरांत रहाणाऱ्या गरुडाची होय. या जातीच्या गरुडाचेंहि इंग्लंडमध्यें पूर्वीं वास्तव्य होतेंसें दिसतें. समुद्रकांठीं रहाणाऱ्या गरुडापेक्षां हा अधिक चपळ असून उडतांना हा आपल्या चोंचींत आपलें भक्ष्य घेऊन उडतो. युरोपमध्यें गरुड पाळून त्यास सावज मारण्यास शिकवितात. किरगिज तार्तर लोक याच जातीचे गरुड पाळून त्यांच्याकडून काळवीट, कोल्हा व लांडगा यांची शिकार करवीत असत असा पुष्कळांचा तर्क आहे. असा शिकारीच्या वेळेस पारधी लोक गरुडास पिंजऱ्यांत घालून अरण्यांत नेतात व सावज दृष्टीच्या टप्प्यांत येतांच गरुडास त्याच्या अंगावर सोडतात. अशा प्रकारच्या शिकारींत निष्णात असलेल्या गरुड पक्ष्याची किंमत दोन उंटाच्या किंमतीबरोबर आहे असें पी. एस्. पल्लास विधान करतो. या कामीं एकापेक्षां अधिक जातींच्या गरुडांचीहि योजना करणें शक्य आहे मध्य आशियामध्यें सांपडणाऱ्या ए. हेलिका व ए. मॉगिलनिक नामक जातीच्या गरुडांची शिकार करण्याच्या कामीं विशेष योजना केला जाते.

सर्वांत लहान परंतु अस्सल असा गरुडपक्षी म्हणजे ए. पेनाट जातीचा होय दक्षिण युरोप, आशिया व हिंदुस्थान या प्रदेशांतून वरील जातीच्या गरुडांची वस्ती आढळते.

ए ऑडाक्स नामक आस्ट्रेलियात आढळणाऱ्या जातीच्या गरुडानी शेपटी इतर गरुडाच्या शेपटीहून वेगळ्या आकाराची असते शेपटीशिवाय याच्या सर्व अवयवांचे इतर गरुडाच्या अवयवांशी बरेच साम्य असते तथापि शेपूट हें त्यांचें वैशिष्ट्य होय अलेरीस येथपर्यंत न सांगितलेला म्हणजे, लाल तंगड्याच्या योगानें ओळखला जाणारा गरुडाचा एक लहानसा समुदाय होय या समुदायातील पक्ष्यांपैकीं एक् कॅलिएट्स जातीचे गरुड यूरोपात आढळतात

सुवर्णासारख्या अंगकांतीच्या गरुडाचें वसतिस्थान म्हणजे आशिया व यूरोप या खंडांतील पर्वतश्रेणी होत हिमालय पर्वतामध्यें अशा प्रकारचे गरुड बरेच सांपडतात यांचा भव्य आकार, सुंदर, गर्द व पिंगट रंगाचा पिसारा, निर्भय मुद्रा, तीक्ष्ण दृष्टि, बळकट पंजे व वेगाचें उड्डाण इत्यादि गुणांवरून त्यास 'खगेंद्र' असें सार्थ नाव मिळालें आहे यांखेरीज 'फाउन्ड' ( मुकुटयुक्त ) गरुड आफ्रिकेंत, 'सुपर्ब' ( भव्य ) मिनिआत, 'चीला' हिंदुस्थानात, 'रॉयल' आफ्रिकेंत आणि दक्षिण अमेरिकेंत व 'वल्चराईन' ( गिधाडी ) गरुड कॅफेरियात सापडतो कित्येक राजवंशाच्या चिलखतावर सामर्थ्याच्या निदर्शनादाखल गरुडाचें चिन्ह असतें

**गरुडपुराण** – अठरा महापुराणांतील एक हें पुराण वैष्णवपंथाचे आहे यामध्यें गरुड पक्ष्यानें विष्णूच्या आज्ञेवरून या परमेश्वरा( विष्णू )च्या महिम्याचें तत्व वर्णन केलें आहे जगदुत्पत्ति, आदित्यरूपी विष्णूची भक्ति, विष्णूची अमूर्त पूजा, शिव व इतर देवतांची पूजा व इतर समारंभ वगैरे गोष्टी यांत आल्या आहेत यांत सूर्य व सोमवंशी राजांच्या वंशावळी दिल्या आहेत रामायण, महाभारत व हरिवंशांतील माहिती यांत दिली आहे आणि इतर हरएक माहिती—वैद्यक, साहित्यशास्त्र, व्याकरण इत्यादि–दिली आहे शिवाय सर्व प्रकारचीं माहात्म्यें—गयामाहात्म्य( गया तीर्थाचें श्राद्धपक्षासंबंधीं महत्व ) आणि प्रेतकल्प ( मृताच्या आत्म्याविषयींचे विधी )–या पुराणांपैकीं होत असें मानतात या गरुडपुराणाचे ( १ ) आचारकाण्ड, व ( २ ) धर्मकाण्ड असे दोन विभाग असून त्यांपैकीं आचारकाण्डांत एकंदर २४० अध्याय आहेत धर्मकाण्डाचेहि (१) प्रेतखंड व ( २ ) ब्रह्मखंड असे पोटविभाग पाडलेले असून प्रेतखंडांत ४९ अध्याय व ब्रह्मखंडांत २९ अध्याय आहेत

**आ चा र का ण्ड** —मंगलाचरणानंतर नैमिषारण्यामध्यें सूत पुराणिकास शौनकादिक ऋषींनीं नारायणकथाबद्दल विचारलें असतां पूर्वी गरुडानें कश्यपमहर्षीस व नंतर व्यासानें सूतास सांगितलेलें गरुडपुराण शौनकादिकांस सांगण्यास सूत प्रारंभ करितात. त्यांत विष्णूचे कुमार, सूकर, सात्वतमार्गप्रवर्तक देवर्षि, नंतर नरनारायण, सांख्यमतप्रवर्तक कपिल, दत्तात्रेय, यज्ञदेव, उरुक्रम पृथु, मत्स्य, कूर्म, धन्वंतरी, मोहिनी, नृसिंह, वामन, परशुराम, व्यास, दाशरथी राम, रामकृष्ण, भविष्यत् काळीं कीकटांत होणारा बुद्ध व विष्णुयशापासून कल्की अशा रीतीनें घेतलेले भगवंताचे अवतार वर्णन करून गरुडपुराणाच्या उत्पत्तीचे हेतू वर्णिले आहेत दुसऱ्या अध्यायांत ऋषींनीं गरुडपुराणाची परंपरा विचारल्यावरून पूर्वी विष्णूपासून रुद्रास, महादेवास व नंतर त्याजपासून व्यासनारदब्रह्मास व त्यापासून सूतास हें पुराण कळल्याबद्दल सूत सांगतात याला 'गरुड पुराण' हें नांव पडण्याचें कारण पूर्वी एकदा गरुडानें विष्णूस आपल्या विनता नांवाच्या आईस सोडविण्यास व आपल्या नांवाची पुराणसंहिता रचण्याविषयीं आपण समर्थ व्हावें म्हणून प्रार्थना केली त्यावेळीं विष्णूनीं आपलें ध्यान करून त्यास पुराण रचण्यास सांगितलें कश्यपानें 'गरुडपुराण' ऐकून त्या प्रभावानें वठलेल्या वृक्षास फलपुष्पानीं समृद्ध केलें ३ ऱ्यांत मी तुम्हांस पुराण सांगतों असें सूत शौनकादिकांस सांगतात ४ थ्यांत रुद्रास विष्णु प्राकृत वैकृतिक सृष्टि सांगतो ती प्रथम अनंतापासून अव्यक्त–आत्मा–बुद्धि–मन–ख ( आकाश )–वायु–तेज पाणी–भूमि हीं तत्वें परंपरेनें उत्पन्न होतात प्रभु हिरण्मय अंडामध्यें शरीर धारण करतो व तोच प्रभु रजोगुणयुक्त ब्रह्मदेवस्वरूप धारण करून सृष्टिरचना,विष्णुस्वरूपानें पालन व कालस्वरूपानें नाश करतो पहिली महत्सृष्टि, दुसरी तन्मात्रासृष्टि व तिसरी वैकारिक म्हणजे इंद्रियसृष्टि व चौथी स्थावरसृष्टि पांच वैकृत सर्ग व तीन प्राकृत सर्ग, अशा रीतीनें चराचर सृष्टि उत्पन्न होते ५ व्यांत ब्रह्मदेवापासून ऋषींची व मरीचाच्या आगमनापासून दक्ष व त्याची पत्नी यांची उत्पत्ति, दक्षयज्ञामध्यें शंकराचा अपमान झाल्यामुळें सतीनें देहत्याग करून हिमालयापासून मेनकेच्या ठिकाणीं जन्म धारण व नंतर पार्वतीपासून विनायकोत्पत्ति दिली आहे ६ व्या अध्यायांत स्वायंभुव–शतरूपा ह्यांच्यापासून प्रियव्रत व उत्तानपाद,उत्तानपादापासून सुनीति व सुरुचि ह्यांच्या ठिकाणीं ध्रुव व उत्तम ह्यांचें जन्म, त्याचप्रमाणें कश्यपास अदितीच्या ठायीं द्वादशादित्य व त्याचप्रमाणें दितीच्या वंशाचें वर्णन ७ व्यांत तत्पद्धतीप्रमाणें सूर्य, सशक्तिक सरस्वती इत्यादींची पूजा कशी करावी हें सांगितलें आहे नंतर वज्रनाभ मंडल काढून विष्णूची पूजा करण्याचा विधि ८ व्या अध्यायांत वर्णन केला आहे ९ व्यांत विष्णुदीक्षा देतांना गुरूनें व घेतांना शिष्यानें काय काय गोष्टी कराव्या ह्यांचें वर्णन आहे. १० व्या अध्यायांत पद्ममंडलाची रचना कशी करावी व त्यांत देवतांची स्थापना करून समंत्रक महालक्ष्मीचें पूजन कशा रीतीनें करावें ह्याचें वर्णन आहे ११ व्यांत नऊ व्यूह कोणकोणते व त्यांची अर्चा करण्याचा विधि काय ह्याचें विस्तृत विवेचन आहे १२ ते ४८ या सदतीस अध्यायांमध्यें विष्णुपंजर, तसेंच विष्णुसहस्रनाम इत्यादि स्तोत्रें त्याचप्रमाणें विष्णु सूर्य, शिव वगैरे देवतांचें तांत्रिक विधीस अनुसरून पूजन करण्याचे प्रकार, त्याचप्रमाणें साप, नाग ह्यांसारखे विषारी प्राणी चावले

असतो त्याच्या विषाची बाधा निवारण करण्याचे मंत्र, ग्रहपीडा रोग निरसन इत्यादि करणारी सुदर्शनचक्रासारखीं मंडलें व त्यांचे पूजनविधी, त्याचप्रमाणें द्विजांनीं संपूर्ण पापाचा नाश करण्याकरितां करावयाचे संध्याविधी इत्यादिकांचें वर्णन आहे. त्याचप्रमाणें ऋषि, देवता, गोत्र इत्यादींच्या विनियोगन्याससह गायत्रीमंत्र जपण्याचा विधि इत्यादि वर्णन आहे. त्याचप्रमाणें विष्णुलोक प्राप्त करून देणारें सूर्यार्चन कसें करावें, कार्यांत सिद्धि मिळण्याकरितां दुर्गाजप कसा करावा, ज्या मंत्रानीं परनीचा लाभ किंवा वध करतां येतो ते मंत्र, त्याचप्रमाणें सर्व मनोरथ पूर्ण करणारें ब्रह्ममूर्तीचें ध्यान कसें करावें, प्रवृत्तकालीं विष्णूच्या पवित्रारोपणापासून वर्षभर विष्णुपूजा केल्याचें फल कसें प्राप्त होतें, त्याच प्रमाणें चारी पुरुषार्थ साधून देणारी शालग्राममूर्तींचीं लक्षणें कोणतीं, घरें, राजवाडे, देवालयें, बागबगीचे इत्यादींचीं शुभाशुभ लक्षणें कोणतीं इत्यादि विविध विषयांचें वर्णन या अध्यायांतून आलें आहे. ४९ते ५२ या चार अध्यायांपैकीं पहिल्या अध्यायांत स्मृत्युक्त वर्णधर्म व आश्रमधर्म यांचें संक्षेपानें विवरण आहे व तदनंतरच्या अध्यायांत सर्व वर्णांना सामान्य असा दिनचर्याविधि निरूपण केला आहे. ५१ व्या अध्यायांत दानविधीच्या नित्य, नैमित्तिक व काम्य असा तीन प्रकारांचें विवेचन असून ५२व्यांत पांच महापातकें कोणतीं व त्यास प्रायश्चित्तें कोणतीं याचा विचार आहे. ५३ व्या अध्यायांत प्रश्नोत्तरादि नसतां एकदम निराळ्या विषयांनें विवेचन सुरू होतें त्यावरून हा प्रक्षिप्त भाग असावा. यांतील विषय मार्कंडेय पुराणांतील ६८व्या अध्यायांतील आहे तो असा.—पद्म, महापद्म, मकर, कच्छप, मुकुंद, कुंद, नील, शंख, असे आठ दैविक निधी आहेत ते पूर्वपुण्याईनें मनुष्यप्राण्यास प्राप्त झाले असतां त्यास निरनिराळ्या प्रकारचीं फलें प्राप्त होतात. या देवतारूप निधींपैकीं पद्म व महापद्म हे सात्त्विक, मकर व कच्छप हे तामस, मुकुंद व कुंद हे राजस, नील हा सत्वरजोयुक्त व शंख हा रजस्तमोयुक्त असतो असें वर्णिलें आहे.

५४ते ५८व्या पाच अध्यायांत भूगोल व खगोलसंबंधीं सर्व पौराणिक कल्पनांचें वर्णन आलें आहे. स्वायंभुव वंशांतील प्रियव्रत यानें आग्नीध्रादि सात मुलांना सात द्वीपें वाटून दिलीं त्यांपैकीं जंबुद्वीपाचा राजा जो आग्नीध्र यानें आपल्या नाभी प्रभृति नऊ मुलांना नववर्षें विभागून दिलीं, भरतखंडामध्यें निरनिराळ्या दिशांस किरात, यवन, आंध्र, म्लेच्छादिकोंची वस्ती असल्याचें वर्णन आहे. त्यानंतर महेंद्रादिपर्वत व तापीपयोष्णी वगैरे नद्यांची माहिती आहे ५६ व्या अध्यायांत इतर द्वीपें, त्यांचे अधिपती वगैरेंचें वर्णन आहे. ५७ व्यांत नागलोक, पाताळ लोक त्याचप्रमाणें पुष्करद्वीपांतील रौरवादि नरकांचें वर्णन आहे. ५८व्या अध्यायांत भूर्लोकमध्यें ग्रहमंडल व नक्षत्रादींचा प्रवास, त्याच प्रमाणें सप्तर्षी वगैरे नक्षत्रांच्या परिभ्रमणासंबंधीं हकीकत आली आहे.

५९ ते ६७ या अध्यायांतील मुख्य विषय फलज्योतिष व सामुद्रिक इत्यादिकांसंबंधीं आहे. सत्तावीस नक्षत्रांच्या देवता कोणत्या, मोठमोठ्या इमारती बांधण्यास किंवा कार्यसिद्धि तत्काल होण्यास शुभमुहूर्त कोणते, नवग्रहांच्या दशा व त्यांचीं शुभाशुभ फलें व तन्निवारणीय उपाय कोणते, बाराव्या स्थानीं असलेल्या चंद्राचें फळ काय, लग्नकुंडली विज्ञानावरून शुभाशुभ योग कोणते, सामुद्रिक शास्त्राप्रमाणें स्त्रीपुरुषाच्या हस्तरेषांचीं फलें काय, लक्षण काय, त्याचप्रमाणें स्वरोदयानुसार उजव्या व डाव्या नासिकेंतून स्वर वहात असतांना कार्यसिद्धीचीं शुभाशुभ लक्षणें कोणतीं इत्यादि गोष्टींचा ऊहापोह केलेला आहे.

६८–८० या तेरा अध्यायांतील विषय म्हणजे वज्र, मोतीं, पद्मराग, मरकत, इंद्रनील, वैडूर्य, पुष्पराग, कर्केतन, भीष्म, पुलक, रुधिराक्ष, स्फटिक व विद्रुम इत्यादि मूल्यवान रत्नांची उत्पत्ति कशी होते, त्यांच्या किंमतीची परीक्षा कशा रीतीनें करावी, त्यांचीं शुभाशुभ लक्षणें कोणतीं इत्यादि गोष्टींबद्दल उपयुक्त विवेचन आहे

८०ते८६ यांत गंगाद्वार, प्रयाग, वाराणसी, कुरुक्षेत्र, प्रभास, द्वारका, सरस्वती, केदार, संभलग्राम, बदरिकाश्रम, श्वेतद्वीप, माया, नैमिषारण्य, पुष्कर तीर्थ, अयोध्या, चित्रकूट, गोमती, रामतीर्थाश्रम, कांची, तुंगभद्रा, श्रीशैल, सेतुबंध रामेश्वर, कामतीर्थ, उज्जयनी, कावेरी, चंद्रभागा, मथुरा, शोणनद, अंबुसर, महेंद्रपर्वत, कावेरी, गोदावरी, पयोष्णी, विंध्य, नर्मदा, गोकर्ण, गोवर्धन पर्वत, कृष्णवेणी, भीमरथी, गण्डकी, इरावती, विदुरतीर्थ इत्यादि महातीर्थें प्रसिद्ध आहेत, परंतु त्या सर्वांत गया क्षेत्र अक्षय ब्रह्मलोक देणारें आहे. कारण अशी आख्यायिका आहे कीं पूर्वी गयासुर नामक दैत्यानें देवांना तपानें जिंकल्यामुळें सर्व देव विष्णूला शरण गेले, तेव्हां एकदा क्षीरसागर समुद्रांतून शिवपूजेकरितां कमलें आणून गयासुर कीकट देशांत विश्रांति घेण्याकरतां पहुडला त्यावेळीं विष्णूनीं आपल्या गदेनां आघात करून त्याचे प्राण हरण केले व तेव्हांपासून गदाधर विष्णु स्वतः नेहमीं मुक्ति देण्यास उभे आहेत. या ठिकाणीं प्राण्यानीं श्राद्ध, दान इ. केल्यास त्यांना मुक्ति मिळते असें सांगितलें आहे. ८६ व्या अध्यायांत एकंदर गयाश्राद्धाचा विधि सांगितला आहे.

८७ व्या अध्यायांत स्वायंभुव, स्वारोचिष, औत्तम, तामस, रैवत, चाक्षुष, वैवस्वत, सावर्ण्य, दक्ष, सावर्ण्य, धर्मपुत्र, रुद्रपुत्र मनु, रौच्य, भौत्य इत्यादि पहिले सहा गत मनु, सध्या चालू असलेला सातवा वैवस्वत व पुढील होणारे सात मिळून चौदा मनु, त्यांचे पुत्र, ऋषि, देव वगैरे दिले आहेत. ८८ व्या अध्यायांतील कथा म्हणजे रुचि नामक प्रजापति हा दारसंग्रह म्हणजे पत्नीचें

मूळ असें समजून अग्नीची पूजा न करता फिरत असता त्याच्या पितरांची गाठ पडली व त्यानीं पुनाशिवाय कोणासहि सद्गति मिळणार नाहीं असें सांगून ते अंतर्धान पावले. ८९ व्या अध्यायातलि कथा भाग म्हणजे हा पितृगणाचा उपदेश ऐकून रुचीला दारापरिग्रह करावा असें वाटूं लागलें, परंतु कन्या मिळेना तेव्हां त्यानें ब्रह्मदेवास संतुष्ट करून निरनिराळ्या स्तोत्रांनीं पितरास संतुष्ट केलें नंतर त्याला सुंदरी नावाची भार्या प्राप्त होऊन तीपासून मन्वंतरकर्ता पुत्र होईल असा वर मिळविला. ह्या पितृस्तोत्राच्या पठनानें कोणतें फळ मिळतें हेंहि मध्यंतरी सांगितलें आहे. ९० व्या अध्यायात वरुणाचा मुलगा पुष्कर याच्या प्रम्लोचा स्त्रीच्या ठिकाणीं उत्पन्न झालेल्या मानिनि नामक कन्येशीं रुचीचा विवाह होऊन तिच्यापासून रोच्यमनू उत्पन्न झाला. ९१ व्या अध्यायात स्वायंभुवादि मनूंनीं भगवंताचें ध्यान कोणत्या प्रकारें केलें ह्याचें वर्णन आहे. ९२ व्या अध्यायात भगवंताच्या व्यक्त व अव्यक्त उपासनापैकीं व्यक्त उपासना कशी करावी हें सांगितलें आहे.

९३–१०४ यातील पहिल्या अध्यायातील मजकूर बहुतेक याज्ञवल्क्यस्मृतींतून अनुक्रमभेदानें घेतलेला आहे व शेवटचा १०७ वा अध्याय हा पराशरस्मृतीवरून घेतलेला दिसतो. प्रथम ९३ व्या अध्यायात गर्भाधानादि संस्कार विवाहाशिवाय अमंत्रक करावे असें वर्णन आहे. ९४व्या अध्यायात ब्रह्मचर्याश्रम निरूपण व ९५व्या अध्यायात गृहस्थाश्रम धर्मनिरूपिला आहे. ९६ त संकरजातींचीं कर्में सांगितलीं आहेत. ९७ व्यात सौवर्णराजतताम्रादि पात्राची शुद्धि करण्याचे प्रकार सांगितले असून ९८ व्यात दानधर्म व प्रतिग्रह घेण्यास अधिकारी कोण हें सांगितलें आहे. ९९ व्यात अमावास्या वगैरेसारख्या पर्वदिनीं करावयाचा श्राद्धविधि सांगितला आहे. १०० व्यात विनायक नावाच्या ग्रहाच्या पीडेचें निवारण कसें करावें हें सांगितलें आहे. १०१ व्यात सूर्यादि नवग्रहांची शांति कशी करावी हें सांगितलें आहे. १०२ या अध्यायात वानप्रस्थाश्रमधर्म व १०३ अध्यायात संक्षेपानें याज्ञवल्क्यप्रणीत संन्यासधर्माचें निरूपण केलें आहे. १०४ मध्यें मानवी प्राण्याच्या पातकामुळें त्याला नरकयातना कशा भोगाव्या लागतात व राहिलेल्या पातकामुळें निरनिराळ्या प्रकारचे रोग कसे होतात इत्यादि वर्णन आहे. १०५ अध्यायात ब्रह्महत्यादि पांच महापातकें व त्यांचीं प्रायश्चित्तें ह्यांचें निरूपण आलें आहे. १०६ व्या अध्यायात खनन व अग्निदहन करण्यास योग्य कोण व त्याचें अशौच किती ह्याचें विवेचन आहे. १०७ अध्यायात पराशरोक्त वर्णाश्रमधर्माचें सामान्य निरुपण आहे.

१०८–११५ ह्यापैकीं १०८ व १०९ ह्या दोन अध्यायात सामान्य नीतिदर्शक सुभाषिताचा संग्रह केला आहे ११० मध्यें राजनीतिवर्णन असून राजानें कसें वागावें ह्याबद्दल, त्याचप्रमाणें १११ व ११२ ह्यामध्यें राजपुरोहित, मंत्री, इत्यादि कशा प्रकारचे नेमावेत ह्याबद्दल विवेचन आलें असून पुढील तीन अध्यायात स्त्रिया व पुरुष यांनीं सामान्य वागणूक कशी ठेवावी याबद्दल सुभाषितें ग्रथित केलेलीं आहेत.

११६–१३७ ह्या २१ अध्यायांत द्वादशमासांतील निरनिराळ्या व्रतांचें निरूपण आलें आहे. प्रथम ११६व्या अध्यायात प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत असणारीं निरनिराळीं व्रतें व त्यांच्या देवता इत्यादिकांचें विवेचन असून नंतर पुढें क्रमाक्रमानें अनंगत्रयोदशीव्रत, अखंडद्वादशीव्रत, अगस्त्यार्घ्यव्रत, रंभातृतीयाव्रत, चातुर्मास्यव्रत आश्विन शुक्ल ११ पासून कार्तिक शुक्ल ११ पर्यंतचें मासोपवासव्रत, भीष्मपंचकव्रत, शिवरात्रिव्रत व त्या प्रसंगीं सुंदरसेनक नामक फासेपारध्याला अजाणता हें व्रत घडल्यामुळें शिवलोकाची प्राप्ति कशी झाली ही कथा, एकादशी व्रत, नारायणार्चनविधि, माघ शुक्लैकादशीच्यावेळीं सुवर्णाच्या वराह देवतेचे पूजन करण्याचा विधि, एकंदर सर्वसामान्य व्रतांची परिभाषा, उद्धारपंचमी, मरीचसप्तमी, फलसप्तमी, ओदनसप्तमी, विजयसप्तमी, दूर्वाष्टमी, गोकुळाष्टमी व कृष्णजन्मोत्सव व्रत, बुधवासरयुक्त पौषाष्टमीला बुधाचें पूजन व वीरनामक ब्राह्मणाची कथा आहे ती अशीः—पाटलिपुत्रनगरात वीर नामक ब्राह्मण रहात असून त्याची रंभा नावाची पत्नी व कौशिक नावाचा एक पुत्र व विजया नावाची मुलगी होती. कौशिक आपल्या धनपाल नामक बैलास घेऊन गंगा नदींत क्रीडा करीत असता काहीं चोरट्या गवळ्यांनीं बैल चोरून नेला त्यामुळें कौशिक दुःखित होऊन ताता अरण्यात फिरूं लागला व विजयाहि फिरूं लागली. एके ठिकाणीं सरोवराच्या काठीं काहीं समारंभ चालत असताना क्षुधित झाल्यामुळें त्यांनीं अन्नाची याचना केली. तेव्हां त्या दिव्य स्त्रियांनी त्यांना बुधाष्टमी व्रत करण्यास सांगितलें यानंतर १३३ अध्यायात अशोकाष्टमी व्रत, महानवमी व्रत, दमनकनवमी व्रत, दिग्दशमी व्रत, कृष्णैकादशी व्रत, श्रवणद्वादशी व्रत, अनंगत्रयोदशी व्रत, धाम व्रत, व वारव्रतें हींहि सांगितलीं आहेत. ह्या आठ अध्यायांत एकंदर भूतभविष्य राजांचीं वंशवर्णनें आहेत. प्रथम विष्णूच्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव, ब्रह्मदेवाच्या आंगठ्यापासून दक्ष, त्यापासून आदिति, तिजपासून सूर्य व त्यापासून पुढें सूर्यवंशातलि अनेक राजे झाले. ब्रह्मदेवाचा पुत्र अत्रि, त्यापासून चंद्र, चंद्राचा गुरुपत्नी तारा हिच्या ठिकाणीं उत्पन्न झालेला बुध, त्याचप्रमाणें पुढें कर्णसुत जो वृषसेन त्याच्यापर्यंत चंद्रवंशाची हकीकत आली आहे. त्याचप्रमाणें परिक्षित जनमेजयापासूनचे भावी राजे कोणकोण होणार हें थोडक्यात सांगितलें आहे पुढें विष्णूचे दहा अवतारवर्णन व त्याचवेळीं सीतेच्या पातिव्रत्याचें वर्णन करून त्या प्रसंगानें अनुसूयानामक पतिव्रतेनें मांडव्य ऋषीच्या मृत्युकारक शापापासून आपल्या कौशिक नामक कोढ्या नवऱ्याचें कसें संरक्षण केलें ह्याचें वर्णन असून पुढें थोडक्यात श्रीरामचरित्र व श्रीकृष्णचरित्र

हेंहि वर्णिलें आहे. त्याचप्रमाणें शेवटी समग्र भारते-तिहासाचा सारांशहि दिला आहे.

१४६–१९४ व्या अध्यायांतील विषय म्हणजे आर्य-वैद्यकशास्त्राचें संपूर्ण विवेचन हा होय. ह्यात निरनिराळे ज्वर, क्षयादि रोग, त्यांचीं लक्षणें, त्याचे प्रकार, त्यावर औषधोपचार इत्यादि सद्यास विवेचन आहे. ह्यावरून हे श्लोक कोठून तरी उद्धृत केले असावेत असें वाटतें. एकंदर सर्व आर्यवैद्यक-प्रकरण धन्वंतरीनें सुश्रुतास सांगितलें असें दाखविलें आहे. प्रथम रोगांचें निदान सामान्यतः कसें करावें हें सांगून कफ-वातपित्त या त्रिदोषाप्रमाणें ज्वरभेद सांगितले असून नंतर रक्तपित्त, कास, श्वास, हिक्का, राजयक्ष्मा, अरोचक, आम्ल-पित्त, मदात्यय, अर्श, अतिसार, मूत्राघात, प्रमेह, विद्रधि, उदर, पाण्डुरोग, विपर्स, कुष्ठ, कृमि, वातव्याधिरोग इत्या-दींचीं निदानें पृथक् अध्यायात विवेचन केलीं असून सर्व सामान्य वैद्यशास्त्राची परिभाषा निरूपण केली आहे. व त्यानंतर निरनिराळे ज्वररोग, नाडीव्रणरोग, स्त्रीरोग, त्याचप्र-माणें रोग हरण करणारीं मधुरतिक्तद्रव्यें इत्यादींचें निरूपण आहे. १७४ व्या अध्यायापासून पुढें स्मरणशक्ति वाढवणारें ब्राह्मीघृत, नारायण तेल, अजमोदा तेल, टक्लावर केशोत्पत्ति करणारें भृंगराजतेल, कर्णरोग हरण करणारें देवदारु तेल, लिंगबाहुस्तनकर्ण इत्यादि अवयवाची वृद्धि करणारे निरनि-राळे लेप, कावीळ, भाजलेलें अंग, डास, पिसवा, ढेंकूण, इत्यादिकांचे नाश करणारे धूप व तेलें, स्त्रीपुरुष वशीकरणास उपयोगी असे धूप, तिलक, तांबूल वगैरे, त्याचप्रमाणें अग्नि-मांद्य, कुष्ठ, शूळ, निरनिराळ्या विषारी प्राण्यांचीं विषें उतर-विण्याचे लेप इत्यादींचें सांगोपांग निरूपण आहे व सरते-शेवटीं सर्वरोग हरण करणारा विष्णुपूजाविधि व वैष्णव कवच यांचें निरूपण आहे. प्रथम वैष्णवकवचाच्या पठनानें चित्रकेतूला विद्याधराधिपत्य प्राप्त झाल्याबद्दल वर्णन असून नंतर मोक्षप्रद असा विष्णुधर्म सांगितला आहे. १९७ व्यांत एकंदर नागजाती वश करण्याचे गारुडमंत्र निरूपिले आहेत व नंतर त्रित्यक्लिन्नानामक विद्या सांगितली असून स्त्रीपुरुषांचें यशापयश सुचविणारें चूडामणिसंज्ञक मंत्रोद्धारकथन असून उजव्या व डाव्या नाकपुडींत श्वासो-च्छ्वास होत असतां त्यांचीं फलें काय हें सांगितलें आहे. २०१ अध्यायात हत्ती, घोडे, यांच्या रोगनिवारणाबद्दल औष-धक्रिया कशी करावी हें सांगितलें असून २०२ मध्यें स्त्रियांचा योनिशूल हरण करण्याचा उपाय, जराहरणाचा उपाय, वाजी-करणाचा उपाय हे सांगितले आहेत. पुढील दोन अध्यायामध्यें चतुष्पाद जनावरें व वनौषधी यांच्या रोगावरील उपायांचें विवेचन आलें आहे.

२०५–२१२ ह्या आठ अध्यायांतील विषय म्हणजे व्याकरण, छंदःशास्त्र यांचें विवेचन होय. ह्यापैकीं पहिल्या (२०५।२०६ ह्या) दोन अध्यायात "सुप्तिङन्तं पदं ख्यातं" अशी पदाची व्याख्या देऊन सात विभक्ती कोणत्या, मुख्य व्यंजनसंधी कसे होतात, समासाचे प्रकार कोणते त्याचप्र-माणें संहिता ग्रंथांतील सिद्धप्रयोगाची उपपत्ति कशी लावावी हें विवेचन आहे. त्यानंतर पुढील सहा अध्यायांत छंदःशास्त्राचें विवेचन असून, आर्यावृत्तें, समविषमअर्धसमवृत्तें विवेचिलीं असून पुढील दहा अध्यायांत गृहस्थाश्रमी लोकांचे आचार व कर्तव्यकर्में यांचें वर्णन केलें आहे:—उदाहरणार्थ, समंत्रक स्नानविधि कसा करावा, पंचमहायज्ञाची काय अवश्यकता आहे ब्राह्मणानीं संध्याविधि अवश्य का केला पाहिजे, पार्वण-श्राद्धें वृद्धिश्राद्धें, सपिंडीकरणश्राद्धें करण्याचे नियम इत्यादि गोष्टींचें विवेचन आलें असून चातुर्वर्णीय लोकांस सर्वसामान्य असे सदाचार नियम विवरण केले आहेत

आचार काण्डातील शेवटल्या १८ अध्यायात कृतादि-चतुर्युगामध्यें प्रचलित असलेल्या धर्माचें स्वरूप काय आहे, नैमित्तिक व प्राकृतिक प्रलय कोणते, प्राण्याला नाना-विध देह धारण का करावे लागतात, अष्टांग योगाचें स्वरूप काय, विष्णुभक्ति व विष्णुपूजा कशी करावी, शिवकृत नृसिंहस्तोत्रनिरूपण, त्याचप्रमाणें मृत्युसंसारविमोचक भगवद्ध्यान करावयाचा प्रकार, ब्रह्मज्ञानप्राप्ति व आत्म-साक्षात्कार कसा करून घ्यावा, अर्जुनास श्रीकृष्णानीं सांगि-तलेल्या गीतेचें सार, त्याचप्रमाणें ब्रह्मगीतेचें सार व सरते-शेवटीं मंत्र, तंत्र, ज्योतिष, वैद्यक, व्याकरण इत्यादि विविध विषयानीं युक्त अशा गरुड पुराणाच्या पठणाचें फल काय हेंहि सांगितलें आहे.

धर्म का ड, प्रेतखंडः—या धर्मकांडातर्गत प्रेतखंडाचे एकंदर ४९ अध्याय आहेत. नांवाप्रमाणेंच अन्वर्थक असे यातील विभाग आहेत. मनुष्य मृत झाला असता त्याचे अंत्य संस्कार वर्णाश्रमधर्माप्रमाणें कोणते, त्याचप्रमाणें प्रेत स्थितींत गेलेल्या मनुष्यास भोगाव्या लागणाऱ्या स्वर्ग-नरकादि गोष्टींचें कल्पनाप्रचुर वर्णन वगैरे भाग फारच मनोरंजक आहे.

पहिला अध्याय हा एकंदर प्रेतखंडास प्रस्तावनेदाखल असून त्यात शौनकादिक ऋषींनीं नैमिषारण्यात सूतास एकदां नित्यकृत्यें समाप्त झालीं असतां असा प्रश्न केला कीं "हे सूता, कोणी म्हणतात कीं तृणजलौकन्यायानें देही हा अन्य शरीरें धारण करतो व कांहीं म्हणतात कीं देही हा मध्यंतरीं स्वर्गनरकादि उपभोगून नंतर अन्यदेह स्वीकारतो; तर त्यापैकीं खरी गोष्ट काय?" त्यावर सूतानीं उत्तर केलें कीं हे ऋषिगणहो, पूर्वी भगवान् विष्णु व वैन-तेय ह्यांमध्यें ह्याच विषयाला अनुसरून संवाद झाला त्यावेळीं भगवंतांनीं गरुडास, मृतांच्या पुत्रादि आप्तेष्टांनीं मरणानंतर मृताची उन्नति कशी करावी, त्याचप्रमाणें मृतास कर्माच्या गुणाप्रमाणें कशीं फलें मिळतात इत्यादि विषयानीं युक्त असा 'प्रेतकल्प' नांवाचा विषय कथन केला तोच मी तुम्हाला सांगतो असें सांगितलें.

वरील गरुडप्रश्न ऐकून विष्णूनी प्रेतकल्प सांगण्यास सुरुवात केली. या दोन अध्यायांत कोणतें कर्म केलें असता कोणता परिणाम होतो, त्याचप्रमाणें मृताचें और्ध्वदेहिक कसें करावें हें सांगून नंतर रौरव, कालसूत्र, अतिशीत इत्यादि नरकांचें साधन कोणत्या पातकानीं होतें व चौऱ्याशीं लक्ष योनींची प्राप्ति कां होते याचें विवेचन आहे.

प्रथम मरणातुरानें दशदानें द्यावीत तीं गाय, जमीन, तीळ, सोनें, तूप, वस्त्र, धान्य, गूळ, रुपें, मीठ यापैकीं असावीत. नंतर यमाच्या वैतरणी नदींतून नीट पार पडण्याकरितां आतुरानें कपिली गाय, किंवा इतर दान केल्यावर मरणासन्न प्राण्यास शक्य तर संन्यास द्यावा, म्हणजे तो मुक्तीस जातो. प्राणी गतप्राण झाल्यावर त्यास पुत्रादिकानीं स्नान घालून शुद्ध वस्त्रें, चंदन वगैरेनीं शरीर आच्छादित करावें, व मृताचे जागीं एकोद्दिष्ट श्राद्ध करावें. नंतर तिल, दर्भ, घृत, इंधन बरोबर घेऊन यमगाथा म्हणत मृतास आप्तानीं न्यावें दक्षिणदिशेस अरण्यामध्यें दहनभूमि करून वाटेंत पूर्वोक्त दोन श्राद्धें करून नंतर चिताभूमीवर प्रेताची स्थापना करावी व पुन श्राद्ध करावें नंतर सुतादिकानीं स्वत चितासंभार घ्यावा व यथाशास्त्र वेदी करावी प्रेत वस्त्राचे दोन भाग करून एकानें प्रेताच्छादन करावें व एक स्मशानरक्षकास द्यावा. नंतर प्रेतहस्तात पूर्वोक्त विधीनें पिंड द्यावा व प्रेतास मन्त्राग्नि देऊन नंतर स्नान वगैरे करून पुन. पुत्रादि आप्तानीं तर्पण करावें व घरीं परत यावें व अश्रुपात न करता संसाराची नश्वरता लक्षांत घेऊन त्याप्रमाणें वर्तन करावें असें सांगितलें आहे.

५–७ पांचव्या अध्यायात आशौचाचे सामान्य नियम, अस्थिसंचयनकाल, त्याचप्रमाणें प्रेतसंबंधी दानविधि, व प्रेतास परलोकीं त्रास न व्हावा म्हणून करण्यांत येणारा वृषोत्सर्गविधि, नवश्राद्धाचा काल कोणता, एक वर्षपर्यंत प्रेताच्या सुखाकरितां करण्यात येणारे विधी, यमदूताचे व वैतरणी नदीचें भयानक वर्णन इत्यादि विषय आहेत सहाव्या व सातव्या अध्यायांत अनुक्रमें वृषोत्सर्गानें व विष्णुस्तुतीनें उत्तम गति कशी मिळते याबद्दल कथा सांगितल्या आहेत

८–१० या अध्यायांत और्ध्वदेहिक क्रियेस अधिकारी नसतांना जिवंतपणी आपला आपण श्राद्धविधि कसा करावा त्याचें निरूपण आहे क्रियाधिकारी आप्त नसल्यास राजास तो अधिकार आहे असें नवव्या अध्यायात सांगितलें असून त्याबद्दल कथा सांगितली आहे ती अशी.—बभ्रुवाहन राजा मृगया करीत असतां मार्ग चुकला तों त्याला एक प्रेत भेटलें त्यावेळीं प्रेतानें त्या स्थितीचें कारण त्यास सांगितलें व त्याच्या निवृत्तीचा उपाय सांगितला. त्यावेळीं राजानें वृषोत्सर्ग विधि केल्यावर त्या प्रेतास मुक्ति मिळाली १० व्या अध्यायांत श्राद्धांत विप्रास वाढलेलें अन्न द्विजशरीरातून पितरांना कसें पोहोंचतें व त्याकरितां श्राद्धविधि अत्यंतावश्यक कसा आहे याचें निरूपण आहे पुष्करतीर्थावर श्रीरामचंद्र यानीं दशरथाच्या श्राद्धाकरितां ब्राह्मण बोलाविले असतांना सीता ब्राह्मणास पाहून लाजली श्राद्धसमाप्ति झाल्यावर श्रीरामानें लज्जेचें कारण विचारलें त्यावेळीं तिनें दशरथास पाहिल्याबद्दल सांगितलें असें वर्णन आहे.

यानंतर प्राण्यांना उच्चनीच गती कशा प्राप्त होतात याबद्दल ११व्या अध्यायात विवेचन आलें असून १२ व्यांत अण्डज, जारज, स्वेदज, उद्भिज्ज या चार स्थिरचरात्मक ८४ लक्ष योनींचें निरूपण केलें आहे,व हीं शरीरें मृत्युकाली सोडावीं लागतात, एकटा धर्म प्राण्याच्याबरोबर असतो असें सांगितलें आहे १३ व्यांत वृषोत्सर्गविधि, निरनिराळे दानधर्म व आत्मश्राद्धविधि याचें निरूपण आहे. प्राणी आर्तदशेत मृत्युशय्येवर पडला असतां त्याचीं कर्तव्यें म्हणजे हरिभक्ति, दानधर्म, वृषोत्सर्ग इत्यादि असल्याचें वर्णन आहे

या नंतर १५ व्या अध्यायात मरणसमयीं किंवा मरणानंतर पुत्रानेंच क्रिया करावी असें सांगून यमलोकाचा विस्तार केवढा आहे तें व त्यातील प्राण्यांना भोगाव्या लागणाऱ्या निरनिराळ्या यातनांचें वर्णन आहे १६ व्यांत यातना भोगण्याकरितां धारण केलेल्या शरीराचा मृत्युसमयीं पुन त्याग केल्यानंतर यमदूत प्राण्यास पुन यमलोकास नेतात असें सांगितलें आहे. १७ व्यांत त्रैलोक्यामध्यें काय काय गोष्टी घडत आहेत याजवर नजर ठेवण्याकरितां ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेल्या श्रमणा नामक देवतांचें केवढें माहात्म्य आहे याचें निरूपण आहे. १८ व्यांत वृषोत्सर्ग, कुंभदान, शय्यादान इत्यादींचीं फलें मृतात्म्यास काय मिळतात त्याचें निरूपण आहे नंतर जीव यममंदिरांत प्रवेश करतो व क्रमाक्रमानें मनुष्य, पशु, पक्षी इत्यादि जन्म कसे घेतो याचें विवेचन आहे अशा रीतीनें ८४ लक्ष योनी फिरून पुढें प्राणी प्रेतपिशाच्चरूपानें आपल्या घरातील किंवा मित्राच्या घरांतील आप्तांस कसें छळतात, त्यांचें स्वरूप कशा प्रकारचें असतें, इतरांस बाधा कशी देतात याचें २० व्या अध्यायात सुंदर विवेचन आहे २१ व्या अध्यायांत प्रेतपीडा अगर पिशाच्चबाधा होत असेल तर व प्रेतपिशाच्चांना मुक्ति मिळावी याकरितां अयुत गायत्रीजप, किंवा विष्णुबलि किंवा वृषोत्सर्गविधि करावेत असें सांगितलें आहेत. २२ व्यांत जीवास प्रेतत्वास नेणारीं दुष्कर्में कोणतीं, याचें निरूपण असून आधारादाखल संतप्तक ब्राह्मणाचा इतिहास दिला आहे २३ व्यांत प्रेतांचीं स्वरूपें, चिन्हें, निद्रा,विश्रांति या कशा असतात त्याचें विवेचन आहे.

नंतर २४ व्या अध्यायांत वेदामध्यें प्राण्याचें आयुष्य शभरवर्षें दिलें असतांना अकालिक मृत्यूचें कारण काय असा ऋषींनीं सूतास प्रश्न केल्यावरून सूत सांगतात कीं निरनिराळ्या तऱ्हेचीं पातकं केल्यानें मनुष्य अल्पायुषी होतो व अशा रीतीनें अकाली मेलेल्या बालकाचा अल्प संस्कार कसा करावा हें सांगितलें आहे २५ व्यांत मृत बालकाची

अत्येष्टि वृषोत्सर्ग वगैरेशिवायच करावी असें सांगितलें असून आईबापांची उत्तरक्रिया पुत्रादिकाच्या हातून होणेंच प्रशस्त आहे असं सांगितलें आहे २६ व्या अध्यायांत सपिंडीकरणापूर्वी सर्व सगोत्रास आशौच असतें, त्याचप्रमाणें सपिंडीकरणास योग्य काल कोणता व अधिकारी कोण याचें निरूपण आहे २७ व्यांत बभ्रुवाहन राजा व प्रेत यांच्या संवादरूपानें प्रेतत्वाची निवृत्ति होण्यास खरा उपाय म्हणजे गृह,अनेक पदार्थांचीं दानें हे होत असें सांगितलें आहे २८ त श्रीविष्णूंनीं गरुडानें केलेल्या,और्ध्वदेहिक क्रियेंत करावयाच्या अनेक दानाच्या फलासबंधीं प्रश्नास उत्तरें दिलीं आहेत २९ व्यात जीवास परलोकसुखप्राप्ति व्हावी एतद्व्याकरिता पुत्रादिकांनीं अष्टदानें द्यावीत असें निरूपण असून ३०—३१ ह्या दोन्ही अध्यायात कार्पास, सप्तधान्यें, मीठ, लोह, हेम, जमीन, वस्त्रें इत्यादि वस्तूंचीं दानें केलीं असता निरनिराळीं कोणतीं फलें प्राप्त होतात याचें निरूपण आहे

३२–३४ ह्या तीन अध्यायात मृत्यु, यमलोकाची पौराणिक कल्पना, त्याठिकाणचीं काल्पनिक दुःखें व यातना, सप्तभुवनाचें स्वरूप, पुनःशब्दार्थाचें विवेचन इत्यादि गोष्टी आल्या आहेत

३५ व्या अध्यायात प्रथम पिन्डमेलनविधि कसा करावा, त्याचप्रमाणें शव स्मशानात नेऊन दाह करण्याचा विधि हे सांगितले आहेत ३६ व्यात मरणसमयीं भगवताचें पादोदक घेतल्यानें विष्णुलोकाची प्राप्ति होते असें सांगितलें आहे ३७ व्यात यमलोकात जात असता पुत्रादिकांनीं दानधर्म केला असता त्यास कमी यातना कशा होतात हें सांगितलें आहे ३८ व्या अध्यायात अयोध्यादि सप्तमोक्षपुरीत मृत्यु आला असता, त्याचप्रमाणें ब्राह्मणाकरिता मरण आलें तर, स्त्रियांनीं सहगमन केलें तर, त्याचप्रमाणें अनाथ प्रेतसंस्कार केला तर, सत्पात्रीं दान, एखादा शिवलिंगपूजा इत्यादि केल्यानें मोक्षप्राप्ति होतें असें विवेचिलें आहे ३९ व्यात निरनिराळ्या वर्गातील लोकाना सूतककालप्रमाण निरनिराळ्या प्रसंगीं कोणतें असावें त्याचें विवेचन आहे ४० व्यात वाईट रीतीनें मरण आलेल्या प्रेतास सद्गति मिळण्याकरिता नारायणबलि कसा करावा हें वर्णन आहे ४१—४२ या दोन अध्यायात वृषोत्सर्ग,गोभूमिदान इत्यादींचीं फलें निरूपण केलीं आहेत ४३–४४ व्यात जलात बुडून, अग्नींत दग्ध होऊन मृत झालेल्या स्त्रिया, मुलें इत्यादिकांची नैसर्गिक शुद्धि असल्याचें व वाईट रीतीनें मृत झालेल्या प्रेतास सद्गति प्राप्त होण्याकरिता एक वर्षानंतर शुद्ध एकादशीस विष्णु देवतेचें पूजन व पिंडदान कसें करावें हें विवेचन असून नाग वगैरे चावून मेलेल्याची क्रिया करण्याचा विधि सांगितला आहे

या दैवटच्या पांच अध्यायांपैकीं प्रथम ४५व्या अध्यायात वार्षिक श्राद्धविधि, ४६ व्यांत शुभाशुभ फलें उपभोगून मृत्युलोकात प्राणी पुनः आला म्हणजे त्याचीं देहचिन्हें कशीं असतात ह्याचें विवेचन आहे ४७ व्यात वैतरणीवर्णन व गोदानफल सांगितलें असून ४८ व्यात भारतवर्षाची प्रशंसा व गर्भयातनाचें वर्णन आहे ४९ आध्यायात प्रथम मनुष्य शरीराचें दौर्बल्य, मोक्षधर्मवर्णन त्याचप्रमाणें ह्या प्रेतखंड श्रवणाचें फल सांगितलें आहे

ब्रह्मखंड —प्रथमारंभीं शौनकादिक ऋषी हे सूतास ग्रंथारंभीं विष्णु देवतेसच का नमन करण्याची चाल पडली आहे असा प्रश्न करितात त्यास सूत पौराणिक उत्तर देतो कीं अष्टादशपुराणांपैकीं काहीं राजस, काहीं तामस व काहीं सात्विक असून त्यात भागवत, विष्णुपुराण व गारुडपुराण हीं श्रेष्ठ आहेत कारण विष्णु हा सर्वांत पूजनीय आहे पुढील अध्यायात प्रलयानंतर सृष्टिरचनाकाली एकंदर देवांपैकीं विष्णूचा श्रेष्ठपणा कसा पूजनीय आहे हें वर्णिलें आहे

१० १४त वैकृतिक व प्राकृत सृष्टिवर्णन आहे प्रथम विष्णु ब्रह्मदेव–महत्तत्व व त्यापासून इतर देवता उत्पन्न झाल्याचें वर्णन असून १४व्यात देवाकरिता योग्य अन्न कसें असावें ह्या विषयावरून वस्तुसारासार निरूपण आहे प्रथम विष्णूच्या असंख्य अवतारांतील मुख्य अवतार सांगितले असून १६व्यात लक्ष्मीचे अवतार दिले आहेत १७ व्यात भारतीचे द्रौपदी वगैरे अवतार देऊन १८ व्यात सूत्रनामक वायूपासून गरुडाची उत्पत्ति व शेषावतारवर्णन, त्याचप्रमाणें एकादशरुद्रवर्णन आलें आहे १९ व्यात हव्यवाहनकन्या नीला हिच्या तपश्चर्येनें संतुष्ट होऊन भगवतांनीं तिचा अंगिकार कसा केला तें व २०व्यात श्रद्धेनें केलेली भगवत्प्राप्ति,२१व्यात सूर्यकन्या कालिंदी हिच्या तपानें प्रसन्न होऊन भगवतांनीं तिचा केलेला स्वीकार,२२व्यात श्रीकृष्ण लक्ष्मणा याच्या विवाहाचें कारण, २३ व्यात जांबवतीची पूर्व कथा व त्याप्रसंगानें २४, २५ व २६ यात श्रीव्यंकटगिरिवर्णन व माहात्म्य आलें आहे पुढील २७ व्यात नदानदीमाहात्म्य, कुमारीतीर्थमाहात्म्य, सोमपुत्रीचें निवासास पाहून तपाचरण व तीस जांबवतीचा पुनर्जन्म आला असें वर्णन आहे २८ व्यात विष्णूखेरीज इतर देवता त्याज्य हें जीवाच्या सुबुद्धि व दुर्बुद्धि नामक भार्यांच्या संवादात्मक रूपकावरून दर्शविलें आहे २९ व्यात धर्माचें जगधारणाचें स्वरूप, भागीरथी वगैरे देवतांचें तारतम्य सांगून विष्णुसंतोषकर धर्मवर्णन व भगवत्तत्व निरूपण करून ग्रंथ समाप्ति केली आहे

गरुडस्तंभ—हा ओरिसा प्रांतात आहे या ओटपा प्रांतावर पूर्वी केसरी घराणें राज्य करीत असतां, तें घराणें ब्राह्मणी धर्माचें असल्यानें त्यानें आपल्या राज्यात व राजधानीच्या जयपुर या गावीं अनेक देवळें, इमारती वगैरे बांधल्या त्यांतच हा प्रचंड व कलाकुसरीचा स्तंभ आहे हा हल्लीं अरण्यात आहे केसरी घराण्याचें राज्य गेल्यानंतर मुसुलमानांनीं हा पाडण्याचा प्रयत्न केला त्यांनीं

त्याच्याभोंवतीं साखळदंड बांधून हत्तींच्याकडून तो उलथविण्याचे बरेच श्रम केले परंतु तो पडला नाहीं. मात्र त्याच्या माथ्यावर बसविलेल्या गरुडाला त्यांनीं पाडून टाकलें. तथापि ज्यावर तो गरुड बसविला होता तो सुबक दांडा व खालचा सारा स्तंभ अजून शाबूत आहे. हा स्तंभ शि. शकाच्या दहाव्या शतकात उभारला गेला याच्या जवळच अनेक प्रचंड मूर्ती ( इंद्राणी, काली, वसुंधरा वगैरे ) आहेत. त्या सर्वांवरून त्या काळचो हिंदूंची उत्कृष्ट कारागिरी व कलाकुशलता दिसून येते [ वैद्य–मध्ययुगीन भारत पूर्वार्ध, हंटर–ओरिसा. ].

गॅरेट्ट (१७९९–१८५४)—व्हिस्कोंटे डी अलमायडा. हा महान् पोर्तुगीज कवि १७९९ मध्यें ओपोर्टो येथे जन्मास आला. त्याच्या प्राथमिक शिक्षणास अँग्रा येथें सुरवात झाली व तो लहानपणींच कविता करूं लागला १८१६ त तो कोइंब्रा युनिव्हर्सिटींत बुद्धिमान्, तीव्र उदारमतवादी व वक्ता म्हणून प्रसिद्धीस आला. ‘ ल्यूक्रीशिया ’ नावाचें त्याचें शोकरसात्मक नाटक तेथें रंगभूमीवर प्रसिद्धीस आलें. त्याच सुमारास ‘ मिरोप ’ व ‘केटो’ हीं त्याचीं अभिजात नाटकेंहि प्रसिद्ध झालीं. कायद्याची परीक्षा देऊन त्यानें कोइंब्रा सोडलें व लिसबन् येथें १८२० सालीं त्यानें डी लुईझा मिडोसी नावाच्या स्त्रीशीं लग्न केलें. १८२० च्या रॅडिकल राज्यक्रान्तीच्या विरुद्ध चाललेली चळवळ त्यावेळीं शिरारास पोंचली होती. त्यामुळें ॲबसोल्यूटीस्ट राजमंडळाच्या हुकुमावरून गॅरेट्ट यास पोर्तुगाल सोडून इंग्लंडास जावें लागलें. तेथें जर्मन व इंग्रजी अद्भुत वाङ्मयाशीं त्याचा परिचय घडून आला.

राष्ट्रीयत्वाच्या भावनेनें प्रेरित होऊन १८२४ मध्यें त्यानें ‘ कॅमोइन्झ ’ नांवाचें एक काव्य व ‘ डी ब्लँका’ अथवा ‘ऑल गार्व्हेची मोहीम’ नांवाचें देशाभिमानपर एक गीत रचलें. १८२६ मध्ये वृत्तपत्रकर्त्यांच्या व्यवसायात पडून व ‘ ओ पोर्तुगीज ’ नावाचें पत्र काढून तत्कालीन राजकीय वातावरणात न दिसून येणाऱ्या उदात्त कल्पना प्रस्तुत करून व भाषेंत नेमस्तपणा राखून त्यानें वृत्तपत्राचा दर्जा चांगल्या प्रकारें वाढविला. परंतु उदार तत्वाचा प्रसार करण्याबद्दल त्याला तीन महिन्याची शिक्षा झाली व नंतर तो १८२८ त इंग्लंडात आला. तेथें ‘ ॲडोझिंडा ’ व ‘ बर्नाल फ्रॅन्सेझ ’ अशीं काव्यें लिहून इतर चळवळींहि तो करूं लागला. पोर्तुगालच्या स्वातंत्र्याकरितां फ्रान्समध्यें सैन्य उभारलें जात आहे असें कळताच डी पेड्रोच्या हाताखालीं स्वयंसैनिक होऊन तो १८३२ त एस् मिग्युएल येथें गेला. मोझाइन्हो डा सिल्व्हेरा नामक सुत्सद्याचा सहकारी बनून त्यानें पोर्तुगीज सामाजिक घटनेंत क्रांति घडवून आणणारे कायदे तयार केले. ‘ फ्लोरेस सेम फ्रूक्टो ’ नांवाच्या पुस्तकांत संकलित केलेलीं त्याचीं भावगीतें प्रसिद्ध आहेत. ‘ आर्को डी सँट ॲना ’ नांवाच्या त्याच्या ऐतिहासिक कादंबरींत वॉल्टर स्कॉटची छटा दृष्टीस पडते. वरील वाङ्मयात्मक व्यवसाय सांभाळून त्यानें क्रिमिनल व कमर्शिअल कोड वगैरे कायद्याचे ग्रंथ रचले आहेत.

१८३४–३५ मध्यें पोर्तुगॉलचा परराष्ट्रीय वकील म्हणून त्यानें ब्रूसेल्स या ठिकाणीं बरेंच काम केलें स्वदेशीं परत आल्यावर नाट्यकला व राष्ट्रीय नाटकगृह यासंबंधीं विधायक सूचना करण्याचें काम त्याजवर सोंपविण्यात आलें. उत्कृष्ट नाटकाकरिता बक्षिसें देवून आपल्या नेतृत्वाखालीं नट व नाटककार यांचा एक संप्रदाय त्यानें स्थापन केला पोर्तुगीज इतिहासांतील कथा घेऊन नमुन्यादाखल गद्य नाटकें लिहिण्यास सुरवात करून ‘ ऑटो डा गिल व्हिसेंट ’, ‘ अलफाजेम डी सँटारेम ’ व ‘ फ्रे लुइझ डी सूझा ’ वगैरे नाटकें त्यानें लिहिलीं आहेत

पार्लमेंटमध्यें १८३७ सालीं प्रवेश झाल्यावर वक्ता म्हणून त्याचा फार लौकिक झाला त्यानें कॉपिराइट बिल पार्लमेंटात आणलें व त्याचें १८५१ मध्यें कायद्यात रूपांतर झाल्यावर इंग्लंड व प्रशिया देशांतहि असे कायदे पास झाले राजकारणाचा उद्योग सुरू असतानाच ‘ डी फिलिपा डी व्हिल्हेना ’, ‘ व्हायजेन्स ना मिन्हा टेरा ’, ‘ सोव्हिनहो डा मार्थिझ ’ व ‘ रोमान्सिरो ’ वगैरे ग्रंथ त्यानें लिहिले १८५० सालीं त्यास व्हायकाउंट पद प्राप्त झालें ‘ कॉन्सेल्हो अल्ट्रामॅरिनो ’, व ‘ लॉ ऑफ दि मिझरिकॉर्डिअस ’ वगैरे कायदेग्रंथ १८५२ मध्यें त्याच्या लेखणींतून उतरले नतर तो परराष्ट्रीय खात्याचा प्रधान झाला ‘ फॉल्हस काहिडास ’ नांवाचें उत्कट भावनाप्रधान काव्य लिहून त्यानें मोठी कीर्ति मिळविली त्याचें शेवटचें पुस्तक म्हणजे ‘ हेलेना ’ नामक कादंबरी होय परंतु ती ९ डिसेंबर १८५४ मध्यें गॅरेट्टनें इहलोक सोडल्यामुळें अपूर्णावस्थेंतच राहिली आहे. कवि, कादंबरीकार, नाटककार, वृत्तपत्रकार व वक्ता या दृष्टीनें गॅरेट हा मूर्तिमंत वाङ्मयच होता असें म्हणण्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं

उत्कट धर्मश्रद्धेशिवाय गॅरेटमध्यें खोल विचार, स्वयंभु प्रतिभा, सदभिरुचि व विशाल सहानुभूति हे गुण वसत होते. त्याचा व्यापक मायाळूपणा, देशाभिमान, श्रीमंती डामडौल व दिमाख, त्याची भुरळ पाडणारी मोहकता, त्याचें बुद्धिमत्व इत्यादि अष्टपैलूपणाचें मूळ त्याच्या विदग्धकलात्मक मनोरचनेंत असलेलें आढळून येतें. त्याचीं उत्कट, गंभीर व शोकपूर्ण भावगीतें त्याच्या नाट्यसृष्टींतील पूर्णता व वैचित्र्य, त्याच्या वक्तृत्वातील तेज, विनोदांत चमकणारें सत्य व त्याच्या लेखनांत प्रगट होणारें सौंदर्य इत्यादि विविध गुणांचें अधिष्ठान त्याच्या नैसर्गिक कलात्मक मनोरचनेंत होतें. ‘ फोलहास कॉहिडास ’ व ‘फ्रेलुइझ डी सूझा’ हे त्याचे ग्रंथ वरील गुणांची साक्ष देऊं शकतील. एकंदर २४ भागात त्याचे सर्व ग्रंथ संपूर्ण झाले असून त्याच्या कित्येक आवृत्तीहि निघाल्या आहेत.

**गरोठ**—इंदूर संस्थानांतील रामपुरा—भानपुरा सुभा यतींचें मुख्य ठिकाण प्रथमतः हें भिल्लांनीं वसवलें असावें. पुढें १६ व्या शतकांत तें चंद्रावत रजपुतांकडे आलें. ऐति-हासिक दृष्ट्या हें महत्त्वाचें आहे. कारण याच ठिकाणीं मॉन्सन यास यशवंतराव होळकर याच्या पुढें माघार घ्यावी लागली. १८११ मध्यें गरोठ येथें यशवंतराव होळकरास भानपुराहून आणलें होतें. कारण तेथें त्याला भूतबाधा होते असें असें म्हणतात. १८३८–४२ पर्यंत येथें महिदपूर कॉन्टिजन्टची एक तुकडी ठेवण्यात आली होती. कारण त्या वेळीं सोंधिया लोकांनीं दंगेधोपे आरंभिले होते. सुभा आफि-सरहि येथेंच रहातो. येथें एक शाळा, दवाखाना व इन्स्पे-क्शन बंगला आहे. लोकसंख्या सारी (१९०१) ३४५५ होती पण नागदा–मथुरा रेल्वे यावरून गेल्यामुळें अलीकडे वस्ती वाढत आहे. येथून १४ मैलांवर पोला डोंगरांत ८ व्या किंवा ९ व्या शतकांतली बौद्ध लेणीं आहेत.

**गरोडा**—या लोकांची वस्ती राजपुताना व बडोदें संस्थान यांतून आहे. लोकसंख्या (१९११) १७२३१. हे दक्षिण गुजराथ प्रांतांतील भंगी लोकांखेरीज करून इतर सर्व अस्पृश्य जातींचे उपाध्याय आहेत. ते आपल्याला ब्राह्मण म्हणवितात. आपल्या कुलपुरुषानें गुरुभगिनीशीं विवाह केल्यामुळें आपला ऱ्हास झाला असें सांगतात. त्यांच्या जातीविषयीं आणखी बऱ्याच कथा आहेत. त्यांच्यांत असलेल्या दवे, जोशी, नागर वगैरे नांवांवरून ते मूळचे ब्राह्मण असावेत असें दिसतें. पण गोहे व गाधिया ही रजपूत नांवेंहि त्यांच्यांत आढळतात. हे धेडांच्या पंक्तीला जेवतात, व वाटेल तें खातात. ब्राह्मणाप्रमाणें ते रोज जेवणापूर्वी स्नान करतात. ते राम, देवी व तुळशी वगैरे देवतांना भजतात, व ब्राह्मणाप्रमाणें व्रतोपवासहि करतात. कित्येक गरोडा लोक रामानंदी व परिणामी पंथाचे आहेत. लग्नांत बाजरीच्या पिठाचें स्थंडिल (शाथियो) करून त्यावर एखाद्या सौभाग्य द्रव्यानें नवग्रह मांडण्या-करितां नऊ घरें करितात. अशा स्थंडिलास 'चौरी (?)' असें म्हणतात. चौरीजवळ एक गोधडी अंथरून तिजवर नवरानवरीस बसवितात. त्यांच्यापुढें (चौरीजवळ) एक पाण्याचें भांडें, तुपाची वाटी व तुपाचा दिवा लावून ठेवि-तात. नंतर नवरीचा भाऊ किंवा आतेभाऊ त्या वधूवरांच्या हातांत मणगटाजवळ 'मींढळ' नांवाचें फळ सुताच्या नाड्यांत ओंवून तें बांधितो व एकमेकांचे हात एकमेकांच्या हातांत घालून त्या उभयतांकडून तुपाच्या दिव्याभोंवतीं चार प्रदक्षिणा करवितो. नंतर वधूचा बाप वधूच्या पदरीं व वराचा बाप वराच्या पदरीं एक एक पैसा बांधितो, आणि दोघांच्या वस्त्रांचे पदर एकत्र बांधून त्या जोडप्यास वराच्या जानवसघरीं नेतात. म्हणजे लग्नविधि आटोपला.

यांच्यांत मृतांना जाळतात व श्राद्धविधि करितात. जातींतील भांडणें तोडण्यासाठीं पंचायती असतात. [मु गॅ अलोनी–लग्नविधि व सोहळे]

**गरौथा**—संयुक्त प्रांत झांशी जिल्ह्यांतील एक तालुका. उ. अ. २५°२३ ते २५°४९' पू. रे. ७९°१ते७९°२५'. क्षेत्र-फळ ४२६ चौ. मैल. लोकसंख्या (१९११) ७२,६२६. एकदर खेडीं १९० व एक शहर आहे. जमीन थोडीशी काळी असून बाकीची अगदीं कनिष्ठ दर्जाची आहे. सान्याचें उत्पन्न (१९०३–४) १,२५००० व इतर कर २४,००० रुपये. ११४ चौ. मैल जमीन नहिताखालीं होती. अलीकडे २० वर्षे काण (?) नांवाच्या गवताच्या वाढामुळें जमीन भरा-भर पडित होत आहे.

**गरौली**—बुंदेलखंड एजन्सींतलें एक लहानसें सनदी संस्थान. क्षे. फ. ३९ चौ. मै. लो. सं. (१९११) ५२२२. १८१२ मध्यें दिवाण गोपाळसिंग बुंदेला याला दिलेल्या सनदेनें ब्रिटिश सरकारनें हें संस्थान मान्य केलें. अली बहादुराच्या स्वारीच्या वेळीं गोपाळसिंगानें कोत्री परगणा बळकावला होता. बुंदेलखंड घेतांना इंग्रजांना यानें बराच अडथळा केला. पण अखेरीस त्यास शरण येणें भाग पडलें. पन्नाच्या महा-राजानें त्याला १८ खेडीं बहाल केलीं. हल्लींच्या जहागिर-दाराला १९०४ मध्यें अधिकार मिळाले. जहागिरींत १७ खेडीं आहेत. ११ चौरस मैल जमीन लागवडींत आहे व २५००० रु. वसूल आहे. मुख्य ठिकाण गरौली हें धसाण नदीच्या काठीं आहे. तेथील वस्ती (१९०१) ८७८.

**गर्ग** (१)—वैदिक कालामध्यें गर्ग कुलाची स्थापना झाली व त्याचें श्रौत धर्मांत थोडेसें वैशिष्ट्य स्थापन झालें. गर्गत्रिरात्र नांवाची एक सोमसंस्था वेदग्रंथांत वर्णिली आहे. या प्राचीन गर्गांचा ज्योतिषाशीं संबंध दिसत नाहीं. पुराणांत गर्गांचें स्वरूप निराळें दिसतें. कालयवन नांवाच्या एका परक्या जातीच्या शिष्याचा हा पुरस्कर्ता होता आणि त्यामार्फत कांहीं सामा-जिक क्रांति घडवून आणणारा एक गर्ग दृष्टीस पडतो. याज्ञ-वल्क्याबरोबर वादविवाद करणारी प्रसिद्ध विदुषी गार्गी ही कोणत्या गर्गाची मुलगी असावी हें निश्चित होत नाहीं.

(२) एक प्राचीन ज्योतिषी, यादवांचा उपाध्याय गर्ग व हा एकच कीं काय हें सांगतां येणार नाहीं. कारण गर्ग नांवाच्या पौराणिक व्यक्ती अनेक आहेत. वराहमिहिरानें आपल्या ग्रंथांतून जागोजाग सर्व प्राचीन ग्रंथकाराच्या आधीं गर्गाचा उल्लेख केला आहे. यावरून गर्गसंहिता अत्यंत प्राचीन दिसते. हल्लीं गर्गसंहिता दोन तीन प्रकारच्या उपलब्ध आहेत. त्यांत मूळ कोणती हें ठरविणें कठिण पडेल. गर्गाला ज्योतिषी मुनींच्या वाक्यांत प्रमाण मानितात. तेव्हां त्याच्या नांवावर वाटेल तीं विधानें दडपून देण्याची बुद्धी कोणी प्रचलित आहे. वृद्ध गर्ग नांवाचा ज्योतिषी वेगळा दिसतो. याचाहि वराहमिहिरानें अनेकदां उल्लेख केला आहे. तो वराहापूर्वीं दोन तीनशें वर्षे होऊन गेलेला दिसतो.

**गर्गोव्हिआ**—आरव्हर्नी प्रांतांचें राजधानीचें शहर. हें मान्समर्थाल पूडी डोमपासून आठ मैलावर असून एका टेकडीवर वसलें आहे. इ. स. पूर्वी ५२ व्या वर्षी ज्युलिअस सीझरनें या शहरावर हल्ला केला. त्या वेळच्या कांहीं भिंतींचे अवशेष अजून दृष्टीस पडतात. गॉल प्रांत हातीं आल्यावर येथील रहिवाशांनीं या शहराचा त्याग केला. व आगस्टोनीमेटम या नवीन शहरांत जाऊन वस्ती केली.

**गर्दभील**—कुशान राजांपैकीं शेवटचा राजा वासुदेव. याच्या नंतर ख्रि. श. च्या तिसऱ्या शतकांत उत्तर हिंदुस्थानांत कांहीं वर्षे साम्राज्यसत्ता अशी कोणती एकच न राहतां, अनेक लहान लहान राज्यें सर्वत्र पसरलीं. पुराणाच्या आधारावरून त्यावेळीं वायव्येकडून ज्या बाह्य लोकांच्या टोळ्या इकडे आल्या व ज्यांनीं आंध्रांच्या साम्राज्याचा नाश झाल्यानंतर आपलीं राज्यें स्थापलीं, त्या आभीर, शक, यवन, बाल्हिक या लोकांबरोबरच गर्दभील यांचेंहि नांव सांपडतें. या गर्दभीलांनींहि आपलें एक छोटेंसें राज्य स्थापन केलें होतें. वरील सर्व लोकांचीं राज्यें समकालीन असून ठिकठिकाणीं पसरलेलीं होतीं [ स्मिथ-अर्लि हिस्टरी ऑफ इंडिया. ]

**गर्भधारण, आयुर्वेदीय**—वयांत आलेल्या स्त्रीपुरुषांचीं आर्तव व शुक्र हीं शुद्ध असून स्त्रीची योनी व गर्भाशय हीं शुद्ध असतां गर्भधारणा होते. याशिवाय हृदयाची ( मनाची ) प्रसन्नता व वायूची समता, यांचीहि गर्भधारणेस आवश्यकता आहे. स्त्री सोळा वर्षांच्या पुढें व पुरुष वीस वर्षांच्या पुढें प्रायः वयांत येतात. या वयांत झालेली संततीच पराक्रमी व दीर्घायुषी निपजते.

वयाच्या बाराव्या वर्षापासून पन्नास वर्षेपर्यंत प्रायः दरमहा कफमिश्रित रक्त स्त्रियांच्या योनिमार्गांतून येतें. त्यास आर्तव म्हणतात. हें आर्तव वायु, पित्त व कफ या दोषांनीं युक्त, तसेंच दुर्गंधी, गाठाळलेलें, पुवासारखें, कमी असलेलें व निराळ्या रंगाचें असतां गर्भधारणेस अयोग्य असतें. पुरुषाचें शुक्रहि दुर्गंधी इत्यादिक व वातादिक दोषांनीं युक्त असतां बीज होण्याला असमर्थ असतें. लाखेच्या रसाप्रमाणें किंवा सशाच्या रक्ताप्रमाणें असून ज्याचा डाग वस्त्रास पडत नाहीं तें आर्तव शुद्ध समजावें. तूप, मध, व तेल यांच्या रंगासारखें असून जें पुष्कळ आणि स्निग्ध असतें तें शुक्र शुद्ध समजावें. मैथुनकालीं योनिमार्गानें पुरुषाचें शुक्र वायूच्या सहाय्यानें गर्भाशयांत जाऊन तेथील आर्तवांतील बीजाशीं शुक्रांतील बीजभाग संमिश्र होऊन गर्भधारणा होते. शंखाला ज्याप्रमाणें वळ्या असतात. त्याप्रमाणें योनीलाहि तीन वळ्या ( आवर्त ) आहेत. त्या एकामागें एक अशा आहेत. त्यांपैकीं शेवटच्या वळीला गर्भाशय जोडलेला आहे. तो रोहित नांवाच्या माशाच्या तोंडासारखा असून आकारानें तेवढाच आहे. त्याचें तोंड योनीकडे असतें. या गर्भाशयांतच गर्भ वाढतो. गर्भधारणा झाल्याबरोबर स्त्रीस दमल्यासारखें वाटतें, तहान लागते, योनीचें स्फुरण होतें, ग्लानी येते, कांतींत गडबडतें व रोमांच उभे रहातात. हीं लक्षणें चाणाक्ष स्त्रियांनाच समजतात. रजोदर्शन झाल्या दिवसापासून बारा दिवसच गर्भधारण होतें असें पुष्कळ आचार्यांचें मत आहे. परंतु बारा दिवसानंतरहि गर्भधारणा होते असें सुश्रुतकाराचें मत आहे. रजोदर्शनानंतर पहिले तीन दिवस गर्भधारणा होत नाहीं. कारण योनिमार्गानें आर्तव पुष्कळ जात असतें. त्यामुळें आंत शुक्र रहात नाहीं. कदाचित् गर्भ राहिलाच तर तो रोगी, अल्पायुषी असतो. म्हणून पहिले तीन दिवस स्त्रीनें ब्रह्मचारिणी असावें. व दुधाचें किंवा सातूचें अन्न थोडें खावें. त्या योगें कोठ्याचें नीट शोधन होतें व गर्भधारणाला योग्य अशी गर्भाशयादिकांची शुद्धि होते. स्त्री पुरुषांची ज्या प्रकारची चित्तवृत्ति असते त्या प्रकारचें मूल होतें म्हणून आईबापांनीं नेहमीं विशेषतः संभोगकालीं उदार अशा विषयांचें चिंतन करावें म्हणजे संतति चांगल्या आचारविचारांची निपजते. गर्भ स्त्री किंवा पुरुष होणें हें सुद्धां स्त्रीच्या विचारावर अवलंबून आहे असें वैद्यशास्त्रज्ञांचें मत आहे, व त्यास अनुसरूनच आपल्या सोळा संस्कारांत "पुंसवन" नांवाचा संस्कार सांगितला आहे. पुष्य नक्षत्र असेल त्यादिवशीं सोनें, चांदी किंवा लोखंड याचा पुरुषाकृति पुतळा करून तो तापवून दुधांत विझवावा व तें दूध नुकताच गर्भ राहिलेल्या स्त्रीस पाजावें म्हणजे मुलगा होतो.

रजोदर्शन झाल्यापासून चार, सहा अशा समरात्रीं किंवा अकराव्या रात्रीं गर्भ धारण झालें असतां मुलगा होतो असें कांहींचें मत आहे. गर्भधारणाच्या वेळीं शुक्र जास्त असेल तर मुलगा व आर्तव जास्त असेल तर मुलगी आणि दोन्ही सारखीं असतां नपुंसक होतो असेंहि कांहीं लोकांचें मत आहे. गर्भधारणा झाल्यानंतर म्हणजे शुक्रार्तवांचा संयोग झाल्यानंतर सात दिवसांनीं त्याचा पातळ फुगीर ठिपका (कलल) होतो. नंतर एक महिन्यानें त्या ठिपक्याचा घट्ट गोळा, किंवा चापट शिरवळीसारखा असलेला, अथवा अर्बुदाच्या आकाराचा पदार्थ बनतो. त्यापासून अनुक्रमें वाटोळा गोळा असल्यास पुरुष, चापट असल्यास स्त्री व अर्बुदाकार असल्यास तृतीयप्रकृति अशीं अपत्यें होतात. तिसऱ्या महिन्यांत दोन हात, दोन पाय व डोकें असे मधल्या अंगास पांच अवयव उत्पन्न होतात व सर्व अंगें व प्रत्यंगें यांचे सूक्ष्म आकार होतात. चवथ्या महिन्यांत सर्व अंगें व प्रत्यंगें यांचे विभाग स्पष्ट होतात. व गर्भाचें हृदय उत्पन्न होऊन तें हालूं लागतें व आतापर्यंत जें चैतन्य अव्यक्त होतें तें व्यक्त होतें. या चवथ्या महिन्यांतच गर्भाला इंद्रियार्थांच्या इच्छा होतात. सुख व दुःख जाणणारा जीवात्मा हृदयांतच असल्यामुळें ज्यावेळीं हृदय व्यक्त होतें त्यावेळीं जीवात्माहि इंद्रियांचे विषयांची इच्छा करतो म्हणून गर्भिणीस पूर्वी आवडत नसलेले

पदार्थहि गर्भाच्या इच्छेमुळें आवडूं लागतात इतकेंच नव्हे तर त्याविषयींची इच्छा अनावर होते यासच डोहाळे असें म्हणतात. डोहाळे लागले असता जे पदार्थ गर्भिणी मागेल ते अनिष्ट असले तरी थोडे देण्यास हरकत नाहीं. यावेळीं जर तिची योग्य इच्छा पूर्ण केली नाहीं तर गर्भाला अपाय होतो. केव्हा केव्हा डोहाळे न पुरविल्यामुळें गर्भिणीलाहि अपाय होतो असें सुश्रुतकाराचें मत आहे. पाचव्या व सहाव्या महिन्यात अंगादिकांची वाढ होत असून मन व बुद्धी यांची पूर्ण वाढ होते.

सातव्या महिन्यात सर्व शरीर अंगप्रत्यंगासह पूर्ण होतें. आठव्या महिन्यात ओज स्थिर नसतें. केव्हा आईच्या हृदयात तर केव्हा गर्भाच्या हृदयात असतें यामुळें प्रसूतिकाळीं आई किंवा मूल यापैकीं जेथें ओज गेलें असेल तें जगतें व दुसऱ्याचें जीवित संशयावह असतें म्हणून आठव्या महिन्यात प्रसूति होणें धोक्याचें आहे. नववा महिना लागल्यापासून योग्य प्रसूतिकाळ होतो.

प्रसूतिकाळ जरी नवव्या महिन्यापासून सुरू होतो तरी बहुतेक स्त्रियास पूर्ण नऊ महिन्यानींच प्रसूति होते. रजोदर्शन होण्याचें बंद झाल्या दिवसापासून दोनशे सत्तर दिवसानीं प्रसूति होते असा सर्वसाधारण नियम आहे परंतु यासहि पुष्कळ अपवाद आहेत व जास्तींत जास्त एक वर्ष पर्यंतहि गर्भ राहून सुखप्रसूति होते व सातव्या अगर आठव्या महिन्यातहि प्रसूति होऊन मुलें व बाळंतिणी यास काहीं एक इजा होत नाहीं. एक वर्षानंतर जर गर्भाशयात गर्भ राहील तर मात्र तो स्त्रीस विकार उत्पन्न करतो व स्वतःहि विकृत होतो. आईच्या रक्त वहाणाऱ्या नाडीला गर्भाच्या बेंबीपासून निघालेली नाडी चिकटलेली असते. त्या नाडींतून आईचें रक्त गर्भात येऊन गर्भाचे पोषण व वाढ हीं होतात. गर्भाचीं अंगें व प्रत्यंगें ज्यावेळीं नसतात त्यावेळीं म्हणजे निरवयव अवस्थेत गर्भाशयातील रक्तवाहिन्यातून पाझरणाऱ्या रसानेंच गर्भाचें पोषण होतें.

गर्भाचें कोणतें अंग प्रथम उत्पन्न होतें याबद्दल ऋषींचीं निरनिराळीं मतें आहेत. प्रथम मध्यशरीर व त्यास लागून डोकें व नंतर हातपाय होतात असें गौतमाचें मत आहे. कृतवीर्याच्या मतें प्रथम हृदय उत्पन्न होतें, कारण तें चेतनास्थान आहे, म्हणजे शरीरात हालचाल प्रथम तेथें उत्पन्न होते व बुद्धी आणि मन हीं हृदयाचा आश्रय करूनच असतात अशीं निरनिराळ्या प्रकारचीं मतें आहेत तथापि धन्वंतरीचें मत याहून निराळें आहे. त्याच्या मतें सर्व अंगें व प्रत्यंगें एकदम उत्पन्न होतात. कोणतेंहि एक अंग आधीं किंवा मग असा क्रम उत्पत्तिकाळीं नसतो मात्र तीं सर्व प्रत्यंगें त्यावेळीं सूक्ष्म असल्यामुळें आपणास दिसत नाहींत, पूर्णत्वानंतर तीं दिसतात ज्याप्रमाणें आंब्यातील केसर ( रेषा ), बाठ त्यांतील आवरण इत्यादि भाग आंबा कोंवळा असतो त्यावेळीं दिसत नाहींत,कालांतरानें तीं व्यक्त होतात त्याप्रमाणें अंगप्रत्यंगाविषयीं समजावें

ग र्भि णी प रि च र्या.—गर्भ राहिल्यापासून गर्भिणी स्त्रीनें नेहमीं आनंदित असावें. मनाला उद्वेग येईल असें काहीं ऐकूं नये व पाहूं नये. कपडे वगैरेंची शुद्धता ठेवावी, अलंकार घालावे, देवता, गुरु इत्यादि पूज्य गोष्टींच्या संनिध असून त्यांची शुश्रूषा करावी

शिळें, कुजलेलें व कोरडें अन्न खाऊं नये, ओझें उचलूं नये, तैलाभ्यंग वारंवार करूं नये. व फार श्रम करूं नये वर सांगितलेल्या गोष्टी केल्या असता गर्भपात होण्याचा संभव असतो. पातळ, गोड व स्निग्ध असें भोजन करावें, मृदु आसनावर बसावें व मऊ बिछान्यावर निजावें. साधारण्यतः नऊ महिनेपर्यंत याप्रमाणें गर्भिणीनें वागावें

पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या महिन्यात गोड, थंड व पातळ असें भोजन करावें तिसऱ्या महिन्यात दूध भात जेवावा. चवथ्या महिन्यात दूध, लोणी ( जांगल ) मास असे आवडते पदार्थ खावे पाचव्या महिन्यात तूप, दूध जास्त खावें सहाव्या महिन्यात सराट्याच्या काढ्यात तयार केलेलें तूप व पेज, सातव्या महिन्यातहि पिठवण इत्यादि औषधींमध्यें तयार केलेलें तूप प्यावें याप्रमाणें सात महिने आहार ठेवल्यास गर्भ वाढतो. आठव्या महिन्यात प्रथम आस्थापन बस्ती द्यावा. त्यानें मळाची शुद्धि होऊन वायु अनुलोम होतो. नंतर दूध व मधुर औषधाच्या काढ्यात तयार केलेल्या तेलाचा अनुवासन बस्ती द्यावा त्यानें प्रसूति सुखानें होते. आठव्या महिन्यात तूप घातलेली कण्हेरी गर्भिणीस खाण्याकरिता द्यावी. अशा रीतीनें गर्भिणीस अंतर्बाह्य स्निग्धता आली म्हणजे काहीं एक विकार न होता प्रसूति होते व प्रसूतीनंतर थकवा येत नाहीं.

नववा महिना लागताच प्रसूतीची तयारी करून ठेवावी. बाळंतिणीची खोली प्रशस्त ठिकाणीं व अगदीं लहान नसलेली अशी असावी. तींत उजेड वगैरे योग्य तितका येईल अशी व्यवस्था असावी. भिंती व जमीन चांगली सारवून ढेंकूण, चिलटें, वगैरेंचा त्रास न व्हावा म्हणून धूप घालावा बाज, सुईण, लेंगडी, वस्त्र, दोरा, औषधें वगैरे सर्व तयारी आगाऊ करून ठेवावी

**गर्भविज्ञान**—मातेच्या गर्भाशयात गर्भसंभव होऊन तो बाहेर पडेपर्यंत त्याची जी वाढ होते व मातापितराच्या रूप, आकाराशीं साम्य होत जातें त्याचें विशेष परीक्षण म्हणजे गर्भविज्ञान होय. पण या विषयाचा व्याप यापेक्षां विस्तृत आहे. बारीक व मोठ्या सर्वच प्राण्यांचे गर्भ उत्पत्तिपासून झपाट्यानें वाढून त्यांच्या आकाररूप रचनेंत विलक्षण बदल होत जातो.या स्थितीमध्यें त्या गर्भात स्वतंत्र आयुष्य नसतें व त्यास आपलें भक्ष्यहि मिळविता येत नाहीं. म्हणून तो गर्भ गर्भाशयात असतो अगर तो बाहेर पडून अंड्यामध्यें स्वस्थ पडून रहातो. मात्र डांस वगैरे काहीं कीटकाच्या

गर्भास स्वतंत्रपणें जगण्याची पात्रता असल्यामुळें ते पूर्ण वाढ होईपर्यंत त्या स्थितींत असतात व त्यास स्वतंत्रपणें जगण्यापुरतीं इंद्रियें असतात. या दोनदच्या प्रकाराच सचेतन गर्भ असें नाव देऊं. हलक्या प्राण्याच्या गर्भाचें रूपांतर होऊन पूर्ण वाढ होईपर्यंत जे फरक होत जातात त्याची काही यावतीत फरक असलेली अन्य प्रतिमा म्हणजे मानवी गर्भाचें होणारें स्थित्यंतर होय व म्हणून मानवी प्राणी श्रेष्ठ असला तरी त्याच्या गर्भविज्ञानशास्त्राच्या अभ्यासासाठीं त्याची हीन प्राण्यांशीं गर्भविज्ञान संबंधीं तुलना करावी लागते. " जन्म होईपर्यंत होणाऱ्या स्थित्यंतरांचें ज्ञान" हीहि या विषयाची व्याख्या पुरेशी होत नाहीं. कारण, मूल जन्मलें तरी तुसऱ्या वाटीखेरीज त्याच्या शरीरात पुष्कळच फेरफार व्हावयाचे असतात. त्याचप्रमाणें बेडूक अगर कोंबडीच्या पिलाचीहि स्थिति असते तें पिलूं उपजल्याबरोबर हिंडू फिरूं व दाणे टिपूं लागतें तरी त्याचा पिसारा व अवयव पूर्ण वाढ झालेल्या कोंबड्याप्रमाणें नसतात. हाच प्रकार बहुतेक अन्य प्राण्याविषयीं असतो. " जन्मापासून तारुण्यावस्थेपर्यंत होणाऱ्या फेरबदलाचें प्राण्याचें शरीरविज्ञान" अशी जरी व्याख्या घेतली तरी पुनः मानवप्राणी व इतर उच्च कोटींतील प्राणी वगळले असतां तारुण्यावस्था म्हणजे कोणती हें निश्चित करणें अवघड आहे प्रजोत्पादनक्षमता येणें हें त्या अवस्थेचें लक्षण म्हटलें तरी हें सामर्थ्य प्रगट झाल्यानंतरहि वाढ व बदल शरीरांत होतात असं काहीं जलचर प्राण्यांच्या परीक्षणावरून दिसतें. येणेप्रमाणें कोणतीहि व्याख्या केली तरी तिला परेच अपवाद सापडतात व म्हणून गर्भसंभवापासून मृत्यूपर्यंत प्राण्यामध्यें जे जे फेरबदल होतात त्यांचें ज्ञान ही व्याख्याच विशेष सयुक्तिक ठरते. हक्सले याच्याहि मतें हीच गोष्ट अनुभवास येते कीं मृत्यूपर्यंत प्राण्यात वाढीचे अगर जरेचे बदल होत असतात व वाढ कोणत्या वर्षीं थांबते व जरेमुळें होणारे बदलहि केव्हां थांबतात हें सांगता येत नाहीं या दोहोंच्या दरम्यान पूर्ण वाढीचा काळ धरला पाहिजे. प्रजोत्पादन दोन प्रकारांनीं होतें. एक जननेंद्रिय संयोगापासून व दुसरा या क्रियेविरहित होणारें प्रजोत्पादन. पहिल्या प्रकारामुळें अनेक व्यक्ती जन्मास येतात ऐवढेंच नव्हे तर व्यक्तींचे विविध प्रकारहि जन्मतात. परंतु दुसऱ्या प्रकारामुळें ज्या जातीच्या प्रथम व्यक्ती आहेत त्याच व्यक्तींच्या संततीनें त्या जातीची वाढ होते. त्यात व्यक्तिवैचित्र्य व विविधता हे गुण आढळत नाहींत. पहिल्या प्रकारामध्यें जननेंद्रियपेशी नर आणि मादी या दोन जातींच्या असतात व त्यांना रेतपेशी व अंडपेशी म्हणतात. रेतपेशींमध्यें चलनवलन व अंडपेशींत पोषणक्षमता हे धर्म असतात व या दोहोंचा पूर्ण संयोग होऊन एक नवीन संयुक्त पेशी तयार होणें म्हणजेच अंडपेशीची सफलता अगर गर्भसंभव ( नवीन व्यक्ति तयार होणें ) होय. ही व्यक्ति काहीं पोषणाच्या सांठ्यानें समृद्ध व आकारानें अंडपेशीप्रमाणें असते खरी परंतु तीमध्यें रेतपेशी असल्यामुळें नवीन व्यक्तींमध्यें उभयपक्षांचे गुणधर्म तिच्या वाढींत दिसून येतात.

यानंतर गर्भाची वाढ व्हावयाची परंतु ती ठरीवक्रमानें होण्यास अनुकूल परिस्थिती पाहिजे. त्याशिवाय मात्र ती होणार नाहीं, उलट गर्भपात होतो झाडाचें बीं हवा व ओलावा न लागेल अशा स्थलीं ठेविलें तर त्यापासून वृक्ष, व फळें यांचा उद्भव होणें अशक्य आहे. त्या बीजाला जमीन, पाणी, हवा इत्यादि अनुकूल परिस्थितीमध्यें ठेविलें तरच त्याची वाढ होते तसेंच गर्भ वाढीस लागण्याचा व प्रसव होण्याचा निसर्गाचा जो ठरीव मार्ग व प्रकार आहे त्यास अनुसरून वाढ होते. त्यात बदल करता येत नाहीं. गर्भवृद्धीबरोबर बाह्य परिस्थितीहि आपोआप बदलून गर्भवृद्धीस मदत करीत असते असें हर्बर्ट स्पेन्सरचें सुद्धा मत आहे. काहीं मर्यादेपर्यंत परिस्थितींत इष्ट बदल केल्यानें गर्भवृद्धीस मदत होते, परंतु अनिष्ट बदल झाल्यास उलट प्रकार व गर्भपातहि होतो. या गोष्टी ध्यानांत ठेऊन पक्षी वगैरे प्राणी पिंजऱ्यात ठेवून हे प्रकार पहाता येतात कांहीं जलचर प्राण्यांचें मात्र काहीं मर्यादेच्या बाहेर येणेंप्रमाणें परीक्षण करणें शक्य नसतें काहीं प्राणिशास्त्रवेत्त्यांनीं हीनप्राणीप्रजोत्पादनाचं एक नियमबद्ध शास्त्रच बनविलं आहे

रेतस्खलनाच्या वेळीं जरी लक्षावधी रेतपेशी बाहेर पडत असल्या तरी गर्भसंभव होण्यासाठीं एकच रेतपेशीची व एकच अंडपेशीची जरूरी असते अंडाशयात सर्व जन्मात ७०,००० अंडपेशी उत्पन्न होण्याची पात्रता असते त्यापैकी १५ ते ४५ वयापर्यंत म्हणजे ३० वर्षांत फक्त ४०० अंडपेशी पक्व होऊन प्रतिमासीं स्त्रियांच्या रजाबरोबर २ ४ जातात, यांपैकीं फारच थोड्या गर्भसंभवांत सापडतात असा अदाज केला आहे. अंडपेशीची सफलता अथवा गर्भसंभव कसा होतो हें वर सांगितलेंच आहे. या संयुक्त पेशींच्यामध्यें आणखी एक मध्यबिंदु उत्पन्न होतो व त्याचें कारण रेतपेशी होय. नंतर हे दोन्ही मध्य बिंदू जवळ व संयुक्त होऊन विभागत जाऊन त्या पेशींची संख्या वाढून त्याचा एक गोळा बनतो. मानवी व इतर श्रेष्ठ प्राण्यात यापुढील फेरबदल मातेच्या गर्भाशयात होतात व त्यामध्यें ही गर्भसंभव झालेली पेशी या स्थितींत लहान असते व मातेच्या शरीरातून पोषक द्रव्य गर्भास मिळत असतें परंतु हे पुढील फेरबदल पक्ष्यादि प्राण्यात मातेच्या शरीराबाहेर व्हावयाचे असले तर पोषक द्रव्याचा बराचसा साठा असलेलें अंडें बाहेर पडतें. हा साठा म्हणजे पिवळा बलक होय. या बलकावर एक जीवनपेशीचा पांढरा ठिपका असतो व तेंच पुढें अंडें फोडून बाहेर निघणारें पिलूं होय. त्याचें, भोंवतालच्या पौष्टिक बलकावर वाढ व पोषण होत असतें. वर सांगितल्याप्रमाणें असंख्य पेशींचा गोळा बनल्यानंतर त्यास

आकार प्राप्त होऊन त्यास नळीचा पोकळ आकार येतो. प्रथम याची एकच थराची बनलेली रचना असते. परंतु नंतर ते दोन थर होतात. यांपैकीं बाहेरील थरास गर्भबाह्यास्तर व आंतील थरास गर्भांतरास्तर म्हणतात. कांहीं काळानंतर या दोहोंमध्यें आणखी एक थर उत्पन्न होतो त्यास गर्भमध्यास्तर म्हणतात. यावेळीं गर्भाच्या मधील नळीचा आकार वाढतो. गर्भमध्यास्तर या नळीच्या दोन्ही बाजूंस चिकटून नंतर त्याचे दोन पापुद्रे होऊन बाहेरील गर्भबाह्यास्तराशीं संलग्न होतो. या थराची वाढ होत असतांना मधील नळी पूर्ण होण्यास गर्भाच्या वरील म्हणजे मानेच्या बाजूस आरंभ होतो या नळीमध्यें मज्जासंस्थेची मध्य नलिकाकार पोकळी असते.याशिवाय गर्भमध्यास्तराच्या दोन पापुद्र्यांतील पोकळी आणि गर्भांतास्तरांतील आंत्रपोकळी अशा दोन पोकळी असतात. नंतर नलिकाकार गर्भास दोरीनें आवळल्याप्रमाणें करकोचा पडून एक वरचा भाग ( गर्भ )व एक खालील भाग(गर्भानुबंधी)बनतो. वरील म्हणजे गर्भाच्या पुढील भागास शीर्षपुट व गर्भाच्या मागील भागास पुच्छपुट म्हणतात.शीर्षपुटामध्यें याच वेळीं बनलेलें आद्यांत्र, पुच्छपुटामध्यें अंत्यांत्र व या दोहोंमध्यें मध्यांत्र असतें. जेथें करकोचा पडून गर्भाचे दोन भाग झालेले दिसतात तेथें भावी बेंबी असते व हें बेंबीचें छिद्र गर्भावस्थेंत बराच काळ उघडें असून त्या वाटें मध्यांत्र आतड्याच्या भागाशीं जोडलें जातें. गर्भमध्यास्तराच्या पोकळीपासून हृदयावरण व अंत्रावरण या पोकळी निर्माण होऊन थोड्या अवधींत एकमेकांपासून अलग होतात. मज्जानलिकेची पोकळी बंद होण्याच्या अगोदर गर्भांतास्तराच्या खालील भागापासून मानेपर्यंत काठिण्य येत जाऊन तो भावी अस्थिपंजराचा कणा बनतो व नंतर मणके तयार होऊन त्याची पोकळी बंद होते. हे गर्भाचे मूलभूत तीन थर आहेत त्यांपासून सर्व शरीर व इंद्रियें बनतात व म्हणून, निरनिराळ्या लहान मोठ्या प्राण्यांतील कोणता भाग अथवा इंद्रिय कसा बनला असावा व त्याचें कार्य काय असावें याचा वाद सुरू झाला असता त्याचा निकाल देणारें हे थर म्हणजे गर्भविज्ञानशास्त्रांतील वरिष्ठ कोर्टच मानलें गेलें आहे. कारण तो वादग्रस्त भाग अमुक थरापासून बनतो असें प्रयोगानें अगर परीक्षणानें सिद्ध करून दिलें म्हणजे त्याच्या शरीरांतील कार्याविषयीं संदेह उरत नाहीं. यूरोपाय शास्त्रांमध्यें हें नवीन वाढतें शास्त्र असल्यामुळें असे प्रश्न वारंवार उद्भवतात. या तीन थरांपासून जे शरीराचे भाग निर्माण होतात ते असे:—

गर्भांतस्तरापासूनः—( १ ) शरीराची बाह्यत्वचा, केंस, नखें इत्यादि. ( २ ) मेंदु, कणा, व शरीरांतील सर्व प्रकारची मज्जासंस्था व स्नायू. ( ३ ) नाककानादि पंचेंद्रियांची आंतील रचना व अंतस्त्वचा. (४) मुखांतील अंतस्त्वचा व दांतांच्या वरचें शुभ्र कवच. ( ५ ) नाकांतील अंतस्त्वचा (६) गर्भाच्या मस्तकाच्या शेंड्यांतील आस्तरण. तसेंच मुख व नाकांतील ग्रंथींतील आस्तरण. ( ७ ) स्वेदपिंडातील स्नायू व डोळ्यांतील कनीनिका ( बाहुली ) स्नायू.

गर्भमध्यास्तरापासूनः—सर्व अस्थी आणि सर्व प्रकारची संधाय रचना. ( २ ) स्वेदपिंडांमधील स्नायूंखेरीज इतर सर्व प्रकारचे स्नायू. (३) सर्व प्रकारच्या शिरा, धमन्या, रक्तवाहिन्या व रसवाहक कोष व प्लीहा. (४) मूत्राशय व मूत्रमार्गाच्या अंतस्त्वचेखेरीज सर्व इतर मूत्रमार्ग व जननेंद्रियें. या थराच्या आंतील पापुद्र्यापासून अंतर्मार्गांची तंतुमय व स्नायुमय रचना सर्व रक्ताभिसरणसंस्था आणि लघवी व जननेंद्रियें. बाहेरील पापुद्र्यापासून शरीराच्या बाह्यबाजूची ( यांतच त्वचेचा समावेश होतो. ) अस्थिमय, तंतुमय व स्नायुमय रचना.

गर्भबाह्यास्तर.—( १ ) घशापासून गुदद्वारापर्यंत सर्व अंतस्त्वचा. तसेंच सर्व पिंडाच्या आंतील सर्व अंतस्त्वचा ( यकृत, प्यांक्रिया वगैरे ). ( २ ) श्वासमार्गाच्या आंतील सर्व अंतस्त्वचा. ( ३ ) कानांतील कर्णनलिका व पडद्याच्या आंतील अंतस्त्वचा ( ४-५ ) थायराइड ग्रंथीच्या आणि थायमस कप्प्यांतील अंतस्त्वचा. ( ६ ) मूत्राशय व मूत्रमार्गाच्या छिद्राजवळील भाग वगळून तेथील इतर सर्व अंतस्त्वचा. या तीनहि थरांवरून व त्याच्या निश्चित रचनेवरून अनेक वादग्रस्त मुद्दे मिटविता येतात असें वर म्हटलें आहे खरें; परंतु समुद्रांतील स्पंज व इतर प्राण्यांच्या गर्भाविषयीं विचार कर्तव्य असतां यासहि अनेक स्पष्ट अपवाद आढळून येतात. त्याचप्रमाणें मज्जासंस्थेचा नलिकाकार रचनेनें आरंभ होतो व त्याचें वरचें टोक वळून त्याचा पुढचा मेंदू बनतो या दोन्ही क्रियांमध्यें मानवीप्राणी व गोगलगाय इत्यादि हीन प्राणी यांच्या या भागाच्या गर्भावस्थेंतील रचनेमध्यें फरक असतो. मानवी प्राण्यात मेंदु, पृष्ठवंश व इतर सर्व मज्जासंस्था गर्भबाह्यास्तरापासून होतात. परंतु कांहीं इतर प्राण्यांत मेंदु व पृष्ठवंशाखेरीज इतर मज्जारचना अन्य थरापासून निर्माण होतात. असल्या व याहून सूक्ष्म व दक्ष मुद्यावर तज्ज्ञ शास्त्र्यांत वाद चालतात. परंतु त्याचा येथें विशेष विस्तार न करतां फक्त मानवी गर्भाच्या पुढील स्थित्यंतराचें वर्णन करून हा विषय संपवूं.

गर्भवेष्टण.—गर्भसंभव होऊन गर्भाशयांत गर्भ येऊन पोंचल्यावर भोंवतालची गर्भाशयांतस्त्वचा गुच्छ्याप्रमाणें जाड झालेली असते व त्या पोवळ्याच्या मुळाशीं तो गर्भ जरासा रुतून व चिकटून बसतो व त्याच्या वरील या अंतस्त्वचेच्या वेष्टणानें तो गोल व नरम आच्छादला जातो. या वेष्टणामुळें गर्भाशयाचा अंडाशयाशीं संबंध जोडणारी दोन्ही बाजूंची छिद्रें झाकली जाऊन या गर्भवेष्टणाचे तीन भाग होतात, ते असेः—(१) तळवेष्टण म्हणजे गर्भ व गर्भाशयाचा तळ यामधील वेष्टण ( २ ) छिद्रांपासून वेष्टण

म्हणजे गर्भ व गर्भाशयाची पोकळी यामध्यें आडवें असलेलें वेष्टन (३) गर्भाशयाच्या इतर भागास चिकटलेल्या वेष्टणास वास्तविक वेष्टण म्हणावें. याशिवाय गर्भ वाढून त्याच्या भोंवती आणखी दोन गर्भवेष्टणें थोड्या दिवसांनीं तयार होतात. गर्भवेष्टणाच्या बाहेरील पापुद्र्यास गर्भमध्यवेष्टण म्हणतात व त्यामध्यें रक्तवाहिन्यायुक्त शेंडे असतात ते गर्भाशयाच्या तलवेष्टणांत व मध्यवेष्टणांत घुसतात. याच्या आंत गर्भांतर्वेष्टननामक गर्भास वेढून टाकणारें पिशवीसारखें व सगळीकडून बंद असलेलें वेष्टण असतें. व हें गर्भाच्या बेंबीशीं गर्भास चिकटलेलें असतें. त्यामध्यें जो द्रवपदार्थ असतो त्यांत गर्भ तरंगतो. नाभिरज्जुनामक रक्तवाहिन्यायुक्त बंधनानें गर्भ मध्यवेष्टणाशीं जोडलेला असतो. या रज्जूस गर्भांतर्वेष्टणाचा आवरणासारखा उपयोग होतो. शिवाय या रज्जूमध्यें नार, पोषणकोष व आत्रनलिकेशीं संबंध जोडणारी नलिकाहि असते. गर्भाच्या वाढीबरोबर गर्भाशयमध्यवेष्टणाचीहि वाढ होऊन गर्भाशयाची पोकळी भरून जाते आणि तल व वास्तविक वेष्टण चिकटून दोन्हीं एकजीव होतात. या जाड थरामध्यें पिंड असतात परंतु त्यांत रक्तवाहिन्यायुक्त गर्भमध्यवेष्टनाचे शेंडे मात्र घुसत नाहींत हे सर्व थर स्पंजाप्रमाणें जाड होत जातात व प्रसूतिसमयीं येथेंच वेष्टणें सुटण्यास आरंभ होतो.

गर्भाशयाच्या तळाशीं बराच फेरबदल होऊन रक्त साठणाऱ्या मोठमोठ्या स्पंजाप्रमाणें पोकळ जागा निर्माण होऊन त्यांत गर्भमध्यवेष्टणाचे रक्तवाहिन्यायुक्त शेंडे घुसतात आणि याचीच वार बनते. या रक्तवाहिन्या गर्भाच्या पश्चिम आतड्याकडून येतात; व तेथील वेष्टणास (अॅलेन्टॉइस) म्हणतात. वार या इंद्रियाच्या योगानें गर्भाचें पोषण व मलविसर्जन या क्रिया चालतात. गर्भ बाहेर येण्याच्या वेळीं वारेची लांबी ७-८ इंच व वजन १ पौंड असतें. गर्भाशयधमनी त्यात शुद्ध रक्ताचा पुरवठा करते व तिच्या जोडीची शीर अशुद्ध रक्त घेऊन जाते. येथील स्पंजाप्रमाणें रक्ताच्या मोकळ्या व मोठ्या फटींत गर्भाच्या रक्तवाहिन्यांचे शेंडे घुसल्यामुळें माता व गर्भ याचे रक्तप्रवाह मिश्र न होता झिरझिरांत रक्तवाहिन्यांच्या पडद्यातून शुद्ध प्राणवायु व अशुद्ध कॅर्बोनिक अॅसिड वायु आणि लघवी इत्यादि द्रव्यांची अदलाबदल होते गर्भाचें रक्त नाभिरज्जूच्या योगानें वारेंत जातें व तेथून तें मातेच्या रक्तातील शुद्ध वायू शोषतें व विषारी द्रव्यें बाहेर टाकतें. गर्भांतर्वेष्टणजल हें गर्भ व माता याच्या रक्तवाहिन्यातून द्रव पदार्थ झिरपून बनतें. त्यात नैट्रोजनयुक्त पदार्थ लघवी, क्षार व गर्भ मोठा झाल्यावर त्याचें मूत्र असतें. त्याचें काम गर्भास आसरा देऊन धक्का न लागूं देणें हें होय.

येथपर्यंतची गर्भाची वाढ व यापुढील फेरबदल विहंगम दृष्टीनें व दर महिन्याचें वर्णन केल्यानें तें आटोपशीर होऊन हा विषय समजण्यास सुलभ जाईल.

प हि ला म हि ना.—बारा दिवसाच्या सफलित संयुक्तपेशीचा व्यास १/८ इंच व गर्भाची लांबी एक दोरा असते. तिसऱ्या आठवड्यानंतर वरील व्यास १/५ इंच व गर्भाची लांबी दोन दोऱ्या होते. गर्भांतर्वेष्टण तयार होतें व पोषणकोषापासून गर्भास पोषण मिळतें. गर्भाची पाठ वक्राकार होते. व मस्तकाचा निदर्शक आडपणा तयार होतो गर्भरक्तवाहिन्याचा संबंध गर्भमध्यवेष्टणाशीं जडूं लागतो. चवथ्या आठवड्यानंतर गर्भपेशीचा व्यास १/८ इंच असून वजन २० गुंजा असतें व आता वक्राकार झालेल्या गर्भाची लांबी १/४ इंच असते. डोळे, कान व छातींतील इंद्रियें बनण्यास नुकताच आरंभ झाल्याच्या खुणा दिसतात. तसेंच झाडास फुलाची बारीक फळी यावी तशा चार कळ्या दिसतात. त्या भावी हातापायाच्या निदर्शक होत. लहान आतड्याला पोषणकोष असतो. गर्भांतर्वेष्टण फुगलेलें व मध्यवेष्टणास चिकटून एकजीव झालेलें नसतें

दु स रा म हि ना.—या कालाच्या शेवटीं गर्भपेशी १ १/२ इंच व्यासाची असून व गर्भाची सरळ लांबी ३/४ इंच असते. पोषण कोष लहान असून एका धाग्यास लोंबता असतो. भावी वार तयार होण्याच्या जागीं पेशीवर्धन सुरू होतें गर्भाची वाढ सरळ असते. गर्भांतर्वेष्टण बरेंच फुगलेलें व बाहेरील गर्भमध्यवेष्टणास चिटकलेलें असतें. बेंबीचें छिद्र बहुतेक मिटलेलें असून त्यातील आतडें किंचित् दिसतें. खालील जबडा व गळपट्टीच्या हाडामध्यें दार्ढ्य येऊं लागतें. मुख व नाक हीं ओळखता येतात. मूत्रपिंड तयार होतात.

ति स रा म हि ना.—या महिन्याच्या शेवटीं गर्भपेशी चार इंच लांब असते व वार तयार होते. गर्भमध्यवेष्टणातील रक्तवाहिन्यांचे शेंडे हें लक्षण कमी होऊं लागतें व ते साधें वेष्टण होतें गर्भाच्या नाळीची लांबी वाढते. व ती पिळवटण्यास आरंभ होतो. गर्भाची लांबी सुमारें चार साडेचार इंच असते व वजन सुमारें अडीच तोळे असतें. डोकें आणि छाती यामधील भाग, मान, मुख आणि नाक यामधील टाळू या रचना तयार होऊन ओंठहि पूर्ण बनतात व त्यांनीं तोंड मिटलें जातें जननेंद्रियें संदिग्ध स्वरूपात निर्माण होतात. परंतु लिंगभेददर्शक अवयव तयार नसतात. बेंबीमध्यें किंचित अडकलेलें आतडें उदरात जाऊन बसतें. नखें व बोटें यासुद्धां हातपाय तयार होतात; बहुतेक हाडात दार्ढ्य येण्यास ठरीव स्थानीं आरंभ होतो.

च व था म हि ना.—याच्या अखेरीस गर्भाची लांबी साडेपाच इंच व वजन सुमारें तीन औंस असतें. स्त्रीपुरुषभेद दर्शक अवयव स्पष्ट तयार होतात. डोक्याच्या कवटीच्या हाडांमध्यें दार्ढ्य येण्यास आरंभ झाला असला तरी त्यामधील सांध्यामध्यें फटी व त्याच्या कोपऱ्यात अपुऱ्या अस्थी असल्यामुळें अस्थिकोनरंध्रें दिसतात. गर्भाच्या लांबीपैकीं एक चतुर्थांश मस्तकानें व्यापला जातो. शरीरावर किंचित् लव दिसण्यास प्रारंभ होतो. हातापायामध्यें चळवळ करण्याची प्रवृत्ति सुरू

होते. तिसरा महिना पुरा होण्याच्या किंचित् अगोदर गर्भपात होण्याबरोबर गर्भ पाहिला तर हातापायांतील चळवळ दृष्टीस पडते.

पा च वा म हि ना.–याच्या अखेरीस गर्भाची लांबी नऊ इंच व वजन सुमारें अकरा औंस भरतें शरीरावर तैलयुक्त चिकट स्निग्धता येण्यास आरंभ होतो. गर्भाच्या आकारापेक्षा अद्याप गर्भांत वेष्टणजल अधिक असते. यावेळीं उपजलेल्या गर्भांत हस्तपादादिकांचें चलनवलन जोरानें सुरू असतें व तें कांहीं तासपर्यंत टिकतें

स हा वा म हि ना —याच्या शेवटीं गर्भाची लांबी बारा इंच व वजन चोवीस औंस भरतें. भिवया व पापण्याचे केंस तयार होतात शरीरांत जेथें वसा असावी अशा ठिकाणीं ती तयार होऊं लागते. परंतु ती थोडी असल्यामुळें एकंदरींत त्वचेस अमळ सुरकुत्या पडलेल्या असतात. लघुआंत्रामध्यें पिंवळा मळासारखा पदार्थ असतो व काळसर रंगाचा तसलाच पदार्थ महांत्रांत बनण्यास नुकताच आरंभ होतो. डोक्यावरील केंस लांब होतात

सा त वा म हि ना —याच्या शेवटीं गर्भाची लांबी सव्वा फूट व वजन पंचेचाळीस औंस भरतें पापण्या उघड्या असतात. एका बाजूचें अंड ( पुरुष गर्भ असल्यास ) उदरांतून खालीं अंडाशयांत उतरतें नखें जाड होऊं लागतात पण अद्यापर्यंत त्यांची वाढ व्हावयाची असते. अठ्ठावीस आठवडे पूर्ण भरल्याखेरीज उपजलेला गर्भ जगावयाचा संभव फारसा नसतो असें बहुमत आहे याच्या अगोदर उपजलेलीं मुलें कांहीं तास अगर दिवसच फक्त जगतात यास अपवादात्मक अशीं लहान मुलें जगल्याचीं उदाहरणें खरीं आहेत. पण त्यांतील गर्भाधानात्मक व त्याच्या अगोदरचा रजोदर्शन काल यांची माहिती आईबापांनीं जशी दिली असेल त्यावरून वर मोजलेलीं हीं उदाहरणें आहेत

आ ठ वा म हि ना—याच्या अखेरीस साडेसोळापासून सतरा इंचापर्यंत गर्भाची लांबी व वजन साडेचारपासून सतरा पौंडापर्यंत असतें वसावृद्धि झाल्यामुळें सुरकुत्या जाऊन गर्भ पुष्ट दिसतो. अंडाशयांत एकच अंड उतरलेलें व तेंहि बहुधा डाव्या बाजूचें असतें. यावेळीं उपजलेलीं मुलें चळवळ करण्यांत जरा मंद व वरीचशीं झोंपाळू असतात तशीं पुरे दिवस भरलेलीं मुलें नसतात. त्यांची विशेष निगा राखली नाहीं तर पूर्ण मास भरलेल्या लेंकरांपेक्षां या लेंकरांतील मृत्युसंख्येचें प्रमाण अधिक असतें.

न व वा म हि ना.–याच्या अखेरीस जन्मलेल्या मुलाची लांबी २० इंच व सात पौंड वजन भरतें या कालापूर्वी उपजलेलीं मुलें वर्णानें यावेळीं जितकीं लाल दिसतात तसें हें नसतें; तर त्याचा वर्ण अमळ पांढुरकाच गोरा असतो. हातापायांच्या नखांची पूर्ण वाढ होऊन हाताचीं नखें तर आणखी वाढून पुढें आलेलीं असतात. डोक्यावरील केंस एक दोन इंच लांब वाढून त्यांचा काळा रंग असतो. अंडाशयांत यावेळीं दोन्ही अंड उतरलेले असतात. याच्या अगोदर बेंबी कटिराच्या बाजूकडे खालीं असते ती यावेळीं शरीराच्या साधारण मधोमध येते म्हणजे खऱ्या बिंदूपेक्षा ती फक्त पाऊण इंच खालीं असते. प्रसूतीस वेळ लागला तर मुलाचें तोंड व शरीर काळें निळें होतें. व तें मूल मुळींच अथवा फारसें रडत नाहीं. पण तसें नसलें तर उपजताक्षणीं मोठ्यानें " ट्याहा ट्याहा " करीत रडतें व एकसारखें हातपाय हलवितें. थोड्या वेळानें त्यास लघवी व हिरव्या पिंगट काळसर रंगाची मलशुद्धि होते

वर दिलेल्या वजनापेक्षा एक दोन पौंड अधिक वजनाचीं मुलें जन्मल्याचीं पुष्कळ उदाहरणें घडतात. पांच पौंडापेक्षा कमी वजन असलेलें मूल जगण्याचा संभव एकंदरीनें कमी असतो, परंतु अशीं मुलें जगल्याचीं उदाहरणेंहि कांहीं थोडीं थोडकीं नाहींत या वजनाचें मूल अपुऱ्या मासाचें जन्मलें तर तें जगण्याचा संभव अधिक असतो. दहा पौंड वजनाचीं मुलें क्वचित जन्मतात व त्याहून फारच क्वचित बारा पौंड वजनहि आढळण्यांत आलें आहे. बारापासून पुढें पंधरा व अठरा पौंड वजनाचीं मुलें झाल्याचा लेखी वृत्तांत विश्वसनीय डाक्टराच्या हातचा आहे. पण हीं मुलें मृत उपजलेलीं अगर शस्त्रप्रसूतीनें व तींहि मृतावस्थेंत काटलेलीं होतीं. साडे चोवीस इंचापर्यंत गर्भाची लांबी नमूद आहे मुलाचें वजन मुलीच्यापेक्षां उपजताच जास्त असतें. मातेच्या मागाहूनच्या प्रसूतींमध्यें तिच्या लेंकरांचें उपजता वेळचें वजन वाढतें याचें कारण पंचवीस ते पस्तीस वयाच्या दरम्यान मातेस अधिक वजनाचीं मुलें होतात. या वयानंतर उपजलेल्या मुलाचें वजन पुनः कमी कमी होऊं लागतें. शस्त्रप्रसूतीची अवश्यकता कटिर प्रदेश चिंचोळा व निरुंद असल्यास अधिक असण्याची भीति असते. मूल उपजल्यानंतर दोन तीन दिवस म्हणजे मातेच्या स्तनांत दुग्धोत्पत्ति नीटशी होईपर्यंत मुलाचें उपजत वजन कांहींसें कमी होतें नंतर तें पुन पूर्ववत होऊन यथाक्रमानें वाढत जातें. उपजत लेंकरांची मोठी संख्या अजमावून पहातां मुलें आणि मुली यांचें परस्पर तुलनात्मक प्रमाण १०६ मुलगे : १०० मुली असें पडतें.

मूल उपजण्यापूर्वी गर्भामध्यें रक्ताभिसरण कसें होतें.—वारेंतून शुद्धरक्तवाहक शीर निघते तिला नाभिशीर म्हणतात. ती यकृतांतील आडव्या भेगेंत प्रवेश करून नंतर तिच्या दोन शाखा होतात. यापैकीं थोरली शाखा यकृत धमनीशीं संयुक्त होऊन यकृतास शुद्ध रक्ताचा पुरवठा करते व धाकटी शाखा, अधस्थ महत्तम शिरेमध्यें प्रवेश करिते. म्हणजे शरीरांतील रक्तांत प्रवेश होण्यापूर्वी गर्भाच्या शुद्धरक्तास यकृतपिंडांतून प्रथम जावें लागतें. आणि गर्भावस्था वृद्धिंगत होतांना हें रक्ताभिसरणाचें प्रमाण वाढत जातें. हृदयाचें ऊर्ध्वस्थ दक्षिणपुटामध्यें याप्रमाणें शुद्ध व अशुद्ध

# गर्भविज्ञान

१ महिन्याचा गर्भ.



३ महिन्यांचा गर्भ



पूर्ण वाढलेला गर्भ.



गर्भाशय व त्याचे आनुषंगिक भाग. (पुढचें अंग)




१ गर्भाशयाचें बूड २ गर्भाशयाचें छिद्र ३ योनि ४ अंडाशय ५ अंडाशयाचें बंधन ६-६ गर्भाशयाचीं बंधनें

## गर्भावस्थेचीतुलना. गर्भविज्ञान.













डुक्कर. गाय. ससा. मनुष्य.






असा मिश्र रक्ताचा प्रवाह अधस्थ महत्तम शिरेच्या वाटें येतो. त्या रक्ताचा वारेंतून निघून हातापायांतील रक्तवाहिन्यांवाटें येणारा भाग व यकृतमार्गे येणारा भाग (म्हणजे रक्त) अशा रीतीनें ऊर्ध्वस्थ दक्षिणपुटात येतो. गर्भाच्या आरंभावस्थेत हा प्रवाह ऊर्ध्वस्थ दक्षिणपुटातून गर्भावस्थेत असलेल्या लंबवर्तुलाकार छिद्रातून ऊर्ध्वस्थ वामपुटामध्यें एका पडद्यानें लोटला जातो व त्यातून तो अधस्थ वामपुटात लोटला जातो. शरीराच्या डोकें वगैरेवरील अवयवातील अशुद्ध रक्त ऊर्ध्वस्थ महत्तम शिरेवाटें ऊर्ध्वस्थ दक्षिणपुटात प्रवेश करून नंतर अधस्थ दक्षिणपुटांत व तेथून फुफ्फुसधमनीत जातें. त्यापैकीं अल्प भाग फुफ्फुसांत जाऊन बहुतेक रक्त धमन्याकार नाडींतून वामस्कंधधमनीच्या उगमाजवळ महत्तम धमनींत प्रवेश करतें व नंतर खालील हातपाय वगैरे भागात तें जातें. तात्पर्य हे कीं या आरंभावस्थेमध्यें हृद्दक्षिणपुटांत शुद्ध व अशुद्ध रक्तप्रवाहाचें मिश्रण होणें पडद्याच्या योगानें घडत नाहीं ही मौज आहे. तसेंच हात, दंड, मान व शिर यास शुद्ध रक्ताचा पुरवठा होतो व कमरेखालील भागास बहुतेक अशुद्ध रक्ताचा पुरवठा होतो. म्हणून या अवस्थेंतील गर्भाचें डोकें इतर भागापेक्षा मोठें दिसतें. गर्भावस्थेंतील मध्य कालापासून हा प्रकार बदलतो. दक्षिणपुटातील पडदा बारीक होतो व छिद्राचा पडदा अधिक मजबूत होतो. म्हणून अधस्थ महत्तम धमनींतून येणाऱ्या शुद्ध रक्ताचा काहीं भाग हृद्दक्षिणोर्ध्वस्थपुटात स्थिर होतो. आणि तो धमन्याकार नाडीमार्गें महत्तम धमनींत प्रवेश करतो. म्हणजे असें घडूं लागल्यापासून गर्भशरीराच्या खालील भागास अशुद्ध रक्ताच्या ऐवजीं मिश्र रक्त मिळूं लागल्यामुळें या कालापासून खालील शरीरास अधिक पुष्टि येते. मान, डोकें, हात याना पूर्वीप्रमाणें शुद्ध रक्त मिळणें चालूं असतेंच.

**मूल उपजल्या नंतर वरील रक्ताभिसरणप्रकारामध्यें होणारे फेरबदल**—पहिला श्वासोच्छ्वास सुरू झाल्याबरोबर फुफ्फुसांत हवेचा प्रवेश होतो; व नंतर फुफ्फुसधमन्या मोठ्या होऊन त्यांतून खूप रक्त फुफ्फुसात शिरूं लागतें व तें पुन्हां ऊर्ध्वस्थ वामहृत्पुटात परत येतें व म्हणून तेथील पोकळींतील दाब वाढतो. याच सुमारास वार सुटून मोकळी झाल्यामुळें तींतील रक्ताभिसरण बंद पडतें व म्हणून नाभीच्या शिरेमधील प्रवाह थांबल्यामुळें ऊर्ध्वस्थ दक्षिणहृत्पुटांतील दाब कमी होतो.या दोन्ही कारणामुळें अधस्थ वामहृत्पुटातील दाब उजवीकडील हृत्पुटापेक्षां अधिकच असतो. तेथें जें दीर्घवर्तुळाकार छिद्र दोन्ही ऊर्ध्वस्थ हृत्पुटामध्यें असतें त्याचा पडदा बंद होतो व उजव्या पुटातील रक्तप्रवाह थेट डाव्या पुटामध्यें पूर्ववत् जाईनासा होतो. शिवाय अधस्थदक्षिणपुटांतील रक्त फुफ्फुसांत क्षणोक्षणीं खेचलें जाऊं लागल्याबरोबर धमन्याकार नाडींतील दाब कमी होतो व नंतर त्या नाडीचा आकारहि क्रमाक्रमानें बारीक होऊन तींतील पोकळीहि काहीं दिवसानीं बुजून जाते. तींतील रक्त गोठल्याशिवाय हें सर्व घडतें. दीर्घवर्तुळाकार छिद्राच्या सुमाराशीं जो पडदा असतो त्याच्या कडा चिकटतात व एकमेकाशीं जुळून येतात. यानंतर काहीं दिवस छिद्र जरी मिटलेलें नसलें तरी त्यातून गर्भावस्थेप्रमाणें रक्तप्रवाह जाऊं शकत नाहीं. तें पुढें जर न मिटलें तर मुलाचा वर्ण काळवटलेला असतो. धमन्याकार नाडींतून अधस्थ महत्तम धमनीमध्यें रक्तप्रवाह जाईनासा झाल्याबरोबर त्या महत्तम धमनींतील दाब कमी होतो. नाभिधमन्यातील रक्त गोठून त्या सुकून बारीक होतात व नंतर बुजतात

**गर्भांतील यकृताचें कार्य.**—हें अतिशय महत्त्वाचें असतें हें रक्ताभिसरण त्यातून होतें यावरून लक्षात येईलच गर्भाच्या आकाराच्या मानानें गर्भावस्थेत या पिंडाचा आकार पुष्कळच मोठा असतो. यावेळीं शर्कराहि तेथें अधिक प्रमाणात असते. यकृताचें मधुशर्करासंचयाचे कार्य गर्भावस्थेत विशेष जोरानें चालत असावें. हा पिंड तयार होण्यापूर्वी हें कार्य वार अगर दुसऱ्या एखाद्या भागाकडून होतें असा संभव दिसतो. पाचव्या महिन्यापासून यकृतामध्यें पित्ताची उत्पत्ति होऊन तें आपलें कार्य करूं लागतें.

**गर्भाची मज्जासंस्था.**—जन्मापर्यंत मेंदूंतील मज्जापेशी अगदींच बाल्यावस्थेंत असतात. परंतु त्यापासून मधूनमधून चलनवलनात्मक शक्तीचे वेगप्रवाह सुटत असावे असें गर्भाच्या हालचालीवरून व मातेच्या उदरास व शरीरास स्पर्श केल्यानें होणाऱ्या गर्भाच्या हालचालीवरून वाटतें. येणेंप्रमाणें मानव गर्भविज्ञानास प्राधान्येंकरून इतर प्राण्याच्या गर्भतुलनात्मक गर्भविज्ञानाचीहि माहिती दिली आहे. या विषयाला हल्लींचें शास्त्रीय व व्यवस्थित स्वरूप गेल्या शंभर सवाशें वर्षांतच आलें आहे. तथापि या आरंभीं रुक्ष व नीरस वाटणाऱ्या विषयाची लालसा यूरोपस्थ पंडितामध्यें किती जुनी आहे, याचा अति संक्षिप्त इतिहास मनोरंजक व अनुकरणीय असल्यामुळें तो थोडासा या पुढें दिला आहे. अति प्राचीन ग्रीक तत्ववेत्ता आरिस्टॉटल व यूरोपीय वैद्यशास्त्राचा आद्य ऋषि गॅलन यानें अंड्यातील व इतर प्राण्यातील गर्भावस्थेचें बरेच दिवस निरीक्षण केलें होतें. मागाहूनच्या पंडितानीं त्याच्या शोधात थोडी भर टाकली. परंतु सूक्ष्मदर्शक यंत्राचा शोध निघाल्यापासून सूक्ष्मगर्भ रचनेचा अभ्यास करता येऊं लागल्यामुळें त्यात झपाट्यानें प्रगति झाली. तोंपर्यंत म्हणजे १७ व्या शतकापर्यंत आपल्याकडील शारीर व वैद्यशास्त्रविषयक उपपत्तींमध्यें कल्पनाप्राधान्यच विशेष असे. कारण निरीक्षणाचीं साधनें तेव्हा नव्हतीं. रक्ताभिसरण शोधून काढणारा हार्व्हे यानेंच वरील अंड्यांतील गर्भाच्या व इतर गर्भाच्या स्थित्यंतराचें वर्णन अधिक शास्त्रशुद्ध रीतीनें केलें. सूक्ष्मदर्शक यंत्राच्या मदतीनें या ज्ञानात

अधिक भर टाकणारा बलोना येथील मालपिघी हा व दुसरा ग्राफ हे दोघे पंडित होत. यांनी शारीरशास्त्रात शोध लावले असल्यामुळें शरीरातील काहीं सूक्ष्म रचनेस त्यांचीं नावें दिलीं आहेत. अठराव्या शतकात हॉलर नामक महापंडितानें (इ स १७५७–१७६६) इंद्रियविज्ञानशास्त्रावर मोठा ग्रंथ लिहून या विषयात शोधाची भर टाकली व डार्विनच्या उत्क्रांतितत्वाच्या प्रास्ताविक उपपत्तीचा शोध यानें लावला असें म्हणण्यास हरकत नाहीं. वूल्फ नामक पंडित १७३३–९४च्या दरम्यान होऊन गेला त्याच्या नावावरून गर्भाच्या काही रचनेस नाव दिलें गेलें आहे गर्भावस्थेंतील भ्रूणोत्पत्तीवर शोध लावून प्रसिद्ध केला, त्याकडे कोणी इतर शास्त्रज्ञ लक्षहि देईनात व त्यावर विश्वास ठेवीनात. परंतु प्रसिद्ध शास्त्रज्ञ व अज्ञेयवादी हेकेल यानें त्या शोधास अनुमति देऊन त्या लेखाचें जर्मन भाषेंत भाषांतर केल्यावर आधुनिक गर्भविज्ञानशास्त्राचा आद्य संस्थापक असें त्यास इतर पंडित म्हणू लागले १७७५ सालीं विल्यम हंटर व त्याचा बंधु यांनी मानवी गर्भावस्था यावर एक उत्कृष्ट व सचित्र ग्रंथ तयार केला त्यानें या शास्त्रासंबंधीं व शारीरविज्ञान व इंद्रियविज्ञानशास्त्रासंबंधीं प्रेक्षणीय व दुर्मिळ नमुन्यांचें व चित्रांचें खाजगी कायम संग्रहालय केलें होतें व त्यातील प्रत्येक वस्तूंची वर्णनात्मक सूचीहि छापून तयार केली होती हें संग्रहालय अमोल ठेवा म्हणून मानलें जातें हें युक्तच होय. याशिवाय वर निर्देश केलेला जर्मन पंडित हेकेल यानें व दुसऱ्या पुष्कळ शोधकांनीं १७८९ पासून १८१६ याच्या दरम्यान या ज्ञानात भर टाकली.

बेयर नामक एक शोधक होऊन गेला, त्यानें आपल्या आत्मचरित्रात प्यांडर या १७९४-१८६५ च्या दरम्यान हयात असलेल्या मित्राचा व शोधक गृहस्थाचा गौरवपूर्वक उल्लेख करून त्या दोघांपूर्वी डॉलिंजर नामक पंडितानें अर्धवट लावलेल्या शोधाचें अर्धवट काम लायक माणसाच्या अभावीं बंद पडलें होतें तें पुढें चालविण्यास हा मनुष्य योग्य आहे अशी खात्री करून देऊन त्याच्या गळ्यात तें काम घातलें व प्यांडरनेंहि आपली जबाबदारी ओळखून नवीन शोध लावून ही जबाबदारी पार पाडली. प्यांडर व बेयर हे जर्मनींत वर्झबर्ग या गावीं असत बेयर हा डॉलिंजर नामक पंडितासाठीं प्रेतविच्छेदकाचें काम करीत असे व तो डॉलिंजरबरोबर तुलनात्मक शारीरविज्ञानाचा अभ्यास करी. म्हणून प्यांडरच्या शोधाच्या कामीं तो लायक असूनहि त्यात मन घालण्यास त्यास तितपतच फुरसत मिळे व तेवढें अल्प लक्ष तो त्या शोधात घाली. व म्हणूनच प्यांडरनें तें शोधाचें काम सोडल्यावर १८१९ सालीं बेयर यानें ते शोध पुढें सुरू ठेविले. कोनिग्सबर्ग येथील विद्यापीठामध्यें बरडाक व रथके या दोघा महान् योग्यतेच्या पंडिताचा तो समकालीन व समानस्वभावी होता. बरडाकच्या नांवावरून [illegible]तील काहीं रचनेस त्याचें नांव दिलें आहे. शोधकावरून शरीररचनेस नाव देण्याची यूरोपात चालच दिसते. येथें नामनिर्देश न केलेले असे अनेक शोधक होऊन गेले व त्यांनीं या ज्ञानात आपआपली भर आणून टाकली आहे. बेयर यास आधुनिक शास्त्रज्ञच समजतात. यानें १८२९ च्या सुमारास या विषयावर मोठा ग्रंथ लिहिला आहे. त्यातील विशेष हा की त्यातील शोधाची माहिती फार बिनचूक, पूर्ण मतें व उपपत्ति असलेली, सर्वांना पटणारी व पूर्ण शोधाअंतीं दिलेली अतएव अत्यंत विश्वसनीय अशी असे. त्याच्या कृतींत दोष राहिला तो हा कीं, मूलभूत ज्या ज्या प्राथमिक नाना पेशीपासून शरीराचे भाग व इंद्रियें बनतात तें अति सूक्ष्म रचना वर्णन त्या ग्रंथात व त्याच्या पूर्वीच्या ग्रंथात नाहीं हें बिकट काम लीज येथील श्वॉन या पंडितानें १८३९ सालीं तयार करून या मूलभूत पेशींतील उद्भिज्ज व प्राणिकोटींत साम्य कसें आहे हें उघड करून दाखविलें यानें प्रचलित केलेलीच उपपत्ति अद्याप या व प्राणिशास्त्राच्या पाठशालांतून चालू आहे यानंतर कॉलिकर आणि मेचीन कॉफ या महान् शोधकांनीं पेशीवर्धनक्रिया ही मूलजीवन पेशीपासून होऊन व तीहि नानाप्रकारानें होऊन त्यापासून इंद्रियादि शरीराचे भाग तयार होतात हें सिद्ध केलें उपरिनिर्दिष्ट श्वॉन याच्या ग्रंथाचें इंग्रजींत भाषांतर इ. स १८४१ त सिडनहॅम सोसायटी नामक संस्थेसाठीं हेनरी स्मिथ या गृहस्थानें केलें. बर्लिन येथील व्हॉन पुरकिंजे यानें नाव मेंदूंतील काहीं प्रकारच्या मज्जापेशींस दिलें आहे त्यानेंहि गर्भसंभव होताच सफलित संयुक्त पेशींत होणाऱ्या बदलाचा शोध लाविला वर गर्भाचीं प्रतिमाभास अनुसरून स्थित्यंतरें दिलीं आहेत त्याविषयीं बरेच शोध १८२० ते १८४० च्या दरम्यान भराभर लागले यात प्रिव्होस्ट व ड्यूमास यांनीं बरेच श्रम केले व त्याचप्रमाणें म्यूलर व दुसऱ्या अनेकांनीं लहानमोठे ग्रंथ प्रकाशित करून गर्भविज्ञानवृद्धि केली असें म्हणण्यास हरकत नाहीं. १८५० पासून पुढें लहानमोठे शोध पुष्कल शोधकांनीं इतके लावले कीं, नामनिर्देश कोणाचा करावा व कोणास वगळावें हें लेखनमर्यादेमुळें अवघड झालें आहे. ससा, कुत्रा, गिनीपिग व हरिण या प्राण्यांवर प्रयोग व निरीक्षण करून हे शोध लागले. रथके यानें याच काळात सर्प व सरपटणाऱ्या प्राण्यांतील गर्भविज्ञानासंबंधीं शोध लाविले व रेमॅक यानें बेडूक व कोंबडा यांच्या संबंधीं शोध लाविले पुढें १८५९ मध्यें हक्स्ले यानें अस्थिपंजरसहित व अस्थिपंजररहित प्राण्यामध्यें गर्भसंभवानंतर जे तीन थर होतात त्यातील साम्य दाखविलें. कारण यापूर्वी यांत काहींहि साम्य नाही असेंच मत रूढ होतें. इ. स. १८५९ या सालीं डार्विनचा "नानाप्राणिविशेषोत्पत्तिपद्धति" हा प्रसिद्ध ग्रंथ निर्माण झाला. जीवनपेशीच्या शोधानें जी नवी क्रांति या शास्त्रांत घडविली तिला पुष्टिदायक अशी उपपत्ति या ग्रंथांत कथन केली आहे. व त्यामुळें शारीरशास्त्र, गर्भविज्ञानशास्त्र व तत्संबंधी इतर विषयांची

परस्पर संगति लावणें कठिण जात होतें तेंया ग्रंथानें सुलभ झालें. या ग्रंथाच्या मतें प्राण्याच्या गर्भावस्थेतील रचनेचा व स्थितीचा आपण तपास लावला तर त्याच्या पूर्वेतिहासाचा इतिहास व त्या जातींतून 'उत्क्रांतितत्त्वानें' बदल होत जाऊन उत्तरोत्तर नवीन पिढीस 'मर्कटाचा मानव' या म्हणीप्रमाणे हळूहळू स्थित्यंतर कशीं होत जातात हें स्पष्ट होतें. त्यामुळें प्राणिजातिवर्गीकरण करणें अधिक शास्त्रशुद्ध होतें. गर्भावस्थेत नर व मादी कशी उत्पन्न होतात हें आपणास कळत असल्याचा भाव कांहीं बेजबाबदार व अशास्त्रीय ग्रंथकार आपल्या प्रजोत्पादन या विषयावरील ग्रंथात आणतात व मनाप्रमाणें स्त्री अगर पुरुष संततीवर उपायहि ते सुचवितात. परंतु वरील सर्व जगमान्य शोधकाच्या मतानें ही गोष्ट आज पर्यंत सिद्ध झालेली नाहीं म्हणून वाचकवर्गानें त्यावर विश्वास तितपतच ठेवावा. वरील इतिहास देण्याचें कारण यूरोपीय पंडित किती चिकाटीनें या व अशा विषयाची कास धरतात हें मनन करून आपल्या देशात जुन्या चिकित्सा पद्धतींचें पुनरुज्जीवन करतांना आधुनिक शोधांना डोळ्यापुढें ठेवून पूर्वपरंपरा व नवीन युग यांचा मिलाफ करावा, आपल्या देशास हल्लीं मानवेल व पटेल अशी चिकित्सापद्धति व अध्ययन व अध्यापनमार्ग रूढ करावेत. जुन्याचा अगर नव्याचा फाजील अभिमान धरूं नये.

**गर्भाधान संस्कार.**—सोळा संस्कारांपैकीं पहिला संस्कार. स्त्रीच्या ठिकाणीं पुरुषानें गर्भाची स्थापना करणें या संस्कारास गर्भाधान संस्कार असें म्हणतात. गर्भाधान संस्काराचा प्रत्यक्ष उल्लेख संहिताग्रंथातून नाहीं. परंतु गर्भधारणा कशी होते, गर्भाच्या देवता कोण यासंबंधी कांहीं मंत्र ऋग्वेद (१०,१८४) व अथर्ववेद(५. २५) या संहितांतून आढळतात. पैकीं अथर्ववेदातील उल्लेख जास्त स्पष्ट आहे हल्लीं होत असलेल्या प्रयोगानुसारी गर्भाधान संस्कारास मूलाधार सूत्रग्रंथांचा आहे. बहुतेक सूत्रकारांनीं आपापल्या गृह्यसूत्रात या संस्काराचा स्पष्ट उल्लेख केला आहे. आश्वलायन सूत्रात या संस्काराचा स्पष्ट उल्लेख नसल्यामुळें आश्वलायन परिशिष्टकारांनीं तो सविस्तर दिला आहे. हा संस्कार ऋतुस्नात स्त्रीच्या पाचव्या दिवसापासून सोळाव्या दिवसापर्यंतच्या एखाद्या शुभदिनीं करावयाचा असतो. सत्यापाढ सूत्र या संस्कारास ऋतुमतीचा चवथा दिवसहि प्रशस्त मानितें. या संस्कारास उक्तदिन व त्यांचीं शुभाशुभ फलें यांचें विस्तृत विवेचन मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतिकारांनी व धर्मसिंधु, निर्णयसिंधुकारांनी केलें आहे हा संस्कार करण्यापूर्वी त्याच दिवशीं रजोदर्शनकालीं असलेल्या दुष्टमास व दुष्टदिन यांच्या निरासार्थ भुवनेश्वरी नामक शांति करतात ही शांति बौधायन सूत्रात पठित आहे. गर्भाधान संस्कारात मुख्य कर्म म्हणजे गृह्याग्नीवर प्राजापत्य स्थालीपाक करणें. भार्येच्या दक्षिण नासिकेंत अश्वगंधा वनस्पतीचा रस सेचन करणें व संभोगकाली (प्रयोगकारांनीं दिलेले व संहिताग्रंथात असलेले) मंत्र पठण करणें इत्यादि आहे. या विधींत भिन्न भिन्न सूत्रानुसार कांहीं फरकहि आढळतो. गर्भाधान संस्कार हा क्षेत्रसंस्कार असल्यामुळें एकवारच करावा, प्रतिगर्भास करूं नये असें कांहीं ग्रंथकारांचें मत आहे.

**गन्हा**—हें ग्वाल्हेरच्या रेसिडेंटाच्या नजरेखालील सेंट्रल इंडिया एजन्सीमधील एक छोटेखानी संस्थान आहे. क्षेत्रफळ ४४ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) १२४०२. पूर्वी याचा समावेश राघूगड संस्थानात होत असे पण अंत.कलहामुळें शिंची घराणें विभक्त झालें व १८४३ मध्यें विजयसिंग याला ५२ खेडीं मिळाली. याप्रमाणें येथील राजा राघूगडच्या खिची चव्हाण रजपुतांपैकीं असून त्याला राजा हा किताब आहे. संस्थानचें उत्पन्न २२००० व खर्च १३००० आहे. जामनेर हें कारभाराचें मुख्य ठिकाण आहे. तेथें एक दवाखाना व शाळा आहे. खुद्द गन्हा हें मुख्य व महत्वाचें स्थळ असून तेथेंहि एक दवाखाना व शाळा यांची सोय केली आहे.

**गन्हार्ट**(१८१६-१८५६) —या रसायनशास्त्रज्ञाचा जन्म स्ट्रासबर्ग येथें झाला तेथील शाळेतच त्याच्या शिक्षणक्रमास सुरुवात होऊन पुढें लाइझाक येथें ओटो एर्डमानजवळ तो रसायनशास्त्र शिकला लीबिग, डुमास, चेवरूल इ. तत्कालिन शास्त्रज्ञांशीं याचा परिचय झाला होता व त्याच्याजवळ त्यानें कांहीं दिवस कामहि केलें, परंतु तो स्वतंत्र विचाराचा असल्यामुळें त्याचें कोणाशींच पटेना. तो आपल्या बापाशींहि एकदोनदा भांडला. यानें कांहीं अम्लाचे अनार्द्र क्षार तयार केले. याचे शोध फारसे महत्त्वाचे नाहींत त्यानें अणु, परमाणु, अणूंची घटना इत्यादिकांसंबंधी नवीन कल्पना प्रचारात आणल्या हें त्याचें काम महत्वाचें होय. तो स्ट्रासबर्ग येथेंच १८५६ त मरण पावला

**गलगनाथ**—मुंबई इलाखा धारवाड जिल्हा. करजगीच्या ईशान्येस सुमारें २० मैलावर तुगभद्रेच्या वामतीरावर हा गाव आहे येथें गर्गेश्वर आणि हनुमान यांचीं देवळें आहेत. गर्गेश्वर देऊळ वर्धा नदी व तुंगभद्रा नदी याच्या पवित्र संगमावर बांधलें असून देवळात इ स १०८० आणि ११४७ सालचे दोन शिलालेख आहेत हनुमानाच्या देवळात इ. स. १०११ सालचा एक वीरकल आहे.

**गलगली**—विजापूर जिल्ह्यात कलादगीपासून उत्तरेकडे सात कोसावर कृष्णा नदीच्या काठीं हें गाव आहे हें गाव बरेंच जुनाट असून याला गालवक्षेत्र म्हणतात येथें गालव ऋषि इतर सहा ऋषींसह रहात असत असें सांगून, गावाच्या दक्षिणेस डोंगरात त्यांची आश्रमाची जागा अजूनहि दाखविली जाते कृष्णेच्या पात्रात एक जुनाट देऊळ आहे तें एकदां (१८७६-७७) भयंकर दुष्काळ पडला असता, कृष्णा आटली होती तेव्हां थोडेसें दिसलें होतें तें १०० फूट

औरसचौरस आहे असें म्हणतात तेथेंच येहमार्चे व इतर दोन तीन देवळें आहेत संभाजी महाराजांना मारल्यानंतर मराठ्यांना दक्षिणेंत कोंडून मारावें म्हणून औरंगझेब हा आपल्या प्रचंड सैन्यानिशीं ब्रह्मपुरीहून गलगलें येथें आला तो येथें सहा वर्षे (१६८९-९५) छावणी करून होता त्यावेळीं (१६९५) गेमेली करेरी नावाचा एक इटालियन प्रवासी गोव्याहून गलगलीस गेला होता त्यानें औरंगझेबाची भेट घेतली होती तो म्हणतो कीं, ही छावणी पंधरा कोस लांब पसरली असून तीस साठ हजार घोडदळ, दहा लाख पायदळ, पन्नास हजार उंट, तीन हजार हत्ती होते म्हणजे तें एक पांच लाख माणसांचें चालतेंबोलतें शहरच होतें, अडीचशें तर नुसते निरनिराळे बाजार होते इ स १७९० सालीं विजापूर सुभ्यात गलगली परगणा असून त्याचें उत्पन्न १९ हजारांचें होतें [ राजवाडे खंड १८, चतुर्थसंमेलन भा इ मं, विजापूर ग्याझे, केरिंग-मराठाज]

**गलग्रंथिदाह**—घशाच्या आरंभीं व टाळूच्या मागें प्रत्येक बाजूस एक एक असा प्रत्येक माणसास दोन गांठी असतात व एरव्हीं त्या फुगलल्या दिसत नाहींत परंतु थंडी अगर उष्णतेमुळें किंवा अशुद्ध हवेंत राहिल्यानें कित्येक माणसांमध्यें या पिंडांचा दाह होण्याची प्रवृत्ति दिसते तसें झाल्यास हा पिंड सुजून फुगतो व लाल दिसतो व त्यावरच पिंवळे, पांढरे, पुवासारखे दिसणारे कण दृष्टीस पडतात यांत पुष्कळ प्रकारचे जंतू सांपडतात व हे पिंड लाळीनें बरेच आच्छादित असतात खालच्या जबड्याचा हाडफाळकोपरा जो मान व कान यांमध्यें असतो तेथ ही सुजलेली गांठ हातास लागते याहून तीव्र रोगांत लाल व पांढऱ्या-पिंवळ्या दाट स्रावाचें प्रमाण अधिक असतें व घटसर्प रोगाचा पापुद्रा घशांत अडकला आहे किंवा काय असा भास होतो सूज बहुधा दोन्ही पिंडांस येते व त्याबरोबर कसें सेंच वाटणें, जिभेवर बुरशी, ताप, घशांत दुखणें व काहींहि गिळतांना अडचण ही बहुतेक तापाचीं लक्षणें व इतर काहीं लक्षणें रोग्यास होतात मानेंतील रसग्रंथी मोठमोठ्या होतात एकंदरींत या पिंडामध्यें जोराची दाहक्रिया सुरू होऊन तिचें पर्यवसान गळवांतहि होण्याचा पुष्कळ संभव असतो गळू एका अगर दोन्ही बाजूस होतें आणि मग नेहमींपेक्षां फार लाल व दुप्पट आकाराचा हा पिंड दिसतो व फुगून घशाच्या मधोमध येऊन पडजिभेसहि चिकटतो. त्यावर श्लेष्मा फार असल्यामुळें तो पिंड चकाकतो व अति लाल म्हणजे काळा निळाहि होतो जबड्याखालीं फुगलेली गांठ हातास चांगलीच कळते व डोळ्यांनीं दिसतेंहि मूळच्या तापांत थंडी फार वाजून वांतीहि होते ताप १०३°-४° पर्यंत वाढून त्याबरोबर असणारीं नेहमींचीं इतर लक्षणेंहि तीव्रतर होतात गिळणें व बोलणें मवळमवळ अशक्यच होतें तोंडांत लाळ असून ती वारंवार थुंकावी लागते दोन ते चार दिवसांत गांठ पक्व होते, म्हणजे तींत पू होतो व गांठ बाहेरून दोन्ही हातांनीं तपासून पाहिली तर मिलबिलीत झालेली बोटास लागते ही गांठ फोडली नाहीं तर आपोआप फुटून ताप उतरतो व चारआठ दिवसांनीं प्राय रोगी लवकर बरा होऊं लागतो गळू आत फुटून मानेंत पू जाऊन इजा झाल्याचीं उदाहरणें फार क्वचितच घडतात ताप अधिक असल्यामुळें हे गलग्रंथीचें गळू होत आहे नुसता दाह नव्हे असें ओळखता येतें

उ प चा र—गलग्रंथिदाह असल्यास कोयनेल द्यावें रोगी फार अशक्त असल्यास पोर्ट नामक मद्य द्यावें जंतुघ्न औषध घशास काडीच्या टोंकाए कापूस गुंडाळून त्यानें लावावें हें औषध तुरट व संकोचनशील असावें, म्हणजे सूज शमते यांत गळू होत असेल तेव्हां करण्याचे प्रकार:—आरंभावस्थेमध्यें बर्फ घशांत चघळीत जावा व त्याशिवाय बाहेरूनहि लावल्यानें फायदा होतो पोटामध्यें रोज तीन वेळा सोडा सॅलिसीलेट हें औषध देत जावें किंवा प्रत्येक वडीमध्यें ३ ग्रेन असलेल्या ग्वायाकम नामक औषधाच्या वड्या तोंडांत ठेवून त्यापासून सुटणारा रस गिळीत जावा पू झाला असें वाटूं लागलें कीं, शेकण्यानें व बाहेरून पोटीस लावण्यानें तें गळू पिकण्यास मदत होते तें फोडण्यासाठीं चाकूचा टोंक फक्त अर्धा इंच उघडा ठेवून त्याचा बाकीचा भाग गमप्लास्टरच्या पट्टीनें चिटकवावा म्हणजे गळवांत तो चाकू भोसकला तरी आंत मोठी धमनी आहे तिला इजा होत नाहीं कापण्याच्या अगोदर घशास कोकेनचा तुषार उडवून बधिर करावें पातळ अन्न व तेंहि कोमट करून रोग्यास द्यावें उत्तेजक व शक्तिदायक औषधें मागाहून रोग्यास द्यावीं

**आ यु र्वे दी य**—गळ्याच्या रोगापैकीं नेहमींचा म्हणजे स्वरभेद किंवा घोगरेपणा, ओरडून भाषण केल्यानें किंवा पाठ म्हटल्यानें, विष, दुखापत, शैत्य यापासून हा उद्भवतो त्याचे सहा प्रकार असून कफवातादि रस, मेदवृद्धि व कफक्षय यानें तो उत्पन्न होतो आवाज घोगरा, बारीक आणि कर्कश व गाढवाच्या ओरडण्यासारखा होतो, किंवा घशांत आग होते, किंवा खाकरा साचतो शब्द उच्चारणें फार कठिण जातें किंवा धुरानें आवाज कोंडल्यासारखा, किंवा अगदीं बंद होतो किंवा घशांत शब्द अडकतात व अस्फुट होतात यास कोमट पाणी, तूप व इतर स्निग्ध औषधें घालून प्यावीं शिवाय वातिकारक व गुळवाचीं औषधें बस्ती व हुंगण्याचीं औषधें घ्यावीं असें चरकसुश्रुतादि ग्रंथांत सांगितलें आहे. रोहिणी, रोहिणीका ( लालपणा ) म्हणजे घशांत जिभेच्या मुळाशीं मोठी सूज येऊन फार दुखणें यानुळें जास्तींतजास्त तीन दिवसांत मृत्यु येतो पण हुषार वैद्य हा रोग बराहि तावडतोब करतो मांस वाढल्यानें घसा बंद होऊन गुदमरल्यानेंहि मृत्यु येतो या रोगाचे आणखी जाचक ऊहि प्रकार आहेत विशेषत रक्तापासून झालेला रोग असतो त्यांत घशांत पुष्कळ लहान लहान फोड येतात साध्य रोगी असतील त्यांच्यावर रक्तस्राव, शांतिकारक औषधें, अंत श्वास, गुरगुळे, वाफारे

वगैरे उपाय करावे कंठात खाकेरा दाटल्यानें गलग्रह उद्भवतो. त्याच्याशींच कंठशालुकाचें साम्य असावें, कारण त्यातहि गळा सुजून कठिण व खडबडीत होऊन दुखूं लागतो. तें म्हातार्‍यानेंच उत्पन्न होऊन त्यामुळें कांट्याप्रमाणें टोंचूं लागतें, तें शस्त्रक्रियेनें बरें होतें. जिभेच्या टोंकाप्रमाणें जिभेवर सूज (पडजीभ) येत असते तिला अधिजीव म्हणतात आणि ती घातक असते. वलय म्हणून मोठी व पुष्कळ सूज येते तीहि असाध्य असते. तिच्यामुळें अन्न जाण्यालाच अडथळा येतो. हा श्वासोच्छ्‌वासप्रतिबंधक व त्रासदायक बलास रोग व अथर्ववेदांत उल्लेखिलेला बलास एकच किंवा काय याबद्दल संशय आहे; कारण त्याचेंहि कारण कफ असेंच सांगितलें आहे. शतघ्नी म्हणजे मांस वाढून कठिण व त्रासदायक सूज येणें, गलविद्रधि म्हणजे सुजीनें गळा बंद होणें, गलघ म्हणजे गळ्यांत सूज येऊन घाणेरपणें, श्वासोच्छ्‌वासाला अडथळा होणें, स्वरघ्न म्हणजे कफानें श्वासनलिका बंद होऊन घोगरेपणा, श्लेष्मा किंवा कोरड उत्पन्न होणें, आणि मांसतान म्हणजे 'मांसाचे गोळे' (कंठांतील) यांत सूज येऊन खालच्या बाजूस लोंबणें व त्यानें हळूहळू गळा भरून जाणें इत्यादि सर्व प्रकार प्रत्यक्ष घातकच असतात, किंवा निदान फार भयंकर तरी असतात. एकंदर गलरोगाचे पांच प्रकार (रोहिणीचे प्रकार धरून दहा) आहेत. या सामान्य वर्णनावरून यामध्येंच कप व घटसर्प (वलयरोग) यांचा अन्तर्भाव होतो किंवा नाहीं याचा निर्णय करतां येत नाहीं.

**गॅलॉट्स्**—रुमानियाच्या कोव्हर्लुईभागांतील मुख्य ठिकाण हें डान्यूब नदीच्या कांठीं आहे. येथील लो. सं. १९१४मध्यें ७२५१२ होती. पैकीं १२००० ज्यू लोक होते. हें आरमाराचें ठिकाण असून येथें फौजेच्या तिसर्‍या तुकडीचें मुख्य ठिकाण आहे व तिचें संरक्षण किल्ल्याच्या रांगेनें केलें आहे. परंतु हें शहर व्यापाराकरितां विशेष महत्त्वाचें आहे. हें मोल्डेव्हियांत प्रवेश करण्याकरितां मुख्य बंदर आहे. कारण येथें डान्यूब, सेरेथ व प्रूथ हे तीन जलमार्ग मिळत असून शिवाय सर्व सुपीक प्रदेशांतून येथें आगगाडी जोडलेली आहे येथें पुष्कळ सूत कातण्याच्या गिरण्या व कणिकेच्या गिरण्या आहेत. येथील बोटीचा व्यापार बहुतेक परकीयांच्या ताब्यांत आहे व त्यांत ब्रिटिश हे मुख्य आहेत.

**गॅलिपोली**—गॅलिपोली हें यूरोपीयन तुर्कस्तानांतील आड्रियानोपल विलायत (जिल्हा) मधील बंदर व मुख्य शहर आहे. हें दार्दानेल्सच्या वायव्य टोंकास असलेल्या एका अरुंद द्वीपकल्पावर आड्रियानोपलच्या दक्षिणेस ९० मैलांवर आहे. लोकसंख्या (१९०५) सुमारें २५०००. याच्या अगदीं समोर आशियाखंडांत लॅंपसकी आहे. हें शहर दिसण्यांत प्रेक्षणीय नसून यांतील रस्ते अरुंद व घाणेरडे आहेत. फक्त बाजारांतील इमारती काय त्या चांगल्या आहेत रोमन व बायझन्टाईन काळांतील कांहीं अवशेष मात्र महत्त्वाचे आहेत खडकावर बांधलेलें दीपगृह फार मजेदार दिसतें गॅलिपोलीला दोन बंदरें आहेत. हें तुर्की आरमाराचें मुख्य बंदर आहे. दार्दानेल्सचें नाकें म्हणून १८५४ त हें फ्रेंच व ब्रिटिश फौजेनें घेतलें होतें. दार्दानेल्सची सामुद्रधुनी मार्मोराच्या समुद्रास जेथें मिळते तितका भाग गॅलिपोली येथील तोफांच्या टप्प्यांत येतो. शहराची विशेष तटबंदी नसून जेथें दार्दानेल्स अरुंद आहे तेथें मात्र मजबुती केली आहे गॅलिपोली जिल्हा (संजाक) फार सुपीक आहे. ह्याची लोकसंख्या १ लक्ष असून याचे चार तुकडे (भाग) पडतात ते येणें प्रमाणें.—(१) मैटास, हें सुंदर कापसासाठीं प्रसिद्ध आहे. (२) केशन–गुरांचा बाजार, धान्य, अळशी, कॅनरीच्या बिया वगैरे साठीं प्रसिद्ध आहे (३) मायरिओ फायतो (४) शारकी. शारकी येथें लोखंड व पेट्रोलियम सांपडतें शारकीच्या जवळपास पूर्वीं चांगली दारू तयार होत असे परंतु जबर करामुळें ती तयार करणें बंद झालें.

आड्रियानोपल व ईजियन समुद्र यांना जोडणार्‍या रेल्वेनें गॅलिपोलीचा बराच व्यापार बसला. १९०४ सालीं ८०,००० पौंडाच्या मालाची निर्गत झाली त्यांत गहूं, मका, जव, ओट अळशी, कानडीं वगैरे मुख्य माल होता. लाकरीचें व सुताचें कापड, लोखंडी सामान, दोर, सर्पण, लोखंड वगैरे मालाची आयात होते

खिस्तपूर्व ५ व्या शतकांत मॅसिडोनियन शहर कॅलीपोलीस याची स्थापना झाली. येथें खिस्ती बिशपाची स्थापना होऊन मध्ययुगांत हें मोठ्या व्यापाराचें शहर बनलें व याची लोकसंख्या सुमारें एक लक्ष झाली. याचा व्यापार व लष्करी महत्त्व यामुळें पूर्वेकडील रोमन बादशहांनीं याला तटबंदी केली. कॉन्स्टांटिनोपल लॅटीन लोकांच्या ताब्यांत गेल्याबरोबर (१२०४) गॅलिपोली हें व्हेनिसच्या ताब्यांत आलें. व्हेनेशियन लोकांचा पराभव करून १२९४ त हें शहर जिनोईज लोकांनीं घेतलें १४ व्या शतकाच्या मध्यांत जेव्हां तुर्कांनीं यूरोपांत स्वारी केली त्या वेळेस गॅलिपोली हेंच पहिलें शहर त्यांच्या हातांत गेलें महायुद्धानंतर सार्वराष्ट्रीय विभागांत गॅलिपोली पडूं लागलें.

**गॅलिली**—हा रोमन प्रांत पॅलेस्टाईनमध्यें असून समेरियाच्या उत्तरेस आहे. ह्याच्या दक्षिणेस समेरिया व कार्मेल पर्वताची ओळ, पूर्वेस जार्डन नदी, उत्तरेस लेबोन्टेस (लिटानी) व पश्चिमेस भूमध्यसमुद्र व फिनिशियाचा भाग आहे

देशांतर करून परत आल्यावर यहुदी लोक जुडीयांत राहूं लागले त्यावेळीं गॅलीली हें मिश्रवर्णी लोकांच्या स्वाधीन करण्यांत आलें. रोमनसत्तेखालीं गॅलिली येथील हेरॉड घराण्यांतील सत्ताधीश रोमचे मांडलिक होते. खिस्ताचें बालपण, उपदेश व चमत्कार गॅलिलींत झाले. यरुशलेमचा नाश झाल्यावर राबी लोक गॅलिलींत येऊन गॅलिली प्रांताचे उत्तर व दक्षिण असे दोन

येथील जमीन सुपीक आहे. या देशात धान्य, दारू, तेल व साबु इत्यादि पदार्थ उत्पन्न होतात.

येथें बायझन्टाईन अंमल व धर्मयुद्ध या काळच्या पुष्कळ पडक्या इमारतींचे अवशेष आहेत. १२ व्या शतकात गॅलिली हें यरुशलेमच्या खिस्ती राज्याचें नार्क होतें. पवित्र भूमीपैकीं दक्षिण गॅलिली हाच कायतो भाग खिस्त्याच्या ताब्यात होता. परंतु एकर त्याच्या हातून गेल्यावर (१२९१) हा सर्व प्रदेश त्यांच्या हातून गेला. गॅलिलीची सध्याची वस्ति मिश्र आहे.

**गॅलिलीओ गॅलिली** (१५६४-१६४२)—या इटालियन ज्योतिष्याचें चरित्र व शास्त्रीय शोध 'विज्ञानेतिहास' (ज्ञानकोश विभाग ५, प्र ८, पृ २४५-२४७) यात दिले आहेत. यानें दुर्बिणीच्या शोधानें ज्योतिषशास्त्रात महत्त्वाची भर घातली. याचे सर्व लेख प्रथम फ्लॉरेन्स येथें (१८४२-१८५६) १६ विभागात प्रसिद्ध झाले मिसेस ऑलनेचें 'दि प्रायव्हेट लाईफ ऑफ गॅलिलीओ' (१८७०) हें त्याच्या खासगी आयुष्यक्रमावर प्रकाश पाडणारें पुस्तक आहे.

**गॅलिलीचा उपसागर**—पॅलेस्टाइनमधील सरोवर. याची लांबी १३ मैल, रुंदी ८ मैल व क्षेत्रफळ ६४ चौरस मैल आहे या सरोवराची सर्वांत जास्त खोली १५० फूट आहे. हें एका बाजूस चिंचोळें आहे हिब्रू धर्मग्रंथात याचें नाव चिनेरेथ किंवा चिनेरोथचा समुद्र असें आहे. याची धर्मग्रंथात गेनेसर, गेनेसारेट, टायबेरिआसचा समुद्र इत्यादि निरनिराळीं नावे आहेत

या सरोवराच्या भोंवतालच्या प्रदेशात पुष्कळ उष्ण झरे आहेत. या सरोवरातहि एक उष्ण झरा आहे. या झऱ्यामुळें पाण्याच्या आतील भागात कधीं कधीं खळबळ सुरू होते, भोंवतालच्या प्रदेशात भूकंप फार होतात. उपसागराचें पाणी फाऊसर व मलिन आहे तथापि तें पिण्याच्या उपयोगी आणितात. उपसागराभोंवतीं उंच डोंगर आहेत. पूर्वेकडील डोंगर २००० फूट उंचीचा आहे उपसागराची स्वाभाविक रचना अशा तऱ्हेची असल्या कारणानें हवेमध्यें तात्काल फरक होतो व त्यामुळें भयंकर वादळें होतात.

सरोवराच्या भोंवतालचीं जुनीं पहाण्याजोगीं ठिकाणें उत्तरेपासून पश्चिम दिशेला व दक्षिणेपासून पूर्व दिशेला आहेत. सरोवराच्या किनाऱ्यापासून २ मैलावर १०० फूट उंचीवर पेराजेह हें स्थान आहे, पश्चिमेस एक मोठी खिंड आहे. या खिंडीत ज्यू लोकांच्या देवालयाचे काहीं अवशेष आहेत. या देवळाच्या दक्षिण भागाला "हेलहम" नावाची जुनी इमारत आहे मिननेह या इमारतीचे अवशेष गेनेसारेथ मैदानाच्या उत्तरेस आहेत गेनेसारेथच्या दक्षिणेस मागदाल, टयुबारिया, केराक या स्थानांचे अवशेष सापडतात. उपसागराच्या पूर्व भागाचा पश्चिम भागाइतका शोध लागलेला नाहीं पूर्वभागात हिप्पोस, कालाटेल होसन, केरसा इत्यादि ठिकाणचे काहीं अवशेष आहेत.

**गॅलिशिया**—हा ऑस्ट्रियाच्या ताब्यातील एक प्रात असून त्याच्या पूर्वेस व उत्तरेस रशिया आहे. बुकोव्हिना व हंगेरी हे याच्या दक्षिणेस असून पश्चिमेस ऑस्ट्रियन व प्रशियन सायलेशिया देश आहेत या प्रांताचें क्षेत्रफळ ३०,३२१ चौरस मैल असून गॅलिशिया व लोडोमेरिया नावाचीं जुनीं राज्यें, ऑश्वनिट्झ व झेटॉरच्या जहागिऱ्या व क्रॅकौची मोठी जहागिरी या सर्वांचा त्यात समावेश होतो. कार्पेथियन पर्वताच्या उत्तर भागास हा प्रांत असून त्यात व्हिश्चुला व नीस्टर अशा मुख्य दोन नद्या आहेत गॅलिशिया व हंगेरी या देशाची सरहद्द दोहोमध्यें असलेल्या कार्पेथियन पर्वतराजीनेंच ठरविलेली दिसते क्रॅकौ या ठिकाणीं नौकागमनाई होणाऱ्या व्हिश्चुला नदीनें आपल्या तेथील अस्तित्वानें गॅलिशियाची वायव्यसरहद्द तयार केली आहे त्या ठिकाणीं पुष्कळ नद्या व उपनद्या व्हिश्चुलेस मिळतात कार्पेथियनमध्यें उगम पावणारी नीस्टर नदी सॅबॉर येथें नौकागमनाई होते प्रूथ नदीहि महत्त्वाची आहे. या प्रांतात सरोवरें थोडीं आहेत 'झॉनिका' व 'कायनिका' येथें अल्क( अल्कली )चे झरे असून कुझेसझोविस, झलो व ल्युबिअन येथें गंधकाचे झरे आहेत इवोनिक येथें आयोडाइनचे झरे आहेत गॅलिशिया प्रांत हा ऑस्ट्रियातील अत्यंत थंड प्रदेश होय. तेथील जमीन सुपीक असून मका, गहूं, ओट व सर्व कडधान्यें तेथें पिकतात. बटाटे, ताग, जवस, व तंबाखू ही चांगली पिकतात तेथील मुख्य खनिज द्रव्यें म्हटलीं म्हणजे कोळसा, मीठ व पेट्रोलियम हीं होत त्याशिवाय जस्त, लोखंड व संगमरवरी दगड वगैरे पदार्थ विपुल सापडतात. पक्का माल तयार करणारे कारखाने गॅलिशियात फारसे वाढलेले नाहींत. कलालाच्या भट्ट्या, पेट्रोलियमची निपज, करवतकामाच्या गिरण्या, कागद करणें, साखरेचे कारखाने तंबाखूचे कारखाने, इत्यादि अनेक उद्योगधंदे तेथें चालू आहेत शिवाय ताग व लोकरी कापड याचेहि कारखाने आहेत. बहुतेक व्यापार ज्यू लोकांच्या ताब्यात असून रशियाशीं व पौरस्त्य देशाशीं बराच व्यापार चालतो

१९१० सालीं, गॅलिशियाची लोकसंख्या ८०,२५,६७५ भरली होती. पोल व रुथेनियन या लोकांच्या संख्येचें प्रमाण जास्त असून कार्पेथिअनमध्यें राहणाऱ्या पोल लोकांना गोरॅलिअन म्हणतात व रुथेनियन यांना हुझुलिअन म्हणतात पोल हे रोमनकॅथॉलिक धर्माचे असून रुथेनियन ग्रीक कॅथॉलिक आहेत शिवाय ज्यू व आर्मिनियन याचीहि मोठी संख्या असून ते कॅथॉलिक धर्मी आहेत 'लेंबर्ग' व क्रॅकौ हीं प्रसिद्ध विद्यापीठें असून क्रॅको येथें एक पोलिश शास्त्रीय विद्यालय आहे. या प्रांताचे ७८ जिल्हे असून लेंबर्ग व क्रॅकौ हीं ठिकाणें स्वयंशासित आहेत

१७७२ त पोलंडची विभागणी झाल्यावर गॅलिशिया व लोडोमेरिया हीं राज्यें ऑस्ट्रियास जोडलीं गेलीं, पण १८०९ च्या व्हिएन्नाच्या तहानें पश्चिम गॅलिशिया व क्रॅको हीं ठिकाणें वार्सांच्या मोठ्या जहागिरीस जोडलीं गेलीं व १८१० त पूर्व गॅलिशियाचा भाग व टार्नोपोल रशियाच्या ताब्यात देण्यात आला. १८१४ च्या पॅरिसच्या तहानें टार्नोपोल ऑस्ट्रियास परत मिळाला व १८४६ क्रॅकोच्या प्रजासत्ताक राज्याची इतिश्री झाल्यावर पूर्व गॅलिशियाहि मिळाला. १८६१ ची घटना अमलात आल्यावर, ऑस्ट्रियन साम्राज्यातील कोणत्याहि प्रांतापेक्षा, गॅलिशियास जास्त स्वायत्तता प्राप्त झाली.

**गॅले**—गॅले हें सीलोनच्या नैर्ऋत्य किनाऱ्यावरील बंदर व शहर आहे. येथें झाडें अतिशय आहेत. या बंदरात किनाऱ्याजवळ खोल पाणी आहे. परंतु नैर्ऋत्येकडील बंदरांत बोटींना वाऱ्यामुळें प्रवेश करणें फार कठिण आहे. १८६९ मध्यें सुएझचा कालवा सुरू झाला व कोलंबो येथें बंधारा घातल्यामुळें कोलंबो येथें व्यापारी जहाजें व डाकेचें जहाज हीं जाऊं लागलीं व त्यामुळें या बंदराचें महत्व कमी झालें. गॅले जिल्ह्याची सर्व निर्गत व आयात कोलंबोहून होते. येथील लोकसंख्या १९११ मध्यें ३९,९६० होती.

१४ व्या शतकाच्या मध्यात हें शहर लहान होतें असा उल्लेख आहे. पोर्तुगीज लोक येथें आल्यापासून या बंदराला महत्व आलें आहे. पोर्तुगीज लोकांनंतर डच लोकांच्या ताब्यात जेव्हा हें गॅले तेव्हा त्यांनीं येथें तटबंदी केली, इंग्लंडच्या दुसऱ्या चार्लसच्या पोर्तुगालच्या राजकन्येशीं झालेल्या विवाहाच्या वेळीं असा तह झाला कीं, जर पोर्तुगीज लोकांनीं सीलोन पुन्हा मिळविलें तर गॅले इंग्रजांना द्यावयाचें, परंतु पोर्तुगीज लोकांनीं सीलोन मिळविलें नाहीं. सीलोन जेव्हा डच लोकांपासून इंग्रजांनीं जिंकलें तेव्हा १७९६ मध्यें हें इंग्रजांना मिळालें.

**गॅलेशिया**—(१) हें नाव ग्रीक लोकांनीं आशियामायनरमधील एका जिल्ह्याला दिलें होतें. हा जिल्हा इ. स. पूर्वी ३ ऱ्या शतकात गॅाल जातींनीं व्यापून टाकिला. ह्याच्या उत्तरेस बिथिनिया व पॅफ्लागोनिया, पश्चिमेस फ्रिजीया, दक्षिणेस लिकॅओनिया व कॅपाडोसिया आणि पूर्वेस पान्टस हे प्रांत आहेत. साधारणतः सध्याच्या अंगोरा प्रांताचा बराच भाग यांत येतो. गॅलिशिया हा आशियामायनरमधील एका मोठ्या पठाराचा भाग आहे. समुद्रसपाटीपासून २ से ३ हजार फूट उंचीवर हा जिल्हा आहे.

गॅाल लोक आशियामायनरमध्यें इ. स. पूर्वी २७८–७७ च्या सुमारास आले. त्यांनीं फारच अंदाधुंदी माजविली शेवटीं परगॅमनच्या पहिल्या अॅटलसनें त्यांचा पराभव करून त्यांना अंकिरा, पेसिनस, टेव्हियमच्या भोंवतालच्या प्रदेशात वस्ती करावयास लाविलें. अॅटलस मेल्यावर त्यांनीं रोमन प्रांतावर स्वाऱ्या केल्या. परंतु याची चांगली खोड मोडली गेली मिथ्रिडेटिक युद्धात गॅलेशियन लोकांनीं रोमला चांगली मदत केली पुढें सिसिरो व सीझर यांचा समकालीन जो डिओटेरस हा गॅलेशियाचा पहिला राजा झाला. तिसरा राजा अमिन्टास हा इ. स. पूर्वी २५ त मेल्यावर आगस्टसनें हा प्रांत आपल्या साम्राज्यास जोडिला.

गॅाल लोक येण्यापूर्वी पश्चिमगॅलेशियात फ्रिजिअन व पूर्व गॅलेशियात कॅपाडोशियन व इतर लोक होते. लोकसंख्येंत यांचा भरणा विशेष असे. यांना जिंकिल्यावर गॅाल हे सत्ताधिकारी व वरिष्ठ दर्जाचे बनले. परंतु अंगातील शौर्य कमी झाल्यावर गॅाल लोक तेथील मूळ रहिवाश्यांत मिसळले शेतकरी व खालच्या दर्जाच्या लोकात ग्रीक भाषा व संस्कृति यांचा प्रचार झाला नाहीं. परंतु ४ थ्या व ५ व्या शतकात राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण प्रथम निकोमेडिया व नंतर कॉन्स्टांटिनोपल येथें गेल्यामुळें ग्रीकसंस्कृतीचा चांगलाच फैलाव झाला.

( २ ) गॅलेशिया नांवाचा रोमन प्रांत इ. स. पूर्वी २५ त अस्तित्वात आला. यात गॅलेशिया, फ्रिजीयाचा कांहीं भाग ( अपोलेनिया, अँटीओक व इकोनियम ), पिसिडीया, लिकाओनियाचा भाग व इसारिया यांचा समावेश होई. हा १०० वर्षेपर्यंत सरहद्दीवरील प्रांत होता. यांत हळूहळू बरेच प्रांत सामील करण्यांत आले. इ. स. ७० त गॅलेशियाची जागा कॅपॉडोशियानें पटकाविली ११४त ट्रॉजननें गॅलेशियाला कमी दर्जाचा बनविला. डायओक्लेटियननें गॅलेशियाचे दोन भाग केले. उत्तरेकडील भागाला गॅलेशिया नाव राहिलें ( इ. स. २९५ ) नंतर अरब व इराणी लोकांच्या स्वाऱ्यापासून गॅलेशियाला बराच त्रास झाला. ११ व्या शतकांत गॅलेशिया सेल्जुक तुर्कांनीं घेतला व १४ व्या शतकाअंत तो ओटोमन तुर्कांच्या हातीं आला. सेंटपालनें ज्या 'गॅलेशियातील ख्रिस्ती मंदिरांना' पत्रें पाठविलीं, तीं मंदिरें उत्तरभागात होतीं कीं नाहीं याविषयीं बराच वाद आहे.

**गल्ल**—पूर्व आफ्रिकेतील बलवान हॅमिटिक लोकांना गल्ल म्हणतात. त्यांची लोकसंख्या ३० लाखापेक्षा जास्त आहे ते अबिसिनियाचे मध्यभागापासून ब्रिटिश पूर्व आफ्रिकेतील सॅबस्की नदीपर्यंतच्या मुलुखात रहातात. त्यांच्या प्राचीन वसतिस्थानाबद्दल निश्चयात्मक माहिती मिळत नाहीं. हल्लीं अबिसिनिअन साम्राज्याच्या मध्यभागाच्या दक्षिण प्रदेशाला गल्ल लोकांचा प्रदेश असें नांव आहे कारण त्या भागात गल्ल लोकांची वस्ती फार आहे. गल्ल लोकांचें कपाळ उंच, रंग पिंगट व केंस मऊ असतात. सर्वसाधारणपणें त्यांचे चेहरे यूरोपातील लोकांप्रमाणें आहेत.

गल्ल लोक पशुपालवृत्ति असून त्यांची संपत्ति म्हणजे त्यांचीं गुरेंढोरें होत. मांस, दूध, दही व मध हे त्यांच्या आहाराचे पदार्थ आहेत. त्यांच्यात कोठें एकपत्नीत्वाची तर कोठें बहुपत्नीत्वाची चाल आहे. त्यांच्यात

प्रकारचे विवाहविधी आहेत लढाईच्या वेळीं ते फार क्रूरपणानें वागतात तरी ते आपलें वचन मोडीत नाहींत भाला व दोनधारी चाकू हीं त्यांचीं हत्यारें होत त्यांच्यांत मुसुलमानी व ख्रिस्ती धर्म प्रचलित असून शिवाय कांहीं मूर्तिपूजकहि आहेत मनुष्याची उत्पत्ति सूर्यापासून झाली असा त्याची समजूत असून उत्तरेकडील गल्ल लोक सापाची पूजा करतात

**गॅल्वे, परगणा**—पश्चिम आयर्लंडच्या कॅनाट प्रांतात असून याच्या उत्तरेस मेयो व रॉस्कोमन, पूर्वेस रॉस्कोमन व किंग्सचे परगणे व टिपेरारी, दक्षिणेस क्लेअर व गॅल्वे उपसागर आणि पश्चिमेस अटलांटिक महासागर आहेत आयरिश परगण्यातील कॉर्कचे खालोखाल गॅल्वे परगण्याचें क्षेत्रफळ सुमारें १४६७८५०एकर आहे लॉफकॉरिबमुळें या परगण्याचे पूर्व आणि पश्चिम असे दोन स्वाभाविक विभाग झाले आहेत पूर्वविभागाचा दक्षिण भाग सुपीक असल्याबद्दल फार प्रसिद्धि आहे पश्चिमेकडे बालिना, किल व क्रेगान उपसागर आहेत या परगण्यात फार थोड्या नद्या असून शाननशिवाय सर्व लहान आहेत लॉफकॉरिबचें सरोवर येथील सरोवरात सर्वांत मोठें असून याच्या पश्चिमेस सुमारें २५ लहान सरोवरें आहेत लाफरी नावाचें सरोवर याच नावाच्या शहराजवळ आहे हें सरोवराच्या आसपास असलेल्या सृष्टिसौंदर्याच्या देखाव्यानें फार मनोहर दिसतें येथील किनाऱ्याच्या व अंतर्भागाच्या मनोरम देश्यामुळें या परगण्यात उन्हाळ्यात बरेच लोक येतात गॅल्वे क्लिफडेन रेल्वेमुळें पश्चिमेकडील परगण्यात जाण्याचा मार्ग सुगम झाला आहे लीलान रेन्व्हिलेहाऊस लेटर फ्रॉक, स्टीमर्हेन, क्लीफडेन आणि कशेल हीं समुद्रकाठचीं आरोग्यकारक स्थानें आहेत येथील लोकसंख्या ( इ स १९११ ) १८२२२४ होती गॅल्वे ( राजधानी ) टुआम, बलिन्स्लो, लॉघ्रिआ हीं या परगण्यातील मोठीं शहरें आहेत या परगण्याचे उत्तर, दक्षिण, पूर्व आणि कॉनेमारा असे चार पार्लमेंटरी विभाग केले आहेत

१५७९ मध्यें आयर्लंडचा लॉर्ड सर हेनरी सिडने यानें गॅल्वेचा परगणा बनविला १६९१ मध्यें आघ्रिम येथें आंग्ल राज्यक्रांतीच्या वेळीं लढाई झाली या परगण्यांत प्राचीन शिलावर्तुळें सांपडतात यांपैकीं किल्माक्डुअघ येथील चांगल्या स्थितीत आहे जुनीं स्मारकेंहि फार आहेत टुआमपासून सुमारें ६ मैलांवर नाक मॉय येथें सापडलेले अवशेष फार महत्त्वाचे आहेत टुआमचा किल्ला आयर्लंडच्या रॉडरिक ओकोनार राजानें इंग्लिशांच्या स्वारीच्या वेळीं बांधला होता अरन बेटावर जुन्या मठांचे अवशेष आहेत

**शहर**—हें आयर्लंडच्या गॅल्वे परगण्याचें मुख्य शहर, पार्लमेंटरी बरो व बंदर गॅल्वे उपसागराच्या उत्तर किनाऱ्यावर, मिडलन्ड ग्रेट वेस्टर्न रेल्वेवर आहे येथील लोकसंख्या ( १९०१ ) १३४२६ ळिंचचा महाल म्हणून एक प्रसिद्ध आहे सेंट निकोलसच्या या देवळांत केन्हराने येथून आणलेली घंटा आहे. सेंट अगस्टाइनचें देऊळ अर्वाचीन आहे या शहरात रोमन कॅथोलिक बिशप रहातो लोंकर, शेतकीचे जिन्नस व काळा संगमरवरी दगड हा मुख्य निर्गत माल आहे येथें लोखंडाचे, दारू गाळण्याचे व कुच्या व थैल्या तयार करण्याचे कारखाने आहेत १८८५ पावतों पार्लमेंटमध्ये दोन प्रतिनिधी निवडून जात होते आता फक्त एक प्रतिनिधी जातो गॅल्वे शहराचे जुनें व नवें शहर असे दोन विभाग असून क्लेडाघ उपनगरांत कोळी लोक रहातात याच्या चालीरीती, कायदे, विवाहपद्धति फार विचित्र असून याच्यात धर्म व नीतीचें उच्च ध्येय आहे गॅल्वे शहराच्या आसपासचा देखावा फार सुंदर आहे रॉसकॉम हें सर्वांत उत्तम व मनोरम स्थान आहे ओकोनॉर घराणें नामशेष झाल्यानंतर हें शहर डीबर्गोस याच्या हातीं लागलें पुढें शहराची तटबंदी होऊन येथें बरेच व्यापारी येऊन राहिले व यामुळें व्यापाराच्या दृष्टीनें हें शहर फार प्रसिद्धीस चढलें दुसऱ्या रिचर्डकडून पुष्कळशा हक्कांची सनद मिळाली १५४५ मध्यें या बंदराचा अधिकार आरान बेटावर चालावा, आणि तांग व लोंकर याशिवाय कोणताहि माल बाहेर पाठविण्याच्या हक्काची सनद मिळाली येथें क्रामवेलचे बरेच शिपाई राहिले होते १६४१ च्या यादवींत हें शहर आयर्लंडतर्फे लढलें व सर चार्लस कूटच्या पार्लमेंटरी सैन्यास शरण आलें यानंतर येथील जुन्या रहिवाश्यास येथून काढून देण्यात आलें जेम्सच्या ( २ रा ) राज्यारोहणाच्या वेळीं या लोकास पूर्वीचे हक्क मिळण्याची जी थोडीबहुत आशा होती ती विल्यम राजा आल्यामुळें फार नाहींशी झाली व जनरल गिंकेलच्या सैन्यानें दिलेल्या वेढ्यात पुन येथील लोकांना शरण जावें लागलें

**गवंडी**—गवंडीकाम करणाऱ्या लोकांची या नावानें ओळखिली जाणारी जात फक्त मुंबई इलाख्यातच आहे लो स (१९११) ३९४०९ सबंध मुंबई इलाख्याभर हे लोक पसरलेले आहेत सागर व जिरे गवंडी मातीच्या देवाच्या मूर्ती करून विकतात विजापूरमधील गवंडी पूर्वी मीठ तयार करीत असत यामध्यें ( १ ) मराठे ( २ ) जिरे ( ३ ) सागर अथवा कामाटी ( ४ ) कानडी व ( ५ ) जुनर, कादिया, सगर किंवा गुजराथी, अशा पांच पोटजाती असून एका पोटजातीचे लोक दुसऱ्या पोटजातीच्या लोकांशी विवाहसंबंध करीत नाहींत

**मराठे गवंडी**— हे मराठी कुणबी असून त्यांच्या धंद्यावरून त्यांची वेगळी जात झालेली आहे

**जिरे गवंडी**—हे पंढरपूर व सोलापूर येथें आढळतात विजापूरच्या राजाचा प्रसिद्ध गवंडी " जिरे " याच्या नांवावरून याचें नांव जिरे असें पडलें हे मूळचे मराठे कुणबी असून विजापूरच्या आदिलशाहींत (१४९०–१६८०) त्यांनीं मुसुलमानांच्या मशिदी बांधल्याबद्दल यांना १५० ६

दंड केला गेला व तो न दिल्यामुळें हे जातीबाहेर टाकिले गेले असें म्हणतात.

सा ग र ग वं डी.—हे सोलापूर जिल्ह्यात आढळतात. हे मूळचे बनारसचे रहिवासी असून ते प्रथम निजामच्या मुलुखात सोलापूर जिल्ह्यात आले. ह्या जातीचे काहीं लोक हैद्राबादमध्येंहि आहेत.

का न डी ग वं डी.—धाना धारवाड प्रांतात सागर चक्रवर्ती असेंहि नाव आहे. यामध्यें लिंगायत संस्कार बरेच आलेले असून कधीं कधीं लिंगायत उपाध्ये याचे उपाध्ये असतात.

का डि या ग वं डी.—याचे संस्कार व चालीरीती इतर कारागीर लोकाप्रमाणें आहेत. अहमदाबाद जिल्ह्यातील कडिया गवंड्याची ४० सभासदाची एक मध्यवर्ती पंचायत असून तिचा अधिकार अहमदाबाद, प्रांतेज, वढवान, लिमडी, धंदुका व सुरत यावर आहे. गुन्ह्यांबद्दल दंड होतो व जातीबाहेरहि टाकिलें जातें. काठेवाडमधील काडिया गवंड्याची ४-६ सभासदाची एक मध्यवर्ती जात पंचायती असून ती अपराधाबद्दल दंड करते. दडाचें उत्पन्न देवळाकडे व साधूंना भोजन देण्याकडे खर्चिलें जातें.

गवत—बहुतेक देशात रानमाळ जमिनीवर गवत उगवलेलें असतें, परंतु जेथें निबिड अरण्यें असतात व इतर वृक्षवनस्पती असतात अशा ठिकाणींहि गवत दृष्टीस पडतें न नागरलेल्या अशा शेताच्या कोणत्याहि भागात गवताची वाढ होते. तसेंच नागरून पडिक झालेल्या जमिनीवरहि गवत दमतें. कुरण हा शेतीचा एक महत्वाचा भाग आहे व धान्य जसें स्वस्त होईल तसें त्याचें महत्व वाढत जातें गवताच्या विविध उपजाती त्याचे विशेष, कुरणाची सुधारणा व कमी पिकाऊ अशा बहित जमिनींस गवताचीं कुरणें तयार करण्याची आवश्यकता इत्यादि प्रश्नाकडे तज्ज्ञांचें लक्ष्य लागलें आहे. बहुतेक शेतकऱ्याची इच्छा जमिनींतील काहीं भागात तरी गवत असावें अशी असते. कायमच्या कुरणातील गवताचा उपयोग गुरें चारण्याकडे व तें कापून त्याचें वाळलेलें गवत करण्याकडे होतो. तात्पुरतीं व कायमचीं अशीं दोन प्रकारचीं कुरणें असतात. सर्व प्रकारचें गवत, 'ग्रॅमिनी' नावाच्या जातीचें असतें व निरनिराळीं धान्यें, बांबू, ऊंस व भात वगैरे वनस्पतीहि वरील मूळ जातीपासून निघाल्या आहेत असें म्हणतात. कुरणातील व इतर वाळलेल्या गवताच्या उपजातींचे आंग्लवनस्पतिशास्त्रज्ञानीं वर्गीकरण केलें आहे. त्यापैकीं गवताच्या वियास उपयुक्त अशा सहाच उपजाती असून त्याचा तात्पुरत्या व कायमच्या कुरणाकडे उपयोग होतो. डॉ. डब्लू. फ्रेअॅम यानें इंग्लंडच्या कुरणांची तपासणी करून असें ठरविलें कीं, रायगवत व पांढरें गवत बहुतेक कुरणात मुख्यतः असतें. याशिवाय इतर कित्येक प्रकारचें गवत व वनस्पति शेतांत असतात व ह्यांचा उपयोग कुरणाकरितां संमिश्र बीं तयार करण्याकडे होतो. अनेक जातींचे गवत शेतात मुद्दाम लावण्यात येतें व खत वगैरे घालून तें वाढेल अशीहि तजवीज करण्यात येते. गवताच्या जातींपैकीं कोणत्या प्रकारची अधिक वाढ होते ही गोष्ट जमिनीची स्थिति,तेथील कामकाज व हवामान यावरच अवलंबून असते. बहित जमिनींत उत्तम गवताचें कुरण करण्यास योग्य असें बीं कोणतें यासंबंधी कॅंब्रिज येथें प्रयोग करण्यात आले तात्पुरतीं कुरणेंच साधारणतः फेरलागवडीकरिता तयार करण्यात येतात. व लवकर उगवणारें व लवकर नष्ट होणारें गवतच साधारणतः नेहमीं लावण्यात येतें. गवताच्या उपजाती युरोपात बऱ्याच आहेत. हंगेरिअनब्रोम, अमेरिकन प्रेरी कॅंटकी निळें गवत, अमेरिकन बफेलो ग्रास, कॅनेडिअन बफेलो ग्रास, बन्च,स्विरलटेल ग्रास व अशाच अनेक जाती ब्रिटनदेशात आढळून येत नाहींत. वरील सर्व प्रकार प्रेरी कुरणात विपुल असतात. या प्रेरी कुरणात अस्सल फ्रॅन्ड्र गवताचा एकहि नमुना आढळत नाहीं. इंग्लंडमध्यें दाट माती असलेली जमीनच गवताच्या उत्पत्तीस योग्य असते त्यावर रूळ फिरवितात व ती जमीन लागवडीस योग्य अशी करण्यात आल्यावर तेथें विपुल गवत उगवूं शकतें. गवताच्या जातींतील वनस्पती 'चारा' या लेखात विवेचिल्या आहेत हिंदुस्थानांत पुतनी, पवन्या, भातेंण, उंडेण, घोडशाडा इत्यादि गवताच्या जाती आढळतात.

रि हा अ थ वा चि नी ग व त —रिहा हें एका चिनी गवताचें नाव आहे. चीनचें व मलायाचें गवत असे दोन प्रकार एकाच जातीचे आहेत युरोपात या गवताची लागवड होऊं शकते या गवतास चीनमध्यें चुमा,कोचीनमध्यें कायगाई, बंगाल येथें कंकुर, आसामात रिहा उर्फ रिसा आणि ब्रह्मदेशात गुन अशीं विविध नावें आहेत मलाई भाषेतील नावाशीं तुलना केली असता कंकुर व रिहा ही नावें हिंदुस्थानी भाषेतील आहेत असें दिसतें. ज्याला अलीकडे बनरिहा म्हणतात त्या झाडाचें नागभाषतील नाव रिशा असें असून त्यावरून चिनी गवताला रिहा हें नाव पडलें असावें. कंकुर किंवा रिहा याचा हिंदुस्थानातील कोणत्याहि जुन्या सर्वमान्य ग्रंथात मुळींच उल्लेख नाहीं. काहीं लेखक रामी नावाच्या गवतालाच रिहा असं चुकीनें नाव देतात रामी हें प्रथम हिंदुस्थानात आलें, तेव्हा त्यास अनेक नावें मिळालीं व त्याचीं निरनिराळ्या देशातील नावेंहि अनेक आहेत. रिहा उत्पन्न होणाऱ्या प्रदेशात हिंडून पाहिलें असता असें दिसतें कीं, या जातीच्या सर्व प्रकारात साम्य आहे. चीनमधील वेंचो येथून इकडे आणलेल्या रोपाप्रमाणें हिंदुस्थानातील स्थानिक रोपे फारशीं जलद वाढीचे असत नाहींत तथापि लखिमपुर व कामा येथील रामबाग या ठिकाणचें रोपे जलद वाढीचे व तरतरीत असल्याचें आढळतें. रामबागेंतील रोपे फारशी मशागत न करिताहि यशस्वी व उत्पन्नदायक असे ठरले.

रिहा हें मुळचें हिंदुस्थानांतील झाड नसून येथें तें आपोआप होत नाहीं. ज्याला वनरिहा म्हणतात त्यापासून ताग व तंतु निघतात. रिहाच्या लागवडीस विशिष्ट प्रकारची जमीन, प्रतिवार्षिक खत व ठराविक हवामान यांची जरूरी लागते. रिहा हें झाड शेतकरी उत्पन्नच नाहीं या गाडाचा घास, मासे धरण्याच्या जाळी व दोर करण्याकरितां उपयोगिला जातो व कांहीं लोक त्याची लागवड करितात. बंगाल व विशेषतः रामपुर येथील माळरानें रिहाच्या पिकास योग्य आहेत. फारसा फायद्याच्या अभावीं शेतकरी या पिकाकडे दुर्लक्ष करतात. पूर्व व उत्तर बंगाल येथील रिहाची लागवड करण्याची विशिष्ट पद्धत आहे. तमाखूस जी हवा व जमीन योग्य असते तीच रिहासहि योग्य असून रिहाबरोबर आळीपाळीनें मिरची, तमाखू, रताळीं वगैरे पीक करितात. दिनाजपूर, बोग्रा व कुच बिहार येथें कांहीं ठिकाणीं रिहा उगवतो. बंगालमध्यें मुळें कापून तीं लावण्याची पद्धत आहे. दांडे तोडून तेहि लावतात. लावणीच्या दोन वेळा असतात. सामान्यतः तीन कापण्या होतात. पक्व झालेल्या बुंध्याचीच कापणी करतात. हिवाळ्यातील कापणीनें जोराची वाढ होते. आसामची परिस्थिति वरीलप्रमाणेंच आहे. तेथें फार मोठ्या प्रमाणावर रिहाची लागवड करावयाची म्हणजे चहाच्या मळेवाल्यांशी टक्कर द्यावी लागेल. तरी पण रिहाचें मुख्य उत्पन्न त्याच ठिकाणीं होतें. आसामची जमीन जास्त सुपीक असल्यामुळें शेतकऱ्यांची प्रवृत्ति रिहाकडे फारशी नसते हें खरें आहे. ब्रह्मदेशांतील रानरिहा म्हणजे एक प्रकारची खाजकुयरी होय. याच्यापासूनच पुष्कळ डोंगरी लोक धागा काढतात व त्यास निलगिरीची खाजकुयरी म्हणतात.

येथापर्यंत बंगाल व आसाम या प्रांताप्रमाणें रिहाची मशागत स्वाभाविक नसली तरी कामाची हवा रिहाला योग्य आहे. संयुक्तप्रांतात बरेच प्रयोग करण्यात आले व अनुभव असा आला की, रिहाची मशागत करणें खर्चाचें काम आहे. तेथें दरवर्षी दोन कापण्या करून भागवावें लागतें. दक्षिणहिंदुस्थानातहि युरोपियन लोकांनीं रिहाची लागवड केली परंतु खर्चापुरतेंसुद्धां उत्पन्न निघेना. वरील सर्व प्रांतांतील अनुभवावरून असेंच ठरतें की, हिंदुस्थानात रिहा उत्पन्न होणें शक्य नाहीं. तिरहुत व आसाम येथील कांहीं प्रयोग अलीकडे यशस्वी होऊं लागले आहेत. हिंदुस्थानापेक्षा इतर ठिकाणीं रिहाचें चांगलें पीक होतें व तें कसें स्वस्तहि होतें तर्से येथील मशागतीस योग्य फरक करावे हा विचारार्ह असा प्रश्न आहे.

पूर्वी लोक अंकुर सुकल्यानंतर ते पाण्यात भिजवून त्यांच्या सालीपासून धागा तयार करीत असत, परंतु आतां या पद्धतींत फरक पडला आहे. पाण्यात कार्बोनेट ऑफ सोडा घालून दोन दोन तास सुंभे उकळत ठेवितात. नंतर वाहत्या पाण्यात एखाद्या तक्तयावर ते बडवून काढतात व पुन एक तास उकळून वाहत्या पाण्यात बुडवून काढतात म्हणजे साल व गोंद हीं भिन्न होतात. याप्रमाणें एक मणभर अंकुराचा एका तासात शे २॥ प्रमाणें कच्चा माल तयार होतो. सुंभे पाण्यात कुजत घालणें हें वाईट आहे. परंतु अल्जीरियन लोकांची पद्धत अशी आहे कीं, ते साध्या पाण्याऐवजीं समुद्राचें पाणी वापरतात. ही पद्धति चांगला आहे असें मानण्यात येतें. आसाम व बंगालमधील ताग काढण्याची रीत खालीं वर्णन केल्याप्रमाणें आहे. प्रथम अंकुराचीं पानें काढून नंतर ते ताणून टाकतात व त्या पानांचा नंतर खतासारखा उपयोग होतो. एक आठवडा सुंभ वाळविल्यावर तंतु सडरे होतात. त्यानंतर त्यांचें पृथक्करण करण्यात येतें. बंगाली लोक प्रथम सुंभ ताणून नंतर त्यापासून तंतू वेगळे काढतात. चीन देशांत प्रथम साली काढून नंतर तंतूंची फीत करतात. फीत कुजत ठेऊन नंतर साल व गोंद ही वेगळीं काढतात. रेशमात मिसळण्याकरितां रिहाच्या तंतूंचा फार उपयोग होतो. बंगाल व आसाम येथें या तंतूपासून जाडाभरडा दोरा व मासे धरण्याचीं जाळीं तयार करतात.

**गवती चहा**—गवती चहास कोठें कोठें हिरवा किंवा ओला चहा म्हणतात. बंगाल्यांत या चहास बधेवेन व हिंदुस्थानींत गंधतृण म्हणतात. संस्कृतांत यास भूस्तृण असें नांव आहे. गवती चहा एक जातीचें गवत आहे. हें गवत हिरवें गार असून सरसरीत असतें. पूर्वेकडील आर्चिपेलेगोतल्य पुष्कळ बेटांत, सिलोनांत व हिंदुस्थानांत गवती चहा मुद्दाम बागांत लावितात. या गवतास क्वचित फूल येतें. सिंगापूर व सिलोन येथें सुवासिक तेल काढण्याकरितां गवती चहा पुष्कळ लावितात. या गवताचा सुवासिक तेल काढण्याकडे विशेष उपयोग होतो. 'कालन वॉटर' तयार करण्यांत या तेलाचा फार खप होतो. तापात घाम येण्यासाठीं गवती चहाचा काढा करून पाजतात.

**गवरा**—मध्यप्रांत जिल्हा चांदा भांदकच्या दक्षिणेस टेकडीवर हें एक लहानसें खेडें आहे. येथें कांहीं लेणीं असून त्यांत एक यौवनाश्वाचें देऊळ आहे. त्यांत एका गोंवावर एक लेख असून त्यावर संवत् ११६६ (सन ११०९) आहे. जवळच एक लहानसें दुसरें देऊळ असून त्यांत गणेशाची मोठी मूर्ति आहे.

**गवळी**—दुधदुभत्याच्या धंद्यावरून 'गवळी' हें नांव पडलेली जात फक्त मुंबई इलाख्यांतच आहे. अहिरांची माहिती स्वतंत्र दिली आहे. लो. सं. ३८५४२. दक्षिण हिंदुस्थान, कोंकण व कर्नाटक या प्रांतभर हे लोक आहेत. धनगर, कुरबा, मराठा कुणबी इत्यादि लोकांचा भरणा या जातींत बराच असून त्यांच्या धंद्यावरून ही एक स्वतंत्र जात झालेली आहे. यांमध्यें आठ पोटभेद असून त्या

पोटभेदांतील लोक एकमेकाशीं रोटीबेटीव्यवहार करीत नाहींत. यारोरीज कानडी ' गोपाल किंवा गोला ' हाहि गवळ्याचाच एक पोटभाग आहे असें म्हणतात. या लोकाच्या पुष्कळ चालीरीती लिंगायताप्रमाणें असून काहीं खास लिंगायत झालेले आहेत. एक आडनाव असलेल्या लोकामध्यें विवाहसंबंध होत नाहींत पुनर्विवाह व घटस्फोट या दोन्ही चाली यामध्यें रूढ आहेत. हे लोक मांसाहारी असून त्यांचा सामाजिक दर्जा कुणब्याहून वरचा आहे. यांची मुख्य देवता कृष्ण ही होय. याच्या कुलदेवता महादेव, खंडोबा, विठोबा इत्यादि आहेत. जंगम व ब्राह्मण हे त्यांचे उपाध्ये असतात परंतु लग्नाच्या वेळीं ब्राह्मण असावाच लागतो.

गवळा जात— आसामातील गवळी लोकांची संख्या सुमारें चाळीस हजार आहे. बिहारमध्यें ब्राह्मण, गवळ्याच्या हातचें पाणी घेतात. बंगाल्यांत ह्या लोकांना नवसख लोकांपेक्षा हलके समजतात. परंतु ओरिसामधील गवळी आपणाला उच्च जातीचे समजून बंगाल व बिहारमधील गवळ्यांना ते तुच्छ मानितात. ब्रह्मपुत्रा नदीच्या थडीवरील गवळी बहुतेक सर्व बाहेरून आलेले आहेत व तसेंच सिलहट व काचरमधील फारच थोडे गवळी स्थानिक आहेत. [ सेन्सस रिपोर्ट अहीर पहा ].

गवा—ही बैलाची रानटी जात असून कपाळाचा रुंद भाग, लांब अवयव, भरदार डोकें, डौलदार वशिंड आणि सशक्त स्नायू इत्यादि गोष्टी यात विशेष असतात. गव्याला चौदा बरगड्या असतात व त्याचें डोकें व मान काळसर व पिंगट केसांनीं आच्छादिलेली असते युरोपातील गव्याची ' आयाल ' ग्रीष्मऋतूंत नष्ट होते असें म्हणतात. युरोपातील गवा सुमारें दहा फूट लांब व सहा फूट रुंद असतो प्राचीन काळीं असले प्राणी अनेक होते याची साक्ष गेंडे व गवे यांचे सध्या जे लांब रुंद अवशेष सापडले आहेत, त्यावरून पटते जर्मनी व बेलजम मधील अरण्यात रानटी बैलाप्रमाणेंच गवे असत असा सीझरनें उल्लेख केला आहे त्या काळीं रोमन ॲम्फीथिएटरमध्यें जिवंत गव्याचें प्रदर्शन होत असे सोळाव्या शतकातील हर्बर्स्टनच्या उल्लेखावरून त्या काळीं मध्ययुरोपातहि बरेच गवे असावे. सध्या गवा हा प्राणी फक्त कॉकेशस पर्वतातच आढळतो, व रशियन सरकारनें या प्राण्याचें रक्षण करण्याचें मनावर घेतलें आहे. साधारणत. गवे हे एखाद्या सुगंधी वनस्पतीवर किंवा पानें, झाडांचीं मुळें, साली व चव्हाळ्या यावर उपजीविका करतात. अमेरिकन गवा हा युरोपियन गव्यापेक्षा थोडा भिन्न असतो. तेथील गव्याचा पार्श्वभाग थोडासा कमकुवत असतो. त्याच्या डोक्यावर, मानेवर व पृष्ठभागावर काळसर व पिंगट केस बरेच असतात. त्याचें डोकें व शिंगेंहि जरा भिन्न असतात. त्याचीं शिंगें आखूड असून तीं वरींच वाकलेलीं व अणकुचीदार अशीं असतात त्याचे डोळे वाटोळे असून डोकेंहि भव्य असतें पूर्वी या जातीनें उत्तर अमेरिकेचा सुमारें एक तृतीयांश भाग व्यापिला होता, परंतु हल्लीं तेथें गवा हा प्राणी जवळ जवळ नामशेष झाला आहे इंग्लंडात गव्याचे लहान कळप पाळलेले आहेत अमेरिकेंतील गव्याच्या दोन जाती प्रसिद्ध आहेत व त्या जवळ जवळ सारख्याच आहेत.

म्हैसूर जवळच्या जंगलात व मध्यप्रांतात गवे आढळतात. त्यांच्या शिंगाच्या अनेक नक्षीदार वस्तू करतात.

गवार—ह्या झाडास लॅटिनमध्यें सीमॉप्सिस प्सोरेलिव्हिडिस कोंकणात गवार, गवारी, गुवार व बावची. देशावर गवार, गवारी; मुंबईकडे गुवार, गोवार अशीं निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं नांवें आहेत. गवारीच्या चार जाती आहेत. शेतगवार ही जात कोरडवाहू शेतात पावसाळ्यात तुरीप्रमाणें पेरतात व तुरीसारखींच शेतगवारीचीं झाडें होतात. पावसाळ्याच्या शेवटीं शेंगा पिकून वाळल्या म्हणजे सबंध झाडें कापून खळ्यात आणतात व दाणे तयार करतात. दाण्याचा उपयोग भरडून, भिजवून जनावरास घालण्याकडे करतात कोंवळेपणीं शेंगांची भाजी करतात हें पीक गुजराथ व मारवाडात करितात. बागाईत गवारीच्या १ मासणिया, २ सडी अगर सोटिक व ३ लेंकुरवाळी अशा तीन जाती आहेत २ व ३ या जाती मुंबईच्या उत्तरभागात व गुजराथेंत करतात महाराष्ट्रांतील लोकांस तिसरी जात माहीत आहे अलीकडे दुसरी व तिसरी या जाती कोठें कोठें करावयास लागले आहेत.

सडी अगर सोटिया गवारीचीं झाडें उंच वाढतात. त्यास फाट्या फुटत नाहींत. शेंगाचे झुबके पानाजवळ वाढतात. या जातीची वाढ लवकर होते व शेंगाहि लवकर वाढतात झुबके सबंध काढून बाजारात नेतात. ही जात ठाणे व सुरत जिल्ह्यात आल्याच्या वाफ्यात सावली करण्याकरिता करतात. आलें जोरावलें म्हणजे सावलीची जरूरी नसते. तेव्हा गवारीच्या शेंगाहि खपत येतात व झाडें उपटून टाकितात. आलें लावण्याच्या अगोदर वाफ्यात बीं फेकीतात. इच्या शेंगाची भाजी मासणियाच्या शेंगापेक्षा कमी लज्जतदार होते.

मासणिया गवारीचें बीं जाड असतें. झाडें उंच वाढतात. पानें मोठालीं असतात फाट्या फुटतात व शेंगा फरगळासारख्या ६ ते ३॥ इंच लांब व मांसाळ होतात. त्याची भाजी शिजल्यावर लोण्यासारखी मऊ होते. शेंगा जून झाल्यावर शेंगातील दाण्याभोंवतीं कवचदार पडदा कठिण होतो व तो दाताखालीं लागतो लेंकुरवाळी गवार देशावर उसात अगर स्वतंत्र करतात सरीचे वाफे करून १ते१॥ हाताच्या अंतरानें बीं टोंचून लावितात. झाड तुरीसारखें वाढतात ह्या झाडास खालपासून पुष्कळ फाट्या फुटतात म्हणून या जातीस पुण्याकडे " लेंकुरवाळी " हें नांव प्रचलित आहे या जातीच्या शेंगा लहान व अरुंद असून पानाजवळ झुबके थोड्या शेंगांचे येतात त्या लवकर जून होतात त्याची भाजी वरील दोन जातींप्रमाणें लोण्यासारखी शिजत नाहीं व लज्जतदार

आणि रुचकर होत नाहीं भाजीस थोडा उग्र वासहि येतो गवारीची भाजी पौष्टिक आहे जून शेंगाची उसळ होते सुकलेले दाणे शिजवूनहि उपयोग होतो वाळलेल्या दाण्याची भरडून चुणा करतात, ती जनावरास पुष्टिकारक असते ती जनावरास भिजवून अगर वरीच वेळ भिजवून ठेवून घालितात गवाराच्या चुणीपासून जनावरास सन्निपातासारखी बाधा होते असें म्हणतात गवारीचें ताजें बीं कधी कधीं उगवत नाहीं तें सडून लाविल्यानें उगवतें, अगर आधणाच्या पाण्याचा चटका देऊन मग पेरल्यानें उगवतें

गोवारीचें पाव गोराड व वेसर जमीनींत चागलें होतें जमीन दोन वेळ नागरून वर समार ( फळी ) फिरवितात नतर २ पाळ्या घालून जून महिन्यात गोवारीच्या बाजरीच्या शेतात ओळी पेरतात केव्हा केव्हा गवारी स्वतत्रहि पेरितात भाजीकरिता जेव्हा बागाइतात पेरितात तेव्हा दर एकरीं शेणखताच्या २० गाड्यापावेतों खत देतात कोरडवाहूत फारसें खत देत नाहींत दर एकरीं मिसळीच्या पिकास ६ पौंड पावेतों बीं लागतें स्वतत्र पिकास २५ पौंड लागतें. गवारी आक्टोबर महिन्यात तयार होते झाडें कापून आणून खळ्यात वाळवितात व नतर वरून बैलाच्या गाड्या फिरवून दाणे तयार करतात चाकानें हें काम चागलें होतें

उत्पन्न सरासरी दरएकरी १००-१५० पौंड मिसळीचें पीक ८००--१००० पाउंड स्वतत्र पीक

गव्हला-हें झाड फार मोठें होत नाहीं याची उत्पत्ति उत्तर-हिंदुस्थानात होते यास सस्कृतमध्यें प्रियगु, लॅटिनमध्यें ॲग्लिआ रिक्सबर्घिआना, हिंदींत व मराठींत गव्हला अशी नावें आहेत यात एक सुगधी जात आहे तिचा सुवासिक तेलें, उदबत्त्या अगरबत्त्या वगैरे करण्याकडे उपयोग होतो गव्हला तुरट, शीतल, केसाना हितावह, वांति, दाह, पित्त, ज्वर, मोह, तृषा वगैरे व्याधी दूर करणारा आहे आम्लपित्तावर गव्हल्याचें चूर्ण साखरेबरोबर द्यावें

**गहरवार घराणें**—कनोजचें गहरवार किंवा गहडवाल हें घराणें गौतम बुद्धाच्या वशाची एक शाखा आहे असें दंतकथेवरून मानतात पहिल्यानें गहरवार राजघराणें काशीवात असून याच घराण्यापासून राठोड घराणें उत्पन्न झालें गहरवार राठोड घराण्याची वंशावळ खालीलप्रमाणें आहे (१) महेन्द्रपाल ( इ स ९२१ ), (२) दुसरा भोजदेव ( ९२५-५० ), (३) विनायक पालदेव ( ९५०-७१ ) (४) नयपाल, (५) यशोविग्रह ( विग्रहपाल ) सुमारें ९९१-१०५८, (६) महीचन्द्र ( महीपाल ), (७) चंद्रदेव, (८) मदनपाल, (९) गोविंदचद्र (१०) पुत्र ( गोविंदचद्राचा ) (११) जयचद्र

१० व्या शतकात गहरवार घराण्याच्या राज्कारणात फारच फेरबदल झाला गहरवारवंशीय महीपालानें कलचुरी घराण्याच्या मदतीनें बनारस शहर हस्तगत केलें कनोज --- कलचुरी घराण्याच्या ताब्यांत गेलें त्यानतर महीपालाचा पुत्र चद्रदेव यानें कलचुरीवशाच्या कर्णापासून कनोज शहर घेतलें व तेथें नवें राज्य स्थापन केलें त्यामुळें पुन्हा कनोजची भरभराट झाली ( १०९० ) या नूतन राज्य स्थापन करणाऱ्या म्हणजे स्वत च्या घराण्यास त्यानें राठोड हें नाव ठेविलें त्यानें कनोजप्रमाणें अयोध्या, काशी व दिल्ली प्रातहि हस्तगत केले

गहरवार घराण्याचे गहरवार व राठोड असे दोन भाग होण्याचें कारण असें कीं, हें घराणें महापाल राजापर्यंत बौद्धधर्मीय होतें परंतु चद्रदेवानें ब्राह्मणीधर्माचा स्वीकार केला त्यामुळे या घराण्यात दुफळी पडून चद्रदेवानें नवें राज्य स्थापिलें गहरवार घराण्यापासून दुसरीहि एक शाखा उत्पन्न झाली तिचें नाव बुंदेले हें होय हें कनोजचें घराणें शिहाब-उद्-दीन यानें ११९४ त नाहींसें केलें चद्रदेवाचा नातु गोविंदचद्र यानें ११०४-११५५ पर्यंत राज्य केलें त्याच्या आढळणाऱ्या अनेक ताम्रपट व नाण्यावरून त्यानें पुष्कळ प्रात जिंकल्याचें व कनोजची भरभराट केल्याचें दिसून येतें गोविंदचद्राचा नातू जयचद्र ( यालाच हिंदी काव्यातून व लोककथातून राजा जयचद राठोड म्हणतात ) याची मुलगी सयुक्ता ही प्रख्यात अजमेरच्या राय पिठोरा राजानें ( पृथ्वीराज ) हरण केली ( ११७५ ) या जयचदाचें राज्य फार मोठें होतें चीन देशापासून माळव्यापर्यंत व आरबी समुद्र ते लाहोरपर्यंत तें पसरलेलें होतें असें सागतात मुसुलमान याला बनारस चा राजा म्हणतात त्यावरून त्यावेळीं काशी ही त्याची राजधानी असावी शिहाबउद्दीननें त्याचेवर ( इटावा जिल्ह्यातील ) यमुना काठच्या चंद्रावर गावीं स्वारी करून त्याला लढाईत ठार मारून, काशी लुटून चौदाशें उट भरून लूट नेली येथें कनोजच्या या गहरवार घराण्याचा शेवट झाला याच्यानतर महोबा येथील चंदेलराजानीं कनोज येथें आठ पिढ्यापर्यंत राज्य केलें यावेळीं गहरवार वशातील जे लोक राजपुतान्यात आश्रयार्थ पळून गेले त्यापैकींच एका पुरुषानें जोधपुर येथें राज्य स्थापन केलें या सर्व लोकाना पुढें राठोड हें नाव मिळालें

[ इंडियन ॲंटिक्वरी व्हॉ १४, १८ इंपीरियल ग्याझे व्हॉ १४, इलियट डॉसन व्हॉ २, स्मिथ—अर्लि हिस्टरी ऑफ इंडिया, इंडियन म्युझियम कॉइन्स कॅटलॉग व्हॉ १, जर्नल एशिआटिक सोसायटी १८८१, १८८५ ]

**गहाणाचा फायदा भा र त व र्षी य**—प्राचीन सस्कृत ग्रथात गहाणाला आधि हें पारिभाषिक नाव आहे आधि याची व्याख्या नारदस्मृतींत 'अधिक्रियते इत्याधि ' अशी केली आहे नारदानें आधी दोन प्रकारच्या सांगितल्या आहेत (१) कृतकालापनेय आणि (२) यावद्देयोद्यत यावद्देयोद्यताचे गोप्य व भोग्य असे दोन प्रकार नारदानें सागितले आहेत याज्ञवल्क्य स्मृतींत, कालकृत व फलभोग्य असे आधीचे दोन प्रकार वर्णन केले

आहेत. नारदानें सांगितलेला कालापनेय आधि व याज्ञवल्क्याचा कालकृत् आधि हे एकच आहेत. गहाणदारानें एखादी वस्तु सावकाराजवळ कांहीं ठराविक मुदतींत कर्ज फेडण्याच्या शर्तीवर गहाण ठेवली व ठराविक मुदतींत त्यानें आपलें कर्ज फेडलें तर गहाणदाराला त्याची वस्तु परत मिळते व गहाणांतून गहाणदार मोकळा होतो. अशा प्रकारच्या गहाणास कालकृत् गहाण असें म्हणतात. यावद्देयोधत गहाणाचा अर्थ गहाणदार कर्ज फेडीपावेतों गहाण वस्तु सावकाराकडे राहाणें व ती त्यानें संरक्षण करणें अगर तिचा उपभोग घेणें होय. जेव्हां गहाण वस्तु नुसती संरक्षण करून ठेवावयाची त्यावेळीं त्या गहाणाच्या प्रकाराला गोप्य यावद्देयोधत असें म्हणतात, व गहाण टाकलेल्या वस्तूचा ज्यावेळीं सावकार हा उपभोग घेतो त्यावेळीं त्याला फलभोग्य गहाण असें म्हणतात.

याज्ञवल्क्यस्मृतीप्रमाणें ज्यावेळीं गहाणदाराच्या कर्जाची दामदुप्पट होते तरी देखील गहाणदार आपलें कर्ज फेडीत नाहीं त्यावेळेस गहाण नष्ट होऊन सावकार त्या गहाण वस्तूचा मालक होतो. 'कालकृत्' गहाणात विशिष्ट मुदतीच्या आत गहाणदारानें कर्ज न फेडल्यास तें गहाण नष्ट होतें. पण फलभोग्य गहाणात मात्र गहाण कधींच नष्ट होत नाहीं. फलभोग्य 'गहाणात' मुद्दलावर व्याज चालू रहात नाहीं. सावकाराजवळ असलेली गहाणवस्तु जर दैववशात किंवा युद्धादि राजव्यापार या कारणाशिवाय अन्य कारणानें म्हणजे स्वतः च्या हलगर्जीपणानें अगर दुरुपयोगामुळे अर्धवट अगर पूर्णपणें नष्ट झाली तर सावकारानें ती वस्तु गहाणदाराला भरून दिली पाहिजे असें याज्ञवल्क्य म्हणतो. गहाणवस्तु सावकारानें स्वीकारीपावेतों गहाण पूर्ण झालें असें म्हणता येत नाहीं. गहाणवस्तु जर फलभोग्य नसेल म्हणजे त्या वस्तूपासून सावकाराला कांहींच फायदा होत नसेल तर गहाणदारानें दुसरी वस्तु गहाण ठेवली पाहिजे, अगर एक वर्षाच्या व्याजासहित मुद्दल तरी देऊन टाकलें पाहिजे असें याज्ञवल्क्य म्हणतो (या. स्मृ. व्यवहाराध्याय प्रकरण ३, श्लोक ६०) जेव्हां स्वतःच्या जबाबदारीवर म्हणजे स्वतःचें चरित्र गहाण टाकून गहाणदार सावकाराकडून कर्ज घेतो त्यावेळीं गहाणदारानें, मूळ मुद्दल व्याजासह सावकाराला दिलें पाहिजे. गहाणदारानें रक्कम परत केल्यास गहाणवस्तु सावकारानें गहाणदाराला परत केली पाहिजे, नाहींतर तो स्तेन म्हणजे परकीय वस्तु अपहार करणारा ठरतो व शिक्षेस पात्र होतो असें याज्ञवल्क्य म्हणतो. सावकार हा गहाणदारानें कर्ज फेडण्यापूर्वी मरण पावला असेल तर गहाणदारानें त्याच्या वारसाजवळ आपलें कर्ज देऊन टाकून त्याच्यापासून गहाणवस्तु घ्यावी पण सावकार जर परगांवीं गेला असेल तर गहाणदारानें व्याजासहित आपल्या कर्जाच्या रकमेचें मूल्य ठरवून ती सर्व रक्कम सावकाराच्या वारसाजवळ द्यावी व सावकार गांवीं आल्यावर गहाणवस्तु अगर वस्तूची किंमत सावकारापासून घ्यावी अशी चाल असे. स्वतः कर्जदारच जर जाग्यावर नसेल अगर त्याचे वंशज जर सापडत नसतील तर सावकारानें कांहीं लोकांना साक्षी ठेवून गहाणवस्तु विकून त्यातून आपली रक्कम फेडून घेण्याची वहिवाट असे. ज्यावेळीं गहाणदारानें कर्जाच्या दुप्पट रकमेइतका फायदा उपभोगण्याची शर्त पुरी होईतों गहाणवस्तु ठेवण्याचें कबूल केलें असेल त्यावेळीं तितक्या रकमेच्या इतका फलभोग होताच सावकारानें ती वस्तु गहाणदाराला परत केली पाहिजे असें याज्ञवल्क्यानें म्हटलें आहे.

याज्ञवल्क्य स्मृतीच्या पूर्वी होऊन गेलेल्या स्मृतींपैकीं पुष्कळ स्मृतींत गहाणासंबंधीं सांगोपांग विचार केलेला आढळत नाहीं मनु अगर कौटिल्य यांच्या ग्रंथातहि गहाणासंबंधीं फारसा उल्लेख आढळत नाहीं खुद्द याज्ञवल्क्य स्मृतींत गहाणासंबंधीं पूर्ण विवेचन आढळत नाहीं तथापि तत्कालीन परदेशीय कायद्यापेक्षा याज्ञवल्क्याच्या वेळीं हिंदुस्थानात गहाणासंबंधीं अधिक विचार झाला होता असं आपणाला म्हणता येतें

*ब्रि टि श हिं दु स्था ना ती ल ग हा णा चा का य दा.*— ब्रिटिश हिंदुस्थानातील गहाणाच्या कायद्यात इंग्लंडमधील गहाणाच्या कायद्याचीं तत्वें दृष्टोस पडतात, व असें होणेंहि अपरिहार्य आहे. ब्रिटिशांचें येथें राज्य सुरू झाल्यावर इकडे जे यूरोपिय अगर इंग्रज न्यायाधीश आले त्यांना इंग्लिश कायद्याची पूर्ण माहिती असे व त्या कायद्यातील तत्वांशीं त्यांचा परिचय असल्यामुळें न्याय देताना ते हिंदुस्थानातील पूर्वकायद्याकडे फारसें लक्ष न देता आंग्ल कायद्यातील तत्वाच्या व कायद्याच्या आधारें न्यायनिवाडा करीत. त्यामुळें हल्लींचा गहाणाचा कायदा हा हिंदू व इंग्लिश 'गहाणासंबंधींच्या' कायद्याची भेसळ आहे असें आपल्यास म्हणता येईल.

हल्लींच्या गहाणाच्या कायद्याप्रमाणें गहाणाचे मुख्यतः पांच प्रकार आहेत, ते असे. साधे गहाण (सिंपल मॉर्टगेज), शर्तीचें खरेदीखत (मॉर्टगेज बाय कंडिशनल सेल) भोगवट अगर वहिवाटगहाण, अगर कबजा गहाण (युसुफ्रक्टयुअरी मॉर्टगेज), इंग्लिश पद्धतीचें गहाण (इंग्लिश मॉर्टगेज), व इक्विटेबल मॉर्टगेज

साधें गहाण अगर सिंपल मॉर्टगेजमध्यें, गहाणदार स्वतःच्या अंगावर आपली मिळकत सावकाराला गहाण टाकतो. या प्रकारात मिळकतीचा कबजा सावकाराकडे जात नाहीं. ठराविक मुदतींत जर गहाणदारानें कर्जाची रकम परत केली नाहीं तर कोर्टाच्यामार्फत या मिळकतीची विक्री करून त्यातून आपली रक्कम सावकाराला फेडून घेता येते अगर त्याच्या मनात असल्यास गहाणदाराविरुद्ध फिर्याद करून त्याला अडकवून ठेवता येतें. तशी स्थिति शर्तीचें खरेदीखत अगर (मॉर्टगेज बाय कंडिशनल सेल) मध्यें होत नाहीं.

या खरेदीखताच्या प्रकारांत गहाणदार हा सावकाराला गहाणवट वस्तु तात्पुरती विकतो; *पण ठराविक मुदतींत कर्ज फेडल्यास गहाणदाराला वस्तु परत मिळते. तसें न झाल्यास मात्र सावकार हा त्या वस्तूचा कायमचा मालक बनतो.* कबजागहाणांत सावकाराच्या ताब्यांत गहाणवट वस्तु जाते व कर्ज फिटेपावेतों तो तिचा उपभोग घेतो. कबजा गहाणांत कर्जावर बहुधा व्याज चढत नाहीं. कर्जफेड झाल्यावर सावकाराकडून ती वस्तु गहाणदार परत घेतो. इंग्लिश-*पद्धतीच्या गहाणाविषयीं व इक्विटेबल मॉर्टगेजविषयीं खालीं विवेचन आलेंच आहे.* 'इक्विटेबल मॉर्टगेज' हें कराची, मूलमिन, रंगून, वसई व अक्याब, मुंबई, मद्रास, कलकत्ता इत्यादि ठिकाणीं प्रचारात आहे.

गहाणदाराचे हक्क—गहाणदाराच्या हक्कामध्यें प्रमुख हक्क म्हणजे वेळेवर रकम फेडून गहाण सोडविणें हा होय. गहाणवट वस्तु ही सावकाराच्या कबजात असेल तर *गहाण-दाराला ती कर्जफेडीनंतर परत मागण्याचा हक्क आहे.* दोन वस्तू निरनिराळ्या कर्जासाठीं गहाणदारानें गहाण टाकल्यास यांपैकीं कोणतीहि एक वस्तु त्या वस्तूवरील कर्ज फेडून टाकून सोडविण्याचा त्याचा हक्क आहे. दोन्ही वस्तु एकसमयावच्छेदें-करूनच सोडविल्या पाहिजेत असा सावकाराला आग्रह धरता येणार नाहीं. *गहाणाच्या मुदतींत जर गहाणवट वस्तूची वाढ झाली असेल व ती विभाज्य नसेल तर त्या वाढीचा मोबदला घेऊन वाढीसकट ती वस्तू सावकारानें गहाणदाराला दिली पाहिजे.* पण जर वाढ विभाज्य असेल तर ती सावकाराला आपल्याकडे ठेवता येते अगर त्याची इच्छा असल्यास गहाणदाराला विकता येते. गहाण वस्तु सोडविण्याच्या बाबतींत अतिशय जाचक अटी घालणें हें बेकायदेशीर आहे. *गहाणवट वस्तु ऐन जिनसी सोडविली पाहिजे.* खंडशः रकमेची फेड करून त्या त्या प्रमाणांत गहाणवट वस्तूवरील बोजा गहाणदाराला कमी करता येत नाहीं. १०० रुपये किंमतीहून अधिक किंमत असलेलें गहाणखत नोंदविलेंच पाहिजे असा नियम आहे.

गहाणदाराची जोखीम—गहाणदारानें जी वस्तु *गहाण टाकली असते ती त्याच्या मालकीची असली पाहिजे.* ती जर तशी नसेल तर सावकाराला आपली रकम नुकसान-भरपाईसकट भरून घेण्याचा हक्क पोहोंचतो. गहाण वस्तूची मालकी सिद्ध करण्याकरितां लागणारा सर्व खर्च गहाणदारानें सोसला पाहिजे. गहाण वस्तूवर सरकाराला सारा, कर वगैरे द्यावयाचा राहिला असेल तर तोहि गहाणदाराला द्यावा लागतो. गहाण वस्तु तत्पूर्वी दुसऱ्या सावकाराला गहाण टाकली असेल तर त्या वस्तूवरील व्याज वगैरे वेळेवर देणें हें गहाणदाराचें कर्तव्य आहे.

सावकाराचे हक्क व कर्तव्यें.—मुदत टळल्यानंतर गहाण वस्तूची विक्री करण्याचा अगर शर्तीत ठरल्याप्रमाणें कर्ज ठेवण्याचा सावकाराला हक्क असतो. कर्जाबद्दल *फिर्याद करण्याचा,कोर्टाच्या परवानगीशिवाय कांहीं बाबतींत गहाण वस्तूची विक्री करण्याचाहि सावकाराला हक्क आहे.* गहाण वस्तु जपून वापरणें, त्याच्यावरील सरकारी कर देणें, गहाणाचा चोख हिशेब ठेवणें व कर्जफेडीनंतर गहाण वस्तु ज्याची त्याला परत देणें हीं सावकाराचीं कर्तव्यें आहेत.

इंग्लिश गहाणाचा कायदा.—*गहाण म्हणजे जिंद-गीच्या तारणावर अशा रीतीनें कर्ज काढणें कीं ठर-लेल्या मुदतींत कर्जदारानें कर्ज न फेडलें तर गहाण सोडविण्याचा हक्क रद्द करण्याचा किंवा जिंदगी विकून* आपलें कर्ज फेडून घेण्याचा हक्क सावकारास प्राप्त होतो. इंग्रजी कायद्यांत गहाणाचें कार्य शर्तीच्या खरे-दीनें करण्याची योजना आहे म्हणजे मूळचा व्यव-हार खरेदीचा धरून ठरलेल्या मुदतींत कर्ज परत केलें तरच गहाणासारख्या खरेदींतून जिनगी मुक्त *करून घेण्याचा हक्क ठरलेला असतो.* परंतु गहाण ठेवण्याचा व खरेदी देण्याचा यांपैकीं मूळचा हेतू कोणता याविषयीं लबाडी करण्यास जागा राहूं नये म्हणून कायद्यानें या बाबतींत पुष्कळसे निर्बंध घातले आहेत.

या विषयावरील रोमन लोकांच्या कायद्यांत तीन अवस्था स्पष्टपणें दिसून येतात. पहिल्या अवस्थेंत, कर्ज फेडल्यावर *जिनगी फिरून मूळ मालकाच्या नांवावर चढवून देईन या अटीवर* खरेदीचा व्यवहार होत होता. दुसऱ्या अवस्थेंत, जिंदगी सावकाराकडे जात नसे. फक्त ताबा मात्र त्याजकडे जाऊन वेळवर कर्ज न फिटलें तर जिंदगी विकण्याचा वगैरे हक्क सावकारास प्राप्त होत असत. तिसऱ्या अवस्थेंत जिंदगीचा ताबाहि सावकाराकडे न जाता मुदतींत कर्ज न फिटलें तर जिंदगी कोणाच्याही ताब्यात असली तरी तिला विका-वयास काढण्याचा सावकारास हक्क प्राप्त होत असे.

गहाणाचा इंग्रजी कायदा हा दोन परस्पर भिन्न कायद्यांतून निघाला आहे. त्याचें मूळ व स्वरूप हें सामान्य कायद्यांतून घेतलें आहे. *गहाण टाकलेली जिंदगी ही कर्जाबद्दल तारण होय* अशाविषयीं घातलेले निर्बंध न्यायबुद्धीच्या ( इक्विटी ) कायद्यांतून घेतलेले आहेत. सामान्य कायद्या( कॉमनलॉ )च्या दृष्टीनें गहाण टाकलेल्या जिंदगीचा सावकार हा मालक असतो. *न्यायबुद्धीच्या कायद्यानें गहाणदार हा मालक राहून* सावकाराचा फक्त जिंदगीवर बोजा असतो. गहाणख-ताच्या शर्तीप्रमाणें रद्द झालेल्या गहाण सोडविण्याचा हक्क यास "न्यायबुद्धीच्या कोर्टानें दिलेली गहाण सोडविण्याची सवलत" असें म्हणतात. आपआपसांत केलेला कसलाहि करार या गहाण सोडविण्याच्या कोर्टाच्या सवलतीच्या आड किंवा गहाणदाराच्या अशी सवलत मिळविण्याच्या आड येऊं शकत नाहीं. ही न्यायबुद्धीच्या

कोर्टानें दिलेली सवलत जरी पहिल्यानें गहाणदारास मिळत असे तरी ती पुढें गहाणदाराच्या वारसांसहि मिळूं लागली गहाणखतात कसलीहि भाषा वापरली असली तरी गहाणदार हाच मूळ जमिनीचा मालक रहातो व सावकार यास त्यानें दिलेल्या कर्जामुळें कांहीं हक्क प्राप्त होतात व्यवहार खरेदीचा होता की गहाणाचा होता असा प्रश्न उपस्थित झाला तर कोर्टानें व्यवहाराच्या एकदर सर्व गोष्टी ध्यानात घेऊन जर त्यास जिंदगी ही कर्जाबद्दल तारण म्हणून लावून दिलेली होती असें आढळून आलें तर तो व्यवहार गहाणाचा होता असा निकाल द्यावा याप्रमाणें जर(१) मिळकतीची किंमत व दिलेली रकम यात कांहींच मेळ नसेल ( २ ) पैसे देणारास एकदम ताबा देण्यात आला नसेल ( ३ ) कर्जावरील व्याजाएवढी रकम वाद करून जर जिंदगीच्या उत्पन्नाचा हिशेब देण्यात येत असेल ( ४ ) खतपत्राचा खर्च जर जिनगी देणारानें सोसला असेल तर तो व्यवहार खरेदीचा दिसत असला तरी गहाणाचा असला पाहिजे असें धरण्यास जागा आहे आणि "एक वेळ गहाण तें कायमचेंच गहाण" या तत्वास बाध येत नाहीं पुढील करारांनीं त्यास कोणताहि बाध येऊ शकत नाहीं ठरलेल्या मुदतींत कर्ज न फिटलें तर, अमुक एका मुदतींत व्याज व खर्चेंच यासह कर्ज परत न केलें तर गहाण सोडविण्याची सवलत रद्द होईल अशा तऱ्हेची मागणी सावकारानें करावी याउपर दिलेल्या मुदतींत कर्ज न फिटलें तर त्यायोगें सावकार जिंदगीचा मालक होईल, परतु गहाण सोडविण्याची सवलत रद्द करण्याच्या फिर्यादींत कोर्टानें कोणत्याहि एका पक्षाच्या विनतीला अनुसरून जिंदगीचा लिलाव करण्याविषयीं हुकूम करावा अशा रीतीनें जिंदगीची विक्री झाल्यावर जी किंमत वसूल होईल तिच्यातून मुद्दल, व्याज व खर्च सावकाराच्या पदरात टाकून उरलेली रकम अर्थात गहाणदाराची असते खतात नमूद केलेल्या वेळेच्या आत सावकारास कर्ज परत घेण्यास भाग पाडतां येत नाहीं व ठरलेल्या वेळीं जर कर्ज परत केलें नाहीं तर कर्ज परत करण्याचा आपला विचार असल्याबद्दल सावकारास सहा महिन्यांची अगाऊ नोटिस द्यावी लागते त्यायोगानें सावकारास आपली रकम कोठें व्याजी लावावी याची योजना ठरवून ठेविता येते

जेव्हा एकच जमीन निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या सावकाराकडे गहाण टाकलेली असेल त्यावेळीं त्याचे हक्क त्याच्या व्यवहाराच्या कालक्रमाप्रमाणें अस्तित्वात येतात परतु गहाणाच्या कायद्यात जीं न्यायबुद्धीच्या कायद्याचीं तत्वें प्रविष्ट होतात त्यायोगान वरील नियमात महत्वाचा बदल झाला आहे जेव्हा एकामागून एक अशा अनेक सावकारांचे बोजे एखाद्या जिंदगीवर चढतात तेव्हां आद्य सावकाराचा बोजा तेवढा कायदेशीर असतो त्याचप्रमाणें जेव्हा दोन सावकाराचे हक्क इतर बाबतींत अगदीं ततोतंत असतील तेव्हाहि न्यायबुद्धीच्या कायद्याच्या तत्वाला अनुसरून कालगणनेनें पहिल्या सावकाराचा हक्कच तेवढा शाबीत धरला जातो असें —कर्ज देतांना न २ च्या गहाणदाराच्या गहाणाच्या अस्तित्वाबद्दल जर न ३ च्या गहाणदारास नोटीस नसेल तर दोघांचे हक्क सारखेच समजण्यात येतात व दुसरी एखादी गोष्ट आड येत नसेल तर कालगणनेनें ज्याचा व्यवहार आधींचा त्याच्या तर्फे निकाल देण्यात येतो. परतु जर न ३ च्या गहाणदारानें न १ च्या गहाणदाराचा हक्क वेचन करून घेतला असेल तर त्याला आपल्या व्यवहाराचा सबध पहिल्याशीं चिकटवून न २ च्या गहाणदारावर नवर पटकाविता येतो आणी जर नवर एकचा गहाणदार न २ च्या गहाणदाराच्या गहाणाची माहिती नसता अगोदर दिलेल्या कर्जापेक्षा अधिक कर्ज देईल तर न २ च्या गहाणदाराच्या आधीं त्याच्या सर्व बोजाचा हक्क धरण्यात येतो

अशाच तऱ्हेचा परिणाम जेव्हां निरनिराळीं तारणें एकत्रित करतात तेव्हाहि दिसून येतो उदाहरणार्थ एकाच गहाणदारानें एकाच सावकाराकडे निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या कर्जांकरिता दान स्वतंत्र जिंदग्या गहाण टाकल्या तर त्या दोन्ही जिंदग्याच्या गट केला जातो ( कन्सॉलिडेटेड ) म्हणजे एकदर कर्जाबद्दल दोन्ही जिंदग्या मिळून तारण होतात व दोन्हीं कर्जें फेडीपर्यंत गहाणदारास कोणतीच जिंदगी सोडविता येत नाहीं जर गहाणदारानें एखाद्या जिंदगीवर तिच्या किंमतीपेक्षा अधिक कर्ज काढलें असेल तर अपुरें तारण असलेल्या सावकारानें न १ च्या गहाणाचें वेचन घेऊन त आपल्या व्यवहाराशीं साधून टाकावें आणि अशा रीतीनें न २ च्या गहाणदारावर मात करावा

मालकीहक्काच्या कागदपत्राच्या ठेवीवर कर्ज काढलें तर त्यास 'न्यायबुद्धीस मान्य असलेल गहाण' ( एक्विटेबल मॉर्टगेज) असें म्हणतात कायद्याप्रमाणें तर गहाणाच्या व्यवहाराबद्दल लेखी खत केलेंच पाहिजे असा निर्बंध आहे तर मग केवळ कागदपत्राच्या ठेवीवर हें गहाण कसें मान्य झाल ? सामान्य कायद्याच्या कोर्टांत अशा तऱ्हेनें तारण म्हणून ठेवलेले मालकीहक्कदर्शक कागदपत्र परत मिळविण्यास मार्ग नसे,त्याकरिता न्यायबुद्धीच्या कोर्टांत मात्र मार्ग मोकळा होता व तेथें फिर्याद केली असता कर्ज परत केलें तर कागदपत्र परत मिळतील असा निकाल देण्यात येई अशा तऱ्हेनें कागदपत्र ठेवीस ठेवून कर्ज काढलें आहे असें माहित असून जर एखाद्या सावकारानें एखादी जिंदगी खत करून गहाण ठेवली तर अशा कायदेशीर सावकारापेक्षा कागदपत्राच्या ठेवीवर कर्ज देणाऱ्या सावकाराचा हक्क अधिक धरला जातो कायदेशीर गहाणदारानें जरी कागदपत्राचा तपास केला नसला तरी जर तपासाअतीं त्यास ते कागदपत्र कोठें ठेव

म्हणून ठेवले आहेत हें माहीत होण्यासारखें होतें म्हणून तवलें ह्यांना छोटें त्याच्या माथीं मारतें.

गहूं—वैदिक काळीं गव्हाचा उल्लेख आलेला आढळतो. ( ज्ञानकोश वि. ३ पृ. २५४ पहा. ) यास संस्कृतात गोधूम असें नाव आहे.

इतिहासः—गव्हाची लागवड फार प्राचीन काळापासून म्हणजे जगातील सर्वात जुन्या भाषा तयार होण्याच्या पूर्वीपासूनच होत असून त्या सर्व भाषात गव्हाला निरनिराळीं व स्वतंत्र नावें आढळतात; उ. चिनी भाषेंत "मै" व हिब्रूंत 'चिटा' अशीं गव्हाला नावें आहेत चिनी लोक इ.स. पूर्वी २७०० वर्षे गव्हाची लागवड करीत होते हिंदुस्थानातील आर्य लोकांना वेदकालापासून गव्हाची माहिती होती. कारण गोधूमाचा उल्लेख यजुर्वेद संहिता ब्राम्हण वगैरे ग्रंथात आढळतो.

ईजिप्तमधील दाशूर मनोऱ्याच्या एका विटेंत डंगर नावाच्या गृहस्थाला गव्हाचे दाणे आढळले होते, व डंगरच्या मतें त्या मनोऱ्याचा काळ इ. स.पू. ३३५९ वर्षे असावा. त्याच्याहि अलीकडचा गहू स्वित्झर्लंड व इटालीतील काहीं ठिकाणीं सापडला होता. बायबलात गव्हाचा निर्देश आहे.

बेरोसस नावाच्या खाल्डियन धर्मोपाध्यायाच्या लिहिण्यावरून मेसापोटेमियात वन्य अथवा आपोआप होणारा गहूं होता असें दिसतें. व सिंधूच्या खोऱ्यातहि तसल्या प्रकारचा गहूं आढळत असे असा समज आहे; परंतु वन्य गहूं आढळल्याचें कोणताहि अर्वाचीन वनस्पतिशास्त्रज्ञ नमूद करून ठेवीत नाहीं ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. यावरून ज्याला वन्य गहूं म्हणतात, तो व अर्वाचीन गहूं हे एकच नव्हेत एवढें तरी म्हणण्यास हरकत नाहीं.

आशिया, यूरोप, आफ्रिका व अमेरिका या चारहि खंडात याची लागवड होते. मिसर देशात नाइल नदीच्या भोंवतालच्या प्रदेशात उत्तम प्रतीचा गहूं पैदा होतो. तो नाइल नदीला पूर येऊन जो गाळ जमतो त्यात उत्पन्न होतो. त्या देशात गव्हाची एक जात आहे तिचें पीक इतकें येतें कीं, एका दाण्यापासून पायली दीड पायली गहूं उत्पन्न होतात. सर्व एकदल धान्यात गव्हात पौष्टिकपणा जास्त असतो. म्हणून त्यास धान्यराज असें नाव मिळालें आहे.

गव्हाचे प्रकार व जाती.—खरीप व रब्बी हे गव्हाचे दोन स्वतंत्र प्रकार आहेत असें मानतां येत नाहीं. कारण हवामान व देशमान बदलल्यास अथवा एकाच ठिकाणीहि पेरणी करण्याच्या हंगामाप्रमाणें एका प्रकारचा गहूं दुसऱ्या वेळीं काढता येतो. उदा॰ खरीप गहूं दरवर्षी थोडा थोडा उशीर करून अथवा रब्बी गहूं थोडा अगोदर पेरीत गेल्यास, खरीपाचें पीक रब्बीच्या वेळीं, व रब्बीचें खरीपाच्या वेळीं घेतां येतें.

हिंदुस्थानांतून सेटनला पाठविलेल्या गव्हाच्या असंख्य परीक्षण करून डॉ. फोर्बस वॉटसन यानें गव्हाचें पुढीलप्रमाणें वर्गीकरण केलें:—( १ ) पांढरा मऊ. ( २ ) पांढरा कठिण. ( ३ ) तांबडा, मऊ ( ४ ) तांबडा कठिण. नरम अथवा मऊ गव्हाला सामान्यतः पिशी गहूं म्हणतात. हे चारी प्रकारचे गहूं थोड्याबहुत प्रमाणांत एकाच ठिकाणींहि आढळतात; परंतु उत्तर हिंदुस्थानात मुख्यतः पिशी गहूं व दक्षिण हिंदुस्थान आणि बंगालमध्यें कठिण गहूं होतो. उत्तम पिशी गव्हाची लागवड मुख्यतः गंगा, सिंधू व नर्मदा या नद्यांच्या वरच्या खोऱ्यात होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. नर्मदेच्या दक्षिणेकडे पिशी गहूं बहुतेक मुळींच आढळत नाहीं. संयुक्त प्रांतात व बहार आणि तिरहुतच्या काहीं भागात पांढरा पिशी व पंजाबात तांबडा पिशी गहूं पिकतो. दख्खन, वऱ्हाड व बंगालचा काहीं भाग यात कठीण गहूं होतो; मुंबई इलाख्याचा बराच भाग व दक्षिणेस म्हैसूर आणि मद्रासपर्यंतचा प्रदेश यात होणारा गहूं अतिशय कठीण असतो. त्याला खपली गहूं म्हणतात.

गव्हाचें झाड सुमारें २॥ ते ४ फूट उंच वाढतें. गव्हाच्या एका बुडख्यापासून त्याला अनेक फरगडे फुटतात. व प्रत्येक फरगड्याच्या शेवटीं सुमारें बोटदीड बोट लोंबी येते. लोंबीतील दाणे पातळ फोलात असतात व ते खपले गव्हाखेरीजकरून इतर सर्व जातींत मळणीच्या वेळीं सुटतात.

संयुक्तप्रांतात दांडा गहूं सर्वांत उत्तम समजला जातो. त्या प्रांतात पांढऱ्या, मऊ व बिनकुसळाच्या गव्हाला मुंडिया म्हणतात. मध्यप्रांतांतील मुख्य गव्हाचे प्रकार म्हणजे पिसी, जलालिया, ( हावरा ) दांडिया, कठिया व बनसी हे होत. पैकीं पहिल्या तीन प्रकारचे पांढरे व मऊ असून दुसऱ्या दोन प्रकारचे तांबडे व कठीण असतात. या सर्व प्रकारच्या गव्हांना कुसळें असतात बिनकुसळाच्या गव्हाला पक्ष्यापासून फार त्रास पोंचतो. म्हणून शेतकरी लोक त्याची लागवड करीत नाहींत.

कठिण अथवा मऊपणा व रंग या प्रमाणें वर्गीकरण करण्यापेक्षां कुसळाचे व बिनकुसळाचे असें वर्गीकरण करणें अधिक बरें असें जी. ए. ग्यामी याचें मत दिसतें. त्यानें गव्हाचे सहा प्रकार केले आहेत. पैकीं पहिले दोन बिन कुसळाचे असून पांढऱ्या रंगाचे, कठीण अथवा मऊ असतात. तिसऱ्या प्रकारचे म्हणजे काळी कुसळ अथवा बक्षी हे कुसळाचे असून त्याचे दाणे कठिण, पांढरे, पिंवळे किंवा तांबडे असतात. चौथा पोपटिया गहूं मुख्यतः मुंबई व मध्यप्रांतात होतो. तो कठीण असून पिंवळ्या किंवा तांबड्या रंगाचा असतो. दाऊदखानी गव्हाची कुसळें आखूड असून दाणा नरम, पांढरा अथवा कठिण असून पांढरा किंवा तांबडा असतो. ग्यामींच्या सहाव्या प्रकारांत निरनिराळ्या प्रकारचे खपली गहूं मोडतात.

गुणधर्म व उपयोग—भिन्न भिन्न प्रांतात गव्हाचे निरनिराळे भिन्न खाण्यांत येतात. गव्हाचें पीठ तीन

प्रकारचें असतें ओलवलेले गहू दळून चाळल्यावर चाळणीवर जें कणदार पीठ रहातें त्यांतील भुसा अथवा कोंडा काढून टाकला म्हणजे शुभ्र रवा रहातो, चाळणीतून खालीं पडलेल्या बारीक पिठाला मैदा अथवा सपीठ म्हणतात गहू नुसते दळल्यास त्या पिठाला कणीक असें नाव देतात गहू ओले केल्याशिवाय दळल्यास रवा तांबूस वर्णाचा होतो निरनिराळ्या प्रकारचीं पक्वान्नें उदाहरणार्थ करंज्या, पुऱ्या फेण्या, मांडे, घिवर, चिरोटे वगैरे करण्याकरिता साध्या कणकेऐवजीं रवा वापरतात जिलब्या, पुरणाच्या पोळ्या वगैरेकरिता सपीठ घेतात, व सर्वसाधारणपणें नेहमीं खाण्याच्या पोळ्या अथवा चपात्या कणकेच्या करतात पंजाबांत कणकेचे रोट करून खातात हिंदुस्थानांतील ज्या भागांत गहू खाण्याचा प्रघात आहे तेथें पोळ्या अथवा चपात्या हाच जेवणांतील मुख्य जिन्नस असतो गव्हाचे पदार्थ नुसतेच म्हणजे तुपाशिवाय खाल्ले असतां पचण्यास जड जातात याकरिता त्यांना बहुतकरून तूप माखून खातात काहीं ठिकाणीं नुसत्या गव्हाची कणीक न करता दळण्यापूर्वी गव्हांत जव अथवा हरभरा मिसळतात,व यावरूनच गव्हाबरोबर दुसरें मिश्र पीक काढण्याची चाल पडली असावी मोठमोठ्या शहरांत अलीकडे गव्हाचे पाव व बिस्किटेंहि बरीच होऊं लागलीं आहेत. तांदुळाप्रमाणें गव्हाची निवी चुन्यांत मिसळून विशिष्ट प्रकारचें सिमिंट तयार करतात गहू दळण्याकरिता अलीकडे पिठाच्या चक्क्या अथवा गिरण्या निघाल्या असून त्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे

गव्हांतील भेसळ.—देशी पद्धतीनें व देशी आउतांनीं तयार केलेला गहू युरोप, अमेरिका व ऑस्ट्रेलिया या देशांत होणाऱ्या गव्हाप्रमाणें निर्भेळ नसतो त्यांत शेंकडा २ पर्यंत माती व इतर भेसळीचे पदार्थ असतात. त्याचप्रमाणें गव्हांत हरभरा, तुर, जव, वगैरे धान्येंहि आढळतात हे सर्व भेसळीचे पदार्थ रहाणार नाहींत अशा रीतीनें गहू गोळा करून मळण्याची पद्धति निघाली पाहिजे, किंवा हल्लींच्या पद्धतींत बरीच सुधारणा झाली पाहिजे तरच हिंदी गव्हास चांगला भाव येईल व त्याविषयीं झालेला वाईट ग्रह नाहींसा होईल

लागवड.—हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांतील भिन्न हवामान व परिस्थितीला अनुरूप असे गव्हाचे निरनिराळे प्रकार झाले आहेत याचें प्रत्यंतर म्हणजे आपण हिंदुस्थानच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत प्रवास केल्यास एकाच ऋतूंत निरनिराळ्या ठिकाणीं गव्हाची लागवड निरनिराळ्या स्थितींत आढळेल उदाहरणार्थ जूनमध्यें पंजाबांतून निघून दक्षिणेस यावयास निघाल्यास, उत्तरेकडे शेतकरी लोक सप्टेंबरांत पेरणी करण्याकरिता जमिनीची पूर्व मशागत करण्यांत गुंतलेले आढळतील, मध्यभागीं कोंकणांतील तयार झालेल्या खपली गव्हाची रास चालली आहे असें दिसेल व दक्षिणेस म्हैसूर व मद्रास इलाख्याच्या काहीं भागांत ज्याची कापणी सप्टेंबरांत करावयाची त्या गव्हाची पेरणी चालली असेल (वॅट, अग्रिक १८९५ नं ३, ३८) सामान्यतः दक्षिणेकडून उत्तरेकडे म्हणजे आर्द्र वातावरण व मळईच्या जमिनी सोडून वर जावें तसतशी गव्हाची लागवड जास्त झालेली दिसते हिंदुस्थानांतील बहुतेक गव्हाची पेरणी शरदृतूंत होऊन वसंतऋतूंत कापणी होते म्हणजे बहुतेक पीक रब्बीचें असतें

उत्पन्न.—सामान्यतः बी आक्टोबरांत पेरल्यानंतर ३॥ किंवा ४ महिन्यांत पीक कापणीस येतें पीक चांगलें असल्यास दर एकरीं १० मण (बजनी) उत्पन्न होतें, परंतु पाटाचें पाणी देण्याची सोय असलेल्या जमिनींत मुबलक खत घातल्यास दर एकरीं १५ ते २० मण उत्पन्न होण्यास बहुधा हरकत नाहीं

गव्हाबरोबर फेरपाळीनें जवस, हरभरा किंवा दुसऱ्या एखाद्या कडधान्याचें पीक घेतात खाद्य धान्याबरोबर फेरपाळीनें कडधान्याचें पीक काढण्याचें महत्त्व इकडील लोकांस पूर्णपणें माहीत असून त्याचा ते फायदाहि घेतात

गव्हाचे रोग.—गेरू, गरवर, जेरू अथवा तांबेरा हा गव्हाचा मुख्य रोग आहे. पाटस्थळाखालच्या जमिनींतील गव्हावर पिकाच्या प्रथमावस्थेंत पाऊस बेसुमार झाल्यास अथवा आकाश आभ्राच्छादित असल्यास किडा पडत असतो (अग्रि लेजर १८९५, नं २० मध्यें दोन प्रकारच्या तांबेऱ्याचें सचित्र वर्णन दिलें आहे) काळी, पिवळी व नारिंगी अशा तीन रंगाची तांबेरा असते असें बटलर व हेमन यांनीं एका लेखांत लिहिलें आहे

गव्हाचा दुसरा रोग म्हणजे काजळी अथवा काणी (स्मट) हा होय हा रोग पिकास झाल्यास ओंब्यांत दाणा धरत नाहीं, त्यांत नुसती काळी भुकटी आढळते व ओंबीला कुसळ रहात नाहीं हा रोग संसर्गजन्य असल्यामुळें कापणीच्या वेळीं रोगट ओंब्या प्रथम काढून टाकाव्या व नंतर बाकीचें पीक गोळा करावें नाहींतर पुढील सालीं तें बी (काजळी लागलेलें) पेरल्यास पुन्हा रोग उत्पन्न होतो

गव्हाचा चीक किंवा सत्व.—गव्हाची कणीक पाण्यांत पुष्कळ वेळ धुतली असतां पाण्यांत न विरघळणारा जो पदार्थ शिल्लक रहातो त्याला सत्व किंवा चीक म्हणतात हा टणक व चिकट असतो ओढला असतां तुटत नाहीं याला चव मुळींच नसते असें म्हटलें तरी चालेल याचा रंग पिंवळसर असून त्यावर थोडी करड्या रंगाची झांक मारते वाळल्यावर याचें दोनतृतीयांश वजन कमी होतें व तो थोडा ठिसूळ व पारदर्शक होतो. तापविल्यावर फटफट असा आवाज करतो त्याची फुगून लाही होते व नंतर तो जळूं लागतो याचें पृथक्करण केल्यावर यांत शेंकडा ५३ भाग कर्ब (कोळसा), ७ भाग उज्जवायु, १५ ते १८ भाग नत्रवायु, थोडासा प्राणवायु, आणि सरासरी १ भाग गंधक हीं द्रव्यें सांपडतात बाजरी, राय आणि मका यांच्या पिठांत हें सत्व नसतें म्हणून त्यांच्या

पिठात गव्हाच्या पिठासारखी चिकणाई नसते या सत्वाचा उपयोग मधुमेहाच्या रोग्यासाठीं भाकरी, बिस्कुटें वगैरे करण्याकडे करतात, याचा चाकोलेटहि करतात व चहा, कॉफीत याची भेसळ करतात

**गहोइ**—बुंदेलखंड व मोरादाबाद येथें मुख्यत्वें आढळून येणारी ही एक वनियाची पोटजात आहे पेंढारी टोळयाच्या उपद्रवामुळें आपण बुंदेलखंडाहून देशांतर करून येथें राहण्यास आलों असें मिर्झापूरचे गहोई स्वत संबंधीं माहिती देतात गहोई लोक विपत्तींत असतांना त्याच्या कुटुंबाचें एका विधापानरी ब्राह्मणानें रक्षण केलें व या जातीची द्वादश-गोत्रात विभागणी केली हाच ब्राह्मण गहोई लोकाचा उपाध्याय असून त्याचें चित्र लग्नकार्यांत भिंतीवर काढून त्याची पूजा करण्यात येते मिर्झापूर येथील गहोई जातीचीं वासिल, गोइल, गागल, बादल, जैताल, कौन्धिल, काछिल, वाछल काश्यप, भारल व पतिया अशीं गोत्रें आहेत पतिया गोत्राचे लोक भाटाचा धंदा करतात गहोई जातींत सगोत्रविवाह होत नसून विधवाविवाहास मनाई असते हे लोक वैष्णव धर्मानुयायी आहेत श्रीकृष्ण अथवा बिहारीलाल हाच त्याचा उपास्य देव होय आगरवाल व परवाल लोकाप्रमाणेंच गहोईंचा वनियामध्यें मोठा दर्जा आहे ते मद्यमांसादान करीत नाहींत बुंदेलखंडचे भार्गव ब्राह्मण हेच त्याचे उपाध्याय होत व्यापारधंदा व अडतीचा धंदा करणें इत्यादि त्याचे उद्योग असतात

**गळिताचीं धान्यें**-हिंदुस्थानात गळिताचीं धान्यें असमारें अवरा आहेत त्यापैकीं जवस, सरसव, मोहरी, तीळ, भुइमुग, करडई, एरंड, हीं मुख्य होत याशिवाय मोहा, करंज, निंब, बिब्बा, काजू, वगैरे झाडाच्या बीजापासून तेल काढतात खोबरें व सरकीचें तेल हीं स्वच्छ करून त्याचा अमेरिकेंत लोण्याप्रमाणें उपयोग करतात हिंदुस्थानात दरवर्षी वीस कोटी पचाहत्तर लक्ष किंमतीचीं गळिताचीं धान्यें व तेलें काढितात यापैकीं अजमासें एकतृतीयांश माल परदेशीं रवाना होतो व बाकीचा माल या देशात खपतो लढाई सुरू होण्यापूर्वीच्या माहे मार्च सन १९१४ अखेर पाच वर्षांची सरासरी पहाता दरवर्षी परदेशीं रवाना झालेल्या मालाची किंमत २४३८ लक्ष रुपये होती अलीकडे परदेशीं भुइमुगाच्या जातीचा बराच फैलाव झाला आहे याचें मुख्य कारण जास्त उत्पन्न व या जातींना रोगाची फारशी बाधा होत नाहीं हें होय सन १९००—०१ व १९०४—५ च्या दरम्यान भुइमुगाखालीं सरासरीने ४,३१,००० एकर क्षेत्र होतें तें सन १९१४—१५ सालीं २४१३००० एकरांपर्यंत गेलेलें आहे हें पीक मद्रास, मुंबई इलाखा, ब्रह्मदेश या ठिकाणीं फार महत्वाचें आहे व इतर प्रांतात याचा पेरा तुरळक आहे संयुक्तप्रांत, मध्यप्रांत व म्हैसूरचें राज्य येथें भुइमुगाचा थोडयाशा प्रमाणात पेरा आहे अलीकडे मलबार व त्रावणकोर येथील खोबऱ्याचा व्यापार वाढत्या प्रमाणावर होऊं लागला आहे सन १९१४—१५ सालीं नारळ, खोबरेल, तेल, दोरखंडें, वगैरे मिळून सुमारें दोन कोटी पचवीस लक्ष रुपयाचा माल दक्षिण हिंदुस्थानातून परदेशीं रवाना झाला सन १९१४—१५ सालीं सर्व हिंदुस्थानात गळिताच्या धान्याखालीं खालीं नमूद केल्याप्रमाणें क्षेत्र होतें

| धान्याचें नाव | क्षेत्र एकर. | धान्याचें नाव | क्षेत्र एकर |
|---|---|---|---|
| जवस | ३५२६,००० | सरसव व मोहरी | ४१४४००० |
| तीळ | ४४७८,००० | इतर धान्यें | ४१८५००० |

वरील सर्व क्षेत्राची बेरीज १५३३३००० एकर आहे या क्षेत्रापैकीं शेकडा २२ क्षेत्र मद्रास इलाख्यात असून शेकडा १७ मध्यप्रांतात व वऱ्हाडात, शेकडा १२ बहार, ओरिसा व बंगाल, शेकडा १० ब्रह्मदेश, शेकडा ९ पंजाब व शेकडा ६ संयुक्तप्रांत व बाकी शेकडा ६ भाग क्षेत्र इतर ठिकाणीं होतें.

| मुंबई इलाखा | | मध्यप्रांत | |
|---|---|---|---|
| धान्याचें नाव | एकर | धान्याचें नाव | एकर |
| जवस | ११८३९० | जवस | ११७०३५६ |
| तीळ | २६२३७९ | तीळ | ८४३९९२ |
| सरसव-मोहरी | ८१०७ | सरसव-मोहरी | ४६७८३ |
| भुइमुग | २२२०४६ | भुइमुग | ३६८६ |
| इतर | ३२०५२७ | इतर | ४१४१५८ |

वऱ्हाड.

| | | | |
|---|---|---|---|
| जवस | ५१,५३३ | भुइमुग | ३,६५३ |
| तीळ | ८१,७४२ | | |
| सरसव-मोहरी | १,४२२ | इतर | ६६,८६८ |

गळिताच्या धान्याच्या पेऱ्यापैकीं काहीं खरीप, काहीं रब्बी व काहींचा पेरा दोन्ही हंगामात करतात तीळ व एरंडी हीं पिकें दोन्ही हंगामात पेरितात भुइमुग, कारळा, व सूर्यफूल हीं खरीपात पेरीत असून जवस, सरसव, मोहरी, जवो, करडई, खसखस हीं रब्बीच्या हंगामात पेरतात. अंबाडी बहुतकरून खरिप पिकाशीं मिसळून पेरतात देशावर गळिताच्या धान्याचा पेरा जास्त होत असून कोंकणात तो अगदीं कमी प्रमाणात होतो सर्व पिकात भुईमुगाचें बीं दर एकरी जास्त लागत असून त्याला जास्त खर्च येतो लहान दाण्याच्या लवकर तयार होणाऱ्या जातीचें बीं दर एकरी जास्त लागतें कारण या जातीस रोपें पसरत नसून, मुळ्यांच्या झाडांसारखीं उभीच वाढतात तीळ, सरसव-मोहरी, खसखस, जवो यांचें बीं अगदीं कमी लागतें उत्पन्नावरून पाहिल्यास दर एकरीं भुईमुगाच्या उत्पन्नाइतकें उत्पन्न कोणत्याच गळिताच्या धान्याचें येत नाहीं

गळिताच्या धान्यातील तेलाचें शेकडा प्रमाण खालीं दिलें आहे

| पिकाचें नाव | शेंकडा प्रमाण | पिकाचें नाव | शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|
| जवस | ३८–४० | करडी | २५–२९ |
| सरसव–मोहरी | ३२–४० | जवो | २५–२८ |
| तीळ | ४६–४८ | खसखस | ३०–३३ |
| भुइमूग | ४२–४९ | सरकी | १५–२१ |
| कारळा | ४१–४३ | खोबरें | ५२–५७ |
| एरंडी | २६–३६ | | |

तेल डोक्याला व अंगाला लावितात मद्रास इलाख्यात अंगाला तेल लावण्याचा विशेष प्रघात आहे. तिकडील लोक दर आठवड्यास अभ्यंगस्नान (ऑइल बाथ) घेतात. याशिवाय स्वयंपाकांत, दिव्यांतून जाळण्यास यंत्रें गाडया ओंगण करण्यास व रंगाच्या कामीं उपयोगाचें असून कांहीं ठिकाणीं तें भाकरीवर घेऊन खातात. साबण व मेणबत्त्या करण्यांत तेलाचा फार उपयोग होतो. जवस, तीळ, भुइमूग, कारळा, करडी, सरकी, खोबरें, अंबाडी वगैरेंची गोडी पेंड गुरांस चारतात व एरंडी, करंज, जवो, उडी वगैरेंची कडू पेंड खतास वापरतात गोड्या पेंडीचाहि खतासाठीं चांगला उपयोग होतो. हल्लीं भुईमुगाच्या पेंडींत गव्हाचें पीठ मिसळून त्याचीं बिस्किटें तयार करण्याचे प्रयोग चालू आहेत. गोडया गळिताच्या धान्याची चटणी करतात.

**गळूं** (विद्रधि)—शरीराच्या कोणत्याहि लहान मोठ्या भागात पूयसंचय होणें म्हणजे गळूं होणें व तें होण्याचें कारण विकृतशरीरविज्ञानशास्त्राच्या मतानें त्यात होणारा पूयोत्पादक जंतूंचा प्रवेश हें होय हे जंतू सर्व तऱ्हेच्या गळवातून सापडतातच शरीरास कांहीं इजा होऊन त्वचेंतील सूक्ष्म छिद्रातून त्यांचा प्रवेश आत होत असावा अगर रक्तप्रवाहमार्गें ते गळवात येत असावे. गळूं होण्याच्या अगोदर कांहीं लक्षात येण्याजोगी इजा त्या भागास होऊन त्याची रोगप्रतिकारकशक्ति अंमळ हीन झालेली असते अगर शरीरातच एखाद्या जबर व्याधीचें चिन्हाड असल्यामुळें रोगजंतू पचविण्याच्या शरीराच्या स्वाभाविक शक्तीचा ऱ्हास झालेला असतो आणि असें झालें म्हणजे त्या ठिकाणीं विशेष रक्तसंचय होऊं लागून रक्तवाहिन्यातून त्या भागात लसीचें उत्सर्जन व संचय होऊं लागतो व हीच लस मग गोठते आणि तो भाग लाल व दाडरल्यासारखा कठीण लागतो. याचा मधील भागाची मात्र लिबलिबीत होण्याची प्रवृत्ति असते व पुढें हा लिबलिबीतपणा वाढत जाऊन त्यावरील त्वचा अगदीं पातळ होत व तिच्या मध्यभागीं कांहीं भाग कुजून काळसर होऊन छिद्र पडून पू बाहेर आपोआप येऊं लागतो नंतर तो भाग हलका होऊन ठणका थांबतो. या सुजेंतील बराच भाग पूयजंतूंनीं ग्रस्त केल्यामुळें मृत होऊन पुवाचे रूपानें निघून जातो कांहीं विद्रधींमध्यें ही मांसनाशक्रिया फार तीव्र असते व त्या सुजलेल्या भागातील सर्वच गांठ निःसत्त्व होऊन कुजते व छिद्रातून सबंध पडून जाते अगर कापून काढावी लागते (उदाहरण – काळपुळी) पण असें नेहमीं न होता बहुधा तें गळूं फुटलें असता अथवा फोडलें असता दाट पिवळा पू बाहेर येतो व त्या जागेच्या आतील मांसल भाग कुजून पुवाच्या रूपानें बाहेर पडतो व गळवाचें एक पोंकळ विवरच बनून त्याच्या आत पूयजंतूंच्या नाशकक्रियेस बळी न पडलेला लाल भाग असतो. एखाद्या पूयव्रणाचा अगर क्षताचा तळ जसा लाल व दाणेदार दिसतो, तसाच हा भाग असतो व हेच लाल दाणेदार मांसपेशी वाढत जाऊन ती पोकळी भरून येते. या क्रियेस व्रण राहून जखम भरून येणें असें म्हणतात. कधींकधीं एखादा सांधा अगर त्यातील स्नायू, मस्तक, उर, अगर उदर याच्या पोकळ जागेंत पूयसंचय होतो व तसा तो झालेला आहे त्याचें निदान खास झालें म्हणजे ही स्थिति सुधारण्याचे मार्ग दोनच (१)कापून पू बाहेर येऊं देणें व(२) जखम भरून येईतोंपर्यंत आतील पू बाहेर पडण्यास मार्ग ठेवणें हीं गळवें कापताना आतील लाल दाणेदार मांस जरा खरवडून घेऊन जंतुघ्न औषधानें धुवून काढण्याची वहिवाट आहे आणि येणेंप्रमाणें पुवाचा निकाल होत असण्याची उत्तम तजवीज राखल्यास पू उत्पन्न होणें बंद होतें व गळवातून पाण्यासारखी लस येते तीहि कमी होत जाऊन गळवाची पोकळी संकोचित होत जाते असें होऊं लागलें म्हणजे पुवाचा निचरा होण्यासाठीं जी रबरी अगर कांचेची नळी ठेवितात ती आखुड आखुड करीत जातात व शेवटीं काढूनहि टाकतात आणि मग गळवाचे तोंड बंद होतें मान, पाठ अथवा कंबर यातील मणक्यास हाडोव्रण झाला असता अशा तऱ्हेचा पुवाचा मोठा संचय होऊन मोठे विद्रधी तयार होतें व त्याचा निकालहि याच तत्त्वानुसार करतात पण क्षयसंबंध असल्यामुळें जंतुघ्नसम्प्रदायाप्रमाणें कांहींच न चुकण्याविषयीं अधिक काळजी घेतात गळवाच्या अगदीं खालच्या भागात शस्त्रानें चीर पाडतात म्हणजे निचरा उत्तम होतो. गळूं कापल्यावर जर ठणका सुरू राहिला तर नवीन पू होत आहे अगर पूयोत्सर्जननलिकेंत कांहीं अडकलें आहे असें समजून जें कारण असेल तें काढून टाकावें आणि लवकरच पुनः खरवडणें, धुणें, व पूयोत्सर्जननलिकेमार्गें पुवाचा निकाल करून घ्यावा लागतो

**घ र गु ती उ पा य**—गळूं मऊ होण्यासाठीं शेकानें अथवा पोटिसानें त्यातील पू बाहेर वाहून जाण्यास मदत करावी आळशीचें, गव्हाच्या पिठाचे, कांद्याचें कडुलिंबाच्या पानाचें अगर दुसऱ्या कित्येक पदार्थांचें पोटिस करावें एक उबदार पण पातळ फडकें दुहेरी करून त्यात हें पसरून गळवावर बांधावें व तें वरचेवर बदलीत जावें म्हणजे गळूं लवकर पिकतें तें चिरताना आडव्या तऱ्हेनें न फोडितां उभ्या दिशेनें चिरलें असता एखादि रक्तवाहिनी कापली गेल्यास ती सहज बरी होते व फाजील

रक्तस्राव होत नाहीं. गळूं फोडण्यापूर्वी रोग्यास स्नान घालून कापावयाचा जो भाग असेल तो साबणानें व नंतर जंतुनाशक द्रव्यानें धुवून काढावा. ( १ ) रसकापूर १ ग्रेन व पाणी ४ औंस, अथवा ( २ ) कॅर्बालिक ॲसिड १ भाग व पाणी ८० भाग, किंवा ( ३ ) बोरिक ॲसिड ५ ग्रेन व पाणी १ औंस. यापैकीं कोणतेंहि औषध गळवा-बाहेरील व आंतील भाग जंतुरहित करून शस्त्रक्रिया यशस्वी करण्यास उपयोगी पडतें. रोग्याचा बिछाना, चादर, टेबल हीं सर्व निर्मळ असावीत. उपकरणें, शस्त्रें, डॉक्टर व मदतनीस याचे हात व नखें या औषधानीं स्वच्छ व जंतुरहित करतात.

**गाई व म्हशी.** गा ई —सर्व जनावरात गाय व बैल हे प्राचीन कालापासून माणसाळलेले प्राणी आहेत. आपल्या भरतखंडांतील अतिशय प्राचीन वाङ्मय म्हणजे वेद. यांत निरनिराळ्या ऋचांत निरनिराळ्या प्रसंगाला अनुसरून गाय व तिजपासून होणारें दूध, दहीं, तूप वगैरे जिन्नस यासंबंधानें उल्लेख आले आहेत. गाईच्या मांसाचा उपयोग जरी प्राचीन काळीं होई तरी गोरक्षणाचें महत्वहि प्राचीन काळीं होतेंच. याला अनुलक्षून वेदात पुष्कळ ऋचा सापडतात. त्यापैकीं ऋग्वेदातील एका ऋचेचा भावार्थ पुढें दिला आहे.

‘ रुद्र-रुद्रपुत्र मरुत–यांची माता, वसूंची दुहिता, आणि आदित्याची भगिनी व अमृतरूप दुधाचें केवल निवासस्थान अशी जी पापरहित गाय तिचा वध करूं नका; असा जाणत्या लोकांना मी उपदेश करतों” ( ऋ. ८.१०,१५ )

वेदकालीं संग्रही असणाऱ्या गाईच्या आधिक्यावरून गृह-पतीच्या स्थितीचा अजमास करावयाचा असा प्रघात होता असें मंत्रार्थावरून आढळून येतें.

" हे दिव्य धेनूनों, रोड झालेल्या मनुष्यांस तुम्ही पुष्ट करतां आणि ज्यांच्या तोंडावर अगदीं कळा नाहीं त्यांना तजेलदार करून सोडता. तुमचा स्वर मंगलकारक आहे, तर तुम्ही आमचें घर मंगलमय करा. त्या तुमच्या महान् सामर्थ्याची वाखाणणी लोकसभेंतून सुद्धां होत असतें”. ( ऋ ६.२८,८ )

वरील उल्लेखावरून प्राचीनकाळीं गोसंवर्धनाचें महत्व आर्यलोक पूर्णपणें जाणत असत हें सिद्ध होतें. भागवत वगैरे पुराणांत गाईंच्या कळपाचीं सुंदर वर्णनें व धार्मिक दृष्ट्या गाईचें महत्व दाखविणारीं अनेक वचनें सांपडतात. भागवतातील दशम स्कंधात पूर्वार्धांतील तेराव्या अध्यायांत श्रीकृष्णाच्या बालपणाचें वर्णन करतांना श्रीवेदव्यासांनी फार बहारीचे प्रसंग दिले आहेत व त्यांतील गोपगीतांत गोपाल व गाई यांच्या संबंधानें फार सुंदर काव्य पदोपदीं आढळतें. उदाहरणार्थः—

गावस्ततो गोष्ठमुपेत्य सत्वरं हुंकार घोषैः परिहूत संगतान् ।
स्वकान् स्वकान् वत्सतरानपाययन् मुहुर्लिहन्त्यः स्रवदौधसंपयः ।।
× × × समेत्य गावोऽधोवत्सान्वत्सवत्योप्यपाययन् ।
गिलन्त्य इव चाङ्गानि लिहन्त्यः स्वौधसंपयः ।।

कौटिल्याच्या अर्थशास्त्रातहि गोरक्षण व संवर्धन याच्या संबंधीं उल्लेख आलेला आहे. त्यावेळीं या कामाकरिता एक निराळें खातें अस्तित्वात होतें, त्यावर एक अधिकारी नेमलेला असे त्याचें काम जनावरांचें वर्गीकरण करून तीं सुस्थितींत आहेत कीं नाहींत व त्यापासून सरकारला होणारें उत्पन्न बरोबर व योग्य वेळीं मिळतें कीं नाहीं, इत्यादि गोष्टीं-संबंधानें देखरेख करणें. अलीकडील सर्व हिंदुराजास गोब्राह्मण प्रतिपालक ही संज्ञा असे व गाईचें संरक्षण करणें हें आपलें मुख्य कार्यच आहे असें ते समजत व अद्यापहि समजतात.

एवंच इतर देशापेक्षा हिंदुस्थानात गुरांचें महत्व अधिक आहे. या देशात आउताचे बैल हें मुख्य शेतकीचें साधन होय. बैल चांगले तर शेती चांगली. बैल आउताला, गाडीला, मोटेला व कित्येक ठिकाणीं स्वारीकरता वर, बसून जाण्यालाहि उपयोगी पडतात. हिंदुस्थानात गाई मुख्यत्वेंकरून शेतकीला लागणाऱ्या बैलाकरिता पाळितात. गाईचें जें थोडें बहुत दूध निघतें तें घरखर्चास उपयोगी पडतें. गोऱ्हा मोठा झाला म्हणजे तो शेतीच्या कामीं येतो. हिंदुस्थानदेशातील निरनिराळें हवामान, चाऱ्याचा कमजास्त पुरवठा, निरनिराळ्या प्रकारच्या कमजास्त कसाच्या जमीनी व त्यावर होणारीं निरनिराळ्या प्रकारचीं गवतें व पिकें, या मानानें गाईच्या अनेक जाती आढळतात. त्या जातींत कित्येक पुष्कळ दूध देणाऱ्या, कित्येक कमी पण कसदार दूध देणाऱ्या व कित्येक तर फारच देखण्या आहेत. कित्येकांची प्रजा जड ओझीं वाहण्यास, नांगरटास मजबूत व वळकट असते. कित्येक जास्त काटक व जास्त वर्षें काम देणारी व कित्येकाची अवलाद गाड्या, टांगे वगैरेस घोड्याप्रमाणें ओढणारी असते. फार पावसाळी भात पिकणाऱ्या भागात गुरें अगदीं लहान असतात. चांगल्या गुरांच्या जाती उष्ण व समशीतोष्ण भागातच आढळतात. त्यापैकीं मुख्य, नेलोरी—मद्रास ईलाख्यात, अमृतमहाल—म्हैसूर संस्थानात, मॉंटगॉमरी व हांसी-पंजाबात; सिंधी–दक्षिण सिंधप्रांतांत; माळवी—सातपुड्यात व मध्यहिंदुस्थानात, गीर अगर सोरटी—काठेवाडात; कॉंकेजी–गुजराथेंत, गौळाऊ–मध्यप्रांतात; खामगावी—वऱ्हाडात; खिलारी–सातपुड्यात व आठपहाडी महालात; व कृष्णाकाठी—कर्नाटकात; अशा जाती आढळतात.

सर्व हिंदुस्थानांत जास्त दूध देणाऱ्या गाईंच्या जाती फक्त पांच आहेत (१) सिंधी, (२) दाह्विाल किंवा मॉंटगॉमरी (३) हांसी किंवा हिसार, (४) गीर अगर सोरटी, (५) ऑंगोल अगर नेलोरी. हिंदुस्थानांत आढळणाऱ्या मुख्य गाईंच्या म्हशीच्या जातींचें वर्णन पुढें दिलं आहे.

मॉंट गॉमेरी, शहीवाल अगर तेली जात.—ही पंजाब प्रांतांतील उत्तम दुभती गुरें आहे. या जातीचीं उत्तम गुरें गुर्जावारात (वार = दोन नद्यांमधील प्रदेश)पैदास होतात. या प्रदेशात गवत येतांवेंच होत असलें तरी पडीक जमीन मुबलक आहे. पाऊस सरासरी दहाधारा इंच पडतो. या गुरांची पैदास मुसुलमान लोक करतात. साधारणपणें येथील परिस्थिति कराची गाय जेथें पैदा होते तशा तऱ्हेची आहे. या जातींचें कराची गाईशीं पुष्कळ साम्य आहे. या गाईचा प्रसार विनार कॉलनींत लाहोर,मुलतान,अमृतसर वगैरे ठिकाणीं झाला असून शिवाय त्या हिंदुस्थानभर आढळतात. त्या परदेशींहि गेलेल्या आहेत मॉंटगॉमेरी जात रंगात पिवळी, तांबडी, पाटरट किंवा करडी असते. जनावर लहान, सुबक असून डोकें, शिंगें व मान लहान असतात. मान पातळ असते. जनावर पुढच्याच्या बाजूला जरासें उंच असतें. कास मोठी असून आचळाचीं ठेवण चांगली असते. अवाव-रील कातडी पातळ असून केस तुळतुळीत असतात. गाय रोज सरासरी सोळा पौंड दूध देते. साधारण गाईला शंभर सवाशें रुपये किंमत पडते.

हिसार-हरियाना अगर हांसी:— या जातींतील उत्तम जनावरें गुजराथी व काकेजीसारखीं दिसतात. हीं रंगात पांढरीं व करडीं असून पंजाबात रोहटक, हिसार या जिल्ह्यात पैदा होतात.या जातीच्या विशेष चांगल्या गाई संपळा व गोहाना तालुक्यात आढळतात. यांचें तोंड लांब व सुबक दिसतें; कपाळ रुंद उठावदार, डोळे पाणीदार व पोळीला वळकट्या असतात. बैलांचें वशिंड मोठें असतें. एकंदरीत बैल बांधेसूद व मोठा असून तो शिंगानें भव्य दिसतो. जनावर चपळ व ताकद-वान असतें. या जातीच्या गाई पुढयाकडे उंच असून मागा-कडे उतरत्या असतात. कास मोठी असून आचळ आका-रात मध्यम असल्यामुळें दूध काढण्यास सोपें जातें व दूधहि पुष्कळ निघतें. या गाई मिळण्याचीं ठिकाणें पंजाबात हिसार, भिवानी, शिरसा व जहाजगड हीं होत. येथें दरवर्षी मोठया यात्रा भरतात. जनावराची उंची साधारणपणें ५२ इंच असून छातीचा घेर सुमारें ८० इंच असतो. पुढच्या पायाची नळी ७ इंच असते. हिसार येथील पैदाशीच्या गोशाळेंतून उत्पत्ती-साठीं वियाणू व मिलिटरी खात्यासाठीं मोठमोठया गाड्या ओढण्यास बैल पुरविले जातात.

नागोरी:—या जातीचें मूलस्थान राजपुतान्याच्या पश्चिमेस असलेला नागोर प्रांत होय.या जातींतील गुरांचा रंग पांढरा, तोंड सरळ, कपाळ रुंद, डोळे पाणीदार, मान लांब व बारीक व कान मोटे असून लोंबते असतात एकंदरीत जनावरें उंच व चपळ असतात. या जातीच्या गाई पुष्कर, हिसार, हांसी व बालोत्रा येथील वार्षिक यात्रेंत मिळतात. गाईची कास मोठी असून त्या रोज सुमारें २० पौंड( १० शेर )पर्यंत दूध देतात. या जनावरांची उंची सुमारें५२ इंच असते. पुढच्या पायाची नळी ७ इंच असते.

मेवार, मथुरा अगर कोशी —या जातीचें मुख्य उत्पत्ति-स्थान मेवार होय. हा प्रदेश, कोशी तालुक्याचा कांहीं भाग, पंजाबातील गुरगांवपैकीं कांहीं भाग, भरतपूर व अलवार संस्थानचा कांहीं भाग मिळून झालेला आहे. या जातीच्या गाई रंगात पांढऱ्या अगर करड्या असून नेहेऱ्याची लांबी हिसार जातीहून कमी असते डोळे पाणीदार असून कान मोठे व लोंबते असतात. या गाई रोज १०-१६ पौंड दूध देतात. या गाई मथुरा जिल्ह्यातील कोशीच्या यात्रेंत विकत मिळतात. बैल आकारानें मध्यम असून कामाला चांगले असतात. याची उंची सुमारें ४९ इंच व छातीचा घेर ६२इंच असतो.

रेरी.—ही जात देरीगड, पन्हेर, माजरा या ठिकाणीं पैदा होते या जातीचे बैल कामाला चांगले असतात पण खादाड असतात या जातीस वळण लावण्यास अगर शिकविण्याम कठिण जातें. गाई फारसें दूध देत नाहींत.

पिलेवीट ( पनया ):—ही जात पुरानपूर जिल्ह्यामध्यें पैदा होते. बैल कामाला फार चांगले असतात गाई फारसें दूध देत नाहींत.

कनवारिया —ही जात बुंदेलखंडात पैदा होते. बैल कामाला चांगले असतात गाई फारसें दूध देत नाहींत.

नेल्लोर ( ऑंगोल ).—या जातीची उत्पत्ति मद्रास इला-ख्यातील नेल्लोर, कृष्णा व गंतूर जिल्ह्यात होते जनावराची दुधाविषयीं व कामकरी बैलाविषयीं प्रसिद्धि आहे. हें जनावर उंच असून दिसण्यांत सुंदर दिसतें. या जातीचीं जनावरें कांहींशी कृष्णातीरच्या जनावरासारखीं दिसतात. दोघांचें मूळ एकच असावें असें दिसतें मध्यप्रांतांतील आर्वी जात आकारात, बांध्यात व रंगात नेल्लोरसारखीच दिसते, पण या जातीच्या गाई फारसें दूध देत नाहींत. नेल्लोर जातीच्या गाई हिंदुस्थानातील मुख्य दुभत्या जनावरात गणल्या जातात.या गाई स्वभावानें गरीब असून त्या १४ते २५ पौंडपर्यंत दूध देतात. बैल फार चपळ नाहींत व फार लहहि नाहींत. ते शेतकीच्या सर्व कामीं उपयोगी पडतात नेल्लोर जातींत रंग पांढरा, करडा व केंव्हा केंव्हा तिंगटहि असतो. चेहरा आखूड, कपाळ रुंद, जबडा मोठा व डोळे पाणीदार असतात. मान जाड व आखूड असून पोळी व वेंवट फार वाढलेलें असतें. शिंगें आखूड व सुरदलेलीं असतात. जनावर पायाने नरम असून दगडाळ किंवा रेंवट जमिनींत व खडीच्या रस्त्यावर याचे पाय लवकर उमळतात, परंतु काळ्या व खोल जमिनी नांगरण्यास हे बैल फार उपयोगी आहेत. साधारण गाईची किंमत ८०ते१५० रुपयेपर्यंत पडते उत्तम गाईला २०० रुपये पडतात. साध्या बैलाच्या जोडीला १२५ ते १५० रुपये पडत असून जोडीची किंमत ३५०रुपये पर्यंत असते.

कांगायम —ही जात दक्षिण कोइमतूर जिल्ह्यामध्यें पैदा होते. या भागातील शेतकरी आपल्या शेताचा एक

भाग चारण्याकरिता वेगळा राखून ठेवितात. गवत लहान असताना आत गुरें सोडीत नाहींत त खाण्याजोगें उंच झालें म्हणजे शेताचे भाग करून ते थोडे थोडे चारतात. या जातीचीं गुरें मद्रास इलाख्यात बरींच आढळतात. जनावर आकारात मध्यम व बांध्यानें मजबूत असून स्वभावानें फारसें तापट नसतें ही जात शेतीच्या सर्व कामाला फार उपयोगी आहे. या जातींतील गाई दुभत्या नसतील तेव्हां नागरास लावण्याची तिकडे चाल आहे यांची उंची सुमारें ५२ इंच असते. जोडीची किंमत १००ते१५० रुपये पर्यंत असते.

सिलोनी गुरें:—सीलोनमध्यें दोन जातींचीं गुरें आढळतात. एक गावटी व दुसरी समुद्रकिनारी समुद्रकिनारी जात म्हैसुराकडून आलेली आहे. गावठी जात एडनसारखी आकारात लहान असून ती दिसण्यात सुरेख दिसते या गुराचें डोकें लांबट असून कान लहान असतात. शिंगें आखूड, जाड व दुरटीं असतात पाय आखूड व खूर काळे असतात. हीं गुरें साधारणपणें विलायती गुरासारखीं दिसतात. बैल चपळ व काटक असतात गाई फारसें दूध देत नाहींत उंची ४१ इंचापर्यंत असते सिलोनात गुरें डागण्याची फार चाल आहे गेल्या दहा वीस वर्षांत सिलोनात दुभत्य करिता कराचीहून बन्याच सिंधी गाई नेलेल्या आहेत.

लाखाभोंडा (लाखाम्हणजे तांबडी. भोंडा म्हणजे तोंडावर पांढरी)—या जातीचें उत्पत्तिस्थान तेलंगणात आहे, म्हणून तिला तेलंगी असेंहि म्हणतात वन्हाडात या जातीचीं जी जनावरें आहेत तीं बहुतकरून निझामच्या राज्यातून आणलेलीं आहेत तथापि त्यांची पैदास यवतमाळ जिल्ह्यातील केळापूर व वणी तालुक्यात बरींच होते. याचें डोकें उठावदार असून चेहरा थोडासा आखूड व अरुंद असतो शिंगें व कान आखूड असतात या जनावराचें हाड कणखर असून त्याची मागची बाजू मजबूत असते. मागील धड पुढील भागापेक्षा थोडेंसें उंच असतें हें यांच्यात एक विशेष लक्षण आहे. उंची सुमारें ४२ ते ५० इंच असते एकंदरींत जनावर कणखर असून शेतीच्या फार उपयोगी पडतें साधारण जोडीला सुमारें १२५ ते १७५ रुपये किंमत पडते.

गुरगाव—गुरगाव म्हणून होळकराच्या संस्थानात एक जिल्हा आहे. या जातीच्या जनावराचें हें उत्पत्तिस्थान असल्यामुळें तिला हें नाव मिळालें आहे. ही जात इंदूर, पंचमहाल व नर्मदा नदीच्या उत्तर भागात दृष्टीस पडते या जातीचीं जनावरें नेमाडी गुरांपेक्षा सावकाश पण अवजड काम करण्यास अधिक उपयोगी पडतात या जातीच्या जनावरांच्या अंगावर पांढऱ्या रंगाचे ठिपके अगर पट्टे असतात व तीं निमाडीपेक्षा आकारानें मोठीं असतात. त्यांची उंची वशिंडामागें सुमारें ५० ते ६० इंच असून छातीचा घेर सुमारें ७० इंच असतो उत्तम जोडीला १५० ते २०० रुपये किंमत पडते, पण साधारण बैल ६० रुपये पर्यंत विकत मिळतो.

साकरा.—या जातीचीं जनावरें सिवणी, छिंदवाडा, यांच्या उत्तरेकडील प्रदेशात मंडला, जबलपूर व दमोह या जिल्ह्यात पैदा होतात. हीं जनावरें माळवीच्या खालोखाल असून चपळ असतात हीं आकारानें लहान असल्यामुळें त्यांना खावयास कमी पुरतें व तीं हलक्या जमिनी नांगरण्याच्या कामीं उपयोगी पडतात. याची वशिंडामागें उंची सुमारें ४० इंच असून छातीचा घेर सुमारें ६३ इंच असतो. एकंदरींत साकरा जात माळवीप्रमाणेंच असून ती आकारानें मात्र लहान असते.

शेरी अगर खेराट.—ही जात रजपुतान्यातील शिरोही संस्थानात पैदा होते व अबूच्या पहाडाच्या आसपास पुष्कळ आढळते ही माळवीसारखीच पण थोडी उंच असून शिंगाची ठेवण वेगळ्या प्रकारची असते. हिचीं शिंगें एकावर एक दोन वळसे घेऊन उंच होत जातात

माळवी —या जातीची खरी पैदास हुशंगाबादच्या उत्तरेस व सागरच्या पश्चिमेच्या प्रदेशात म्हणजे मध्यहिंदुस्थानात होते याचें मुख्य वसतिस्थान होळकर व शिंदे यांचें राज्य व कांहीं अंशीं पंचमहाल होय याची पैदास गवळी, अंजनी, खाटीक, सैंडाज या जातींचे लोक करतात माळवी जातींचीं गुरें शेतकीच्या कामीं फारच उपयोगी पडतात. तीं काटक, स्वभावानें गरीब व गवळाऊ एवढीं मोठीं नसली तरी सुटसुटीत व सुदृढ असतात. या जातीचा प्रसार दक्षिणगुजराथ, खानदेश, देश व नर्मदेच्या काठचा सपाट प्रदेश व वन्हाड प्रांत यात मोठ्या प्रमाणात झाला आहे. या जातींचीं गुरें रंगानें पांढरीं करडीं, आकारानें मध्यम, मजबूत व वाटोळ्या आगलोटाचीं आणि मध्यम उंचीचीं असतात. चेहरा आखूड व नाकाचा भाग किंचित् वर उचललेला असतो. डोकें थोडें खोलगट असतें. शिंगें वर जाऊन व पुढें येऊन कमानदार होतात एकंदरींत जनावर रुंदट असून लांबीला कमी असतें. पाय सुबक असून खूर काळे कणखर असतात. उंची सुमारें ५४ इंच असून छातीचा घेर सुमारें ७० इंच असतो. गाई दूध कमी देतात व त्यांचीं तीन वर्षांत दोन वेतें होतात.

उ म र डा (डिमजा) जात —मूर्तिजापूर जिल्ह्यात उंबरडा म्हणून एक गाव आहे, हें गाव या जातीच्या गुराचें मूलस्थान होय. हल्लीं हीं गुरें यवतमाळ, उमरावती, व अकोला या जिल्ह्यात फार आढळतात. या जातींत दोन रंगाचीं गुरें आढळतात. कांहीं पांढरी कांहीं तांबडी आणि कित्येकात या दोन्हीं रंगाचें मिश्रण असतें या जातीचे बैल मध्यम आकाराचे असून त्याच्या शरिराचा बांधा सुदृढ असतो. चेहरा सुबक, कपाळ रुंद व किंचित् उठावदार असतें. डवरा रुंद व फिकट रंगाचा असून नाकपुड्या मोठ्या असतात. मान आखूड व जाड असून गळ्याखालची पोळी फारशी वाढलेली नसते शिंगें मध्यम आकाराचीं असतात. पाठ सरळ असून जनावर एकंदरींत सुबक, मजबूत, चपळ

राकट असतें या जातीचे बैल सवारीच्या गाडीला रोज ३० ते ४० मैलपर्यंत प्रवास करूं शकतात. साधारण जोडीला १२५ ते २०० रुपये पडतात.

गवळाऊ(अरव्ही)जातः—ही जात नागपूर वर्धा जिल्ह्यांच्या उत्तरभागांत व शिवणी जिल्ह्याच्या दक्षिण भागात पैदा होते. अस्सल जातीचीं गुरें नागपूर जिल्ह्यात जेतपूर, रामटेक व साखर येथें दृष्टीस पडतात. या जातीचा रंग बहुतकरून पांढरा असून शिंगे वर येऊन मागील बाजूस वाकलेलीं असतात. चेहरा लांबट व डोकें उठावदार असतें. शरीर हलकें, कमरेंत साधारण कमजोर, पुठ्ठा मरा उतरता असून जनावर उंच व पायात मजबूत असतें. ही जात चपळ असून पळण्यात चांगली असते. कित्येक वेळीं ते एका दिवसात ५० मैलपर्यंत मजल मारतात बशिंडाभागी उंची सुमारें ५ फूट असून छातीचा घेर सुमारें ७'५ इंच असतो साधारण जोडीची किंमत २०० ते ४०० रुपयेपर्यंत असते. या जातीच्या गाई चांगलें खावयास घातलें तर ४ ते ८ शेरापर्यंत दूध देतात.

मेळघाट जातः—वऱ्हाडात अनिमयीत लहान जातीचीं गुरें मेळघाट अथवा पहाडी ही होत. या जातीचें बैल काटक व चपळ असून पहाडी मुलखांत फार उपयोगी आहेत. यात अनेक रंग असतात, पण मुख्य तांबडा-पांढरा, काळा-पांढरा व दोन्ही मिश्रित हे होत. यांचे कपाळ सपाट असून मध्यें उभेट खाच असते. पोळी गळ्याबरोबर असते. पुठ्ठ्याकडचा भाग चिंचोळा असतो. एकंदरींत बांधा मजबूत असून जनावर गुटगुटीत दिसतें. हे बैल मोठ्या बैलापेक्षा गरीब लोकास सोईचे पडतात. साधारण जोडीची किंमत शंभरपासून दीडशें रुपयेपर्यंत असते.

खामगाव जात.—ही जात पश्चिम वऱ्हाडात बुलडाणा जिल्ह्यांत पैदा होते व खामगाव बाजारात विकली जाते. त्यावरून या गुरास हें नाव पडलें. ही अस्सल जात उंडी जवळच्या भागात पैदा होते. या जातीचे बैल पूर्वी लढाईचे सामान वहाण्यास व तोफा ओढण्यास उपयोगी पडत असत. हल्लीं निजामच्या राज्यात याचा उपयोग तोफा ओढण्याकडे करतात. या जातीचे उत्तम बैल बुलढाणा जिल्ह्यांतील खामगांव, मलकापूर आणि जळगाव ह्या तालुक्यात जेथें उत्तमप्रतीच्या जमीनी आहेत तेथें आढळतात व त्यांचा भारी जमिनी नांगरण्याच्या कामी उपयोग होतो. या जातीचा बैल मोठा, मजबूत व लांबट असून मिश्रित रंगाचा असतो. त्याच्या अंगावर तांबड्या रंगाचे ठिपके असतात; खूर, नाक, शिंग व कानाच्या आतील भाग भुरकट लाल रंगाचे असतात. शिंगें लांबीला मध्यम असून बुडाजवळ जाड असतात. डोकें रुंद व थोडें उंच असून वशिंड बरेंच वाढलेलें असतं. गळ्याच्या खालील पोळी व बेंबट ही दोन्ही लोंबती असतात. चांगल्या बैलाची उंची वशिंडाच्या मागें सुमारें ५२ इंचांपर्यंत असते डोक्यापासून शेपटीपर्यंत लांबी ६ फूट असून शरीराचा परिघहि जवळ जवळ तितकाच असतो. एकंदरींत जनावर मजबूत व दमदार असतें व त्याचा उपयोग विशेषतः नांगर ओढण्याच्या कामी होतो. पण वऱ्हाडातील लहान जातीच्या बैलापेक्षा पळण्याच्या कामांत ही जात कमी असते. यांचे खूर नरम असल्यामुळें पक्क्या सडकेवर ते लवकर झिजतात. साधारण जोडीला १५० ते २५० रुपये किंमत पडते व उत्तम जोडीला ३०० ते ३५० रुपयेपर्यंतहि किंमत येते. या जातीच्या गाई फारसें दूध देत नाहींत, दररोज सरासरी २-४ शेरपर्यंत दूध निघतें.

बैतुल जातः—ही जात माळवी आणि खामगावी या जातींपासून उत्पन्न झालेली मिश्र जात आहे. या जातीचें जनावर फारच चपळ असतें. सामान्यतः माळावरील व डोंगरावरील जनावरें लहान असतात. याची उंची सुमारें ४० इंच व छातीचा घेर सुमारें ५५ इंच असतो.

कृष्णातीरी (खिलारी अगर देशुरी ):—या जातीची पैदास कृष्णा व तिला मिळणाऱ्या मोठ्या नद्या यांच्या काठीं होते. कृष्णाकाठ कऱ्हाडजवळ सुरू होऊन मिरज, सांगली, कुरुंदवाडवरून पुढें बेळगाव जिल्ह्यात शिरतो या जातीच्या उत्तम गुराची पैदास मिळवडी, दुधगाव, डिग्रज, सांगली, कर्नाळ, अंकली, यडूर, मांजरी, कागवाड आणि सत्ती-सवदी येथें होते. पैदास करणारे लोक गुराची फार काळजी घेतात. खोंडांना मक्याचीं कणसें व भोपळे चारतात व कित्येक तर आवडत्या गुराना तूप सुद्धा पाजतात. या जातींत गुराचा रंग मुख्यत्वेंकरून पांढरा असतो. तथापि ही जात निर्भेळ नसल्यानें केव्हा केव्हा तींत काळे, तांबडे, करडे, पढ्याचे असे सर्व रंग आढळतात. या जातींत कपाळ मोठें, चेहरा लांबट व मासल, शिंगें मध्यम व पुरटलेलीं, कान मोठे व लोंबते, मान आखूड, जाड व मासल, पोळी मोठी व सुरकुतलेली व पोटाखालील कातडी लोंबती असते. एकंदरींत सर्व जनावराचा आकार लांब, जाड व मोठा असून जनावर मोठें, उंच व भव्य दिसतें. जनावर बळकट असून चपळहि जरा कमी असल्यामुळें नांगरटीला व ओझें वहाण्याला तें फारच योग्य असतें या जातीच्या गाई नदीकाठीं चारा व पाणी मुबलक मिळत असल्यामुळें साधारणपणें सिंधी किंवा काठेवाडीप्रमाणें दूध देतात.

सोरटी ( सांगलीकडील ):—या जातीचें जनावर स्थूल व भारदस्त दिसतें. याच्या अंगीं चपळपणा कमी असून काटकपणा मुळींच नसतो. याचा बांधा ढिला असतो, रंग तांबडा, गवळा अगर काळा असून शिंगें दिवटी व लहान असतात. याचें कपाळ पसरट व उठावदार असतें. या जातीच्या गाईस दूध बरेंच असतें. कृष्णातीरी या जातीचीं गुरें अमेरिका व फिलीपाईन बेटापावेतों गेलीं आहेत.

देशी ( डेक्कन ):—डेक्कनी ही जात निव्वळ अशी महाराष्ट्रात नाहींशी झाली आहे. देशी जनावरें हें एक

अठरा धान्यांचें कोठार बनलें आहे. याला अनेक कारणें आहेत; त्यांपैकी वेळेवर पाऊस न पडणें व वरचेवर दुष्काळ पडणें हीं मुख्य होत. पावसाच्या अनिश्चितपणामुळें गुरांच्या खाण्यापिण्याचे फार हाल होतात. एखाद्या वर्षी भरपूर चारा व दुसऱ्या वर्षी कांहींच नाहीं अशा परिस्थितीमुळें, महाराष्ट्रात माळव्यांतून माळवी, गिरी व इतर ठिकाणाहून बैल येत असल्यामुळें भेसळ होऊन 'डेक्कनी' निर्भेळ जातीचा लोप झालेला आहे. याकरितां हल्लीं जी डेकनी जात म्हणून म्हटली जाते ती लहान, आखूड, बांधेसूद, चपळ व काटक अशी असते. पाय लहान असून गुरात मजबूत असे असतात. बैल हलक्या वाहतुकीला, नांगराला व पळण्याला योग्य असतात. अपुऱ्या व मिळेल तसल्या चाऱ्यावर राहणारी देशाला योग्य अशी ही जात बनली आहे. ही जात साधारणपणें खोडकर, दृष्ट व शिकविण्यास जरा कठिण अशी आहे. या जातींतील गाई म्हणण्यासारखें दूध देत नाहींत.

कोंकणीः—ही जात डेक्कनी सारखीच असून आगलोटात लहान असते. यात काळे, पांढरे, लाल व पिंवळे वगैरे बरेच रंग आढळतात. या जातीची शेपटी जमिनीवर लोळण्याइतकी लांब असून शेपटीच्या शेवटी केसांचा झुपका असतो. कोंकणात जनावरांचें हें शेपटीचें लक्षण फार उत्तम असें मानलें जातें. घाटावरून जे बैल गाडी वगैरेंना खालीं कोंकणात जातात त्यांची शेपटी मागील पायाच्या टोंपरापर्यंतच असते. अशीं जनावरें मुंबारली व आंबे घाटानें गाडीस जोडून व मळ्या व कुंडी घाटानें गोणीला घालून खालीं कोंकणात येतात.

ठाणी अगर धांगरी—या जातीची पैदास नाशिक, अहमदनगर व ठाणें जिल्ह्यांतील मावळी भागात होते. या जातीचीं गुरें डेक्कनी गुरांपेक्षा थोडीशीं मोठीं असतात. मानेखालची पोळी व बेंबटाजवळील चामडी फार वाढलेली असते. अंगावर काळे, पांढरे टिपके असतात. बैल कामाला मजबूत असतात पण चपळ नसतात. गाई फार करून दुधाळ असतात.

सोनखेरीः—ही जात नाशिक जिल्ह्यांतील सटाणा व खानदेशांतील साकरी पिंपळनेर या भागात पैदा होते. हिचा रंग तांबडा अगर पिंवळट असून हिच्या सर्वांगावर पांढरे टिपके असतात, त्यांच्या डोळ्यांच्या पापण्या व जबडा यांचा रंग मांसाच्या रंगासारखा असतो. ही जात शेतकामाला बरी असते व या जातीच्या गाई दूध बरें देतात.

खिलारी (माणदेशी):—या जातीच्या गुरांची पैदास प्रोव्हर सातपुडा पर्यंत, औंधसंस्थानांतील आटपाडी महाल, माण व खानापूर (सातारा) व त्याचप्रमाणें सोलापूर जिल्ह्यांतील कांहीं भागात व जमाखिंडी, मुधोळ, इत्यादि भागांतील संस्थानात होते. या जातीत म्हैसुरी जातीची भेसळ झाली असल्या कारणानें तिचे म्हैसुरची वरील साम्य आहे. ही गुरें लवकर माणसाळत नाहीत. यांचें तोंड, शिंगें व शेंडे हीं विशेष प्रकारचीं असतात. चेहरा लांबट असून कपाळ जरा वर उचलल्यासारखें असतें. चेहरा डोळ्यांपासून जबड्यापर्यंत सोलगट असतो. शिंगें मुरव्यातील जवळ निघून पुढें जरा मागें व उंच जाऊन त्यांचीं टोंकें कमानी सारखीं पुढें आलेलीं असतात. डोळे लाल, पाणीदार व रागीट दिसतात. याचा जबडा, पायाचे खूर व डोळ्यांच्या पापण्या गाजरी रंगाच्या असतात. एकंदरीत ही जात रंगात पांढरी, जागोजाग पिंवळट झाक मारणारी, मान आखूड व भरलेली, उंचीला मध्यम पण डेक्कनीपेक्षा मोठी, लांबट व बांधेसूद असून गाडीच्या कामाला फारच उत्तम असते. याचा शेतकीकडे साधारणपणें सर्व कामास उपयोग होतो. या जातीचा स्वभाव तापट व रागीट असतो. गाईहि आकारानें लहान असून चपळ व मारकट असतात. त्या दूध फारसें देत नाहींत. यांचीं शिंगें बैलापेक्षा लांब व अणकुचीदार असतात. सांपुड्यांतील खिलारी बैल जास्त चपळ व रंगानें पांढरे असतात. यांच्या गळ्याखालची पोळी फारशी वाढलेली नसते. या जातीचे बैल चपळ असल्यामुळें नांगरटीच्या कामाला लवकर थकतात.

म्हैसुरी—या जातीची पैदास म्हैसुरात व भोंवतालच्या प्रदेशात होते. हींत पुष्कळ प्रकार आढळतात. त्यांपैकीं महत्त्वाची जात म्हटली म्हणजे म्हैसुरातील अमृतमहाल खात्यात ठेविलेल्या गाईपासून पैदास होते ती होय. ही पैदास हैदर व टिपू सुलतान यांच्या अमदानीपासून व्यवस्थित रीतीनें चाललेली आहे. या जातीत दुसऱ्या रक्ताची भेसळ नसल्यामुळें गुरें रंगात व बांध्यात एकसारखींच असतात. त्यांची पैदास बहुतेक अर्धवट रानटी स्थितींत असल्यासारखी आहे.

अमृतमहाल खात्यात शेंभर गाईचा एक कळप केलेला असतो. एका कळपांत बहुतकरून सारख्याच वयाच्या गाई असतात. हे कळप एका कुरणातील चारा संपला म्हणजे दुसऱ्या कुरणांत नेतात. थंड भागातील कुरणें उन्हाळ्यात चारण्यासाठीं राखून ठेवतात. कळपातील गुरांना बांधीत नाहींत, पण कुरणांतील गवत कमी पडल्यास सांठवून ठेवलेल्या गवताचा उपयोग करितात. यांस दाणा कधींच देत नाहींत. एका कळपावरोबर दोन वियाणू असतात. आपआपसांतील वीण टाळण्यासाठीं हे वियाणू एका कळपांतून दुसऱ्या कळपात बदलतात. वियाणूसेरीज सर्व गोऱ्हे दोन महिन्यांच्या आंत खच्ची करतात. या जातीच्या कालवडी लवकर वयात येत नाहींत. गाई फारसें दूध देत नाहींत. मात्र आटेपर्यंत सर्व दूध वासरें पितात म्हणून तीं चांगलीं पोसतात. अमृतमहाल गुरें आकारात भारदस्त असून त्यांचीं हाडें ओबडधोबड अशीं नसतात. यांचा रंग करडा व पांढरा मिश्र असून त्यांच्या तोंडावर केव्हां केव्हां दुरट पांढरे टिपके असतात. बैलावर जास्त काळी झांक असते. चेहरा लांब व अरुंद असून डोक्यापासून जबड्यापर्यंत सर्व गोलगट असतो. शिंगें मोठें व काळे असून त्यांच्या पापण्या म्हणजे विरळसारख्या मोठ्या असतात.

# गाई म्हशी





लांबशिंगीगाय



आखुडशिंगीगाय

ब्राह्मणीगायववासरूं



टोणगा



ऑल्डर्नेगाय



गॅलोवेगाय

# विशिष्टप्राणी

गरुड.



गोगलगाय



गोगलगायीचीशरीररचना



१ सोंड.२पाय.३फुप्फुस.४कोठा.५ आंतडें.६ काळीज.७ हृदय.
८एओर्तीधमनी.९ जाठररससंबधीधमनी.१० पायाचीध-
मनी.११ काळिजाचीधमनी.१२ पोटाचीखांच. १३फु-
फुसाकडेरक्तनेणारानळ.१४ फुप्फुसांतूनहृदयाकडे-
रक्तनेणारीशीर.

गेंडा



## खोखोपटांगण (पान१२१)

ट

९ फूट { क

अ

आ

इ

ई

म

उ

ऊ

ए

ऐ

ख

ठ

फ

च

शिंगें साधारणपणें खिलारीसारखींच असतात. गळ्याखालची पोळी व बेंबटाखालील कातडी फारशी वाढलेली नसते. पाय मजबूत व खुरांत सारखे असतात. एकंदरीत या जातीत बांधा लांबट असून अरुंद असतो.

म्हैसुरीचाच आणखी एक प्रकार आहे त्याला मधेस्वरन-बेत्ता अगर अलमडी असें म्हणतात. यांची पैदास म्हैसूरच्या आग्नेयीकडील डोंगरात होते. या जातीचीं गुरें अमृतमहालांपेक्षां मोठीं असून साधारण बोजड दिसतात. या जातींत पोळी बरीच वाढलेली असून डोकें जड असतें. शिंगें जाड, मान आखूड व जाड, पाय बोजड व खुरांत नरम असून अंगावरची चामडी जाड असते. हीं जनावरें कामाला जड असून कर्नाटकात याचा शेतकीच्या कामीं फार उपयोग होतो. बेळगावात या जातीचे बैल तेल्याच्या घाण्याला व धमनीला फार करून अधिक आढळतात.

नंदी येथें दरवर्षी मोठी यात्रा भरते. हें ठिकाण बंगलोरपासून २२ मैलावर आहे. येथें म्हैसुरी चागले बैल विक्रीस येतात. तेथें पनिांग, स्ट्रेट सेटलमेंटस, मलाया, ब्राझिल ( अमेरिका ) वगैरे ठिकाणाहून पुष्कळ परदेशी अडत्ये दरवर्षी बैल खरेदी करण्यासाठीं येतात. जोडीला २५० ते ४०० रुपये किंमत पडते

हणम्— ही म्हैसुरीची एक पोटजात असून तिची पैदास सांगली संस्थानात व कर्नाटक प्रांतात फार होते. या जातीच्या गाई लहान असून अंगानें बारीक, फार चपळ व रानटी गाईसारख्या दिसतात. त्याचीं शिंगें बरींच लांब असतात. गाईचा रंग पांढरा असून कांहीं जनावरांत मानेवर तांबूस व कांहींत सर्व अंगावर पांढरे ठिपके असतात.

या जनावराचा बांधा सडक असतो. शिंगें नीट व अणीदार असतात. तोंड लांबट असतें. जनावर जातीनें चपळ, क्षणखणीत, बळकट व रागीट असतें.

ए ड न— ही जात आकारात लहान असून ती अरबस्तानात पैदा होते. या जातींत दुभत्या जनावराचे गुण बऱ्याच प्रमाणात आढळतात. एडन गाई विक्रीकरिता इकडे येत नाहींत. ज्या कांहीं इकडे आढळतात त्या युरोपियन लोकांनी तिकडून येताना आणल्या आहेत. आकाराच्या मानानें या गाई बरेंच दूध देतात; व त्या गरीब असल्यामुळें रोज दोन तीन वेळ दूध काढलें तरी देतात. या जातीच्या कालवडी लवकर वितात व गाई फार दिवस भाकड रहात नाहींत. याचा रंग तपकिरी असतो, व चेहेरा, कान, पाय, पायाचीं हाडें, खूर व आकार याचें बारीक रीतीनें निरीक्षण केल्यास जनावर साधारणपणें हरिणासारखें दिसतें. बैल शेतकीच्या हलक्या कामाला योग्य असून साधारणपणें दक्षिणी बैलाची बरोबरी करतात.

सिंधीः—या जातीचें वसतिस्थान मुख्यत्वेंकरून सिंधप्रांतातील कराची जिल्हा होय. या जातीची पैदास कराचीच्या आसपास पाच पन्नास मैलात होते. रानांत चरावयास बेताचेंच असतें. परंतु भोवताला चाऱ्यावर तीं गुबगुबीत असतात. पैदास करणारे लोक मुख्यत्वेंकरून मुसुलमान असून ते बियाण्याची निवड करण्यात जास्त काळजी घेतात व गोऱ्हे लहानपणींच खच्ची करतात. या दोन कारणामुळें सिंधी जात बहुतेक निर्मेळ राहिली आहे. या गाई दूध देण्याच्या अगदी ऐन भरात असताना रोज २०–२४ पौंड दूध देतात. सर्व्या अवलादीचा रंग तांबूस किंवा तावडा असतो. परंतु कित्येक जनावरात काळा, जागजागीं पांढरे ठिपके असलेला असाहि असतो. तोंड मोठें व अवजड असतें. कान लांब असून लोंबते असतात मान जाड व आखूड असते. शिंगें लांबीला मध्यम असतात. गळ्याखालची व पोटाखालची चामडी बरीच लोंबती असते. एकंदरीत सर्वांग लांबट, उंच व सुंदर असें असून तें आखूड पायावर तोललेलें असतें. कास साधारण मोठी व मासल असते. कालवडी लवकर माजावर येतात. गाई स्वभावानें गरीब असून दूधहि बरेच दिवस देतात. या जातींत खुबे, खांदे व पुठ्ठा हे बरेच मासल असून त्यात चरबीहि बरीच असते. पाश्चात्य देशात हे गुण मांसासाठीं निवडलेल्या जातींत आढळतात. या गुणामुळें या गाई बऱ्याच प्रमाणात बाहेर देशीं जाऊं लागल्या आहेत. या जातीचा प्रसार सर्व हिंदुस्थानात मिलिटरी डेरी फार्मवर व सिलोनमध्येंहि दुधासाठीं झाला आहे. याचा विलायतेतील 'आयरशायर' जातीच्या बियाणूबरोबर संकर होऊन झालेली गाय साधारणपणें दीडपटीनें दूध देते असा अनुभव आला आहे. हल्लीं या गाईला कराची मुक्कामीं १२५ ते १५० रुपयेपर्यंत किंमत पडते. बैल फारसे चपळ नसले तरी साधारणपणें सर्व शेतीच्या कामास उपयोगी पडतात.

गीर ( सुरती अगर सोरटी ).—या जातीची पैदास रबारी, भाखड, व चारण लोक दक्षिण काठेवाडात गिरनारचे अरण्यांत करितात. या अरण्यात चारा भरपूर असून पाण्याचा पुरवठा मुबलक आहे. जनावरें रात्रीं बांधीत नाहींत. दूध काढण्याच्या वेळीं एके ठिकाणीं जमा करतात. या जातींत त्याचें डोकें, कान व शिंगें विशेष प्रकारचीं असतात. कपाळ मोठें व पुढें आलेलें असतें. शिंगें जाड, मोठीं, मागें वळून वेटाळलेलीं अशीं असतात. कान मोठे, लांब व लोंबते असून शेंडे वळलेले असतात. रंग तांबडा अगर रंगीबेरंगी तांबडा अगर पांटरा असतो. यामध्यें पांढरा अगर तांबडा या रंगाचा बारीक शिडकाव मारल्यासारखा विचित्र असतो. आगलट ओबडधोबड, पाठ लांब, सपाट, पाय मोठे, खूर नरम असून जनावर बरेंच उंच असतें. कास मोठी लोंबती व मासल असते. आचळ मोठे व पिळण्यास कठिण असतात. ही जात मोठाड (धीराड) असल्यामुळें खावयास लागणाऱ्या खर्चाच्या मानानें गिरनार अरण्याशिवाय इतर ठिकाणीं फायदेशीर ठरत नाहीं. या जातीच्या गाई काठेवाडांत बरेंच दूध देतात परंतु दुसरीकडे नेल्यास दुभाला कमी येतात. या गाई बरेच महिने भाकड राहतात,

व लवकर आटतातहि. काठेवाडांत या गाईला ६०–७५ रुपये किंमत पडते. बैल मोठे धिप्पाड असतात. वशिंड गाईपेक्षां बैलांत मोठें वाढलेलें असतें. हे बैल जोराच्या कामाला फारच उत्तम असतात. ही जात सर्वत्र पसरलेली आहे. या जातीच्या गाई मारवाडी, गुजर, वाणी व इतर व्यापारी लोक जेथें जेथें व्यापाराकरितां जातात व रहातात तेथें तेथें ते बरोबर घेऊन जातात.

काकेजी ( वडीयाळ ).—या जातीचें मुख्य वस्तिस्थान पालनपूर संस्थानापैकीं कांकेज हें होय. हें जनावर दिसण्यांत मोठें उमदें असून त्याची नेहमीं उभें रहाण्याची ठेवण ताठ, डोकें वर केलेली अशी असते. कपाळ बरासें खोलगट असतें व उंच, पिळदार व उभ्या शिंगामुळें हें जनावर एकंदरीत सुरेख व मनात भरण्यासारखें असतें. शिंगांचें बूड एक दोन इंच केसांनीं वेष्टिलेलें असतें. रंग पांढरा किंवा करडा असतो. जनावर थोडेंसें उंच असतें; पण बांधांचा एकंदर माथा, पाय, चेहरा वगैरे रेखीव असतो. कान मोठे व लोंबते असतात. गळ्याखालची पोळी व बेंबटाजवळची कातडी बऱ्याच प्रमाणात वाढलेली असते. वशिंड फारच भव्य असतें. एकंदरीत जनावराचें शरीर स्थूल, कान लांब, कपाळ पसरट, शिंगें दिवटीं व चाल डुलकी यामुळें हें जनावर दिसण्यात गंभीर दिसतें. तें चपळ व सहनशील असल्यामुळें हलक्या व भारी दोन्ही प्रकारच्या शेतीच्या कामाला योग्य असतें. या जातीच्या गाई गुजराथेंत सिंधी गाईइतकें दूध देतात. या जातीची पैदास करणारे लोक रबारी होत. ते वियाणूची, गाईंची व वांसरांची फार काळजी घेतात. गोऱ्हे सहा महिन्याच्या आंतच खच्ची करतात. या जातीची पैदास जेथें होते तेथें मुबलक चराऊ जमीन व भरपूर पाणी आहे. ही जात निर्मळ असल्यामुळें ओळखण्यास घोटाळा पडत नाहीं. सर्व जनावरें सारखींच दिसतात. या जातीचीं जनावरें अमेरिकेपर्यंत गेलेलीं आहेत.

गुजराथी.—या जातीचीं गुरें अहमदाबाद, खेडा व बडोदे सरकारचें राज्य येथें पैदा होतात. हीं गुरें काकेजीसारखीं दिसत असून कित्येक वेळा तीं त्यापेक्षांहि मोठीं असतात. त्यांची पैदास करणारे लोक वियाणूची फारशी काळजी घेत नाहींत. यात माळवी व खानदेशी जातींची बरीच भेसळ झालेली आढळते.

तलवडा.—दक्षिण गुजराथेंत व सुरत जिल्ह्यांत या नांवाची जात आढळते. ती दिसण्यांत काकेजसारखीच दिसते; पण आंगलोटात जरा लहान व त्याची पोळी व पोटाखालची कातडी कमी वाढलेली असते. शिवाय कान लहान, पण मजबूत आणि चेपूट डोकें व मानेला काकेजीपेक्षा कमी असते.

म्हशी.—हिंदुस्थानांत दुधासाठीं म्हशी पाळितात. कांहीं कांहीं ठिकाणीं पावसाळी भागांत टोणग्याचा उपयोग शेतकामाकडे करतात. टोणगा बैलापेक्षां फार मजबूत असतो. पखालीकरितां बहुतेक टोणगाच वापरतात. म्हशीचें मूळ स्थान तिबेट असावें. हिंदुस्थानांत, आरचीपेलेगो, मेसापोटेमिया व दक्षिण यूरोपांत कांहीं ठिकाणीं हें जनावर आढळतें. म्हशीच्या जातीला पाणी फार आवडतें. तथापि जातवान म्हशी बेतशीर पावसाळी भागांतच आढळतात. त्यांची चामडी रंगानें काळी व दिसण्यात चकचकीत असते. या जनावरास ऊन सहन होत नाहीं. त्यांना रोज एक दोन वेळ धुवावें किंवा नदींत बसवावें. त्याच्या अंगावरील केंस पातळ असल्यामुळें त्यात नेहमीं गोचिड, उवा, सुळे वगैरे प्राणी उत्पन्न होतात. यासाठीं म्हशींना घर्पोतून दोन वेळ भादरावें व नेहमीं त्याचें अंग घांसून पाण्यानें धुवावें. म्हशीच्या व गाईच्या जातींत बराच फरक आढळून येतो. म्हशीचें दूध गाईपेक्षा जास्त सत्वशील असतें. म्हशीला वशिंड किंवा पोळें नसतें. त्यांचा अवाज गाईपेक्षां वेगळा असतो. म्हशी गाईपेक्षा फार खोडकर असतात. वासरूं मेल्यास, गवळी बदलल्यास किंवा इतर क्षुल्लक कारणानेंहि कांहीं दिवस त्या दूध देत नाहींशा होतात. गाईपेक्षां म्हशीच्या जाती कमी आहेत. ( १ ) दिल्ली. ( २ ) जाफराबादी, ( ३ ) सुरती, अगर नडियादी ( ४ ) नागपुरी अगर वऱ्हाडी ( ५ ) दक्षिणी ( ६ ) गवळी अगर ढोलेसाळ, ( ७ ) शिरगुजी. शिरगुजी ही जात देशी म्हैस व जंगली टोणगा यांची अवलाद असावी. ही जात मध्यप्रांतांतील जमीनदारी व छत्तीसगड भागांत आढळते. हें जनावर मानेत जाड असून याचीं शिंगें व खादा अगदीं जंगली टोणग्यासारखा असतो. टोणगा ताकदवान असून, म्हैस दुभत्याच्या कामीं अगदीं कमी प्रतीची असते

हिंदुस्थानात आढळणाऱ्या म्हशींच्या जातींचें वर्णन पुढें दिलें आहे:—

दिल्ली अगर मुरा.—या जातीचें मुख्य वसतिस्थान रोहटक हें दिल्लीजवळ पंजाबांत आहे. या जातीच्या म्हशी दिल्लीहून दुसरीकडे जातात म्हणून या जातीस दिल्ली हें नांव प्राप्त झालें आहे. या जातींत शिंगें गुंडाळलेलीं असतात. म्हणून त्यांना 'कुंडी' असेंहि म्हणतात. दिल्ली म्हशी विकण्याकरितां मुंबईत आणितात; व त्यांचा 'मिलिटरी डेरी फार्म'मध्यें सर्वत्र प्रचार झाला आहे. या जातीच्या म्हशी मोठाड ( थोराड ) असून लांबीला कमी असतात. पाठीमागील भाग रुंदट असून पुढें निमूळता झालेला असतो. कांस मोठी व चांगल्या आकाराची असते. या जातींत दुभत्या जनावराचे गुण बरेच आढळून येतात. त्या नियमितकाळीं वितात व दूधहि पुष्कळ देतात. जनावर मोठें असल्यामुळें त्यास खाणें जास्त लागतें म्हणून या जातीच्या म्हशी गरीब लोक क्वचितच पाळतात. चांगल्या अवलादीची म्हैस रोज २५ ते ३५ पौंडपर्यंत दूध देते. म्हशीची उंची सुमारें ५२ इंच असून छातीचा घेर १०२ इंचपर्यंत असतो.

सुरती अगर नडियादी—ही जात उत्तरगुजराथेंतील खेडा जिल्हा, बडोद्याचें राज्य व मुंबईवरून चरोतरात आढळते. या म्हशी दक्षिणी व वऱ्हाडीपेक्षा थोड्या मोठ्या असून त्यांचीं शिंगें त्या दोहोंपेक्षा आखूड असतात. हें जनावर एकंदरीत आकारमानात मध्यम, बांधेसूद व आटपसर असतें. मागील भाग रुंद असल्यामुळें कासेला भरपूर जागा मिळून तिची ठेवण साजेश्या प्रमाणात असते. ही जात दुधाला चांगली असून मध्यम प्रतीच्या लोकाना बाळगण्याजोगी आहे. हिची उंची सुमारें ५३ इंच असून छातीचा घेर ७४ इंचापर्यंत असतो.

जाफराबादी—गीरगाई व या जातीच्या म्हशी यांचें मूलस्थान दक्षिण काठेवाड होय. या पूर्वी जाफराबाद बंदरातून रवाना होत असत म्हणून त्याना 'जाफराबादी' हें नाव प्राप्त झालें असावें. मुंबई इलाख्यातील दुभत्या जनावरात हें मोठाड ( थोराड ) जनावर होय. या म्हशी अवजड असून त्यांच्या कपाळाचें हाड रुंद व पुढें आलेलें असतें. या जातींत शिंगें, कान व डोकें हीं विशेष प्रकारचीं असतात. यांचा पुढचा भाग, मागच्या भागाच्या मानानें जास्त अवजड असतो. ही जात गिरनार प्रदेशात पुष्कळ दूध देते परंतु ती बाहेर देशीं नेल्यावर दुधाचें प्रमाण कमी पडतें. या म्हशी फार दिवस भाकड रहातात व लवकर आटतात. त्यांच्या मोठ्या आकारामुळें त्यानां दाणें जास्त लागते व दुधाचें उत्पन्न बेताचेंच असतें. म्हशीची उंची सुमारें ५७ इंच असून छातीचा घेर अजमासें ८८ इंच असतो.

दक्षिणी—ही जात देशावर, कर्नाटकात, खानदेश, निजामचें राज्य व वऱ्हाड या ठिकाणीं सर्वत्र आढळते. कोंकणातील म्हशी याच जातीच्या असून त्या बऱ्याच लहान असतात. दक्षिणी म्हशींचा एकंदरीनें आकार सुरती म्हशींपेक्षा लहान असून शिंगें मात्र फार लांब असतात. कास लहान असून दुधाचें मानहि फार कमी असतें.

वऱ्हाडी अगर नागपुरी—या जातीच्या म्हशी मध्यप्रांतांतील वर्धा, यवतमाळ, इलिचपूर इत्यादि जिल्ह्यात व लगतच्या निजामच्या राज्यात गवळी लोक पाळतात. या म्हशी खानदेशात व सोलापुरात फार नेतात. वऱ्हाडी म्हशी दक्षिणी म्हशींपेक्षां थोड्या मोठ्या असून त्यांचीं शिंगें दक्षिणीपेक्षा मोठीं, लांब व अणकुचीदार असतात. या दक्षिणीपेक्षां दूध जास्त देतात पण लवकर आटतात. या जातीचे टोणगे वसुदेव खरेदी करून छत्तीसगड व तेलंगण येथें नेऊन विकतात.

गवळी व होळेसाळ—बेळगांव व धारवाड जिल्ह्यात दोन जातीच्या म्हशी आढळतात त्याना गवळाऊ आणि होळेसाळ अगर जवारी (जवारी = गावटी) म्हणतात. पहिल्या जातीच्या म्हशी सोलापूर, पंढरपूर व निजामच्या राज्यांतून आणतात व दुसऱ्या जातीच्या म्हशींची पैदास कृष्णा व घटप्रभा नद्यांच्या काठीं होते. या दोन्ही जाती आकारांत व ठेवणींत मध्यम असून गवळाऊ, मात्र थोडीशी मोठी असते व तिचीं शिंगें लांब व पसरट असतात. या म्हशी रंगानें बहुतेक काळ्या असून पुष्कळ जनावरांत कपाळावर पांढरा ठिपका असतो. या जातीच्या म्हशींत घाऱ्या डोळ्याच्या म्हशी फार आढळतात. या म्हशी होळेसाळपेक्षा जास्त दूध देतात.

होळेसाळ यांची ठेवण लहान असून त्या सामान्यतः शेतकरी लोक पाळतात. या दूध थोडें देतात व लवकर आटतात. कृष्णाकाठीं वगैरे जेथें याना चरावयास भरपूर मिळतें तेथें त्या बरेंच दूध देतात. या जातीचे टोणगे कोंकणात शेतकामाला चांगले समजले जातात.

दुभत्या जनावरांचीं लक्षणें—जनावर जातिवंत असून खोडकर किंवा रोगी नसावें. त्याचप्रमाणें तें शांत स्वभावाचें असावें. कारण तापट स्वभावाची गाय अगर म्हैस लवकर बिथरते व दूध देत नाहीं. जनावर अंगानें सडपातळ असून त्याचा आकार पुठ्याकडे जाड व रुंद असून पुढें निमुळता असावा. पुठ्याकडील भाग असा असल्यास गर्भास पोटात रहाण्यास मुबलक जागा सापडते. व तेथें त्याची वाढ चांगली होते. तोंड लहान, जबडा मोठा, कपाळ रुंद, मान बारीक, छाती लांबट, कोठा मोठा व मागील भाग जरा उचललेला असावा. मोठ्या जबड्याचीं व मोठ्या कोठ्याचीं जनावरें पुष्कळ खातात व पुष्कळ दूध देतात. अंगावरील कातडें पातळ व केस नरम असणें हें सुद्धा दुभत्या जनावराचें एक चांगलें लक्षण आहे. गुडघ्याखालील पायाचीं हाडें आखूड असावीं, कास फार लोंबती नसावी व आचळाचा एके ठिकाणी झुबका नसावा. त्याची ठेवण चार कोपऱ्यावर व सारख्या अंतरावर असणें चांगलें. आचळ मुके नसावे. चारहि आचळांतून दूध येत असावें. काहीं जनावराना चोहोंपेक्षा अधिक आचळ असतात. खडकी ( पुणें ) येथील गोशाळेंत एका म्हशीला सहा आचळ असून त्या सर्वांतून दूध येत असे. दुधाचें प्रमाण कासेवर अवलंबून नसून पोटाखालून जाणाऱ्या दूधवाहिन्याच्या आकारावर असतें. या वाहिन्या पोटाखालून जात असताना वाकड्या वाकड्या जात असल्यास चांगलें. हे वर निर्दिष्ट केलेले गुण सर्व दुभत्या जातींत सापडतात असें नसून त्यांपैकीं बरेच गुण उत्तम दुभत्या जनावरात आढळून येतात. उदाहरणार्थ सिंधी, एडन गाईंच्या जाती व दिल्ली आणि सुरती म्हशींच्या जाती.

वियाणू (पोळ, सांड, वळू)चीं लक्षणें—चांगली पैदास होण्यास गाय व वियाणू हीं दोन्हीं जातिवंत व निर्भेळ अवलादीचीं असलीं पाहिजेत. असें असतांहि त्यांतल्या त्यांत पैदासीच्या दृष्टीनें बैलाचें महत्व अधिक आहे. कारण गाय जर वाईट अवलादीची असेल तर तिचें वासरू मात्र वाईट

निपेल; परंतु जर बियाणू वाईट असेल तर सर्व वळपच वाईट निपजेल. याकरितां बियाणूची पूर्वपीठिका माहीत असणें जरूर आहे. तो सुदृढ व बाधेसूद असावा. तो अशक्त अगर रोगी असल्यास त्यापासून होणारीं वासरेंहि तशींच निपजतील. त्याचा पुढील भाग रुंद असावा, असें असल्यानें त्याच्या काळजाला व फुफ्फुसाला भरपूर जागा सांपडते त्याच्या बरगड्या मजबूत असून त्याचीं हाडें कणखर असावीं. त्याच-प्रमाणें तो चपळ असून दिसण्यांत सुंदर असावा बियाणूची निवड करतेवेळीं त्याची अवलाद कोणत्या कामाकरितां उपयोग करण्यांत यावयाची आहे त्याप्रमाणें त्याचीं लक्षणें पाहून निवड करावी.

( १ ) आउताच्या कामीं बैलाची पैदास करणें असल्यास बळ धष्टपुष्ट, मजबूत बांध्याचा, कणखर खुराचा व हाडाचा असून त्याचीं मान व खांदा मजबूत व आखूड असावीं.

( २ ) पळण्याच्या किंवा गाडीच्या कामीं उपयोगीं पडणाऱ्या बैलाची निपज करावयाची असल्यास बियाणू सडपातळ, लांबट बांध्याचा, जरासा उंच पातळ व नरम कातडीचा व चालण्यास चपळ असावा

( ३ ) दुभत्या जनावराची पैदास करावयाची असल्यास बियाणू जास्त दूध देणाऱ्या गाईचा असावा, कारण जास्त दूध देणें हें आनुवंशिक संस्काराचें फल असून, पूर्वी निवड करूनच उत्पन्न झालें असलें पाहिजे. खाण्यापिण्याच्या व्यवस्थेनें सुद्धां दुधांत थोडा बहुत फरक होतो. उत्तम गाय व उत्तम बियाणू असल्यास त्यांची अवलाद उत्तम होऊन त्यांत आईबापाचे गुण जास्त उतरून प्रजा जास्त दूध देते. सुमारें पन्नास गाईंच्या कळपांत एक बियाणू ठेवावा व तो दर पांच वर्षांनीं बदलावा.

का मा च्या बै लां चीं ल क्ष णें.—काम करणारे बैल मजबूत व धष्टपुष्ट असावे. त्याचा खांदा व मान आखूड असावी, डोळे पाणीदार असावे, पाय उभे, सरळ, काळ्या खुरांचे कणखर, व आंखूड नडगीचे असावेत. गाडीच्या बैलाच्या पायाची नळी लांब असावी. पुढपाकडील भाग उतरता असल्यास बैल बहुतकरून चपळ असतो.

गाडीच्या कामास बैल लांबट असावा. तो बुटका नसावा, पोळी व पोटावरील कातडी फारशी वाढलेली नसावी. कारण ही कातडी चालतांना अडचण करिते. खुऱ्या काळ्या असाव्यात, त्या मजबूत असतात. गाभऱ्या खुरीचे बैल पायांत नाजुक असतात. ते लवकर झिजतात. अशा खुरीचीं जनावरें ढेकळें असलेल्या शेतांत काम करतांना लवकर लंगडीं होतात. गाईं म्हशींचें दूध व त्याचे गुणधर्म यासंबंधानें माहिती ‘ दूध दुभतें ’ या लेखाखालीं मिळेल.

**गागाभट्ट व त्याचें घराणें**—गागाभट्टाचें घराणें हें मूळचें पैठणचें होतें. दुर्गादेवीच्या दुष्काळांत ( इ स १३९८–७५ ) पैठण व पुणतांबें येथें मोठीं प्राचीन संस्कृत विद्यापीठें होतीं. त्यांचा आश्रय बंद पडून महाराष्ट्रांतील बीं अनेक पंडित घराणीं देशत्याग करून काशीस जाऊन राहिलीं त्यांतच गागाभट्टाचेंहि घराणें असावें. सन १४५० च्या सुमारास गोविंदभट्ट नांवाचा विश्वामित्रगोत्री ऋग्वेदी ब्राह्मण ( आश्वलायन सूत्री ) पैठणास रहात होता. गोविंदभट्टाचा पुत्र रामेश्वरभट्ट याचें पैठणास विद्यापीठ असून तें शिष्यवर्गानें गजबजून गेलेलें असे. या विद्यापीठास गाधिजवंशानुचरित्रांत ‘ श्रीरामचंद्राच्या सैन्याची छावणी ’ अशी उपमा दिली आहे निजामशहानें रामेश्वरभट्टाचा बहुमान केला होता. पण त्याजवर लवकरच दुष्काळामुळें देशत्याग करण्याची पाळी आली. तो विजयानगरच्या कृष्णदेवरायास भेटून द्वारकेस जात असतां रस्त्यांत त्यास नारायणभट्ट नांवाचा पुत्र झाला ( इ. स १५१४ ). द्वारकेस शिष्यशाखा व विद्यापीठ स्थापून तो परत पैठणास येऊन चार वर्षें राहून मग काशीस गेला. काशीस गेल्यावर ह्या घराण्यांत अनेक विद्वान पुरुष निपजले. त्यापैकीं पुष्कळांचे हिंदुधर्मशास्त्रावरील ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहेत. रामेश्वराचे शिष्य हिंदुस्थानांतील सर्वप्रांतीय होते. रामेश्वर हे रामोपासक होते. गोविंदभट्ट व रामेश्वरभट्ट यांनीं पुष्कळ ग्रंथ लिहिले पण ते हल्लीं उपलब्ध नाहींत. नारायणभट्टाचा लौकिक काशींत मोठा आहे. काशींतील विश्वेश्वराचें देऊळ नारायण भट्टानेंच बांधिलें. नारायणभट्ट काशीस असतां मोठा दुष्काळ पडला तेव्हां भट्टानें भागीरथींत अनुष्ठान करून विपुल पाऊस पाडविला, त्यामुळें मुसुलमान अधिकाऱ्यानें त्याचा हा प्रभाव पाहून विश्वेश्वराचें पाडलेलें मंदिर पुन्हा बांधण्याची त्यास परवानगी दिली असें सांगतात. हा मोठा मीमांसक होता. त्याचे बारा ग्रंथ मार्तंड नांवानें प्रसिद्ध असून त्यांतील मुहूर्तमार्तंड हा स. १५७१ त लिहिलेला आहे. यानें बंगाल व बहार येथील पंडितांना जिंकिलें. गया, काशी व प्रयाग या तीन क्षेत्रांत तीर्थविधि कसा करावा याबद्दलचा त्रिस्थळीसेतु नांवाचा ग्रंथ यानें लिहिला. राजा तोडरमल्लाचा व याचा चांगला स्नेह होता. त्यानें बंगालचा सुभेदार असतां बंगालचा ( नवद्वीप ) विद्यानिवास वंगोपाध्याय व मिथिला येथील इतर विद्वान पंडित यांचा व नारायणभट्टाचा वादविवाद करविला, त्यांत भट्टानें सर्व पंडितांस जिंकिलें. याचा धर्मप्रवृत्ति हा ग्रंथ दाक्षिणेंत व प्रयोगरत्न ग्रंथ उत्तरेकडे प्रमाणभूत मानितात. प्रयोगरत्नाचें नारायणभट्टी नांव आहे. (याचें गुजराथी भाषांतर बडोद्यास झालें आहे) यानें वेदांतविषयांत अनेक मल्लारांशीं वाद करून त्यांना जिंकिलें. अकबराच्या दरबारीं याची मोठी प्रतिष्ठा होती. त्याचे मुलगे रामकृष्णभट्ट व शंकरभट्ट हे विद्वान असून त्यांचे ग्रंथ सर्वमान्य आहेत. शंभुवार्तिकव्याख्या, ज्योतिष्टोमपद्धति व जीवत्पितृकनिर्णय हे रामकृष्णाचे व द्वैतनिर्णय आणि आचाररत्न हे शंकराचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. प्रख्यात सिद्धांतकौमुदीकर्ता भट्टोजी दीक्षित हा शंकराचा शिष्य होय.

शंकरभट्ट याचा पुत्र नीलकंठभट्ट हा व्यवहारमयूख इत्यादि बारा मयूखांचा कर्ता आहे. रामकृष्णभट्टास दिनकरभट्ट ( दिवाकरभट्ट ), कमलाकरभट्ट व लक्ष्मणभट्ट असे तीन पुत्र होते. हे तिघेहि मोठे ममांसक म्हणून प्रसिद्ध आहेत. पैकीं दिनकरभट्टाचे बारा ग्रंथ दिनकरोद्योत संज्ञेचे आहेत. कमलाकरभट्टानें कमलाकर संज्ञेचे बारा ग्रंथ लिहिले. पैकीं निर्णयकमलाकर यासच निर्णयसिंधु असें म्हणतात.

हा ग्रंथ त्यानें स. १६१२ त रचला. याचे पूर्तकमलाकर, शांतिकमलाकर, शूद्रकमलाकर, विवाहकमलाकर हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. लक्ष्मणभट्टाचे आचाररत्न वगैरे ग्रंथ आहेत. कमलाकराचे अनंत, प्रभाकर व श्याम असे तीन पुत्र होते. अनंताचा रामकल्पद्रुम ग्रंथ प्रसिद्ध आहे. वर आलेला नीलकंठभट्ट हा १७व्या शतकाच्या आरंभीं बुंदेलखंडांत सागरवंशी भगवंतदेवाच्या दरबारीं होता आणि त्याच्या आज्ञेवरूनच नीलकंठानें १२ मयूख केले. याचा भाऊ दामोदर यानें द्वैतनिर्णय परिशिष्ट वगैरे ग्रंथ लिहिले. नीलकंठाचा मुलगा शंकर याचे व्रतार्क वगैरे बारा ' अर्क ' प्रसिद्ध आहेत.

गागाभट्ट हा दिनकरभट्टाचा पुत्र असून त्याला बापानें गागा असें लाडकें नांव दिलें व तेंच पुढें प्रसिद्ध झालें त्याचें खरें नांव विश्वेश्वर होतें. त्यानें उत्कृष्ट विद्या संपादन करून आपल्या घराण्याचा लौकिक वाढविला काशीस राहित्यावरहि या घराण्याचे शरीरसंबंध दक्षिणेंत होत असत शिवदिननाथाचा गुरु केसरीनाथ हा गागाचा मामा होता. मीमांसा, न्याय, अलंकार व वेदान्त या विषयांत गागाभट्टाची प्रवीणता विशेष होती. दिनकरोद्योत ग्रंथांत त्याच्या बापानें पुष्कळ विषय सोपे म्हणून सोडून दिले होते त्याची पूर्तता गागाभट्टानें केली त्यामुळें हेमाद्रीच्या चतुर्वर्गचिंतामणीप्रमाणेंच दिनकरोद्योताची योग्यता मोठी आहे जैमिनी सूत्रावर गागाभट्टाची टीका आहे. शिवाय न्यायशास्त्रावरील भट्टचिंतामणि व कायस्थधर्मप्रदीप उर्फ गागाभट्टी हे त्याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत गागाभट्ट शके १५९५ ( स. १६७३ ) त दक्षिणेंत आला व शके १५९६ च्या हिंवाळ्यांत काशीस गेला असा अंदाज आहे. या सुमारासच बाळाजी आवजीनें गागाभट्टाकडून कायस्थधर्मप्रदीप उर्फ गागाभट्टी रचून घेतला. तो बहुधा शके १५९६ तील ज्येष्ठ शु. १३ व वद्य ९ याच्या दरम्यान संपूर्ण झाला असावा. छत्रपतींच्या ग्रंथालयांत न्यायाधीश व पंडितराव या पोथीचा उपयोग करीत. कायस्थांचे धर्म, आचार व संस्कार बाळाजी आवजींच्या संमतीनें गागाभट्टानें ठरवून दिले यांत महाराजांच्या राज्यारोहणाचा उल्लेख आहे यांत वेदमंत्राचे अर्थ संस्कृत अनुष्टुप्छंदांत आणून ठेविले असून सर्व संस्कार अमंत्रक दिले आहेत. राजवाडे यांना सातारकर महाराजांच्या दप्तरांत एक पोथी सांपडली तींत हा कायस्थधर्मप्रदीप व शिवराजप्रशस्ति अशीं दोन प्रकरणें आहेत काव्य या दृष्टीनें प्रशस्तीची किंमत नसल्याच इतर प्रशस्त्यांहून अधिक नाहीं. ती शके १५९५ च्या मार्गशीर्षानंतर रचलेली दिसते प्रशस्तींत मुसुलमानांचा निर्देश दैत्य शब्दानें केला आहे व महाराजांनीं ब्राह्मणरक्षण व श्रुतिस्मृतिशास्त्राचा उद्धार केला असें म्हटलें आहे. तसेंच विजापूरकर बहलोल खानाची छाती फोडल्याचा ( पराभव केल्याचा शके १५९५ चा ) हि उल्लेख आहे.

गागाभट्टाच्या विद्वत्तेसंबंधानें दक्षिणेंत मोठा लौकिक असून दक्षिणेंतील ब्राह्मणवृंदावर त्याची छाप मोठी होती. त्यास मराठी राज्याचा व दक्षिणी पंडिताचा विशेष अभिमान असून शिवाजीचा लौकिक माहित होता. त्याच्या मनांत शिवाजीविषयीं आदर असल्यामुळें त्यानें मुद्दाम दक्षिणेत येऊन आणि पैठण वगैरे ठिकाणच्या अनेक विद्वानांचें अनुमत घेऊन शिवाजीचा राज्याभिषेक नेटानें पार पाडला, शिवाय महाराष्ट्रराज्यसंस्थापना ही महाराष्ट्रीय पंडिताकडून होण्यांत एक प्रकारें औचित्यहि होतें

सोळाव्या व सतराव्या शतकांत हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांच्या व मुसुलमान बादशहाच्या दरबारीं या घराण्यांतील विद्वान् पुरुषास मोठा मान मिळत असून धर्मकृत्यांच्या प्रसंगीं त्यास बोलावण्यात येत असे अद्यापीहि बनारस येथें त्या घराण्यास अग्रपूजेचा मान मिळतो भट्टघराण्यास " तें जनतेचें ( सेवा करणारें ) घराणें होतें " असें वै मंडलिक म्हणतात

लोकाच्या धर्मव्यवस्थेचे निबंधग्रंथ या भट्टांनीं लिहिले म्हणून मोठ्या धर्मकृत्यांच्या प्रसंगीं भट्ट घराण्यांतील पुरुषास अध्यक्षस्थान देण्याचा रिवाज सर्वत्र आहे या ग्रंथांत जुन्या स्मृती जमेस धरून व ठिकठिकाणचे आचार संकलित करून त्यांनीं व्यवस्थित पद्धती बांधून दिल्या. एकाच घराण्यांत असे एकसारखे विद्वान पुरुष निपजल्याचीं उदाहरणें फारच थोडीं आढळतील. कमलाकर भट्टाचे वंशज काशीनाथभट्ट (मिर्झापूर येथील संस्कृत पाठशाळेचे अध्यापक) यांनीं भट्टवंशकाव्य नांवाचा ग्रंथ लिहिलेला आहे. [ मराठी रियासत पूर्वार्ध, स. १९१५; विविधज्ञान विस्तार वर्ष ४५ अ १२; भा. इ. सं. चतुर्थ संमेलनवृत्त. ]

**गांगेयदेव**—हा चेदीदेशाचा राजा असून कलचुरीवंशाचा होता. याची कारकीर्द १०१५–१०४० पर्यंत असून हा मोठा महत्वाकांक्षी व शूर होता, त्याच्या मनांत उत्तरहिंदुस्थानांत साम्राज्यसत्ता स्थापण्याचें होतें व ती आपली मनीषा त्यानें बरीच पुरी हि केली होती तिरहुतपर्यंत त्याचें राज्य वाढलें होतें, तिरहुत हा प्रांत त्याच्या ताब्यांत १०१९ त आला होता याच्या पश्चात याचा मुलगा कर्णदेव यानेंहि आपलें राज्य गुजराथच्या भीमदेवाच्या सहाय्यानें वाढविलें [स्मिथ—अर्लि हिस्टरी ऑफ इंडिया.]

**गाग्रा**—पंजाबांतील एक जात लोकसंख्या ( १९११ ) ३१५५ हे मुख्यत. हिंदु व मुसुलमान आहेत. ते लाहोरच्या आसपास आढळतात ते किडे भरीत गावोंगाव हिंडतात व

किडे खातात. परंतु त्यांचा परंपरागत धंदा जळवा पकडून त्या लावणें हा होय. या धंद्यावरून त्यांना जुकेश म्हणतात. [ पंजाब से. रि. १९११ ].

**गाग्रौन**—राजपुताना. कोटा संस्थानच्या कनवास जिल्ह्यांतील एक किल्ला; व खेडें. अहू व कालीसिंध नद्यांच्या संगमावर हें वसलेलें आहे. हा किल्ला राजपुतान्यात सर्वांत मजबूत असून दोड रजपुतांनीं बांधिला आहे. १२ व्या शतकाच्या अखेरीस त्याच्याच ताब्यात होता. त्यांच्या नंतर खीची चव्हाण आले. जेटसिंगच्या कारकीर्दीत अल्लाउद्दीननें १३०० सालीं वेढा दिला होता तो ह्या लोकांनीं मागें हटविला. राजा अचलदासाच्या कारकीर्दीत माळव्याच्या हुसंगशहानें हें स्थान घेतलें. मुसुलमान इतिहासकार म्हणतात कीं १५१९ मध्यें हा गाव कोणी भीमकरणाच्या ताब्यात होता; व त्याजवर महंमद खिलजीनें हल्ला करून त्यास कैद केलें व ठार मारिलें.लवकरच मेवाडच्या राणा संग्रामसिंगानें महंमदाचा पराजय केला व पुढें १५३२ पावेतों गाग्रौन रजपुताकडेच राहिलें. १५३२ मध्यें गुजराथच्या बहादूरशहानें हें गाव घेतलें. पुढें सुमारें तीस वर्षांनीं अकबर माळव्याच्या स्वारीवर जात असता येथील किल्लेदार त्यास शरण आला. गाग्रौन हा माळव्याच्या सुभ्याचा एक सरकार होता असें ऐने इ अकबरींत म्हटलें आहे. १८ व्या शतकाच्या सुरवाती पर्यंत तो त्याजकडेसच राहिला. ह्या वर्षी तो महाराव भीमसिंग ( कोटा ) ह्यास बादशहाकडून इनाम मिळाला. नंतर ह्याची डागडुजी वगैरे करण्यात आली. गांवाभोंवतीं व किल्ल्याभोंवतीं एक उंच भिंत असून शिवाय खंदक आहे. हा गांव प्राचीन आहे. ह्यास गर्गाशास्तर म्हणत असत. कारण श्रीकृष्णाचा पुरोहित गर्गाचार्य येथें रहात असे अशी समजूत होती. कोणी म्हणतात ह्या गावास गर्गरातपूर म्हणत असत गर्गनामक हिंदु ज्योतिषानें येथूनच रेखांश मोजण्यास सुरवात केली. कोटा दरबारची पूर्वी येथें टांकसाळ होती. येथून आग्नेयीस ११ मैलावर मऊ नावाचें खेडें आहे. हें सुरवातीस खीची रजपुताच्या राजधानीचें शहर होतें. पश्चिमेस एक मोठा पडका वाडा आहे. तो पृथ्वीराज चव्हाणाचा आहे असें म्हणतात.

**गाजर**—यास लॅटिनमध्यें डॉकस कॅरोटा, इंग्रजींत कॅरट, संस्कृतमध्यें गर्जर, पिंडमूल, मराठींत गाजर इत्यादि नावें आहेत.

मूलस्थानः—या रोपाचें मूलस्थान काश्मीर आहे. पश्चिम हिमालयावरहि ५००० फुटापासून ९००० फूट उंचीवर हें रोप वाढतें. युरोप, ॲबिसीनिया, उत्तर आफ्रिका, मदिरा, अझोर्स बेटें व उत्तर आशिया हीं देखील या रोपाचीं मूलस्थानें आहेत असें मानण्यात येतें.

सबंध हिंदुस्थानभर या रोपाची लागवड होते. कित्येक भागांत हिरवट पादुरकें गाजर पसंत केलें जातें. याचें रोप जमिनीवर दोन किंवा तीन इंच वाढतें, व मूळ खडबडीत असून त्याला युरोपीय गाजराची चव नसते. कडक उन्हाळ्यांत देखील हें रोप जिवंत असूं शकतें, आणि कांहीं कांहीं भागात तर बाराहि महिने होऊं शकतें. गाजर कंदासारखें जमिनींत होतें. झाड हात सवा हात वाढतें. ह्याचें उत्पन्न बाराहि महिने होतें.

इतिहासः— सर जॉर्ज वर्डवूड यानें गाजराचा इतिहास लिहिला आहे. हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून लोक याचा उपयोग करीत आहेत. बाबरच्या आत्मचरित्रात, ऐने इ अकबरींत, टेरी व फ्रायर याच्या ग्रंथात गाजराचा नामनिर्देश व त्याचें वर्णन आलें आहे. हें रोप मध्यआशियामधून युरोपात नेण्यात आलें. जेव्हां युरोपमध्यें या रोपाविषयीं कांहींच माहिती नव्हती तेव्हां हिंदुस्थानात या भाजीची लागवड करून ती खाण्याचा प्रघात रूढ होता.

गाजर कंदासारखें जमिनींत वाढतें. हें लांबट असून त्याचा रंग तांबूस असतो. गाजराचें झाड हात सवा हात वाढतें दिल्लीकडे गाजरें सर्वोत्कृष्ट असतात गाजराच्या पिकास मध्यम, काळी किंवा मिश्र जमीन चांगली असते, गाजराच्या लागवडीच्या जमिनींत नांगरटीच्या पूर्वी दर एकरी सुमारें १०–१२ गाडया शेणखत देतात. जमीन चांगली तयार झाल्यावर आगष्ट सप्टेंबरांत सुमारें पाच ते सात पौंड बी पाभरीनें पेरतात. कित्येक वेळीं तें फेंकून पेरितात. ओळींत अंतर सुमारें नऊ ते बारा इंच ठेवितात. बीं फार बारीक असल्यामुळें तें पेरण्यापूर्वी त्यात राख अगर बारीक माती मिसळतात. या पिकाला दोनतीन खुरपण्या व पान सहा वेळ पाणी द्यावें लागतें. ओल भरपूर असल्यास हें पीक कोरडवाहूंतहि करितात. बीं पेरल्यापासून सुमारें चार महिन्यात पीक काढण्यास तयार होतें. दर एकरीं सरासरी उत्पन्नः—बागाइतें. उत्पन्न १६ हजार ते२० हजार पौंड व कोरडवाहू ५ हजार तें१० हजार.

हिरवीं गाजरें भाकरीबरोबर खातात व त्याची भाजीहि होते. गाजरें उकडूनहि खातात. गरीब लोक दुष्काळात गाजरावरच दिवस काढतात. गाई म्हशी वगैरे जनावरांस गाजरें चारलीं असता तीं पुष्ट होऊन दूध बरेंच देतात. रोज सुमारें दर जनावरास २० पौंडाचा रतीब देण्यास हरकत नाहीं.

**गांजा व भांग**,—या झाडास संस्कृतमध्यें विजया; लॅटिनमध्यें कॅनॅबिस सेटिव्हा, इंग्रजींत इंडियनहेंप, हिंदुस्थानींत भंग, गजा, सबझी, इत्यादि नावें आहेत. हें झाड रानटी स्थितींत अनेक ठिकाणीं सांपडत असल्यामुळें याचें मूलस्थान नक्की समजत नाहीं.

' भंग शब्दाचा उल्लेख अथर्ववेदात असून तेथें त्याचा ' पवित्र ' गवत या अर्थी उल्लेख सांपडतो सोम, कुश, भंग, यव व सह या हवनीय वनस्पतींत भाग आहे. याचा औषधी म्हणून उल्लेख प्रथम सुश्रुतांत आहे ( ८ व्या

शतकापूर्वी ). नंतरच्या चार शतकांत रोप म्हणून भांगेचा उल्लेख संस्कृत कोशांत आहे. १०व्या शतकांत भांगेचा मादक गुण माहीत झाला असावा. परंतु १४व्या शतकांत तो सर्वांनां माहीत होता. १० व्या शतकांत 'इंद्राशन' (इंद्राचें अन्न) हा शब्द प्रथम वाङ्मयांत आढळतो. भांगेच्या उत्पत्तीसंबंधीं एक पौराणिक कथाहि प्रचलित आहे ती ही कीं, देवांनीं समुद्रमंथन केलें त्यावेळीं अमृताच्या रूपानें भांगेची उत्पत्ति झाली. 'बॉवर मॅनस्क्रिप्ट' मधील औषधी भागांत भांगेचा उल्लेख नाहीं. ही हस्तलिखित प्रत ८ व्या शतकाच्या अखेरीस वाळवंटांत गडप झालेल्या कुच (खोतानमधील) शहरीं सांपडली. हाच वैद्यकावरील सर्वांत जुना असा उपलब्ध ग्रंथ असावा.

कैलासवासी डॉ. गणेश कृष्ण गर्दे पुणें, यांनीं हॅपड्रग्ज कमिशनपुढें खालील साक्ष दिली होती. "प्राचीन हिंदु वाङ्मयांत भांगेच्या मादक गुणाविषयीं मुळींच उल्लेख नाहीं. पाणिनी म्हणतो कीं हें रोप शेतांत पिकत असे. यापासून वाख निघत असे असें मनुस्मृति व कौषीतकी ब्राह्मणांत लिहिलें आहे पुढील संस्कृत टीकाकार व कोशकार भंग म्हणजे शण असा अर्थ देतात, हें शण रोप वगळी शण असून यापासून वाख निघतो. याची फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत माहिती असावी." गांजा व चरस यांना संस्कृत भाषेंत शब्द नाहीं. सर्व शब्द नवीन बनविलेले आहेत. असें डॉ. गर्दे यांचें मत आहे.

गु ण ध र्म व उ प यो ग—भांगेपासून मुख्यतः तीन प्रकारचें उत्पन्न होतें. त्यासंबंधीं वेगळा विचार केला आहे. खालील साल:—हिचा उपयोग दोर, दोरखंड, व जाडें भरडें कापड तयार करण्याकडे करितात. खाद्य बी.—याच्यापासून तेल काढतात. मादक पदार्थ:—यापासून भांग, चरस व गांजा हीं तयार होतात. व यांत राळेसारखा पदार्थ व बाष्पभावी तेल असतें.

भांगेचें बीं पक्ष्यांना दाणा म्हणून घालतात, व हिंदुस्थानांत दुसऱ्या गाईला ह्या बिया खाव्या असें म्हणतात. यांचें तेलहि निघतें.

तेल:-भांगेच्या बियांतून शेंकडा १५ते२५ प्रमाणांत फिक्कट व शुद्ध तेल निघतें. प्रथम याचा रंग हिरवट पिवळा असून नंतर तें हवेंत ठेविलें तर त्याचा फिकेपणा जातो. याची चव चांगली नसून वास साधारण असतो. याचें विशिष्टगुरुत्व .९२५ पासून .९३१ पर्यंत असतें. व हें १५° वर घट्ट होतें. याच्या अंगीं सुकविण्याचे गुणधर्म आहेत. इंग्लंडमध्यें रंगांत हें टाकीत नाहींत. परंतु यूरोपखंडांतील ज्या देशांत हें विशेष प्रमाणांत होतें त्या देशांत याचा रंगांत उपयोग करतात. या तेलाचा दिव्यांत जाळण्याकडे उपयोग करीत असून त्याचा मऊ साबण होतो. पुष्कळदां अळशीच्या तेलांत या तेलाची भेसळ सांपडते. पेंड गुरांना घालतात. संयुक्त संस्थानांत एकराला २० ते ४० बुशेल बी तयार होतें. झाड पिकण्यापूर्वीच कापणी करतात. नाहीं तर त्यांच्यापासून दुसऱ्या बिया निघतात. या बिया फार दिवस राहिल्यास पेरण्याच्या कामी येत नाहींत. म्हणून फक्त एकच वर्षभर त्या ठेवितात. रशियांत दरवर्षी ५ लक्ष टन बियांची पैदास होते.

ब ना थी भां ग, (लागवड केलेली व रानटी रोपें:)—हिंदुस्थानांत भांगेची लागवड दोन कारणांसाठीं करतात. ( १ ) मादक पदार्थांचा पुरवठा व ( २ ) वाख. हिंदुस्थानच्या सपाटीच्या प्रदेशांत भांगेंत मादक द्रव्य लवकर तयार होतें. परंतु वाख चांगलासा होत नाहीं. काहीं रोपांत मादक द्रव्य कडक व जास्त प्रमाणांत असतें. हिमालयाच्या पायथ्याच्या प्रदेशापेक्षां मैदानांत झालेली भांग अधिक चांगली समजतात. वाखासाठीं भांगेची लागवड वायव्य हिमालयांत करीत असून मादक पदार्थांसंबंधीं तेथें विशेष चर्चा करीत नाहींत कोठें गांजा, कोठें चरस व कोठें भांग याकडे लक्ष देतात. सिंधमध्यें या रोपापासून चांगला वाख निघून भांगहि बरीच उत्पन्न होते.

भांगेचें झाड सुमारें तीन हात उंच वाढतें. यास तुरे येतात त्यास गांजा म्हणतात तो सुकविल्यावर जो चुरा राहतो त्यास भांग म्हणतात भांग वाटून पितात. गांजा चिलमींतून ओढल्यानें व घोटा पिण्यापासून मनुष्यास निशा येते. याची लागवड अहमदनगर, सातारा आणि खानदेश जिल्ह्यांत व मध्यप्रांतांत नेमाडांत होते. याची लागवड कैफी पदार्थांकरितां करितात. कोंवळ्या पाल्याची भाजी करितात. नेपाळांत याच्या वाखाच्या पिशव्या व दोऱ्या करतात. डोंगरी लोक याची पायदणें तयार करितात. बी खातात व त्याचें तेल काढितात, किंवा पक्ष्यांना खावयास घालितात. याच्या लागवडीस खोल, काळी, भुसभुशीत जमीन, कोरडी हवा व पाऊस थोडा पण वरचेवर पडणारा पाहिजे. गांजासाठीं जमीन एक वेळ नांगरतात व वरचेवर कुळवून तयार करितात. दर एकरी शेणखत सुमारें १५-२० गाड्यांपर्यंत देतात. पेरणी जून-जुलई महिन्यांत करितात. बीं दर एकरीं सुमारें ८-१० पौंडपर्यंत पेरितात. ओळीमध्यें अंतर अडीच ते तीन फूट असतें. रोपें नऊ इंच उंच झाल्यावर पातळ करितात. या पिकाला एक खुरपणी व दोन तीन कोळपण्या देतात. सप्टेंबर आक्टोबर महिन्यांत रोजच्या रोज नर झाडें उपटून काढावीं लागतात. जर स्त्रीकेसर व नरकेसर यांचा संयोग होऊं दिला तर कैफाचें प्रमाण कमी पडतें. फूट व्हावी म्हणून बुंध्याजवळ झाडें जराशीं मुरगळतात. म्हणजे झाडें ठेंगणीं होऊन फूट जास्त होते. पुढें पाऊस कमी पडल्यास २।३ पाणी द्यावीं लागतात. पीक तयार झालें म्हणजे फुलांचे गोंडे काढतात व खळ्यांत नेऊन रात्रभर ठेवतात. ~~५ दिवशीं त्याचे लहान लहान ढीग करतात.
मध्यें आणून ते ढीग रोज पायानें
मळतात. या तुडवण्यांत फुलें चेपलीं

तयार होतो त्याला गांजा म्हणतात व लहान फांद्या, पानें व तुटलेलीं फुलें यांच्या मिसळीला भांग असें म्हणतात

बाजारांत मिळणारी सुकीं पानें ही एक तऱ्हेची पूड असून तिला सिद्धि म्हणतात हींत फक्त पानांचे तुकडे व न्याना तुरे असतात व कित्येक वेळां बियाहि असतात याला कित्येक वेळां पत्ति म्हणतात भांग शब्द फार व्यापक असून तो फक्त पानांनाच लावतात असें नाहीं सपाटीच्या प्रदेशांत व डोंगराळ भागांत रानटी झाडापासून सिद्धि काढतात परंतु बहुतकरून सर्व ठिकाणीं घराजवळच लहान तुकड्यांत भांगेची अर्धवट लागवड केलेली सांपडते या पानांची बारीक भुकटी करून तिच्यापासून चमत्कारिक पेय तयार करतात व त्यांत चव येण्यासाठीं पुष्कळ वेळां साखर, मसाला, वेलदोडे, काकडीच्या बिया किंवा दूध घालतात या पेयाला निरनिराळीं नांवें आहेत तीं अशीं —बंगाल –भंग, सिद्धि संयुक्त प्रांत – सिद्धि, थंडाई मध्यप्रांत — घोटा सिंध —घोटा, तडहूल, पण मद्रासमध्यें अशाच तऱ्हेच्या पेयाला रामरस अथवा रामरक्षम असें म्हणत असून पुण्याकडे ज्वारी व भांगेपासून केलेल्या पेयाला बोज म्हणतात वाईट वास पेयाला येऊं नये म्हणून त्यांत कस्तुरी किंवा इतर सुगंधी पदार्थ घालतात व जास्त मादक व विषारी होण्यासाठीं त्यांत अफू, धोत्र्याच्या बिया, सोमल, बचनाग, कुचला इत्यादि विषारी पदार्थ टाकतात कित्येक नादूळ व ज्वारी यांचीं मुळें मुद्दाम घालतात भांग व मदार्क यांपासून तयार केलेल्या पेयाला लुत्की नांव असून सुद्र नांवानें त्याचा बलुचिस्तान व पंजाबमध्यें उपयोग होतो या पेयांत भांग, अफू, मद्यार्क व धोत्रा असतो याच्या पेयापासून माजूम नांवाचा गोड पदार्थ करतात व तो सर्व ठिकाणीं खातात बाबरनें आपल्या आत्मचरित्रांत स्वत माजूम किती वेळां खाल्ला हें लिहिलें आहे

च र स—थंड व रुक्ष देशांत लाविलेल्या भांगेचीं पानें, दांडे, तुरे व फळें यांवर एकसमयाच्छेदकरून दिसणारा राळेसारखा पदार्थ म्हणजे चरस होय हा भांग व गांजा यांच्यापेक्षां जास्त परिणामकारक असतो सर्व वायव्य हिमालयांत म्हणजे नेपाळपासून तुर्कस्तानपर्यंत विशेष प्रकारचा मादक पदार्थ म्हणून चरस तयार करतात

काश्मीर व तुर्कस्तानमधून चरसाचा पुरवठा होतो चरस व गांजा कसे तयार होतात याची खरी हकीकत अद्यापि चांगली कळली नाहीं प्रेन म्हणतो कीं एकदा चरस पृष्ठभागावर दिसूं लागला व त्या ठिकाणीं पक्का बसला म्हणजे बियांच्या वाढीपासून त्यावर कांहींच परिणाम होत नाहीं

दक्षिण हिमालयांतील चरस व मध्य आशियांतील चरस यांत एवढाच फरक आहे कीं, पहिला झाड हिरवें असतानाच तें तोडण्यापूर्वी काढतात, आणि दुसरा सुकलेल्या झाडापासून घेतात मध्यआशियांतील चरसांत धूळ व झाडाचे इतर भाग यांचें मिश्रण असल्यामुळें शुद्ध हिंदी चरसाला जास्त किंमत येते कांहीं चांगल्या जातीचा चरस मात्र औषधांत घालतात चरस हा भांग व गांजा यांच्यापेक्षां जास्त अपायकारक आहे तयार झालेल्या मालांत पान नसलें तर त्याला जास्त किंमत येते रंग व वास यांवर गांजाची किंमत अवलंबून असते गांजाचे तीन प्रकार आहेत ते पुढीलप्रमाणें —

चापट गांजा —जमिनीपासून ६ इंच भाग सोडून रोपाचा दांडा कोयत्यानें कापतात नंतर तो एकत्र बांधून तीं रात्रभर बाहेर ठेवितात व तीं कारखान्यांत घेऊन जातात नंतर तुरे एकामागून एक जमिनीवर ठेवितात व त्यांना पायाखालीं इतकें तुडवितात कीं, पानें चिकटलेलीं फुलांचीं टोकं व लहान पानें एक होऊन चापट होतात दहाव्या लांबीच्या डोक्याच्या आकारावरून मग त्यांना मोठा चपटा, फादी चपटा इत्यादि नांवें देतात त्याच्या गांठी करतात

गोल गांजा —वरचीं डोकीं न तुडवितां तीं पायांखालीं घालून वळवितात तीं चिकटून बसत नाहींत, आणि त्यांना गोल आकार येतो गोल गांजाचीं लहान लहान पेंडकीं तयार करतात

चुर ( बारीक ) गांजा अथवा रोडा लहान फांद्यांपासून काटलेले तुटके तुकडे अथवा फुलांचे शेंडे हे चापट अथवा गोल या दोन्ही गांजांपासून निघत असून यांना ' चुर ' म्हणतात छाटण्याच्या वेळेस त्याचे तुकडे फार निघतात बंगाली गांजाला इतर प्रांतांत ' बलुचर ' म्हणतात बलुचर हें एका खेड्याचें नांव असून तेथें प्रथम गांजा झाला असा समज आहे ग्वालेर व मध्यप्रांत येथील गांजाला ' पथर ' नांव आहे गांजा तयार केल्यानंतर राहिलेला केरकचरा ' भांग ' म्हणून विकतात

औ ष धी व रा सा य नि क गु ण ध र्म —गांजानें वेड लागतें हा समज अतिशयोक्तिरूप आहे असें हॅपड्रग्स-कमीशनच्या रिपोर्टांत लिहिलें आहे गांजाचा नियमित उपयोग केला तर कोणताहि नैसर्गिक तोटा होत नाहीं शुद्ध व नियमित प्रमाणांत हें औषध घेतलें तर उन्मादवायू उत्पन्न होऊन त्यापासून बुद्धिभ्रंश होईल असा गुणधर्म यांत फारच थोडा असतो अथवा मुळींच नसतो असें म्हटलें तरी चालेल कोणत्याहि तऱ्हेच्या भांगेचा उपयोग केला तर मानसिक अस्थैर्य वाढतें यामुळें मन दुर्बळ होऊन मनुष्य वेडा होण्याचा संभव असतो एवढें मात्र खरें आहे हॅंपड्रग्स कमीशन बसलें होतें त्या सालीं हिंदुस्थानांतील पागलखान्यांत भांगमुळेंच खरोखर वेडे झालेले असे फक्त शेंकडा ७ ३ लोक होते मागेंनें आलेल्या वेडेपणावर उपाय होण्यासारखा असून या मादक पदार्थांची आसक्ति होत नसल्यामुळें हें घेणें एकदम बंद केलें तर चालण्यासारखें असतें व बंद केल्याबरोबर गुण दिसूं लागतो

व्या पा र व स र का री क रा चें उ त्प न्न.— गांजासाठीं या झाडांची लागवड करावयाची असल्यास हिंदुस्थानात परवाना घ्यावा लागतो. शिवाय मुदतीनें पिकाची तपासणी होऊन उत्पन्नाचा अंदाज करण्यांत येतो. व्यापाऱ्यास माल विकण्यास कांहीं भानगडी नसते. परंतु माल विकल्यावर तो मुद्दाम केलेल्या सरकारी कोठारात अथवा सरकारनें नेमलेल्या गोदामात ठेवितात. या गोदामास दोन किल्ल्या असून एक किल्ली सरकारी अधिकाऱ्याजवळ असते व दुसरी शेतकऱ्याजवळ असते. येथून माल नेताना ठरीव कर द्यावा लागतो व शेतकऱ्याचा अंदाज व विक्रीपत्र याला धरून नेलेल्या मालाची नोंद ठेवितात. घाऊक व किरकोळ दोन्ही व्यापाऱ्यांना परवाने घ्यावे लागतात. गांजाचा सर्व व्यापार अधिकाऱ्याच्या नजरेखालीं चालतो. चरससंबंधीं सर्व आयात मालाला मणाला कमींत कमी ८० रु. कर द्यावा लागतो. पसंत केलेल्या कोठारात चरस ठेवतात व तेथून तो नेतांना पुन्हां कर द्यावा लागतो. राज्य तेथें भांगेवर मुद्दा कर लादतात. विक्री व व्यापार यांना कायदा लावतात. परवाना घेतल्याशिवाय यापैकीं कोणताहि मादक पदार्थ लागवड केल्यास अथवा विकल्यास गुन्हा समजला जातो.

तिन्ही मादक पदार्थांना वेगळाले परवाने घ्यावे लागत असून किरकोळ विकणाऱ्यानें लहान मुलास अथवा वेडसर मनुष्यास हा पदार्थ विकण्याची मनाई असते. हा पदार्थ एका वेळीं किती विकावयाचा अथवा एका मनुष्यानें किती जवळ बाळगावयाचा याविषयीं मर्यादा ठरविलेली आहे. हा पदार्थ जुना झाल्यास खराब होतो असा व्यापारी व याचें सेवन करणाऱ्या लोकांचा समज आहे. अफूच्या बाबतींत मात्र याच्या उलट असतें. वरील कारणामुळेंच यूरोपात भांगेवर केलेले प्रयोग बरोबर वठले नाहींत.

क्षे त्र फ ळ व म ह सू ल —हेंपड्रग्स कमिशन रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यावर हिंदुस्थानसरकारनें आपला ठराव केला. त्यावेळीं ( १८९५ ) गांजाच्या लागवडीचें क्षेत्रफळ ६००० एकर होतें. त्यानंतरची माहिती येणेंप्रमाणेः—

| वर्ष | लागवडीचें क्षेत्र एकर | करमहसूल पौंड. |
|---|---|---|
| १९००–१ | ४०९६ | २०१३४४ |
| १९०१–२ | २४९६ | २१२२२४ |
| १९०२–३ | १९४० | २२५३५२ |
| १९०५–६ | २६४५+ | |
| | ४१९ ( देशी संस्थानें ) | |

वरील आकड्यांवरून लागवडीचें क्षेत्रफळ एकसारखें कमी होत असून उत्पन्न वाढत चाललें आहे असें दिसतें. सरकारी कायदे व अधिकाऱ्यांची अंमलबजावणी यामुळें वरील उत्पन्न वाढलें असावें असें उघड दिसतें.

कि म त व क र.—भांग व त्याचे इतर प्रकार यांच्या किंमतींत इतका फरक आहे कीं, तिचे आंकडे देण्यात विशेष फायदा नाहीं. मालाचा दर्जा, तयार करण्याची रीत, कर वगैरे गोष्टींवर त्याची किंमत अवलंबून असते. एका शेराच्या किरकोळ किंमतीचा तक्ता हिंदुस्थानसरकारनें प्रांतिक सरकाराकडे पाठवून त्या किंमतीबरोबर दर ठेवण्याचा प्रयत्न करण्यास सांगितलें. त्यातील कांहीं किंमती येणेंप्रमाणे.—

| पदार्थाचें नाव. | प्रांत | दर शेरास कमीत कमी किंमत रु | दर शेरास जास्तीत जास्त किंमत रु. |
|---|---|---|---|
| गांजा | आसाम | १५ | ४० |
| ,, | मुंबई | ६ आणे | ५ |
| चरस | पंजाब | ४ | १५ |
| ,, | बंगाल | ३५ | ४० |
| भांग | पंजाब | २ आणे | ८ आणे |
| ,, | बंगाल | १ | ६ |

करामुळें वरील किंमतींत फरक असेलच. परंतु पदार्थाच्या दर्जाप्रमाणेंहि हा फरक बराच असावा कारण दोन प्रांतात होणाऱ्या मालात फरक तर आहेच, परंतु एकाच प्रांतातील दोन जिल्ह्यातील मालातहि फरक असतो.

**गाजीउद्दीनखान, प हि ला.**—एक मुसुलमान सरदार. याला अलमगीर बादशहानें फीरोझजंग हा किताब देऊन अमीर पदावर चढविलें ( इ. स १६८७) याचाच मुलगा हैद्राबादच्या गादीचा संस्थापक प्रख्यात निजाम–उल्–मुल्क होय. बहादुरशहाच्या कारकीर्दींत गाजीउद्दीन गुजराथचा सुभेदार झाला. व पुढें अमदाबाद येथें १७१०त मरण पावला.

दु स रा.—हा प्रख्यात निझाम उल्मुल्क आसफजाह याचा वडील मुलगा असून, याला मुहंमदशहानें नादिरशहाच्या स्वारीनंतर व खानडौरान मेल्यानंतर अमीर–उल्–उमरा करून फिरोझजंग हा किताब दिला होता. निझामानें याला दिल्लीस ठेविलें होतें. व आपण दक्षिणेत आला होता त्यावेळीं त्यानें बादशहाकडून याला मीर बक्षीगिरी ( सेनापति ) देवविली. निझाम–उल–मुल्क हा इ. स १७४८ त मरण पावल्यानंतर दक्षिणेत जाऊन हैद्राबादचा नबाब होण्याची याची फार इच्छा होती; परंतु इ. स. १७५२ पर्यंत महम्मदशहानें त्याला परवानगीच दिली नाहीं याचें व मराठ्याचें चांगलें सख्य होतें. हा दिल्लीस वजीर असल्यानें मराठ्याच्या विरुद्ध इतर मुसुलमान कांहीं करूं शकले नाहींत. मराठ्यांनीं आपल्यास मदत करण्यासाठीं मराठ्यांशीं जें बोलणें यानें लाविलें होतें त्यावरून असें दिसतें कीं, त्याच्या इतर भावांनीं दिल्लीदरबारास लांच दिला असावा. इकडे मराठेहि निजामास दाद देण्यासाठीं नेहमीं गाजीउद्दिनाचा उपयोग करून घेत. पुढें नासिरजंग मरण पावल्यावर गाजीउद्दिन हा दिल्लीहून मराठ्यांच्या हिमतीवर निघाला; तो औरंगाबादेस आला. त्याच्या बरोबर ७ सैन्य, त्याचें खासगी सैन्य व मराठ्यांच्या

सैन्य मिळून दीड लाख फौज होती पुढं श्री नानासाहेब पेशवे हे त्याच्या मदतीस आले होते, शहानवाझास त्यांची भेट झाली होती, निजाम उत्मुल्काचा हा वडील मुलगा असल्याकारणानें त्याच्या हक्काबद्दल कोणी शंका घेत नव्हते पेशव्याचा उद्देश त्याच्याकडून उत्तर दक्षणचे नाना प्रकारचे कार्यभाग उरकून घ्यावयाचे होते व खास भागानगरप्रांत मिळवावयाचा होता गाझीनें पेशव्याना, आपल्याला मदत केल्याबद्दल तापी व गोदा वरी यामधील सर्व प्रदेश देऊ केला होता व तो पुढें सलाबतजग यानें दिलाहि परंतु गाजीउद्दिनचें नशीब निराळेंच होतें त्याचा सावत्र भाऊ निजामअली याच्या आईनें त्याला मेजवानीस बोलाविलें असता हा तेथें गेला, त्यावेळीं त्याला विषप्रयोग करण्यात आला यामुळें हा १६ ऑक्टोबर १७५२ रोजीं मरण पावला त्याचें शव दिल्लीस नेऊन तेथें पुरलें श्री नानासाहेबाची मोठ्या कुशलतेनें निजामाला काबूत आणण्याची योजना यामुळें फसली व हा मोठा व्यूह ढासळून पडला पुढें याचा मुलगा शहाबउद्दीन यास अमीर-उल्-उमरा व गाझीउद्दीन हे किताब मिळाले याच्या नावचें गाजिउद्दीन नगर म्हणून एक गाव उत्तरेकडे आहे तेथें अब्दाली व दुर्रानी याची लढाई झाली होती

ति स रा —दुसऱ्या गाजीउद्दीनखानाचा मुलगा बापाच्या मृत्यूनतर (१७५२) दिल्लीच्या अहमदशहा बादशहानें याला अमीर-उल्-उमरा नेमून इमाद-उल-मुल्क गाजी-उद्दीनखान अशी पदवी दिली यानेंच पुढें दिल्लीचा वजीर होऊन अहमदशहास कैद केलें व त्याचे डोळे काढले ('अहमदशहा पहा') दुसऱ्या अलमगीरचा खून करविणारा हाच गाजीउद्दीन होय याची बायको गन्ना किंवा गुन्नाबेगम हिंदुस्थानी कवयित्री म्हणून फार प्रख्यात आहे गाजीउद्दीन कधीं वारला तें समजत नाहीं, पण गुलजार इब्राहिम कर्तानें तो १७८० त हालात दिवस काढीत होता असें लिहिलें आहे 'मासिर-उल्-उमरा' ग्रंथावरून पहातां तो १७७१ त दक्षिणेंत जाऊन माळव्यात एक जहागीरदार बनला, नंतर सुरतेला जाऊन काहीं दिवस इंग्रजांसमवेत राहिला व शेवटीं मक्केच्या यात्रेला गेला असें आढळतें कोणी म्हण तात तो १८०० त काबूल येथें मरण पावला गाजी उद्दीन प्रख्यात फारसी कवि व ग्रंथकार होता [बील, मु रियासत, राजवाडे खंड १, ग्रँट डफ इ]

गाजीउद्दीन हैदर—एक अयोध्येचा नवाब (१८१४–१८२७) 'अयोध्या प्रांत' पहा

गाझा—(आधुनिक घुझे) ५ फिलिस्टाइन शहरां पैकीं अगदीं दक्षिणेकडचें शहर हें समुद्राजवळ असून ईजिप्त, अरबस्तान, पेट्रा व सीरिया या देशाकडे जाणारे प्राचीन व्यापारी रस्ते येथें मिळालेले होते इस्रायली लोकांच्या ताब्यात हें शहर फार थोडे दिवस होतें त्यानंतर असुरी सत्ता येथें सुरू झाली सिकंदर बादशहानें गाझाला पांच महिनेपर्यंत वेढा दिला होता (इसवी सन पूर्वी ३३२) इ स पूर्वी ९६ त हें शहर अलेक्झांडर जेनिअसनें युद्धांत मिळविलें होतें २ ऱ्या व ३ ऱ्या शतकात गाझा हें फार भर-भराटींत आलेलें ग्रीक शहर होतें ६३५ त हें शहर मुसुल मानांच्या हातीं आलें व व्यापारानेरीज इतर बाबतींत त्याचें महत्त्व फार कमी झालें नेपोलियननें हें शहर १७९९ त काबीज केलें होतें

सध्याच्या शहराचे चार भाग केले असून लोकसंख्या१६००० आहे पूर्वेस सॅम्सनची कबर असून दाखवितात येथील लोकांचा पेहराव ईजिप्शियन पद्धतीचा आहे

गाझिआबाद, त ह सी ल —मीरत जिल्ह्यातील एक तालुका. जलालाबाद, लोणी, दास्ना हे तीन परगणे आहेत यात ३३४ खेडीं व ८ शहरें आहेत क्षेत्रफळ ४९२चौ. मै लोकसंख्या (इ स १९११) २,१८,७४८ १९०३-४ मध्यें सान्याचें उत्पन्न ४,८५,०००व पट्टयाचें उत्पन्न ८० ०००होतें जमीन एकदरींत हलक्या दर्जाची आहे पण दळणवळणाची साधनं, रेल्वे व रस्ते हीं बाढली आहेत अप्परगंगा व पूर्वयमुना कालव्यानें येथें पाणी पुरवितात १९०३-४ सालीं ३४९ चौ मै लागवडी जमीनीपैकीं १८० चौ मै वरील पाण्यानें भिजत असे येथें निळीचें पीक मुख्य असून उसाचें पीक कमी आहे

श ह र —मीरत जिल्ह्यातील गाझीआबाद तालुक्याचें मुख्य ठिकाण कलकत्ता-पेशावर रस्त्यावर वसलें आहे हें ईस्ट इंडिया, नॉर्थ वेस्टर्न व औध—रोहिलखंड रेल्वेवरचें जंक्शन स्टेशन आहे लो स(१९११)११३०४ हें १७४० मध्यें वजीर गाझीउद्दीन यानें वसवलें १७६३ मध्यें येथें सुरज-मल जाटाचा खून झाला १८५७ च्या बडात येथेंहि एक चकमक झाली होती येथील बाजाररस्त्यावर चांगली घरें असून एकंदर रस्ते सुरेख आहेत पोलीस स्टेशन व टाऊनहॉल याच्याकडे जाणाऱ्यास सराईचा उपयोग होतो १८६८ मध्यें येथें म्युनिसिपल क स्थापन झाली धान्य, कातडें, कमावलेलें चामडें याचा व्यापार चालतो येथें ८-१० मुलामुलींच्या शाळा आहेत

गाझीपूर जि ल्हा —संयुक्त प्रांत बनारस विभागामध्य हा जिल्हा आहे क्षेत्रफळ १३३९ चौ मैल या जिल्ह्यात डोंगर अथवा टेंकड्याहि नाहींत याच्या मधून गंगा जाते नदीच्या दोन्ही बाजूस विस्तीर्ण सपाट जमीन आहे तथापि ऊंच व सखल मैदान असे भाग दोन्ही बाजूस आहेत बहु तेक सर्व जमीन शेतीखालीं आहे वस्तीहि फारच दाट आहे त्यामुळें या भागाला जंगली जनावरें बहुतेक नाहींतच गर्द जंगलेंहि फारशीं नाहींत बहुतेक झाडें आंबा, बाबू व इतर नेहमींचीं फळझाडें वगैरे आहेत पाऊस साधारणत ४० इंच पडतो लहान लहान नद्यांचे प्रवाह बरेच आहेत गोमती, मगाई व छोटी शरयू या तरा मोठ्या नद्या आहेत

जिल्ह्यात खडकाळ जमीन नाहींच सर्व जमीन गंगेच्या गाळाची बनलेली आहेत

हा जिल्हा पूर्वी गुप्तांच्या मगध साम्राज्यांत होता याचा सविस्तर प्राचीन इतिहास सांपडत नाहीं प्रसिद्ध चिनी प्रवासी ग्यूएनत्संग यानें या जिल्ह्यातील जमीन सुपीक व बहुतेक लागवडीखालीं असल्याचें लिहिलें आहे. ११९४ मध्यें गुलाम घराण्याचा पहिला राजा कुतुबुद्दीन यानें बिहार वगैरे सर्व मुलूख, कनोज येथें जयचंद राजाचा पराभव करून जिंकला १३३० मध्यें मसाऊद गाझी यानें गाधीपूरच्या राजाचा खून केला व शहराचें नाव गाझिपूर केलें १३९४–१४७६मध्ये शर्की घराण्याचा येथें अमल होता त्यानंतर मोंगल साम्राज्य येथवर पसरलें मध्यंतरीं शीरशहा सूर या अफगाणाचा अमल होता. अकबरानें त्याचा समावेश सुभा अलाहाबादमध्यें केला होता १७२२ त सादतखान हा अयोध्येचा नबाब म्हणून स्वतंत्रपणेंच कारभार पहात होता त्यानें अबदुल्ला नबाब नावाचा एक गाझीपूर येथें सुभा नेमला पुढें राजा बळवंतसिंग (बनारस) यानें हा भाग बळकावला य च बळवंतसिंगाला इंग्रजांनीं त्याचें राज्य त्याच्या दासीपुत्राला देण्यास भाग पाडलें व जेव्हां चेतसिंग पैसे देण्यास असमर्थ झाला व स्वतंत्र होण्याचा प्रयत्न करू लागला तेव्हां वॉरन हेस्टिंग्जनें त्याला गादीवरून काढून टाकलें १७७५ मध्यें बनारस प्रांत इंग्रजांच्या अधिकाराखालीं आला

१८५७ च्या गडबडींत हाहि जिल्हा सामील झाला होता पण फारशी दंगल या बाजूला झाली नाहीं. जिल्ह्यात प्राचीन महत्त्वाचीं स्थानें व वस्तू बऱ्याच आहेत त्या बौद्धांच्या व हिंदूंच्या वेळच्या आहेत भिटा येथें गुप्तांचा शिलालेख व शिक्कामोर्तब सापडलें आहे व पहालादपूर ( प्रल्हादपूर ) येथें एक शिलालेख सापडला आहे

या जिल्ह्याची लोकसंख्या ( १९२१ ) ८३२२८९ यांत २५४९खेडीं व शहरें आहेत १९११सालीं ८३९७२५ लोकांपैकीं ७५३०२ लोकांना लिहितां येत होतें शेंकडा ९० हिंदु व १० मुसलमान आहेत भाषा बिहारीची पोटभाषा भोजपुरी शेंकडा ७१ लोक शेतीवर व ६ सामान्य मजुरीवर रहातात जिल्ह्यात सर्व प्रकारची जमीन आढळते

या जिल्ह्यात कंकर फार सापडतो त्याचा उपयोग रस्त्यावगैरे कडे करतात सोरा व सज्जीखार हीं काढतात उद्योगधंदे फारसे नाहींत साखर तयार करतात व जाडाभरडा कपडा होतो, अफू व अत्तरें गाझीपुरांत होतात निर्यात माल साखर, कातडीं अफू, अत्तरें व क्वचित धान्य आयात माल कपडा, सूत कापस, मीठ, मसाला, धातु सामान बंगाल–नॉर्थ वेस्टर्न व इतर रेल्वेमुळें घोग्राच्या पलीकडचा आणि दुआबमधला व्यापार निकडून हाऊं लागला सैदापूर, झमानिआ व गाझीपूर हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत व्यापाराचा ओघ रेल्वेकडे स्वाभाविकच जात आहे गाझीपूर जिल्ह्यांत रेल्वेलाईन बरीच आहे ईस्ट इंडियन रेल्वे, प्रॉव्हिन्शिअल रेल्वे व बंगाल-नार्थवेस्टर्नच्या दोन शाखा यांतून जातात ५७६ मैल सडकेपैकीं ९५ मैल पक्की आहे या जिल्ह्याला दुष्काळाची बाधा फारशी झालेली नाहीं १८७३ व १८७८ सालीं बराच दुष्काळ पडला होता पण लोक दुष्काळी कामावर आले नाहींत १८९४त अतिवृष्टि व १८९६–९७त अनावृष्टि यांनीं भाव चढले होते १८९७ सालीं पिकें फारच चांगलीं आलीं व शेतकऱ्यांना भाव चांगला मिळाला शिवाय येथून पुष्कळ लोक नेहमीं मजुरीकरितां बाहेर प्रांतीं जातात

त ह शी ल—हा तालुका गाझीपूर जिल्ह्यातला आहे. याच नावाचा तालुका फत्तेपूर जिल्ह्यातहि आहे याचें क्षेत्रफळ३९५ चौ मै व लो स (१९११)२४६८५१ ८४७ खेडीं व एक शहर आहे साऱ्याचें उत्पन्न २६६००० व इतर कर ४९०००६ येथल्या इतकी दाट वस्ती जिल्ह्यातील दुसऱ्या तालुक्यात नाहीं ४१५ नद्या या तालुक्यातून वहातात तांदुळाचें पीक मुख्य आहे ओसाड जमीनींतून सज्जीखार बराच सापडतो २३५ मैल जमीनीपैकीं १४३ मैलांना पाणीपुरवठा होतो पैकीं ½ विहिरींनीं व बाकीचें तलावांनीं पुरवले जात

श ह र—गाझीपूर जिल्हा व तालुका यांचें मुख्य ठिकाण दंतकथेवरून हें शहर राजा गाधी यानें गाधीपूर या नावानें वसविलें व १३३० च्या सुमारास मसाऊद मलिक उस्सादात गाझी यानें पूर्वीच्या राजास पराभूत करून याला गाझीपूर बनवलें या जुनाट शहराचा विस्तार २ ते ३ मैलांचाच आहे जुनाट तट व इमारती आणि मशिदी कांहीं पडीत व कांहीं शाबूद आहेत लॉर्ड कार्नवालिसचें थडगें येथेंच आहे अफूचें सरकारी मुख्य ठिकाण हेंच आहे व सर्व ठिकाणाहून अफूचें कच्चें पीक येथें येतें

चीनकरितां व मध्यप्रांत, संयुक्तप्रांत वगैरेकरतां लागणारी अफू, डॉक्टर व सरकारी दवाखाने याकरता मॉर्फिआ वगैरे येथें तयार होतात चीनमध्यें येथली अफू बनारसची अफू म्हणून प्रसिद्ध आहे अफूशिवाय अत्तरें करण्याचा धंदा मुख्य आहे अफूच्या कामावर हंगामाप्रमाणें ५०० पासून ३५०० पर्यंत माणसें काम करतात येथें १८६७ पासून म्युनिसिपल कमेटी आहे येथें १४ शाळा आहेत

**गाझीपूर तहशील**–संयुक्तप्रांत फत्तेपूर जिल्हा क्षेत्रफळ २८४ चौ मै लो स ९३०५२ खेडीं १४४ शहर नाहीं साऱ्याचे उत्पन्न १९५००० इतर कर ३१००० रु जमीन बहुतक हलकीच आहे फत्तेपूर कालव्याचें पाणी येथें येत व स्थानिक तळीं व झील ( झरे ? ) याचा उपयोग करतात. विहिरी क्वचितच दिसतात १०८ चौ मै पैकीं ३९ मैल जमीन पाटाच्या पाण्याखालीं आहे

**गॉर्टिझेन**—प्रशियाच्या हॅनोव्हर प्रांतांतील एक शहर. लोकसंख्या ( १९०५ ) ३४०३० हें कॅसेलला जाणाऱ्या आगगाडीच्या रस्त्यावर हॅनोव्हरच्या दक्षिणेस ६७ मैलांवर

आहे लीनेचा कालवा ह्या शहरामधून जातो शहराभोंवतीं कोट असून त्यावर लिंबाचीं झाडें लावलीं असल्यामुळें सहल करण्यास तें एक रम्य स्थान झालें आहे. विश्वविद्यालयाच्या बऱ्याच इमारती, मध्ययुगातील एक नगरभवन आणि दोन प्रॉटेस्टंट धर्माचीं देवळें येरीजकरून ह्या शहरात सार्वजनिक महत्वाच्या दुसऱ्या इमारती नाहींत प्रसिद्ध जॉर्जिआ ऑगस्टा विश्वविद्यालय दुसऱ्या जॉर्ज राजानें १७३४ त स्थापिलें १८२३ त येथील विद्यार्थ्यांची संख्या १४७ होती परंतु विद्यार्थी व अध्यापक राजकीय चळवळींत पडल्यामुळें १८३४ त ती ८६० झाली १८३३ ची उदार राज्यपद्धति हॅनोव्हरच्या अर्नेस्ट ऑगस्टस राजानें बदलली, म्हणून त्याच्या विरुद्ध भाषणें केल्यावरून जेव्हा सात अध्यापकाना काढून टाकलें तेव्हा तर ती संख्या आणखी कमी झाली परंतु हॅनोव्हर प्रशियाला जोडलें गेल्यापासून ह्या विश्वविद्यालयाची सारखी भरभराट होत आहे. १९१४ मध्यें येथें १६३ अध्यापक व ३३६३ विद्यार्थी होते येथील ग्रंथसंग्रहालयात ५ लक्ष ग्रंथ व ५३०० हस्तलेख आहेत जर्मनींतील आधुनिक वाङ्मयाचा एवढा मोठा संग्रह दुसरीकडे कोठेंहि सापडणार नाहीं ह्या विश्वविद्यालयात रसायनशास्त्राची एक उत्तम प्रयोगशाळा, त्याचप्रमाणें प्राणिशास्त्र, मानवजातिशास्त्र व खनिजशास्त्रातील वस्तूंचा मोठा संग्रह आहे याशिवाय शारीरशास्त्रातील कवट्यांचा प्रसिद्ध संग्रह, शेतकीसंस्था, वनस्पतिबाग, एक मोठी वेधशाळा व कित्येक रुग्णालयेंहि आहेत. गुर्टिंगी किंवा गोडिंग नावाच्या खेड्याचा उल्लेख ९५० त प्रथम केलेला आढळतो हें शहर इ स. १५३१ त यूरोपातील धार्मिक सुधारणेंत पडलें पुढच्याच शतकात झालेल्या यूरोपातील 'तीस वर्षांच्या लढाईंत' ह्याचें अतोनात नुकसान झालें एक शतकपर्यंत त्याचा एकसारखा ऱ्हास होत गेला परंतु विश्वविद्यालयाच्या स्थापनेमुळें त्याला बरेंच महत्व आलें आहे अलीकडे अलीकडे तर व्यापारात व उद्योगधंद्यातहि तें पुष्कळ पुढें आलें आहे.

**गाडरवाडा, त ह सि ल**—मध्यप्रात नरसिंगपूर जिल्ह्याची एक पश्चिमेकडील तहसील क्षेत्रफळ ९०८ चौ. मै. लो सं. (१९११) १०२१९५ हींत १ शहर (गाडरवाडा) व खेडीं ४५१. सरकारी जगल ६३ चौ मै ही तहसील नर्मदा नदीच्या खोऱ्यात असून जमीन काळी व सुपीक आहे तसेंच सातपुड्याच्या काहीं टेकड्याहि ह्या तहसिलींमध्यें आहेत

**. गा व**—गाडरवाडा तहसिलीचें मुख्य ठिकाण मराठ्याचे अमदानींत हा गाव जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें लो सं. (१९०१) ८९१८ व (१९११) ४७१५ एका दशकात एवढी लोकवस्ती कमी झाली. म्यु स्थापना १८६७त झाली. निर्गत माल तूप व धान्य येथें १ मिडल्स्कूल व १ दवाखाना आहे

**गाणपत्य**—हिंदूंत जे अनेक उपासनापंथ निर्माण झाले त्यामध्यें 'गाणपत्य' हा एक पंथ आहे. गाणपत्यांचें दैवत गणपति होय गणपति हा देव हिंदू म्हणविणाऱ्या प्रत्येक माणसाच्या घरीं पूजिला जातो हा देव सकळ विघ्नाचा हर्ता, विद्यादाता व मंगलमूर्ति असा मानला जात असल्यामुळें या देवाचें पूजन प्रत्येक हिंदूच्या घरीं होतें. ('गणेश' पहा.)

इतर देवताप्रमाणे गणपतीची मुख्यतः उपासना करणारा एक संप्रदाय हिंदुस्थानात आहे या पंथाला अगर संप्रदायाला गाणपत्य अशी संज्ञा आहे या संप्रदायाचे लोक पुष्कळ आहेत गणपति हाच परमात्मा असून त्यानेंच हें सर्व ब्रह्मांड निर्माण केलें असें या पंथाचे अनुयायी मानतात. या गणपतिस्वरूपी परब्रह्मापासूनच सर्व किरकोळ देव उत्पन्न झाले गणपति हा मात्र अनाद्यंत, अजर, अमर, निर्गुण व निराकार असा देव आहे असें या संप्रदायाचें तत्व आहे हें तत्व प्रचलित करण्यासाठीं या पंथाच्या आचार्यांनीं निरनिराळे ग्रंथ लिहिले व हे सर्व ग्रंथ त्या पंथाच्या अनुयायांनीं प्रमाण मानले आहेत

**ग्रा न्थ**—या संप्रदायाचे प्रमुख ग्रंथ म्हटले म्हणजे वरदतापनीय अगर गणपतितापनीय उपनिषद्, गणपत्युनिषद्, गणेशसंहिता, गणेशपुराण, मुद्गलपुराण व ब्रह्मवैवर्त पुराणाचा गणेशखंड हे होत. गणेशसंहितेंत अगर गणपत्युपनिषदात गणपति व ब्रह्म हे एक असून गणपति हा जगताचें आदिकारण होय असें सांगितलें आहे. गणेशपुराणामध्यें गणेशासंबंधींच्या निरनिराळ्या कथा दिल्या असून त्याची पूजा व उपासना कशी करावी हें सांगितलें आहे तसेंच गणपत्युपासनेचा एक मंत्रहि यात आहे ( पहा ) गणेशखंडामध्यें देखील अशाच प्रकारच्या कथा वर्णन केलेल्या आहेत. ब्रह्मवैवर्तपुराणामध्यें एका अध्यायात राधा ही गणेशाची पूजा करीत असे असें सांगितलें आहे हें ध्यानात ठेवण्याजोगें आहे गणेशखंडात शिवानें गणपतीला प्रसन्न करून घेण्यासाठीं दहा वर्षें घोर तपश्चर्या केली व त्याच्यापासून त्रिपुरासुराच्या वधाचा वर प्राप्त करून घेतला असें वर्णन आलेलें आहे. गणेशगीता नावाचाहि एक ग्रंथ आहे पण तो अवळ अवळ भगवद्गीतेसारखाच आहे फक्त कृष्णाबद्दल गणेश नाव घालण्यात आलें आहे. याखेरीज गणपतिकल्प, गणपतिकवच, गणपतिपंचरत्न, गणपतिपंचाग, गणपतिपंचावरण स्तोत्र (शंकराचार्यकृत ), गणपतिपुरश्चरणविधि, गणपतिपूजा, गणपतिमंत्रविधान, गणपतिमानसपूजा गणपतिरत्नप्रदीप गणपतिरहस्य, गणपतिवेदपादस्तोत्र ( जैमिनीकृत ? ), गणपतिसहस्रनाम, गणपतिसूक्त, गणपतिस्तवराज, गणेशमाहात्म्य इत्यादि अनेक गणपतिपूजनाचे ग्रंथ आहेत

**गा ण प त्यु पा स ने चा उ द य**—गणपतिदेवतेचें वेदपूर्व प्राचीनत्व आहे तरी गाणपत्य पंथाचा उदय केव्हा झाला हें पाहूं गेल्यास तो जास्त अर्वाचीन काळीं झाला असावा असें दिसून येतें या पंथाचा उदय होण्यापूर्वींहि 'गणेश'

देवतेला येथेच प्राधान्य होतें यांत शंका नाहीं तथापि गाणपत्यपंथाचा उगम पाचव्या शतकानंतर ते नवव्या शतकाच्या पूर्वी केव्हांतरी झाला असला पाहिजे असें डॉ. भांडारकर याचें म्हणणें आहे. या काळात रचल्या गेलेल्या याज्ञवल्क्य स्मृतींत व भवभूतीच्या मालतीमाधवांत गणेशाची प्राधान्येंकरून स्तुति करण्यात आलेली आहे आठव्या अगर नवव्या शतकातील शिलालेखातहि या गाणपत्याचा व गणेश देवतेचा उल्लेख आढळतो गणपत्युपासनापर सर्व ग्रंथ याच काळात निर्माण झाले असें म्हणावयास हरकत नाहीं

गा ण प त्या सी ल पो ट भे द.—आनंदतीर्थांनीं लिहिलेल्या शंकरदिग्विजयामध्यें या गाणपत्यासंबंधींचा व त्याच्या तत्वाचा उल्लेख आला आहे. हा ग्रंथ दहाव्या शतकामध्यें लिहिला गेला असावा. या ग्रंथामध्यें गाणपत्याचे सहा पोटभेद होते असें सांगितलें आहे. हे पोटभेद म्हणजे महागणपतिपंथ, हरिद्रागणपतिपंथ, उच्छिष्टगणपतिपंथ, नवनीतगणपतिपंथ, स्वर्णगणपतिपंथ व सनातनगणपतिपंथ हे होत. या पंथापैकीं उच्छिष्टगणपतिपंथ थोडासा चमत्कारिक आहे. या पंथाचे अनुयायी गणपतीची डाव्या हातानें पूजा करितात. हे लोक गणपतीला हेरंब हें नाव देतात. या पंथात जातिभेद पाळण्यात येत नाहीं व विवाहविषयक निर्बंधाना या पंथान थारा नाहीं. वाटेल त्या स्त्रीशीं संभोगादि व्यवहार करण्याची याच्यात चाल दिसते. चंद्राकृति तांबडें गंध लावणें ही गाणपत्याची मुख्य खूण होय.

गणपत्युपासनेचें माहात्म्य विशेषतः दक्षिणहिंदुस्थानात आढळून येतें. द्रविड लोकाचा हा मूळचा देव असावा असें दिसतें. या देवाचें वहान उंदीर आहे व द्रविड लोकाची ओरौन म्हणून जी एक जात आहे त्या जातीचें उंदीर हें प्रमुख दैवत आहे. त्रावणकोर संस्थानांत होमपुर उर्फ गणपतीचीं देवळें पुष्कळ ठिकाणीं असून त्या ठिकाणीं गणपतीच्या निमित्त दररोज होम केला जातो काहीं ठिकाणीं क्वचित प्रसगीं महागणपतिहोम नावाचा बऱ्याच खर्चाचा होमहि करण्यात येतो. पुण्याजवळ चिंचवड येथें गणपतीची स्वयंभू मूर्ति असून तिच्यानिमित्त मार्गशीर्ष वद्य प्रतिपदेपासून षष्ठीपर्यंत मोठा उत्सव करण्यात येतो. येथील मोरया गोसावी नावाच्या साधूनें गणपतीला प्रसन्न करून घेतलें व गणपतीनें 'मी तुझ्या शरीरांत व तुझ्यामागून होणाऱ्या सहा पुरुषात अशरूपानें वास करीन' असा त्याला वर दिला व त्याप्रमाणें मोरया व त्याचे सहा वंशज याच्यामध्यें गणपति वास करितो अशी समजूत असून या सातजणांच्या समाधींची गणपति या नात्यानें दररोज पूजा करण्यात येते. या गणपतिसंस्थानाला निरनिराळ्या भाविक भक्तांनीं देणग्या दिल्या असून खुद्द औरंगझेब बादशहानें देखील आठ खेडीं इनाम दिलीं आहेत. [ याशिवाय 'अष्टविनायक' पहा. ].

गात्रसंकोचन-( गात्रक्षय, इं. ॲट्रोफी ). हा शरीररोगविज्ञानशास्त्रातील पारिभाषिक शब्द असून त्याचा अर्थ शरीरातील एका किंवा अनेक भागांच्या पोषणक्रियेमध्यें बिघाड उत्पन्न होऊन तो भाग शुष्क व क्षीण होणें, असा आहे शरीरांतील भागाची झीज प्रतिक्षणीं होते ती भरूनहि पण तितक्याच जलदीनें यावी अशी नेहमीं योजना असते त्यामुळें झिजलेल्या भागाचें पोषण व वाढ होऊन झीज एरवीं दिसून येत नाहीं,म्हणून प्राण्याच्या जीविताचें रक्षण होतें व जगणें शक्य होतें म्हणजे नेहमीं पोषण व झीज यामध्यें आपोआप असा समतोलपणा रहातो की, त्यामुळें रोगोत्पत्ति होत नाहीं पण कधीं असें घडतें कीं, विवक्षित भागाची जितकी झीज होते त्याच्या मानानें त्यास फारच अथवा फाजील पोषक द्रव्य व रक्तपुरवठा होतो व त्यामुळें तो भाग एकदम पोसलेला व दृढ होतो, यासच पोषणवृद्धि अशी संज्ञा आपण देऊं याचीं उदाहरणें: प्रसूति कालानंतर मूल पाजणें आवश्यक होतें तेव्हा स्तनाची एकदम वृद्धि (वाढ) होते, अथवा गरोदरपणामध्यें गर्भधारणेसाठीं गर्भाशय नऊ महिन्यात नेहमीच्या १५–२० पट वाढणें इत्यादि होत. याच्या उलट प्रकार म्हणजे पोषण कमी झालें अथवा केलें असता त्याचा परिणाम तो भाग झिजणें व शुष्क होणें हा होय किंवा पोषणद्रव्यें यथास्थित मिळत असून तीं पचविण्याची शक्ति जर कमी झाली तरीहि तोच परिणाम होतो काहीं विकृतींमध्यें ( उदाहरणार्थ —वार्धक्य ) सर्व शरीरास झीज येऊन तें सर्व क्षीण होऊं लागतें तेव्हा फक्त हृदय मात्र झिजत नाहीं ही झिजेची क्रिया कधीं कधीं शरीराच्या एखाद्या भागापुरती अथवा इंद्रियापुरतीच असलेली दिसून येते असें घडण्याचीं कारणें अनेक आहेत. (१)एखाद्या शरीराच्या भागाचा उपयोग करणेंच सोडून दिलें, अथवा त्या भागाकडून होणारी क्रिया पुढें चालू राहिली नाहीं तर तो भाग लहान दिसण्यास आरंभ होतो. अर्धांगाचा झटका येऊन लुलेपणामुळें अगर संधिवात होऊन, हाताची अगर पायाची हालचाल नेहमीप्रमाणें होणें व त्याच्याकडून व्यायाम होऊन त्यास अधिक मिळणाऱ्या रक्तानें त्याचें पोषण व वृद्धि होणें हें कमी झाल्याबरोबर हे अवयवहि लहान दिसूं लागतात (२) बुद्धिहीनत्वामुळें अर्धवट माणसाचे मेंदूहि लहान असलेले आढळतात, व तसेंच अंध माणसामध्यें चीक्षुर्मज्जाहि वाळून जाते. कारण तिचा उपयोग केला जात नाहीं (३) बालक गर्भाशयात असेपावेतों त्यास यायमसपिंड आणि काहीं विशिष्ट धमन्या आणि शिरा मातेपासून रक्ताभिसरणाच्या योगानें पोषण मिळविण्यासाठीं जरूर असतात पण पुढें तें मूल उपजल्यावर त्या रक्तवहिन्या व पिंड याची जरूर रहात नाहीं म्हणून ते शुष्क होऊन नाहीसे होतात (४) बाळंतपणानतर गर्भाशय जें अतिशयच मोठें झालेलें असतें, त त्याची फाजील पोषणक्रिया व वृद्धि आपोआप बंद पडून पुन्हा बहुतेक पूर्ववत

पहिल्या आकाराचें होतें. (५) स्त्रियांत उतारवयात मुलें होईनाशीं झालीं म्हणजे त्यांच्या ओटीपोटातील अंडसदृश पिंड शुष्क होतात व त्यांची गर्भधारणशक्ति नाहींशी होते. (६) एखाद्या भागाला रक्ताचा पुरवठा करणारी धमनी बांधून टाकिली तर पुढील भाग शुष्क होतो. (७) यकृत आणि मूत्रपिंड यांचे जे जुनाट रोग असतात त्यामध्यें या इंद्रियांत विकृत-द्रव्य साचत जातें व त्यामुळें त्या इंद्रियाच्या पोषणास अडथळा येऊन तीं बारीक होतात. (८) एखाद्या शरीरांतील इंद्रियावर चोहोंकडून, शेजारी रोगाच आवाळूं ( अर्बुदग्रंथि ) उत्पन्न होऊन दाब पडल्यास तें इंद्रिय त्या दाबानेंहि लहान होतें. याचें दुसरें उदाहरण म्हणजे चिनी श्रीमंत बायका शोभेसाठीं आपले पाय लोखंडी पट्यानीं बांधून ठेवून मुद्दाम बारीक करतात हें होय. ह्या गात्रसंकोचनाची क्रिया सुरू झाली म्हणजे त्या विवक्षित भागातील पेशी नष्ट होऊन तो भाग लहान होतो. पण कधीं असेंहि घडतें की, जरी त्या भागातील पेशी नष्ट होऊन ही क्रिया सुरू झाली तरी त्याच्या बदली विकृतमलद्रव्य साचतें व त्यामुळें दिसण्यात तो भाग बारीक झालेला दिसत नाहीं उदाहरणार्थ हृदय म्हणजे रक्ताशयांत ही क्रिया सुरू झाली असता त्याचे मांसपेशी कमी कमी होत जातात व त्याच्या ऐवजीं निरुपयोगी अशी मेदवृद्धि हृदयाच्या मांसल भागातून होते यामुळें हें विकृत हृदय झिजलेलें व लहान न दिसता उलट थोडें मोठेंच दिसतें. बहुधा या क्रियेची प्रगति अगदीं सावकाशपणें होते. (१०) पण गरोदर स्त्रियांना विशेषतः होणारा यकृताचा एक चमत्कारिक रोग आहे. त्यांत थोड्या दिवसांत यकृत अर्ध्या किंवा तृतीयांश आकाराचें होऊन रोगी मृत्यु पावतो. (११) वर्धमानस्नायुक्षय नावाचा रोग पृष्ठवंशरज्जूपासून पुढील बाजूकडे जाणारे मज्जातंतू विकृत होऊन हळू हळू होतो व त्यामुळें काहीं विवक्षित मांसपेशी अगर त्यांचे समूह झिजून बारीक दिसतात व नंतर लुले पडतात. आरंभ बहुधा उजव्या हातास पंजामध्यें होतो व हाताची शक्ति कमी होत चालली आहे असें रोग्यास समजूं लागतें नंतर आगट्याच्या मुळाशीं जो मांसल भाग आहे तोहि शक्तिहीन व बारीक होतो नंतर बाहु व पाय यांचेहि स्नायू क्रमाक्रमानें बारीक व कमकुवत होत जातात कधीं कधीं या रोगाची प्रगति येथपर्यंत मजल गाठून थांबते. पण बहुधा शरीरांतील इतर बऱ्याच स्नायुसमूहावर असाच विकृत परिणाम उत्तरोत्तर होत जाऊन शेवटीं रोग्यास मरण येतें (१२) त्वचा हें एक इंद्रियच आहे व म्हातारपणामुळें यामध्येंहि शुष्कता येऊन त्वचा रुक्ष व खरखरीत दिसून सुरकुत्या पडतात कधीं कधीं पहिला वर्ण थोड्या फार प्रमाणात बदलून जागजागीं काळ्या अगर पिंगट रंगाचे चट्टेहि दिसतात. त्वचेचे पोषक मज्जातंतु बिघडून त्वचेस तकतुकी व सूजहि दिसून येते व त्वचेंत आग अगर मुंग्या आल्याप्रमाणें भास होतो. अगर महारोगांत स्पर्शज्ञान कमी होऊन बोटाचीं अग्रेंहि कुजून गळून पडतात.

**गात्रोपघात**—याचा प्रचारांतील अर्थ हलवण्याची इच्छा असताना हातपाय वगैरे अवयवाची चलनशक्ति नष्ट होणें, असा आहे. परंतु वैद्यकीय दृष्टीनें पहाता, स्पर्शज्ञान, रुधिराभिसरण, इत्यादि शक्ती नष्ट होणें या लक्षणाचा गात्रोपघातातच समावेश केला पाहिजे. यास स्वतंत्र रोग न समजता स्नायू किंवा मज्जास्थानाच्या ठिकाणीं विविक्षित व्याधी अगर इजा होऊन अगर धक्यामुळें तात्कालिक त्यांची क्रिया बंद होऊन ( उदाह० उन्माद रोगांत ) हें लक्षण रोग्यास होतें असें समजावें हा रोग कधीं एक दोन स्नायूपुरता असतो व कधीं अर्धांगमहि होतो व कधीं छाती अगर कमरेखालील सर्वांगास होतो तो का व कसा होतो हें समजण्यास मज्जातंतू, मेंदू व पृष्ठवंशरज्जूपासून निघून कोणत्या मार्गानें स्नायूंत शिरतात व कोणत्या मार्गानें स्पर्शसंवेदना—शीतोष्णादि भावनांचें मेंदूस ज्ञान होतें या इंद्रियविज्ञानशास्त्रांतील भागाचें मनन लक्षपूर्वक केलें असता समजेल, तें येथें देणें शक्य नाहीं परंतु पुढील रोगलक्षणें संभवतात तीं अशीं:—

( १ ) मेंदूच्या वरील भागास रोग अगर इजा झाली तर इच्छाशक्तिपूर्वक स्नायूंची चलनशक्ति नष्ट होते ( २ ) मेंदूचा खालील भाग वरीलप्रमाणें विकृत झाल्यास चलनशक्ति नष्ट होऊन शिवाय स्नायू क्षीण होऊन बारीक होऊ लागतात. या रोगाचे अनेक भेद आहेत. मेंदूत विकृतीमुळें होणाऱ्या रोगापैकीं अर्धांगवाताचें वर्णन पूर्वी दिलेंच आहे ( अर्धांगवायु पहा ) बाकीच्या मुख्य प्रकाराचें त्रोटक वर्णन पुढें दिलें आहे.

पृष्ठवंशांतील मज्जास्थानें बिघडून होणारे रोग ( पंगुवायु ) कारणें.— पृष्ठवंशरज्जूंतील चलन अगर स्पर्श, वेदनादि संदेशवाहकमार्ग रोगामुळें अगर दुखापतीमुळें त्या पृष्ठवंशरज्जूंतील भागांत दाह सुरू होऊन त्याच्या खालील भागांत ह्मणजे छाती अगर कमरेखालील दोन्ही बाजूंचें सर्वांग लुलें पडतें, चलनशक्ति व त्यांतील स्पर्श, वेदना शीतोष्णादि ज्ञान रोग्यास नसतें इच्छाशक्ति नसल्यामुळें न कळत लघवीस व शौचास होतें स्नायुपोषण अनैच्छिक रीतीनें आपोआप होणें बंद झाल्यामुळें अंथरुणात पडून राहिल्यामुळें शय्याक्षतें होण्याची प्रवृत्ति असते. तथापि पृष्ठवंशरज्जूंचा थोडा भाग बिघडला असल्यास स्नायू फारसे क्षीण होत नाहींत या प्रकारचा पंगुवायु, मग तो रोगामुळें होवो अगर अपघातामुळें पाठीचा कणा दुखावून होवो—बरा होण्याचा संभव असतो त्यासाठीं रोग्यास उताणें निजवून दररोज त्याचे हातपाय चोळून परिचारकाकडून त्याच्या चलनक्रिया बळेंच करीत जाव्या स्वच्छता राखून शय्याक्षतें होऊ देऊ नयेत मूत्र कोंडून नंतर नकळत वाहूं लागण्याचे अगोदर दिवसांतून दोनतीन वेळा मूत्रशलाकेनें लघवी काढीत जावी म्हणजे दृष्ट हेतु साध्य होईल

**बालपंगुत्व रोग.**—लहान मुलांमध्यें वरील रोगाप्रमाणें रोग आपोआप झालेला पहाण्यांत येतो. कांहीं देशांत नर सांथीप्रमाणें पुष्कळ मुलांना एके काळीं हा रोग होतो, व तेथें सांथ नसली तर हा रोग नेहमीं वारंवार आढळतो व यावरून एखाद्या विवक्षित रोगजंतूमुळें हा संसर्गकारीरूपानें रोग होत असावा. या रोगांत पृष्ठवंशरज्जूंतील गाभ्याच्या मध्यभागीं शिंगाच्या आकाराचीं धूसरवर्ण मज्जास्थानें असतात तीं विकृत होऊन अंग लुळें पडतें. हा रोग क्वचित् मोठ्या माणसातहि होतो. मुलाची एकाएकी प्रकृति बिघडते. परंतु कदाचित् त्याचा एखाद्दुसरा हात अगर पाय अंमळ लुळा, अशक्त झाला आहे इकडे कोणाचें लक्ष न जाईल इतकी थोडी विकृति प्रथम होते. नंतर एकदम ज्वर, ओकारी, आचके येणें आणि मुलास बोलता येईल इतकें वय असल्यास हातपाय बधिर होऊन मुंग्या येत असल्याचें त्यास कळतें. व ज्या अवयवास असें होतें तो पुढें लुळा पडतो. नेहमींप्रमाणें एकापेक्षां अधिक अवयवहि लुळे पडतात. परंतु त्यांत विशेष हा असतो कीं, त्याची चलनशक्ति नष्ट झाली तरी स्पर्श, वेदना, शीतोष्णज्ञान शाबूत असतें. कांहीं विवक्षित स्नायूंचा समूह अगर एकाच बाजूचा हात व पाय अशा रीतीनें लुळा पडला तरी त्यांत अर्धांगवाताप्रमाणें अगदीं बरोबर निम्में अंग निखालस निर्जीव झाल्याप्रमाणें स्थिति होत नाहीं. हे विकृत स्नायू तीव्र रोग असल्यास भराभर क्षीण होतात व त्यांना विजेची पेटी लाऊन संवेदना होत नाहीं. सौम्य रोग असल्यास फक्त एखादा स्नायूंचा समूह—हाताचा किंवा पायाचा—लुळा पडून ते स्नायु बारीक व क्षीण होतात; पण नष्ट झालेली चलनशक्ति परत येण्याची बरीच आशा असते. त्याबरोबरच रक्ताभिसरणक्रिया मंदगतीनें चालल्यामुळें तो लुळा भाग काळवंडलेला, तेजोहीन व थंडगार होतो. आंतील हाडाचें व मांसाचें पोषण न झाल्यामुळें त्याची वाढ खुंटून दुसऱ्या बाजूच्या हात अगर पायापेक्षां तो आखुड होतो. यामुळें व स्नायूंचा हाडावरील दाब कमी होऊन हाडें वाकडीं होऊन त्यांना निरनिराळ्या प्रकारचें व्यंगत्व येतें. या रोगांत नकळत लघवीस अगर शौचास होत नाहीं. किंवा शय्याक्षतेंहि पडत नाहींत व बहुधा रोगी दगावत नाहीं. रोगास प्रारंभ झाल्या दिवसापासून एक महिन्यानें क्षीण झालेले स्नायू चोळण्यास सुरवात करावी. म्हणजे त्यांतील रुधिराभिसरणक्रिया वाढून व्यंगत्व कमी होईल त्याचा उपयोग न झाल्यास शस्त्रवैद्यास दाखवून व्यंगत्व हरण करावें.

**वर्धमान क्षीणस्नायुस्तंभ.**—या रोगास २५ ते ४५ वर्षांच्या सुमारास आरंभ होऊन प्रथम हाताचे तळवे, करांगुली व अंगठ्याखालीं जे मांसल उंचवटे आहेत ते, झिजून क्षीण होण्यास सुरवात होते. हा रोग पुरुषांत विशेष आढळतो याचें कारण वरील रोगाप्रमाणेंच आहे. परंतु हा रोग अतिसावकाशपणें येतो व बरा होत नाहीं. क्रमाक्रमानें खांदे व हात यांचें मांस कृश होऊन ते अवयव बारीक होतात. नंतर बाहु, खांदा, छाती यांची गति सावकाशपणें होते हे स्नायू क्षणमात्र एकदम थरथरतात हा एक यांत विशेष आहे लघवी व मलशुद्धीच्या क्रिया बिघडत नाहींत. कफ, फुप्फुसदाह होऊन श्वसनशक्तीचा ऱ्हास झाल्यामुळें मृत्यू येतो कित्येकांना पुढील प्रकारचा जिव्हौष्ठस्तंभरोग होऊन मरण येतें.

**जिव्हौष्ठस्तंभ.**—पुढील क्रिया करणाऱ्या स्नायूंना संदेशवाहक मेंदूतील मज्जातंतू बिघडून बोलणें, गिळणें, आवाज उत्पन्न करणें व चर्वणक्रिया, या क्रिया एकदम दुबळ्या होतात किंवा अगदीं बंदहि पडतात. चाळीस ते साठ उमरीच्या माणसामध्यें असा रोग हळूहळू आलेला दृष्टीस पडतो. प्रथम तालव्य व्यंजनाचा उच्चार करतांना जरा बोबडेपणा वाटतो. नंतर पवर्गांतील ओष्ठस्थान असलेलीं अक्षरें उच्चारतांना बोबडेपणा दिसतो. नंतर तालुस्थानाचा मागील भाग लुळा पडल्यामुळें बोलणें गेंगाणें—नाकांतील स्वरांत येतें; यानंतर जीभ लटकी पडत गेल्यामुळें तिच्या योगानें घास घशांत लोटतां न येऊन अन्न गिळतां येत नाहीं. व मग तें अन्न गालफडांत साचून बसतें. तसेंच तो घास घशांतील गिळणाऱ्या स्नायूंनीं चटकन् पकडून गिळण्याची क्रिया आपोआप सुरू व्हावी, परंतु त्यामध्येंहि जडत्व आल्यामुळें तसें कांहींएक न होतां उलट तें अन्न नाकपुड्यांवाटे—अन्न पातळ असल्यास—परत येतें. यापुढें कंठांतील स्नायूंना जडत्व येऊन भाषण अगदींच अस्पष्ट येऊं लागून अन्न गिळण्याची फार पंचाईत पडूं लागते. कंठांतील स्नायूंचें स्पर्शज्ञान कमी होऊन अन्न अगर पाण्याचे थेंब श्वासनलिकेंत जाऊन खोकल्यांना ठसका सुरू होतो यानंतर चर्वणक्रियेच्या स्नायूंना स्तंभ होऊन ते लुळे पडतात व मागाहून श्वसनक्रियेचे स्नायू लुळे पडून रोगी मधून मधून गुदमरतो रोग्यास शुद्धि अगदीं चांगली असते स्नायू लुळे पडून तोंड बावळें दिसतें व मनोविकार विशेष नाजूक स्थितींत असल्यामुळें रोग्यास रडें अगर हसूं चटकन येतें. व त्यावरून रोग्यास चळ लागल्याचा संशय येतो; पण वस्तुतः तसें कांहीं नसतें चेहऱ्याचा खालील भाग विकृत होतो; पण वरील भाग नीट असतो. या रोगांत अन्नकण श्वसनमार्गांत शिरल्यामुळें फुप्फुसदाह होऊन मेंदूंतील महत्वाचीं स्थानें बिघडल्यामुळें थोड्या दिवसांत रोगी दगावतो. तथापि प्लेगच्या तापांत कांहीं रोग्यांना अशा प्रकारचा स्तंभ होऊन फक्त बोबडेपणाचें व्यंग राहून ते रोगी बरीच वर्षे जगल्याचीं उदाहरणें दृष्टीस पडतात.

हातपायास हलविणारे मज्जातंतू बिघडून होणारा गात्रोपघात मज्जातंतुदाह होऊन एखादा स्नायु, स्नायूंचा समूह, किंवा सबंध हात अगर पाय अगर अवयव लुळा पडणें संभवनीय असतें याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे अर्दित

बाहूमध्यें चेहऱ्याचे स्नायू हलविणाऱ्यास मज्जातंतूवर दाब पडून दाह उत्पन्न होऊन एका बाजूचा चेहरा वाकडा होतो हें होय. वातप्रकृतीच्या माणसास गारठा बाधून अगर वारा फार लागल्यामुळें असें होतें. तसेंच कुबडीचा साहाय्यानें चालणाऱ्या माणसामध्यें कुबडीचा दाब मज्जातंतूवर पडल्यामुळें हात लुला पडतो हें दुसरें उदाहरण. पोटात नकळत शिसें जाऊन तेलाचें रंग देणाऱ्या लोकांना विषबाधा होते; कारण या रंगात शिशाचे क्षार असतात व त्यापासून मनगट लुले पडतें. वातप्रकृतीच्या माणसास ओल्या जागेवर बसून अगर गारव्यानें मांडीतील मज्जाततूंचा दाह होऊन ऊरुस्तंभ नावाचा वायु होतो.

हस्तपाद मज्जातंतु दाह—रक्तदोषामुळें अगर शिसें, सोमल, अति मद्यपान, मधुमेह, घटसर्प, बेरीबेरी इत्यादि रोगाचें विष रक्तात भिनून त्यामुळें या प्रकारचा जो दाह होतो त्याचीं सामान्य लक्षणें पुढें दिलीं आहेत.—अगोदर शरीरात काहीं व्याधि असून त्यात दीर्घकालीन बेहुमार दारूच्या व्यसनाची भर पडून रक्त दुषित होतें रोग फार तीव्र अवस्थास रोग्याच्या छाती अगर कमरेखालील दोन्ही कडचा भाग लुला पडतो. परंतु पृष्ठवंशरज्जुदाहामुळें पंगुवायु होऊन शौचमूत्राच्या क्रियेवर रोग्याचा दाब रहात नाहीं. तसें लक्षण या रोगात रोग्यास भ्रम झाला तरच होतें; एरवीं होत नाहीं. दुसरा फरक हा कीं त्या रोगात त्या स्नायूंचें स्पर्शज्ञान नष्ट होतें. पण या रोगात स्नायू दाबले तर ते फार दुखतात, व ते स्नायू क्षीण होऊन बारीक होतात. काहीं रोग्यामध्यें पायमोजे घातले असता पायाचा जेवढा भाग आच्छादला जातो तेवढ्या भागातील स्पर्शज्ञान व वेदनासंवेदनज्ञान नष्ट होतें रोग अधिक तीव्र झाल्यास याच प्रकारचा लुलेपणा हातानाहि येतो, व हृदयहि दुर्बल होतें. व शरीरातील इतर स्नायूहि केव्हा लुले पडतील याचा नेम नसतो. मानसिक स्थितीहि फारच बिघडून रोग्यास चित्तभ्रम व भुरळ पडते. त्यास काळवेळ हें काहींच कळेनासें होऊन ओळखीच्या माणसास भलतेंच माणूस समजण्याचा भ्रम होतो. विशेष चमत्कार हा कीं, रोग्यास अगदीं लहानपणच्या गोष्टी आठवतात परंतु नुकत्या घडलेल्या गोष्टींचें विस्मरण पडतें.

मिथ्यास्नायुपुष्टिस्तंभः— जन्मत. काहीं आनुवंशिक संस्कारामुळें मज्जास्थानात काहींहि विकृति न होता एकाच कुटुंबातील माणसें वयाच्या ठराविक वेळीं या रोगामुळें स्नायुदुर्बलतेमुळें लुलीं होतात. कित्येक कुटुंबात पुरुषाना मात्र हा रोग होतो. कधीं मुलाना व मुलींना हा रोग होतो. तरी पण एकंदरींत स्त्रियापेक्षा पुरुषांना होणें अधिक संभवनीय असतें, व स्त्रिया फक्त हा आनुवंशिक रोग पुढील पिढीस सादर करतात. रोग्याचें वय स्नायुसमूह व स्नायुपुष्टि अगर क्षीणता याच्या मानानें या रोगाचे अनेक पोटभेद केले आहत. या रोगात ध्यानात ठेवण्यासारखी मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे जरी स्नायू पुष्ट दिसले तरी वस्तुतः त्यातील संकोचन पावणारे तंतु क्षीण व कमी झालेले असतात, व वसा व इतर निरर्थक तंतुवृद्धि होऊन अवयव विनाकारण पुष्ट दिसतो, व त्यावरून ह्या रोगाचें नाव सार्थ आहे असें म्हणावें लागतें. वयपरत्वें (१) बालस्नायुस्तंभ व (२) युवास्नायुस्तंभ असे याचे दोन भेद पाडतात.

मुलामध्यें बाह्यतः स्नायू क्षीण किंवा अतिपुष्ट असे दोन्हीं भिन्न प्रकार भिन्न रोगात नजरेस पडतात. अगोदर स्नायू क्षीण होऊन पुढें मुलास अशक्तपणा आला म्हणजे कार्यकारणसंबंध लक्षात येतो. परंतु मूल जन्मतः ढुंगण, मांड्या, पोटऱ्या, दड वगैरे भीमसेनाप्रमाणें पुष्ट असून त्याचा नि.शक्तपणा आईबापाच्या लक्षात आल्यानें त्यास फार आश्चर्य वाटतें. मूल उभें राहूं लागलें म्हणजे सावधगिरीनें पाय बरेच फाकदून उभें रहातें चालताना फेंगडत व फरफरडत चालतें, वारंवार आपटतें, एखादा पडलें म्हणजे पुनः उठण्यास त्यास अडचण पडते व हात भुईवर टेंकून जपून पुनः उभें रहातें .उभें रहाताना गुडघा, कंबर वगैरे ठिकाणीं हात ठेवून तोल संभाळून सावधगिरीनें उभें रहातें. हा रोग असाध्यच आहे व असलीं मुलें मध्यम वयापर्यंत सुद्धा वाचत नाहींत.

कंपवायु.—हा रोग मनुष्यास उतारवयच्या सुमारास होऊन त्यात मुख्य लक्षणें म्हणजे स्नायूंचा अशक्तपणा, कंप ताठरपणा, उभें रहाण्याची व चालण्याची विशिष्ट तऱ्हेची ढब ही होत. प्रथम अशक्तपणा येऊन एका हातासच कंप सुटतो. कातगोळ्या वळताना जसें मनुष्य आगठा व तर्जनी हालवितो किंवा पखवाज हळूहळू एकसारखा वाजविताना जशी बोटें हलतात तशाच प्रकारचा कंप एका हातास सुरू झाल्यानंतर काहीं दिवसानीं दुसऱ्या हातास,व नंतर पायाच्या घोट्याच्या ठिकाणीं कंप सुरू होतो. काहीं रोग्याचें मस्तक कंपामुळें सदा हलत रहातें. हा कंप दर सेकंदास सुमारें पाच झटके या वेगानें येतो हा कंप झोपेंत अगदीं थांबतो. चालण्याची व उभें रहाण्याची ढबहि चमत्कारिक असते. रोगी मान खालीं घालून जवळ जवळ अंतरावर पावलें टाकीत प्रथम सावकाश व नंतर झपझप वेगानें व अंमल चढल्याप्रमाणें तुरतुर चालतो. चेहरा जसें एखादें चित्र अगर पुतळा शून्यदृष्टि असतो तद्वत् दिसतो; परंतु त्या रोग्याची बुद्धि शाबूत असते. रोगी पुष्कळ वर्षे जगतो पण त्यावर उपाय फारसे चालत नाहींत म्हटलें तरी चालेल. फक्त हातपाय आखडूं नयेत म्हणून दररोज दुसऱ्याकडून त्याचें चलन करवून व चोळून घेऊन बरें वाटतें. वरील कित्येकप्रकारचें स्तंभरोग एकत्र दिलें आहेत. त्याची चिकित्सा काहीं ठरीव सामान्य धोरणावर करावयाची असते. त्याची माहिती पुढें दिली आहे.

(१) रोग्यास बिछान्यात निजवून ठेवावें, व मलमूत्रादींच विसर्जन नियमितपणें होत जाईल अशी तजवीज राखावी.

त्याचप्रमाणें रोग्याची हृदयक्रिया, श्वसनक्रिया व पुरेसें अन्न यांत बिघाड न होईल अशी व्यवस्था ठेवावी औषध व उत्तेजक पदार्थ द्यावेत किंवा नाहीं यांचें ज्ञान डॉक्टरास नाडीवरून होतें. पडून राहिल्यानें फुफ्फुसदाह होण्याचें भय असतें. याचें एक मुख्य कारण रोग्याच्या घशाच्या ठिकाणीं बधिरता उत्पन्न झाल्यामुळें त्यास अन्नपाणी घालतेवेळीं दोहोंचे कण श्वसनमार्गानें श्वासनलिकांत लोटले जातात व त्या बधिरत्वामुळें ते आगंतुक कण ठसका येऊन बाहेर खोकून पडावे तसें काहीं एक न होता फुफ्फुसदाह उत्पन्न करितात. या दुखण्याच्या आरंभीं जर नाडी भरलेली व सशक्त असेल तर एकदां जुलाबाचें औषध देऊन कोठा साफ करावा. नाडी अशक्त असली तरी नियमितपणें मळशुद्धि होणें जरूर आहे. लघवी कोंडेल अशी वेळ येऊं देऊं नये त्यासाठीं मूत्रनलिकेचा उपयोग जरूर तर अगोदरच करणें चांगलें पण ती शलाका जंतुरहित राहील अशी काळजी घेणें जरूर आहे नाहीं तर मूत्राशयांत जंतूंचा प्रवेश होऊन मूत्राशयदाहरोग उत्पन्न होतो. रोग्याची पाठ दररोज तपासून त्यास तेथें अगर अन्य ठिकाणीं दाब पडून शय्याक्षतें न पडतील अशी खबरदारी घ्यावी. तीं होण्याची खूण म्हणजे त्या भागावरील त्वचा स्वच्छतेच्या अभावामुळें कुजूं लागते म्हणून दाब पडत असलेल्या जागीं आरंभापासून कोलनवाटर किंवा स्पिरीट रोज चोळून तींत काठिण्य आणावें त्वचा कुजण्याचें पूर्वचिन्ह पाठ किंवा कुला या जागीं त्वचेवर लाल डाग दिसूं लागतो. असें झालें म्हणजे झिंकऑक्साइडची पूड अगर मलम त्या जागीं लावून त्या जागीं भार न येईल अशा नवीन स्थितींत रोग्यास निजवावा. किंवा आंगठीप्रमाणें वर्तुळाकार अशा गिरद्या त्या जागीं रोग्याखालीं ठेवाव्यात. रोग्यास कधीं शेकावें लागतें व रोग्याचें स्पर्शज्ञान कमी अगर नष्ट झाल्यामुळें शेकतांना फोड उठेपर्यंत शेकलें तरी त्यास कळत नाहीं व अशा तऱ्हेनेंहि शय्याक्षतें पडतात. यासाठीं शेकण्याकरतां ज्या बाटल्याचा उपयोग करावयाचा त्यावर नेहमीं गरम कपडा गुंडाळून मग शेकीत जावें. असे फोड शेकतांना उठले तर ते बरे होण्यास जड जातात. छातीखालील दोन्ही बाजूंचें सर्वांग लुलें पडल्यास दोन्ही पायांत हातानीं विणलेले जाड लोंकरीचे मोजे घालावेत. नंतर दोन्ही पायांवर त्याच्या लांबीच्या आकाराची चौकट ठेवून चौकटीवरून पांघरुणें घालावीत. म्हणजे पांघरुणाचा सदा भार पायांवर पडून पाऊल लुलें पडतें तें पडणार नाहीं. रोगाची प्रथमावस्था संपतांच लगेच परिचारकाकडून हातापायांच्या चलनक्रिया बळें करविण्याच्या उद्योगास लागावें व त्याचवेळीं ते अवयव चोळविण्याचा परिपाठ ठेवावा. काहीं रोग्यांना विजेची पेटी लावून फायदा होतो पण पेटीपासून वेदना होतात व त्यांचा वारंवार उपयोग चोळणें व कृत्रिम चलन यांपेक्षां अधिक होतो किंवा नाहीं याचा वानवा आहे. म्हणून निदान मुलांचे बाबतींत हा उपचार मुळींच करूं नये. हात अगर पाय परिचारक हलवीत असतां ती क्रिया आपण होऊन मुद्दाम करीत आहों अशा भावनेनें रोग्यानें त्यांत मन व लक्ष घालून होतेनें या क्रिया कराव्यात व करून घ्याव्या. म्हणजे तुटलेले मज्जामार्ग दुरुस्त होऊन अगर नवीन मार्ग निर्माण होऊन मेंदू व स्नायू यांचा पूर्ववत् संबंध जडून चलनादि व्यापारांचे संदेश स्नायूंना पोंचल्यानें रोगी हिंडूं फिरूं लागतो.

**गॉथ लोक**—गॉथ हे टयूटन वंशाचे लोक होत. खिस्ती शतकाच्या पहिल्या शतकामध्यें व्हिश्चुला नदीच्या तीरावरील प्रदेशाच्या मध्यभागांत त्यांची वस्ती होती. टयूटन वंशाच्या लोकांपैकीं, गॉथ हे अगदीं पूर्वेकडील प्रदेशांत रहाणारे लोक होते असें म्हणावयास हरकत नाहीं. बेरिग राजाच्या नेतृत्वाखालीं हे स्वीडनहून सरळ सरकत गॉथिस्कॅन्डिझा येथें आले असें जॉर्डेन्स यानें म्हटलें आहे. याचा सहावा राजा फिलिमर याच्या कारकीर्दींत सिथियाच्या प्रदेशांत यानीं आपली वसति केली. यापूर्वी त्यांनीं उलमेरुगी व व्हॅंडाल या लोकांना जिंकून त्यावर आपला अंमल बसविला. परंतु दिलेल्या गॉथ लोकांच्या स्थानांतराची हकीकत ही प्रमाण मानतां येत नाहीं असें पुष्कळांचें मत आहे व अद्यापिहि विद्वानांत यासंबंधीं चर्चा सुरू आहे. तथापि एक गोष्ट खरी दिसते की खिस्ती शतकाच्या आरंभीं ते मारोबुडुस या मारकोमॅनिक राजाच्या सत्तेखालीं होते. तिसऱ्या शतकांत त्यांचा रोमन लोकांशीं संबंध आला. या काळांत त्यांनीं डान्यूब नदीपर्यंतच्या सर्व टापूवर आपला दरारा बसविला होता. रोमन लोकांवर देखील त्यांनी स्वाऱ्या करण्यास कमी केलें नाहीं. आस्ट्रोगॉथ व नीवा या राजांच्या कारकीर्दींत गॉथ लोकांनीं रोमन लोकांचा पुष्कळ ठिकाणीं पराजय केला होता असें जॉर्डेन्सनें म्हटलें आहे. रोमचा बादशहा गॅलस हा गॉथला खंडणी देत असे. डान्यूब नदीच्या कांठच्या प्रदेशावर आपली सत्ता प्रस्थापित केल्यानंतर, गॉथ लोकांनीं काळ्या समुद्राकडे आपला मोर्चा वळविला, व १५१२० वर्षांच्या अवधींत आशिया मायनर व ग्रीसच्या समुद्रकांठच्या प्रदेशाला त्यांनीं त्रास देण्यास सुरवात केली. कॉन्स्टटाईन दि ग्रेटच्या अमदानींत गॉथ लोकांनीं थ्रेस आणि मोशाशिया हे प्रांत लुटले पण कॉन्स्टंटाईननें त्यांचा पराभव करून इ. स. ३३६ मध्यें त्यांना तह करण्यास भाग पाडलें.

पण अशा रीतीनें गॉथ लोक दक्षिणेकडे व पूर्वेकडे नवीन मुलुखांवर स्वाऱ्या करून ते प्रांत आपल्या ताब्याखालीं घालीत होते तरी त्यांनीं व्हिश्चुला नदीच्या कांठचा प्रदेश सोडला होता असें दिसत नाहीं. कारण कान्स्टंटाईन राजाच्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं ऑस्ट्रोगॉथ यानें जेपीडेचा राजा फॉस्टिडा याजवर व गेबेरिक यानें व्हॅंडलांचा राजा विसिमर याजवर मोठे विजय मिळविले असें जॉर्डेन्स यानें म्हटलें आहे. गेबेरिकच्या मागून हर्मनरिक हा गॉथ लोकांचा प्रसिद्ध राजा होय. यानें

भागांतील, हरूली, ईस्टी, व्हेनेडी इत्यादि जाती जिंकल्या पश्चिमेस होलस्टीनपर्यंत याची सत्ता प्रस्थापित झाली होती. असें अँग्लो सॅक्सन लोकांच्या इतिहासावरून समजतें. इ. स. ३७० मध्यें हूण लोकांनीं याच्या मुलुखावर स्वारी केल्यामुळें यानें आत्महत्या करून घेतली असें म्हणतात आस्ट्रोगॅाथ या नांवानें प्रसिद्ध असलेल्या गॉथ लोकांच्या राज्याचा बराच भाग हूण लोकानीं आपल्या ताब्यात घेतला व्हिसीगॉथ लोकांना डान्यूब नदीच्या पलीकडे मोडाशिया प्रांतात वसाहत करण्याला परवानगी देण्यात आली गॉथ लोकांपैकीं पुष्कळ लोकांनीं खिस्ती धर्म स्वीकारला. पण रोमन सुभेदारानीं गॉथ लोकांवर जुलूम करण्यास सुरवात केल्यामुळें सन ३७८ मध्यें ॲड्रियानोपल येथें व्हॅलेन्सचा पराजय होऊन त्यातच त्याचा अंत झाला.

इ स ३७० च्या सुमारासच गॉथ लोकांचे पूर्वगॉथ व व पश्चिमगॉथ असे दोन भाग झाले पूर्वगॉथ लोक डान्यूबच्या उत्तरेकडील प्रदेशात रहात असून त्याच्यावर हूणांचें राज्य होतें पश्चिम गॉथ लोकानीं डान्यूब नदी ओलांडून रोमन प्रांतात वास्तव्य केलें होतें व रोमच्या इतिहासात आपलें नाव पुष्कळ वेळा गाजविलें.

प श्चि म गॉ थ —रोमनलोकानीं या पश्चिमगॉथ लोकांना फार त्रास देण्यास सुरवात केल्यामुळें, रोमन लोकांत व या पश्चिमगॉथ लोकांत वारंवार खटके उडूं लागले याचें पर्यवसान युद्धांत होऊन सन३७८मध्यें गॉथ लोकानीं ॲड्रियानोपल येथें रोमन सरदार व्हॅलेन्स याचा पूर्ण पराभव केला. पुढें व्हॅलेन्सनंतर थीओडोशिअस यानें याच्याशीं तह करून त्यांना शांत केलें व पुष्कळशा गॉथ लोकांना आपल्या पदरीं नोकऱ्या दिल्या.

पण सन ३९५ मध्यें थीओडोशियस वारल्यानंतर रोमन साम्राज्यांत व पश्चिमगॉथ लोकांत पुन्हा बेबनाव उत्पन्न झाला, तेव्हा या गॉथ लोकानीं रोमन साम्राज्याशीं असलेलें मांडलिकत्वाचें नातें झुगारून देऊन आपली स्वतंत्र सत्ता स्थापित केली व ॲलॅरिक यास आपला राजा निवडलें. ॲलॅरिक हा मोठा कर्तृत्ववान माणूस होता याच्या कारकीर्दीत पश्चिम गॉथ लोकानीं स्वातंत्र्य मिळविलें. रोमन लोकानीं ॲलॅरिक व त्याचे अनुयायी यांना पुष्कळ आमिषें दाखविलीं. बहुमानाच्या पदव्या व जागा देऊं केल्या व ॲलॅरिकनें प्रसंग विशेषीं त्या स्वीकारल्याहि तथापि त्यानें आपलें स्वातंत्र्य जाऊं दिलें नाहीं आपलें कायमचें राज्य कोणत्या तरी भागांत स्थापन करण्याची कल्पना ॲलॅरिक यास फार मागाहून सुचली. आफ्रिकाखंडात आपलें राज्य स्थापण्याची त्याची इच्छा होती असें दिसतें

३९५-९६ मध्यें ॲलॅरिकनें ग्रीसवर स्वाऱ्या करण्यास सुरवात केली. नंतर त्यानें ४०२-३त इटलीवर स्वाऱ्या केल्या व इटलीची दुर्दशा करून टाकिली. ॲलॅरिक हा ४१० त मरण पावला.

ॲलॅरिकच्या मरणानंतर आटाल्फस हा गादीवर आला, व त्यानें आपल्या पराक्रमानें पश्चिम यूरोपमध्यें गॉथ लोकांचें राज्य स्थापन केलें. आटाल्फस हा महत्त्वाकांक्षी असल्यानें त्यानें रोमनसाम्राज्य आपल्या घशाखालीं घालण्याचा बेत केला होता पण रोमन लोकांची संस्कृति उच्च दर्जाची असल्याचें त्याला आढळून आल्यामुळें त्यानें रोमनराज्य जिंकण्याचा बेत सोडून दिला व रोमन लोकांशीं मैत्री संपादन करून रोमन लोकांना रानटी लोकांच्या स्वारीचा जो त्रास होत असे त्यापासून त्याची मुक्तता केली या त्याच्या उपकाराबद्दल रोमन बादशहानीं त्याला स्पेन व गॉलमधील पुष्कळ प्रदेश दिला. पश्चिमगॉथ लोकांच्या थिओडॉरिक राजानें रोमन लोकांच्या वतीनें हूण लोकांशीं लढाई केली पण त्यांत तो स्वत: मरण पावला पुढें युरिकच्या कारकीर्दींत पश्चिमगॉथ लोकांची सत्ता स्पेनभर पसरली. याच सुमारास फ्रँक लोकानीं कॅथॉलिक धर्माची दीक्षा घेतल्यामुळें त्यानीं कॅथॉलिक धर्माचा प्रसार करण्याकरितां पश्चिमगॉथ लोकांवर स्वारी केली व त्यांचा पाडाव केला यामुळें पश्चिमगॉथ लोकांची सत्ता डळमळली व स्पेनमधून व गॉलमधून पश्चिमगॉथ लोकांच्या सत्तेचें उच्चाटण होतें कीं काय अशी भीति उत्पन्न झाली पण पुढें उल्लेख केलेल्या पूर्वगॉथ लोकांच्या थीओडॉरिक राजानें पश्चिमगॉथ लोकांचें स्पेनमधील अस्तित्व कायम राखिलें.

पू र्व गॉ थ लो क.—याच सुमारास पूर्वगॉथ लोकानीं रडगैससच्या आधिपत्याखालीं इटलीवर स्वारी केली होती. हे लोक जरी आपल्याला हूण लोकांचे मांडलिक म्हणवीत असले तरी वस्तुतः ते स्वतंत्रच होते. हूणसत्तेचें ज्यावेळीं उच्चाटण झालें त्यावेळीं हे लोक स्वतंत्र झाले पांचव्या शतकाच्या उत्तरार्धांत या पूर्वगॉथ लोकानीं आपली सत्ता वाढवण्याचा उद्योग आरंभला होता व अमाली घराण्यातील राजाच्या नेतृत्वाखालीं त्यानीं तत्कालीन राजकारणांत महत्त्वाचा भाग घेतला होता असें दिसतें. या घराण्यातील इतिहासप्रसिद्ध राजा थिओडॉरिक दि ग्रेट हा होय हा पहिल्या प्रतीचा मुत्सद्दी होता तो वरपांगी रोमन लोकांशीं सख्य दाखवीत असे व त्याचें साहाय्य घेत असे. ४८८ सालीं त्यानें झेनो बादशहाच्या आज्ञेवरून ओडोएसर राजापासून इटली जिंकून घेण्याकरितां स्वारी केली या स्वारींत पश्चिम गॉथ लोकानींहि त्याला मदत केली होती असें दिसतें. या लढाईत थीओडॉरिक हा विजयी झाला व त्याची सत्ता इटली, सिसली, डालमेशिया इत्यादि देशांवर पसरली पुढें पश्चिमगॉथ लोकांची सत्ता संपुष्टांत आल्यावर स्पेनवर व गॉलच्या बऱ्याच भागावर यानें आपली सत्ता प्रस्थापित केली

थिओडॉरिक राजानें पूर्वगॉथ लोकांच्या सत्तेखालीं स्पेनप्रमाणेंच पुष्कळ मुलुख आणलेला होता व आपल्या बुद्धिमत्तेनें त्यानें आपल्या हयातींत उत्तम प्रकारें राज्य

केलें, पण त्याच्या मरणानंतर पूर्वगॉथ व पश्चिमगॉथ हे पुन्हा अलग झाले. थिओडॉरिक राजाच्या मागून आलेल्या राजात थिओडॉरिकची तडफ नव्हती. त्यामुळें पूर्वगॉथ लोकाच्या सत्तेला पुन्हा उतरती कळा लागली. जस्टिनियन बादशहानें पूर्वगॉथ लोकापासून इटली परत बळकावून घेतला. त्यामुळें पूर्वगॉथ लोकाची सत्ता जवळ जवळ नष्टच झाली. पण पश्चिमगॉथ लोकांनीं मात्र आपली सत्ता काहीं कालपर्यंत नष्ट होऊं दिली नाहीं. पश्चिमगॉथ लोकाची सत्ता अद्यापि गॉल व स्पेनवर होती. आसपासच्या मुलुखात मात्र कॅथोलिकपंथी गॉल लोकाचें वर्चस्व होतें. या लोकानीं हळूहळू पश्चिमगॉथ लोकाची सत्ता नष्ट करून रोमन साम्राज्याचा विस्तार करण्याचा खटाटोप सुरू केला. तरी पण स्पेनमध्यें पश्चिमगॉथ लोकाची सत्ता पुष्कळ कालपर्यंत चालू होती. लियोव्हिजील्ड ( ५६८-५८६ ) च्या कारकीर्दीत पुन्हा पश्चिमगॉथ लोकानीं आपल्या सत्तेचा विस्तार करण्यास सुरवात केली. त्याचा मुलगा रिकेर्ड याच्या कारकीर्दीत गॉथ व रोमन लोकामध्यें ऐक्य करण्याचा प्रयत्न झाला. पुष्कळ गॉथ लोकानीं कॅथोलिक पथ स्वीकारला. गॉथभाषेपेक्षा रोमन भाषेला प्राधान्य देण्यात आल. तरी पण गॉथलोकामध्यें व रोमन लोकामध्यें संस्कृतिभेद व वर्णभेद हा कायमच राहिला. गॉथ सरदारानीं अद्यापि रोमन आचारविचाराचा अवलंब केला नव्हता. त्यामुळें गॉथ लोकाचें वैशिष्ट्य कायमच राहिलें. स्पेनमध्यें गॉथ लोकाचाच राजा राज्य करीत असे. पुढें मुसुलमानी सत्तेशीं स्पेननें जो झगडा कित्येक शतकें चालू ठेवला त्यात या गॉथ लोकाचें पुष्कळच साहाय्य झालें. हल्लींच्या स्पॅनिश लोकातहि गॉथ लोकाचें रक्त अद्यापि खेळत असल्याचें दृष्टीस पडतें. अशा रीतीनें इटलीमधून जरी गॉथलोकाचें पूर्ण उच्चाटन झालें तरी स्पेनमध्यें गॉथलोकाचें अद्यापहि अस्तित्व दिसून येतें.

**गॉथिक वाङ्मय**—गॉथ लोकामधील वाङ्मयाचा विचार केल्यास, गॉथिक भाषेंत उलफिलासनें जें बायबलचें भाषांतर केलं आहे त्याचा प्रामुख्यानें निर्देश करणें जरूर आहे. याशिवाय गॉथिक भाषेंत लिहिलेले धार्मिक ग्रंथ संपूर्ण नाहींत, तरी तुटक तुटक असे उपलब्ध झालेले आहेत. इ.स ५००च्या सुमारास थीओडोरिकने काढलेलें आज्ञापत्र लॅटिन भाषेंत उपलब्ध आहे त्यावरून व थीओडोरिक व त्याच्या मागून होणाऱ्या राजाच्या राजकीय पत्रव्यवहारावरून गॉथ लोकाचे कायदेकानू काय होते याचेंहि आपल्याला ज्ञान होतें. इ. सन. ६५४ सालीं रेसेसविंथ राजानें आपल्या पूर्वीच्या गॉथ राजाचे कायदेकानू एकत्र करून एक कायदेसंग्रह ( कोड ) तयार करविला. गॉथ लोकाच्या इतिहासावर जॉर्डेन्स यानें ग्रंथ लिहिला आहे. त्याशिवाय इसिडोरनेंहि सातव्या शतकापर्यंतचा पश्चिम गॉथ लोकाचा इतिहास लिहिलेला आढळतो. पाचव्या शतकात होऊन गेलेल्या सॅल्व्हियन नावाच्या ग्रंथकारानें, 'डेग्यूबर नॅशनें डी' नावाचा ग्रंथ लिहिला असून त्यात गॉथ लोकाची साग्रोपाग माहिती दिली आहे या ग्रंथात रोमन लोकाच्या दुर्गुणाची निंदा व गॉथ लोकाच्या नीतिमत्तेची फार स्तुती केली आहे.

भाषा—वर सांगितलेंच आहे कीं, गॉथिक भाषेंत उलफिलासनें बायबलचें भाषांतर केलें. याशिवाय बायबलवरील टीकाग्रंथहि गॉथिक भाषेंत उपलब्ध आहेत. या ग्रंथावरून गॉथिक भाषेचें स्वरूप आपणाला कळून येतें. या भाषेंतील बरींचशीं अक्षरें, ग्रीक अन्शल लिपीपासून घेतलेलीं आढळतात. काहीं अक्षरें, रूनिक लिपि अगर लॅटिन लिपीपासून घेतलेलीं दिसतात. ग्रीक व लॅटिन ग्रंथात मधून मधून गॉथिक भाषेंतील विशेषनामें सापडतात. तसेंच दहाव्या शतकातील साल्त्सबर्ग येथील हस्तलिखित ग्रंथात बुखियो येथें सापडलेल्या धातूंच्या बनविलेल्या हारावर व कोव्हेल येथें सापडलेल्या भाल्याच्या मुठीवर गॉथिक भाषेंत लिहिलेले लेख आढळतात. त्यावरूनहि गॉथिक भाषेचें स्वरूप काय होतें याची कल्पना आपल्यास करता येते. तत्कालीन ट्युटनवंशीय लोकाच्या भाषापेक्षा या भाषेंत एक प्रकारचें वैशिष्ट्य आढळतें. चौथ्या शतकात व्हॅंडॉल व जेपीडे लोकहि हीच भाषा बोलत होते असें प्रोकोपियसनें म्हटलें आहे. चौथ्या व पाचव्या शतकात यूरोपमधील पुष्कळ राष्ट्रें व आफ्रिका खंडाच्या उत्तर भागातील लोक हीच भाषा बोलत असल्याचें दिसतें. पण ही जरी एके काळीं लोकप्रिय भाषा होती तरी ती फारच थोड्या काळात लुप्तप्राय झाली. मध्ययूरोपमध्यें ही भाषा अधिक काळ टिकाव धरून होती. ९ व्या शतकात लोअर डान्यूबच्या काठच्या प्रदेशातील चर्चमध्यें ही भाषा प्रचारात होती असें स्ट्रेबो म्हणतो. क्रिमियामध्यें मात्र १५ व्या शतकापर्यंत ही भाषा बोलली जात होती असें इतिहासावरून सिद्ध करता येतें.

[ संदर्भ ग्रंथ—टी हॉड्गकिन-इटली अँड हर इन्व्हेडर्स ( ऑक्सफर्ड १८८०-१८९९ ), मिलमन-हिस्टरी ऑफ लॅटिन खिश्चॅनिटी ( १८६७ ), ब्रॅडले-हिस्टरी ऑफ गॉथ्स ( स्टोरी ऑफ नेशन्स सीरीज ), राइट-ए प्रायमर ऑफ गॉथिक लँग्वेज ( ऑक्सफर्ड १८९२ )]

**गांधार देश**—या देशाबद्दल वैदिककालीन माहिती ज्ञानकोश विभाग ३ रा पृ. २०९ येथें आली आहे. महाभारतात गांधार देशाचा उल्लेख पुष्कळदा येतो. धृतराष्ट्राची पत्नी गांधारी ही या देशाच्या सुबल राजाची मुलगी होती व शकुनी नावाचा त्याचा मुलगा होता. हा प्रांत साप्रतच्या वायव्यसरहद्दीवरील कंदाहार प्रांत होय. यात काबूल ( प्राचीन कुभा ) नदीच्या दक्षिणेकडील खोरें, तेथून सिंधुनदीपर्यंतचा प्रदेश, दक्षिणेस सफेद कोह आणि कोहात पर्वत यांच्यापासून उत्तरेस स्वातच्या तोंडापर्यंतचा प्रदेश इतक्या भागाचा समावेश प्रस्तुतचा पेशावर जिल्हा, कोहातचा काहीं भ

प्रदेश, स्वात, बाजौर व बुनेर ( उद्यान ) हे प्रांत होत या प्रांतांभोंवतीं सर्वत्र डोंगर आहेत या देशाची प्राचीन राजधानी तक्षशिला होती तसेंच पुष्कलावती, पुरुषपूर व उद्भाडपूर हीं गांवेंहि राजधान्या होत्या येथील लोकानीं दरायसला ग्रीसवरील स्वारींत मदत केली होती गांधार देशांत बौद्धधर्म बराच प्रचलित होता येथें फाहिआन, ह्युएनत्संग व वूकोन्ग हे तीन चिनी प्रवासी आले होते फाहिआन म्हणतो कीं, मगधाच्या खालोखाल येथेंच बौद्धधर्म जास्त पसरला होता गांधारीचा बाप सुबल हा शैलूष गंधर्वाचा वंशज होता असें म्हणतात बृहत्संहितेंत हा देश उत्तर विभागांत दिलेला असून तेथील लोकानाहि गांधार हेंच नांव दिलेलें आहे अशोकाच्या एका शासनांत गांधार हें नांव येतें त्यांत गांधार लोक हे अशोकाची प्रजा असल्याचें म्हटलें आहे कनिष्काच घराणें गांधारावरच राज्य करीत असून त्याची राजधानी पुरुषपुर(पेशावर)होती ह्युएनत्संगच्या वेळीं गांधारदेश काबूलच्या शाही राजाच्या अमलाखालीं आला त्याच्या आधी सिंहपूर ( लवण गिरीचा प्रांत ) व उरशा ( हजारा प्रांत ) हीं राज्यें गांधार देशांत मोडत होतीं गांधार देश हें हूणांचें मुख्य ठाणें होतें अलेक्झांडरच्या पूर्वी ( खि पू ७ वें शतक ) उत्तरहिंदुस्थानांत जीं स्वतंत्र सोळ राज्यें होतीं त्यांत गांधार राज्य एक होतें सुत्तांतील उल्लेखाप्रमाणें अलेक्झांडरच्या सुमारास गांधारची राजधानी तक्षशिला होती पेशावर ( पुरुषपूर ) येथें कनिष्कानें एक चैत्य उभारला होता या चैत्याची माहिती गुणयून फाहिआन, ह्युएनत्संग व अल्बेरूणी यानीं दिली आहे एम् फौशेर यानें गांधारदेशाबद्दल कांहीं माहिती लिहिली असून त्याच्या सांगण्यावरून सरकारी पुराणवस्तुसंरक्षकखात्यानें पेशावरजवळील वरील चैत्य उकरून काढला आहे त्यांत कनिष्काची मूर्ति व लेख कोरलेला एक करंडा व इतर जिनस सांपडले होते गांधार देशांतील कोरीव मूर्तिकाम हें ग्रीस व रोमन या दोन मिश्रणाचें होतें असें व्हि स्मिथ म्हणतो हीं कोरीव व कलाकुसरीचीं कामें पेशावरनजीकच्या प्रांतांत विपुल असून तीं कनिष्क व त्याचे वंशज यांच्या कारकीर्दींत खोदलीं गेलीं आहेत तीं बहुधा बौद्धधर्मविषयक व्यक्ती अगर प्रसंगाचीं आहेत त्यावरून तत्कालीन बौद्ध धर्माच्या इतिहासावर व लोकस्थितीवर बराच उजेड पडतो या खोदकामाचा अत्युत्तम नमुना दुसऱ्या शतकांतील होय त्यावेळीं या कलेचा या प्रांतांत कळस झाला होता कनिष्काच्या कुशान घराण्यानंतर हूणानीं गांधार देशावर हल्ले करून तो काबीज केला ( ४६५ ) या हूणानीं फार अत्याचार केले असें सुगयून म्हणतो त्यानंतर बहुधा काबूलचें शाही राज्य गांधारावर झालें असावें पुढें बंगालच्या पालघराण्यांतील धर्मपाल राजानें कनोजच्या चक्रायुध राजास गादीवर बसवितांना आसपासच्या ज्या भोज, मत्स्य, कुरु, यदु वगैरे नऊ राजांची संमति घेतली होती त्या राजांत गांधारराजाचेंहि नांव येतें ही गोष्ट सन ८०० च्या सुमाराचा होय समुद्रगुप्तानें येथील कुशान राजाशीं मित्रत्वाचा तह केला होता असा उल्लेख आहे हल्लीं या देशांत ओरकझाई, आफ्रिडी व मोहमद लोक राहतात यांत काबूल व स्वात या दोनच नद्या आहेत. प्राचीन वर्णनांत या देशाच्या भरभराटीची जी माहिती आढळते ती हल्लीं आढळत नाहीं आतां सर्वत्र रुक्षपणा पसरलेला आहे मात्र जुने अवशेष पुष्कळ आहेत गांधारशिल्पाची माहिती शिल्पशास्त्रांत आढळेल [ बृहत्संहिता ५, ९, १०, १४, इंडियन अॅटिक्वरी पु २०, इंपीरिअल ग्याझे १२, प्राचीन कोश, स्मिथ–आर्ले हिस्टरी ऑफ इंडिया, साचौ–अल्बेरूणी, बील–रेकार्ड्स व्हॉ १, आर्किऑलॉजिकल रिपोर्ट १९०८–०९, अय्यंगार–एन्शन्ट इंडिया ]

**गांधारी**—गंधाराधिपति जो सुबल त्याची कन्या गांधारी धृतराष्ट्राची पत्नी असून तिला धृतराष्ट्रापासून शंभर पुत्र झाले तिचा पति अंध असल्यामुळें गांधारीहि सम दुःख भोगण्याकरितां म्हणून आपल्या डोळ्याभोंवतीं पट्टा बांधीत असे तिच्या पित्याच्या नांवावरून तिला सौबाली आणि सौबालेयी अशीं नांवें पडलीं व्यासाच्या वरप्रसादानें तिला शंभर पुत्र झाले अशी कथा आहे कुंतीस आधीं पुत्र झाल्याचें समजल्यावरून हिनें आपला गर्भ बलात्कारानें पाडला असतां एक मोठा मांसाचा गोळा पडला तेव्हां तिला फार दुःख झालें परंतु व्यासानीं तो आकारहीन गोळा घेऊन त्याचे १०१ तुकडे केले व ते सर्व निरनिराळ्या तुपाच्या रांजणांत ठेविले. योग्य कालानंतर गांधारीचा प्रथम पुत्र दुर्योधन जन्मास आला नंतर एक महिन्यानें दुसरे ९९ पुत्र व एक कन्या दुःशला यांचा जन्म झाला बालपणांत रुद्राचें तिनें आराधन केलें होतें त्यावेळीं शंकरानें शंभर मुलांचा तिला वर दिला होता हिनें दुर्योधनाची पांडवांचा विनाकारण छळ करण्याबद्दल पुष्कळच कानउघाडणी केली होती, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं युद्धानंतर आपल्या मुलाच्या नाशास श्रीकृष्णच कारण आहेत अशा समजुतीनें हिनें त्याना यादवकुळाचा नाश लवकरच होवो असा शाप दिला होता धर्मराज गादीवर बसल्यानंतर धृतराष्ट्र व ही कांहीं काल पांडवांच्या जवळ होती पुढें वानप्रस्थाश्रम स्वीकारून हीं दोघे विदुरासहित अरण्यांत निघून गेलीं त्याच्याबरोबर कुंतीहि गेली पुढें कांहीं कालानें अरण्यास वणवा लागून त्यांत धृतराष्ट्रासह गांधारीचा नाश झाला. तिची पतिव्रता म्हणून ख्याति आहे [ महाभारत, आदि–उद्योग–स्त्रीपर्व ]

**गाधि**—( सो व ) विजयकुलोत्पन्न कुशाबु राजाचा पुत्र हा कान्यकुब्ज देशाचा राजा असून यास एकच प्रशस्त सत्यवती नांवाची कन्या होती या सत्यवतीची ऋचीक ऋषीनें यासमीप भार्यार्थ याचना केली असतां, तिला यानें

त्यास विवाहविधीनें दिलें. पुढें त्यास विधामित्र नावाचा पुत्र झाला'. [ महाभारत, आदि प. अ. १७५; वन. अ. ११५; शल्य. अ. ४० ].

**गानिगा**—म्हैसूर संस्थान, मद्रास व मुंबई इलाखा यांतून यांची वस्ती आहे. एकंदर लो. सं. ( १९११ ) ६११२५३. मुंबई इलाख्यांत, कर्नाटक व कानडा प्रांतात हे लोक आढळतात. यांचे हिंदु व लिंगायत असे दोन पोट-भेद आहेत. हिंदुलोकांच्या चालीरीती लिंगायताप्रमाणेंच असून ते जानवें व लिंग हीं दोन्हीं घालतात. बहुतेक लोक तेली आहेत, कांहीं शेतकरी व लहान व्यापारीहि आहेत. हिंदु गानिगांमध्यें आठ पोटभाग असून वैष्णवाशेरीजकरून एका पोटभागांतील लोक दुसऱ्या पोटभागांतील लोकांशी विवाहसंबंध करीत नाहींत. आडनावावरून यांचीं कुळें ठरलीं जातात. संजन व पास्टी या पोटभागांतील लोकांत पुनर्विवाह व घटस्फोट या दोन्हीं चाली आहेत. कानडा-मध्यें विधवा स्त्रियांचें केशवपन करतात. वैष्णवखेरीजकरून सर्व पोटभागांतील लोक मांसाहारी आहेत. हे लोक आप-ल्याला उच्च वैश्य समजतात व हाविक ब्राम्हणांशिवाय इतरांचें अन्न घेत नाहींत. हे वैष्णव व शैव असून यांचा वारसासंबंधीं कायदा हिंदुप्रमाणेंच आहे. घाण्याला लाव-लेल्या बैलाचे डोळे बांधणें हें पाप आहे असा यांचा समज आहे त्याचप्रमाणें बैलाला जोडूनि कामास लावणें हेंहि ते पाप मानितात. कर्नाटकी गानिगा जंगमावरोबर जेवतात व त्यांना मान देतात. कर्नाटकी गानिगाचे उपाध्ये हाविक ब्राह्मण आहेत. लिंगायत लोक प्रेतें पुरतात. इतर त्यांना अग्नि देतात. मेलेल्या माणसाचे कपडे घरीं आणून त्यांची ७ वे दिवशीं पूजा करून नंतर ते जंगमाना दिले जातात.

म्हैसूर संस्थानांत यांचा मुख्य धंदा तेल काढ-ण्याचा आहे, त्यांच्या वस्तीच्या ठिकाणावरून व त्यांच्या चालीरीतीवरून त्यांना निरनिराळीं नांवें पडलीं आहेत. त्यांच्या मुख्य जातीस जोतिनागर असें नांव आहे. यांच्यात 'सज्जन' म्हणून एक लिंग धारण करणारी पोटजात आहे, या लोकांचा इतर पोटजातींशीं कोणत्याच प्रकारचा व्यवहार नाहीं विधवाविवाहास या जातींत मोकळीक नाहीं. या जातींत जर एखादा तरुण अविवाहित वारला तर त्याचा अंत्यविधि करण्यापूर्वी त्याचा अर्क वृक्षाशीं विवाह लावतात [ सेन्सस रिपोर्ट १९११ मुंबई व म्हैसूर ].

**गावत**—मुंबई इलाख्यातील महिकांठा एजन्सींतील एक लहान संस्थान. हें नानी मारवाडा असून यांत ६ गांवें आहेत. गावत हें संस्थानचें मुख्य ठिकाण आहे.

**गावती**—या जातीची लोकसंख्या ( १९११ ) २४८१८. रत्नागिरी व कानडा जिल्ह्यातील समुद्रकांठचा प्रदेश व सावंतवाडी संस्थान येथें हे लोक आढळतात. यांचीं गावीत किंवा घावती अशींहि दुसरीं नांवें आहेत. गावती हें नांव पडा-वयाचें कारण असें सांगतात कीं शिवाजी महाराजांनीं आर-मार तयार केलें त्यावेळीं त्यांत तिर्कटीतारु, गलबत, मचवा, पडाव, शिवाड, होडी, डोंग, पगार व घाव अशीं निरनि-राळीं गलबतें होतीं. घावजहाज हें लढाऊ असे. त्यावर तोफा असत. घाव ( गुराब ) हा आरबी शब्द आहे. त्याचा अर्थ गनबोट होय. या घावावर जे लढाऊ मराठे कोंकणी नोकर राहिले ते हे घावती होत. गावीत हा शब्द खरा नाहीं ( हा सेन्सस रिपोर्टांत येतो. ). घावती व गावती एकच. आम्हीं कोंकणी मराठे असून आमचे पूर्वज पूर्वी शिवाजीच्या आरमारखात्यांत नोकर होते असें हे म्हण-तात. म्हणून जैतापूर, विजयदुर्ग, देवगड, मालवण, वेंगुर्लें या पूर्वीच्या आरमाराच्या ठिकाणीं यांची वस्ती जास्त आहे. पेशवाई बुडाल्यानंतर त्यांनीं कोळ्याचा धंदा सुरु केला असें म्हणतात. १७६० च्या अगोदर व त्यानंतर सुमारें ४० वर्षेंपर्यंत हे लोक दर्यावर्दीपणाचा धंदा करीत होते. यांच्या बायकामुलांनीं ( पुरुष आरमारावर नोकर अस-ल्यामुळें ) शेजारी रहात असलेल्या कोळ्याचा धंदा व मोल-मजुरी करण्यास प्रारंभ केला. त्यामुळें मराठे व या लोकांचा संबंध दुरावला. साठसत्तर वर्षांपूर्वी मराठ्यांचा व यांचा रोटी-बेटीव्यवहार असे पण हल्लीं नाहीं. त्यावेळीं मालंडकर परब ( घावती ) यांची मुलगी विजयदुर्गाच्या धुळपांकडे दिली होती असें म्हणतात. यांचीं आडनांवेंहि मराठ्यांच्या आड-नावाचीं आहेत. वेंगुर्लें येथें कुवल आडनावाचीं पांच घराणीं असून त्यांपैकीं चार मराठे व एक गावती आहे. मागमरा-तब यांनाहि सारख्याच मिळतो. हुद्याचीं दर्शक आडनांवें यांच्यांत आहेत तीं:—तांडेल, साततांडेल, पडतांडेल, फड-तांडेल, तिळतांडेल, नायनाक, नाईक, पडनाईक, फडनाईक, महालनाईक, मुकनाईक, सारंग, मोठेसारंग, दुइये इत्यादि. या लोकांमध्यें कुळें व देवकें आहेत व त्यावरून ते मूळचे मराठे असण्याचा फार संभव दिसतो. मासे पकडून विकणें व दर्यावर्दीपणा करणें हे त्यांचे परंपरागत धंदे होत. यांमध्यें गोत्रेंहि आहेत. परंतु त्यांचा उपयोग होत नाहीं. विवाहाच्या

धंद्याच्या गैरसोयीमुळें तें खुंटीस ठेवतात. विवाहादि सर्व संस्कार ग्रामजोशी ब्राह्मण उपाध्याय करतो. या जातीच्या रखेलीपासून झालेली संतति मराठा जातींत मोडते; त्याची निराळी जात नाहीं.मात्र अशा पहिल्या पिढीस बंदा म्हणतात व त्यापुढील संतति आस्ते आस्ते पक्क्या मराठ्यांत मोडते. त्यांच्यापैकीं कांहीं वारकरी व रामदासी पंथाचे आहेत.यांच्या गांवोगांवीं पंचायती होत्या व सर्वसाधारण पंचायत मालवणास होती. तिचा अध्यक्ष वंशपरंपरेचा असतो. हल्लीं फार थोड्या पंचायती शिल्लक आहेत. पूर्वी निवाडे लिहून ठेवण्याची पद्धति होती. निकाल न पाळल्यास गुडगुडी, पाणी, विस्तव, रोटीव्यवहार हे बंद करणें किंवा दंड करणें या शिक्षा असत. कांहीं गांवीं जातीचीं मालकीचीं देवस्थानें आहेत. जातीचा कर नाहीं. ब्राह्मण, मराठे व वाणी यांच्या बरोबर याचा अन्नोदकव्यवहार चालतो. यांच्यात पोटजाती नाहीत. संकेश्वर मठ हा या जातीच्या धर्मगुरूचा मठ होय याच्यात दोन शिक्षणविषयक फंड आहेत. या जातीबद्दल एथ्नॉलॉजिकलसर्व्हे डिपार्टमेंटकडून चौकशी होत असतां "आमच्या जातीपैकीं कोणाहि गृहस्थाचा सल्ला घेण्यात आला नाहीं; उलट प्रतिस्पर्धी जातीकडून भलती नालस्ती करणारी चुकीची माहिती मिळवून सरकारनें मोनोग्राफ छापला. तो छापला गेल्यावर जातीतील पुढाऱ्यांनीं एथ्नॉ डिपार्टमेंटला अर्ज करून त्यांत केलेल्या खोटया विधानाबद्दल तक्रार केली व खरीखुरी माहिती पुराव्यानिशीं सादर केली. परंतु मोनोग्राफ पूर्वीच छापून निघाल्यामुळें त्याचा कांहींच उपयोग झाला नाही." असें रा. कृ. वि. शुक्ल म्हणतात. [ सेन्सस ऑफ इंडिया १९११ व्हॉ. ७, रा. कृ वि. शुक्ल यांनीं पुरविलेली माहिती. ].

**गाम चक्कल**—यांची बहुतेक वस्ती मुंबई इलाख्यातच आहे. लो. सं.(१९११)१२१३२.कानडी जिल्ह्यातील गंगावती व शिरवती या नद्यांमधील खोऱ्यांत हे लोक आढळतात.यांचा सामाजिक दर्जा हालवाक्किवक्कल यांबरोबर असून ते शेतीचा धंदा करितात.

**गायकवाड**—या गायकवाडाचें मूळ गाव पुणें जिल्ह्यात धावडी हें होय. या घराण्याचा पूर्वज दमाजी हा खंडेराव दाभाड्याच्या सैन्यातील एक सरदार होता. इ. स. १७२० मध्यें बाळापूर येथें निझामाशीं झालेल्या लढाईत दमाजीनें विशेष नांवलौकिक मिळविल्यामुळें खंडेरावाच्या शिफारशीवरून शाहू महाराजांनीं त्याला समशेर बहादर असा किताब देऊन त्याची सेनापतीच्या मुतालिकीच्या जागीं नेमणूक केली. दमाजी हा १७२० त मरण पावला.त्याच्या मृत्यूनंतर त्याचा पुतण्या ( झनकोजीचा पुत्र ) पिलाजी याची नेमणूक झाली ( १७२१ ). पिलाजी हा खानदेशांत नवापूर येथें प्रथम रहात होता. परंतु भोवारांनीं हरकत घेतल्यामुळें त्यानें सोनगड येथें किल्ला बांधून तेथें आपलें ठाणें दिलें. हें ठिकाण बरेच दिवस गायकवाडांची राजधानी होतें. पिलाजीनें राजपिंपळ्याच्या राजाच्या मदतीनें १७२० त प्रथम सुरत प्रांतावर स्वारी केली व चौथ मिळविली व अहमदाबाद येथें आपला गुमास्ता ठेवला.

इ. स. १७२४ मध्यें पिलाजीनें गुजराथचा नायब सुभेदार हमीदखान यास सरबुलंदखानाच्या ( नवीन सुभेदार ) विरुद्ध मदत करून, त्याच्याकडून मही नदीच्या पूर्वेकडील मुलखात चौथ वसविण्याचा हक्क मिळविला. पुढें १७२५ साली पिलाजीनें पुन्हा हमीदखानास मदत करून अहमदाबादेजवळ अदालेदजी येथें सरबुलंदचा पराभव केला. तेव्हां पिलाजीशीं सख्य ठेवण्याकरितां सरबुलंदानेंहि गुजराथेंत चौथ वसविण्याचा अधिकार त्यास दिला. कंठाजीकदम बांडे यानेंहि हमीदखानास मदत केली होती. त्यामुळें चौथाईबद्दल त्यालाहि कांहीं हक्क मिळाले होते. त्या संबंधात पिलाजी व कंठाजी या दोघात तंटे माजले. त्याचा निकाल हमीदनें लावला. कंठाजीनें महीच्या पश्चिमेकडील व पिलाजीनें पूर्वेकडील प्रांताची चौथ गोळा करावी असें ठरलें. नंतर पिलाजी सोनगडास गेला. पुढें सरबुलंद यानें गुजराथची सरदेशमुखी व चौथाई थोरले बाजीरावासच दिली ( १७३१ ). बाजीराव व दाभाडे यांच्यात डभई येथें युद्ध झालें, त्यात पिलाजी दाभाड्याकडून लढत होता. या युद्धांत बाजीरावाचा सरदार आवजी कवडे याचा पिलाजीचा मुलगा दमाजी यानें पराभव केला. डभईच्या लढाईत पिलाजीचा एक मुलगा मारला गेला व पिलाजीहि जखमी झाला. पुढें यशवंतराव दाभाड्यास सेनापतीचीं वस्त्रें मिळालीं, तेव्हां पिलाजीस त्याच्या मुतालकीच्या जागीं कायम करण्यात येऊन 'समशेरबहादूर' या किताबाशिवाय सेनाखासखेल हा नवीन किताब त्यास देण्यांत आला. डभईच्या लढाईच्या वेळीं डभई व बडोदें हीं दोन्हीहि शहरें पिलाजीच्या ताब्यात होतीं. सरबुलंदखानानें मराठ्यास चौथाई सरदेशमुखीच्या सनदा करून दिल्यामुळें बादशहाची त्याच्यावर खप्पामर्जी होऊन त्याच्या जागीं जोधपूरचा राजा अभयसिंग याला गुजराथच्या सुभेदारीचें काम देण्यात आलें. अभयसिंगानें थोड्याच दिवसात बडोद्याचा किल्ला मराठ्यांकडून काबीज केला. परंतु पिलाजीनें इतरत्र बरेच जय मिळवून कित्येक मुख्य मुख्य ठाणीं बळकाविलीं होतीं, म्हणून अभयसिंगानें पिलाजीशीं कायमचे करारमदार करून टाकण्यासाठीं त्याच्याकडे आपले वकील पाठविले व त्यांच्याकरवीं डाकोर येथें त्याचा एके दिवशीं विश्वासघातानें खून केला ( १७३२ ).

पिलाजीच्या मृत्यूमुळें अभयसिंगास कांहींच फायदा झाला नाहीं. कारण पिलाजीचा दोस्त पाद्र्याचा ( बडोद्याजवळील एक गांव ) देसाई दिल्ला याच्या चिथावणीवरून सर्व देशभर कोळी व भील लोकांनीं बंड केलें. अभयसिंगाचें सैन्य त्याचें बंड मोडण्यात गुंतलें आहे असें पाहून पिलाजीचा भाऊ महादजी ( हा जंबूसर बळकाऊन बसला होता ) यानें बडोद्यावर स्वारी करून तें

घेतलें ( १७३२ ) येथपासून वडोदें ही गायकवाडांची राजधानी झाली. पिलाजीचा वडील मुलगा जो दमाजी त्यानेंहि याच सुमारास सोनगडाहून निघून गुजराथेंतील पश्चिमेकडचे बरेच मुख्य मुख्य जिल्हे पादाक्रांत केले. त्याच्या स्वाऱ्या जोधपूरपावेतों जेव्हां जाऊं लागल्या तेव्हां आपल्या दुय्यम अधिकाऱ्याच्या स्वाधीन अहमदाबाद करून अभयसिंग हा जोधपूरच्या रक्षणार्थ तिकडे निघून गेला ( १७३२ )

पुढें दमाजीनें कंठाजी कदम बांडे यास गुजराथेंतून हाकून लावलें ( १७३४ ), म्हणून कंठाजीनें पुढच्या सालीं मल्हारराव होळकरासह गुजराथेंत अकस्मात स्वारी करून बनास नदीपावेतों खंडण्या वसूल केल्या व ईदर, पालनपूर वगैरे कित्येक शहरें लुटलीं. या स्वारीनंतर लवकरच गुजराथच्या सुभेदारीचें काम अभयसिंगाकडून काढून नजीब उद्दौला मोमीनखान याच्याकडे देण्यात आलें पण अभयसिंगाच्या वतीनें गुजराथचा कारभार पहाणारा नायब सुभेदार हा अहमदाबाद सोडण्यास तयार नव्हता. तेव्हां मोमीनखानानें त्याला हाकून लावण्याकरिता दमाजीची मदत घेतली(१७३५). व ते दोघे पगडीभाई झाले याप्रमाणें अहमदाबाद हस्तगत झाल्यावर तेथली सत्ता व वसूल या दोघांनीं वांटून घेतली ( १७३७ ) बाजीराव उत्तरेस गेला आहे असें पाहून दमाजीनें माळव्यात स्वारी केली ( १७४१ ).

मोमीनखान हा १७४३ त ( फेब्रुवारी ) मेला. तो जिवंत होता तोंपर्यंत दमाजीनें गुजराथेंतील व काठेवाडांतील आपले सर्व हक्क बिनहरकत वसूल केले मोमीनच्या मरणानंतर अबदुल अझीझ याची नेमणूक झाली, पण तो औरंगाबादेहून गुजराथेंत येत असता, मार्गातच दमाजीनें अंकलेश्वर येथें त्यावर हल्ला करून त्याची सर्व फौज कापून काढली. यानंतर फकीरद्दौला यास दिल्लीहून गुजराथेंत पाठविण्यात आलें ( १७४४ ). यावेळीं दमाजी साताऱ्यास गेला होता,तथापि त्याचा सरदार रंगाजी यानें फकीरद्दौलेस विरोध करून गुजराथचा कारभार आपल्या हातीं घेऊं दिला नाहीं. दमाजीस खंडेराव नावाचा एक भाऊ होता. दमाजी गुजराथेंत नसल्यामुळें त्याला कारभारात ढवळाढवळ करण्यास संधि मिळाली. त्यानें रंगाजीस अहमदाबादेहून काढून तेथें दुसऱ्या माणसाची नेमणूक करून फकीरद्दौला यासहि कांहीं मदत दिली. परंतु रंगाजीस ही बातमी लागतांच तो लागलीच परत आला, व त्यानें खंडेराव व फकीरद्दौला यांचा संबंध तोडून खंडेरावास संतुष्ट राखण्यासाठीं, त्यास बुरसद ( बोरसादचा ) किल्ला व नडियाद जिल्हा दिला व वडोदें येथें त्याला आपला प्रतिनिधि म्हणून नेमलें १७४४ त दमाजी गायकवाड साताऱ्यास आला होता. या वर्षी रघुजी भोंसले व बाळाजी बाजीराव यांच्यामध्यें शाहूच्या मध्यस्थीनें जी तडजोड झाली, तींत असें ठरलें होतें कीं, दमाजीनें माळव्यातून कांहीं दिवसापूर्वी जी खंडणीची रक्कम वसूल केली, तिचा हिस्सा त्यानें पेशव्यास द्यावा. शाहूनें आपल्या मरणापूर्वी दमाजी गायकवाडास साताऱ्यास हजर होण्याविषयीं हुकूम पाठविला होता, परंतु त्यावेळीं तो गेला नाहीं ( १७४८ )

दमाजी हा ताराबाईस पेशव्याच्याविरुद्ध मदत करण्याकरिता १५००० सैन्य घेऊन साताऱ्याकडे आला व त्यानें पेशव्याच्या पक्षाच्या मंडळीचा नींब येथें पराभव केला. ( १७५१ ) परंतु ही बातमी नानासाहेबाना लागताच ते मोठमोठ्या मजला करीत दक्षिणेकडून साताऱ्यास आले. पेशव्यांशीं बोलणें लावून तडजोड करून घेण्यासाठीं दमाजीनें खटपट चालविली पण ती सफळ झाली नाहीं. अखेर दमाजीवर पेशव्यानीं अचानक हल्ला करून त्यास पकडून बंदोबस्तानें पुण्यास आणून ठेविलें व त्याच्या कुटुंबास कैदेंत ठेविलें

भडोचच्या वसुलाचा व जकातीचा हिस्सा गायकवाडास नक्की केव्हां प्राप्त झाला हें कळत नाहीं. इ स १७४७ साली सुरतच्या अधिकारासंबंधीं मुसलमानी निरनिराळ्या पक्षात तंटे उपस्थित होऊन त्यापैकीं सय्यद अचीनखानानें दमाजीचा चुलतभाऊ केदारजी यास आपल्या मदतीस बोलावलें याबद्दल तीन लक्ष रुपये केदारजीस देण्याचें ठरलें परंतु केदारजीच्या मदतीवाचूनच अचीनखानाचें कार्य झाल्यानें तो ती रक्कम देण्यास टाळाटाळ करूं लागला त्यावर केदारजीनें सुरतच्या आसपास लुटालूट करण्यास आरंभ केला. तेव्हां अचीनन नाइलाज होऊन त्या रकमेची फेड होईपर्यंत सुरतच्या वसुलाचा एकतृतीयांश हिस्सा केदारजीनें घ्यावा असें ठरविलें व तें केदारजीनेंहि दमाजीच्या सल्ल्यानें मान्य केलें दमाजी पुण्यास पेशव्याच्या कैदेंत होता त्यावेळीं ( इ.स.१७५२–१७५४ ). पुनः सुरत येथें बरीच बेबंदशाही माजली होती तिचा फायदा घेता यावा म्हणून पुढें दिल्याप्रमाणें दमाजीनें पेशव्यांशीं करार करून आपली सुटका करून घेतली ( १७५४ ) यावेळीं असें ठरलें कीं दमाजीनें १५ लक्ष रुपये देऊन मागील बाकीचा फडशा करावा, गायकवाडाकडे गुजराथेंत जो मुलूख आहे त्याचा अर्धा वाटा पेशव्यास मिळावा व पुढेंहि त्यांनीं नवीन मुलूख जिंकल्यास त्याचाहि अर्धा हिस्सा पेशव्यास मिळावा अत:पर स्वाऱ्यांमध्यें जो कांहीं पैसा मिळेल त्यातून स्वारीचा खर्च वजा जाता बाकी राहिलेल्या रकमेचा अर्धा हिस्सा पेशव्यास देत जावा. दहा हजार फौज चाकरीस ठेवून गरज पडेल तेव्हां पेशव्यास मदत करावी, दाभाडे सेनापतीचे मुतालिक या नात्यानें गुजराथ प्रांताच्या वसुलातून दरसाल सवापांच लक्ष रुपये सरकारात द्यावे आणि छत्रपतींच्या इतमामासाठीं दरवर्षी कांहीं रक्कम पाठवीत जावी वगैरे कैदेंतून सुटण्यासाठीं दरबारखर्च म्हणून दमाजीनें दहापंधरा लक्ष रुपये खर्च केले सुटका झाल्यानंतर ( १७५४ ) पावसाळ्याच्या राघोबादादाच्या गुजराथच्या स्वारींत दमाजी त्यांस मिळाला व ते दोघे खंडण्या गोळा करीत

( १७२५ ) आले त्यांनीं शहरास वेढा देऊन तें हस्तगत केलें. मोंगलांचा अधिकारी जवानमर्दखान बाबी याची नेमणूक मोमीनखान याच्या भावानें केली होती. त्यानें कित्येक दिवसपर्यंत शहराचें रक्षण केलें, परंतु शेवटीं पट्टण, वडनगर, राधनपूर, विजापूर आणि साबरमती व बनास या नद्यांमधील अहमदाबादच्या उत्तरेकडचे गुजराथेंतील कांहीं जिल्हे स्वतःस जहागीर घेऊन ( एप्रिल महिन्यांत ) त्यानें तें शहर मराठ्यांच्या स्वाधीन केलें. अहमदाबाद हस्तगत झाल्यावर त्याचा वसूल गायकवाड व पेशवे यांनीं अर्धा अर्धा वाटून घ्यावा असें ठरलें. वरील बाबींच्या जहागिरीपैकीं बराचसा मुलूख पुढें १० वर्षांनीं दमाजीनें परत मिळविला.

इ. स. १७६० मध्यें भाऊसाहेब हिंदुस्थानांत जावयास निघाले तेव्हां पेंढारलेल्या अलीकडेच पेशव्यांच्या आज्ञेवरून दमाजी त्यास जाऊन मिळाला. पानिपतच्या अखेरच्या घनघोर लढाईंत दमाजी व इब्राहिमखान हे दोघेहि बरोबरच रोहिल्यांशीं लढत होते. नंतर मल्हारराव होळकरानें रणभूमीवरून पाय काढल्यावर दमाजीनेंहि त्याचेंच अनुकरण केलें. पुढें ( १७६३ ) निजामाशीं झालेल्या तांदुळज्याच्या लढाईंत ( पेशव्यातर्फे ) दमाजी हजर होता. नंतर ( स. १७६८ ) दमाजीनें आपला मुलगा गोविंदराव याजबरोबर फौज देऊन त्याला थोरले माधवराव यांच्याविरुद्ध राघोबादादास मदत करण्यास पाठविलें. इ. स. १७६८ च्या सुमारास दमाजी मरण पावला. त्याला सयाजी, गोविंदराव, मानाजी व फत्तेसिंग असे चार मुलगे होते. यांपैकीं सयाजी सर्वांत वडील होता पण तो पहिल्या बायकोचा नव्हता. गोविंदराव पहिल्या बायकोचा होता पण धाकटा होता. दमाजी मेला तेव्हां गोविंदराव हा राघोबादादास मदत केल्यामुळें पुण्यास अटकेंत होता. त्यानें सुटकेसाठीं दंड व नजर मिळून ५०॥ लक्षांवर रुपये देऊन, ७ लक्ष ७९ हजार रुपये दरसाल खंडणी देण्याचें आणि पुण्यास नेहमीं ३ हजार फौज व लढाईच्या वेळीं ४ हजार फौज ठेवण्याचें कबूल करून सेनाखासखेल हें पद मिळविलें. सयाजी स्वतः वेडा होता पण फत्तेसिंगानें त्याचा हक्क पुढें मांडून पेशव्यांकडूनच ( १७७१ ) आपल्या भावासाठीं सेनाखासखेल ही पदवी मिळविली व आपण त्याचा मुतालिक झाला. यामुळें गोविंदराव व फत्तेसिंग यांच्यामध्यें वैमनस्य आलें. तेव्हां गोविंदरावानें बंड केल्यास गुजराथेंत शांतता राखतां यावी म्हणून फत्तेसिंगानें पेशव्यांना दरसाल ६॥ लक्ष खंडणीचा करार करून आपलें सैन्य पुण्याहून काढलें. पुढें दादासाहेबांस पेशवाई मिळाल्यावर त्यांनीं गोविंदरावास पुन्हां 'सेनाखासखेल' केलें. तेव्हां गोविंदरावानें लागलीच गुजराथेंत स्वारी केली. पुढें दादासाहेब हे त्याची मदत देण्याकरितां बडोद्यास आले ( ३ जाने. १७७५ ) तेव्हां त्यानें फत्तेसिंगास ( बडोदें येथें ) वेढा दिला होता. यावेळीं गोविंदरावाचा चुलता व नडियादचा जहागीरदार खंडेराव हा गोविंदरावाच्या मदतीस आला. परंतु पुण्याच्या कारभाऱ्यांनीं त्याला आपल्या बाजूस वळवून घेतलें. हरीपंत फडके दादाच्या पाठोपाठ आले. तेव्हां गोविंदराव बडोद्याचा वेढा उठवून दादाबरोबर नदीच्या पलीकडे गेला. तेथें महीतीरीं वासद खेड्याजवळ हे छावणी देऊन राहिले असतां फत्तेसिंग व हरीपंत यांनीं नदी उतरून यांच्यावर अचानक हल्ला केला व यांचा पराभव केला ( १७ फेब्रु. ) तेव्हां दादा हे इंग्रजांकडे खंबायतेस गेले व गोविंदराव पालनपुराकडे गेला.

पुढें ( १९ एप्रिल ) राघोबादादा हे कीटिंगसह गोविंदरावाच्या सैन्यास खंबायतच्या ईशान्येस ११ मैलांवर दरमज येथें येऊन मिळाले. गोविंदरावाच्या विनंतीवरून इंग्रजांनीं बडोदें घेण्याचें ठरविलें. तेव्हां फत्तेसिंग इंग्रजांशीं तह करण्यास कबूल झाला. या तहानें इंग्रजांनीं दादासाहेबामार्फत गोविंदराव व फत्तेसिंग यांचा समेट करून देण्याचा प्रयत्न केला. परंतु पुढें गोविंदरावानें हा तह पाळला नाहीं. फत्तेसिंगानें ३००० स्वारांनिशीं दादाच्या चाकरीस रहावें, थोरले माधवराव पेशवे यांच्याशीं केलेल्या कराराप्रमाणें, गोविंदरावासाठीं गुजराथेंत २ लक्षांची जहागीर आतां त्यानें राखून ठेवूं नये, कारण दादा हे दक्षिणेंत १० लक्षांची जहागीर गोविंदरावास देण्यास कबूल होते. फत्तेसिंगानें दादांना २६ लक्ष रुपये द्यावे व त्यानें भडोचच्या वसुलावरील आपले हक्क व दुसरीं कित्येक खेडीं इंग्रजांस द्यावीं असें या तहान्वयें ठरलें. या तहानें इंग्रजांचा पुष्कळ फायदा झाला. पुरंदरच्या तहांत ( १७७६ ) असें एक कलम होतें कीं, पेशव्यांच्या संमतीशिवाय गायकवाडास आपला मुलूख दुसऱ्यास तोडून देतां येत नाहीं, तसें सिद्ध झाल्यास, इंग्रजांनीं फत्तेसिंगाचा मुलूख त्यास परत द्यावा.

आपण पेशव्यांचे अंकित आहोंत हें फत्तेसिंग कबूल करी, परंतु त्याच्या संमतीवांचून आपणास आपला मुलूख दुसऱ्यास देतां येत नाहीं हें मात्र त्यास मान्य नव्हतें. आपला मुलूख परत द्यावा हें त्याचें देखील इंग्रजांपाशीं मागणें होतें परंतु याचें कारण तो असें सांगे कीं, ज्याकरितां हा मुलूख इंग्रजांस दिला तें कार्य राघोबादादा हे साध्य करूं शकले नाहींत म्हणून तो प्रांत इंग्रजांना देण्याचें आतां कांहीं प्रयोजनच राहिलें नाहीं. पुढें ( १७७८ ) त्यानें पेशव्यांना मागील सर्व बाकी, साडे दहा लक्ष रुपये खंडणी व ५ लक्ष रुपये नजर देऊन सेनाखासखेलीचीं वस्त्रें मिळविलीं. त्यामुळें गोविंदरावाचा हक्क कायमचा नष्ट झाला.

फत्तेसिंगानें गॉडर्ड यांशीं तह करून, पेशव्यांशीं चाललेल्या तत्कालीन युद्धांत त्यांच्या मदतीस ३००० फौज देण्याचें कबूल ( २६ जाने. १७८० ) केलें. तथापि युद्ध चाललें असतांहि गायकवाडानें आपली शिरस्त्याची खंडणी



श्रीमंत सयाजीराव गायकवाड, संस्थान बडोदें



लक्ष्मीविलास राजवाडा, बडोदें.



श्री सौ. चिमणाबाईसाहेब गायकवाड



नझरबाग-राजवाडा, बडोदें

पेशव्यास देण्याचें बंद करूं नये अशीहि एक अट होती यावेळीं इंग्रजानें त्याला महीच्या उत्तरेकडील प्रांत देण्याचें कबूल केलें व त्याबद्दल त्यानें इंग्रजांना सुरत व भडोच प्रांत दिले, आणि वर सांगितल्याप्रमाणें फत्तेसिंग हा इंग्रजांचा हस्तक बनला. पुढें इंग्रजांनीं पेशव्याशीं तह केला ( १७८१ ), त्यांत फत्तेसिंगाजवळ असलेला मुलूख तसाच असावा, त्यानें पेशव्यांना नेहमींप्रमाणें खंडणी द्यावी असें ठरलें. यापुढें मरेपर्यंत फत्तेसिंगानें राज्य सुरळीतपणें चालविलें.

शेवटीं (१७८९ डिसेंबर २१) फत्तेसिंग आपल्या वाड्याच्या वरच्या मजल्यावरून खालीं पडून मरण पावला. मरेपर्यंत फत्तेसिंग हा सयाजीचा मुतालिकच होता त्याच्या मरणाच्या वेळीं त्याचा धाकटा भाऊ मानाजी हा बडोद्यासच होता. त्यानें लागलीच सयाजीस आपल्या ताब्यात घेऊन जहागिरीचा अधिकार बळकाविला. या वेळीं गोविंदराव हा पुण्याजवळ अज्ञातवासात रहात होता. त्यानें संस्थानचा अधिकार आपणास मिळावा अशी नाना फडणविसास विनंति केली परंतु मानाजीनें पुणें दरबारास ३३,१३,००१ रुपये नजर करून व फत्तेसिंग गायकवाडाकडे राहिलेल्या ३६ लाखांची मागील बाकीची भरपाई करण्याचें अभिवचन देऊन आपला अधिकार कायम करविला. हें पाहून महादजी शिंद्यांनीं गोविंदरावाची बाजू घेऊन मानाजीची नेमणूक पेशव्याकडून रद्द करविली. तेव्हां मानाजी इंग्रजांकडे गेला व गॉडर्ड व फत्तेसिंग यांच्या तहाच्या आधारावर त्यांनीं आपणास मदत करावी असें म्हणूं लागला; परंतु साल्बाईच्या तहानें मागचा तह रद्द झाला असें सांगून इंग्रजांनी ह्या वादात पडण्याचें नाकारलें. नाना फडणवीस तडजोड करण्यास तयार होते, पण गोविंदरावाच्या हट्टामुळें तडजोड झाली नाहीं इतक्यात एकाएकीं ( १ आगष्ट १७९३ ) मानाजीचें देहावसान झालें. मानाजी मेला तरी गोविंदरावास बडोद्यास जाण्याची परवानगी मिळाली नाहीं. पुण्यातील कारभारीमंडळ गोविंदरावास म्हणूं लागले कीं तुम्ही पूर्वीच्या सर्व अटी कबूल करून शिवाय सन १७८० सालीं इंग्रजांना देऊं केलेला तापीचा दक्षिणेकडील स्वतःचा प्रदेश व सुरतच्या वसुलातील आपला वाटा सरकारात द्या. इंग्रजांनीं यावर हरकत घेतली कीं, साल्बाईच्या तहान्वयें गायकवाडाचें कोणतेंहि काम न केल्यामुळें त्याचा मुलूख घेण्याचा पेशव्यास अधिकार नाहीं. पुढें गोविंदराव बडोद्यास गेला. तेथें त्याला खंडेरावाचा मुलगा मल्हारराव याच्याशीं लढाई करावी लागली, तींत मल्हारराव पराभव पावला व गोविंदराव सयाजीचा मुतालिक म्हणून राज्यकारभार पाहूं लागला.

आबा शेलूकर नावाचा इसम गुजराथेंत पेशव्यातर्फे सुभेदार होता. तो दौलतराव शिंद्याकडे गेला असतां तेथें त्यास कैद करण्यात आलें. हें कृत्य रावबाजीच्या सांगण्यावरून झालें. त्यात गोविंदरावाचा हात होता. परंतु शेलूकरानें दहा लाख रुपये देण्याचा दौलतरावाशीं करार करून आपली सुटका करून घेतली व परत येऊन तो अहमदाबादचा कारभार पाहूं लागला शेलूकर हा नाना फडनविसाच्या पक्षाचा असल्यामुळें बाजीरावानें गुप्तपणें गोविंदरावास त्याच्या विरुद्ध पुन्हा उठविलें. याच सुमारास शिंद्यांनींहि रकमेच्या भरपाईचा तगादा लावल्यामुळें शेलूकरानें गायकवाडाच्या काहीं गावापासून पैसा उकळला. त्यामुळें दोघामध्यें पुन्हा भांडणें सुरू झालीं. इ. स. १७९९ सालीं सुरतचा नबाब मरण पावला तेव्हा सुरतेच्या चौथाईचा गायकवाडाचा हिस्सा प्राप्त करून घ्यावा असा इंग्रजांनीं मनसुबा ठरविला व त्याप्रमाणें त्यानीं गोविंदरावास विनंति करून तो हक्क तर मिळविलाच, परंतु त्याबरोबर चौऱ्याशी जिल्हाहि आपखुशी पदरात पाडला. वास्तविक १७९३ सालीं पेशव्यांना जशी या सुरतेच्या हक्काबद्दल इंग्रजांनीं हरकत घेतली तशी या वेळेस पेशव्यांनाहि घेता आली असती पण पेशवे सध्या निर्बळ झाले होते. या देणगीबद्दल इंग्रजांना गोविंदरावानें शेलूकराविरुद्ध मदत मागितली पण इंग्रजांनी त्याबद्दल टाळाटाळच केली तथापि थोड्याच दिवसांनीं अहमदाबाद गायकवाडच्या हातीं आलें, आबा शेलूकर कैद झाला व पेशव्यानीं गायकवाडास आपला गुजराथेंतील हिस्सा वार्षिक पाच लाख रुपयावर पाच वर्षांकरिता इजाऱ्यानें दिला ( १८०० आक्टोबर ). इकडे गोविंदराव सप्टेंबरांतच मरण पावला. त्याच्या मागून त्याचा मुलगा कान्होजी हा मुतालकीचा कारभार पाहूं लागला. परंतु त्याच्या उद्दाम वागणुकीनें थोड्याच दिवसात आरबसैन्यानें त्याला पदच्युत करून आनंदराव ( त्याचा भाऊ ) यास कारभारी केलें त्यामुळें आनंदराव व त्याचा चुलता मल्हारराव यांत वैर माजलें. तेव्हा आनंदरावाचा दिवाण रावजी आप्पाजी यानें इंग्रजांकडे मदत मागितली व ती त्यानीं दिली. यावेळीं सर्व सत्ता आरबाच्या हातीं गेली होती. इंग्रजांच्या मदतीनें आनंदरावानें मल्हाररावाचा पराभव करून त्याला नडियादकडे ( कडी प्रांतात ) काहीं जहागीर दिली या सुमारासच गणपतराव व मुरारराव गायकवाड यांनीं धुंडाळी माजविली होती त्याचा पराभव होऊन ते धार येथें पळून गेले या दोन तीन प्रसंगीं केलेल्या मदतीबद्दल इंग्रजांनीं आपली तैनातीफौज गायकवाडावर रावजीआप्पाजीच्या तर्फे लादली; व तिच्या खर्चासाठीं बराचसा प्रांत घेतला, तसेंच स्वारीखर्चाबद्दलहि भरपूर पैसा मिळविला. लागलीच डंकन ( गव्हर्नर ) यानें रावजीशीं त्यानें केलेल्या या गोष्टीबद्दल गुप्त तह करून त्याचें व त्याच्या वंशजाचें रक्षण करण्याचें वचन दिलें. पुढें ( १८०२ ) गायकवाडाचें आरबसैन्य काढून टाकण्याबद्दल इंग्रजांनी आनंदरावास लकडा लाविला. परंतु आपली बाकी दिल्याशिवाय आरब जाईनात. उलट त्या रावास कैद केलें. तेव्हा इंग्रजांनीं त्याची आरबाची रक्कम देऊन टाकून त्यांना

कान्होजीनें बंड उभारलें पण तें इंग्रजांनीं मोडलें व तो उज्जनी-कडे पळून गेला इतक्यात मल्हाररावानें पुन्हां उचल केली. पण विठ्ठलराव नावाच्या सरदारानें त्याला कैद करून त्याचें बंड मोडलें. रावजी आप्पाजीनें गायकवाडीराज्याची सर्व सत्ता इंग्रजाच्या ताब्यात दिल्यानें, प्रजा त्याला घरभेद्या म्हणूं लागली. परंतु इंग्रज म्हणतात कीं त्यानें दूरवर दृष्टी देऊन योग्य मार्ग स्वीकारला. यापुढें काठेवाड आपल्या ताब्यात असावा अशी हाव इंग्रजांस उत्पन्न होऊन त्यांनीं गायकवाडाशीं १८०५ त तशा प्रकारचा एक तहहि केला.

वास्तविक सर्व काठेवाडावर गायकवाडाचा हक्क होता. रावजी मेल्यानंतर दिवाणपदाच्या बाबतींत त्यांचा भाऊ बाबाजी व पुत्र सीताराम यांत भांडणतंटे सुरू झाले. ( इ. स. १८०७ ) बाबाजीस इंग्रजांची मदत होती. यानंतर आबा शेलूकरास सोडून देऊन मेजर वॉकर यानें काठेवाड आपल्या ताब्यात घेण्यासाठीं तिकडे स्वारी केली. बाह्यतः काठेवाडातील गायकवाडाच्या मांडलिक संस्थानिकांनीं त्यांना द्यावयाच्या खडणीची सुव्यवस्था लावण्यासाठीं ही स्वारी आहे असें सांगण्यात आलें. त्याप्रमाणें झालवाड, मुचकुंद, हलर, वरडा, गोहिलवाड वगैरे संस्थानिकांच्या खडणीची कायमची व्यवस्था त्यानें लाविली. यानंतर आनंदरावानें उखामंडळातील बंडाळी मोडली. या सुमारास सीतारामानें इंग्रज व रावजी आप्पाजी यांच्या गुप्त तहाच्या आधारावर आपल्याला दिवाणगिरी मिळविण्याबद्दल खटपट केली; परंतु वॉकरनें तहाचें भाषांतर चुकलें आहे असें कारण दाखवून सीतारामाचा दावा काढून टाकला. कान्होजी हा यावेळीं बडोद्यास आला, तेव्हां त्याला कांहीं नेमणूक ठरवून पाद्रा येथें ठेविलें ( सन १८०८ ). त्याचप्रमाणें मुकुंदराव ( गोविंदरावाचा दासीपुत्र ) व मुरारराव ( गोविंदरावाचा औरस पुत्र ) यांनाहि नेमणूका ठरवून दिल्या. वॉकरनें सन १८१८ तील आपल्या खलित्यांत स्पष्ट म्हटलें होतें कीं, आपण कधीं कधीं गायकवाडाच्या खासगी गोष्टींतहि हात घातलेला होता. नवानगरच्या जामनें इंग्रजांविरुद्ध राजकारण केल्यानें इंग्रजांनीं गायकवाडाची मदत घेऊन त्याच्यावर स्वारी केली ( सन १८१२ ) व पोरबंदर आणि उखामंडळ यांतील बंडाळीहि मोडली. या सुमारास सीताराम यास पगाराबद्दल फौजेनें अडाविलें असतां ती रक्कम इंग्रजांनीं देऊन त्याची सुटका केली. आणि या उपकाराची फेड सीतारामानें आनंदराव व इंग्रज यांच्यांत झालेल्या पूर्वीच्या सर्व तहाचे अस्सल कागद इंग्रजांना परत देऊन केली. कान्होजीनें पुन्हां उचल केल्यावरून त्यास पकडून मद्रासेस पाठविलें. या वेळच्या रेसिडेंटच्या खलित्यावरून इंग्रजांचें गायकवाडाकडे असलेलें कर्ज फिटल्याचें समजतें; परंतु गायकवाडींतून इंग्रज अधिकारी काढून घेण्याचा प्रसंग आला तेव्हां त्याच रेसिडेंटानें कंपनीस कळविलें कीं, सन १८१६ पर्यंत कर्ज फिटणार नाहीं. या वेळींच गंगाधरशास्त्री पटवर्धन हा दिवाण होता. त्याची या रेसिडेंटानें फार तारीफ केली आहे. पुढें पालनपूर, राधनपूर, धांगध्रा, जुरिया येथील संस्थानिकांनीं गायकवाडाशीं नवीन तह केले. यानंतर पेशवे व गायकवाड यांच्यांत तेढ आली. गुजराथचा इजाऱ्याचा करार संपल्यानें तो पुन्हां करून घेण्यास गंगाधरशास्त्री पुण्यास गेला. पेशवे व गायकवाड या प्रत्येकांनीं परस्परांवर (१ कोटी) कर्ज काढलें. अहमदाबाद गायकवाडास पुन्हां देण्याची पेशव्याची इच्छा नव्हती म्हणून प्रकरण चिघळत चाललें व शेवटीं गंगाधरशास्त्री याचा खून झाला. सीतारामाचें व शास्त्र्याचें फार वाकडें होतें त्यामुळें कांहीं लोकांचें म्हणणें असें कीं, सीतारामाच्या पक्षाकडून शास्त्र्याचा खून झाला असावा. यावेळीं सीतारामानें धार येथें सैन्याची जमवाजमवहि केली होती. पेशव्यांना शास्त्र्याचा खून करण्यांत मुळींच फायदा नव्हता. कारण यामुळें गुजराथ हातची जाण्याचा संभव होता. उलट त्यास बक्षीस देऊन आपलासा करण्यांत फायदा होता असें कर्नल वॉलेस म्हणतो. सीतारामास लागलीच इंग्रज शिपायाच्या देखरेखीखालीं ठेवण्यांत आल्यावरून वरील म्हणण्यास पुष्टी मिळते. इंग्रजांचें कर्ज या सुमारास फिटल्यानें कंपनीनें आपला संबंध कमी करण्याबद्दल कार्नाक यास कळविलें, पण तें त्यानें जुमानलें नाहीं. गंगाधरशास्त्र्याचा दाब फत्तेसिंगावर फार होता, आतां फत्तेसिंग स्वतंत्रपणें वागूं लागला व त्यास आपल्यावरील इंग्रजांची सत्ता सपेना. त्यानें पसंत केलेला दिवाण न नेमतां कार्नाकनें आपण ठरवलेला प्रधान त्याच्यावर लादला, त्यामुळें फत्तेसिंगाचें मन फार खट्टू झालें. पुन्हां उखामंडळांत बंड उद्भवलें, तेव्हां गायकवाडास त्या प्रांतांत सतत शांतता ठेवतां येत नाहीं या सबबीवर इंग्रजांनीं ( द्वारकेशिवाय सर्व ) उखामंडळ स्वतः खालसा केलें. व काठेवाडांतील सर्व संस्थानिकांच्या खंडणीवसुलाच्या कामांहि त्यांनीं आपला अधिकार यापुढें गाजविण्यास प्रारंभ केला. पुन्हां ( सन १८१७ ) गायकवाडाशीं तह करून इंग्रजांनीं त्याच्याकडून तैनाती फौजेच्या वाढीबद्दल बराचसा मुलूख हस्तगत केला. याचवेळीं गायकवाडी फौजेनें इंग्रजांस पेंढाऱ्यांविरुद्ध सैन्याची मदत केली. पुढें ( सन १८१८ ) फत्तेसिंग व आनंदराव ( सन १८१९ ) दोघेहि मरण पावले. नंतर सयाजीराव वारस ठरून तो गादीवर बसला. फत्तेसिंग हा शेवटपर्यंत कारभारीच होता. सयाजी हुषार होता. यानें इंग्रजांकडे आपलें सैन्य, त्यांनीं माळव्याच्या लढायांत वापरल्याबद्दल रकमेची मागणी केली. तेव्हां इंग्रजांनीं उत्तर केलें कीं तुमच्या सैन्यानें आम्ही देशांत शांतता राखली, यांत तुमचाच फायदा झाला असल्यानें मोबदला कसला मागतां ? उलट आपलें सैन्य आम्हांपाशीं माळव्यांत ठेवावें, कारण तुम्हांला त्यावरील खर्च कोणताहि

धरावाच लागणार मध्यंतरीं आनंदरावाच्या राणीनें व सयाजीच्या दोन सावत्र आयांनीं आपापल्या मुलांबद्दल खटपट चालविली होती. पेशव्यांनीं इंग्रजाकडे काठेवाडांतील जमाबंदीवसुली दिली होती. त्याचा फायदा घेऊन गायकवाडाचा तो हक्क इंग्रजांनीं एकीकडे ठेवला. एवढेंच नाहीं तर खास गायकवाडाचीं जीं मांडलिक संस्थानें होतीं त्यानांहि त्यांनीं ढवळाढवळ सुरू केली. राजपिंपळा संस्थानात वारसान्या तंटयाचा फायदा घेऊन इंग्रजांनीं तेथची सारी व्यवस्था आपल्या ताब्यात घेतली व फक्त दरसालची खंडणी गायकवाडानीं घ्यावी असें ठरविलें. तसेंच गायकवाडास या संस्थानांच्या बाबतींत कठीण प्रसंगीं मदत न देता इंग्रजानीं आपला मात्र फायदा साधून घेण्याचा क्रम आरंभिला. पुढें एलफिन्स्टनची व सयाजीची जी भेट झाली ( १८२०—२१ ) त्यावेळीं त्यानें सयाजीस (१) कर्जफेड करणें, ( २ ) इंग्रजांशीं खुला व्यापार व व्यवहार ठेवणें, आणि ( ३ ) परराष्ट्राशीं इंग्रजाच्या संमतीशिवाय व्यवहार न करणें, या तीन अटी सांगितल्या व या पाळल्यास गायकवाडींतील अंतर्गत कारभारात आपण हात घालणार नाहीं असें सांगितलें. सयाजीनें हें सर्व कबूल केलें. दौलतीस यावेळीं जवळ जवळ एक कोटीचें कर्ज होतें. या सुमारास सीतारामानें पुन्हा दिवाणगिरीची खटपट इंग्रजाजवळ चालविली. परंतु ती त्यांनीं फेंटाळून लाविली. महिकांठ्यामधील गायकवाडाची जमाबंदी वसूल करण्याचें काम इंग्रजांनीं काठेवाडाप्रमाणेंच सयाजीची पर्वा न करता आपल्या हातीं घेतलें. एवढेंच नव्हे तर महिकांठ्यामध्यें असलेलें गायकवाडी सैन्य काढून टाकण्याचा तगादा त्यांनीं त्याच्या मागें लावला. काठेवाडालगत व महिकांठ्याशेजारी आपली हद्द असल्यानें व तुमच्या प्रांतात नेहमीं बंड उत्पन्न होतात त्यामुळें ही व्यवस्था करणें आम्हास भाग आहे असें इंग्रज म्हणत. या वेळीं फत्तेसिंगाच्या बायकोनें आपल्या दत्तक पुत्राबद्दल खटपट चालविली, परंतु ती इंग्रजांनीं हाणून पाडिली. या सुमारास बडोद्याच्या रेसिडेंटास जो वरिष्ठ सरकाराचा हुकूम आला होता त्यात सयाजीवर नजर ठेवावी व त्यानें दिलेल्या सर्व वचनावर लक्ष्य ठेवावें, मात्र आपलें वर्चस्व उघडपणें दाखवूं नये असा मजकूर होता. पुढें ( १८२१ ) एलफिन्स्टननें गायकवाडावर पुन्हा वीस लाखाचें कर्ज काढून खंबायतच्या नबाबानें वार्षिक पंचवीस हजाराची खंडणी द्यावी असें गायकवाड म्हणत व तो नाकारीत असे, शेवटीं इंग्रजानीं मध्यस्थी करून ही रकम साडेचार हजार ठरविली. पुढें सयाजीरावाचें व बडोद्याच्या रेसिडेंटाचें भांडण झालें. दौलतीला जें कर्ज होतें त्या कर्जाबद्दल सावकारांना इंग्रज हे जिम्मेदार राहिले होते. कर्ज फिटेना म्हणून रेसिडेंटानें तें सयाजीरायानें आपल्या खाजगींतून द्यावें अगर सावकारांना राज्यांतील महाल सात वर्षांच्या मक्त्यानें कर्जफेडीस लावून द्यावे असें ठरविलें यावद्दल सयाजीनें थेट वरपर्यंत भांडण नेलें, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट ही व्यवस्था अंमलात न आणल्यास आम्हाला सर्व राज्याचा वसूल करण्याचें काम जबरदस्तीनें हातात घ्यावें लागेल असा एलफिन्स्टननें सयाजीस दम भरला पुढें इंग्रजांनींच नऊ महाल ( पाच वर्षांपुरते ) आपल्या ताब्यात घेऊन ही कर्जाची खटपट धारली ( १८२८ ) त्याशिवाय (१८२९ त) तैनाती फौजेच्या खर्चाकरिता आणखीहि कांहीं महाल इंग्रजांनीं आपल्या ताब्यात घेतले. इंग्रजाचें व सयाजीरावाचें जास्त फाटत चालल्यानें खुद्द बडोद्यास सयाजीराव यांना पदच्युत करून त्याचा मुलगा गणपतराव यास गादीवर बसविण्याचा एक कट झाला ( १८३१ ) होता; परंतु तो उघडकीस येऊन त्याचा बीमोड करण्यात आला याच सुमारास मालकम हा जाऊन त्याच्या जागेवर लॉर्ड क्लेअर हा गव्हर्नर होऊन आला व त्यानें पूर्वीचें धोरण सोडून नवें सलोख्याचें धोरण स्वीकारलें त्यावर लागलीच सयाजीरावानेंहि तडजोड करून व आपल्या खानगींतून २५ लाखाची भरती घालून कर्जदाराची फेड केली त्यामुळें क्लेअर यानें नऊ परगणे ( जे पूर्वी कर्जफेडीकरिता तारण घेतले होते ) गायकवाडास परत दिले ( १८३२ एप्रील ) पोलिटिकल कमीशनर याच्या मनात पाच वर्षांची मुदत भरली तरीहि ते परगणे आणीक पाच वर्षे ठेवण्याची इच्छा होतीच, पण क्लेअरनें तें ऐकलें नाहीं तैनाती फौजेच्या खर्चाबद्दल सयाजीरावानीं दहा लाख रु इंग्रजाच्या स्वाधीन आगाऊच करून ठेवले ( १८३३ ) होते या वेळीं पुन्हा इंग्रज व सयाजीराव यांच्यात खटके उडावयास लागले. वल्लभदास नावाच्या अफुविक्याचा पक्ष घेऊन मुंबईचा गव्हर्नर ग्रांट यानें सयाजीरावाला कांहीं जबरीच्या मागण्या केल्या होत्या. इंग्रजाच्या जिम्मेदारी माणसाला त्रास दिल्याच्या आरोपावरून गायकवाडाच्या अंतर्गत कारभारात ग्रांट हा वाटेल तसा हात घालूं लागला व सयाजीरावासहि नाइलाजानें त्याचें म्हणणें ऐकावें लागलें पुढें कार्नाक हा गव्हर्नर झाला. त्यानें हिंदुस्थान सरकारच्या संमतानें सयाजीरावांना कळविलें कीं, तुम्ही आमच्या हुकूमास व मागण्यास नाकबूल झाल्यास तुम्हास पदच्युत करून तुमच्या मुलास गादीवर बसवूं असें सांगूनहि इंग्रजांनीं गायकवाडाचा पेटलाद प्रांत आपल्या कबजात घेतला ( १८३८ ) आणि तैनाती फौजेपैकीं गुजराथ घोडदळ ( सयाजीराव यास शिक्षा म्हणून ) वाढविण्यात येऊन त्याचा सालीना तीन लाखाचा बोजा गायकवाडावर लादला ( १८३९ ) याबद्दल सयाजीरावानीं पुष्कळ तक्रार केली पण इंग्रजांनीं ती ऐकिली नाहीं सयाजीरावानीं १८४० त सतीची चाल बंद करून पुढें गुलाम विकण्याची पद्धत बंद केली ( १८४७ ). इंग्रजांनीं अखेरीस ( १८४०–४१ )
आपल्या अजावीस मागण्या गायकवाडाकडून
दिल्या व ही वहादारी ( इंग्रजांनी ,
कांहींची घेतलेली जिम्मेदारी ) पद्धत १५०

( १८४५ सुमार ). या पद्धतीमुळें इंग्रजांना अनायासें व वाटेल तसा आपला हात संस्थानी कारभारात शिरकविता येत असे. या वेळीं तत्कालीन इंग्रज अधिकारी लांच घेत. *यामुळें गुजराथेंत असें लोकमत झालें होतें कीं, प्रत्येक इंग्रज* लाचखाऊ असतो ( रूलर्स ऑफ बडोदा. पृ. २२७ ). या लाचलुचपतीस त्यावेळीं 'खटपट' असें दरबारी नांव मिळालें होतें. हा प्रकार सर जे. औटरम यास बंद करण्यास फार त्रास पडला. त्याच्या आड त्याचेच मित्र व वरिष्ठ अधिकारीहि आले होते ( कित्ता ). यानंतर थोड्याच दिवसात सयाजीराव मरण पावले ( दिसेंबर १८४७ ).

## वंशावळ




टीप.—ज्याच्या शेजारीं अथवा खालीं * अशी खूण आहे ते पुरुष गादीवर बसले होते असें समजावें
( रूलर्स ऑफ बडोदावरून )

सयाजीराव हे नावाजण्यासारखे राजे होते. प्रजेचे ते आवडते होते. इंग्रजाच्या पकडींतून सुटण्याचा त्यांनीं फार प्रयत्न केला. तत्कालीन इंग्रजाच्या अधार्मीपणामुळें त्याचा स्वभाव हट्टी बनला असें रूलर्स ऑफ बडोदा या पुस्तकाच्या कर्त्याचें मत आहे(पृ२३२) इंग्रजांनीं निरनिराळ्या सबबींवर जप्त केलेला सर्व मुलूख त्यांनीं पुन्हा सोडविला त्यांनीं आपले बेत बहुतेक पार पाडले. लष्कर, सरदार, सावकार, मुत्सद्दी व प्रजा या सर्वांवर त्यांचें वजन होतें आणि शेवटीं त्यांनीं इंग्रजाच्या,

आपल्या संस्थानात ढवळाढवळ करण्याच्या कृत्यास घोंघ घातला त्याना पाच औरस पुत्र होते पैकी वडील गणपत राव हे गादीवर आले हे स्वभावानें गरीब व नाकर्ते असून फारसे शिकलेले नव्हते राज्यकारभार बहुधा दिवाणाच्या सल्ल्यानेंच चालत असे यानीं प्रवास फराच केला होता याच्यावेळीं गुजराथेंत आगगाडी सुरू झाली गणपतरावांनीं *ग्रेंच्या जमानींची नुकसानभरपाई व संस्थानाचा मार्गावरील* जकातीचा तोटा हे भरून मिळण्याच्या अटीवर आपल्या राज्यातील जमीन आगगाडास देऊ केली ( १८५६ ) यांचें व यांचा भाउ खंडेराव यांचें नांगलेंस सूत नव्हतें तांबवेकर नांवाच्या दिवाणावरून गणपतराव व रेसिडेंट औटरम यांचेंहि बिनसलें होतें हें भांडण गव्हर्नर जनरलपर्यंत गेलें होतें ( १८५४ ) त्यापुढें विशेष काहीं न घडता गणपत राव हे १९ नोव्हेंबर १८५६ त मरण पावले त्याना पुत्र नसल्यानें त्याच्या पश्चात त्याचे धाकटे भाऊ खंडेराव हे गादीवर बसले ( खंडेराव गायकवाड यांचें चरित्र मागें येऊन गेलें आहे तें पहा ) त्याच्या नंतर मल्हारराव हे त्याचे भाऊ गादीवर बसले ( त्याच चरित्र पुढें मल्हारराव पहा ) आणि त्याच्या पश्चात विद्यमान सयाजीराव महाराज हे गादीवर आले

याप्रमाणें या बडोद्याच्या गायकवाड घराण्याची साधारण माहिती आहे याशिवाय भ्वारहेर, अतापुर, सनखेडा, कडी, खानदेश वगैरे *ठिकाणीं या गायकवाड* घराण्याच्या शाखा आहेत अशा शाखापैकीं एका खानदेशच्या शाखेंतील पिलाजीच्या प्रतापराव नावाच्या मुलाच्या वंशातीलच प्रस्तुतचे सयाजीराव महाराज हे दत्तक घेतलेले आहेत

[ कर्नल वॅलेस-गायकवाड ॲन्ड हिज रिलेशन्स विथ दि इंग्लिश गव्हर्नमेन्ट, दि रूलर्स ऑफ बडोदा १८७९, ग्रँट डफ, तिन्ही भाग ]

**गायत्री**— ( १ ) ऋग्वेदाच्या तिसऱ्या मंडलातील ६२ व्या सूक्ताच्या विश्वामित्रानें दृष्ट अशा १० व्या ऋचेला गायत्री म्हणतात प्राचीन काळीं मंत्रपाठकाचे गायत्र, अर्की वगैरे वर्ग होते यासंबंधीची माहिती ज्ञानकोश वि २ मध्यें आली आहे गायत्री हें वेदातील अष्टाक्षरी वृत्ताचें नाव आहे व वैदिक वाङ्मयात( ब्राह्मण ग्रंथातून )याच अर्थानें गायत्रीचा उल्लेख येतो ऐतरेय *ब्राह्मणाच्या तिसऱ्या पंचिकेंत याच अर्थी* गायत्रीची कथा आली आहे संध्याकर्मांतील जो गायत्री मंत्र गायत्री छंदात आहे त्या गायत्री मंत्रास ब्राह्मणग्रंथापर्यंत वैशिष्ट्य आलेलें आढळत नाहीं, परंतु विशिष्ट गायत्री मंत्र हाच होय याबद्दल सूत्रांत पुरावा मिळतो उपनयनसंस्कारात या गायत्री मंत्राचा उपदेश होत असतां शतपथसूत्रांत उपदेशप्रसंगीं *या मंत्राचा विनियोगदृष्ट्या प्रत्यक्ष* पाठ प्रथमच केलेला आढळतो त्यावरून गायत्री मंत्र हाच होय हें सिद्ध होत सविता देवतेच्या उपासनेकरिता सर्वत्र हाच मंत्र का रूढ आहे याचें निश्चित कारण देता येत नाहीं कदाचित उपलब्ध ऋक्संहितेंतील सवितृ देवतात्मक गायत्री छंदातील हा पहिलाच मंत्र आहे हें कारणहि असेल सर्व स्मार्त सूत्रकारानीं या मंत्रास गायत्री असें नाव न देता सावित्री असें नाव दिलें आहे आश्वलायन गृह्यपरि*शिष्टात संध्याकर्मांत गायत्री मंत्राचे छंदर्षी देताना या* मंत्राची देवता गायत्री असल्याचा उल्लेख केला आहे व संस्काररत्नमाला, संस्कारकौस्तुभ वगैरे प्रयोगकारांनींहि गायत्र्युपदेशप्रकरणीं या मंत्राचा गायत्री म्हणूनच उल्लेख केला आहे. आश्वलायन गृह्यपरिशिष्टात संध्याकर्मांत गायत्री जपाच्या आरंभीं गायत्री ही देवता कल्पून तिचें प्रातःकाल,माध्यान्हकाल व सायंकाल या तीनहि काळीं सर्ध्येत करावयाचें एकच ध्यान प्रथम देऊन त्यापुढें तीन वेळचीं निरनिराळीं ध्यानें दिलीं आहेत त्यामध्यें वरील तिन्ही कालाच्या अनुक्रमें ऋक्, यजु व सामरूपीं *गायत्रीचें* वर्णन असून कालपरत्वें गायत्रीचे वर्ण, वाहन,दवता,वसन इत्यादिकाचे निरनिराळे प्रकार दिले आहेत *गायत्रीजपाच्या* पूर्वी गायत्री मंत्राचा न्यास परिशिष्टकारानें दिला आहे परंतु त्याच ठिकाणीं हा न्यासविधि अवैदिक आहे असें म्हटलें आहे वरील विवेचनावरून गायत्रीमंत्राचा जप करण्याची चाल सूत्रकालात सुरू झाली असावी व त्या मंत्राचे सावित्री हें *नाव रूढ असून सूत्रकालानंतर गायत्री हें नाव रूढ झालें* असावें त्रैवर्णिकात या मंत्राचें महत्व अतिशय मानिलें जातें गायत्री मंत्राच्या संध्येंतील जपाशिवाय गायत्री पुरश्चरण नावाचा आणखी एक विधि आहे त्याचें विवेचन गायत्री कल्प वगैरे ग्रंथातून आढळतें शंकराचार्यांनीं गायत्री मंत्रावर बरीच विस्तृत टीका लिहिली आहे

भू, अंतरिक्ष व स्वर्लोक याच्या आठवणीसाठीं गायत्री *मंत्राच्या अगोदर व्याहृतींचा* उच्चार करण्यात येतो " त सवितृयाचें वरेण्य भर्ग ( तेज ) आम्ही स्तवितो, जें आमच्या बुद्धीस प्रचोदना देईल ' असा गायत्री मंत्राचा भावार्थ आहे गायत्रीमंत्र ही सूर्याची एक साधी स्तुति आहे व याच अर्थानें हा मंत्र प्राचीन लोक जपत असत असं एक मत आहे या मंत्राचें महत्व इतकें स्थापन झालें आहे कीं, आर्य आणि व्रात्य किंवा शूद्र यातील मुख्य फरक या *मंत्राचा उपदेश किंवा त्याचा अभाव यावर अवलंबून राहिला*

[ संहिता व ब्राह्मणें, डौसनकृत हिंदु क्लासिकल डिक्शनरी ]

( २ ) *ब्रह्मदेवाची सावत्र मुलगी व पत्नी जी शतरूपा* तिलाहि गायत्री नाव लावतात हरिवंशात शिवाच्या स्त्रीलाहि *गायत्री नाव दिलें आहे*

**गार पगारी**—मध्यप्रांतात आढळणारी एक जात लोकवस्ती सुमारें ९ हजार हे शेतावर पडणाऱ्या गारांचें निवारण करतात अशी समजूत आहे व तारा, ओतारी,

धानकर, हुरण्या, वाघ, दवडे अशीं यांचीं नांवें आहेत मावशांच्या मुलास नातें आठवतें तोंपर्यंत परस्पर लग्नें करतां येत नाहींत यांचीं लग्नें कुणब्याप्रमाणें होतात विधवाविवाह सुद्धां होतात पण कोणी कोणी बायका 'भगत' बनतात त्या पुरुषाचा पोषाख घालून यात्रा करतात घटस्फोटाची जरी मोकळीक आहे तरी बायकाच्या कमतरतेमुळें हे घटस्फोट करीत नाहींत आणि 'दसवारी भाजी जर कोणी फुकट देव ढींत नाहींत तर ३॥ हाताची बायको कशी टाकावयाची' असें म्हणतात गारांचें भविष्य वर्तविण्यास व त्यांचें निवारण करण्यास हे अनेकप्रकारचे मंत्रतंत्र व जादूटोणे करतात व प्रसंगी आपल्या मुलाचा वधहि करून त्यागा करतात गारपगारी गावांत नसला तर त्यांची बायको गारांचें निवारण व्हावें म्हणून मार्गानें पुढें लुगडें सोडून उभी रहाते व त्या ब्रह्मचारी देवाला आपल्या दिगंबर स्वरूपानें भेडसावते असें रसेल व हिरालाल वर्णन करतात छत्तीसगडांत बैगा व बरई लोक गारपगारीचें काम करतात

ग्रीक लोकांतील गारपगाऱ्यास शलाझो फुलक्स म्हणत व तो आपलें रक्त काढून त्यांचें निवारण करी ख्रिस्ती लोकांत देखील त्याचे उपाध्याय फ्रान्स देशांत हा कामगिरी करीत असें फ्रेझर म्हणतो आजकाल यांच्यावरून लोकांचा विश्वास उडाल्यामुळें यांची वृत्ति बुडाली आतां नवार विणण्याचा धंदा व शेतकी हे लोक करतात. कुणबी लोक यांच्या हातचें पाणी पीत नाहींत यांच्या नावामागें नाथ शब्द असतोच

**गारफील्ड जेम्स अब्रॅम** (१८३१-१८८१)—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानाचा हा विसावा अध्यक्ष, १८३१ साली ओहिओंतील ऑरेंज नामक शहरीं जन्मास आला त्याचें प्राथमिक शिक्षण सामान्य शेतकऱ्याप्रमाणें जि ल्ह्यांतील शाळेंत झालें व त्या ठिकाणीं रॉबिन्सन क्रूसोसारखीं अल्प येटनाचीं अद्भुत कथानकें वाचल्यामुळें त्याला खलाशी होण्याची इच्छा झाली क्षाराच्या कारखान्यांत काम करीत असतांना एकदां त्या कारखानदाराच्या मुलीनें त्याचा उपमर्द केला व तें सहन न झाल्यामुळें तो घरीं आला व शिक्षक होण्याची इच्छा धरून त्यानें चेस्टर येथील एका शाळेंत अभ्यास केला शिक्षक, सुतार व शेतकरी या नात्यानें कामें करून विल्यम्स कॉलेजांत नांव घालून व परिस्थितीशीं झगडून त्यानें १८५६ साली हिरॅम येथील इक्लेक्टिक इन्स्टिटयूटमध्यें प्रथम विद्यार्थी या नात्यानें व नंतर प्राचीन भाषा व वाङ्मय याचा प्रोफेसर म्हणून व पुढें त्याच संस्थेचा प्रिन्सिपाल म्हणून चांगलें नांव मिळविलें

त्यानंतर लवकरच तो राजकीय चळवळींत पडला प्रजासत्ताक पक्षाच्या आरंभकाळीं व १८५७ आणि १८५८ च्या मोहिमाच्या वेळीं उत्कृष्ट वक्ता व गुलामगिरीचा निषेधक म्हणून तो पुढें आला १८५९ साली आपल्या कर्तृत्वाच्या जोरावर तो ओहिओसिनेटमध्यें निवडून आला फुटून राहिलेल्या संस्थानावर दंडपशाही गाजविण्याचा सरकारचा हक्कच आहे असें त्याचें मत होतें मिलियन वॉर बिलाचें त्यानें समर्थन केलें आहे जेव्हां युद्ध उपस्थित झालें त्यावेळीं तो लेफ्टनंटच्या पदास चढला व आपल्या पूर्वीच्या विद्यार्थ्यांतूनच त्यानें रिक्रूट भरती केली १८६२ त तो स्वयंसेवकाचा ब्रिगेडियर जनरल झाला त्याच सालीं तो कॉंग्रेसचा सभासदहि झाला पुढें १८६३ मध्यें आपलें लष्करी कमिशन सोडून देऊन त्यानें हाउस ऑफ रिप्रिझेंटेटिव्ह मध्यें आपला प्रवेश करून घेतला रिपब्लिकन पक्षांतील रॅडिकल लोकांच्या बाजूस तो असे व त्यानें अनेक कमिटयांवर महत्त्वाचीं काम केलीं १८६३ ते ७३ च्या दरम्यान गुलामगिरीविरुद्ध त्यानें अनेक व्याख्यानें दिलीं १८७१ साली रिपब्लिकन पक्षास वाईट दिवस आले व गारफील्डवर अनेक दोषारोप करण्यांत आले, परंतु १८७६ मध्यें तो पुन निवडून आला १८७७ त तो हाऊस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हजचा पुढारी झाला परंतु डेमोक्रॅट लोकांचें सख्याधिक्य जास्त असल्यानें त्याचा पराभव झाला १८८० साली रिपब्लिकन पक्षाला एक उमेदवार अध्यक्ष म्हणून नेमावयाचा होता जेम्स जी ब्लेन आणि जान शरमन यांच्या तर्फेच्या लोकांमध्यें अहमहमिका सुरू झाला यातच जनरल ग्रँट यास हाणून पाडण्याचाहि प्रयत्न सुरू होता अशा वेळीं गारफील्ड यांचें आयतेंच फावलें लोकसभेंतील अनेक वर्षांची सेवा, स्वपक्षाचा पुढारीपणा, वक्ता म्हणून झालेला बोलबाला व संयुक्त संस्थानाच्या सीनेटमध्यें त्याची नुकतीच झालेली निवडणूक या सर्व गोष्टींमुळें साहजिकच योग्य मनुष्य म्हणून जनतेचें त्याच्याकडे लक्ष वेधलें दुर्दैवानें स्वपक्षांतील तीव्र मतभेद काढून टाकणें त्यास जड जाऊं लागलें प्रेसिडेंट झाल्यावर ब्लेन यास त्यानें सेक्रेटरी ऑफ स्टेट म्हणून नेमलें त्यामुळें विरुद्ध पक्षांत मोठीच खळबळ उडाली न्यूयॉर्कच्या सीनेटराचा संमति न घेतां त्यानें रॉबर्टसनची न्यूयॉर्कच्या कलेक्टरच्या जागीं नेमणूक केला त्यामुळेंहि बराच असंतोष माजला त्यावेळीं पक्षद्वेष इतका माजला होता कीं, एका विरुद्ध बाजूच्या मनुष्यानें वॉशिंग्टन रेल्वे स्टेशनावर त्यास गोळी घातला १९ सप्टेंबर १८८१ साली गारफील्डचें प्राणोत्क्रमण झालें

१८८२ साली दोन मोठ्या विभागांत, बोस्टन येथें बर्क ए हिन्सडेल यानें प्रेसिडेंट गारफील्ड याचे ग्रंथ प्रसिद्ध केले

**गारिसपूर**—ग्वालेर संस्थानांत हें खेडेगांव आहे हल्लीं जरी याचें महत्त्व फारसें नाहीं तरी पूर्वी ह्याच ठिकाणावरून माळवा ते बुंदेलखंड हा रस्ता जात होता हें ठिकाण प्रथम गोंड लोकांनीं घेतलें व नंतर मोंगल लोकांनीं आपल्या ताब्यांत घेतलें व त्या ठिकाणचीं सर्व देवळें पाडून टाकलीं पूर्वीच्या भव्य इमारतींपैकीं कांहीं अवशेष शिल्लक आहेत त्यांपैकीं 'अष्टखाव' हा प्रचंड देवळाचा अवशेष आहे मालदेवी नावाच्या जुन्या देवळाचाहि हल्लीं एक पडित

भाग सांपडतो. ह्या इमारतीशिवाय मानससरोवर व आणखी एक अशीं दोन तळीं आहेत.

**गारुडी**— धंद्यावरून बनलेली या नावाची जात मुंबई इलाख्यात आढळते. ही साप खेळविणाऱ्यांची व जादूटोणा करणाऱ्यांची एक जात आहे. ठाणें जिल्ह्यांत यांची घरगुती बोली गुजराथी आहे. कृष्णवर्णी सदृढ व काटक असे हे लोक आहेत. हे स्वभावतः शांत, अतिथिपूजक असले तरी फार आळशी व कट्टे दारूबाज असतात. यांची रहाणी गलिच्छ असते. उपाध्याय ब्राह्मण असून तो लग्न चालवितो. हे लोक ब्राह्मणांना मान देतात व देवी भवानीची पूजा करतात. एकादशीच्या दिवशीं व नवरात्रांत उपोषणें करतात. यांच्यात जातिसभा नाहीं. विधवाविवाह संमत आहे. मृताच्या बाराव्या दिवशीं कावळ्याला बली अर्पण करतात. हे सापाचे खेळ करून पोट भरतात.

सातारा जिल्ह्यात मुसुलमान गारुड्यांची वस्ती असून त्यांचे मुख्य ठिकाण मिरज आहे. कोल्हाटी जातींतील कांहीं माणसें बाटून या जातींत आलीं असावीत. यांच्या चालीरीती मुसुलमानी दिसत नाहींत [ मुं. ग. ]

**गार्डनरीच**—बंगालच्या बराकपूर पोट जिल्ह्यांतील एक शहर. लोकसंख्या ( १९११ ) ११,५८०. येथें ताग व कापूस यांच्या गिरण्या आहेत. शामनगर नावाच्या खेड्याचा समावेश या शहरातच झाला आहे. १८९६ मध्यें याला स्थानिक स्वराज्याचे अधिकार स्वतंत्रपणें मिळाले. १८९६ पर्यंत याचा समावेश नॉर्थ बराकपूर म्युनिसिपालिटींतच होत असे.

**गारो टेंकड्या**—आसामधील अगदीं नैर्ऋत्येकडच्या जिल्ह्याचें गारोहिल्स असें नाव आहे. याचें क्षेत्रफळ ३१४० चौ. मै. आहे. यांतील बहुतेक मुलुख टेंकड्यांनीं व्याप्त आहे. या जिल्ह्याच्या मधोमध, या टेंकड्यांच्या तुरा व अर्बेला अशा दोन समांतर रांगा झालेल्या आहेत. नोरकेक हें सर्वांत उंच शिखर आहे. या जिल्ह्यात सोमेश्वरी नदी मुख्य असून ती तुरा टेंकडीच्या उत्तरेस उगम पावून कागसा नदीला मिळते. सर्व टेंकड्यांवर जंगल पसरलेलें असून तें नेहमीं हिरवें असतें. जंगलात साल वगैरे झाडें व उंच वेतासारख्या वनस्पती यांची वाढ होते. वाघ, हत्ती, अस्वलें, हरणें, इत्यादि पशूंची समृद्धि आहे. सर्व जिल्हा मलेरियानें दूषित आहे. पावसाचें प्रमाण सरासरी १२५ इंच आहे.

**इतिहास.**—या जिल्ह्याच्या पूर्वेतिहासाविषयीं म्हणण्यासारखी माहिती नाहीं. गारो लोक बहुधा जुन्या हिंदू राजांनीं त्यांना बंगालमधून हाकून दिल्यावर ते इकडे आले असावेत. बंगाली जमीनदारांचें गारो लोकावर फार वर्चस्व असे व त्याच्या जुलमामुळें हे लोक फार त्रस्त झाले होते. त्यांनीं हें जमीनदारांचें वर्चस्व कमी करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण त्यात त्यांना यश आलें नाहीं. १८४८ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीच्या एका कामगाराला या लोकांनीं मारल्यामुळें कंपनीनें त्यांच्यावर सैन्य पाठविलें व जिल्ह्यांतील पुष्कळ खेडीं आपणच होऊन त्यांच्या स्वाधीन झालीं. १८७० सालीं गारोटेंकड्या हा स्वतंत्र जिल्हा पाडण्यात आला.

या जिल्ह्याची लोकसंख्या १९११ सालीं १५८९३६ होती. या जिल्ह्यात एकंदर १९३७ खेडीं आहेत. या जिल्ह्यातील लोकांत वन्य, हिंदू व मुसुलमान लोकांची संख्या बरीच आहे. गारो, रभा, इत्यादि भाषा येथें प्रचलित आहेत. हे गारो लोक आपणास डोंगरी लोक म्हणवितात. यांच्या सुमारें १५ जाती आहेत व त्या स्थलविभागावरून बनलेल्या आहेत असें दिसतें. गारो लोक दिसण्यांत ठेंगणे पण जाडे व दणकट गडी असून त्यांचे डोळे तिरवे व डोकें मोठें असतें. हे दिसण्यात भव्य दिसतात. यांचा स्वभाव ज्यात्या आनंदी व ममताळू आहे. यांचीं घरें झोंपडीवजा असतात. घरें टेंकडीच्या उतारावर बसलेलीं असल्यानें, झोपड्याची एक बाजू टेंकडीवर बसलेली असते. यांचीं घरें धाबूचीं असतात. गारो लोक पक्त लंगोटीवजा एक लांब पट्टीच नेसतात व तीच कमरेभोंवतीं गुंडाळतात. स्त्रिया गुडघ्यापर्यंत परकरासारखें वस्त्र वापरतात. स्त्रियांच्या कानात पितळेचीं कर्णभूषणें असतात. भाला, ढाल व दुधारी तरवार हीं गारोंचीं हत्यारें होत. यांचें खाण्याचें मुख्य धान्य तांदूळ आहे.

गारो लोक, समान कुलाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि कुलाशीं बेटीव्यवहार करतात लग्नाच्या वेळीं कोंबडा-कोंबडीचा बळी देण्यात येतो घटस्फोट व पुनर्विवाह यांच्यात रूढ आहेत. गारो स्त्रिया या नीतिसंपन्न व सदाचरणी असतात. यांच्यात मृताला जाळण्याची चाल आहे मृताच्या अस्थी घराच्या आसपास पुरण्यात येतात व मृताचें स्मारक म्हणून घराच्या आवारात एक खांब पुरतात गारो लोकांचा परमेश्वरावर व पुनर्जन्मावर विश्वास आहे. भुताखेतावर यांची श्रद्धा असून, त्यांचेंहि गारो लोक पूजन करतात. गारो लोक चांगले सुखवस्तू व श्रीमंत आहेत.

गारो लोकात झूम नावाची शेतीची पद्धत आढळते. यांना नांगर वै पावडें यांचा उपयोग माहीत नाहीं. जिल्ह्यात तांदूळ, कापूस, बटाटे, नीळ, हळद इत्यादि जिनस पिकतात. कालवे वगैरे पाणीपुरवठ्याची सोय नाहीं. गुराढोरांचा उपयोग गारो लोक दुभत्याकडे करीत नाहींत. ढोरांचा उपयोग खाण्याकडे करतात जिल्ह्यातील जंगलामध्यें साल वगैरे वृक्ष आहेत. हीं झाडें तोडून तीं विकण्याला यांना परवानगी आहे विक्रीवर यांना कर मात्र द्यावा लागतो. जिल्ह्याच्या वायव्य भागांत कोळशांची खाण आहे. सोमेश्वरीच्या दरींत पेट्रोलियमच्या खाणी लागल्या आहेत. चुन्याचा दगड व चिकण माती या जिल्ह्यात आढळून येते. गारोटेंकड्या जिल्ह्यांत नाव घेण्यासारखा कोणताच होत नाहीं. मातकाम, विणकाम, इत्यादि प्रचारांत आहेत. कापूस, जंगलातील

लाख इत्यादि जिनस येथून बाहेर जातात व तांदूळ, गुरेढोरें, कपडा इत्यादि मालाची आयात होते तुरा येथून ब्रह्मपुत्रा नदीच्या रेनमारी घाटाकडे व मैमनसिंग जिल्ह्याकडे असे दोन गाडी रस्ते जातात. डाबुजगला ते डामरापर्यंत २४ मैलाचा नवीन गाडीरस्ता १९०० च्या सुमारास तयार झाला.

या जिल्ह्याचे दिवाणी फोजदारीचे अनियंत्रित अधिकार या जिल्ह्याच्या डेप्युटी कमिशनरकडेच आहेत चीफकमीशनरच्या परवानगीनें या डेप्यूटीकमिशनरला फांशी देण्याचा अधिकार आहे येथील व्यवस्थेकरता चीफकमीशनरनें स्वतंत्र कोड केलं आहे या जिल्ह्यात तालुके वगैरे पोट विभाग नाहींत तुरा येथें एक मुख्य एंजिनीयर व एक जंगल कामागार असतो. लास्कर नावाच्या ग्रामाधिकाऱ्याना किरकोळ गुन्हे व दिवाणी लष्करी यांचा निकाल लावण्याचा अधिकार असतो पोलीसची कामेंहि यानाच करावीं लागतात येथें एक लष्करी अधिकारी असतो व त्याला मॅजिस्ट्रेटचे अधिकार असतात या जिल्ह्यातील खेड्याची रचना लोकसत्ताक तत्वावर झालेली आहे. जिल्ह्याच्या बंदोबस्तासाठीं एक जिल्हासुपरिंटेंडेंट असून त्याच्या हाताखालीं काहीं अधिकारी व शिपाई असतात तुरा येथें एक तुरुंग आहे गारो जिल्हा शिक्षणाच्या बाबतींत अत्यंत मागासलेला आहे.

**गारोडी**—जिल्हा पुणें तळेगाव दाभाडयाच्या दक्षिणेस सुमारें दहा मैलावर ही ५०० फूट उंचीची टेंकडी आहे. टेंकडीवर खिस्ती शकाच्या आरंभीं खोदलेलीं काहीं लेणीं आहेत त्यापैकीं एका लेण्यावर आंध्र अथवा दक्षिणी पाली लिपींत इ स १०० च्या सुमारास खोदलेला एक लेख आहे.

**गार्गी**—वचक्नु ऋषीची कन्या म्हणून हिला गार्गीवाचक्नवी असें नाव ग्रंथात आहे. ही परम ब्रह्मनिष्ठ असून परमहंसाप्रमाणें पृथ्वीवर संचार करीत असे. हिचा दैवराती जनकाच्या सभेंत याज्ञवल्क्याशीं वाद झालेला, बृहदारण्यकातील मधुकांडात प्रसिद्ध आहे

**गार्डो**—यूरोपांतील लॉम्बर्ड सरोवरापैकीं गार्डा हें एक विस्तृत सरोवर असून जिनीव्हा व कॉन्स्टन्स हीं दोनच सरोवरें त्याहून मोठीं आहेत याचे थेट उत्तरेकडील टोंक रिव्हायाच्याखेरीज याचा सर्व भाग इटलीच्या ताब्यात आहे हें आदिजे नदीच्या खोऱ्याच्या दक्षिणेस आहे व आदिजे नदीच्या व याच्या दरम्यान मॉन्ट बॉल्डो आहे. यास उत्तरेकडून सार्का नदी येऊन व दक्षिणेस मिन्सिओ नदी उगम पावून पो नदीस मिळते याचें क्षेत्रफळ १४३ चौ मै. आहे. हें सरोवर समुद्रसपाटीपासून २१६ फूट उंच आहे व जास्तींत जास्त १९१६ फूट खोल आहे. हें उत्तरेकडे अरुंद होत गेलें आहे परंतु पूर्वेकडे गार्डा व पश्चिमेकडे सॅलो याच्या याचा आकार वर्तुळ असून, सर्मियोन नावाच्या भूशिराच्या योगानें दक्षिण किनाऱ्याचे दोन भाग झाले आहेत या रचनेमळें यामध्यें वादळें फार उत्पन्न होतात चोरिया अथवा सूअर या नावाचें एक उत्तरेकडून वादळ येतें तें अत्यंत भयानक असतें. शिवाय ओरा इत्यादिकांसारखीं अनेक वादळें या सरोवरात उपस्थित होतात. पूर्वेकडील मॉन्ट बाल्डोवरील चुनखडी व पश्चिम व दक्षिण किनाऱ्यावरील सुंदर बागाइत यांचा विरोध फारच विलक्षण होय गार्ग्नानो व सॅलो यामधील पश्चिम किनाऱ्याचा प्रदेश उष्ण असून तेथें लोक हिवाळयात राहण्याकरितां येतात पश्चिम किनाऱ्यावर सॅलो, टॉस्कोलॅनो, गार्ग्नानो व लिमोन हीं शहरें असून पूर्वेकडे फक्त बार्डोलिनो व गार्डो हीं दोनच आहेत उत्तरेकडील टोंकावर रिव्हा आहे

**गार्डिनर, सॅम्युएल रासन ( १८२९–१९०२ )**—एक अर्वाचीन इंग्लिश इतिहासकार याचा जन्म आलरेस फोर्ड जवळ झाला लंडन येथील किंग्ज कॉलेजमध्यें तो कांहीं दिवस इतिहासाचा अध्यापक होता त्याला प्युरिटन् लोकानीं घडवून आणलेल्या क्रांतीचा इतिहासकार समजतात. त्याच्या पुस्तकातील माहिती बिनचूक असून ती बऱ्याचदशा हस्तलेखावरून मिळविलेली आहे मानवजातीच्या नैतिक, धार्मिक व राजकीय प्रगतीची माहिती ज्यापासून होईल अशा गोष्टींना आपल्या ग्रंथातून तो फार महत्व देतो. त्यानें सविस्तर माहिती आपल्या पुस्तकातून दिल्यामुळें तीं बरींच मोठीं झालीं आहेत. तरीपण ती सर्व माहिती त्यानें नि.पक्षपातानें दिली आहे. त्याची भाषा जरी जोरदार नसली तरी पण समजण्यास सोपी आहे. तिचा वाचकाच्या मनोविकारावर परिणाम न होता विचारावर जास्त परिणाम होतो. त्यानें इतर पुस्तकें लिहिलीं आहेत. तरी पण त्याच्या इग्लंडच्या इतिहासामुळेंच त्याचें नाव नेहमीं लोकांच्या तोंडीं राहील 'दि इंग्लिश हिस्टॉरिकल रिव्हयू' चा तो संपादक असून 'डिक्शनरी ऑफ नॅशनल बायॉग्रफी' त त्याचे बरेच लेख आहेत. ऑक्सफोर्ड, एडिंबरो व गॉटिन्जेन विश्वविद्यालयांनीं त्याला बहुमानार्थी पदव्या दिल्या होत्या.

**गॉल**—आल्प्स, भूमध्य समुद्र, पीरीनीज, अटलांटिक महासागर व ऱ्हाईन इत्यादींनी मर्यादित असलेला व केल्टिक भाषा बोलणाऱ्या लोकाचा प्रदेश इ. स. पूर्वी सुमारें २१८ त रोमन सैन्यानें या प्रदेशात प्रवेश करण्यास सुरुवात केली. इ स. पूर्वी १२१ त मॉंट पेलीअर पासून पीरीनीज पर्यंतचा किनारा व नारबोर्न बंदर यांचा मिळोन नारबोनेंसिस म्हणून एक प्रांत बनविण्यात आला. हळू हळू या प्रांतानें आपली मर्यादा मॅसॉलिआच्या उत्तरेपर्यंत वाढविली.

गॉल प्रांताविषयीं अत्यंत प्राचीन असा उल्लेख ज्युलीअस सीझरच्या 'कॉमेंटरीज' मध्यें सांपडतो. या पुस्तकाप्रमाणें गॉल हा त्यावेळीं तीन प्रकारच्या लोकात विभागला गेला होता ॲक्विटानी, गॉल व बेल्जी हे ते लोक होत हा तीन

मुख्य जाती स्वीरोजकरून ट्टेलवेटी, सेक्वानी, आरव्हर्नी वगैरे पोटजाती होत्या.

सीझरनें इ. स. पू. ५८–५१ पर्यंत केलेल्या लढायांनीं सबंध गॉल प्रांत रोमच्या ताब्यात गेला. आगस्टसच्या अमदानींत राज्यकारभाराच्या सोयीकरितां म्हणून गॉलचे जे विभाग करण्यात आले ते:—( १ ) नारबोनेसिस, या ठिकाणीं सीनेटनियुक्त रोमन प्रतिनिधि राज्यकारभार पाहूं लागला. येथील गॉल लोकांचा इटालीयन संस्कृतीकडे जास्त ओढा दिसून आल्यामुळें हळू हळू त्यांचा जुना केल्टिक आयुष्यक्रम व रीतीभाती नाहींशा होऊन इ. स. नंतर ७० च्या सुमारास तो संस्कृतीनें पूर्ण इटालियन बनला. ( २ ) ॲक्विटेनीआ, ( ३ ) लुग्डुनेसिस, ( ४ ) बेल्जिका; या प्रांतांतील लोकांस नारबोनेसिसच्या लोकांपेक्षा राज्यकारभारात जास्त स्वातंत्र्य देण्यात आलें होतें. येथील लोकांनींहि रोमन संस्कृतीचा स्वीकार करून थोडक्याच वेळात ते देखील पूर्ण इटालियन बनले; परंतु या तिन्हीं प्रांतात आपलेपणाची भावना अजून शिल्लक होती ही लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे. केल्टिक देवताची पूजा ते अद्यापहि करीत असत व खेड्यापाड्यातून केल्टिक भाषेचाच प्रसार विशेष रूढ असे. ( ५ ) गॉल प्रांताचा पांचवा विभाग म्हणजे ऱ्हाईन नदीची सरहद्द होय. या सरहद्दीला प्रांताचें स्वरूप टायबेरियस यानें दिलें. हा प्रांत मुख्यतः लष्करी दृष्टीनें वसवला असल्यामुळें या ठिकाणीं प्रथम राजकीय संस्था मुळींच अस्तित्वात नव्हत्या. परंतु पुढें एक दोन स्थानिक स्वराज्यसंस्था स्थापण्यात आल्या.

इ. स. नंतर ४०० पर्यंत गॉल रोमच्या ताब्यात असून सुरक्षित होता. इ. स. ४०० मध्यें फ्रँक्स, व्हँडालस वगैरे लोकांची गॉलवर टोळधाड येऊन रोमनसत्ता ही बहुतेक नामशेष झाली व व्हिजीगॉथ्स, बरगंडियन्स व फ्रँक्स यांचीं राज्यें अस्तित्वात येऊं लागलीं. सेनापति ॲटीअस हा गॉलवरील शेवटला सत्ताधारी पुरुष होय. इ. स. ४८६ त गॉलमधील रोमचें स्वामित्व पूर्णपणें लयास गेलें.

**गालगुंड**, नि दा न.—गळ्याला थोडी किंवा फार सूज येऊन ती लोंबल्यासारखी दिसते त्यास गालगुंड ( गलगंड ) म्हणतात. वायु व कफ हे दोष आणि मेद धातु दुष्ट होऊन गळा किंवा मान याच्या ठिकाणीं आपापल्याला म्हणजे जो दोष जास्त दुष्ट असेल त्याच्या लक्षणास घेऊन सूज उत्पन्न करतात. म्हणून हीं गालगुंडें तीन प्रकारचीं आहेत. वातिक, कफजन्य व मेदोजन्य. ठणका फार असणें, त्यावरील शिरा काळ्या असून त्यांनीं जणूं काय बांधलें आहे असें दिसणें, त्या गालगुंडाचा रंग काळा असणें, किंवा अरुण असणें, त्याची वाढ सावकाश होणें व न पिकणें हीं वातिक गालगंडाचीं लक्षणें होत.

सूज स्थिर असणें, त्वचेचा रंग न बदलणें, जड असणें, कंडू फार असणें, सूज पुष्कळ व थंड असणें, तोंड गोड असणें व आटाळा व गळा कफानें लिप्त होणें हीं लक्षणें कफजन्य गालगुंडाचीं असून हें गालगुंड सावकाश वाढतें, यांत दुखवा फार नसतो व बहुतकरून पिकत नाहीं. गालगुंड तेलकट दिसणें, जड असणें, पांढुरकें असणें, त्यास कंड असणें व मुळाशीं लहान असून पुढें दुधभोपळ्याप्रमाणें मोठें होऊन लोंबणें आणि शरीराच्या बारीक होण्यानें बारीक व लठ्ठ होण्यानें जाडी होणें, दुखवा थोडा असणें, तोंड नेहमीं स्निग्ध म्हणजे तूप किंवा तेल खाल्ल्याप्रमाणें असणें, गालगुंड झालेल्या माणसाचा आवाज घोगरा असणें हीं लक्षणें असतील तर गालगुंड मेदोजन्य समजावें.

श्वासोच्छ्वास मोठ्या कष्टानें होणें, सर्व शरीर मृदु होणें, अरोचक असणें आणि आवाज बसलेला असणें, हीं लक्षणें असून गालगुंड झालेला रोगी जर क्षीण असेल आणि गालगुंड होऊन एक वर्ष होऊन गेलें असेल तर तें बरें होत नाहीं.

चि कि त्सा.—वातजन्य गालगुंड शेकून रक्त काढावें आणि तीळ, करडई, अळशी यांचें पोटीस बांधावें. कफजन्य गालगुंडावरहि हीच चिकित्सा करावी. परंतु स्वेद व विम्लापन हीं त्याहून फार करावीं. कफघ्न औषधांनीं तयार केलेलें तेल प्यावें. तसेंच कफनाशक धूम, वमन व नस्य वगैरे उपचार चालू करावे. मेदोजन्य गालगुंडावर शीर तोडावी, कफनाशक उपाय करावे आणि असाणाशिवस इत्यादि मेदोनाशक औषधाचें चूर्ण गोमूत्रातून प्यावें. या उपायांनीं बरें न झाल्यास फोडून सर्व गालगुंडाच्या प्रमाणें प्रमाणें चिकित्सा करावी. गालगुंड फार मोठें नसल्यास शेकून चिकट औषधें वर लावून पट्टी बसवावी म्हणजे त्या जाग्यास ओढा बसून गालगुंड बरें होतें.

**गालव**—गालव नांवाचा एक ब्रह्मर्षि होता. दुसरा गालव म्हणून विश्वामित्राचा एक पुत्र होता, दुष्काळांत दर्भरज्जू बांधून त्याला विकावयास काढल्यामुळें हें त्यास नांव मिळालें होतें. तिसरा गालव हा विश्वामित्राचा शिष्य होता. विश्वामित्रानें गुरुदक्षिणा म्हणून याच्याजवळ ८०० श्यामकर्ण घोडे मागितले असतां हा ययातीकडे गेला त्याच्याजवळ घोडे नसल्यानें त्याच्या माधवी नांवाच्या मुलीस घेऊन सूर्यवंशीय हर्यश्व राजाकडे तिला एक पुत्र होईपर्यंत ठेवून त्याच्यापासून त्यानें दोनशे घोडे घेतले पुढें सोमवंशी दिवोदास व भोजराज उशीनर या प्रत्येकाजवळ एक एक पुत्र होईपर्यंत माधवीस ठेऊन त्याच्याकडूनहि त्यानें दोनदोनशे घोडे आणले. नंतर एकंदर सहाशे घोडे व माधवी भाना

आहे. [ देवी भागवत. अ १०; महाभारत उद्योग पर्व अ. १६, १०८–१९ ]

**गालापागास बेटें**—पॅसिफिक महासागरांतील हा लहानमोठा द्वीपसमूह विषुववृत्ताच्या खालीं आहे. दक्षिण अमेरिकेच्या किनाऱ्यालगतचें बेट इक्वेडोरच्या पश्चिमेस ५८० मैलावर असून हीं बेटें इक्वेडोरच्या ताब्यात आहेत. सोळाव्या शतकांत स्पॅनिश लोकानीं या बेटाचा शोध लावला. त्यावेळीं तेथें मनुष्याची वस्ती नव्हती किंयेक बेटांचीं इग्रजी नावें यांचे लोकानी दिलेलीं असावीं. अलबे-मारले अथवा इसाबेला, नारबरो, सँटाक्रूझ, चॅथम, जेम्स व चार्लस इत्यादि या द्वीपसमूहाचीं कांहीं नावें आहेत. या बेटाचें एकंदर क्षेत्रफळ २८७० मैल असून तेंथ किंयेक ज्वालामुखी आहेत. चॅथम बेटावर ३०० गुन्हेगारांची एक वसाहत असून तेथील व्यवस्था इक्वेडोरचा पोलिस अधिकारी पहातो. १८३२ सालीं हा द्वीपसमूह इक्वेडोर देशाला जोडला गेला. त्यावेळीं तेथें फ्लोरिआना हें गांव वसाविण्यात आलें. १८८५ सालापासून तेथें एक गव्हर्नर नेमण्यात आला. कारण पनामा कॅनालमुळें या बेटास महत्व आलें चार्लस बेटावरहि थोडीशी वसाहत आहे येथील द्वीपसमूहामध्यें घोडे, माकडें, डुकरें, बकरीं व कुत्रे वगैरे बरेच प्राणी आहेत. येथें उंच वृक्ष, हिरवीगार झुडुपें व बहुविध वनस्पतीहि,बऱ्याच आहेत. तथापि तेथील सपाट बाजूच्या जमीनी खडकाळ असून किनाराहि चांगला नाहीं या बेटाचा सपाट प्रदेश व झाडाझुडुपानीं गजबजलेला डोंगराळ प्रदेश यामध्यें बराच फरक दिसून येतो हीं बेटें विषुववृत्ताच्या खालीं असलीं तरी येथील हवा फारशी कडक नाहीं कारण ॲन्टार्टिक समुद्राकडून वाहत येणारे शीतवारे हवा समशीत करून टाक-तात. गालापागोस बेटें इक्वेडोर देशास व्यापाराच्या दृष्टीनें महत्वाचीं वाटतात. कारण त्या बेटावर सापडणारा ग्वानो व आर्चिला नावाचें शेवाळ यूरोपात पाठविलें जातें. चार्लस बेटाखेरीज अन्यत्र फारशी मनुष्यवस्ती नाहीं. डार्विननें या द्वीपसमूहास भेट दिल्यापासून त्याचें महत्व वाढलें आहे. ह्या द्वीपसमूहात सात जातींचे प्रचंड कासव असून ते सर्वच स्थानिक आहेत. सरड्याच्याहि दोन जाती असून तेथील पक्षी निराळयाच तऱ्हेचे असलेले आढळून येतात.

**गालिचे**—वाफेच्या यंत्रांनीं गालिचे विणण्याची कला जरी सर्वस्वीं पाश्चात्य आहे तरी फार प्राचीन काळापासून पौरस्त्य देशातून हातानें विणलेले सुंदर गालीचे तयार होत. आपल्याकडील रिवाजाप्रमाणें प्राचीन ईजिप्तमध्येंहि राज-वाड्यातून व देवळ्यातून जमीनीवर व आसनावरून हांतरण्या-करिता हातऱ्या असत. अशा गालिचात सुयानीं बारीक नक्षीकाम करीत. इ स. च्या ३ ऱ्या किंवा ४ थ्या शत-कातील ईजिप्तोरोमन गालिचे साउथ केन्सिंग्टन म्युझियम-मध्यें ठेविले आहेत.

*फू ल गा लि चे*—बुटेदार किंवा फुलाचे गालिचे कर-ण्यात इराण, तुर्कस्तान या पौरस्त्य देशांची *बरीच ख्याति* आहे. सूत, ताग, लोंकर किंवा रेशीम यांची उभी वीण घालून त्यात रंगीत लोंकर, बकरीं किंवा उंट याचे केंस किंवा रेशीम यांचें चित्र आखून त्याप्रमाणें धागे भरतात व उभ्या विणीवर आडवें सूत घेतात नंतर पुन्हा याप्रमाणेंच रंगी-बेरंगी लोंकरीची आणखी एक ओळ भरून पुन्हा एक आडवा दोरा घालतात. अशा रीतीनें फूल गालिचे विण-तात या गालिच्यात दोन पुरातन गाठींचा उपयोग केला जातो,*एकीला तुर्की किंवा घिओर्डेस(या नावाचें स्मृर्नाजवळ एक* प्राचीन शहर आहे ) गाठ व दुसरीला पर्शियन किंवा सेहना गाठ म्हणतात. सेहना, किर्मान आणि ताब्रिझ येथें होणाऱ्या पर्शियन गालिच्यात ताणा रेशमाचा असल्यानें फूल फार उठावदार दिसतें. पूर्वेकडे असे गालिचे कधींपासून करण्यास येऊं लागले याचा अदाज लागत नाहीं. मखमलीसारखें हें कापड असल्यानें अगोदर कोणतें व मागाहून कोणतें तयार होऊं लागलें हें समजत नाहीं. सतरंज्यासारखे गालिचे फूल गालिच्याच्या फार आधींचे यात शंका नाहीं.

*पौ र स्त्य गा लि च्या ती ल न क्षी का मा चें र ह स्य.*—व्यापक दृष्टि योजिल्यास पौरस्त्य गालिच्याच्या नमुन्यात दोन प्रकार दृष्टीस पडतील. एक *सुनी पंथी* व दुसरा *शिया* पंथी. पहिल्यात रुक्ष भूमितीच्या व कोन साधलेल्या आकृती असून शिवाय गुंतागुंतीची नक्षी, गूढ चिन्हें वगैरे असतात. त्यात सुनींची संन्यस्त वृत्ति दिसून येते. उलट दुसऱ्या प्रकारात शिया किंवा सुधारक पंथाचें स्वतंत्र विचार दृष्टीस पडतात शिया प्रकारांत मोठया कल्पकतेनें काढलेलीं फुलें व वेलबुट्टया, वनस्पती व प्राणी यांचे आकार, कुफी लेखाभोवतीं बसविलेलीं महिराप वगैरे कामें केलेलीं असतात. अफगाणिस्तान, तुर्कस्तान, बुखारा, हिंदुस्थानचा वायव्य सरहद्द प्रांत यातून सुनी तऱ्हेचे व इराणात शिया तऱ्हेचे गालिचे होतात

*हिं दु स्था नी गा लि चे.*—इराण, *तुर्कस्तान व हिंदु-*स्थानचा वायव्यसरहद्दप्रांत याच्या खालोखाल फूलगालिचे होणारा, ऐतिहासिक महत्वाचा देश म्हणजे हिंदुस्थान होय. हिंदुस्थानात चौदाव्या शतकाच्या उत्तरभागात, फुलाचे गालिचे विणण्याची कला प्रथम मुसुलमान लोकांनीं आणिली. परंतु मोंगल वंशाच्या स्थापनेच्या कालापर्यंत ह्या कलेस म्हणण्यासारखें महत्व मिळालें नव्हतें. मोंगल वंशाची स्थापना झाल्यावर बाबरानें १६ व्या शतकाच्या आरंभीं या कलेस नावारूपास आणिलें. त्या काळीं हिंदु-स्थानात तयार झालेल्या गालिचावरील नक्षीकाम इराणी गालिचाच्या धर्तीवर केलेलें असे. तथापि मूलप्रतिमेसारखें सौंदर्य हिंदुस्थानात तयार झालेल्या गालिच्याच्या ठायीं क्वचितच दिसे. गालिचे तयार होणारे हिंदुस्थानातील ऐति-हासिक दृष्टया प्रमुख प्रांत म्हटले म्हणजे काश्मीर, पंजाब

व सिंध हे होत आग्रा, मिर्झापूर, जबलपूर, वरंगळ, मलबार आणि मच्छलीपट्टण हीं गालिचे होण्याचीं मुख्य स्थळें आहेत बनारस आणि मुर्शिदाबाद या ठिकाणीं सोनेरी व रुपेरी कलाबतूंचें नक्षीकाम केलेले गालिचे होतात हे गालिचे फक्त उत्सवप्रसंगींच वापरावयाचे असतात तजावर आणि सालेम या ठिकाणीं रेशमानें विणलेले फूलगालिचे तयार होतात हिंदुस्थानांतील सर्वोत्कृष्ट असे लोंकरी गालिचे हे हिंदुस्थानातील राजेरजवाडे, मोठमोठे अमीरउमराव धनिक लोक यानीं मुद्दाम गालिचे करण्यात वाकबगार अशा कारागिराना पदरीं ठेवून त्यांच्याकडून तयार करून घेतलेले आहेत हे गालिचे राजवाड्यातून शोभेकरता हांतरण्याचा प्रघात असे वरील प्रकारच्या कुशल कारागिराचा धन्याच्या खासगी आस्थापनेंत समावेश होत असून त्याना ठराविक वेतन मिळत असे. दुसऱ्या एखाद्या गिऱ्हाईकाचें काम करण्यासहि त्याना मुभा असे एकोणिसाव्या शतकात, सरकारी तुरुगातून गालिचे बनविण्यात येऊ लागले तुरुंगातील गालिचे, कारखान्यात तयार झालेल्या गालिच्यांपेक्षा कमी सुबक व मृदु असतात कारण तुरुंगात ते मोठ्या प्रमाणावर काढावे लागतात फूलगालिच्यांपेक्षाहि अतिशय प्राचीन काळापासून सतरंजीवजा पातळ सुती गालिचे हिंदुस्थानात तयार होत असत हे गालिचे निळ्या व पांढऱ्या अथवा निळ्या व तांबड्या पट्यानीं विणलेले असून त्याची वीण अगदीं साधी व सोपी असे याना दरी अथवा सतरंजी म्हणतात बनारस ( काशी ) शहरीं व उत्तर हिंदुस्थानांत मुख्यत्वेंकरून सतरंज्या तयार होतात दक्षिणेमध्येंहि सतरंज्या होतात विशेषत निलगिरी पर्वतातील तोडा लोकासारखे मूळ रहिवासी या कामात प्रवीण आहेत

यू रो प म धी ल गा लि चे —कॅस्टाईलची राणी एलेनॉर हिनें तेराव्या शतकाच्या उत्तरार्धात इंग्लडमध्ये प्रथमच गालिचे उपयोगात आणिले असें म्हणतात हे गालिचे स्पेनमधून आणविलेले असत कारण, त्यावेळीं स्पेनच्या दक्षिणभागात सॅरसीन किंवा मूर लोक गालिचे तयार करीत उलटपक्षीं सेन्ट्डोनेरी येथील पीअर दुर्पोन्ट नामक गालिचे करणारा कारागीर (इ स १६३२) म्हणतो कीं, फ्रान्समधील गालिचे तयार करण्याच्या कृतीचे ज्ञान हें इ स ७२६ त चार्लस मार्टेल यानें केलेल्या सॅरसेन लोकांच्या पराभवाचें फल होय कारण फ्रेंच लोकानीं सॅरसेन लोकापासून गालिचे करण्याची कला उचलली १३ व्या शतकात व्हेनिस शहरीं सुदर नक्षीकाम करणारे असे कुशल विणकर गालिचे तयार करण्याच्या कामीं वेतन देऊन नेमिले होते त्याकाळीं व्हेनिस हें गालिचे वगैरे सामानाच्या निर्गतीचें मुख्य ठिकाण होतें येथूनच पश्चिम यूरोपभर गालिच्यांचा प्रसार होत असे

स्पॅ नि श गा लि चे —आता सॅरसेनिक व इराणी गालिच्याहून भिन्न अशा प्रकारच्या स्पेनमध्यें तयार झालेल्या गालिच्यांचा उल्लेख केला पाहिजे सुमारें पंधराव्या शतकाच्या शवटीं अगर सोळाव्या शतकाच्या आरंभीं स्पेनमध्यें गालिचे करण्याची कृति प्रचलित असावी अगदीं अलीकडच्या काळातच या प्राचीन गालिचाचे नमुने सापडले आहेत स्पेनमध्यें हे गालिचे करण्याचे कारखाने कोठून आले याविषयीं नक्की माहिती उपलब्ध नाहीं या फूलगालिच्याचा एक प्रेक्षणीय नमुना व्हिक्टोरिया आणि आलबर्ट म्यूझियम मध्यें पहावयास सापडतो या गालिचाच्या मध्यभागांतील नक्षीकाम मूर लोकानीं विणलेल्या गालिचाच्या धर्तीवर असून गालिचाच्या कडावर सर्पाकृति प्राण्याप्रमाणें नक्षीकाम केलेलें आहे फूल गालिचाशिवाय १७ व्या व १८ व्या शतकात स्पेनमध्यें तयार झालेल्या सतरंजीवजा गालिच्यावर स्पॅनिश नावें व कोरीव लेख आढळून येतात

पो लि श गा लि चे —उत्कृष्ट फूल गालिचाचा आणखी एक चमत्कृतिजन्य वर्ग म्हटला म्हणजे पोलिश गालिचाचा होय या प्रकारचे गालिचे आधुनिक काळामध्येंच ज्ञात झाले आहेत हे गालिचे बहुश रेशमानें विणलेले असून अतिशय मृदु असतात जमिनीवर हांतरण्याकरता केलेले गालिचे सोनेरी व रुपेरी कलाबतूंनें विणलेले असून सतराव्या शतकातील मुसाफर्खिन्सच्या धर्तीवर बनविलेले आहेत पुष्कळ प्रकारच्या शाबावरून हे पोलिश गालिचे, कॉन्स्टान्टिनोपल व दमास्कस या दोन शहरांपैकीं कोणत्यातरी एका शहरीं प्राचीनकाळीं तयार होत असावे असें सिद्ध होतें

फ्रा न्स म धी ल गा लि चे —१६६७त फ्रान्समध्यें लुव्हर येथें चौथ्या हेनरीनें या कलेस उत्तेजन देण्याकरता म्हणून राजकीय कलाभवनें स्थापिलीं या कलाभवनातून निरनिराळ्या प्रकारचीं कलाकुसरीचीं कामें केलीं जात असत याच ठिकाणीं स १६०४ मध्यें पौरस्त्य ( ओरिएन्टल ) गालिचे तयार करण्याकरता एक उद्योगशाळा स्थापन झाला पुढें सुमारें दहापधरा वर्षानीं पीअरडुपॉन्ट आणि सायमन लॉर्डेट या दोघा गृहस्थानीं चिलॉट (पॅरिस) येथें फूलगालिचे करण्याचा धंदा सुरू केला लुव्हर येथील गालिचे बनविणारे कारागीर इ स १६३१ मध्यें चिलाट येथें बदलले जाऊन सदर ठिकाणीं गालिचे तयार करण्याचा धंदा, प्रत्यक्ष फ्रान्सच्या राजाच्या हुकमतीखालीं व राजाश्रयानें पुढें केक वर्षे चालू होता

इं ग्ल ड म धी ल —१७ व्या शतकाच्या अखेरच्या काळात तुर्की फूल गालिचे करणारे फ्लेमिश कारागीर इंग्लडमध्यें येऊन निरनिराळ्या ठिकाणीं गालिचे तयार करण्याचा उद्योग करू लागले या गोष्टीला खात्रीलायक पुरावा असल्यामुळें याबद्दल काहीं वाद नाहीं ॲक्समिन्स्टर आणि विल्टन या येथील गालिचे विणणाराना १७०१ सालीं तिसऱ्या विल्यमकडून सरक्षक सनद ( प्रोटेक्टिव्ह चार्ट ) मिळाली १८ व्या शतकाच्या आरंभीं हेनरी अर्ल ऑफ पम्ब्रोक नामक गृहस्थानें विल्टन येथील गालिच्यांच्या व्यापारात मन घालून मासमधून काहीं कुशल कारागीर आणविले व

त्याना रिन्टन येथें नेमिलें त्यामुळें फूलगालिचाच्या व्यापारात क्रान्ति होऊन इंग्लंडमध्यें सर्वांगसुंदर फूलगालिचांची निपज होऊं लागली १७५१ साली फुल्हॅम शहरीं पॅरिसॉट नामक एका तज्ज्ञानें फूल गालिचे विणण्याचा कारखाना काढला पुढें १७०० साली हा कारखाना विकला गेला नंतर एक्स्मीन्स्टर येथें दुसरा एक कारखाना काढण्याचा त्याचा विचार होता पण तो तडीस गेला नाहीं विल्टन येथील गालिचाच्या कारखान्याची उत्तरोत्तर भरभराट झाली तेथें तयार होणारे गालिचे व फूल गालिचे सर्व लोकांच्या आदरास पात्र झालेलेच आहेत १८ व्या शतकाच्या अखेरीस ॲक्समिन्स्टर येथील कारखाने मात्र टाळ बुडाले सॅव्होंनेरी प्रमाणेंच ॲक्समिन्स्टर हें नाव गालिचाच्या प्रसिद्धीकरितांच निव्वळ शिल्लक राहिलें आहे

अर्वाचीन यंत्रानें विणलेले गालिचे —वाफेच्या यंत्रानीं गालिचे विणण्याची कला इंग्लंडमध्यें अस्तित्वात येण्यापूर्वी गालिचे विणणार लोक फ्रेंच लोकांनीं घालून दिलेल्या उदाहरणाचें अनुकरण करीत म्हणजे गालिचे विणण्याच्या कामीं जॅकार्डच्या यंत्राचा (ॲपरेटसचा) मुख्यत उपयोग करीत एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत व पुढें काहीं काळ हीच स्थिति होती परंतु पुढें लवकरच इंग्लंडमध्यें थोड्या वेळात पुष्कळ गालिचे तयार होऊं लागल्यामुळें इंग्लंडमध्यें गालिचे करण्याच्या कामाचा गति अतिशय वाढली त्यामुळें बेलजममधील टूर्ने व फ्रान्समधील नाईम्स, ॲबेव्हिले, व्यून्हेस, टॉरकोईंग आणि लॅनॉय इत्यादि शहरांतील गालिचे करणाऱ्या कारखानदारास जबर धक्का बसला अमेरिकेमधील ईरॅस्टस् बी बिगर्ले व इंग्लंडमधील विल्यम वुड नामक दोन गृहस्थानीं जॅकार्डच्या गालिचे विणण्याच्या वाफेच्या मागांत (लूम) सुधारणा करण्याच्या कामीं बरेच परिश्रम घेतले होते त्यांनीं सुधारलेल्या यंत्रात इंग्लंडमधील लोकांकडून आणखी सुधारणा घडवून आणून गालिचे काढण्याच्या कामांत भराभर प्रगति केली त्यामुळें इंग्लंडाशीं स्पर्धा करणें सर्व युरोपियन देशांना अवघड झालें पुढें १८८० सालापासून फ्रान्स देशातील फूलगालिचे करणारे कारागीर इंग्लंडमधून वरील प्रकारचीं वाफेनें चालणारी यंत्रें आणून, त्याच्या साहाय्यानें गालिचे विणू लागले आहेत

अमेरिकेतील संयुक्त संस्थानांत गालिचे विणण्याचे अनेक कारखाने असून ते फार महत्त्वाचे आहेत ऑस्ट्रियामध्यें सर्वांत सुंदर फूलगालिचे तयार होतात त्यावरील नक्षीकाम असून गालिचावरील नक्षीकामाच्या धर्तीवर आहे जर्मनी, हॉलंड आणि बेल्जम या देशांतहि वाफेनें चालणाऱ्या यंत्रावर गालिचे तयार होतात

अर्वाचीन हातानें विणलेले गालिचे —विल्यम मॉरिस नामक एका इंग्रजानें हातानें गालिचे विणण्याच्या कामीं फार प्रशंसनीय प्रयत्न केले त्याच्या प्रयत्नामुळें हातानें विणलेल्या फूलगालिच्यात बरीच सुधारणा घडून आली उत्तम नक्षीकाम केलेले, हातानें विणलेले कार्डी फुल गालिचे अर्वाचीन काळींहि तयार झालेले सापडतात अशा गालिचापैकीं काहीं खुद्द इंग्लंडमध्यें तयार झालेले आहेत १८५० सालपूर्वी व तदनंतर काहीं काळ, रग व गालिचे यावर रंगीबेरंगी दोऱ्यानें जनावराच्या व वनस्पतीच्या ओबडधोबड आकृति काढीत अशा आकृती काढलेले गालिचे अद्यापहि कोठें कोठें आढळतात ग्लासगो, मँचेस्टर व बर्मिंगहॅम येथील कलाविद्यालयातून (स्कूल ऑफ आर्ट) गालिचावर अप्रतिम व रेखीव चित्रें काढण्याचें काम अद्याप मोठ्या कुशलतेनें केलें जातें सबब युरोप व अमेरिकेंत चित्रें काढण्याच्या कलेंत बरीच प्रगति झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं फ्रान्समध्यें ऑबुसन आणि सॅव्होंनेरी येथील हातानें विणलेले गालिचे पौरस्त्य गालिचाहून निराळ्या धर्तीवर विणलेले असून विशेष व सुंदर नक्षीदार असतात युरोपमधील प्रसिद्ध पदार्थसंग्रहालयातून अनेक प्रकारचे पौरस्त्य गालिचे ठेविले आहेत

[संदर्भग्रंथ —ब्रिटिश मॅन्युफॅक्चरिंग इंडस्ट्रीज (लंडन १८७६) व्हिन्सेंट जे रॉबिन्सन-ईस्टर्न कार्पेटस्, हर्बर्ट कॉक्सॉन—ओरिएंटल कार्पेट्स, आस्ट्रेलियन कमर्शिअल म्युझियमनें प्रसिद्ध केलेलें पौरस्त्य गालिचावरचें पुस्तक, रिपोर्ट ऑन कार्पेट्स ॲट दि पॅरिस एक्झिबिशन, १९००, जॉन किंबर्ले मुफोर्ड—ओरिएंटल रग्स, जर्नल ऑफ इंडियन आर्ट अँड इंडस्ट्री, इंडियन कार्पेट्स अँड रग्स (भाग ८७ ते ९४) लंडन १९०५ व १९०६, मार्टिन—ए हिस्टरी ऑफ ओरिएंटल कार्पेट्स बिफोर १८००]

**गावड**—शेतकरी जात लो स (१९११) ६७५० रत्नागिरी जिल्हा व सावंतवाडी संस्थान येथें हे लोक आहेत गावड शब्द गाव या शब्दापासून झाला आहे असें मोल्सवर्थचें मत आहे हे लोक मराठी बोलतात ते कुळ जातींहून अगदीं भिन्न आहेत यांमध्यें पूर्वी देवकें होतीं व पुढें कुळें होऊन ब्राह्मणाप्रमाणें गोत्रेंहि झालीं आहेत अजूनहि काहीं गावड लोकांत देवकें असून ते त्या देवकाना मान देतात काश्यप, वत्स, व भारद्वाज हीं फक्त तीन गोत्रें यामध्यें असून काश्यप गोत्रांतील एकाच देवकात व गोत्रात विवाह होत नाहीं असें काहींचें मत आहे याचा मूळचा धंदा मीठ करण्याचा होता परंतु आता पुष्कळसे लोक शेतकरी व मजूर आहेत मीठ तयार करणारे लोक कमी दर्जाचे समजले जातात आईकडील व बापाकडील यांच्याशीं विवाह करतां येतो मावस बहिणीशीं विवाह होत नाहीं धर्म व संस्कारासंबंधीं चाली मराठ्याप्रमाणेंच आहेत [से रि १९११ (मुंबई)]

**गाविलगड** —वऱ्हाड उमरावती जिल्ह्यात मेळघाट तालुक्यामध्यें हा किल्ला आहे हा कोणी व केव्हां बांधला हें अद्याप समजत नाहीं याच्या बांधणी वगैरे वरून मुसुलमानांनीं हा बांधला असावा असें वाटतें फेरिस्ता म्हणतो कीं बहामनी अहमदशाह (वली) यानें तो बांधला (इ स १४२ )

पुढें वऱ्हाडचा सुभेदार फत्तेउल्लाइमाद उल्मुल्क यानें त्याची डागडुजी केली (इ स १४८८) आणि पुढें तो जेव्हां स्वतंत्र बनला ( १४९० ) तेव्हां त्यानें येथेंच आपली राजधानी केली त्यानंतर अहमदनगरच्या मुर्तझा निजामशहानें पुन्हां त्याची दुरुस्ती केली (इ स १५७७) याबद्दलचा एक शिलालेख तेथील एका पश्चिमेकडील बुरुजावर ( बैरामखा नांवाच्या उल्लेखाचा ) आहे अकबराच्या वेळीं अबुल फजल यानें हा किल्ला घेतला (इ स १५९८) येथें फार पूर्वी गवळी, अहीर वगैरे वन्य लोकांचा एक मातीचा लहानसा किल्ला होता व त्याचें पहिलें नांव गवळीगड असेंच होतें खानदेशांतील गवळीगड व अहीर(असीर)गड या नांवावरून हाहि त्याच लोकांचा किल्ला असावा असें म्हणतात याच्या जवळच हल्लीं चिखलदरा हें वऱ्हाडांतील हवा खाण्याचें ठिकाण आहे मोंगलानंतर भोसल्यांनीं हा घेतला त्यांनींहि याची दुरुस्ती केली होती हा किल्ला वऱ्हाडच्या इतिहासांत फार प्रसिद्धीस आला कारण याची मालकी म्हणजे वऱ्हाडची मालकी समजली जाई इमादशाहीचा व भोसल्यांचा खजिना व जडजवाहीर येथें असे भोसल्यांनीं वऱ्हाड सोडलें असतां नरनाळा व गाविलगड मात्र सोडले नव्हते ( १८०३ ) भोसल्यांच्या वेळचा एक मराठी शिलालेख येथें आहे हा किल्ला सातपुड्याच्या एका टोंकावर असून याची उंची चार हजार फूट आहे हा नरनाळ्यापेक्षाहि मजबूत आहे याला खालून मारा करतां येत नाहीं. इंग्रजांनीं १८०३ मध्यें हा घेतला तेव्हां त्यांना फार त्रास पडला खुद्द वेलस्ली हा सेनापति होता अखेर एका गोंडानें विश्वासघात केल्यानें किल्ला पडला किल्लेदार व बेनीसिंग यांनीं शेवटपर्यंत पराक्रम केल्यावर व ते मेल्यानंतर किल्ला इंग्रजांच्या हातीं लागला त्यावेळीं तेथील रजपूत स्त्रियांनीं जोहार केला देवगांवीं यावेळीं तह झाला त्यांत पुन्हां हा किल्ला भोसल्यांना परत मिळाला तेथें भोसल्यांचा खजिना होता, तो सर्व इंग्रजांनीं लुटला या किल्ल्याच्या आंत एक बालेकिल्ला असून किल्ल्यास दुहेरी तट आहेत पुढें १८२२ त हा किल्ला इंग्रजांस कायमचा मिळाला किल्ल्यावर एक मशीद पाहण्यासारखी आहे मुख्य वेशीवर इमामउल्मुल्क याचा शिलालेख आहे व विजयानगरच्या हिंदु राजाच्या चिन्हाप्रमाणें सिंह, हत्ती, गरुड वगैरेंचीं चित्रें आहेत फत्तेउल्ला इमादुल मुल्क हा बाटण्यापूर्वी मूळचा ब्राह्मण व विजयानगरचा रहिवासी असल्यानें त्यानें हीं विजयानगरचीं चिन्हें येथें कोरलीं असावीं बाहेरचा किल्ला म्हणून एक किल्ल्याचा भाग आहे तो भोसल्यांनीं बांधला आहे नरनाळ्याप्रमाणेंच येथेंहि एक नऊगजी तोफ आहे किल्ल्याचा नाश १८५१ त करण्यांत आला हल्लीं येथें गवळी लोक राहतात किल्ला ज्या डोंगरावर आहे त्या सर्वच डोंगरास गाविलगडचा डोंगर असें म्हणतात ऐने इ अकबरींत या किल्ल्याचा उल्लेख येतो गाविलगड डोंगरास त्यावेळीं बड म्हणत असत ही सातपुड्याची ओळ बैतुल-मेळघाट-नेमाड मधून तापी-पूर्णापर्यंत गेली आहे मेळघाटाची उंची ३४०० फूट आहे, त्यांतील बैराट शिखर मात्र ३९८९ फूट उंचीचें आहे याच्या पूर्वेस मल्हारघाट व पूर्वेस देऊळघाट व त्याच्या पलीकडे भिंगार घाट आहे देऊळघाट व मल्हारघाट यांतून गाडीरस्ते असून मेळघाटांतून तर दळणवळण चांगलेंच होतें [ काळे-वऱ्हाडचा इतिहास, इंपीरियल ग्याझे व्हॉ १२, उमरावती ग्याझे व्हॉ ए, रा खंड १० ]

गाळणा—मुंबई इलाख्यांतील नाशिक जिल्ह्याच्या मालेगांव तालुक्यामध्यें या नांवाचा एक किल्ला आहे समुद्रसपाटीपासून याची उंची २३१६ फूट असून किल्ल्यावर गाळणेश्वर महादेवाचें देऊळ आहे तसेंच कांहीं कोरीव गुहा असून त्याजवळच एक अगदीं पडका रंगमहाल नांवाचा वाडा आहे किल्ल्यास परकोट, लोखंडी, कोतवाल व लखा नांवाच्या चार वेशी आहेत. पैकीं लोखंडी वेस फार प्रेक्षणीय आहे किल्ल्यावर बऱ्याच तोफा पडलेल्या आहेत किल्ल्याचा डोंगर अगदीं उभट असल्यानें एका मार्गाशिवाय वर जाण्यास दुसरा रस्ता नाहीं दक्षिणेकडील एका कमानीच्या बुरुजांत स १५६९ चा एक फारशी शिलालेख आहे दुसरा एक लेख उत्तरेकडील एका बुरुजावर आहे तो देवनागरी असून शके १५८० चा आहे व त्याखालीं स १५८३ चा दुसरा फारशी लेख तो बुरूज बांधणाऱ्याच्या नांवाचा आहे तिसऱ्या एका बुरुजावर १५८७ चा फारशी लेख आहे येथल्या मशीदींत एक जाळीदार खिडकी प्रेक्षणीय आहे या किल्ल्याला केळणा असेंहि नांव आहे

**गिगासारण**—काठेवाड. लाठापादर ठाण्याच्या अंमलातील एक स्वतंत्र खंडणी देणारा तालुका. येथील ग्रासिया कोटिला जातीचे वाघिया आहेत.

**गिधिया**—या गिधिया लोकांची वस्ती आग्रा व संयुक्त प्रांतांत आहे. बपारिया या राष्ट्रजातीची ही एक शाखा असावी. गिधिया लोक " भयपाहारिया " नावाच्या क्षत्रिय वंशातील असून मूळचे गुजराथचे रहिवाशी होते. व ते हारेवाला या प्रांतातून आले. त्यांचा वंशपरंपरागत धंदा म्हटला म्हणजे पक्षी धरण्याचा होय. मुरादाबाद प्रांतातील ठाकुरद्वार व अलमोरा या तहसिलींत आणि नैनीताल, तराई व बिजनोर या प्रांतात हे लोक आढळतात. या जातींत एक कायमची पंचायत असते व या पंचायतीची हद्द कांहीं खेड्यांपर्यंत नेमलेली असते प्रत्येक पोटजातीची वेगळी पंचायत असते. या पंचायती कज्जा, मारामारी, गोहत्या व इतर सामाजिक गुन्ह्यांची चवकशी करितात. पोटजातींमध्यें फक्त स्वज्ञातिविवाहच प्रचलित आहेत. ही जात एकदा गुन्हेगार समजली जात असे. ह्या जातींतील लोक आतां शेतकीचा धंदा करूं लागले आहेत

**गिधौर**—बिहार, ओरिसा. मोंगिर जिल्ह्यातलें एक खेडें. येथें बिहारमधील पुरातन घराणीं अद्याप आहेत त्यांचें मूळ ठिकाण जवळच गैरा टेकड्यापाशीं आहे त्याचे अवशेष दिसतात. जवळच नवलासगड आहे. या घराण्याचा मूळपुरुष बीर विक्रमसिंग हा तेराव्या शतकाच्या सुमारास इकडे आला व येथील दोसाद राजाला मारून त्यानें गिधौर घराण्याची स्थापना केली. राजा पुरणमल यानें वैद्यनाथाचें ( वैजनाथ ? ) देऊळ बांधलें

**गिनी**—भूमध्यरेषेवरील आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्याच्या कांहीं भागाचें हें साधारण नाव आहे. हा गिनी किनारा गँबियापासून केपनिग्रोपर्यंत पसरला आहे. गाबून, लोअँगो, नैर्ऋत्यकिनाऱ्यावरील पोर्तुगीज मुलूख इत्यादिकांचा समावेश दक्षिणगिनींत होतो. उत्तरगिनी कासामांसी नदीपासून कामेरूनपर्यंत पसरला आहे. पूर्वी उत्तरेकडे केपनुनपासून गिनीची सुरवात मानण्यांत येई. या नावाची व्युत्पत्ति फार अनिश्चित आहे तथापि जिनीआ या शहराच्या नावावरून हें नाव पडलें असावें असें म्हणतात. गिनी हें नाव १४ व्या शतकांतील नकाशांत आढळतें. पण १५ व्या शतकाच्या अखेरीस तें साधारण उपयोगांत आलें. गिनीचा किनारा इतका सपाट आहे कीं, तो नाविकांनीं जवळ आल्याशिवाय दिसत नाही. व्हाइट केप वेर्डा येथें मात्र किनारा थोडा उंच व भव्य आहे. हा किनारा अनेकविध वनस्पतींनीं गुरफटलेला आहे. शुद्ध निग्रो वंशाचे रहिवाशी या ठिकाणीं रहातात.

प्राचीन व्यापारी उत्तर गिनी प्रदेशास तेथें उत्पन्न होणाऱ्या जिनसांवरून नावें देत असत. सेरालीओनपासून पूर्वेस केपपाल्मासपर्यंत ५०० मैल पसरलेल्या गिनी किनाऱ्यास हे व्यापारी ग्रेनकोस्ट असें संबोधीत असत. हें नाव या भागास १८५५ त देण्यात आलें. कारण या ठिकाणाहून नानाप्रकारचीं बीबियाणें बाहेरदेशीं पाठविण्यांत येत असत. आतां हें बीं पाठविण्यांत येत नसल्यामुळें हें नावहि लुप्त झालें आहे. आयव्हरीकोस्ट या नावाचा इतिहासहि असाच आहे. दक्षिण गिनीच्या अनेक भागापैकीं गाबूनच्या दक्षिणेस असणाऱ्या व काँगो नदीच्या उत्तरेकडील भागास लोअँगो हें नाव असे आता लोअँगोचा फ्रेंचकाँगोमध्यें समावेश होतो. काँगो नदीच्या दक्षिणेकडील देशास कांगो हेंच नाव लावीत. आता कांगो पोर्तुगीज वेस्ट आफ्रिकेचा एक पोटविभाग आहे. १२७० त लॅन्सलॉट मॅलोसेलो हा जिनोआ येथील गृहस्थ क्यानरीज बेटांपर्यंत जाऊन पोहोंचला. १२९१ त पुनः जिनोआमधीलच कित्येक गृहस्थानीं केपनन ओलांडलें पण यापलीकडे त्यानीं काय केलें हें मात्र माहीत नाहीं. इ. स. १३४६ त कॅटलान येथून कांहीं प्रवाशी गिनीकिनाऱ्यावरील ' सुवर्णनदीच्या ' शोधार्थ निघाले, पण त्याचें काय झालें तें ठाऊक नाहीं. १३६४ व १४१० या वर्षांच्या दरम्यान डीपे येथील लोकांनीं गिनी येथें पुष्कळ सफरी केल्या असें फ्रेंचाचें म्हणणें आहे. १४०२ त जेन डी बेथेन कोर्ट यानें कॅनरीज बेटांच्या दक्षिणेकडील प्रदेश शोधून काढला. शेवटीं पोर्तुगॉलच्या प्रिन्स हेनरी यानें नियुक्त केलेल्या नाविकाच्या संघटित प्रयत्नानें गँबियापर्यंतचा किनारा शोधून काढण्यांत आला व पंधराव्या शतकाच्या अखेरीस सबंध गिनी कोस्ट यूरोपियनांच्या परिचयाचा झाला.

**पोर्तुगीज गिनी**—पश्चिम आफ्रिकेंतील एक पोर्तुगीज वसाहत. ही वसाहत समुद्रकिनाऱ्यावर असून केपरोक्सोपासून कोगोच्या नदीमुखापर्यंत पसरली आहे. हिच्या उत्तरेस सेनिगॉलचा कॅसामॅंस हा प्रांत व पूर्वेस व दक्षिणेस फ्रेंच गिनी आहे. वसाहतीचें क्षेत्रफळ १३,९४० चौरस मैल आहे व लोकसंख्या २,८९,००० आहे. येथील हवा रोगकारक आहे. पाऊस फार जोराचा पडतो. येथील जंगलांत खजूर, एबनी, मेहोगनी इत्यादि प्रकारचीं झाडें आहेत. पेरू, ॲपल, नारिंग व आंब्याचीं झाडेंहि आहेत. अन्तर्भागांतील लोक बहुतेक मॅंडिगो व फ्युला या राष्ट्रजातीचे आहेत. बेटें व समुद्रकिनाऱ्याजवळच्या भागांत निग्रो राष्ट्रजात राहते या जातीची कौटुंबिक जीवितविषयींची आदरबुद्धि व पूर्वजांविषयींची धर्मबुद्धि फार जागृत आहे. मॅकोआ व कोचीओ यामधील भागांत बिजुगा नावाची जात रहाते. हे लोक फार आत्मैक्यवादी, हुशार व एकवचनी आहेत अशी त्यांची ख्याति आहे. या लोकांत एक प्रकारची उघडी आहागिरीची पद्धत आहे. कोंबड्याची मानटी कापून ती तपासून भविष्य वर्तविण्याचा यांच्यांत प्रघात आहे. बिसॉस या बेटावर स्वतंत्र व युद्धविशारद बिडिओगोज ही राष्ट्रजात रहाते.

१४८१ त गुलामा येट पोर्तुगीज नाविकांनीं शोधून काढलें. १७१२ च्या सुमारास पोर्तुगॉलनें बिसॉओ येथें वखार घातली. याच्याहि अगोदर म्हणजे १६६६ त पोर्तुगॉलनें रायओपेंडी हें काबीज केलें होतें. पोर्तुगीज अंमलाखालील मुलखाच्या अन्तर्मर्यादा १८८६ मध्यें फ्रान्सच्या सहकारितेनें ठरविण्यांत आल्या. व १९००-३या काळांत सरहद्द आखण्यात आली. १९१७-१८ सालीं वसाहतीचें उत्पन्न ७,२३,८३८ एस्क्युडो असून खर्च ७,०८,७०० एस्क्युडॉ होता. १९१७ त वसाहतीची निर्गत २८,८१,३८३ एस्क्युडोची होती. भुईमुग, रबर, मेण, हस्तिदंत इत्यादि निर्गत व्यापाराच्या वस्तू होत.

स्पॅनिश गिनी.—याचें क्षेत्रफळ ९४७० चौरस मैल असून लोकसंख्या सुमारें दोन लाख आहे.

फ्रेंच गिनी.—पश्चिम आफ्रिकेंतील एक फ्रेंच वसाहत. हिच्या पश्चिमेस अटलांटिक महासागर, उत्तरेस पोर्तुगीज गिनी व सेनीगाल, पूर्वेस अपर सेनीगाल व आयव्हरी कोस्ट व दक्षिणेस लायबेरिया व सिएरालिओनी आहे. ही वसाहत पूर्वेस ४५० मैलपर्यंत सरळ पसरली आहे व हिची दक्षिणोत्तर रुंदी जवळजवळ ३०० मैल आहे. एकंदर क्षेत्रफळ सुमारें ९५००० चौरस मैल.लो. सं. (१९१६) १८०८८९३.

हवामानः—किनाऱ्यावरील हवामान उष्ण, सर्द व रोगट आहे. मेपासून नोव्हेंबरपर्यंत अति पाऊस पडतो. सबंध वर्षभर हवेंत फारच ओलावा असतो. नायगर नदीकांठच्या प्रदेशाची हवा साधारण आरोग्यकारक असते.

वनस्पती व प्राणीः—समुद्रकिनारा व नदीतीरावरून ओंवराया लागल्या आहेत. समुद्रकिनाऱ्यावरील महत्वाचें झाड म्हणजे तैलोत्पादक ताडाचें होय. जंगलांत रबराचीं झाडेंहि विपुल आहेत. फुटाजेलनच्या दक्षिणेस सिंह आढळतात. वानरांच्याहि पुष्कळ जाती आहेत. सर्प तर पुष्कळच सांपडतात.

रहिवासीः—कोगॉनच्या तीरावर लँडोज व आयओलाज ह्या प्राचीन निग्रो जाती रहातात. वागा, नालू, लॅंडुमन व टिमनी या जातींचेंहि येथें वास्तव्य आहे. मुनेझच्या दक्षिण किनाऱ्यास व फुटाजालनपर्यंतच्या अन्तर्भागात सुसा नावाची जात रहाते. सुसा ही मुसुलमानी जात आहे. बागा व इतर काहीं जाती वन्य आहेत. गौरकाय असे फारच थोडे लोक आहेत व ते सर्व फ्रेंच आहेत.

शहरेंः—कोनाक्राय, बोके, दुबेका, बेंटी, टिंबो व लाबी हीं मुख्य शहरें होत. यांपैकीं कोनाक्राय हें राजधानीचें शहर आहे. याची लोकसंख्या २०,००० आहे नायगरला जाणारी आगगाडी येथूनच निघते.

उद्योगधंदेः—येथील जमीन फार सुपीक आहे. रबर, ताडाचें तेल, कापूस, डिंक, भुईमूग हे जिनस विशेषेकरून येथें होतात. फुटाजालन येथें गुरें पाळणें, विकणें हा धंदा चालतो. कातड्याचा व्यापारहि बऱ्याच मोठ्या प्रमाणात चालतो. कापसाचा माल, तांदूळ, तंबाखू, ह्या मुख्य आयात वस्तू होत. १९१६ त ९६८९३९१ फ्रँकची आयात व १६२४०४८८ फ्रँकची निर्यात होती.

इतिहास—गिनी किनाऱ्याचा हा भाग पोर्तुगीज शोधकानीं प्रथम पंधराव्या शतकांत शोधून काढला. गिनीच्या इतर भागांतून उचलबांगडी झाल्यामुळें गुलामाचे व्यापारी १८ व्या शतकाच्या उत्तरार्धांत येथें येऊन राहिले. १८३८ त फ्रान्सचें लक्ष्य या भागाकडे वेधलें. १८५४ त जनरल फेडहरबी याला सेनीगॉलचा गव्हर्नर नेमण्यांत आले. फ्रेंच सत्तेचा पाया मजबूत करण्यासाठीं नालु जातींशीं १८४८त तह करण्यात आला व १८४८ ते १८६५ च्या दरम्यान निरनिराळ्या किनाऱ्यावरील जातींना फ्रान्सनें आपल्या संरक्षणाखालीं घेतलें. १८८१ मध्यें फुटाजालन येथील मुख्यानें आपला देश फ्रान्सच्या शासनाखालीं दिला. १८८२ मध्यें ग्रेटब्रिटननें फ्रान्सच्या दक्षिणेस मेलाकोरीच्या पात्रापर्यंतच्या प्रदेशावरील हक्क मान्य केला. १८८६ मध्यें पोर्तुगालशीं तह होऊन उत्तरसरहद्द ठरविण्यात आली (१८९९). अपर नायगर प्रांत देखील कॉलनींत समाविष्ट करण्यात आले. १९०४ मध्यें लॉस बेटें ग्रेटब्रिटननें काहीं अटींवर फ्रान्सला दिलीं. १८९१ मध्यें फ्रेंच गिनी सेनिगॉलपासून वेगळा करण्यात आला. गिनीला बरेच स्वराज्याचे हक्क मिळाले आहेत. तेथील राज्यकारभार लेफ्टनंट-गव्हर्नर पहातो. बऱ्याचशा भागावर एतद्देशीय संस्थानिक नेमण्यात आले आहेत. अर्थातच फ्रेंच अधिकाऱ्याची त्यांच्यावर देखरेख आहे.

गिबन एडवर्ड—( १७३७-१७९४ ) या आंग्ल इतिहासकाराचा जन्म पुटने ( सरे ) येथें झाला. लहानपणीं हा नेहमीं आजारी असे. घरगुती काळजी व प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्याच्या आईनें त्याच्याकडे थोडें फार दुर्लक्षच केलें, परंतु गिबनच्या मावशीनें त्याला लहानाचा मोठा करून वाचावयास व लिहावयास शिकविलें. एकंदरींत या मावशीचे गिबनवर फार उपकार झाले व गिबन ते स्मरतहि असे. तो नेहमीं आजारी पडत असल्यामुळें त्याचें लहानपणाचें शिक्षण चांगलें सुरळीत झालें नाहीं. तरी पण त्या वयातच इतिहासाची त्याला गोडी लागली. वयाच्या १६व्या वर्षापासून त्याची प्रकृति सुधारत चालल्यामुळें त्याला शिक्षणाकरितां स्वित्झर्लंड येथें पाठविलें. तेथें पॅव्हिलिआर्डच्या देखरेखीखालीं त्याचें शिक्षण उत्तम तऱ्हेनें झालें. फ्रेंच भाषेंत तर त्यानें थोडक्याच वेळात इतकें प्रावीण्य मिळविलें कीं त्याला विचार सुद्धा फ्रेंच भाषेंतच करावयाची संवय लागली. पास्कलचीं ' प्राव्हिन्शिअल लेटर्स ' तर त्याला इतकीं आवडलीं कीं तीं तो दरवर्षी एकदां वाचीत असे व त्यामुळें स्वतःच्या ज्ञानांत प्रतिवर्षी बरीच भर पडली असें त्याला वाटे. स्वित्झर्लंडमधील शिक्षण पांच वर्षांत संपल्यावर १७५८ त तो इंग्लंडला परत आला. परकीय भाषेच्या

शिक्षणामुळें तो इंग्लिश चालीरीतींनाहि बराच परका झाला होता आणि म्हणूनच तो फारसा समाजात मिसळत नसे बोलताना स्वकीय व परकीय भाषेची भेसळ न होऊ देता शुद्ध स्वदेशी भाषा बोलता यावी म्हणून त्यानें पुष्कळ प्रयत्न केले परंतु ते सर्व निष्फळ ठरले स्वदेशाभिमानानें त्यानें हॅम्पशायरच्या फौजेंत १७५९ सालीं कॅप्टनचें काम पत्करिलें हें काम करीत असताना सुद्धा त्यानें आपला अभ्यास सोडून दिला नाहीं या नोकरीमुळें त्याची प्रकृति सुधारून तो पहिल्यासारखा भिडस्त राहिला नाहीं तीन वर्षांनीं लष्करी नोकरींतून सुटल्यावर १७६३ च्या जानेवारींत तो देशपर्यटण करण्याकरितां निघाला फ्रान्स, स्विझर्लंड, इटली वगैरे देशांतून त्यानें प्रवास केला व त्याच्या इटालीमधील प्रवासांतच त्याला 'रोमच्या साम्राज्याचा ऱ्हास व नाश' असें एक ऐतिहासिक पुस्तक लिहिण्याची इच्छा झाली १७७६त त्यानें या पुस्तकाचा पहिला भाग लिहिला व पुढें अकरा वर्षांत तें पुस्तक त्यानें संपविलें या पुस्तकाचे विषयानुसार दोन विभाग करता येतात. पहिल्या विभागात ४६० वर्षांची (इ. स १८०-६४१) सविस्तर माहिती फारच चांगल्या तऱ्हेनें दिली आहे दुसऱ्या विभागात यापुढील ८०० वर्षांची त्रोटक माहिती असून त्यामधील कांहीं गोष्टींबद्दल मतभेद आहे या इतिहासाची पधरावें व सोळावें हीं प्रकरणें फार लोकप्रसिद्ध आहेत या प्रकरणांतून गिबननें ख्रिस्ती धर्माचा उत्कर्ष व रोमन साम्राज्याच तत्संबधीं धोरण याचा सविस्तर इतिहास दिला आहे मानव जातीच्या सुखावरून प्रगति व सुधारणा यांचें मान तो ठरवीत असे मानवी सुखाला राजकीय स्वातंत्र्य हें जरूर पाहिजे असें त्याचें मत असून गुलामगिरीच्या तो अगदीं विरुद्ध होता

त्यानें लिहिलेल्या इतिहासाचा पहिला भाग प्रसिद्ध झाला तेव्हा तो पार्लमेंटचा मेंबर होता लॉर्ड नॉर्थला राजकारणात बरीच मदत केल्यामुळें तो कांहीं दिवस व्यापार व वसाहती यावरील कमिशनरचें काम करीत होता हा प्रसिद्ध इतिहासकार १७९४ सालीं मरण पावला लॉर्ड शेफील्डनें गिबनचे निरनिराळे ग्रंथ, आत्मचरित्र व इतर लिखाण दोन खंडात प्रसिद्ध केलें आहे ( १७९६ )

**गिब्ज** ( १८२२-१९०८ )—हा अमेरिकन रसायनज्ञ न्यूयॉर्कमध्यें जन्मला याच्या शिक्षणास १८३७ त कोलंबिया विद्यालयात सुरुवात झाली व पुढें तो जर्मनींत लाबिग, रोज वगैरे शास्त्रज्ञांजवळ व पॅरिसमध्यें डुमास, रेग्नॉल्ट वगैरे शास्त्रज्ञांजवळ शिकण्यास गेला परत आल्यावर त्याला हार्वर्ड विश्वविद्यालयात अध्यापकाची जागा मिळाली निरिंद्रिय रसायनशास्त्रांत कोबाल्ट अमाईनें, प्लाटिनम धातू इत्यादींवर प्रयोग करून यानें कांहीं शोध लावले आहेत हा अतिउत्तम शिक्षक होता

**गिब्स जोसिया विलिअर्ड** ( १८३९-१९०३ )—हा एक अमेरिकन गणिती आणि, पदार्थविज्ञानशास्त्रवेत्ता होऊन गेला याचा जन्म अमेरिकेंतील न्यू हेव्हन शहरीं झाला इ स १८५४ सालीं याचा येल कॉलेजात प्रवेश झाला व सन १८५८ सालीं तेथील पदवी घेऊन त्यानें आपलें शिक्षण तसेंच पुढें चालू ठेवलें इ स १८६३ सालीं त्याला त्याच कॉलेजांत शिक्षक नेमण्यात आलें.प्रथमतः त्यानें लॅटिन शिकविलें व पुढें नैसर्गिक तत्वज्ञान शिकविलें पुढें १८६६ ते ६९ पर्यंतचा काल त्यानें यूरोपखंडात घालविला १८६९ सालीं तो परत आला व त्याला येल कॉलेजात गणितात्मक पदार्थविज्ञानशास्त्राचा प्रोफेसर नेमण्यात आलें या ठिकाणीं त्यानें मरेपर्यंत अध्यापकाचें काम केलें इ स १८७३ सालीं त्यानें 'प्रवाही द्रव्याच्या गत्युष्णतेविषयीं रेखागणितात्मक पद्धति' या नावाचा लेख लिहिला व दुसरा असाच एक लेख लिहिला या वेळेपासून त्यानें लेख लिहिण्यास सुरुवात केली पुढें १८७६-७७ सालीं त्यानें 'विभिन्न द्रव्यांचा समतोलपणा' या नावाचा लेख लिहून रसायनशास्त्रात एक उपशास्त्र उत्पन्न केलें यानें गणितावर कित्येक लेख लिहिले आहेत १९०१ सालीं त्याला रॉयल सोसायटीनें कोपले पदक नावाचें पारितोषिक दिलें

**गिरनार**—काठेवाड या टेकडीला ५ मुख्य शिखरें आहेत त्यापैकीं सर्वांत उंच जें गोरखनाथ त्याची उंची ३६६६ फूट आहे येथें अंबामातेचें मंदिर व जैन मंदिर पुष्कळ आहेत गोमुखी, हनुमानधारा व कमंडलकुंड हीं मुख्य कुंडें होत भैरवजप नावाच्या खडकावरून चांगला जन्म यावा म्हणून तपस्वी लोक खालीं मुद्दाम उडी घेत असत असें सांगतात गिरनारचीं उज्जयंतादि किंवा रैवत हीं जुनीं नांवें आहेत या टेंकडीच्या पायथ्याशीं अशोकाच्या शासनाच्या खोदलेल्या नकला व सुदर्शन तळें बांधल्याबद्दलचा रुद्रदामन् ( सुमारें इ स. १५० ) चा एक लेख असून दुसरा एक लेख या तळ्याचा नाश व दुरुस्ती ( इ स ४५८ ) याबद्दलचा आहे ( स्मिथ-'अशोक,' व 'अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया' पहा ) वाघेश्वरी दरवाज्यांतून गिरनारला रस्ता जातो वाघेश्वरी टेंकडीवर एक देवीचें देऊळ असून जवळच दामोदरकुंडाकडे जाण्याचा रस्ता आहे येथील पाण्यात हाडें विरघळतात म्हणून हिंदू लोक आपल्या नातेवाइकांचीं हाडें येथें आणून टाकतात जवळच रेवतीकुंड आहे वाघेश्वरी दरवाज्यांतून वाघेश्वरीच्या देवळाकडे जाताना रस्त्यानें अशोक, रुद्रदामन व स्कंदगुप्त यांच्या वेळचे अंकित लेख असलेले बरेच खडकाचे कडे लागतात दामोदरकुंडापासून सुमारें दीड मैलावर भावनाथ महादेवाचें देऊळ आहे येथें माघ महिन्यात जत्रा भरते नेमिनाथाच्या देवळांतील तळमजल्यात पार्श्वनाथाचा पुतळा आहे त्याच्या छिद्रांतून थब थब सारखें पाणी पडतें असें म्हणतात नवीन वधूवरांना एकमेकांच्या

बळाला गाठ मारून अंबामातेच्या दर्शनाला नेण्याची चाल आहे.

या क्षेत्राचें माहात्म्य प्रभास खंडात वर्णिलें असून त्याचे तीस अध्याय केले आहेत. यांत गिरनार येथील ब्राह्मणाच्याच हातून क्रिया करून घेण्यात काय पारमार्थिक फायदे आहेत तें दाखविलें आहे. आणि हे ब्राह्मण हिमालयाच्या पायथ्यापासून आलेले आहेत. प्रभास क्षेत्र सर्व क्षेत्रांत थोर आहे आणि गिरनार हें त्याहूनहि थोर आहे. कैलासस्थ शंकरावर सहज प्रसन्नतेबद्दल व दैत्यावरहि कृपा केल्याबद्दल विष्णु रागावला. शिव गुप्त झाला आणि गिरनारावर अदृश्यरूपें वास करूं लागला. पार्वतीसह सर्व देव तेथें आले पार्वतीच्या गायनानें संतुष्ट होऊन साक्षात शंकर देवांस दृश्य झाला. देवांनीं स्तुति करून कैलासीं परत जाण्यास विनंति केली. 'तुम्ही जर येथें रहाल तर मी कैलासीं जातों' असें शंकर म्हणाला. तेव्हांपासून सर्व देव व शंकरहि अंशेंकरून या स्थळीं राहिले येथें शंकर शरीररूपानें वस्त्राशिवाय राहिले होते म्हणून यास वस्त्रापथ असें नांव आहे. गिरनारनंतर दातर (उंची २७५१ फूट) नांवाची दुसरी टेंकडी महत्त्वाची आहे. हिच्या शिखरावर जमिलशहाचें थडगें असून मुसुलमान लोक ही टेंकडी पवित्र मानतात. महारोग्यांना या टेंकडीवर गुण येतो असें म्हणतात. गिरनार टेंकड्यांतून निघणाऱ्या जलप्रवाहांत सुवर्णरेखा, गुडाजली व कालवो हे मुख्य आहेत.

[ जे. ब्र. बर्जेसच्या 'रिपोर्ट ऑन दि अँटिक्विटीज ऑफ काठेवाड अँन्ड कच्छ' या लेखांत (आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ वेस्टर्न इंडिया पु. २ पान १३ पासून पुढें) गिरनारचें विस्तृत वर्णन आढळेल 'प्रोग्रेस रिपोर्टस ऑफ दि वेस्टर्न सर्कल' यांतूनहि मधून मधून बरीच माहिती दिलेली आहे; शिवाय बील—बुद्धिस्ट रेकॉर्ड्स ऑफ दि वेस्टर्न वर्ल्ड. क्रूक—पॉप्युलर रिलिजन अँन्ड फोकलोअर ऑफ नार्दर्न इंडिया ]

**गिरसप्पा**—होनावर तालुक्यांत होनावर व गिरसप्पा धबधबा यांच्या मध्यावर शरावतीच्या काठीं सुंदर जागेवर वसलेलें एक गांव. हें नारळाचें आगर आहे. येथून जवळच नगरबस्तिकेरे शहराचे अवशेष आहेत. एका काळीं येथें १ लाख घरें व ८८ देवळें होतीं असें सांगतात. येथें जैनांचें एक कुली (चौफुली ?) सारखें देऊळ पडाण्यासारखें आहे. त्यांत ४ मूर्ती आहेत. महावीरस्वामी वर्धमानाच्या देवळांत महावीराची काळ्या दगडाची मूर्ति आहे व ४ शिलालेख आहेत. अशी दंतकथा आहे कीं विजयानगरच्या राजांनीं गिरसप्पा येथील एका जैन घराण्यास अधिकारारूढ केलें. १४०९ मध्यें गिरसप्पाच्या वडेर इम्माडप्पानें संकीजवळील गुणवतीच्या देवळाला देणगी दिल्याचा उल्लेख आहे. इम्माडप्पाची नात विजयानगरापासून स्वतंत्र झाली. या घराण्यांत पुष्कळ वेळां स्त्रियांनीं अधिकार चालविलेला दिसतो. १६ व्या शतकाच्या अखेरीला बेदनूरच्या नाईकानें भैरादेवीचा पराभव केला. १६२३ मध्यें डेलाव्हली हा इटालियन प्रवासी लिहितो कीं 'गिरसप्पा ही पूर्वी एका भागाची राजधानी व प्रसिद्ध शहर असून तेथें राणीचें राज्य होतें.' त्यावेळीं काहीं झोपड्यांखेरीज तेथें काहीं राहिलें नव्हतें व अवशेष भाग जंगलांत नाहींसा झाला होता. येथें मिरीं इतकी होतात कीं पोर्तुगीज लोक गिरसप्पाच्या राणीला मिऱ्यांची राणी म्हणत.

**गिरसप्पा धबधबा**—उ. अ. १४°१४' व पू. रे. ७४°४९' मुंबई म्हैसूरच्या हद्दीवर हा आहे. होनावर व गिरसप्पा येथून हा पहाण्यास जातात अंतर अनुक्रमें ३५ व १८ मैल आहे. जवळच्या जोग नांवाच्या खेड्यावरून तेथले लोक त्याला जोगचा धबधबा असेंहि म्हणतात. हा धबधबा ज्या नदीच्या प्रवाहानें झाला आहे त्या शरावती नदीचें पात्र या धबधब्याच्या तोंडाशीं २३० फूट रुंद आहे व तें ४ धारांनीं ८३० फूटावरून खालीं उडी घेतें. एवढ्या उंचीचा मोठा व गंभीर सुंदर धबधबा हिंदुस्थानांत तर नाहींच पण जगांतहि क्वचितच सांपडेल. हा पहाण्याची उत्तम वेळ म्हणजे डिसेंबर महिना होय. जून ते नोव्हेंबरपर्यंत तो धुक्यानें आच्छादित असतो. गिरसप्पा गांवापासून १० मैलपर्यंत चांगला चढाव असून गिरसप्पा व मालेमणी घाटाच्या माथ्यावर जाईपर्यंत रस्ता भव्य व गंभीर अशा जंगलांतून जातो. सूर्यप्रकाशानें नेहमीं इंद्रधनुष्याची शोभा दिसते व चंद्राच्या प्रकाशांत रुपेरी झकाकीनें पाण्याच्या धारा चकाकतात. रात्रीच्या वेळीं पेटत्या चुडी वगैरे दरींत सोडल्या असतांना दिसणारी शोभा काहीं विशेष व काहींशी भयंकर असते. आडवें पडून व डोकावून खोल दरीची शोभा पहावी लागते. म्हैसूर बाजूनें सर्वोत्कृष्ट देखावा दिसतो. म्हैसूर बाजूनें जंगलांतून एक दोन रस्ते गेले असून त्यांपैकीं एकानें वर नदीच्या पात्राकडे जातां येतें व माथ्यावरचा मुलूख दिसतो. काठावरून पाहिलें असतां धबधब्याची शोभा, कडे तुटलेल्या त्या दरीची भयानकता व खोल आणि वळणें घेत जाणाऱ्या व युगानुयुगें न बदललेला व न थांबलेला प्रवाह हीं सर्व उत्तम दिसतात.

**गिरिधर राजा बहादुर**—उत्तर मोंगलशाहींत जे थोडे हिंदु कामदार स्वपराक्रमानें प्रसिद्धीस आले त्यांत राजा गिरिधरच्या कुटुंबाची गणना होते. हे नागर ब्राह्मण अलाहाबादेकडे रहात होते. राजा गिरिधरचा बाप दयाराम उर्फ दयाबहादूर व चुलता छबिलराम हे बहादुरशहाचा दुसरा मुलगा अजीमुश्शान याच्या पदरीं होते. ते मोठे शूर व मुत्सद्दी असून त्यांनीं आपल्या धन्याची सेवा उत्कृष्ट बजाविली. अजीमुश्शान बंगालचा सुभा असतां त्यास व त्याचा मुलगा फर्रुखसियर यास दयारामाच्या कुटुंबाची चांगली मदत होत असे. लाहोर येथें बहादुरशहा स. १७१२ त वारला तेव्हां त्याच्या मुलांत गादीविषयीं लढाया

झाल्या. या लढायांत दयाराम नागर आपल्या धन्यासाठीं लढून समरांगणीं मरण पावला. राजा मुहकमसिंग, केशरसिंग, राजसिंग, पृथ्वीराज व दयाराम एकमतानें वागून, अजीमुश्शानचा पक्ष उचलून धरीत होते. परंतु अजीमुश्शान मारला गेला आणि दयारामाचा भाऊ छबिलाराम जहांदरशहाच्या पक्षास मिळाला. त्यास जहांदरशहानें कडा माणिकपूरचा फौजदार नेमिलें. त्याजवळच दयारामाचा मुलगा राजा गिरिधर हाहि कामास असे. छबिलाराम व गिरिधर यांनीं कडा माणिकपुर येथें असता द्रव्यसंचय करून फौज वाढविली. जहांदरशहा गादीवर बसल्यानंतर सहा सात महिन्यांनीं फर्रुखसेयर बंगाल्यातून सय्यद बंधूंची मदत घेऊन आग्र्यावर चालून आला तेव्हां छबिलाराम व गिरिधर त्यास जाऊन मिळाले. त्यांनीं त्यास पुष्कळसा पैसा कर्जाऊ देऊन फौजेचीहि मदत चांगली केली. ता. १० जानेवारी स. १७१३ रोजीं आग्रा येथें निकराची लढाई झाली. तींत छबिलारामानें स्वतः मोठा पराक्रम करून जिवावर उदार होऊन लढण्याची शिकस्त केली, म्हणूनच फर्रुखसेयर यास त्या दिवशीं जय मिळाला या कामगिरीबद्दल फर्रुखसेयरनें त्यास प्रथम खालसा दिवाणाचें म्हणजे वसुलाचें काम देऊन पुढें आग्र्याच्या सुभ्यावर नेमिलें. आग्रा येथें असता त्यानें चूडामण जाटास वठणीस आणिलें. नंतर कांहीं दिवसांनीं त्याची बदली अलाहाबादच्या सुभ्यावर झाली. सवाई जयसिंग व छबिलाराम यांचें संगनमत असल्यानें सय्यदांचें व बादशहाचें वाकडें आलें. तेव्हां या दोघांची सय्यदास मोठी धास्ती वाटे. शेवटीं सय्यदांचीं कारस्थानें सिद्धीस जाऊन फर्रुखसेयर पदच्युत झाला. लवकरच सय्यदांनीं छबिलारामावर शस्त्र धरिलें. प्रथम त्यांनीं गिरिधर बहादुर यास दिल्लीस बोलावून आणून कैदेंत ठेवलें. तेथें त्यास सय्यदांचा बेत समजताच तो पळून अलाहाबादेस छबिलाराम यास जाऊन मिळाला. तेव्हां सय्यदांनीं त्या दोघांवर फौज रवाना केली. इतक्यांत छबिलाराम अर्धांगवायु होऊन मरण पावला ( नोव्हेंबर १७१९ ), आणि गिरिधर हा चुलत्याच्या उत्तरक्रियेची सबब सांगून एक वर्ष प्रयागास राहिला; आणि त्या अवधींत त्यानें तेथील किल्ल्याचा वगैरे चांगला बंदोबस्त केला. या वेळीं बुंदेले रजपूतहि बादशहाशीं लढत असून त्यांचा राजा भगवंतसिंग हा गिरिधर बहादुरास अलाहाबाद येथें सामील झाला. सय्यदांनीं त्याजवर मोठी फौज रवाना केली. या फौजेवर महंमदखान बंगश वगैरे सरदार मुख्य होते. गिरिधरसारखा पराक्रमी, अनुभवी व शूर सरदार आणि अलाहाबादसारखा महत्वाचा किल्ला जोंपर्यंत आपल्या कबजांत नाहीं तोंपर्यंत सय्यदास चैन पडेना. किल्ला कबजांत येईना, तेव्हां सय्यदांनीं आपल्या भरंवशाचा सरदार रतनचंद यास गिरिधरकडे पाठविलें. रतनचंदानें गिरिधरची खासगी रीतीनें भेट घेऊन त्याजबरोबर सल्ला ठरविला. गिरिधरनें लाख रुपये व अयोध्येचा सुभा घ्यावा आणि अलाहाबादचें ठाणें सोडून द्यावें, असा तह ठरून राजा गिरिधर अयोध्येस गेला आणि रतनचंद सय्यदांकडे परत आला (मे स. १७२०). पुढें सय्यदांचा पाडाव झाला आणि अयोध्येच्या सुभ्यावर बादशहानें सादतखानास नेमिलें. तेव्हां तेथून गिरिधर बहादुराची बदली माळव्यावर बहुधा स. १७२१ त झाली; परंतु निजामहि तेथें हक्क सांगत होता. निझामास अडविण्याकरिताच गिरिधरची माळव्यावर बादशहानें नेमणूक केली होती. पुढें सवाईजयसिंग व गिरिधर यांच्यात तेढ येऊन जयसिंगानें मराठ्यांना माळव्यावर स्वारी करण्यास बोलाविलें. व त्याप्रमाणें चिमाजी आप्पा व मल्हारराव होळकर हे चालून आले त्यांची व गिरिधरची देवासच्या ईशान्येस २५ कोसांवरील सारंगपूर गावीं लढाई होऊन तींत राजा गिरिधर मरण पावला ( १७२४ ). उज्जनीच्या तटास गिरिधराचें नाव चालतें असें म्हणतात. पुढें गिरिधरचा चुलत भाऊ दयाबहादर हा माळव्याचा सुभेदार झाला. [ बील, मराठी रियासत, मध्यविभाग ].

**गिरिधर रामदासी**—यांचें मूळचें नाव गिरमाजी. हे समर्थ रामदास यांची शिष्यीण श्री वेणाबाई, तिच्या बायजाबाई नांवाच्या शिष्यीणीचे शिष्य होत. त्यांनीं समर्थांना प्रत्यक्ष पाहिलें होतें व त्यांचा समागम यांना कांहीं काल घडला होता. त्यांचा मठ मोंगलाईत बीड येथें आहे. यांचा मुख्य ग्रंथ समर्थप्रताप नांवाचा असून त्यांत समर्थांचें बरेंचसें चरित्र ( जें गिरधरांनीं स्वतः पाहिलें तें ) आलेलें आहे. समकालीनत्वामुळें या ग्रंथास समर्थचरित्रांच्या इतर ग्रंथांत बरेंच वरचें स्थान आहे. याशिवाय यांचे चाळीस ग्रंथ व हजार पंधराशें इतर कविता उपलब्ध आहे. रामायणावर यांचे पांच सहा ग्रंथ आहेत. यांनीं रामाशिवाय इतर देवतांवरहि काव्य केलें आहे. यांचा निवृत्तिराम हा ग्रंथ फार सुंदर आहे. यांनीं आपल्या आयुष्यांतील आठवणी एका छोट्या ग्रंथांत लिहून ठेवल्या आहेत. यांनीं काशीयात्रा केली होती व तिचें वर्णनपर एक प्रकरणहि त्यांनीं लिहिलें आहे. हे शके १६५१त समाधिस्त झाले. हे मिरजेकडील रहाणार होते. [ समर्थप्रताप. संतकविसूचि ].

**गिरिया**—मुर्शिदाबाद जिल्ह्यांतील एक जुनें रणक्षेत्र. येथें दोन प्रसिद्ध लढाया झाल्या. एक १७०० मध्यें अलिवर्दीखान यानें नवाब सर्फराजखा याचा पराभव करून बंगाल्याचें राज्य घेतलें, ती व दुसरींत १७६३ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीनें मिरकासीमचा पाडाव करून मीरजाफरला राज्यदान केलें.

**गिरिव्रज**—ही मगधदेशाची प्राचीन राजधानी होय. हिची स्थापना उपरिचरवसु यानें केल्यावरून हिला वसुमति असेंहि एक नाव होतें. पांडवांच्या वेळीं हींत जरासंध रहात असे. पुढें या शहरास राजगृह असें म्हणूं

लागले पाटलिपुत्राच्या दक्षिणेस हें ठिकाण होतें विल्सन म्हणतो की मगधाच्या डोंगराळ भागात हें शहर होतें परंतु पुढें रसलेंच यानें साम्य राजगृहाशीं दाखविलें आहे गिरिव्रज म्हणजे तद्देशीय असाहि अर्थ कर्न करतो बृहत्संहितेंत हें नाव येतें कोठें कोठें ही केकय देशाची राजधानी म्हणून सांगितलें आहे विष्णुपुराणातहि याचा उल्लेख येतो

फाहियान म्हणतो की राजगृहाच्या दक्षिणेस पाऊण मैलावर पांच टेकड्यांच्यामध्यें हें आहे ह्युएन संगहि तेंच सांगतो रामायणातहि असेंच वर्णन आहे यास हल्लीं पुराना राजगिर म्हणतात महाभारतात या पांच टेकड्यांचीं नांवें वैहार ( सांप्रतचे वैभार ), वराह ( विपुलगिरी ), वृषभ ( रान ), ऋषि ( उदय ) व चैत्यक ( सोनागिरी ) अशीं आहेत. वैभार टेकडीवर जैन शिलालेख आहेत. बौद्धांची पहिली संगीति येथेंच भरली ( वि पृ ५४३ ) येथें अनेक उन्हाळीं व कुंडें आहेत

[ बृहत्संहिता १०, विष्णुपुराण भा ४, वाल्मिकी रामायण, बालकांड अ ३३, अयोध्या कां अ ६८, भारत पर्याय मूवर्णन ]

**गिरिष्क**—गिरिष्क या नावाचें अफगाणिस्तानात एक खेडें व किल्ला आहे हें हेलमंड नदीच्या पूर्वतीरावर असून कंदाहारच्या पश्चिमेस ७८ मैलावर समुद्रसपाटीपासून ३६४१ फुट उंचीवर आहे येथील किल्ल्यात कंदाहारची शिबंदी असून या जिल्ह्याच्या अधिपतीचें निवासस्थान आहे या किल्ल्याला लष्करी महत्व नाहीं पहिल्या अफगाण लढाईत ब्रिटिश लोकांनीं प्रथम हें शहर काबीज केलें दश्त-इ-बक्वा हें रुंद मैदान गिरिष्कच्या पलीकडे फराकडे पसरलेलें आहे

**गिरीदीह**—बिहार-ओरिसा हजारीबाग जिल्हा गिरीदीह सबडिव्हिजनचें मुख्य ठिकाण उ अ २४°१०' व पू रे. ८६° २२' लो स ( १९११ ) १०६६८ येथें १९०२ पासून म्यु क आहे

**गिलगांव जमीनदारी**—मध्यप्रांत चांदा जिल्हा क्षेत्रफळ ४०चौरस मैल पैकीं ३४मैल जंगल असून त्याची पहाणी झाली नाहीं पूर्वेस खुटगांव आणि पोटेगांव जमीनदारी दक्षिणेस पेमुरदा, उत्तरेस आणि पश्चिमेस खालसा भाग ही घराणें जुनी आहे होत एकंदर खेडीं २२, पैकीं ७ ओसाड आहेत एकंदर उत्पन्न २०००रु, टाकोळी ७१ रु वइतर कर ४३-११-० घराणें राजगोंड जमीनदार पैकी यापु इस्टेट साधारण बऱ्या स्थितींत आहे

**गिलजित**—काश्मीरच्या सरहद्दीवरील जिल्ह्यांपैकीं हा एक जिल्हा आहे. हा काश्मीर प्रांताच्या उत्तरेला आहे इ स १९०१ च्या पूर्वी गिलजित जिल्ह्यात चित्रळ, दीर, इत्यादि मुलखाचा अंतर्भाव होत असे पण इ स १९०१ नंतर वायव्य सरहद्दीवरील मुलुखाचा एक स्वतंत्र प्रांत बनविण्यात आल्यापासून गिलजित जिल्ह्यातून पूर्वीचा बराच मुलूख गाळला इ स १९११ साली या जिल्ह्याचें क्षेत्रफळ ३११८ चौ मै होतें.

गिलजित जिल्हा हा बाल्टिस्थानापेक्षाहि सखल जागेवर वसलेला आहे या जिल्ह्यातील मुख्य शहर गिलजित हें होय हें सिंधु नदीच्या उत्तरेला असून ४८०० फूट उंचीवर वसलेलें आहे गिलजित जिल्ह्यात गिलजित व अॅस्टोर या दोन तहशिली आहेत गिलजित जिल्ह्याची लोकसंख्या १९११ साली ३१,००० होती

या जिल्ह्यात गिलजित ही प्रमुख नदी आहे या नदीला यासीन, अश्कुमन व इतर छोटया नद्या मिळालेल्या आहेत. या नद्यांचीं खोरीं फार मोठीं असून नेहमी बर्फाच्छादित असतात गिलजित व चित्रळ यांच्यामध्यें एक मोठी सडक गेलेली आहे या जिल्ह्यात दरकोट, गझर, कोरबोहर्ट, किलिक, मिंटक इत्यादि मोठमोठे घाट असून, त्यांची सर्व साधारण उंची १५०००फूट आहे यजी ठिकाणापासून थोड्या मैलावर गिलजित नदी ही सिंधुनदीला मिळाली आहे व त्या ठिकाणीं हलता पुल बांधलेला आहे बजीच्या थोडेसें खालीं गेल्यावर अॅस्टोर ही नदी सिंधूला मिळाली असून, या नदीच्या खोऱ्यात ट्रगबल व बर्झिल हे मोठे घाट आहेत व या घाटामधून काश्मीरकडे जाणारा रस्ता आहे याशिवाय गिलजितहून पंजाबमध्ये येण्यासाठीं एक स्वतंत्र सडक आहे

नं

या लोकांची गिल्जित, अधिर व शिलतश ही प्रमुख ठिकाणें आहेत या जाती तुर्की भाषा बोलतात काश्मीरच्या मुलुखात या जाती फार धुडगूस घालतात.

गिलजितवर पूर्वी ट्रकन घराण्याचे पुरुष राज्य करीत होते असें तत्कालीन दतकथावरून समजतें हें घराणें निर्वंश झाल्यावर पुष्कळ काळपर्यंत 'ज्याची लाठी त्याची म्हैस' अशी या प्रदेशाची स्थिति होती १८४२ पर्यंत या प्रदेशावर पाच घराण्यानीं राज्य केलें या घराण्यापैकीं एका घराण्यात गौर रहमान नावाचा एक प्रसिद्ध पुरुष होऊन गेला इ स १८४१ मध्यें शीख लोकानीं गिलजितप्रात आपल्या ताब्यात घतला व तेथ आपलें लष्कर ठेवलें इ स १८४६ मध्यें ब्रिटिशानीं हा प्रात जम्मूचा महाराजा गुलाबसिंह यास दिला पण या प्रातात शातता ठेवणें हें गुलाबसिंगासारख्या कर्तृत्ववान व शूर पुरुषालाहि जड गेलें गौर रहिमान यानें अचानक बड करून गुलाबसिंगाच्या डोग्रा रजपूत शिपायाना सळो का पळो करून सोडलें सुमारें आठ वर्षे या रजपुतानीं आपली नजर या प्राताकडे वळविली नाहीं गुलाबसिंगाचा मुलगा रणबीरसिंग हा गादीवर येताच त्यानें गिलजित प्रात पुन्हा आपल्या ताब्यात आणण्यासाठीं कबर बाधली इ स १८६० मध्यें त्यानें गिलजितवर आपली फौज पाठविली सुदैवानें याच सुमारास गौररहमन हा वारल्यामुळें गिलजितप्रात आपोआपच रजपुताच्या हातीं लागला यानतर डोग्रा लोकानीं दोनदा यासीन सस्थानावर स्वारी करून तें जिंकून घेतलें १८६६ मध्यें त्यानीं दरेल सस्थानावर स्वारी करून तेथील दरद लोकाचा पराभव केला रशियाचा हिंदुस्थानात हात शिरू नये यासाठीं ब्रिटिशसरकारानें गिलजित जहागीर निर्माण केली इ स १९०१ सालीं वायव्य सरहद्दीवरील प्रदेशाचा स्वतत्र प्रात बनविण्यात आला व गिलजित जिल्हा हा काश्मीरमध्यें मोडू लागला

या जिल्ह्याची व्यवस्था पहाण्याकरिता काश्मीर सस्थाननें एक वजीर नेमलेला असतो या वजीरावर देखरेख ठेवण्याकरिता ब्रिटिशसरकारतर्फे एक पोलिटिकल एजट नेमण्यात आलेला आहे गिलजित जहागिरामध्यें अनेक प्रकारचे लोक पूर्वी रहात असत व त्या सर्व लोकाना दरद हें साधारण नाव होतें पण हल्लीच्या गिलजित जिल्ह्यात मुसलमान लोकाची वस्ती फार आहे याशिवाय येथें शीख लोकाचीहि बरीच वस्ती आहे हे लोक पैशाची भाषा बोलतात या जिल्ह्यातील लोक, पायघोळ लोंकरी अगरखा व पायजमा वापरतात वर वर पहाणाऱ्याला येथील लोक खुल्या दिलाचे व आनदी असावेसे दिसतात पण याच्याशीं ज्याचा निकट सबध येतो त्याना हे लोक खुनशी व क्रूर आहेत असें आढळल्यावाचून रहात नाहीं

**गिलवर्ड विल्यम** ( १५४४—१६०३ )—विल्यम् गिल्बर्ड याचा जन्म इग्लडातील कोलचेस्टर गावीं झाला. पुढें त्याच गावच्या शाळेत त्याचें शिक्षण झाल्यानतर त्याचा केंब्रिज येथील सेंटजॉन कॉलेजात प्रवेश झाला व तेथून त्यानें बी ए, एम् ए आणि एम् डी, या पदव्या सपादन केल्या इ स १५७३ सालापासून त्यान लडन शहरीं वैद्यकीचा धदा सुरू केला पुढें निरनिराळ्या खात्यात कित्येक अधिकाराच्या जागावर काम केलें

गिलबर्ट यानें चुबकत्वावर एक प्रसिद्ध ग्रंथ लिहिला आहे या ग्रथात त्यानें कित्येक वर्षांचें अनुभवजन्यज्ञान सगृहित करून ठेविलें आहे विद्युत्तेविषयींहि बरेचसें ज्ञान या पुस्तकात उपलब्ध करून ठेविलें आहे रसायनशास्त्रावर यानें बरेच परिश्रम केले होते परतु त्यावरील याचे लेख उपलब्ध झाले नाहींत

**गीझो**( १७८७–१८७४ )—या फ्रेंच मुत्सद्याचें नाव फ्रक्वा पेरी असें असून हा वक्ता व मुत्सद्दी होता हा नीमीस येथें १७ ७ मध्यें एका प्रॉटेस्टट घराण्यात जन्मला फ्रान्समध्यें १७८९ च्या राज्यक्रान्तीपूर्वी प्रॉटेस्टट लोकाचे बरेचसे हक्क काढून घेतल्यामुळें गीझोच्या आईबापाना आपला विवाह चोरून गुप्तपणें उरकून घ्यावा लागला उलटपक्षीं तें कुटुब उदारमतवादी असूनहि क्रातीच्या दिवसात गीझोच्या बापाचा वध करण्यात आला (१७९४) त्यामुळें गिझोच्या शिक्षणाची जबाबदारी त्याच्या आईवर पडली ती साधी, पण मोठी करारी व दृढनिश्चयी होती, तिची धार्मिक मतें १६ व्या शतकांतील ह्युगुनॉट्सना शोभण्यासारखीं होतीं अशा या बाईनें आपल्या पुत्राला उत्तम वळण लाविलें ती नेहमीं साधी रहात असे गीझो हा प्रधान झाला असताहि ती आपल्या पतीच्या स्मरणार्थ सुतकी वेषातच राही मात्र मोठमोठ्या राजकारणी पुरुषाच्या बैठकींत नेहमीं भाग घेई पुढें १८४८ मध्यें गीझोच्या हद्दपारींत ( लडनमध्यें ) ही मरण पावली पतीच्या वधानतर ही मुलासह जिनेव्हाला जाऊन राहिली, व तेथेंच गीझोचें शिक्षण झालें ती उदारमतवादी असून एमिली ग्रथात प्रतिपादिलेल्याप्रमाणें प्रत्येकानें काहीं तरी पोटाचा धदा शिकलाच पाहिजे हें मत तिला पटल्यामुळें तिनें गीझोला सुतारकाम शिकविलें त्यावेळीं गीझोनें स्वत केलें एक टेबल अद्याप ठेवलेलें आहे तथापि गीझोचें उच्च शिक्षण कोठें झालें याबद्दल साग्र माहिती आढळत नाहीं त्यानें स्वत च्या आठवणी म्हणून जो ग्रथ लिहिला त्यातहि लहापणाची माहिती मुळींच दिली नाहीं पुढें पॅरिसला तो परत आला व तेथें कायद्याचा अभ्यास करू लागला त्यावेळीं त्याचें वय १८ वर्षांचें असून त्यानें एका बड्या मत्र्याच्या घरीं शिकवणी मिळवून वर्तमानपत्रात लेखहि लिहिण्याचें सुरू केलें त्यामुळें वाङ्मयप्रेमी सस्थाशीं त्याचा परिचय झाला त्यानें२२व्या वर्षी शॅटू ब्रियाड याच्या मार्टीस या पुस्तकावर परीक्षणात्मक लेख लिहिला पुढें स्टुअर्ड या सपादकाच्या मार्फत त्याची पॉलिन म्यूलन नावाच्या लेखिकेशीं ओळख झाली ही कुलीन व ज्ञानसपन्न असून वयानें गीझोपेक्षां १४ वर्षांनीं वडील होती राज्यक्रान्तीच्या वेळीं

तिच्यावर आपत्ति कोसळल्यामुळें ती लेखनव्यवसायावर पोट भरीत असे. तिनें सुभर्डच्या पत्रांत एक लेखमाला सुरू केली असतां मध्येंच तिच्या आजारीपणामुळें तींत खंड पडला. परंतु गीझोनें ती माला पुरी केली. या प्रसंगामुळें *त्या दोघांतील परिचय वाढून पुढें गीझोशीं तिनें लग्न लाविलें.* विवाहोत्तरहि तिनें स्त्रीशिक्षणविषयक पुष्कळ पुस्तकें लिहिलीं. शेवटीं ती १८२७ त वारली. पुढें १८२८ त गीझोनें तिच्या भाचीशीं विवाह केला. तिला एक मुलगा होऊन ती १८३३ मध्यें मरण पावली. गीझोचा मॅरीस ग्युलोम नांवाचा मुलगा पुढें नावाजलेला लेखक बनला. नेपोलियनच्या कारकीर्दींत गीझोनें केवळ वाङ्मय व्यवसायासच वाहून घेतलें. त्यानें ललितकलावर थोडेंसें लिहून गिबनकृत रोमच्या इतिहासाचेंहि भाषांतर केलें. त्यानंतर तो इतिहासाचा प्रोफेसर झाला. त्यावेळीं त्यानें इतिहास-संशोधनाच्या कामास फार उत्तेजन दिलें. पुढें *१८ व्या लुईच्या वेळीं सेक्रेटरीच्या जागेवर त्याला नेमिलें.* पण नेपोलियन परत येतांच त्यानें राजीनामा देऊन पूर्ववत *लेखनव्यवसाय पत्करला.* यानंतर जेव्हां दोस्त राष्ट्रें नेपोलियनवर चालून आलीं त्यावेळीं गीझो हा घेंट येथें लुईकडे गेला. हें कृत्य देशद्रोहाचें होतें असें ठरवून, पुढें लोक गीझोचा घेंटचा माणूस म्हणून उपहास करीत असत. पुढें १८१६त पुन्हा राजशाही सुरू होऊन, गीझोला न्यायमंत्र्याच्या सेक्रेटरीची जागा मिळाली. या काळांत तो नियंत्रित राजशाहीचा पुरस्कर्ता होता. मध्यम वर्गास मताधिकार देण्यास तो अनुकूल असून निर्भेळ लोकशाहीच्या, तसेंच लष्करशाहीच्या व जुन्या बोर्बोन घराण्याच्या जुलमी राजेशाहीच्या तो विरुद्ध होता. नंतर १० व्या चार्लसनें पूर्ववत सुलतानी सुरू केल्यामुळें गीझोला सरकारी नोकरी सोडावी लागली; तेव्हां त्यानें 'लोकनियंत्रित राजपद्धति' या विषयावर व्याख्यानें व लेखांची झोड उठविली. त्यानें १८३० पर्यंत इंग्लंडच्या इतिहासांतील व फ्रान्सच्या इतिहासांतील संस्मरणीय गोष्टी प्रसिद्ध केल्या व यूरोपांतील सुधारणेचा इतिहास या *विषयावर महत्त्वाचीं व्याख्यानें दिलीं. त्यामुळें फ्रान्स व सर्व यूरोपमधील उत्तम लेखकांत त्याची गणना होऊं लागली. १८३० मध्यें तो लिसो शहरातर्फे डेप्युटी सभेचा सभासद* निवडून आला. त्या सभेंत एकदां चार्लस राजाच्या धमकीवजा भाषणाचा त्यानें जोरानें निषेध केला. राज्यक्रांतीचीं पुन्हां चिन्हें दिसूं लागलीं तेव्हां गीझो हा हुजूरपक्षास मिळून अठरा वर्षें सतत लोकशाहीविरुद्ध झगडत राहिला. या नंतर इ. स. १८३२ त गीझोला शिक्षणमंत्र्याची जागा मिळाली. त्यावेळीं त्यानें आपल्या देशाची उत्कृष्ट सेवा बजावली. प्राथमिक शिक्षणाच्या शाळा वाढवून शिक्षणबोर्ड स्थापलें, दुय्यम शिक्षण संस्था, युनिव्हर्सिटी व इतिहाससंशोधन या सर्वांस भरपूर सरकारी मदत दिली. राजकीय व सामाजिक शास्त्रसंस्था नेपोलियननें बंद पाडली होती ती पुन्हां यानें सुरू केली. पुढें (१८३९) गीझो हा लंडनला वकीलीच्या जागेवर गेला. येथें त्याचा खुद्द व्हिक्टोरिया राणीनें मोठा सत्कार केला. त्याच्या ग्रंथांबद्दल, आचरणाबद्दल व वकिलातीच्या कामाबद्दल त्याची मोठी वाहवा झाली. नंतर सीरियन प्रकरणामुळें राजानें गीझोस परत बोलावून प्रधानमंडळ बनविण्यास सांगितलें. याप्रमाणें १८४० मध्यें गीझो मुख्य प्रधान बनला, तो आठ वर्षें त्याच जागेवर होता. या वेळीं इंग्लंड व फ्रान्स यांच्यांत गीझोच्या चातुर्यामुळें सलोखा झाला होता. लुई राजा व व्हिक्टोरिया राणी यांची परस्पर भेट झाली होती.

प्लेट नदीवर फ्रेंच व ब्रिटिश फौज खांद्याला खांदा लावून प्रथमच लढली पण १८४६ मध्यें इंग्लंडचें प्रधानमंडळ बदललें. इतक्यात स्पेनच्या तरुण राणीच्या विवाहाचा प्रश्न निघाला. त्या बाबतींतील इंग्लंडच्या प्रयत्नाचा भलताच अर्थ करून गीझोनें व लुई राजानें मध्यें पडून स्पॅनिश राणीचा एका हलक्या बोर्बोन वंशजाशीं व तिच्या बहिणीचा लुईच्या धाकट्या मुलाशीं असे विवाह घडवून आणले. यामुळें फ्रेंचाचें ब्रिटिशांशीं विनाकारण वाकडें आलें व दोघामधील मैत्रीचा करार रद्द झाला. मात्र फ्रेंच पार्लमेंटांत गीझोचें वर्चस्व अबाधित होतें. तो स्वतः लांचलुचपतीपासून पूर्ण अलिप्त होता. तो गरीबींतच अखेरपर्यंत राहिला पण हाताखालील लोकांच्या दुराचरणाला त्यानें कडक प्रतिबंध न केल्यामुळें त्याच्या प्रधानमंडळाबद्दल मात्र ओरड सुरू झाली. तथापि त्याच्या भाषणशैलीची व वक्तृत्वाची छाप विलक्षण होती. अनेक बाबतींत तो पिटसारखा होता. मताधिकार विस्तृत नसल्यामुळें व स्वतः गीझो राजशाहीचा भक्त असल्यामुळें व त्यानें पार्लमेंटची लोकमतानुवर्ती सुधारणा न केल्यामुळें त्याच्या विरुद्ध देशांत बराच असंतोष माजला. त्याची दृष्टि सत्त्वाप्रमाणें थोर होती. सूक्ष्म व्यवहार त्याला कळत नसे. जमाबंदी, व्यापार, लष्कर व आरमार या बाबतींत तो गैरमाहीत असल्यानें हाताखालच्या मंत्र्यांच्या सल्ल्यानें त्याला वागावें लागे. वरील सर्व गोष्टी गीझोच्या तोट्यास कारण होऊन १८४८ त खुद्द राजानेंच त्याला राजीनामा देण्यास लाविलें. पुढें लोकशाही स्थापन झाल्यानंतर गीझो हा लंडनला जाऊन राहिला. तेथें इंग्लिश राजानें त्याचा मोठा सत्कार केला. त्यानंतर तो २६ वर्षें जगला. त्यांत शेवटपर्यंत पुस्तकें लिहून त्यानें आपला निर्वाह केला. फ्रान्सच्या प्रधानपदावरून सर्व *यूरोपच्या राजकारणाचीं सूत्रें* हालविणारा हा मुत्सद्दी शेवटीं तत्त्ववेत्त्याप्रमाणें शांतवृत्तीनें आपलें आयुष्य घालवूं लागला. *अधिकारलालसेनें पुन्हां राजकारणांत पड*ण्याची इच्छा त्याला झाली नाहीं. कांहीं दिवसांनीं लंडनहून तो आपल्या लिसो नांवाच्या गांवीं परत आला. फ्रान्समधील अनेक शास्त्रीय संस्थांचा तो सभासद होता. अखेर लिसो येथें तो अगदीं म्हातारपणीं मरण पावला (१८७४).

**गीता**—महाभारतांतील सर्व बोधप्रद भागात जर एखाद्याची ख्याति व लोकप्रियता अतिशय वाढली असेल तर ती भगवद्गीतेचीच होय. श्रीमद्भगवद्गीता हें आजच्या धर्मग्रंथातील अतिशय तेजस्वी व निर्मल रत्न आहे भगवद्गीता म्हणजे ईश-काव्य. भरतखंडामध्यें भगवद्गीतेसारखा अतिशय मौल्यवान लोकप्रिय ग्रंथ क्वचितच सांपडेल. वैष्णव पंथाच्या भागवत धर्माच्या लोकांचे भगवद्गीता हें पवित्र धर्मशास्त्र आहे इतकेंच नव्हे तर भारतीय धर्मांतील प्रत्येक पंथांतील लोकाचा हा भक्तिग्रंथ आहे. कल्हण ( राजतरंगिणी ५; १२५ ) नावाचा इतिहासकार काश्मीरचा राजा अवंतिवर्मन् याची अशी गोष्ट सांगतो कीं, इ. स. ८८३ मध्यें जेव्हां अवंतिवर्मन् राजा मरण्याच्या पंथास लागला तेव्हां त्यानें भगवद्गीतेचे अथपासून इतिपर्यंत वाचन करविलें व विष्णुपदाचे चिंतन करून मोठ्या आनंदानें प्राण सोडला. केवळ अवंतिवर्मन् राजालाच मरणसमयीं आत्मशांति मिळाली नसून पुष्कळ लोकाना गीतेच्या वाचनानें शांति मिळाली आहे. आज हिंदुस्थानात भगवद्गीता मुखोद्गत असणारे पुष्कळ शिकलेले लोक सांपडतील. अद्यापीहि गीतेच्या हजारों हस्तलिखित प्रती उपलब्ध आहेत.

*आवृत्त्या व भाषांतरें*.—इ. स १८०९ मध्यें कलकत्ता शहरीं प्रथम भगवद्गीता छापली. तेव्हांपासून हा ग्रंथ छापला गेला नाहीं असें क्वचितच एखादुसरें वर्ष सांपडेल. भगवद्गीतेचें भाषांतर हिंदुस्थानातील सर्व प्रचलित भाषांत केलेलें सांपडतें. युरोपखंडामध्यें गीतेचें भाषांतर प्रथम इंग्रजीमध्यें चार्लस विलकीन्सनें इ. स. १७८५ मध्यें लंडन शहरीं प्रसिद्ध केलें. आगस्ट विल्हेल्म व्हॉन श्लेगल यानें प्रथम भगवद्गीतेची बिनचूक आवृत्ति प्रसिद्ध केली व नंतर त्याच आवृत्तीला लॅटिन भाषांतर जोडण्यांत आलें.त्याच आवृत्तीवरून विल्हेल्म व्हॉन हम्बोल्टनें गीतेचें पारायण केलें. हा ग्रंथ त्यास इतका आवडला कीं, त्यानें लुक्रेशीअस, पॅरमेनाइडस् व एंपिडोक्लीस यांच्यापेक्षां भगवद्गीता ग्रंथ फार महत्त्वाचा आहे असें ठरविलें इतकेंच नव्हे तर आज सर्व देशाच्या उपलब्ध वाङ्मयामध्यें महाभारत महाकाव्यासारखें सुंदर व तत्त्वज्ञानानें ओथंबलेलें महाकाव्य सांपडत नाहीं असे त्यानें स्पष्टपणें नमूद केलें आहे. या काव्याचा विल्हेल्म व्हॉन हम्बोल्ट यानें फार बारकाईनें १८२५–२६ सालीं बर्लिनच्या ॲकेडेमीकमध्यें विचार केलेला आहे. या काव्याचें जर्मन भाषेमध्येंहि अनेकवार भाषांतर झालें आहे. इ. स. १८३४ मध्यें सी. आर, एस, पीपर; १८६९ मध्यें लारिन्सर व १८७० मध्यें वी बॉयस वगैरे यांनीं भाषांतर केलें अत्यंत शुद्ध भाषांतर आर. गार्बे व पी. डॉयसेन यांचें आहे.

*प्रसंग व उपदेश*–भीष्मपर्वामध्यें महायुद्धाचें वर्णन सुरु होण्यापूर्वीच भगवद्गीतेला अचानक प्रारंभ होतो. उभय पक्षाकडील योद्धे जेव्हां युद्ध करण्यास प्रवृत्त होऊन एकमेकासमोर उभे राहिले तेव्हा श्रीकृष्णानें अर्जुनाचा रथ दोन्ही सैन्याच्या मध्यभागीं नेऊन उभा केला; व युद्धाच्या इच्छेनें उभे राहिलेले कौरव व पांडव वीर त्याला दाखविले. तेव्हा अर्जुनानें वडील, आजे, गुरु, मामा, भाऊ, मुलगे, नातू, मित्र, सासरे व आपले हितकर्ते हे दोन्ही सैन्यात उभे आहेत असें पाहिलें, तेव्हां अर्जुन करुणेनें अत्यंत पीडित झाला. आपल्याच आप्तावरोबर युद्ध करावयाचा विचार मनात येताच अर्जुनाच्या शरीरास कंप सुटून रोमांच उभे राहिले. ज्याच्या हिताकरिता लढावयास तयार झालें पाहिजे असे जे स्वजन त्यांचा घात करणें मूर्खपणाचें आहे व त्यापासून पाप मात्र लागेल असें त्यास वाटलें. तेव्हा कृष्णानें अर्जुनाचा सांत्वनपणा व मनाचें दुबळेपण पाहून त्याची निर्भर्त्सना केली. तेव्हा अर्जुनानें " युद्धामध्यें जय मिळवून काय फायदा ? व माझें कर्तव्य काय आहे हें मला समजत नाहींसें झालें आहे तरी निश्चयेंकरून कल्याणकारक असेल तें मला सांगा" अशी श्रीकृष्णाची प्रार्थना केली. नंतर श्रीकृष्णानें परिणामाकडे लक्ष न देता युद्ध करण्यास उभें रहाणें हें प्रत्येक वीर पुरुषाचें कर्तव्यकर्म आहे अशी अर्जुनाची खात्री करून देण्याकरिता उत्तरादाखल अतिशय तत्वज्ञानानें भरलेलें भाषण केलें.श्रीकृष्ण म्हणालेः–"तूं गोष्टी तर सांगतोस पंडित्याच्या आणि जे शोक करण्यास योग्य नाहींत अशाबद्दल शोक करीत बसला आहेस. पण जे खरे पंडित (आत्मज्ञानी) आहेत ते मेलेल्याचाहि शोक करीत नाहींत, आणि जिवंताचाहि शोक करीत नाहींत. कारण मी पूर्वी केव्हांहि नव्हतों किंवा तूंहि कधीं नव्हतास किंवा हे राजेहि नव्हते असें नाहीं व आपण सर्वजण यापुढें कधीं असणार नाहीं असेंहि नाहीं. आपण नित्य आहों. या साम्प्रतच्या देहास जसा बाल्य, तारुण्य व वार्धक्य या तीन अवस्था येतात व जातात तशीच आत्म्याला दुसऱ्या देहाची प्राप्ति होते.परंतु या अवस्थांतरामुळें किंवा देहांतरामुळें आत्मा अनित्य असेल असली भूल खऱ्या पंडिताला पडत नाहीं. या नित्य अविनाशी व अप्रमेय आत्म्याचा उपाधिभूत जो देह तो विनाशी आहे, याकरिता हे भारता, तूं युद्धपराङ्मुख होऊं नकोस. जो असें समजतो कीं आत्मा मारणारा आहे, तसेंच जो आत्मा मरणारा आहे असें समजतो ते दोघेंहि अज्ञानी आहेत. कारण हा कोणास मारीतहि नाहीं व कोणाकडून मारलाहि जात नाहीं. हा आत्मा कधींहि जन्मत नाहीं व कधींहि मरत नाहीं; किंवा हा मागें अस्तित्व पावला नसून पुनः मृत्यु पावणार असेंहि नाहीं. कारण, हा जन्मरहित, नित्य, शाश्वत व अनादि आहे आणि शरीराचा वध झाला तरी ह्याचा वध होत नाहीं. जसा पुरुष जीर्ण झालेलीं वस्त्रें टाकून दुसरीं नवीं घेतो, तसा आत्मा जुनीं शरीरें टाकून नव्या शरीराशीं संगत होतो ह्या आत्म्याला शस्त्रें तोडीत नाहींत, याला अग्नि जाळीत नाहीं, याला पाणी भिजवीत नाहीं व याला वारा सुकवीत नाहीं. आत्मा अशा प्रकारचा आहे असें

समजल्यावर शोक करणें योग्य नाहीं आत्मा हा कोणत्याहि देहांत असला तरी तो कधींहि वध पावत नाहीं, म्हणून कोणाहि भूताच्याबद्दल शोक करणें तुला योग्य नाहीं धर्मयुद्धाहून क्षत्रिय वीराला दुसरें कांहींहि कल्याण नाहीं पार्था, यदृच्छेनें प्राप्त झालेला युद्धप्रसंग म्हणजे स्वर्गाचें उघडलेलें द्वारच होय असलें युद्ध भाग्यशाली क्षत्रियानाच प्राप्त होतें जर तू धर्मयुद्धाचा त्याग करशील तर मरणापेक्षांहि अति दुःखकर अशी तुझी अपकीर्ति होईल जर तू युद्धांत मारला गेलास, तर तुला स्वर्ग प्राप्त होईल, अथवा युद्धांत जय पावलास तर पृथ्वीचें राज्य भोगशील एवंच उभयपक्षीं युद्ध इष्टच आहे म्हणून अर्जुना युद्धाविषयीं निश्चय करून ऊठ कृष्णानें योद्धा या नात्यानें केलेलें भाषण व पुढें धर्मगुरु व परमेश्वर या नात्यानें केलेलें भाषण यामध्यें वरवर पहाणाऱ्याच्या दृष्टोत्पत्तीस असंबद्धता येते कांहीं ठिकाणीं तर भगवद्गीतेंत श्रीकृष्णानें अर्जुनाशीं परमेश्वर या नात्यानें केलेलेंच भाषण आढळून येतें भगवद्गीतेंतील कर्मयोगावरील विवेचनांतील अतिशय उच्चतम पराकाष्ठेचें तत्व म्हटलें म्हणजे फलाची इच्छा टाकून जय किंवा अपजय याचा विचार न करता नेहमीं निरिच्छ कर्म करावें हें होय कारण असल्या प्रकारचें निष्काम कर्म ऐहिक संसाराचा परित्याग, कर्म व संन्यास या तत्वामध्यें समाविष्ट झालेलें जें उच्चतम नीतितत्व (कर्मयोग) त्या तत्वांत अज्ञात तरी समाविष्ट होतें संन्यासमार्ग व कर्मयोग यामध्यें वरवर पहाणारास जो विरोध दिसतो, तो वास्तविक तसा नसून मोक्षशास्त्रदृष्ट्या हे दोन्हींहि एकच व समान फलदायी आहेत हें दाखविण्याचा गीतेमध्यें प्रयत्न केलेला आढळतो गीतेचें मत मात्र कर्मयोगाकडे निःसंशय झुकलेलें दिसतें वस्तुतः कृष्णानीं भगवद्गीतेंत मोक्ष मिळविण्यास कर्ममार्ग व ज्ञानमार्ग अथवा कर्मसंन्यास आणि कर्मयोग हे दोन्हींहि मार्ग कथन केलेले आहेत आत्मा हा जोंपर्यंत शरीरानें बद्ध झालेला आहे तोंपर्यंत कर्मसंन्यास करणें शक्य नाहीं व तो केला असे म्हणणें (म्हणजे कर्म न करता जगणें) ढोंगीपणाचें आहे कारण प्रकृति सत्व रज-तम या त्रिगुणानीं युक्त असल्यामुळें कर्म हें नैसर्गिक व आवश्यक आहे म्हणून मनुष्याला फक्त *निष्काम बुद्धीनेंच* कर्म करणें शक्य आहे जसा धुरानें अग्नि, मळानें आरसा व गर्भाशयानें गर्भ *आच्छादिलेला असतो तसें हें शुद्ध ज्ञान ज्ञान्याचें नित्य* वैर करणाऱ्या कामानें झाकून टाकलें आहे म्हणून निष्काम बुद्धीनें कर्म करणारा ज्ञानमार्गाचें जें उच्चतम ध्येय त्याप्रत पोंचतो *चौथ्या अध्यायातील ३६ व्या श्लोकांत ज्ञानानें* अतिशय पापीहि तरेल अशी महती भगवद्गीतेंत वर्णिलेला दिसते

अपिचेदसि पापेभ्य सर्वेभ्य पापकृत्तम ।
सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥

भगवद्गीतेंत प्रसंगी जो ऐहिक संसाराचा त्याग करून *ध्यानस्थ* होऊन ज्ञान संपादन करतो तो योगी असें म्हटलें आहे योगी हा शीत, उष्ण, सुखदुःख तसेंच मानापमान *मान हीं सारखीं मानतो व आपलें मन स्थिर ठेवतो,* माती, दगड व सोनें हीं सारखीं समजतो, मित्र व शत्रु, आप्त व परकी यांच्या ठिकाणीं व साधूंच्या ठिकाणीं तशीच पाप्यांच्या ठिकाणींहि समबुद्धि ठेवतो साधकानें एकांतवासांत एकाग्र होऊन आपल्या नासाग्रीं दृष्टि ठेवावी *निवाऱ्यांत ठेविलेला दिवा हालत नाहीं हीच पुरातन* उपमा आत्मविषयक योग करणाऱ्या स्थिरचित्त झालेल्या *योग्याला लागू पडते*

उपनिषदामध्यें मोक्ष व *ब्रह्मज्ञान* प्राप्त करून घेण्यास चिंतन व ध्यान एवढेच कायते दोन मार्ग सांगितले आहेत. परंतु भगवद्गीतेमध्यें *आणखी एक तिसरा भक्तिमार्ग* सांगितला आहे अर्जुनानें जेव्हां श्रीकृष्णाला ज्याला आपलें *चित्तसंयमन करितां येत नाहीं तो नाश पावतो काय?* असा प्रश्न विचारला तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले हा पार्था ! जो कोणी शुभकर्म करूं लागला तो दुर्गतीला किंवा हीन गतीला कधीं जात नाहीं ज्यानें कर्तव्य बजावलें आहे तोच केवळ नव्हे तर योगभ्रष्टहि मरणानंतर फिरून पवित्र व श्रीमंत पुरुषाच्या कुळांत जन्मास येतो व बरेच जन्म घेतल्यानंतर योगी बनतो निखिल योगी जनांतहि जो आपला अंतरात्मा माझ्या ठिकाणीं ठेवून श्रद्धेनें मला भजतो तोच मला सर्व योग्यांत श्रेष्ठ वाटतो भक्तिमार्गानें खरा मोक्ष मिळतो व ब्रह्मज्ञान उत्पन्न होतें, हेंच तत्व वारंवार श्रीकृष्णानें शिकविलेलें आढळतें ईश्वरावरील श्रद्धेनें व भक्तानें योग्याच्या पुण्यकर्माला व सद्गुणाला महती मिळते भगवद्गीतेंतील नैतिक शिक्षणाचें *वर्चस्व किंवा सार ज्याला टीकाकार रहस्य असें म्हणतात* तें अकराव्या अध्यायाच्या पंचावन्नाव्या श्लोकांत आहे तें असें कीं सर्व कर्में परमेश्वराचीं होत या बुद्धीनें कर्म करणारा, व परमेश्वरपरायण संगविरहित व सर्व भूतांच्या ठायीं निर्वैर असा जो परमेश्वराचा भक्त तो हे पांडवा मला येऊन पोंचतो

ईश्वराशीं तादात्म्य हेंच उच्चतम ध्येय किंवा मोक्ष आहे असें भगवद्गीतेंत सांगितलें आहे ईश्वराशीं तादात्म्य किंवा *ब्रह्मस्वरूपीं लीन होणें म्हणजे जीवात्म्याला परमात्मस्वरूपी* बनविणें व चिरकाल ईश्वराच्या सन्निध राहणें होय

हें ध्येय *संपादन करण्याचे तीन मार्ग आहेत* पहिला कर्ममार्ग, दुसरा ज्ञानमार्ग व तिसरा भक्तिमार्ग हे तिन्हींहि मार्ग *एकच आहेत असें दाखविण्याचा प्रयत्न गीतेंत केलेला आहे* व तो पुष्कळ अंशीं सफलहि झालेला दिसतो कर्ममार्गाची व भक्तिमार्गाची सांगड जुळते व भक्तिमार्गानें ज्ञानमार्गाची प्राप्ति होते म्हणून तीनहि मार्ग एकच आहेत अशा रीतीनें भगवद्गीतेंतील एकंदर उपदेशाची एकवाक्यता करतां येते ईश्वराच्या अस्तित्वाच्या कल्पनेशिवाय ईश्वर *सर्वत्र भरलेला* आहे अशा उपनिषदांतील ब्रह्मात्मवादांतील तत्वाचा उल्लेख मधून मधून सांपडतो सगुण-मूर्तिपूजा किंवा *अवतारी* पुरुषाची श्रद्धेनें भक्ति करणें हा मार्ग अज्ञानी लोकांकरितां

आहे, व ईश्वर सर्वत्र भरलेला हें तत्व ज्ञानी व ऋषी वगैरे लोकांकरितां आहे, व ईश्वराचें अवतारदृष्ट अस्तित्व, व ईश्वर सर्वव्यापित्व ह्या दोन्ही लोकपरिचित तत्वांचें ऐक्य, अथवा परमात्मा व इहलोकीं मानवरूप धारण करणारा जीवात्मा किंवा अवतारी पुरुष सगुणेश्वर हे दोन्ही एकच आहेत, अशा तऱ्हेचीं तत्वें जशीं इतर ग्रंथांतून सापडतात तशीं भगवद्गीतेंतहि सापडतात. व अशा रीतीनें 'सगुणोपासना व निर्गुणोपासना या परस्परविरोधी भासणाऱ्या तत्वांची भगवद्गीतेंत सुसंगति लावलेली आहे श्रीकृष्ण आपणास परमात्मा व विश्वकर्ता श्यात म्हणवितो असे श्लोक भगवद्गीतेंत एकामागून एक आलेले आढळतात, व त्या श्लोकांमध्यें वेदांतील व उपनिषदांतील व त्याप्रमाणेंच ब्रह्म व परमात्मा–याविषयींचीं तत्वें वर्णलेलीं दिसतात. यावरूनच भगद्गीता हें वेदांततत्वानुसार रचलेलें एक निर्गुण भक्तीचें काव्य असावें व नंतर त्यास वैष्णवांनीं सगुण भक्तीचेंहि समर्थन करणारें काव्य बनविलें असावें' असें कांहीं पाश्चात्य विद्वानांचें म्हणणें आहे.

गार्बेच्या मतें भगवद्गीता प्रथम सगुण भक्तीचेंच एक काव्य असावें असें आहे व हें मत सिद्ध करण्याचा गार्बेनें केलेला प्रयत्न कित्येकांच्या मतें सफल झाला आहे.

ईश्वर सर्व चराचरांत भरलेला आहे असे सर्वभूतात्मैक्यदर्शक श्लोक भगवद्गीतेंतून सहज निवडून काढतां येतात. भगवद्गीतेंतील सातशें श्लोकांतील निदान एकशें सत्तर श्लोक गार्बेच्या मतें ब्राह्मणी धर्मानुसार व वेदांततत्वानुसार मागाहून घातले असावेत. जर गार्बेनें छापलेली भगवद्गीता वाचली तर त्यांत बारीक अक्षरांत लिहिलेले श्लोक वगळले तर बिलकुल विसंगतपणा अगर तुटकपणा दिसून येत नाहीं. उलट कांहीं ठिकाणीं असे बारीक टाइपांत छापलेले श्लोक वगळले तर तुटकपणा नाहींसा होतो असें विंटरनिट्झनें म्हटलें आहे. याच्या उलट होल्ट्झमन नावाच्या एका विद्वानानें, गीता ही, परमेश्वर हा निर्गुणनिराकार व ज्ञानगम्य आहे या मताचें प्रतिपादन करणारी आहे, असें म्हटलें आहे; व त्यानें गीतेंतील सगुण परमेश्वरासंबंधीचे जे श्लोक आहेत ते प्रक्षिप्त म्हणून ठरविले आहेत. अशा प्रकारचीं हीं पूर्णपणें परस्परविरुद्ध व धाडशी विधानें दृष्टीस पडतात. मोकळ्या मनानें व बारकाईनें जर मूळ भगवद्गीता हा ग्रंथ वाचला तर आपणास आशिया व यूरोपखंडांत भगवद्गीतेची प्रशंसा व तिजविषयींचा आदर इतका कां दिसून येतो याचें कित्येकांना आश्चर्य वाटतें त्याचा उलगडा होईल. पण आत्मविद्येचीं गूढ व पवित्र तत्वें थोडक्यांत पण असंदिग्ध रीतीनें सांगून त्यांच्या आधारें मनुष्यमात्रास आपल्या आध्यात्मिक पूर्णावस्थेचीं म्हणजे परमपुरुषार्थाची ओळख करून देणारा आणि त्याबरोबरच भक्तीची ज्ञानाशीं व अखेर या दोहोंचीहि शाश्वत प्राप्त होणाऱ्या व्यवहाराशीं सोपपत्तिक व सुंदर जोड घालून संसारांत भापावून गेलेल्या यतीस शांति व निष्काम कर्तव्याचरणास प्रवृत्त करणारा यासारखा दुसरा बालबोध ग्रंथ संस्कृतांतच काय पण जगांतील इतर वाङ्मयांतहि सापडणें दुर्मिळ होय. या दृष्टीनें याची जी जगांत प्रशंसा झाली ती अगदीं योग्यच आहे.

बोधलिंग म्हणतो कीं भगवद्गीतेंत ज्याप्रमाणें उच्चतम सुंदर विचार ग्रथित केलेले आढळतात, तशींच दोषस्थळें, असंबद्धता, पुनरुक्ति, अतिशयोक्ति, विक्षिप्तपणा दिसून येतो. पण केवळ काव्य या दृष्टीनें जरी आपण त्याचें परीक्षण केलें तरी सुद्धां तत्वज्ञानाचीं गूढ तत्वें, इतक्या सुलभ व प्रासादिक भाषेंत, समजून सांगणारा दुसरा ग्रंथ नाहीं, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं गीता ग्रंथ कांहीं काव्यदृष्टीनें लिहिला नाहीं हें उघड आहे. पण बायबलची भाषा जितकी प्रासादिक आहे त्यापेक्षा गीतेंतील भाषा अधिक प्रासादिक आहे हें कोणालाहि कबूल करावें लागेल यूरोपीय पंडित व हिंदुस्थानांतील भाषाशास्त्रज्ञ यांच्या मतें केवळ विचारप्रागल्भ्य व अगाध ज्ञान भगवद्गीतेंत दिसून येतें म्हणूनच या ग्रंथाचा लौकिक सर्व यूरोपखंडांत भरतखंडांत झाला असें नाहीं तर या ग्रंथांत काव्यसौंदर्य, भाषेचा जोरदारपणा, सुंदर उपमा, पावित्र्य व गांभीर्य सांपडतें व ग्रंथाविषयीं पूज्यबुद्धि असल्यानें वाचकाचें मन वळतें व त्यायोगेंच सर्व जगभर या ग्रंथाची थोरवी वाढली आहे.

आज ज्या स्वरूपांत भगवद्गीता ग्रंथ उपलब्ध आहे त्या स्वरूपांतच पहिल्या शतकापासून आजतागायत हा ग्रंथ वेदांत, तत्वज्ञान व धार्मिक कल्पना यांच्या सांठ्यासारखा होता असें नाहीं व त्यामुळेंच भरतखंडामध्यें अतिशय लोकप्रिय धार्मिक ग्रंथ म्हणून नावाजला गेला असेंहि नाहीं. तो ग्रंथ प्रथम विशिष्टमतप्रधान असून नंतर अनेकमत–संगतिपर बनला असावा असें वाटतें. एका संशोधकानें सिद्ध केल्याप्रमाणेंच प्राचीन भगवद्गीता ग्रंथ सांख्य तत्वानुसार रचिला असेल सांख्ययोगांत प्रकृति आणि पुरुष यामधील पूर्ण भेद सांगितला आहे. आत्म्याचें विविधत्व व प्रकृतीचें नित्यत्व व अनावलम्बित्व त्यांत मानलें आहे. हें सर्व विश्व मूलप्रकृतीच्या विकृतीपासून उत्पन्न झालें आहे. व उपनिषदांप्रमाणेंच प्रकृतिपुरुषाच्या यथार्थ ज्ञानानेंच मोक्ष प्राप्त होतो असें यांत मानिलें आहे. उपनिषदांतील एकेश्वरवादतत्वाशीं हीं सर्व तत्वें बिलकुल जुळत नाहींत. परंतु वेदांततत्वज्ञान्याला भगवद्गीतेंत वेदांततत्वें दृष्टीस पडतात सांख्य व योग यांच्या यांतील विवेचनांत बरेंच साम्य सांपडतें. दोन्हीही पंथांचीं मूलतत्वें जवळ जवळ एकच आहेत मानसशास्त्र, तर्कशास्त्र, अध्यात्मविद्या व ज्ञानसंपादन सांख्ययोगांत जास्त लागतें. व योगामध्यें विशिष्ट प्रकारचें आचरण करावें लागतें. भगवद्गीतेंत "कर्तव्यकर्मानुसार योग्य आचरण करणें" यास 'योग" म्हटलें आहे; व सांख्य म्हणजे यथार्थ ब्रह्मज्ञान संपादन करणें होय.

भगवद्गीता-काव्य हा एक कर्मयोग शिकण्याला मुख्य ग्रंथ आहे. सांख्ययोग हें एक उत्कृष्ट प्रकारचें तत्वज्ञान आहे असें भगवद्गीतेंतच काय पण सर्व महाभारतांत कथन केलेलें आहे. काहीं ठिकाणीं भगवद्गीतेंत योग म्हणजे केवळ आचार-नीतिशास्त्र होय असें दिसतें. परंतु भारतीय वाङ्मयामध्यें योग म्हणजे मन एकाग्र करून ब्रह्मचिंतन करणें किंवा ध्यानैकाग्रतेनें समाधि लावणें असें मानलेलें आहे. भौतिक स्थूल शरीरातून जडात्म्याला सोडवून विश्वव्यापी जो परमात्मा त्याशीं तादात्म्य पावण्यास लावण्याविषयीं जे मार्ग कथन केले आहेत ते योग शब्दांत समाविष्ट होतात. योगमार्गाचा सांख्याप्रमाणें वेदांताशींहि निकट संबंध आहे. सर्व धर्माच्या लोकांची, योगी म्हणजे सज्जन लोकांनीं ठरविलेली सर्वोत्कृष्टपणाची अनुकरणीय प्रतिमा किंवा एक नमुनेदार यंत्र अशी कल्पना आहे. आजच्या भगवद्गीतेस सांख्य किंवा वेदांत पक्षाचा ग्रंथ न म्हणता अनेकमतसंगतिपक्षाचा ग्रंथ म्हटल्यास अधिक योग्य होईल. भगवद्गीतेंत जरी वेदांतील यज्ञयागादि आचार वर्णन केलेले नाहींत व त्यापासून मुक्ति मिळते असें जरी कथन केलें नाहीं तरी वैदिक पद्धतीनुसार ठरविलेले यज्ञ व त्याच्यासंबंधीं वेदांतसूत्रें घालून ब्राह्मणी यज्ञाची गीतेंत शिफारस केलेली आढळते. सर्व प्रकारचे तत्वज्ञानी व निरनिराळ्या पंथाचे लोक भगवद्गीतेकडे का ओढ घेतात हें वरील गोष्टींवरून सहज लक्षांत येतें. एखाद्या प्रश्नावर विचार करणाऱ्याची जितकी महती भगवद्गीतेच्या दृष्टीनें आहे तितकीच महति एखाद्या कर्मठ ब्राह्मणाला सुद्धा भगवद्गीतेंत दिलेली आहे. महाभारतांतील इतर सर्व तत्वज्ञान शिकवणारे बोधप्रद भाग भगवद्गीतेप्रमाणेंच महत्वाचे आहेत. सांख्ययोग व कर्मयोग यांचींच तत्वें प्रामुख्यानें भगवद्गीतेंत वारंवाईनें वर्णिलेलीं आढळतात व उच्चतम ज्ञान मिळविण्यास हेच दोन मार्ग आहेत अशी शिफारस केलेली आहे. महाभारतात उद्योगपर्वांमध्यें एकेचाळीस ते शेचाळीस या अध्यायांतून सनत्सुजातानें प्रतिपादिलेलीं तत्वें बहुतेक वेदांतपर आहेत, व अनुगीता हें भगवद्गीतेचेंच एक अनुकरण आहे. हा ग्रंथ मागाहून लिहिला गेला व यांत बऱ्याच तत्वांची भेसळ केलेली आहे. भगवद्गीतेशीं तुलना करितां तत्वज्ञानानें भरलेल्या भारतातील इतर भागांपैकीं कोणताहि भाग काव्यदृष्ट्या कमी प्रतीचा ठरेल.

भगवद्गीता ग्रंथाची अल्पावधींतच लोकमान्यता झाल्यामुळें, त्याचें अनुकरण सर्वत्र होऊं लागावें यांत आश्चर्य नाहीं. अशा प्रकारची अनुकरणप्रियता आपल्याला सर्वत्र आढळून येते. कालिदासाच्या मेघदूताचें अनुकरण करून नेमिदूत, काकदूत, पिकदूत इत्यादि अनेक काव्यें लिहिलीं गेलेलीं आढळतात, तीच स्थिति गीतेसंबंधींहि दृष्टीस पडते. खुद्द महाभारतांतच शांतिपर्वान्तर्गत मोक्षपर्वाच्या काहीं फुटकळ प्रकरणांस पिंगलगीता, शंपाकगीता, मंकिगीता, बोध्यगीता विचख्युगीता, हारीतगीता, वृत्रगीता, पराशरगीता व हंसगीता अशीं नांवें दिलेलीं असून अनुगीतेच्या एका भागास ब्राह्मणगीता अशी निराळी विशिष्ट संज्ञा आहे. या शिवाय अवधूतगीता, अष्टावक्रगीता, ईश्वरगीता, उत्तरगीता, कपिलगीता, गणेशगीता, देवगीता, पांडवगीता, ब्रह्मगीता, भिक्षुगीता, यमगीता, रामगीता, व्यासगीता, शिवगीता, सूतगीता, सूर्यगीता वगैरे दुसऱ्याहि गीता प्रसिद्ध आहेत. अवधूत, अष्टावक्र वगैरे गीता कोणत्या पुराणांतील आहेत अथवा पुराणांतील नसल्या तर त्या स्वतंत्र रीतीनें कोणीं व केव्हां रचिल्या याचा पत्ता लागत नाहीं. तथापि हे सर्व ग्रंथ भगवद्गीता सर्वमान्य झाल्यावरच रचिले गेले असें उघड दिसतें.

गी ता का ल नि र्ण य—कोणत्याहि ग्रंथाचे बहिरंग व अंतरंगपरीक्षण असे सामान्यतः दोन भाग पडतात. अंतरंग परीक्षण हा भाग या दोहोंत अधिक महत्वाचा असला तरी बहिरंगपरीक्षणाचें महत्व काहीं कमी आहे असें नाहीं. गीतेच्या बाबतींत तर हें बहिरंगपरीक्षण फार महत्वाचें आहे. बहिरंगपरीक्षणांत गीताकालनिर्णयाचा प्रामुख्यानें अंतर्भाव करणें जरूर आहे. गीताकालनिर्णय झाल्यास गीतेंतील अंतरंगावर पुष्कळच प्रकाश पडण्यासारखा आहे. गीता ही खिस्ती शकानंतर रचिली गेली असावी असें बहुतेक पाश्चात्य विद्वान् व त्याप्रमाणेंच आपल्या इकडील काहीं विद्वानांचें मत आहे. गीता जितकी अर्वाचीन ठरेल तितकी ठरविण्याचा या पाश्चात्य विद्वानांचा हेतुपुरःसर प्रयत्न असतो हें डॉक्टर लॉरिन्सर अगरडे ल्होडा याच्या ग्रंथावरून दिसून येतें. गीता अर्वाचीन ठरवून नंतर तींत खिस्ताची भक्तिमार्गाचीं तत्वें आलीं आहेत व खिस्ताच्या भक्तिमार्गाचा गीतेवर फार परिणाम झाला आहे असें ठरविण्याचा या विद्वानांचा प्रयत्न असतो. पण सुदैवानें गीता ही काहीं झालें तरी खिस्ताच्या पूर्वीं रचिली गेली असल्याचें अनेक प्रमाणांनीं सिद्ध करता येतें. डॉ. भांडारकर, के. तेलंग इत्यादि विद्वानांनीं हल्लींच्या गीतेचा काल खिस्ती शकापूर्वी ठरविला आहे. हल्लीं नुकतींच जी भासाचीं नाटकें सापडलीं आहेत त्यावरून देखील हेंच अनुमान दृढ होतें. भासकवीचा काल अगदीं अलीकडे ओढला तरी खिस्तोत्तर दुसऱ्या शतकाच्या पुढें नेता येत नाहीं हें निर्विवाद आहे. त्याच्या कर्णभार नाटकांत बारावा श्लोक पुढीलप्रमाणें आहे.

हतोऽपि लभते स्वर्गं जित्वा तु लभते यशः ।
उभे बहुमते लोके नास्ति निष्फलता रणे ॥

हा श्लोक गीतेंतील ' हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं ' या श्लोकाशीं समानार्थक आहे. भासाला महाभारताचा पूर्ण परिचय होता हें त्याच्या नाटकावरून दिसून येतें; त्याअर्थीं वर लिहिलेला श्लोक रचतांना त्याच्या डोळ्यापुढें गीतेचा श्लोक असावा असें अनुमान करता येतें, पण सर्वांत बलवत्तर प्रमाण म्हणजे बौधायन गृह्यशेषसूत्रांत ' देशाऽभावे

द्रव्याऽभावे साधारणे कुर्यान्मनसा नाऽर्चयेदिति। तदाह भगवान् ॥ पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति । तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मन इति ॥ अस्तु गीतेंतील नवव्या अध्यायांतील २६ वा श्लोक 'यथाह भगवान्' म्हणून स्पष्ट घेतला आहे. त्याचप्रमाणें याच गृह्यशेषसूत्राच्या तिसऱ्या प्रश्नाच्या शेवटीं ' ॐ नमो भगवते वासुदेवाय ' हा द्वादशाक्षरी मंत्र जपला म्हणजे अश्वमेधाचें फल मिळतें असें स्पष्ट म्हटलें आहे. यावरून बौधायनाच्या पूर्वी गीता व वासुदेवभक्ति सर्वमान्य झालेली होती असें दिसतें. याशिवाय बौद्धग्रंथामध्यें गीतेंतील श्लोकाशीं सदृश अशीं कोणतीं वाक्यें आढळतात व मूळ बौद्धधर्म हा निवृत्तिपर असताना गीतेच्या शिकवणीमुळें लोकप्रिय झालेल्या कर्मयोगाची छाप कशी पडलेली आहे हें लो. टिळकांनीं आपल्या गीतारहस्यात सप्रमाण सिद्ध केलेलें आहे. या वरील सर्व प्रमाणांवरून गीता ही खिस्तीशकापूर्वी तीन शतकें तरी अस्तित्वात होती असें निर्विवाद सिद्ध होतें.

गीता ही उपनिषदें व वेदान्तसूत्रें यांच्याप्रमाणेंच धार्मिक तत्त्वज्ञानाची पूर्ति करणारा ग्रंथ या नात्यानें प्रस्थानत्रयीमध्यें गणली जाऊं लागल्यामुळें वैदिक धर्माच्या निरनिराळ्या संप्रदायाच्या आचार्यांनीं आपापल्या संप्रदायाची वेदमूलकता व प्रामाण्य सिद्ध करण्यासाठीं गीतेवर भाष्यें लिहिण्यास सुरुवात केली. याशिवाय इतर पुष्कळ पंडितांनींहि स्वतंत्र रीतीनें गीतेवर भाष्यें लिहिलीं आहेत. पण हल्लीं असलेल्या गीतेवरील भाष्यामध्यें व टीकामध्यें बहुतेक भाष्यें व टीका, सांप्रदायिक आचार्यांच्या अगर पंडिताच्या आहेत. या संप्रदायापैकीं अतिशय प्राचीन संप्रदाय म्हणजे शंकराचार्यांचा होय. यांची 'गीताभाष्य' म्हणून गीतेवरील टीका प्रसिद्ध आहे. यानंतर रामानुजाचार्यांनीं गीतेवर एक भाष्य दहाव्या शतकात लिहिलें. त्यांत त्यानीं शंकराचार्यांच्या अद्वैत मताचें खंडण करून विशिष्टाद्वैत मताचें प्रतिपादन केलें आहे. रामानुजाचार्य हे भागवतधर्मी असल्यामुळें भागवत धर्मांत विशिष्टाद्वैत मत शिरण्यास याचेच ग्रंथ कारणीभूत झाले आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. यानंतर द्वैती संप्रदायाचे प्रसिद्ध प्रवर्तक मध्वाचार्य उर्फ आनंदतीर्थ यांनीं 'भगवद्गीता तात्पर्यनिर्णय', 'भगवद्गीताभाष्यविवरण' इत्यादि ग्रंथ लिहून जीव व शिव हे दोन्हीहि भिन्न असून त्यांचें पूर्ण ऐक्य होणें शक्य नाहीं असें तत्त्व प्रतिपादन केलें. वल्लभाचार्यांनीं १५ व्या शतकात शुद्धाद्वैत मताचें प्रतिपादन करण्यासाठीं गीतेवर भाष्य लिहिलें. रामानुजाचार्यानंतर पण मध्वाचार्यांच्या पूर्वी होऊन गेलेले निंबार्काचार्य यानीं जो संप्रदाय काढला त्या संप्रदायातील केशव काश्मीरिभट्टाचार्य यानीं 'तत्त्वप्रकाशिका' नावाची एक टीका लिहिली आहे. या संप्रदायास 'द्वैताद्वैती संप्रदाय' हें नाव देता येईल. यांच्याशिवाय गीतेवर इतर भाष्यें पुष्कळच आहेत. त्यांपैकीं श्रीधराची सुबोधिनी, हनुमद्भाष्य, आनंदाची 'स्वात्मानंदविवर्धिनी' जयतीर्थांची 'प्रमेयदीपिका' व 'न्यायदीपिका,' जगद्धराची 'गीतार्थदीप' टीका, नीलकंठाची 'भावदीपिका,' मधुसूदनाची 'गूढार्थदीपिका,' राघवेंद्रकृत 'भगवद्गीतार्थसंग्रह' वनमालीकृत 'गूढार्थचंद्रिका', विज्ञानभिक्षुकृत गीतेवरील टीका; वेदान्ताचार्यांची 'भगवद्गीतातात्पर्यचंद्रिका', शंकरानंदाची 'भगवद्गीतातात्पर्यबोधिनी', क्षीरस्वामीकृत 'सुबोधिनी', सदानंद व्यासकृत 'भावप्रकाश' सूर्यपंडितकृत 'परमार्थप्रभा', श्रीकृष्णानंदस्वामीकृत 'गीतार्थपरामर्श' इत्यादि टीका प्रसिद्ध आहेत. याशिवाय निरनिराळ्या भाषांत टीका व भाष्यें झालीं आहेत तीं वेगळीच. मराठींत ज्ञानेश्वरमहाराजांनीं गीतेवर भावार्थदीपिका नांवाची एक टीका लिहिली आहे. हीसच ज्ञानेश्वरी असें म्हणतात. वारकरी पंथाचा हा सर्वांत महत्त्वाचा व परमपूज्य ग्रंथ होय. त्यात त्यानीं गीतेचें भक्तिपर विवरण केलें आहे. याशिवाय वामनपंडिताची 'यथार्थदीपिका' नावाची गीतेवर एक ओवीबद्ध विस्तृत टीका असून त्यानें गीतेचें समश्लोकी भाषांतरहि केलें आहे. महानुभावानाहि गीता मान्य आहे परंतु त्यानीं त्यातील तत्त्वाचें आपल्या संप्रदायानुरूप निराळें प्रतिपादन केलें आहे. त्यानी "संभवामि युगेयुगे" याचा अर्थ चार युगात ईश्वराचे चार अवतार होणार आहेत. पैकीं दत्त, हंस व कृष्ण हे अनुक्रमें कृत, त्रेत आणि द्वापर युगात होऊन गेले असून कलियुगात प्रशांत हा अवतार व्हावयाचा आहे असें प्रतिपादलें आहे. अलीकडे गीतेवर गद्य व पद्य अशा टीका थोड्या फार झाल्या आहेत. पद्यात्मक टीकेंत बाबा गर्देकृत 'पंचरत्नी,' विष्णुबुवा ब्रह्मचारीकृत 'भगवद्गीता सेतुबंधिनी' पदबोधिनी गीता, देसाईकृत 'भगवद्गीता यथार्थबोधिनी' ( यथार्थदीपिकेचें गद्य स्वरूप ) इत्यादि अनेक टीका प्रसिद्ध झाल्या आहेत. गद्यात्मक टीकेमध्यें के. लो. टिळक यांच्या गीतारहस्याला अग्रस्थान देणें जरूर आहे. गीतारहस्यावर टीका करण्याच्या निमित्तानें य. र्यं. कोल्हटकर यानीं गीताधर्म हें पुस्तक लिहिलें आहे. परशुराम गोविंद चिंचाळकर उर्फ गोविंदसुत यानीं रहस्यनिरीक्षण पुस्तक लिहिलें आहे. याशिवाय चिं. गं. भानूकृत भगवद्गीता ( षडाध्यायी–प्रथम, द्वितीय, तृतीय व उपसंहार ), सातवळेकर कृत 'भगवद्गीतासार', गुंजीकरकृत 'भगवद्गीता सुबोधचंद्रिका' हंसकृत 'भावार्थसारगीतासुधा' इत्यादि टीका प्रसिद्ध आहेत. समाजशास्त्र व नीतिशास्त्र दृष्ट्या गीतार्थविवरणाचा प्रयत्न म्हणून पाश्चात्य तत्त्वज्ञानादि शास्त्रांचें गीतेंत मूळ दाखविण्याचा गीताभाष्यात रा. रा. राजवाडे यानीं प्रयत्न आरंभला आहे. गीतारहस्याचा व तदनुरोधानें गीतेचा अभ्यास करण्याकरता नुकतेंच कै. लो. टिळक यांचे नातू ग. वि. केतकर यानीं 'गीता–धर्म–मंडळ' स्थापन केलें आहे.

[ संदर्भग्रंथ. - गार्बे—इंट्रोडक्शन टु दि भगवद्गीता– मॅकनिकलकृत इंग्लिश भाषांतर ( १९१८ मुंबई ), हॉपकिन्स—

दि ग्रेट एपिक; रिलिजन्स ऑफ इंडिया; वेबर—इंडिया स्टुडिओ; मार्च-रिलिजन्स ऑफ इंडिया; होल्ट्झमन् ' दि महाभारत अँड इट्स पार्ट्स';न्या तेलंग-'गीता' (सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट सीरिज ,; सतिनाथ तत्वभूषण-कृष्ण अँड गीता, डॉ. भांडारकर-' शैविझम, वैष्णविझम अँड अदर सेक्ट्स '; चिं. वि. वैद्य-' महाभारताचा उपसंहार '; बा. गं. टिळक-श्रीमद्भगवद्गीतारहस्य ( चतुर्थ आवृत्ति १९२३ ); डॉ. कुर्तकोटी-' हार्ट ऑफ दि गीता '; प्रो डॉयसेन-'फिलासफी ऑफ दि उपनिषद्स '; फरक्हर-' रिलिजन्स ऑफ इंडिया '; ]

**गुइमे**—हा फ्रेंच औद्योगिक रसायन शास्त्रवेत्ता ल्हायॉन येथें १७९५ त जन्मला. याचें शिक्षण पॅरिस येथें झालें. वैडूर्य नावाच्या रत्नापासून त्यानें समुद्रफार ( अल्ट्रामरीन ) नावाचा पदार्थ तयार केला व तो पदार्थ मोठ्या प्रमाणावर तयार करण्याकरिता त्यानें कारखानाहि काढला.तो १८७१ त मरण पावला.

**गुगेरा**, त ह शी ल.—पंजाब. मॉंटगॉमेरी जिल्हा.हींतून रावी नदी जाते. क्षेत्रफळ ७८० चौ. मै. वस्ती ( १९११ ) १७१७०. खेडीं-२९८. मुख्य ठिकाण-गुगेरा गाव. सारा व कर मिळून उत्पन्न ( १९०३-४ ) १,३३,००० रु. दक्षिण भागात रावी व बिआसचें जुनें वळण याच्यामध्यें सतलज खोरें आहे. रावीच्या दोन्ही बाजूच्या पट्ट्याना कालव्यानीं पाण्याचा थोडासा पुरवठा होतो.देग नावाचा प्रवाह वेगानें व खोल वहात येऊन गुगेराजवळ रावीला मिळतो.

**गुग्गुळाचें झाड**—हा एका कादेरी झाडाचा सुगंधी निर्यास आहे. या झाडाच्या सुमारें ८० जाती आहेत, यास लॅटिनमध्यें कॉम्मिफेरा म्हणतात. काहीं झाडापासून गुग्गुळ, काहीं झाडापासून उटणें व काहीं झाडापासून हिराबोळ उत्पन्न होतो.

कॉ म्मि फो रा अ गा लो चा.—याला गुगळ, म्हशाबोळ हीं नावें आहेत. पूर्वबंगाल, सिलहट व आसाम यामध्यें हीं झाडें होतात. या झाडापासून गुग्गुळ होतो असा पूर्वी समज होता परंतु या झाडापासून निघालेला पदार्थ गुग्गुळ नसून त्याची हिराबोळात भेसळ करतात.

कॉ. मु कु ल.—याला गुग्गुळ, गुक्कल,मुकुल, मैसाक्षि हीं नावें आहेत. हीं झाडें काठेवाड, राजपुताना, वऱ्हाड, खानदेश व सिंध प्रांतातील रुक्ष प्रदेश यांमध्यें होतात. या झाडावर हिंवाळ्यात खोचा कराव्या लागतात. याच्या चिकाचा रंग हिरवट व उदी असतो. उमरावती प्रांतात गुग्गुळ पुष्कळ होतो. गुग्गुळ चुन्यात मिसळून उत्तम सिमेंट तयार होतें. महारोग, संधिवात इत्यादि रोगावरहि याचा उपयोग करतात. याचा ठोक भाव ४ रुपयास १ मण असतो. किरकोळ ६ आणे शेर विकतात पुष्कळसा गुग्गुळ परदेशांतून येतो तो आफ्रिका, अरबस्तान व मस्कत येथून बहुधा हिंदुस्थानात येतो करम अथवा बंदारकरम या प्रकारचा गुग्गुळ उत्तम असतो.त्याच्या खालोखाल चिनईबोळ हा आहे. गुग्गुळ आफ्रिका व अबिसिनीयामधून लंडनला हाही जातो. मुंबईहून लंडन येथे जाणाऱ्या गुग्गुळाला 'रेड झांझीबार' हें नाव देतात. गुग्गुळाच्या धूपाकरिता धूप पहा. [वाट].

**गुंज**—या वेलीस लॅटिनमध्यें ॲब्रस प्रिकेटोरिअस संस्कृतात काकचिंच., शिखंडिनी, गुंजा, भीलभूषणा, श्यामालचूडा, मराठींत गुंज अशीं नावें आहेत. संस्कृत काव्यात गुंजाचें वर्णन आढळतें उदा. " किं जातु गुंजाफलभूषणाना । सुवर्णकारेण वने चराणाम् ॥" असे विक्रमांकदेव चरितांच्या प्रारंभीं बिल्हण वर्णन देतो. ही सुंदर वेल हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांतील सपाटीच्या प्रदेशात, तसेंच हिमालय व इतर डोंगराळ मुलुखात ३००० फूट उंचीपर्यंत आढळते. या वेलीच्या चकचकणाऱ्या लहान लाल बियांचा म्हणजे गुंजाचा सोनार लोक चांदी व सोनें तोलण्याकडे वजनासारखा उपयोग करतात. आठ गुंजाचें वजन एक माशाबरोबर धरतात व बारा मासे म्हणजे एक तोळा याप्रमाणें सोन्याचें वजन करण्याचा प्रघात आहे. प्रत्येक गुंजेचें वजन अजमासें १॥। ग्रेन असतें. लाल गुंज अतिशय विषारी आहे. व तिचा केव्हा केव्हा फार वाईट रीतीनें प्राणघात करण्याकडे उपयोग केला जातो. थंड पाण्यात लाल गुंजा गंधासारख्या बारीक वाटून त्यापासून एक सुईसारखी काडी तयार करतात. ती वेल अगर मनुष्याच्या कातड्यात खुपसली असता, थोड्याच वेळात मृत्यु येतो. हें विष सर्पांच्या विषाच्या जातीचें आहे परंतु त्याच गुंजा पाण्यात उकळल्या असता त्यांतील विष नाहींसें होऊन मग त्या खाल्ल्या असता अपाय होत नाहीं असें म्हणतात.

गुंजा लाल व पांढऱ्या अशा दोन जातीच्या आहेत. यांचीं पानें साधारण चिंचेच्या पानासारखीं बारीक लांबट असतात. गुंजेच्या दोन्हींहि जातींचे वेल सारखेच दिसतात. पांढरी गुंज औषधीकामाकडे जास्त उपयोगी पडते.

औ ष धी उ प यो ग —गुंजेचें मूळ बाजारात कित्येक वेळा ज्येष्ठमधाऐवजीं देतात. [ वाट ]

**गुजर**—या जातीच्या नावाच्या उत्पत्तीबद्दल विद्वानांत फार मतभेद आहेत. कनिंगहॅम, कॅम्पबेल, स्मिथ हे पाश्चात्य याना परकीय बाह्य, यूएची, शक, गुर्ग, खजर, जुग किंवा गोरे हूण म्हणतात व आपल्या इकडील चिंतामणराव वैद्यादि विद्वान त्यांना मूळचे आर्यच म्हणतात

गुजर म्हणजे गाई राखणारा ( गोचिर किंवा गौचारण ) अगर गाई चोरणारा ( गोचार) अशीहि या नावाची व्युत्पत्ति परकीय इतिहासकार देतात फारसी भाषेंतील गुर्ग (लांडगा) या नावाचा गुजर नावाशीं संबंध आहे असाहि त्यांचा एक तर्क आहे. हे परकीय बाह्य लोक खि. श. च्या पहिल्या पाच शतकात इकडे आले असावेत असें वरील तर्कवाद्यांचें म्हणणें आहे.कुशान सत्तेचा नाश होईपर्यंत गुजर( किंवा गुर्जर ) याचा कोठेंहि उल्लेख येत नसल्यानें ते कुशानवंशीय होत हें

कानिंगहॅमचें म्हणणें लटकें ठरतें. तसेंच हूणांच्या विजयात गुजरांचें नावहि येत नाहीं म्हणून गुजर हे खजरहि नाहींत सारांश प्रचलित दंतकथांवरून यांची खरी माहिती फार थोडी मिळते सिंधुनद ते गंगानदी व हजारापर्वत ते गुजराथपर्यंतच्या भागात मुख्यत: यांचा भरणा असून शिवाय वायव्येकडील प्रांत (इ स १९११च्या खानेसुमारीप्रमाणें वस्ती ११३८७१ ), पंजाब ( ६१०४७२),संयुक्त प्रांत(३६६१९१), राजपुताना (५००४६),वऱ्हाड मध्यप्रांत (५५७९८), मध्यहिंदुस्थान ( १८५७२८ )अजमेर (३५०५९), याप्रमाणें सर्व देश मिळून यांची एकंदर लोकसंख्या २१,९९,१९८ आहे. दिल्लीच्या दक्षिणेकडील रिवारीचा राजा गुजर आहे शिखांचा मोठा भरणा या गुजरांपैकींच आहे गुजर हिंदु व मुसुलमान दोन्हीहि आहेत

जाट, गुजर व अहीर या जाती एकाच वंशापासून झाल्या असें इबेटसन म्हणतो कारण हल्लीं या तिन्ही जाती एकमेकांच्या हातचें खातात यांचा रजपुतांशींहि संबंध असावा असें त्यांच्यांतील बरागी, चंदेल, चव्हाण व तोमर वगैरे आडनांवावरून वाटतें त्यावरून पजाब व पश्चिमेकडील प्रांत इकडील गुजर हे उच्चवर्णीय असावेत असें दिसतें गुजर व जाट यांचा दर्जा समान असून त्यांच्या रंगरूपातहि फरक नसतो जिप्सी लोक यांच्यापासूनच फुटून निघून पश्चिमेकडे गेले असावे असें त्यांच्या भाषेंतील साम्यावरून दिसतें

खानेसुमारीवरून त्यांच्यात अनेक गोत्रें अगर कुळ्या आढळून येतात.हिंदु गुजराच्या ११७८व मुसुलमान गुजराच्या ३८० कुळ्या आहेत. तथापि मुख्य कुळ्या ८४ च आहेत. तसेंच भट्टी, तगारी, नदवासी, खाप्राई, राठी, दापू वगैरेहि कुळ्या आहेत

पंजाबात बड ( वडे = मोठे ) गुजर व भट्टीगुजर या दोन पोटजाती प्रमुख आहेत श्रीकृष्ण ज्या कुळींत जन्मले ती आपली वडगुजराचीच कुळी होय असें हे लोक सांगतात इकडे मुसुलमान झालेलेहि गुजर आहेत यांचा धंदा शेतकीचा व गुरें राखण्याचा असून कांहीं लोक सैन्यातहि दाखल होतात इकडील शिखांतहि पुष्कळसे गुजर आहेत.

काश्मीरमधील बहुतेक गुजर बाटगे मुसुलमान असून ते धनगराचा, व शेतीचा धंदा करतात. तिकडे रणवीरसिंगपुर, रामपुर, राजौरी व पंच या प्रांतात हे राहतात. पंजाबमधील बाटगे व हे एकच होत

कच्छ प्रांतातील गुजर हे तिकडे वाघेल रजपुतांबरोबरच गेलेले आहेत यांच्याच मदतीनें वाघेलांना तिकडे राज्यप्राप्ति झाली व त्याबद्दल त्यांनीं यांना शेतीच्या बाबतींत कांहीं हक्क दिले येथील गुजर स्त्रियांना गोषा नाहीं. इकडे मकाना, चुनेसर, चावडा, चौहान, गोहेल, डुडिया वगैरे पोटजाती यांच्यात आहे.

राजपुताना–मारवाडांतील भाटी हे मूळचे गुजर असावेत. त्यांना भाटी गुजर असें म्हणतात इकडे चंदेल, भगरावत, चारण, चाप, चेची, झाल्वा, कल्हेणिया, कोर,कुसान गेहलोट, परिहार, खेड्ग, लोर, मेर,नागरी, नेकाडी, रिंद व सिसोदिया या गुजर पोटजाती आहेत. ज्यांनें गुजरस्त्रीचें दूध प्यालें नाहीं तो कोल्हा होय अशी राजपुतान्यात एक म्हण आहेत.

गुजराथेंत तर यांचा भरणा फार आहे. येथील वाणी, लोहार, कणबी यांना गुजर म्हणतात, परंतु ते त्यांना अवडत नाहीं, हें कमीपणाचें दर्शक होय असें ते मानतात येथील मारवाडी ओसवाल होहि गुजरच होत हे गुजर लोक पूर्वी धनुर्विद्येंत फार प्रवीण होते तसेंच सुंदर इमारती व देवळें वगैरे बांधण्यातहि ते तरबेज आहेत, पूर्वी हे दर्यावर्दीपणाहि करीत असत

खानदेशातहि हे लोक आहेत त्यांना तिकडे कुणबी अगर मराठे यांच्याप्रमाणें मानतात तेथें हे लोक बागाईत करून भाजीपाला विकतात त्यामुळें कदाचित भाजीबाजारास गुजरी हें नाव मिळालें असावें हे व्यापारीहि आहेत गुजरात गुर्जर ब्राह्मणहि आहेत हे पूर्वी कोठले रहिवासी होते यांच्याबद्दलहि वाद आहेत पाश्चात्त्यांच्या मतें बाह्य हूणांनीं ( गुजरांनीं ) हे आपले उपाध्याय आपल्याच बरोबर आणले हल्लीं हे श्रावक व इतर गुजरांचे उपाध्याय व देवळांतील पुजारी म्हणून आहेत बुंदी, अलवारकडील रजपूत ब्राह्मण, मारवाडकडील गौड ब्राह्मण व मेर ब्राह्मण यांचा या गुर्जर ब्राह्मणाशीं थोडाफार संबंध येतो. तसच पुष्कर ब्राह्मण व गुजराथेंतील नागरब्राह्मण यांचाहि या गुजर ब्राह्मणाशीं संबंध आहे नागर हे बुद्धिवान व देखणे असून, गुजराथच्या राज्यकारभारात ते गेल्या हजार वर्षांत प्रसिद्धीस आले आहेत नागर याचा अर्थ वेदाचारतत्पर सुधारलेला असा ( ते स्वत ) करतात नेपाळातहि नागर ब्राह्मण थोडकेसे आढळतात.

गुजर लोक फार धर्मभोळे असून त्यांना चारण किंवा भाट यांचा फार धाक असतो व त्यांच्याविषयीं पूज्यबुद्धीहि असते राजा लक्ष्मणसिंह म्हणतो कीं, बुलंद जिल्ह्याकडे पूर्वी ( बालहत्याप्रतिबंधक कायद्याच्या आधीं ) यांच्यात मुलींना लहानपणीं मारण्याची चाल असल्यामुळें-स्त्रियांच्या कमततेमुळ बहुपतीत्वाची चाल प्रचारात होती, कुटुंबात अनेक भाऊ मिळून एकच बायको असे पंजाबकडील गुजर हे शैव व शाक्तपंथी असून सीतलाभवानी, चामार या देवतांची व ध्याराजी आणि बाबा सोभाराम या साधूंच्या समाधीची पूजाअर्चा करितात इकडील व राजपुताना–गुजराथ इकडील गुजर हे गुरें चोरणें व पुंडाई करणें याबद्दल प्रसिद्ध असत बाबरनें गांच्या या उपसर्गाचा उल्लेख करून ठेविला आहे जाटांनीं व यांनीं १८५७ मध्यें इंग्रजांना पुष्कळच त्रास दिला होता.

अयोध्या व मीरत इकडील मुसुलमान बाटगे गुजर हे तैमूरलंगाच्या वेळीं बाटलेले आहेत ते सुनी संप्रदायी असून

त्याच्या चालीरीती मात्र अगदीं हिंदूसारख्या आहेत. निका लावण्याचा मुहूर्त वगैरे ठरविण्याचें काम ब्राह्मण करतो. गाझीमिय्या, मदारशहा या मुसुलमान अवलियाप्रमाणें सुदिचदवायासारख्या हिंदु संताचाहि ते पूजा करितात. होळी व नागपंचमी हे सण पाळून दर शुक्रवारीं पितराच्या नावानें अन्नदान करितात.

मध्यप्रांतांत नेमाड व हुशंगाबादकडे यांची वस्ती जास्त आहे. हे लोक गरीब व मागासलेले असून मुख्यतः शेतीचा धंदा करितात. येथें त्यांच्या लेवा, मुंडल (रेवे) व जादम अशा तीन पोटजाती आहेत. लेवा हे जेवतांना डोकीवर पागोटें ठेवून जेवतात. जादम हे स्वतःस यादववंशी म्हणवितात. कापूस दाबण्याचे कारखाने निघण्यापूर्वी हे कापूस पिंजण्याचा धंदा करीत असत, त्यामुळें त्यांना लोंढारी म्हणत. हुशंगाबादेकडील तागे पिंजणारे लोक हा हे यांच्यापैकीं असावेत. इकडे केकरे अथवा कनवे म्हणून जी पोटजात आहे तिला हलकी समजतात. सोहागपूरकडील लिल्हेरिया गुजर म्हणतात कीं श्रीकृष्णाच्या कपाळाच्या घामापासून आमची उत्पत्ति असून आम्हींच पहिल्यानें मुरली वाजविल्यानें मुरेलिया हें आमचें दुसरें नांव पडलें. बडगुजर हे आपल्यास यांचेच वंशज म्हणवितात. यांच्यातील लग्नविधींत अग्नीऐवजीं एका तांब्याच्या पाणी भरलेल्या घागरीभोंवतीं वरास पुढें करून चार, व वधूस पुढें करून तीन, अशा सात प्रदक्षिणा घालणें हा मुख्य विधि आहे. पाट लावण्यापूर्वी मालगुजारास सव्वा रु. कर द्यावा लागतो. हे लोक अविवाहितांचीं प्रेतें पुरतात. लग्नापेक्षा उत्तरक्रियेंत हे फार खर्च करितात. यावेळीं जें जेवण होतें त्यास गुजर-वाडा म्हणतात. यांच्यातील कुलदेवतेसाठीं घरांत एक ओटा तयार करावा लागतो व प्रत्येक घरांत असा ओटा असतो. त्यावरील देवतेची पूजा कुटुंबाबाहेरील दुसऱ्या माणसास करतां येत नाहीं. अविवाहित मेलेल्यास मुंजा म्हणून त्यांचें श्राद्ध माघ महिन्यांतील सोमवारीं व शुक्रवारीं करितात. यांचे गुरु बहुधा गोसावी असतात. गुरु न केलेल्यास नुगा (निगुऱ्या) म्हणतात आणि उठल्याबरोबर त्याचें तोंड दिसणें हा अपशकुन मानतात.

नेमाडांत यांचा हिंदुमुसुलमानमिश्रित असा एक पार जादा पंथ आहे. इकडील गुजरांचा पोशाख हिंदुस्थानी पद्धतीचा असतो. यांच्यापैकीं काहीं मालगुजारी करितात. म्हैसूर संस्थानांत बंगलोर येथें यांची वस्ती असून ते बहुतेक इंग्रजांच्या पलटणींत नौकर आहेत. यांच्यापैकीं पुष्कळसे मुसुलमान झालेले आहेत.

[बॉम्बे ग्याझे. पु. १, ९, आर्किऑलॉजिकल रिपोर्ट पु. २. क्रूक–ट्राइब्स ॲन्ड कास्टस, सेन्सस रिपोर्ट, १८८१–९१ रोज–ग्लॉसरी २ पु., इंडियन अँटिक्वरी पु. ५. रसेल अन्ड हिरालाल–सी. पी. ग्याझे., इबेटसन—पंजाब सेन्सस रिपोर्ट.]

**गुजरखान**—पंजाब रावळपिंडी जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ ५६९ चौ. मै. झेलमच्या कांठानें कांहीं टेंकड्या आहेत. बाकी सर्वत्र मैदान असून त्यांत ओहोळ व नाले वरेच आहेत. लोकसंख्या (१९११) १४८५७१. खेडीं ३८०. गुजरखान हें तालुक्याचें मुख्य ठिकाण.

**गुजराणवाला, जिल्हा**—पंजाब लाहोर विभागांतला एक जिल्हा. क्षेत्रफळ ३१९८ चौ. मै. सर्व मुलूख सपाट मैदान असून टेंकड्या, खोरी, नद्या, ओढे वगैरे कांहीं एक म्हणण्यासारखें यांत नाहीं. जिल्ह्याची आरोग्याबद्दल ख्याति आहे. येथील रहिवाशी निरोगी व दांडगे आहेत. पावसाचें साधारण मान १८ इंच आहे.

असरूर येथें जुने बौद्धकालीन अवशेष, जुनीं नाणीं व विटा वगैरे सांपडतात. ह्युएनत्संग यानें या खेड्याचा टाकी असा उल्लेख केला आहे. यानंतर मुसुलमानी अमलापर्यंतचा इतिहास सगतवार मिळत नाहीं. मुसुलमानी अमलाखालीं या जिल्ह्याची भरभराट झाली. अकबरापासून औरंगजेबापर्यंतच्या दिवसांत सर्वत्र खेडीं व विहिरी होत्या. बारमध्यें त्यांचे अवशेष अद्याप सांपडतात. पुढें रणजितसिंगानें सर्व प्रदेश आपल्या ताब्यांत आणला. शीख अमलापासून गुजराणवाला जिल्ह्याला उत्कृष्ट प्रतीचा फायदा झाला. १८४७–४९ मध्यें येथें इंग्रजी सत्ता स्थापन झाली. या जिल्ह्यांत १७४३ खेडीं व ६ शहरें आहेत. लोकसंख्या (१९२१) ६२३५८१ आहे. याचे ५ तालुके पाडण्यांत आले आहेत. शेंकडा सुमारें ६७ मुसुलमान व सुमारें २३ हिंदु आहेत. जमीन हलक्या दर्जापासून मध्यम दर्जापर्यंत आहे. परंतु कालव्यामुळें सर्व भागांत पिकाचें मान जवळ जवळ सारखें झालें आहे, व पंजाबच्या अत्यंत सुपीक जिल्ह्यांपैकीं हा एक बनला आहे. गव्हाचें पीक मुख्य आहे. हरभरा, जवस, कापूस, तांदूळ, कडधान्य वगैरेंहि पिकें आहेत.

योल्याशा शिसवाच्या झाडाखेरीज विशेष महत्वाचीं झाडें नाहींत. कंकर (चुनखडीचा दगड) हाच काय तो खनिज पदार्थ सांपडतो. रेशमी कपडा थोड्या प्रमाणावर तयार होतो व सुती कापड मात्र बरेंच होतें. गहूं, इतर धान्यें, कापूस, गळीताचीं धान्यें, पितळी भांडीं व तूप यांची निर्गत होते व लोखंड, साखर व कापड यांची आयात होते. वझीराबाद येथें चिनाबकालव्यातून येणाऱ्या हिमालयांतील लांकडाचा व्यापार चालतो.

जिल्ह्याचा एकंदर वसूल १४७९००० जिल्ह्यांत ६ म्युनिसिपालिटया, पांच नोटिफाइड एरिया, जिल्हा बोर्ड, वगैरे आहेत. पोलिस, दवाखाना, देवी काढणें वगैरेंची व्यवस्था इतर ठिकाणांप्रमाणेंच आहे. शेंकडा ३.५ लोक साक्षर आहेत.

**तहशील**—गुजराणवाला जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ ७५६ चौ. मै. लोकसंख्या (१९११) २१८३५२. यांत दोन शहरें व ४३९ खेडीं आहेत. तालुक्याच्या पूर्वभागची जमीन उत्तम आहे.

श ह र —गुजराणवाला जिल्हा व तालुका यांचें मुख्य ठिकाण नॉर्थ वेस्टर्न रेल्वेचें हें स्टेशन असून मोठया सडकेवर वसलें आहे उ अ० ३२ ९' व पू रे ७४°११' लोकसंख्या (१९११) २९४७२ शहर जुनें आहे तरी त्याचें सध्याचें स्वरूप केवळ नवीन आहे व त्याचें श्रेय रणजितसिंगाच्या वडिलाकडे आहे रणजितसिंगाचा जन्म येथेंच झाला १८६७ पासून येथें म्यु कमिटी आहे धान्य, कापूस, तेल, पितळेची भांडीं, लोखंडी पेटया, हस्तिदंती सामान, कपडा, कुंभारकाम वगैरे माल तयार होतो व्यापार वाढता आहे सहासात हायस्कुलें व इतर शाळा आहेत

**गुजराथ, जिल्हा**—पंजाब रावळपिंडी विभागातला एक जिल्हा क्षेत्रफळ २०५१ चोरस मैल चिनाब व झेलम यांच्या मधील हा प्रदेश पंजाबच्या सपाट मुलुखाचा उत्तरेकडचा शेवटचाच भाग होय उन्हाळयात सुद्धा पर्वतसानिध्यानें येथील हवा असह्य होत नाहीं लोकांची प्रकृति उत्तम रहाते परंतु चिनाव व झेलम काठानें मलेरिया असतो पाव साचें मान २५ इंच आहे व या भागाला तें पुरेसें आहे या जिल्ह्यांत पुराणवस्तू व जागा बऱ्याच आहेत मोंग हें या बाबतींत विशेष महत्वाचें ठिकाण आहे

हा भाग प्रथम पोरसच्या राज्यात होता नंतर मौर्य घराणें येथें सत्ताधीश झालें पुढें ग्रीक (बॅक्ट्रीअन) आले व त्याच्यामागून येथें पठाणी अंमल बसला मधल्या बऱ्याच शतकांचा इतिहास सापडत नाहीं पण या मुलुखावर श्वेत हूणाच्या बऱ्याच स्वाऱ्या झाल्या असाव्या पुढें येथें गुर्जरराज्य झालें ९ व्या शतकाच्या अखेरीला शंकरवर्मा (काश्मीर) यानें हा भाग पादाक्रांत केल्याचें राजतरंगिणी सांगते पधराव्या शतकांत लोदी घराण्याचा अंमल येथें होता शारशहा व अकबर यांच्या राज्यात जमिनीची मोजणी वगैरे झाली, त्या वेळच्या कागदपत्रावरून असें दिसतें कीं या जिल्ह्यांत त्यावेळीं २५९२ खेडीं होतीं व वसूल १६ लाखाचा होता नादिर शहा व अहमदशहा यांच्या स्वाऱ्यापासून या भागाला अत्यंत उपद्रव पोंचला १७६५ पासून शीख सत्तेचा उदय होऊन मोठा विस्तार झाला नंतर शीख लोकांची सत्ता नाहींशी होऊन ती इंग्रजाच्या हातात गेली (१८४९) १८९३ त जिल्ह्याला हल्लींचे स्वरूप आलें या जिल्ह्यात ४ शहरें व १३२८ खेडीं आहेत लोकसंख्या (१९११) ८२४०४६ याचे तीन तालुके पाडले आहेत शेंकडा ६३ लोक शेतीवर रहातात जमीन साधारण सुपीक आहे यांत मोठ्या जमिनदारी नाहींत १९०३-४ सालीं १९२२ चौरसमैला पैकीं १३३२ लागवडींत होती गुरेंढोरें साधारण प्रतीचींच आहेत घोडे साधारण बरे आहेत गुजराथ शहरीं वर्षांतून एकदां घोड्याचा बाजार भरतो ८३ चौरसमैल राखीव जंगल आहे गुजराथ येथें उत्कृष्ट प्रतीचें लाकूडकाम तयार होतें इंग्लिश चेकच्या धर्तीवर सुती कापड निघतें तागाची तरटेंहि येथ तयार होतात जलालपूर येथें हलक्या जातीच्या शाली आणि साबर तयार होतात गुजराथ येथें भांडीं व जोडे तयार होतात गहूं, गळिताचीं धान्यें, कापूस, तेल, तूप आणि कातडीं बाहेर रवाना होतात कपडा, लोखंड, साखर, मीठ, तांदूळ, भांडीं, लोंकर, मसाला हे आयात होतात गुजराथ हें एक महत्वाचें व्यापारी ठिकाण आहे या जिल्ह्यातून नॉर्थवेस्टर्न रेल्वेची शाखा जाते चिनाव आणि झेलम ह्यातून नावा चालतात या जिल्ह्यात १७८३, १८१५,-३१,-६३,-६९,-७८,-९६,-९७,-९९ व १९०० सालीं दुष्काळ होते जिल्ह्यातील रहि शहरीं म्युनिसिपालिटया आहेत इतरत्र जिल्हा-बोर्ड काम पहातें पोलिस व दवाखाने वगैरेंची भामुल व्यवस्थाच आहे लिहिता वाचता येणाऱ्याचें प्रमाण शेंकडा तीन पूर्णांक तीनदशांश ( सहा पूर्णांक एकदशांश पुरुष आणि तीन दशांश बायका ) आहे

त ह शा ल —गुजराथ जिल्ह्याचा एक तालुका क्षेत्रफळ ५६९ चौ मै उत्तरेकडचा भाग डोंगराळ असून त्यात ओढे बरेच आहेत लो स (१९११) ३०४७७८ गुजराथ (मुख्य ठिकाण ), जलालपूर व कुंजा हीं तीन शहरें व ५१२ खेडीं या तालुक्यात आहेत

श ह र —पंजाब गुजराथ जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण उत्तरअक्षांश ३२° ३४' व पूर्वरेखांश ७४° ५' नॉर्थ वेस्टर्न रेल्वेचें हें स्टेशन आहे लो सं (१९११) १९०९० इ स पूर्वी ५०व्या शतकात बचनपाल रजपूत यानें उदयनगरी या नावानें हें शहर स्थापलें इ स १२० त राणी गुजराण हिनें याचा पुनर्रचना केली व ९ व्या शतकांत अलाखान यानें या शहराला पुन्हा उर्जितावस्थेस आणिलें पुढें या शहराचा पडता काळ आला व नंतर शीरशहा व अकबर यानीं हल्लींचें शहर वसवलें जाट लोकाची वस्ती असून येथाल सर्व शिबंदी गुजराची होती शहाजहानच्या वेळीं येथें पीर शहादौला रहात असे येथील किल्ल्याला व शहराला गुजराथ-अकबराबाद म्हणत. या मोंगली अमलाचे अवशेष येथें बरेच आहेत पुढें येथें शिखांचा अंमल आला व याच ठिकाणीं इंग्रज व शीख यांचे दोन हात होऊन इंग्रजी सत्ता या भागात कायमची रोवली गेली (१८४९) येथें म्यु कमेटी आहे हा जिल्ह्यातील व्यापाराचें केंद्र आहे येथून जिल्ह्यातला शेतीचा माल बाहेर जातो व त्याबद्दली विलायती कापड, लोखंड वगैरे माल येतो येथील प्राचीन व प्रसिद्ध असा शालींचा धंदा पार बुडाला बुटाचा मात्र मोठा व्यापार आहे येथें ६ हायस्कुलें, एक इंजिनियरिंग शाळा व बऱ्याच प्राथमिक शाळा आहेत

**गुजराथ प्रांत**—हा प्रांत मुंबई इलाख्याच्या ईशान्येस असून, त्याच्या पश्चिमेस आरबी समुद्र, वायव्येस कच्छचें आखात, उत्तरेस छोटेरण व मेवाड, ईशान्येस अबू व अरवलीचे डोंगर व पूर्वेस विन्ध्य व सातपुडा आणि दक्षिणेस तापी नदी आहे गुजराथचें क्षेत्रफळ ७० चौ मै व लो स

१२ ल.खापर्यंत आहे, पैकी हे प्रांत अहमदाबाद, खेडा, पंचमहाल व भडोच या जिल्ह्यांत असून सुमारें ५ हजार चौ. मै. बडोदें संस्थानांत व बाकीचा मुंबईसरकारच्या देखरेखीखालीं असणाऱ्या इतर लहानमोठया संस्थानांत विभागला आहे. पालनपूर, रेवाकांठा, महिकांठा व सवायत अशा चार एजन्सींत हीं संस्थानें सामावतात गुजराथचे गुर्जरराष्ट्र (खास गुजराथ) व सौराष्ट्र (काठेवाड) असे दोन मुख्य भेद आहेत. साबरमती, मही, बनास, सरस्वती, नर्मदा व तापी या नद्यांच्यामुळें गुजराथ देश फार सुपीक बनला आहे, त्यातल्या त्यात मध्यभागाची जमीन फारच सुपीक आहे. उत्तर, पश्चिम व पूर्व या बाजूस असलेल्या डोंगराच्या काठची जमीन रेताड आहे डोंगराच्या आसपास जंगलेंहि बरींच आहेत जंगलांतून वाघ, वनगायी, काळवीट, चित्ते वगैरे जनावरें आढळतात. हा प्रांत अत्यंत सुपीक असल्यानें याच्यावर परकीयांच्या व स्वकीयांच्या अनेक वार स्वाऱ्या झाल्या आहेत. त्याचें ठोकळ कालमान पुढील प्रमाणें होय, पौराणिक यादव, यवन (ग्रीक, शक वगैरे) ख्रि. पू. ३०० तें इ स १००, आश्रयार्थ आलेले पारशी व त्याचे पाठलागी आरब (स. ६००–८००), संगनियन यांचे (९००–१२००), नवायत मुसुलमान (१२५०–१३००), पोर्तुगीज व तुर्क (१५००–१६००), आरब व मुसुलमान यांचे (१५००–१८००), डच, फ्रेंच, आर्मेनियन व्यापारी (१६००–१७५०) व इंग्रज (१७५०–१८१८) हे बहुतेक सारे समुद्राच्या मार्गानें आले उत्तरेकडून खुष्कीनें हूण, शक (ख्रि. पू. २००–इ स. ५००), गुर्जर (४००–६००). जाडेजा व काठी (७५०–९००); अफगाणादि मोंगल व तुर्क (१०००–१५००) हे आले ब्राह्मणाच्या वसाहती उत्तरेकडून होत होत्या (११००–१२००). तसेंच पूर्वेकडून मौर्य (ख्रि. पू ३००) शकक्षत्रप (ख्रि. पू १०० –स. ३००), मोंगल (१५३०) व मराठे (१७५०) आले तर दक्षिणेकडून शालिवाहन (१००). चालुक्य. राष्ट्रकूट (६५०–९५०), मुसुलमान, पोर्तुगीज, मराठे व इंग्रज हे आले

इतिहास–गुजराथ नाव संस्कृत गुर्जरराष्ट्र या नावापासून बनलेलें आहे. नवव्या शतकांतील लेखांत गुर्जरराष्ट्र असें नाव येतें. येथील प्राचीन राजांना गुर्जरराजे असें म्हणत हे मूळचे मथुरेकडील असून पुढें गुप्तराजांबरोबर ते राजपुताना–माळवामार्गें गुजराथेत उतरले गुप्त घराणें नष्ट झाल्यानंतर हे राज्य करूं लागले. हल्लींच्या गुजराथेंत प्राचीन आनर्त, सुराष्ट्र व लाट या देशांचा समावेश होतो. आनर्त (हल्लींचा उत्तर गुजराथ) ची राजधानी आनंदपूर (वडनगर) होती. गिरनारच्या रुद्रदामनच्या लेखांत आनर्त व सुराष्ट्र हे जुनागडच्या पल्हव सुभेदाराच्या ताब्यांत असल्याचा उल्लेख आहे. सुराष्ट्राला हल्लीं सोरट म्हणतात. लाट म्हणजे मही–तापीकडील दक्षिण गुजराथ होय. हें नांव संस्कृत दिसत नाहीं. महाभारतादि जुन्या ग्रथांत तें आढळत नाही. कदाचित (राष्ट्रकूट) रट्टराजावरून व जनपदावरून लाट नाव पडलें असावें.

गुजराथेंतील कांहीं स्थलांचा निर्देश पुराणांत आढळतो. बलरामाची बायको रेवती ही आनर्त राजाची कन्या होती. श्रीकृष्णानें मथुरा सोडून द्वारका राजधानी केली, प्रभास व गिरनार येथें यादव यात्रेत जात असत, गिरनारच्याच यात्रेंत सुभद्राहरण झालें, प्रभास येथेंच यादवी झाली व पुढें ओसाड द्वारका समुद्रांत बुडाली, वगैरे कथा पुराणांत येतात. या यादवनाशानंतर मौर्यांच्या राजवटीपर्यंत गुजराथची माहिती आढळत नाहीं मौर्य घराणें (ख्रि पू. ३१९) राज्य करावयास लागल्यापासून गुजराथच्या इतिहासास प्रारंभ झाला असें म्हणतात गिरनारच्या लेखावरुन चंद्रगुप्त व अशोक यांची सत्ता गुजराथेवर होती व गिरिनगर (जुनागड) ही त्यावेळची राजधानी होती असें ठरतें. अशोकानंतर दशरथ व नातू संप्रति हे गुजराथचे सम्राट होते. संप्रतीच्या पश्चात मौर्य सत्ता नष्ट होऊन बॅक्ट्रियन ग्रीकाची सत्ता स्थापन झाली. त्यावेळची युक्रेटिडीस (ख्रि पू १८०–१५५) मिन्याडर व अपोलोडोटस यांचीं नाणीं गुजराथेंत सापडतात अपोलोडोटनंतर क्षत्रपाची सत्ता स्थापन होईपर्यंत (स.१००) च्या एक शतकाची माहिती आढळत नाहीं

क्षत्रपः—हे परकीय होते पुढें त्यांनीं हिंदुधर्म स्वीकारला. गुजराथेंतील क्षत्रपास पश्चिमक्षत्रप घराणें म्हणत. त्याचा पहिला राजा नहपान हा होता. त्यानें काठेवाड–वलसाड–डाग नाशिक हा मुलुख पादाक्रांत केला. याची कारकीर्द स. १००–१२० पर्यंत होती कदाचित् आंध्र हेहि त्याचे मांडलिक असावेत. उत्तरगुजराथ मात्र त्याचे ताब्यांत नव्हता याच्या नाण्यावर ग्रीक अक्षरें व त्यांचें नागरीरूपांतर असतें यानें आपल्यास क्षत्रप उपपद लाविलें नाहीं. त्याच्या नंतर (पुत्र नसल्यानें) त्याचा जावई उषवदात ऋषभदत्त गादीवर आला. त्यानें धर्मशाळा, अन्नछत्रें, घाट, लेणीं, वगैरे अनेक लोकोपयोगी कामें केलीं. हा आपल्याला स्पष्टपणें शक म्हणवी. शालिवाहनशक म्हणजे वस्तुत नहपानानें गुजराथ ज्या सालीं जिंकला त्या सालापासून सुरू झालेला शक होय. त्यास प्रथम वर्ष, शकवर्ष, शकसंवत्सर म्हणत त्यालाच हजारअकराशें वर्षांनीं शालिवाहनशक असें नाव पडलें याचा प्रारंभ इ स ७८ या वर्षी होतो. उषवदातापासून (शातकर्णी) आंध्रभृत्यांनीं राज्य घेतलें चष्टन महाक्षत्रपानें उलट त्यांच्यापासून पुन्हां राज्य परत मिळविलें याच्या नंतर गुजराथच्या क्षत्रपराजाच्या नाण्यावर राजाचें, त्याच्या बापाचें नांव व वर्ष हीं दिलेलीं असतात. या सर्वांत रुद्रदामन हा पराक्रमी होऊन गेला याची माहिती गिरनारच्या शिलालेखावरुन बरीच मिळते. सुदर्शन तलावाला त्यानें एक बांध घातला होता, आनर्त व सौराष्ट्र या देशावर त्याचें

होते. याची राजधानी बहुधा गुजराथेच्या बाहेर असावी. भिलसा ते सिंध व अबू ते उत्तरकोंकण इतका प्रांत ( काठेवाड सुद्धा ) त्याच्या ताब्यात असे. हा फार विद्वान होता. याचा राजकाल स १४३–१५८असावा. याच्या नंतर याचे घराण्यातील सोळा जणांनीं राज्य केलें.या वंशातील शेवटचा राजा विश्वसेन होय ( स. ३०० ). यापुढें ( २५०–४५० ) गुजराथेवर त्रैकूटक राजघराण्याचा अंमल होता. त्याच्या ताब्यात सबंध गुजराथ नव्हता. त्यांची राजधानी जुन्नर ( पुणें जिल्हा ) होतें हे मूळचे आभीर असून पुढें स्वतःस हैहय म्हणवीत विश्वसेन क्षत्रपाच्या नंतर यांनीं त्याच्या राज्याचे निरनिराळे भाग वाटून घेतले. दक्षिणगुजराथ याच्या राज्यात होतें. पुढें ( ४१५ ) यांना गुप्त किंवा मौर्य यांनीं नामशेष केलें.

गुप्त व वलभीः—गुप्तानें मूळ राज्य गंगायमुनांअंतर्वेदींत होतें.या वंशातील दुसरा चंद्रगुप्त यानें प्रथम गुजराथ जिंकला ( ४१० ). त्याचा मुलगा कुमारगुप्त हा गुजराथचा पहिला गुप्तराज होय काठेवाडात याचीं नाणीं फार आढळतात. याचा मुलगा स्कंदगुप्त यानें श्वेतहुणाचा पराभव करून सुराष्ट्रावर पर्णदत्त नावाचा सुभेदार नेमला. स्कंदानंतर गुप्तघराणें दुर्बळ होत चाललें, तें कसेंबसें हर्षवर्धनापर्यंत जीव धरून होतें. गुप्तानंतर वलभी राजे गुजराथेवर राज्य करू लागले. सेनापति भट्टार्क यानें या घराण्याची स्थापना केली ( ५०९ ) याच्या पूर्वी गुजराथेंत कोठें कोठें श्वेतहूण सत्ताधारी होते असें म्हणतात. वलभी हे गुर्जर क्षत्रिय असून त्याच्यावरून गुजराथेस गुर्जरराष्ट्र नाव मिळालें असावें ह्युएनत्संग गुजराथेंत आला होता त्यावेळीं ( ६४० ) या वंशातील दुसरा ध्रुवसेन राजा ( बालादित्य ) राज्यावर होता. गुप्त व वलभी याच्या राजवटींत गुप्तशक चालू असे याची राजधानी वलभीपुर ( वाले ) होती. त्यांनीं २५० वर्षेपर्यंत ( ७६६ ) राज्य केलें हे दैव होते. वरील बालादित्य हाच या घराण्यातील प्रख्यात पुरुष होता.

चालुक्यः—नंतर हे गुजराथचे राजे झाले ऐहोळ शिलालेखावरून दुसरा पुलकेशी चालुक्य यानें गुजराथ घेतला. या वंशातील प्रख्यात पुरुष जयसिंहवर्मा ( ६६६–६९३ ) होता याची राजधानी नवसरी येथें होती. या वंशात आठ पुरुष होऊन, पुढें राष्ट्रकूटांनीं याचें राज्य काबीज केलें ( ७४७ ).

गुर्जरवंश.–हे मूळचे उत्तरहिंदुस्थानातील असून गुजराथेंत सहाव्या शतकात आले. वलभी व चालुक्य याचा अंमल चालू असता यांचें लहानसें राज्य मही व नर्मदा याच्या दरम्यान असून त्याची राजधानी नांदिपुरी ( नांदेड ) होती. याच्यातील तिसरा जयभट हा पराक्रमी होता. हे वलभी किंवा चालुक्याचे मांडलिक असत. ह्युएनत्संगाच्या वेळीं याच्यातील दद्द हा राजा होता स. ७३५ नंतर याचा फारसा उल्लेख आढळत नाहीं. ताजीक किंवा अरब यांनीं अगर गुजराथेंतील राष्ट्रकूटांनीं याचा नाश केला असावा. हे आपल्याला पुढें पुढें ( ७०० ) भारतीय कर्णाचे वंशज म्हणवीत. चालुक्य पुलकेशीच्या एका ताम्रपटात ( ७३८ ) त्यानें गुजराथ घेतल्याचा उल्लेख आहे.

राष्ट्रकूट.—राष्ट्रकूटाचा गुजराथशीं संबंध (इ. स. ७४३ते ९७४ पर्यंत होता राष्ट्रकूट–ध्रुव यानें गुजराथेंत राज्य स्थापिलें. त्याच्या नंतर त्याचा पुत्र गोविंद व नातु कक्क हे राजे झाले पुढें दक्षिणराष्ट्रकूटांनीं या गुजराथी घराण्याचा अंतर्भाव आपल्यात करून घेतला या घराण्यात ध्रुव हा पराक्रमी होऊन गेला ( ७९१ ). यानें आपल्या मुला( तिसऱ्या गोविंदा )स गुजराथ स्वतंत्र तोडून दिला. त्याच्या मागें त्याचा भाऊ इंद्र हा राजा झाला ( ८०८ ) हा गुजराथी राष्ट्रकूट दुसऱ्या शाखेचा मूळपुरुष होय, याला लाटेश्वर म्हणत. या घराण्यातील कर्कानें उत्तर कोंकणातील कांहीं प्रांत काबीज केले. याचा मुलगा ध्रुव ( ८६७ ) यानें व दक्षिणेंतील मुख्य राष्ट्रकूट घराण्यानें वाकडें घेऊन त्या दोघामध्यें झालेल्या लढाईंत ध्रुव मरण पावला याचा नातू, दुसरा ध्रुव हा पराक्रमी होता. त्यानें आपला गेलेला मुलुख सर्व परत मिळविला व दक्षिणेंतील राष्ट्रकूटाचा पराभव केला. काठेवाडच्या मिहिर राजाचाहि त्यानें पराभव केला होता. पुढें या वंशातील अकालवर्ष कृष्ण ( ८८८ ) यानें खानदेशातील बराच भाग जिंकला. याचे नंतरची या घराण्याची माहिती आढळत नाहीं. पुढें ( ९१४ ) मान्यखेटच्या इन्द्र राष्ट्रकूटानें गुजराथ काबीज केलें. याची सत्ता गुजराथेवर किती दिवस होती हें नक्की समजत नाहीं. परंतु पश्चिमचालुक्य तैलप्प यानें त्याचा मोड करीपर्यंत ( ९७२ ) ते तेथें अंमल करीत होते हें निर्विवाद आहे. तैलपानें गुजराथ घेऊन तेथें आपला द्वारप्प ( बारप्प ) नावाचा सुभेदार नेमला

मेर–मिहिर अथवा मेर याचा काल स.४७०-९००चा आहे. गुप्त घराण्यातील बुद्धगुप्ताच्या सुभेदाराचा मैत्रक नावाच्या जातीनें मोड करून गुजराथचा कांहीं भाग काबीज केला. हेच मिहिर अथवा मेर होत. अद्यापिहि काठेवाडात हे आढळतात. याच्या निशाणावर माशाचें चिन्ह असे व गुप्ताच्या निशाणावर मोराचें असे. मेर हे आपल्याला मारुतीचा पुत्र मकरध्वज याचे वंशज म्हणवितात. याच्या एकंदर ठेवणी व पोषाखावरून हे उत्तर हिंदुस्थानातून काठेवाडात आले असावेत. गुप्ताचा विध्वंसक तोरमाण ( ४७०–५१२ ) याच्याबरोबर हे खालीं आले असावेत.याची सत्ता५०९-५२० च्या सुमारास चांगलीच स्थिर झाली होती. भट्टारकानें ५२० त त्यांना हुसकावल्यामुळें ते मोरवी येथें जाऊन राहिले. ते वलभीचे मांडलिक असत. वलभीच्या नाशानंतर यांनीं सर्व काठेवाडात आपली सत्ता वाढविली. व गुजराथेवर स्वाऱ्यांस प्रारंभ केला ( ८९० ). गुजराथेंत ९०० च्या सुमारास त्याचा बराच अधिकार चालत होता. पुढें जाडेजा व चूडासमा या

रजपुतांनीं त्यांच्यावर हल्ले केल्यानें त्यांनीं घुमली ही आपली राजधानी सोडून पोरबंदराजवळ श्रीनगर येथें वास्तव्य केलें. यांच्यातील प्रसिद्ध राजा महिपाल हा १०व्या शतकाच्या प्रारंभीं झाला मेर हे मूळचे श्वेतहूण होत असें कांहींजण म्हणतात.

चूडासमा यांनीं काठेवाडांत आपली सत्ता स. ९०० च्या सुमारास स्थापिली यांची राजधानी वनथाली ( वनस्थली ) असून तेथील या वंशाचा पहिला राजा चूडाचंद्र नांवाचा होता. त्याच्यावरूनच या वंशास चूडासमा म्हणतात. यांच्या माडलिकांत जेथव व झाला हे लहानसे जहागीरदार येत असत. हेहि काठेवाडांतच रहात होते.

अनहिलवाडचें चावडा घराणें (७२०-९५६)–अनहिलवाड येथें राज्य स्थापण्यापूर्वी हें चावडा घराणें पंचासरप्रांतीं (गुजराथ व कच्छ यांच्या दरम्यान)एक लहानसें जहागीरदार म्हणून होतें. या घराण्यातील जयशेखर राजाचा वध कल्याण कटकच्या भुवड राजानें केला ( ६९६). या जयशेखराचा पुत्र वनराज हाच अनहिलवाड्याचा संस्थापक होय. पंचासरवर अरब किंवा भुवड चालुक्यानें स्वारी करून चावडाचा विध्वंस केला (७२०).वनराजाला पुष्कळ दिवस वनवासामध्यें काढावे लागले. पुढें त्याचा मामा सूरपाल याच्या मदतीनें त्यानें अनहिलवाड्यास गादी स्थापिली (७६५) त्यानें ७८० पर्यंत राज्य केल्यानंतर त्याचा मुलगा योगराज, नातू क्षेमराज व पणतू चामुंड हे राजे झाले. चामुंडाचा मुलगा घागड हा ९०८मध्यें त मेल्यावर त्याचा पुत्र ( याचें नांव आढळत नाहीं ) गादीवर आला. हाच या वंशांतील शेवटचा राजा होय हा ९६१ त मरण पावल्यानंतर त्याचा भाचा मूळराज हा राजा झाला

सोळंकी अथवा चालुक्य राजे (९६१–१२४२)'--मूळराज हा या वंशांतील मूळपुरुष होय यानें आपल्या मामाच्या राज्याचा बराच विस्तार केला. याच्यावर तैलंगणच्या राजानें स्वारी केली होती. मूळराजानें सोरटच्या आभीर राजावर स्वारी केली. हा मोठा दानशूर असून यानें बरींचशीं देवळें बांधिलीं. यानें शेवटीं अग्निकाष्ठें भक्षण केलीं (९६१ ते ९९६). याचा मुलगा चामुंड यास तीन मुलें होतीं. याला मुंज राजानें पदच्युत केलें. त्याचा सूड म्हणून याचा मुलगा वल्लभ यानें मुंज राजावर स्वारी केली पण तो वाटेंतच मरण पावला. तेव्हां त्याचा भाऊ दुर्लभ हा गादीवर बसला (१०१०) दुर्लभानें मारवाडातील कांहीं राजावर स्वारी केली आणि शेवटीं आपला पुतण्या भीम यास राज्य देऊन आपण वानप्रस्थाश्रम स्वीकारला (१०२२). भीम हा फार पराक्रमी होता त्यानें चेदि आणि सिंध येथील राजाचा पराभव करून त्यांना मांडलिक बनविलें पण तो तिकडे गुंतला असतां माळव्याच्या राजानें अनहिलवाड लुटलें याच्याच कारकिर्दीत गझनीच्या महंमुदानें सोमनाथावर स्वारी केली नंतर यानें अबूच्या राजाचा पराभव केला. प्र.च्यानंतर याचा मुलगा कर्ण हा गादीवर बसला (१०६४). याची कारकीर्द शांततेची झाली. यानें लोकोपयोगी बरींच कामें केलीं. हा १०९४ त वारल्यानंतर याचा मुलगा प्रसिद्ध सिद्धराज जयसिंग हा गादीवर बसला. तो अज्ञान असतांना त्याची आई मैनलदेवी ही कारभार करीत असे. गुजराथमधील सर्व राजांत हा फार प्रख्यात असून शूर, धार्मिक व दानशूर होता. द्व्याश्रय काव्यामध्यें बर्बक म्लेच्छाचा यानें पराभव केल्याचा उल्लेख आहे. त्याचप्रमाणें सौराष्ट्रातील अहीर राजा व गिरनागरचा खिंगार राजा आणि माळव्याचा यशोवर्मा या सर्वांचा पराजय करून त्यानें त्यांचे प्रांत आपल्या राज्यास जोडले आणि त्याच्या स्मरणार्थ सिंहसंवत्सर या नांवाचा एक शक सुरू केला. हा शैव असून यानें सिद्धपूर येथें रुद्रमाळ नांवाची इमारत व पाटण येथें सहस्रलिंग या नांवाचें सरोवर बांधिलें हा विद्वानांचा पोशिंदा असून प्रख्यात जैनाचार्य हेमचंद्र हा याच्या पदरीं होता. यास मूल न झाल्यामुळें गादीचा वारसा याच्या मांडलिक त्रिभुवनपाल याच्याकडे गेला त्यास तीन मुलें होतीं. त्यांतील कुमारपाल नांवाचा मुलगा हा गादीवर बसला ( ११४३ ) यानें आपले जुने अधिकारी काढून नवे नेमल्यामुळें याचा प्राण घेण्यासाठीं एक गुप्त कट करण्यांत आला व माजी मंत्र्याचा मुलगा अरभट्ट यानें साबरच्या राजाच्या मदतीनें कुमारपालावर स्वारी केली असतां कुमारानें त्याचा व माळव्याच्या राजाचा पराभव करून माळव्याचें राज्य खालसा केलें.

यानंतर कुमारपालानें कोंकणावर स्वारी केली. व सौराष्ट्रावरहि स्वारी करून तो प्रांत खालसा केला. तसेंच चंद्रावती संस्थानहि त्यानें खालसा केलें यावेळीं याचें राज्य उत्तरेस तुर्की मुलूख, पूर्वेस गंगा, दक्षिणेस विंध्य व पश्चिमेस सिंधु या चतुःसीमेंत पसरलेलें होतें यानें सोमनाथाचें देऊळ पुन्हा बांधिलें आणि बऱ्याचशा देवळांचा जीर्णोद्धार केला याच्या पदरीं बरेचजैन पंडित असत. त्यांत रामचंद्र व उदयचंद्र हे दोन प्रख्यात होते. वर आलेला हेमचंद्र हा याचा गुरु असून यानें अगदीं शेवटीं शेवटीं जैनधर्म स्वीकारला होता. हा स. ११७४ त वारल्यानंतर याचा पुतण्या अजयपाल गादीवर आला. तो जैनधर्माचा द्वेष्टा असल्यानें त्याच्या कारकीर्दींत जैनांचा फारच छळ झाला. ११७७ त त्याचा खून झाल्यानंतर दुसरा मूळराज हा राजा झाला. त्याच्यानंतर ११७९ मध्यें दुसरा भीम गादीवर आला. हा दुर्बळ असल्यानें सर्वत्र अदाधुंदी माजून वाघेल लोकांनीं याचें राज्य बळकाविलें ( १२०० )

वाघेल राजे ( इ स.१२१९ ते १३०४ )'—कुमारपालाचा भाचा अर्णवराजा हा या घराण्याचा संस्थापक होय. याच्या जहागिरीचें गांव व्याघ्रपल्ली असें होत आणि त्यावरून त्याच्या वंशास वाघेल हें नांव मिळालें त्याचा मुलगा लवप्रसाद हा दुसऱ्या भीमाचा प्रधान होता हा शूर असून यानें माळव्याच्या व मारवाडच्या राजाचा पराभव केला. यानें १२३२ त राज्यत्याग केल्यानंतर याचा मुलगा वीरधवल गादीवर आला. त्यानें वनस्थळी व भद्रेसर येथील

राज्यें खालसा केलीं व पूर्वगुजराथ खालसा करून महाराष्ट्रापर्यंत आपलें राज्य वाढविलें महमुद घोरीचाहि यानें पराभव केला होता. १२३८ त हा वारल्यावर याचा मुलगा विसलदेव हा राजा झाला. यानें अनहिलवाड येथें दुसऱ्या भीमाचा पराभव करून आपली राजधानी स्थापन केली. हा फार शूर असून यानें माळवा, देवगिरी व मेवाड येथील राजाचा पराभव केला होता याच्या कारकीर्दीत गुजराथेंत तीन वर्षे दुष्काळ पडला असता लोकांच्या दुःख निवारण्याची यानें बरीच खटपट केली याच्या नंतर याचा पुतण्या अर्जुनदेव हा गादीवर बसला नंतर सारंगदेव ( १२७४–१२९६ ) व त्यानंतर कर्णदेव ( १२९६–१३०४ ) यानीं राज्य केलें याच्यातील कर्णदेव हा अतिशय दुर्बळ होता. याच्या कारकीर्दीत १२९७ मध्यें अल्लाउद्दीन खिलजीचा भाऊ अलफखान यानें अनहिलवाड काबीज केलें व कर्णदेव देवगिरीकडे पळून गेला

मुसुलमानी अंमल (१२९७-१७६०) –अल्लाउद्दीन खिलजीनें गुजराथ जिंकल्यापासून १२९७ मध्यें मराठ्यानीं तो काबीज करीपर्यंत साडेचार शतकें गुजराथ मुसुलमानी अमलाखालीं होता त्यात ( १ ) दिल्लीच्या सुलतानाचा अंमल ( १२९७–१४०३ ), ( २ ) अहमदाबाद येथील शहाचा अंमल ( १४०३–१५७३ ), आणि ( ३ ) मोंगल बादशहाचा अंमल (१५७३–१७६०),अशा तीन कारकीर्दी झाल्या या अंमलात गुजराथचे राजकीय दृष्ट्या दोन भाग असत, एक खालसा ( यावर खास मध्यवर्ती सरकारचा अमल असे ) व दुसरा सस्थानी ( यात माडलीक राजे असत ). खालसाचे सरकार( जिल्हा )निहाय भाग पाडले होते, आणि सरकाराचे परगणे ( तालुका ) असत. प्रत्येक परगण्यावर अमीन किंवा तहसीलदार असे व त्याच्या हाताखालीं पाटील असत सरकारापैकीं काहीं सरकारें खास मध्यवर्तीसरकाराच्या ताब्यात असत व काहीं सरजामदार यास फौजीतैनातीसाठीं दिलेले असत.

अकबरानें या व्यवस्थेंत थोडा फरक केला जकात व जमीनमहसूल हीं खातीं वेगळीं करून त्यावर निरनिराळे ( अमीन, अमील, फैल, मुशरीफ वगैरे ) अधिकारी नेमिले माडलीक, जहागीरदार, वगैरे लोकापासून खडणी वसूल करणारा अधिकारी निराळा असे. त्याला सरकारी वसुलापैकीं शेकडा २½ टक्के मनोती मिळे न्यायाच्या कामीं काझी ( मुसुलमानासाठीं ) व सदर अमीन ( मुसुलमानेतरासाठीं ) यांचीं कोर्टें असत; त्यावरचें अपील अहमदाबाद येथील न्यायाधीशाकडे चाले आणि त्याच्याहि वर काझी– उल्–कुझ्झत आणि सदर––उल्––सुदुर याच्याकडे अपील चाले

इनामदाराचे दोन वर्ग असत मुसुल्मानी अमलापूर्वीचे ( हे सारे हिंदूच होते ) व नंतरचे. पहिल्याना जमीनदार व दुसऱ्याना जहागीरदार म्हणत. जहागीरदाराना खडणी द्यावी ––णे काहींजणाना सरंजामी फौज ठेवावी लागे काहीं इनामदाराचीं इनामें सरकार हळू हळू संपुष्टात आणीत असे त्यामुळें हे इनामदार ( बहुतेक हिंदू ) मुसुलमानाविरुद्ध मराठ्याना मिळत असत

जमीनमहसुलाच्या बाबतीतहि अकबरानें पुढील सुधारणा केल्या ( १ ) नवीन मोजणी व धारेबंदी ( २ ) पाटील कुळकर्ण्यांना सरकारी पगार, ( ३ ) गांवच्या हक्कदाराना पूर्वी मिळत असलेले व मुसुलमानी अंमलात बंद केलेले हक्क पुन्हा सुरु करणें वगैरे

वर सांगितल्याप्रमाणें अल्लाउद्दिनानें गुजराथ जिंकल्यावर तेथें उलुघखानाची सुभेदारीवर नेमणूक केली यानें २१ वर्षे कारभार केला परंतु शेवटीं अल्लाउद्दिनानें त्याला मलीक काफरच्या चिथावणीवरून सुळावर चढविलें व ऐनउल्मुल्क यास सुभेदार केलें यानें तिकडील बंडें मोडलीं त्याच्या नतर दोन चार सुभे झाले, पण ते महत्वाचे नाहींत महंमद तुघलुकाच्या वेळीं ( १३४६ ) गुजराथेंत बडें झालीं तीं त्यानें स्वत गुजराथेंत येऊन मोडलीं व बंडाचा पुढारी मलीक तुघन याचा मोड करून निजाम–उल्–मुलक यास सुभेदार नेमिलें पुढें रास्तीनखान नावाचा एक सुभेदार आला तो फार दुष्ट व जुलमी होता त्याच्या मागून (१३९१) झाफरखान हा सुभा झाला यानें ईदरच्या राजापासून ( १३९३) व जुनागडच्या राजापासून ( १३९४ ) थकलेल्या खंडण्या वसूल करून सोमनाथाच्या देवळाचा पुन्हा विध्वस करून माडूचा किल्लाहि काबीज केला

अहमदाबादचे शहा ( १४०३––१५७३ ) –याची सत्ता गुजराथेवर १७५ वर्षेपर्यंत होती वरील झाफरखानानें दिल्लीच्या बादशहाची सत्ता झुगारून आपल्या तातारखान नावाच्या मुलास नासीरुद्दीन महंमदशहा ही पदवी देऊन स्वतंत्र राज्य स्थापन केलें ( १४०३ ) हा नासीर दिल्लीवर स्वारी करण्यास गेला असता वाटेंतच मेला यानें आपल्या बापास कैदेंत टाकल्यामुळ त्याच्या मित्रानीं नासीरचा खून केला असें म्हणतात पुढें झाफरखानच मुझफरशहा नाव घेऊन गादीवर आला ( १४०७ ) यानें माळव्यावर स्वारी करून तेथील हुशंगशहास कैद केलें व माडु किल्ला मुसखानापासून काबीज केला पुढें मुझफरचा नातू अहमद यानें याला विषप्रयोग करून आपण गादीवर आला ( १४११ ) हा फार शूर होता यानें याच्या चुलत भावानें केलेलीं बंडें मोडून आशावल येथील भिल्ल राजाचा पराभव करून तेथ अहमदाबाद गाव वसविलें ( १४१३ ) पुन्हा एकदा ( १४१५ ) चुलतभावानें ईदरच्या राजाच्या मदतीनें बंड उभारलें, परंतु तेंहि यानें मोडलें याच वेळीं त्यानें गुजराथेंतील बारीकसारीक संस्थानिकाना आपलें माडलिक बनविलें व माळव्यावर स्वारी करून तेथील शहाचा पराभव केला ( १४१७ ). आपल्या जहागीरदाराची कोट किल्ल्याचीं ठाणीं त्यानें पाडून टाकिलीं आणि मान्याच्या जागीं स्वत किल्ले बाधले पुढें ईदरच्या राजाचा पराभव

पराभव करून त्यानें राज्यांत अन्तर्गत सुधारणा फार केल्या. सैन्यास पगार अर्धा रोख पैशाच्या रूपानें व अर्धा जमीनीच्या रूपानें देण्याची त्यानें नवीन पद्धत पाडली. पुढें माहीमबेट ( १४२९ ), बागलाणचे किल्ले ( १४३१ ) व नागोरचा किल्ला हीं ठाणीं यानें काबीज केलीं आणि शेवटीं हा १४४१ त मरण पावला, हा न्यायी व दयाळु असे. याच्यानंतर त्याचा मुलगा दुसरा महमद हा गादीवर आला हा फार चैनी व भित्रा असे. याच्यावर माळव्याच्या सुलतानानें स्वारी करून याचा पराभव केला. शेवटीं याच्या सरदारांनीं याला ठार मारून, याच्या कुतुबुद्दीन नावाच्या मुलास गादीवर बसविलें ( १४५२ ). यानें माळव्यावर व चितोडवर स्वाऱ्या केल्यानंतर हा मरण पावला ( १४५९ ). नंतर त्याचा चुलता दाऊद गादीवर आला,पण प्रजेनें त्याला त्याच्या मूर्खपणाच्या कृत्यामुळें पदच्युत करून, दुसऱ्या महमदाचा मुलगा फत्तेखान यास महमूदशहा ( बेगडा ) नाव देऊन गादीवर बसविलें ( १४५९ याचें चरित्र महमूद बेगडा या शब्दाखालीं पहावें ) त्याच्या मागून दुसरा मुझफर तख्तारूढ झाला. त्यानें ईदरवर ( १५१४ ) व माळव्यावर ( १५१७ ) स्वारी करून मांडूच्या मेदिनीरायाचा पराभव केला. मुझफर हा विद्वान, संगीतप्रिय, धार्मिक व शूर होता. हा १५२६ त मेल्यानंतर त्याचा मुलगा शिकंदर गादीवर आला ( स १५२६ ). शिकंदराचा थोड्याच महिन्यांत खून होऊन त्याचा भाऊ दुसरा महमूद गादीवर बसला पण त्याचाहि वध करून बहादूरखान हा गादीवर आला ( १५२७ या बहादूरशहाचें चरित्र बहादूरशहा या नावाखालीं पहावें ) त्याच्या पश्चात त्याचा भाचा गादीवर बसला, पण तो लगेच मेल्यामुळें बहादूरचा भाऊ महमूदशहा राजा झाला ( १५३६ ). हा अज्ञान असल्यानें दर्याखान व इमादुल्मुल्क या सरदारानीं सत्ता बळकाविली. शेवटीं महमूदनें त्याचा पराभव करून अहमदाबाद घेतलें पुन: इमादुल्मुल्कानें बंडाळी माजविली, पण ती शहानें मोडली. यानें रजपूत सरदाराचीं वतनें जप्त केल्यामुळें त्यानीं बंड उभारलें, त्याचा फायदा घेऊन बुऱ्हाण नावाच्या नोकरानें शहाचा खून केला ( १५५४ ) पुढें अहमदशहा हा गादीवर आला हा लहान असल्यानें सर्व कारभार इतिमादखान हा पाही त्यानें गुजराथचे तुकडे करून ते निरनिराळ्या सरदाराना वाटून दिले. याचें व इतर सरदाराचें जमेना आणि याच्यात भांडणें झालीं, तेव्हां हा खानदेशाच्या राजाकडे पळाला व त्याच्याकडून यानें गुजराथेंतील नंदुरबार वगैरे प्रांत काबीज करविले. तेव्हा अहमदानें याला पुन्हा बोलाविलें, परंतु पुन्हा अहमदानें याच्या जाचातुन मुक्त होण्याची खटपट चालविली असता यानें शहाचा खून करून तिसऱ्या मुझफरास गादीवर बसविलें ( १५६१ ). इतक्यात चेंगीजखानानें इतिमाद याचा पराभव करून त्याला हाकलून, सर्व सत्ता आपल्या ताब्यात घेतली परंतु बिजलीखान नावाच्या एका हबशानें याचा खून करून सत्ता बळकाविली. यानंतर हबशाची सत्ता सुरू झाली. इतक्यात अहमदाबादेवर शेरखान नावाचा अहमदशहाचा एक सरदार चालून आला असतां हबशानीं इतिमाद यास मदतीला बोलाविलें व इतिमादनें अकबराची मदत मागितली, त्याप्रमाणें मोंगल सैन्यानें येऊन अहमदाबाद काबीज केलें व गुजराथच्या राजघराण्याचा शेवट होऊन तेथें मोंगली सत्ता प्रस्थापित केली( १५७२ ).

मोंगलाचा अंमल ( १५७३—१७५८ )—वरीलप्रमाणें गुजराथी सरदारांतील दुहीच्या फायद्यामुळें अकबरास गुजराथ मिळालें. त्याचा पहिला सुभेदार मिर्झा अझीझ कोकलताश नावाचा होता. यानें खोरासानच्या मिर्झा या राजपुत्राची बंड मोडलें, नंतर राजा तोडरमल्लानें गुजराथची जमाबंदी केली. इतक्यात गुजराथचा पूर्वीचा शहा मुझफर हा कैदेंतून पळून जाऊन त्यानें बंड उभारलें व अहमदाबाद, भडोच वगैरे प्रांत हस्तगत केला ( इ. स १५८३ ). परंतु अकबरानें मिर्झा अब्दुल यास त्याच्यावर पाठविलें व त्यानें मुझफरला पिटाळून लावून सर्व प्रांत परत मिळविला, त्याबद्दल त्याला खानखानान ही पदवी मिळाली ( १५८७ ) परंतु पुन्हा मुझफरनें सोरठांत बंड केल ( १५९१ ) तेव्हा फिरून खानखानानें त्याचा पराभव केला असता, तो कच्छचे रावाकडे पळून गेला रावानें खानखानाच्या हवालीं त्याला केलें; त्यानें त्याला दिल्लीस पाठविल असता, मुझफरनें वाटेंतच आत्महत्या केली पुढें मुझफरचा मुलगा बहादुर यानें बंड केलें ( १५९४ ) पण त्यावेळीं गुजराथचा सुभेदार शहाजादा मुरादबक्ष होता त्यानें तें तत्काळ मोडलें मुराद ( १६०० ) मेल्यामुळें पुन्हा कोकलताश यास सुभेदार नेमलें. जहांगीर गादीवर आल्यानंतर त्यानें गुजराथेंतील कांहीं जुलमी कर रद्द करून सर्वत्र दवाखाने उघडले या वेळीं बहादूरनें पुन्हा बंड केलें, परंतु तेंहि लवकरच मोडलें पुढें मांडव्याच्या संस्थानिकानें मुसुलमानी सत्ता झुगारण्याचा प्रयत्न केला, पण तो फसला या वेळीं गुजराथचा सुभेदार मुर्तुझा बुखारी होता याच्याच वेळीं इंग्रजाला गुजराथेंत शिरण्याची संधि मिळाली त्यानें कॅ. हॉकिन्स याला सुरतेंत माल विकण्यास परवानगी दिली ( १६०८ ) मलिक अंबरनें सुरत लुटल्यामुळें ( १६०९ ) शहाजादा शहाजहान यानें अहमदनगर वर स्वारी केली (१६१६ ) यावेळीं गुजराथचा सुभा मुकरबखान होता पुढील वर्षी जहांगीर हा गुजराथेंत शिकारीस आला असता ईदर, नवानगर, कच्छ येथील राजानीं त्याचा फार सन्मान केला ( १६१७ ). त्यानंतर शहाजादा शहाजहान हा गुजराथचा सुभा झाला ( १६१८ ) पण त्यानें बापाविरुद्ध बंड केल्यानें त्याला काढून खुश्रूचा पुत्र सुलतान दावरबक्ष यास सुभेदार केलें पुढें शहाजहान गादीवर आल्यानंतर गुजराथचा सुभेदार निराळा नेमला गेला पुढें(१६३१—३२ ) गुजराथेंत भयंकर दुष्काळ पडल्यानें शहाजहाननें

सुरत व अहमदाबादेस अन्नछत्रें उघडलीं या दुष्काळास तिकडे (संवत्)' सत्याशीनो काळ ' म्हणतात शहाजहाननें या वेळीं कोळ्यांचें व काठी लोकांचें बंड मोडून नवानगरच्या जामाकडून थकलेली खंडणी वसूल केली. पुढें (१६४२) सुभेदार मिर्झा तर्खान यानें गुजराथच्या जमाबंदींत पुष्कळ सुधारणा केल्या. यानंतर (१६४४) अवरंगझेब हा सुभेदार बनला. त्यानें हिंदूंवर अत्यंत जुलूम केला, देवळें भ्रष्ट केलीं, गाई मारल्या (मु गॅ. भा २ पु १). त्यामुळे त्याला परत बोलावून शास्ताखानास सुभेदार नेमिलें (१६४६) परंतु त्याच्यानें कोळ्यांचीं बंडें मोडवेनात म्हणून दाराशुकोह यास सुभेदारीवर पाठविलें. तो कंदाहारच्या सुभेदारीवर गेल्यानें (१६५२) पुन्हा शास्ताखान आला नंतर (१६५४) शहाजादा मुराद हा सुभेदार झाला त्यानें कोळ्याच्या नायकाचा पराभव केला. इतक्यात शहाजहान बादशहा आजारी पडल्यामुळें मुरादनें आपणास बादशहा म्हणून जाहीर केलें शहाजहाननें जसवंतसिंगास त्याच्यावर पाठविलें परंतु त्याचा पराभव होऊन मुराद व अवरंगझेब आग्र्यास गेले अवरंगझेब गादीवर आल्यानंतर दारानें गुजराथवर स्वारी केली, तेव्हां तेथील सुभेदार शहानवाझ हा त्याला मिळाला परंतु अखेरीस दाराचा पराभव झाला व शहानवाझच्या जागीं जसवंतसिंग हा सुभा आला तो दक्षिणेंत शिवाजीमहाराजावर गेल्यामुळें मोहतब सुभा झाला (इ स १६६२) यानें नवानगर खालसा केलें व दाराच्या तोतयाचा पराभव केला यावेळीं औरंगझेबानें गुजराथेंत अनेक जुलमी कर लादले व सुरत अहमदाबादच्या ईमज आणि इन लोकांवर जकात बसविली. इतक्यात शिवाजीमहाराजांनीं सुरत लुटली तेव्हा गावास तट घातला, पण पुन्हा (इ स. १६६६) महाराजांनीं सुरतेवर हल्ला केला याच सालीं शेतकऱ्यांना तकावी (तगाई) देण्याची पद्धत सुरू झाली पुन्हा मराठ्यांनीं (१६७०) सुरतेवर स्वारी केली, तेव्हा जसवंतसिंगास सुभेदार नेमलें (१६७१) तो काबूलच्या सुभेदारीवर (१६७४) गेल्यावर अहमद अमीन हा सुभा झाला, यानें कांकरेजच्या कोळ्यांचें बंड मोडलें पुढें उदेपुरकर युवराज भीमसिंह यानें औरंगझेब मारवाडकडे गुंतलेला पाहून गुजराथेवर स्वारी केली, इतक्यात इदरच्या राण्यानेंहि बंड उभारलें परंतु अमीननें तें मोडलें तेव्हा औरंगझेबानें गुजराथेंत (व सर्वत्र त्याच्या साम्राज्यात) जिझियापट्टी बसविली. इतक्यात गुजराथेंत भयंकर दुष्काळ पडला, (इ. स. १६८१) अहमदाबादेस बंडाळी झाली. त्यावेळीं बंडाचा पुढारी अबूबकर यास सुभेदारानें विषप्रयोग केल्यानें बंड मोडलें. पुन्हा (१६८४) गुजराथेंत दुष्काळ पडला पुढें (१६९१) दुर्गादास राठोडच्या युद्धाचा फायदा घेऊन गुजराथेंत मतिया व मोमना या पाटया मुसुलमानांनींहि बंड उभारलें व गडोचचा किल्ला घेऊन तेथील सुभेदारास ठार केलें परंतु गुजराथचा सुभेदार करतलब यानें त्याचा मोड करून (१६९२) काठी लोकांचीहि बंडाळी मोडली. यानें अहमदाबादेस उत्तम इमारती बांधल्या. सन १६९८त गुजराथेंत पुन्हा दुष्काळ पडला पुढें सुलतान महंमद अजम हा गुजराथचा सुभेदार झाला (१७०३) त्यानें दुर्गादास राठोडाला पाटणची सुभेदारी दिली परंतु बंडाची तयारी चालविल्यामुळें त्याला पकडण्याची तजवीज झाली पण तो पळून गेला. याचवेळीं अवरंगझेबानें हिंदूंना मुसुलमान नोकर ठेवण्याची मनाई केली पुढें सुलतान अज्जम परत गेला व धनाजी जाधवानें गुजराथेवर स्वारी केली (१७०६) हीच मराठ्यांची गुजराथेवरील पहिली स्वारी होय. रतनपूर येथें धनाजींनें मोंगलाचा फडशा पाडला, बाबापीरच्या लढाईंत पुन्हा मराठ्यांनीं मुसुलमानांचा पुरा धुव्वा उडविला. सर्व गुजराथेंतून चौथ वसूल करून व गुजराथचा सुभा हमीद याला कैदेंतून सोडण्याबद्दल खूप मोठा दंड करून मराठे परतले. त्याच्यावर शहाजादा बेदरबख्त चालून आला पण त्याचा मोड झाला, तोच पुढें गुजराथचा सुभेदार बनला मराठ्यांच्या गडबडीचा फायदा घेऊन दुर्गादासानेंहि बंडाळी माजविली होती यापुढें (१७०७–१७५७) मात्र मुसुलमानी सत्ता क्रमक्रमत होऊन मराठ्यांच्या स्वाऱ्या गुजराथेंत जास्त होत चालल्या

मराठ्यांच्या स्वाऱ्या —प्रथम बाळाजी विश्वनाथ यांनीं अवरंगझेब मेल्याबरोबर लागलीच गुजराथवर स्वारी करून सुभेदार इब्राहीम यांच्यापासून दोन लाखांची खंडणी घेतली (१७०७). पुन्हा मराठ्यांनीं गुजराथेवर स्वारी केली (१७११) व चौथ वसूल केली पुढें अमदाबाद येथें कांहीं धार्मिक स्वरूपाची बंडाळी माजली होती (१७१४) या वेळीं दाऊदखान पन्नी हा सुभा होता. त्याची शिस्त कडक असे दिवाणी कारभार त्यानें दक्षिणीब्राह्मणांच्या सल्ल्यानें चालविला होता पुढें (१७१६) महाराज अजितसिंह हा सुभा झाला, त्यानंतर गुजराथेंत दुष्काळ पडला (१७१९). अजितसिंहास आपल्या बाजूचा करण्यासाठीं सय्यदबंधूंनीं त्याचा फार मानमरातब ठेवला होता. याच वेळीं पिलाजी गायकवाडानें गुजराथवर स्वारी करून सोनगड काबीज केलें, येथपासून गुजराथेंतील मोंगली सत्ता नष्ट झाली व मराठ्यांची विशेषत गायकवाडाची सत्ता तेथें प्रस्थापित झाली. अजितसिंहानेंहि त्याला मदत केली आणि मारवाडच्या लगतचा गुजराथीप्रांत आपल्या हाताखालीं घालण्यास प्रारंभ केला. यावेळीं हैदरकुली हा गुजराथचा सुभा झाला, तो दिल्लीची सत्ता जुमानीनासा झाला. त्यानें बादशाही घोडे पकडले रयतेच्या मिळकती तो जप्त करून स्वतःच्या आवडत्या लोकांना वाटून देऊं लागला, तेव्हा बादशहानें त्याला काढून निझाम उल्मुल्क याला सुभेदारी दिली (१७२२) पण तो तेथें न रहातां हैद्राबादेस गेला व गुजराथेंत सर्वत्र अंदाधुंदी माजली तिचा फायदा घेऊन पिलाजीनें स्वारी

केली ( १७२१ ) व चौथ वसूल केली, आणि या वर्षापासून मराठयांनीं गुजराथची चौथ नियमितपणें वसूल करण्यास प्रारंभ केला. यापुढील मराठयांची हकीकत 'गायकवाड' ( घराणें ) या नांवाखालीं पहावी.

[ संदर्भ ग्रंथ :—बॉम्बे ग्याझे पु. १. भा. १, राजतरंगिणी, बील—बुद्धिस्ट रेकार्ड्स्, आर्किऑलॉजिकल सर्व्हे रिपोर्ट्स् २, ४; रासमाला, इलियट, हरिवंश, महावंशो; पेरिप्लस, टॉलेमी, वायुपुराण, विष्णुपुराण वगैरे ]

**गुजराथी वाङ्मय**—गुजराथी वाङ्मयाचें विहंगम दृष्टया परीक्षण केलें असता जी एक गोष्ट प्रामुख्यानें वाचकाच्या नजरेस आल्यावांचून रहात नाहीं ती म्हणजे या वाङ्मयात कालिदास, शेक्सपीयर, मिल्टन, गोएटे यासारखी कवि-रत्नें आढळून येत नाहींत गुजराथी वाङ्मयातील नरसीमेथा, प्रेमानंद, दयाराम इत्यादि कवींच्या काव्याचें अवलोकन केल्यास जगप्रसिद्ध कवींच्या मालिकेंत यांना स्थान देण्याइतके उच्च प्रतीचे हे कवी नाहींत असेंच वाचकाचें मत पडेल अशी जरी स्थिति असली तरी वर सांगितलेले गुर्जर कवी हे गुजराथी वाङ्मयाच्या इतिहासात श्रेष्ठ होऊन गेले व यांचीं काव्यें गुजराथी ग्रंथामध्यें अद्यापिहि सर्वतोमुखी आहेत, ही गोष्ट नाकबूल करून चालावयाचें नाहीं. हे कवी आपापल्या काळामध्यें प्रतिष्ठेस आले व त्यांनीं आपलें नाव गुजराथी वाङ्मयाच्या इतिहासांत अजरामर करून ठेविलें. या दृष्टीनें त्यांच्या काव्याचें व त्यांबरोबरच गुजराथी वाङ्मयाचें आलोचन करणें आवश्यक आहे.

गुजराथमध्यें नामांकित व पहिल्या दर्जाचा एखादा कवि सुद्धा का निर्माण होऊं नये असा प्रश्न सकृद्दर्शनीं वाचकाच्या पुढें उभा रहाणें स्वाभाविक आहे. या प्रश्नाचें उत्तर द्यावयाचें असल्यास आपणाला गुजराथच्या ऐतिहासिक, सामाजिक व धार्मिक परिस्थितीचें अवलोकन करणें भाग आहे. कितीहि श्रेष्ठ दर्जाचा माणूस घेतला तरी परिस्थितीच्या चक्रातून जाण्याशिवाय त्याला गत्यंतरच नसतें. ज्याकाळीं तो जन्माला येतो, त्या काळच्या परिस्थितीचीं बंधनें त्याला जखडून टाकण्याचा प्रयत्न करीत असतात शेक्सपीयर, वर्डस्वर्थ गोएटे यांसारखे शककर्ते कवी, परिस्थितीचीं बंधनें तोडून टाकण्याचा शक्य तितका प्रयत्न करीत असतात पण त्यांच्या हातूनहि ती गोष्ट साध्य होत नाहीं. मग सामान्य माणसाची गोष्ट दूर राहिली गुजराथी कवींच्या बाबतींत हीच गोष्ट आढळून येते. राजकीय धडामोडींत गुजराथवर अनेक दुर्धर प्रसंग ओढवले होते रजपूत, मुसुलमान, मराठे या लोकांनीं अनुक्रमें गुजराथवर अंमल बसविला होता. स्वत. गुजराथनें आपलें स्वातंत्र्य प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केलाच नाहीं म्हटलें तरी चालेल गुजराथी लोक जात्या, शांत वृत्तीचे, शेतकी व व्यापार यावर आपला चरितार्थ चालविणारे, व धार्मिक वृत्तीचे लोक होते. रजपूत अगर मराठयांप्रमाणें स्वातंत्र्याची हौस व पराक्रमाची आवड त्यांच्यांत नव्हती. त्यामुळें पारतंत्र्यात देखील ज्याप्रमाणें रजपुतामध्यें वीररसपूर्ण काव्यें झालीं तशीं गुजराथी लोकात झालीं नाहींत. स्वातंत्र्यलालसा ही काव्याची जननी होय पण गुजराथी लोकात स्वातंत्र्यलालसा दृष्टोत्पत्तीस आली नाहीं व स्वातंत्र्याची तुतारी वाजवून लोकात स्वातंत्र्यरवीची ज्योत पाजळत ठेवणारे शाहीर कवीहि गुजराथमध्यें झाले नाहींत पण राजकीय धडामोडी चालू असता गुजराथमध्यें कवीच निर्माण झाले नाहींत असें मात्र नाहीं. या अशा उलाढालीच्या काळातच मोठमोठे कवी निर्माण झाले पण त्यांचीं काव्यें स्वातंत्र्योद्दीपक व चित्ताची खळबळ उडविणारीं नव्हतीं. मुसुलमान सुलतानानीं गुजराथवर व त्याच्या आसपास ज्यावेळीं मुलुखगिरीचा धूमधडाका चालू ठेवला होता त्यावेळीं नरसी मेथा राधाकृष्णाच्या शृंगारविलासावर आपलीं कवनें रचीत होता. गुजराथी समाज हा जात्या धार्मिक असल्यानें गुजराथी कवींचा धर्म हा आवडता विषय होऊन बसला होता. गुजराथमध्यें धर्माचें पीक पुष्कळ येतें असें म्हणतात. पावसाळयातील छत्र्यांप्रमाणें गुजराथेंत धर्मसंप्रदाय निर्माण होतात व नष्ट होतात. नेहमीं परकीयांच्या अमलाखालीं असणाऱ्या कमकुवत लोकाना धर्माशिवाय दुसरा विसावा कोठून मिळणार ? गुजराथी कवींच्या काव्यात हीच स्थिति नजरेस येते धर्म, शृंगार, शांति इत्यादि विषयाच्या बाहेर या कवींची दृष्टि गेली नाहीं. अशा रीतीनें गुजराथी काव्याचें क्षेत्र फारच मर्यादित होतें पण या क्षेत्रातच आपल्या प्रतिभेनें लोकाना स्तिमित करणारे कवी गुजराथेंत निर्माण झाले. गुजराथी वाङ्मयाचे मुख्यत तीन भाग पाडता येतात (१) दहाव्या ते चौदाव्या शतकापर्यंतच्या काळातील वाङ्मय, ( २ ) पंधराव्या शतकापासून ते सतराव्या शतकाच्या अगदीं अखेरीपर्यंतचें वाङ्मय व ( ३ ) अठराव्या शतकानंतरच्या अर्वाचीन काळातील वाङ्मय.

**दहावें ते चौदावें शतक**—या काळास जुन्या गुजराथीचा काळ असें म्हणता येईल. या काळांत हल्लींच्या शुद्ध गुजराथी भाषेचीं बीजें पेरलीं गेलीं या काळातील गुजराथी वाङ्मय फारच थोडें व तें सुद्धा अशुद्ध स्वरूपाचें आहे इ स ७४६ पासून १२९८ पर्यंत रजपूत लोकांची सत्ता गुजराथवर स्थापित झालेली होती. ब्राह्मण व जैन हे आपापले ग्रंथ संस्कृत भाषेंत लिहीत असत पण सुमारें दहाव्या शतकाच्या सुमारास भाट आणि चारण यांनीं रजपूत राजांच्या स्तुतिपर रासा आपल्या देशी उर्फ अपभ्रंश भाषेंत रचिण्यास सुरुवात केली या रासामधील भाषा म्हणजे व्रज, मारवाडी व इतर देशी भाषांची खिचडीच होती. प्रथम प्रथम ब्राह्मण व श्रेष्ठ वर्णाचे लोक या भाषाकडे दुर्लक्ष करीत. पण पुढें दहाव्या शतकाच्या सुरवातीच्या काळात देशी भाषाना व त्यांच्याबरोबर गुजराथीलाहि बरीच मान्यता मिळूं लागली पण मान्यता ...

तरी पुढें दोनतीन शतकें गुजराथी भाषेंत फारसें वाङ्मय झालें नाहीं

पधराव्या शतकाच्या आरंभापासून गुजराथी वाङ्मयाला खराखुरा प्रारंभ झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. या वाङ्मयाचें यथार्थ स्वरूप काय होतें हें समजण्याला तत्कालीन परिस्थितीचें ज्ञान असणें अत्यावश्यक आहे मीराबाई व नरसी मेथा हे ज्यावेळीं आपल्या मधुर कवनांनीं गुजराथी समाजाला वेड लावीत होते त्यावेळीं गुजराथवर एका नवीन धर्ममताची लाट येऊन आदळली होती. दक्षिण हिंदुस्थानात उत्पन्न झालेली भक्तिमार्गाची चळवळ या सुमारास गुजराथपर्यंत येऊन पोंहोचली होती बौद्धधर्मांतील तत्वज्ञानाचा आय शंकराचार्यांनीं धुव्वा उडवून वैदिक धर्माची स्थापना केली होती शंकराचार्यांनीं स्थापन केलेल्या या वैदिक धर्मांत पुढें बौद्धधर्मांतलि चागलीं तत्वें घुसडण्यात आलीं बुद्धालाहि हिंदु धर्माच्या अवतारी पुरुषाच्या मालिकेंत स्थान मिळालें होतें अशा रीतीनें हिंदुधर्म व वैदिक धर्म यांची सागड जमली असता, दक्षिण हिंदुस्थानात रामानुजाचार्य, मध्वाचार्य इत्यादि महान् धर्माचार्यांनीं भक्तिमार्गाचा प्रसार करण्यास सुरवात केली होती. गुजराथनेंहि या मार्गाचा स्वीकार करण्यास विलंब लावला नाहीं. थोडक्याच काळात सर्व गुजराथभर ही भक्तिमार्गाची चळवळ फैलाविली.

भक्ति याचा अर्थ परमेश्वराचें भजन करणें असा आहे. पण निर्गुण, निराकार अशा परमेश्वराचें भजन तरी कसें करावयाचें ? अशी स्थिति उत्पन्न झाल्यामुळें, परमेश्वराला सगुण स्वरूप देऊन त्याला सगुण स्वरूपात भजावयाचें, त्याचे गुण गावयाचे अशी भक्तीची व्याख्या करण्यांत येऊ लागली आपल्या मनाला आवडेल त्या स्वरूपात परमेश्वराला भजलें असता आपल्याला मोक्ष मिळू शकतो ही भावना प्रत्येक स्त्रीपुरुषाच्या मनात या नूतन भक्तिमार्गानें उत्पन्न केली. हा मार्ग ब्राह्मणाप्रमाणेंच शूद्र, पतित, स्त्रिया इत्यादिकाना सरास खुला होता भक्तीच्या साम्राज्यात स्त्रीपुरुष, उच्चनीच असा भेद नव्हता कीर्तनाच्या प्रसंगीं उच्च जातीचा ब्राह्मण व हलक्या जातीचा महार अगर धेड याच्यात स्पृश्यास्पृश्यतेची अडचण येत नसे अशा प्रकारच्या भक्तिमार्गाची लाट गुजराथभर १५ व्या शतकाच्या आरंभी पसरली होती दक्षिण हिंदुस्थानात रामभक्ति प्रचारात होती तर महाराष्ट्रात विठ्ठल भक्तीचें प्रस्थ माजलें होतें उत्तर हिंदुस्थान–बंगालमध्यें कृष्ण भक्तीचा फैलाव झाला. अगोदरच कृष्णाच चरित्र म्हणजे अनेकांगी, ज्याला ज्या अंगाची गोडी वाटत असेल त्याला तें आवडतें अंग कृष्णामध्यें दृष्टीस पडे. मग काय ! गुजराथमधील स्त्रीपुरुषांनीं आपल्याला रुचेल अशा स्वरूपात कृष्णभक्ति करण्यास सुरवात केली कुणी कृष्णाला कन्हय्याच्या स्वरूपात भजूं लागला तर कुणी राधारमणाच्या स्वरूपात श्रीकृष्णाचें चरित्र गाऊं लागला. कृष्णभक्तीचा पंथ स्थापन करणारा वल्लभाचार्य हा गुजराथेंतच जन्मास आला व त्यानें या कृष्णभक्तीचा प्रसार गुजराथमध्यें झपाट्यानें केला.

मीराबाई ( इ स.१४०३–१४७० ) —गुजराथमध्यें मीराबाई व नरसी मेथा हे कवी उदयास येण्याच्या वेळची परिस्थिती वर वर्णन केल्याप्रमाणें होती. मीराबाई ही १४०३ मध्यें जन्मास आली हिचा मेवाडचा राणा कुंभ याच्याशी विवाह झाला विवाह होण्यापूर्वीच हिला कृष्णभक्तीचें वेड लागलेलें होत. तिनें मनानें कृष्णाला वरलें होतें पण तिच्या इच्छेविरुद्ध तिचा कुंभाशीं विवाह लावण्यात आला. कुंभ हा शिवभक्त होता लग्नानंतर ज्यावेळीं कुलदेवतेला नमस्कार करण्याचा प्रसंग आला त्यावेळीं मीराबाईनें शिवाला नमस्कार करण्याचें साफ नाकारलें एका कृष्णाशिवाय दुसऱ्या कोणापुढेंहि मी माझें डोकें नमविणार नाहीं असें तिनें आपल्या सासरच्या मंडळींना बजावून सांगितलें कुंभानें मीराबाईचें मन कृष्णभक्तीपासून वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण व्यर्थ उलट मीराबाईनेंहि कुंभाचें मन कृष्णभक्तीकडे वळविण्याचा प्रयत्न केला पण त्यात तिलाहि यश आलें नाहीं. ती नेहमीं कृष्णभक्तींत तल्लीन असे. कुंभाचें व तिचें अशा रीतीनें पटत नसल्यामुळें ती द्वारकेला जाऊन साधूंच्या संगतींत आपला काळ घालवूं लागली अर्थातच तिच्याविषयीं नाना प्रकारच्या कंड्या पिकल्या तेव्हा कुंभाला फार राग येऊन त्यानें तिला विषाचा पेला पाठवून दिला. मिराबाई त्या पेल्यातील विष प्याली पण तिला काईंहि झालें नाहीं. राण्यानें तिचें मन वळविण्याचे कसे कसे प्रयत्न केले हे तिनें एका पद्यात सांगितलें आहे. मिराबाई ही जातीनें गुजराथी नव्हती. द्वारकेस आल्यानंतर तिनें गुजराथीचें ज्ञान संपादन केलें असावें. तिनें पुष्कळ गाणीं हिंदीभाषेंत रचलेलीं आहेत. खास तिचीं अशीं २५० गाणीं असावीत. बाकीचीं काहीं जरी तिच्या नावावर विकलीं जातात तरी तीं गाणीं दुसऱ्याचीं असून तीं त्यांनीं लोकप्रिय व्हावीत या हेतूनें मिराच्या नावाखालीं दडपून दिलीं असावीत असें दिसतें कारण काहीं काहीं घुसडून दिलेल्या गाण्यात अर्वाचीन गुजराथी शब्दप्रयोग आढळतात हिचें गाणें ऐकावयास अकबर आला अशी एक कथा प्रचलित आहे ती चुकीची असावी किंवा ही मीराबाई कुंभ राण्याची बायको नसावी.

पर्शियन शफीला ज्याप्रमाणें परमेश्वर हाच आपली बायको, आपली आई, आपला बाप किंबहुना आपलें प्रेमसर्वस्व वाटतो, त्याचप्रमाणें मिराबाईला कृष्णाशिवाय दुसरें काहींहि सुचत नसे. तिनें आपलें तन व मन परमेश्वराला अर्पण केलें होतें खालील ओळींमध्यें तिनें आपलें अंतःकरण उघड केलेलें आहे.—

प्रेमनी प्रेमनी प्रेमनी रे मने लागी कटारी प्रेमनी
जळ जमुनामा भरवा गयाता हती गागर माथे हेम-
नारे । मने

फावे ते तातणे हरिजी एँ बांधी, जेम खेंचे तेम
तेमनी रे मने ।
मीरा कहे प्रभु गीरिधर नागर, शामळी सुरत शुभ
एमनी रे मने ।

दुसऱ्या एका कवनांत ' गोविंदो प्राण अमारो रे, मने जग लाग्यो खारो रे, मने मारो रामजी भावे रे, बीजो मारो नजरे न आवे रे ' असें तिनें म्हटलें आहे.

वरवर विचार करणाऱ्याला मिराबाईच्या कवनांत उत्तान शृंगाराशिवाय कांहीं दिसावयाचें नाहीं. पण, वस्तुस्थिति तशा प्रकारची नाहीं. मिराबाईला श्रीकृष्णाचें वेड लागलेलें होतें व त्याच्याशीं एकरूप होण्याकरतां तळमळणाऱ्या जीवाचे मानवी प्रेमाच्या स्वरूपांत व्यक्त केलेले बोल म्हणजे तिचीं कवनें होत. तीं कवनें गायलीं जात असतांना श्रोत्यांचें मन तात्पुरतें तरी तल्लीन झाल्याशिवाय रहात नाहीं. हीं शृंगारपूर्ण कवनें राजरोस गातांना गुजराथी बायकांना कोणत्याहि प्रकारची लाज वाटत नाहीं. अद्यापिहि गुजराथमध्यें, गर्भ्यांमध्यें हीं कवनें तरुणी गात असतात. गुजराथमध्यें ज्या ज्या कवींचीं अगर कवयित्रींचीं काव्यें गुजराथी आबालवृद्धांच्या तोंडीं बसलेलीं आहेत अशा कवींमध्यें व कवयित्रींमध्यें मिराबाईची प्रामुख्यानें गणना करण्यास हरकत नाहीं.

नरसी मेथा. (१४१५–१४८१).—मीराच्या समकालीन व मीरापेक्षांहि श्रेष्ठ दर्जाचा कवि नरसीमेथा होय. हा जुनागड येथील नागर ब्राह्मण होता. लहानपणींच त्याचे आईबाप वारल्यामुळें त्याच्या चुलतभावानें त्याचें लालनपालन केलें होतें. नरसीची जात शिवोपासक होती. पण नरसीचा ओढा बालपणापासूनच कृष्णभक्तीकडे असे. साधूंच्या संगतींत भजन करण्यांत त्याचा वेळ जात असे. कांहीं वेळां तो स्वतः स्त्रियांच्या वेषांत स्त्रियांबरोबर गर्भ्यांचा नाच करीत असे. त्यामुळें त्याच्या जातींतील लोक त्याच्यावर व त्याच्या कुटुंबावर रुष्ट झाले व त्याच्या कुटुंबीयांना वाळींत घालण्यापर्यंत त्यांची मजल गेली. त्याचें लग्न एका मुलीशीं ठरलें होतें पण वरील वार्ता त्याच्या भावी श्वशुराला कळतांच त्यानें आपली मुलगी नरसीला देण्याचें नाकारलें. पण पुढें त्याचें दुसऱ्या एका गृहस्थाच्या मुलीशीं लग्न झालें. याचा व याच्या बायकोचा खर्च याच्या भावावरच पडत असे. एक दिवस त्याची भावजय त्याला टाकून बोलली. त्यामुळें त्याला राग येऊन त्यानें आपल्या घराला रामराम ठोकला व समुद्रकांठच्या महादेवाच्या देवळांत जाऊन तपश्चर्या करण्यास सुरवात केली. शिव संतुष्ट झाला व त्यानें नरसीला द्वारकेस नेलें आणि कृष्णाची सोळासहस्र गोपींशीं झालेली रासक्रीडा त्याला दाखविली. त्यामुळें नरसीला अपरिमित आनंद झाला; व त्यानें कृष्णभक्ति हें आपलें अंतिम ध्येय ठरविलें. तो घरीं परत आला व आपल्या भावजयीच्या दुरुत्तरामुळें कृष्णाचें दर्शन झाल्याबद्दल त्यानें तिचे आभार मानिले. (कालिदासाच्या संबंधीं अशीच आख्यायिका प्रसिद्ध आहे). घरीं आल्यावर त्यानें आपलें वेगळें बिऱ्हाड केलें. दिवसभर कृष्णभक्तींतच त्याचा वेळ जात असल्यामुळें त्याला अतिशय हलाखींत व दारिद्र्यांत दिवस काढावे लागले. त्याला एक मुलगा व मुलगी झाली. पुढें कांहीं दिवसानंतर त्याची बायको व त्याचा मुलगा काळाच्या भक्ष्यस्थानीं पडली. मुलीचा विवाह झाला होता. त्यामुळें तो प्रपंच्याच्या उपाधींतून मोकळा झाला. त्यामुळें त्याला जो आनंद झाला, तो 'एअ रे अमें एवा रे एवा, तमे कहोछो वळी तेवा रे। भलुं थयुं भांगी जंजाळ, सुखे भजीशुं श्रीगोपाळ।' या सर्वमान्य पद्यांत वर्णन केला आहे.

भक्तीच्या साम्राज्यांत जातिभेद आडवे येत नाहींत याची नरसीला पक्की जाणीव झाली होती. धेड लोकांच्या पंक्तीला त्याच्या आमंत्रणावरून तो गेला व त्याच्याबरोबर त्यानें जेवण केलें. यामुळें त्याच्या ज्ञातिबांधवांनीं त्याला वाळींत टाकिलें. पण पुढें नरसीच्या ज्ञातीच्या लोकांनीं ज्यावेळीं भोजनसमारंभ केला त्यावेळीं श्रीकृष्णानें आपल्या मायेनें त्या ज्ञातीच्या गृहस्थांमध्यें धेड जेवायला बसले आहेत असा देखावा ज्ञातींतील गृहस्थांना दाखविला व पुढें नरसी मेथा तेथें येतांच तो देखावा नाहींसा झाला. यामुळें त्याच्या ज्ञातीचे गृहस्थ खजील झाले व त्यांनीं नरसीला पुन्हां आपल्या जातींत घेतलें.

अशा प्रकारच्या वीस तरी अद्भुत गोष्टी कै. इच्छाराम देसाई यांनीं दिल्या आहेत. त्यापैकीं कुंवरबाईनो मामेरुं, नरसिंह मेथांना बापनुं श्राद्ध, शामळदासनो विवाह, नरसिंह मेहेतानी हुंडी, हे चार चमत्कार प्रसिद्ध आहेत नरसिंह मेहेतानी हुंडी, या गोष्टीवर स्वतः नरसीनें एक काव्य रचलें आहे.

नरसी मेथाच्या ग्रंथाचे दोन भाग पाडतां येतात. (१) शृंगारपर काव्यें व (२) भक्तीपर काव्यें. याच्या शृंगारपर काव्याचें पर्यवसान भक्तींतच झालेलें आहे. तथापि शुद्ध शृंगाराचींहि कांहीं कवनें आपल्याला आढळून येतात. उदाहरणार्थ, ललिता नांवाच्या एका दूतीला कृष्णानें राधेचें मन आपल्याकडे वळविण्याकरितां पाठवलें असतां ललितेनें राधेला कृष्णाकडे आणिलें व त्यानंतरची राधाकृष्णाची प्रणयलीला कवीनें पुढील पद्यांत वर्णिली आहे:—

कुंजसमीपे आवीया कुंवरीने तेडी कुमार
एकान्तस्थाने रची शय्या मळी करी रे विहार ।
भूधरे भीडी हृदेशुं चुंबन लीधुं गाल
रसीओ ते रस प्रीते पीडा कंदर्प रस रसाळ ॥

अशाच प्रकारचीं शृंगारपर कवनें आणखींहि उद्धृत करून देतां येतील. पण या शृंगारपर कवनांत देखील आचरट शृंगार आढळून येणार नाहीं. राधाकृष्णांची रास म्हणजे जीवात्म्याची परमात्मस्वरूपांत विलीन पावण्याची अनावर

लालसा होय. स्वतः श्रीकृष्णाला सोळा सहस्र बायका असून तो ब्रह्मचारीच होता. नरसीनें कृष्णाच्या तोंडांत एके ठिकाणीं असे शब्द घातले आहेत.

'सुणो तमे नारी, अमे ब्रह्मचारीअमने ते कोई एक जाणे रे ।
वेद भेद लहे नहि मारो सनकादिक नारद व खाणे रे ।
एक जाणे छे व्रजनी गोपी, फेरत जयदेवे पीधोरे ॥
( शृंगारमाला. )

ही कवनें करूनच तो राहिला नाहीं तर त्यानें आपल्या वांपुरुष भक्ताकडून रासामध्यें हीं पदें गावविलीं. पुष्कळ निंदकानीं या त्याच्या कृत्याबद्दल त्याला नांवें ठेविलीं पण त्याला त्याची पर्वा वाटली नाहीं मीरा व नरसी याच्या शृंगारपर काव्याची तुलना केली असता, मीराबाईचीं पदें नरसीपेक्षा मधुर व अधिक उच्च भावनापूर्ण वाटतात व त्यामुळें मीराचीं पदें गुजराथी समाजात सर्वतोमुखीं झालेली आहेत.

पण भक्तिपर काव्यात नरसी हा मीरापेक्षा अधिक श्रेष्ठ कवि आहे. तत्कालीन कृष्णभक्तीचें परमोच्च स्वरूप या भक्तिपर काव्यात दृष्टीस पडतें. शिवाय काव्यात, तत्त्वज्ञान देखील जागोजागीं भरलेलें आढळतें. शंकराचार्यांच्या चर्पटपंजरीतील विचाराप्रमाणें ' सुमरने थोहरी मेल्य ममतापरी, जोने विचारीनो मूळ ताहरुं । तुं अल्या कोण ने कोने वळगीर रो, वगर समजे कहे महारुं महारु ।' या पद्यातील विचार आहेत. प्रभातकाली म्हणता येतील अशीं तात्त्विक व भक्तिपर गाणींहि यानें केलेलीं आहेत. हीं तुकारामाच्या अभंगासारखींच व भक्तिरसपूर्ण आहेत

नरसीची भाषा पुराणी नाहीं व इतरांच्या कवींच्या पद्धतीप्रमाणें बोजड व कृत्रिम नाहीं. तात्त्विक विवेचन देखील तो सोप्या भाषेत करतो. शृंगारपरकाव्यात त्याच्यापेक्षा दयाराम हा श्रेष्ठ आहे व अंतःकरणातील भावना व्यक्त करण्याच्या बाबतींत मीराबाईइतका त्याचा हातखंडा नाहीं. तथापि त्याच्या काव्याचें सामुदायिक पर्यालोचन केल्यास तो सर्व कवींत श्रेष्ठ होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

भालण.—मीरा व नरसी मेथा हे पंधराव्या शतकातील दोन महान् कवी होते. दुय्यम दर्जाच्या कवींत भालन, भीम व पद्मनाभ याची गणना करता येईल. भालन हा पाटणचा राहणारा असून जातीचा श्रीमाळी ब्राह्मण होता. त्यानें बाणाच्या कादंबरीचें गुजराथींत भाषांतर केलें याशिवाय राम, कृष्ण, शिव इत्यादिकांच्या चरित्रांतील प्रसंगावर त्यानें काव्यें रचलीं. रामकृष्ण अगर शिव यांपैकीं कोणाचेंहि भजन केलें असता परमेश्वराचें भजन केल्याप्रमाणेंच आहे हा त्याच्या काव्यांतील उपदेशाचा भाग आहे. ध्रुवआख्यान व नलाख्यान हीं काव्यें त्यानें लिहिलीं पण त्यांत विशेष वर्णनीय असें कांहीं नाहीं.'साभळ रे तुं सजनी मारी रजनी क्यां रमी आवीजी ' हें त्याचें गाणें फार प्रसिद्ध आहे. दशमस्कंध, सप्तशती, रामायण, शिवभिलडीसंवाद, हीं त्याचीं इतर काव्यें आहेत.

भीम.—भीम हा सिद्धपूर पाटणचा मोध ब्राह्मण होता. त्यानें बोपदेवाचें भागवत गुजराथींत भाषांतरिलें आहे.

पद्मनाभ.—पद्मनाभाचें नाव त्यानें लिहिलेल्या ' कह्नडदे प्रबंध ' या ऐतिहासिक काव्यामुळें प्रसिद्ध आहे. हा विशालनगरचा नागर ब्राह्मण होता. त्यानें १४५६ मध्यें झालोर येथें हें काव्य लिहिलें. या काव्यातील कथाभाग अल्लाउद्दीन खिलजीचा सरदार अलफखान यानें केलेल्या गुजराथवरील स्वारीसंबंधींचा आहे अनहिलवाडपट्टणाची राखरांगोळी कशी झाली, सोमनाथ पाटण कसें लुटलें गेलें, हिंदु राजानीं तीनचारदा अलफखानाच्या सैन्याचा कसा पराभव केला, शेवटीं एका रजपूत राजाच्या विश्वासघातामुळें गुजराथ परतंत्र कसें झालें, यासंबंधींचीं वर्णनें यात आलेलीं आहेत. हें काव्य वाचीत असताना, मधून मधून वीररसपूर्ण पद्यें आढळतात व गुजराथी वाङ्मयात एक तरी कवि स्वातंत्र्यमहिमा गाणारा झाला याबद्दल आनंद वाटतो. हें पद्मनाभाचें काव्य डॉ. बुल्हरनें १८७५–७६ सालीं शोधून काढलें. काव्याच्या नावातील प्रबंध या शब्दावरून हें काव्य जैन कवींचें असावें अशी लोकाची कल्पना होती, पण ती इष्ट नाहींशी झाली आहे.पद्मनाभानें हें काव्य त्यानीं जसें लिहिलें तशा भाषेंतच उपलब्ध आहे. मीरा व नरसीमेहताच्या काव्याची भाषा त्यानीं लिहिल्यासारखी राहिली नसून त्यात फेरफार झालेले आहेत, व त्यामुळें त्याची भाषा कशी होती हें आपल्याला कळून येत नाहीं.

पंधराव्या शतकातील जे मुख्य कवी झाले त्याचें वर वर्णन केलें. या कवींच्या काव्यात मुख्यत. कृष्णभक्तीचें स्तोम आढळून येतें. या कालातील भक्तीचें स्वरूप मिराबाई व नरसिंह मेहेता याच्या काव्यात आपणाला दृष्टोत्पत्तीस येतें. पुढील शतकात ज्या ज्या कवींनीं कृष्णभक्तिपर काव्यें लिहिलीं त्यामधील मुख्य कल्पना याच्या काव्यातूनच घेतलेली आढळून येते. या कवींच्या काव्याचा परिणाम तत्कालीन समाजावर फार झाला व अद्यापिहि त्याच्या काव्यानें गुजराथी समाजाला वेड लावलें आहे. या कवींच्या काव्यात अप्रत्यक्ष रीतीनें जागजागीं, तत्कालीन समाजाचें स्वरूप काय होतें याची अस्फुट कल्पना आपल्याला करता येते पण एकंदरीनें या कालांतील कवींचें काव्यक्षेत्र बरेंच संकुचित होतें असें म्हणावयास हरकत नाहीं.

सो ळा व्या श त का तो ल क वी —या शतकांत वाङ्मयाला ओहोटी लागली. चागल्या प्रकारचें वाङ्मय उत्पन्न होण्याला जी परिस्थिति लागते ती या शतकाला लाभली नाहीं. या काळात नांव घेण्यासारखे कवी म्हणजे वस्तो वच्छराज व तुळशी हे होत

वस्तोः—वस्तो हा खेडा जिल्ह्यांतील थोरसद गांवचा पाटीदार होता. त्यानें सर्वसंगपरित्याग करून साधू व संन्याशी यांचा सहवास पत्करला. यानें नरसीमेथाच्या धर्तीवर शुकदेवाख्यान व सुभद्राहरण हीं काव्यें रचिलीं आहेत.

वच्छराजः—हा भडोचजवळील अंबुसारचा राहणारा. हा कबीरपंथी होता. त्याचें मुख्य काव्य म्हणजे रसमंजरी होय. यांत त्यानें पुष्कळ गोष्टी एकत्र केल्या आहेत.

तुळशीः—हा जुनागडजवळच्या कुटियन गावांत राहणारा सारस्वत ब्राह्मण. यानें ध्रुवाच्या कथेवर एक काव्य रचिलें.

सतराव्या शतकांतील कवी.—सोळावें शतक वाङ्मयाच्या दृष्टीनें जवळजवळ वांझ होतें असें म्हटलें असतां चालेल. पण सतराव्या शतकांतल्या वाङ्मयाचा या शतकानें पाया घातला होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. या सतराव्या शतकांत ज्याला खरें काव्य म्हणतां येईल असें वाङ्मय निर्माण होऊं लागलें. या काळापर्यंत काव्य म्हणजे धार्मिक काव्य अशी स्थिति होती. काव्यामध्यें देखील धर्माचा वरचष्मा होता. पण सतराव्या शतकांतील कवींच्या काव्यांत काव्य हें धर्माच्या तावडींतून सुटलें व काव्याचें क्षेत्र विस्तृत झालें. अशा प्रकारचें काव्य निर्माण करण्यांत ज्या ज्या कवींनीं पुढाकार घेतला त्यांत आखोभगत हा अग्रेसर होय.

आखोः—हा जातीचा सोनार होता. लहानपणापासूनच त्याला जगाचा वीट आला होता. त्याचा पहिला गुरु वल्लभपंथी होता. तो फार लुच्चा आहे असें आखोला आढळून आलें म्हणून तो दुसऱ्या गुरूच्या शोधार्थ निघाला व काशीस त्याच्या मनाप्रमाणें त्याला एक गुरु मिळाला. त्याच्याजवळ त्यानें वेदान्ताचें अध्ययन केलें. शंकराचार्यांचें अद्वैत तत्त्वज्ञान हेंच खरें तत्त्वज्ञान होय अशी त्याची खात्री झाली होती. त्याचे प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे आखोगीता, चित्त विचारसंवाद, गुरुशिष्यसंवाद, पंचीकरण, अनुभवबिंदु, कैवल्यगीता, ब्रह्मलीला, परमपदप्राप्ति व पंचदशीतात्पर्य हे होते. आखोच्या काव्यांत वेदान्त भरलेला आहे. त्याच्या काळीं जे नानाप्रकारचे पोटपंथ निर्माण झाले होते त्या सर्वांचा त्यानें परामर्ष घेऊन ते सर्व झूट आहेत म्हणून ठरविलें. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' हेंच तत्त्व त्यानें आपल्या ग्रंथांत प्रतिपादन केलेलें आहे. आखो हा मोठासा सुशिक्षित माणूस नव्हता. त्याची भाषा ओबडधोबड आहे. समर्पक कोट्या करणें, एखाद्या मतावर टीका करणें, समाजांतील अनाचारावर झणझणीत वाक्प्रहार करणें या बाबतींत त्याचा हातखंडा होता. आपल्या पहिल्या गुरूच्या ढोंगावर टीका करतांना तो म्हणतो ' गुरुकीधा में गोकुलनाथ, घरडा बळदने घाली नाथ, धन हरे धो को नव हरे, ए गुरु कल्याण शूं करे '. यात्रा करण्याच्या धार्मिक समजुतीवर त्याचा विश्वास नव्हता. 'तीर्थ करं टं, हरिजनने चरण' असें त्यानें म्हटलें आहे. संस्कृत काय अगर प्राकृत काय, दोन्ही भाषा विचार व्यक्त करण्याच्या दृष्टीनें सारख्याच योग्यतेच्या होत असें तो म्हणत असे. आपले विचार व्यक्त करण्यासाठीं त्यानें योजलेल्या उपमा व परिचित गोष्टी फारच समर्पक असतात. तो स्वतः आपल्याला कवि म्हणून घेत नसे. तत्त्वज्ञ अगर ज्ञानी म्हणून घेण्यांत त्याला फार आनंद वाटत असे. काव्य लिहितांना त्यानें वृत्ताकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. त्यानें काव्याच्या योगानें समाजांतील वाईट चालींचा विध्वंस करण्याचें काम केलें. त्याच्या पूर्वींच्या काव्यवाङ्मयांत जें कृष्णभक्तीचें स्तोम माजलें होतें तें यानें नाहींसें केलें व काव्याला एकप्रकारचें नवें वळण लाविलें.

प्रेमानंद (१६३६–१७३४)—तथापि गुजराथी भाषेला व वाङ्मयाला जर कोणी उच्च दर्जाचें स्थान प्राप्त करून दिलें असेल व संस्कृतइतकीच प्राकृत भाषा गहन विचार व्यक्त करण्याला समर्थ आहे अशी जर कोणी लोकांची खात्री पटवून दिली असेल तर तो कवि म्हणजे प्रेमानंद होय. गुजराथींत चांगलें वाङ्मय निर्माण केल्याशिवाय पागोटें न वापरण्याची त्यानें प्रतिज्ञा केली होती. प्रेमानंदानें संस्कृत भाषेचा व पुराणाचा चांगला अभ्यास केला होता. तो स्वतः कवी होता एवढेंच नाहीं तर त्यानें काव्याचा स्वतंत्र पंथ निर्माण केला. जॉन्सनप्रमाणें त्याच्याभोंवती नेहमीं कविवृंद जमत असे, व प्रेमानंद हा आपल्या स्फूर्तीनें त्यांना निरनिराळीं काव्यें लिहिण्याला उत्तेजन देत असे. त्याचे जवळ जवळ २७ शिष्य होते. त्यांपैकीं एकाला सात्त्विक कविता तर दुसऱ्याला ऐतिहासिक काव्यें रचण्यास तो सांगत असे. स्वतः प्रेमानंदानें पुष्कळ काव्यें व नाटकें लिहिलीं. त्याच्या नाटकांमध्यें एकप्रकारचें वैशिष्ट्य दिसून येतें. त्याचें काव्यभांडार फार मोठें आहे. त्यानें एकंदर ३०।३२ काव्यें लिहिलीं. संस्कृतमधून गुजराथींमध्यें पुराण सांगणाऱ्या पंडितांची त्याला फार चीड येत असे. याकरितां प्रेमानंदानें गुजराथींतच पौराणिक प्रसंगावर काव्यें लिहिण्यास आरंभ केला व रामायण, महाभारत यांमधील प्रसंगावर त्यानें काव्यें रचिलीं. पण ' केवळ पुराणांचें भाषांतर करणारा माणूस हा कसला कवि ' अशी त्याचा प्रतिस्पर्धी सामळ यानें त्याची चेष्टा केल्यानें त्यानें सामाजिक विषयावरहि काव्यें लिहिण्याचा निश्चय केला. नरसीमेथाच्या चरित्रांतील तीन चार प्रसंग घेऊन त्यानें त्यावर इतकीं उत्कृष्ट काव्यें रचिलीं कीं, तीं आजतागायत गुजराथमधील आबालवृद्धांच्या तोंडीं आहेत. 'सामळदासनो विवाह' व 'कुंवरबाईनुं मामेरुं' या काव्यांत नरसीमेथाच्या दारिद्र्याचें वर्णन, मेथाच्या घराचें वर्णन हीं हुबेहुब साधलीं आहेत. तसेंच ' नरसिंह मेहेतानी हुंडी ' या काव्यांत श्रीकृष्ण हा मेथाची हुंडी पटवण्याकरितां वाण्याच्या रूपांत हिंडत असतांना द्वारकेच्या बाजाराचें जें वर्णन दिलें आहे तेंहि फारच सुंदर आहे. हीं मेहतावरील

काव्यें दर रविवारीं पुष्कळ गुजराथी भक्तिभावानें वाचतात. त्याचप्रमाणें दर शनिवारीं प्रेमानंदाचें सुदामचरित्र वाचतात. उखोहरण, दशमस्कंध, नलाख्यान हींहि काव्यें नेहमीं म्हटलीं जात असतात.

दशमस्कंधामध्यें कृष्णाच्या बाललीलाचें वर्णन आलें आहे तें फारच वाचनीय झालें आहे. नलाख्यानात दमयंतीविलापाचें वर्णन फार बहारीचें साधलें आहे. हें वर्णन वाचलें असता मनुष्यस्वभावाची पारख प्रेमानंदाला फार मार्मिक होती असें दृष्टोत्पत्तीस आल्याविना रहात नाहीं. उखाहरणात प्रेमानंदाची कल्पनाशक्ति किती अनिवार होती हें प्रत्ययास येतें रणयज्ञ हें काव्य रावणासंबंधीचें आहे. सुदामचरित्रात सुदामाची कथा आली आहे. नरसीच्या सुदामचरित्रात, सुदाम्याचें भक्तिपूर्ण चरित्र पहावयास सापडतें, पण प्रेमानंदाच्या सुदामचरित्रात काव्यप्रतिभा दृग्गोचर होते.

प्रेमानंदाला छंद शास्त्राची विशेष माहिती नव्हती व या मुळें त्याच्या काव्यात वृत्ताचे नियम पाळले जात नाहींत असा एक आक्षेप घेण्यात येतो पण तो खरा नाहीं द्रौपदीहरणात त्यानें वृत्ताचा उपयोग केला आहे. त्यावरून वरील आक्षेप निर्मूलक ठरतो प्रेमानंदाच्या काव्यात मानवी स्वभाव अलंकाराच्या सहाय्यानें उत्तम रीतीनें रेखाटलेला आढळतो. कित्येक ठिकाणीं त्याच्या काव्यात उपमा, रूपक, उत्प्रेक्षा याचा घोटाळा झालेला आढळून येतो व हा एक प्रेमानंदाच्या काव्यात दोष आहे असें त्याचे टीकाकार म्हणतात प्रेमानंदानें एकंदर ११ नाटकें लिहिलीं असें रावबहादुर हरगोविंदास कांतावाला यानीं म्हटलें आहे. त्यापैकीं रसदर्शिका सत्यभामाख्यान, पांचालीप्रश्नाख्यान, सपत्याख्यान हीं तीनच सध्या उपलब्ध आहेत. या तीन्ही नाटकामध्यें अगदीं अलीकडचे शब्दप्रयोग आढळतात व त्यावरून हीं नाटकें प्रेमानंदाचीं नव्हेत असें पुष्कळ विद्वानाचें म्हणणें आहे. सत्यभामा नाटकाच्या शेवटीं जें भरतवाक्य आहे त्यावरून गुजराथी भाषेची प्रेमानंदाला किती आवड होती हें दिसून येतें हें भरतवाक्य असें आहे 'सांगोपांग सुरंग व्यंग अतिशे, धारो गिरो गुर्जरी। पादेपाद रसाळभूषणवती थाओ रूखी ऊपरी। जे गिर्वाण गिरा गणाय गणता, ते स्थान एल्येवरी। थाये श्रेष्ठ सहु सखा जन थकी, ए आश पूरो हरि.'

सामळभटः—प्रेमानंदाचा प्रतिस्पर्धी सामळभट हा इ. स. १६४० मध्यें जन्मला. हा श्रीगोडमालवी ब्राह्मण जातीचा होता. त्याला संस्कृत, हिंदी, फारसी इत्यादि भाषा उत्तम अवगत होत्या. व्रजभाषेतील वृत्ताचा याच्या काव्यात फार उपयोग केलेला आढळतो प्रसंगविशेषीं दोहरा, चौपाई, छप्पा हीं गुजराथी वृत्तें देखील त्यानें उपयोगात आणलेलीं आहेत. सामळ हा प्रथमतः पुराणातल्या प्रसंगावर कवनें करीत असे पण त्याकाळीं गुजराथमध्यें धर्मासंबंधीं लोकाची आस्था नव्हती. त्यामुळें सामळलाहि आपल्या कवनाचे विषय तत्कालीन समाजाला पटतील असे निवडावे लागले त्याच्या काव्याची गोडी प्रथम समाजाला समजली नाहीं पण रखीदास नावाच्या एका कुणबी पाटलाला त्याच्याबद्दल फार आवड असे त्यानें सामळला आपल्याकडे बोलावून त्याला काव्यें करण्यास उत्तेजन दिलें. तसेंच रामानजी नावाच्या एका भाटाच्या संगतीचा सामळला फार फायदा झाला. सामळनें एकंदरींत २६ काव्यें रचिलीं. त्यापैकीं पद्मावती, रावणमंदोदरी संवाद, उद्यमकर्मसंवाद, सामळरत्नमाला, मदनमोहना, रखीदासनीं चरित्र इत्यादि काव्यें फार प्रसिद्ध आहेत सामळच्या काव्याचे वर्णनात्मक व नैतिक असे दोन भाग पडतात. नैतिक काव्यामध्यें जागजागीं उत्कृष्ट प्रकारचीं नीतिवचनें आढळून येतात उदाहरणार्थ पोटामुळें आपल्यावर काय काय अनर्थ घडून येतात तें वर्णन करताना कवि म्हणतो. 'पेट करावे वेठ, पेट वाजा वडवावे, पेट उपडावे भार, पेट गुण सौनागावे, पेट भमे परदेश; पेटथी पाप करे छे पेट करे छे जार पेटथी सत्य हरे छे'इ अशाच प्रकारचीं सत्यप्रमेयें जागजागीं सामळच्या काव्यात आढळून येतात. मदनमोहना हें अतिसुंदर, विनोदप्रचुर व शृंगारिक असें वर्णनात्मक काव्य आहे

कथाभागात निरनिराळ्या प्रकारचे प्रसंग फारच बहारीनें सामळनें वर्णिले आहेत. या काव्यातील प्रत्येक श्लोक सुंदर आहे असें स्वतः सामळनें म्हटलें आहे. या काव्याची भाषा फार सोपी व मनोहर आहे. जागजागीं कूट श्लोक घालण्याची सामळला फार खोड असे. त्यामुळें त्याच्या काव्याला एकप्रकारचें क्लिष्ट स्वरूप प्राप्त झालें आहे. सौंदर्यवर्णनात प्रेमानंद सामळाहून वरचढ आहे. सामळाच्या काव्यातील नायिका, नायकापेक्षा अधिक सुंदर तऱ्हेनें रेखाटलेल्या आढळतात. सामळच्या नायिकामध्यें साहस, पातिव्रत्य, सुशिक्षण, इत्यादि गुण आढळून येतात. सामळच्या काव्यावरून त्याची स्त्रियांबद्दलची काय कल्पना होती हें नीटसें समजत नाहीं.काहीं प्रसंगीं तो स्त्रियाची फार प्रशंसा करतो तर काहीं ठिकाणीं तो स्त्रियाबद्दल अनुदारपणाचें उद्गार काढतो. 'ए जीवती जात छे जक्षणी, जोर जोरावरना हर्यां' अगर 'घडी एकमा कहे वीर, कंथ घडीमा करी थापे' असें त्यानें स्त्रियांबद्दल वाईट उद्गार काढले आहेत. तर अन्यत्र 'जोबनमा दे रंग, संगसुख टाटक मननी, न्हालपणें करी वात, मटाडे पीडा मननी... चतुरा चित्र हरनार, सार उरमा मदमाती......छेनीच कोइजो नारियो, स्वभावे सहुं नहि सरखा' असें प्रशंसापर उद्गार काढले आहेत.

सामळ हा उत्कृष्ट कवि होता व त्याचे विचार तत्कालीन समाजाच्या फार पुढें गेले होते त्याचें अनुकरण करणारा

दुसरा कोणीहि कवि गुजराथी वाङ्मयात आढळत नाहीं. त्याच्या काव्यात फारसी भाषेंतील शब्द वारंवार येतात.

या प्रमुख तीन कवींशिवाय १७ व्या शतकांत नाकर, मुकुंद, देवीदास, शिवदास, विष्णुदास, विश्वनाथजानी, मुरारि, श्रीधर स्वामी, नरहरी, वल्लभ, वृज, रत्नेश्वर, हरिदास, द्वारकादास, धनदास, गोपाळदास, रत्नाजी आनंदघन, नेमिविजय इत्यादि अनेक कवी होऊन गेले व त्यांनी गुजराथी वाङ्मयांत पुष्कळ चांगल्या काव्यग्रंथांची भर घातली.

१७व्या शतकांतील काव्याचें संकुचित क्षेत्र नाहींसें करून काव्याचें क्षेत्र व्यापक केलें. आखो, प्रेमानंद व सामळ यांनी गुजराथी भाषा लोकप्रिय केली. या तिन्ही कवींचे मार्ग निरनिराळे होते. आखोच्या काव्यांत तत्त्वज्ञानावर भर दिलेला आढळतो तर प्रेमानंदाच्या काव्यांत मानवी स्वभावाचें उत्कृष्ट चित्र रेखाटलेलें पहावयास सांपडतें. सामळच्या काव्यांत, कथानिवेदनाची अप्रतिम हातोटी दिसून येते. पण अशा रीतीनें या तिघांचे मार्ग जरी निरनिराळे असले तरी या तिघांच्या काव्यामुळें गुजराथी भाषेला उच्च दर्जाचें स्थान मिळालें यांत संशय नाहीं.

*अठराव्या शतकांतील कवी*—अठराव्या शतकाच्या उदयाच्या वेळीं गुजराथच्या राजकीय परिस्थितींत स्थित्यंतर घडून आलें होतें. मुसुलमानी सत्तेला उतार लागून मराठी साम्राज्याचा रवि तळपूं लागला होता. मराठ्यांनीं आपली सत्ता चोहोंकडे प्रस्थापित करण्याचा सटाटोप मांडला होता. गुजराथवर त्यांनीं स्वाऱ्या करण्यास सुरवात केली होती. अर्थात अशा मुलुखगिरीच्या धामधुमीच्या काळांत, गुजराथी समाजांत एकप्रकारची चलबिचल व्हावी यांत आश्चर्य नाहीं. याचा परिणाम गुजराथी वाङ्मयावर घडून आला. सतराव्या शतकांत ज्या गुजराथमध्यें आखो, प्रेमानंद, सामळप्रभृति कवी निर्माण झाले त्याच गुजराथेंत अठराव्या शतकांतील वरील कवींच्या जोडीचा एकहि कवि निर्माण झाला नाहीं. उलट प्रकारच्या काव्याचा या शतकांत जन्म झाला नाहीं. सतराव्या शतकांत काव्याला स्वैर संचार करण्याकरितां जें क्षेत्र मिळालें होतें तें नाहींसें होऊन धर्माचें जूं काव्याच्या मानगुटीवर बसूं पहात होतें. कृष्णभक्तांच्या संप्रदायानें वर डोकें काढण्यास सुरवात केली होती. वल्लभपंथाचे उपदेशक गांवोगांवांतून आपल्या धर्माचा उपदेश करीत होते. अशा परिस्थितींत, गुजराथमधील कवीहि या धर्माच्या खऱ्या सुरांशीं आपल्या काव्याच्या तुतारीचा आवाज मिळविण्याचा प्रयत्न करीत होते. काव्याचें क्षेत्र पुन्हां संकुचित होऊं लागलें होतें. काव्याला सांप्रदायिक स्वरूप येत चाललें होतें. या शतकांत प्रसिद्धीस आलेल्या कवींपैकीं सुमारें बारा कवींनीं या संप्रदायाचीं तत्त्वें काव्यद्वारें जनतेपुढें मांडण्यास सुरुवात केली पण या कवींच्या काव्यांत नरसीमेहताच्या अगर मीराबाईच्या काव्यांत असलेला भक्तीचा उमाळा व उदात्त प्रेमाची जागती ज्योत आढळत नाहीं. यांच्या काव्यांत दृग्गोचर होणारें भक्तीचें स्वरूप हिणकस आहे.

वल्लभभाट कवीचीं काव्यें अंबादेवीच्या भक्तीपर आहेत. वल्लभाचा भाऊ धोला यानेंहि अंबामातेच्या स्तुतिपर कवनें रचिलीं आहेत. या दोघांचीहि कवींचीं काव्यें फार लोकप्रिय आहेत. वल्लभानें इतरांहि गर्बे लिहिले आहेत. 'कजोडूं' म्हणजे जरठ तरुणी जोडप्यावर त्यानें एक सुंदर गर्बा लिहिलेला आहे. यांतील प्रत्येक शब्द हृदयाला पाझर फोडणारा आहे. द्वारकेची (जन्म १७१०) कविता कृष्णचरित्रावर आहे. त्यांत जागोजागीं सुंदर नीतिवचनें आहेत. भानदास (जन्म १७२१) कवीनें शंकराचार्य व हस्तामलकाचार्य यांमधील संवाद रचिला असून त्यांत हस्तामलकाचार्यांनीं शंकराचार्यांना अद्वैत, द्वैत यांतील तत्त्वें विशद करून सांगितलेलीं आहेत. कालिदास (जन्म १७२५) या नागर ब्राह्मण कवीची, त्याच्या प्रल्हादाख्यान काव्यामुळें फार प्रसिद्धि आहे. याशिवाय सीतास्वयंवर, ध्रुवाख्यान, ईश्वरविवाह इत्यादि त्याचीं काव्यें आहेत. त्रिकमदास (जन्म १७३४) या नागरब्राह्मणानें रुक्मिणीविवाह, व डाकोरनाथ या विषयावर काव्य रचिलें आहे. प्रीतमदास (जन्म १७३०) हा संदेसर येथें राहणारा भाट जातीचा कवि होता. त्याचा गुरु गोविंदराम नांवाचा होता. सद्गुरूची कृपा झाल्याशिवाय मोक्षाचा मार्ग सुलभ होत नाहीं असें यानें ठाम मत झालें होतें व गुरूच्या महतीबद्दल त्यानें पुष्कळ कविता लिहिल्या आहेत. याशिवाय सारस गीता, ज्ञानकक्को, गुरुमहिमा, ज्ञानमास इत्यादि त्याचीं प्रसिद्ध काव्यें आहेत. याशिवाय कृष्णाच्या लीलावर त्यानें पुष्कळ पदें रचिलीं आहेत. त्यांपैकीं 'हे जसोदाजी आवडो-लाडकवायो लालन कीजे', 'हे वासलडी वेरणथई लागी रे व्रजनी नारने,' 'मनमोहनलाल मारगडो मूको तो मथुरा जइए,' व 'हरिभजन थकी छोटा होए, ते सौथी मोटा थाए' हीं पदें नेहमीं लोकांच्या तोंडीं असतात. शिवानंद (१७४८ जन्म) हा सुरतेचा नागर ब्राह्मण. यानें शिवपार्वतीच्या स्तुतिपर काव्यें रचिलीं आहेत. नर्भेराम (जन्म १७५७) हा पिहिजी येथें राहणारा मोढ ब्राह्मण होता. त्यानें कृष्णभक्तीपर वीस पंचवीस पदें रचिलीं आहेत. हरिदास (जन्म १७७४) हा कुंतलपूर येथें राहणारा क्षत्रिय जातीचा कवि होता. यानें 'शिवविवाह' नांवाचें काव्य व वेदान्तपर पदें रचिलीं आहेत. याच्या भाषेंत उर्दू शब्दांचा भरणा पुष्कळ आहे. गोविंदराम (१७८१-१८१४) या कवीनें कलीयुगांत मनुष्यजातीचा कसा अधःपात होत चालला आहे यासंबंधीं सुंदर व परिणामकारक कविता लिहिली आहे. उदयरत्न (जन्म १७१२) हा जैनधर्मी कवि होता. त्यानें स्त्रियांच्या संगतीपासून होणारे दुष्ट परिणाम काय होतात तें आपल्या काव्यांत वर्णन केलेलें.

रत्नो ( १७३९ ) हा जातीचा रंगारी होता. यानें कृष्णवियोगामुळें गोपींनां जें दुःख झालें त्यावर काव्य रचिलें आहे. जीवराज नांवाच्या कवीनें 'जीवराज सेठ' या प्रवासवर्णनात्मक काव्यात प्रेमानंदाच्या विवेकवंझारा या कवितेचें अनुकरण केलेलें आहे. बन्यनच्या 'पिलग्रिम्स प्रोग्रेस'च्या धर्तीवर हें काव्य आहे. माधवदास नांवाच्या कवीनें ( जन्म १७२१ ) दशमस्कंध, रुक्मिणीहरण इत्यादि विषयावर कविता लिहिली आहे पण त्याची कविता अगदींच साधारण प्रतीची आहे.

एकोणीसाव्या शतकांतील कवी.—१९ व्या शतकाच्या पूर्वार्धांत जे कवी उदयास आले त्यापैकीं बहुतेक कवींचा जन्म, १८ व्या शतकातच झाला होता. त्यामुळें त्यांची गणना कांहीं विद्वान अठराव्या शतकातच करतात. या कवींनीं आपलीं काव्यें एकोणिसाव्या शतकांत लिहिलीं. या दृष्टीनें त्यांची गणना १९ व्या शतकातच करणें अधिक इष्ट आहे असें कांहीं विद्वानांचें मत आहे. पण तें कसेंहि असो १९ व्या शतकाच्या पूर्वार्धांत अठराव्या शतकामधील परिस्थितीच कायम होती असें म्हटलें तरी चालेल. १८ व्या शतकात जे धर्मसंप्रदाय निर्माण झाले त्यातच या शतकाच्या पूर्वार्धांत सहजानंदस्वामींच्या संप्रदायाची नवीन भर पडली. या संप्रदायामध्यें पुष्कळ कवयित्री निर्माण झाल्या व त्यानीं मीराबाईच्या भक्तिमार्गाची विझनी ज्योत पुन्हा प्रज्वलित करण्यास सुरवात केली. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत जे कवी झाले त्यांमध्यें कालानुक्रमानें धीरो भगत हा पहिला होय. हा बडोदें संस्थानांतील गोथडा गांवचा रहाणारा होता. हा ब्रह्मभाट जातीचा होता. त्यानें एका संन्याशाला आपला गुरु केलें होतें. गुरुभक्तीवर त्यानें पुष्कळ गीतें केलीं आहेत. आत्मज्ञानावर त्याची फार भदार होती व आत्मज्ञानाच्या महतीवर त्यानें पुष्कळ पद्यें रचलीं आहेत. आपली कविता लोकप्रिय व्हावी या हेतूनें त्यानें एक नवीनच युक्ति लढविली. नदीवर स्नानाला जाण्याच्या वेळेस तो एका वेळूच्या नळकांड्यामध्यें आपलीं काव्यें कागदावर लिहून तीं ठेवीत असे व त्या नळकांड्याचें तोंड बंद करून तें नळकांडें नदींत सोडून देत असे व तें नळकांडें ज्याला सापडेल तो तीं पदें वाचीत असे. धीरोचीं रणयज्ञ, स्वरूपनी काफीओ, मतवादी, आत्मबोध, ज्ञानबत्रो, योगमार्ग, प्रश्नोत्तरमालिका, अवतवाणी, छप्पपदो, सरीवओधोळ, हीं काव्यें मोठीं आहेत. हीं काव्यें त्यानें काफीवृत्तात लिहिलीं आहेत. या वृत्तात त्याचा हात धरणारा अद्यापि कोणीहि झाला नाहीं. ओखाप्रमाणेंच जनतेच्या डोळ्यात तो सणणीत अंजन घालतो पण तें कठोर शब्दांनीं न घालता आपल्या पद्यलहरीयानीं तिला सुख करीत करीत घालतो. धीरोचे पुष्कळ शिष्य होते. त्यात बापूसाहेब गायकवाड हे एकच काय ते शिष्य कवियशाला पात्र आहेत.

बापूसाहेब गायकवाड ( इसवीसन १७७९–१८४३ ):—हे सरदार घराण्यातील गृहस्थ होते. लहानपणापासून धर्माकडे त्याचा ओढा असे. बापूसाहेबांनां भजन करण्याचा फार नाद असे. गुजराथी लोकात अशी चाल आहे कीं, एखादा घरचा मुख्य माणूस मेला कीं, शोकगीतें म्हणण्यासाठीं भाडोत्री बाया आणावयाच्या व मग या बायानीं ऊर पिटून रडण्यास सुरवात करावयाची एकदा बापूसाहेबांनीं अशा प्रकारच्या भाडोत्री बाया शोकगीतें म्हणताना पाहिल्या तेव्हा त्या शोकगीतामध्यें राम नाहीं असें वाटून त्यानीं स्वतः एक 'रामराजिओ' नावाचें शोकगीत तयार केलें. त्यात कामक्रोधादि षड्विकारांचें त्यानीं वर्णन केलेलें असून त्यापासून मनुष्यानें अलिप्त राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे असें त्यात सांगितलेलें आहे. हें शोकगीत हल्लीं पुष्कळ ठिकाणीं पूर्वींच्या शोकगीताऐवजीं म्हणण्यात येतें. बापूसाहेबाच्या काव्यात मानवी स्वभावाचें यथार्थ स्वरूप वर्णन केलेलें दृष्टीस पडतें. रामरहिम एकच आहेत. तेव्हा हिंदू व मुसुलमान यानीं परस्परात भांडत बसणें गैर आहे अशा प्रकारची शिकवण त्याच्या काव्यात दृष्टीस पडते.

प्रेमानंद स्वामी:—(इ. स. १७७९–१८४५)—हा काठेवाडातील गवडा येथील राहणारा. त्यानें कृष्णलीलाचें वर्णन काव्यात केलें आहे स्वतःला राधा समजून व कृष्णाला आपला वल्लभ समजून त्यानें हें काव्य लिहिलें आहे व यावरून त्याला प्रेमानंद सखी हें नाव पडलें आहे. सहजानंदस्वामींच्या समाधीनंतर त्याच्यावर यानें कांहीं कविता केल्या आहेत, व त्या फार उत्कृष्ट साधल्या आहेत. याशिवाय 'थल' नांवाची त्याची कविता प्रसिद्ध आहे.

भोज भगत ( इ. स. १७८५–१८५० ):—भोजभगत हा काठेवाडचा राहणारा असून जातीनें कुणबी होता. लहानपणींच एका तपस्व्यानें त्याला भक्तीचें महत्व समजून दिलें होतें. व त्याच्या मनावर त्याचा फार परिणाम होऊन तो विरक्त बनला. पुढें फत्तेहपूर येथें १२ वर्षें त्यानें तपश्चर्या केली. तो खरा साधु आहे किंवा नाहीं याची परीक्षा करण्याकरता विठोबा दिवाणजी नावाच्या एका मराठा अधिकाऱ्यानें त्यास फार छळ केला. भोजाच्या काव्यामध्यें त्याचे 'चाबखा'उर्फ फटके हे फार प्रसिद्ध आहेत. हे फटके उपदेशपर आहेत दयारामाची ज्याप्रमाणें गर्बीबद्दल प्रसिद्धि आहे, अगर सामळची त्याच्या 'छप्पा' बद्दल ख्याति आहे त्याचप्रमाणें भोजाचें नाव त्याच्या 'चाबखा'बद्दल प्रसिद्ध आहे. याशिवाय त्यानें इतर काव्येंहि लिहिलीं आहेत. पण तीं संपूर्ण नाहींत. त्याचें 'नळैयाख्यान' काव्य प्रसिद्ध आहे. याशिवाय त्यानें कांहीं होरी लिहिल्या आहेत. त्यापैकीं 'कृष्णप्रार्थना' ही होरी फार लोकप्रिय आहे. 'चाबखा'मध्यें त्यानें ढोंगी साधूवर फार टीका केली आहे. या ढोंगी बावाचें लक्ष्य परमेश्वराकडे नसून त्यांना नमस्कार करण्यास येणाऱ्या

पायखोंकडे असतें असें त्यानें म्हटलें आहे. भोज भगताची भाषा असंस्कृत व कर्णकठोर आहे तरी त्यामध्यें ओज व मनाची तळमळ दृष्टीस पडते. त्याची भाषा फार मर्मभेदक आहे.

मनोहरस्वामी:—( १७८८-१८४५ ) हा जुनागड येथील रहाणारा. हा संस्कृत व पर्शियन भाषेचा पंडित होता. वैष्णव व शैव पंथामध्यें जे वारंवार कलह माजत असत त्यामुळें त्याचें मन विटून जाऊन त्यानें आपणांस नूतन नाव सच्चिदानंद असें धारण केलें. वल्लभाचार्यांच्या तत्त्वाविरुद्ध त्यानें कविता रचिल्या होत्या. मूर्तिपूजा, तीर्थाटन, इत्यादि-कांचा त्याला फार तिटकारा असे. गुरुकृपेशिवाय खरें ज्ञान होणें शक्य नाहीं असें त्याचें मत होतें. 'दृढ विश्वास धरीने कोई सद्गुरु शरणे आया तेना संशय, विपर्यय हृदय ग्रंथी भेदाया, मनोहर जन्ममरण भय भागे संशय पलाया' असें त्यानें एका कवितेंत म्हटलें आहे. त्याच्या काव्याची भाषा सुसंस्कृत व जोरदार असते. तात्त्विक विषयावर लिहितांना त्याची भाषा गंभीर व दुर्बोध असते.

*गिरिधर कवि हा गुजराथीमधील छंदोबद्ध रामायणाबद्दल* प्रसिद्ध आहे. त्याशिवाय त्याचे इतर ग्रंथ तुलसीविवाह *राजसूय यज्ञ, गोकुळलीला, रावणविरह, अश्वमेध, कृष्णलीला* हे होत. गिरिधरानंतरचा कवि रणछोड गार्ची, रामायण, *रावणविरह, रणछोडजीनी गर्बी* इत्यादि काव्यें प्रसिद्ध आहेत. रणछोडजी दिवाण (१७६८-१८४१) हा कवि काठेवाडांत फार *प्रसिद्ध आहे. हा मूळचा नागरब्राह्मण आहे. तरी* पण त्याला युद्धकला चांगली अवगत होती व आपला पराक्रम *त्यानें पुष्कळ ठिकाणीं गाजविला होता.* पुढें १८०५ त कर्नल वॉकरनें काठेवाडमधील बंडाळी मोडल्यानंतर, रण-छोडजीनें आपला शिपाईबाणा सोडून देऊन लेखनाचा व्यवसाय पत्करला. हा अतिशय बुद्धिमान व विद्वानांचा आधार होता. उर्दू भाषेंत *त्यानें 'तारीख ए सोरठ'* व *'रसात ए गुणागुण'* हे दोन ग्रंथ लिहिले आहेत. *शिवरह-*स्याचें समभाषेंत त्यानें भाषांतर केलें आहे. 'शिवगीता,' 'चंडीपाधना न गर्बो' इत्यादि त्याचीं गुजराथी भाषेंतील काव्यें प्रसिद्ध आहेत. हरिदास कवीची सीताहरणेंवर इत्यादि काव्यें बरींच लोकप्रिय आहेत. हरिभट (१८२९) हाहि वऱ्या-पैकीं कवि होऊन गेला. त्याचें कृष्णचरित्रावरील काव्य बरें आहे. वीरविजय हा जैन यति, त्याच्या बोधप्रद, कवितांबद्दल प्रसिद्ध आहे. त्यानें एकंदर ३६ उपदेशपर कडवीं रचिलीं, तीं फार सुंदर आहेत.

या वर वर्णन केलेल्या कवींशिवाय *या कालांत* पुरुषोत्तम, मिश्री, मुकुंद, दयाळ, रत्नदास, रघुनंदन, हरगोवन, रघुना-थदास, *कृष्णरायदेवसाहेब डुंगर बारोट, शांतीदास, भवान-*भक्त दुर्गादास, नाथास्वामी, धनविजय इत्यादि दुय्यम दर्जाचे कवी होऊन गेले. या काळांतच स्वामी नारायण पंथाची भरभराट झाली होती. या पंथीच्या अनुयायांतहि *ब्रह्मानंद*, मुक्तानंद, *निष्कुळानंद*, प्रेमानंद, देवानंद, मुळजी भट इत्यादि कवी प्रसिद्ध आहेत.

पण या काळामध्यें पुष्कळ कवीच तेवढे निर्माण झाले असें नाहीं तर पुष्कळ कवयित्रीहि निर्माण झाल्या. मीरा-*बाईप्रमाणें जरी या कवयित्रींची ख्याति नव्हती तरी त्या* आपल्या काळीं बऱ्याच लोकप्रिय होत्या यात शंका नाहीं. दिवाळीबाई, राधाबाई, कृष्णाबाई, पुरीबाई, गौरीबाई या कवयित्री या काळांतील मुख्य होत. दिवाळीबाईची राम-चरित्रांतील कविता रसाळ व सुंदर आहे. राधाबाई ही दक्षिणी बाई असून तिनें गुजराथींत कृष्णचरित्रांतील कित्येक प्रसंगांवर कविता लिहिली आहे. पण तिच्या कवितामधून हिंदी व मराठी शब्द वारंवार आढळतात. तिची कविता जोरदार व परिणामकारक आहे. कृष्णाबाईची 'कृष्णना *हालरडा' व 'सीताजीनी कांचळी' या कविता* प्रसिद्ध आहेत. पुरीबाईचें सीतामंगल काव्य लोकप्रिय आहे. गौरीबाईनें *जवळ जवळ ६५० पदें रचिलीं असून त्यात वेदांत ओतप्रोत* भरलेला आढळतो.

*दयाराम:—गुजराथी भाषेचे जे तीन मुकुटमणी म्हणून* मानले जातात त्यामध्यें, नरसीमेहता, प्रेमानंद, यांच्याच *बरोबर दयारामाची गणना केली जाते. या तीन कवींच्या* काव्यात गुजराथी भाषेचें परमोच्च स्वरूप दृष्टीस पडतें. *अभिजात काव्याचे मेहता. प्रेमानंद व दयाराम हे तीन* प्रमुख कवी होते असें म्हणावयास हरकत नाहीं. दयाराम *याचें मूळचें नांव दयाशंकर असें होतें.* पुढें वल्लभाचार्यांच्या संप्रदायाची दीक्षा घेतल्यानंतर त्यानें दयाराम असें आपलें *नाव जाहीर केलें हा चाडोदचा राहणारा होता.* चाडोद येथील नायकाची सौंदर्याबद्दल व नखरेपणाबद्दल फार प्रसिद्धि *आहे. लहानपणीं आपल्या इतर* खेळगड्यांसह, नायकाच्या खोड्या करण्याची दयारामाला फार खोड असे. एकदा दया-रामानें एक सोनाराची बाई नर्मदेच्या घाटावरून घागर *भरून घेऊन जात असतां, खडा मारून फोडली.* तेव्हा

बालविधवेची मैत्री होती. हा जरी ब्राह्मण होता तरी त्यानें तिला आपल्या घरीं ठेवून तिचें पालन केलें होतें. तिच्याशीं त्याचा वाईट संबंध होता असें लोक म्हणत व तें खरेंहि होतें. तरीपण लोकांच्या निंदेची पर्वा न करतां तीं दोघेंहि शेवटपर्यंत एकत्रच राहिलीं. दयारामाच्या शेवटच्या दुखण्यात तर या बाईनें त्याची अतिशय काळजीपूर्वक शुश्रुषा केली.

दयारामाची स्त्रियांच्यावरोबर अतिशय सलगी असल्यामुळें त्याच्याविषयीं लोक वाईट उद्गार काढीत पण त्याचें दयारामाला कांहीं वाटत नसे. त्याच्या इच्छेविरुद्ध बायका त्याला देवासमान मानून त्याचे पाय चोळीत व त्याची अन्य प्रकारें सेवा करीत. एका काव्यात त्यानें आपण कृष्णाशीं व्यभिचारी आहों असें म्हटलें आहेः—" दयानी प्यारी कृष्णजी कहावे, कृष्णनी प्यारी आदासी । रमुं, रमाडुं, प्रेमें पोढुं, जारी कृष्ण सुं, नहि तो उदासी । ए व्यभिचार नित्य मरीए रे, एथी भवसागर तरी ए रे " चाळीसाव्या वर्षापर्यंत नेहमीं तीर्थाटणें, यात्रा वगैरे करण्यात दयारामानें आपला काळ घालविला. डाकोर येथें गोमती नदीच्या काठीं तो गाणें गात असतां इच्छाराम भट या गृहस्थानें तें ऐकलें व दयारामावर तो प्रसन्न झाला व त्यानें त्याला तूं उत्तम कवि होशील असा आशीर्वाद दिला असें म्हणतात. दयाराम हा नरसीमेहेताचा अवतार आहे असें तो म्हणत असे. वल्लभाचार्य पंथाच्या महाराजावर दयाराम हा नेहमीं चिडत असे. या महाराजाचीं वाईट कृत्यें त्याच्या दृष्टीस पडल्यामुळें त्याच्या तोंडावर त्याची नालस्ती करण्याला तो मागें पुढें पहात नसे. पण या महाराजावर जरी त्याचा राग असे तरी वल्लभाचार्यांच्या संप्रदायाचीं तत्त्वें त्याला पूर्णपणें मान्य होतीं. त्याच्या काव्यातून या वल्लभ सांप्रदायासंबंधींचे चांगले उद्गार आपल्याला आढळून येतात.

दयारामाचा आवाज फार मिठा असे. त्यामुळें त्याच्या भक्तिपर गाण्यावर लोक फार खुष असत. दरवर्षी दयारामाला त्याच्या गाण्यावर दोनशें रुपये तरी मिळत असत, पण तो उधळ्या असल्याकारणानें ते पैसे तो थोडक्याच दिवसांत खर्च करून टाकीत असे. त्याच्या मनात आलें असतें तर त्याला सहज राजाश्रय मिळवितां आला असता पण राजाच्यापुढें सुद्धां शिर नमविण्याचें त्याच्या जिवावर येत असे. कृष्णाशिवाय दुसऱ्या कोणापुढेंहि मी डोकें नमविणार नाहीं असें तो मोठ्या अभिमानानें म्हणत असे. दयारामाचा शिष्यवर्ग फार मोठा असे. गुजराथच्या निरनिराळ्या भागातून सर्व दर्जाच्या लोकांमधून त्याचे शिष्य पसरले होते. अमृतराम पाड्या व दयाभाई साभोद्रा नागर हे त्याचे दोन आवडते शिष्य होते. पुढें रणछोड नावाच्या एका १५ वर्षांच्या मुलाला त्यानें त्याच्या गोड आवाजावरून आपला शिष्य करून घेतलें; व या शिष्याचीहि गरुवीवर अलोट भक्ति असे.

दयारामाचा काव्यसंग्रह फार मोठा आहे; पण त्यापैकीं उत्कृष्ट असें काव्य फार थोडें आहे. त्यानें कृष्णभक्तिपर जे गर्भे लिहिले ते फारच सुंदर आहेत. गुजराथीमध्यें त्यानें ४८ काव्यें व व्रजभाषेंत ६१ काव्यें लिहिलीं. याशिवाय गुजराथीमध्यें त्यानें ७००० पदें; व्रजभाषेंत १२००० पदें, मराठींत २००, पंजाबीमध्यें ४० व संस्कृतमध्यें व उर्दूमध्यें अनुक्रमें १५ व ७५ पदें रचिलीं. यापैकीं फार थोडीं पदें उपलब्ध आहेत. कांहींच्या मतें त्याच्या ग्रंथांची संख्या १३५ आहे. तर इतरांच्या मतें २०८ आहे. तो बसल्या बसल्या पदें करीत असल्यामुळें, त्याच्या पदांची संख्या फारच आहे हीं सर्व पदें अद्यापि एकत्र करण्यात आलेलीं नाहींत. त्याचे गुजराथी ग्रंथ म्हणजे, गीतामाहात्म्य, रसिकवल्लभ, अजामिळाख्यान, वृत्रासुराख्यान, प्रेमरसगीता, प्रबोधबावनी, कालज्ञानसार, प्रश्नोत्तरमालिका, श्रीकृष्णनाममाहात्म्यमंजरी, श्रीकृष्णनाममाहात्म्यमाधुरी, श्रीकृष्णस्तवनचोद्रका, श्रीहरिभक्तचंद्रिका, श्रीहरिभक्तरत्नमाला, श्रीहरिनामवेली, श्रीगुरुदेव चंद्रिका, प्रेमप्रशंसा, शिक्षा तथा परीक्षा, भक्तिपोषण, भक्तिदृढत्व, स्तवनमाधुरी, सत्यभामाविवाह, रुक्मिणीविवाह, दशमलीला, रासपंचाध्यायी, भ्रांतिभंजन, अन्यायमर्दन, मोहमर्दन, ईश्वरनिरीक्षण, चिंताचूर्णिका, नरसिंह मेहेतानी हुंडी, उत्साहरण इत्यादि होत.

शतसैया या त्याच्या हिंदी ग्रंथात त्याचें संस्कृतग्रंथासंबंधींचें अगाध ज्ञान प्रगट होतें. वल्लभसंप्रदायाच्या तत्वाचा त्यानें पुरा अभ्यास केला होता हें या ग्रंथावरून दिसून येतें. या ग्रंथावर त्यानें स्वतःच गुजराथी भाषेंत टीका लिहिली आहे.

त्याच्या काव्यग्रंथाचे ( १ ) धार्मिक ( २ ) नैतिक, ( ३ ) शृंगारिक असे तीन भाग पडतात. धार्मिक ग्रंथांची संख्या त्याच्या इतर ग्रंथापेक्षां मोठी आहे. हरिभक्ति हें या ग्रंथांतील मुख्य तत्व आहे. हाफीज अगर रूमी या शफी पंथाच्या कवीच्या काव्यामध्यें ज्याप्रमाणें, ईश्वरविषयक शुद्ध प्रेमाचें स्वरुप दृष्टीस पडतें त्याचप्रमाणें दयारामाच्या काव्यांतहि दृष्टीस पडतें. हरीशीं पूर्णपणें एक होणें हें सर्व धर्मांचें सार आहे असें तो म्हणतो. ' दयारामनो अक्षरदेह ' या ग्रंथांत त्रिपाठी या विद्वान पंडितानें दयारामाच्या धार्मिक तत्वांचा विस्तारपूर्वक विचार केला आहे. दयारामाच्या नीतिविषयक कल्पना फारच साध्या आहेत. हरिभक्ति करणें व शुद्धाचरणानें रहाणें हा उपदेश त्यानें आपल्या काव्यात केलेला आढळतो. हीं काव्यें सुंदर विचारांनीं भरलेलीं आहेत. हीं पदें अद्यापिहि कित्येक भक्ताच्या तोंडून ऐकावयास मिळतात. (१)"वैष्णव नथी थयो तुंरे, शीद गुमानमां घुमे, हरिजन, नथी थयो तुरे; (२) फुल्यो शुं करे छेरे, भूल्यो भवकूपमां पड्यो, मनुष्य देह मोंघो रे, खोयो पाणी हाथे चढ्यो,"इत्यादि पदें फार बहारीचीं आहेत.

त्याच्या शृंगारिक काव्यांनीं त्याचें नांव अजरामर केलें आहे. त्याचीं शृंगारिक पदें गर्भा चालीवर आहेत. भावना गीताप्रमाणें हीं पदें चित्ताची खळबळ करून टाकणारीं आहेत. 'प्रेम वहालुं रे वैकुंठ नहि आवुं। मने न गमे चतुर्भुज थावुं। जे कोई प्रेम अंश अवतरे प्रेमरस तेना-उरमा ठरे," इत्यादि गर्ते फार सुंदर आहेत. शारीरिक प्रेमाची त्यानें फार स्तुति केलेली आढळते. पण त्याच्या-मध्यें गूढ अर्थ भरलेला आहे असें त्याचे भक्त म्हणतात. स्वरूपात त्यानें आपल्या प्रिय देवाचीच स्तुति केली आहे असें त्याचे भक्त सांगतात. कृष्ण व राधा यांच्या शृंगारांचें त्यानें फार मनोहर वर्णन केलें आहे. त्याच्या शृंगारिक कवितांचे मासले खालीलप्रमाणे आहेत.

"आवोनी मारे घेर माणवा होजी, राज आवोनेः मारे
घेर माणवा.
प्रेमरस प्यालो पीवा ने पावा, जोबन तुरीने पलाणवा
होजी
पडती राते पधारजे प्रीतम कोई नथी वेतु जाणवा."

'हे राजपुत्रा तूं माझ्याकडे ये प्रेमरसाचा आस्वाद घेण्याकरता तूं माझ्या दाराकडे ये. मला देखील तो प्रेमरस पिऊं दे, तू माझ्याकडे रात्रीच्या वेळीं ये म्हणजे तुला कोणी ओळखूं शकणार नाहीं.'

"रमीशुं रातडी रे, आवनो अलबेलाजी घेर
कहे जेमातेनेर गाय एक खोवाणी छे आज'
जाऊं हुं शोधवांरे वांभ जो पाणी पहेली पाज,
सासरीआ यही रे मारो आवास छे एकात
रातीश दीवडो रे माणाशुं मनमानी मोज."

"प्रियकरा तूं माझ्या घराकडे ये,म्हणजे आम्हीं रात्रीं प्रेमात तल्लीन होऊं. तूं तुझ्या आईला सांग कीं, गाय चुकली आहे व तिच्या शोधाला मी जातो व अशा रीतीनें थाप मारून तूं माझ्याकडे ये. माझी निजावयाची खोली अगदीं एकीकडे व स्वतंत्र आहे. मी तुला मार्ग कळावा म्हणून दिवा जळत ठेवते. तूं आलास म्हणजे मग मानेल तशी आपण मजा मारूं.'

अशीं कित्येक शृंगारिक पदें येथें उद्धृत करता येण्यासारखीं आहेत. या पदांची भाषा शुद्ध, सुंदर व मधुर आहे. पदलालित्याच्या बाबतींत त्याचा हात धरणारा कोणी नाहीं. तीं पदें ऐकल्याशिवाय त्याच्यामधील गोडी कळत नाहीं. हीं पदें ऐकताना क्षणभर तरी मन तल्लिन झाल्याशिवाय रहात नाहीं.

दयारामाच्या काव्यांचें परीक्षण पुष्कळांनीं केलें आहे. त्या सगळ्यांत नवलरामनें केलेलें परीक्षण फार मार्मिक आहे. दयारामची कविता भावप्रधान व प्रेमपूर्ण असते. पण त्याच्या काव्यात मानवी स्वभावाचें सत्यस्वरूप रंगविलें गेलेलें आढळत नाहीं शृंगाररसाच्या बाबतींत प्रेमानंद दयारामापेक्षा श्रेष्ठ आहे. नवलरामच्या मतें दयाराम यांची जितकी स्तुति केली जाते तितकी त्याची योग्यता नाहीं पण गोवर्धनराम त्रिपाठींचे मत याच्या उलट आहे. यांच्या मतें दयारामाची भाषा फार सुंदर व परिणामकारक असून त्याचें काव्य फार श्रेष्ठ प्रतीचें आहे. काहीं विद्वानांनीं दयारामाला हफीझच्या जोडीला तर काहींनीं बायरनच्या जोडीला नेऊन बसविलें आहे. कांहींनीं तर त्याची सूरदासाशीं तुलना केली आहे. अभिजात वाङ्मय लोकप्रिय करणाऱ्या कवींमध्यें दयारामाची योग्यता फार मोठी आहे. दयारामाच्या काळीं अभिजात काव्याला उतरती कळा लागली होती. पण ही दुःस्थिति नाहींशी करून दयारामानें अभिजात काव्याला नरसीमेहेता व प्रेमानंदाच्या वेळेप्रमाणें लोकप्रिय करून टाकलें. दुर्दैवानें दयारामाच्यानंतर ही स्थिति टिकली नाहीं ही गोष्ट निराळी

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत गुजराथी काव्याला एक प्रकारचें नवीन वळण लागलें असें म्हणावयास हरकत नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वभागातील काव्यावर १८ व्या शतकामधील काव्याच्या स्वरूपाचीच छाप पडलेली होती पण उत्तरार्धांत ज्या वेळीं वर्डस्वर्थ, शेले, टेनिसन इत्यादि कवींच्या काव्याचा अभ्यास सुरू झाला त्यावेळीं काव्याचें स्वरूप हळू हळू पालटूं लागलें

१९ व्या शतकाच्या उत्तरार्धामधील दोन प्रसिद्ध कवी म्हणजे दलपतराम (१८१७–१८९८) व नर्मदाशंकर (१८३३–१८८६) हे होत. इंग्लिश शिक्षणामुळें हिंदु लोकांच्या आचारविचारात हळू हळू क्रांति घडून येत चालली होती. हिंदु समाजातील व्यंगें लोकांच्या नजरेस येत चालली होतीं. महाराष्ट्राप्रमाणेंच गुजरार्थेत सामाजिक सुधारणेचे कंकण बांधणारे, समाजवीर निर्माण झाले होते. या समाजसुधारणेच्या चळवळीचा परिणाम वाङ्मयावरहि झाल्यावाचून राहिला नाहीं. दलपतराम व नर्मदाशंकर या कवींनीं याच विषयावर काव्यें लिहिण्यास सुरवात केली. दलपतराम हा धीरे धीरे सुधारणा व्हावी या मताचा होता, तर त्याच्या उलट नर्मदाशंकर हा आगरकरी बाण्याचा म्हणजे तावडतोब सामाजिक सुधारणा झाली पाहिजे असें म्हणणारा होता. वेनचरित्र नामक आपल्या काव्याच्या दुसऱ्या भागात 'सज्जन साभाळ्यव जो रे धीरे धीरे सुधारानो सार, लाखो कीडीभर लाडवो, आखो मेलीये तो मरी जाय, भूको करी भमरावीये, तो ते खासी रीतिशी जाय," अशा रीतीनें धीरे धीरे समाजसुधारणा घडवून आणण्याची लोकांना दलपतराम कवीनें इशारत दिली आहे. पण उलटपक्षीं नर्मदाशंकरनें "या होम करीने पडो फतेह छे आगे" अशा गंभीर शब्दांत एकदम समाजसुधारणा करण्याचा संदेश त्यानें लोकांना पाठविला आहे. दलपतराम हा श्रीमाळी ब्राह्मण होता त्यानें व्रज व संस्कृत भाषेचा चांगला अभ्यास केला होता. तो सद्रा येथील पोलिटिकल एजटच्या कचेरींत दफ्तरदार

होता. पुढें फोर्बसनें आपल्याला ग्रंथ लिहिण्याच्या कामांत साहाय्य करण्याविषयीं दलपतरामाला लिहिलें. तेव्हां त्यानें आपल्या नोकरीला रामराम ठोकला व आपलें आवडतें कार्य पार पाडण्यासाठीं तो फोर्बसच्या हाताखालीं राहिला. गुजराथ व्हर्नाक्युलर सोसायटीमध्यें त्यानें आपलें नांव दाखल केलें. त्या ठिकाणीं काम करीत असतां त्यानें पुष्कळ ठिकाणीं हिंडून गुजराथी वाङ्मय एकत्र केलें. पुढें त्याची दृष्टि क्षीण झाल्यामुळें त्यानें ही सोसायटी सोडली व सरकारनें त्याला शेवटपर्यंत २० रुपयांचें पेन्शन दिलें.

दलपतरामचा काव्यसंग्रह मोठा आहे. याशिवाय बुद्धिप्रकाश नांवाचें एक मासिक त्यानें चालविलें होतें. यानें कांहीं नाटकेंहि लिहिलीं आहेत. सामाजिक विषयावर त्यानें पुष्कळ काव्यें लिहिलीं. त्याच्या ग्रंथांत भुतावरील निबंध, जातीवरील निबंध, लक्ष्मीनाटक, कथनसप्तशती, पुनर्विवाह, स्त्रीसंवाद, बालविवाहनिबंध, गुरुशिष्याचीं परस्परकर्तव्यें, शहरसुधारणेवरील निबंध, विजयक्षमा, काव्यदोहन, हुन्नरखानची चढाई, अनुखान, मिथ्याभिमान नाटक इत्यादि ग्रंथ प्रमुख होत.

दलपतरामाच्या काव्यांत (१) आस्ते सुधारणा व्हावी या मताचा पुरस्कार, (२) स्वातंत्र्यलालसा व (३) देशाभिमान हे *तीन गुण दिसून येतात.* सुधारणेसंबंधीचें त्याचें मत वर दिलेल्या उताऱ्यावरून दिसून येतें. स्वातंत्र्यलालसा दर्शक उतारा खालीलप्रमाणें आहे. 'आ राणी सरकारनो निर्मळ छे शुभ न्याय। पण बोल्याबीण कोईना वार नहि वचाय, मागे सेवे तो मळे अदल रुडो इन्साफ, ए अंतरजामी *नथी केम करे दरयाफ*' या उताऱ्यांत सरकारशीं सनदशीर रीतीनें भांडून, स्वातंत्र्य मिळविण्याचें तत्त्व त्यानें प्रतिपादन केलें आहे. 'स्वदेशनु सर्व प्रकार सारु तमे करो ते गणिने तमारु जरूर एवा जन धर्म जाणो अरे स्वदेश अभिमान आणो' या कवितेंत त्याचा स्वदेशभक्ति दिसून येते.

काव्यदृष्ट्या विचार केल्यास दलपतराम हा श्रेष्ठ दर्जाचा कवी होता असें म्हणतां येत नाहीं. त्याच्या वर्णनांत *नाविन्य* आणि *प्रतिभा दिसून येत नाहीं.* त्याच्या काव्यांत आढळून येणारें सृष्टिवर्णन अगदीं साधें आहे. फोर्बसचें गुजराथी कवीवर फार प्रेम असे. त्यामुळें दलपतरामनें 'फार्बस विलास' नांवाचें एक काव्य लिहिलें. हें काव्यहि अगदीं सामान्य आहे. दलपतरामचें वेनचरित्रपर काव्य मात्र फार बहारीचें आहे. वेनचरित्राच्या प्रसंगानें त्यानें सामाजिक सुधारणेवर आपले विचार प्रगट केलेले आहेत. दलपतरामची भाषा सामान्य माणसालाहि कळण्यासारखी असते. तो व्रज व संस्कृत भाषेंत निपुण होता. तरी त्याच्या काव्यांत संस्कृत भाषेंतील शब्द फार आढळून येत नाहींत. त्यामुळें त्याचें काव्य सुबोध व लोकप्रिय झालें आहे. नवलरामनें त्याच्यासंबंधीं असे उद्गार काढले आहेत कीं, दलपतरामची कविता गंभीर, अर्थपूर्ण, चतुराईयुक्त, व 'सभारंजनी' अशी आहे. त्याच्या काव्यांत सर्व प्रकारचे रस आढळतात पण, त्यांत अतिशयोक्ति बिलकूल दिसून येत नाहीं. निःपक्षपातीपणानें जगांतील व्यवहाराचें निरीक्षण करून नंतर व्यवहारांतील प्रसंग वर्णन करण्याची त्याची पद्धत आहे. त्यामुळें त्याच्या काव्यांत भावनेची उत्कटता दिसून येत नाहीं. त्याची लेखनशैली सूक्ष्मविनोदप्रचुर, मधुर व गुलगुलीत असते. याच्या अनुयायांत बुलाखीराम, चतुरभाई, रणछोड गलुराम, नवमियन हे प्रमुख होत. बुलाखीरामाचें काव्यकौस्तुभ प्रसिद्ध आहे. रणछोड गलुरामचें रणछोडकाव्यसुधा हें काव्यहि बऱ्या प्रकारचें आहे. याशिवाय, हरजीवन कुबेर कवि भवानी शंकर, दलपतराम दुर्लभराम, गणपतराम, राजाराम हे कवीहि याच्याच शिष्यवर्गांत मोडतात.

नर्मदाशंकर—हा गुजराथी लोकांचा आवडता कवि होय. यानें गुजराथी गद्यग्रंथहि पुष्कळ लिहिले. गुजराथी वाङ्मयांत *त्यानें स्थित्यंतर घडविलें.* हा *नागरब्राह्मण जातीचा होता.* याचें शिक्षण एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें झालें. त्यानें इंग्लिश भाषेंतील बहुतेक कवी वाचून काढले होते. याशिवाय मराठी, हिंदी, संस्कृत इत्यादि भाषांचाहि त्यानें अभ्यास केला होता. लहानपणीं तो मोठा रंगेल व चैनी असे. स्वच्छंदी आचार विचार हे काव्याला पोषक आहेत असें त्याचें मत होतें. पुढें आयुष्याच्या उत्तरार्धांत मात्र त्याचें मत बदललें व तो *नियमितपणानें राहूं लागला. त्याचे शेवटचे दिवस दारिद्र्याशीं* झगडण्यांत गेले.

नर्मदाशंकरमधील मोठा गुण म्हणजे त्याचा स्वच्छंदी स्वभाव होय. परंपरागत आचारविचाराप्रमाणें वागणें त्याला कधींच पसंत पडलें नाहीं. आपल्याविषयीं त्यानें जी हकीकत *लिहून ठेवली आहे तीवरून तो चैनी व गर्विष्ठ मनुष्य असावा* असें दिसतें. बायकांच्या बाबतींतहि त्याची वागणूक आक्षेपार्हच होती. उत्तरवयांत मात्र नर्मदाशंकरमध्यें मोठी क्रांति घडून आली. जुनें तें सारें कुचकामाचें अशी त्याची पूर्वींची समजूत उत्तरोत्तर पालटत चालली. धर्माकडे त्याचें लक्ष हळूहळू वेधूं लागलें. धर्मविचार नांवाच्या त्याच्या ग्रंथांत त्याचे धर्मसंबंधाचे विचार आढळून येतात.

वाङ्मयसेवा पत्करावयाची त्यानें निश्चित केल्यापासून त्यानें संस्कृत, हिंदी, इंग्रजी भाषेंतील ग्रंथांचें सूक्ष्म अध्ययन केलें. *अलंकारशास्त्राचा व छंदःशास्त्राचा* त्यानें चांगला अभ्यास केला. त्यानें काव्यापेक्षां गद्यग्रंथच अधिक *निर्माण* केले. नवलरामनें त्याचें चरित्र लिहिलें असून त्यामध्यें नर्मदाशंकरानें कोणकोणते ग्रंथ लिहिले याची साग्र माहिती त्यानें दिली आहे. १८५८–१८६५ च्या दरम्यान नर्मदाशंकरनें *पुष्कळच ग्रंथ लिहिले. आपल्या कवितेंचे खंड जसजसे* त्यानें प्रसिद्ध करण्यास सुरवात केली तसतशी *त्याची* लोकप्रियता शुक्लेंदुप्रमाणें वाढत चालली. १८६६ मध्यें त्यानें 'नर्मकविता' या नांवाखालीं आपलें काव्य प्रसिद्ध केलें. आपल्या काव्यांतील

चमत्कृतीची लोकांना कल्पना येत नाहीं असें त्यानें म्हटलें आहे. त्यानें स्वतःच आपल्या काव्याचें वर्गीकरण केलेलें आहे व त्यांतील गुणाचें वर्णन केलें आहे.

त्याच्या काव्याचें क्षेत्र फार विस्तृत आहे.सामाजिक सुधारणाविषयक निरनिराळ्या विषयांवर व धार्मिक, नैतिक,ऐतिहासिक अशा सर्व विषयांवर त्यानें काव्यें रचिलीं आहेत. याशिवाय अलंकारप्रवेश, रसप्रवेश,नायिकाप्रवेश, इत्यादि काव्यें त्यानें लिहिलेली आहेत. भावगीतें लिहिणारा हा पहिलाच कवि होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्याची काव्याची कल्पना वर्ड्स्वर्थच्या व्याख्येप्रमाणेंच होती. ऋतुवर्णन काव्यांत, भावनेच्या उत्कटतेमुळें आपोआप बाहेर पडलेल्या कविता पुष्कळ आढळून येतात.

बालविधवांची दुर्दशा अवलोकन करून त्याचें मन अतिशय कष्टी होत असे. वैधव्यचरित्रांत त्याला वाटत असलेली विधवा विषयींची चिंता उत्तम रीतीनें निदर्शनास येते. विधवाभेद ही कविता लिहितांना स्वतः रडल्याचें त्यानें लिहिलें आहे. पण कांहीं काहीं ठिकाणीं त्यानें अतिशयोक्तीचें वर्णन केलें आहे. हाच दुर्गुण त्याच्या इतर काव्यातहि आढळतो.ऋतुवर्णनपर काव्यांत अश्लील शब्दांची रेलचेल आढळते. आपल्या प्रत्येक कवितेवर त्यानें टीका लिहिलेली आहे व त्यांत तर अश्लील वाक्याना नुसता ऊत आलेला दिसतो लोकांच्या पापी अचरणाची पूर्ण फोड करून त्याना नीतिमान बनविण्यासाठीं आपण मुद्दाम इतक्या स्पष्ट शब्दांत टीका लिहिलेली आहे असें त्यानें म्हटलें आहे. पण त्याचा इष्ट परिणाम होण्याऐवजीं अनिष्टच परिणाम होण्याचा संभव आहे.

निसर्गाचें वर्णन करण्यांत मात्र त्याचा हातखंडा आहे. लहानपणापासून त्याला निसर्गनिरीक्षणाची फार आवड होती. निसर्गामध्यें गूढतत्व भरलेलें आहे असें तो म्हणत असे. 'जेने बीजा पथरा कहे तेने कविजन हीरा लेहे, बलीहारी छे कुदरत तणी, कवि जुए छे खुबी घणी, बीजा पण संस्कारी जेह, पीए ए प्रेमामृत तेह ' असें त्यानें निसर्गाचें वर्णन केलें आहे. प्रवासवर्णन नामक आपलें काव्य शुद्ध शांतरसपूर्ण आहे असें त्यानें म्हटलें आहे. निसर्गवर्णनाचे कांहीं मासले खालीं दिले आहेत; त्यावरून तें किती उत्कृष्ट साधलें आहे याची कल्पना येईल. नर्मदा नदीचें वर्णन त्यानें केलें आहे तें असें:— ' नर्मदा शु गाढ शोभा साजनी । हारे पवन पाणी वादळ रंगना सुसाजनी । होजीरे ॥...हारे गुलाबी घेरो तेवंग आसमानने हारे गुलाबी फुलोना पाणीनो मेदाननो । होजिरे ॥

अर्थः—नर्मदे सायंकाळच्या तुझ्या शोभेचें मी किती वर्णन करूं ? वारा, वादळाचा रंग व पाणी, यांची शोभा यासमयीं एकवटली आहे आकाशाचा रंग गुलाबी असून तुझ्या पाण्याचा रंग गुलाबाच्या फुलासारखा आहे. पर्जन्यासंबंधी वर्णन करताना नर्मदाशंकर म्हणतो ' पर्जन्यराजाचे भाट कावळे हे पर्जन्यराजाची स्वारी आली, चूप बसा चूप बसा अशी ललकारी ठोकीत आहेत, वारा हा अगदीं शांत आहे, व सर्वत्र गंभीर शांतता पसरली आहे. या देखाव्याचें यथार्थ वर्णन मी कसें करूं ? ही पहा मेघराजाची स्वारी आली. वृक्षराजींनीं आपलें डोकें त्याच्यापुढें लवविलें आहे. व अशा रीतीनें त्याचें स्वागत केलें आहे.' अशा प्रकारचे सुंदर उतारे आणखीहि देतां येतील.

निसर्गवर्णनापेक्षांहि ऐतिहासिक विषयांचें वर्णन करण्यांत त्याचें कौशल्य अधिक नजरेस येतें. विद्या, धर्म, वहेम, देशीराज, परदेशीराज, नीति इत्यादि बाबतींत हिंदुसमाजाची अधोगति चाललेली होती तिचें वर्णन 'हिंदुओनो पडती' या काव्यात केलें आहे. त्याचप्रमाणें उत्तरेकडील, व दक्षिणेकडील हिंदु राज्यांमधील प्रसिद्ध व्यक्तींची वर्णनेंहि त्यानें बहारीचीं दिलीं आहेत. गुजराथीमध्यें एक महाकाव्य लिहिण्याचा त्याचा विचार होता. हिंदुस्थानची स्थिति वर्णन करतानां तो म्हणतो ' हिंदु देशनो हाल थया छे भुंडी आजे सत्ता मोटी खोइ नीचुं ते जोटा लाजे '. ' आज हिंदुस्थानची स्थिति फार वाईट झाली आहे, त्याचें पूर्व वैभव आज नष्ट झालें आहे व लज्जेनें त्यानें मान खालीं घातली आहे.' पुराणमतवादीपणा, ब्राह्मणाचें वर्चस्व,देशी राजाचा अदूरदर्शीपणा, जातिद्वेष इत्यादि कारणामुळें हिंदुस्थानला वाईट दिवस प्राप्त झाले असें तो म्हणतोः— " विना देश अभिमान, देश उत्कर्ष न थाये । देशी धन समसान जे हवो खावा धाये । राज संबंधी ऐक्य नथी अहिंना लोकोमां । जाति बंधनो खुब जनो बाधोना मोमा " पोरसची सिकंदराविरुद्ध लढाई, महंमद गझनीच्या विरुद्ध भामदेवाची लढाई, पानपत येथें पृथ्वीराजानें घोरीशीं केलेलें युद्ध अशा प्रकारचे सहा प्रसंग त्यानें बहारीत वर्णन केले आहेत व सरतेशेवटीं ' कोनुं मोढुं मे जोयुं, अंगमा रंगरमे छे ' उछळी उछळी कोही ऐकिया खूब करे छे अर्थ, याचा ' आज सकाळीं मी कोणाचें शुभ मुख पाहिलें आहे नकळे; माझ्या नसानसातून आज अपूर्व उत्साह दाटला आहे. माझें रक्त ताज्या दमानें उसळी मारीत आहे ' असे उत्साहपूर्ण शब्द त्यानें काढले आहेत.गुजराथसंबंधींचें त्याचें राष्ट्रगीत तर आज प्रत्येकाच्या तोंडीं आहे. व तें अत्यंत स्फूर्तिदायक आहे. 'जय जय गरवी गुजराथ । जय जय गरवी गुजराथ । दीपे आणुं प्रभात । ध्वज प्रकाशे झळळळ कसुंबी प्रेमशौर्य अकीत। तूं भणव भणव निज संतति सहने प्रेम भक्तिनी रीत " अशा स्फूर्तिदायक रीतीनें या गीताचा प्रारंभ झालेला आहे. सुरतेच्या प्राचीन वैभवावरील त्याची कविता अशीच स्फूर्तीनें नटलेली आहे. धर्मविषयावरील त्याचीं काव्येंहि भक्तिपूर्ण सरसच आहेत.

वर्ड्स्वर्थचे ' वुइ आर सेव्हन' 'ल्युसी ग्रे' व रावर्ट सौदेचें ' लार्ड नेलसन, हीं तीन काव्यें त्यानें भाषांतरिलीं आहेत. याशिवाय प्रेमसंबंधी त्यानें कांहीं कविता लिहिण्याचाहि

प्रयत्न केला. सामाजिक सुधारणेसंबंधीं त्याचीं काव्येंहि फार बोधपर आहेत त्याच्या प्रीतिसंबंधच्या काव्यात, दिव्य प्रेमापेक्षा,शारीरिक प्रेमासंबंधींचेंच वर्णन केलेलें जास्त आढळतें.

नर्मदाशंकराच्या मापेंत प्रसाद आढळून येत नाहीं. दलपतरामच्या काव्यात जो स्वाभाविकपणा आढळतो, तो याच्यात आढळून येत नाहीं अश्लील भाषा याच्या काव्यात पदोपदीं आढळून येते नरसरामानें त्याच्या काव्याची फार स्तुति केलेली आहे पण त्यात अतिशयोक्ति आहे राव बहादूर रमणभाईनीं त्याच्या काव्याविषयीं जे उद्गार काढले आहेत ते अधिक समर्पक आहेत ते म्हणतात " नर्मदा-शंकरची कविता भावप्रधान आहे काहीं प्रसगीं त्याची कल्पनागति अप्रतिहत आहे तर काहीं ठिकाणीं फारच मर्या-दित आहे त्याच्या भावनामध्यें नाविन्याची छटा फारशी आढळत नाहीं "

याशिवाय नर्मदाशंकरानें लिहिलेला नर्मकोश व नर्म-कथासंग्रह हे ग्रंथ फारच महत्वाचे आहेत व यामुळें त्यानें आपलें नाव गुजराथी वाङ्मयात अजरामर करून ठेवलें आहे त्याचा कोश १८२७ मध्यें प्रसिद्ध झाला

नर्मदाशंकराच्या अनुयायात सवितानारायण हा मुख्य होय. त्याचा ' सविताकृत कविता ' हा काव्यसंग्रह बऱ्यापैकीं आहे. पण त्याहिपेक्षा त्यानें प्रसंगोपात्त ज्या कविता केल्या आहेत त्या अधिक चांगल्या आहेत याशिवाय अलंकार चंद्रिका व नीतिसुधातरंगिणी हे त्याचे ग्रंथहि बरे आहेत. विजयशंकर त्रिवेदि यांचें ' विजयवाणी ' हें काव्य त्याच काळीं प्रसिद्धि पावलें पण हल्लीं तें मागें पडलें आहे. कवि हिराचंद कानजी हा नर्मदाशंकराच्या काळचा कवि होता. नर्मदाशंकरापेक्षा आपला दर्जा श्रेष्ठ आहे असें याचें मत होतें त्याचें मिथ्याभिमानमतखंडन हें काव्य बऱ्यापैकीं आहे नर्मदाशंकराला काव्याचें ज्ञान करलेंच नाहीं असे तो म्हणत असे व नर्मदाशंकराच्या पिंगलप्रवेश, अलंकार प्रवेश, रसप्रवेश इत्यादि ग्रंथावर त्यानें फार टीका केली आहे स्वतः यानें, 'गुजराथी अनेकार्थकोश, ' ' सुधरेल शास्त्र, ' ' गुजरातनी गागई,' ' भाषाभूषण ' ' मानमंजरी,' ' वैराग्यबोध, ' इत्यादि काव्यें लिहिलीं आहेत

भोलानाथ साराभाई—रावबहादुर भोलानाथ साराभाई या कवींचें नाव त्याच्या भक्तिपर काव्याबद्दल फार प्रसिद्ध आहे हे प्रार्थनासमाजिष्ट होते. गुजराथमध्यें जे सगुणोपासनेचें प्रस्थ माजलें होतें तें कमी करण्याचा व एकेश्वरी पंथाचा प्रसार करण्याचा यांनीं प्रयत्न केला यांचें ईश्वरप्रार्थनामाला हें काव्य फारच उत्कृष्ट आहे त्यामध्यें भोलानाथाचा भोळाभाव व परमेश्वरासंबंधीं अनन्य भक्ति हे गुण दिसून येतात ईश्वरप्रार्थनामालेंतील त्याचीं गीतें गातांना अंतःकरण भक्तिमय व तल्लीन होतें त्याचीं पदें अर्थगंभीर व रसपूर्ण असतात त्याच्या पदाचे कित्येक मासले पुढें दिलेले आहेत :—

' दिननो दयाल छोडी थोने शरण जाऊ । मात तात जाणी प्रभुचरण प्रते धाऊ ' तसेंच ' विधाता धन्य छे तारी रचना जगतनी अनंत । अतर्क्य अगोचर रूप तमारुं । व्यापी रह्या सत्ता थको भगवंत ॥' ही ईश्वरीप्रार्थनामाला गुजरा-थमध्यें अतिशय लोकप्रिय आहे

कलापी (१८७४–१९००)—कलापी या टोपण नांवा-खालीं प्रसिद्ध असलेले कवी हे काठेवाडमधील लाठी देशचे ठाकोरसाहेब श्री सूरसिंहजी तख्तसिंहजी गोहिल हे होत याचे शिक्षण राजकुमार कॉलेजमध्यें झालें नंतर त्यांनीं हिंदुस्थान व काश्मीर येथें प्रवास केला. १८९५ मध्यें ते गादीवर बसले. त्याना १६ व्या वर्षी दोन बायका होत्या त्यापैकीं रमा ही आवडती बायको होती हिच्या दासी-जनात एक सहासात वर्षांची दासी होती. हिनें कलापीचें मन आकर्षण करून घेतलें होतें. हिचें शोभना असें नांव त्यानी ठेवलें होतें ही वयात आल्यावर तिचें त्यानीं लग्न करून दिलें पण शोभनेचें आपल्या नवऱ्यावर प्रेम नव्हतें कलापीचें तर हिच्यावर अलोट प्रेम होतें. तेव्हा प्रेमाच्या पाशात सापडून जनापवादाला न भिता त्यानीं तिच्याशीं उघडपणें विवाह केला या कृत्याचा फार वाईट परिणाम होणार ही गोष्ट ते जाणून होते हृदयत्रिपुटी नामक आपल्या प्रणय-काव्यात त्यानीं आपला व शोभना व रमा याचा संबंध कशा प्रकारचा होता हें सांगण्याचा प्रयत्न केला आहे. या काव्यातील प्रेम उच्च तरुणाच्या प्रेमाच्या स्वरूपाचें आहे.

लहानपण पासून इंग्लिश, संस्कृत, उर्दू व गुजराथी वाङ्मय याचा त्यानीं अभ्यास चालू ठेवला होता. काव्य व तत्वज्ञान यांच्याकडे त्याचा फार ओढा असे. शेले, वर्डस्वर्थ, इमर्सन, स्वीडनबर्ग हे त्याचे आवडते ग्रंथकार होते व त्याच्या काव्यात या ग्रंथकारांच्या ग्रंथातील कल्पना जागोजागीं आढळतात संस्थानातील कारस्थानाची त्याना फार चीड असल्यामुळें ते या कारस्थानापासून नेहमीं अलिप्त रहात. गोवर्धनराम त्रिपाठी, मणिलाल द्विवेदी, मणिशंकरभट यांच्यासारख्या विद्वानाशीं सहवास घडविण्यात त्याना नेहमीं आनंद वाटे. ते या विद्वानाशीं नेहमीं पत्रव्यवहार करीत मोठेपणीं त्याना संसाराचा अगदीं वीट आला होता व आणखी काहीं काल ते जगले असते तर त्यानीं गादीचा त्याग करून वानप्रस्थाश्रम पत्करिला असता असें पुष्कळांचें म्हणणें आहे

कलापींच्या प्रणयकवितांना ' प्रणयगीता ' असें एका ग्रंथकारानें नाव दिलें आहे याच्या प्रणयसंबंधी कविता, उर्दू कवींच्या गझल वृत्तात रचिलेल्या आहेत व या उर्दू कवींची प्रेमगीताची छटा याच्या काव्यात दिसून येते. ' कमलिनी ' हें काव्य शेलेच्या ' मेघ ' या कवितेच्या धर्तीवर आहे उर्दू कवींच्या विशेषत शफी कवींच्या कविता कलापीनें भाषांतर केल्या आहेत व त्या बऱ्या साधल्या आहेत काश्मी-रच्या प्रवासाच्या वर्णनपर काव्य फारच उत्कृष्ट साधलें

आहे. याचें हमीरकाव्य हें ऐतिहासिक प्रसंगावरील काव्यहि सुंदर आहे. शुद्ध गुजराथींतील कलापीचें काव्य, मिश्र गुजराथी भाषेंतील त्याच्या कवितांपेक्षां सरस आहे. यांची प्रेमासंबंधींची कांहीं कडवीं गुजराथी लोकांत फार लोकप्रिय झालीं आहेत. यांची कीट्स कवीशीं नेहमीं तुलना करण्यात येते. कांहीं विद्वान याची शेले कवीशीहि तुलना करतांना आढळतात पण त्यांत बरीच अतिशयोक्ति आहे. कलापीच्या गझलाप्रमाणेंच पुष्कळच गुजराथी कवींनीं गझलें रचण्याचा प्रयत्न केला आहे, पण त्यात त्यांना जितकें यश याचें तितकें आलें नाहीं.

प्रो. मणिलाल द्विवेदीः—यांनीं काव्यापेक्षां गद्यवाङ्मयांत आपलें नांव गाजविलें. तरी पण त्यांचें काव्यहि श्रेष्ठ दर्जाचें आहे. त्यांच्या कवितेंत वेदांत भरलेला आहे. आत्मनिमज्जन, अभेदोर्मि, प्रेमजीवन इत्यादि त्यांच्या तत्त्वज्ञानात्मक कविता प्रसिद्ध आहेत. याशिवाय 'कहीं लाखो निराशामां अमर आशा छुपाई छे' हें त्याचें गझल फार लोकप्रिय आहे.

बलशंकरः—मणिलाल द्विवेदी याच्यापेक्षां बलशंकर याचें काव्य अधिक सरस आहे. त्यांतल्या त्यात त्याचीं गझलकाव्यें उत्कृष्ट आहेत. यानें हाफीजचीं कांहीं गझल भाषांतरें केलेलीं आहेत.

गोवर्धनराम त्रिपाठीः—हा सुप्रसिद्ध विद्वान असून त्याची काव्यापेक्षां गद्याबद्दलच अधिक प्रसिद्धि आहे. त्याचें स्नेहमुद्रा हें काव्य चांगलें आहे. याशिवाय इतर पुष्कळ कविता त्यानें लिहिल्या आहेत. आपल्या गद्यकादंबऱ्यांत मधून मधून त्यानें कविता गुंतवून दिली आहे व ती कविताहि फार सुंदर आहे.

देरासरी या कवीचें 'बुलबुल' नामक गझल अतिशय प्रसिद्ध आहे. हरिलाल ध्रुव या कवीचीं, आर्योत्कर्ष, पूर्वामेघ, कीमोदिमाधव इत्यादि काव्यें लोकप्रिय आहेत. याच्या काव्यांत ज्वलद्देशाभिमान दिसून येतो. याच्या काव्यानें गुजराथी भाषेंत बरेंच वरचें स्थान पटकावलेलें आहे.

या शतकांत पारशी कवीहि पुष्कळच उदयास आले. मेरवानजी शापूरजी या कवीचा कवितासंग्रह फारच मोठा आहे. शोराब आणि रुस्तुम यांच्यामधील युद्धावरील काव्य, फार सुंदर असून तें वाचलें असतां डोळ्यांतून अश्रू न येणारा वाचक विरळाच सापडेल. याच्या काव्यावर दलपतरामच्या काव्याची छाप पडलेली दिसते. फरदुनजी मर्झबानजी यांचाहि काव्यसंग्रह मोठा आहे. यांनीं सादीच्या गुलिस्ताननें 'फुलेस्तान पोथी' या काव्यात भाषांतर केलेलें आहे. जमशेटजी पेटिट हे विशेषतः त्यांच्या निर्यामक कवितांबद्दल प्रसिद्ध आहेत. 'मोहरी मडोह तथा बीजी कविताओ' या त्यांच्या काव्यसंग्रहात पुष्कळ चांगल्या कविता आढळतात. बहिरामजी मलबारी यांचें 'नीतिविनोद' हें काव्य उत्तम आहे. यांत तरुण विधवांच्या स्थितीवर, व जरठतरुणी विवाहांवर पुष्कळ कविता लिहिलेल्या आढळतात. याशिवाय विरसनाविरुद्ध, अनुभविक, संसारिक इत्यादि त्यांचीं काव्यें फारच लोकप्रिय झालीं आहेत. खबरदार या कवीचीं, काव्यरसिका, विलासिका, प्रकाशिका, भारतनो टंकार हीं काव्यें प्रसिद्ध आहेत. यानें 'गुणवंती गुजराथ' नामक एक राष्ट्रगीत लिहिलें असून तें 'वंदे मातरम्' या राष्ट्रीय गीताच्या तोडीचें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. याचें काव्य मुख्यतः भावनाप्रधान असल्याचें आढळतें. हमनजी फरोज (१८८८—१९२०) याची कविता फार थोडी आहे पण याच्या काव्यांतील प्रत्येक ओळींत त्याचें फारशी काव्यावरील प्रभुत्व दिसून येतें. त्याचें 'सरोष राहत' हें काव्य प्रसिद्ध आहे.

नरसिंहराव दिवेटिया यांनीं गुजराथी कवितेला नवीन प्रकारचें स्वरूप प्राप्त करून दिलें म्हटलें तरी चालेल. हे गुजराथी भाषेंतील एक जाडे विद्वान होत. कुसुममाला हें त्यांचें पहिलें काव्य होय. यांत निरनिराळ्या विषयांवरील भावगीतांचा संग्रह आहे. या गीतांतील निसर्गवर्णन फारच बहारीचें आहे. 'हृदयवीणा' या कवितासंग्रहांत त्यांची विशाल कल्पना व हृदयाची तळमळ हे गुण प्रामुख्यानें दिसून येतात. याच्या काव्यावर पाश्चिमात्य कवींची छाप फार पडली आहे असा आक्षेप घेण्यांत येतो पण तो खरा नाहीं. नूपुरझंकार, स्मरणगीता हीं त्याचीं काव्यें फारच उत्कृष्ट आहेत. रावबहादूर कांतवाला यांचें पानिपत काव्य काव्यदृष्ट्या विशेष श्रेष्ठ दर्जाचें नसलें तरी त्यांतील भाषा जोरदार व भारदस्त आहे. मणिशंकरभट यांचीं 'वसंत विजय' व 'चक्रवाकमिथुन' हीं काव्यें विशेष प्रसिद्ध आहेत.

पण हल्लींचे सर्वांत उत्कृष्ट कवि म्हणजे नानालाल दलपतराम हे होत. यांचें 'जय व जयंत' हें नाटक फारच उत्कृष्ट आहे. त्याच्या काव्यांत नवनिच तत्त्वें प्रतिपादन केलेलीं आढळतात. काव्यदृष्ट्या यांचीं काव्यें उच्च दर्जाचीं आहेत. यांचीं भावगीतें बादाच्या साहाय्यानें गाता येण्यासारखीं आहेत. दिल्लीदरबारच्या वेळीं बादशहा येथें आले असतांना त्याच्यावर एक सुंदर स्वागतपर पद्य यांनीं रचलें आहे. याशिवाय त्याचीं 'ग्राम गीतें' कल्पनाप्रचुर, रसपूर्ण व प्रासादिक आहेत. यांनीं भगवद्गीतेचें कवितावद्ध भाषांतर केलें आहे.

नानालालशिवाय हल्लीं दौलतराम पंड्या, भीमराव, जयशंकर बच, रमणभाई निलकंठ हेहि नावाजलेले कवी आहेत. कवयित्रींमध्यें सुमतीबाई ही लल्लुभाई सामळदास यांची कन्या प्रसिद्ध आहे. हिचें 'दिव्यमेघराळसालक' हें काव्य फार हृदयस्पर्शी आहे. ही कवयित्री अधिक वर्षे जगली असती तर हिनें आपलें नाव केलें असतें; पण ती तरुणपणींच मृत्युमुखीं पडली. विद्यालक्ष्मी हिचें 'प्रेम-याचना' नांवाचें एक काव्य आहे. यात स्त्रियांच्या पतिव्रताधर्मावर हिनें आपले विचार प्रगट केलेले आहेत.

सारांश, दयारामानंतरच्या काळांतील काव्यसृष्टींत दलपतराम व त्याचा संप्रदाय व नर्मदाशंकर व त्याचा संप्रदाय हे प्रमुख सांप्रदाय होत. याशिवाय नरसिंहराव दिवेटिया व नानालाल या कवींनी निर्माण केलेला तिसरा संप्रदाय होय. हे तिन्ही संप्रदाय आपापल्या परीनें श्रेष्ठ असून त्यांनीं गुजराथी काव्याला श्रेष्ठ प्रकारचें स्वरूप आणून दिलें आहे यांत शंका नाहीं.

काठेवाडमध्यें एक स्वतंत्र प्रकारचें वाङ्मय आपल्याला दृष्टीस पडतें. तशा प्रकारचें वाङ्मय, गुजराथी वाङ्मयामध्यें आढळून येत नाहीं या वाङ्मयाचें नाव दुहावाङ्मय असें आहे. या दुहावाङ्मयाची भाषा गुजराथीहून निराळी आहे. या वाङ्मयांत तत्कालीन काठेवाडी समाजाचें प्रतिबिंब फार उत्तम न्हेंनें दृष्टीस पडतें हें दुहावाङ्मय संकलित करण्याचा अद्यापि व्हावा तसा प्रयत्न झाला नाहीं ही मोठ्या दुःखाची गोष्ट होय दुहा याचा अर्थ कडवें कडव्यामध्यें हीं काव्यें लिहिलीं गेल्यामुळें त्यांना दुहावाङ्मय हें नाव पडलें. या दुहावाङ्मयामध्यें, लिहिलेल्या काव्यांत हलामन जेठवा, उजली व मेहा, राणकदेवी, सिद्धराज, इत्यादि विषयावर लिहिलेलीं काव्यें फार प्रसिद्ध आहेत. हीं काव्यें फार सुंदर असून तीं तेजस्वी भाषेंत लिहिलेलीं आहेत.

गु ज रा थी ग द्य वा ङ्म य.—ब्रिटिशांनीं हिंदुस्थानांत शिक्षणाचा प्रसार करण्यापूर्वी गुजराथी भाषेंत गद्यवाङ्मयाचा जवळ जवळ अभावच होता असें म्हटलें तरी चालेल. गुजराथमधील शिलालेख, ताम्रपट, सनदा, गहाणखतें इत्यादींमध्यें जे कांहीं गद्य भाग सांपडतील तेवढेच. याशिवाय नाहीं म्हणावयाला मंत्रतंत्र अगर हितोपदेश यामधील कांहीं भागाचें भाषांतर झालेलें दृष्टीस पडतें. बाणाची कादंबरी मूळ संस्कृतांत गद्यामध्यें असून तिचें गुजराथीमधील भाषांतर पद्यावें तो कवितेमध्यें झालेलें आढळतें. अशी स्थिति १८५० च्या पूर्वी होती. पुढें १८५० नंतर रणछोडदास, गिरिधरभाईसारख्या कांहीं गुजराथी गृहस्थांनीं व कांहीं पारशी गृहस्थांनीं शालोपयोगी अशीं पुस्तकें लिहिण्यास सुरवात केली. अर्थातच हीं पुस्तकें गद्य होतीं व त्यामधील भाषा अगदीं सोपी असे. हीं पुस्तकें गुजराथी भाषेंत गद्यवाङ्मय तयार करण्याच्या हेतूनें झालेलीं नसून शाळेंतील विद्यार्थ्यांसाठीं म्हणून तीं लिहिलीं गेलीं होतीं. कांहीं मिशनऱ्यांनींहि गुजराथीमध्यें बायबल वगैरे ग्रंथाचें भाषांतर केलें होतें.

गुजराथीमध्यें गद्य लिहिण्यास खरी सुरवात नर्मदाशंकर यानें केली असें म्हणण्यास हरकत नाहीं. नर्मदाशंकर हा ज्याप्रमाणें चांगला कवि होता त्याचप्रमाणें तो उत्तम गद्यलेखक होता त्यानें इतिहास, तत्त्वज्ञान, धर्म इत्यादि विषयावर गद्य ग्रंथ लिहिले. त्याची भाषा साधी पण मुद्देसूद व जोरदार असे. त्याच्या भाषेंत क्लिष्ट शब्दरचना व [illegible]र आढळून येत नाहीं. संस्कृत भाषेचा त्यानें जरी खोल अभ्यास केला होता तरी त्यानें गुजराथी गद्यांत संस्कृत शब्द न कोंबण्याची शक्य तितकी खबरदारी घेतली होती त्याचा सर्वांत प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे 'राज्यरंग' हा होय. हा ग्रंथ ऐतिहासिक आहे या राज्यरंग ग्रंथांत त्यानें जगांतील प्रमुख राष्ट्रांचे इतिहास लिहिले आहेत. या ग्रंथांत त्यानें प्राचीन ग्रीसमधील महान पुरुषांनीं केलेलीं पराक्रमाचीं कृत्यें त्याचप्रमाणें बाबिलोनिया, ईजिप्त, रोम, ग्रीस, पर्शिया, या राष्ट्रांतील विभूतींचीं चरित्रें वर्णनें केलीं आहेत. आपल्या इकडील राम, लक्ष्मण, संग, प्रताप इत्यादि महापुरुषांचींहि चरित्रें या ग्रंथांत आलेलीं आहेत या ग्रंथाची भाषा भारदस्त, सोपी पण सुंदर आहे. नर्मदाशंकरनें या राज्यरंगानंतर जो धर्मविचार नावाचा ग्रंथ लिहिला त्यामधील भाषा सोंचदार, गंभीर व मर्मभेदक आहे त्यानें आपल्या ग्रंथाला 'नर्मगद्य' असें नाव दिलें आहे.

पण नर्मदाशंकरपेक्षांहि गुजराथीमधील गद्यभाषेला ओजस्वी वळण लावण्याचें श्रेय, नवलराम यासच आहे. किंबहुना नवलरामाच्या तोडीचा दुसरा गद्यलेखक, अद्यापिहि झाला नाहीं असें म्हणण्यास फारसा प्रत्यवाय नाहीं. यानें नर्मदाशंकरचें चरित्र लिहिलें आहे. नर्मदाशंकर या कवीच्या चरित्रांतील भाषेमध्यें यत्किंचितहि कृत्रिमपणा आढळून येत नाहीं त्याचा दुसरा ग्रंथ म्हणजे 'इंग्लिश लोकांचा इतिहास' हा होय. गुजराथी भाषेंत इंग्लिश लोकांचे इतिहास पुष्कळांनीं लिहिले आहेत. पण त्या सर्वांत नवलरामानें लिहिलेला इतिहास उत्कृष्ट आहे.

पण नवलरामाची प्रसिद्धि त्यानें केलेल्या निरनिराळ्या ग्रंथाच्या परिक्षणामुळें झालेली आहे. त्यापूर्वी गुजराथमध्यें वाङ्मयासंबंधीचें मार्मिक परीक्षण करणारे विद्वान् नव्हते म्हटले तरी चालेल नवलरामाच्या नंतर मणिलाल द्विवेदी, मनसुखराम त्रिपाठी, नृसिंहराव दिवेटिया व प्रो. ध्रुव इत्यादि प्रसिद्ध परीक्षणकार झाले. तथापि या सर्वांहूनहि परीक्षणाच्या बाबतींत नवलराम हा श्रेष्ठ आहे. करण घेलो, कांता इत्यादि ग्रंथाचें त्यानें केलेलें परीक्षण फारच मार्मिक व मुद्देसूद आहे इंग्लिश काव्याचा खोल अभ्यास त्यानें केलेला नव्हता. तथापि त्यानें केलेलें काव्यग्रंथाचें परीक्षण नेहमीं मार्मिक असे. नवलरामाची भाषा व लेखनपद्धति स्फूर्तिदायक व परिणामकारक आहे. पण ज्याप्रमाणें नर्मदाशंकर, दलपतराम व नवलराम यांची भाषा शास्त्रशुद्ध व सुलभ अशी आढळून येते तशी नवलरामाच्या नंतरच्या परीक्षणकारांची आढळून येत नाहीं. त्याच्यानंतरच्या टीकाकारांची भाषा क्लिष्ट असून तीमध्यें संस्कृत शब्दांचा भरणा फार असे. त्यामुळें हीं परीक्षणें सालच्या वर्गांतील लोकांना समजण्याला अवघड जाऊं लागलीं याचा परिणाम असा झाला कीं, नवलरामानंतरच्या टीकाकारांनीं गुजराथी भाषेला जें बोजड वळण लावलें तें वळण पारशी लोकांनीं अनुसरण्यास मद आर्म

लागलें त्यामुळें साहजिकच पारशांच्या गुजराथी भाषासरणींत व या नूतन भाषासरणींत बरीच तफावत पडूं लागली या नूतन भाषासरणीला 'हिंदुगुजराथी' व पारशांच्या भाषासरणीला 'पारशीगुजराथी' असें संबोधण्यात येऊं लागलें. या नवीन भाषापद्धतीचे प्रमुख पुरस्कर्ते गोवर्धनराम त्रिपाठी, मणिलाल मनसुखराम त्रिपाठी व छगनलाल पंड्या हे होत. यांच्या भाषेंत संस्कृत शब्दांचाच अधिक भरणा आढळतो.

नवलरामानें आपल्या 'संस्कृतमय गुजराथी' या निबंधात अशा प्रकारच्या संस्कृतप्रचुर भाषापद्धतीवर बरेच कोरडे ओढले आहेत. संस्कृतभाषेंतील शब्द मुळींच गुजराथीमध्यें येऊं नयेत असें त्याचें म्हणणें नव्हतें. पण नेहमीं व्यवहारात लागणाऱ्या वस्तूंना गुजराथींत सोपा शब्द असताना मग तो दुसऱ्या भाषेंतून कां आलेला असेना मुद्दाम संस्कृतांतील अगडबंब वापरण्याच्या तो अगदीं विरुद्ध असे. गुजराथीमध्यें रूढ झालेले संस्कृत शब्द वापरले असताना देखील ज्यांची लेखनपद्धति अगदीं सुलभ असते असे ग्रंथकार म्हणजे रावबहादूर भोलानाथ सारभाई हे होत.

या संस्कृतमय गुजराथी भाषासरणीविरुद्ध बंड म्हणून रावबहादूर, हरगोविंददास कांटावाला यांनीं प्राकृत गुजराथी भाषा वापरण्यास सुरवात केली. 'अंधेरी नगरीनो गर्धवसेन' या कादंबरीला लिहिलेल्या प्रस्तावनेंत ग्राम्य गुजराथी भाषा वाङ्मयात प्रचारात आणणें अत्यावश्यक आहे, तसेंच गुजराथी भाषेची श्रीमंती वाढविण्यास गुजराथमधील निरनिराळ्या प्रांतांतील रूढ झालेल्या शब्दांचा वाङ्मयात उपयोग करण्यांत येणें जरूर आहे असें त्यांनीं म्हटलेलें आहे.

रावसाहेब महीपतराम रूपराम यांची भाषा दलपतराम प्रमाणेंच सुबोध व शुद्ध असते. पण ती अभिजात नसते. त्यांच्या ग्रंथांत सुंदर कल्पनांचा व समर्पक अलंकारांचा पूर्णपणें अभाव दिसून येतो. उत्तम ग्रंथकाराला लागणारी प्रतिभा यांच्या ग्रंथांत दिसून येत नाहीं.

वृत्तपत्रें व नियतकालिक वाङ्मय.—वर ज्या दोन भिन्न भाषासरणींचा उल्लेख करण्यात आलेला आहे त्यांचें प्रतिबिंब गुजराथी वृत्तपत्रें व मासिकें यांमध्येंहि दृग्गोचर होतें. मुंबईमध्यें पारशी लोकांनीं जीं वृत्तपत्रें व साप्ताहिकें चालविलेलीं आहेत त्यांमधील भाषापद्धति ही गुजराथी लोकांनीं चालविलेल्या वृत्तपत्रांतील भाषापद्धतीहून निराळ्या स्वरूपाची आहे. पहिल्या प्रकारच्या भाषापद्धतीला 'मुम्बाइगिरी गुजराथी' असें विशिष्ट नांव रूढ झालें आहे. मुम्बाइगिरी गुजराथी ही साधी व जुन्या गुजराथी भाषेच्या वळणावर असलेली आढळते. त्याच्या उलट 'हिंदुगुजराथी' ही संस्कृतप्रचुर व बोजड अशा प्रकारची आहे. शिवाय इंग्लिश भाषेच्या शिक्षणाचा प्रसार झाल्यापासून एक तिसरीच भाषापद्धति प्रचारात येऊं लागली आहे. पण अलीकडे कांहीं वर्षांत इंग्लिश तऱ्हेनें विचार करण्याची जी अनिष्ट पद्धत आढळते तिच्या विरुद्ध चळवळ दृष्टोत्पत्तीस पडूं लागली आहे. पण इंग्लिश भाषेच्या ऐवजीं गुजराथी भाषा शिक्षणाचें माध्यम होईपावेतों वरील अनिष्ट पद्धतींत ताबडतोब फरक करणें शक्य नाहीं असें वाटतें. अलीकडील ग्रंथकारामध्यें संस्कृतप्रचुर गुजराथी भाषा लिहिण्याची जी पद्धत रूढ झालेली आहे तिला महात्मा गांधी व त्यांच्या कक्षेंत असणाऱ्या त्यांच्या अनुयायांनीं पहिला धक्का दिला असें म्हणावयास हरकत दिसत नाहीं. गांधींच्या साध्या, स्पष्ट, व परिणामकारक भाषापद्धतीची छाप तरुण लेखकांच्या मनावर बसली. साधा विचार सुद्धां अगडबंब भाषेंत व्यक्त करण्याची पूर्वीची अनिष्ट पद्धत या नवीन लेखकांनीं टाकून देण्यास सुरवात केली व गांधींच्या भाषापद्धतीचा अवलंब करण्यास सुरवात केली. गांधींनीं अशा प्रकारें गुजराथी भाषेला नवीन वळण लावलें म्हटलें तरी चालेल. नवजीवन कार्यालयातर्फे राष्ट्रीय विषयासंबंधीं बरींच पुस्तकें प्रसिद्ध झालीं व गांधींच्या निरनिराळ्या क्षेत्रांतील कामगिरीचें विवेचन करणारीं पुस्तकें लिहिलीं गेलीं. गांधींचे प्रसिद्ध पट्टशिष्य महादेव भाई देसाई, काका कालेलकर यांनीं असहकारितेच्या चळवळींत जे निरनिराळे लेख लिहिले, ते एकत्र करून छापण्यात आले आहेत.

कादंबरी वाङ्मय.—गुजराथमध्यें कादंबरी वाङ्मय इंग्लिश शिक्षण अमलांत आल्यानंतर निर्माण होऊं लागलें. कादंबरीला गुजराथींत नवलकथा हें नांव आहे. या वाङ्मयाचा जनक नंदशंकर मुळजीशंकर हा होय. १८६८ मध्यें याची 'करणघेलो' ही ऐतिहासिक कादंबरी प्रथम प्रसिद्ध झाली. तींत तत्कालीन समाजस्थितीचें वर्णन, दसरा वगैरे सण कसे पाळले जात होते यांचें वर्णन, माधवाच्या राजवाड्याचें वर्णन इत्यादि वर्णनें सुंदर आहेत. करणघेलो ही कादंबरी अद्यापिहि लोकप्रिय आहे. गुजराथ व काठेवाड या राष्ट्रांत पुष्कळ वीर पुरुष निर्माण झाले. त्यांनीं केलेलीं पराक्रमाचीं कृत्येंहि स्फूर्तिदायक आहेत. या सर्व कथांचें एकीकरण करून फ्रामजी बोमनजी नांवाच्या पारशी कादंबरीकारानें 'गुजराथ अने काठीवाड देशनी वार्ताओ' नांवाचा एक ग्रंथ १८७५ त प्रसिद्ध केला. यांतील गुजराथी भाषा शुद्ध व सुबोध आहे. अशाच प्रकारचा 'गुजराथी वार्ताओ' हा ग्रंथ मणिलालभट यानें लिहिला. यांत पृथ्वीराज चव्हाण, झांशीची लक्ष्मीबाई इत्यादि पुरुषांचीं व स्त्रियांचीं चरित्रें आलीं आहेत. रावसाहेब महिपतराव यांच्या 'वनराज चवडो' व 'सिद्धार्थ जयसिंग' या कादंबऱ्याहि फार प्रसिद्ध आहेत. यांतील भाषा उत्तम नसली तरी सुबोध आहे. अनंतप्रसाद वैष्णव यांची 'राणकदेवी' ही कादंबरीहि चांगली आहे. रावबहादूर

कानवाला याची 'अंधेरी नगरीनो गर्धवसेन, एक उदंग वार्ता' हिला कादंबरीपेक्षा कथासंग्रह हेंच नांव अधिक शोभेल. यांत ग्रांतिक शब्दांचा भरणा पुष्कळ असून ग्राम्य शब्दांचा भरती आहे. नलेयारखान नांवाच्या पारशी ग्रंथकाराच्या रत्नलक्ष्मी व मुद्रा आणि कुलिन या कादंबऱ्या फार लोकप्रिय आहेत. यांतील पात्रें उत्कृष्ट रंगविलीं गेलीं असून भाषाहि शुद्ध व जोरदार आहे. इच्छाराम देसाई याच्या 'गंगा' कादंबरीत शिवाजीनें केलेल्या सुरतेच्या लुटालुटीचें वर्णन आलें आहे. इच्छाराम देसाई यांनीं स्वतः लिहिलेल्या कादंबऱ्यांपेक्षा त्यांनीं गुजराथी प्रिंटिंग प्रेस काढून, आपल्या छापखान्यातर्फे कादंबरीकारांकडून कादंबऱ्या लिहून घेऊन त्या दरवर्षी आपल्या ग्राहकांना बक्षीस देण्याच्या निमित्तानें छापून काढल्या व कादंबरीकारांना उत्तेजन दिलें यामुळें त्यांचें नांव कादंबऱ्यांच्या इतिहासांत अमरामर राहील. त्याच्या छापखान्यातर्फे हिंदु अने ब्रिटानिया, दिल्ली-पर हल्लो, चाणक्य नंदीनी, नूरजहान, चक्रवर्ती हमीर इत्यादि लोकप्रिय कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. इच्छारामाचें अनुकरण अहमदाबादेच्या प्रजाबंधु व गुजराथी पंच या वृत्तपत्रांनीं केलें आहे, व त्यांनीं पुष्कळ ऐतिहासिक कादंबऱ्या प्रसिद्ध केल्या आहेत. पण हल्लीं गुजराथी भाषेंतील कादंबरीवाङ्मयामध्यें पहिल्या प्रतीचा कादंबरीकार या नात्यानें ज्याला संबोधितां येईल असा कादंबरीकार कन्हैयालाल मुनशी हा होय. हा प्रथम घनश्याम या टोपण नांवाखालीं पुष्कळ कथा लिहीत असे. त्याची 'पाटणनी प्रभुता' ही पहिला ऐतिहासिक कादंबरी प्रथम टोपणनांवाखालींच एका साप्ताहिकांत प्रसिद्ध झाली. ही कादंबरी फारच लोकप्रिय झाली. लगेच गुजरातनो नाथ ही त्याची दुसरी कादंबरीहि प्रसिद्ध झाली. थोड्याच कालानंतर वाचकांच्या आग्रहावरून पृथ्वीवल्लभ ही तिसरी कादंबरीहि त्यानें लिहिली. यापूर्वी गोवर्धनराय त्रिपाठी याची सरस्वतीचंद्र ही कादंबरी फार लोकप्रिय होती. पण मुनशीनें आपल्या कादंबऱ्या प्रसिद्ध केल्यापासून सरस्वतीचंद्र ही कादंबरी मागें पडली. मुनशीच्या कादंबऱ्यांतील पात्रांचीं स्वभाववर्णनें हुबेहूब साधलीं असून त्यांतील कथानकाचा विकास, स्वाभाविकतेनें झालेला आहे. निरनिराळ्या प्रसंगाचीं अनुरूप वर्णनें करण्यांत याचा हातखंडा आहे. त्याची भाषा जोरदार, भेदक व वस्तुस्थितिनिदर्शक अशी आहे.

गोवर्धनराय त्रिपाठीची सरस्वतीचंद्र ही कादंबरी म्हणजे एक ज्ञानकोशच आहे म्हटलें तरी चालेल. हिचे ४ भाग असून त्यांत राजकीय, सामाजिक, ऐतिहासिक व तात्त्विक विषयांचीं सुरस वर्णनें आलीं आहेत. ही कादंबरी आदर्शभूत झाली आहे यांत शंका नाहीं. यांतील भाषा नमुनेदार असून ओजस्वी व प्रतिभासंपन्न आहे. गुजराथचा बंकिमचंद्र गवर्धनराम असें याला संबोधण्यांत येतें.

याशिवाय मोर्गदलाल द्विवेटिया यांच्या अलक्ष्यज्योति (१९०७) मधुकर, पद्मनाभ (१९०८), ज्योतिर्पुंज (१९०९), प्रियमाता इत्यादि कादंबऱ्या, तसेंच गिरिधरलाल कोठारी याची 'नवी प्रजा' कृष्णराव दिवेटियारचित मुकुलमर्दन, राजेंद्रदलरचित विपिन आणि मोगल संध्या, चंद्रशेखर पंड्यारचित 'पात्र प्रेमकथा' या कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. गुजराथी कादंबरीवाङ्मयांत भाषांतरित कादंबऱ्यांचा भरणाच अधिक आहे.

गुजराथी नाट्यवाङ्मय—गुजराथी वाङ्मयांत नाट्यवाङ्मयाची स्थिति फार शोचनीय आहे म्हटलें तरी चालेल. अलीकडे गुजराथींमध्यें जरी थोडीफार चांगलीं नाटकें प्रसिद्ध झालीं आहेत तरी त्यांची संख्या अल्प आहे. एकंदर गुजराथी नाटकांतील संख्या शंभरसवाशें आहे. पण त्यांत उत्कृष्ट नाटकें हातावर मोजण्याइतकींदेखील मिळण्याची मारामारच पडेल. गुजराथी भाषेंत इतर प्रकारचें वाङ्मय उच्च दर्जाचें व भरपूर जोरानें निर्माण झालें असतां नाटकांच्या बाबतींतच गुजराथ पाठीमागें कां असावा याचीं कारणें समजणें कठिण आहे. तथापि नाट्यवाङ्मयाची अशी स्थिति असणें ही मात्र लाजिरवाणी गोष्ट आहे. गुजराथी नाट्यवाङ्मयाचा आरंभ मराठी नाट्यवाङ्मयाच्या आरंभाबरोबरच झाला, असें असतां मराठींत ज्याप्रमाणें नाट्यवाङ्मयांत चांगलीं चांगलीं नाटकें वरींच सांपडतात तशीं गुजराथी भाषेंत सांपडत नाहींत. मुंबई हें गुजराथी भाषेचें एक केंद्र आहे असें मानण्यांत येतें व या ठिकाणीं पुष्कळसे गुजराथी विद्वान सांपडतात. पण अशा गुजराथींच्या केंद्रस्थानीं देखील मराठी नाटकमंडळ्यांच्या व मराठी नाटकांचीच चलती दिसून येते. मराठी नाटकांवर महाराष्ट्रीय प्रेक्षकांच्याच उड्या पडतात असें नाहीं तर गुजराथी लोकांच्या झुंडीच्या झुंडी या नाटकांना जात असतांना व गुजराथी नाटकांच्यापेक्षा या मराठी नाटकांची स्तुति करतांना आढळतात. ही स्थिति मराठी नाटकमंडळ्यांना जितकी भूषणावह तितकीच गुजराथी नाटकमंडळ्यांना लाजिरवाणी आहे असें म्हटल्यावाचून राहावत नाहीं.

गुजराथी भाषेंत नाट्यवाङ्मयाची उत्पत्ति अगदीं अर्वाचीन आहे. गेल्या ५० वर्षांपूर्वी गुजराथी भाषेंत या नाट्यवाङ्मयाचा पूर्ण अभाव होता असें म्हटलें तरी चालेल. यापूर्वी गुजराथेंत नाटकमंडळ्यांची जागा भवाई, रासधारी व मानभट हे भरून काढीत असत. महाराष्ट्रांतील हरिदाससंस्थेप्रमाणें गुजराथेंत मानभटाची संस्था असे. शेकडों वर्षांपूर्वी जी अर्वाचीन नाट्यवाङ्मयाची व रंगभूमीची स्थिति होती तीच गुजराथेंत एका शतकापूर्वी होती म्हटलें तरी चालेल. गुजराथेंतील मानभट अगर रासधारी संस्थांपेक्षांहि अधिक प्राचीन संस्था म्हणजे 'भवाई' संस्था ही होय. भवाई संस्थेच्या दर्जा अशी आपल्याकडील तमाशांची संस्था होय या भवाईमध्यें अश्लीलपणाची चंगळ दिसून येते.

नाकसंदर्भेमधून ही संस्था उदयास आली असावी असा कित्येकांचा तर्क आहे. या भवाई अनेक प्रकारच्या असतात. भवाई करणाऱ्या लोकांना भवय असें नांव आहे. हे भवय लोक, खालच्या वर्गांतील असल्यामुळें त्यांच्या खेळांत अश्लील शब्द व हावभाव यांची रेलचेल असे हे लोक गाणारे चांगले असत व त्यामुळें प्रेक्षकांची चांगली करमणूक होत असे. यांच्या खेळांत रंगलो उर्फ विदूषक हा प्रमुख असे व त्याचें मुख्य काम म्हणजे असंबद्ध भाषण करून प्रेक्षकांना पोट दुखेतों हंसविणें हें असे. अशाप्रकारें या भवयांची निकृष्ट स्थिति होती. ती स्थिति घालवण्याकरतां रावसाहेब महिपतराम यांनीं फार खटपट केली.

इंग्लिश वाङ्मयाचा प्रसार गुजराथेंत झाल्यापासून मात्र ही स्थिति बदलूं लागली. भवाई संस्थेला उतरती कळा लागून रंगभूमी संस्था उदयास येत चालली. गुजराथेंतील रंगभूमी संस्थेला वळण देण्याच्या कामगिरींत दक्षिणी नाटक मंडळ्यांना अग्रपूजेचा मान दिला पाहिजे. किर्लोस्कर नाटक मंडळी, सांगलीकर नाटक मंडळी, रामभाऊ नाटक मंडळी या नाटक मंडळ्यांनीं गुजराथमध्यें आपलीं नाटकें करून दाखविण्यास सुरवात केल्यापासून गुजराथी लोकांनीं हि त्यांचें अनुकरण करण्यास सुरवात केली, व गुजराथी लोकांचें लक्ष्य गुजराथी रंगभूमीची सुधारणा करण्याकडे वेधूं लागलें. गुजराथी लोकांप्रमाणेंच पारशी लोकांनींहि गुजराथी रंगभूमि सुधारण्याचा प्रयत्न सुरू केला. व्हिक्टोरिया नाटक मंडळी, नाटक उत्तेजक मंडळी इत्यादि पारशी नाटकमंडळ्या गुजराथी खेळ करूं लागल्या. कबराजीसारख्या पारशी नाटककारांनीं व रणछोडभाईसारख्या गुजराथी नाटककारांनीं या कंपन्यांकरितां नाटकें लिहून देण्यास सुरवात केली. या कंपन्या आपले बरेचसे खेळ उर्दूमध्यें करीत असत, कारण गुजराथी पेक्षां उर्दू भाषाच त्यांना सुगम जात असे. थोड्याच काळांत या पारशी कंपन्यांप्रमाणेंच गुजराथी कंपन्या स्थापन झाल्या व त्यांनीं गुजराथी नाटकांचे प्रयोग करून दाखविण्यास सुरवात केली. या कंपन्यांमध्यें मोर्वी आर्य सुबोध नाटक मंडळी, देशी समाज नाटक मंडळी, वांकानेर नाटक मंडळी वगैरे कंपन्या नावाजलेल्या आहेत. गुजराथींतील सर्वांत पहिलें नाटक कवि दलपतराम यांचें लक्ष्मी-नाटक (१८५१) हें होय. ॲरिस्टोफेनीस या ग्रीक विनोदी कवीच्या 'प्लुटस'चें हें इंग्लिश भाषांतर आहे. हें गद्य नाटक आहे. गुजराथी नाट्यवाङ्मयाचा जनक ज्याला म्हणतां येईल असा नाटककार म्हणजे रणछोडभाई उदयराम हा होय. पण याला गुजराथी लोक नाट्यवाङ्मयाचा पितामह असें संबोधतात. गुजराथी भवाईचा त्याला वीट आल्यामुळें त्यानें नवीन तऱ्हेची गुजराथी नाटक कंपनी स्थापून या भवाई संस्थेचा नाश करण्याचा विचार केला खालच्या वर्गांतील लोकांच्या रुचीप्रमाणें नाटक लिहिणें हें नाटककाराचें वास्तविक ध्येय नसून, खालच्या वर्गाची उन्नति करणाचें ध्येय नाटककारानें आपल्या डोळ्यांपुढें ठेवलें पाहिजे असें रणछोडभाईचें मत होतें, व हें तत्त्व नाटकें लिहितांना त्यानें आपल्या डोळ्यांपुढें ठेवलें. त्यानें एकंदर ११।१२ नाटकें लिहिलीं. यांच्या नाटकांत, कथानकाचा सहज विकास आढळून येत नाहीं. विचारसौष्ठवाचा व कविकल्पनेच्या भराऱ्यांचा यांच्या नाटकांत बराच अभाव आहे. पण रणछोडभाईची नाटककार या नात्यानें लोकप्रियता जर कोणत्या नाटकामुळें झाली असेल तर ती त्याच्या 'ललितादुःखदर्शक नाटक (१८६६) या नाटकामुळेंच होय. हें नाटक शोकपर्यवसायी आहे. हिंदुसमाजामध्यें वधूची संमति न घेतां, व वराच्या अंगच्या गुणाकडे लक्ष न देतां, केवळ त्याच्या पैशाकडे बघून मुलगी वराच्या गळ्यांत बांधावयाची ही जी दुष्ट चाल आहे त्या चालीला अनुसरून ललिता नावाच्या एका मुलीला एका श्रीमंत पण दुर्गुणी तरुणाच्या गळ्यांत तिच्या आईबापांनीं अडकविली व पुढें सासरच्या जाचामुळें तिनें आत्महत्या करून घेतली असा या नाटकांतील कथानकाचा सारांश आहे. हें नाटक फार लोकप्रिय झालें व या नाटकाचा इष्ट तो परिणाम गुजराथी समाजावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. वाङ्मयदृष्ट्या या नाटकांत बरेच दोष आहेत पण नाटकांतील भाषा साधी व मनोहर आहे. रणछोडभाईला नाट्यवाङ्मयाच्या उपयुक्ततेची खात्री पटली होती व आपलें सर्व आयुष्य चांगलीं नाटकें लिहिण्याच्या कामीं व रंगभूमीची स्थिति सुधारण्याच्या कामीं त्यानें खर्च केलें

रणछोडभाईनंतरचे नाटककार प्रो. मणिलाल नभुभाई द्विवेदी हे होत. यांचें 'कान्ता' (१८८४) नावाचें नाटक प्रसिद्ध आहे. गुजराथी नाट्यवाङ्मयामध्यें चांगल्या नाटकांची भर घालून रंगभूमीला तेजस्वी वळण देण्याचें कार्य जर कोणी केलें असेल तर तें मोर्वी आर्य सुबोध नाटक मंडळीचे मालक व्हागजी आशाराम, देशी समाज कंपनीचे मालक दयाभाई धोळशाजी, मूळशंकर नंदराम व बॅरिस्टर दिवाकर यांनीं होय. व्हागजी आशाराम हे या चतुष्टयांतील पहिले नाटककार होत. यांनीं मोर्वी आर्य सुबोध नाटक मंडळीकडून आपले धार्मिक व पौराणिक खेळ रंगभूमीवर आणविले. दयाभाई धोळशाजी यांचीं नाटकें सामाजिक व काल्पनिक आहेत. दयाभाईनें पुष्कळ नाटकें लिहिलीं त्यांमध्यें पवित्रलीलावती, अश्रुमति, दम देवडी, रामवियोग इत्यादि नाटकें महत्त्वाचीं आहेत दयाभाईचें सर्वांत उत्कृष्ट नाटक अश्रुमति हें होय

मोर्वी कंपनी व देशी समाज कंपनी यांच्या तोडीची तिसरी नाटक मंडळी म्हणजे वांकानेर कंपनी ही होय या कंपनीचे मालक [illegible] नावाचे दोघे बंधू होते हे

दोघेंहि उत्कृष्ट प्रकारचे नट असल्याकारणानें त्यानीं उत्तम नाटकें रंगभूमीवर आणून तीं यशस्वी करून दाखविलीं. नरसिंमेथा व शिवाजी हीं नाटकें तर या पंधूंनीं आपल्या उत्कृष्ट अभिनयानें अतिशय लोकप्रिय केलीं.

नथूराम सुंदरजी नावाचा एक नाटककार याच सुमारास झाला. हा शृंगारिक नाटकें लिहिण्यात तरबेज होता. त्याची कंपनी काठेवाडात फार लोकप्रिय होती. त्याच्या नाटकांपैकीं कुमुदचंद्र, माधवोनल व सौभाग्यसुंदरी हीं नाटकें फार प्रसिद्ध आहेत.

मुंबईमधील गुजराथी नाटककारांतील पहिला नाटककार म्हणजे मूळशंकर नंदराम हा होय. मुळशंकरचीं अतिशय प्रसिद्ध अशीं नाटकें म्हणजे, अजबकुमारी व जुगलजुगारी हीं होत. शांतरस व शृंगाररस रेखाटण्यात मूळशंकरचा हातखंडा आहे. गुजराथी नाट्यवाङ्मयाला उच्च दर्जा प्राप्त करून देण्यान्या चार नाटककारांपैकीं शेवटचे नाटककार वं. विभाकर होत. यांचें पहिलें नाटक "सिद्धार्थकुमार" हें होय. हें गुजराथी नाट्यवाङ्मयातील एक उत्कृष्ट प्रकारचें नाटक आहे असें म्हटलें असता वावगें होणार नाहीं. या नाटकाशिवाय स्नेहसरिता, सुधाचंद्र, मधुबंसरी, मेघमालिनी अन्जोनो बंधन, हींहि विभाकराचीं नाटकें फार प्रसिद्ध आहेत. या निरनिराळ्या नाटकामध्यें विभाकरांनीं मानवी आयुष्याचें व समाजाच्या निरनिराळ्या चळवळींचें चित्र रेखाटलें आहे. विशेषत: ह्लींच्या राजकीय व सामाजिक चळवळींचें चित्र नाटकांमधून पुढें मांडण्याचें कार्य विभाकराशिवाय दुसऱ्या कोणीहि केलें नाहीं; व या दृष्टीनें यांच्या नाटकांचें विशेष महत्त्व आहे. गुजराथी नाट्यवाङ्मयांत विभाकराच्या नाटकांना उच्च दर्जाचें स्थान दिलें पाहिजे.

कवि नानालाल यानें लिहिलेलीं जयजयन्त व इंदुकुमार हीं नाटकेंहि वाङ्मयाच्या दृष्टीनें उच्च दर्जाचीं आहेत. हीं नाटकें रंगभूमीवर आलेलीं नाहींत व येण्यासारखींहि नाहींत. या नाटकांतील मुख्य गुण म्हणजे, नाटककाराची संपन्न प्रतिभा होय. नानालाल हा उत्कृष्ट कवि असल्यामुळें त्याच्या या नाटकांत काव्यवल्पनाची रेलचेल आहे.

मणिशंकर रत्नजी भट यानीं 'कांत' या नावाखालीं 'भ्रमालिया तुलिया' नांवाचें एक नाटक लिहिलें आहे. रावसाहेब रमणभाई महिपतराम यांचें 'राईनों पर्वत' हें नाटकहि नांव घेण्यामोगें झालें आहे.

गु ज रा थी भा षा—गुजराथी भाषा ही पश्चिम हिंदुस्थानांतील जवळ जवळ एक कोट लोकांची भाषा आहे. हिंदी, पंजाबी, बंगाली व मराठी यांच्या खालोखाल संख्येच्या दृष्टीनें गुजराथीचाच नंबर लागतो. ही भाषा केवळ हिंदूच वापरीत नसून पारशी व मुसुलमानहि ही भाषा वापरतात.

भूगोलदृष्ट्या गुजराथ व काठेवाड हे परस्परांपासून अलग असले तथापि या दोन्हीं प्रदेशांतील भाषा थोड्या फार प्रांतिक भेदाखेरीज एकच आहे. अर्वाचीन गुजराथी भाषेचे दोन पोटभेद आहेत. एक कच्छी–गुजराथी व दुसरा मारवाडी–गुजराथी. कच्छी लोक कच्छी–गुजराथी वापरतात व मारवाडी लोक दुसरी भाषा बोलतात. या मारवाडी–गुजराथींत व्रज भाषेंतील शब्दांचा फार भरणा आढळतो.

गुजराथी भाषा ही फार सोपी भाषा आहे. ही बोलण्याला फारसे सायास पडत नाहींत. या भाषेंत शब्दांचा भरणा पुष्कळ नाहीं. तथापि ती जोरदार व तेजस्वी भाषा आहे. गहन विचार व्यक्त करण्यासाठीं जितके शब्द योजितात तितके शब्द या भाषेंत आढळत नाहींत. त्यामुळें या भाषेला संस्कृतमधून पुष्कळच शब्द उसने घ्यावे लागतात. गुजराथी भाषेचें व्याकरण सोपें आहे. या भाषेंत उपसर्ग, उपपदें, साहाय्यक क्रियापदें, प्रत्यय यांचा फारसा घोटाळा नाहीं. गुजराथी अक्षरें संस्कृत अक्षरापासूनच घेतलीं आहेत व कांहीं ठिकाणीं त्यात फेरफार झालेला आहे. प्रत्येक अक्षरावर संस्कृतमध्यें अगर मराठीमध्यें जी रेघ मारण्याची पद्धत आहे तिचा गुजराथींत पूर्ण लोप झालेला आहे.

ह्लींचा गुजराथी भाषा लिहिण्याची पद्धत दोन अवस्थांमधून उत्क्रांत झाली आहे. प्रथम गुजराथी भाषा देवनागरी उर्फ बालबोध लिपींतून लिहिण्यात येत असे. पुढें प्रत्येक अक्षरावर रेघ देण्याऐवजीं एकदम एक लांब रेघ मारून नंतर मग त्या रेघेखालीं अक्षरें लिहावयाची मोडी पद्धत अंमलांत आली. यानंतरची अवस्था म्हणजे, अजीबाद रेघ न काढता लिहिणें ही होय.

संस्कृत भाषेपासूनच गुजराथी भाषा निघाली आहे. कांहींच्या मतें गुजराथी भाषा ही शौरसेन भाषेपासून निघाली. पण कांहींच्या मतें ती महाराष्ट्रीचा एक प्रकार आहे. पुष्कळदां तिचा 'अपभ्रंश' म्हणून उल्लेख करण्यांत येतो. चंद्रानें आपल्या 'प्राकृत लक्षण' ग्रंथांत या भाषेसंबंधीं नियम दिलेले आहेत हेमचंद्राचार्यानें अपभ्रष्ट गुजराथीचा आपल्या ग्रंथात समावेश केला आहे. गुजराथी भाषेंत संस्कृत, प्राकृत इत्यादि भाषांतून बरेच शब्द आले आहेत. संस्कृतांतून जे शब्द गुजराथींत आले आहेत अशा शब्दांपैकीं वियोग, धीरज, करय हे उदाहरणादाखल देतां येतील. प्राकृतामधून गुजराथींत जे शब्द आले त्यामध्यें, दुईड मुडो, घेलो, आप, घऊ, मेलुं इत्यादि शब्द येतात. याशिवाय पोर्तुगीज, फ्रेंच, मराठी, पारशी, अरबी इत्यादि भाषामधून थोडेफार शब्द आलेले आहेत.

[ संदर्भग्रंथ.—कृष्णलाल मोहनलाल अव्हेरी—माइल स्टोन्स इन गुजराथी लिटरेचर ( गुजराथी प्रिंटिंग प्रेस ), 'फरदर माइलस्टोन्स इन गुजराथी लिटरेचर ( ब्रिटिश इंडिया प्रेस १९०० ); गोवर्धनराम त्रिपाठी–क्लासिक पोएट्स ऑफ गुजराथ. दिवेटिया–गुजराथी लँग्वेज ॲंड लिटरेचर ( वुइलसन फायलॉ लॉजिकल लेक्चार्स ); साठीना साहित्यनुं दिग्दर्शन, दलपतकाव्य, नर्मगद्य, नर्मकविता; रावबहादूर रमणभाई–कविता अने साहित्य; इंदुलालदेव–पेपर ऑन कलपी; गुजराथी दिवाळी दश ( १९१० ) ]

**गुंजीकर, रामचंद्र भिकाजी** ( १८४४–१९०१ )— एक महाराष्ट्रीय ग्रंथकार. याचा जन्म बेळगावनजीक गावोंढी गांवीं एका कुलीन सारस्वत-ब्राह्मण घराण्यात झाला. यांचें मूळ उपनाव कर्करे; परंतु वतनगावावरून त्यांचें घराणें 'गुंजीकर' या आडनावानें प्रसिद्धीस आलें. एलफिन्स्टन हायस्कुलामध्यें उपगुरु, हुबळी येथील इंग्रजी शाळेचे हेडमास्तर, बेळगाव जिल्ह्याचे असि० डे. ए. इन्स्पेक्टर अशा जागावर त्यांनीं कामें केलीं व १८९८ मध्यें पेन्शन घेऊन मुंबईस राहिले.

गुंजीकर हे मराठी भाषेंतील एक मार्मिक ग्रंथकार होते. ज्यावेळीं मराठीमध्यें ज्ञानप्रसारक हेंच एक मासिक पुस्तक होतें त्यावेळीं म्हणजे १८६७ सालीं यांनीं काहीं मित्रांच्या साह्यानें विविधज्ञानविस्तार चालू केला. वि. ज्ञा. विस्ताराची टीकाकार म्हणून जी प्रसिद्धी आहे ती त्यास मूळ रामभाऊ मुळेंच प्राप्त झाली. 'मनोरमा,' 'प्रेमबंधन', 'राजा शिवाजी' वगैरे अनेक पुस्तकांवरील त्याचे टीकालेख वाचण्याजोगे आहेत. त्यांची मोचनगड ही कादंबरी प्रसिद्ध आहे. शाकुंतल नाटकाचें त्यांनीं केलेलें सुरस भाषांतर आज दुर्मिळ आहे.

रामभाऊंना संस्कृत, प्राकृत, इंग्लिश, बंगाली, कानडी, गुजराथी आणि उर्दु या भाषा चांगल्याच अवगत होत्या. १८७७ सालीं त्यांनीं रा. रा. काशीनाथ पांडुरंग परब यांस मदतीस घेऊन "कौमुदी महोत्सव" नावाचें भट्टोजी दिक्षित यांच्या सिद्धांत कौमुदीचें भाषांतररूप त्रैमासिक सुरू केलें. परंतु दोन वर्षे चालवून आश्रयाच्या अभावामुळें तें त्यास बंद करावें लागलें. 'रामचंद्रिका' म्हणून संस्कृत शब्दरूपावली त्यांनीं लिहून प्रसिद्ध केली. भगवद्गीतेचें सुबोध भाषांतर त्यांनीं प्रसिद्ध केलें. शेक्सपियरकृत 'रोमिओ ॲन्ड ज्युलिएट' या नाटकाचें त्यांनीं 'रोमकेतु विजया नाटक' हें नांव देऊन भाषांतर करून वि. ज्ञा. विस्तारांतून प्रसिद्ध केलें आहे. कानडी भाषा शिक्षकाच्या मदतीशिवाय शिकता यावी म्हणून त्यांनीं 'कन्नडपरिज्ञान' म्हणून एक पुस्तक लिहिलें आहे. तसेंच पिट्मनच्या लघुलेखन पद्धतीवरून त्यांनीं मराठींत लघवी लिपी अथवा अतित्वरेनें लिहिण्याची युक्ति काढली. मराठींतील त्यांचीं दुसरीं प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें 'महाराष्ट्र भाषेची लेखन शुद्धि' ( आवृत्ति दुसरी ) आणि 'मराठी सुबोध व्याकरण' हीं होत.

ब्राह्मण जातीचा आणि त्यांतहि स्वजातीचा त्यास मोठा अभिमान असे. आणि यांचेंच फळ 'सरस्वतीमंडल अथवा महाराष्ट्र देशांतील ब्राह्मण जातींचें वर्णन' हें होय. [ वि. विस्तार, पु. ३२ अं. ३–४ ].

**गुंटकल**—मद्रास. अनंतपुर जिल्ह्यातलें खेडें. लो. सं. ६०५९. हें सदर्नमराठा रेल्वेवरचें महत्वाचें जंक्शन आहे. सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे कारखाने येथें आहेत. तरी येथें व्यापार फारसा नाहीं. आसपास काहीं पुराणवस्तु सापडल्या आहेत.

**गुडघेमोडीचा ताप** ( डेंग्यु )— हा ज्वर उष्णकटिबंधांतील व त्याच्या आसपासच्या प्रदेशांत प्रचलित असतो; अन्य ठिकाणीं आढळत नाहीं. थोडे दिवस टिकणारा ज्वर, अंग व सांधे या ठिकाणीं ठणका; नंतर ज्वररहित अशा थोड्या कालानंतर पुनःज्वर उलटणें व अंगावर तापाची लाली गोवरादि ज्वराप्रमाणें दिसणें व क्वचित्प्रसंगीं दोन अगर तीन वेळांहि ज्वर उलटणें हें या साथीच्या ज्वराचें मुख्य स्वरूप होय. या ज्वराच्या साथी हिंदुस्थान, ब्रह्मदेश, इराण, मिसरदेश, आफ्रिका, उत्तर व दक्षिण अमेरिकेंतील विवक्षित टापू व वेस्ट इंडिया बेटें या ठिकाणीं बहुधा मधून मधून प्रचलित असतात. या साथीचा प्रसार होण्याचें साधन एका विशिष्ट जातीच्या डासाचा दंश होय. व जेथें या प्रकारच्या डासाची वाढ होते त्या ठिकाणीं साथ उत्पन्न होते; व त्या टापूपुरती ती साथ मर्यादित असते रोग्याचें रक्त निरोगी माणसाच्या शिरांत टोंचून घातल्यानें हा ताप त्यास येतो असा अनुभव घेऊन पाहिला आहे.

लक्षणें:—तीन ते सहा दिवसपर्यंत हा ज्वर गर्भावस्थेमध्यें असतो. यानंतर ताप प्रगट होऊन माथेशूळ होतो व एकदम एखाद्या पोटामध्यें अथवा सांध्यामध्यें वेदना सुरू होते. ही वेदना एका सांध्यांतील बरी होते न होते तों दुसऱ्या सांध्यांत प्रवेश करिते व ती सांध्यात व त्या लगतच्या स्नायूंतहि भासते. डोळ्यांचीं बुबुळें फार दुखतात. ज्वर १०२°, १०३° पासून १०५° पर्यंतहि असतो व नाडीच्या ठोक्यांचें प्रमाण दर मिनिटास १०० किंवा अंमळ अधिक असतें. बहुतेक रोग्यामध्यें या प्रथमज्वरात मुद्दा चेहऱ्यावर अगर कधीं सर्वांगावर ज्वराचें लाल पुरळ दिसू लागतें; व घसा दुखतो. बहुधा हा पुरळ एका दिवसात मावळतो व त्याच सुमारास ज्वर कधीं सावकाशपणें तर कधीं एकदम पुष्कळ घाम येऊन जलद निघतो. वेदनांचें शमन होऊन रोग्यास तीन चार दिवस बराच अशक्तपणा वाटला तरी रोगी ज्वरांतील वेदनायुक्त स्थितीच्या मानानें रोगी बऱ्या स्थितींत असतो. यानंतर पुनः ज्वर व पुनः पुरळ येतें. हें पुरळ कधीं सुसते लालसर तर केव्हा ठिपकेदार असतें. लाली गोंवरांत दिसते त्यासारखा व कधीं पित्ताच्या लाल गाधी उठतात त्याप्रमाणें असते. यांशिवायहि त्यात भिन्न प्रकार असूं शकतात. त्यापासून थोड्या फार प्रमाणांत रोग्याच्या अंगास कंड सुटते व ती कधीं काहीं तासपर्यंत टिकते अगर कांहीं रोग्यांना त्यापासून दोन तीन दिवसपर्यंत पीडा होते व त्यानंतर पुरळ आल्या जागच्या त्वचेपासून खवले, कोंडा निघून जातो. या द्वितीय ज्वरावस्थेमध्यें सांध्यांतील वेदना पुनः प्रगट होउन अंमळ अधिक वेळ टिकतात, अगर ज्वर निघाल्यावरहि पुनः वेदना सुरू होतात. या लक्षणावरून आपल्या देशात त्यास गुडघेमोडीचा

ताप हें नाव पडलें आहे ज्वर दुसऱ्यांदा उलटला नाहीं अगर सांध्यांतील ठणका, सूज, हीं फार दिवस टिकून राहिलीं नाहींत तर या दुखण्याची मुदत सुमारें एक आठवडा असते सांध्यांतील दर्द लांवला तर त्यांत व्यंग उत्पन्न होऊन तो आखडल्याचींहि उदाहरणें पडतात अगदीं तान्हीं मुलें व वृद्ध माणसें मात्र या ज्वरामुळें मृत्युमुखीं पडतात सौम्य रोगामध्यें अंग मोडून येऊन रोग्याचा घसा दुखतो व अंगावर एकदा अगर दोनदा थोडें फार पुरळ येतें ज्वराचें स्वरूप उग्र असल्यास रोग्याचा ज्वर अतिशय वाढून त्यास गुंगी येते नाक, तोंड, गुदद्वार, अथवा गर्भाशय इत्यादि मार्गावाटें रुधिरस्राव कमी अगर अधिक प्रमाणांत होतो हृदयाची क्रिया मंद चालून शेवटीं ती ज्वराच्या कडकीमुळें बंद पडते चेहरा काळा [illegible] दिसतो फुप्फुसांत सर्दी होते अगर फुप्फुसदाह, फुप्फुसावरणदाह, हृदयावरणदाह, अगर हृदयाभ्यावरणदाह हा मोठा ज्वर व दाहयुक्त रोगांपैकीं एखादा रोग आगंतुक रीतीनें उत्पन्न होतो या रोगाच्या जंतूचा शोध लागला नाहीं व शरीरांत इतर कोणत्या विकृती होतात हेंहि अद्याप कळलेलें नाहीं

उ प चा र —कोठा सौम्य रेचक अगर एनिमा देऊन साफ ठेवावा व नंतर पोटामध्यें क्षारयुक्त औषधें व सौम्य प्रकारचीं स्वेदक औषधें दिल्यानें रोग्याच्या दाहयुक्त स्थितीचें शमन होतें पोटांत क्विनाइन दिल्यानें रोगाची मुदत अमल कमी होते म्हणून तें द्यावें सांध्यांतील वेदनांसाठीं पुढील कोणतेंहि एक औषध उपयुक्त आहे, (१) बेलाडोना अर्क १०–१५ थेंब प्रमाणांत, (२) डोव्हर्स पावडर, (३) किंवा थोड्या प्रमाणांत फिनासिटीन अगर अँटिपैरीन. शरीरदाहासाठीं ओल्या बोळ्यानें सर्वांग पुसावें व नंतर तें कोरडें करावें कर्पूरमिश्रित तेल पुरळावर लावतात शक्ती येण्यासाठीं क्विनीन, लोहयुक्त औषधें उत्तम असतात

**गुंडयाळी**-मुंबई, काठेवाड वढवाण ठाण्यांतील स्वतंत्र खडणी देणारा एक तालुका या तालुक्यांत गुंडयाळी व वाला अशीं दोन खेडीं आहेत तालुकदार झाला रजपूत असून वढवाणचे भायाद आहेत

**गुडलुपेठ**—म्हैसूर म्हैसूर जिल्ह्यांतला एक तालुका क्षेत्रफळ ५४७ चौ मै वस्ती (१९११) ७८०३५ यांत गुडलुपेठ हें एक शहर व १२८ खेडीं आहेत दक्षिण व पश्चिम भागाला दाट अरण्यें आहेत अरण्य व वस्तीचा भाग यांच्यामध्यें डोंगर आहेत गुडल नदीचें पाणी शेतकामाला घेतात त्याकरितां बंधारा घातला आहे चोलम व रागी येथें पिकते विजयपूर तलावाच्या पाण्यानें उत्तम भाताचें पीक निघतें येथील विड्याचीं पानें प्रसिद्ध आहेत नदीकांठानें रानखजूर फार होतो

**गुडा**—काठेवाड नवानगरच्या अमलाखालें रोडें [illegible] एक सिहदिला [illegible] मिळाला आहे त्यांतच धान [illegible]

जयदाम, रुद्रदामन् व रुद्रसिंह या क्षत्रपांचीं नांवें असून त्यांना स्वामी ही पदवी जोडण्यांत आलेली आहे

**गुडियात्तम** ता लु का —मद्रास उत्तर अर्काट जिल्हा या तालुक्यांत गुडियात्तम हें एक शहर व १८३ खेडीं आहेत वस्ती (१९२१) २१३५७१५ व क्षेत्रफळ ४८१ चौ मै सारा व इतर पट्टया मिळून उत्पन्न सुमारें ३॥ लाख आहे यांतील जमीनींत पूर्वघाटाच्या शाखा पसरल्यानें डोंगराळ आहे व मधून खोरीं आहेत जमीन साधारणत चांगली आहे माती तांबडा व रेतीमिश्रित आहे

श ह र —गुडीयात्तम तालुक्याचें मुख्य ठिकाण उ अ १२°५८' व पू रे ७८°५३' येथून रेल्वेस्टेशन ३ मैल आहे मद्रासपासून ११ व कालीकतपासून ११८ मैलांच्या अंतरावर आहे वस्ती (१९११) २०८ ३ येथ १८८५ पासून स्थानिक स्वराज्याचे अधिकार दिले आहेत हा गाव सुंदर व स्वच्छ असून सर्व घरें कौलारू आहेत येथें मुख्यत विणकाम चालतें लब्बाई लोक कातडीं, निच, तंबाखू, तूप वगैरेचा व्यापार करतात व कानडी लोक दुकानदारी व सावकारी करतात येथें ढोरांचा बाजार राणीपेठच्या बाजाराएवढा दर मंगळवारीं भरतो

**गुडीवाडा**, ता लु का —मद्रास इलाखा कृष्णा जिल्ह्यांतील तालुका क्षेत्रफळ ३१३ चौ मै वस्ती (१९२१) १७९५५, जमीनमहसूल व कर सु ९ लाख रुपये बहुतेक जमीन कृष्णा कालव्याखालीं आहे कोलार सरोवर यांतच आहे कैकलूर येथें डेप्युटी तहसीलदार आहे गुडीवाडा शहर हें मुख्य ठिकाण आहे

श ह र —गुडीवाडा तालुक्याचें मुख्य ठिकाण उ अ १६° २७' व पू रे ८१° ०' हें जुनाट शहर आहे येथें एक जुना बौद्ध स्तूप आहे पश्चिमेस जैनमूर्ती व शहराचा जुना उंचवटा आहे येथें जुने भक्कम कुंभारकामाचे अवशेष, धातू दगड व कांच यांचे विविध प्रकारचे मणी व जुनीं आंध्र नाणीं सांपडलीं आहेत

**गुडूर**, ता लु का —मद्रास नेलोर जिल्हा क्षेत्रफळ ६५८ चौ मै व लोकसंख्या (१९२१) १०६८८० यांत गुडूर हें एक शहर व १२४ खेडीं आहेत सारा व कर मिळून उत्पन्न सुमारें ३ लाख. श्रीहरिकोटा बेट यांतच मोडतें. कारोमांडल किनाऱ्यावर ज्या ठिकाणीं इंग्रजांचे पाय प्रथम लागले व वसाहती (सेलमेंट) वसल्या त्यांतलें आरमागांव यांतच आहे पश्चिमेची जमीन कडक व खडकाळ आहे पूर्वेकडील जमीन बरी आहे वर काळी माती व खारी रेती सांपडते स्वर्णमुखी, कैदापुरम, मंदलेरू या नद्या आहेत येथें नीळ पूर्वीच तयार होत असे पण तिचा भाव उतरल्यानें हा व्यापार बसला

श ह र —मद्रास, नेलोर जिल्हा गुडूर तालुका व सब डिव्हिजन यांचें मुख्य ठिकाण वस्ती (१९११) ८००६ मुख्य धंदा देशाचा [illegible] म्युनिसिपल युनियन आहे [illegible]

वीर टेटोपाली येथून वाटा होतात. ताडूट व भिरच्या बाहेर पाठवितात.

गुणवंत गड—सातारा जिल्हा. पाटणच्या नैर्ऋत्येस २ मैलावर १००० फूट उंचीच्या टेकडीवर गुणवंतगड किंवा मोरगिरी किल्ला आहे. याचा आकार निरुंदेच्या जिल्हासारखा दिसतो म्हणून यास मोरगिरी नाव पडलें. मोरगिरी खेड्याचा काही भाग या किल्ल्याच्या नैर्ऋत्य बाजूखाली आहे. अठराव्या शतकांत या किल्ल्यावर पेशव्याचें ठाणें होतें आणि दातेगडावर पंत प्रतिनिधीचे लोक रहात असत; व जेव्हां विरुद्ध पक्षाकडील हुकूम सुटत तेव्हां त्यांच्या अंमलबजावणीत ते वराच अडथळा करीत. सन १८१८ त हा किल्ला विन लढाईनें ब्रिटिशांच्या ताब्यात आला.

गुणाढ्य—यानें पैशाच भाषेंत बृहत्कथा नामक एक ग्रंथ लिहिला आहे.गुणाढ्याच्या नांवाचा एकदाच उल्लेख उपलब्ध ग्रंथात आढळून येतो. गुणाढ्य म्हणून एक कवि होता यांत शंका नाहीं कारण हें दंतकथेवरून निश्चित होतें. या कवी संबंधानें अनेक रसभरित आख्यायिका आहेत तथापि खरी माहिती उपलब्ध झाली नाहीं. प्रतिष्ठान येथें त्याचा जन्म झाला असें मानण्यात येतें. सातवाहन राजाचा तो प्रधान होता अशीहि दंतकथा आहे. गुणाढ्याचा काळ ख्रिस्ती शकाच्या सातव्या शतकापूर्वी असावा. त्यास काबोडियातील एका लेखांत 'प्राकृतप्रिय' म्हटलें आहे. बृहत्कथेचें थोडेसें विवेचन 'कादंबरी' या लेखांत आढळेल. फेलिक्स लकोतेनें गुणाढ्य व बृहत्कथा यावर फ्रेंच ग्रंथ लिहिला आहे. आणि त्यांत गुणाढ्य कथापर नेपाळ माहात्म्यातील चार अध्याय दिले आहेत (पारीस १९०८).

गुणि—सिंधमधील एक तालुका. क्षे. फ. ९८७ चौ. मै. वस्ती (१९११) ९१३६६. ताडो महमदखान हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. याशिवाय यांत १७९ खेडीं आहेत जमीनमहसूल व कर मिळून उत्पन्न २.२५ लाख. सर्व प्रदेश सपाट असून दोन टेकड्या आहेत. मुख्य पिकें बाजरी, गहूं, ऊंस इ.

गुणुपुर—विजगापट्टन जिल्ह्यातला हा एजन्सी तालुका आहे. क्षेत्रफळ ११८८ चौ मै वस्ती (१९२१) १२६०७७. येथें खोंड लोक व सावरा उरिया ब्राह्मण व थोडेसे तेलुगु आहेत. खेडीं ११३८. व मुख्य शहर गुणुपुर. हा तालुका वंशधारेच्या खोऱ्यात असून तांदूळ व खरीपाचीं यांत पिकें होतात. काहीं भाग कुरपम व काहीं जयपूरच्या जमीनदारींत मोडतो.

गुणे, पांडुरंग दामोदर—एक महाराष्ट्रीय भाषापंडित. हे अहमदनगरचे रहिवासी असून, एम्. ए. झाल्यावर फर्ग्यूसन कॉलेजात प्रोफेसर झाले. भाषाशास्त्राचें अध्ययन करण्यासाठीं रा. गुणे काहीं वर्षें जर्मनींत होते. तेथच त्यांना भाषाशास्त्रनैपुण्याबद्दल पी एच्. डी. ही पदवी मिळाली होती. यांनीं भाषाशास्त्रावर एक इंग्रजी पुस्तक लिहिलें आहे. मराठी मासिकांतून यांचे विद्वत्ताप्रचुर असे बरेच लेख आहेत. भांडारकर रिसर्च इन्स्टिटयूटचे ते एक प्रमुख चालक होते. १९२२ सालीं वारले हे मराठी मासिकांत लिहीत असत.

गुंतुपल्ली—मद्रास. कृष्णा जिल्हा. एलोर तालुक्यांतील एक खेडें. हें एलोरपासून २४ मैल उत्तरेस आहे पाशेजेला बौद्धांच्या गुहा वगैरे टेकडीतून खणलेल्या आहेत. येथील देवळांच्या दर्शनाला यल्लाव लोकांची यात्रा लोटते. येथें पूर्वी जैनपूरम् नांवाचें शहर होतें असें म्हणतात.

गुप्त—१ स. च्या सहाव्या शतकांत कोंकण प्रांतांत सूर्यवंशातील एक घराणें राज्य करीत असे. हें घराणें पाटलीपुत्र येथील मौर्यवंशाचे शाख असावी. (मौर्य पहा). मूळ मौर्य घराणें चंद्रगुप्तानें स्थापन केलें. व गुप्त घराणें हें त्याचीच एखादी अलीकडील शाखा असावी. हे आपणास बाराव्या व तेराव्या शतकांत महामण्डलेश्वर असें म्हणवून घेत असत. हे चालुक्य राजाचे मांडलिक असून धार व म्हैसूर प्रांतांत रहात असत.

### गुप्तांची वंशावळ

मागुप्त. उर्फ महागुप्त.
|
गुप्त १ ला.
|
मल्ल अथवा मल्लिदेव
(इ. स. ११७५)
|
वीर विक्रमादित्य १ ला.
|
- सोम, सोम्म अथवा सोविदेव १ ला. (इ. स. ११८१)
- गुप्त २ रा.
  |
  आहवादित्य–वीर–विक्रमादित्य २ रा. (इ. स. ११८२–१२१३.)
  |
  - तळुवलदेवी.
  - सोविदेव उर्फ सोयिदेव २ रा. (इ. स. १२३८)
  - विक्रमादित्य ३ रा.
    |
    - गुप्त ३ रा. (इ. स. १२६२–६५)
    - हिरियदेव
    - सोमिदेव ३ रा.

अशोकाचा नातू चंद्रगुप्त व संवत्कर्ता विक्रमादित्य हे दोघेहि गुप्त राजाचे पूर्वज समजले जातात, परंतु फ्लीट यांच्या मतें गुप्त हा शब्द गुप्त याचा अपभ्रंश असून माळव्यावर राज्य करणाऱ्या गुप्त्या गुप्त राजांपैकीं हे वंशज या गुप्त राजांपैकीं पहिला चंद्रगुप्त व त्याचा चंद्रगुप्त याना विक्रमादित्य हीं दुसरें नांव

हे संवत्कर्त्या विक्रमादित्याच्या वंशांतील असावे असा समज चुकीनें प्रचलित झाला असला पाहिजे असें ते म्हणतात धारवाड जिल्ह्यात करजगी तालुक्यामध्यें गुत्त वोळल गुत्त राजाची राजधानी असून तिच्या आसपासच्या मुलुखावरच ते राज्य करीत असत [ फ्लीट मु ग्या पु १ भा २ पृ ५७८-७९ ]

**गुत्तल**—मुंबई इलाखा धारवाड जिल्हा करजगीच्या पूर्वेस सुमारें १७ मैलांवर एक गांव इ स १८६२ पर्यंत हा गांव एका पेट्याचें मुख्य ठाणें होता येथील चुड ( चूडा? ) शेराराच्या देवळांत दोन शिलालेख आहेत इ स ११८१ च्या यळ्ळुरी शिलालेखांत उल्लेखिलेलें गुत्तवोळाल हेंच गुत्तल असावें असें वाटतें

**गुत्ती, (गुटी) तालुका**—अनंतपूर जिल्ह्याच्या उत्तरेकडील तालुका क्षेत्रफळ ८९६ चौ मै लो स ( १९२१ ) १३४३५५ शहरें १ खेडीं १४२ गुत्ती हें मुख्य ठिकाण येथील डोंगरी किल्ल्याबद्दल प्रसिद्ध आहे पामिडा येथें चिट तयार होतात सारा व कर मिळून वसूल ७॥ लाख रु आहे दक्षिण व पश्चिम भागीं कापसालायख काळी जमीन आहे उत्तर व पूर्वभागीं ती तांबडी व रेताड आहे या तालुक्यात फक्त पेनर ही एक नदी आहे व तिच्या पाण्याचे पाट काढून शेतीकडे उपयोग करतात प्रत्येक जण दर एकरामागें एकेका दिवसाकरितां एकएक मजूर देऊन ते पाट नेहमीं साफ ठेवतात चोळम् आणि कापूस कोरडवहू जमीनींत पिकतात व रागी ही ओल्या जमीनींत पिकते

**शहर**—मद्रास अनंतपूर जिल्ह्यांतील गुत्ती तालुक्याचें मुख्य ठिकाण उ अ १५° ७' व पू रे ७७° ३९' लोकसंख्या ६६८२ मध्यभागीं जुना डोंगरी किल्ला आहे शहराभोंवतीं चुन्याचा एक भक्कम तट आहे पश्चिमेकडील भाग सर्वांपेक्षां उंच असून तुसत्या खडकाचा आहे त्यावर बालेकिल्ला आहे येथून किल्ल्यावरून जाण्याला मार्ग आहे आणि ह्या मार्गानें वाटेंत ठिकठिकाणीं दरवाजे व चौक्या आहेत किल्ल्याची उंची समुद्रसपाटीपासून २१०५ फूट आहे पाण्याच्या साठ्याकरितां खडकांत बरींच टाकीं खोदलीं आहेत किल्ल्यांत शिल्पशास्त्रदृष्ट्या महत्वाच्या अशा जुन्या इमारती वगैरे कांहीं नाहींत एका बुरुजाच्या टोंकावर मुराररावाचा सभामंडप आहे येथून सारा शहराचा व भागचा देखावा दिसतो किल्ला व इमारती यांची दुरुस्ती सरकार ठेवतें जुनें गुत्ती शहर पार दाट वसलेलें आहे येथें उन्हाळा फारच भासतो आतां तट बाहेर वस्ती वाढत आहे बहुतेक सरकारी ऑफिसें बाहेरच आहेत

किल्ल्याविषयीं खात्रीचा इतिहास मिळत नाहीं किल्ल्यावरील शिलालेखावरून ११ व्या शतकांत हें महत्वाचें ठिकाण होतें असें दिसतें व विजयानगरच्या घराण्याचा शेवट होईपर्यंत तो मुसलमानांना सर करितां आला नाहीं १७४६ मध्यें मुरारराव यानें तो दुरुस्त केला १७७५ मध्यें हैदरनें घेतला १७९९ मध्यें तो निजामाच्या ताब्यांत गेला व १८०० पासून तो इंग्रजांच्या ताब्यांत आहे

**गुथली**—मुंबई कच्छ भुजच्या वायव्येस ३६ मैलांवर असलेलें लहान खेडें येथें एका प्राचीन शहराचा अवशेष आहे देवळें व घरें असल्याच्या खुणा पुष्कळ ठिकाणीं दिसतात १८२८ त या खेड्यांतील लोकांस जुनीं भांडीं, गाढवाचा मुसकट असलेलीं नाणीं व कांहीं पैशाच्या पेट्या सापडल्या

**गुदिआली**—मुंबई काठेवाडमधला एक स्वतंत्र खंडणी देणारा तालुका यांत गुदिआली व वाल हीं दोन गांवें असून तालुकदार वढवाणचे भायाद आहेत

**गुना**—ग्वाल्हेर संस्थानांतलें आग्रा-मुंबई रस्त्यावरील बीनाबारण रेल्वेचें स्टेशन येथें ब्रिटिशांची लष्करी छावणी आहे नुसती शहरची वस्ती ( १९११ ) ६५८६ रेल्वे झाल्यापासून शहर व शहरचा व्यापार वाढता आहे शहर व छावणी दोन्ही ठिकाणीं पोस्ट, शाळा वगैरे आहेत

**गुन्नौर तहसील**—संयुक्त प्रांतांतील एक तालुका क्षेत्रफळ ३६४ चौ मै लो स ( १९११ ) १६२९७०. यांत खेडीं ३२१ व शहर एक ( गुन्नौर ) आहे बराच भाग जंगलांत आहे

**शहर**—गुन्नौर तालुक्याचें मुख्य ठिकाण उत्तरेला ४ मैलांवर बबराला स्टेशन ( औ रो खंड रेल्वेचें ) आहे लो स ( १९११ ) ७११९ अकबराच्या वेळीं हें एका परगण्याचें मुख्य ठिकाण होतें येथून बबराला स्टेशनशीं व्यापार बराच चालतो येथें शाळा वगैरे आहेत

**गुप्त घराणें**—गुप्त घराण्याची बरीचशी माहिती बुद्धोत्तर जग (विभाग ४ था) या विभागांत (पृ ३२०-३२५) दिलीच आहे व तेथ गुप्तकालीन हिंदुस्थानची माहिती देणारा नकाशाहि दिला आहे हें घराणें कुशानानंतर उदयास आलें याचा वंश पुढें दिल्याप्रमाणें आहे गुप्त हा मूळपुरुष, त्याचा पुत्र घटोत्कच, त्याचा पहिला चंद्रगुप्त, त्याचा समुद्रगुप्त त्याचा दुसरा चंद्रगुप्त, त्याचा कुमारगुप्त व त्याचा स्कंदगुप्त, होय या राजांचे अलाहाबाद, एरण, उदयगिरी, मथुरा, गढवा, सांची, भिलसार, मानकुवर, मंदसोर, जुनागड, कहौन, इंदोर व भितारी या ठिकाणीं असलेल्या शिलालेखांवरून यांची साभ माहिती उपलब्ध झाली आहे पहिला चंद्रगुप्त हा मगधचा राजा होता त्याची राणी लिच्छवीवंशीय असून, तिच्या संबंधामुळें चंद्रगुप्ताची सत्ता अयोध्या, मगध, प्रयाग वगैरेकडे पसरली ( चवथें शतक प्रारंभ ) या उपकारास जाणून चंद्रगुप्तानें आपल्या नाण्यांच्या बाबतींत लिच्छवी वंश व राणी कुमारदेवी यांना संबंध आणला. यानें आपल्या नांवाचा शक सुरू केला ( २६ फेब्रुवारी सन ३२० ) होता चंद्रगुप्त ३२० मध्यें मेल्यानंतर त्याचा पुत्र समुद्रगुप्त गादीवर आला,

तत्कालीन सर्व हिंदुराजांत हा अत्यंत बलाढ्य व आदर्शभूत होता. त्यानें गंगानदीकांठचे राजे, मध्यदेशांतील राजे, कांचीचा राजा, पश्चिमेकडील राजे यांना जिंकून साम्राज्य स्थापलें, याचा दिग्विजय १३ वर्षे चालला होता. त्यानें हीं राज्यें खालसा न करितां त्यांच्या राजांना नुसतें मांडलिक बनविलें होतें. नंतर त्यानें अश्वमेध करून सोन्याचें नाणें पाडिलें याचें साम्राज्य उत्तरेस हिमालय, दक्षिणेस नर्मदा, पश्चिमेस चंबळ, पंजाब, माळवा आणि पूर्वेस कामरूप आसामपर्यंत पसरलें होतें. शेजारचे नेपाळ, शक, सिंहली वगैरे राजे त्याचे मित्र होते. सिंहलद्वीपच्या राजानें याच्या परवानगीनें बुद्धगयेच्या जवळ एक विहार बांधविला होता. समुद्रगुप्त हा अलौकिक कर्तबगार, विद्वान, कवि व कलामंडित होता. याच्या नाण्यावर हातांत वीणा असलेलें याचें चित्र कोरलेलें आहे; त्यावरून तो संगीतज्ञ होता हें ठरतें. यानें स्वतः काव्यें व अनेक ग्रंथ रचिले असून त्याच्या पदरीं अनेक विद्वान होते; त्यांत वसुबंधु हा बौद्ध पंडितहि होता. याच्या राणीचें नाव दत्तदेवी होतें. हा केव्हां वारला तें समजत नाहीं, त्याच्या पश्चात त्याचा पुत्र दुसरा चंद्रगुप्त गादीवर आला त्यानें आपल्यास विक्रमादित्य हें बिरुद लाविलें. त्यानें शकांच्या ताब्यातून माळवा, गुजराथ व काठेवाड स. ३८८ च्या सुमारास सोडविले त्यामुळें भडोच, सोपार व गयाबंदर हीं बंदरें त्याच्या ताब्यात येऊन व्यापाराची भरभराट होऊन त्याला पुष्कळ फायदा झाला. त्याची शिस्त कडक असे. त्याला लष्करी पिंड स्वतः स लावण्याची फार हौस असे. सिंहाशी युद्ध करीत असतांची अगर निरनिराळ्या मर्दानी खेळांत प्राविण्य मिळवीत असल्याचीं चित्रें त्यानें आपल्या नाण्यांवर कोरलीं आहेत. याच्या राणीचें नांव ध्रुवदेवी. समुद्रगुप्त हा प्रख्यात राजा चाळीस वर्षे राज्य करून ४१६ त मरण पावला. याच्या अमदानींत फाहिआन हा चिनी प्रवासी इकडे आला होता. त्यानें त्याकाळप्रमाणें देशविषयक माहिती लिहून ठेवली आहे.

मगधांतील शहरें मोठीं भरभराटलेलीं असून लोक सुखी व श्रीमंत असत. मोफत चाललेल्या संस्था पुष्कळ असून मार्गांत यात्रेकरूंच्या सोईसाठीं ठिकठिकाणीं धर्मशाळा बांधलेल्या होत्या. राजधानींत एक मोठें मोफत औषधालय होतें. पाटलीपुत्रांत यावेळीं महायान व हीनयान या दोन्ही पंथांचे मोठे विहार होते. शहरांत अशोकाच्या वेळचे राजवाडे, महाल वगैरे इमारती शाबूत होत्या. त्यांचें कौशल्ययुक्त काम पाहून फाहिआन यास त्या दैवी वाटल्या कोणाहि माणसास सर्वत्र राज्यांत वाटेल तेथें परवाना दाखविल्याशिवाय जातां येत असे दरोडेखोर वगैरे अपराधास अवयवच्छेदनाची शिक्षा होई देहांतशासन फार क्वचित असे जमीनमहसुलाची पद्धत उत्तम असून सैन्य व शिपाई यांना नक्त पगार देत असत. राज्यांत बौद्ध चालीरीती प्रचारांत असून हिंसा, मद्यमांससेवन होत नसून गुरें ढोरें विकीत नसत जे असत्य असून वरील नियम पाळीत नसत त्यांची वस्ती स्वतंत्र असे. अशोककालापेक्षांहि यावेळीं अहिंसा जास्त प्रसृत झाली होती. मात्र जातिभेद कडक होते. सांपत्तिकव्यवहारांत सरकार ढवळाढवळ करीत नसे. खंडोबाची होत नसत.

दुसऱ्या चंद्रगुप्तानंतर पहिला कुमारगुप्त गादीवर आला. याचें बिरुद महेंद्रादित्य असून त्याच्या राणीचें नाव अनंतदेवी होतें. समुद्रगुप्तानंतर पाटलीपुत्र ही राजधानी जाऊन कनोज झाली होती. कुमाराची फार माहिती आढळत नाहीं. यानें अश्वमेध केला व कांहीं प्रांतहि पादाक्रांत केले होते. त्याच्यामागून स्कंधगुप्त राजा झाला. याच्या कारकीर्दीत मध्यआशियांतील रानटी हूणांनी स्वाऱ्या केल्या परंतु यानें त्यांचा पराभव केला याच्यानंतर या घराण्यांत बरेच राजे झाले. हाहि या घराण्यांतील प्रख्यात असा राजा होय. पुढें हें घराणें दुर्बळ झालें व त्याचीं छोटीं छोटीं अनेक संस्थानें निर्माण झालीं. स्कंधगुप्तानंतर पुरगुप्त राजा झाला याचीं नाणीं उत्कृष्ट असत त्यांवर प्रकाशादित्य असें नाव आढळतें. याची राणी वत्सदेवी होय पुरगुप्तानंतर त्याचा पुत्र नरसिंहबालादित्य गादीवर आला ( ४८५ ). यानें नालंदास तीनशें फुटांपेक्षा उंच असें एक विटांचें देऊळ बांधलें. हें अत्यंत सुंदर, सोन्यारत्नांनीं खचित होतें असें ह्युएनत्संग म्हणतो यानें हूणांचा व मिहिराचा अनेकदां पराभव केला. याच्यानंतर दुसरा कुमारगुप्त राजा झाला याचीच चांदीची मुद्रा भीतरी येथें सांपडली. हाच शेवटचा गुप्तसम्राट होय याची राणी महादेवी नावाची होती. याचें राज्य सर्व हिंदुस्थानभर होतें याच्यानंतर पुष्कळ काळ गुप्तांची माहिती आढळत नाहीं. मात्र पुढें एकदम अकरा गुप्तराजांची माहिती मिळते. हे राजे फक्त मगध देशावरच राज्य करणारे होते सम्राट नव्हते या अलीकडील राजांत आदित्यसेन हा प्रख्यात राजा होता, याची राणी कोणदेवी होती. त्यानें हर्षाच्या मरणानंतर पुन्हा आपलें स्वातंत्र्य स्थापन करून अश्वमेध केला; याचा बाप माधवगुप्त होता. या शाखेंतील शेवटचा राजा जीवितगुप्त होय; हा आठव्या शतकाच्या पहिल्या भागांत राज्य करीत होता. या शतकाच्या अखेरीस बंगालच्या पालराजांनीं मगध खालसा केलें.

मध्यहिंदुस्थानांत बुद्धगुप्त नावाचा एक राजा राज्य करीत होता (४९०) परंतु त्याचा वरील गुप्तघराण्याशीं काय संबंध होता तें समजत नाहीं. तसेंच ५१० मधील एका भानुगुप्ताचाहि उल्लेख येतो पण त्याचाहि संबंध वरील मोठ्या घराण्याशीं काय होता तें आढळत नाहीं.

गु प्त का ळ — या घराण्याच्या अमलाखालच्या काळास हिंदुस्थानचें सुवर्णयुग म्हणतात. कोणी त्याला ग्रीसमधील पेरिक्लीसचा काळ संबोधितात; कोणी हिंदूंच्या पुनरुज्जीवनाचा काळ म्हणतात. या काळांत वाङ्मय, कला, शास्त्रें, वगैरेंचा अभ्युदय झाला होता अशोकानें बौद्ध प्रसार जोरानें केला तरी हिंदु किंवा जैनधर्म हे

झाले नव्हते गुप्तराजे हे सनातनधर्मी होते तरी त्यांनीं बौद्ध किंवा जैन धर्माचा द्वेष केला नाहीं त्याच्या वेळीं धार्मिक आचारविचारांना पूर्ण वाव होता, तत्तद्धर्मीयांना या राजांनीं त्रास दिला नाहीं किंवा त्यांच्या तीर्थक्षेत्राचा उच्छेदहि केला नाहीं सूक्ष्मपणें पाहिल्यास या (पाचव्या) शतकांत हिंदुधर्माचा पगडा बौद्ध व जैनधर्मांवर हळू हळू बसत चालला होता

सनातन धर्माच्या पगड्याबरोबर संस्कृतभाषेचेंहि महत्व वाढू लागलें अशोकानें दप्तर पालीभाषेंत असे आणि जेंव्हां प्राकृत भाषाच राजदरबारीं वापरीत मात्र गुप्तराजवटींत ही रीत बदलली संस्कृतभाषेला राजमान्यता आली त्यांच्या नाण्यावरहि संस्कृत लेख कोरले गेले त्यावेळचें वाङ्मय संस्कृतांत होऊं लागलें मृच्छकटिक (समुद्रगुप्तकाल) मुद्राराक्षस (चंद्रगुप्तकाल), वायुपुराण वगैरे वाङ्मय या काळांत झालें कालीदास (कांहींच्या मतें), वसुबंधु हे विद्वानहि या काळांतीलच होते गणितशास्त्र, ज्योतिष, फलज्योतिष यांचाहि उगम या वेळीं झाला असून प्रख्यात विद्वान आर्यभट्ट (४७६) वराहमिहिर (५०५-५८७) व ब्रह्मगुप्त (५९८) हे या वेळा चमकले संगीतकलाहि चांगलीच उदयास आली असावी (समुद्रगुप्त संगीतज्ञ होता यावरून ) समुद्रगुप्ताच्या पदरीं या शास्त्रांतील तज्ज्ञ घरेच असावेत शिल्पकला खोदकाम, चित्रकला यांचाहि या वेळीं कळस झाला होता गुप्तांच्या नंतर मुसुलमानांची स्वारी हिंदुस्थानावर आल्यामुळें व त्यांनीं या सुंदर (देवळें, स्तूप, स्तंभ वगैरे) इमारतींचा उच्छेद केल्यामुळें तत्कालीन अवशेष फारच थोडे पहावयास सांपडतात

उपलब्ध इमारतींत सर्वांत महत्वाची इमारत ललितपूर तालुक्यांतील देवगडचें दगडी देऊळ होय हें पांचव्या शतकाच्या शेवटीं बांधलें असून त्याच्या भिंतींवर गुप्तकालचें खरें कलाकौशल्य पहावयास सांपडतें कानपूर जिल्ह्यांतील भितरीगांवचें प्रचंड विटांनीं बांधलेलें देऊळ ( दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या वेळचें) हेंहि खोदाव कामाचा उत्कृष्ट नमुना आहे सारनाथ येथें पुष्कळ तत्कालीन देवळें होतीं या काळीं धातूवरीह उत्कृष्ट कामें होत प्रयाग येथील समुद्रगुप्ताचा एक लोखंडी स्तंभ (विजयलेख) पाहण्यालायख आहे तांब्याचे उत्तम तऱ्हेचे मोठमोठे पुतळेहि यावेळीं होत असत नालंदा येथ ८० फूट उंचाचा बुद्धाचा एक पुतळा होता तो, तसेंच सुलतानगंजचा ७॥ फुटाचा बुद्ध पुतळा (दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या काळचा) हल्लीं बर्मिंगहॅम येथें असलेला, हे या कामांतील उत्कृष्ट नमुने होत दुसरा चंद्रगुप्त व कुमारगुप्त यांच्या वेळीं ह्या कला उच्चतम गेली होती अजंटा येथील लेणीं हीं याच काळचीं असून तीं अत्युत्कृष्ट कलाकुसरीचीं म्हणून प्रसिद्ध आहेत स्कंधगुप्ताच्या वेळीं तर भिंतीच्यावर सुंदर कुसरकाम होत असे

या वेळच्या शिल्पांत एक विशेष असतो चित्राचा टरण, शरीराचे नाजूक अवयव, दुर्बोध आधार अंगावर ऱ शिरशिरीत पोशाख, त्यातून दिसणारे आतील भाग, मुद्रण पद्धति वगैरे अनेक विशेषावरून गुप्तकालीन मूर्ती व शिल्प कला तात्काल ओळखून काढता येते

गुप्तकालामध्यें पूर्वपश्चिम यांचा संबंध जास्त प्रमाणावर झाला या काळांत दहा हिंदुस्थानी शिष्टमंडळ चीनमध्यें गेला तसेंच बौद्ध भिक्षूंचीं धार्मिक मंडळें इकडून चीनमध्यें व तिकडून इकडे येत जात असत कुमारजीव नावाचा प्रख्यात भिक्षु इकडून तिकडे गेला होता (३८३) इकडील बंदराचा व कांबोज सयाम वगैरे देशांतील बंदरांचा व्यापारी संबंध असे जावामध्यें बौद्धधर्माचा प्रसार या सुमारास होत होता अजिंठ्यामधील लेण्यांतील चित्रावरून इराण व हिंदुस्थान यांचें दळणवळण होतें असें ठरतें तसेंच रोमच्या बादशहाकडेहि इकडून शिष्टमंडळें गेल्याचा पुरावा आढळतो ( ३३६, ३६१, ५५० या सालीं ) व नाण्यावरून या विधानाला बळकटीहि येते, दीनार हा रोमन शब्द इकडील सोन्याच्या नाण्याला लावीत असत

मगधाचें धार्मिक महत्व गुप्तांच्या उतरत्या काळांतहि कायम होतें चीनच्या एका बौद्धधर्मी राजानें ( स ५३९ ) मगधांत एक भिक्षुमंडळ महायानपंथाच्या धर्मग्रंथप्राप्तीसाठीं व त्यांच्या भाषांतरासाठीं पाठविलें होतें गुप्तराजानें त्यांचा सन्मान करून परमार्थ नावाच्या आपल्या एका भिक्षूला चीनमध्यें पाठविलें याच सुमारास बोधिधर्म नावाचा एक हिंदी राजपुत्र चीनमध्यें जाऊन (५२०) तिकडेच कायमचा राहिला

गुप्तकाळाबद्दल माहिती विज्ञानेतिहास ( विभाग ५ ) यांत (पृ ११२) दिलीच आहे ती पहावी

[ संदर्भग्रंथ—स्मिथ-अर्लि हिस्टरी आफ इंडिया भांडारकर कॉमेमोरेशन व्हॉल्युम इंडियन अँटिक्वरी, पु १५, १७ फ्लीट-गुप्त इन्स्क्रिप्शन्स एपिग्राफिआ इंडिका पु १०, हिंदु बुद्धिस्ट मॉन्युमेन्टस रिपोर्ट १९१५ डॉ भांडारकर-नोट ऑन दि गुप्त इरा, बॉम्बे ग्याझे पु १ भा २, मावेल डफ बील-जर्नल रा. ए सो पु १३ ]

गुब्बी तालुका —म्हैसूरच्या तुमकूर जिल्ह्यांतील एक तालुका क्षेत्रफळ ५५९ चौ मै लोकसंख्या ( १९११ ) ९६८२० गुब्बी ( तालुक्याचें मुख्य ठिकाण ) व कडाबा हीं दोन शहरें व वारी ३५४ खेडीं आहेत जमीनमहसूल (१९०३-०४) १,९२,००० रु यांतून शिमशा नदी वहाते. यांत डागलवारी टेंकड्या आहेत जमीन तांबडमातीची उथळ व रेताड आहे

शहर —गुब्बी तालुक्याचें शहर लोकसंख्या ( १९११ ) ३४१४ तुमकूरपासून अंतर १३ मैल हें रेल्वेस्टेशन व व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे कोमटी व लिंगायत हे व्यापारी आहेत सुपारीच्या व्यापाराचें हें केंद्रस्थान आहे व येथून नगर, माल्नाद, वालाजा पेठ वगैरेकडे सुपारी जाते येथें

कपडा, घोंगडा, धान्य आणि विविध जिन्नस यांचा वारं-वार होणाऱ्या बाजाराच्या वेळीं व्यापार फारच असतो.

**गुमला पोटविभाग**—बंगाल. रांची जिल्ह्याचा हा एक पोटविभाग आहे. क्षेत्रफळ १५०५ चौ. मै. छोटा नागपूरच्याच माळाचा ( प्लेटो ) हा एक भाग आहे तरी यांतील कांहीं भागांत टेंकड्या सरळ उंच व कांहीं गोल आहेत. लोकसंख्या ( १९११ ) ५११७११. यांत १३९६ खेडीं आहेत. गुमला तालुक्याचें क्षे. फ. २०८ असून लो. सं. ( १९११ ) ४६५५१ आहे. गुमला तालुक्याचें मुख्य ठिकाण गुमला हें एक खेडेंच आहे.

**गुमसूर तालुका**—मद्रास. गंजमजिल्ह्यांतील अगदीं उत्तरेकडचा तालुका. क्षेत्रफळ ८२४ चौ. मै. लो. सं. ( १९२१ ) १६१९६२. खेडीं ५३९. मुख्य ठिकाण रसेलकोंड. सारा व कर मिळून वसूल ३२८ हजार. अर्ध्याहून अधिक भागांत जंगल आहे व तें सगळ्या जिल्ह्यांत अधिक महत्त्वाचें आहे. जमीन सुपीक आहे. कृत्रिमरीत्या पाणी पाजण्याची सोय आहे तरी बरीच जमीन पडीत आहे. पैका नावाचे लोक जुन्या सरंजामी पद्धतीप्रमाणें जरूर पडेल तेव्हां नौकरीवर येण्याच्या करारानें जमीन करतात. पहारेकरी किंवा चपराशी म्हणून हे लोक रहातात.

**गुरखा**—नेपाळमध्यें ज्या अनेक राज्जाती आहेत त्यामध्यें गुरखा ही एक प्रमुख जात आहे. हल्लींचें नेपाळचें राजघराणें याच जातीचें आहे. गंडकी नदीच्या खोऱ्याच्या पूर्वेस त्रिशूळगंगा व मत्स्यगंगा या नद्यांच्या मध्यभागीं गुरखा नावाचा एक जिल्हा असून या जिल्ह्याची राजधानी गुरखा ही होती. हें शहर हल्लींची राजधानी जें खाटमांडू शहर त्या शहरापासून पश्चिमेस ५६ मैलांवर आहे. या गुरखा जिल्ह्यांत रहाणाऱ्या लोकांना गुरखा अशी संज्ञा पडली आहे. 'गुरखा' याचा अर्थ 'गोरक्षक' (गो+रक्ष) असा होतो, व गाईचें रक्षण करणाऱ्या लोकांना 'गुरखा' हें नांव पडलें असावें असें दिसतें. कित्येकांच्या मतें, गोरखनाथ या नावाचा जो नेपाळामध्यें एक प्रसिद्ध साधु होऊन गेला त्याच्या नावावरून गुरखा हें नाव रूढ झालें असावें. गुरखे लोक स्वतःला रजपूत लोकांचे वंशज म्हणवितात. मुसलमानांनीं ज्या वेळीं चितोडवर स्वाऱ्या केल्या त्यावेळीं त्यांच्या भयानें कित्येक रजपुतांनीं नेपाळमधील कुमाऊन प्रांताच्या सभोंवतालच्या डोंगराळ प्रदेशाचा आश्रय केला. नंतर त्यांनीं आसपासच्या मुलुखावर स्वारी करून गुरखा, नयकोट इत्यादि प्रांत जिंकून घेतले व त्या ठिकाणीं त्यांनीं आपलें राज्य स्थापन केलें. त्यावेळेपासून तों आजपावेतों नेपाळावर त्यांची सत्ता अबाधित चालली आहे.

अशा रीतीनें ज्या रजपूत लोकांनीं नेपाळमध्यें गुरखा जिल्ह्यांत वस्ती केली व नेपाळ देश जिंकून घेतला त्यांना गुरखा हें नांव जरी पडलें असलें तरी खश, गुरंग, मंगर इत्यादि जातींचाहि समावेश या गुरखे लोकांतच होतो. त्रिटिशांच्या गुरखा पलटणीमध्यें विशेषतः याच जातीच्या लोकांचा भरणा आहे. अशा रीतीनें गुरखा हें नांव खास रजपूत लोकांच्या नेपाळमधील वंशजानाच तेवढें लावण्यांत येत नसून वरील जातीचाहि त्यांत समावेश होतो असें दिसून येतें.

गुरखे लोक नेपाळांतील इतर जातींच्या लोकांपेक्षा दिसण्यांत अधिक चांगले आहेत. हे लोक अंगानें सडपातळ असून उंच असतात. गुरखे लोकांत क्षात्रतेज दृष्टीस पडतें. त्यांचा पेशा लष्करी शिपायाचा असून सैन्यामध्यें यांचीच संख्या पुष्कळ असते. कृषिकर्म अगर व्यापार या बाबतींत ते मागसलेले आहेत. ते ऐदीपणांत आपला सारा वेळ घालवितांना दृष्टीस पडतात. इतर लोकांपेक्षा नीटनेटकेपणांत गुरखे लोक श्रेष्ठ आहेत. हे लोक निळ्या रंगाचे कपडे वापरतात. निळा पायजमा, निळें कुडतें, निळें शिरस्त्राण घालून कमरेभोंवतीं ते कित्येक हात लांबीचा निळा कमरबंद गुंडाळतात व त्यांत एक मोठा सुरा लटकावून देतात. या सुऱ्यास 'कुकरी' असें म्हणतात. थंडीच्या दिवसांतहि गुरखे लोक हेच कपडे परिधान करतात. फक्त या कपड्यांच्या आंतील अंगास कापूस लावलेला असतो. श्रीमंत लोक आपल्या कपड्याचा आंतला भाग बकऱ्याच्या केसांनीं मढवून घेतात, व डोक्यास चित्रविचित्र रंगाच्या कापडाच्या तुकड्याची टोपी घालतात. अधिकारी लोकांच्या टोप्यांना कलाबतूची फीत लावलेली असते.

गुरखे लोक मांसाहारी आहेत. नेपाळच्या उत्तरेकडील पहाडांतील व तराईंतील बकऱ्यांचें मांस हे लोक मोठ्या आवडीनें खातात. याशिवाय शिकारीचा यांना फार नाद असल्यानें रानडुकरें, ससे, इत्यादि प्राण्यांची शिकार करून त्यांचें मांस हे लोक खातात. रानडुकरें पाळून त्यांना धष्टपुष्ट करून नंतर त्यांचें मांस खाण्याची पद्धत श्रीमंत लोकांत आढळते.

गुरखे लोक हिंदुधर्मीय आहेत. अर्थातच यांच्या पद्धती व चालीरीति हिंदुस्थानांतील लोकांप्रमाणेंच आहेत. यांच्यांत जातिभेदाचेंहि थोडें फार वर्चस्व आढळून येतें. बहुपत्नीकत्वाची चाल यांच्यामध्यें आढळून येते. गुरखे लोक आपल्या बायकावर करडा अंमल गाजवितात. आपली बायको व्यभिचारी आहे असा एखाद्या गुरख्याला संशय आला तर तो तिला भयंकर शासन करतो. जो पुरुष आपल्या स्त्रीशीं वाईट संबंध ठेवतांना आढळेल त्याला गुरखा आपल्या सुरीनें ठार मारितो. विधवाविवाहाला गुरखे लोकांत पूर्ण मनाई आहे. नेपाळचें राजघराणें गुरखा जातीचें असल्यानें, या राजघराण्यांतील लोक हिंदुधर्मीय आहेत. अर्थात् नेपाळांत हिंदुधर्मांतील उत्सव व यात्रा मोठ्या थाटांत साजऱ्या केल्या जातात. या यात्रांमध्यें इंद्रयात्रा रथयात्रा, शिवरात्र्युत्सव प्रमुख आहेत. याशिवाय, दुर्गापूजा, पशुपतिनाथ यात्रा, रामनवमीचा उत्सव व हिंदुधर्मां-

साल इतर उत्सव गुरखे लोकांत भक्तिभावानें साजरे करण्यात येतात [ संदर्भ ग्रंथ—राइट—हिस्टरी ऑफ नेपाल १८७७, ज. रा. धाजगावकर—नेपाळवर्णन १९०६, कॅप्टन व्हॅन्सीटार्ट नोट्स ऑन दि गुरखाज ( १८९८ ) ]

**गुरगाव जिल्हा**—पंजाबमधला एक जिल्हा क्षेत्रफळ १९८४ चौ मैल दक्षिणेकडून अरवली पर्वताचे दोन फाटे उत्तरेकडे जातात सामान्यत ऋतुमान कडक नसतें, तरी तापाची साथ नेहमी असते पावसाचें मान सामान्यत २५इंच आहे पूर्वी हा भाग यादव व शाही रजपुतांकडे होता ११९६ पासून दोन शतकापर्यंत त्यांचा मुसुलमानांशीं झगडा चालू असे पुढें मुसुलमानी सत्ता झाली नंतर मराठ्यांचा भगवा झेंडा येथें फडकला १७९२ च्या सुमारास जॉर्ज थॉमसच्या ताब्यात फिरोजपूर परगणा गेला होता त्यानें गुरगाव लुटलें मराठ्यांनीं रेवारी येथें अहीर वंशाचा तेज सिंग याची स्थापना केली १८०३ मध्यें शिंदे यांच्या मार्फत हा सर्व भाग इंग्रजांकडे आला तरी तेथें पुष्कळ वतनदार कायम होतेच हलके हलके या वतनदारांपैकीं एकेकाचें वतन तो केणत्या तरी कटांत, बंडांत अगर खुनांत सामील झाल्याबद्दल म्हणून जप्त झालें व हा पूर्ण ब्रिटिश जिल्हा बनला रेवारी, पलवल, होडल वगैरे ठिकाणीं प्राचीन अवशेष पहाण्याजोगे आहेत जिल्ह्यांत ५ तालुके आहेत ७ शहरें व ११८० खेडीं आहेत लोकवस्ती ( १९२१ ) ६८२००३ सहा शहरीं म्युनिसिपालिटया आहेत गुरगाव हें एक लहान शहर आहे भाषा हिंदुस्थानी, मेवाडी, ब्रज या चालतात यमुनेच्या दोन्ही बाजूंची जमीन चांगली आहे त्याचप्रमाणें टेंकड्यांमधल्याहि जमीन बरी आहे आणि कालव्यांचें पाणी इकडे येत या जिल्ह्यांत जंगल फारसें नाहीं रेवारी तालुका तर उजाड आहे फक्त पलवल तालुक्यांत थोडेंसें जंगल आहे मिठाच्या खाणी बऱ्याच जुन्या आहेत व पुरवठाहि बराच होतो सुल्तानपुरी मीठ प्रसिद्ध आहे सोरा, अभ्रक, लोखंड, तांबें वगैरे धातूंच्या खाणी आहेत पण फारशा चालू नाहींत डोंगरी प्रवाहांच्या रेतींत सोनें सांपडतें रेवारी येथें स्लेटाचे दगड सांपडतात सुती, खाकरी हलका कपडा तयार होतो त्यांतील थोडीशी मलमल होते रेवारी येथेंच पितळेची भांडी होतात बांगड्या, लोखंडी भांडी, मोठे होहि होतात व्यापाराचें मुख्य ठिकाण रेवारी हें आहे राजपुताना व उत्तर हिंदुस्थान यांच्याशीं व्यापार चालतो आयात माल मिरचें मीठ व लोखंड, निर्गत माल साखर, धान्य व विलायती कपडा वगैरे राजपुताना माळवा रेल्वे, व काय पी ची आग्रा डिव्हिजन व ११२ लहान रस्ते यांतून आगात कच्चा ( ८१ मैल ) पक्का ( ५०९ मैल ) सडकाहि मध्यप आहेत दिवस गुड्गा गेंडीच होळ्या चालतात दिवाळीच्या कर्दींत प्रसंगांस जिल्ह्यांत दा जिल्ह्यात

... नेंच स्थान मिळेल

**तहशिल**—पंजाब गुरगाव जिल्ह्यातली एक तहशील क्षेत्रफळ ४११ चौ मैल लो स ( १९११ ) ११२३११ हींत ३ शहरें व २०५ खेडीं आहेत सारा व कर मिळून २५ लाखांचा वसूल आहे टेंकड्यांतून येणाऱ्या प्रवाहांना बंधारे घालून शेतीकरितां पाणी अडविलें आहे उत्तरेकडे जमीन चांगली आहे दक्षिणेकडे रेताड आहे

**शहर**—गुरगाव जिल्हा तालुक्याचें मुख्य ठिकाण उ अ २८° २९' व पू रे ७७° २० रेल्वेस्टेशन ३ मैलावर आहे वस्ती ( १९११ ) ५४६१ यालाच हिदायतपूर असेंहि म्हणतात येथें झांशी येथील राणी सैन्यावर नजर ठेवण्याकरितां एक पलटण असे जवळच गुरगाव मसाणी येथें शीतळा देवीचें देवालय आहे दरसाल ६० हजार पर्यंत लोक दर्शनाला येतात

**गुरमतकाल**—हैद्राबाद संस्थानचा एक तालुका होता १९०५ सालीं त्याचीं १९१ खेडीं व ३२० चौ मै जमीन दुसऱ्या तीन तालुक्यांत विभागून दिली

**गुरव**—महाराष्ट्राबाहेर ही जात फारशी आढळत नाहीं महाराष्ट्रांत ह्या जातीची संख्या अत्यंत अल्प आहे मध्य प्रांत वऱ्हाडांत यांची संख्या १९११ च्या खानेसुमारी प्रमाणें सुमारें १४००० आहे व मुंबई इलाख्यांत ही ६५,७३८ आहे हैदराबाद संस्थानांत यांची संख्या १७१२२ आहे आपल्या मूळपुरुषानें शिवार्चनांत अंतर पडल्या कारणानें महादेवाच्या शापामुळें वैगुण्य प्राप्त होऊन त्यांतच अज्ञान व दारिद्र्याची भर पडल्यामुळें उच्च वर्गापासून आपण च्युत झालों असें सुशिक्षित गुरवांचें म्हणणें आहे ऋषीपासून गुरवांची उत्पत्ति असल्याचें शिवपुराणावरून दिसून येतें वेतन घेऊन पूजा करणारे ब्राह्मण हव्य कव्य व श्राद्धकर्मीं निषिद्ध आहेत असें स्मृतिकार व धर्मशास्त्रकार यांनीं ठरविल्यामुळें स्मृतिकालापासून गुरवांच्या अवनतावस्थेस आरंभ होऊन शिवपुराणकालीं गुरव ही निराळी जात बनली असावी गर्भाधान, उपनयनादि सर्व संस्कार, गायत्र्याधिकार वगैरे बाबतींत व सामान्य आचारविचारांत श्रेष्ठ वर्गांच्या गुरवांत व इतर ब्राह्मणांत सकृद्दर्शनीं काहीं एक भेद दिसून येत नाहीं श्रीशिव गंगापीठाच्या श्रीमच्छंकराचार्यांची स्वारी १९१२ सालीं वैदर्भ प्रांतीं संचारार्थ गेली असतां त्यांनीं गुरव हे ब्राह्मण असल्याबद्दल आपला अभिप्राय दिल्याचें सांगतात गुरवांत सांप्रत बालविवाह व पुनर्विवाह रूढ झालेला आहे परंतु त्याला वरिष्ठ गुरवसमाजाकडून गौणस्थान देण्यात येत गुरवांत उपनयन, गर्भाधान, विवाहादि सर्वच संस्कार यथाशास्त्र आहेत त्यांना पण इतर श्रेष्ठ ब्राह्मणांप्रमाणें हातचें अन्नोदक चालतें मुंबई इलाख्याकडे गुरव जातीच स्वतंत्र उपाध्याय कित्येक ठिकाणीं असून ते गुरवांच्या सत्कर्मांशीं चालवितात हे एखाद्या ठिकाणीं उपलब्ध नसल्यास ... [illegible]

शैव भटजी पूर्वी असत, पण आता नाहींसे झाले आहेत. मध्यप्रांतात शैव भटजी केव्हांच अस्तित्वात नसून ब्राह्मणच सर्व कर्मे करतात

*पो ट जा ती.*—नागपूर मध्यप्रांतीय गुरवात देशकर, वऱ्हाडे, झाडे वगैरे पोटभेद निरनिराळ्या वसतिस्थानांवरून पडलेले दिसतात. वऱ्हाडे म्ह० मूळचे वऱ्हाडात राहणारे. झाडे म्ह० जंगली झाडीच्या प्रदेशातील वगैरे. या पोटजातीत रोटीबेटी व्यवहाराची काहीं तुरळक उदाहरणें देशस्थकोंकणस्थ विवाहाप्रमाणें केवळ अपवादादाखल असून सामान्यतः रोटीबेटी व्यवहार रूढ नाहीं. मध्यप्रांतात देशकराहून निराळा असा एक लहानसा पोटभेद असून त्याला कित्येक वऱ्हाडे म्हणतात काहीं अपवाद खेरीजकरून वऱ्हाडकराशीं त्याचा विशेषसा संबंध नाहीं. सामान्यतः वऱ्हाड मध्यप्रांतातील गुरव इतरांपेक्षा शिक्षण वगैरे सर्वच बाबतींत पुढें गेलेले असल्यामुळें श्रेष्ठतेचा फराच अभिमान त्यांच्या अंगीं सकारण वसत आहे. सातारा, सोलापूर, खानदेश वगैरे प्रांतातील गुरव जातींत हलक्या सलक्या पोटभेदांचा पुष्कळच भरणा आहे. तिकडे नगरे व जुन्नरे असे २ मुख्य भेद आहेत. त्यात नगरे उच्च प्रतीचे मानिले जातात. खानदेशातील पार पश्चिम तापी काठीं साडव्याकडे अहीर गुरव आहेत. तेथें सही नावाचाहि एक पोटभेद असल्याचें कळतें. खानदेशातील स्थिति अत्यंत निकृष्ट आहे. कोंकणात लिंगायत गुरव आहेत. हेच नीलकंठ गुरव होत. ते गळ्यात लिंग अडकवितात. याचा भरणा कोंकणपट्टीकडे आहे. शिवाय जैन गुरव निराळेच आहेत. मराठे गुरव म्हणजे मराठा जातीचे पुजारी. वासुदेव, कडू वगैरे शूद्रजातींपैकीं होत. त्यांच्या चालीरीती शूद्राप्रमाणें असतात.

वरील पोटजातींशिवाय काहीं वाजंत्र्याचा धंदा करणारे लोक स्वतःस 'गुरव' म्हणवितात. यांनीं फक्त देवळात व राजदरबारात वाजवावें असा निर्बंध असल्याचें समजतें. ह्या वाजंत्री गुरवाचा वरील कोणत्याहि पोटजातीशीं संबंध नाहीं. मुंबईकडे शूद्र देवताची पूजा घेणारे कोळी आणि मराठे देखील स्वतास गुरवच म्हणवितात काहीं जैन देवताची पुजा घेणारेहि गुरवच बनले आहेत. यास नागपूर प्रांतीं वस्ईवाले म्हणतात, पण हे खरे गुरव नव्हत. यांच्यावरून सर्व गुरव जातीची कल्पना केल्यामुळें पाश्चात्य ग्रंथकारांच्या चुका झालेल्या आहेत व त्यामुळेंच समाजात गुरवांसंबंधीं गैरसमज पसरलेला आहे असें सुशिक्षित गुरव म्हणतात.

*पा श्चा त्य ग्रं थ का रां चें म त.*— रसेलकृत कास्टस् अँड ट्राईब्स् ऑफ दि सेंट्रल प्राव्हिन्सेस अँड वेरार्स (पु. ३ पा. १७६) यांत पुढीलप्रमाणें उल्लेख केला आहेः 'गुरव आपली धर्मशिष्या जी कलावंतीण तिच्या पाठीमागें वाद्यें वाजवितात. गर्भाधानप्रसंगीं वेश्या गुरवाची पूजा करते व तो तिच्या दांताला मिस्सी लावतो. तिला मूल होण्यापूर्वी जिनें हा विधि उरकून न घेतल्यास तिला जातीबाहेर टाकतात ...... कोठें कोठें गुरव कुणब्यांच्या हातचें अन्न खातात'.

*उ प जी वि के चीं सा ध नें*:—पूजेकरिता देवतेला दिलेल्या शेतावर व दक्षिणादि सर्व उत्पन्नावर गुरवाची मालकी असते. जागृतेश्वर ( नागपूर ); महाकाली ( चांदा ), खंडोबा ( जेजुरी ) यांठिकाणीं गुरवच या उत्पन्नाचे मालक आहेत. अलीकडे बहुतेक ठिकाणीं देवस्थान कमिट्या नेमून सर्वच पुजाऱ्याप्रमाणें गुरवाच्या वंशपरंपरा हक्कास बाध आला आहे. महाकाली या देवस्थानावरून गुरवाचें आडनावहि महाकाळे असें पडलें आहे. आळंदी येथें ज्ञानेश्वर महाराजांच्या उत्पन्नासंबंधानें गुरव व देवस्थानकमिटी यांचा तंटा कोर्टात बरेच दिवस चालून गुरवास अपयश आलें या जातींत शिक्षणप्रसार कमी असून गरीब लोकांचाच भरणा फार आहे बहुतेक लोक नोकरी व शेतीवर उपजीविका करीत आहेत. खेड्यापाड्यातील दरिद्री गुरव क्वचित् बेलफुलें व पानपत्रावळी विकून उदरभरण करतात. सामान्यत ढोलवयाचें म्हणजे गुरव हे पाढरपेशे बनले आहेत. पूर्वी जातिपंचायती असत पण आता त्या नष्ट झाल्या आहेत

*जा तीं ती ल का हीं आ ड ना वें*—हीं आडनावें बहुधा स्थलावरून किंवा धंद्यावरून पडलेलीं असावींत. कित्येकदां व्यंग्यार्थानें एखाद्यास नाव ठेवण्यात येतें व तेंच पुढें आडनाव होऊन बसतें. पूर्वी भाट लोक आडनावें ठेवीत असत असें ऐकिवात आहे नागपूर कडीलः— रामेकर, पंडे, मोगाडे ( दळवी ), सुंभ, भास्कर ( फत्तेपुरी ), सौरंगपले, राणे, सोनटक्के, मार्कंडेय, महाकाळे, वाशीमकर, फुलझेले, क्षीरसागर, वऱ्हाडे. वऱ्हाडातील·—सातोकर, देवरणकर, अंबुलकर, अंजनकर, अलकारे, ग्वतकर, डागे, दलाल, खंडेराव पुण्याकडील — चेंदरे, काळे, उपाध्ये, महाबळी, क्षीरसागर, गोरक्ष, डोळे, इ. काळे, क्षीरसागर, वानखेडे, पंडे, सोनटक्के वगैरेसारखीं आडनावें वरील तिन्ही पंथीयात दिसतात

मध्यप्रांतातून पश्चिमेस महाराष्ट्राकडे जसजसें जावें तसतशी या जातीची निकृष्टावस्था अधिकाधिक दिसून येते मराठे कुणबी ( जखाई जोखाईचे पुजारी ), कोळी, वासुदेव वगैरे पुजारी लोकहि स्वतास गुरव म्हणतात. त्यांच्यावरून व विशेषतः वाजंत्र्यावरून सर्वच गुरव जातीची कल्पना बसविल्यामुळें त्यांच्यासंबंधीं पश्चिममहाराष्ट्रात बराच गैरसमज दिसून येतो. यात शिक्षणाचा अभाव असून गरीब लोकांचाच भरणा फार आहे. एकंदर संख्या पाऊण लाखाच्या आत बाहेर आहे. कै. रा. आबाजी दामोदर रामेकर, काशीनाथ भगवंत उपाध्ये, सीताराम दाजीबा पंडे वगैरे गृहस्थांच्या प्रयत्नानें गुरवात जागृति उत्पन्न होत आहे. १९१६साली सातारा येथें पहिली शिवब्राह्मण परिषद भरली तिचे रा. रा. सीताराम

दाजीवा पंडे हे अध्यक्ष होते [ लेखात रा. रा. दा. रामेकर, वकील, (अकोट) यांजकडून आलेल्या माहितीचा उपयोग केला आहे. शिवाय मुं.गॅ.; सेन्सस रिपोर्ट; रसेल व हिरालाल व एन्थोवेन पहा. ]

गुरु—सूर्यमंडळातील सर्वांत मोठा ग्रह. गुरु हा शुक्राच्या खालोखाल तेजस्वी आहे. जेव्हां त्याच्या अस्तोदयाची संधि असते तेव्हा मात्र तो बारीक दिसतो इतर वेळीं तो सहज ओळखितां येतो. याच्या अस्ताचा काल मंगल कार्यांत वर्ज्य केला जातो.

गुरूची आणि सूर्याची युति झाल्यापासून पुनः तशीच युति होण्यास सुमारें ३९९ दिवस लागतात. गुरु आपणास डोळ्यानीं लहानसा बिंदु दिसतो परंतु तो एवढा मोठा आहे कीं, आपल्या पृथ्वीएवढाले १३९० गोल एकत्र करावे तेव्हां गुरूएवढा एक गोल होईल. गुरूंतील द्रव्य पृथ्वीच्या सुमारें ३००पट आहे; अर्थात् पृथ्वीच्या३०० पट त्याचें वजन असलें पाहिजे. त्याची घनता सरासरीनें पृथ्वीच्या चतुर्थांश आहे. पृथ्वीच्या दोन अक्षप्रदक्षिणा जेवढ्या कालात होतात तेवढ्या कालात गुरुच्या पांच अक्षप्रदक्षिणा होतात. यामुळें गुरुवरील दिवस आपला ९ तास ५५॥ मिनिटां एवढा आहे. परंतु त्याचें वर्ष फार मोठें आहे. आपलीं बारा वर्षे होतात तेव्हां गुरूचें एक वर्ष होतें. सूर्यापासून पृथ्वीच्या पांचपट अंतरावर गुरु आहे. त्याचा दक्षिणोत्तर व्यास पूर्वपश्चिम व्यासापेक्षा सुमारें ५००० मैल कमी आहे. त्यामुळें ह्याचा आकार ध्रुवाकडे किंचित् चापट आहे.

गुरूच्या पृष्ठावर स्थाईक खुणा नाहींत असें म्हटलें तरी चालेल. इसवी सन १८७९ मध्यें त्याच्या दक्षिणगोलार्धांत एक तांबडा ठिपका दिसूं लागला. तो तसाच इसवी सन १८८३ पर्यंत दिसत होता व तो दीर्घवृत्ताकार होता. त्याचा बृहदक्ष विषुववृत्ताशीं समांतर व लघ्वक्षाच्या चौपट होता. त्याचें क्षेत्रफळ सुमारें आपल्या पृथ्वीएवढें होतें. त्यावरून गुरूचा अक्षप्रदक्षिणाकाळ काढिला आहे. त्यात असें दिसून आलें आहे कीं, गुरूचा विषुववृत्तवरील भाग जितका जलद फिरतो त्यापेक्षा ध्रुवाकडील भाग कमी वेगानें फिरतो. या गोष्टींत गुरूचें सूर्याशीं साम्य आहे. वर उल्लेखिलेला मोठा तांबडा ठिपका यानंतर गुरूवर बऱ्याच वेळा दिसून आला. गुरूवर विषुववृत्ताशीं समांतर असें कांहीं पट्टे आहेत कीं, ते चकचकीत दिसतात. विषुववृत्तावरच एक चकचकीत पट्टा दिसतो. त्याचा रंग बहुतकरून मोत्यासारखा दिसतो. त्याच्या उत्तर व दक्षिण भागीं जे पट्टे दिसतात त्याचा रंग तांबूस दिसतो. कधीं कधीं त्यात जांभळ्या रंगाची झाक मारते हे पट्टे त्याच्या ध्रुवापर्यंत गेले आहेत. ध्रुवाजवळचे प्रदेश बहुधा किंचित निळे दिसतात. गुरूचा पृष्ठभाग सतत सारखा असा दोन दिवस देखील नसतो. कांहीं भागाचा रंग वारंवार बदलतो.

ज्याप्रमाणें पृथ्वीला चंद्र हा एक उपग्रह आहे त्याप्रमाणें गुरूला आठ उपग्रह आहेत.पैकीं मोठ्या चारांचा शोध ग्यालिलिओनें लावला ( १६१० ). ह्या चोहोंच्या आंत एक पाचवा उपग्रह आहे. त्याचा शोध सन १८९२ च्या आगष्ट महिन्यात लागला. जगातील अति मोठी दुर्बीण अमेरिकेंत हॅमिल्टन पर्वतावरील लिक नावाच्या वेधशाळेंत आहे. तींतून हा ५ वा उपग्रह प्रथम दिसला १९०४ साली आणखी दोन लहान उपग्रह संशोधिले गेले. आठवा उपग्रह २८ फेब्रुवारी १९०८ रोजीं पी. जे. मेलोटे यानें संशोधिला.

गुरूवरून पहाणारास पहिल्या उपग्रहाची अक्षप्रदक्षिणा होण्यास १ दिवस, १८ तास, २८ मिनिटें व ३६ सेकंड इतका काल लागतो असें दिसतें. दुसऱ्याच्या अक्षप्रदक्षिणेस काल ३ दिवस १३ तास लागतो तिसऱ्याच्या अक्षप्रदक्षिणेस काल ७ दिवस, ४ तास लागतो आणि चवथ्याच्या अक्षप्रदक्षिणेस काल १६ दिवस१८तास लागतो. ह्या उपग्रहाच्या छायेनें गुरूला ग्रहण लागतें व गुरूच्या छायेनें उपग्रहास ग्रहणें लागतात.दुर्बिणींतून तीं ग्रहणें वारंवार पाहण्याची मोठी मौज असते. गुरूची कक्षा, त्याच्या उपग्रहाच्या कक्षा, आणि पृथ्वीची कक्षा यामध्यें सुमारें ३ अंशाचे कोन असतात. यामुळें उपग्रहांचीं ग्रहणें वारंवार होतात. कोणत्याहि पदार्थाचा प्रकाश आपल्या डोळ्यावर येईपर्यंत त्यास मधला मार्ग आक्रमण्यास कांहीं काल लागतो असा शोध गुरूच्या उपग्रहाच्या ग्रहणावरून लागलेला आहे. गुरूच्या उपग्रहास सूर्यापासून प्रकाश आणि उष्णता फार थोडी म्हणजे आपल्या पचविसाव्या हिश्शानें मिळते. गुरु आणि त्याचे उपग्रह ही एक लहानशी सूर्यमालाच म्हणण्यास हरकत नाहीं. गुरूच्या उपग्रहाची घनता गुरूपेक्षा जास्त आहे. गुरूच्या उपग्रहावर वस्ती असावी असें अनुमान करतात.

गुरु—या विषयावर विवेचन करताना शिल्पी वर्गांचें शिक्षण देणाऱ्या वर्गाचें विवेचन वगळलें आहे, आणि ब्राह्मण व क्षत्रिय या वर्गांचें शिक्षण देणारा वर्गच अनुलक्षिला आहे. या शिक्षक वर्गाचें ऐतिहासिक विवेचन करताना मंत्रकालाकडे प्रथम लक्ष जातें. मंत्रकालांत गुरु ही कल्पना फारशी विकसित झालेली दिसत नाहीं, का कीं, मंत्र स्वयंस्फूर्तीनें तयार होत किंवा अनुकरणानें होत. परंतु त्याच्या वाढीसाठीं पद्धतशीर शिक्षण देणाऱ्या वर्गाचें अस्तित्व शक्य दिसत नाहीं. बृहत्ग्रहसंस्थेचा म्हणजे संहितीकरणाचा काल आला तेव्हां मोठ्या वाङ्मयसंग्रहाचें अध्ययन, पठण, अभ्यास व विनियोग याचें शिक्षण देणाऱ्या वर्गाचा अवश्यकता उत्पन्न झाली. कारण यज्ञांची घटना अशी होऊं लागली कीं, तींत पुष्कळ दिवस परिश्रमपूर्वक शिकविणारा वर्ग असल्याशिवाय त्या विद्येंत प्रावीण्य शक्य नव्हतें. यामुळें विशिष्ट आचार्यांच्या अस्तित्वास अवश्यक अशी परिस्थिति उत्पन्न झाली यावेळच्या संहितीकरणकालीन

अनेक आचार्यांची नांवें आज उपलब्ध आहेत. आणि त्यांपैकी ज्यांच्या नांवावर विशिष्ट याग किंवा कोणतें तरी प्रचलित कर्म रूढ झालें त्यांची नांवें वेदविद्या विभागांत २१० व्या पृष्ठांत दिलीं आहेत त्यांत अंगिरस, गर्ग, अत्रि, कुसुरुबिंदु, बृहस्पति, नाचिकेता, वसिष्ठ इत्यादि नांवें प्रामुख्यानें सांगतां येतील. या आचार्यवर्गांमध्यें होत्यांच्या किंवा अध्वर्यूंच्या किंवा सामकांच्या कर्मांच्या शिक्षणाचा उपक्रम असावा अथर्व्यांची गुरुपरंपरा इतरांच्या गुरुपरंपरेइतकी बलवान् दिसत नाहीं. ज्यावेळीं यज्ञसंस्था जोरानें चालू होती त्यावेळेसच वादाचे अनेक प्रसंग येत व शिक्षणहि अधिक कारणमीमांसापूर्वक देणें अवश्य होई त्यामुळें त्रैविद्याच्या आचार्यपरंपरेंतूनच शिक्षादि सहा वेदांगें निर्माण झालीं आणि त्या वर्गांतूनच पुढें भारतीय शास्त्रीय शिक्षण देणाराचा वर्ग निघाला व तो आजपर्यंत चालत आला आहे आणि कदाचित् आजचाच वर्ग हा परंपरेचा शेवट म्हणतां येईल

श्रौतकर्मांविषयीं अनास्था किंवा जुगुप्सा ज्या वर्गांत उत्पन्न झाली तो वर्ग म्हटला म्हणजे आरण्यकांचा होय. या वर्गांमध्यें अध्यात्म विषयाची उपासना होऊं लागली आणि अध्यात्मविषय परंपरेनें सांगणारे शिक्षक उत्पन्न होऊं लागले. या शिक्षकांमध्यें जनक, याज्ञवल्क्य, यांचीं नांवें मुख्यत्वें देतां येतील अध्यात्म ज्ञानासंबंधांच्या अशा प्रकारच्या गुरुशिष्य परंपरा ब्राह्मणकालांतहि होत्या हें शतपथ ब्राह्मण, जैमि. उ. ब्राह्मण यांतील गुरुशिष्यपरंपरावरून दिसून येतें. या परंपराची माहिती बुद्धपूर्व जग (विभाग १ पृष्ठ ४३७) या भागांत दिली. या वर्गानेंच पूर्वमीमांसेखेरीज इतर दर्शनांची जोपासना केली. व त्यामुळें विशिष्ट दर्शनाचे आचार्य उत्पन्न झाले. श्रौतांचा आचार्यवर्ग आणि आरण्यकांचा आचार्यवर्ग हे एकमेकांपासून अगदीं पृथक् नव्हते. उदाहरणार्थ, याज्ञवल्क्य जैमिनि यांचीं नांवें दोहींकडेहि येतात आणि त्याचा परिणाम ज्ञानविकासावर झालाच आहे तो इतका कीं, मीमांसा हें शास्त्र जरी श्रौतांच्या परंपरेंतील आहे तरी तें आरण्यकीयांच्या दर्शनपरंपरेंत योजिलें गेलें आणि जेव्हां श्रौतसंस्था बंद पडल्या तेव्हां वेदांगें व दर्शनें मिळून होणारा शास्त्रसमुच्चय हा एका सामान्य वर्गास अभ्यासविषय झाला आणि श्रौती व पाठ म्हणणारे वैदिक एवढ्याचपाच हातीं श्रौतज्ञानाची परंपरा राहिली या स्थितींत हे दोन्ही अद्याप चालू आहेत.

आतां पुराणदृष्ट गुरुपरंपरेविषयीं विचार करूं. मांत्र संस्कृतीपासून निराळी असलेली जी सूतसंस्कृति त्या संस्कृतींतील वाङ्मयाचें मांत्रसंस्कृतीचा स्पर्श होऊन जें रूपांतर झालें तें आज आपणास इतिहासपुराणवाङ्मय म्हणून उपलब्ध आहे या वाङ्मयाकडे लक्ष्य देतां आपणांस दोन, तीन प्रकारच्या गुरुपरंपरांची कल्पना येते. सूतवर्ग आपला व्यवसाय गुरुपरंपरेनें चालवीत असे याविषयीं संशय नाहीं. परंतु दैत्यगुरु व देवगुरु यांचीं वर्णनें जीं येतात त्यावरून तें गुरुत्व कोणत्या प्रकारचें असावें याविषयीं कल्पना करतां येत नाहीं ते आध्यात्मिक गुरु असतील असें म्हणवत नाहीं. आणि असल्यास ते अध्यात्मशिक्षण कोणत्याप्रकारें देत असावेत याची कल्पना होत नाहीं. दैत्यासुरांच्या अध्यात्मिक परंपरेची ओळख आपणास इतिहासपुराणें करून देत नाहींत आणि देवांचीहि जवळ जवळ तीच कथा आहे देवगुरु जो बृहस्पति म्हटला आहे त्याच नांव जर एखाद्या विचारपरंपरेशीं संयुक्त असेल तर तें लोकायताशीं म्हणजे नास्तिक्याशीं होय महाभारतामध्यें गुरुगृहाच्या संघटनेविषयीं बरेंच विवेचन आहे. म्हणजे अनेक वर्षें विद्यार्थी गुरुकडे अभ्यास करतो, त्याच्या घरचीं अनेक कामें करतो आणि विद्यार्जन करून गुरुदक्षिणा देऊन निघून जातो हें चित्र आपणास धर्मसूत्रकालापासून दिसतें व यावरून हें सूतसंस्कृतींतील गुरुपरंपरेचें चित्र नसून श्रौतोत्तरकालाचें आहे व श्रौतोत्तरकालीन ब्राह्मणाकडून इतिहासवाङ्मयावर जो संस्कार झाला त्याचा हें द्योतक होय शिवाय महाभारतांत हजारों शिष्य बाळगणारा या कुलपतीचा उल्लेख आहे म्हणजे महाभारतांत गुरुकुलघटनेविषयीं बरेंच विवेचन दिलें आहे पण शिक्षणक्रमाविषयीं विवेचन फारसें नाहीं पण असें समजण्यास हरकत नाहीं कीं, शिक्षणविषयक जी माहिती सूत्रग्रंथ देतात तोच शिक्षणक्रम महाभारताच्या संपादकास अभिप्रेत असावा.

षड्दर्शनांचे सूत्रग्रंथ तयार झाले आणि त्यानंतर देशांत विशिष्ट मार्गानें मोक्ष मिळविण्यास साधक असे संप्रदाय तयार झाले कोणी योगमार्गी तर कोणी भक्तिमार्गी. हे संप्रदाय मुसुलमानी स्वाऱ्यांनंतर हिंदुसंस्कृतीचा उच्छेद झाल्यामुळें तर फारच बळावले कारण हिंदु विद्या शिकावयाची तरी कशाला, तिच्या योगानें राजाश्रय मिळत नाहीं. अशा स्थितींत हिंदु विद्या पारमार्थिक मार्गांचीच उपशाखा बनली व सर्व तद्वैत ज्ञान हें मोक्षसाधन मार्ग या नात्यानेंच जिवंत राहूं लागलें या परिस्थितींत गुरूचें महत्त्व तर फारच वाढलें शास्त्रीय ज्ञान देणारा गुरुवर्ग मोक्ष साधन करून देण्याचा बाणा वाढवूं लागला परपरेनें जीं बादरायण सूत्रें आलीं, त्यावर भाष्यें होऊन निरनिराळे पारमार्थिक संप्रदाय त्याच्याशीं संबद्ध होऊं लागले. जे संस्कृत ग्रंथ देशी भाषांत होऊं लागले त्यांतूनहि गुरूचें महत्त्व सांगणारे क्षेप येऊं लागले. उदाहरणार्थ, ब्रह्मोत्तरखंड ग्या ग्रंथाचा अनुवाद श्रीधरानें शिवलीलामृत म्हणून केला आहे ब्रह्मोत्तरखंडांत गुरूचें प्राबल्य नाहीं पण शिवलीलामृतांत गुरुमुखाशिवाय गति नाहीं वगैरे वाक्यें उच्चारलीं गेलीं आहेत मोक्षसाधनास विद्वत्तेची जरूर लागत नाहीं आणि व्यक्तीचें मोक्षसाधन हें ध्येय झालें व विद्वत्ता हें ध्येय राहिलें नाहीं. त्यामुळें लफंग्या लोकांस गुरुपद मिळविण्याची आकांक्षा उत्पन्न झाली. शिष्य विद्वान व सदाचारी असला तरी त्यानें एखादा गुरु हा केलाच पाहिजे, आणि तो गुरु दुराचारी असला तरी हरकत नाहीं

असलेलींहि वाक्यें उद्गीर्ण झालेलीं दिसतात. लिंगायतांसारख्या व जैनांसारख्या अपसृष्ट संप्रदायामध्यें तर गुरूंचें स्तोम फारच होतें. सांप्रदायिक कालामध्यें गुरूचें वाटलेलें महत्त्व समाजाच्या शैक्षणिक अधोगतीचें दर्शक आहे. सांप्रदायिक गुरूंपैकीं फारच थोड्यांस उच्च विचार किंवा ज्ञान यांच्या इतिहासांत स्थान देतां येईल.

गुरु व आचार्य या उपदेष्ट्यांशिवाय पुरोहित हाहि एक वर्ग अस्तित्वांत होता व यांच्याकडे कुलगुरुत्व असे रामायणकालीं वसिष्ठ हा रामचंद्राचा कुलगुरु होता व धनुर्वेद शिकविणारा गुरु विश्वामित्र होता

गुरु शब्दाचा वैदिक वाङ्मयात सूत्रापासून उल्लेख आढळतो. पारस्कर गृह्यसूत्रांत शिष्यानें गुरूच्या सन्निध उपाकर्म, उत्सर्जनादि कर्में करावीं व गुरूच्या आज्ञेनें समावर्तन करावें वगैरे उल्लेख आहेत. बौधायन गृह्यसूत्रांतहि अशा व प्रकारचे उल्लेख येतात आश्वलायन गृह्यसूत्रांत और्ध्वदेहिकप्रकरणीं गुरूचा उल्लेख आहे पारस्कर गृह्यसूत्रांतील उल्लेखावरून गृह्यसूत्रकालीं गुरुगृहीं अध्ययन करणें पूर्ण रूढ असून बरेच शिष्य एका ठिकाणीं अध्ययन करीत असलेलीं गुरुकुलें बरींच होतीं असें दिसत. अध्यापकास गुरु शब्दापूर्वी आचार्य शब्द असावा असें दिसतें. दशोपनिषदांपैकीं नारायणोपनिषद यामध्यें शिष्यानें गुरूजवळ कसें वागावें व कोणते नियम पाळावे याचा उल्लेख आहे. गुरु कसा असावा याबद्दल मनु, याज्ञवल्क्य या स्मृतींत बरेंच विवेचन आढळतें. पूर्वी उपनयन संस्कार गुरूच करीत असावा. परंतु पुढें गुरूच्या अभावीं पित्यानें तो संस्कार करण्याची चाल रूढ झाली अध्ययन समाप्तीनंतर गुरुदक्षिणा देण्याबद्दल सूत्रांत उल्लेख येतो. गुरुदक्षिणेच्या पौराणिक गोष्टी उत्तंक, कृष्ण बलराम वगैरेंच्या प्रसिद्ध आहेत. गुरूच्या शिष्यावरील अधिकारासंबंधानें विवेचन फारसें स्पष्टपणें केलेलें येत नाहीं शिष्याचें गुरूसंबंधीं कर्तव्य अमर्यादित दाखविण्याचा प्रयत्न दिसतो. पण त्याबरोबर शिष्यासंबंधीं गुरूचें कर्तव्यहि व्यापक दाखविलें आहे. प्राचीन शिक्षणविषयक माहितीसाठीं "शिक्षण" पहा.

**गुरुकुल**—आर्यसमाजपंथी लोकांची गुरुकुल ही एक शिक्षणसंस्था आहे कनखलपासून ह्या संस्थेचें ठिकाण तीन मैलावर आहे. बहुतेक रस्ता गंगानदीच्या पात्रांतूनच जातो. लाहोरच्या आंग्लोवैदिक दयानंदसरस्वती कॉलेजच्या चालकांत व दुसऱ्या कांहीं समाजपंथी लोकांत मतभेद होऊन ही संस्था अस्तित्वांत आली. ह्या संस्थेचे आद्यजनक लाला मुनशीराम किंवा हल्लींचे श्रद्धानंद हे होत ह्यांनीं आपला तीस पस्तीस हजार रुपयांची इस्टेट संस्थेप्रीत्यर्थ देऊन ह्या संस्थेचा पाया घातला हल्लीं ही संस्था पंजाबच्या आर्यप्रतिनिधि सभेच्या ताब्यांत आहे. ह्या ठिकाणीं दरवर्षी आर्यसमाजपंथी लोकांचें संमेलन भरतें. गुरुकुलाच्या आंतील व्यवस्थेकरितां एक अंतरंग सभा म्हणून लहान कमिटी आहे, तीच गुरुकुलाच्या आचार्यांची नेमणूक करते. हा आचार्य तेथील सर्व व्यवस्था पाहतो.

गुरुकुल विद्यालय ही शिक्षणसंस्था मुख्यतः वेद व संस्कृत भाषेच्या अध्ययनाकरितां आहे. तरी पण तेथें इंग्रजी वाङ्मय, अर्वाचीन शास्त्रें व तत्त्वज्ञानशास्त्रें ह्यांचें शिक्षण दिलें जातें. विद्यालयांतील शिक्षकांना दयानंदसरस्वतींनीं स्थापन केलेल्या आर्यसमाजाचीं तत्त्वें मान्य असलीं पाहिजेत. ज्यांचा उपनयनविधि झाला आहे अशा सर्व ब्रह्मचारी विद्यार्थ्यांस विद्यालयांत घेतलें जातें मात्र विद्यार्थ्यांचें वय सहा ते आठच्या दरम्यान असावें अध्ययनास लागणारी सर्व सामुग्री गुरुकुलच पुरवितें. येथें जातीजातींत भेदभाव मानला जात नाहीं.

या विद्यालयाचा शिक्षणक्रम १६ वर्षांचा आहे त्याच्या तीन पायऱ्या आहेत पहिला क्रम दहा वर्षांचा असून त्याच्या शेवटीं अधिकारी परीक्षा होते. या परीक्षेनंतर विद्यार्थ्यांला महाविद्यालयांत दाखल होतां येतें. तेथील अभ्यासक्रम चार वर्षांचा आहे महाविद्यालयांतून उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्याला 'स्नातक' ही पदवी देण्यांत येते यापुढें आणखी दोन वर्षांचा अभ्यासक्रम आहे. यांत विद्यार्थ्याला स्वतःसंशोधन करून निबंध लिहावा लागतो या कसोटीला जो उतरेल त्याला 'वाचस्पति' ही पदवी मिळते.

ह्या विद्यालयांत दानत व शरीरसामर्थ्य हीं वाढविण्याकडेहि चांगलें लक्ष पुरविलें जातें या विद्यालयांत जुन्या नव्याचा संगम घडवून आणण्याचा प्रयत्न केला आहे. ही संस्था आर्यसमाजाकरितां उपाध्याय व उपदेशक तयार करते.

**गुरुंग जात**—ही जात विशेषतः बंगाल—आसामांत आहे आसामांतील या जातीची लोकसंख्या सुमारें २० हजार आहे नेपाळांतील उत्तम लढाऊ राष्ट्रजातींपैकीं ही जात असून हे लोक आसामांतील प्रत्येक जिल्ह्यांतून सांपडतात. जैंटिआ व खासी टेंकड्यांतून ह्या लोकांची वस्ती जास्त असल्यामुळें तेथें एक गुरखा लोकांची तुकडी ठेविली आहे.

**गुरुगोविंद**.—शीखांचा दहावा गुरु. तेघबहादुरनंतर त्याचा मुलगा गुरुगोविंद हा गुरुपदावर आरूढ झाला. हा धोरणी व चलाख असून याच्या वेळेपासून शीखांच्या पंथांत नवीन मन्वंतर सुरू झालें लष्करी पद्धतीवर शीखांचें एक नवीन प्रजासत्ताक मंडळच त्यानें स्थापिलें असें म्हटलें तरी चालेल. गुरुगोविंद हा उत्कृष्ट उपदेशक व शूर योद्धा होता. आपल्या लोकांस शिकविण्याकरितां त्यानें नवीन प्रघात घातले. जातिभेद साफ नाहींसा करून सर्व लोकांस सारखें वागविण्याचे नियम केले, आपल्या अनुयायांस एक नवीन लष्करी पोषाख दिला व शिपाईगिरीची खूण म्हणून प्रत्येकानें आपल्याजवळ लोखंड बाळगावें, अंगावरील केस न काटतां ते वाढू द्यावेत असें त्यानें ठरविलें. हिंदूस खूप

ठेवण्याकरिता गोवधाची मनाई करून हिंदूंच्या देवतास मान देणें व ब्राह्मणांची प्रतिष्ठा राखणें इत्यादि गोष्टी ठरवून दिल्या. आजतागाईत शीखांची शौर्याबद्दल जी ख्याति आहे, तिचा उत्पादक हा गुरुगोविंद होय. आदिग्रंथाचा 'दसम पादशाही' नावाचा जो भाग आहे तो गुरुगोविंदसिंगाचा असून अहाल शीख या भागाला विशेष मानितात (आदिग्रंथ पहा) लढाईच्या प्रसंगीं 'वा. गुरुजीका खालसा,' 'वा. गुरुजीकी फत्ते,' अशा शब्दांचा उच्चार करण्याविषयीं गुरुगोविंदानें ताकीद दिली. 'खालसा' शब्दाचा अर्थ एका असा आहे. म्हणून आपण सर्व लोक एक असून गुरुशीं आपलें संगनमत आहे, असा वरील शब्दाचा अर्थ होतो. यावरूनच शीख फौजेस 'खालसा फौज' म्हणण्याचा प्रघात पडला. 'गुरमता' नावाचें एक शीख सरदारांचें मंडळ गुरुगोविंदानें स्थापिलें. औरंगझेबाच्या लष्कराशीं लढतांना गुरुगोविंद अगदीं टेंकीस आला. अखेरीस मोंगल फौजेनें गुरुगोविंदाचीं सर्व ठाणीं घेतलीं आणि नानाप्रकारें छळ करून त्याच्या पक्षाची अगदीं वाताहत करून टाकिली. तो अगदीं तेजहीन व हतवीर्य होऊन रानोमाळ भटकत फिरूं लागला आणि शेवटीं दक्षिणेंत नांदेड येथें त्याच्या एका शत्रूनें त्याचा खून केला (१७०८). गुरुगोविंद हाच शिखांचा शेवटचा गुरु होय [मु. रियासत, स्मिथ.]

**गुरुत्वाकर्षण**—कोणतेहि जड पदार्थ एकमेकास एकमेकाकडे ओढतात, या आकर्षणास गुरुत्वाकर्षण असें म्हणतात. दोन पदार्थांमधील अंतराच्या वर्गाच्या व्युत्क्रम प्रमाणात हें आकर्षण असतें आणि तसेंच हें आकर्षण त्या दोन पदार्थांमधील जडांशाच्या गुणाकाराच्या प्रमाणात असतें हा नियम प्रथमतः न्यूटननें शोधून काढला आहे तरी पदार्थांमध्यें आकर्षण घडत असावें अशा प्रकारचा तर्क न्यूटनच्या पूर्वी कित्येकांनीं केला होता. जॉन केप्लरनें आपले तीन नियम प्रसिद्ध केले, हे नियम बसविले त्यावेळेस सूर्याकडून काहीं तरी आकर्षण घडून येत असावें व त्यायोगानें ग्रह सूर्यासभोंवार प्रदक्षिणा करीत असावेत अशी त्याची समजूत होती. परंतु न्यूटनप्रमाणें पायाशुद्ध अशा रीतीनें या नियमाचें प्रतिपादन कोणींच केलें नाहीं. न्यूटनच्या समकालीन असलेले सी. हायगेंझ आणि आर. हूक यांनीं असें दाखवून दिलें कीं, केप्लरच्या तिसऱ्या नियमाचें वर्तन अंतराच्या वर्गाच्या व्युत्क्रमप्रमाणास अनुसरून आहे, परंतु हा व्युत्क्रमप्रमाणाचा नियम सार्वत्रिक लागू होण्यास केप्लरच्या तिन्ही नियमांचें वर्तन व्युत्क्रमप्रमाणास अनुसरून झालें पाहिजे, परंतु केप्लरच्या साऱ्या नियमास व्युत्क्रमाच्या नियमाची व्युत्पत्ति बसवितां न आल्यामुळें हा घोटाळा त्यावेळीं नितकाच राहिला. वरील शास्त्रज्ञांनीं असेंहि दाखविण्याचा प्रयत्न केला कीं, ज्या नियमाच्या योगानें सूर्याचें ग्रहावर आकर्षण घडतें त्याच नियमाच्या योगानें पृथ्वीचें चंद्रावर आकर्षण घडतें, परंतु या प्रयत्नास त्यांना म्हणावें तितकें यश प्राप्त झालें नाहीं, या कामीं न्यूटननें प्रथमतः यश संपादन केलें.

या सृष्टींतील सर्व नियमांत गुरुत्वाकर्षणाचा नियम अगदीं अपवादरहित असा आहे. दोन पदार्थांतील आकर्षण त्यांच्या जडांशाच्या गुणाकाराच्या प्रमाणात आणि त्यांच्या अंतराच्या व्युत्क्रमप्रमाणात असतें, असा जो गुरुत्वाकर्षणाचा नियम आहे त्याला अद्याप पावेतों एकहि अपवाद सापडला नाहीं. दुसऱ्या सर्व प्रकारच्या आकर्षणांत परिस्थितीप्रमाणें फेर पडतो. उदाहरणार्थ, दोन पदार्थ विद्युत्संचारित झाले असतां त्यांचें आकर्षण घडतें, परंतु ज्या दोन पदार्थांत आकर्षण घडलें त्यास सापेक्ष किंवा निरपेक्ष गति असल्यास त्यांच्यामधील आकर्षणांत फरक पडतो. जड द्रव्याची स्थिति बदलली किंवा दुसऱ्या कोणत्याहि प्रकारच्या परिस्थितींत जड द्रव्यास ठेऊन दिलें तरी गुरुत्वाकर्षणाच्या नियमांत रतीभरहि फरक पडत नाहीं. सूर्यमालेंतील ग्रहांपैकीं कित्येकास अत्यंत वेगानें गति आहे परंतु त्यांच्या या वेगामुळें गुरुत्वाकर्षणाच्या नियमांत यत्किंचित्‌हि फरक पडलेला आजपर्यंत दिसून आला नाहीं अशी आतापर्यंत समजूत होती. परंतु सर्व नियमाप्रमाणें गुरुत्वाकर्षणाचा नियमहि सापेक्ष आहे असें आइन्स्टीन यानें सिद्ध केलें आहे व याचा प्रत्यय ग्रहांच्या गतीवरून विशेषतः सूर्यग्रहणप्रसंगीं घेतां येतो. आणखी एक असा प्रश्न उपस्थित झाला आहे कीं गुरुत्वाकर्षण एका निमिषमात्रांत सर्वत्र ताबा बसवितें किंवा प्रकाशाप्रमाणें त्याला जाण्यास वेळ लागतो, परंतु आतापर्यंत ग्रहादिकांच्या विषयीं जें अवलोकन करण्यांत आलें आहे त्यावरून असें दिसून आलें आहे कीं, गुरुत्वाकर्षणाचा निमिषमात्रांत सर्वत्र प्रसार होतो. एकमेकास आकर्षण करणाऱ्या दोन जड द्रव्यांच्या वस्तूंच्या दरम्यान तिसरी जडवस्तू किंवा पडदा आल्यास त्यामधील आकर्षणास बाध येत नाहीं किंवा त्यामधील आकर्षणाच्या नियमबद्ध प्रमाणांत फरक पडत नाहीं. उदाहरणार्थ पुण्यांत एक धातूचा गोळा आहे आणि पाताळ लोकांतील (अमेरिकेंतील) पेरू देशांत दुसरा एक गोळा आहे तर दरम्यान पृथ्वी असतांनाहि त्या दोन गोळ्यांचें परस्परांवर गुरुत्वाकर्षणाच्या नियमास अनुसरून आकर्षण घडतें व दरम्यान पृथ्वी नसतांना ज्या प्रकारचें आकर्षण घडलें असतें त्याच प्रकारचें आकर्षण दरम्यान पृथ्वी असतांनाहि घडतें.

यावरून हें उघड होतें कीं, आतापर्यंत उपलब्ध असलेल्या सर्व सृष्टिनियमांत गुरुत्वाकर्षणाचा नियम जास्त सर्वव्यापी आणि मूलभूत असा आहे अर्थात् आइन्स्टीन यानें यास अपवाद दाखविला आहे. दोन पदार्थांमधील आकर्षण अंतराच्या वर्गाच्या व्युत्क्रमप्रमाणात असतें हा जो गुरुत्वाकर्षणाचा नियम आहे तो प्रत्यक्ष प्रयोगानें अद्याप पावेतों सिद्ध झाला नाहीं. खगोलशास्त्रवेत्त्यांच्या या दृष्टीनें झालेल्या अवलोकनावरून काहींच अनुमान बांधतां येत नाहीं.

असें याप्रकारचें अनुमान बांधता येण्यास कित्येक शतकें किंवा सहस्र वर्षेपर्यंत स्वस्थ ज्योतींचे वेध घेऊन अनुमान बांधलें पाहिजे असें जरी आहे तरी बुधाची गति चमत्कारिक आहे व या चमत्कारिक गतीचा उलगडा होण्यास पुटीत प्रमाणें गुरुत्वाकर्षणाच्या नियमांत किंचित् दुरुस्ति करावी लागते त्याकरितां असें समजावें लागतें कीं, ग्रह जो जो सूर्याच्या संनिध असतो तो तो ग्रह आणि सूर्य यांच्या दरम्यानचें आकर्षण वर्गाच्या व्युत्क्रमप्रमाणांत न होतां त्यापेक्षां कमी कमी प्रमाणांत होतें बुधाच्या बाबतींत २ (द्विघात म्हणजे वर्ग) हें प्रमाण न रहातां २ ०००००१६१२ घात या प्रमाणांत होतें

परंतु हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, नुसत्या बुधाच्या उदाहरणावरून असें म्हणतां येत नाहीं कीं, पदार्थांचें अंतर कमी झालें असतां आकर्षण कमी होतें, कारण याप्रमाणें दुसऱ्या ग्रहाच्या बाबतींत हेंच घडून आलें पाहिजे पृथ्वी आणि चंद्र यांचे वेध घेऊन शास्त्रज्ञांनीं हें सिद्ध केलें आहे कीं, चंद्र आणि पृथ्वी यांच्या दरम्यानचें अंतर बुध आणि सूर्य यांच्यामधील अंतरापेक्षां पुष्कळच कमी झालें असताहि त्यांच्या दरम्यानचें आकर्षण सूर्य आणि बुध यांच्या दरम्यानच्या आकर्षणापेक्षां कमी झालेलें दिसत नाहीं यावरून शास्त्रज्ञांनीं असें ठरविलें आहे कीं बुधाच्या बाबतींत दुसऱ्या कांहीं कारणानें आकर्षणाच्या विपयीं फरक पडलेला दिसतो आणि दोहोंच्या अंतराच्या वर्गाचा नियम अबाधित असावा पृथ्वीचें घनत्व आणि गुरुत्वाकर्षणाचें स्थिर (कान्स्टंट) परिमाण पुढें दिल्याप्रमाणें —

गुरुत्वाकर्षणाच्या नियमांत असें सांगितलें आहे कीं, $ज_1$ आणि $ज_2$ हे दोन जडपदार्थ एकमेकांपासून ड अंतरावर असेल तर त्यांच्यामधील आकर्षण होतें तें —

$$आकर्षण = \frac{ग \times ज_1 \times ज_2}{ड^2}$$

या प्रमाणांत असतें, वरील सूत्रात्मक समीकरणांत "$ज_1$" आणि "$ज_2$" हे त्या दोन वस्तूंचे जडांश आहेत "ग" हें गुरुत्वाकर्षणाचें स्थिरपरिमाण आहे, व "ड" हें अंतर आहे '$ज_1$' कडे '$ज_2$' ह्याची गति (वर्धमानता = ॲक्सिलरेशन) — $\frac{ज_1 \times ग}{ड^2}$ ह्या प्रमाणांत असते निरनिराळ्या ग्रहांचें सूर्याकडे जें आकर्षण होतें किंवा निरनिराळ्या उपग्रहांचें ग्रहाकडे जें आकर्षण होतें त्या आकर्षणासंबंधानें ज्योतिर्विदांनीं जे वेध घेतले आहेत, त्यावरून वर्धमान परिमाणाचा नियम सिद्ध होतो, या योगानें गुरुत्वाकर्षणाचा नियमहि सिद्ध होतो सूर्य आणि निरनिराळे ग्रह यांच्या दरम्यान जें आकर्षण होतें किंवा उपग्रह आणि ग्रह यांच्या दरम्यान जें आकर्षण होतें त्याच्या योगानें जें आकर्षणाचें प्रमाण येतें त्या योगानें पृथ्वीच्या जडांशाच्या किती पटीनें सूर्यमालेंतील ग्रहांचे आणि उपग्रहांचे जडांश आहेत हें काढतां येतें, परंतु पृथ्वीच्या ठिकाणीं किती जडांश आहे हें व्यावहारिक प्रमाणांत निघूं शकत नाहीं, त्याकरितां पुढील प्रकारचे प्रयोग करण्यांत आले आहेत, या प्रयोगाचे दोन प्रकार आहेत पहिल्या प्रकारच्या प्रयोगांत क्षितिजाशीं लंबरेषेंत असणाऱ्या ओळंब्याच्या (प्लंबलाइन) रेषेशीं शेजारच्या पर्वताचा किंवा दुसऱ्या एखाद्या वजनदार पदार्थाचा किती परिणाम होतो हें पाहतात, नंतर त्या पर्वताचें किंवा त्या पदार्थाचें वजन काढून त्या योगानें पृथ्वीचें वजन काढतात पृथ्वीचें वजन याप्रमाणें काढल्यावर गणितानें पृथ्वीच्या आकारमानावरून तिचें सरासरी घनत्व काढतां येतें दुसऱ्या प्रकारांत दोन जडवस्तूंवर परस्पराचें किती आकर्षण होतें हें काढून त्या योगानें शास्त्रीय परिमाणांत पृथ्वीचें कोणत्या प्रमाणांत त्या पदार्थावर आकर्षण होतें हें काढतात, त्या योगानें पृथ्वीचें वजन निघतें व या वजनाच्या योगानें पृथ्वीचें घनत्व काढतां येतें

पहिल्या प्रकारचा प्रयोग प्रथमतः बोगर यानें केला हा प्रयोग प्रथमतः म्हणण्यासारखा यशस्वी झाला नाहीं बोगर यानें हा प्रयोग इ स १७४० सालीं केला या शास्त्रज्ञाच्या मागून मास्केलान (१७७४), फ्रान्सिस्को कार्लिनी (१८२१), सर जी बी एअरी (१८५६), इ इ शास्त्रज्ञांनीं हा प्रयोग केला आहे या तऱ्हेच्या प्रयोगाची सामान्य दिशा संक्षेपतः सांगून दुसऱ्या प्रकारच्या प्रयोगाकडे वळूं या पूर्वपश्चिम असलेल्या एखाद्या पर्वताच्या रांगेच्या दक्षिणोत्तर बाजूला एक एक लंबक टांगून ठेवतात हे लंबक एकाच याम्योत्तर वर्तुलांत असले पाहिजेत कोणता तरी एक ठळक तारा घेऊन तो याम्योत्तर वृत्तांतून जात असतांना ओळंब्याच्या लंबरेषेशीं कोणता कोन करतो हें दोन्ही ठिकाणीं वेध घेऊन ठरवून त्यानें डोंगरानें किती आकर्षण घडवून आणलें हें काढतां येतें नंतर त्या डोंगराची अतिशय काळजीपूर्वक पाहणी करून त्या डोंगराचें वजन काढतात व या वजनाच्या योगानें पृथ्वीचें वजन काय आहे हें काढतां येतें.

दुसरी पद्धत अशी कीं एक दांडी समतोल राहील अशा रीतीनें तिच्या मध्यबिंदूपासून टांगून ठेवतात टांगण्याकरितां उत्तम स्थितिस्थापक तार घेतात नंतर तिच्या दोन्हीं टोंकास असलेल्या दोन गोलकाच्या समीप दोन शिशाचे गोळे ठेवतात या गोळ्यांच्या योगानें दांडीच्या टोंका वरील गोलावर आकर्षण पडून दांडी किंचित हलते याप्रमाणें हलण्याचा कोन अतिशय सूक्ष्म असतो हा कोन सुलभ रीतीनें मापतां यावा म्हणून या दांडीच्या मध्यभागीं एक आरसा बसविला असतो या आरशावर प्रकाशबिंदू पाडून त्यायोगानें जो कवडसा उत्पन्न होतो त्या कवडशाचें अतिसूक्ष्म कोनाच्या योगानें सुद्धां जास्त चलन होतें

याप्रमाणें कवडाशाच्या योगानें हा अति सूक्ष्म पीळ मोजतात. नंतर ते शिशाचे दोन गोळे दांडीच्या टोंकांपासून जरा दूर अंतरावर ठेवतात. या स्थित्यंतरामुळें दांडीच्या टोंकाचे गोळे विरुद्ध दिशेनें आकर्षिले जाऊन कवडाशा विरुद्ध दिशेनें हलतो. याप्रमाणें टोंकाच्या गोळ्यावर शिशाच्या गोळ्याचें होणारें आकर्षण मोजून काढतात. या आकर्षणाच्या योगानें पृथ्वीचें घनत्व काढतात.

तिसऱ्या पद्धतींत वरील दोन पद्धतींशिवाय आणखी एक पद्धत उपयोगांत आणली आहे.या पद्धतीला तुलापद्धति असें नाव आहे हींत एक तराजू केलेली असते.या तराजूस जी नेहमींचीं पारडीं असतात त्या पारड्याच्या खालींच दुसरीं दोन पारडीं जोडलेलीं असतात वरचीं पारडीं आणि तराजूची दांडी याच्या दरम्यान अगदीं थोडें अंतर ठेवलेलें असतें व वरची पारडी आणि खालची पारडी याच्या दरम्यान शक्य तितकें जास्त अंतर ठेवलेलें असतें अगदीं सारख्या आकाराचे मोठे शिशाचे गोळे वरील पारड्यात ठेवून तराजू समतोल करतात. नंतर एका पारड्यातील वजन खाच्या खालच्या पारड्यात ठेवतात व दुसऱ्या पारड्यातील वजन हलवीत नाहीं. असें केलें असता पृथ्वी आणि हे दोन गोळे याच्या दरम्यानचें पूर्वीचें समान अंतर नाहींसें होऊन त्याच्या ऐवजीं तें अंतर कमीजास्त होतें त्यामुळें पृथ्वीचें त्या गोळ्यावर कमजास्त प्रमाणात आकर्षण घडून एक पारडें जड होतें. हें किती जड होतें तें काढतात. दोन पारड्यातील अंतर मोजून त्या योगानें गुरुत्वाकर्षणाचें स्थिरपरिमाण काढता येतें. या प्रकारचे प्रयोग प्रथमतः व्हान जेला यानें केले. परंतु जेलच्या प्रयोगांनीं पृथ्वीचें घनत्व काढता आलें नाहीं. जेलीनंतर रिचार्झ, क्रिगार–मेंझेल, पायंटिंग इ. शास्त्रज्ञांनीं तुलापद्धतीनें प्रयोग करून पाहिले आहेत. या पद्धतीनें पृथ्वीचें घनत्व ५.४९३ इतकें आलें आहे. सारांश: वरील तिन्ही पद्धतीनें पृथ्वीचें जें घनत्व येतें त्याच्या दरम्यान थोडा थोडा फरक येतो. असा फरक कोणकोणत्या कारणानीं येतो याचें शास्त्रज्ञानीं मागोमाग विवेचन केलें आहे. खालीं दिलेले आकडे सध्याच्या शास्त्रीय मंडळात प्रचारात आहेत. ते असे:— पृथ्वीचें सरासरीचें घनत्व—५.५२७

गुरुत्वाकर्षणाचें स्थिरपरिमाण = $\frac{६.६५८}{१०^{८}}$

**गुरुदासपूर,** जिल्हा.—पंजाबमधील एक जिल्हा. क्षेत्रफळ १८२६ चौ. मै. याच्या उत्तरेला काश्मीर संस्थान आहे. रावीच्या पश्चिमेकडे जम्मू जवळचा काहीं भाग सोडून तो प्रदेश ओसाड व रुक्ष आहे. रावी नदी गुरुदासपूर व जाफर स्थान याची २५ मैलांचा सरहद्द आहे. लहान मोठे बरेच त्याचे प्रवाह डोंगराळ मुलुखातून वहात गेलेले आढळतात. माधवपूरपासून रावीमधून बारीदुआब कालवा काढला आहे तो डोंगरी मुलुखांतून मैदानात आल्यावर गुरुदासपूर शहरापाशीं त्याचे चार मोठाले विभाग होतात.

हवामान साधारणत चांगलें असतें पर्वतसांनिध्यानें उष्मा फार होत नाहीं तरी पठाणकोट तालुक्यात मलेरिआ वगैरे आजार नेहमीं असतात.

रावीच्या काठावर फार पुरातन कोरीव लेणीं आहेत तीं पांडवाचीं असावीं असें सांगतात. पठाणकोट येथें हिंदूचें राज्य होतें. १५५५ मध्यें कलानौर येथेंच बहरामखानानें अकबराला गादीवर बसविलें अकबरानें सूर वंशापासून हा भाग घेतला व जहांगीरचा बराच काळ याच भागात गेला असें शहाजहाननें शहानहर (राजवालवा) काढला. डेरा नानक या शहराचें नाव नानकावरून पडलें आहे. बंदा यानें आपल्या विक्रमाला सुरवात याच भागात केली व त्याच्या आणि मोंगलाच्या बऱ्याच झटापटी झाल्या.

यानंतर हा भाग काहीं दिवस अदीनाबेग याच्या हातीं होता त्यानें दिनानगर वसविलें त्यानें अहमदशाहा व दिल्लीचा बादशहा याना बरेच चकवलें. शेवटीं मराठ्यांच्या आश्रयान व सहाय्यानें हा लाहोर भागाचा गव्हर्नर झाला त्याच्यानंतर शीखाच्या विस्ताराला विशेष जोर चढला शीख संस्थानात आपसात बरेच दिवस झगडे चालले होते कधीं हा पक्ष तर कधीं तो पक्ष वरचढ होई. शेवटीं सर्व भाग रणजितसिंगानें एकत्र केले १८११ मध्यें कनया संस्थान जप्त झालें व १८४६ मध्यें बराच भाग इंग्रजास देण्यात आला १८४९ मध्यें बाकीचा भाग जप्त झाला व सर्वत्र इंग्रजशाही सुरु झाली. या भागाच्या घटनेंत बरेच वेळा फरक झाले १८५७ मध्यें येथें काहींहि गडबड झाली नाहीं १८६२ मध्यें जिल्ह्याची हल्लींची रचना झाली काहीं अर्वाचीन इतिहासकार म्हणतात कीं अलेक्झांडरचें सगल व कटईचा किल्ला हीं याच जिल्ह्यात असावींत पण हीं स्थानें निश्चित झालीं नाहींत इतर प्राचीन वस्तू बऱ्याच आहेत.

या जिल्ह्यात १० शहरें व २२३४ खेडीं आहेत. वस्ती (१९२१) ८५२१९२ गुरुदासपूर, शकरगड, पठाणकोट व बटाला हे चार तालुके आहेत

जमीनमहसुलाच्या पद्धती भैयाचारा व पट्टिदारी या आहेत. गहू, हरभरा, तांदूळ, मका हीं मुख्य पिकें आहेत. कालव्यांच्या वाढीबरोबर शेतीचीहि वाढ होत आहे. पण शेतीच्या पद्धतीत बियाण्याचा वगैरे फरक मुळींच होत नाहीं. गुरेंढोरें साधारण प्रतीचींच आहेत. शकरगड तालुक्यातले घोडे बरेच चांगले आहेत. एकंदर ११३३ चौ. मै. जमीन वहीत आहे पैकीं ३४४ चौ. मै. पाण्याखालीं आहे.

ककर (एक प्रकारची चुनखडी) व सोरा हेच काय ते खनिज पदार्थ आहेत. पठाणकोटपर्यंत नॉर्थ वेस्टर्न रेल्वेची शाखा जाते. रावी व बियासवरून नेहमीं १५१२० ठिकाणीं होड्या चालतात, पण त्यायोगें व्यापार फारसा होत नाहीं. धारिवाल येथें ग्र्यूइनर्टन नावाची प्रसिद्ध लोंकरीची गिरणी आहे. हातमागावरहि लोंकरीचा बराच माल होतो.

शाली व इतर ब्लँकेटें वगैरे होतात पण यांत्रिक कामापुढें हा धंदा चालवत चालला आहे सुती, रेशमी व लोकरीचें निर्भेळ व मिश्र अशा जातीचे कापड होतें साबण, सतरंज्या व गालिचे, चामड्याचे सामान, नीळ वगैरे, साखर, सुत रकाम व दारटोणी येथील दारू वगैरे माल तयार होतो धान्य, गळिताची धान्यें, कापूस, लोकरी कपडा, दारू वगैरे माल निर्गत होतो धान्य, तूप, कापूस लोखंड माल व कपडा या मालाची आयात होते बहुतेक व्यापार रेल्वेनेच होतो सियालकोट, जम्मू यांशी सडकेनें व्यापार होतो बटाला हें व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे हा जिल्हा शिक्षणाच्या बाबतींत फारच मागसलेला आहे

त ह सी ल—पंजाब गुरुदासपूर जिल्ह्यातला तालुका क्षेत्रफळ ४९६ चौ मै लो स (१९११) २२४५१५ यांत शहरें तीन व खेडीं ६६१ आहेत सारा व कर मिळून उत्पन्न ५१७ हजारांचें आहे रावी आणि बियास या नद्यांच्या बाजूची जमीन उत्तम आहे मधलीहि जमीन सुपीक असून तिच्यावर थोडेंबहुत जंगलहि आहे धारि वालच्या प्रसिद्ध लोकरीच्या गिरण्या याच तालुक्यांत आहेत

श ह र—याच नावाच्या जिल्हा व तालुक्याचें मुख्य ठिकाण उत्तर अक्षांश ३२° ३' व पूर्व रेखांश ७५°२५' लो स (१९११) ६२४८ येथील किल्ला शीख लोकांचा नायक बंदा यानें १७१२ च्या सुमारास बांधला तेथें हल्लीं सारस्वत ब्राह्मणाचा मठ आहे जिल्ह्यांत हें मध्यवर्ती शहर आहे पण व्यापारधंदा फार थोडा चालतो बहुतेक व्यापारी पठाणकोटचें बटाला हेंच मुख्य ठिकाण आहे गुरुदासपूर येथें १८६७ पासून म्युनिसिपालिटी आहे

गुरुहा (गरहा)—वायव्य विभागांतील एक प्रयोजित (बृहत्संहिता १४,२३) मदी गुलहा, गुरुहा व गुरुहा असे निरनिराळे याचे पाठ आहेत आपल्या भाषांतरांत कर्न म्हणतो —" गुरुहा (गरहादेशील) प्रीकांनीं उल्लेखिलेले गॅरो-इस लोक होत, ते नदीच्या जिल्ह्यांत गोर्यंआ म्हणत असत लॅसेन प्रीक नांवाचें गॅरीशीं साम्य दाखवितो गरहा व गुरुहा या दोन्हा नावांशीं दोन्ही रूपें बरोबर जुळतात

गुर्दा—मध्यप्रांत रायगड संस्थानांतील जमीनदाराचें गाव. ही जमीनदारी १२गावांची असून गुर्दा गाव जमीनदाराचें रहाण्याचें ठिकाण असल्यामुळें जमीनदारीस हें नांव पडलें आहे एकंदर क्षेत्रफळ ७२० एकर लो स २४०५ जमीनदार कंवार जातीचा असून त्यास ४६५४ रु टाकोळी द्यावी लागते

गुर्रमकोंडा—मद्रास कडाप्पा जिल्ह्यांतला एक जुना किल्ला हा गोवळकोंड्याच्या सुलतानांनीं बांधला असावा हा त्यावेळीं नादरयार व मजबूत होता ५०० फूट उंचीच्या टेंकडीवर हा बांधला आहे याच्या तीन बाजू सरळ उभ्या आहेत चवथ्या बाजूला तट व बुरुज वगैरे बंदोबस्त आहे खालीं सपाटीवर जुन्या राजाचा वाडा आहे. त्याचा अधिकाऱ्याकरतां डाकबंगला म्हणून उपयोग होतो

कर्नाटक बालाघाटचें हा किल्ला प्रथम मुख्य ठिकाण होता. १७६६ मध्यें मीरसाहेब याला मराठ्यांकडून जहागीर म्हणून हा मिळाला मीर हैदर अलीचा मेव्हणा होता १७९१ मध्यें किल्ला निजामानें घेतला व १८००मध्ये कडाप्पा जिल्ह्याबरोबर तो इंग्रजांच्या हवालीं केला

याला गुर्रमकोंडा (घोड्याचा टकडी) हें नाव कसें पडलें तें समजत नाहीं एक दंतकथा (कदाचित नांवावरून रचलेली) सांगते कीं या किल्ल्यांत पूर्वी एक घोडा असे व तो किल्ल्यांत आहे तोंपर्यंत किल्ला अभेद्य अशी समजूत होती एका वाडसी व शूर सरदारानें तो किल्ला घेणें सोपें जावें म्हणून मागच्या सरळ कड्यावरून वर प्रवेश करून घेतला व त्याच मार्गानें घोडा नेला अर्थात् पुढें तो किल्ला पडला किल्ल्याजवळ मुसुलमानी थडगीं व इमारती आहेत किल्लाहि सर्वथा मुसुलमानी बांधणीचाच आहे

गुलछबू—यास निशिगंध असहि नांव आहे हें एक सुवासिक फुलाचें झाड आहे याचे कंद असतात त्यापासून याची उत्पत्ति होते या झाडास केवड्यासारख्या पाती येतात त्यांतून एक दांडा २-२॥ हात लांबीचा निघतो व त्यास जो तुरा येतो त्या तुऱ्याला फुलें येतात हीं संध्याकाळीं फुलतात हीं फुलें लांबट, सफेत रंगाचीं, फार मधुर व देठाजवळ थोडीं वांकडी असतात

गुलतुरा—हें एक फुलझाड आहे ह्यास संस्कृतमध्यें शशोदरी, गुजराथींत गुलतुरी व मराठींत गुलतुरा म्हणतात याचीं पानें रानतरवडाच्या पानासारखीं असून यास पिंवळ्या किंवा तांबड्या रंगाचीं झुपकेदार फुलें येतात त्यास शक राचीं फुलें म्हणतात याचें लाकूड फार बळकट असतें व त्याचे जात्याकरितां खुंटे तयार करतात हें झाड बुंधा पासून तोडलें तरी पुन्हा पूर्ववत् जोरानें फुटतें या झाडाचा विस्तार सर्व बाजूंनीं छत्रा पसरतो व त्याचा गरा खालीं वाकतात यामुळें हें झाड फार शोभिवंत दिसतें व छाया गर्द होऊन जाते या झाडास बोटाइतक्या जाड चपट्या व चार पांच अंगुलें लांबीच्या शेंगा येतात त्यांत ७।८ दाणे असतात हे दाणे बरेच रुचकर असल्यामुळें मुलें आवडीनें खातात या झाडास कांटे असतात व हें झाड बियांपासून व कलमें लावून तयार होतात याच्या फुलास वास नसतो फुलाचा हंगाम आषाढ, श्रावण व भाद्रपद या महिन्यांत असतो एरवींहि बारमहा यास फुलें येतात या झाडास चक्रेश्वर, सकामुर, रानतुरा, कुंकुमकेशर, असेंहि म्हणतात

गुलबाशी—हें एक लहान झाड आहे त्याच्या मुळाच्या वरच्या बाजूस एक कांदा होतो त्यापासून किंवा बियांपासून झाडाची उत्पत्ति होते या झाडास संस्कृतमध्यें नक्ता, मराठींत व पर्शियनमध्यें गुलबाशी हीं नांवें आहेत हीं

" सदाफुली " असेंहि म्हणतात. या झाडाची पानें लांबट व मृदु असतात. गुच्छाशीत पांढरी, गुलाबी, पिवळी, तांबडी, केशरी वगैरे अनेक रंगांचीं फुलें देणाऱ्या जाती आहेत.

गुलबुर्गा. वि भा ग—हैद्राबादसंस्थानांतील एक विभाग, यालाच दक्षिणविभाग असें म्हणतात. सुभेदार गुलबर्गा येथें रहातो. क्षेत्रफळ २२११० चौ. मैल लोकसंख्या (१९११) ३६७३१७१. शेकडा ८८ हिंदु, ११ मुसुलमान व बाकी इतर-धर्मीय लोक आहेत. यांत गुलबर्गा, उस्मानाबाद, रायचूर व बेदर हे जिल्हे आहेत. या विभागांत ३२शहरें व ५५२१खेडीं आहेत. गुलबुर्गा, रायचूर हीं मोठीं शहरें आहेत. गुलबुर्गा, रायचूर, लातूर, तुळजापूर वगैरे व्यापाराचीं ठिकाणें आहेत. गुलबुर्गा, रायचूर, कल्याणी, उदगीर, अनागोंदी हीं इतिहास-प्रसिद्ध शहरें आहेत.

जि ल्हा—हैद्राबाद गुलबुर्गा विभागांतील जिल्हा. क्षे. फ. ६७१९ चौ. मैल.मुसुलमानी अमलापूर्वी हा जिल्हा वरंगळच्या काकतीयाच्या अंमलाखालीं होता. १४ व्या शतकांत महंमद तघलकाच्या ताब्यांत गेला. पुढें बहामनी राज्याचा अंमल कांहीं दिवस राहून त्याचा समावेश विजापूर बादशाहींत झाला. औरंगजेबाच्या स्वारीनंतर कांहीं दिवस येथें मोंगलाची सत्ता होती. पुढें असफजहानें त्याचा समावेश हैद्राबाद संस्थानांत केला.गुलबुर्ग्याचा किल्ला राजा गुलचंद यानें बांधला व मुसु-मानांनीं त्याची बरीच सुधारणा केली. हा किल्ला लष्करी-दृष्ट्या महत्त्वाचा होता. औरंगजेबानें बांधविलेल्या कांहीं मशीदी येथें आहेत. चितापुर येथें पोर्तुगीजांचें चर्च आहे.

शहरें व खेडीं मिळून गांवसंख्या १५९५ आहे. लोक-संख्या ११५०९८३. शेकडा८१ हिंदु, १५ मुसुलमान, शेकडा ५३ कानडी भाषा बोलतात.२५ तेलगु, १४ उर्दु व ६ मराठी भाषा बोलतात. १९०५ मध्यें इतर जिल्ह्यांशीं मुलुखांची अदलाबदल झालेली आहे. शेकडा ५८ लोक शेतीवर रहा-तात. कर्नाटकमध्यें कापसालायक काळी जमीन विपुल आहे. तेलंगणामध्यें रेताड जमीन बरीच आहे व काळी थोडी आहे. कर्नाटकांत पांढरी ज्वारी, गहु, हरभरा, कापूस आणि जवस, हीं पिकतात. तेलंगणांत पिवळी ज्वारी, बाजरी, तांदुळ, जवस, एरंड आणि ताग यांचें उत्पन्न होतें. तेलंगणांत भातलागवडीकरितां तलावच्या पाण्याचा उपयोग करितात.

येथें जमाबंदीची रयतवारी पद्धत आहे. २४२८ चौ. मैल.पैकीं (१९०१साली)१९५५ लागवडीखालीं होती. १२८ मैल लागवडीलायक असून पडीत होती.१२६मैल जंगलाखालीं आणि २०९ लागवडीलायक नसल्यामुळें पडीत होती. ज्वारी हें मुख्य पीक असून शेकडा ६४ इतकी जमीन या पिका-खालीं होती. बाजरी, कडधान्यांचीं धान्यें, कापूस, तांदुळ आणि गहूं हीं दुसरीं महत्त्वाचीं पिकें होत. येथील जनावरें साधा-रणतः बळकट आहेत. अंदोला तालुक्यांतील तट्टें चांगल्या प्रतीचीं आहेत.

चिंचोली तालुक्यांत ५१ चौ. मैल संरक्षित जंगल आहे. त्यांत साग व इतर इमारती लांकुड आहे. एकंदर जंगल ( संरक्षित व इतर मिळून ) १२६ मैल आहे. शहाबाद, चितापूर वगैरे ठिकाणीं फरशीचे शहाबादी दगड सांपड-तात. सुती व रेशमी साड्या आणि जरीचे कपडे व इतर कपडा हातमागावर तयार होतो. अंदोला व चिंचोली तालुक्यांत धनगरलोक टिकाऊ व जिगळाच्या घोंगड्या तयार करतात. गुलबुर्गा येथें कापड तयार होतें.

निर्गत माल.–ज्वारी,बाजरी इ. धान्य व कडधान्य,चामडीं, कापूस गळीताचीं धान्यें व तरवडाची साल. आयात माल.–मीठ,मासे,अफू,सोनें,रुपें, साखर,सूत, धातु ( लोखंड ) वगैरे माल. व्यापाराचें गुलबर्गा हें केंद्र आहे.लिंगाइत वाणी,कोमटी, मोमीन, मारवाडी आणि भाटिया यांच्या हातांत व्यापार आहे. या जिल्ह्यांतून जी. आय. पी. रेल्वे ५० मैल व निजाम रेल्वे ११५ मैल गेली आहे. एकंदर रस्त्याची लांबी ८९ मैल आहे.मुलकाच्या व्यवस्थेकरितां या जिल्ह्याचे तीन भाग केले आहेत, व त्या प्रत्येकांत दोन तीन तालुके आहेत प्रत्येक तालुक्यावर तहशीलदार आहे नाझिम इ-दिवाणी हा मदत न्यायाधीश ( जॉइंट मॅजिस्ट्रेट ) आहे. गुलबर्गा हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. या जिल्ह्यांत साधारणतः मोठाले गुन्हे होत नाहींत. परंतु दुष्काळांत दरवडे व गुरांच्या चोऱ्या होतात त्यांचें सरासरी (इ.स.१९०८)१७ टक्के आहे.गुलबर्गा येथें डिस्ट्रिक्टबोर्ड व म्युनिसिपालिटी आहे. इतर तालुक्यांत तालुकाबोर्डें आहेत. पहिला तालुकदार हा पोलिसचा मुख्य अंमलदार आहे.

गुलबर्गा येथील तुरुंगांत सतरंज्या, टॉवेल व इतर कपडा आणि तंबू वगैरे सामान तयार होतें. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा अत्यंत मागासलेला आहे. शेकडा फक्त २ लोकांना ( ३.८ पु. ४.११ स्त्रिया ) लिहितां वाचतां येतें.

ता लु का.—हैद्राबाद संस्थान गुलबर्गा जिल्ह्यांतील तालुका क्षे. फ (१९१०) ५७२ चौ. मैल. आणि लो. सं. २१२०३४. गुलबर्गा हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. तालुक्यांत २४१ गांवें असून ३७ जहागीर आहेत. यांचें सान्याचें उत्पन्न २.८ लाख. १९०५ मध्यें महागांव तालुका यांतच सामील कर-ण्यांत आला. या भागांत कापसाची उत्कृष्ट काळी जमीन आहे.

श ह र.—ही बाहमनीराज्याची राजधानी होती. उ. अ. १७°२१' व पू. रे. ७६° ५१'. राजधानी होण्यापूर्वी या गांवाचें नाव कुलबुर्गा असें होतें. तें पुढें हसनगंगु या बादशहानें अहसनाबाद किंवा हसनाबाद असें ठेविलें; परंतु गुलबुर्गा हेंच प्रसिद्ध राहिलें. हल्लीं यास, गुलबुर्गा-गुलबर्गा असेंहि म्हणतात. फारशी लिपींत 'क' आणि 'ग' यांचा नेहमीं घोटाळा होतो. निजामाच्या राज्यांत हल्लीं गांव असून तिकडील सरकारी कागदपत्रांत असेंच लिहितात कलबुर्गा, कुलबर्गा आणि

लोक ठार केले. मग त्यानें अलीगडास वेढा देऊन किल्ल्यास वेढा देऊन तो हस्तगत केला. नंतर तो आग्र्याला इस्मायल बेगच्या मदतीस गेला ( १७८८ ). ता. २४ एप्रिल रोजीं जाटांच्या व शिंद्यांच्या सैन्याचा इस्मायल बेग व गुलाम कादर यांनीं भरतपूरजवळ पराभव केल्यावर शिंद्याचा सरदार राणेखान यानें शाह व जाट यांना कादरच्या जहागीरी मुलखांत धुमाकूळ घालण्यास पाठविलें तेव्हां त्याच्या बंदोबस्तासाठीं गुलाम कादर इस्मायलला सोडून निघून गेला. आग्र्याच्या लढाईंत शिंद्यांनीं इस्मायलबेगचा पराभव केल्यानें तो दिल्लीस गेला, त्यावेळीं गुलाम कादरहि तेथें त्याच्या मागोमाग गेला, पण या दोघांनाहि बादशहानें शिक्यांत येऊं दिलें नाहीं. तेव्हां गुलाम कादरानें किल्ल्यांतील एका नोकरास लांच देऊन आपला आंत प्रवेश करून घेतला. येथें पुढें दोन महिनेपर्यंत गुलाम कादरानें जो अत्याचार केला, त्यासारखें दुसरें उदाहरण इतिहासांत कोठेंहि आढळून येणार नाहीं. त्यानें शहाअलम बादशहाजवळून होता नव्हता तेवढा सर्व पैसा लुबाडून घेतला, त्याची नाना प्रकारें विटंबना केली, त्याला पदच्युत केलें, व शेवटीं त्याचे डोळेहि काढले ( १० आगष्ट १७८८ ) तसेंच बादशहाच्या बेगमा, मुली, मुलें व त्याचे दुसरे नातेवाईक यांची देखील यानें विटंबना केली. सरतेशेवटीं त्याची सुटका करण्याकरितां मराठ्यांचें सैन्य दिल्लीस आलें. या अत्याचारास इस्मायल बेगची संमति नव्हती. पुढें मराठ्यांकडून त्याला जहागीर मिळण्याचें आश्वासन मिळताच तो त्यांना जाऊन मिळाला. शहाअलम यास पदच्युत केल्यावर कादरानें बेदरबख्तास तख्तनशीन केलें. मराठे दिल्लीनजीक येताच तो बेदरबख्तास घेऊन पळाला. राणेखानानें त्याच्या पाठलागास फौज रवाना केली. तेव्हां कादरानें मिरतच्या किल्ल्याच्या आश्रयानें कांहीं दिवसपर्यंत मराठ्यांपासून स्वतःचें संरक्षण केलें. परंतु शेवटीं अन्नसामुग्रीच्या तुटवड्यामुळें तो एकटाच एका चपळ घोड्यावर स्वार होऊन किल्ल्यांतून पळून गेला. परंतु वाटेंत घोड्यावरून पडल्यामुळें तो बेशुद्ध झाला असतां काहीं शेतकऱ्यांच्या हातीं पडला. शेतकऱ्यांनीं त्याला ओळखून तावडतोब मराठ्यांच्या छावणींत नेऊन त्याच्या स्वाधीन केलें. त्याला प्रथम मोठ्या बंदोबस्तानें कैदेंत ठेवलें व नंतर त्याचे हात, पाय, नाक, कान इत्यादि अवयव छाटून त्याला दिल्लीस बादशहाकडे पाठविलें, परंतु तो वाटेंतच मरण पावला ( डिसेंबर ). त्याचें थडगें आग्रा जिल्ह्यांतील भील गांवीं आहे [ डफ, वील-कोरि. बायों डिक्श ]

**गुलामगिरी,** उत्पत्ति —एका मनुष्याला दुसऱ्या मनुष्यावर केवळ मालमत्तेप्रमाणें अधिकार चालविण्यास परवानगी देणारी जी समाजव्यवस्थेंतील पद्धति तिला गुलामगिरी म्हणतात. तथापि मालकाचा गुलामावरील हक्क व अधिकार केवळ मालमत्तेवरील हक्काइतका अमर्यादित नसतो. जुन्या रोमन कायदेपद्धतींत व रोमनोत्तर आधुनिक यूरोपीय गुलामपद्धतींत मालकाचा गुलामावर पूर्ण अधिकार नसून केवळ गुलामापासून श्रम किंवा काम करून घेण्याचाच फक्त हक्क आहे. वेस्टरमार्कनें म्हटल्याप्रमाणें गुलामपद्धति ही केवळ औद्योगिक संस्था आहे. या अर्थानें अप्रगत व मागासलेल्या समाजांत विवाहित स्त्रियांची स्थिति गुलामासारखीच असते, आणि ज्या समाजांत स्त्रियांना गुलामाप्रमाणें राबविण्यांत येतें त्या समाजांत बहुधा गुलामपद्धतीचें अस्तित्व नसतें. पुढें प्रगत समाजांत एकदां गुलामपद्धति सुरू झाली म्हणजे मात्र स्त्रियांना गुलाम बनविण्यांत मालकाचा हेतु श्रम घेण्याचा नसून स्त्री या नात्यानें तिचा उपयोग करून घेण्याचा असतो. तसेंच प्राचीन व मागासलेल्या समाजांत कुटुंबांत जो एक मुख्य कर्ता इसम असतो तो स्त्रियांप्रमाणें कुटुंबांतील मुलांना व इतर कौटुंबिक व्यक्तींनाहि गुलामाप्रमाणेंच वागवितो. तथापि दोहोंत बराच फरक असतो. दुसरी गोष्ट अशी कीं राजकीयदृष्ट्या जित देश किंवा मानवसमाज आणि जेता देश किंवा मानवसमाज यांचा संबंधहि केवळ गुलामाप्रमाणें नसतो. तसेंच यूरोपांत प्रचलित असलेली 'सर्फडम' व गुलामपद्धति यांतहि बराच फरक आहे. प्राथमिक अवस्थेंतील जनसमाजांत गुलामगिरीचीं दोन स्वरूपें असतात. एक समाजांतर्गत व्यक्तींना गुलाम बनविण्याची पद्धति व दुसरी समाजबाह्य व्यक्तींना गुलाम बनविण्याची पद्धति. यांपैकीं समाजबाह्य व्यक्तींना गुलाम करण्याची पद्धति ही कालदृष्ट्या अगोदरची होय. कारण प्राथमिक अवस्थेंतील समाज समतेच्या नात्यानें बद्ध असतात. ते बहुतेक एकाच हाडामासाचे म्हणजे एकमेकांचे नातेवाईक असतात, आणि एका समाजांतील किंवा टोळींतील इसमांनीं आपसांत एकमेकांस गुलाम बनवूं नये असा सक्त नियमच केला जातो. अशा स्थितींत प्रथम गुलाम बनविण्याचा प्रसंग युद्धामुळें उत्पन्न होतो. युद्धांत कैद केलेले लोक हेच प्रथमचे गुलाम होत. मात्र आद्यकालीन मानवसमाज हे सदासर्वदा एकमेकांत लढत राहत असत व धींगामस्ती करून वागत असत अशी जी समजूत प्रचलित होती ती मात्र खरी नाहीं. प्रागैतिहासिक पुराणवस्तुसंशोधनशास्त्र आणि रानटी समाजाचें मानववंशशास्त्र यांतील शोधावरून असें सिद्ध झालें कीं प्राथमिक अवस्थेंतील समाजहि शांततामय जीवनक्रमाचा उपभोग खास घेत असत. हॉबहाऊस व त्याचे सहकारी यांनीं परिश्रमपूर्वक माहिती मिळवून असें सिद्ध केलें आहे कीं, 'अयुध्यमान' समाज या सदराखालीं अगदीं अप्रगतावस्थेंतील मृगयावृत्तीनें राहणारे समाज येतात आणि गुलामपद्धतीचें अस्तित्वहि नेमकें याच प्रकारच्या समाजांत नसतें असें सिद्ध झालेलें आहे. परंतु कालांतरानें निरनिराळ्या मानवसमाजांत लढाया होऊं लागल्यानंतर युद्धांत कैद केलेल्या लोकांना गुलाम बनविण्याची पद्धति सुरू झाली. अशा तऱ्हेच्या

गुलामांना वागविण्याची रीत जेत्यांना सोयीची पडेल अशी अमलांत आली हेंहि उघड आहे. अशा प्रकारच्या कैद्यांची जिवंत न ठेवतां कित्येकदां पूर्ण कत्तलहि करून टाकीत असत किंवा अशा जित लोकांना हाल हाल करून मारून खाणें किंवा खंडणी घेऊन सोडून देणें, किंवा कैद्यांची अदलाबदल करणें किंवा उदारपणानें अर्जावात सोडून देणें, किंवा गुलाम बनवून ठेवणें वगैरे अनेक प्रकार सुरू झाले. हल्लीं अस्तित्वांत असलेल्या रानटी जातींत हे सर्व प्रकार आजहि चालू आहेत.

तथापि कोणताहि मानवसमाज अर्थशास्त्रदृष्ट्या एका विशिष्ट प्रकारचा जीवनक्रम आक्रमूं लागल्याशिवाय गुलामपद्धति अमलांत आणीत नाहीं. उदाहरणार्थ, समाज जोंपर्यंत मृगयावृत्तीनें राहणारा आहे तोंपर्यंत गुलाम पाळण्याची पद्धति त्या समाजांत क्वचित्च दृष्टीस पडते. कारण अशा समाजांत कोणतेहि उद्योगधंदे सुरू झालेले नसल्यामुळें गुलामाकडून करून घेण्यासारखें काम कांहींच नसतें. उलट उदर भरणाकरतां प्रत्येकाला शिकार करण्यांत जिवापाड श्रम करूनहि स्वतःचें व बायकामुलांचें पोट भरणें जेमतेम शक्य होतें. आणि शिकारीसारखें काम गुलामाकडून करून घेणें अशक्यच असतें. कारण अशा स्थितींत त्याच्यावर देखरेख करणें अवघड असतें. त्यास पळून जाण्यास पुष्कळ संधि असते व उत्तम शिकाऱ्याचे गुण त्याच्या अंगीं नसतात. यानंतरच्या गोपालवृत्तीच्या समाजांत गुलामपद्धतीची सुरवात होऊं लागते. जनावरें सांभाळण्याचें काम करण्यासि मनुष्यांनाहि गुलाम बनवून त्यांकडून काम करून घेण्याचें कौशल्य साधूं लागतें. प्रत्यक्ष पुराव्यानें ही गोष्ट सिद्ध झाली आहे. पृथ्वीच्या पाठीवरील गोपालवृत्ती निम्याहून अधिक समाजांत गुलामपद्धति अस्तित्वांत असल्याचें आढळून आलें आहे. तथापि असे समाज वायव्य व ईशान्य आफ्रिकेच्या भागांत, काकेशसपर्यंत व अरबस्तान एवढ्याच देशांत असून सायबेरिया, मध्यआशिया, हिंदुस्थान व दक्षिण आफ्रिका या भागांतील गोपालवृत्ती समाजांत गुलामपद्धति अस्तित्वांत नाहीं. समाजाच्या प्रगतींतील यापुढची पायरी म्हणजे कृषीवलवृत्ति. या पायरीला पोहोंचलेल्या पृथ्वीच्या पाठीवरील सर्व समाजांत गुलामपद्धति सर्वत्र रूढ असलेली आढळते. तथापि गुलामपद्धति जेथें नाहीं असेहि शेतकी करणारे पुष्कळ समाज आहेत. शिवाय ज्या देशांत बिनमालकीची पडीत जमीन पुष्कळ आहे तेथें कोणी कोणाचा गुलाम बनून न राहतां स्वतः स्वतंत्रपणें जमीन करून उपजीविका चालवितो. परंतु देशामध्यें सर्व जमीन खाजगी मालकीची बनून मोठा जमीनदार वर्ग तयार झाला म्हणजे शेतकीचें काम करणाऱ्या मजुरांची किंवा गुलामांची जरूरी भासूं लागते, व अत्यंत कमी खर्चाचे मजूर केवळ गुलाम मिळविण्याची खटपट जमीनदार वर्गांत सुरू होते आणि युद्धांत कैद केलेल्या लोकांस गुलाम बनविण्याची पद्धति जोरानें सुरू होते. समाजांतील व्यक्तींनी गुलाम बनविण्याची ही रूढी वाढतां वाढतां समाजांतर्गत व्यक्तींनांहि गुलाम बनविण्याचा मोह उत्पन्न होतो. असे गुलाम बनविण्याचे मुख्य मार्ग दोन. एक कर्जदारी व दुसरा गुन्हेगारी. कर्ज फेडूं न शकणाऱ्या ऋणकोला ठार मारण्याची चाल फार क्वचित आढळते. उलट अशा ऋणकोंना गुलाम म्हणून सावकाराच्या ताब्यांत देण्याची रूढी पुष्कळ आढळते. अशा वेळीं ऋणको स्वतः गुलाम न बनतां स्वतःच्या बायकोला किंवा मुलांना गुलाम बनविण्याची रूढी पडतात. गुन्हेगाराला किंवा त्याच्या नातेवाईकांना गुलाम करणें हा एक मार्ग होय.

**गुलामाची स्थिति व वागणूक.**—तात्त्विक दृष्ट्या मालकाची गुलामावर पूर्ण सत्ता असते हें खरें. तथापि व्यवहारतः मालकाची ही सत्ता फार मर्यादित झालेली असते. रूढी व लोकमत यांच्या दडपणामुळें गुलामाच्या कित्येक हक्कांना मान देणें मालकांना भागच पडतें. जिवंत ठेवणें किंवा ठार मारणें या हक्कासंबंधानें पाहतां युद्धांतील कैद्यांना गुलाम बनविलेले असल्यास तो हक्क मालकांना न्याय्यतःच प्राप्त होतो. तथापि मालकाशिवाय इतर कोणासहि गुलामास ठार मारण्याचा अधिकार नसतो, इतकेंच नव्हे तर गुलामाला ठार मारण्याच्या गुन्ह्याबद्दल मालकाला नुकसानभरपाई मागतां येते. पुढें अशा गुलाम स्त्रीपुरुषांपासून जन्मास आलेल्या गुलामांना ठार मारण्याचा अधिकार मालकाकडे उरत नाहीं. पाहिजे तर असे गुलाम दुसऱ्यास विकून टाकण्याचा हक्क मालकास असतो. यानंतरची पायरी म्हणजे गुलामाकडून कांहीं ठराविक मर्यादेपर्यंतच काम करून घेण्याचा अधिकार असतो. पुढें गुलामाला स्वतःच्या मालकीचें असें द्रव्यार्जन करण्याचा अधिकार प्राप्त होतो. इतकी मजल गेल्यावर उपार्जित द्रव्याच्या साहाय्यानें स्वतःचें स्वातंत्र्य गुलाम विकत घेऊं शकतो. कित्येक गुलामपद्धतींत एका मालकाच्या गुलामगिरीऐवजीं दुसऱ्या मालकाची गुलामगिरी पत्करण्याचा हक्कहि गुलामास दिलेला आढळतो. वागवण्यासंबंधानें पाहतां युद्धांतील कैद्यांचे बनवलेले गुलाम किंवा परकीय समाजांतून विकत घेतलेले गुलाम आणि मालकाच्या घरांत जन्मास आलेले गुलाम यांना मालक निरनिराळ्या प्रकारें वागवतात. घरांत जन्मलेल्या गुलामांना इतरांपेक्षां फार सौम्यपणानें व सदयतेनें वागविण्यांत येतें. तसेंच गृहकार्य करणाऱ्या गुलामांना शेतकाम करणाऱ्या गुलामांपेक्षां फार अधिक सवलती मिळतात. आफ्रिकेंतील नीग्रो गुलामांना अमेरिकन वागविण्याची अलीकडील रीत सर्वांत अधिक क्रूरपणाची असल्याचें सिद्ध झालेलें आहे.

**गुलामपद्धतीचे परिणाम.**—गुलामपद्धतीपासून मानवसमाजाला बहुविध फायदे झाले असल्याचें कित्येक लेखक प्रतिपादन करतात. त्यापैकीं एक मोठा फायदा असा झाल्याचें टीली व पोंड हे लेखक सांगतात की, सतत शारीरिक कष्टानें काम करण्याची संवय मनुष्यजातीला गुलामपद्धतीमुळें लागली. मनुष्य स्वभावतः आळस्यप्रिय

असल्यामुळें त्याला दीर्घोद्योग करण्याची सवय लावण्याचें काम अत्यंत कठीण होतें, व हें कठीण काम गुलामपद्धतीनें केलें आहे. तथापि गुलामांना सतत परिश्रम करण्याची लागलेली सवय त्यांच्या वंशांत उतरून आतां मानववंशांत कायम बनली आहे हें विधान चुकीचें आहे. कारण जीवशास्त्राचा असा सिद्धान्त आहे कीं, जे गुण मनुष्यानें संपादन केलेले असतात ते वंशामध्यें संक्रमण पावत नाहींत. म्हणून दीर्घोद्योगिता हा गुण मानवजातीला गुलामपद्धतीमुळें लाभला हें म्हणणें शास्त्रसंमत नाहीं. गुलामपद्धतीमुळें अर्थशास्त्रांतील सुप्रसिद्ध श्रमविभागाचें तत्त्व अमलांत आलें हें म्हणणें खरें आहे. समाजामध्यें सत्ताधारी व मालक वर्ग आणि कामकरी व नोकर वर्ग असे दोन विभाग गुलामपद्धतीमुळें उद्भवले असें म्हणतां येईल. तसेंच या गुलामपद्धतीमुळें सत्ताधारी मालक वर्ग उत्तरोत्तर अधिक श्रीमंत होऊन मोठा बलाढ्य बनला व समाजांतील वरच्या दर्जाच्या वर्गांमध्यें प्रत्यक्ष स्वहस्तानें परकाम, किंवा कोणतेंहि उद्योगधंद्याचें काम करण्याचा कंटाळा किंवा तिरस्कार या गुलामपद्धतीनेंच उत्पन्न केला.

विस्तार — पृथ्वीच्या पाठीवर कोणकोणत्या देशांत गुलामपद्धतीचा प्रसार होता तें आतां पाहूं.

हिंदुस्थान — पूर्वकाळीं दास होते किंवा नाहीं हा एक महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो. अंगमेहनतीचीं कामें बहुधा दास नांवाच्या विशिष्ट वर्गाकडून घेण्याचा संप्रदाय सर्व देशांत पूर्वकाळीं चालू होता. त्याप्रमाणें हिंदुस्थानांतही वैदिककाळीं कदाचित् चालू असेल. ऋग्वेदामध्यें दास व दासी दान दिल्याचे उल्लेख आढळतात. त्रसदस्यूनें सोभरीस ५० स्त्रिया दान दिल्या (८.१९,३६). पण दास हे गुलाम स्थितींत व केव्हां होते हें प्रत्येक वेळेस पुरावा तपासून ठरविलें पाहिजे.

शूद्राचा विशिष्ट धंदा म्हणजे त्रैवर्णिकाची अथवा जेत्या आर्यांची सेवा करणें हाच ठरविलेला होता. 'परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम्' असें भगवद्गीतेंत म्हटलें आहे. याशिवाय आर्य लोकहि जिंकिले गेले म्हणजे दास होत असत असें भारतीयुद्धकालीं दिसतें. मग हें जिंकणें युद्धांत असो किंवा द्यूतांत असो. अर्थात् द्यूतांत जिंकणें म्हणजे स्वतःला पणाला लावून जिंकलें गेल्यास दास होणें असाच प्रकार असे. पांडवांनीं आपल्यास स्वतःस पणास लावलें तेव्हां ते दास झाले. या रीतीनें पणाला लावण्याचा प्रकार महाभारतकालींसुद्धां असावा. कारण मृच्छकटिकांतहि असा प्रकार झालेला वर्णिला आहे. युद्धांत जिंकून शत्रूस ठार मारण्याच्या ऐवजीं त्यास दास करण्याचीहि चाल क्वचित् असावी. कारण वनपर्वांत भीमानें जयद्रथास जिंकून बांधून आणला आणि 'यास पांडवांचा दास केला आहे असें द्रौपदीस कळवा' असा निरोप पाठविला (वनपर्व अ. २७२). अर्थात् असा दास करण्याचा संप्रदाय क्वचित् असावा असें दिसतें. क्वचित् म्हणण्याचें कारण असें आहे कीं याप्रमाणें आपल्याच मानवबंधूस दास करण्याची आर्य लोकांस गोडी किंवा इच्छा नसावी. दास झाला म्हणजे त्यास सर्व प्रकारचें सेवारूप कर्म करावें लागे, इतकेंच नव्हे तर त्याची स्वतंत्रताहि आणि किंबहुना धर्मजातहि भ्रष्ट होत असली पाहिजे. द्रौपदी दासी झाली असें मानलें तेव्हां तिला पाहिजे त्या रीतीनें किंबहुना बटकीप्रमाणें वागविण्याचाहि हक्क उत्पन्न झाला असें समजलें जात असे. अर्थात् क्षत्रिय लोकांत किंबहुना एकंदर आपले लोकांस दास करण्याची तऱ्हा भारतीयुद्धकालींहि नव्हती. दोन्ही प्रसंगीं या जिंकलेल्या आर्य क्षत्रियास दास्यापासून मुक्त करून सोडून दिलें आहे. यावरून असें दिसतें कीं भारतीयुद्धकालीं युद्धाचा जरी कडकडीत नियम कोठें कोठें चालू होता तरी तो हळूहळू बंद पडला. महाभारतकालीं पाश्चात्य देशाप्रमाणें परदेशांतील लोकांस व स्वदेशांतील लोकांस जिंकून दास अथवा गुलाम बनविण्याची चाल हिंदुस्थानांत नव्हती. घरकामाकरितां दास व दासी ठेवण्याचा प्रघात प्राचीन काळापासून आपणांस पेशवाईपर्यंत आढळतो. तसेंच भडोच बंदरांत गुलाम व सुंदर स्त्रिया बाहेरून येत असत व येथून बाहेर जात असें पेरिप्लसमध्यें वर्णन आढळतें (ज्ञानकोश विभाग १ पृ. २९९).

ही चाल ग्रीस रोम, इजिप्त वगैरे देशांत त्या काळीं चालू होती आणि त्या देशाचे इतिहास वाचले म्हणजे आज सुस्थितींत असलेले हजारो स्त्रीपुरुष त्या जिंकले गेल्यामुळें भयंकर दास्यत्वांत किंवा गुलामगिरींत कसे पडत हें वाचून आपल्यास सदैव आश्चर्य वाटतें. कोणत्याहि शहराला वेढा पडून शहर जिंकून हस्तगत झालें म्हणजे तेथील लढवय्ये पुरुषांची कत्तल व्हावयाची व त्यांच्या सुंदर स्त्रिया गुलामगिरींत जावयाच्या असा नियमच असे. होमरमध्येंहि असेंच वर्णन वारंवार येतें आणि ग्रीक लोक आपल्या वीरांस तुम्हांस ट्रॉयमधील सुंदर स्त्रिया उपभोगास मिळतील असें प्रोत्साहन देत असत. प्रसिद्ध हेक्टरच्या पत्नीस आपलें शेष आयुष्य दास्यत्वांत घालवावें लागलें. असा प्रकार महाभारतकालीं हिंदुस्थानांत मुळींच नव्हता असें म्हटलें असतां चालेल. हिंदुस्थानांत पाश्चात्य देशांतल्याप्रमाणें गुलामगिरी नव्हती हें पाहून ग्रीक लोकांस आश्चर्य वाटलें आणि त्यांनीं आपल्या ग्रंथांत ही गोष्ट नमूद करून ठेविली आहे. हिंदुस्थानांतील लोक स्वतःस किंवा परदेशांतील लोकांस दास अथवा गुलाम करीत नाहींत. ते स्वतः स्वतंत्र असून दुसऱ्याचें स्वातंत्र्य हिरावून घेण्याची त्यांची इच्छा नसे असा ग्रीक इतिहासकाराचा पुरावा आहे. या जोडपुराव्यावरून महाभारतकालीं दास अथवा गुलाम फारसे नसावेत. दास म्हणजे शूद्र असा अर्थ महाभारतकालीं ठरीव दिसतो. '(गौर्वोढार वाजिनार तुरंगी शूद्रा दास ब्राह्मणी याचकच)' गाईपुत्रास जन्मेल तर तो ओझेंच ओढील, आणि

घोडी प्रसवेल त्यास द्यावें लागेल. शूद्र स्त्री पुत्र प्रसवेल तर त्यास दास व्हावें लागेल आणि ब्राह्मणी पुत्र प्रसवेल त्यास भीकच मागावी लागेल. या श्लोकांत वर्णिलेलें मर्म फार मजेदार आहे. दास म्हणजे शूद्र असेंच यावरून दिसतें, आणि शूद्राचें कामहि परिचर्येचें असें ठरलें होतें. तरी सर्वच शूद्र सेवा करीत होते असें नाहीं. ज्याप्रमाणें सर्वच ब्राह्मण भिक्षा मागत नाहींत त्याप्रमाणें सर्वच शूद्र दास नव्हते. कित्येक स्वतंत्र धंदा करून पोट भरीत असत व त्याजवळ द्रव्यसंचयहि होत असे. ते श्राद्धादि कर्में करण्यासही योग्य आहेत असें ठरलें होतें व दानहि करीत असत. पण त्यास तपश्चर्या करण्याचा अधिकार नव्हता. सर्वच शूद्र दास नव्हते पण सर्वच दास शूद्र होते ही गोष्ट मात्र खरी होती. शूद्राशिवाय इतरांकडून नोकराचीं कामें महाभारतकाळीं घेत नसत असें दिसतें. ब्राह्मण शूद्राचीं कामें करूं लागतील हा कलियुगांतील भयंकर प्रसंग होय. अशा रीतीनें शूद्राचाहि दरजा पाश्चात्य देशांतील दासांपेक्षां अधिक श्रेष्ठ होता. त्यास मारहाण करण्याचा मालकास हक्क नव्हता. त्याचा प्राण घेईपर्यंत पाश्चात्य देशांत हक्क असे, परंतु येथें तशी स्थिति मुळींच नव्हती. किंबहुना येथें दास नव्हतेच असें मानलें पाहिजे. गृहस्थानें नोकरचाकरांस अन्न घालून नंतर आपण जेवावें येथपर्यंत नियम महाभारतांत आहेत. शूद्रास जुनें झालेलें वस्त्र द्यावें असा नियम होता. तसेंच जोडा, छत्रा, पडदे, वगैरे जुन्या वस्तू द्याव्यें. शूद्राला द्रव्यसंचय करण्याचा अधिकार नाहीं. त्याचें द्रव्य म्हणजे मालकाचें ही गोष्ट दासालाच लागू आहे. ब्राह्मणाकडे शूद्र आला असतां त्याचें पोषण केलेंच पाहिजे, किंबहुना तो अनपत्य मरेल तर त्याला पिण्डहि द्यावा असें सांगितलें आहे (शां. प. अ. ६. भा. पु. ६ पान १२०). शूद्रानें म्हणजे दास नसेल त्यानें अमंत्रक पाकयज्ञ करावा वगैरे वर्णन आहे. अर्थात् दास्याचें स्वरूप शूद्राच्या परिस्थितीचें मुळींच नव्हतें. तथापि दास्य हें दास्यच होय आणि सप्तर्षींच्या कथेंतील (अनु. अ. ९१) त्यांचा शूद्र सेवक शपथ वहातांना असें म्हणतो कीं, 'मी पुन्हां पुन्हां दास जन्मास येवो,' तर अशा घरच्या शूद्र सेवकास व दासास कोणतेंच वेतन देत नसत. अन्नवस्त्र हें त्याचें वेतन असे.

अशा शूद्र दासाशिवाय अन्य मजूर असलेच पाहिजेत व निरनिराळे धंदेवाले शिल्पीहि असलेच पाहिजेत. कोळी, कोष्टी, सुतार, वगैरे कारागिरीहि असलेच पाहिजेत. त्यांना वेतन काय देत असत याचा खुलासा होत नाहीं. बहुधा शेताच्या कामांत मजुराचा उपयोग होत नव्हता. महाभारतकाळीं शेती करणारे उद्यमी वैश्यच असत. अशाच लोकांपैकीं जाट वगैरे हल्लींचे लोक आहेत व दक्षिणेकडील शेतकरी मराठे हेहि असेच आर्य आहेत. हे पैकीं शूद्रदासांच्या सहवासानें शेताचा सर्व धंदा करीत. उद्यम, शिल्पें व शेती करणारे लोक शूद्र समजले जाऊं लागण्याचें मुख्य कारण असें कीं, शूद्रत्व आणि द्विजत्व यांतील भेद कर्ममूलक न सस्कारमूलकच झाला.

कौटिल्याच्या काळीं गुलाम म्हणून स्वतःला किंवा दुसऱ्याला विकतां येत असे, पण या गुलामांना चांगल्या रीतीनें वागविण्यासंबंधीं व त्यांचे सर्व वारसाचे हक्क देण्यासंबंधीं सरकारी नियम असत. गुलामाला स्वतंत्रता मिळवितां येई. गुलामाची संतति 'आर्य' म्हणून समजली जात असे. गुलाम स्त्रीला यजमानापासून मूल झाल्याबरोबर ती व मूल स्वतंत्र म्हणून गणलीं जात. कोणाहि 'आर्य' मनुष्याला गुलाम बनविण्याबद्दल कडक शिक्षा असे.

मनुष्य गुलाम बनण्याचीं कारणें मनुस्मृतींत सात व नारदस्मृतींत पंधरा सांगितलीं आहेत. त्यांत युद्धांतील कैद, कर्जदारी, गुन्हेगारी, दारिद्र्य, दुष्काळ, गुलाम आईबापाच्या पोटीं जन्म हीं प्रमुख आहेत. स्वतःच्या मुलांना गुलाम म्हणून विकण्याची चाल प्राचीन समाजांत होती. हिंदुधर्मशास्त्रांतील दत्तकपद्धति ही याच चालीपासून निघाली असावी. गुलामपद्धतीचा दुसरा एक प्रकार म्हणजे हिंदुसमाजांतील शूद्र व अतिशूद्र जाति हा होय. याप्रमाणें हिंदुस्थानांत गुलामपद्धति निरनिराळ्या स्वरूपांत ब्रिटिश अमदानीपर्यंत चालू असल्याचें आढळतें. ती कायद्यानें बंद करण्याचें काम ब्रिटिश सरकारनें हळूहळू केलें. १८११ मध्यें परदेशांतून आणलेले गुलाम येथें विकण्याची मनाई करण्यांत आली. १८४३ मध्यें सरकारी अधिकाऱ्यांनीं कोणत्याहि प्रकारची गुलामपद्धति कायदेशीर मानूं नये असें ठरलें आणि १८६० पासून इंडियन पिनल कोडांत कोणत्याहि इसमाला गुलाम म्हणून विकणें किंवा खरेदी करणें गुन्हा ठरवून त्याला शिक्षा सांगितलेली आहे. गुलामपद्धतीशीं सदृश असलेल्या मुदतबंदी मजूरपद्धतीची माहिती स्वतंत्र लेखांत दिली आहे.

ग्रीस.—इतर देशांतल्याप्रमाणें ग्रीसमध्यें गुलामपद्धति दोन कारणांमुळें चालू झाली. एक कारण दारिद्र्य व दुसरें युद्ध. दारिद्र्यामुळें एकाच समाजांतील व्यक्ती एकमेकांचे गुलाम बनत असत. युद्धामुळें परसमाजांतील व्यक्ती गुलाम बनत. युद्धांतील कैद्यांना गुलाम बनविण्याची पद्धति समाज मृगयावृत्तींतून कृषीवलवृत्तींत गेल्यावर पडते. तथापि शेतकीचें कामहि वर्षभर पुरण्यासारखें नसल्यामुळें गुलामांना सतत पोसणें मालकाला फार जड जातें. समाज जेव्हां उद्यमवृत्तीप्रत पोहोंचतो, तेव्हांच गुलामाकडून सतत काम घेऊन मालकांना अपार संपत्ति मिळवावयास सांपडतें. ऐतिहासिक काळांतील प्राचीन ग्रीस देश कृषिवलवृत्तींतून उद्यमवृत्तींत संक्रमण पावण्याच्या स्थितींत होता. त्या वेळीं गुलामपद्धतीचा त्यानें भरपूर उपयोग करून घेतला. शिवाय स्पार्टासारखे कांहीं ग्रीक समाज सर्वस्वी क्षत्रिय ऊर्फ लष्करी पेशाचे असल्यामुळें अशा समाजांत युद्धेतर सर्व कामें करवून घेण्याची पद्धत असे. त्यामुळें प्रागैतिहासिक होमरच्या काळांत गुलामपद्धति ग्रीसमध्यें पूर्णपणें अमलांत असल्याचें होमरच्या काव्यावरून स्पष्ट दिसतें. त्या काळांत शेतीचें काम व गुरें सांभाळण्याचें काम पुरुष गुलामाकडून व

घरकाम स्त्रीगुलामांकडून करून घेत असत. त्यानंतरच्या ऐतिहासिक काळाबद्दलची माहिती तर भरपूर उपलब्ध आहे. त्यावरून ग्रीसमध्यें पुढील कारणांनीं गुलाम बनत असत असें दिसतें:—(१) जन्म. तथापि या मार्गानें गुलामांची संख्या भरपूर मिळत नसे, कारण एक तर स्त्रीगुलाम फारसे नसत, व दुसरें गुलाम मुलें अज्ञानपणापासून त्यांना पोसून काम करण्यालायक वयानें मोठीं होईपर्यंत वाढविण्यापेक्षा गुलाम आयते विकत घेणें फार स्वस्त असे. (२) विक्री. ग्रीक लोक स्वतःचीं मुलें विकीत असत व अशा मुलांना मरणापेक्षा अधिक त्रासदायक अशा गुलामगिरींत आयुष्य कंठावें लागत असे. शिवाय दरिद्री ग्रीक लोक कर्जाचा बोजा भयंकर वाटला म्हणजे धनकोचे गुलाम बनत असत. (३) युद्धांतील कैद. गुलामांच्या पैदाशीचा हाच मुख्य मार्ग असे. आशियांतील ग्रीकेतर समाजांतील लोकांनाच नव्हे तर प्रत्यक्ष निरनिराळ्या ग्रीक राज्यांतील लोक एकमेकांसहि लढाईंत कैद करून गुलाम बनवीत असत. तथापि ग्रीकांनीं एकमेकांस गुलाम बनवूं नये असें मत पुढें येऊन कांहीं अंशीं अमलांतहि आलें. (४) चांचेगिरी व चोरी. त्या काळांत समुद्रावरून किनाऱ्यावर उतरून लोकांना पकडून पळवून नेणें व परराज्यांत नेऊन विकणें हा भयंकर धंदा चांचेलोक मोठ्या प्रमाणावर करीत असत. मात्र खरेदीची रकम रोख किंवा मजुरीच्या रूपानें फेडल्यावर सदरहू इसम पुनः स्वतंत्र समजावा असा अथेन्सचा कायदा असे. चोरी करणारे लबाड लोक लहान मुलांना पळवून नेऊन गुलाम बनवीत असत. अशा लोकांच्या तडाक्यांत सांपडून कोण केव्हां गुलामगिरींत पडेल याचा कांहीं नेम नसे. (५) व्यापार. लढाईंतल्या कैद्यांशिवाय सीरिया, पाँटस, लीडिया व थ्रेस प्रांतांतून, शिवाय इजिप्त, इथिओपिया, या देशांतूनहि गुलाम पकडून आणून विकण्याचा व्यापार या काळीं चालू होता. सर्वांपेक्षा आशियांतले लोक फार आज्ञाधारक व चैनीच्या कलाकुसरींत निपुण, म्हणून त्यांना बाजारांत मागणी फार असे. खुद्द अथेन्स शहरांत गुलामांचा मोठा व्यापार चालत असे. शिवाय सायप्रस, सॅमॉस, इफेसस व चिऑस येथें गुलामांचे मोठे बाजार भरत असत.

घरकाम व खासगी शेती, खाणी व कारखाने हीं कामें गुलामांकडून करवीत असत. त्याप्रमाणें सार्वजनिक सरकारी कामेंहि गुलामांना सांगत असत. शहराच्या बंदोबस्ताचे पोलीस गुलामच असत. सैन्य व आरमार यांत हलकीं कामें करण्यास गुलाम ठेवीत. अथेन्समध्यें गुलामांना पुष्कळ चांगल्या रीतीनें वागवीत असत. क्रूर वृत्तीच्या रोमन लोकांना तर हें ऐकून आश्चर्य वाटत असे. ग्रीसमध्यें गुलामांना स्वतःची खासगी मिळकत करण्यास सवड असे. लग्न करण्यास रूढीनें परवानगी असे. कांहीं खासगी स्वरूपाच्या धार्मिक विधींत त्यांना भाग घेतां येत असे. शिवाय कोणी मालक निर्दयपणानें वागवीत असल्यास दुसऱ्या मालकाकडे विकून घेण्याचा गुलामाला कायद्यानें हक्क असे. गुलामावर लोभ जडल्यामुळें मरणोत्तर थडगीं बांधून चांगलें स्मारक मालकानें केल्याचीं उदाहरणेंहि ग्रीसमध्यें घडत असत. शिवाय स्वतःचे पैसे जमवून गुलामांना स्वतःची गुलामगिरींतून सुटका करून घेतां येत असे. मालक खुष झाल्यास स्वतः होऊन तो गुलामास स्वातंत्र्यदान करीत असे. तथापि अशा प्रसंगीं स्वातंत्र्यप्राप्तीनंतर कांहीं ठराविक नोकरी ठराविक काळपर्यंत घेण्याची अट मालक घालीत असत.

गुलामगिरीचें तात्त्विक दृष्ट्या समर्थन करणाऱ्या तत्त्ववेत्त्यांपैकीं खुद्द ॲरिस्टॉटल हा एक होता हें सुप्रसिद्ध आहे. पण गुलामांना क्रूरपणानें वागविणें, ग्रीकांनीं ग्रीकांनाच गुलाम करणें या दोन्हीं गोष्टी त्याला संमत नव्हत्या. प्लेटोनें तर या पद्धतीला दोष दिला आहे. एपिक्युरीयन पंथांतले तत्त्ववेत्ते स्वतःच्या सुखाकरितां व चैनीकरितां गुलाम बाळगावे असें निःशंकपणें प्रतिपादन करीत असत. उलट स्टोईक पंथी तत्त्ववेत्ते असें म्हणत कीं, स्वातंत्र्य व गुलामगिरी हीं दोन्हीं ज्ञानी पुरुषाला सारख्याच किंमतीचीं स्वतंत्र किंवा परतंत्र स्थिति असह्य झाल्यास आत्महत्या करणें हा मार्ग प्रशस्त होय.

रोम.— रोमन लोकांची राहणीच अशा प्रकारची होती कीं, त्यांच्यांत गुलामगिरीची पद्धति उत्पन्न होणें स्वाभाविक होतें. त्यामुळें गुलामपद्धतीला सर्व बाबतींत पद्धतशीर स्वरूप येऊन गुलामपद्धति फार विस्तृत प्रमाणावर अमलांत आली. रोमन लोकांनीं देश जिंकण्यास आरंभ केला तेव्हांपासूनच ते गुलाम पाळूं लागले, परंतु आरंभीं त्यांच्या मालकीच्या जमिनी फारशा नसल्यामुळें रोमन इसमांजवळ गुलामांची संख्या अल्प असे. परंतु रोम येथें लोकसत्ता (रिपब्लिक) स्थापन होऊन जेव्हां रोमन साम्राज्य झपाट्यानें वाढूं लागलें त्यावेळीं प्रत्येक लढाईंत हजारों कैदी पकडून त्यांची विक्री होऊं लागली. एपायरसमध्यें जय मिळविल्यावर एमिलियस पॉलसनें १,५०,००० कैदी गुलाम करून विकले. तसेंच रोमन लोकांनीं टयूटन लोकांना जिंकलें तेव्हां ९०,००० व सिंब्री लोकांना जिंकलें तेव्हां ६०,००० गुलाम विकण्यांत आले. ज्यूलियस सीझरनें गॉलमध्यें एका प्रसंगीं ६३००० कैदी गुलाम विकले. पुढें बादशाही अंमलाच्या वेळीं आफ्रिका, स्पेन, गॉल व आशियांतील देश यांमधून गुलाम आणून रोम येथें विकण्याचा व्यापार सतत चालू होता. शिवाय मनुष्याला गुलामगिरींत पाडणारीं वर ग्रीससंबंधानें सांगितलेलीं सर्व कारणें रोममध्यें चालू होतींच.

रोममध्येंहि गुलामांना पोलीसखातें, न्यायकोर्टें, तुरुंग वगैरे ठिकाणीं हलक्या दर्जाच्या कामावर नेमीत असत. रोममध्यें व इतर प्रांतोप्रांतींच्या शहरांत रस्ते तयार करणें, गटारें साफ करणें, वगैरे कामें गुलामांकडून करवीत असत.

खाजगी कुटुंबांत स्वयंपाक, कपडे धुणें व शिवणें, गुरें राखणें, शेतकाम करणें, इतकेंच काय पण मालकाच्या करमणुकीकरता गायन, वादन, नृत्य हीं कामेंहि गुलाम करीत असत नाटकें, सर्कस, द्वंद्वयुद्ध हीं सार्वजनिक करमणुकीचीं कामें गुलामच करीत असत मोठमोठ्या रोमन अधिकाऱ्यांच्या, सरदारांच्या व धनिकांच्या पदरीं हिशेबनीस, गृहव्यवस्थापक, वैद्य, कारागीर, लेखक, वाचक, ग्रंथसंग्रहव्यवस्थापक व यापेक्षांहि मोठ्या योग्यतेचे विद्वान ग्रंथकार, वैय्याकरणी, तत्ववेत्ते असत ते वास्तविक परतंत्र गुलाम असत पडुआ येथील विद्यापीठांतील अध्यापक ग्रीक गुलाम असत याप्रमाणें एक एका थोर रोमन गृहस्थाजवळ दोन दोन, चारचार हजारपर्यंत गुलाम असत क्लाडियसच्या कारकीर्दींत इटलामध्यें एकंदर गुलामांचा संख्या २,०८,३२,००० होती असें म्हणतात अशा गुलामासंबंधानें तारण्यामारण्यासुद्धां सर्व सत्ता रोमन कायद्यानें गुलामाच्या मालकाला दिलेली होती गुलामांना खाजगी धनसंचय करण्याचा हक्क नसे, तसेंच विवाह करण्याचा हक्क नसे, पण मालकाच्या सवलतीनें या दोन्ही गोष्टी गुलाम करीत असत गुन्ह्याबद्दल गुलामांना इतरांपेक्षां फार कडक शिक्षा असत *गुलामांची संख्या आरंभीं कमी होती तेव्हां मालकाचा गुलां*मांशीं प्रत्यक्ष परिचय होऊन स्नेहभाव वाटत असे व गुलामांना सवलतीनें व सौजन्यानें वागविण्यांत येत असे पण पुढें एकेका मालकाच्या पदरीं शेंकडो, हजारों गुलाम झाले तेव्हां परस्पराची कधीं गांठभेटहि नसे, व गुलामांना सांभाळणें हें अवघड काम होऊन त्यांच्या हातापायांत बेड्या पडूं लागल्या पुढें खाणींतून व कारखान्यांतून स्त्रीपुरुष गुलामांकडून अर्धनग्न स्थितींत व बेड्या अडकवून आणि चाबकाचा उपयोग करून काम करून घेण्यापर्यंत मजल गेली, व रोमन गुलामपद्धतीला फार क्रूरपणाचें स्वरूप आलें या कारणानें गुलाम अपापसांत गुप्त कट करून मालकाविरुद्ध मोठमोठीं बंडें व दंगे करूं लागले व मालकाच्या तावडींतून पळून जाऊं लागले रोमच्या इतिहासांत असे गुलामांच्या बंडाचे प्रसंग पुष्कळ आहेत तथापि गुलामांना स्वतःचें स्वातंत्र्य पुन: प्राप्त करून घेण्याच्या बाबतींत रोमन कायद्यानें अधिक सवलती ठेवलेल्या होत्या सबब एवढ्या बाबतींत रोमनपद्धति ग्रीकपक्षा श्रेष्ठ होती रोमन मालक पैसे घेऊन गुलामांना स्वतंत्र करीत असत व त्याच पैशानीं दुसरे गुलाम खरेदी करीत पुढें रोमन बादशहांच्या काळांत लढायांचें मान कमी होऊन औद्योगिक युगाला आरंभ झाला तेव्हां रोमन बादशहांनीं गुलामांना कायद्यानें पुष्कळ सवलती दिल्या मालकाच्या क्रूरपणाला पुष्कळ आळा घातला व गुलामांना स्वतंत्र करण्याच्या कामीं स्वत: प्रत्यक्ष मदत पुष्कळ केली

*ख्रिस्ती धर्माचा परिणाम*—रोमन लोकांनीं ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यापासून गुलामपद्धतीला सौम्य स्वरूप येऊन गुलामांची संख्याहि उत्तरोत्तर कमी होत गेली ख्रिस्ती धर्मानें खुद्द धर्मग्रंथांत गुलामपद्धतीचा निषेध स्पष्टपणें केलेला नाहीं तथापि ख्रिस्ती धर्मोपदेशकांनीं ख्रिस्ती बनलेल्या रोमन मालकांकडून, व विशेषत ख्रिस्ती धर्म स्वीकारलेल्या *रोमन बादशहाकडून गुलामपद्धतींत प्रत्यक्ष* उपदेशानें पुष्कळ सुधारणा घडवून आणली पुष्कळ गुलाम पदरीं असणें हें मोठेपणाचें लक्षण न मानणें, द्वंद्वयुद्धासारखे प्राणघातक खेळ गुलामाकडून न करविणें, युद्धकैद्यांची खंडणी घेऊन तांबडतोब सुटका करणें, गुलामांना विशेष सवलता देऊन स्वतंत्र होऊं देणें, *मनुष्यामनुष्यामधील समानबंधुत्वाचें* नातें ओळखून गुलामांना भूतदयेनें व सन्मानानें वागविणें इत्यादि गोष्टी धर्मोपदेशकांनीं हळूहळू घडवून आणल्या कॉन्स्टंटाईन, थिओडोशियस व जस्टिनियन या बादशहांनीं गुलामांच्या हिताचे असे अनेक कायदे केले

*गुलामपद्धतीचें कृषीदासामध्यें रूपांतर*—तथापि उपर्युक्त सुधारणानीं गुलामपद्धति बंद पडून एक स्वतंत्र समाज न बनता मध्यतरा एक 'सफडमची' अवस्था उत्पन्न झाली हें अवस्थांतर पुढील कारणानीं झालें (१) रोमन साम्राज्य पूर्ण वाढून जेव्हां युद्धें कमी झालीं तेव्हां गुलामांच्या *संख्येंत भर घालणारें साधन जी युद्धकैद तें बंद पडून* गुलामांचा पुरवठा कमी पडला तेव्हां मालक गुलामाबद्दल जास्त काळजी व आस्था बाळगूं लागले व गुलाम स्त्रीपुरुषापासून गुलाम संतति उत्पन्न करवून गुलामांची उणीव भरून काढूं लागले (२) तथापि गुलामांची संख्या एकसारखी *कमी कमी होत गेल्यामुळें* स्वतंत्र मजूरवर्ग उत्पन्न होऊं लागला प्रथम सरकारी, नंतर खासगी नोकऱ्यांत हळूहळू स्वतंत्र माणसें शिरूं लागलीं श्रीमंत मालक कारखाने, खाणी व शेती यांत कामाला गुलाम लावीत असत पण शेवटीं तेंहि बंद पडलें (३) कारण रोमन साम्राज्याच्या उत्तर काळांत रोमन समाजाची सबंध घडीच बदलली स्वतंत्र रोमन नागरिकांचा वर्ग व गुलामांचा वर्ग ही पूर्वीची रचना हळूहळू नाहींशी होऊन सर्व समाजांत वंशपरंपरागत धंदेवाईक जाती उत्पन्न झाल्या हें स्वरूप हिंदुस्थानांतील जातिभेदासारखेंच होतें (४) या अवस्थांतराला अनुसरून गुलामांचें अवस्थांतर होऊन त्यांना खंडानें शेत करणाऱ्या कुळाचें स्वरूप प्राप्त झालें अशी शेती करणाऱ्या लोकांच्या जागोजाग वसाहती वाढल्या। हे गुलामगिरींतून सुटलेले लोक जमिनदाराला दरसाल खंड देऊन त्यांच्या शेतीच्या उत्पन्नावर स्वतंत्रपणें उदरनिर्वाह करून राहूं लागले अशा नवीन वसलेल्या गावांचा जमीनमहसूल सरकारांत भरण्याबद्दल जमीनदार मालक जबाबदार असे व तो कुळें लावून शेत पिकवीत असे या कुळांबद्दल पुढें कायद्यानें पुष्कळ बंधनें उत्पन्न केलीं कुळानें गाव सोडून जातां कामा नये, इतकेंच नव्हे तर त्यानें स्वखुषीनें दुसऱ्या जमीनदाराच्या कुळाशीं लग्न करूं नये असा निर्बंध

कायद्यानें घातला. तसेंच कुळांनीं आपल्या गुलांना वंशपरंपरा तेथेंच ठेवून दोन्हीं केली पाहिजे असा कायदाहि झाला. उलट जमिनदारानां खंड वाढविण्याचीहि कायद्यानें मनाई होती. कुळांना खासगी धनसंचय करण्याचा हक्क होता. याप्रमाणें शेतीच्या बाबतींत गुलामपद्धति बंद पडून कृषिदासपद्धति ( सर्फडम ) अमलांत आली.

अ र्वा ची न गु ला म प द्ध ति.—कृषिदासपद्धति स्थापन झाल्यावर गुलामपद्धति कायमची नामशेष होणार अशी अपेक्षा करणें गैरवाजवी नव्हतें परंतु दुर्दैवानें गुलामपद्धति १५ व्या शतकांत पुन्हा सुरू झाली; इतकेंच नव्हे तर तिला प्राचीन रोमन पद्धतीपेक्षाहि भयंकर क्रूर स्वरूप प्राप्त झालें. हीच अमेरिकेंतील सुप्रसिद्ध नीग्रो गुलामपद्धति होय. हिचा थोडक्यांत इतिहास पुढीलप्रमाणें आहेः—१४४२ त सुप्रसिद्ध दर्यावर्दी पोर्तुगालचा प्रिन्स हेनरी याच्या हुकमतीखालीं पोर्तुगीज लोकांनीं आफ्रिकेच्या अटलांटिक महासागराकांठील किनाऱ्याचें संशोधन करीत असतां पुष्कळ मूर लोक पकडून कैद केले परंतु त्याच्या मूर देशबांधवानीं त्यांच्या मोबदला नीग्रो गुलाम व सोनें देऊन त्यांची सुटका केली यामुळें पोर्तुगीजांची द्रव्यतृष्णा वाढून त्यांनीं आफ्रिकेच्या किनाऱ्यावर ठिकठिकाणीं वसाहती करून नीग्रो लोक पकडून आणून स्पेनमध्यें विकण्याचा क्रम सुरू केला. पुढें हयटी बेट स्पेनच्या ताब्यांत आल्यावर तेथें त्यांनीं निग्रो गुलाम नेले विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, अमेरिकेकडील या नूतन संशोधित भूप्रदेशांत निग्रो गुलामपद्धति सुरू करण्यासंबंधानें ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं आक्षेप न घेतां उलट या गोष्टीला थोडें फार उत्तेजनच दिलें. या कार्यांतला प्रथमारंभापासूनचा चायपाचा सुप्रसिद्ध बिशप बार्टोलोमि डी लास कासस हा होय. यानें उच्च नैतिक तत्वाकडे दुर्लक्ष करून हायटी बेटांतील गुलामाचे हाल प्रत्यक्ष पाहिले असूनहि प्रत्येक स्पॅनिश वसाहतवाल्यानें फक्त एकेक डझन गुलाम बाळगावे या अटीवर गुलामांच्या व्यापारास संमति दिली. अशा रीतीनें अमेरिकेंत आफ्रिकन निग्रो गुलामाचा व्यापार सुरू झाला. या व्यापारांत भाग घेणारा पहिला इंग्रज सर जॉन हॉकिन्स हा होय. प्रथम इंग्रज व्यापारी स्पॅनिश वसाहतींनाच गुलाम पुरवीत असत. १६२० मध्यें व्हर्जिनिया या इंग्रज वसाहतींतील जेम्स टाऊनमध्यें प्रथम निग्रो गुलाम डच व्यापाऱ्यांनीं आणून विकले. याप्रमाणें ब्रिटिश अमेरिकेंत दोन्हीकडे निग्रो गुलाम उपयोगांत येऊं लागून उत्तरोत्तर याचें प्रमाण इतकें वाढलें कीं, १७९० मध्यें एकट्या व्हर्जिनिया संस्थानांत २,००,००० निग्रो गुलाम होते. इंग्लंडमध्यें प्रथम कांहीं विशिष्ट कंपन्यानाच गुलामाचा व्यापार करण्याचा हक्क दिलेला होता. पण तिसऱ्या विल्यम राजानें हा निर्बंध काढून या व्यापाराची परवानगी सर्वांना बिनशर्त दिली. यामुळें इंग्रज व्यापारी स्पॅनिश वसाहतींनाहि गुलाम पुरवूं लागले. हा व्यापार इतका फायदेशीर असे कीं, मोठमोठ्या युद्धाचे तह ठरतांना या व्यापाराच्या हक्काबद्दल राष्ट्राराष्ट्रांत रणें माजत १७१३ तील युट्रेटचा तह हें अशा प्रकाराचेंच उदाहरण होय. सर राबर्ट वालपोलला केवळ याच प्रकरणावरून स्वमताविरुद्ध स्पेनबरोबर युद्ध पुकारावें लागलें १६८० ते १७०० एवढ्या अवधींत एका आफ्रिकनकंपनी नामक व्यापारी मंडळानें १,४०,००० गुलाम नेऊन विकले व इतर व्यापाऱ्यांनीं १, ६०,००० गुलाम विकले. १७०० ते १७८० या अवधींत एकट्या जमेका या इंग्रज वसाहतींत ६,१०,००० गुलाम विकले. अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धाच्या सुमारास इंग्रजांचा हा व्यापार शिखरास पोहोंचला होता, तो युद्धकालांत जरा मंदावला युद्धानंतर हा व्यापार पुन्हा जोरांत सुरू झाला. त्यासंबंधानें पुढील विश्वसनीय आंकडे प्रसिद्ध आहेत. दरसाल ब्रिटिशांनीं ३८०००, फ्रेंचांनीं २००००, डचांनीं ४०००, डेन्सांनीं २०००,व पोर्तुगीजांनीं १०००० याप्रमाणें सालोसाल एकंदर ७४०००निग्रो गुलाम यूरोपियनांनीं अमेरिकेंत नेऊन विकण्याचा क्रम चालू ठेवला होता व त्यापैकीं निम्म्याहून अधिक व्यापार ब्रिटिशांच्या हातीं होता.

आफ्रिकेंतून अमेरिकेंत निग्रो गुलाम नेण्याचें कारण एक तर स्पॅनिश लोकांनीं अमेरिकेंत वसाहती करतांना तेथील इंडियन लोकांची अत्यंत क्रूरपणानें बरीचशी कत्तल केली होती. आणि दुसरें कारण एक निग्रो गुलाम चार इंडियना इतकें काम करीत असे निग्रो पकडण्यापासून अमेरिकेंत नेऊन विक्रीपर्यंत सर्वच प्रकार अनानुष निर्दयपणाचा होता यूरोपियन लोक निग्रोंना पकडण्याचें काम निग्रो पुढाऱ्याकडून करवीत असत. हे लोक खेड्याला प्रथम आग लावून देत आणि तेथील रहिवासी बाहेर पळूं लागले म्हणजे त्यांना कैद करीत या झटापटींत कांहीं निग्रो मरत ते वगळले तरी शेंकडा १२॥जहाजांतून अमेरिकेपर्यंत जातांना वाटेंत मरत, शेंकडा ४॥ बंदरांत उतरून विक्री होईपर्यंत मरत व शेंकडा $\frac{1}{3}$ तेथील हवापाणी न मानल्यामुळें गुलाम बनल्यावर मालकाच्या घरीं मरत. प्रत्येक गुलामाला सुमारें २० पौंड किंमत येत असे हे गुलाम बाजारांत विकावयास बहुतेक नग्न स्थितींतच आणीत असत. खरेदी करतांना घोड्याप्रमाणें त्यांच्या तोंडांतील दांत व सांधे तपासून पहात असत निग्रो गुलाम दरसाल आफ्रिकेंतून अमेरिकेंत न्यावे लागत असत. कारण अमेरिकेंत त्यांची संख्या फारशी वाढत नसे. जमेकामध्यें १६९० सालीं ४०००० गुलाम होते आणि १८२० पर्यंत तेथ ८००००आणखी गुलाम आले,तरी त्या सालीं तेथें गुलामाची एकंदर संख्या अवघी ३४०००० कायती होती निग्रोंची संख्यावृद्धि न होण्याचें कारण अर्थात् निग्रो स्त्रीगुलामाची कमतरता हें होय. जमेकामध्यें १७८९ सालीं स्त्रियांपेक्षा पुरुष निग्रो ३०००० अधिक होते शिवाय निग्रो गुलामांना त्यांचे गोरे मालक फारच निर्दयपणानें वागवीत असत.

व्या पा र बं दी ची च ळ व ळ.—वरील एकंदर हकीगत इंग्लंडमध्यें लोकांच्या कानीं येऊन गुलामपद्धतीचें

भयंकर स्वरूप त्यांच्या लक्षात येतांच सर्व थोर मनाच्या लोकांचें मत या व्यापाराविरुद्ध बनलें, अशा लोकांत पुढील प्रमुख इंग्रज होतेः–पोप, थॉमसन, सॅव्हेज, कौपर वगैरे कवी, हचेसन, जॉन वेस्ले, ब्लिट्टफील्ड, आडाम स्मिथ, राबर्टसन, डॉ. जॉनसन, पॅले, ग्रेगरी, गिलबर्ट वेकफील्ड वगैरे लेखक व वक्ते. प्रथम १७२९ मध्यें ग्रेटब्रिटनमध्यें गुलामगिरी कायदेशीर आहे की नाहीं हा प्रश्न उपस्थित होऊन यॉर्क व टालबॉट या अटर्नी जनरल व सॉलिसिटर–जनरल कायदेपंडितांनीं अस्तिपक्षीं आणि चीफ जस्टिस होल्ट यांनीं नास्तिपक्षीं मत दिलें होतें. पुढें एक खटला प्रत्यक्ष कोर्टांत चालून १७७२ त सर्व बेंचतर्फे लार्ड मानस्फील्ड यांनीं असा निकाल दिला कीं कोणत्याहि गुलामाचें पाऊल ग्रेट ब्रिटनच्या जमीनीला लागलें कीं तो त्या क्षणापासून स्वतंत्र होतो. तिकडे अमेरिकेंत गुलामपद्धतीविरुद्ध चळवळ क्केकर लोकांनीं अगोदर १६७१ पासूनच सुरू केली होती तिची हळूहळू प्रगति होऊन १६८३ त त्यांनीं वेस्ट इंडीज बेटांतील नीग्रो गुलामांना स्वतंत्र करण्याकरतां एक निराळी संस्था काढली अमेरिकेंतल्या पेनसिल्व्हानियन क्केकर लोकांनीं यापेक्षा अगोदर प्रत्यक्ष कामास सुरवात केली होती. त्यांत जॉन वुलमन व ॲन्थॉनी बेनेझेट हे प्रमुख होते. १७७४ नंतर या कार्याकरितां इतर अनेक संस्था स्थापन झाल्या. तथापि या चळवळीला प्रथम यश इंग्लंडमध्येंच आलें १७८६ पासून या विषयावर वाङ्मय प्रसिद्ध होऊं लागलें. थॉमस क्लार्कसननें या विषयावर एक निबंध लिहून बक्षीस मिळविलें व पुढें पुस्तकरूपानें तो निबंध बराच खपला. गुलामाच्या व्यापाराची बंदी करण्याच्या उद्देशानें १७८७ त एक कमेटी स्थापन झाली. तींत विल्यम विलबरफोर्स, जोशिया वेजवूड, ग्रेनेट शॅर्पटन (डॉ. जानसनचा मित्र), झाकारिया मेकॉले, हेन्री थॉर्नटन व जेम्स स्टीफन हे इसम होते. पुढें पार्लमेंटकडे पुष्कळ अर्ज गेल्यामुळें गुलामाचा व्यापार या प्रश्नासंबंधानें चौकशी करण्याकरतां१७८८त प्रीव्हीकौन्सिलची एक कमेटी नेमण्यांत आली व कॉमन्ससभेनें या प्रश्नाचा विचार करावा असा पिटचा ठराव हे पास झाला. पुढें पार्लमेंटच्या कमेटीनें साक्षी पुरावा घेतला व तदनुसार १७९१ मध्यें वेस्ट इंडीजबेटांत ब्रिटिश येथून त्यापुढें गुलाम पाठवूं नये अशा अर्थाचा ठराव पार्लमेंटांत आला. पण १६३ विरुद्ध ८८ मतांनीं नापास झाला. १७९२ पासून सालोसाल विलबरफोर्स व त्याच्या इतर मित्रांनीं गुलामाचा व्यापार बंद व्हावा अशा अर्थाचे ठराव पार्लमेंटपुढें मांडले. पण ते कॉमन्ससभेंत किंवा लॉर्डांच्या सभेंत नापास होत गेले अखेर १८०६ मध्यें लॉर्ड ग्रेनव्हिल व फॉक्स यांचें प्रधानमंडळ असतां बंदीचे ठराव पुढें येऊन अखेर १८०७ मध्यें असा ठराव झाला कीं, ब्रिटिश मुलुखांतल्या कोणत्याहि बंदरांतून १ मे १८०७ नंतर गुलाम नेण्याकरितां एकहि जहाज बाहेर जाऊं नये व ब्रिटिश वसाहतींत तारीख १ मार्च १८०८ नंतर कोणीहि गुलाम नेऊन उतरूं नयेत. हा कायदा मोडणारास फक्त दंडच ठेवलेला असल्यामुळें १८०७ च्या बंदीच्या कायद्यानंतरहि गुप्तपणें व्यापार चालू होता त्याचा बंदोबस्त करण्याकरितां १८११ मध्यें गुलामाचा व्यापार करणें हा मोठा गुन्हा ठरवून त्याला हद्दपारीची शिक्षा ठेवण्यांत आली. या कायद्यामुळें सदरहू बंदी नीट अमलांत आली.

फ्रान्स–सेंट डॉमिंगो या फ्रेंच वसाहतींत १७९१ सालीं ४,८०,००० काळे नीग्रो, २४,००० म्युलॅटो (मिश्र) व ३०,००० गोरे लोक होते. १७८८ मध्यें गुलामाचा व्यापार व गुलामपद्धति पूर्णपणें बंद करण्याचा प्रयत्न करण्याकरितां कॉंडॉर्सेटच्या अध्यक्षतेखालीं एक सोसायटी स्थापन झाली. तिला मिराबोची सहानुभूति होती. पण त्याचे प्रयत्न इंग्लंडातल्याप्रमाणें धार्मिक दृष्टीचे नसून भूतदयेनें प्रेरित होते. तथापि १७८९ मधील फ्रेंच राज्यक्रांतीनंतरच्या फ्रेंच सरकारनें व कायदे मंडळानें सेंट डॉमिंगो येथील गोऱ्या वसाहतवाल्यांच्या असंतोषास भिऊन गुलामाचा पक्ष घेण्याचें नाकारलें. तेव्हां तेथें म्युलॅटो व नीग्रो लोकांनीं मिळून बंड केलें. तेव्हां फ्रान्समधून कमिशनर पाठविण्यांत आले. त्यांचे तेथील गव्हर्नराशीं भांडण होऊन त्यांनीं नीग्रो लोकांच्या मदतीनें फ्राकॉय शहरांतील रहिवाशांवर हल्ला करून त्यांची जाळपोळ व कत्तल केली, तेव्हां गोऱ्या वसाहतवाल्यांनीं ब्रिटिशांची मदत घेतली. पण फ्रेंच रिपब्लिकन सरकारच्या सैन्यानें नीग्रो लोकांच्या मदतीनें ब्रिटिशांना हाकून लाविलें व गुलामपद्धति पूर्णपणें बंद केली. पण पुढें बोनापार्टनें गोऱ्या वसाहतवाल्यांतर्फे नीग्रोंना जिंकण्याकरतां सैन्य पाठविलें, पण नीग्रोंनीं त्याचा पराभव करून तें हाकून लाविलें व आपलें राज्य स्थापन केलें. पुढें बोर्बोन राजांनीं तें बेट जिंकण्याचा व तेथें गुलामपद्धति सुरू करण्याचा प्रयत्न केला पण त्यांना यश न येतां हें बेट इ. स. १८२५ पासून पूर्णपणें स्वतंत्र राहिलें आहे.

*गुलामाच्या स्वातंत्र्याची चळवळ.*–गुलामांचा व्यापार बंद करण्याचा पहिला मान इंग्लंडला नसून डेन्मार्कला आहे. १६ मे १७९२ रोजीं निघालेल्या राजाच्या हुकुमानें डॅनिश वसाहतींत १८०३ पासून या व्यापाराला पूर्ण बंदी करण्यांत आली. पोर्तुगॉलनें १८१५ पासून बंदीच्या कायद्यास आरंभ करून १८२० मध्यें या व्यापारास पूर्ण बंदी केली. डच लोकांनीं हा व्यापार १८१४ त बंद केला, व स्वीडिश लोकांनीं १८१३ तच बंद केला होता. दक्षिण अमेरिकेंतले ला प्लटा, व्हेनेझुएला, व चिली या देशांनीं स्वतंत्र होतांच हा व्यापार बंद केला. याप्रमाणें व्यापार बहुतेक बंद झाल्यावर गुलामगिरीत हळूहळूपणापासून [illegible]

असलेल्या नीग्रोंना स्वतंत्र करून गुलामपद्धतीच अजीबात नष्ट करण्याचे उद्योग सुरू झाले. व्यापार बंद होऊन नवीन पुरवठा बंद झाल्यामुळें पूर्वीच्या गुलामाकडून मालक प्रमाणाबाहेर अतिशय काम घेऊं लागले व त्यामुळें गुलामांची मृत्युसंख्या फार वाढली. वेस्ट इंडीजमध्यें १८०७ सालीं ८,००,००० संख्या होती ती १८३० मध्यें ७००००० उरली. या सर्व गोष्टींना उपाय म्हणजे गुलामगिरींतून सर्वांची मुक्तता करणें हाच होय हें स्पष्ट दिसूं लागलें. तेव्हां या दिशेनें चळवळ विलबरफोर्स व बक्स्टन यांनींच सुरू केली. "गुलामांचे हाल दूर करण्याच्या योजना ब्रिटिश वसाहतींनीं आपापल्या कायदेमंडळामार्फत अमलांत आणाव्या अशी ब्रिटिश पार्लमेंटची शिफारस आहे." इतकाच कॅनिंगचा ठराव पास झाला. पण त्यामुळें गुलामांचा गैरसमज होऊन त्यांनीं मालकाचीं कामें करण्याचें एकदम नाकारलें. तेव्हां उभयपक्षांत मारामाऱ्या होऊन लष्करी कायदा लागू करावा लागला व मोठे कडक उपाय योजून गुलामांचीं बंडें मोडण्यांत आलीं. तेव्हां कांहीं वर्षे हा प्रश्न मागें पडून पुन्हां १८३३ मध्यें अर्ल ग्रेच्या प्रधानमंडळानें स्टॅनिथर्यानें गुलामांना स्वातंत्र्य देण्याचा कायदा पास केला व मालकांना नुकसानभरपाई देण्याकरतां म्हणून २ कोटी पौंड मंजूर केले पण स्वातंत्र्यप्राप्तीची तयारी म्हणून सात वर्षे गुलामांनीं मालकाची नोकरी दिवसाचे ६ तास करावी व त्याचा मोबदला मालकांनीं त्यांना अन्नवस्त्र द्यावें असें ठरवण्यांत आलें. सहा वर्षांच्या आंतील मुलें मात्र स्वतंत्र ठरवून त्यांना धार्मिक व नैतिक शिक्षण देण्याची व्यवस्था करण्यांत आली तथापि ब्रिटिश कामन्स सभेला ही सात वर्षांचीहि मुदत पसंत नव्हती. सबब तडजोड होऊन १८४० ऐवजी १८३८ मध्येंच सर्व गुलामांना स्वातंत्र्य देण्यांत आलें. इंग्लंडचें उदाहरण पाहून फ्रान्सनें १८४८ सालीं, पोर्तुगालनें १८५८ सालीं व डच लोकांनीं १८६३ सालीं गुलामांना दास्यांतून मुक्त करून स्वतंत्र केलें. मेक्सिकोनें तत्पूर्वीच १८२९ सालीं गुलामांना स्वातंत्र्य दिलें होतें. आयर्सनें त्याच्याहि पूर्वी कायदा करून २१ जून १८१२ नंतर जन्मलेल्या गुलामांच्या सर्व मुलांना स्वतंत्र समजण्याचें ठरविलें व कोलंबियामध्यें १६ जुलै १८२१ नंतर जन्मलेल्या सर्वांना वयांत आल्यापासून म्हणजे अठराव्या वर्षापासून स्वतंत्र समजण्याचा कायदा पास झाला होता. यानंतर गुलामपद्धति चालू असलेले महत्वाचे देश तीनच उरले, ते दक्षिण युनायटेड स्टेट्स, क्युबा व ब्राझिल हे होत.

युनायटेड स्टेट्स.—अमेरिकेंतील संस्थानांचें स्वतंत्र संयुक्त राष्ट्र बनविणारे थोर थोर पुरुष यांना गुलामपद्धति मान्य नव्हती. वॉशिंग्टननें आपल्या मृत्युपत्रांत स्वतःच्या गुलामांना स्वातंत्र्य देण्याबद्दल लिहून ठेविलें होतें. जॉन अॅडाम्सनें गुलामपद्धति पूर्ण बंद करण्याची योजना अमलांत यावी असें जाहीर मत दिलें होतें फ्रँक्लीन, मॅडिसन, हॅमिल्टन, पॅट्रिक हेनरी या सर्वांनीं गुलामपद्धतीचा निषेधच केलेला होता. जेफर्सननें युनायटेड स्टेट्सच्या राज्यपद्धतीसंबंधानें जी लेखी योजना तयार केली तींत गुलामपद्धति बंद व्हावी असें स्पष्ट वाक्य घातलें होतें. या मतांपास अनुसरून १८०४ च्या सुमारास युनायटेड स्टेट्समधील उत्तरेकडील संस्थानांत व्यक्तिशः गुलामपद्धति बंद करण्याचे कायदे पास झाले होते. पण त्याचा परिणाम एवढाच झाला कीं, उत्तरेकडील संस्थानांतल्या मालकांनीं दक्षिणेकडील संस्थानांत नेऊन गुलाम विकले. त्यामुळें गुलामांना प्रत्यक्ष स्वातंत्र्य मिळालें नाहींच. उलट दक्षिणेकडील संस्थानांत गुलामपद्धति वाढत्या प्रमाणांत चालू होती सर्व युनायटेड स्टेट्स राष्ट्रांत व्यापाराची बंदी होऊन गुलामांना स्वातंत्र्य मिळावें अशी चळवळ करणारा पहिला इसम बेंजामिन लुंडी ( १७८९-१८३९ ) हा होय. त्याच्याशिवाय विल्यम ल्लॉइड गॅरिसन ( १८०५-१८७९ ), एलिजा पी. लव्हजॉय, वेंडेल फिलिप्स, चार्लस सम्नर, जॉन ब्राऊन हे या कार्यांतले प्रसिद्ध पुरस्कर्ते होते. आर्. डब्ल्यू इमर्सन, ब्रायंट, लाँगफेलो, व्हिटियर व व्हिटमन हे विद्वान ग्रंथकार व कवी यांनीं स्पष्ट शब्दांत सदरहू पद्धतीचा निषेध केलेला होता उलट पक्षीं त्या पद्धतीच्या पक्षपात्यांनीं निषेधपर मत प्रसिद्ध होऊं नयेत अशाबद्दल भगीरथ प्रयत्न चालविले होते दक्षिणेकडील ख्रिस्ती चर्चेंहि या पद्धतीचा पुरस्कार करीत असत तथापि हळूहळू विरुद्ध मत प्रगट होत चाललें होतें आणि १८५२ च्या सुमारास मिसेस हॅरिएट बीचरस्टौ हिनें लिहिलेल्या 'अंकल टॉम्स केबिन' या कादंबरीनें तर लोकमतांत फारच खळबळ उडवून दिली. तथापि दक्षिणेकडील लोकमत बिलकुल वळेना. तेव्हां लढाई शिवाय या प्रकरणाचा मोक्ष लागत नाहीं असें स्पष्ट दिसूं लागलें. इतक्यांत १८६० मध्यें अब्राहाम लिंकन प्रेसिडेंट निवडून आला हें पाहून दाक्षिणेकडील संस्थानांनीं स्वातंत्र्यप्राप्तीच्या युद्धाचें रणशिंग फुंकलें व उत्तरेकडील संस्थानांनीं दुफळी न होता एकी कायम राहावी अशा हेतूनें शस्त्रें उचललीं. तथापि युद्धाचा मुख्य हेतु गुलामपद्धतीचें अस्तित्व चालू ठेवणें किंवा बंद करणें हा होता. १८६५ च्या एप्रिल ९ रोजीं आपोमाटॉक्स येथें दक्षिणेचें सैन्य शरण येऊन युद्धाचा निकाल लागला. काँग्रेसनें तत्पूर्वी १८६२ मध्यें कायद्यानें गुलामांना स्वातंत्र्य देण्याचें जाहीर केलेंच होत. त्याचा अम्मल १८६३ पासून सुरू होऊन युद्ध संपताच १८६५ डिसेंबर पासून सर्व युनायटेड स्टेट्स देशांत गुलामपद्धतीला कायमची मूठमाती मिळाली.

क्यूबा व ब्राझिल.—क्यूबा या स्पॅनिश वसाहतींत १७८९ मध्ये पास झालेल्या कायद्यानें गुलामांना पुष्कळ सवलती दिलेल्या होत्या. परंतु त्यांचा प्रत्यक्ष अम्मल न होता उलट गुलामांचा व्यापार वाढत होता जी १७९२ मध्यें ८४,००० गुलाम होते ती संख्या १८४३ मध्यें ४,३६, वर गेली. अखेर १८७० मध्यें स्पॅनिश

1

मंडळानें गुलामाना स्वातंत्र्य देण्याचा कायदा केला व तो हळूहळू अमलांत येऊन १८८५ च्या सुमारास सर्व गुलाम स्वतंत्र झाले. ब्राझिलच्या बादशहानें १८८० त गुलामाचा व्यापार बंद करण्याबद्दल हुकूम सोडला तथापि चोरून व्यापार चालू राहून कित्येक वर्षे दरसाल ३४,००० गुलाम देशात बाहेरून येत होते. १८५० मध्यें व्यापार पूर्ण बंद पडला. पण त्यामुळें तत्पूर्वीच्या गुलामावर कामाचा बोजा फार पडून त्याचे हाल वाढले. कारण पूर्वीचे घरकाम करणारे गुलाम शेतकामाला लावण्यात आले. तथापि युनायटेड स्टेटसच्या मानानें ब्राझिलमध्यें गुलामावर जुलूम कमीच होत असे. अखेर १८७० मध्यें ब्राझिलच्या कायदेमंडळानें गुलामाना स्वातंत्र्य देण्याचा कायदा केला. तो हळूहळू अमलात येऊन १८८८ मध्यें सर्व गुलाम पूर्णपणें स्वतंत्र करण्यात आले

मुसुलमानी देश—मुसुलमानी देशात गुलामपद्धति आहे. पण ते गुलाम शेतकामाकरिता नसून घरकामाकरिता असतात. अर्थात् त्याना साधारणपणें कुटुंबातल्या माणसाप्रमाणें समजून दयाळूपणानें व प्रेमानेंहि वागवितात. इराणमध्यें गुलामाना इतकें चागल्या तऱ्हेनें वागवितात कीं त्यास स्वतंत्रता देणें हीच शिक्षा वाटते असें विल्स म्हणतो ( इन दि लँड ऑफ दि लायन अँड सन ) खुद्द कुराणामध्यें गुलामाना इतक्या चागल्या तऱ्हेनें वागवण्याबद्दल आज्ञा असून शिवाय त्याना स्वतंत्र करावे अशीहि शिफारस केलेली आहे गुलाम स्त्रीला झालेलें मूल स्वतंत्र दर्जाचें मानतात व त्या स्त्रीलाहि गुलामगिरींतून सोडवून स्वातंत्र्य देतात. तुर्कस्तानच्या बादशाहानें स्वतःच्या राज्यात गुलामाचा व्यापार करणें हें बेकायदेशीर आहे असें पुनः पुनः जाहीर केलें व १८८९ मध्यें व्यापारबंदीचा कायदाहि केला. पण सरकारी नोकराच्या सामिलीमुळें व्यापार पूर्ण बंद होऊं शकला नाहीं. ईजिप्तमध्यें मात्र तो पूर्णपणें बंद झाला आहे.

रशियातील कृषिदासपद्धतिः—गुलामगिरीची पद्धति मोडून जिला सर्फडम उर्फ कृषिदासपद्धति म्हणतात ती रशियामध्यें सुरू होऊन ती जवळ जवळ १९ व्या शतकाच्या अखेरपर्यंत चालू होती. आरंभीं रशियात शेतकाम करणारे ( १ ) गुलाम, ( २ ) शेतमजूर व ( ३ ) शेतकरी असे तीन वर्ग होते; परंतु पुढें १८ व्या शतकाच्या सुमारास वरील तिन्ही वर्गांचें रूपांतर कृषिदासामध्यें झालें. हे लोक जमीनीच्या मालकापासून जमीनी खंडानें कायमच्या पत्करून राहूं लागले या कृषिदासाना जमिनी सोडून देण्याची परवानगी नसे इतकेंच नव्हे तर जनावराप्रमाणें हे दास मालकाना विकतांहि येत असत. पीटर दि ग्रेटनें या दासांवर डोईपट्टी बसविली होती व तिच्या वसुलीबद्दल जमीनदार हे जबाबदार असत. दुसऱ्या कॅथराईनच्या कारकीर्दीत ही पद्धति पूर्णावस्थेप्रत पोहोंचली. त्यावेळीं हे दास जमीनीबरोबर किंवा स्वतंत्रपणें विकीत असत, बक्षीस देत असत व कोणी बंड-
केल्यास त्याला दूर हद्दपार करीत किंवा आजन्म खाणींमध्यें कामास लावीत. पुढें पॉलच्या कारकीर्दीत ( १७९६–१८०१ ) त्याच्या मुक्ततेच्या चळवळीस सुरवात झाली दुसऱ्या अलेक्झांडरच्या कारकीर्दीत दासाना स्वातंत्र्य देण्यासंबंधानें सूचना करण्याकरता एक कमेटी नेमिली गेली, व तिच्या सूचनानुसार जमिनदाराचा विरोध असतानाहि दासाना स्वातंत्र्य देण्याचा कायदा ता. ३ मार्च १८६१ रोजीं करण्यात आला. यावेळीं दासाची एकंदर संख्या २,१६,२५,६०९ होती. याशिवाय सरकारी कामकाजाकरिता व राजघराण्यामध्यें मिळून दोन कोटीपर्यंत दास होते वरील कायद्यानें या सर्वांना म्हणजे चार कोटी दासाना स्वतंत्र करण्यात आलें.

आफ्रिका.—अमेरिकेमधील वसाहतींच्याकडे पाठविण्यात येणारे निग्रो गुलाम मुख्यतः आफ्रिकेतल्या कालाबार व बॉनी या दोन नद्यांच्या मुखाजवळील बंदरातून जात असत या बंदरातून जाणाऱ्या गुलामाची संख्या आफ्रिकेच्या इतर सर्व भागांतून जाणाऱ्या गुलामाच्या संख्येच्या इतकी असे. ईजिप्त, तुर्कस्तान, अरबस्तान व इराण इकडे पाठविण्यात येणारे गुलाम ( १ ) मध्य सुदान, ( २ ) अपर नाईल नदीचा मोठाल्या सरोवरापर्यंतचा प्रदेश, आणि ( ३ ) पोर्तुगिज ईस्ट आफ्रिका या तीन भागातले असत. मध्य सुदानमधून दरसाल ४००० गुलाम जात असत व त्याबद्दल तेथील सुलतानाला सालीना जकातीचें उत्पन्न ४८०० पौंड होत असे अलीकडे पश्चिम सुदानवर फ्रेंचाचा अम्मल सुरू झाल्यापासून या भागातून होणारा गुलामाचा पुरवठा फार कमी झाला आहे. तथापि सुदानच्या सुलतानाच्या साम्राज्यात गुलामपद्धति अद्याप चालू आहेच. अपर नाईल नदीच्या प्रदेशातून चालणारा गुलामाचा व्यापार बंद करण्याचें काम खेदीव इस्मायलनें १८६९ पासून सर सॅम्युअल बेकरला व त्या नंतर १८७४–७९ पर्यंत कर्नल सी. जी. गॉर्डन यास सांगितलें होतें तथापि माहादी व खलीफा या सुलतानाच्या कारकीर्दीत तो व्यापार पूर्ववत् सुरू झाला परंतु पुढें पूर्व सुदान अँग्लोईजिप्शियन सैन्यानें काबीज केल्यावर हा व्यापार कमी होऊं लागून अखेर १९१० च्या सुमारास मध्य सुदान फ्रेंचाच्या पूर्णपणें ताब्यात आल्यावर हा व्यापार अगदीं बंद झाला. मादागास्कर व कोमोरो बेटाना होणारा गुलामाचा बहुतेक पुरवठा पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेतून होत असे. शिवाय न्यासा सरोवराच्या प्रदेशात सापडणारे गुलाम झांजिबार बंदरातून जात असत. पुढें झांझिबारला ब्रिटिश प्रोटेक्टरेट स्थापन झाल्यावर आणि बहुतेक पूर्व आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील प्रदेश, ब्रिटिश, जर्मन व पोर्तुगीज याच्या ताब्यात आल्यावर गुलामाचा व्यापार बंद पडला व या यूरोपीय लोकाच्या ताब्यातील प्रदेशात गुलामाना स्वातंत्र्यहि देण्यात आलें.

कांगो नदीच्या काठीं बेल्जमच्या दुसऱ्या लिओपोल्ड राजानें कांगोफ्रीस्टेट नावाचें राज्य स्थापल्यावर तेथून व इतर देशी संस्थानातून गुलाम पकडून रवाना करण्या

व्यापार पुष्कळ चालू होता. पण पुढें आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर ब्रिटिश, जर्मन व फ्रेंच यांचीं प्रोटेक्टरेट राज्यें स्थापन झाल्यावर व्यापार कमी होत जाऊन १९१० च्या सुमारास तो पूर्णपणें बंद झाला.

गुलामाचा व्यापार व गुलामपद्धति बंद करण्याच्या बाबतींत प्रयत्न करणारांपैकीं क्लार्कसन व बहुस्टन हे प्रमुख होत. यांना व या बाबतींत प्रयत्न करणाऱ्या इतर सद्गृहस्थांना हें पूर्णपणें कळून चुकलें होतें कीं, गुलामाचा व्यापार व गुलामगिरी बंद पडण्यास निग्रो लोकांत शिक्षण, उद्योगधंदे व व्यापार यांचा प्रसार करणें हा रामबाण उपाय होय. सिरिया लिओन व लायबेरिया या मार्फत सदरहू कार्याला चांगला आरंभ होईल असें एकदां वाटत होतें. परंतु अद्यापहि या दिशेनें चांगला उपक्रम कोठेंहि झालेला नाहीं.

गुलामपद्धतीचा प्रच्छन्न अवतार.—यूरोपांतील अनेक देशांच्या वसाहतींत गुलामांचा व्यापार बंद करण्यात आल्यावर त्यांऐवजीं मागासलेल्या मानवजातींतील लोकांना मोठमोठ्या मुदतीच्या करारावर मजूर म्हणून आणण्याची पद्धति सुरू झाली. या मुदतबंदी मजुरपद्धतीला हळुहळु इतकें क्रूर स्वरूप प्राप्त झालें कीं गुलामपद्धतीचा हा नवा अवतारच आहे असें म्हणण्याची पाळी आली. १८६७ च्या सुमारास दक्षिण महासागरांतील बेटांमध्यें, न्यू कॅलेडोनिया व फिजी बेटांमध्यें प्रथम या पद्धतीला सुरवात झाली. वास्तविक या मजुरांबरोबर कायदेशीर करार करून त्यांना नेत असत, परंतु मजूर पुरविणाऱ्या व्यापारी कंपन्याच्या लबाड्या व अत्याचारामुळें या पद्धतीला पुढें गुलामपद्धतीचेंच हिडिस स्वरूप प्राप्त झालें. मजुरांना कराराच्या अटी सर्व नीट समजाऊन सांगण्यात येत नसत व कायदेशीर मुदतींपेक्षांहि अधिक मुदतीपर्यंत त्यांना करारानें बद्ध करून घेत असत. यासंबंधीची संपूर्ण माहिती स्वतंत्र लेखांत दिली आहे.

[ वाङ्मय.—यासंबंधावर वाङ्मय संपादन आहे. थोडक्यांत पुस्तकांचा उल्लेख येथें करता येईल भारतीय दास्यस्थितीसाठीं वेद, महाभारत, धर्मशास्त्रें व प्रवासवर्णनें हीं पाहिलीं पाहिजेत. यावर पद्धतशीर पुस्तक नाहीं. ग्रीसमधील गुलामगिरीवर ए. काल्डेरिनी यांचें पुस्तक आहे ( मिलान १९०८ ). रोमन गुलामगिरीच्या कायद्यावर बक्लँड यांचें ( केंब्रिज १९०९ ) पुस्तक चांगलें आहे. यूरोपांतील मध्ययुगीन गुलामगिरीवर द्वीपकलीय ग्रंथकार पुष्कळ आहेत पण इंग्रजी ग्रंथ चांगले नाहींत. तरी "स्टब्ज" चें कान्स्टिट्यूशनल हिस्ट्री ऑफ इंग्लंड, हें पुस्तक वाचावें. अमेरिकन गुलामगिरीवर एच् विल्सनचें हिस्ट्री ऑफ दि राईझ अँड फॉल ऑफ दि स्लेव पावर इन् अमेरिका ( बोस्टन १८७२ ); ड्यू बाईस-सप्रेशन ऑफ दि आफ्रिकन स्लेव्हट्रेड टु दि युनायटेड स्टेट्स ( न्यूयार्क १८९६ ), ड्यू बाईस हा निग्रो ग्रंथकार आहे. ]

गुलाम घराणें ( १२०६-१२८८ )—तेराव्या शतकाच्या सुरवातीपासून घोरानें हिंदुस्थानावर स्वारी केली, तोंपर्यंतच्या काळामध्यें दिल्लीच्या तख्तावर एकंदर चौतीस मुसुलमानी राजे बसले त्यांपैकीं महंमद घोरीचा वजीर ऐबक हा पहिला होय. हे चौतीस राजे पांच निरनिराळ्या घराण्यांपैकीं होते. त्यांपैकीं गुलाम घराण्यानें दिल्ली येथें राज्य केलें. इ. स. १२०६ पासून १२८८ पर्यंत या घराण्यात एकंदर दहा सुलतान होऊन गेले. त्यांपैकीं कुत्बुद्दिन ऐबक, अल्तमश व बल्बन हे विशेष प्रसिद्ध आहेत.

ऐबक.—कुत्बुद्दिन हा गुलाम घराण्याचा संस्थापक होय. यांचें चरित्र ज्ञानकोशाच्या अकराव्या भागात (पृ. ५४७)आलें आहे तेथें तें पहावें त्याच्या हातानें बोट तुटलेलें असल्यामुळें त्याला ऐबक म्हणजे हातानें अधू असें नाव पडलें. कुत्बुद्दीन न्यायी असला तरी हिंदूंवर त्याची वक्रदृष्टीच होती. हिंदूंचीं देवळें पाडून तेथील दगडांनीं त्यानें मशीदी बांधिल्या होत्या.

अल्तमश.-ऐबकानंतर पाचव्यावर त्याचा आराम नांवाचा पुत्र गादीवर बसला, परंतु राज्यकारभार करण्यास तो नालायक असल्यामुळें सर्वत्र अव्यवस्थता व गोंधळ उडून गेला. कुबाचा नांवाच्या सरदारानें सिंधू व मुलतान आणि बखत्यार खिलजीनें बंगाल व बहार हे प्रांत बळकाविले व एल्डोज सरदाराचा डोळा लाहोरवर होता. अशा स्थितींत कुत्बुद्दीनचा जांवई अल्तमश यानें दरबारी मंडळीच्या साहाय्यानें आरामचा पराभव करून तख्त बळकाविलें अल्तमश हाहि गुलाम होता. परंतु त्याच्या धन्यानें त्यास उत्तम शिक्षण देऊन कुत्बुद्दीनला विकलें होतें. हळू हळू तो कुत्बुद्दीनला इतका प्रिय झाला होता कीं, त्यानें यास आपली मुलगी दिली होती. अल्तमशनें सिंधवर स्वारी करून कुबाचाचा पराभव करून त्याचा मुलुख पादाक्रांत केला इ. स. १२२६ त त्यानें माळवा प्रांतावर स्वारी करून १२३१ त ग्वालेरचा किल्ला व उज्जनी घेऊन तेथील देवालयाचा नाश करून बहुतेक उत्तरहिंदुस्थान आपल्या अंमलाखालीं आणिलें. नंतर त्यानें बगदादच्या खलीफाकडून स्वतःसाठीं बादशाही वस्त्रें मिळविलीं. पुढें तो १२३६ त मरण पावला. अल्तमश हा मूळ थोर घराण्यांतील होता; तो हुषार, देखणा व बुद्धिमान असल्यामुळें द्वेषबुद्धीनें त्याच्या भावांनीं त्यास गुलाम म्हणून विकलें होतें अल्तमशनेंच प्रथमतः अरबी नाणीं हिंदुस्थानात सुरू केलीं. व टंका ( रुपायाच्या तोडीचें एक नाणें ) हें चांदीचें नाणें पाडिलें. या नाण्याचें वजन १७५ ग्रेन होतें.

रझिया.—अल्तमशाचे पुत्र दुर्बल व व्यसनी असल्यामुळें त्याच्या नंतर दहा वर्षें राज्यात सर्वत्र दंगेधोपे चालू होते. अल्तमशाचा वडील पुत्र रुक्न उद्दीन यानें तख्त बळकाविलें, परंतु तो अत्यंत व्यसनी असल्यामुळें दरबारचे लोक त्याचा कंटाळा करूं लागले त्याची बहीण रझिया हिला राज्यकारभार देण्याचें ठरवून रुक्न उद्दीन यास त्यांनीं कैदेंत

टाकिलें. रझिया इनें सुलतान रझिया-दुद्दीन (धर्मसक्त) असा स्वतःस किताब धारण केला. ती पराक्रमी असून आपल्या बापाची लाडकी होती. बापाच्या गैरहजेरींत ती सर्व कारभार पाहत असे. राज्यकारभार करण्यास लागणारे बहुतेक सर्व गुण तिच्या अंगीं होते. तिलाच गादी मिळावी अशी अल्तमशचीहि इच्छा होती. प्रत्येक काम ती स्वतः पाही. पूर्वीच्या वाईट चाली बंद करून तिनें कायद्याची दुरस्ती केली. परंतु स्त्रीनें राज्य करावें ही कल्पनाच त्यावेळीं पसंत नसल्यामुळें लोकांचें समाधान झालें नाहीं. निझामउल्मुल्क जुनैदी या वजीरानें तिचा अधिकार मान्य केला नाहीं. मलिक जानी, कोची, कबीर खान वगैरे सरदारांच्या मदतीनें त्यानें रझियाच्या विरुद्ध बंड केलें. परंतु तें रझियानें मोडून टाकिलें. अमीर जमलुद्दीन याकूत नावाच्या हबशी गुलामावर तिचें प्रेम बसून त्याला तिनें आपला मुख्य कारभारी नेमिलें होतें. परंतु या कृत्यानें व ती नेहमी पुरुषवेष धारण करी यामुळें तुर्क सरदारांचीं मनें तिच्या विरुद्ध कलुषित झालीं. त्यामुळें लाहोरच्या सुभेदारानें बंड केलें. परंतु तिनें तें तत्काळ मोडलें. इतक्यांत पुन्हा (१२४०) भटिंडचा सुभेदार मलिक अल्तुनिया यानेंहि बंड केलें व त्याला अनेक सरदारांनीं मदत केली. हें बंड मोडण्यासाठीं ती स्वतः गेली असतां तुर्क सरदारांनीं तिच्यावर हल्ला करून अमीर याकूत या हबशाला ठार केलें व रझियाला पकडून कैदेंत टाकिलें. कांहीं दिवसांनीं या अल्तुनियाशींच तिनें लग्न लाविलें. तेव्हां या दोघांविरुद्ध इतर सरदारांनीं लढाई करून त्यांना ठार मारिलें. राज्यकारभार करण्याचें चातुर्य तिच्या अंगीं होतें, परंतु स्त्रीनें राज्य करावें ही कल्पनाच तुर्क लोकांस आवडली नाहीं. आजपर्यंत फक्त तीन स्त्रियांनीं मुसुलमानी अमदानींत राज्य केलें. एक ही रझिया, दुसरी ईजिप्तची राणी शजारुद्दूर व तिसरी इराणची राणी आबिदा. रझियाचा भाऊ मोइझ-उद्दीन बहराम हा तिजविरुद्ध लढत होता. पुढें त्यासच राज्यपद मिळालें.

मोइझ-उद्दीन बहराम (१२३९—४१)—बहराम राज्यकारभार करण्यास अगदीं नालायक होता. कित्येक लोकांस त्यानें कपटानें ठार केल्यामुळें त्याविरुद्ध दरबारांत कट झाले. १२४१ त मोंगलांनीं लाहोरावर स्वारी केली असतां बहरामनें यखत्यार-उद्दीन नावाच्या दिवाणास त्यांच्यावर पाठविलें. मोंगलांचें पारिपत्य करून दिल्लीस परत आल्यावर यखत्यार-उद्दीन यानें बहराम यास पकडून ठार मारिलें. बहराम हा क्रूर व दुष्कृत असून त्याच्या दोन वर्षांच्या कारकीर्दींत जिकडे तिकडे खून, मारामाऱ्या वगैरे गोष्टी चालू होत्या.

अल्ला-उद्दीन-मसाऊद (१२४१-४६)—बहराम नंतर त्याचा पुतण्या मसाऊद हा गादीवर आला. याच्या वेळींहि दंगेधोपे चालूच होते. तो क्रूर व चैनी ... राज्यकारभाराकडे त्याचें लक्ष नसे. दरबारच्या लोकांनीं त्यास कैद करून त्याचा चुलता नासिरुद्दीन यास राज्यपद दिलें. मसाऊद कैदेंतच मरण पावला. याच्यावेळीं मोंगलांनीं हिंदुस्थानवर दोन स्वाऱ्या केल्या, परंतु दोन्ही वेळां त्यास माघार घ्यावी लागली.

नासिरुद्दीन महमूद (१२४६-१२६६)—नासिरुद्दीन महमूद हा अल्तमशचा तिसरा पुत्र होय. याच्या कारकीर्दींत सर्वत्र शांतता नांदत होती. याच्या सावत्र आईनें यास लहानपणीं कैदेंत टाकिलें होतें. पुढें मसाऊदनें याची सुटका करून यास बेहराइचची सुभेदारी दिली. तें काम त्यानें उत्तम रीतीनें केलें. बंदींत असतां कुराण लिहून तो आपला उदरनिर्वाह करी. तोच धंदा राज्यावर आला असताहि त्यानें चालविला. त्याचें राहणें साधी होती, तो एकपत्नी होता. घरचीं सर्व कामें त्याच्या बायकोस स्वतः करावीं लागत. तो स्वतःस राज्याचा मालक न समजतां रक्षक समजे. स्वतःच्या खर्चाचा भार राज्यावर लादणें योग्य नव्हे अशा समजुतीनें स्वतः श्रम करून तो आपला खर्च चालवी. त्यानें राज्यांत चांगला बंदोबस्त ठेविला, मोंगलांचा बंदोबस्त केला, शेजारचीं लहान लहान स्वतंत्र राज्यें जिंकून आपल्या राज्यास जोडिलीं. उलुघ खान उर्फ ग्यासुद्दीन बल्बन यास त्यानें आपला वजीर नेमलें. नासिरुद्दीन इ. स. १२६६ त मरण पावला. तो स्वभावानें शांत होता, परंतु राज्यकारभाराच्या कामीं इतका साधा मनुष्य नालायक असतो.

बल्बन (१२६६-१२८७)—बल्बन हा एका तुर्क सरदाराचा मुलगा होता. परंतु लहानपणींच मोंगलांनीं त्यास पळवून हिंदुस्थानांत गुलाम म्हणून विकलें. अल्तमशनें त्यास विकत घेतलें. प्रथम नाईक, मग शिकारी, नंतर सेनापति व मुत्सद्दी व सरतेशेवटीं सुलतान अशा रीतीनें केवळ स्वपराक्रमानें व चातुर्यानें तो चढत गेला. रुक्नुद्दीनच्या कारकीर्दींत त्याला कारागृहवासहि भोगावा लागला होता. बहरामच्या वेळीं याला एक लहानशी जहागीर मिळाली. बहरामच्या विरुद्ध झालेल्या बंडांत याचें अंग असल्यामुळें, तें बंड यशस्वी झाल्यावर हांसीचा राज्यकारभार याच्याकडे आला. १२४३ त याच्याच पराक्रमानें मोंगलांचा पराभव झाला. नासिरुद्दीन गादीवर बसल्यावर सर्व सत्ता बल्बनकडेच आली. नासिरुद्दीन निपुत्रिक असल्यामुळें त्याच्या पश्चात् बल्बन यासच राज्य मिळालें. राजा झाल्यावर त्यानें बराच कडकपणा गाजविला. हिंदू लोकांवर त्याची वक्रदृष्टि होती. त्यांना मोठमोठ्या जागा त्यानें दिल्या नाहींत. मुसुलमानी विद्येस त्यानें चांगलें उत्तेजन दिलें. मद्यपान न करण्याबद्दल त्यानें नियम केले व ते मोडणारास कडक शिक्षा दिल्या. तो डामडौलाचा भोक्ता होता. अल्तमशनंतर चाललेल्या सुलतानांच्या कर्तृत्वशून्य निघाल्यामुळें हिंदू लोकांनीं चळवळ सुरू केली होती. परंतु ती बल्बननें दडपून टाकिली. हा हिंदूंचा फार द्वेष्टा होता. नासिरुद्दीनच्या वेळीं प्रत्येक वर्षी तो हिंदू लोकांवर स्वाऱ्या करी. दरबारा

मडळीच्या गुन्ह्यावरून एकदा नासिरुद्दीननें त्याला हद्दपार केलें होतें (१२०१) बल्बन हद्दपार झाल्यावर त्याची जागा रिहन (एक बाटगा हिंदु) यास मिळाली होती, परंतु त्याचा जुलूम लोकास सहन न होऊन सर्वत्र असंतोष पसरला तेव्हा दरबाऱ्यानीं पुन्हा बल्बन यास परत आणून त्यास पूर्वीचा अधिकार दिला (१२५४) यापुढें त्यानें वीस वर्षें पर्यंत मोंगल लोकाचे हल्ले परतविले व हिंदु लोकाचीं बडें मोडणें या दोन महत्वाच्या गोष्टी केल्या या दोन गोष्टी करताना त्यानें पुष्कळ क्रूरपणाचीं कृत्यें केलीं यावेळीं त्यानें अग्नि व तलवार याचा प्रलय सुरू केला होता

बगाल्यात तुघ्रलखानाचें बड —बगाल शिरजोर झाल्यामुळें तिकडे बल्बनने तुघ्रलखानास त्याच्या कारभारावर पाठविलें होतें त्यानें तथील बदोबस्त उत्तम केला परंतु त्यानें स्वतत्र होण्याचा उद्योग चालविल्यामुळें बल्बननें त्याच्यावर फौज पाठविली तुघ्रलनें त्या फौजेचा पराभव केल्यामुळें बल्बन स्वत बगाल्यात गेला व त्यानें तुघ्रलखानाचा पराभव करून त्याच्या लोकाची कत्तल केली या चारीस एकदर तीन वर्षे लागलीं (१२८०–८३)

एकदरींत बल्बनचें आयुष्य धामधुमींत व युद्धप्रसंगात गलें हा अत्यत क्रूर व मनुष्यसहारक होता दिल्लीच्या आसपास मेहमी बडें मोडण्यासाठीं त्यानें एकदर एक लाख लोक ठार मारिले त्यामुळें जिकडे तिकडे रक्ताच्या नद्या वाहू लागल्या, प्रत्येक गावाजवळ प्रेताचे प्रचड ढीग जमा झाले आणि त्याच्या दुर्गंधीनें सर्व प्रदेश व्यापून गेला (सरदेसाई) बगालच्या स्वारीहून परत आल्यावर, मुल्तानावर मोंगलानीं हल्ला केला होता, त्याचा बदोबस्त करण्यासाठीं त्यानें आपला मुलगा महमूद यास रवाना केलें महमूदनें मोंगलाचा मोड करून सर्व मुलूख परत घेतला परंतु देपालपूर येथ झालेल्या निकराच्या लढाईत महमूद मारला गेला (१२८५) या बातमीनें बल्बन आजारी पडून लवकरच मरण पावला (१२८६) बल्बन भपकेबाज दरबार भरवून व थाट करून लोकावर छाप बसवी लहानपणीं त्यास मद्यप्राशनाचा नाद होता, पण राज्यकारभार हातीं येताच त्यानें आपले सर्व छंद टाकून दिले त्यानें शेतीची सुधारणा केली अनेक देशाचे विद्वान गृहस्थ त्याच्या दरबारीं होते

कैकुबाद (१२८६–१२८८) –आपला नातू कैखुसु (महमदचा पुत्र) यानें आपल्या पश्चात गादीवर बसावें असें बल्बननें ठरविलें होतें परंतु तें न जुमानता त्याचा दुसरा मुलगा बोगराखान (बगालचा सुभेदार) याच्या कैकुबाद नावाच्या मुलासच दरबारी लोकानीं गादीवर बसविलें तो प्रथम सौम्य होता परंतु हातांत अधिकार आल्याबरोबर तो विलासी बनून आपला सर्व वेळ चैनींत घालवू लागला त्यानें निजामउद्दीन नांवाच्या सरदारास वजीर नेमून सर्व सत्ता त्याच्या हातीं दिली स्वत च राज्य बळकवावें अशी निजामाची इच्छा होती कैखुसनें राज्य घेण्याची खटपट चालविली असतां त्याचा पराभव करून निजामनें त्यास ठार मारिलें – सर्व जुन्या कामगारास काढून टाकिलें, बोगराखाननें स्वत आपल्या मुलास (कैकुबादास) उपदेशपर पत्रें पाठवून निजामनें राज्यावर काय काय संकटें आणलीं आहेत, त्याची जाणीव करून दिली शेवटीं बोगराखान स्वत दिल्लीस आल्यामुळें निजामाचें कपट बाहेर आलें यामुळें निजामानें आत्महत्या केली पुढें कैकुबाद व्यसनाधीन झाल्यामुळें आजारी पडला त्यावेळीं खिलजी व मोंगल असे दोन पक्ष दरबारात प्रबळ झाले या दोन पक्षाचे तंटे विकोपास जाऊन जलालुद्दीन खिलजीनें कैकुबादचा व त्याच्या मुलाचा खून करून दिल्लीचें राज्य स्वत बळकाविलें अशा प्रकारें गुलामवशाचा शेवट झाला (इ सन १२८८ ) आम गुलाम या शब्दास जाईट स्वरूप आलें आहे, परंतु त्यावेळीं तें तसें नव्हतें लढाईत पकडून आणलेल्या लोकांचा भरणा या गुलामांत होत असे मुसुलमानी धर्म व राज्य याच्या प्रसारास या गुलामाचा विशेष उपयोग होता तुर्क व अफगाणाच्या वेळीं गुलामाची ही सस्था नावलौकिक मिळविण्याची एक शाळाच बनली होती प्रत्येक सुलतानाचे प्रेम या गुलामावर विशेष असे महमद घोरी व कुतुबुद्दीन हे स्वतच्या मुलापेक्षाहि आपल्या गुलामावर अधिक प्रेम करीत त्यावेळीं गुलामगिरी म्हणजे पराक्रमाची शाळा असे येथून निभावून बाहेर येण्यास अंगी योग्यताच लागे महमद घोरीचे एल्दोझ कुबाचा बख्तयार खिलजी व कुतुबुद्दीन हे चार मुख्य सरदार मूळचे गुलामच होते गुलामगिरीचा जो निंद्य अर्थ पाश्चात्य लोकात आहे तो तत्कालीन पूर्वेकडच्या मुसुलमानी अमदानींत नव्हता ( सरदेसाई ) [ हेवलूक हूट सिव्हिलूल इंडिया विल्यम जॅक्सन—मद्रास मेडन पीरियड पु ५ सरदेसाई–मुसुलमानी रियासत ]

गुलाल—गुलाल ही एक तांबूस किंवा अबाशाई रंगाची पूड असून तिचा उपयोग हिंदु लोकात लग्नकार्याच्या वेळीं, होळी सणात व इतर उत्सव व मगलप्रसंगीं करतात गुलाल तयार करण्यास तांदुळाचें अगर शिंगाड्याचें पीठ लागतें राडीपासून मध्यम प्रतीचा गुलाल होत व शाडूपासून केलेला गुलाल अगदी कनिष्ठ प्रतीचा समजला जातो

गुलाल करण्याच्या कृती —प्रथम खडी, शिंगोळे वगैरे ज्या जिनसाचा गुलाल करणें असेल ते जिन्नस भुसळानें कुटून व ठीक करतात नतर मोठ्या जात्यांत दळून त्याचें पीठ करतात तसेंच हलक्या जातीचे तांदूळ दळून त्याचेंहि पीठ करतात नंतर तांबड्या रगाचें दाट पाणी करून त्यांत तें पीठ भिजवितात व एक दोन दिवस तें तसेंच भिजू देतात चागलें वाळल्यावर त्याची पूड करून ठेवतात बाजारात तांबड्या रंगाचे हवे मिळतात तो रंग गुलाल तयार करताना वापरल्यास त्यापासून उत्तम गुलाल तांदुळाचा गुलाल केल्यास महाग पडतो म्हणून

इतर पदार्थच उपयोगात आणतात. म्हणजे गुलाल स्वस्त घावयास सापडतो.

**गुलावथी**-संयुक्तप्रांतामध्यें बुलंदशहर तालुक्यातलें शहर. उत्तरअक्षांश २८°३५' व पूर्वरेखांश ७७°४८'. वस्ती (१९११) ६०२७. मुख्य वस्ती सय्यद व बनिया लोकांची. मिहिरबान अली नावाच्या एका सय्यदानें शहर सुधारण्याकरता बरीच खटपट केली व बराच पैसाहि खर्च केला, व शाळा उघडली

**गुल्म, नि दा न.**-गुल्म म्हणजे आमाशयापासून गुदद्वारापर्यंत हाताच्या स्पर्शानें समजणारी गाठ. संस्कृत भाषेत गुल्म शब्दाचा अर्थ शेंड्याकडे विस्तार असलेल्या लहान लहान झाडाचा एकवट दिसणारा समुदाय असा आहे. यासच जाळें असें मराठींत नाव आहे. या अर्थावरून पोटात दोषामुळें अशीच जी जाळी बनते तीस गुल्म नाव दिलें आहे. हीं वरून हाताला गाठीसारखी लागते म्हणून दिला गाठ असें म्हटलें आहे. परंतु शरीरात इतर ठिकाणीं म्हणजे गळ्याला वगैरे ज्या गाठी होतात त्यात आणि या गाठींत फरक आहे. तो असाः—शरीरात इतर ठिकाणीं झालेल्या गांठी पिकतात, गुल्म पिकत नाहीं. इतर गांठी बहुतेक मांस, व मेद यांच्या बनतात. गुल्म दोषानीं व रक्तधातु यानेंच बनतो.

त्या गुल्म संज्ञक गाठी आतड्याच्या आतल्या भागातच प्राय· होतात परंतु कित्येकवेळां आतड्याच्या बाहेरच्या बाजूसहि होतात. त्यास बहिर्मार्गगत गुल्म म्हणतात. अंतमार्गातील किंवा बहिर्मार्गातील गुल्मांचीं लक्षणें सामान्यत· सारखींच असतात. हे गुल्म आठ प्रकारचे आहेत. ते वात, पित्त, कफ, वातपित्त, कफपित्त, कफवात, संनिपात व रक्तज,( आर्तव दोषानें स्त्रियास होणारा ) हे होत.

ताप, वांती, किंवा अतिसार इत्यादि रोगाचीं अथवा पंचकर्मे ( ओकारी, रेचक, बस्ती दोनप्रकारचे [ निरूह, अनुवासन ] आणि नस्य ) यानीं क्षीण झाल्यावर वातकारक पदार्थ खाण्यानें, भूक लागली असता थंडपाणी पिण्यानें, जेवल्यानंतर पाण्यात पोहणें वगैरे, लंघन, शक्ति कमी करणारीं व शरीरास खिळखिळीं करणारीं कर्में केल्यानें, बळेंच ओकाऱ्या काढल्यानें, किंवा वातादिकाचे आलेले वेग दाबवून न धरल्यानें, शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें स्नेहन अगोदर व स्वेदन न करिता रेचक औषध घेतल्यानें, किंवा शोधन औषध घेतल्यावर लगेच विदाही व कफकारक ( कफ पाझरवणारे-स्पंदन ) पदार्थ खाल्यानें, महास्रोतातील म्हणजे आमाशय व पक्वाशय यांतील वाताधिक दोष वेगवेगळे, दोन दोन, किंवा तीन्ही एकत्र अथवा रक्तासहित कुपित होऊन वरचा व खालचा दोन्ही मार्ग बंद करून हातास लागणारा वर उचललेला गाठीसारखा गुल्म नावाचा रोग उत्पन्न करितात हा उत्पन्न होण्यापूर्वी पोटांत शूळ होऊं लागतो. हा गुल्मरोग आमाशय किंवा ( आतडा ) यात कोठेंहि जरी होतो तरी हृदयाजवळचा भाग, पोटाच्या कुशी, बेंबीच्या जवळचा प्रदेश, मूत्राशय यात विशेषें करून होतो.

वायु अमूर्त असल्यामुळें त्याची गाठ कशी होते अशी कोणास शंका येईल याचें उत्तर असें आहे कीं, धातुक्षयानें किंवा कफ, मल व पित्त यानीं मार्ग बंद केल्यानें वायु कोठ्यात घर करून रूक्षतेमुळें कठिण होतो. तो स्वस्थानीं म्हणजे पक्वाशयात असल्यास स्वतंत्रपणें दूषित होतो आणि परक्या स्थानीं म्हणजे आमाशयात असता पित्तकफाच्या तेजानें दूषित होतो तो एकेठिकाणीं गोळा झाल्यामुळें ( थोड्या जागेंत पुष्कळ वायु चेंडूप्रमाणें साठल्यामुळें) साकार किंवा कठिण नसूनहि कठिण भासतो व हाताला गाठीसारखा लागतो म्हणून त्या साठलेल्या वायूस वातगुल्म म्हणतात. या वातगुल्मात मान व डोकें यात शूळ, ताप, पानथरी, आतड्यात कुजबुजणें, सुईनें टोचल्यासारखें दुखणें, मलावरोध, वरचेवर दम लागणें, इंद्रियें ताठणें, तोंडास कोरड, कृशता, अग्नि अनियमित होणें, त्वचा, डोळे, नखें, वगैरे रुक्ष व काळीं पडणें, आणि वायूच्या चंचलपणामुळें गुल्माचा आकार व स्थान वाढणें, कमी होणें व वेदना, याचा कोणत्याच प्रकारचा नियम नसणें, आणि गुल्म मुंग्या आल्याप्रमाण स्फुरण पावणें व त्यात टोंचणें हीं लक्षणें होतात. पित्तगुल्मात दाह, आंबट ढेंकर, मूर्छा, जुलाब, घाम, तहान, ताप, त्वचा हिरवी होणें, गुल्मास स्पर्श सहन न होणें, गुल्म तापणें, दुखणें, पेटल्यासारखा होणें, फटत लागणें आणि त्याची जागा पोळल्यासारखी होणें हीं लक्षणें होतात. कफगुल्मात अंगावर ओलें वस्त्र पांघरल्यासारखें वाटणें, अरुची, अग्निमांद्य, हिंवताप, पडसें, आळस, मळमळ, खोकला येणें, त्वचा, नखें वगैरे पांढरीं होणें आणि गुल्म खोल, कठिण, जड व स्तब्ध असून त्यावर हात ठेवला असतां रोग्याला न कळणें व वेदना कमी होणें हीं लक्षणें होतात गुल्म बहुतकरून ज्या दोषापासून उत्पन्न होतात ते त्या दोषाच्याच स्थानात असतात. आणि त्या दोषाच्या पूर्वोक्तप्रकोपकाळीं त्यात शूळ होऊं लागतो. द्वंद्वज गुल्म तीन आहेत. त्यात दोन, दोन, दोषाचीं लक्षणें होतात. सांनिपातिक गुल्मात तीव्र शूळदाह होतो, तो लवकर पिकतो. आणि कठिण व उंच असतो. तो असाध्य आहे.

रक्तगुल्म फक्त बायकासच होतो. जी स्त्री ऋतुकाळीं, बाळंपणात किंवा कांहीं योनिरोग झाला असता वातूळ पदार्थ खाते त्यामुळें वायु कुपित होऊन तो दर महिन्यास साचलेलें आर्तव ( विटाळ ) गर्भाशयांत कोंडून ठेवितो त्या योगानें पोट फुगतें आणि मळमळ, डोहाळे, स्तनात दूध येणें, अशक्तता वगैरे गर्भारपणाचीं लक्षणें प्रगट होतात. पुढें त्या साचलेल्या रक्तात वायुचा संसर्ग झाल्यामुळें तिला वात गुल्माची आणि रक्त हें पित्तापासून बनतें म्हणून पित्तगुल्मांचीं लक्षणें होतात तीं पुढीलप्रमाणें:—

पोटांत दुखणें, ताठणें, दाह, अतिसार, तहान, ताप वगैरे. याशिवाय गर्भाशयांत दुष्ट रक्त असून त्यात फार शूळ होतो. योनींतून स्राव होतो त्यास घाण येते. योनींत टोंचण होते. वेदना होतात आणि ती स्फुरण पावते. गर्भारपणाचीं सर्व लक्षणें या रक्तगुल्मात होत असल्यामुळें पुष्कळ वेळां गर्भ किंवा गुल्म यांचा निश्चय करणें कठिण जातें. परंतु पुढील लक्षणांवरून बारकाईनें गुल्माचा निश्चय करता येतो.

गर्भ जसा आपल्या अंगानीं (हात, पाय, डोकें, वगैरे) पोटांत इकडे तिकडे चळवळ करतो त्याप्रमाणें रक्तगुल्म, त्यास अंगें नसल्यामुळें हालचाल करूं शकत नाहीं. परंतु त्यात शूळ होतो. तो एकच गोळा असलेला कधीं कधीं स्फुरण पावतो. याशिवाय गर्भानें जसें पोट वाढतें तसें यात न होता गुल्मच वाढतो.

सर्व गुल्म ज्या एक किंवा अनेक दोषापासून उत्पन्न होतात, त्याच्याच आश्रयानें रहातात. म्हणून ते फार दिवसांनीं पिकतात किंवा मुळींच पिकत नाहींत कारण पिकण्यास तिन्ही दोषाची जरूर असते. पोटात गळूं (विद्रधी) झालें असता प्रथम गुल्माचा भास होतो. परंतु विद्रधी दुष्ट रक्तानें होत असल्यामुळें लौकर पिकतो. यावरून गुल्म व विद्रधी यातील भेद स्पष्ट होतो. मागें सांगितल्याप्रमाणें अंतर्भागगत गुल्म व बहिर्गत गुल्म यांचीं लक्षणें प्रायः जरी *सारखीं असलीं तरी कांहीं लक्षणें निराळीं असतात तीं येणें* प्रमाणें.—

अंतर्गत (आतड्याच्या आतील) गुल्मांत मूत्राशय, कुक्षी, हृदय व प्लीहा यांत वेदना होतात, अग्नि मंद होतो, शरीराची कांती नाहींशी होते. शक्ती क्षीण होते आणि मलमूत्रादिकाचे वेग बंद होतात बहिर्गत गुल्मात याच्या उलट लक्षणें होतात. बस्ति, हृदय, वगैरे कोष्टागात किंचित् शूळ उत्पन्न होतो. गुल्माच्या जागेवरील त्वचेचा रंग बदलतो व ती जागा बाहेरून अधिक उंच दिसते फार ढेकर येणें, मलावरोध, थोडें जेवलें तरी पोट भरल्यासारखें वाटणें, भरपोट जेवण सहन न होणें, आंतड्यात कुजबुजणें, पोटांत गुरगुरणें *पोट फुगणें व अग्निमांद्य हीं लक्षणें गुल्म होण्यापूर्वी होतात.*

या गुल्मांतच आनाह या नावाचा विकार फार होतो. वरून व खालून वायूचा अवरोध झाल्यानें पोट अतिशय फुगतें, आंत गुरगुरतें व अत्यंत तीव्र वेदना होतात ही त्या आनाहाचीं लक्षणें होत.

जो गुल्म थोडा थोडा क्रमानें वाढत जाऊन मोठा झाला, (सर्व पोटभर पसरला) व ज्याच्यावर शिरांची जाळी झाली असून कासवासारखा उंच दिसूं लागला तसेच अशक्तपणा, अरुचि, मळमळणें, खोकला, ओकारी, अस्वस्थता व ताप, तहान, झोंपड, आणि पडसें हीं लक्षणें दिसूं लागलीं तो गुल्म असाध्य असतो.

गुल्म झालेल्या रोग्याचे हात, पाय, हृदय व बेंबी यास *सूज असून ताप, दमा, ओकारी व अतिसार हीं लक्षणें झाली* तर गुल्म असाध्य असतो दमा, पोट दुखणें, तहान, अन्नद्वेष *व गुल्माची गाठ एकदम नाहींशी होणें, व दुर्बलपणा येणें* हीं लक्षणें झाली असता गुल्मरोगी वाचत नाहीं.

चिकित्सा.—सर्व प्रकारच्या गुल्मांवर लंघन, वमन, विरेचन, स्वेदन, घृतपान, बस्ती, अरिष्टें, पथ्यभोजन आणि रक्त काढणें व डाग देणें हे उपचार आहेत रूक्ष व शीतसेवनापासून उत्पन्न झालेल्या वातिक गुल्मात मळाचा खडा, वायूचा अवरोध व तीव्र वेदना हीं लक्षणें असल्यास त्यावर तेलाचा उपयोग करावा. खाण्यात, पिण्यांत, बस्तीच्या द्वारें व अभ्यंगानें तेलाचा उपयोग केल्यानें शरीर स्निग्ध झाल्यावर शेकावें. पोटफुगी, वेदना, ताठणें आणि वायु व मळ यांचा अवष्टंभ हे विकार असतां विशेष शेकावें. *तें स्निग्ध झालेल्या रोग्याचीं स्रोतें मऊ करून वायु व मळ* यांचा अवष्टंभ मोडून गुल्म नाहींसा करते. सामान्यतः सर्व गुल्मावर व विशेषेंकरून बेंबीच्या वरच्या गुल्मावर स्नेहपान हितकर आहे. पक्वाशयातील गुल्मावर बस्ति आणि *इतर भागीं पोटातील गुल्मावर स्नेहपान व बस्ति हे दोन्हीं* उपाय हितकर आहेत. वातगुल्मांत वायु व मळ यांचा अवष्टंभ असून अग्नि प्रदीप्त असल्यास स्निग्ध व उष्ण अशीं पौष्टिक अन्नपानें द्यावीं आणि वरचेवर स्नेह पाजावा. वातगुल्मात कफपित्ताचें प्राबल्य असल्यास निरूह व अनुवासन बस्ती द्यावे. बस्तिकर्म उत्तम गुल्मनाशक आहे. कारण तें प्रथम वायूस त्याच्या स्वस्थानांत म्हणजे पक्वाशयात जिंकून गुल्माचा त्वरित नाश करितें म्हणून वरचेवर निरूह व अनुवासन बस्ती दिले असता वातज पित्तज व कफज गुल्म बरे होतात. वातगुल्मात कफ वाढून अग्नीस मंद करून जर तो अरुचि, मळमळ, जडत्व व झापड हे विकार उत्पन्न करील तर रोग्यास वमन द्यावें.

वातगुल्मात कफाचें प्राबल्य असल्यास एरंडेल तेल सुरेच्या निवळीबरोबर आणि पित्ताचें प्राबल्य असल्यास दुधातून प्यावें. वातगुल्मात पित्त अतिशय वाढून त्यापासून दाह उत्पन्न झाल्यास अनुलोमन करणारें स्नेहयुक्त रेचक द्यावें. यापासूनहि दाह शमन न झाल्यास रक्त काढावें. कोंबडा, मोर, तित्तिर यांच्या मांसाचा रस, भात, मद्य, औषधानीं तयार केलेलें सूप, बेतानें उष्ण, पातळ व स्निग्ध अन्न हीं सर्व वातगुल्मावर पथ्यकारक आहेत

स्निग्ध व उष्ण सेवनानें उत्पन्न झालेल्या पित्तगुल्मावर रेचक हितावह आहे. रूक्ष व उष्ण सेवनापासून झालेल्या पित्तगुल्मावर तिक्तघृत, वासाघृत हीं घृतें द्यावीं.

दाह फार होत असेल तर शीतवीर्य औषधें वाटून तुपांत कालवून लेप द्यावा. गुल्माच्या पूर्वरूपात विशेषतः पित्तगुल्मांत शूळ व अग्निमांद्य हीं झालीं असल्यास रक्त काढावें. गुल्माचीं मुळेंच कापलीं गेलीं म्हणजे त्यांचा पाक न होता ते नाहींसे होतात कारण आतलें रक्त नासूनच पाक होतो. तेंच नासकें रक्त काढून टाकलें म्हणजे त्यापासून

होणारा व्याधी सहजच नाहींसा होतो. रेच होऊन रोग्यास ग्लानी आली असल्यास जागल मासरसानीं त्याची तृप्ति करून तो हुषार झाला म्हणजे शिल्लक राहिलेला विकार काढून टाकण्यासाठीं घृताचें सेवन चालू ठेवावें. रक्त व पित्त अतिशय वाढल्यामुळें किंवा त्यावर आरंभीं औषधोपचार न झाल्यामुळें गुल्म पिकण्याच्या बेतावर आल्यास त्यावर पित्तविद्रधीप्रमाणें चिकित्सा करावी

कफगुल्मांत प्रथम रोग्यास वमन द्यावें तो वमन ओकारीचें औषध देण्यास योग्य नसल्यास उपास करवावे नंतर कडू, उष्ण व तिखट औषधें पेयादि क्रमानें योजून त्यानें अग्नि प्रदीप्त करावा खोल किंवा वर उभारलेला बधिर, टणक, स्थिर व आनाहादिकानीं युक्त असा गुल्माचें शोधनानें शमन करावें कफगुल्मावर तीळ, एरंड्या, अळशी व गोहुन्या याचा लेप करून लोखंडाचें भांडें किंचित् तापवून शेकावें. या उपायानीं स्वस्थानापासून सुटलेल्या कफगुल्माचें स्निग्ध रेचकें व दशमुळाच्या काढ्याचे बस्ती देऊन शोधन करावें. " दंती हरीतकी " या नावाचें औषध यावर चागलें आहे.वर करून बसलेला,मोठ्या घेराचा, टणक, बधिर, जड व मासांत खोल असलेला असा गुल्म क्षार, अरिष्टें, व डाग यानीं बरा करावा हे उपाय एक दिवस किंवा दोन दिवस किंवा तीन दिवस मध्य सोडून शरीराची शक्ति वाढविण्याकडे व दोषांचा जोर कमी करण्याकडे लक्ष्य पुरवून करावे. क्षार आपल्या क्षारत्वानें मासरस दूध व तूप खाणाऱ्या मनुष्याच्या मधुर व स्निग्ध कफास तोडून त्याच्या आशयास फोडून खालीं पाडता अग्नि मंद होऊन अरुची उत्पन्न झाली असता संचयीच्या मद्याबरोबर स्नेहयुक्त भोजन करण्यास स्रोताचे मार्ग मोकळे होण्याकरितां जुनीं आसवें व अरिष्टें द्यावीं.

वरील उपायानीं कफगुल्म बरा न झाल्यास स्थिरगुल्मावर डाग द्यावा. वैद्यानें गुल्मावर शेवटपर्यंत वस्त्र घालून बेंबी, बस्ति, आतडीं, हृदय पोटावरील रोमराजी यास वचावून तापवून लाल केलेल्या बाणानें किंवा लोखंडाच्या डहाणानें किंवा टेंभुर्णीच्या जळक्या लाकडानें फार जोरानें न दाबता डाग द्यावा. नंतर आग कमी झाल्यावर व्रणाप्रमाणें थंड लेप वगैरेंची योजना करावी.

स्त्रीस रक्तगुल्म झाला असता बाळंत होण्याच्या वेळीं, म्हणजे नऊ महिने लोटल्यानतर, तिचें स्नेहन स्वेदन करून तिला स्निग्ध रेचक द्यावें. स्त्रियाच्या रक्तगुल्मावर व रजोदर्शन बंद झालें असल्यास विटाळ आणणारीं औषध द्यावीं. रक्तपित्तनाशक क्षार मध व तूप यातून चाटवे.लसूण, तीक्ष्ण मद्य व मत्स्य हे पदार्थ खावयास द्यावे

दशमुळाच्या काढ्यांत दूध, गोमूत्र व क्षार घालून त्याचा उत्तरबस्ति द्यावा. म्हणजे योनिद्वारें पिचकारी मारावी. यापासून योनिद्वारा रक्तस्राव न झाल्यास गुल्म फोडावा. जुन्या साळींचा भात, कुळीथ, जांगलमांस, शेवगा, चित्रक, मुळा या भाज्या, हिंग, डाळिंब, ताक, तूप व तेल हे पदार्थ खावे. पाणी कमी किंवा मुळींच पिऊं नये. दह्याची निवळ, ताक, किंवा मद्य याचाच उपयोग करावा. मिताहार करावा व चेताचा व्यायाम करावा व कोणत्याहि वेगाचें धारण करूं नये. पाण्याच्याऐवजीं द्राक्षासव अगर कुमारीआसव ( योगरत्नाकरोक्त ) याचा उपयोग करावा.

**गुस्टाव्हस तिसरा** (१७४६–१७९२)—हा स्वीडनचा राजा १७४६ त जन्मला त्याचें शिक्षण कार्ले गुस्टाफ टेसिन व कार्ल शेफर या दोन तत्कालीन अत्यंत नावाजलेल्या मुत्सद्याकडून झालें होतें. कारस्थानें व डावपेचानीं भरलेल्या राजकीय वातावरणांत तो वाढल्यामुळें लहान वयांतच तो मुत्सद्देगिरींत तयार झाला. उपजत गुणहि त्याच्या अंगीं पुष्कळ होते. १७६६ त त्याचें डेन्मार्कच्या राजकन्येशीं लग्न झालें. १७६८ मध्यें बाप गादीवरून दूर झाल्यानंतर गुस्टाव्हस राजकारणांत प्रथम प्रत्यक्ष पडला, व त्यानें तत्कालीन बलिष्ठ ' कॅप " पक्षास जादा डायटसभा भरविण्यास भाग पाडलें त्या बैठकींत पूर्वीची राजघटना बदलून राजशाहीच्या वळणावर नवीन रचना करविण्याचें त्याच्या मनांत होतें. परंतु ' हॅट " नावाच्या पक्षानें तें जमूं दिलें नाहीं. तेव्हां तो पॅरीसमध्यें जाऊन राहिला; तेथें तो बराच लोकप्रसिद्ध झाला व याचा फायदा घेऊन त्यानें आपले कांहीं राजकीय हेतूहि साधून घेतले. फ्रेंच सरकारनें दरसाल १५ लक्ष लिव्हर्स अशा रुपयानीं त्याला लागेल तितकी पैशाची मदत स्वीडनमध्यें राज्यक्रान्ती घडवून आणण्याकरितां देण्याचें कबूल केलें. गुस्टाव्हसनें परत जातांना बर्लिन आपला मामा फ्रेडरीक दी ग्रेट याची गांठ घेतली. त्यावेळीं फ्रेडरीकनें त्याला प्रचलित स्वीडीश राजघटनेंत ढवळाढवळ न करतां सर्व राजकीय पक्षांशीं जमवून घेण्याचा उपदेश केला. स्वीडनला परत आल्यावर ( १७७१ ) कॅप व हॅट या पक्षामध्यें तडजोड करण्याकरितां आपल्या कारकीर्दीतील पहिल्या पार्लमेंटच्या बैठकींत त्यानें प्रयत्न केला पण तो फुकट गेला कोणताहि पक्ष स्वार्थ सोडण्यास तयार होईना. उलट अधिकारारूढ कॅप पक्षानें राजाचे हक्क अधिकच मर्यादित करण्यास सुरवात केली. हा कॅपपक्ष रशियाच्या जाळ्यांत सापडलेला होता. स्वीडनला मांडलिक बनविण्याचा रशियाचा विचार होता. तेव्हां देशाचें स्वातंत्र्य कायम राखण्याकरतां लष्कराच्या मदतीनें क्रांति घडवून आणण्याखेरीज गुस्टाव्हसला दुसरा मार्ग उरला नाहीं. त्यासाठीं त्यानें गुप्त कट रचला. त्याच्या स्प्रेंग पोर्टेन नावाच्या सरदारानें प्रथम फिनलंड हस्तगत करून तेथून अचानक स्टॉकहोमवर छापा घालून तेथील लोकसभानां नवी राजशाही घटना तरवारीच्या जोरावर मान्य करण्यास लावण्याचें काम अंगावर घेतलें. नंतर ठरल्याप्रमाणें टोल नावाच्या सरदारानें

( १७७२ आगष्ट ) येथें उगारलें व स्प्रेंगपोर्टननें फिनलंडहि घेतलें, पण तितक्यांत मोठें वादळ झाल्यामुळें त्याला स्टॉकहोमवर ठरलेल्या तारखेस छापा घालता आला नाहीं इकडे पंजाच्या घातकीमुळें त्रासलेल्या "कॅप" पक्षाच्या कचाट्यांत स्टॉकहोम येथें गुस्टाव्हस एकटाच सांपडला. तेव्हां त्यानें प्रसंगावधान ठेऊन जवळ असलेल्या सैन्याच्या जोरावरच आपला बेत मोठ्या धाटानें पार पाडला. तसेंच सेनेटचे सभासद व गव्हर्नर जनरल यांना कैद करून आरमारावरहि ताबा मिळविला. नंतर दोन दिवसांनी नवीन पार्लमेंट भरवून व राजवेशांत सिंहासनावर बसून आपल्या भाषणांत लोकसभेच्या सभासदांच्या मागील स्वैर वर्तनाबद्दल खरपूस समाचार घेऊन नंतर नवी घटना पुढें मांडून ती सर्वानुमतें पास करून घेऊन मग डायट सभा मोडून टाकिली. नंतर गुस्टाव्हसनें प्रत्येक सरकारी खात्यांत स्वतः लक्ष घालून सुधारणा केल्या. लाचलुचपतीचे प्रकार त्यानें बंद करून लोकांस मुद्रणस्वातंत्र्य दिलें, आरमाराची वाढ केली, खुला व्यापार सुरू करून इतर संरक्षक जकाती हलक्या केल्या, लोकांनां पूर्ण धार्मिक स्वातंत्र्य दिलें परराष्ट्रीय धोरणाहि मोठ्या हुषारीनें व दक्षतेनें ठेविलें. व १७७८ मध्यें पार्लमेंट भरवून त्यानें आपण केलेल्या कारभाराचा अहवाल पार्लमेंटपुढें मांडला. त्यामुळें सभेवर त्याची विलक्षण छाप बसली. पण ती आठ वर्षांवर जास्त टिकली नाहीं. सन १७८६ त सभा त्याच्या विरुद्ध जाऊं लागली तेव्हां गुस्टाव्हसनेंहि पूर्ण अनियंत्रित राजसत्ता सुरू करून पार्लमेंटसभा भरविलीच नाहीं. १७९० मध्यें त्यानें रशियाचा मोठा पराभव करून आपल्याला फायदेशीर तह ठरवून रशियाशीं आठ वर्षांच्या मैत्रीचा करार केला. इतक्यांत फ्रेंच राज्यक्रांती सुरू झाल्यामुळें तिच्या विरुद्ध एक राजसंघ स्थापण्याच्या खटपटीस तो लागला. त्या कार्यास तत्कालीन युरोपियन राजांमध्यें तोच एकटा लायक होता. फ्रेंच राज्यक्रांतीची खरी मीमांसा तोच एक जाणत होता. पण तेथेंहि मत्सरानें घात केला, व तो ऑपेरा हौसमध्यें एका गुप्तकटवाल्याच्या पिस्तुलाला बळी पडला ( १७९२ ). तो विद्वान् होता, त्यानें स्वतः नाट्यें व कांहीं ऐतिहासिक निबंध वगैरे लिहिले असून काव्याची व कलाकौशल्याचीहि त्याला आवड असल्यानें त्या त्या लोकांना त्याचा आश्रय असे.

गुह—शृंगबेर नामक पुरीचा किरातांधिपति. हा दशरथाचा परम मित्र होता. राम अयोध्येहून निघून दंडकारण्यांत चालला असतां एक रात्र येथेंच राहिला होता व त्या वेळेस यानें रामाचें आतिथ्य करून त्यास गंगापार उतरलें व पुढें भरताबरोबर चित्रकूटास रामाच्या भेटीस गेला.

गुहिलोट—हें घराणें मेवाडचें असून त्याचे वंशज आपल्यास सूर्यवंशी क्षत्रीय म्हणवितात राजपुतान्यांत [illegible] हिंदूंचे सूर्य अशी बहुमानाची पदवी लावितात. टॉडच्या मतें रजपुतांच्या ३६ घराण्यांत हें श्रेष्ठ घराणें होय. या घराण्याच्या कुळाचें नांव गुहिलोट अथवा घेलोट असून तें गुहिलपुत्र या संस्कृत नावाचा अपभ्रंश आहे. चितोडच्या ( सं. १३३५ ) एका शिलालेखांत मेवाडच्या एका प्राचीन सिंह नांवाच्या राजास गुहिलपुत्र म्हटलेलें आहे. दुसऱ्या एका शिलालेखांत गोभिलपुत्र असाहि उल्लेख आढळतो. हंसीच्या शिलालेखांत गुहिलोट असें प्राकृत रूप येतें. सारांश गुहिल नांवावरून हें वंशाचें नांव बनलें व्यक्तीवरून कुळाचें नांव ठेवण्याची चाल राजपुतान्यांत सर्वत्र आढळते या घराण्याच्या उत्पत्तीबद्दल टॉडनें पुढील दंतकथा दिल्या आहेत. सूर्यवंशी शेवटचा राजा सुमित्र याच्या वंशांतील हा गुहिल होता. तसेंच वलभीवंशांतील शेवटचा राजा शिलादित्य याच्याशीं या गुहिलाचा संबंध येतो. मुसुलमान तवारिखकार या घराण्याचा संबंध ससन राजाशीं लावितात व कोणी यज्दंगर्द या इराणी राजाच्या मुलीशीं याचा संबंध जोडतात, परंतु या तर्कांना सबळ पुरावा मुळींच नाहीं. हा वंश निःसंशय सूर्यवंशीय क्षत्रिय होय असें पं. गौरीशंकर ओझा व रा. चिंतामणराव वैद्य यांचें मत आहे.

रा. देवदत्त भांडारकर यांनी अचलेश्वरच्या शिलालेखांत ( संवत १३४२ ) बप्पा या गुहिलोट घराण्याच्या मूळ पुरुषाचें जें वर्णन आलें आहे, त्यावरून या घराण्यास व बाप्पास नागर ब्राह्मण ठरविलें आहे. चितोडचा शिलालेख (इ. १३३१), मम्मटदेवप्रशस्ति, रसिकप्रिया, एकलिंगमाहात्म्य, शक्तिकुमाराच्या वेळचा एक शिलालेख ( [illegible] ), तवारीख-माळवा इत्यादि लेख व बखरींवरून हें घराणें मुळचें नागर ब्राह्मण होतें व पुढें क्षत्रिय बनलें असें रा. देवदत्त भांडारकरांचें म्हणणें आहे. त्यांच्या मतें या घराण्याचा मूळपुरुष आनंदपुरचा म्हणजे हल्लींच्या वडनगरचा रहाणारा होता. कुमारपालाच्या वेळच्या एका शिलालेखांत या आनंदपुराचा उल्लेख येतो. वैद्यांच्या मतें आनंदपुर म्हणजे [illegible] वडनगर नव्हे.

हें घराणें मूळचें नागरब्राह्मण असून क्षत्रिय कसें बनलें या बद्दल रा. भांडारकर म्हणतात कीं, " याचें कारण खात्रीनें सांगता येत नाहीं, परंतु ( घराण्याचा मूळ पुरुष ) गुहदत्त हा नागरब्राम्हण असून वडनगरचा रहिवाशी व मूळचा ( मित्र प्रत्ययान्त नागरब्राह्मणाच्या नांवावरून ) मिहिर किंवा मेर जातीचा होता. वलभी राजांनीं वडनगर किंवा आनंदपूरच्या अनेक नागरब्राह्मणाना दानें दिलेल्या ताम्रपटात त्या त्या ब्राह्मणाच्या नांवाच्या शेवटीं मित्र शब्द येतो, यावरून नागरब्राह्मणनाच मित्र शब्द लावीत असें अनुमान निघतें. वलभीराजानाहि मैत्रक म्हणत. तेव्हा मित्र किंवा मैत्रक हे मूळचे मेर किंवा मेहर होत. मेर ही जात आर्य नसून परकीय, एक विशिष्ट विदेशी असून तिनें हूणाबरोबरच सहाव्या शतकात हिंदुस्थानात प्रवेश केला होता. त्या काळीं हे परकी लोक हिंदुस्थानात वस्तीस राहिल्यानंतर येथील चातुर्वर्ण्य उचलीत, त्यामुळें या मेरातहि ब्राह्मण व क्षत्रिय वर्ण बनले. तेव्हा गुहिलोट घराणें मूळचें नागरब्राह्मण म्हणजे मेर असल्यानें विदेशीय ठरतें बाप्पा ब्राह्मण असला तरी तो नागरब्राह्मण म्हणजे विदेशीयच होय, पुढें त्यानें ब्राह्मणधर्म सोडून क्षात्रधर्म स्वीकारल्यानें तो क्षत्रिय बनला असावा." [ जर्नल. ए. सो. बंगाल. पु ५ अं. ६ ]. परंतु गौरिशंकर ओझा व चिंतामणराव वैद्य यांच्या मतें बाप्पा हा ब्राह्मण नसून सूर्यवंशी क्षत्रिय होता वैद्य म्हणतात कीं, नरवाहनाच्या शिलालेखांतील 'रघुवंश कीर्तिपिशुनाः' या विशेषणावरून हा वंश क्षत्रियच होय. देवदत्त भांडारकर यांनीं हें विशेषण आपल्या लेखात गाळलें आहे. नुकेंच बाप्पाचें एक सोन्याचें नाणें सापडलें असून त्यावरील लेखावरूनहि ओझा यांनीं बाप्पा क्षत्रिय असल्याचें ठरविलें आहे. चितोड व अबू येथील लेखात महिदेव व विप्र असे जे शब्द बाप्पास लावण्यात आलेले आहेत व ज्यावरून देवदत्त भांडारकर त्याला ब्राह्मण म्हणतात, ते शब्द लेखकाच्या चुकीनें खोदले गेले असेंहि ओझा म्हणतात. वैद्य म्हणतात कीं, अलीकडील भाटांना क्षत्रियाचीं ब्राह्मण गोत्रें कशीं, याचें गूढ पडून तें उकलण्यासाठीं त्यांनीं रजपूतकुलाची उत्पत्ती नवीन कल्पून त्या त्या गोत्रर्षींच्या ब्राह्मणापासून हीं कुलें उत्पन्न झालीं अशा कथा रचिल्या असाव्यात.

तसेंच गुहिलोत (मैत्रक-मिहिर-मेर) घराणें हें मूळचें हिंदू नसून बाह्य, परकीय, हूण वगैरे जातींचें होतें असें देवदत्त भांडारकरांचें म्हणणेंहि वैद्य याना कबूल नाहीं. त्यांचें म्हणणें कीं, मित्रप्रत्ययान्त नांवावरून केलेला वरील तर्क साफ चुकीचा आहे. मित्र व मिहिर याचा कांहींच संबंध नाहीं. अर्थात् गुहिलोत हे बाह्यपरकीय नसून अस्सल सूर्यवंशी क्षत्रीय होते. देवदत्त यांनीं ज्या शिलालेखावरून हा तर्क केला आहे, त्यातील श्लोकाचा अर्थच त्याना कळला नाहीं व लेखात बाप्पास स्पष्टपणें 'गुहिलगोत्र नरेन्द्रचन्द्र' असें म्हटलें आहे त्यावरूनहि त्याचें क्षत्रियत्वच सिद्ध होतें, असें वैद्य याचें मत आहे.

बाप्पा रावळ—या घराण्यातील बाप्पापासून समरसिंहापर्यंतची हकीकत येथें देतों. त्यापुढील हकीकत ज्ञा को. च्या नवव्या विभागात उदेपूर नावाखालीं आली आहे. बाप्पारावळाच्या जन्मशकाचा, तसेंच तो चितोडच्या गादीवर केव्हा अधिरूढ झाला व त्यानें राज्यपदाचा केव्हा त्याग केला याचा दन्तकथादिकावरून विचार करता ( संवत ८२० ) इ स. ७६३ हा त्याच्या अधिकारत्यागाचा शक ठरतो व तो चितोडच्या मानमोरी लेखाशीं बराच जमतो. त्याच लेखावरून बाप्पाची कारकीर्द ७१३ पासून ७६३ पर्यंत केव्हा तरी सुरू झाली असावी असें रा चिं वि. वैद्यांचें मत आहे. व त्याच्या अंदाजें त्याच्या राज्यारोहणाचा काल स. ७३० असावा. मेवाड येथील दंतकथाप्रमाणें हा काल स. ७२८ असा टॉडनें दिला आहे. अरब लोकांनीं ७१२ सालीं सिंध प्रांत काबीज केला हें निश्चित आहे व त्यानंतरच त्यांनीं राजपुतान्यावर स्वाऱ्या केल्या. सारांश बाप्पाच्या राज्यारोहणाचा काल सन ७३० धरला असता सरासरी ३३ वर्षें त्यान राज्य केलें असावें राज्यारोहणाच्या वेळीं त्याचें वय काय असावें हें ठरविणें कठीण आहे. अगदीं किमान पक्षीं ३० वर्षांचें धरल्यास त्याचा जन्मशक इ. स. ७०० येतो. जुन्या दंतकथावरून व मेवाडच्या गुहिलोतांच्या दृढ समजुतीवरून बाप्पाचा जन्म संवत १९१ मानतात. टॉडनेंहि याच समजुतीचा अनुवाद केला आहे. चिंतामणराव वैद्य म्हणतात कीं, भटार्कानें स ५०९ मध्यें वलभी राज्य स्थापलें, तेव्हापासून हा संवत धरावा (५०९+१९१ = ७०० ) म्हणजे स. ७०० हा (७३० च्या जवळचा) शक येऊन ही तोंडमिळवणी होते. रा. वैद्यांच्या मतें बाप्पा हें एका व्यक्तीचेंच नाव आहे. बाप्पा शब्दाचा 'बावा, साधुपुरुष व पिता' असाहि अर्थ संभवतो, व ह्या अर्थावरूनहि बाप्पा हा गुहिलोत घराण्याचा मूळ पुरुष असावा. नेपाळ वगैरे ठिकाणीं कोरीव लेखात मूळ पुरुष या अर्थी बाप्पा शब्दाचा उपयोग केलेला आढळतो ( उदा० बप्पपादानुध्यात ) त्यावरून बाप्पा या शब्दाचा व्यक्तिवाचक उपयोग पूर्वकाळीं प्रचलित होता. उदाहरणार्थ बप्पभट्टी हें तत्कालीन एका जैन आचार्याचें नाव प्रसिद्ध आहे व 'बप्पार्य' अशा नावाचा उल्लेख तत्कालीन कोरीव लेखातहि सापडतो. हें नाव क्षत्रियवाचक देखील आहे असें इ. स. ६५५ च्या वगुम्रा ताम्रपटावरूनहि दिसतें.

बाप्पानें स्थापन केलेलें चितोडचें गुहिलोट राजघराणें बाप्पाच्या काळापासून ( ७३० ) आजतागायत म्हणजे सुमारें १२०० वर्षें अव्याहत चालू आहे, व त्या घराण्याचें ठिपाणहि जवळ जवळ पूर्वीचेंच आहे. सध्या त्या घराण्याची राजधानी चितोड नसून उदेपूर आहे, पण चितोडहि असून

त्याच्याच ताब्यात आहे व या घराण्यातील अनेक राजपुरुष धैर्यशाली, स्वातंत्र्यप्रिय व स्वधर्मरत होते.

या घराण्याच्या निरनिराळ्या व परस्परांशी विसंगत अशा बऱ्याच वंशावळी उपलब्ध आहेत. त्यामुळें बाप्पाच्या वंशजाचा अनुक्रम ठरविणें कठिण झालें आहे. त्यातून नुकत्याच सापडलेल्या आटपुरालेखांत ( इं. अँ. पु. ३९ ) या वंशावळ बराच भिन्न असा क्रम आढळतो. टॉडला हा शिलालेख माहीत होता, पण या लेखातील यादी टॉडनें दिलेल्या यादीहून बरीच भिन्न आहे. पूर्वीच्या लेखात उल्लेखिलेल्या राजांची संख्या समरसिंहापर्यंत तीस आहे. म्हणजे सरासरी प्रत्येक राजाची कारकीर्द १५वर्षांची(१२००–७३०=४७०) ठरते. परंतु आटपुरालेखात बाप्पापासून फक्त शक्तिकुमारपर्यंत २० राजे होऊन गेले असें म्हटलें आहे. शक्तिकुमाराच्या स. ९७७ सालच्या एका लेखात उल्लेख मिळतो. म्हणजे प्रत्येक राजाची कारकीर्द सुमारें ११ वर्षांची पडते. त्या काळीं अरबलोकांनीं सिंध प्रांत काबीज केला असून त्यांच्या स्वाऱ्यांचा सपाटा सारखा चालू होता; व देशात धामधूम व अशांतता होती म्हणून वरील ११ वर्षांची सरासरी पडत असावी. टॉडनें आपल्या यादीबद्दल असें म्हटलें आहे कीं, त्या यादींतील राजांचा अनुक्रमवारी नामनिर्देश एकाच शाखेचा नसून गुहिलवृक्षाच्या अनेक शाखांच्या समकालीन राजांचा संकलित क्रम आहे. आतां गुहिल घराण्याच्या बऱ्याच शाखा होत्या हें आपणास चितोडगड लेखावरूनहि समजतें. एकदरीनें आज बाप्पाच्या वंशजाचा क्रम व कारकीर्द निश्चयेकरून ठरवितां येत नाहीं. तरी पण चितोडगड व अचलेश्वर येथील लेखास अनुसरूनच हा क्रम साधारण ठरविता येतो.

बाप्पानंतर मेवाडच्या गादीवर गुहिल राजा आला. त्याची सर्व कारकीर्द शत्रूंशीं लढण्यात गेली. मध्ययुगातील सर्वच राजांना आरबांशीं तोंड द्यावें लागे व त्या काळीं अरबांच्या स्वाऱ्यांचा व रजपुतांच्या उलट हल्ल्यांचा इतका कहर उडाला कीं, त्या प्रदेशभर सर्वत्र मांस व रक्त यांचा सडा शिंपला गेला व त्या देशास ‘ मेदपाट ’ ( प्राकृत मेवाड ) असें अन्वर्थक नांव प्राप्त झालं. त्यावरून अरब व रजपूत यामध्यें किती घनघोर युद्ध चाललें होतें तें उघड होतें. गुहिलानें आपल्या पुढील वंशजांना आपलें नाव चालू केलें व ही शाखा गुहिलोट नावानें प्रसिद्ध झाली [ गुहिलोत = संस्कृत गुहिलपुत्र. ओत ( पुत्त ) हा प्रत्यय वंशज या अर्थी राजपुतन्यांत प्रसिद्ध आहे ]

गुहिलानंतर भोजराजा गादीवर बसला व भोजानंतर शीलास राज्यपद मिळालें या दोघांसहि अरबांशीं तीव्र संग्राम करावा लागला, पण त्याच्या मागून गादीवर आलेल्या कालभोजास तर अरबांशीं फारच दारुण युद्ध करावें लागलें कालभोजानंतर त्याचा पुत्र भर्तृपट यास राज्यपद मिळालें व भर्तृपटानंतर सिंहराजा राज्य करूं लागला. त्या सर्वांची कारकीर्द शत्रूंशीं लढण्यातच गेली व हे सर्वहि सारखेच रणगाजी निघाले. सिंहानंतर त्याचा मुलगा महायक गादीवर बसला व महायकानंतर खोम्माणास अभिषेक झाला. प्राचीन शिलालेखांत खोम्माणाच्या पराक्रमाचीं विशेष वर्णनें आढळतात आटपुरालेखांत आणखी दोन खोम्माणाचा उल्लेख आहे. त्यांपैकीं एक कालभोजाचा मुलगा असावा व दुसरा सिंहराजाचा मुलगा असावा. टॉडनें "खोम्माणरासा" नावाच्या एका काव्याचा आधार घेऊन खोम्माण व अरब यांच्यातील एका युद्धप्रसंगीं चितोडगडच्या बाजूनें कोणकोणत्या देशाचे राजे लढले याची याद दिली आहे व त्याचप्रमाणें मुसुलमानांच्या निरनिराळ्या स्वाऱ्यांचाहि अहवाल दिला आहे तो विचारात घेतां ही स्वारी ९ व्या शतकाच्या प्रारंभीच झाली असावी असें वाटतें. बाप्पापासून (स.७६४) या स्वारीच्या कालाची ( स ८२५ ) गणना केली तर सरासरी ६१ वर्षांचा काल येतो. एवढ्या काळात पाच राजे होऊन जाणें स्वाभाविक आहे. अचलेश्वरादि लेखांत बाप्पा ते महायकपावेतों जीं नावें आहेत त्याहून अधिक नावें आटपुरा लेखांत सापडतात. लेखाप्रमाणें पाहता ८२५च्या सुमारास कालभोजाचा पुत्र खोम्माण राजा होता व त्यानेंच अरबांशीं घनघोर संग्राम केला असें सिद्ध होतें. तथापि खोम्माणरासातील यादीवरून फक्त तिच्या कर्त्यांच्या काळीं त्याला ज्ञात जाती अमुक होत्या एवढेंच ऐतिहासिक सत्य निघेल

तिसऱ्या खोम्माणानंतर अल्लट नावाचा अत्यंत पराक्रमी पुरुष गादीवर बसला त्याच्या आईचें नाव महालक्ष्मी असून ती मूळची राष्ट्रकूट घराण्यातील होती अल्लटाच्या मागून त्याचा पुत्र नरवाहन हा गादिवर बसला नरवाहनाचा एक स्वतंत्र लेख मिळतो नरवाहनानंतर शक्तिकुमार राज्य करूं लागला. परंतु आटपुरा लेखात नरवाहन व शक्तिकुमार यांच्या दरम्यान शालिवाहनाची कारकीर्द झाली असा उल्लेख आहे. या शक्तिकुमाराच्याच वेळेचा ‘ आटपुरा ’ लेख होय. व त्याचा शक विक्रम संवत् १०३४ ( स. ९७७ ) असा आहे. शक्तिकुमारानंतर शुचिवर्म्याची कारकीर्द झाली या शुचिवर्म्याचा १०३८ वि. स. मधील शिलालेख उपलब्ध आहे चितोडच्या लेखात नरवाहनापर्यंतचीं नावें दिलीं आहेत. अचलेश्वर लेखात मात्र समरसिंहापर्यंत ( वि सं. १३३८ ) सर्व राजांची वंशावळ दिली आहे समरसिंहाच्या नंतरचा इतिहास उदेपूरसंस्थान या नावाखालीं ज्ञानकोशाच्या नवव्या विभागात आला आहे तेथें तो पहावा.

निरनिराळ्या लेखांतून वर्णिलेल्या गुहिलोट घराण्याची वंशावळ पुढीलप्रमाणें आहे.—

वंशावळ

| आटपुरलेख (सं. १०३४) | अचलगडलेख (सं. १३४२) | बाणपुरलेख (सं.१४०९) |
|---|---|---|
| गुहादित्य | बाप्पा–राज (संन्यास सं.८२०) | बाप्पा |
| १ गुहिल | गुहिल | गुहिल |
| २ भोज | भोज | भोज |
| ३ महेंद्र | ० | ० |
| ४ नाग | ० | ० |
| ५ शील | शील | शील |
| ६ अपराजित | ० | ० |
| ७ महेंद्र ( २ रा ) | ० | ० |
| ८ कालभोज | कालभोज | कालभोज |
| ९ खोम्माण | ० | ० |
| १० महायक | ० | ० |
| ११ भर्तृभट्ट | ० | ० |
| १२ सिंह | सिंह | सिंह |
| १३ खोम्माण (२ रा) | ० | ० |
| १४ महायक | महायक | महायक |
| १५ खोम्माण (३रा) | खोम्माण | खोम्माण |
| १६ भर्तृभट्ट (२रा) | | ० |
| १७ अल्लट | अल्लट | अल्लट |
| १८ नरवाहन ( सं. १०२८) | नरवाहन | नरवाहन |
| १९ शालिवाहन | ० | ० |
| २० शक्तिकुमार (सं. १०३४) | शक्तिकुमार | शक्तिकुमार |
| २१ शुचिवर्मा (सं. १०३८) | ० | ० |

[ मध्ययुगीन भारत, भा. २, राजस्थान, टॉड; इंडियन अन्टिक्वरी. पु. ३९; बॉम्बे ग्याझे. पु.१; जर्नल. ए. सो. बंगाल. पु. ५ अं. ६ ]

**गुळदगुड**—विजापूर जिल्हा. बदामी तालुक्यांतलें एक शहर. उ. अ १६°३' व पू. रे ७५°४७'. याला एक उपनगर आहे. दोन्हींची मिळून लोकसंख्या ( १९११ ) १५२४९. येथें सण, सुती व रेशमी उत्तम कपडा तयार होतो. आसपास दगडाच्या खाणी आहेत. १८८७ पासून म्यु. क. आहे. येथें एक किल्ला आहे. तो १५८० मध्यें इब्राहिम आदिलशहानें बांधला. १७१६ मध्यें हें शहर वसलें. १७८५ मध्यें तें टिपूनें घेतलें. १८२६ मध्यें तें इंग्रजांकडे आलें.

**गुळवेल**—ही एक फार उपयुक्त व महत्वाची वेल आहे. हीस संस्कृतमध्यें गुडूची, अमृतवल्ली, ज्वरारि, अमृता, निर्जरा इत्यादि अनेक नावें आहेत. कोंकणी भाषेंत हीस गरुडवेल, गरोळ, मराठींत गुळवेल, गुजराथींत गळो, हिंदींत गिलोय, असें म्हणतात. लॅटिनमध्यें टिमोस्पाओरा कोर्डिफोलिया असें नाव आहे.

बहुतेक सर्व रोगांवर उपयोगी पडणारी ही वनस्पति आहे. हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांत ती सांपडते. हिचा वेल पुष्कळ मोठा होतो व त्याचें कांडहि जाड होतें. कडुनिंबावरील गुळवेल सर्वोत्कृष्ट समजली जाते. कोंवळ्या वेलीची साल नाजूक, हिरव्या रंगाची व मृदु असते व ती ३।४ वर्षांची झाली म्हणजे साल मळकट, पांढरकी व खडबडीत होते. या वेलीचीं पानें साधारण पिंपळाच्या पानासारखीं असतात. परंतु त्याचा शेंडा मात्र पिंपळाच्या पानाच्या शेंड्याइतका लांब नसतो. ह्या वेलीस आंब्याच्या मोहरासारखीं पांढरकी, पिंगट रंगाचीं फुलें पानाच्या कुशींतून येतात. व त्यास लहान लहान फळांचे घोस लागतात. तीं पक्व झाल्यावर लाल होतात. हा वेल कधीं कधीं खडकावरहि उगवतांना दृष्टीस पडतो. त्यास खडकी गुळवेल म्हणतात. गुळवेलीचें सत्व काढतात. तेंही अनेक रोगांवर चालतें व फार शक्तिवर्धक आहे. औषधाकरितां गुळवेल घेणें ती विषारी झाडावरील घेऊं नये.

**औषधी गुणदोष**—गुळवेल तुरट, कडु, उष्ण, वीर्योद्दीपक, ज्वरहारक आहे. गुळवेलीचा अनेक रोगांवर काढ्यांत वगैरे उपयोग करतात. ही फार गुणकारी आहे.

*गूटी*—‘ गुती ’ पहा.

**गूडलूर, तालुका**.—मद्रास. निलगिरी जिल्हा. जिल्ह्यांतील इतर भागापेक्षां हा बराच सखल आहे. येथील वस्ती दिवसेंदिवस कमी होत आहे कारण येथील सोनें, अभ्रकाच्या खाणी व कॉफीचे कित्येक मळे बंद झाले आहेत. अद्यापहि नेल्लाकोटा व आक्टरलोनी खोरें येथें कांहीं मळे जीव धरून राहिले आहेत. क्षेत्रफळ २८० चौ मैल. एकंदर लो. सं. ( १९२१ ) २२०७१. तालुक्याचा वसूल ५५ हजार आहे.

**गूळ**—गूळ किंवा गुड म्हणजे गोळा. बंगाल प्रांताला प्राचीन नाव गौड देश आहे. गौड म्हणजे गुळाचा देश असा कांहीं व्युत्पत्तिकार अर्थ देतात. गुळाची प्राचीनता साखरेच्या आधींची असून साखरेच्या इतिहासाचा आरंभ गुळाच्या इतिहासानें होणारा आहे [‘ साखर ’ पहा ]. गुळाला लागणाऱ्या उसाच्या लागवडीची माहिती ‘ ऊस ’ या लेखांत येऊन गेलीच आहे. ऊंस तयार झाल्यानंतर तो गाळणें, गूळ रांधणें व ढेपी पाडणें या गूळ तयार करण्याच्या क्रिया देखील त्याच लेखांत विवेचिल्या आहेत.

**गृहस्थाश्रम**—हा आश्रम म्हणजे गृहस्थधर्माचा इतिहास. जेव्हां अपत्यसंरक्षणाची जबाबदारी बापावर पडावयास लागेल तेव्हां समाज मातृसत्ताक कुटुंबपद्धतींतून पितृसत्ताक कुटुंबपद्धतीकडे वळूं लागला किंवा “ कुल ” संस्थेस गृहस्थ धर्मास सुरवात झाली असें समजावें. वैदिक काळांत गृहस्थधर्म अगोदरच स्थापित झालेला दिसतो, म्हणजे समाजाच्या

यूथावस्थेपासून गृहस्थधर्मापर्यंतचा विकासक्रम आपणांस वैदिक वाङ्मयाच्या अभ्यासानें उपलब्ध होणार नाहीं सूतसंस्कृतीच्या प्राचीन अवशेषाचें भांडार जें महाभारत त्याच्या अभ्यासानें या दोन अवस्थांतील विकासक्रम शोधण्याचें काहीं काम रा. वि. का. राजवाडे यांनीं करून चित्रमयजगत्‌मध्यें (पु १४) लेख लिहिले आहेत त्याचा सारांश येणेंप्रमाणें.—

सोदर बहिणभावंडांचा, पितादुहितांचा व मातापुत्रांचाहि शरीरसंबंध अत्यंत प्राचीन आर्यकालीं होत असे त्यावेळीं फक्त स्त्री व पुरुष हे दोन संबंध मात्र समाजाच्या लक्षांत आलेले होते. अनेक सपिंड पुरुषांचा एकाच सपिंड स्त्रीशीं संबंध दाखविणारीं वाक्यें भारतेतिहासांतून सांपडतात मद्रदेशांतील अनाचार कर्णपर्वांत स्पष्टपणें दिला आहे. त्यावेळीं दिवसाढवळ्या उघड्या मार्गांत स्त्रीसमागम होत असे, याला पराशर-मत्स्यगंधाकथेचा पुरावा आहे. तसाच वामदेव्यव्रताच्या वेळीं यज्ञभूमीवर उघड संभोग केल्याचीं महाभारतांत पुष्कळ उदाहरणें आहेत. तेव्हां मैथुन एकांतांत करावें अशा प्रकारचें स्मृतिवचन घालण्याचें कारण पडलें असावें. यावरून हेंच सिद्ध होतें कीं मनुष्य वंशानें पाशव असून प्राथमिक वन्य मनुष्यांत काहीं बाबतींत पशूंचें आचरण दृष्टीस पडल्यास नवल नाहीं.

वर उल्लेखिलेला संकीर्ण समागम व उघडा समागम याखेरीज तिसरी एक वन्य चाल आर्यांत होती. ती म्हणजे देवांना अग्रोपभोगाचा हक्क देण्याची होय. स्त्रियांना अग्रोपभोगाकरितां देवाच्या स्वाधीन करण्याची ही पुरातन चाल सांस्कारिक अवशेषरूपानें आजहि आपणांत प्रचलित आहे सोम, गंधर्व, अग्नि यांशीं विवाह होऊन नंतर व्यक्तीशीं विवाह आजच्या ब्राह्मसंस्कारामध्यें होतो तसेंच कन्याहरण, कन्या-स्त्रीविक्रय, अनैसर्गिक संभोग वगैरे चाली आर्यसमाजांत रूढ होत्या. म्हणजे समाज यूथावस्थेंत असतांना त्यांत वरील चालीरीती असत व पुढें एकेक मोडत चालली.

मानवसंस्कृतीच्या व सूतसंस्कृतीच्या एकत्वाच्या, म्हणजे पारिक्षित जनमेजयाच्या कालापासून सूतसंस्कृतींत देखील गृहस्थधर्मसंस्थापनेच्या पूर्वीचे अवशेष दिसत नाहींसे होतात गृहस्थधर्माचें विवेचन धर्मशास्त्रकारांनीं केलें आहे. त्यांत गृहस्थाचें स्त्रीशीं वर्तन कसें असावें हा भाग थोडासा आहे. तथापि बरेंचसें विवेचन श्रौत, गृह्य व आतिथ्य या धर्मांच्या विवेचनानें व्यापिलें आहे. या विवेचनांतील मुख्य विषय पुढीलप्रमाणें होत.

कोणत्या अग्नीवर कोणतें कृत्य करावें, गृहस्थाचे धर्म, दंतधावन, योगक्षेमाकरितां राजाश्रय करणें, वेदादि पठण, पंचमहायज्ञ, भूतयज्ञ, पितृमनुष्यादिकांना अन्नदान, अवशिष्ट अन्नाचें सेवन, अतिथींना भोजन व भिक्षेकऱ्यास भिक्षा, श्रोत्रियाचा सत्कार; प्रतिसांवत्सरिक अर्घ्यादि पूजन, अतिभोजन वगैरे वर्ज्य करणें, सायंसंध्यादि; ब्राह्ममुहूर्तावर उठून स्वतःचें हितचिंतन, वृद्धास मान देणें, योग्य वृद्धादिकांना मार्ग देणें, द्विजातीयांचीं कर्में, क्षत्रिय व वैश्य यांचीं कर्में; श्रौतधर्माचरण, श्रौतकर्में, नित्यश्रौतकर्में, यज्ञाकरितां हीन जातीपासून द्रव्य न घेणें, धान्यसंग्रह करणें; अग्नौ हुतिप्रक्षेप, पंचमहायज्ञावशिष्ट अन्नाची योजना; भिक्षा अर्पण करणें; अतिथिसत्कार; अर्भकादिकांना अतिथीच्या पूर्वी भोजन देणें; अवशिष्ट अन्नाचें भोजन, केवळ स्वतःकरितां पाकाचा निषेध, राजादिकांचें पूजन, स्त्रीकर्तृक बलिहरण, धनसंचय, आपत्कालाव्यतिरिक्त जीवनक्रम, धान्यसंचय किती करावा, शिलोंच्छ वृत्ति, निंद्य कर्मादिकांचा त्याग; संतोषाची प्रशंसा, वेदोदित कर्मानुष्ठान; गृह्याग्नीची उपासना, गार्हस्थ्याचे दोन भेद, साधकाचीं कर्में, असाधकाचीं कर्में, इ.

**गृह्यसूत्रें**—स्मार्तधर्म म्हणजे गृह्यसूत्रोक्तधर्म होय. हा धर्म बराच जुना आहे. श्रौतसूत्रें ज्या वेळेस तयार होत होत्या त्यावेळेस सामान्य जन काहींहि कर्म नसलेला खास नव्हता. त्यास जीं काहीं कर्में लागलीं होतीं तीं अथर्ववेदांत दिलीं आहेत अथर्ववेद व गृह्यसूत्रें यांचा परस्परसंबंध दाखविणारें एक कोष्टक "वेदविद्या" ग्रंथाच्या परिशिष्टांत दिलेंच आहे त्यावरून असें दिसून येईल कीं यज्ञसंकोचाच्या काळीं बेकार होऊं घातलेला श्रौतविद्याविभूषित असा वर्ग उपजीविकेसाठीं गृह्यकर्मांकडे वळला व अथर्ववेदी वर्गाची बहुतेक विद्या आत्मसात करून घेण्याचा त्रैविद्यांनीं निश्चय केला व आपापल्या मंडळींसाठीं निरनिराळीं गृह्यसूत्रें तयार केलीं; तीं केलीं त्यावेळेस ब्राह्मण जात ही बऱ्याच अशीं इतर धंदे करणारी व पोटजाती असलेली जात बनली असावी. नाहींतर प्रत्येक शाखाविशिष्ट निरनिराळें गृह्यसूत्र करण्याचें कारण नव्हतें. गृह्यसूत्राचें सामान्य विवेचन वेदविद्या पृ. १८०–१८२ पृ २१५–२२१ परिशिष्ट १२२–१२६ येथें दिलें आहे बौधायन गृह्यसूत्राच्या टीकेंत शामशास्त्री यांनीं आग्निवेश्य सूत्रांतील दिलेल्या उताऱ्यांत बौधायन, आपस्तंब, सत्याषाढ, द्राह्यायण, शाण्डिल्य, आगस्त्य, आश्वलायन, शांभव, कात्यायन हीं नऊ पूर्वगृह्यसूत्रें व वैखानस, शौनकीय, भारद्वाज, आग्निवेश्य, जैमिनीय, वाधूल, माध्यंदिन, कौंडिण्य व कौषीतकी हीं नऊ अपरगृह्यसूत्रें होत असें म्हटलें आहे. परंतु हा आग्निवेश्यांतील उतारा बराच संशयित दिसतो. काहीं गृह्यसूत्रविषयक टीपा यापुढें देतों.

**शांखायन गृह्यसूत्र.**—या सूत्राचा कर्ता शांखायन कुलोत्पन्न सुयज्ञ असला पाहिजे. इतर गृह्यसूत्रांत जे तर्पण विधी दिले आहेत त्यावरून हें अनुमान निघतें. या तर्पण विधींत जीं ऋषींचीं नांवें दिलीं आहेत त्यामध्यें सुयज्ञ आणि शांखायन यांचीं नांवें अगदीं जवळ जवळ आहेत. इतर गृह्यसूत्रांप्रमाणें यासहि श्रौतसूत्र आहे व त्याचा गृह्यसूत्रांत पुष्कळ वेळां उल्लेख आलेला आहे.

या गृह्यसूत्र व श्रौतसूत्राचा कर्ता एकच आहे की काय असा प्रश्न साहजिकपणें उद्भवतो आतील पुराव्यावरून निर्णयात्मक असें कांहीं सांगता येत नाहीं. दोहोंचा कर्ता एकच आहे म्हणावें तर श्रौतसूत्रात जीं सूत्रें यावयास पाहिजेत तीं गृह्यसूत्रातच आलीं आहेत. कोणी असें म्हणेल कीं येवढ्या मोठ्या ग्रंथाचा कर्ता ज्यावेळेस एकच असतो त्या वेळेस असें चालावयाचेंच परंतु दुसराहि एक मुद्दा विचारणीय आहे तो हा कीं, यातील सूत्रें इतर गृह्यसूत्रांत सांपडतात. यावरून तीं सगळीं तिसऱ्याच एखाद्या नष्ट झालेल्या ग्रंथातून घेतलीं असावीं असें अनुमान निघतें तथापि एकंदरीत निर्णयात्मक असें कांहीं सांगता येत नाहीं

शांखायन गृह्यसूत्रातील कांहीं भाग मागाहून लिहिला गेला आहे. याचा पांचवा अध्याय परिशिष्ट म्हणून जोडला आहे. टीकाकार नारायण यास 'परिशिष्टाध्याय' असें म्हणतो पांचव्या अध्यायातील मजकूरहि आपणास तसाच दिसतो. या अध्यायात पाहिल्या चार अध्यायात सांगितलेल्या मजकुराचाच अनुवाद आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं कांहीं नवी माहिती जोडली आहे सहाव्या अध्यायाची देखील हीच स्थिति आहे

पा र स्क र गृ ह्य सू त्र.—पारस्कराचें गृह्यसूत्र हें शुक्ल यजुर्वेदाचें एक सूत्र असून कात्यायनाच्या श्रौतसूत्राची ही पुरवणी आहे प्रोफेसर स्टेंझलर यानें त्याचें जर्मन भाषेंत भाषांतर केलें असून जयराम आणि रामकृष्ण या टीकाकारांवर विशेष भिस्त ठेविली आहे पण याशिवाय आणखी एक टीका उपलब्ध आहे. परंतु तो स्वतंत्र ग्रंथ असा नसून त्यातील मजकूर बऱ्याचशा ग्रंथांतून घेतला गेला आहे. प्रो. स्टेंझलर यानें केलेलें भाषांतर एकांगी झालें असून कांहीं ठिकाणीं अर्थविपर्यासहि झाला आहे.

गो भि ल गृ ह्य.—हें सामवेदाचें गृह्यसूत्र आहे. सामवेदाच्या कौथुमी व राणायणी या दोन्ही शाखांना हेंच सूत्र आहे. शांखायन, आश्वलायन, पारस्कर, सत्याषाढ या गृह्यसूत्रांहून गोभिल गृह्यसूत्र एका विशिष्ट बाबतींत अगदीं निराळें दिसतें. सर्व सूत्रें वेदसंहिता गृहीत धरतात त्याप्रमाणें गोभिलसूत्रहि धरितें, पण वेदसंहितेहून एक निराळा मंत्रसमुच्चय या सूत्राला आधारभूत असलेला दिसतो. तो समुच्चय म्हणजे मंत्रब्राह्मण ग्रंथातील होय. विवाहादि गृह्यसंस्कारांच्या कामीं निवळ संहितेंतील मंत्रावर भागणार नाहीं ही जाणीव गोभिल सूत्रकाराला होती म्हणून त्यानें ब्राह्मणांतील मंत्रांची सरसहा मदत घेतली आहे. या सूत्रातील आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे यांत कांहीं आध्यात्मिकाचा भाग आलेला आहे.

खा दि र गृ ह्य सू त्र.—खादिर गृह्यसूत्र हा सामवेदांतील द्राह्यायण शाखेचा एक भाग आहे याचा प्रसार हिंदुस्थानच्या दक्षिण भागांत दिसून येतो. ज्याप्रमाणें द्राह्यायण श्रौतसूत्र हें लाट्यायनाच्या सूत्राचें एक थोडेंसें विकृत रूपांतर आहे त्याप्रमाणें खादिर गृह्यसूत्र हें गोभिलीय गृह्यसूत्राच्या आधारें लिहिलें आहे. खादिरानें त्यातून बरींच सूत्रें घेतलीं आहेत. गोभिलाप्रमाणें खदिरानेंहि पूर्णमंत्र दिले नसून केवळ त्यांचीं प्रतीकें दिलीं आहेत

अर्थातच खादिर गृह्यसूत्र हें गोभिलीय गृह्यसूत्राचें एक संक्षिप्त रूपांतर आहे यांत गृह्यविधी थोडक्यांत दिले आहेत व गोभिलानें ते आपल्या सूत्रांत फार विस्तारानें दिले आहेत. त्याचप्रमाणें खादिरानें गोभिलाचे विषयांतरहि सोडून दिलें आहे खादिर गृह्यसूत्रातील कांहीं भागाचा संबंध लाट्यायनसूत्राशीं व द्राह्यायणसूत्रांशीं आढळून येतो. या ग्रंथानें गोभिलाच्या सूत्रांवर चांगला प्रकाश पडतो हा ग्रंथ फार लहान असून यावर रुद्रस्कंदाची एक टीका आहे. वरील गृह्यांखेरीज आणखी जीं कांहीं सूत्रें आहेत त्यांची माहिती त्या त्या लेखांत सांपडेल

गेज्जीहळ्ळी—मुंबई इलाखा धारवाड जिल्हा हनगलच्या दक्षिणेस दोन मैलावरील एक खेडें येथें बसवेश्वराचें देऊळ असून मूर्तिच्या दोन्ही बाजूस इ. स. ११०२ चे दोन शिलालेख आहेत

गेडी ( १ )—काठेवाड, मोयका ठाण्यातील निराळी खंडणी देणारा एक तालुका. येथून जवळचें लिंबडी रेल्वे स्टेशन ९ मैलावर आहे

( २ ) मुंबई, कच्छ वागडच्या उत्तरेकडील खेडें. कच्छमधील हें फार जुन्या वस्तीचें ठिकाण असून प्राचीन विराटनगर तें हेंच असावें असा समज आहे येथील जुन्या अवशेषांत गाढवाचा छाप असलेलीं नाणीं आढळतात. मुसुलमान, रजपूत, वाघेला व जाडेजा लोकांचा येथें अंमल होता.

महादेव अचलेश्वराचें मंदिर, महावीरजीचें व लक्ष्मीनारायणाचें देऊळ, आशापीराची पडित मशीद व मालन विहीर हीं येथील प्राचीन स्थळें आहेत. बाजारांत एक क्षेत्रपाळाची दगडी मूर्ति आहे. तिच्या चवथ्यावरील अंकित लेखावरून ती १२११ त घडविलेली असावी असें वाटतें.

गेबर—एक रासायन ग्रंथकार. रसायन शास्त्राच्या अनेक ग्रंथांतून "गेबर" या नांवाचा पुष्कळ ठिकाणीं उल्लेख केलेला आढळतो. परंतु "गेबर" ही व्यक्ति कोण याचा अजून नीटसा तपास लागलेला नाहीं लॅटिन भाषेंत रसायनशास्त्रावर जीं पुस्तकें आहेत त्यांतील कांहीं-पुस्तकें गेबर नांवाच्या अरबस्तानांतील एका रसायनशास्त्रज्ञानें लिहिलेल्या पुस्तकाचीं भाषांतरें आहेत व तो गेबर इसवी सनाच्या आठव्या किंवा नवव्या शतकांत होऊन गेला असा "कितात्र-अल-फिरिस्त" मध्यें उल्लेख आहे या ग्रंथांतहि तो कोण, व कोठला याविषयीं परस्परविरोधी विधानें पुष्कळ आहेत बर्थेलोनें पारिसमधील ग्रंथसंग्रहालयातील 'गेबर' च्या पुस्तकांचें निरीक्षण करून असा निष्कर्ष काढला आहे. कीं हीं लॅटिन भाषेंतील पुस्तकें लिहिणारा मनुष्य अरबस्तानांतील नसून तो यूरोपखंडांतीलच कोणीतरी

गेवर असावा. परंतु कांहीं पुस्तकें अरबी लोक व युरोपियन लोक यांचा संबंध येण्यापूर्वी म्हणजे नवव्या व बाराव्या शतकाच्या दरम्यान अरबस्तानांत लिहिलीं गेलीं असावी.

या पुस्तकांतील भाषा अलंकारिक पण क्लिष्ट असून त्यांत मुसुलमानी धर्माचे उतारे आहेत, परंतु गंधक, पारा, व सोरा यांपासून धातू उत्पन्न करतां येतात ही गेबरच्या नांवानें प्रसिद्ध असलेली कल्पना त्यांत नाहीं. बर्थेलो यास आणखी एक पुस्तक पारिस येथें मिळालें होतें व तें गेबरनें ( अरबस्तानांत ) लिहिलें असावें असें बर्थेलोचें मत आहे.

जर हीं पुस्तकें आरबी गेबरनें लिहिलीं नाहींत तर आजपर्यंत अरबांच्या रासायनिक ज्ञानांतील प्रगतीविषयीं जी कल्पना आहे ती खोटी ठरते व जर तीं पुस्तकें अरब गेबरनेंच लिहिलीं असें मानलें तर ह्यापेक्षां प्राचीन काळीं अरबस्थानांत रसायनशास्त्राची फारच प्रगती झालेली होती असें म्हणावें लागतें. परंतु या बाबतींत जास्त मुद्देसूद बातमी मिळेपर्यंत कांहींच मत देतां येत नाहीं.

**गेद-माटरगांव**—व-हाड-मध्यप्रांत बुलढाण्याच्या पूर्वेस २२ मैलांवर गेद-माटरगाव नांवाचें सरकारसंरक्षित जंगल आहे. त्यांत हें एक लहान खेडेगाव आहे मोंगलाईंत हें परगण्याचें मुख्य ठिकाण होतें त्यावेळीं कोळी लोकांचें हें मुख्य ठिकाण असून ते लोक लुटालुटीवर आपला निर्वाह करीत. येथें एक जुना दरगा आहे. कोळी आणि वंजारी लोकांची बहुतेक वस्ती असून ते गोणी ( पांती ) तयार करतात. येथें जंगलांतील विश्रांतीगृह असून आजूबाजूस चांगली शिकार मिळते. या गावास चोरांचें माटरगाव असेंहि म्हणतात

**गेलुसॅक, जासेफ लुई** (१७७८-१८५०)—हा फ्रेंच रसायन व पदार्थविज्ञान यांचा शास्त्रज्ञ ता. ६ डिसेंबर १७७८ रोजीं जन्मला. ह्याचें लहानपणीचें शिक्षण बरेचसें घरींच झालें बर्थोलेला आपल्या संशोधनाच्या कामांत एका हुशार माणसाची जरूरी होती व त्याच्या हाताखालीं काम करण्याची गेलुसॅकला ही जागा मिळाल्यामुळें संधि मिळाली. परंतु बर्थोलेला याचा आपलीं अनुमानें सिद्ध करण्यांत फारसा उपयोग झाला नाहीं. तरी पण त्याला आपल्या शिष्याच्या बुद्धिमत्तेची बरोबर कल्पना आल्यावरून त्यानें त्यास 'सोसायटी ड आर्क्युइल'चा सभासद केलें. १८०२ मध्यें त्याला एकोल पॉलिटेक्निकमध्यें ( विविधकलाशाळेंत ) फोरक्रॉयचा डेमॉन्स्ट्रेटर नेमलें व तेथेंच तो १८१० सालीं रसायनशास्त्राचा मुख्य अध्यापक झाला.

गेलुसॅकचें पहिल्याप्रथम सर्व लक्ष पदार्थविज्ञानशास्त्राकडेच होतें. वायु, बाष्प, आर्द्रतामापन, केशाकर्षण इत्यादि बाबतींत प्रयोग केल्यावर त्यानें बरेच महत्त्वाचे लेख लिहिले तो उंचीवरील हवेंत पृथ्वीच्या लोहचुंबकाच्या जोरांत कांहीं फरक होतो कीं काय हें पहाण्याकरितां विमानांतून दोनदां फार उंच गेला होता, व त्यास तेथें लोहचुंबकाचा जोर असेल हें आढळून आलें त्यानें, दोन वायूंच्या मिश्रणानें एखादें नवीन रासायनिक द्रव्य बनतें तेव्हां ते वायू एका ठराविक आकारमानांत मिश्रण पावतात उदाहरणार्थ जेव्हां उज्ज आणि प्राणवायु मिळून पाणी होतें तेव्हां प्राणवायूच्या म्हणजे आक्सीजनच्या दुप्पट प्रमाणांत उज्ज उर्फ हैड्रोजन असतो हें दाखविलें

ह्यानंतर गेलुसॅकनें पदार्थविज्ञानाचा व्यासंग सोडून दिला असें जरी नाहीं तरी त्यानें रासायनिक संशोधनांतच काळ घालविला १८०८मध्यें त्यानें पालिश धातु तयार केला. १८०९ मध्यें बोरिक अम्लापासून बोरान हें मूलद्रव्य वेगळें केलें त्या नंतर विपाक ( आयवण ) ह्यावरहि त्यानें बरेच प्रयोग केले, प्रसिक अम्लाचे गुणधर्म शोधून काढले इत्यादि त्यानें बरेच सेंद्रिय रसायनशास्त्रांत संशोधनाचें काम केलें यासमयीं याची रसायनशास्त्रवेत्यामध्यें प्रामुख्यानें गणना केली जात असे व त्यामुळें औद्योगिक धंद्यामध्यें त्याची सल्ला घेत असत त्यांतल्या त्यांत गन्धकाम्ल तयार करण्याच्या पद्धतीमध्यें त्यानें बरीच सुधारणा केली. गेलुसॅक हा धीर वृत्तीचा, चिकाटीचा व अतिशय टापटिपीचा होता. शिवाय तो संकोचवृत्तीचा असून आपल्या स्वतःमध्यें किती चांगले गुण आहेत याची त्यास जाणीव नव्हती. तथापि तो धाडशी व अतिशय उत्साही असे

**गेवराई**—हैद्राबाद संस्थानांतील बीड जिल्ह्यांतला तालुका क्षेत्रफळ ५६४ चौ. मै जहागीर मुलुखासुद्धां लोकसंख्या (१९११) ८६२११. यांत १६ जाहागिरी व १३५ खेडीं आहेत १५०१ मध्यें सान्याचें उत्पन्न २ ३ लाख होतें तालुक्याचें मुख्य ठिकाण गेवराई असून वस्ती ( १९११ ) ३५६५ आहे.

**गेवर्धा जमीनदारी**—मध्यप्रांत चांदा जिल्हा. या जमीनदारीचे तीन परगणे आहेत, वेडगाव, रामगड आणि गेवर्धा वेडगाव आणि रामगड परगण्यांत सातनाळा डोंगर आहेत. एकंदर खेडीं ७७. लोकवस्ती ( सन १९०१ ) ७७१५. इस्टेट साधारण बऱ्या स्थितींतील आहे जमीनदारीचें आस्तित्व अलीकडचेंच आहे उत्पन्न ४१०० रु टाकोळी व इतर कर रु. ८७२॥

**गेस्लर हेन्रिश**—( इ स. १८१४-१८७९ ) या जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रवेत्याचा जन्म जर्मनींतील इग्लेशीब नांवाच्या गांवीं झाला. सन १८५४ सालीं यानें बॉन नावाच्या शहरीं आपलें कायमचें वास्तव्य केलें यापूर्वी याला कांच तयार करण्याचा धंदा शिकविला होता. पुढें बॉन शहरीं यानें रसायनशास्त्र आणि पदार्थविज्ञानशास्त्र यांच्या उपयोगी उपकरणें तयार करण्यांत उत्तम नाव कमाविलें यापूर्वी सन १८५२ सालीं जुलिअस प्लुक्कर याच्या बरोबर काम करून त्यानें असें सिद्ध करून दाखविलें कीं ३.८° उष्णमानावर पाण्याचें जास्तींत जास्त द्रव्य असतें. -२४° ते -७° उष्णमान असतांना बर्फाच्या वृद्धिमानाच्या गुणकाविषयीं त्यानें प्रयोग केले आहेत. शिरगोळा आणि टोपॅझ यांच्या आंत ज्या फटी अगर पोकळ जागा असतात

त्यात कर्बद्विप्राणिद नावाचा वायु असतो असें त्यानें सिद्ध करून दाखविलें व साध्या स्फुरावर विद्युत्प्रवाहाचें कार्य घडवून विशिष्ट प्रकारचा स्फुर तयार करितां येतो असें त्यानें दाखवून दिलें परंतु त्यानें एका विशिष्ट प्रकारच्या काचनलिका तयार केल्यामुळें तो जास्त प्रसिद्ध झाला आहे. अत्यंत विरल स्वरूपांत निरनिराळ्या मूलद्रव्यांची वाफ काचेच्या नळींत घालून तींतून विद्युत्प्रवाह पाठविला असतां विशिष्ट प्रकारचा प्रकाश पडतो व हा प्रकाश प्रकाश-पृथक्करणयंत्रांतून पाहून कांहीं विशेष अनुमानें बसवितां येतात या काच-नलिकांस " गेस्लरच्या नलिका " असें नांव देण्यांत आलें आहे पारदवातावर्षक यंत्र, तुला, उष्णतामापक यंत्र इत्यादि अनेक शास्त्रोपयोगी उपकरणें त्यानें बनविलीं आहेत सन १८६८ सालीं त्याला बॉन येथील विश्वविद्यालयांतून डॉक्टर आफ् फिलासफी ही बहुमानाची पदवी अर्पण करण्यांत आली बॉन येथें याचा मृत्यु झाला.

**गेळ**—या झाडास संस्कृतांत मदन, लॅटिनमध्यें रेंडिया, डयुमाटोनिअम, इंग्रजींत एमेटिक नट. मराठींत गेळ किंवा गेळफळ, कानडींत गेळ, हिंदींत मेणफल, करहर इत्यादि नांवें आहेत. हें झाड सर्व हिंदुस्थानभर जंगलांत आढळतें यास दोन अंगुळेंपर्यंत लांबीचे लहान मोठे कांटे असतात याचें फळ सुपारीएवढें असतें व तें पिकल्यानंतर पिवळें होतें या फळाची भुकटी करून कोळी लोक नदींत टाकतात त्या योगें मासे लुब्ध होऊन पकडले जातात गेळ पोटांत गेल्यास ओकारी येते याचा गळवावर लेप केल्यास तें पिकतें.

**गैबीनाथ**—(१५२०—१५८०) ज्ञानेश्वरमहाराजांच्या परंपरेंतील एक गुरु. याची परंपरा ज्ञानेश्वर-सत्यात्मक- गैबी अशी आहे. यापुढील शिष्यपरंपरा (गैबी) गुप्तनाथ-उद्बोध-केसरी याचे ग्रंथ पंचीकृतविवेक, कांहीं अभंग व पदें. [ सं. क का सू ]

**गोएटे**-(१७४९-१८३२) जोहान वुल्फ गँग व्हॉन गोएटे हा जर्मनींतील एक कवि, नाटककार व तत्त्ववेत्ता होता ह्याचा जन्म २८ आगष्ट सन १७४९रोजीं फ्रँकफोर्ट-ऑन-मेन मध्यें झाला. जन्माच्यावेळीं त्याची आई फक्त १८च वर्षांची असल्या-मुळें, तिच्या सान्निध्यानें गोएटेला चांगलें गृहशिक्षण मिळालें. त्याच्यावर पित्याच्या कडक स्वभावाचा परिणाम होऊन त्याचा स्वभाव स्थिर व धिमा बनला होता त्याला बालपणींचें सर्व शिक्षण आपल्या पित्याकडून मिळालें. शिवाय फ्रँकफोर्ट-ऑन-मेन येथील त्याचा जीवितक्रम विविध तऱ्हेचा व मजेदार असल्यामुळें त्यापासूनहि त्यानें ज्ञानार्जन केलें १७६५ च्या ऑगष्ट महिन्यांत गोएटे फ्रँक फोर्टहून लाइप्झिग येथें गेला, परंतु विश्वविद्यालयांत अभ्या-साची पूर्व तयारी या दृष्टीनें त्याचा फ्रँकफोर्ट येथील अभ्यास-क्रम विशेष समाधानकारक झाला नव्हता. येथें त्याची दृष्टि विस्तृत झाली व फ्रँकफोर्ट येथें केलेली अल्पस्वल्प . त्याला फारच थोडी भासूं लागली. पुढें तो भावगीतें लिहावयास शिकला. छात्रवृत्तीची दगदग सहन न झाल्यामुळें तो आजारी पडला व लिप्झिगहून फ्रँकफोर्टला आला हें दुखणें बरें होत असतां त्याचा दृष्टिकोण पार बदलला व तेथून त्याच्या आयुष्याला निराळेंच वळण लागलें व आपल्या बापाच्या इच्छेप्रमाणें त्यानें स्ट्रासबर्ग येथें कायद्याचा अभ्यास केला. येथें गोएटेची व हर्डरची ओळख झाली. स्ट्रासबर्ग येथें एका फ्रेडरिक ब्रायन नांवाच्या तरुणीवर त्याचें प्रेम बसलें. परंतु त्याचा परिणाम विवाहांत झाला नाहीं. १७७१ मध्यें त्यानें पदवी घेतली व आपल्या गांवीं येऊन धंद्यास प्रारंभ केला त्याचें दोन चार तरुणींवर प्रेम बसलें होतें परंतु त्याचें लग्न त्यांपैकीं एकीशींहि झालें नाहीं. एका प्रेमकथेचा वृत्तांत त्यानें आपल्या 'वेर्टरचीं दु:खें' ( वेटर्स लीडेन ) यामध्यें दिला आहे यांतील कांहीं भाग हा गुणे यांनीं मनोरंजनांत अवतरिला आहे.

१७७४ त वीमरच्या चार्लस ऑगस्टसनें गोएटेला बोला-विलें व १७७५ त तो तेथें गेला. त्यापुढील त्याचें सर्व आयुष्य तेथेंच गेलें अनुक्रमें १७७७ व १७७९ त तो हार्झ पर्वत व स्वित्झरलंड येथें जाऊन आला त्यानें १७८६-८८ मध्यें इटलीमध्यें प्रवास केला इटलींत असतांना कलापेक्षां प्राचीन गोष्टींकडे त्याचें लक्ष विशेष जाई या त्याच्या प्रवा-सामुळें कित्येक अज्ञात अशा गोष्टी त्याच्या प्रत्ययास आल्या इटलीहून परत आल्यावर ख्रिस्तेन हुल्पीयस या बाईस त्यानें आपल्याजवळ ठेवलें.

त्याला सुख देण्यांत ही बाई फार तत्पर असे १८०६ मध्यें या दोघांनीं आपला संबंध कायद्यानें संमत असा करून घेतला. १७९१ त गोएटेला वीमर येथील नाटकगृहाचा व्यवस्थापक नेमण्यांत आलें होतें. पुढें शिलर व गोएटे यांची दाट मैत्री जमली व जर्मनींतील या दोन प्रमुख कवींच्या स्नेहाचा परस्परांवर पुष्कळ परिणाम झाला. नवीन अद्भुत वाङ्मयविषयक चळवळींचे पुरस्कर्ते गोएटेला आपला गुरु समजत असत, कारण गोएटे स्वतः जरी प्रथम या चळ-वळींच्या विरुद्ध होता तरी त्याचे ग्रन्थ व त्याची कविता तिला अनुकूल अशीच होती नेपोलियनविषयीं याचें मत चांगलें होतें. १८०५ त शिलर मृत्यु पावल्यामुळें गोए-टेचें फार नुकसान झालें. फॉस्टचा दुसरा भाग पुरा करून मग गोएटेनें आपला देह ठेविला त्याचा अंत ता. २२ मार्च १८३२ रोजीं झाला

गोएटेच्या मरणानंतर थोडे दिवस त्याची व्हावी तशी कीर्ति झाली नाहीं, परंतु पुढें तो लोकांच्या पुढें इतका प्रामुख्यानें आला कीं, त्याचा आयुष्यक्रम व त्याचे ग्रंथ यावर लोकांनीं बरेंच मोठें वाङ्मय तयार केलें एकंदर ग्रंथाच्या संख्येच्या मानानें पाहिलें असतां गोए-टेच्या काव्याचें नैसर्गिक महत्त्व वाखाणण्यासारखें नाहीं. त्याचें बरेचसें काव्य आत्मविषयक आहे, आणि तेंच त्याचें उत्कृष्ट

काव्य आहे.इतर विषयावर त्यानें फारच थोडें लिहिलें आहे.

भावगीतें लिहिण्यात त्याचा हातखंडा होता जर्मन भाषेतील बरेंच काव्य भावगीतात्मक आहे. परंतु त्या सर्वांमध्यें गोएटेचें काव्य उत्तम आहे याच्या नाट्यप्रंथाबद्दल लोकमत फारसें अनुकूल नाहीं. तरी पण स्वभाववैचित्र्य रेखाटण्यात त्याचा हात आधुनिक कवींपैकीं कोणीहि धरूं शकणार नाहीं. इतकें मात्र खरें कीं, नाट्यांतील निर्बंधाचा त्याला फार तिटकारा असे व त्यामुळें त्याची नाटकें प्रयोगाच्या योग्यतेचीं होत नसत.

गोएटे हा फक्त वाङ्मयाचाच भोक्ता होता असें नाहीं. मुत्सद्देगिरी,राज्यव्यवस्था,अर्थशास्त्रीय तत्वांचा व्यवहारात उपयोग इत्यादि गोष्टी त्याच्या नानाविषयपटुत्वाबद्दल साक्ष देतात.

फॉस्ट हा गोएटेचा सर्वांत नावाजलेला ग्रंथ होय. फॉस्ट नाटक क्रमाक्रमानें लिहिलें गेल्यामुळें गोएटेला तें त्याच्या आयुष्यभर पुरलें. त्यानें बरेच ग्रंथ लिहिले त्यांपैकीं काहीं प्रमुख खालीं दिलें आहेत.गोट्झ व्हॉन बर्लिशिंगेन, क्लॅव्हिगो, एग्मॉंट विल्हेल्म मीस्टर, हर्मन अँड डोरोथिया वगैरे गोएटेनें आपलें आत्मचरित्रहि लिहिलें आहे.

**गोकर्ण**—मुंबई इलाखा उत्तर कानडा जिल्हा कुमठे तालुक्यातलें एक शहर. उत्तर अक्षांश १४° ३२' व पूर्व रेखांश ७४° १९'. लो. सं (१९११) ४८८१ हें एक यात्रेचें ठिकाण आहे. येथें महाबलेश्वराचें मंदिर द्राविडपद्धतीचें आहे. हें द्वादशज्योतिर्लिंगापैकीं एक आहे. येथें १०० च्या वर अखंड नंदादीप असतात. ब्रह्मा, विष्णु, शिव, अगस्त्य, राम आणि रावण यांचींहि देवळें येथें आहेत. याठिकाणीं स्नान केलें असता महापातकेंहि नाहींसें होतें असें स्थानमाहात्म्यात सांगितलें आहे. शिवरात्रीस दरसाल यात्रा भरते. महाभारत व रामायण यात सुद्धा या स्थानाचें माहात्म्य वर्णिलें आहे कालिदासानें याचा उल्लेख केला आहे. डॉक्टर जॉन फ्रायर या आद्य यूरोपियन प्रवाशानें १६७५ त या स्थानाला भेट दिली व याचें रसभरित वर्णनहि लिहून ठेविलें आहे तें व गोकर्णमहाबलेश्वराच्या देवळाचें वर्णन मुंबई ग्याझेटियरच्या कानडा विभागात ( १५ २ ) आढळेल.

**गोकर्णी**—हा एक फुलाचा वेल आहे. याच्या फुलाच्या रंगावरून पांढरी व काळी अशा गोकर्णीच्या दोन जाती आहेत या झाडास लॅटिनमध्यें क्लिटोरिआ टर्नाटिआ, संस्कृतमध्यें अपराजिता, गोकर्णा, मराठींत गोकर्णी, गुजराथींत गुरणी वगैरे नांवें आहेत. गोकर्णीस लांबट शेंगा येतात. हिचीं फुलें आकारानें गाईच्या कानासारखीं असतात यामुळें या वेलास गोकर्णी हें नाव प्राप्त झालें आहे हीं फुलें देवास वहातात पांढरी गोकर्णी जास्त गुणावह आहे गोकर्णीस "मुपर्ली" व 'काजळी" असेंहि म्हणतात या वेलीचे अनेक औषधी उपयोग आहेत

**गोकाक** ता लु का.—मुंबई बेळगाव जिल्ह्याचा पूर्वेकडील तालुका. क्षेत्रफळ ६७१ चौ मै यात गोकाक हें एक शहर व ११३ खेडीं. लोकसंख्या (१९११) १२१२२५. सारा व कर मिळून उत्पन्न सुमारें १॥ लाख रु याची हवा हिवाळ्यात मलेरियादूषित व उन्हाळ्यात भयंकर तलखी करणारी आहे. पावसाळा कायतो साधारण बरा असतो पाऊसहि फार पडत नाहीं गोकाकच्या टेंकड्यामुळें पलीकडील मैदानात पाऊस कमी पडतो गोकाकच्या दोन कालव्यांनीं २८ चौरस मैल जमीन भिजते. कालव्याना पाणी घटप्रभेचें घेतात. गोकाकचा प्रसिद्ध धबधबा याच नदीवरचा होय.

श ह र.—बेळगाव जिल्हा. गोकाक तालुक्याचें मुख्य शहर. उ. अ. १६°१०' व पू रे ७४°५३'. बेळगावच्या आग्नेयीस सुमारें ३० मैलांवर हा गाव आहे इ स.१९११ त लोकसंख्या ७३२६ होती हा गाव कागद व लांकडी कामें याकरिता प्रसिद्ध आहे.गावाभोंवती एक भिंत असून सभोंवार एक खंदकहि आहे येथें दोन मशिदी, गंजीखाना व जैन देऊळ हीं जुनीं कामें आहेत गोकाकच्या किल्यास पंचमीगुड असेंहि म्हणतात हा किल्ला गोकाकच्या पश्चिमेस असून विजापूरच्या आदिलशाही बादशहापैकीं एकानें बाधला असावा असें म्हणतात

धबधबा—गोकाकच्या वायव्येस सुमारें साडेतीन मैलावर गोकाकचा धबधबा आहे हा उ अ. १६°११' व पू रे ७४°५०' यावर आहे घटप्रभा नदी सह्यादि पर्वतातील अबोली नामक खिंडींत उगम पावते तिला मध्यंतरी ताम्रपर्णी व हिरणकाशी या मोठ्या नद्या मिळतात सुमारें ८५ मैल ही नदी वाहात आल्यावर गोकाकजवळ १७० फूट उंचीवरून उडी घेते नदीच्या आसपासचा प्रदेश दगडाळ असून रुक्ष आहे. आक्टोबर ते डिसेंबर या महिन्याच्या दरम्यान धबधब्याची शोभा अवर्णनीय असते

नदीकाठीं पुष्कळ देवळें आहेत पैकीं एकात इ. स. १०८७ सालचा शिलालेख असून महालिंगेश्वराच्या देवळात इ स. ११९३ सालचा जुन्या कानडी लिपींत लिहिलेला एक शिलालेख आहे. जवळच मार्कंडेय नदीतीरावर मलाप्पा व निर्वाणप्पा अशीं दोन देवळें असून तेथें पुष्कळ लोक दर्शनास जातात.

इतिहासः—इ. स १०४७ सालच्या एका शिलालेखात गोकाजे म्हणून या गावाचा उल्लेख केलेला आढळतो इ स १७१९ साली गोकाक शाहूच्या राज्यात मोडत होतें. इ. स. १७१९ व १७५४ याच्या दरम्यान केव्हां तरी सावनूरच्या नवाबकडे हा गाव गेला व त्यावेळीं मशीद व गंजीखाना त्यानीं बांधला इ स १७५४ सालीं गोकाक पेशव्यानीं जिंकलें. इ. स १७७८ सालीं कित्तुरकर देसायानीं गोकाकचा ताबा घेतला होता परंतु इ स १७७९ सालीं परशुरामभाऊ पटवर्धन यानीं तें पुन्हा जिंकलें व देसायास कैद केलें या वेळेपासून इ स १७८३ पर्यंत पेशव्याकडे

गोकाक होतें. त्यासाली पटवर्धनाच्या सरंजामांत गोकाक पटवर्धनांकडे गेलें इ. स. १७८९ सालच्या मराठी दप्तरांत गोकाक हें परगण्याचें मुख्य ठिकाण असून त्याचें उत्पन्न ११२५०रुपये होतें असा उल्लेख सांपडतो. इ. स. १७९७सालीं कोल्हापूर सरकारनें गोकाककडून १२०००० रुपये खंडणी सक्तीनें वसूल केली होती. इ. स. १८३६ सालीं तासगांवचे गोविंदराव पटवर्धन निपुत्रिक वारल्यामुळें गोकाक ब्रिटिश मुलुखांत खालसा होऊन गेलें इ. स. १८७६–७७ सालच्या दुष्काळांत येथील विणकरी वर्गाचें अतोनात नुकसान झालें व तो धंदा बराच खालावला. या ठिकाणीं लुगडीं वगैरे स्त्रियांनीं वापरण्यायोग्य माल बराच तयार होत असे.

**गोकुळ**—संयुक्तप्रांत मथुरा जिल्ह्यांतील एक शहर. उ. अ. २७°२६' व पू. रे. ७७°४६'. याच्या जवळून यमुना नदी वहात जाते. कृष्णाच्या बाळपणीच्या लीलांचें स्थान या नात्यानें गोकुळ हें फार पवित्र स्थान मानलें गेलें आहे. या ठिकाणीं गोकुळाष्टमीच्या दिवशीं मोठी यात्रा जमते. याशिवाय वल्लभाचार्यांचें हें रहाण्याचें ठिकाण म्हणूनहि हें प्रसिद्ध आहे. रमणरेती व ब्रह्मांडतीर्थ हीं गोकुळांतील स्थानें फार पवित्र मानिलीं जातात.

मराठ्याच्या इतिहासांत गोकुळवृंदावनासंबंधीं पुढील उल्लेख सापडतो "पठाणच्या लोकांनीं मथुरेवर हल्ला केला. नंतर त्यांनीं अलमशहाच्या नांवें द्वाही फिरविली व पंचवीस लक्ष विन्त घेऊन आपला अंमल बसवून मथुरेहून फौज गोकुळवृंदावनास पाठविली की लुटून घेणें" (रा. खं. १ पृ. १११ ).

**गोकुळ जाट**—अवरंगझेबानें गादीवर आल्यानंतर थोड्याच वर्षांत हिंदूंवर सर्वच बाजूंनी अत्यंत जुलूम केल्यामुळें त्यांच्यांत असंतोष फैलावला. उत्तरहिंदुस्थानांत अवरंगझेबाच्या खुनापर्यंतहि प्रयत्न झाले.वाहीं काझींचे खून पडले ( १६६९ ). मथुरा, अयोध्या व आग्रा या प्रांतांतील जमीनमहसूल गोळा करण्यास नेहमीं त्रास पडे व शिपायांची मदत घ्यावी लागे; याचें कारण तेथील मुसुलमानी फौजदार हिंदू शेतकऱ्यावर फार जुलूम करीत. यानें हिंदूंचा पोपास करून त्याच्या बायका पळवीत ( १६३८ त मुर्शीदकुली फौजदारानें हा प्रकार केला होता ), पैसे खात. त्यामुळें तिकडील जाट शेतकऱ्यांनीं तिलपतच्या गोकुळ जाटाच्या हाताखालीं बंड केलें. त्यानें मथुरेच्या फौजदाराला लढाईंत ठार मारून, सदाबाद परगणा लुटला ( १६६९ ). त्यावर सफशिकन, रणदुल्लासारखे बडे सरदार पाठवूनहि भागेना. तेव्हां खास अवरंगझेब चालून गेला. प्रथम गोकुळाला माफी देण्याची लालूच दाखविली, परंतु तो ऐकेना; तेव्हां लढाई झाली. गोकुळ व त्याचे जाट मोठ्या शौर्यानें लढले; पण सैन्याच्या कमतरतेमुळें त्यांचा पराभव झाला. गोकुळाला पकडून आणून आग्रा येथें त्याचा एकेक अवयव तोडून मग ठार मारलें, व त्याच्या कुटुंबास बाटविलें. तरी पण हीं शेतकऱ्यांचीं बंडें थांबलीं नाहींत. १६७०, १६८१ व १६८८ मध्यें तीं उद्भवलीं व १६८८ तील पुढारी चूडामण जाट याचा पराभव अवरंगझेब अगर त्याचे वंशज यांच्या हातूनहि झाला नाहीं. पुढें तर ( १६९१ ) या जाटांनीं मोंगल बादशहांना फार त्रास दिला. एवढेंच नाहीं तर त्यांनीं अकबराचें थडगें फोडून त्यांतील त्याचीं हाडेंहि जाळलीं होतीं ( स्मिथ ). [ जदुनाथ सरकार—अवरंगझेब; स्मिथ—ऑक्सफर्ड हिस्टरी ऑफ इंडिया. ]

**गोकुळाष्टमी**—श्रावणांतील वद्य अष्टमीस गोकुळाष्टमी किंवा जन्माष्टमी म्हणतात. या दिवशीं मध्यरात्रीं वसुदेव देवकीच्या पोटी कृष्णाचा जन्म झाला असें भागवतांतील दशमस्कंधांत वर्णन आहे. हा दशावतारांपैकीं आठवा अवतार होय ( कृष्ण पहा ). गोकुळाष्टमीचें माहात्म्य वैष्णव संप्रदायांत विशेष आहे. गोकुळाष्टमीचें व्रतहि आहे. त्याचें भविष्यपुराणांतील विधान व्रतराज ग्रंथांत दिलें आहे.

**गोखरू**—(सराटे) या वनस्पतीस लॅटिनमध्यें ट्रिब्युलस टेरिस्ट्रिस;संस्कृतमध्यें गोक्षुर, इक्षुगंधा; मराठींत व गुजराथींत गोखरू, सराटे इत्यादि नांवें आहेत. गोखरूचें झाड लहान असून जमिनीवर पसरतें. हीं झाडें पावसाळ्यांत उगवतात व त्यांस लहान फळें येतात त्यावर चार बाजूनें चार काटे असतात या झाडाची एक लहान जात आहे. तीस सराटे म्हणतात. औषधांत गोखरूच्या अभावीं सराटे घेतात. कारण दोहोंचे गुणधर्म एकच आहेत. गोखरू पौष्टिक असून नाना प्रकारें त्याचा औषधी उपयोग आहे.

**गोखले, गोपाळ कृष्ण** ( १८६६–१९१५ )— एक हिंदी राजकीय पुढारी. चिपळूण तालुक्यांत ताम्हणमळा गावीं यांचा जन्म तारीख ९ मे सन १८६६ रोजीं झाला. कोल्हापूरच्या राजाराम हायस्कुलांत व राजाराम कॉलेजांत शिक्षण घेऊन हे मुंबईस एलफिन्स्टन कॉलेजांत गेले. १८८४ सालीं बी. ए. झाल्यानंतर, डेक्कन एज्युकेशन सोसायटीस हे जाऊन मिळाले. १८८४ पासून १९०२ पर्यंत गोखले डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे सभासद व फर्ग्युसन कॉलेजांत प्रोफेसर होते. कॉलेजांत ते गणित, इंग्रजी वाङ्मय, अर्थशास्त्र व इतिहास शिकवीत असत. १८८७ सालीं गोपाळराव सार्वजनिक सभेचे चिटणीस व त्या संस्थेतर्फे निघणाऱ्या त्रैमासिकाचे संपादक झाले. १८८८ सालापासून सुधारक पत्राचें संपादकत्व गोखल्याच्याकडे आलें. १८९५ सालीं राष्ट्रीयसभा पुण्यास भरली होती त्यावेळीं गोखले तिचे सेक्रेटरी म्हणून काम करीत होते. याप्रमाणें १८९० सालापासून अध्यापनाचें काम संभाळून गोपाळराव सार्वजनिक कामांत भाग घेऊं लागले. १८९७ सालीं हिंदुस्थानच्या वतीनें विलायतेस गेलेल्या प्रतिनिधींपैकीं गोखले हे एक होते. तेथें गेल्यावर त्यांनीं वेल्बी कमिशनपुढें उत्कृष्ट साक्ष दिली व चांगला लौकिक मिळविला. १९०० सालीं गोपाळराव हे मुंबईच्या प्रांतिक कायदेकौन्सिलचे सभासद

झाले. लँड रेव्हेन्यूसंबंधी सरकारी धोरणावर गोखल्यांनीं कौन्सिलात खूप टीका केली व शेवटीं त्यांनीं फेरोजशहामेथा-बरोबर निषेधप्रदर्शनार्थ कौन्सिलांतून उठून जाण्याचें धैर्य दर्शविलें. फेरोजशहामेथानें वरिष्ठ कायदेमंडळांतील आपली जागा सोडल्यामुळें इ.स १९०२ सालीं गोखले वरिष्ठ कायदेकौन्सिलचे सभासद झाले व तेथील काम त्यांनीं आमरण केलें. इ स १९०३ सालीं त्यांनीं बजेटावर वरिष्ठ कौन्सिलात विद्वत्ताप्रचुर भाषणें केलीं इ. स. १९०४ सालीं कर्झनच्या अमदानींत शिक्षणप्रगतीच्या गळ्यास नख लावणारें इंडियन युनिव्हर्सिटी बिल ज्यावेळीं पुढें आलें त्यावेळीं गोखल्यांनीं शिकस्त केली परंतु उपयोग झाला नाहीं. त्याच सालीं गोपाळरावांना सी. आय. ई. असा सरकारकडून किताब मिळाला. १९०५ ते १९०८ हीं वर्षें हिंदी राजकारणांतील मोठ्या चळवळींचीं व अस्वस्थतेचीं दिग्दर्शक होत. बंगालच्या फाळणीमुळें व कर्झनशाहींतील एकंदर दडपशाहीमुळें लोकांचीं मनें विथरून गेलीं होतीं. अशा समयीं राष्ट्रीय सभेस १९०५ मध्यें गोखल्यासारखा कर्णधार प्राप्त झाला व त्यासालची बनारसची काँग्रेस गोखल्याच्या अध्यक्षतेखालीं उत्तम रीतीनें पार पडली. याच वर्षीं मुंबई युनिव्हर्सिटीच्या फेलोशिपचा व पुणें म्युनिसिपॅलिटीच्या अध्यक्षत्वाचा मान त्यांना मिळाला व त्यांच्या सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचा जन्महि १९०५ मध्येंच झाला. नंतर इंग्लंडात लिबरलपक्ष अधिकारारूढ झाल्याचें पाहून गोपाळराव विलायतेस गेले. स्वदेशीं परत आल्यावर सनदशीर चळवळीवरील जनविश्वास नाहींसा झाल्याचें त्यांना आढळून आलें व लगेच त्यांनीं उत्तर हिंदुस्थानांत व्याख्यानाचा दौरा काढला. पण काँग्रेसमध्यें दुफळी व्हावयाची ती झालीच. पुन्हा १९०८ मध्यें विलायतेस जाऊन त्याच सालीं प्रसिद्ध करण्यांत आलेल्या मोर्ले-मिंटो सुधारणेच्या योजनेंत वरीत गोखल्यांनीं बरीच मेहनत घेतली. प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक व मोफत करावें म्हणून १९१० सालीं त्यांनीं चळवळ सुरू केली. याच वेळीं दक्षिण आफ्रिकेंतील सरकारच्या दडपशाहीच्या धोरणास आळा बसावा व नाताळांत मुदतबंदीनें मजूर पाठविण्याचें बंद करावें असें त्यांनीं सरकारास सुचविलें. १९११ मध्यें प्राथमिक शिक्षणाचें बिल त्यांनीं वरिष्ठ कौन्सिलात आणलें. १९१२ त दक्षिण-आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या प्रश्नाबद्दल तडजोड करण्याकरितां गोपाळराव विलायतेस गेले व तेथून ते आफ्रिकेंत गेले. तेथेंहि त्यांचा मोठा सन्मान झाला. यानंतर पब्लिक सर्व्हिस कमिशनमध्यें गोपाळरावांची नेमणूक झाली, व १९१२मध्यें त्यांच्या कामास सुरवात झाली. यावेळीं दक्षिण आफ्रिकेंतील लढा विकोपास गेला होता. महात्मा गांधींच्या नेतृत्वाखालीं सत्याग्रहास सुरवात झाली व गोखले गांधींच्या चळवळीकरितां फंड जमवूं लागले. १९१३ त ते पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या कामाकरितां विलायतेस गेले परत आल्यावर त्यांची प्रकृति जी ढांसळली ती कायमचीच. १९१४ सालचा सर्व काळ वरील कामांतच गेला व या वर्षींहि ते पुनः विलायतेस जाऊन आले. त्यानंतर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्यांना पुण्यास राहावें लागलें. अशा रीतीनें आपल्या प्रामाणिक समजुतीप्रमाणें व निरलस रीतीनें देशसेवा करणाऱ्या या प्रसिद्ध देशभक्तानें पुणें येथें ता. १९ फेब्रुवारी १९१५ रोजीं देह ठेविला.

लोकनायकाच्या अंगीं असणारे अनेक गुण गोपाळरावांमध्यें होते. देशाच्या स्थितीचें व राजनीतिशास्त्राचें यथार्थ ज्ञान, अंगीकृत विषय व्यवस्थित मांडण्याची शैली, इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व, अप्रतिम वक्तृत्व, नियमित वेळांतहि श्रोत्याच्या मनावर परिणाम करण्याची कला, देशाभिमान व स्वाभिमान आणि जबाबदारीची तीव्र जाणीव इत्यादि उत्कृष्ट गुण त्यांच्या ठायीं वसत होते. आपल्या सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटीच्या कामाचें पांच प्रकारचें स्वरूप गोपाळरावांनीं ठरविलें होतें, (१) दुःखनिवारण, (२) समाजसेवा, (३) सहृद्भावित्वाचा प्रसार, (४) समाजशिक्षण, (५) राजकीय चळवळ सनदशीरपणा हाच त्यांच्या राजकारणाचा पीळ होय. थोडक्या हयातींत गोपाळरावांनीं अनेक कामें केलीं व कीर्ति मिळविली.

[ संदर्भ ग्रंथ—आपटेकृत—गोखले घराण्याचा इतिहास, नटेसन, मद्रास—गोखल्याचें चरित्र; अभ्यंकराचा लेख ( विविधज्ञानविस्तार १९१५ ), कै. प्रि. पटवर्धनाचा लेख ( मासिक मनोरंजन १९१५ ); न. चिं. केळकरकृत-टिळकाचें चरित्र ]

**गोखले घराणें**—गोखल्याचें घराणें मूळचें रत्नागिरी जिल्ह्यातील वेळणेश्वर गावचें होय. रा. आबा चांदोरकर, यांच्या संग्रहातील शके १४१० तील ( स. १४८८ ) एका अस्सल कागदावरून वेळणेश्वर येथें त्यावेळीं गोखले घराण्यांतील पुरुषांना धर्माधिकारीपणा व उपाध्येपणाची वृत्ति होती असें ठरतें. परंतु शके ११०० पासून गोखले यांची वस्ती होती असें रा. गोविंदराव आपटे लिहितात ( गोखले घराण्याचा इतिहास, पा. २२८ ) राजापूर तालुक्यांतील धाऊलवल्ली गावची वसाहत शके १३४३ त गोखल्यांनीं केल्याची माहिती मिळते.

गोखले-रास्ते घराण्याच्या मूळपुरुषाकडे आदिलशाहींत वेळणेश्वर महालची रसद पोंहचविण्याचें काम असल्यानें त्या घराण्यास रसदे असें नाव मिळालें, याचेंच पुढें रास्ते बनलें या पुरुषाचाच वंश वाई, पुणें व जमखंडी येथील रास्ते घराण्यांत नांदत आहे. शाहूनें ज्याला रास्ते पदवी दिली तो भिकाजीपंत याच घराण्यांतील होता. याचीच मुलगी श्री नानासाहेब पेशवे यांची पत्नी गोपिकाबाई ( पहा ) होय.

गोखल्यांच्या शाखा पुढील ठिकाणीं आहेत. ताम्हणमळा (रत्नागिरी जि.) येथील चौगुलेगोखले या घराण्यास येथील चौगुलकीचें वतन थोरल्या आनंदराव रास्त्यांनीं

आहे या घराण्यातील पुरुषानें ताम्हनभर रुपये देऊन मळा गाव पेशव्याकडून इनाम मिळविलें अशी दंतकथा आहे या घराण्यातच नामदार गोखले याचा जन्म झाला मालवण नजीक कादळ गावीं एक घराणें असून तेथील कृष्णभट्ट गोखल्यास शाहूनें इनाम दिलेलें आहे पुणें येथें एक नळ-वाले गोखले घराणें आहे. शेवटच्या बाजीरावाऱ्या वेळीं नळाच्या कामावर याचा मूळपुरुष यशवंत आप्पाजी नाजाचा होता त्यावरून हे नाव या घराण्यास मिळालें पुण्यात घर मोडे गोखले म्हणून एक घराणें आहे या घराण्यातील विनायक नारायण गोखल ह्यानें व्यापाराच्या जोरावर पुण्यात जुनीं घरें घेऊन तीं मोडून नवीं बांधण्याचा क्रम सुरू केला होता वेंगुर्ले येथेंहि गोखल्याची एक शाखा आहे इदूर येथें बडे गोखले म्हणून एक घर आहे पोंबुर्ले येथें भुते–गोखले घराणें आहे याशिवाय आध, अबेर, सांगोलें, कल्याण, कागवाड, नाधवडे, नाशक, जुवाटी मिरज, शिरहट्टी, मुटाट, सोमेश्वर, गराड, कोल्हापूर, नागपूर, बडोंद वगैरे ठिकाणीं गोखल्याची घराणीं आहेत [गो वि आपटे—गोखले व रास्ते घराण्याचा इतिहास ]

**गोखले, बापू**—बापूंचें मूळ गाव तळेखाजण हें होय जवळच्या पिरदवण गावीं बापूनीं मल्लिकार्जुनाचें देऊळ बांधलेलें आहे तळेखाजणास हल्लीं बापूच्या वाड्याचा फक्त चौथरा शिल्लक आहे बापू याच नाव बापूजी असेंच आज पर्यंत समजत असत परंतु रा गोविंदराव आपटे यानीं नाशिकच्या तीर्थोपाध्यायाच्या वहीतून त्याचें खरें नाव नरहर गणेश असल्याचें प्रसिद्ध केलें आहे याचे चुलते धोंडोपंत ह्यास प्रथम परशुरामरावभाऊ पटवर्धनाच्या हाता खालीं सरजाम मिळाला नंतर ते बदामाच्या लढाईंत प्रख्यातीस आले टिपूवरील लढाईंतहि त्यानीं तरवार गाज विला होती ( १७९० ) त्यामुळें पेशव्यानीं त्याना काहीं दिवसानीं स्वतंत्र सरदार बनवून दक्षिणेंत धारवाडच्या सुभ्यावर नेमलें यानीं धोंडजी वाघाचा व याच वेळा पराभव केला होता, कित्तुरकर देसायाचें बंड मोडलें होतें व सुरापुर-कर नाईकाचा मोड केला होता कोल्हापुराकडील रत्नाकर-पंत राजाज्ञा यानें पेशव्याच्या हुबळी, सावनूर वगैरे प्रांतावर स्वारी केली असता धोंडोपंत दादा यानीं कारडगी येथें त्याचा पराभव करून तोफा, साहेबी नौबत जरीपटका वगैरे त्यांना सारा सरजाम लुटला ही मोहीम दोन अडीच महिने चालली होती धोंडोपंतास या लढाईंत जखमा लागल्या होत्या ( १७९८ आक्टोबर ) टिपूवर दाब राखण्यासाठीं धोंडोपंतास कर्नाटकांत ठेविलें होतें शिंद्याच्या बाया व कोल्हापुरकर हे एक होऊन पेशवाई प्रांत लुटीत असता परशुरामभाऊच्या हाताखालीं धोंडोपंताना सादत्ती येथें त्याचा पराभव करून बराच मुलूख सोडविला ( १७९९ ) यापुढें टिपूचा नाश झाल्यानंतर धोंडोपंतानीं सोंधे व ˎ इकडील प्रांत काबीज केला याच सुमारास धोंड जाचा उपद्रव पुन्हा सुरू झाला तेव्हां पट्टण जवळ धोंडो पंतानें त्याचा पराभव केला ( १७९९ ) वेलस्लीनें वाघाचा पराभव करून त्यास तुंगभद्रापार हाकल्यानें त्यानं मरा-ठ्याच्या राज्यात धुमाकूळ घातला तेव्हा त्याच्यावर धोंडो पंत व बापू हे चालून गेले, कित्तूरजवळील हालिहाळ येथें त्याच्याशीं लढ देण्याचें त्यानीं ठरविलें, परंतु कित्तूरकर देसायानें वाघास फितूर होऊन धोंडोपंतास वाट चुकवून झाडींत नेलें व वाघास खबर दिली त्यानें येऊन अकस्मात हल्ला केला धोंडोपंताची फौज पुढें निघून गेली होती, जवळ फारच थोडे लोक होते नाल्यात अडचणींत सापडले असताहि त्यानीं शौर्यानें वाघावर चाल केली परंतु अखे रीस धोंडोपंत या लढाईंत कामास आले पुढें बापू यास धोंडोपंताची सरदारी मिळाली हे मराठी राज्याचे शेवटचे सेनापती होते याचा एक भाऊ आप्पा हाहि बाघाच्या वरील लढाईंतच मरण पावला होता बापूना दोन पुत्र होते पैकीं एक लहानपणीं वारला व दुसरा इंग्रजाच्या अष्टावराल मोहिमेंत कामास आला बापूचे वडील गणेशपंत हे विजयदुर्गास दप्तरदार होते धोंडोपंत हे कर्नाटकात असताना बापू हे पुण्यास दरबारात त्याचे वकील म्हणून असत हुनगुदकडे असदअलीच्या बंडाला मोडण्यास धोंडोपंताबरोबर बापूहि होते रत्नाकरपंत राजाज्ञानें कर्नाटकात धुमाकूळ घातला त्यावेळच्या लढायातहि बापू हजर होते आप्पासाहेब पटवर्धनाची करवीर वरील स्वारी चालू असता बापू व धोंडोपंत त्यांच्या मदतीस गेले होते ( १८०० ) त्यावेळीं बापूची पहिली स्त्री आनंदीबाई वारला हालिहाळच्या लढाईंत बापूहि होते, त्यावेळीं त्यानां जखमा झाल्या होत्या शेवटीं त्यानीं इंग्रजाच्या मदतीनें धोंडी वाघास ठार मारिले पुढें नगरप्रांतीं बारभाई व बावनपागे यांचें बंड बापूनीं मोडलें व कित्तुर, नवलगुद, सुरापुर इकडीलहि बंडें मोडून पेशव्याच्या आज्ञेनें पटवर्धनाच्या सावनुर तालुक्यावर हल्ला करून पटवर्धनाचा मोड करून तो तालुका काबीज केला शेवटीं पेशव्यानींच पटवर्धन व बापू याचा समेट केला. नंतर बापू हे प्रतिनिधीवर जाऊन व ताई तेलीण हिचा पराभव करून ( १८०६ ) पुण्यास गेले तेथें पेशव्यांना लोगी चहाडी सांगितल्यावरून त्यानीं बापूस त्याच्याकडील सरजामा प्रांताच्या सोडचिठ्या मागितल्या असता, त्यानीं त्या तावडतोब दिल्यामुळें पेशवे खूष होऊन त्यानीं बापूस १२ लाखाचा सरजाम दिला व त्याना लढाईचें झालेलें १८ लाखाचें कर्जहि फेडलें पुन्हा ( १८०७ ) प्रतिनिधानें बंड केल्यानें बापूनीं तें मोडलें व प्रतिनिधीस थोडासा प्रांत ठेऊन बाकीची सर्व जहागीर त्यानीं आपल्या ताब्यात घेतला याच्या पुढें चतरसिंगाचें बंड बरेंच वाढल्यानं बापूची नेमणूक तें मोडण्यावर झाली व त्यानीं तें सन १८१२ त मोडलेंहि त्यानंतर पेशव्यानीं इंग्रजाशीं लढाईचें धोरण बांधलें त्या वेळीं इंग्रजाचा लिंगो भगवान वकील बापूना फितूर करण्यास

आला असता, त्यास बापूंनीं फार बाणेदारपणाचें उत्तर देऊन प्राण जाईपर्यंत स्वामिद्रोह न करण्याचें ठरविलें. बापू हे पेशव्यांचे मुख्य सेनापति होते. त्याच्याशिवाय ( आप्पा निपाणकर सोडल्यास ) दुसरा कोणीहि शूर पुरुष पेशव्यांच्या पदरीं शिल्लक नव्हता. गणेशखिंडीच्या पहिल्या लढाईत बापूंचा घोडा ठार झाला. तरी त्यांनीं शेवटपर्यंत पायउतारा होऊन तरवार चालविली. नंतर गारपिरावर लढाई झाली. तींत बापूंचे लोक व विंचूरकरादि सरदार मुद्दा पळाले तेव्हां श्रीमंतास सासवडास जाण्यास सांगून बापूहि सैन्याचा जथ कायम ठेऊन मागोमाग गेले तेथून जेजुरी, देऊर, पंढरपूर, खेरी, ब्राह्मणवाडी या भागात पेशवे जात असता त्याच्या पिछाडीस वीस कोसावर राहून व पिछाडी संभाळून बापू ठिकठिकाणीं इंग्रजांशीं लढाया देऊन त्याला थोपवीत होते. ब्राह्मणवाडीजवळ बापूंचा मुलगा बाबासाहेब वारला, तेव्हां त्याची बारा वर्षांची स्त्री सती गेली. पुढें कोरेगावासहि इंग्रजांशी लढाई होऊन तींत दोहींकडील बरेच लोक कामास आले. पंढरपुरकडून एलफिन्स्टन व कर्नाटकातून स्मिथ असे दोघे पेशव्यावर चालून आले. त्या दोघांचेहि शह साभाळून बापूंनीं पेशव्याना साताऱ्याकडे सुरक्षित पोंहोचविलें. पुढें तेथून फलटणवरून पराऱ्याकडे पेशवे जात असता, अष्टे गावीं पेशव्याचा व बापूंचा मुक्काम पडला. स्मिथ येणार हें ऐकून बापूंनीं श्रीमंतास रात्रींच कूच करण्याचा सल्ला दिला. परंतु आप्पा निपाणकरानं दुसऱ्या दिवशीं निघण्यास सुचविलें व हल्ला आल्यास आपण परतविण्याची हमी दिली. बापूंनीं फार आग्रह केला पण श्रीमंतानीं आप्पाचेंच म्हणणें ऐकलें. दुपारींच फौज पराऱ्याकडे निघून गेली होती. बापूजवळ फार थोडे लोक होते. दुसऱ्या दिवशीं ( २० फेब्रुवारी १८१८ ) श्रीमंत सकाळीं भोजनास बसले असता, स्मिथ चालून आला त्यावेळीं बापूनीं श्रीमंतास सावध केलें परंतु उलट पेशवेच त्यांना टाकून बोलले तेव्हां बापू म्हणाले कीं " दुसऱ्याचें ऐकून कालचा बेत बिघडविला व आता आमच्यावर रोष, आता आम्हीं जातों, आपण सावकाश जेवावें जय झाल्यास भेटूं नाहीं तर हें शेवटचें दर्शन " असें म्हणून बापू स्मिथवर तुटून पडले. आप्पा निपाणकर झाडास जाण्याच्या निमित्तानें व आपला निभाव लागणार नाहीं असें म्हणून मागें पळाला तेव्हां बापूंनीं फक्त पन्नास लोकानिशीं स्मिथवर जबरदस्त हल्ला केला. त्यामुळें त्याची एक तुकडी हटली. शेवटीं दहा बारा लोक राहिले असता बापूंची व स्मिथची गाठ पडून द्वंद्वयुद्ध झालें त्यात बापू फार शौर्यानें लढले परंतु शेवटीं रणात ते कामास आले. पाच्छापुरकर बखरींत, " बापूंचा शेवट काय झाला याबद्दल पत्ता लागला नाहीं " असा मजकूर आहे यावेळीं बापूंची दुसरी पत्नी यमुनाबाई ही बरोबर होती ती पुढें साताऱ्यास जाऊन राहिली बापूंचा जन्म स. १७७७ त झाला होता, वयाच्या चाळीसाव्या वर्षी त्यांचा वरीलप्रमाणें शेवट झाला. ठाकुरदासबोवा हे बापूंचे गुरु होते. यमुनाबाईंना शेवटपर्यंत थोडासा सरंजाम चालू होता त्यांना मुलबाळ न झाल्यानें हल्लीं बापूंचा औरस वंश नाहीं. [ खरे-खंड ११, डफ. पु. ३, आपटे-गोखले घराण्याचा इतिहास ]

**गोगले रास्ते**—' रास्ते पहा '.

**गोगलगाय**—या प्राण्याचा अंतर्भाव मृदुकायप्राण्याच्या कोटींत होत असून त्या कोटींतील प्राण्यांचें शरीर मासल, थड व नरम असून त्यावर कवच नसतें. काहीं प्राण्यांस लपून बसण्याकरिता शिंपा किंवा शंख असतात. ह्या कोटींत शिंपा (लॅमेली ब्रॅंकिआटा), गात्रपाद (गॅस्ट्रोपोडा) व मौलिपाद (सेफॅलोपोडा) ह्या तीन वर्गांचे प्राणी येतात पहिल्या वर्गासंबंधीं पाहता असें आढळतें कीं, शिंपले हे नद्या, तळीं, समुद्र व वाळवंट इत्यादि ठिकाणीं सापडतात. शिंपले हे आतील प्राण्याचीं स्वाभाविक आच्छादनें होत दोन्हीं बाजूस शिंपल्याचे भाग असून त्यांच्यामध्यें प्राणी असतो दोन्हीं शिंपले एका बिजागिरीनें जोडले जातात. शिंपला उघडून त्यातील प्राणी आपला पाय बाहेर काढतो व त्यानें हिसके देत वाळूतून चालतो. या प्राण्याना डोकें नसतें व ज्ञानेंद्रियें नसतात शिंपल्यातील प्राण्यावर उपजीविका करणारे काहीं जंतु असतात, ते त्याना त्रास देत असतां त्यांना मारण्यासाठीं हे प्राणी त्यावर शिंपल्याच्या द्रव्याचें वेष्टन घालतात मोतीं हें अशा प्रकारचेंच वेष्टन होय ( मोती पहा ) तिसऱ्या वर्गाचा मौलिपाद हा प्राणी समुद्रात राहतो याची लांबी एक इंचापासून पन्नास फूट पर्यंत असते ह्याच्या डोक्यास ८।१० पेक्षाहि जास्त पाय असतात व त्याच्या योगें हा भक्ष्य पकडतो याच्या डोक्यावर दोन डोळे असतात याच्या शरीरात शाईसारख्या द्रव्याची पिशवी असते. या प्राण्यात नर व मादी असे निरनिराळे प्राणी असतात

मृदुकाय प्राण्याच्या कोटींतील दुसरा वर्ग गात्रपाद हा होय. या वर्गात शंख, कवड्यातील प्राणी व गोगलगाईच्या जाती येतात. मृदुकाय प्राण्यात शखांची संख्या ¾ आहे. शंख हे प्राण्याचें कवच असून त्याची वाढ शिंपाप्रमाणेंच होते. शंखातील प्राणी शिंपल्यातील प्राण्यापेक्षा वरच्या दर्जाचे आहेत. ह्याना डोकें असतें व त्यावर दोन शिंगें व डोळे असतात. शंखातील प्राण्याना श्वासोच्छ्वासाकरितां पिसाच्या सारखे कल्ले असतात. हे प्राणी मांसाहारी असून ते पुष्कळ शंख, शिंपल्याना भोंकें पाडून त्याचा फना उडवितात. शंखाचे अनेक प्रकार आहेत कांहीं शंखाना काटे [illegible]

असून तिचें डोकें व पाय वगैरे भाग बाहेर असतात. डोक्यावर दोन शिंगें असून त्याच्या शेवटीं डोळे असतात. हीं शिंगें आत बाहेर करता येतात. या प्राण्याच्या जिभेवर कांटे असून तोंड डोक्याच्या खालच्या अंगास असतें. तेथें उजव्या बाजूस एक भोंक असतें. त्यातून गोगलगाईस हवा मिळते. भोंकाच्या आत एक पिशवी असते तें फुप्फुस होय. ह्यात रक्तवाहिन्या आलेल्या असतात. पाण्यात असताना हवा घेण्यास वर येऊन व नंतर तोंडाजवळील भोंक बंद करून गोगलगाई पुनः पाण्यांत जातात जमिनीवरील गोगलगाईस चार शिंगें असतात व त्यातील दोहोंवर डोळे व दोहोंवर घ्राणेंद्रियें असतात. ह्या पावसाळ्यात बाहेर पडतात उन्हाळ्यात कवचात शिरून आपलें तोंड बंद करून घेऊन त्या थंड जागीं पडून राहतात ह्याच्या शरीराचा एखादा भाग कापून काढला तर तो पुनः फुटतो. हा प्राणी उभयलिंगी आहे म्हणजे दोन्ही जननेंद्रियें एकाच असतात. जमिनीवरील गोगलगाय पावसाळ्यात अंडीं घालते. अंड्याची रचना शंखासारखी असून त्यावर एक पारदर्शक कवच असत व त्यातून आतील रुधिराभिसरण पाहता येतें बिनशिंगांच्या गोगलगाईस पिचळी किंवा स्लग म्हणतात हिला कवच अगर घर असतें. परंतु तें प्रथमावस्थेंत असून पुढें गळून जातें हिचीं अंडीं झाडाच्या कुंड्यात सापडतात.

पा ण गो ग ल गा य अ थ वा सु वे —(खाण्याजोगे समुद्रात सापडणारे जंतू ) हा प्राणी भूमध्यसमुद्राचा किनारा, पूर्वेकडील द्वीपसमूह ( ईस्टर्न आर्चिपेलेगो ), आस्ट्रेलिआ, मॉरिशस, सिलोन, झांझिबार, इत्यादि ठिकाणीं सापडतो. ब्रह्मदेशात वगैरे हे सुवे धरून व वाळवून चीन देशात पाठवितात. ओहोटीच्यावेळीं हे चिखलावर पडलेले असताना त्याना धरतात आणि कढईंत टाकून ती कढई तापवितात. कढई तापूं लागल्यावर सुवे ( ट्रिपांग )उष्णता सहन न होऊन आपलीं पचनेंद्रियें बाहेर काढून प्राण सोडतात व त्याच्या त्वचावरणाच्या पिशव्या मात्र राहतात. या पिशव्या त्यातील पाण्याचा अंश निघून गेल्यावर कांहीं वेळानें सुरकुततात. नंतर वीस मिनिटानीं किंवा अर्धा तासानें तापविण्याचें काम बंद होतें. आणखी एक वेळ या प्रमाणेंच कृति केल्यावर सुवे पाठविण्यालायक होतात.

व्या पा र.—चीन आणि जपान देशातील चैनी लोक ट्रिपांग फार हौसेनें खातात. याचा चांगला रस्साहि बनतो. [ वॅट. क. प्रॉ ]

गोगुंडा—राजपुताना. उदेपूर संस्थानांतर्लें गोगुंडा जजीन दारीचें मुख्य ठिकाण अरवली पर्वतात २७५७ फूट उंचीवर व उदेपूरपासून १६ मैलावर हें वसलें आहे. वस्ती (१९११) ४७९७. यात खेडीं ९६ आहेत व वसूल सालीना २४००० रु. आहे. पैकीं २००० उदेपूर दरबाराला खंडणी म्हणून दिले जातात. येथील राजा देव्वाडच्या घराण्यातला व झाला रजपुतांपैकीं आहे.

गोग्रा—(घोग्रा,) शरयू व देव्हा हीहि हिचींच नांवें होत ही नदी तिबेटात उगम पावून कर्नाली या नांवानें नेपाळमधून वहाते सीशापाणी येथून ही डोंगर फोडून गिरवा नाव पावते व कर्नाली म्हणून हिचा एक भाग तेथूनच वहातो व गिरवा कर्नालींचा संगम पुन्हा लवकरच होतो सुहेली,दहावार,शरयू वगैरे नद्या हिला मिळतात व ब्रह्मघाटापासून हिला गोग्रा व शरयू हीं दोन नांवें सामान्यतः दिलीं जातात शरयूवरून सर्वरिआ ( शरयूपारिआचा अपभ्रंश ) म्हणजे शरयूच्या तीरचे म्हणून एक ब्राह्मणाची जात झाली आहे पुढें गोंदा व फैजाबाद याच्या सरहद्दीवरून व अयोध्येपासून बस्ती, गोरखपूर, फैजाबाद, आझमगड, बलीया याच्या ही हद्दीवरून वहाते आझमगड येथें छोटी शरयू म्हणून हिचा एक फाटा फुटतो तो पन्याच अंतरावर वाहून पुढें गंगेला मिळतो. व शेवटीं शरयू अथवा गोग्रा ही उत्तर अक्षांश २५ ° ४४'व पूर्व रे. ८४ ° ८२' यावर गंगेला जाऊन मिळते. या नदीमध्यें कौरिआला ( कर्नाली ) व गिरवा यातून वर इंग्रजी हद्दी पर्यंतच होड्या चालू शकतात. नॉर्थवेस्टर्न रेल्वे सुरू होईपर्यंत गोग्रावरचा व्यापार मोठा असे. ब्रह्मघाट, फैजाबाद, अयोध्या, तांडा, बन्हज, गोग्र, व रेवलगंज हीं व्यापाराचीं लहानमोठीं ठिकाणें आहेतः पैकीं शेवटचीं दोन महत्वाचीं आहेत पाटणापासून अयोध्येपर्यंत उतारूंच्या व मालाच्या बोटींची येजा चालते. ब्रह्मघाटाजवळ ३६९५ फूट लांबीचा, एक व तुर्तीपार येथें ( ३९१२ फूट लांबीचा ) दुसरा असे रेल्वेपूल आहेत. पहिल्या जागीं समुद्रसपाटीपासून उंची ३५० फूट व दुसऱ्या जागी १९११ फूट आहे वेग दर सेकंदास दोन्ही ठिकाणीं अनुक्रमें ८७७ हजार व १११९ हजार घनफुटाचा आहे. अयोध्या येथें पावसाळ्यांत होड्याचा पूल असतो.

गोघा—मुंबई. अहमदाबाद जिल्ह्यांतील एक शहर हें खंबायत आखाताच्या किनाऱ्यावर वसलें आहे. लो सं. ( १९०१ ) ४७९८. शहरापासून पाऊण मैलावर एक उत्कृष्ट ओरवा (नागरवाडा)आहे. वलभी राजापासून हें बंदर प्रसिद्ध आहे.

इतिहासः—सौराष्ट्राच्या समुद्रकिनाऱ्यावर सांपडणाऱ्या गोघला नावाच्या शिंपल्यावरून या शहराचें नांव पडलेलें आहे. मुझफर शहानें गुजराथचें राज्य स्थापिल्या नंतर गोघला हें गुजराथच्या राज्यातील एक बंदर झालें. पुढें तें गोहेल घराण्याच्या ताब्यात गेलें. नंतर तें पेशव्याच्या ताब्यात गेलें व अखेरीस ब्रिटिशाच्या ताब्यात आलें व हल्लीं तें त्याच्याच ताब्यात आहे सुरत बंदराची वाढ झाल्यापासून खंबायतच्या बंदराचें महत्व कमी झालें व अलीकडे गोघाचा व्यापार बसून गेला आहे. उत्तरदक्षिणभागीं खाऱ्या दलदली असून पूर्वपश्चिमभागीं उतार शेतजमीन लांबवर पसरली आहे. पिण्याचें पाणी बरेंच लांबून आणावें लागतें. म्यु क. १८५५ मध्यें स्थापन झाली. दर्यावरचा

व्यापार ( १९०३–४ ) १८०००० इतका झाला त्यापैकी १,०६,००० ची आयात व ८१०००ची निर्यात होती मधमज्ज कोर्ट, दवाखाने, शाळा वगैरे येथे आहेत

**गोचीड**—हा प्राणी गुरें व कुत्रे यांच्या अंगावर सापडतो उवा, चोपिडी, माकडाची गोचीड आणि पक्ष्याची गोचीड हे वस्तुतः निरनिराळ्या वर्गातील प्राणी होत या सर्वांमध्ये कांहीं गोष्टी सारख्या आहेत. अंड्यांपासून त्वरित उत्पत्ति, रूपांतराचा अभाव, आकार एकसारखा अलद वाढत जाणें व कातडीचे थर वाढत जाणें या क्रिया सर्वांसच होतात. विविध प्राण्यांवर ज्या गोचिडी होतात ते खरोखर निरनिराळ्या जातींचे प्राणी असतात.

**गोझो**—हें भूमध्यसमुद्रांतील बेट असून तें माल्टाच्या खालोखाल आहे. माल्टापासून हे बेट ३ ने मैल असून त्याचा आकार लांबट आहे. त्याचें क्षेत्रफळ सुमारें २५ चौ मै. आहे गोझो बेटांतील मुख्य शहर व्हिक्टोरिया असून त्याची लोकसंख्या इ. स. १९०१ सालीं ५०५७ होती. ह्या बेटाची परिस्थिति माल्टा बेटाप्रमाणेंच आहेत १९०७ सालीं गोझो बेटाची लोकसंख्या २१९११ होती.

**गोंड**—मध्यप्रदेश व मध्यहिंदुस्थान यांत असलेल्या एका पट्ट्याला गोंडवण नांव आहे. येथ वस्तीस असलेल्या लोकांना गोंड हें नांव पडलें आहे. यांना गोंड हें व कसें मिळालें तें समजत नाहीं. गोंड हे गोंड मधील लोक असतांना व गोंडाचा अपभ्रंश गोंड झाला असावा. गोंड स्वतः आपणाला गोंड न म्हणवितां कोइतूर म्हणवितात. गोंड हा शब्द शालिवाहन शकाच्या ४ थ्या किंवा ५ व्या शतकांतील शिलालेखांत दिसून येतो.

१९११ च्या खानेसुमारींत यांची संख्या ३ लाखांपर्यंत गेली. पैकीं सुमारें दोन लाख तेहेतीस हजार गोंड मध्यप्रांतात होते. द्राविड जातीपैकीं गोंड ही प्रसिद्ध व ऐतिहासीक महत्त्वाची शाखा आहे. कारण या शाखेनें पुष्कळ काळपर्यंत विशेषतः १२ ते १७ या शतकांत बहुतेक मध्यप्रांत आपल्या ताब्यांत ठेवला होता. त्यांचा अंमल शांततेचा व भरभराटीचा झाला त्यावेळीं माडलाचा वसूल १० लाखावर होत असे १५६४ मध्यें येथें अक्बरास अगणित लूट मिळाली. चांदाचें राज्यहि त्यावेळीं अतिशय भरभराटींत असून तेथे शिल्पशास्त्रहि अगदीं उत्कृष्ट स्थितीला पोंचलें होतें.

आठराव्या शतकांत यांना उतरती कळा लागली व नवीनच उदयास आलेल्या मराठी सत्तेच्या विस्तारांत गोंड सत्ता अंतर्धान पावली यानंतर गोंड लोक फारच निकृष्ट स्थितीस पोंचले व त्यांच्या स्वातंत्र्यांतील मर्दुमकीचें रानटी शौर्यांत रूपांतर झालें. पुढें इंग्रजी अंमलाखालीं तर त्यांचा शौर्यमद पूर्णपणें नाहींसा होऊन ते अगदीं भित्रे व गोगलगाईपेक्षा निरुपद्रवी प्राणी बनले.

गोंड लोकांच्या संख्याबाहुल्यामुळें व विस्तारामुळें त्यांच्यांत जाती उपजातीहि पुष्कळच पडल्या आहेत व त्यांत प्रायशः गोंड नाहींत अशा लोकांचाहि भरणा झालेला आहे. उच्च दर्जाच्या गोंड लोकांचा या खालच्या लोकांशीं रोटीबेटी व्यवहार होत नाहीं. या लोकांत कांहीं धंद्यामुळेंहि जाती पडल्या आहेत. उच्च वर्गांत मुख्य दोन वर्ग आहेत, व राजगोंड हे वरिष्ठ व सत्ताधारी आणि धुरगोंड हे प्रजाजन अथवा सामान्य लोक होत

राजगोंड हे जमीनदार गोंडांचे वंशज आहेत. यांना हिंदु म्हटलें जातें. ब्राह्मण यांच्या हातचें पाणी घेतात व क्वचित् रजपुतांबरोबर त्यांचा शरीरसंबंधहि घडल्याचीं उदाहरणें आहेत ब्राह्मणाप्रमाणें हे जानवें घालतात व यांची सोंवळ्याची कल्पनाहि विचित्र आहे स्वयंपाकाकरितां हे सर्पणहि धुवून घेतात चारपांच वर्षांनीं यांना ' बूरा ' देवाच्या दर्शनाला जावें लागतें व तेथ मांसभक्षणाची नक्कल करावी लागते. म्हणजे कपड्यांत मांस गुंडाळून ते तोंडापर्यंत नेतात. हा विधि न केल्यास भूतबाधा होईल असें ते मानतात उत्तरेकडे खटोळा गोंड म्हणून वरच्या दर्जाचे धंदेस लोक आहेत. ते पूर्वीच्या बुंदेलखंडी ' खतोला ' राज्यांतले असावेत

**ल ग्न री ती**—गोंडाच्या प्रत्येक पोटजातींत निरनिराळीं गोत्रें आहेत व प्रत्येक गोत्रास एक निराळें नांव असतें, तें त्या गोत्रांतील सर्व माणसास सारखेंच लागू असतें निरनिराळ्या गोत्रांत निरनिराळ्या देवाच्या पूजा करितात ( १ ) चार देवांची पूजा करणारे, ( २ ) पांच देवांची पूजा करणारे (३) सहा देवांची पूजा करणारे व ( ४ ) सात देवांची पूजा करणारे अशीं ह्या गोंडांचीं गोत्रें आहेत. ज्यांचें गोत्र एक, अशा स्त्रीपुरुषांचा एकमेकांशीं विवाह होत नाहीं त्यांच्यांत राक्षसविवाहपद्धति अद्यापि अस्तित्वांत आहे एखाद्या पुरुषास लग्न करावें अशी इच्छा झाल्यास तो शेजारच्या खेड्यांत बायको करण्याजोगी कोणती मुलगी आहे, ह्याविषयीं माहिती मिळवितो. नंतर जेथें ती आपल्या सोबतिणींबरोबर काम करीत असेल, तेथें तो आपल्या मित्रास बरोबर घेऊन जातो. ती मुलगी आपल्या मंडळींत मिळून आपल्या गांवांत पळून जावयाच्या पूर्वी जर हा तिच्या हातास स्पर्श करूं शकेल, तरच त्याचे मित्र त्याच्या मदतीस जातात. एखाद्या वेळेस त्या मुलीच्या सोबतिणींबरोबर त्याची व त्याच्या मित्राची मारामारीहि होते व ती कित्येक वेळीं वराच्या हस्तस्पर्शानंतरहि होते तथापि, एकदा हस्तस्पर्श झाला आणि मग जरी त्या बायकांच्या मदतीस त्यांच्या गांवांतले पुरुष आले तरी त्यांचें कांहीं एक चालत नाहीं मग त्या स्त्रीपुरुषांचा विवाह झालाच पाहिजे अशी यांच्यांत चाल आहे

**रा ह णी व आ चा र**—गोंडाची राहणी साधी आहे. नवराबायको एके ठिकाणीच मजुरीनें काम करतात. ज्या ठिकाणीं चांगली ओळख झाली आहे अशा ठिकाणीं नवराबायको मजुरीनें निरनिराळ्या जागीं काम करतात. पण ज्या ठिकाणीं ओळख नाहीं अशाच्या घरीं अगर शेतीत काम करण्याचा प्रसंग आला तर तीं कधींहि एकेकटे राहून

पुष्कळ मजुरी मिळाली तरी काम करीत नाहींत थोडी मजुरी घेऊन दोघे मिळून एके जागींच काम करतात. पण यांत आळशी घरेच सापडतात. जर घरात एक दिवसापुरतें खाण्यास असलें तर ते कामावर जात नाहींत. आतांशा काहींना कळूं लागल्यानें शिळक ठेवण्याची प्रगति थोडी थोडी दिसूं लागली आहे. यांचे सर्व आचार अलीकडे हिंदु-लोकांप्रमाणेंच झाले आहेत व होत आहेत. हे लोक रानडुक्कर खातात, म्हणून त्यांचा इतर हिंदु, मराठे, व कुणबी वगैरे लोकांबरोबर रोटीव्यवहार व बेटीव्यवहार होऊं शकत नाहीं. यांची मुख्य देवता देवी आहे.

स ण —ह्यांच्यात शिमग्याच्या सणाचें महत्व फार आहे. दरसाल शिमगा फाल्गुन पौर्णिमेस येतो त्या दिवशीं सण न करता अगोदर गावचा पाटील अगर एखादा मुख्य इसम सर्व गावकरी लोकांना एकत्र जमवितो आणि सर्वांना विचारतो कीं, शिमग्याचा सण केव्हां करावयाचा? कोणच्याहि अडचणी नाहींत असा एक दिवस सर्वांच्या विचारानें ठरवितात त्या दिवशीं तो शिमग्याचा सण सर्वजण मिळून करतात. मात्र गावातील कोणीहि इसम त्या दिवशीं गैरहजर राहिला तर त्यास जातीचा दंड द्यावा लागतो. म्हणून कोणीहि परगावीं गेला असला तर त्या दिवशीं तो हरतऱ्हेनें परत येतो सर्व गाव एक होऊन आनंद करतात. हा सण चैत्रमासापलीकडे सुद्धा लावतो प्रत्येक निराळ्या गावच्या सोयी पाहून ह्या सणाचा दिवस ठरवितात. तो दिवस सर्वजण दारू पिऊन घालवितात. स्त्रिया फेर धरून रात्रीं, दिवसा गाणीं म्हणतात. मलखांब रोवून त्यास एरंडेल तेल लावितात. मग त्या मलखांबाभोंवतीं स्त्रिया फेर धरून गाणीं म्हणतात गावातील प्रमुख वृद्ध लोक एके ठिकाणीं बसून तरुण मुलासाठीं शर्यती लावितात. जो कोणी बायकांच्या फेऱ्यांतून मलखांबावर खांबाच्या टोंकापर्यंत जाईल त्याला वर ठेवलेले दोन, तीन, चार, पाच रुपायांचें इनाम घेण्याचा अधिकार असतो बायकांच्या हातीं हिरवे फोक असतात, ते मलखांबावर चढणाऱ्या इसमावर सपासप मारतात. त्यांच्या सपाट्यांतून जो बक्षीस मिळवितो त्याचे सर्वजण धन्यवाद गातात.

गोंड वन्यधर्मीय आहेत. वाघाचीहि ते पूजा करतात. देवीच्या रोगाकरितां मातादेवी, दांताकरितां दंतेश्वरी यांच्या सारख्या देवतांची उपासना होते. दुल्हादेव ही सामान्य गृहदेवता होय. काहीं सुधारलेले गोंड शिवकालीचीहि भक्ति करतात व बुढादेव हा शिवस्वरूप आहे असें समजतात. गोंड गारगोटयाच्या रूपात पूर्वजाची पूजा करतात.

गोंड लोकातला अंत्यविधीहि चमत्कारिक आहे. दक्षिणेकडे पाय करून ते प्रेतें पुरतात. राजगोंड व सर्व वृद्ध यास जाळतात. पूर्वी मृताला घरातच पुरीत असत. ही वहिवाट आतां बंद पडली आहे. पाचव्या दिवशीं नदीच्या काठीं जाऊन लोक मृताच्या आत्म्याला हाक मारतात व एखादा जिवंत मासा पकडून नेऊन तो खातात अशाकरितां कीं, त्याच्या बरोबर आलेला आत्मा आमच्याच घरांत पुन्हां जन्माला यावा. गोंड लोक हे सामान्यतः शेतकीवर रहातात बहुतेक शेतकामावर नोकर अथवा मजूर असतात. कांहीं पोलिस व चपराशी आहेत. मोहपाणी येथील कोळशाच्या खाणींतले मजूर गोंडच आहेत. हे लोक काम चांगलें करतात, पण अल्पसंतुष्ट व आळशी असून दूरदर्शी मुळींच नाहींत त्यांचा बांधा खुजट, कृष्णवर्णाचा पण बांधेसूद असतो दिसण्यात हे मोठेसे चांगले नसून चाटोळ्या डोळ्यांचे व जाड ओठांचे असतात. केस काळे व राठ असून दाढीमिशा कमी असतात. मध्यप्रांतातील काहीं लोक अर्धवट हिंदी बोलतात. बाकीचे मूळ द्राविड भाषा बोलतात. तिला गोंडी म्हणतात. तामिळ व तेलगु यांचीच ही बहीण आहे पण त्यांच्यात तेलगूशीं तिचा संबंध थोडा जवळचा दिसतो बाकी साम्य विशेष नाहीं

गों डी भा षा—गोंडी भाषा म्हणजे " गोंड " किंवा " कोयतोर " लोक जी बोलतात ती होय. हल्लीं ज्या प्रदेशात गोंड लोकांची वस्ती आहे त्या प्रदेशास नकाशात " गोंडवन " हें नाव दिलें आहे.

जरी गोंडी भाषा ही तामीळ, तेलगी वगैरे चांगल्या सुधारलेल्या व प्रौढ दशेप्रत पावलेल्या दक्षिण हिंदुस्थानातील अस्सल भाषांचीच सख्खी बहीण असावी असें दिसतें तरी ती हल्लीं अगदीं रानटी स्थितींत आहे. तिला 'लिपि' हा शब्द मुळींच ठाऊक नाहीं गोंडीची कानडी व तेलगी भाषेशीं तुलना पुढें दिली आहे:—

| गोंडी | तेलगी | कानडी | मराठी |
|---|---|---|---|
| आद | आदा | अवळू | ती |
| अव | आवरू | अवरू | त्या |
| कडक | कंडळो | कण्णु | डोळा |
| कवी | कवळू | किवी | कान |
| कई | चेई | कै | हात |
| काल | काळू | काल | पाय |
| आका | आकळू | येले | पान |
| कलतन | ... | कळतन | चोरी |
| गोहक | गोधमळू | गोधि | गहूं |
| तंमू | तमो | तम्म | भाऊ |
| तोल | डोलू | तोगलु | कातडें |
| रंड | रोंडु | येरडु | दोन |
| पद | पदी | हत्तु | दहा |
| इंगा | ... | इगलु | आतां |

या शब्दसाम्यावरून गोंडी, तेलगी व कानडी या भाषांचें परस्पर सादृश्य बरेंच आहे असें दिसतें कोणत्याहि भाषेंतील सर्वनामें व अंक हीं दोन जर बरीच सदृश दिसतात तर त्या भाषांचा परस्पर निकट संबंध असून त्यांतील

जंगली स्थितींत राहिलेली त्या सर्व सुधारलेल्या व पक्क झालेल्या भाषाचें मूळ असावी असें अनुमान साहजिक ओघास येतें. यावरून गोंडी भाषेपासून तेलंगी व कानडी निघाल्या असाव्यात

गोंडी भाषेंत गणितविद्येचें माहात्म्य फारसें नाहीं. पाच-पावेतों गोंडी अंकलिपी तेलंगी व कानडी यांच्या अंकलिपीशीं बरीच चांगली मिळते; पुढें दहा पावेतों सरासरीनें मिळते व अकरा बारा यांचा मेळ मुळीच बसत नाहीं शंभराच्या तेलंगांशीं बराच मिलाफ आहे.ह्या जो गणितविद्येचा अगदीं अभाव याचें कारण उघड आहे. हे लोक अगदीं जंगली व रानटी तेव्हां यांस संख्येची व मिळवणीची गरज काय पडणार? पुढें प्रसंग आलाच तर मराठी अथवा हिंदी या भाषेंत काम चालून निर्वाह होत असे. तेव्हां अर्थात् गोंडी भाषा या प्रमाणें गणितालिपींत पाठीमागें पडली.

कोणत्याहि भाषेंत गायनकला अगदीं नाहीं असें होत नाहीं. तेव्हां गोंडी भाषेंत वेडींवाकडीं तरी कांहीं गीतें असावीं असें साहजिक अनुमान होतें व हें अनुमान खरेंहि आहे. शोधाअंतीं गोंडी भाषेंतील गीतें फारशीं वर्णनीय, डुनदार, अनेक अलंकारादिकांनीं युक्त अशीं नाहींत असें समजतें. पण सर्व गीतांत यमक व प्रास याचा थोडाबहुत भरणा नाहीं असें क्वचित् होतें.

गोंड लोकांत प्रधान म्हणून एक भेद आहे. हे गोंड लोक आपल्याला मोठे ज्यांना म्हणतात त्यांच्या पदरीं असतात. राजपुतान्यांत जशी भाट लोकांची कीर्ति आहे, तशीच गोंडवनांत या प्रधान लोकांची आहे. यांच्या गीतांचे कांहीं मासले पुढील प्रमाणें:—

अडकांतं अडका कोशाता अडका.
(मडक्यांतलें मडकें मडींत मडकें.)
नाडीमन्नी मडमी आता नाक जावा दाते
(परवां लग्न झालें मला पेज वाढ )

भावार्थः—अत्यंत कृष्णवर्ण असून जिचें लग्न नुकतेंच मोठ्या कष्टानें झालें ती आता मोठा नखरा करून माझ्या भोजनादिकांकडे लक्ष देत नाहीं म्हणून मी तीस लावून बोलत आहे व भोजन मागत आहे.

काडीना कड पिडता काडी थाडी वाता.
(आंधळीचा डोळा फुटला ओंधळी का आली )
डेडानूर मादांतून काडी दबके किता.
(दीडशें पंक्तीचा आंधळीनें विचका केला.)

भावार्थः—जिचा डोळा फुटला असली एक विरूप आंधळी दीडशें मनुष्यांच्या पंक्तींत आल्यामुळें तिनें सर्व पंक्तीस अगदीं विरस करून टाकिलें.

झिमुट झिमुट पिर वायता दोड्डा उसा वायता.
(झिम पाऊस येतो नदीला पूर येतो )
तरा साया झिणका थोट डपता लाता.
(आण वहिनी गावी लहान मासे पळूं लागले )

भावार्थः—बारीक बारीक पाऊस पडत आहे, नदीला पूर येत आहे, तर वहिनी गावी लौकर आणून दे. मासळ्या पळून जाऊं लागल्या आहेत.

चैक मैक मैनाधार बगाई योड्ड अगाधार.
(चक्क पक्क नवरेवाज भवानपह्यापुढें धावतात.)
विहुना आता पेडगी ड्गाडा चटरी पेकिता.
(अशा हल्लीं मुली आताच्या छिचोर पोरी.)

भावार्थ—चक पक व्हावें, नखरा करावा, भवानपह्या पुरुषापुढें धावून जावें, अशीं लक्षणं हल्लींच्या मुलींचीं झालीं आहेत. आताशा पोरी फार छिचोर झाल्या आहेत.

[ वि. विस्तार पु ८, व ४३. कूक,वस्टेन, रसेल व हिरालाल. बोस—छत्तिसगड ( जे ए एस् बी. ५९ ). विनॉय—सेन्सस रिपोर्ट, बेरार, झेंट—गॅझेटीयर ऑफ सेंट्रल प्राव्हिन्सेस, ग्रीयर्सन—लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया. ]

**गोंड-उमरी जमीनदारी.**—जिल्हा भंडारा. साकोली तहशिलीच्या मध्यभागीं ही जमीनदारी असून तिचें क्षेत्रफळ २८ चौरस मैल आहे. त्यापैकीं अर्धा भाग जंगल आहे. मांडल्याचा गोंड राजा निजामशहा (इ स १७५१) याच्या वेळेपासून ही जमीनदारी अस्तित्वांत आहे असें म्हणतात जमीनदार कनोजा ब्राह्मण आहेत. यांचा मूळ पुरुष शंकर. हा पहिला रघोजी याच्या वेळेस हयात असून त्यास ही इस्टेट दिल्याबद्दलची इ. स १७७५ सालांतील एक सनद पूर्वी यांच्या संग्रहीं होती या जमीनदारींत एकंदर १० खेडीं असून लोकसंख्या ( सन १९०१ ) ३१५० आहे. जयनारायण नावाचा हल्लीं तेथें जमीनदार आहे. उत्पन्न ५००० रुपये. टाकोळी २१०० रुपये.

**गोंड-गोवारी**—ही मराठी जिल्ह्यांतील गुरें राखणारी जात गोंड व गोवारी यांच्या मिश्रणानें बनली आहे. हे लोक जास्त अपवित्र समजले जाऊन गोंड व गोवारी या दोहोंच्याहि खालीं गेले आहेत.१९०१ सालीं यांची संख्या २००० होती व १९११ सालीं यांचा गोवाऱ्यांत समावेश केला. रानांत फिरणाऱ्या गोंड व गोवारी तरुण-तरुणींचा स्नेह जमून जी स्वैर संतति झाली तीच ही जात आहे. यांच्यात उपजाती नाहींत कुलांचीं नांवें गोंडापासून घेतलेलीं आहेत. गोंडा-प्रमाणें यांची उपासनापद्धति आहे. लग्नाचा विधि गोंड व मराठी विधींच्या मिश्रणांचा आहे विधवाविवाह दिव्यासभोंवतीं माडेतीन प्रदक्षिणा घालून होतो यांची वैवाहिक नीति फारच नीच प्रकारची आहे अन्यंतच नीच जातीच्या पुरुषा-बरोबरच व्यभिचार केला तर गोष्ट निराळी,नाहींतर बायकोचे सर्व व्यभिचार नवरा क्षमा करतो. कुणबी वगैरे बाईरांस हे जातींत घेतात. गोंडाप्रमाणें यांच्याहि बायका नितंबा-पर्यंत गोंदतात, कारण न गोंदविलेल्या स्त्रियांस देवपूजा परता येत नाहीं.

**गोडबोले, कृष्णशास्त्री** ( १८३१–१८८६ )—एक महाराष्ट्रीय ग्रंथकार व ज्योतिर्षी. याचा जन्म वाई येथें झाला. विद्याभ्यास पुणें येथें मराठी शाळेंत नंतर संस्कृत पाठशाळेंत व पूना कॉलेजांत झाला. लहानपणापासून त्यांना गणिताचा नाद असे.पाठशाळेंत त्यांनीं ज्योतिषाचें अध्ययन केलें. पुढें १८५५ सालीं नार्मल शाळेंत ते शिक्षक झाले १८६४–६५ सालीं मुंबईच्या कुलाबा वेधशाळेंत त्याची नेमणूक झाली. सन १८८६ सालीं ते मरण पावले. सिंधप्रांतांत असतांना सिंधी भाषेचें चांगलें ज्ञान त्यांनीं संपादन केलें होतें. फारसी भाषाहि त्यांना अवगत होती. ते सिंधी भाषेचे परीक्षक १८७१ ते ७९ पावेतों होते. सन १८७८ मध्यें त्यांनीं व वामन कृष्ण जोशी गद्रे यांनीं मिळून प्रहलाघवाचें मराठी भाषांतर करून छापलें हटनच्या बीजगणिताचें मराठी भाषांतर सन १८५४ त छापलें. सन १८७४ त त्यांनीं व गोविंद विठ्ठल करकरे यांनीं मिळून युक्लिडच्याभूमितीच्या पहिल्या ४ पुस्तकाचें भाषांतर केलें. सन १८८२ त 'वेदांचें प्राचीनत्व' या विषयावर कृष्णशास्त्री यांनीं इंग्रजी निबंध लिहून तो छापून काढला. १८६९ त त्यांनीं सिंधी भाषेंत अंकगणिताचें पुस्तक केलें, व १८६७ त मराठी भाषेचें एक चांगलें व्याकरण केलें. लघुचिंतामणीचें त्यांचें मराठी भाषांतर सोदाहरण आहे [ दिक्षितकृत भारतीय ज्योतिःशास्त्र ]

**गोडबोले, परशुरामतात्या** (शके १७२१–१७९६)—एक महाराष्ट्रीय कवि आणि ग्रंथकार. गोडबोले ह्यांचें मूळ गाव रत्नागिरी जिल्ह्यांतील पावस गोळप होय. बळवंतराव (पणजे), परशुरामपंत (आजे,) नारायणराव (वडील) व परशुरामतात्या (चरित्रनायक), अशी त्यांची वंशावळ आहे. परशुरामतात्यांचा जन्म वाई येथें शके १७२१ मध्यें झाला. त्यांनीं लहानपणचा विद्याभ्यासहि तेथेंच केला त्यांचें मोडी अक्षर फार सुरेख होतें व त्यांना जमाखर्चाची माहिती उत्तम होती. त्यांना दाजीबा नावाचें वडील बंधु होते व त्यास मोरोपंतादि महाराष्ट्र कवींचीं काव्यें वाचण्याचा नाद असे. त्याच्या सहवासानें तात्यास मराठी काव्यें वाचण्याची गोडी लागली. विद्याभ्यास पुरा झाल्यानंतर प्रपंचाच्या निर्वाहार्थ ते पुण्यास जोगाच्या पेढीवर कारकून राहिले कारकुनीपेशातहि तात्यास काव्यें वाचण्याचा फारच नाद असे व सवड काढून ते मराठी काव्याचा भाषाशास्त्रदृष्ट्या अभ्यास करीत त्यावरून मराठी भाषेच्या मार्मिकपणाविषयीं त्यांचा चांगला लौकिक होऊन त्यावेळीं बोर्ड ऑफ 'एज्युकेशन' ह्या मंडळीनें मराठी भाषेचा कोश तयार करण्याकरतां जी विद्वान मंडळी नेमली त्यांत तात्यांची योजना झाली. मेजर कँडी आणि तात्या यांचा प्रथम परिचय याच वेळीं झाला. इ. स. १८५५ सालीं जेव्हां कँडींची मराठी ट्रान्सलेटरच्या जागीं नेमणूक झाली तेव्हां त्यानें आपल्या खास पंडिताच्या जागीं परशुरामतात्यांची नेमणूक करून घेतली. ह्या जागेवर तात्या अखेरपर्यंत होते

नोकरी संभाळून मिळणारा वेळ ते ग्रंथलेखनाच्या कामीं लावीत तात्यांनीं मूळ संस्कृतावरून शाकुंतल, वेणीसंहार, उत्तररामचरित्र मृच्छकटिक, नागानन्द आणि पार्वतीपरिणय हीं नाटकें लिहिलीं. नवनीत भाग पहिला आणि दुसरा हीं त्यांचीं पुस्तकें तर सर्वप्रसिद्धच आहेत. "सर्वसंग्रह" चालविण्यास माधव चंद्रोबाना तात्यांची पुष्कळच मदत झाली. दादोबाची 'यशोदा पांडुरंगी' सामान्य लोकास समजण्यास फार जड जाऊं लागली, म्हणून तात्यांनीं "केकादर्श" नावाचें पुस्तक लिहिलें शिवाय रावबहादूर शंकर पांडुरंग पंडितांनीं सरकारच्या आश्रयानें इंदुप्रकाश छापखान्यांतून जी 'तुकारामाची गाथा' प्रथम छापून प्रसिद्ध केली, त्या कामींहि त्यांना परशुरामतात्यांची बरीच मदत झाली. त्याशिवाय मराठ्यांच्या इतिहासावर सोप्या कविता, नामार्थदीपिका, बालबोधामृत, कादंबरीसार, वृत्तदर्पण, पाठावली इत्यादि पुस्तकें त्यांनीं लिहून मराठी भाषेची उत्तमप्रकारें सेवा केली आहे. तात्यांनीं संस्कृत नाटकाचा परिचय मराठी वाचकास प्रथम करून दिला. 'वेणीसंहार' हें मराठींतील पहिलें नाटक होय. हें इ. स १८५७ मध्यें त्यांनीं प्रथम भाषांतरित केलें. त्यानंतर इ स १८८१ पर्यंत त्याच्या तीन आवृत्त्या निघाल्या व आजपावेतों सुमारें २५।३० वर्षें तें बाजारांत अप्राप्य झालें होतें. ही अडचण साहित्य प्र. मंडळानें लक्षांत आणून आता वेणीसंहाराची चौथी आवृत्ति प्रसिद्ध केली आहे. वेणीसंहारानंतर इ. स. १८५९ मध्यें उत्तर रामचरित्र व इ. स. १८६१ मध्यें. शाकुंतल हीं नाटकें त्यांनीं लिहिलीं तथापि त्यांना वेणीसंहाराची सर आली नाहीं.

अखेर शके १७९६ (स. १८७४ ) मध्यें तात्या आपल्या वयाच्या ७५ व्या वर्षीं परलोकवासी झाले. इंग्रजी अमदानींत जे मराठी भाषासेवक म्हणून थोडे लोक प्रसिद्धीस आले, त्यांपैकीं परशुरामपंत हे एक होत. यांचे एक चिरंजीव रामचंद्र परशुराम गोडबोले हे शाळाखात्यांत इन्स्पेक्टरच्या हुद्यापर्यंत चढले होते. हेच पहिले हिंदी इन्स्पेक्टर होत

**गोंडल संस्थान**—मुंबई,काठेवाड पोलिटिकल एजन्सीमधील एक हिंदी संस्थान. या संस्थानचें क्षेत्रफळ १०२४ चौरस मैल असून एकंदर लोकसंख्या (१९२१) १६७०७१ आहे.

उत्पन्नाचीं साधनें व कालवे —१९२१ सालीं २,००,००० एकरापेक्षांहि जास्त एकर जमीन लागवडींत होती व पडीक जमीन त्या सालीं १४१८१० एकर होती. ४२४०१ एकर जमीन जंगलानें व्यापलेली असून तींपैकी, ३०९ एकर जमीन १९२१ सालीं लागवडींत आणिली. गोंडल व धोराजी या दोन विभागाकरितां पानेलीमोटी व गोंडल या ठिकाणीं दोन मोठीं तळीं कालव्यानें पाणी नेण्याकरितां बांधण्यांत आलीं व त्यास ,२४८१५९ रुपये खर्च आला कालव्यामुळें

होन मितक्या आधिक जमिनीस पाण्याचा पुरवठा जाईल तितका उत्पन्नाहि अधिक वाढ होते असें दिसून आलें आहे. पूर्वी ६५२६ विहिरी होत्या; परंतु १९२१ सालीं विहिरींची संख्या ६५७० इतकी झाली विहिरी खणण्याकरितां शेतकऱ्यांनां सवलतीनें कर्ज देण्यांत येतें.

उद्योगधंदे:—धोराजी व गोंडल या ठिकाणीं कापसाचें व लोकरीचें कापड तयार करण्याचे हातमाग आहेत. लाकडी व हस्तिदंती फण्या, लाकडी खेळाचें सामान, तांबेपितळेची भांडीं करण्याचें काम व सोन्याचें नक्षीकाम वगैरे अनेक उद्योगधंदे या संस्थानात चालू आहेत.तसेंच १२३ कापसाचे, ६१ लोकरीचे व दोन रेशमाचे असे हातमाग आणि ८ सरकी काढण्याचे कारखाने व तीन कापसाचे गढ्ढे दाबण्याचे कारखाने १९२१ सालीं या संस्थानात होते. अडकित्ते, चाकू व वस्तरे तयार करण्याचा एक खासगी कारखाना गोंडलमध्यें असून अपलेटा या ठिकाणीं कातडें कमावण्याचाहि एक कारखाना आहे.

आयात व निर्गतः—इ.स.१९२०—२१सालीं२५४५०४४ रुपयाच्या मालाची निर्गत झाली व २४२५५६९ रुपयाच्या मालाची आयात झाली.

आरोग्यरक्षणः—इ. स. १९२१ सालीं गोंडल, धोराजी व अपलेटा या तीन ठिकाणीं दवाखाने होते व भायावादर आणि सारसाइ येथेंहि दोन रुग्णालयें होतीं. याच्या शिवाय धोराजी येथें दोन तीन खासगी संस्थाहि होत्या. त्याच सालीं आजाऱ्याची संख्या २६२९६ इतकी असून १०७ रोग्यांना दवाखान्यातच राहण्याची सोय करण्यात आली होती. देवी काढण्याचा प्रसार जास्त झालेला असून १९२०—२१ मध्यें देवी-डॉक्टरानीं १७४ खेड्यामध्यें काम केलें. निराश्रितांकरिता एक फिरता दवाखाना व एक रुग्णालय गोंडलच्या ठाकूर साहेबानीं प्रथम काठेवाडात काढलें आहे. गोंडल, धोराजी, अपलेटा व भायावादर येथें म्युनिसिपालिटया असून नगर सुधारण्याचें कामहि सुरु आहे. गोंडलशहरात विजेच्या दिव्याची सोय करण्यात आली आहे. १९२४ सालच्या महापुरामुळें गोंडल शहराचा बराच भाग पाण्यात बुडाला होता परंतु पाणी कमी होताच विजेचे दिवे पूर्ववत सुरू झाले. म्युनिसिपालिटीचे उत्पन्न असें काहींच नाहीं. सर्व खर्च संस्थानाकडूनच चालतो. या संस्थानात दोन तुरुंग आहेत व पोलिसांची एकंदर संख्या १९२१ सालीं ११४८ इतकी होती.

लोकस्थितिः—इ.स. १९११, १९१५, १९१८ व १९२० सालच्या अवर्षणामुळें संस्थानात दुष्काळ पडला होता, त्यावेळीं पगार वाढविण्यात आले व भायाद, मूळगिरासी व जिवैदार याना कर्ज देण्यात आले. महायुद्धाच्या वेळीं मजुराची स्थिति बरी होती. गुरांना मोफत चारा मिळावा म्हणून संस्थानाकडून त्यावेळीं व्यवस्था करण्यात आली. महर्गतेमुळें नोकर लोकांना बढती देण्यात आली काठेवाडातील कोणत्याहि संस्थानापेक्षा या संस्थानांतील कारकुनाचे पगार दुप्पट किंवा तिप्पट आहेत असें आटळून येतें. महायुद्धामुळें उत्पन्न झालेल्या महर्गतेच्या योगानें पुष्कळ पांढरपेशा वर्गातील लोकानीं व अनुदार कुटुंबानी मुंबई, कराची, कलकत्ता व रंगून या ठिकाणीं देशांतर केलें; तथापि १९२० सालापेक्षा सालीं१९२१ सालीं शेकडा तीन या प्रमाणांत लोकसंख्येची वाढ झाली.

दळणवळण आणि पोस्टाची व्यवस्था —येथील संस्थानिकाच्या उदार धोरणामुळें उत्तम रस्ते, उत्कृष्ट इमारती व भक्कम पूल या संस्थानात चोहोंकडे दृष्टीस पडतात. एकंदर २३ पोस्ट ऑफिसें व ९ तार ऑफिसें असून गोंडल येथें एक बंगलाहि आहे. गोंडल रेल्वे ही संस्थानच्या मालकीची असून खिजाडियवासी व जेतासर-राजकोट रेल्वेचा कारभार संस्थानच्याच मार्फत चालतो. शिवाय जेतासर-राजकोट रेल्वेमध्यें संस्थानाचा तीनअष्टमांश हिस्सा आहे. मुखत्यारी मिळाल्यापासून लोकोपयोगी कार्याकरिता १८१०००००, रुपये व रेल्वेकरिता ८१४२२०० रुपये, संस्थानिकानीं खर्च केले आहेत.

संस्थानचें उत्पन्नः—१९२०—२१ सालीं शेतसाऱ्याचें उत्पन्न सुमारें २०,००,००० रुपये व खंडणीचे उत्पन्न १०७२१ रुपये इतकें झालें.सध्याच्या संस्थानिकानीं आपल्या कारकीर्दीत सुमारें ४० कर बंद केले आहेत. जकातहि रद्द केली आहे

शिक्षणः—१९२१ सालीं या संस्थानात १५० शाळा होत्या व त्यात १४६४८ विद्यार्थी शिकत होते व या कामीं खर्च १६३६४७ रुपये झाला. काठेवाडात स्त्रीशिक्षणाच्या कामीं गोंडल संस्थाननें आघाडी मारली आहे. १९२१ सालीं मोंघिबा गर्ल्स् हायस्कूलात ३४७ विद्यार्थिनी होत्या १९१४ पासून ५ विद्यार्थिनी मॅट्रिकची परिक्षा पास झाल्या. इंग्रजी तिसऱ्या इयत्तेच्या पुढें शिकणाऱ्या मुलींना स्कॉलरशिप्स देण्यात येतात व मॅट्रिकची परिक्षा पास होणाऱ्या प्रत्येक विद्यार्थिनीस ठाकूरसाहेब ५०० रुपयाचें बक्षिस देतात १९१७ सालापासून सक्तीच्या प्राथमिक शिक्षणास सुरवात करण्यात आली व १९२१ सालीं शाळेत शिकणाऱ्या मुलींची संख्या ४१८५ इतकी होती.

संस्थानिक.—गोंडलचे अधिपति जाडेजा वंशातले आहेत. याचा मूळपुरुष कुंभोजी होय. ऐने-इ-अकबरींत गोंडल हे सुरत सरकारातले वाघेलाचें वतन म्हणून लिहिलें आहे. १८०७ मध्यें याचा इंग्रज सरकारशीं तहनामा होऊन संबंध जडला. या घराण्याला दत्तकाच्या अधिकाराची सनद आहे. सध्याचे संस्थानिक भगवंतसिंगजी हे एडिंबरो विश्वविद्यालयाचे पदवीधर आहेत. यानां११ तोफांच्या सलामीचा मान आहे.

शहर — हीं गोंडल संस्थानची राजधानी.
पश्चिम तीरावर वसलीं आहे. लो सं ( १९१
येथून राजकोट, जुनागड, माणिकवाडा वगैरे

रस्ते जातात; शिवाय रामकोट–जेतलपूर रेल्वे शाखेचें हें एक स्टेशन आहे. शहराला तटबंदी आहे. दोन सरकारी बगीचे, गिराशिआ कॉलेज, दवाखाना आणि अनाथगृह हीं येथें आहेत. इतर माहिती वर संस्थानांत आलीच आहे.

**गोंडा, जिल्हा.**–संयुक्तप्रांत. फैजाबाद विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ २८१३ चौरस मैल. उत्तरेला हिमालयाचा खालचा भाग, पूर्वेला 'बस्ती,' दक्षिणेला गोग्रा, पश्चिमेला बहरेच. जिल्हा बहुतेक सपाट असून झाडी बरीच आहे आणि लोकवस्ती लहान लहान खेड्यांतून आहे. गोग्रा आणि राप्ती या मुख्य नद्या आहेत. उत्तरेकडे व मध्यभागीं संरक्षित जंगल आहे. कुवाना नदीच्या काठचा बराच मोठा प्रदेश खाजगी मालकीच्या जंगलाखालीं आहे. या सर्व जंगलांत साल, असाणा व खैर हीं झाडें असून आंबा, मोह, शिसवी, वड, पिंपळ वगैरे झाडेंहि आहेत. पर्वताच्या पायथ्याजवळच्या प्रदेशांतील हवा रोगट आहे आणि ताप तर सर्व जिल्ह्याभर नेहमीं असतो. पावसाचें मान सरासरी ४४ इंच आहे. पूर्वी हा जिल्हा अयोध्येच्या सूर्यवंशीय राजाच्या ताब्यांत कोसल साम्राज्याचा भाग म्हणून होता. लवाची राजधानी सरस्वती म्हणून जें शहर होतें तेंच हल्लींचें सेतमहेत होय असें कांहीं लेखक म्हणतात; कांहीं अवशेषांवरून बौद्ध धर्माच्या वैभवकालीं हा सर्व भाग वसलेला असावा असें दिसतें. पण ५ व्या आणि ७ व्या शतकाच्या दरम्यान चिनी प्रवाशांना हा भाग जंगलमय दिसला होता.

मुसुलमानी काळामध्यें येथें रजपूत घराण्याचें वैभव एकसारखें आंदोलन पावत होतें. मुसुलमानी सुभेदार बहरेच हा येथें रहात असे. त्याची सत्ता त्याच्या किल्ल्याबाहेर क्वचितच चाले. रजपुतांचा उदय १४ व्या शतकापासून झाला. १५ व्या शतकामध्यें कल्हण घराणें प्रमुख होतें. जनवार आणि बिसेन या घराण्यांनीं पुढें आपली सत्ता वाढविली. सादतखानाकडे अयोध्याप्रांत आला तेव्हां गोग्राच्या उत्तरेकडील राजे बहुतेक स्वतंत्रच होते. गोंडाच्या राजानें बहरेचा पहिला सुभा याचा वध केला पण पुढें त्याला मुसुलमानी सत्ता कबूल करून खंडणी द्यावी लागली व १८ व्या शतकाच्या अखेरीला बिसेन घराण्याची सत्ता नाहींशी होऊन मुसुलमानांनां वसूल घेतां येऊं लागला. १८ व्या व १९ व्या शतकांत कारभाराच्या अंदाधुंदीमुळें गोंडाचें पुष्कळच नुकसान झालें व कित्येक मोठाले तालुके सावकार आणि अधिकारी यांनीं आपल्या हाताखालीं घातले. १८५६ मध्यें हा जिल्हा खालसा करण्यांत आला. १८५७ च्या दंगलींत गोंडाचा राजा अयोध्येच्या बेगमला मिळाला होता. पुढें गोंडाच्या राजाचा लापती येथें पराभव झाला व तो आणि तुळसीपुरची राणी यांनीं शरण येण्याचें नाकारल्यामुळें त्यांचीं संस्थानें खालसा करून बलरामपूर व अयोध्या येथील संस्थानिकास बहाल केलीं.

सेतमेहत हें जुनें शहर पुराणवस्तुसंशोधनास्तव उकरून काढण्यांत आलें. वंशदीला, पालटीपूर, रयाकेथान आणि ? व इतर ठिकाणीं जुने अवशेष बरेच आढळतात. देवीपाटण, आणि छपिया येथें हिंदूंचीं मुख्य देवळें आहेत.

या जिल्ह्यांत ८ शहरें व २७९४ खेडीं आहेत. वस्ती (१९११) १४७३०९८ आहे. याचे ३ तालुके पाडण्यांत आले आहेत. येथील भाषा औधी ( हिंदीची एक शाखा ) आहे. शेकडा ६४ लोक शेतीवर व शेकडा ९ सामान्य मजुरीवर रहातात.

कंकर नांवाचा दगड येथें फार सांपडतो व त्याचा उपयोग सडका तयार करण्याकरितां व चुना बनविण्याकरितां होतो. कापसाचा हलका कपडा कित्येक ठिकाणीं तयार होतो. उत्रौला येथें नकशीचें कुंभारकाम होतें. निर्गत व्यापार फक्त शेतीच्या उत्पन्नाचाच आहे. तांदूळ, वाटाणे, मका वगैरे शेतांतील धान्यें व लाकूड आणि सरपण हें जंगलचें सामान बाहेर पाठविलें जातात. कपडा, मीठ, धातू, साखर यांची आयात होते. नवाबगंज, कर्नलगंज, उत्रौला व तुळसीपूर हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत. याचा नेपाळशींहि थोडाबहुत व्यापार होतो पण रस्त्याच्या अभावामुळें त्याची वाढ होत नाहीं. बंगाल नॉर्थवेस्टर्न रेल्वेचा मुख्य रस्ता जिल्ह्याच्या दक्षिणभागांतून गेला आहे.

ता लु का.—संयुक्त प्रांत गोंडा जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ ६१९ चौ. मै. लो. सं. (१९११) २९९२५८. यांत गोंडा हें शहर व ७५४ खेडीं आहेत. गोंडा हें तालुका व जिल्हा यांचें मुख्य ठिकाण आहे. हा तालुका सुपीक जमीनीच्या मध्यभागाच्या उंचवट्यावर वसला आहे. सारा व करांचें उत्पन्न (१९०३-४) ५४१ हजार रुपये. बिसुहि ही मध्यभागांतून व तराइ ही दक्षिण भागांतून अशा दोन नद्या वाहतात. वहिंदीखालील ४२२ चौ. मै. जमीनीपैकीं १८७ मैल पाण्याखालीं होती.

श ह र.—संयुक्त प्रांत. गोंडा जिल्हा व तालुका यांचें मुख्य ठिकाण. बंगाल नॉर्थवेस्टर्न रेल्वेचें हें मोठें जंक्शन आहे व येथून बरेच रेल्वेचे फाटे फुटतात. गोंडा हें नांव 'गोठाण' या शब्दापासून आलें असावें व हें शहर अकबराच्या वेळीं मानसिंग नांवाच्या रजपुतानें वसवलें असें म्हणतात. हें दिसण्यांत विशेष चांगलें नाहीं पण दोन तलाव आहेत त्यांनीं जरा शोभतें. १८६९ पासून येथें म्यु. कमिटि आहे. शेतीच्या उत्पन्नाचा बराच व्यापार चालतो पण इतर कारागिरीच्या व कारखान्यांतल्या मालाचा व्यापार होत नाहीं. येथें सरकारी कोर्टें, दवाखाने, लायब्ररी शाळा वगैरे इमारती इतर स्थलाप्रमाणें आहेत.

**गोंडार**—अबिसीनिया देशांतील एक शहर. पूर्वी हें अम्हारिक राज्याच्या राजधानीचें शहर होतें. लोखंडासारख्या काळ्या व वाटोळ्या आकाराच्या दगडांनीं बनलेल्या खडकाच्या एका कड्यावर हें वसलें आहे. या कड्यातून अँग्रेब व काहा या दोन नद्या निघून शहराच्या खालीं एकमेकींस मिळतात. नागिस सायसेनियस यानें

गोंडार हें १६ व्या शतकाच्या सुरुवातीस आपल्या राज्याच्या राजधानीचें शहर बनविलें. त्यावेळीं हें एक लहानसें खेडें होतें. पुढील बादशहांनीं येथें प्रासाद व दुर्ग बांधले. इ. स. १७१६ च्या सुमारास गोंडार वैभवाच्या शिखरास पोंचलें. तेथून पुढें त्याच्या उतरत्या काळास सुरवात झाली. १८८७ सालीं महदीच्या लोकांनीं हें शहर लुटून अग्नीच्या भक्ष्यस्थानीं दिलें. १७७० मध्यें १०००० लोकवस्ती होती ती १९०५ सालीं ७००० वर उतरली. रहिवाशांत मुसुलमान लोक प्रमुख होत. कापूस, सोन्याचांदीची भांडीं, तांब्याचीं भांडीं, उत्तम खोगीर व जोडे इत्यादि वस्तू येथें तयार करण्यांत येतात.

**गोत्र**—ही सध्यां भारतीयांतली चालू संस्था होय. सध्यां अशी समजूत आहे कीं, एका गोत्रातले लोक म्हणजे एका वंशातले लोक. गोत्राचा उच्चार धार्मिक विधींत ब्राह्मणाकडून व्यक्तिनिर्देश करतांना होतो, आणि सगोत्रीं विवाह आज रूढ नाहीं, कारण सगोत्री लग्न विहित नाहीं अशी समजूत आहे आणि सगोत्री लग्न करावयाचेंच झालें तर मुलीला दुसऱ्या कोणाच्या मांडीवर देऊन करण्यांत येतें. प्राचीन इतिहास पहातां एका गोत्रांतील सर्व मंडळी एकाच वंशांतली आहेत ही गोष्ट पूर्णपणें खरी नाहीं. तसेंच सगोत्रविवाह केव्हांच रूढ नव्हते हीहि गोष्ट खरी नाहीं. एवढेंच नव्हे तर गोत्रसंस्थाहि ब्राह्मणांत फारशी जुनी दिसत नाहीं. भारतीय ब्राह्मणांच्या गोत्रसंस्थेशीं प्रवरसंस्था संयुक्त झाली आणि प्रवराचे ऋषी हे गोत्रसंस्थापकांचेहि पूर्वज असावेत अशी समजूत होऊन लग्न करतांना गोत्राबरोबर प्रवरहि टाळूं लागले.

गोत्रसंस्थेचा इतिहास द्यावयाचा म्हणजे अनेक प्रकारचें विवेचन उत्पन्न होतें. एकतर (१) गोत्र, देवक वगैरे नावांनीं जे बहिर्विवाह–युक्त समुच्चय सर्व जगभर दृष्टीस पडतात त्यांची कारणमीमांसा करावयाची, आणि नंतर (२) गोत्र शब्दाच्या उपयोगाचा इतिहास देऊन ब्राह्मणी गोत्रप्रवरयुक्त जी परंपरा स्थापित झाली तिचा इतिहास द्यावयाचा.

गोत्रें स्थापित होणें ही आडनांवें स्थापन होण्याप्रमाणेंच स्वाभाविक क्रिया आहे. आणि 'अपत्यं पौत्रप्रभृति गोत्रं' असा पाणिनीनें जो नियम दिला आहे तो कुलनामनिर्देशाच्या स्पष्टीकरणास योग्य आहे. कुलांना नांवें कशीं पडलीं येवढें स्पष्ट करावयाचें असेल तर पाणिनीचा हा नियम तें स्पष्ट करील. तथापि आपणास स्पष्ट करावयाची गोष्ट आडनावस्वरूपी गोत्रें कशीं पडलीं एवढीच नसून बहिर्विवाहात्मक संस्था उत्पन्न कशी झाली आणि तिचा गोत्राशीं संबंध कसा जडला आणि गोत्राचा प्रवराशीं संबंध कसा जोडला गेला इत्यादि प्रश्न आपणास विचारणीय आहेत.

**बहिर्विवाहाची मीमांसा**—बालहत्येच्या प्रघातावरून गोत्रांतरविवाहाची चाल अस्तित्वांत आली असें मॅक्लेननचें मत आहे. या प्रघातामुळें स्त्रिया दुर्मिळ होऊं लागल्या, व ज्ञातीपुरती बहुभर्तृत्वाची चाल रूढ झाली. व ज्ञातिबाह्य स्त्रिया धरून आणण्याचीहि चाल पडली. रानटी लोकांत, लहान मुलींना ठार मारण्याची चाल आहे. व त्याचीं कारणेंहि उघड आहेत. समाज–घटनेच्या प्राथमिक अवस्थेंत असणाऱ्या मानवांत स्त्रीजातीच्या नैसर्गिक कमकुवतपणामुळें, 'मुली म्हणजे आपल्या मार्गांतील कांटेच होत,' अशी समजूत होती. त्यांना पोसावें लागे, आणि शिकार करून क्षुधा शमविण्याच्या कामीं त्यांचा उपयोग होत नसे. मुली असल्या कीं, शेजाऱ्यास मोहहि उत्पन्न होत असे. हें मॅकलेननचें स्पष्टीकरण पटत नाहीं, कारण तो म्हणतो तितक्या जास्त प्रमाणांत बालहत्या रूढ होती हें सिद्ध झालेलें नाहीं. बलात्कारानें धरून आणलेल्या स्त्रीलाच ज्या प्राथमिक समाजपद्धतींत पत्नीत्व प्राप्त होत असे त्याच सामाजिक पद्धतींत गोत्रांतरविवाहाच्या चालीचा उद्भव झाला असावा हीच गोष्ट जास्त संभवनीय दिसते. मानवी समाजाच्या प्रथमावस्थेंत मुलाचें फक्त आईशींच नातें असे, व एखाद्या जातींतील स्त्रीवर्ग समाईक मिळकत अथवा धन म्हणून मानला जात असे. पुरुषास कोणत्याहि स्त्रीला पूर्णपणें बळकाविता येत नसे, किंवा तिच्यावर स्वामित्वहि त्याला गाजविता येत नसे. परंतु अन्य जातींच्या स्त्रियासंबंधीं मात्र निराळी गोष्ट होती. जो पुरुष अन्य जातींतील स्त्री बलात्कारानें पकडून आणील त्याला त्या स्त्रीवर स्वामित्व गाजविता येत असे व त्याचा हक्कहि अबाधित राहत असे. बालहत्या, स्त्रीवर ताबा असावा म्हणून पुरुषास होणारी नैसर्गिक इच्छा, आणि कुटुंब करून रहावें असा एक प्रकारचा नैसर्गिक कल, अशा अनेक कारणांमुळें गोत्रांतरविवाह जास्त रूढ होऊं लागले व स्वज्ञातींत विवाह कमी होऊं लागले. अगदीं थोडक्या पिढींमध्यें, निसर्गसहज स्फुरणाचें रूढी अथवा कायदा यामध्यें रूपांतर होतें, व नंतर त्यांचा अतिक्रम करणें पाप मानलें जातें तसें झालें. वाढत्या सुधारणेबरोबर व ज्ञातींच्या दळणवळणामुळें, बलात्काराची आवश्यकता नष्ट होऊं लागली आणि राक्षसविवाह हा स्त्रीपुरुषाच्या वैयक्तिक व कायमच्या संबंधाचा एक द्योतक होऊन बसला, अशीहि एक मीमांसा करण्यांत आली आहे. ऑस्ट्रेलियांतील लोकांत एकाच आडनावाच्या दोन कुटुंबांत विवाह होत नाहींत. पूर्व आफ्रिकेंतहि वरील चाल असल्याचें समजतें. हिंदुस्थानांतील खासीया, वरालीं, ओराओन व इतर अनेक वन्य जातींतहि गोत्रांतरविवाहच रूढ आहे. कालमक, सरकॅसिअन, सैबेरियांतील याकुत व अमेरिकेंतील इंडियन यांच्यामध्यें गोत्रांतरविवाह चालू आहे. ब्रिटिश कोलंबियांतील सिमशियन इंडियन लोकांत देवमासा, बेडूक, गरुड व लांडगा इत्यादि देवकें आहेत व त्यांच्यांत सदेवकविवाह होत नाहींत.

आतां भारतीय गोत्रसंस्थेकडे वळूं. गोत्र हा शब्द ऋग्वेदामध्यें इन्द्राच्या पराक्रमाच्या वर्णनांत अनेक वेळां येतो. या शब्दाचा अर्थ रॉथ "गोठा" असा करतो तर गेल्डनेर गाईंचा

कल्प असा करतो. मॅकडोनेलच्या मतें वरील दुसऱ्या अर्थावरून पुढें या शब्दास उत्तरकालीन वाङ्मयांत जो कुटुंब किंवा गोत असा अर्थ आला आहे त्याची उपपत्ति लावणें सोपें होतें. छांदोग्य उपनिषदांत [ ४. ४, १ ]कुटुंब या अर्थी गोत्र हा शब्द आलेला आहे.

गोत्र ही संस्था प्राचीन काळीं काय असावी हें निश्चयानें सांगता येत नाहीं. गो म्हणजे भूमि आणि त्र म्हणजे संरक्षक; यावरून गोत्र म्हणजे भूमिसंरक्षक वर्ग असा गोत्र या शब्दाचा अर्थ करून गोत्र हा शासनविषयक विभाग असावा अशीहि कल्पना व्यक्त झाली आहे; आणि दुसऱ्याच्या गोत्रांतील मुलगी पळविणें हें मर्दाचें काम, यामुळें गोत्राबाहेर लग्न करण्याची रीति उत्पन्न झाली असावी, असें गोत्राबाहेर लग्न लावण्याचें स्पष्टीकरण करण्यात आलें आहे. वैदिक लोकांबद्दल हें स्पष्टीकरण लागू पडत नाहीं या प्रकारच्या स्पष्टीकरणाच्या ग्रहणास अडचण येते ती ही कीं, गोत्र आणि विवाह या संस्थांचा संबंध वैदिकांत प्राचीनकाळीं नव्हता. हा संबंध केव्हां उत्पन्न झाला आणि कोणत्या प्रयोजनामुळें झाला हा बऱ्याच उत्तरकालीन इतिहासाचा प्रश्न आहे. सूतसंस्कृतींत गो म्हणजे जमीन आणि त्र म्हणजे संरक्षक असा अर्थ असणें शक्य आहे; आणि त्यामुळें गोत्र ही एक राजकीय संस्था असावी हेंहि शक्य आहे. परंतु ती तशी होतीच हेंहि आज निश्चयानें सांगता येत नाहीं.

'दुसऱ्याच्या टोळींतील मुलगी चोरून आणावयाची आणि स्वतःच्या टोळींतील मुलगी करणें म्हणजे नामर्दपणा होय' या तऱ्हेच्या कल्पनेचा मात्रसंस्कृतीच्या लोकांतील बहिर्विवाह स्पष्ट करण्यास उपयोग होत नाहीं; कां कीं, मनुष्यसंघ म्हणून गोत्र शब्द वेदांत नाहीं तर सगोत्रविवाह दूषणीय आहेत असा आधार कसा सांपडणार. बौधायनासारख्या जुन्या स्मृतींतहि त्यास आडकाठी नाहीं, आणि वसिष्ठाच्या धर्मसूत्रांत देखील सगोत्रविवाह करण्यास जरी आडकाठी घातली आहे, तरी बापाच्या बाजूनें पांच पिढ्या सोडून लग्न करावें असें सांगितलें आहे. गोत्रमर्यादा जर जुनी असती तर बापाच्याकडील पांच पिढ्या टाकाव्या या नियमाचें प्रयोजनच नव्हतें. ज्या कांहीं स्मृतींमधून सगोत्र किंवा सप्रवर विवाहांचा निषेध केला असतो त्याबरोबरच बापाकडच्या सात पिढ्या टाकाव्या व आईकडच्या पांच पिढ्या टाकाव्या असाहि उल्लेख करण्यांत येतो. गोत्रसंस्था जर प्राचीन नव्हे तर आपणापुढें प्रश्न एवढाच उरतो कीं, ही समाजांत शिरली असेल तरी केव्हां? आणि वर धर्मशास्त्रकारांनीं दिलेले दोन नियम भिन्नकाळीं उपस्थित होऊन पुढें ते दोन्ही एकत्र मांडले गेले असें तर नसेलना? सात पिढ्यांपर्यंत अगोदरच नातेवाईकांचा हिशेब ज्यास माहीत आहे अशा व्यक्ती विरळया. पांच पिढ्या आईकडच्या टाकाव्या हा नियम तर बऱ्याच जातींनीं धाब्यावर बसविला आहे. दाक्षिणेकडे ेक जातींमध्यें मामाची मुलगी तर लग्नांत अधिक पसंत केली जाते. बापाकडून सात पिढ्या टाकाव्या हा नियम घेतला तर तो अनवश्यक ठरतो; कारण गोत्राबाहेर जर लग्न करावयाचें तर सात तर काय पण त्यामुळें शेंकडों पिढ्या वगळल्या जातात. वसिष्ठासारख्या जुन्या स्मृतिकारानीं हे दोन्ही नियम एकसमयावच्छेदेंकरून मांडले असूनहि त्यांत दिसून येणारी परस्परविरुद्धता ओळखून मनुस्मृतीनें फक्त गोत्राचाच नियम ठेविला आहे व बापाकडील सात पिढ्यांचा वगळला आहे. मनुस्मृतीचा "असपिंडाच या मातुः, असपिंडाच या पितुः" हा पाठ घेतला तर सपिंडाबाहेरचे सगोत्री विवाह्य ठरतील. विवाहविषयक नियम देणारे धर्मसूत्रकारांच्या पूर्वीचे ग्रंथकार म्हणजे गृह्यसूत्रकार हे होत. बऱ्याचशा गृह्यसूत्रकारांनीं तर गोत्राचा मुळींच आग्रह धरिला नाहीं. असेंहि शक्य आहे कीं ज्यावेळेस "गोत्र" याचा अर्थ गोठा असा मात्रसंस्कृतीच्या लोकांत होता त्यावेळेस "भूरक्षकवर्ग" हा अर्थ सूतसंस्कृतीच्या लोकांत असावा. आणि सूतसंस्कृतीच्या लोकांत भूरक्षक वर्ग गोत्रांतरविवाही असेल.

मेनार्ट हा सगोत्रविवाहाची निषिद्धता व सवर्णविवाहाची प्रशस्तता मूळ गृहकालापर्यंत नेतो. परंतु असगोत्रविवाहाची चाल इण्डोयूरोपीय कालापासून अस्तित्वांत असावी असें समजण्यास साधन जें भारतीयांतील गोत्रप्राचीनता तेंच खरें दिसत नाहीं. शतपथ ब्राह्मणांत ( १. ८, ३. ६ ) दोन्ही बाजूंनीं तिसऱ्या किंवा चवथ्या पिढीच्या आंतच विवाह करणें संमत असल्याचा उल्लेख आहे. गोत्र ही संस्था फार प्राचीन नाहीं ही गोष्ट गोत्रें व श्रौतधर्म यांचा संबंध लक्षांत घेतला असतां दिसून येईल. असें मात्र शक्य आहे कीं, सूतसंस्कृतीच्या आर्यन् लोकांत गोत्रांचें म्हणजे बहिर्विवाहाचें देवकरूपानें अस्तित्व असेल. रोमन लोकांत 'जेन्' नांवाच्या समुच्चयाबाहेर लग्न करण्याची पद्धत होती. जरी इंडोयूरोपीय काळांत बहिर्विवाह होत असला तरी मधल्या मात्रसंस्कृतीच्या लोकांत तो तात्पुरता नष्ट झाला असला पाहिजे असें वाटतें. जेव्हां त्यांत गोत्रसंस्था निर्माण झाली तेव्हां त्याचा प्रवरांशीं संबंध जोडला गेला, आणि वेदविरुद्ध पण वैदिक परंपरेवर अशी समाजव्यवस्था प्रचलित झाली.

गोत्रांचें अस्तित्व पहाण्यासाठीं ऋग्वेद पाहून पाहिला तर त्यांत "गोत्र" या शब्दाचें "कुल" या अर्थानें अस्तित्व दिसत नाहीं आणि बहिर्विवाहनियमबद्ध समुच्चय तर मुळींच दिसत नाहींत. तर आपणास ऐतिहासिक प्रश्न उत्पन्न होतात ते पुढील प्रमाणें:— ( १ ) बहिर्विवाह ऱ्या समुच्चयांत नव्हते त्यांत उत्पन्न कसे झाले, (२) त्या समुच्चयास एक किंवा अनेक प्रवरांनीं युक्त अशी परंपरा कशी उत्पन्न झाली; ( ३ ) आणि त्या परंपरेस धार्मिक महत्त्व कोणत्या क्रमानें उत्पन्न झालें.

ब्राह्मणी गोत्रें म्हणून आज जीं प्रचलीत आहेत तीं ऋषींचीं नांवें आहेत. त्या नांवांपैकीं कांहीं नांवें इतकीं जुनीं आहेत कीं तीं वेदांतील मंत्रद्रष्टे म्हणून दृष्टीस पडतात व त्यांपैकीं कांहीं ऋग्मंत्रांतच आलीं आहेत तर कांहीं नांवें सर्वानुक्रमणीकारांनीं उल्लेखिलीं आहेत. या दोन्ही प्रकारचीं नांवें तिसऱ्या विभागांत ब्राह्मण्याच्या इतिहासांत दिलीं आहेत. अगस्त्य, अघमर्षण, अग्नि इत्यादि गोत्रनामें आहेत, मंत्रद्रष्टे आहेत व ऋग्मंत्रांत उल्लेखित आहेत, तर उपमन्यु देवल आणि मधुच्छंद हीं गोत्रनामें आहेत व त्यास सूक्तकर्तृत्व सर्वानुक्रमणीकारांनीं दिलें आहे पण त्याचा प्रत्यक्ष उल्लेख ऋग्मंत्रांत नाहीं. अत्यंत प्राचीन ऋषींचे वंशसंबंध सर्वानुक्रमणीकारांनीं दिले आहेत. त्यांपैकीं कांहींस मंत्रांत प्रत्यक्ष आधार आहे व कांहींस नाहीं. त्या वंशसंबंधाचें विवेचन पुढें ब्राह्मण्याच्या इतिहासांतच ( विभाग ३ ) दिलें आहे त्यावरून एवढें दिसतें कीं जीं सात प्रवरसंस्थापक ऋषींचीं कुलें झालीं व अनेक गोत्रें त्या प्रवरपरंपरेंत समाविष्ट करण्यांत आलीं त्यास एक कुलस्थापनपर आधार फार थोडा आहे पण अगदींच नाहीं असें नाहीं.

गोत्रें व श्रौत संस्था.—पशुयागांतर्गत वपायागापूर्वीं जे प्रयाज व्हावयाचे असतात त्यांत कोणतीं आप्रीसूक्तें म्हणावयाचीं, आणि कोणत्या देवतांना आहुती द्यावयाची हें यजमानाच्या गोत्रप्रवरांवरून ठरवावें इतकाच काय तो गोत्राचा आणि श्रौत धर्माचा संबंध आहे, आणि तो देखील वेदोक्त नसून सूत्रोक्त आहे. मंत्रकालीं गोत्रें नव्हतीं व गोत्रानुसार आप्रीसूक्त किंवा देवता यांचें भिन्नत्व स्थापित झालें नव्हतें. मंत्रद्रष्ट्या ऋषींच्या संबंधानें आपणास असें दिसतें कीं, प्रत्यक्ष ऋग्मंत्रांत कुलकल्पनेव्यतिरिक्त गोत्रकल्पनाच नसल्यामुळें अमुक ऋषी अमुक गोत्राचे हें सांपडणें शक्य नाहीं परंतु जे थोडेसे पितृविषयक उल्लेख सांपडतात त्यांचा उपयोग त्यास विशिष्ट गोत्रप्रवरांत बांधण्याकडे सर्वानुक्रमणीकारांनीं केला. ब्राह्मणग्रंथांत आप्रीसूक्तविषयक विवेचन करितांना प्रवरार्ह ऋषित्रयाची कल्पना आली आहे तथापि तेवढ्यावरून मंत्रवक्त्या ऋषींच्या ठायीं गोत्रकल्पना होती असें सिद्ध होणार नाहीं. ब्राह्मण ग्रंथांचा काल म्हणजे गृह्यसूत्रांचा काल आणि सूत्रांचा काल म्हणजे देश्यांच्या वर मान्त्रसंस्कृतीच्या संस्था लादण्याचा काल या कालांत देश्यांची विद्या स्वीकारणें किंवा आपली विद्या देश्यांस देणें या गोष्टी होते, अध्वर्यू व हे उद्गाते करीत होते. केवळ ते विद्याच घेत होते असें नाहीं तर ते देश्यांच्या चालीरीती देखील स्वीकारीत होते. जर देश्यांमध्यें गोत्रें असलीं तर त्या गोत्रांचा यज्ञसंस्थेशीं संबंध जोडण्याचें काम देखील अवश्य होतें. तर असें असणें स्पष्ट आहे कीं देश्यांमध्यें गोत्रें आहेत असें पाहून त्यांची गोत्रसंस्था मान्त्रसंस्कृतीच्या लोकांनीं घेतली असावी. त्या गोत्रांचा उपयोग काय करावयाचा याविषयीं मात्र त्यांचा निश्चय तात्कालिक झालेला दिसत नाहीं. ऋग्मंत्रांत जशी गोत्रकल्पना नाहीं तशी प्रवरकल्पनाहि नाहीं. तसेंच ज्या सत्रकल्पनेच्या आश्रयानें श्रौतसूत्रकारांनीं गोत्रप्रवरकल्पनेची मांडणी केली आहे त्या सत्राचाहि उल्लेख ऋग्मंत्रांत नाहीं. जे सत्रविषयक उल्लेख आलेले आहेत त्यांचा अर्थ अनेक व्यक्तींची एकत्र स्थिति यापलीकडे पोहोंचूं शकत नाहीं. ऋग्वेदांतच सत्रें नाहींत व यजुर्वेदाच्या अनेक शाखांतहि सत्रें नाहींत तर सत्रें होतीं तरी केव्हां? सत्रांच्या भरभराटीचा काल असा वैदिकवाङ्मय वाचल्यास कोणताच दिसत नाहीं. होत्राच्या ऋचांत सत्र शब्द ऐकूं येत नाहीं आणि ब्राह्मणांमध्यें जर सत्रें पुसटलेलीं दिसतात तर सत्रें वैदिक परंपरेंत मुळचीं नव्हतीं पण वेदबाह्य परंपरेंतून निघून वैदिकांनीं तीं मान्य केलीं असावीं असें म्हणण्यास काय हरकत आहे? म्हणजे देश्यांच्या उपासनापद्धतींत सत्रें असावींत आणि गोत्रेंहि त्यांच्या आश्रयानें धर्मविधींत प्रचलित असावींत आणि त्या दोहोंचाहि स्वीकार मान्त्र संस्कृतीच्या लोकांनीं केला असावा.

गोत्रांची उत्पत्ति मान्त्रांत कीं देश्य संस्कृतींत?—गोत्र म्हणजे ज्या समुच्चयांतील लोकांनीं आपआपसांत विवाहसंबंध करतां कामा नये असे पुत्र, अशी लोकांत आज कल्पना रूढ आहे. असले समुच्चय मान्त्रसंस्कृतीच्या लोकांत होते असें मनमधून तर मुळींच सिद्ध होत नाहीं आणि प्रवरहि मंत्रांत नाहींत तर ही गोत्रप्रवरात्मक सृष्टि आली कोठून? ही उत्तरकालीं त्याच संस्कृतींतून विकास पावली असेंहि म्हणतां यावयाचें नाहीं कां कीं मान्त्रसंस्कृतीच्या लोकांचें वाङ्मयरूपी साहित्य आपणाजवळ भरपूर आहे जर गोत्रसंस्था मान्त्रांत परकी नसती म्हणजे मान्त्रांच्या गोत्रविहीन समाजापासून गोत्रसंस्था तयार होत गेली असती तर या विकासाच्या मधल्या पायऱ्या दाखविणारे वाङ्मयरूपी किंवा शब्दरूपी उल्लेख आपणांस खास सांपडले असते. परंतु तसे उल्लेख आपणास आरण्यकान्त वाङ्मयांत कोठेंच सांपडत नाहींत. ज्या समुच्चयाबाहेर लग्न केलें पाहिजे असे समुच्चय काश्मीरपासून द्राविडपर्यंत अनेक जातींत सांपडतात, एवढेंच नव्हे तर रशियापासून आस्ट्रेलियापर्यंत देखील सांपडतात. कांहीं समुच्चयांत बहिर्विवाहाची सक्ति जास्त असते व कांहींत कमी असते एवढेंच. या तऱ्हेचा बहिर्विवाह समाजांत उत्पन्न झाला तो कां याविषयीं मानववंशशास्त्रज्ञांनीं बरींच कारणें पुढें मांडलीं आहेत त्यांतील एक कारण असें कीं समुच्चयासमुच्चयांतच लग्न करणें 'नामर्दपणाचें आहे, खरें मर्दाचें' काम म्हणजे शत्रूच्या गोटांतील मुलगी पळवून आणावयाची ही कल्पना समाजांत अत्यंत बाल्यावस्थेंत कदाचित खरीहि असेल, पण या कल्पनेच्या साहाय्यानें भारतीय ब्राह्मणांमध्यें बहिर्विवाह कां उत्पन्न व्हावा याचें स्पष्टीकरण होणार नाहीं कां कीं, परसमुच्चयांतून मुलगी पळवून आणण्याचें महत्त्व किंवा त्या क्रियेस अनुकूल परिस्थिति ही जो देश वसलेला आहे व ज्या देशांत राज्यसंस्था स्थापित

झाली आहे असा देशांत नसते आणि परसमुच्चयांतून मुलगी पळवून आणण्याचें महत्व हीनजातींत किंवा ओढाजातींत तयार झालेल्या भिक्षुकांत कोठून उत्पन्न होणार? अर्थात बहिर्विवाहाचीं स्वाभाविक कारणें उत्पन्न होऊन बहिर्विवाह मात्र संस्कृतांच्या लोकांत स्थापित झाला हें शक्य नाहीं जर स्वाभाविक कारणामुळें उत्पन्न झाला नसेल तर त्याच्या अस्तित्वाची उपपत्ति अनुकरणाशिवाय दुसरी कशांत सांपडणार? याचा थोडक्यांत अर्थ असा कीं ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांचें किंवा मांत्रांनीं देश्यांचें अनुकरण केलें पण तुम्ह्यावर माझी कडी पाहिजे असा प्रकार मात्र केल्याशिवाय ते राहिले नाहींत त्यांनीं लौकिक गोत्र व अध्यात्मिक गोत्र असा निराळा भेद उत्पन्न करून आपलीं गोत्रें ब्राह्मणेतरांवर लादलीं आणि पुष्कळ प्रसंगीं आपल्या शिष्यास ( उदाहरणार्थ रजपुतांस ) अशी शिकवण दिली कीं, लौकिक गोत्रांचें विवाहादि प्रसंगांत अध्यात्मिक गोत्रांपेक्षा महत्व कमी [ "देवक" पहा ]

प्रवराशीं गोत्राचा संबंध सूत्रकालीन होय सूत्रकारांनीं प्रवरऋषी हे त्या त्या गोत्रसंस्थापकापूर्वीचे पूर्वज बनविले आहेत पण त्या विधानास वेदांतप्रमाण नाहीं

वेदांत प्रवरासारखा उल्लेख कायतो एकच आहे. तो आर्षेयवरणविषयक होय (तै स २. ५, ८) म्हणजे अशी कल्पना होते कीं, श्रौती मंडळींचे आठ संप्रदाय स्थापन झाले आणि त्यावेळचे आचार्य किंवा विद्याभासी या आठापैकीं कोणत्याना कोणत्या संप्रदायांत समाविष्ट होत. वरण या शब्दाचा अर्थच निवड, स्वीकारणें असा आहे म्हणजे त्यावेळचा शालंकायन किंवा बौधायन हा अगस्त्य किंवा वसिष्ठ इत्यादि कोणत्या तरी ऋषीपासून जे संप्रदाय स्थापन झाले त्यापैकीं एकाचा स्वीकार करी. म्हणजे ते त्याचे प्रवर झाले.

गोत्रमंडळामुळें ज्या संप्रदायाचें अस्तित्व कळून येतें ते संप्रदाय म्हटले म्हणजे गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भारद्वाज, वसिष्ठ. जे ऋषी कोणत्याच मंडळांत किंवा संप्रदायांत नाहींत असे मंत्रद्रष्टे पहिल्या, आठव्या व दहाव्या मंडळांत घातले आहेत. प्रवरसंस्थापक ऋषी म्हटले म्हणजे कश्यप, अत्रि, भरद्वाज, विश्वामित्र, गोतम, जमदग्नि, वसिष्ठ व आठवा अगस्ति असे धरले जातात. अनेक ऋषींच्या नांवाचीं गोत्रें आहेत तीं सर्व वरील ऋषींच्या नांवावर स्थापन झालेल्या प्रवरांशीं जोडलीं जातात. या प्रवरसंस्थापकांमध्यें आंगिरसानें नांव दिलेलें नाहीं. आंगिरस हा तर अत्यंत प्राचीन काल्पनिक पुरुष अगर प्रत्यक्ष अग्नि होय असें शक्य आहे कीं जे ऋषी कोणत्याच पुरुषास आपला संप्रदायप्रवर्तक म्हणून मान्य करीत नसतील ते आंगिरसवरण करीत असावेत या अनेक संप्रदायांची सोडमिळवणी करून सर्वसामान्य श्रौतधर्म तयार करण्याची खटपट चालू असे त्या खटपटीचीं अंगें अनेक होतीं. एक अंग म्हटलें म्हणजे अनेक संप्रदायांतील विध्यंश घेऊन . . करणें, दुसरें अंग म्हटलें म्हणजे कर्मांमध्यें काहीं संप्रदायाचें वैशिष्ट्य रहावें म्हणून ऐच्छिक क्रिया ठेवणें. या दोन्ही क्रियाचें परिणाम यज्ञसंस्थेवर झाले आहेत.

काहीं संप्रदायामध्यें विशिष्ट कर्में रूढ होतीं. उदाहरणार्थ, अंगिरसामध्यें द्विरात्र, गर्गांत त्रिरात्र, अत्रींत चतुरात्र जमदग्नीमध्येंहि एक तऱ्हेचा चतुरात्र होताच. उद्दालक पुत्र कुसुरविंद याच्या नांवावर सप्तरात्र इत्यादि संस्था व्यक्तीच्या किंवा संप्रदायाच्या दिसतात सोमयागसंस्था पूर्ण होऊन यजुर्वेद व ब्राह्मणें तयार होण्यापूर्वीच्या या संस्था ज्या क्रियेनें सामान्य एक क्रतु झाला त्याच क्रियेनें या इतर संस्था झाल्या असाव्यात जेव्हां अनेक संप्रदायांचें एकीकरण झालें व अनेक गोत्रांमधून ज्याप्रमाणें होत्र तयार झालें त्याचप्रमाणें सामान्य यज्ञघटना बनवितांना प्रत्येक वरील संप्रदायापाशीं देवघेव करून यज्ञाची मांडणी सर्वमान्य करण्यांत आली असावी. अध्वर्युवर्गानें संस्थांचें एकीकरण केलें तर होत्यांनीं अनेक सूक्तवाग कुळांचें एकीकरण केलें. त्या क्रियेंत विशिष्ट ऋषींस प्राधान्य मिळालें आणि ते प्रवराचे ऋषी होण्यास मदत झाली.

गोत्रमंडळामुळें प्राधान्य पावलेल्या ऋषींचें संप्रदायाच्या इतिहासांत स्थान येणेंप्रमाणें दर्शवितां येईल. गोत्रमंडळांत दृष्ट होणारे संप्रदाय व तैत्तिरीय शाखेंत वर्णिलेले संस्थास्थापक हे समकालीन होत.या दोहोंचा उपयोग पुढील सत्रसंस्थाकारांनीं केला. प्रवराचे ऋषी आणि गोत्रमंडळाचे ऋषी यांत काहीं ऋषी एक दिसतात. प्रवराचा उल्लेख सत्रप्रकरणांत व सत्रांतील आप्री सर्वांच्या सारख्या असाव्यात या हेतूनें आला आहे. आप्री गोत्रावरून आखलेल्या आहेत. पण गोत्रें हजारों त्यांचा थोडक्या आप्रींसाठीं उल्लेखिलेल्या गोत्राशीं संबंध जोडण्यासाठीं कांहीं तरी योजना हवी होती म्हणून सर्व गोत्रांचा विशिष्ट आप्रींशीं संबंध जोडण्याकरितां प्रवरांची यादी तयार होणें अवश्य होतें. ऋग्वेदांतील अनेक ऋषी कांहीं विशिष्ट कुलांत घालण्याचा प्रयत्न झाला गोत्रांस प्रवरान्वयी बनवावें ही योजना भिक्षुकी स्वरूपाची आहे. म्हणजे भिक्षुकी कारणाकरितां काल्पनिक इतिहास तयार होण्याचा संभव येथें आहे म्हणजे वन्याचश लोकांस[1] गोत्रप्रवरासंबंधानें एका कुलांत दडपण्याची खटपट येथें दिसते. तथापि कांहीं मूळचीं परंपरा असल्याशिवाय आणि ती सर्वमान्य असल्याशिवाय सर्वांनांच त्यांत दडपतां येणार नाहीं यावरून असें असणें शक्य आहे कीं कांहीं आर्षेययुक्त गोत्रें व त्यामुळें कांहीं प्रवरसंबंध मूळचेच निश्चित झाले असावेत. प्रवर म्हणून जी आर्षेयपरंपरा प्रत्येक उपासक पाळगी ती श्रौतसंस्था प्रचारकांनीं व इतर समाजांतहि पसरविली असावी.

गोत्रांचा म्हणजे ऋषींच्या घराण्याचा विकास मंत्रकालांत व ब्राह्मणकालांत झाला असेल पण तोपर्यंत त्यास कांहीं संप्रदायवैशिष्ट्य नव्हतें. अमुक गोत्राचा अमुक वेद किंवा शाखा असें कांहीं नव्हतें, व ही गोष्ट 'गोत्र आणि वेदाध्याय'

विकतात, अशा रीतीनें निरनिराळ्या माणसांनीं निरनिराळ्या ठिकाणाहून आणलेला गोंद एकत्र केला जातो. व्यवस्थित रीतीनें गोंद गोळा करण्याची पद्धति कोठेंच अस्तित्वात नाहीं, व एकाच जातीच्या गोंदाचा विपुल साठा सतत पुरविता येईल इतकीं झाडेंहि कोठेंच नाहींत. यामुळें एकाच जातीचा निर्मळ गोंद मिळणें फार मुष्कील झालें आहे. दक्षिणेस तुतिकोरिन येथें अलीकडे गोंदाचा व्यापार सुरू झाला आहे.

हिंदुस्थानात गोंदाचा पुरवठा आफ्रिका, अरबस्थान वगैरे ठिकाणाहून जलमार्गानें होतो व त्याचप्रमाणें देशाच्या निरनिराळ्या भागातून गोंद येतो व येथून देशी व परदेशी गोंदाची निर्गत होते. हिंदुस्थानात उत्पन्न होणाऱ्या गोंदाची १९०६-०७ सालीं मुंबईहून ३५०४४ हंड्रेडवेट व सिंधमधून ५१ हंड्रवेट निर्गत झाली. मुंबईहून आयात मालापेक्षा पुनर्निर्गत अधिक असते.

गोंदाचे औद्योगिक उपयोगः—गोंद हा पाण्यात विरघळल्यानतर सरसाप्रमाणें चिकट होतो. यामुळें पुष्कळ कामाकडे त्याचा उपयोग होतो. कापडाच्या गिरण्यात कपडा व सूत यास खळ लागते त्या खळीच्या मिश्रणात गोंद घालतात. साखरेपासून तयार होणाऱ्या निरनिराळ्या प्रकारच्या मिठाईत गोंदाचें पाणी चिकटपणा देण्याकरिता घालतात. चिट छापण्याच्या कारखान्यात, रंगारी कामाकडे, चितार्‍यास लागणाऱ्या रंगाच्या मिश्रणात, पत्र पाठविण्याचीं पाकिटें व इतर कागद चिकटविण्याकडे वगैरे नाना प्रकारच्या औद्योगिक कामाकडे गोंदाचा उपयोग करतात. बहुतेक जातींचे गोंद गंधहिन,स्वादहीन,व स्वच्छ विनरंगाचे असतात. त्यापैकीं पुष्कळ जाती पाण्यात विरघळून त्यापासून चिकट द्रव उत्पन्न होतो. परंतु काहीं जातीचे गोंद न विरघळता लाह्याप्रमाणें फुलतात. पातळ गोंद बिघडूं नये म्हणून त्यात कार्बोलिक असिड वगैरे जंतुविनाशक पदार्थ सूक्ष्म प्रमाणात घालून तें गोंदाचें पाणी गाळून त्याच्या बाटल्या भरून बाहेर देशातून येथें येतात. व त्याचा खप फराच होतो. गोंदाचे ( डिंकाचे ) लाडू फार पौष्टिक असतात.

**गोंदणें**—शरीराच्या कातड्यावर निरनिराळ्या प्रकारचीं चित्रें, आकृत्या, अक्षरें किंवा शब्द सुईसारख्या तीक्ष्ण टोकाच्या हत्यारानें किंवा इतर साधनांनीं टोंचून घेणें व त्या आकृतीस कायमचें स्वरूप येण्याकरिता त्यात तांबडा किंवा काळा रंग भरणें यास गोंदणें असें म्हणतात. ही चाल फार प्राचीन काळापासून जगातील बहुतेक देशात प्रचलित आहे. आफ्रिकेतील किंवा आस्ट्रेलियातील असंस्कृत लोकात सर्व शरीरभर चित्रविचित्र आकृती गोंदून घेतात. व याप्रकारें ते आपलीं शरीरें भूषवितात. अगदीं जंगली जातीपासून तो आधुनिक सुधारणेच्या शिखरास पोंचलेल्या लोकापर्यंत या चालीचा प्रसार आहे. हिंदुस्थानात नागरेतर जातीच्या स्त्रियात गोंदण्याचा प्रघात फार आहे देवादिकाचीं नावें, आपलें स्वतःचें, नवऱ्याचें किंवा प्रेमातल्या माणसाचें नाव, तुळशीचें झाड वगैरे नाना प्रकारचीं चित्रें हातावर किंवा शरीराच्या निरनिराळ्या भागावर स्त्रिया गोंदून घेतात.

यूरोपियन, यूरेशियन लोक, विशेषकरून सोल्जर लोकास गोंदून घेण्याची फार हौस वाटते. व त्यास लढाईमध्यें जखमी अगर मेलेल्या माणसाचा नाव गाव वगैरे पत्ता लावण्यास या गोंदण्याचा उपयोगहि होतो. गोंदण्यात जपानी लोक फार कुशल आहेत. ते कोणताहि नमुना दाखविला असता त्याबरहुकूम चित्र अंगावर गोंदतात इजिप्त वगैरे प्राचीन देशात सुद्धा स्त्रियाच्या शरीरावर गोंदण्याचा प्रघात होता. शिक्षणप्रसारामुळें हिंदुस्थानातील सुशिक्षित स्त्रियामध्यें गोंदण्याची चाल बहुतेक बंद होत आली आहे.

गोंदण्याचीं हत्यारें प्रत्येक देशात किंवा जातींत निराळीं असतात. सुया किंवा बाभळीचा मजबूत काटा बहुतकरून उपयोगात आणतात व गोंदल्यानंतर विशिष्ट झाडपाल्याचा रस वरून लावतात किंवा काजळासारखे काळे रंग कातडींत भरतात म्हणजे कायमचा हिरवा रंग येतो अलीकडे विजेच्या साहाय्यानें फार जलद व कमी वेदना करून वाटेल त्या आकृतीप्रमाणें गोंदण्याची सोय झाली आहे

**गोदावरी जिल्हा**—मद्रास इलाखा. उत्तरेकडील किनाऱ्याचा जिल्हा. क्षेत्रफळ २५४५ चौ. मै. गोदावरी नदी जिल्ह्याच्या थेट मध्यावरून वहाते. या जिल्ह्याला समुद्रकिनारा १७२ मैल आहे. पण कोकोनाड हेंच कायतें एक अगदी थोड्याशा व्यापाराचें बंदर आहे. गोदावरी व सावरी याच्याशिवाय नद्या वगैरे नाहींत. उंचवटयावर काहीं ओढे आहेत त्याचा शेतीकडे उपयोग होतो. हवामान सामान्यतः चागलें असतें पण बहुधा सर्दन व विशेषत: एजन्सीमध्यात ताप व मलेरिआ नेहमीं असतात. प्राचीनकाळीं हा जिल्हा कलिंग आणि वेंगी या दोन राज्यात विभागला होता. ज्याच्याविषयीं काहीं माहिती मिळते असे राजे म्हणजे आंध्रंवशातील होत. २६० खि० पू० च्या सुमारास अशोकानें याना जिंकलें होतें. पण पुन्हा ४०० वर्षेंपर्यंत पुढें त्यानीं आपलें राज्य कायम राखून विस्तृतहि केलें. त्याच्या मागून क्रमानें पल्लव व चालुक्य आले. चालुक्य हे वैष्णव असून बाकीचे बौद्ध होते. काहीं दिवस चालुक्य हे चोल साम्राज्याचे मांडलिक होते. इ० स० १२०० च्या सुमारास चोल सत्तेचा ऱ्हास झाला व वरंगळचें गणपतिघराणें सत्तारूढ झालें १३२४च्या सुमारास काहीं काल मुसुलमानी सत्ता होती पण त्याना लौकरच हाकून देण्यात आलें व राजमहेंद्रीच्या रेड्डी घराण्याच्या ताब्यात सर्व मुलुख गेला. १५ व्या शतकात ओरिसाच्या गजपति घराण्याचा अम्मल येथें आला १४७०मध्यें गुलबर्ग्याच्या सुलतानाला राजमहेंद्री व कोंडपल्ली हीं ठिकाणें त्यानें केलेल्या मदतीबद्दल देण्यात आलीं आणि थोड्याच वर्षांत गजपतींचें राज्य त्यानें आपल्या सत्तेखालीं

आणलें. कुतुबशहाच्या राज्यात अंदाधुंदी माजल्यामुळें गजपतींनीं पुन्हा आपली सत्ता मिळविली. १५१५ मध्यें विजयानगरच्या कृष्णदेवराजानें त्यांना आपले मांडलिक केले. १५४३ मध्यें गोवळकोंड्याच्या सुलतानानें पुन्हा उचल खाल्ली व गोदावरीपलीकडे त्यानीं आपली सत्ता पसरली व १६८७ मध्यें औरंगझेबाच्या स्वारीपर्यंतहि त्याची सत्ता कायम होती. बादशाही अमलाचा चांगला जम न बसून मोठाले जमीनदार स्वतंत्र होऊं लागले व औरंगझेबानंतर बादशाहीला जो खिळखिळेपणा आला त्यांत दक्षिणचा सुभेदार असफजाह यानें दक्षिणेंतील मुलखांत एकतंत्रीपणा व शांतता प्रस्थापित केली.

यापूर्वीच पुष्कळ दिवस या जिल्ह्यात यूरोपियन लोक येऊन राहिले होते. पालकोलु येथें १६५२ मध्यें डच लोकांची वसाहत होती. जगन्नाथपुरम् येथेंहि त्यानीं आपलें ठाणें दिलें. मदापोलम्, वीरवासरम् व आणखी दोन ठिकाणीं इंग्रज लोकांनीं वसाहती केल्या. यानाम येथें फ्रेंच होते व तें ठिकाण अद्यापहि त्यांच्याकडे आहे. नरसपूर व उत्तर सरकार त्यांना दक्षिणच्या सुभेदाराकडून मिळलें ( १७५३ ). १७५७ मध्यें कोंडोर येथें लढाई होऊन सरकारप्रातांत इंग्रजाचें वर्चस्व प्रस्थापित झालें. १७६५ मध्यें हा मुलूख इंग्रजाना देण्यात आला. तेव्हापासून १८५९ पर्यंत या जिल्ह्याच्या व्यवस्थेंत पुष्कळ फेरफार करण्यात आले. १८३०मध्यें ज्या वरातीमुळें सरकारप्रांत मिळाला त्या वराती नाहींशा करण्यात आल्या. त्यामुळें व महर्गतेमुळें जिल्ह्याला बरीच दैन्यावस्था प्राप्त झाली व नदीवर एक मोठा बंधारा बांधण्याचें काम हातीं घेण्यांत आलें. १८५० मध्यें तें काम पुरें झालें व जिल्ह्याच्या भरभराटीचें तें एक साधन झालें. १८७९–८१ मध्यें रंप बंड चालू होतें. व तें मोडण्याकरिता तुकडीची मदत घ्यावी लागली. गुंटुपल्ली येथें बौद्धकालीन अवशेष बरेच आहेत. आणि इतर ठिकाणीं बौद्धकालीन व हिंदु अवशेष सापडतात. राजमहेंद्री येथील मशीदीवरील १३२४ तील लेखात त्यावेळच्या मुसुलमानी सत्तेचा उल्लेख आहे. १९२१ मध्यें या जिल्ह्याची लोकसंख्या १४७०८६३ होती. राजमहेंद्री, पेद्दापुरम् व कोकोनाडा या तीन विभागात ६ तालुके व २ जमीनदाऱ्या आहेत. १८९१ त खिस्ती लोक ९०६४ होते ते १९०१मध्यें१६७५५ झाले. पैकीं १५८३६ हिंदी खिस्ती आहेत. शेंकडा ९६ लोक तेलगू असून बहुतेक शेतीवर उदरनिर्वाह करतात. कोलार सरोवराच्या सभोंवतालच्या प्रदेशात कापसालायक काळी जमीन आहे. बाकीची जमीन रेताड आहे. मुखप्रदेशामध्यें गोदावरीच्या पाण्याचा फार उपयोग केला जातो. नदीमधील गाळानें बनलेल्या लंका बेटाची जमीन अत्यंत सुपीक आहे. येथील तंबाखू फार प्रसिद्ध आहे. उंचवट्यावरच्या तालुक्यांत जमीन लाल दिसून येते.

जिल्ह्यामध्यें एकंदर जमीनीपैकीं ६५२१२१ एकर जमीनदारी व सबंध इनामी गांवाची असून ७११०२५ एकर रयतवारी गावातील लागवडींत असलेली आहे. जिल्ह्यांतील एकपंचमांश जमीनींत जंगल आहे मुख्य पीक तांदुळाचें आहे. एजन्सीमध्यें चोल आणि रागी हीं पिकें मुख्य आहेत. तंबाखू सगळीकडे पिकते. कांहीं ठिकाणीं ऊंसहि पिकतो. बागाईत जमीनहि बरीच आहे. अमलापुर व नरसपूर येथें ३२००० एकर जमीनींत नारळ होतात. एकंदर जमीनीपैकीं शेंकडा ६२ जमीन पाण्याखालीं आहे. सरकारी कालव्यानीं ९२८ चौ. मै. जमीन भिजते व बाकीची तळीं आणि इतर साधनानीं भिजविली जाते. रथसगंपल्ली येथें कोळशाच्या खाणी आहेत. पेराकोंडा येथें ग्राफाइट सापडतो. एल्लोर येथें चांगले गालीचे तयार होतात. सर्वांत मोठा व महत्वाचा कारखाना म्हणजे सामलकोट येथील साखर शुद्ध करण्याचा व दारू गाळण्याचा होय. या कारखान्याच्या अस्तित्वानें लोकांना ताडी पेण्याचें व्यसन लवकर जडविलें असून त्याकरता ४ लक्षाच्यावर झाडें उपयोगात आणली जातात. भाताचें टरफल कांडणें, एरंडाचें तेल काढणें, कातडी कमाविणें, लोखंडाचें काम वगैरे उद्योगधंदे आहेत. निळीचे कारखाने व मीठ तयार करण्याचीं खाजगी व सरकारी ठिकाणें व त्रिल्टाचा कारखाना वगैरे ध्यानात घेण्याजोगे धंदे आहेत.

निर्गत बहुतेक शेतकीच्याच उत्पन्नाची असते. तांदूळ व इतर धान्यें, तंबाखु, गळिताचीं, धान्यें, नारळ, फळफळावळ, तूप व कातडी हे मुख्य जिन्नस बाहेर जातात. कापूस इंग्लंड व फ्रान्स आणि बेलजमकडे जातो. तांदूळ सिलोन, मॉरिशस येथें; गळिताचीं धान्यें फ्रान्स, इंग्लंड ( युनायटेड किंगडम ) व ब्रह्मदेशात व तंबाखू ब्रह्मदेशात याप्रमाणें माल रवाना होतो. राजमहेंद्री व अंबाजीपेट हीं व्यापाराचीं दोन मुख्य ठिकाणें आहेत. अद्यापहि दर १००० माणसामागें ११ पौंड अफू खपते. पूर्व किनाऱ्यानें जाणारी मद्रास रेल्वेलाइन या जिल्ह्यातून राजमहेंद्री–सामलकोटवरून जाते. सामलकोटाहून कोकोनाडा येथें एक शाखा जाते. गोदावरीवर बांधलेला एकपूर्णांक एकद्वितियांश मैल लांबीचा पूल सुंदर व भक्कम आहे. या जिल्ह्यामधील तीन शहरीं म्युनिसिपालिट्या आहेत. २९ लहान शहरीं युनियन पंचायती आहेत. जिल्हाबोर्ड, पोलिस, जेल, दवाखाने, देवीडॉक्टर वगैरे मामुल व्यवस्था आहे. शिक्षणाच्या बाबतींत आरंभीं हा जिल्हा बराच पुढें होता. दर दहा हजारीं ७५५ लोकास लिहितावाचता येतें.

**गोदावरी नदी**—दक्षिण हिंदुस्थानांतील एक मोठी नदी. गोदावरीचा संस्कृत अर्थ पाणी किंवा गाई देणारी असा आहे पण दख्खनला विभागणारी म्हणून 'गोदे' ( मर्यादा ) या तेलगू शब्दावरून हिला हें नाव पडलें असावें असें कांहीं भाषापंडित म्हणतात. ही गंगा, सिंधू यांच्या खालोखाल आहे. लांबी ९०० मैल असून उगम पश्चिम

घाटात नाशिकजवळ त्र्यंबक येथे आहे. रामचंद्राचा वास हिच्या तीरीं बराच काळ झाल्यामुळें हिला पावित्र्य प्राप्त झालेलें आहे. सिंहस्थात गोदेचें महात्म्य विशेष मानितात व त्यावेळीं नाशिक-त्र्यंबकास फार मोठा यात्रा जमते. हिला नांदेड येथें धरण बांधलें आहे व नेवासें येथें प्रवरा व मुळा हिला मिळतात. पैठणनंतर पुढें ह्या १७६ मैल हैद्राबाद संस्थानांतून जाते. हिला पूर्णा, मांजरा, मानेर, वर्धा, वैनगंगा वगैरे नद्या मिळतात. वैनगंगा वर्धेच्या द्वारें सातपुडा व नागपूरभागचें पाणी घेऊन गोदावरीला मिळते. पुढें प्राणहिता, इंद्रावती व तालमा नद्या मिळतात. १०० मैलपर्यंत गोदावरी नदी मध्यप्रांत व हैद्राबाद संस्थान यांचा सरहद्द आहे. पुढें १९-१५ मैल लांबीचे दोन खडक पात्रांत आहेत ते फोडून काढण्याचा प्रयत्न फसला नाहींतर वरपर्यंत बोटी येण्याची सोय झाली असती. पुढें मद्रास इलाखा व हैद्राबाद यांच्या हद्दीवरून वहाते या भागात हिला सबरी मिळते. नंतर मद्रास इलाख्याच्या कृष्णा गोदावरी जिल्ह्याच्या हद्दीवरून सपाट प्रदेशांतून संथपणानें वहाते व पुढें घाट फोडून बाहेर निघाल्यावर पुन्हा संथपणानें वहाते. या भागात लंका नावाचीं गाळानें बनलेली बेटें सुपीक व तंबाखूबद्दल प्रसिद्ध आहेत. राजमहेंद्री येथें १॥ मैलाचा रेल्वेचा पूल आहे. पावसाळ्यात पूर येऊन बाजूचा भाग जलमय होण्याचा संभव असल्यानें धक्के बांधावे लागतात. राजमहेंद्रीच्या नंतर कांहीं मैलावर गौतमी व वसिष्ठ असे हिचे दोन फांटे होतात. व या दुआबामध्यें नदीच्या गाळानें बनलेली अत्यंत सुपीक जमीन आहे व या भागात गोदावरीच्या पाण्याचा शेतीकडे उपयोग मोठ्या प्रमाणावर करतात. धवलेश्वराच्या देवळाजवळ धरण बांधून कालवे काढले आहेत (कालवे पहा). गोदावरी व तिचे कालवे यांतून बऱ्याच अंतरापर्यंत बोटी चालतात पण पुढें खडक आल्यामुळें त्या फार वरपर्यंत येत नाहींत. यानाम ही फ्रेंच वसाहत गोदावरीच्या काठीं आहे. हिला वृद्धगंगा असें म्हणतात. ही गंगेसारखीच पवित्र मानतात व गंगा आणि गोदा एकच होत अशी समजूत आहे. नाशिकास हिला गंगाच म्हणतात. दर १२ वर्षांनीं राजमहेंद्री येथें पुष्कर नांवाचा स्नानमहोत्सव होतो. त्र्यंबक, कोटिपल्ली, राजमहेंद्री व भद्राचलम् हीं गोदावरीचीं पवित्र क्षेत्रें आहेत.

**कालवे**—गोदावरी नदीचा मुखप्रदेश म्हणून जो एक भाग आहे त्याला धवलेश्वरपासून सुरवात होते व येथूनच गोदावरीने दोन प्रवाह होऊन वरील प्रदेशाचे तीन विभाग होतात. पूर्वमुखप्रदेश, पश्चिममुखप्रदेश व मध्यमुखप्रदेश. हा सर्व प्रदेश सुपीक, मळी या जमिनीचा व सपाट असून समुद्राकडे दर मैली एक फूट याप्रमाणें उतरता आहे. धवलेश्वर येथें नदीस धरण बांधलें आहे व या धरणांतून तीन स्वतंत्र कालवे वरील तीन भागां[illegible] काढले आहेत. हे कालवे बरेच मोठे म्हणजे ४९३ मैल दोड्या व लहान बोटी चालण्याजोगे असून १९२९ मैल लहान शाखा आहेत. मुखप्रदेशाच्या सर्व भागावर पाणी खेळवता येण्याची सोय करण्यांत आली असून ६६२००० एकर जमीन या कालव्यांनीं भिजते. १९०३—४पर्यंत ऐन खर्च १३५ लाख झाला व त्या सालीं ३३ लाख वसूल झाला. चालू खर्च वजा जाता शेकडा १७।१८ पर्यंत निव्वळ नफा रहातो. या कालव्याच्या कामाच्या खालोखाल गुन्नावरम् येथील नहर (अक्विडक्ट) आहे व त्यानें वैनतेय या गोदावरीच्या शाखेनें नगरम्पर्यंत पाणी जातें. १८४५—४७ या दोन वर्षांत या कालव्यांचें मुख्य काम झालें. धरणाची उंची १० फूट आहे. लांबी एकंदर ?। मैलपर्यंत आहे व त्याचें ४ विभाग असून मध्यें तीन ठिकाणीं बेटें आहेत.

**गोंदिया**—मध्यप्रांत भंडारा जिल्हा. तिरोरा तहशील उत्तर अक्षांश २१° २८' आणि पूर्व रेखांश ८०°१३' नागपूरपासून ८१ मैलावर हें बंगाल नागपूर रेल्वेचें जंक्शन आहे. येथूनच जबलपूरला रेल्वेचा फांटा फुटतो. लोकसंख्या (१९११) ५८४७. धान्य व जंगलांतील सामान यांचा येथें बराच व्यापार चालतो. दर मंगळवारीं येथें बाजार भरत असून गांव भरभराटत आहे. येथें पोस्ट आफिस, पोलिस कचेरी, दवाखाना, हिंदी व मराठी शाळा आहेत. मालगुजार पोवार रजपूत आहे.

**गोद्दा पोटविभाग**—बिहार-ओरिसा परगणा जिल्हा. क्षेत्रफळ ९१५ चौ. मै. याचे निसर्गतः दोन भाग पडतात. पश्चिम व दक्षिण भाग डोंगराळ आहे व पूर्वभाग मळगाळाच्या सुपीक जमिनीचा आहे. लोकसंख्या (१९११) ३८७१६०. खेडीं १७३०. गोद्दा हें मुख्य ठिकाण शहर नसून खेडेंच आहे.

**गोंधळी**—या जातीची विशेष वस्ती हैदराबाद संस्थान आणि वऱ्हाड-मध्यप्रांत या भागांतून आहे. मुंबई इलाख्यांत गुजराथखेरीज करून सर्व इलाख्यांभर हे लोक पसरलेले आहेत. पण एकंदर लोकसंख्या हजाराच्या आंत आहे. यांचें मूळ वसतिस्थान माहूर व तुळजापूर हें असून आपण २००-३०० वर्षांपूर्वीं दक्षिणेंत आलों असें हे सांगतात. हे अंबाबाई भवानीचे सेवेकरी असल्यामुळें खालच्या जातींच्या लोकांत यांना चांगला मान मिळतो. मराठ्यांच्या सत्तेच्या आरंभीं गोंधळी लोक आपले पोवाडे गाऊन अशिक्षित लोकांमध्यें देशाभिमान जागृत ठेवीत असत. हे लोक "गोंधळ" करून व भवानीच्या नांवावर भिक्षा मागून आपलें पोट भरतात. मुंबई इलाख्यांत (१) मराठे, (२) कुंभार, (३) कदमराय, (४) रेणुकराय, (५) ब्राह्मण (६) अकरमाशे अशा सहा पोटजाती यामध्यें आहेत. संस्कार व रीतिरिवाज या बाबतींत मराठे कुणब्यांप्रमाणें वागतात. यांचा दर्जा मराठ्याहून खालीं आहे. मध्यप्रांतांत खालच्या जाती पुढीलप्रमाणें आढळून येतात—ब्राह्मण, मराठे, माने,

कुणबी, खैरेकुणबी, तेली, महार, मांग व विदुर तसेंच देशकर, गंगापारे व हिंदू लोकहि योंच्यांत मिळतात. यांचीं गोत्रें, डोंकफोडे, सुरमुखे, मवल, पवार इत्यादि होत. लग्नांत वराच्या गळ्यांत त्याच्या जातींतील ५ विवाहित लोक कवड्यांची माळ घालतात, हाच गोंधळी होण्याचा विधि आहे. उच्च जातींच्या लग्नकार्यांत किंवा नवसाचा गोंधळ करण्यास यास बोलावतात. गोंधळास चार माणसें लागतात. कोणी लोक नवसाकरितांहि गोंधळी होतात. स्वतःची जात न सोडतां त्यास ही दीक्षा घेतां येते. [सेन्सस रिपोर्ट, सन १९११ (मुंबई), रसेल व हिरालाल.]

पूर्वी मराठेशाहींत सरकारी गोंधळी नेमिलेले असत. त्यांचीं कामें पुढील जाबतगावरून कळतील.

गोंधळी जाबता.—१ गोंधळी यांनीं दरमहा पौर्णिमेस प्रातःकाळीं अंघोळ करून, गंध लावून वस्त्रपात्र स्वच्छतेनें सरकार वाड्यांत येऊन तत्रापुढें गोंधळ रात्रीं नेमानें करून जात जावें. लिहिल्याप्रमाणें आपलें काम हुशारीनें करावें. यांत अंतर पडूं नये. पौर्णिमेस अगर जेव्हां हुकूम होईल त्या वेळेस जमत जावें. सदरहू लिहिल्याप्रमाणें वंदोबस्त हुशारीनें सरकार चाकरी करून दाखवील, त्याजवर सरकारमेहेरबानी होईल हें समजोन हुशारीनें वागावें.

सरकारांतून चालवयाचे जाबते —

१ दरमहा पौर्णिमेस व चंपाषष्टीच्या गोंधळाबद्दल रुपया एक व खण पावतो त्याप्रमाणें पावेल.

१ पोतास खादी व ओवाळणीबद्दल रुपया एक पावतो म्हणोन कलम त्यास शिरस्त्याप्रमाणें पावेल, व राजमुरा दोन ताफ्यास पावतो त्याप्रमाणें पावेल.

१ दसऱ्याच्या पूजेस चौंडक्यास पागोटीं दोन व दिपवाळीबद्दल तेल व फराळाचें सालाबादाप्रमाणें पावत जाईल.

या जाबत्याप्रमाणें प्रतापसिंह छत्रपति सातारकर यांची ववस्था होती. [इतिहाससंग्रह पु. ६, अं. ११.]

गोध्रा तालुका.—मुंबई पंचमहाल जिल्ह्यांतील उत्तरेकडचा तालुका. क्षेत्रफळ ५८४ चौ. मैल. यांत एक शहर व १२२ खेडीं आहेत. लो. सं. (१९११) ११७४६६. सारा व इतर मिळून वसूल (१९०३-४) ९२००० रु. येथें शेती इतर हलक्या दर्जाची आहे व झुडपें आणि जंगल पुष्कळ आहे. हवा प्रकृतीस अपायकारक अशी आहे. पावसाचें मान सरासरी चाळीस इंच आहे. मही व पानम या दोन नद्या या तालुक्यांत आहेत व मका हें मुख्य पीक निघतें.

शहर.—गोध्रा हें तालुक्याचें मुख्य ठिकाण. पंचमहाल जिल्ह्याचेंहि हेंच मुख्य ठिकाण आहे. गोध्रा-रतलाम रेल्वे येथून जाते. लो. सं. (१९११) २२१४४. मुसलमानांच्या वेळीं अमदाबादचा सुभेदार येथें रहात असे. रेवाकांठा पोलिटिकल एजंट येथच असतो. गोध्रा शहरीं म्यु... कमेटी आहे. चामडें कमावण्याचे बरेच कारखाने आहेत. गोध्रा हें जळाऊ व इमारती लाकडाच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. शहराजवळ एक मोठा तलाव आहे. गोध्रा येथें सरकारी कचेऱ्या, दवाखाने, हायस्कूल व मुलांमुलींच्या शाळा वगैरे आहेत.

गोप—हा शब्द मूळचा विशिष्ट लोकांचा वाचक असावा. नाग म्हणजे जसे डोंगरी लोक तसे गोप म्हणजे सपाट देशांतील लोक म्हणजे गुराखी. यांचा गुराखीपणा संस्कृतीच्या इतिहासांत डोंगरीपणाच्या नंतरचा आहे. गोप म्हणजे स्थायिक लोक नसून हिंडणारे होते हें "व्रज" (गोपांच्या वसाहती) म्हणजे चालतागाव यावरून दिसतें असें रा. राजाराम भागवत म्हणतात.

गोपामध्यें वीरपूजा होती ती ब्राह्मणांनीं उचलली आणि कृष्ण हा क्षत्रिय व ब्राह्मणांच्या पायां पडणारा बनविला, आणि त्यास क्षत्रिय वसुदेवाचा परागंदा मुलगा बनविलें. यस यादवाचा मोड करण्यासाठीं वसुदेव यादवानें गोपांशी मैत्री केली एवढेंच मूळचें तथ्य असेल. कन्हा, कन्ह अगर कन्हर हें मूळचें नांव असून ब्राह्मणांनीं त्यास "कृष्ण" बनविलें असेल. गोपी नाचणाऱ्या व गाणाऱ्या असून कृष्ण इत्यादि गोप वाजविणारे असतील. गोप शब्दाचा अगर कृष्णाचा ज्या स्थलांशीं संबंध आहे अशीं स्थलें म्हटलीं म्हणजे (१) गोदावरी, (२) गोपपूर (गोवें), (३) गोमतक, (४) गोवर्धन, (५) कृष्णानदी, (६) कान्हेरी, (७) कनड. प्राचीन कालीं गोप हें केवळ वर्गवाचक नसून राष्ट्रवाचक नांव असावें असें दिसतें. गोपराष्ट्र हरिवंशांत उल्लेखिलें आहे. महाभारतांतहि (भीष्मपर्व ९) गोपराष्ट्राचा उल्लेख आहेच.

गोपराष्ट्र हा शब्द शालिवाहनाच्या ६ व्या शतकाच्या पहिल्या पादांतील ताम्रपटांत येतो. या शब्दाचे संबंधी शब्द भारतीय भाषांत अनेक आहेत. भंडाऱ्यामध्यें गावड हा एक पोटभेद आहे. गावडे नांवाची एक जात गोव्यांत व कोंकणांत आहे. गौडा हा पाटलाचा वाचक शब्द आहे. तोहि याशीं संबद्ध असावा. गुर्जर ही गोपाप्रमाणेंच गवळ्यांची जात असावी.

गोप या शब्दाचा संबंध परदेशांतील जातींशीं लावण्याचा प्रयत्न रा. भागवत यांनीं केला आहे. ते म्हणतात कीं, मिसरी लोकांचें अति प्राचीन नांव गोपथ होय. गोपथ शब्दाचा हल्लीं काप्ट असा अपभ्रंश होतो. ईजिप्त हेंहि नांव गोपथ शब्दाचेंच रूपांतर होय. त्याचा खरा उच्चार "ऐगुप्त" असा होय. ग्रीस गोमांस खात म्हणून त्यांच्या भांड्यास मिसरी शिवत देखील नसत. "काप्ट" पैगंबराचे शिष्य झाल्यामुळें गोघातक झाले (वि. वि. पु. २३ पृ. ५१-५२).

या भागवती चर्चेवर कांहीं अनुकूल व प्रतिकूल टीपा देतां येतील त्या येणें प्रमाणें —

(१) काप्ट हे लोक मुसलमान नसून खिस्ती आहेत. (२) काप्ट हा गोपथ याचा अपभ्रंश असो अगर नसो काप्ट हें आपणास ईजिप्शियन समजतात. (३) ईजिप्त याचें ग्रीक

नाव ईजिप्टॉस किंवा ऐजिप्टॉस आहे 'जी' चा उच्चार ग्रीक मध्यें ग असा आहे आणि 'वायु' चा उच्चार उ असा आहे. (४) " ऐगुप्त " या ईजिप्तच्या ग्रीक नावाची व्युत्पत्ति लागत नाहीं त्यामुळें भागवत याची सूचना उपयुक्त आहे. (५) ईजिप्तला तद्देशीय लोक केमि म्हणजे कृष्णभूमि म्हणत आणि ईजिप्तमधील लोक आपणास रोमि म्हणत असें ब्रिटानिका म्हणते.

परक्या देशासंबंधानें विवेचन सोडून फेवळ हिंदुस्थानाकडेच लक्ष दिलें तर असें दिसेल की, देशातील प्रत्येक भागांत गोपसदृश जात आहे अहीर, गोवाल ( बंगाल ) गोवारी, गवळी, गोपाळ इत्यादि नावाच्या जाती पुष्कळ आहेत. या जातींचा एकमेकांशीं कांहीं संबंध होता किंवा नव्हता हें या जातींतील पोटजाती, गोत्रें व देवकें पाहून ठरविलें पाहिजे. जातीचें राष्ट्र होणें व राष्ट्राची पुन्हा जात होणें या क्रिया या जातींत अनेकवेळ झाल्या असल्यात या जातीचें रक्त प्रत्येक ठिकाणीं अनेक स्थानिक जातींत मिसळलें असावें आणि स्थानिक जातींचें याच्यात मिसळलें असावें या जातींशीं सदृश जाती (गवळी, अहीर व आभीर) यांस दिल्या आहेत आणि आता उरलेल्या कांहीं जातींकडे लक्ष देतों.

गो वा री.—याची जात फक्त वऱ्हाड मध्यप्रांतातच आहे लोकसंख्या सुमारें दीड लाख आहे. जेथें हे लोक आहेत तेथें गवळी व अहीर लोक कमी आहेत. यांचें बहुमानाचें नाव धारे आहे. याची जात गोंड व अहीर यांच्या मिश्रणानें बनली असून त्याना गोंड रक्ताचा भाग बराच आहे. गोवाऱ्याचे ३ वर्ग आहेत. गायगोवारी, इंगा व मारिया गोवारी. गाय गोवारी हे फार उच्च आहेत. यांच्यात गवळीरक्त जास्त असावें. इंगा व मारिया तर प्रत्यक्ष गोंडापासूनच जन्मले आहेत याना गायगवाऱ्यांच्या हातचें अन्न चालतें व इंगांच्या हातचें गायगवारी व गोंडगवारी यास चालतें पण गोंडगवाऱ्याच्या हातचें इंगास चालत नाहीं. यांचीं कुलनामें पशुपक्षी, झाडें व इतर पदार्थ या नावावरून पडली आहेत. मोठे कोडेयान हा याचा देव आहे त्याची पूजा ग्रमात व मोठ्या उत्सवात करतात. जातीच्या सभेच्या अध्यक्षास ढोण्या म्हणतात. याची निवड झाली की तो मरेपर्यंत बदलत नाहीं. एखाद्या गुन्हेगारास जातींत परत घेताना प्रथम त्याच्या बरोबर जेवावें लागतें.

पुरुषाच्या कपाळावर एक उभी रेघ गोंदतात. याशिवाय तो गोवारी समजला जात नाहीं. बायका आपल्या उजव्या हाताच्या कोपरापाशीं सुद्धां नागमोडी रेषा गोंदतात व त्यास सीतेचा हात म्हणतात. गोवाऱ्याचा मुख्य धंदा गुरें चारण्याचा आहे कांहीं शेतकीहि करतात. [ रसेल व हिरालाल ]

गो पा ळ बो र क र.—हे मद्रासेंत रहातात. यांचे पांच भाग आहेत मराठी, वीर पागुळ, पहलवान (राम) व गुजराथी गोपाळ. मराठी गोपाळांचा दर्जा उच्च असतो. पण वीरगोपाळ फार नीच समजले जातात. गावाबाहेर झोपड्या बांधून रहातात व त्यांचा मुख्य एक दोन वर्षांनंतर त्या झोपड्या काढून दुसरीकडे बांधण्यास सांगतो. चोरकर लोक चटया विणतात. पागुळ झाडाखालीं धोतर आंथरतो व झाडावर बसून भीक मागतो. मृताशौचातच हे क्षौर करतात इतर दिवसात केस व दाढी लांब वाढवितात दावलमालिक हा याचा देव आहे हे प्रेतें झोळीत टाकून नेतात व मांडी घालून पुरतात खाम गोपाळ हैदराबादेकडील लोक आहेत हे दोऱ्यावर खेळ करतात. गुरें चोरण्यात पटाइत आहेत. आता हे शेतकी करतात.

गो ल्ल.—याचा मूळचा धंदा गवळ्याचा आहे. आतां बहुतेक लोक शेती व मजुरी करतात. याची वस्ती मुख्यतः मद्रास, म्हैसूर व हैदराबाद संस्थानात आहे लोकसंख्या सुमारें १५ लाख आहे म्हैसूर संस्थानांत या जातींत उरगोल्ल आणि बहुगोल्ल असे दोन भेद असून ते परस्परांपासून भिन्न आहेत. उरगोल्ल जातींत अनेक पोटभेद आहेत. त्यांपैकी येरा अथवा किराटी गोल्ल ही जात मुख्य आहे. याच्यातील नावें प्राणी, वनस्पती किंवा इतर वस्तूंवरून पडलेलीं आहेत. त्यांची मूळची भाषा तेलगू असावी. पण कानडी मुलुखात रहाणारे लोक कानडी भाषाच वापरतात जावयास आपल्या सासऱ्याच्या मालमत्तेचा हिस्सा मिळूं शकतो व त्यास मुलगा नसल्यास जावईच वारस समजला जातो

याच्यात विधवाविवाहास मोकळीक नाहीं. स्त्रीपुरुषास घटस्फोट करता येतो. 'बसावी ' ची वहिवाट नाहीं. हे वैष्णव असून कृष्णपूजक आहेत. कित्येक शिवपूजकहि आहेत. 'दासय ' म्हणून आपलें आयुष्य परमेश्वरास अर्पण करण्याची याच्यात विशेष वहिवाट आहे. कडुगोल्ल हे आपण मूळचे उत्तरेकडील आहों म्हणून सांगतात. त्याच्यात एकंदर तीन पोटभेद आहेत. स्त्रीनें अविवाहित मरता कामा नये असा त्याचा समज आहे. विधवांना विवाह करण्याची मोकळीक नाहीं प्रत्येक भागात एक ' यजमान ' असून त्यास पुष्कळ अधिकार असतात. हे लोक विष्णुपूजक आहेत. जंजाया ही त्यांच्या जातीची मुख्य देवता मानली आहे.

मुंबई इलाख्यात सुमारें ५००० गोल्ल आहेत. फडपवाले, फिरते गुराखी व वैदू लोकांची ही एक मिश्र टाळी बनली आहे. बेळगांव जिल्ह्यात याना गोपाळ हें नांव आहे. ते तेलगू बोलतात तेलंगणांत दुष्काळ पडल्यामुळें हे लोक उत्तरेस आले असें म्हणतात. औषधें विकणाऱ्या गोल्ल लोकांमध्यें मराठा, वैदू इत्यादि जातींचा फारच भरणा आहे. यांमध्यें मोरे, पवार, शिंदे इत्यादि आडनांवें असून त्याच्या चालीरीती व संस्कार मराठ्यांप्रमाणेंच आहेत. औषधें विकणाऱ्या गोल्ल लोकांच्या ६ पोटजाती असून एक

जातींतील लोक दुसऱ्या पोटजातींतील लोकांशीं विवाहसंबंध करीत नाहींत. गुरारी गोल्लांतहि सहा पोटजाती आहेत. ते लिंगायतांप्रमाणें आचारविधी करितात व मृतांना पुरतात. वऱ्हाडमध्यप्रांतात यांच्यात उपजाती नाहींत. सिवनी जिल्ह्यांत हे आपलीं व गोंडांचीं कुलनावें एकच आहेत असें सांगतात. व यामुळें त्यांचा वास्तविक संबंध नसता कांहीं तरी संबंध असावा असें भासतें. हे कानडी भाषेची एक पोटभाषा बोलतात. तिचीं गोलारी, गोलिया व कोमट्टु अशीं नावें आहेत. [ रसेल व हिरालाल; थर्स्टन; सेन्सस रिपोर्ट १९११ ].

**गोपथ ब्राह्मण**—हें अथर्ववेदाचें एक ब्राह्मण आहे. अथर्ववेदाच्या अनेक शाखांपैकीं 'शंनोदेवी' या मंत्रानें आरंभ होणाऱ्या संहितेचें हें ब्राह्मण असावें. कारण ' शंनोदेवी ' या मंत्रानें अथर्ववेदाचा आरंभ होतो असा या ग्रंथांत उल्लेख आहे (१. २९). या ब्राह्मणग्रंथाचे दोन भाग असून पहिल्या भागांत अध्याय पांच आहेत व दुसऱ्या भागात सहा आहेत पहिल्या भागांतील विषय श्रौतविषयास सोडून असून दुसऱ्या भागात श्रौतविषयाचें विवेचन आहे. परंतु त्यांतील बराच भाग ऐतरेय, शतपथ व पंचविंश या ब्राह्मणग्रंथांतून घेतलेला आहे. ऐतरेय ब्राह्मणांतील तर संबंध खंडेच यांत उद्धृत केलीं आहेत. ब्राह्मणग्रंथ हा संहितेंतील मंत्राचा विनियोग दाखविणारा ग्रंथ असतो परंतु गोपथ ब्राह्मणात तसा प्रकार आढळून येत नाहीं. या ग्रंथांत ब्रह्मा या ऋत्विजाच्या कर्माचें विशेष विवेचन असून त्रैविद्यांनीं वगळलेल्या अथर्ववेदाचें महत्व जास्त वर्णिलें आहे. इतर ब्राह्मणग्रंथाप्रमाणें ब्रह्मा या ऋत्विजाचें कर्म तीन वेदांनीं करावें,हें मत या ग्रंथास मान्य असून या ग्रंथात ब्रह्मा ऋत्विजाचें कर्म अथर्ववेदानें करावें असें अनेक ठिकाणीं म्हटलें आहे. आणि अथर्ववेदाव्यतिरिक्त कर्म असंस्कृत होय असें म्हटलें आहे. या ग्रंथात अथर्ववेदाला ब्रह्मवेद असें पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे या ग्रंथाचा काल बराच अलीकडील असावा असें यांतील पहिल्या भागांतील उल्लेखावरून दिसून येतें. अध्याय २ खंड २३यात गर्भाधानापासून उपनयनापर्यंतच्या संस्काराचा उल्लेख आहे. तसेंच पाकयज्ञाचा उल्लेख अनेक स्थलीं आला आहे. पुत्र शब्दाची व्युत्पत्ति देतांना नरकाचा उल्लेख आलेला आहे. तसेंच अध्याय १ खंड २९ मध्यें व्यासाचा उल्लेख आहे. या ग्रंथाच्या उत्तर भागांतील दुसऱ्या अध्यायात दशावताराचा उल्लेख आहे वरील अनेक पुराव्यावरून हें ब्राह्मण वेदेतर वाङ्मयाच्या कालांतील असावें असें ठरतें. इतर संहितांना जशीं ब्राह्मणें आहेत तसें अथर्ववेदासहि एक ब्राह्मण असावें या दृष्टीनें बऱ्याच अर्वाचीन काळात या ग्रंथाची रचना झाली असावी असें दिसतें.

**गोपालगंज**—बंगालच्या फरीदपूर जिल्ह्यातला एक पोटविभाग. क्षेत्रफळ ५३८ चौ. मै. लोकसंख्या ( १९११ ) ४३०२४९. यात १०८० खेडीं असून मुख्य ठिकाण गोपालगांव आहे.

**गोपालपूर**—गंजम जिल्ह्याचें मुख्य बंदर. उ. अ. १९°१६' व पू. रे. ८४°५३'. किनाऱ्यानें जाणाऱ्या बोटी येथें लागतात. निर्गत माल मुख्यतः धान्य, कातडीं, ताग, काष्ठाचे पदार्थ, गळिताचीं धान्यें वगैरे. मुख्य आयात साखर, कपडा, राकेल, दारू, धातुसामान वगैरे. १९०३–४ सालीं निर्गत व्यापार १४१२००० चा व आयात २५०००० चा झाला. ब्रह्मदेशांत ७४०० लोक गेले व तेथून ८४०० आले येथें दोन दीपगृहें आहेत व हें बंदर बहुधा बारा महिने उघडें व चालू असतें. पण दिवसेंदिवस हें बंदर खराब होत आहे व्यापारहि खालावत असल्यानें तें दुरुस्त ठेवण्याकरितां सरकारहि खर्च करूं इच्छित नाहीं.

**गोपिकाबाई पेशवे**—ही भिकाजी नाईक रास्ते यांची कन्या. हिचा जन्म १७२५ च्या सुमारास झाला. भिकाजी हा साताऱ्यास शाहूच्या वेळीं मोठा सावकार होता; त्याच्या सचोटीमुळें शाहूची त्याच्यावर मर्जी असे एका दिवाळींत नाइकानें शाहूस मेजवानी केली, तेव्हां गोपिकेस पाहून महाराजांनीं तिच्या लग्नाचें स्वतःच ठरविलें व पुढें बाजीराव साताऱ्यास आला असता त्यास आज्ञा करून नानासाहेबांशीं गोपिकेचें लग्न लाविलें लग्न वाईस झालें ( १० जानेवारी १७३० ). लग्नास खर्च ३४३२५ रुपये झाला. स्वतः शाहूनें लग्नात प्रमुखपणें भाग घेतला होता. ही नेहमीं नानासाहेबा बरोबर स्वाऱ्याशिकाऱ्यात हजर असे. ही फार कारस्थानी असे व राजकीय आणि दरबारी कामातहि तिचा कारभार चाले. सवाईरावसाहेबास तिनें केलेला उपदेश पाहिल्यास हिची योग्यता आढळून येईल. नानासाहेबांनीं १७३७ त काशी प्रयाग सोडविण्यासाठीं उत्तरेंत जी मोठी स्वारी केली, तींत गोपिकाबाई बरोबर होती: परंतु खानदेशात आल्यावर तिला दोनतीन महिने गेलेले दिसताच भाऊसाहेबांबरोबर तिला पुण्यास परत पाठविण्यात आलें. ती पुढें जुलईत प्रसूत होऊन मुलगा झाला; तोच विश्वासराव होय. पुढें नानासाहेबास नाटकशाळेचा नाद लागला ( १७५५ ) त्यामुळें गोपिकाबाई ही पेशव्यांवर रुष्ट असे. रामराजाच्या राज्यारोहणप्रसंगीं गोपिकाबाई मुलांसह ( विश्वासराव व माधवराव ) साताऱ्यास गेली असता, ताराबाईनें तिला व मुलांना बहुमानाचा पोषाक दिला दिला ( १७५० ). सदाशिवरावभाऊची चढतीकळा बाईला पसंत न पडून तिनें नानासाहेबाचें मन भाऊबद्दल कलुषित केलें व भाऊला पानपतावर पाठविण्यासहि बाईच कारण झाली असे आरोप तिच्यावर केले जातात, पण त्याची नक्की शहानिशा अद्यापि होत नाहीं. मराठी दरबारात निरनिराळे पक्ष झाले व मुत्सद्दी एकमेकांचा मत्सर करूं लागले. त्यातहि नानासाहेबाच्या विरुद्ध रामचंद्र शेणवी, महादोबा पुरंदरे, गोविंदराव चिटणीस व प्रत्यक्ष भाऊसाहेब हे मधूनमधून जात म्हणून

कदाचित् गोपिकाबाईनेंच नानासाहेबाचें मन या सर्व मंडळी विरुद्ध बिघडविलें असा प्रवाद त्या वेळीं पसरला असावा. रामराजाच्या दत्तकप्रकरणात ताराबाईनें गोपिकाबाईचाहि सल्ला घेतला होता. उदगीरच्या लढाईच्या प्रारंभीं भाऊसाहेबावर मुजफरखानानें मारेकरी घातले होते ( निजामाच्या चिथावणीवरून हें कृत्य झालें असाहि तत्कालीन एक तर्क आहे ). त्यास बाईची प्रेरणा होती असें डफ म्हणतो पण त्यास आधार नाहीं. पानपतावर भाऊसाहेबाच्या मदतीस नानासाहेब निघाले असता त्या स्वारींत बाई होती. श्रीमंतांनीं अब्दालीचा सूड घेण्याचा निश्चय करून पुढ चाल केली असतां दरबारी मंडळींनीं व बाईनें बोध करून त्याना परत फिरविलें ( १७६१ मार्च ) नानासाहेबांच्या अंतकाळीं बाई जवळच होती. नानासाहेबानीं मृत्यूपूर्वीं सहा महिने नवीन लग्न केल्यानें बाईचा त्यांच्याशीं खटका उडाला होता. नानासाहेबाच्या मृत्यूनंतर थोडे दिवस बाईचें, राघोबादादाचें व दोघा कारभाऱ्यांचें एकचित्त झालें होतें. परतु, पुढें बिघाड पडत जाऊन बाई नाशिकजवळ गंगापूर या गावीं जाऊन राहिली थोरल्यामाधवरावाची बायको रमाबाई हिचें व गोपिकाबाईचें विशेष सख्य नव्हतें, त्यामुळेंहि ती कदाचित् गंगापुरीस गेली असावी. नारायणराव हे गादीवर बसले त्यावेळीं बाई पुण्यास आली होती. तिच्या मनात सर्व कारभार आपण आटोपावा असें होतें परतु तें जमलें नाहीं. पुढें हिचें व आनंदीबाईचें भांडण फार वाटलें, आणि त्याचा शेवट नारायणरावाच्या खुनात झाला. बाईचा गंगापूरचा सालीना खर्च ३४ हजाराचा होता थोरले माधवराव मातृभक्त असल्यानें त्यांनीं मदत्याचा कारभार बाईस कळवूनच केलेला आहे. बाईला बाळबोधी लिहितां येत असे. तिच्या संमतीनें मोठमोठीं राजकारणें होत. राघोबादादावरहि हिचा वचक फार असे. तेहि तिला प्रथम प्रथम बहुतेक राजकारणें कळवीत असत. पण पुढ (नारायणरावाच्या वधानंतर) मात्र परस्परांचें परस्परांचें वाकडें आलें. या वेळीं पुण्यास सूर्यग्रहण लागलें असें ती म्हणत असे सवाईमाधवरावसाहेबावर हिचें फार प्रेम असे. त्या वेळचे मराठे मुत्सद्दी व सरदारहि तिला वचकून असत. नाना फडणिसावर तिचा लोभ असे. शेवटीं गंगापूर येथेंच गोपिकाबाई वारली ( ३ ऑगस्ट १७८८ ). तिच्या उत्तरकार्यांस ( नक्त २७९५० रु. व ५५७१ चे पाचड मिळून) ३३५२१ रुपये खर्च झाला. क्रियाकर्म नाशीक येथें बाईचा बंधु गंगाधर शिवाजी यानें केलें व पुढें पुण्यास पेशव्यानीं केलें. एकदरीत गोपिकाबाई ही शहाणी, राजकारणी, महत्वाकांक्षी, मानी, हिंमतदार व अधिकारी स्त्री होती. हिला विश्वासराव, माधवराव, नारायणराव, व आणखी एक असे पाच पुत्र झाले होते. [ मराठा रियासत. भा. २. ३; का. इ. सं. पत्रें. ४५२; नानासाहेब रोजनिशी. १ ११६; रामराजे चरित्र पृ. २९; राजवाडे १.२८९; ३.१५६; ६.१७०. ]

**गोपिचेट्टिपालेयम**—मद्रास. कोइमतूर जिल्हा. सत्यमंगलम् तालुक्याचें मुख्य ठिकाण एरोड ( रेल्वे स्टे. ) पासून २५ मैल आहे. लो. सं.( १९११ ) १०१६३. येथील जमीन पिकाला उत्तम असून लोक सुखवस्तु आहेत. सत्यमंगलम्पेक्षा हें शहर मोठें आहे. येथें कुरुंदाचा दगड पुष्कळ सापडतो.

**गोपीचंद**—कांचनपुरचा राजा जो त्रैलोक्यचंद्र त्याचा पुत्र. यानें आपल्या स्त्रीच्या सांगण्यावरून जालंदरनाथ नामक एका सिद्धपुरुषास खळ्यांत लीद भरून तींत पुरून टाकलें होतें. पुढें गोपीचंदाच्या मैनावती नामक आईस हें वर्तमान कळताच तिला फार दुःख झालें काहीं काळ लोटल्यानंतर जालंदराचा शिष्य कानिफनाथ हा फिरत फिरत आपल्या गुरूस जेथें पुरलें होतें त्या ठिकाणीं आला. तीन वेळां कानिफानें आपल्या गुरूस हाक मारिली तेव्हां जालंदरनाथ खळ्यांतून सजीव व निर्मळ देहानें बाहेर पडला. पुढें मैनावतीच्या विनंतीवरून जालंदरनाथानें गोपीचंदास अभय देऊन कृतकर्माची क्षमा केली. गोपीचंदानें पुढें विरक्त होऊन योगदीक्षा घेतली व मैनावतीसह तो जालंदरनाथाच्या भजनीं लागला. गोपीचंदाची कथा फार गातांना आढळतात.

**गोपीनाथ दीक्षित ओक**—हे काशीचे रहिवाशी असून तेथें यांचे वंशज असतात. यांचें घर पुण्यासहि नेनेघाटावर होतें. यांचे वडीलहि फार विद्वान होते. थोरल्या त्यावेळीं त्यांची कीर्ति बरीच असल्यानें बहुतेक यज्ञकर्मांत त्याना अध्वर्यवाचा मान मिळे. दीक्षित यज्ञांत तरबेज असत. वडिलांच्या मागें लहानपणींच त्यांनीं एकदां एक आध्वर्यव यथासांग पार पाडल्यामुळें त्यांचें नाव प्रसिद्ध झालें. यांनीं संस्काररत्नमाला नांवाचा ग्रंथ लिहिला आहे ( शके १६८७ ). यांनीं रघूजी आंग्रे यांना एक पत्र लिहिलेलें भा. इ. मं. च्या १८३५ च्या इतिवृत्तांत छापलें आहे. हे अग्निहोत्री असून गाणपत्य होते. हे मधून मधून दक्षिणेंत येत असत. [ अर्वाचीन कोश; भा. इ. सं. अहवाल १८३५ ].

**गोपीनाथपंत बोकील**—यास पंताजी गोपीनाथ असेंहि म्हणत. हा शहाजीच्या पदरीं होता; जिजाबाईबरोबर सोंगट्या खेळण्याइतपत याचा शहाजीच्या घरीं घरोबा असे. याला पंताजीकाका असें त्यावेळीं म्हणत. हा हिवरें ( जि. सातारा ) गावचा कुळकर्णी होता. अफजलखानाकडे याला शिवाजीनें आपला वकील म्हणून पाठविलें होतें. त्यानेंच अफजलचें मन शिवाजीची भेट दोन माणसांनिशीं घेण्यासाठीं वळवून त्याला प्रतापगडावरील माचीवर आणलें. अफजलच्या वधानंतर महाराजांनीं याला हिवरे गांव इनाम दिलें. तत्पूर्वी हा सुभेदारीवर होता. याचें आडनांव बोकील. याचाच वंशज प्रख्यात शाहीर सखारामबापू बोकील होय. [ राजवाडे खं. ४; प्रस्तावना; खं. २०; अफजलखानाचा पोवाडा. ].

**गोमंतक**—किंवा गोमांतक. ' गोवें ' पहा.

**गोमती**—संयुक्त प्रांतातली एक नदी. हिचा यजुर्वेदसंहितेंत उल्लेख आहे ( १९. १२ ). आरंभीं २० मैलपर्यंत हिचें पात्र फार उथळ आहे व ते उन्हाळ्यांत आटतें. पुढें ११२ लहान नद्या मिळाल्यावर ३५ व्या मैलापासून तिला नेहमीं पाणी असतें. शाहाजहानपूरखेरी रस्त्याच्या जवळ २५० फूट रुंदीचें पात्र झालें आहे. या पट्ट्यांतून ती मंद गतीनें जाते. सीतापूरपर्यंत २१३ नद्या येऊन मिळाल्यानें तिचें पात्र रुंद व खोल आणि प्रवाह जोराचा होतो. लखनौ येथें या नदीस४ पूल आहेत. जोनपूरला ही ६०० फूट रुंद होते. तेथें ६५७ फूट रुंदीचा पूल आहे. तेथून पुढें साई नदी मिळते तेथपर्यंत ही ३५० मैल वहात येते. नंतर बनारसमधून जाऊन एकंदर ५०० मैलांचा प्रवास करून ही नदी गंगेला गाझीपूर येथें मिळते.

गोमतीला वारंवार पूर येऊन नेहमीं नुकसान होण्याचा संभव असतो. लखनौ जोनपूर भागात नदीला उतार फारच थोडा म्हणजे मैलामागें ५।१० इंचाचा आहे. त्यामुळें पुराचें पाणी वाहून जात नाहीं १८७१ मधल्या पुरानें जोनपूर व आसपास मिळून १३,००० घरें वाहून गेलीं. महमदीपर्यंत थोटी आतात पण व्यापार फारसा नाहीं. धान्य, सर्पण, गवत ही खालीं जातात व दगड वर आणतात. या नदीचें पाणी शेताकडे उपयोगिलें जात नाहीं.

**गोमल घाट**—हा गोमल नदीच्या खोऱ्यानें अफगाणिस्तान बलुचिस्तानच्या हद्दीवरून अफगाणिस्तानात जातो. हा व्यापाराचा जुना व मुख्य मार्ग होय व अद्यापहि या रस्त्यानें दरसाल हजारों सशस्त्र व्यापाऱ्यांचे तांड्यांच्या तांडे उतरतात.

**गोमाटी** –गोमेटी हेनेरिया अंबेलाटा. ही एक जंगली भाजी आहे. तिचे वेल पावसाळ्यांत सह्याद्री पर्वताच्या जंगलात उगवतात. त्यास भाद्रपद आश्विन मासात फळें येतात. तीं तोंडल्यायेवढीं पण दोडक्यासारखीं कंगोरेदार असतात. कंगोर्‍यांची धार गोल असते. रची तोंडल्यासारखी अगर काकडीसारखी असते. फळ पिकलें म्हणजे मधाप्रमाणें गोड लागतें. गोमाट्याची भाजी बाजारात येण्याइतकी पुष्कळ मिळत नाहीं.

**गोमेद** ( अगेट )—कित्येक वालुकामय पदार्थांना हें नाव लावण्यात येतें. पुष्कळदा ज्वालामुखींतून निघालेल्या रसाचे हे बनलेले असतात. म्हणून या दगडांत मध्यावर पोकळी असते. ब्राझिलमध्यें एकदा एक ३५ टन म्हणजे १४० खंडी वजनाचा गोमेद सांपडला होता.

सुपीरिअर सरोवर व ऑंटेरिओ सरोवर याच्या आसपास अमेरिकेच्या संयुक्तसंस्थानात हा सांपडतो. हिंदुस्थानात राजमहाल, दख्खन व राजपिंपळ्यामध्यें रतनपूर येथेंहि सांपडतो. खंबायत येथें याचा कारखाना पुष्कळ दिवसापासून आहे. जबलपूर येथेंहि याचा कारखाना आहे. हा दक्षिण आफ्रिकेंत सापडतो व इंग्लंडात मिडल्स ब्रव्ह व चेव्हिअट डोंगरांत सापडतो.

उपयोग—हा कठिण असल्यामुळें रसायन शाळेंत लागणाऱ्या अति नाजुक तराजूंमध्यें याचा उपयोग होतो. तसेंच रासायनिक शाळेतील खलबत्ते याचेच असतात. शिवाय छत्र्यांच्या मुठी, कागद कापण्याच्या सुऱ्या वगैरे अनेक किरकोळ जिनसा याच्या करता येतात. याला रंग देता येतो. यास काळा रंग देणें असल्यास प्रथम साखरेच्या पाण्यात याला बुडवून ठेवितात म्हणजे तो साखर शोषून घेतो. नंतर गंधकाम्लात त्यास घालतात म्हणजे साखर जळून काळी पडते व या दगडास रंग चढतो. तांबडा रंग देणें झाल्यास लोहप्राणिद( फेरिक ऑक्साइड )चा उपयोग करतात. निळा किंवा हिरवा रंग देणें झाल्यास प्रथम कोणत्याहि लोहाच्या द्रावात भिजवून मग पालाशलोहि कर्बनत्रिद किंवा पालाश लोहोर्वनत्रिद यांच्या पाण्यात भिजवितात व पिंवळा रंग देण्याकरिता उद्हराम्लात भिजवितात.

**गोरखचिंच**—या झाडास संस्कृतमध्यें गोरक्षी, मराठींत गोरखचिंच, गुजराथींत गोरख आमली इत्यादि नांवें आहेत. हीं झाडें मोठीं होतात. त्याचीं पानें थोडीशी सावरीच्या पानासारखीं असतात. या झाडावर सुमारें वीतभर लांबीचीं दुध्या भोपळ्याप्रमाणें फळें येतात. या फळाची बाहेरील साल कठिण असते व फळात गिराचे गोळे असतात. हा गीर फार आंबट असतो. ह्याचा चिंचेसारखा उपयोग करितात. हा पित्तशामक, रुचिकर व पथ्यकारक आहे. ह्या झाडास चोरचिंच असेंहि कित्येक प्रांतात म्हणतात.

**गोरखनाथ**—कानफटे-योगीपंथाचा हा संस्थापक गणला जातो( ' कानफाटे ' पहा). ' गोरक्षनाथ ' या संस्कृत नावाचें हिंदीरूप गोरखनाथ आहे. याचा काल निश्चित नाहीं; कारण यासंबंधीं प्रचारांत असणाऱ्या आख्यायिका एकमेकींशीं मुळीच विसंगत आहेत. नेपाळात इ. स. ७ व्या शतकात होऊन गेलेल्या नरेंद्रदेव राजाशीं याचा संबंध जोडण्यात येतो. ( सि. लेव्हीचें ' ले नेपाल ' १. ३४७ ); तर उत्तर हिंदुस्थानात त्याला १५ व्या शतकातल्या कबीराचा समकालीन प्रतिस्पर्धी म्हणून लेखितात ( विल्सन–रिलिजिअस सेक्ट्स ऑफ दि हिंदुज, १. २१३ ). आणि पश्चिम हिंदुस्थानात १४ व्या शतकाच्या शेवटीं कच्छमध्यें कानफाटे पंथ सुरू करणारा जो धर्मनाथ त्याच्या गुरूचा मान गोरखनाथाला दिला जातो. गोरखनाथाचें अल्प चरित्र व त्याचा महाराष्ट्राशीं संबंध पुढीलप्रमाणें आहे:—

हा मच्छेंद्रनाचा शिष्य होय. हा जातीनें ब्राह्मण होता. गाईच्या शेणाच्या ढिगाऱ्यात याचा जन्म झाल्यानें याला गोरक्ष नाव मिळालें असें म्हणतात. यानें मच्छेंद्रनाथास स्त्रीराज्यांतून परत आणल्याची कथा ऐकिवात आहे. याचें नेहमीचें ठिकाण गोरखपुर जिल्ह्यात गोरखपूर येथें होतें

असें म्हणतात याचे संस्कृत व प्राकृत असे दोन्ही ग्रंथ आढळतात. व्रजभार्षेतहि याची काव्यरचना थोडीफार आहे रसायनशास्त्रावर गोरक्ष किमयागर नावाचा यानें एक ग्रंथ केला आहे व मराठींतहि एक छोटासा ' अमरनाथसंवाद ' नावाचा ग्रंथ असून, शिवाय हिंदी स्फुट कविता बरीच आहे. याचीं काहीं वाक्यें गोरखमत या नावाखालीं काहीं चोपड्यात प्रसिद्ध झालेली आहेत ( महा. सारस्वत ) याचा शिष्य गैनिनाथ व गैनिनाथाचा निवृत्तीनाथ ( ज्ञानेश्वराचा भाऊ ) होय ज्योतिषावरहि याचे काहीं ग्रंथ असावेत, मुहूर्त वगैरेवर गोरखमत म्हणून एक स्वतंत्र मत आहे. हा नवनाथापैकीं एक असून याचें चरित्र नवनाथभक्तिसारांत आलें आहे

ज्या गुरखासंस्थाननें नेपाळ जिंकून आपल्या कक्षेत आणिलें त्या गुरखासंस्थानची गोरखनाथ संरक्षक देवता म्हणून मानण्यात येते नेपाळची संरक्षक देवता पूर्वी मत्स्येंद्रनाथ असून पुढें या मत्स्येंद्रनाथाचें शिष्यत्व गोरखनाथाच्या गळ्यात घातलें असावें तिबेटात गोरखनाथाला एक बौद्ध मांत्रिक म्हणून समजण्यात येतें हिंदुस्थानात आजहि पुष्कळ ठिकाणीं गोरखनाथ सर्व शक्तिमान परमेश्वर मानिला जातो सत्ययुगात तो पंजाबात अवतरला. त्रेतायुगात गोरखपुर येथें, द्वापार युगात हुर्मुज ( ? ) गावीं, आणि कलियुगात काठेवाडातल्या गोरखमढींत तो राहिला असें त्याचे भक्त सागतात. राजा भर्तृहरीला गोरक्षनाथानें संन्यासदीक्षा दिली अशी एक कथा आहे कोठें कोठें या भर्तृहरीच्या जागीं गोपीचंदाला बसवितात. मराठी, हिंदी, बंगाली वगैरे वाङ्मय आधाराला घेऊन असें म्हणता येईल कीं गोरखनाथ हा एक प्रमुख शैवधर्मप्रचारक असून उत्तर हिंदुस्थानातील मध्ययुगीन भक्तिमार्गाच्या प्रगतीला अड वून धरण्याचें काम यानें केलें.

गोरखनाथासंबंधीं सुसंगत विवेचन व शोध अद्याप कोणी केलेले नाहींत. ही काल्पनिक व्यक्ति होती कीं नाहीं याविषयीं निश्चित सागता येत नाहीं. महायानी बौद्धसंप्रदायाचें नेपाळातील वर्चस्व झुगारून देण्याचें त्याचें महत्कार्य नेपाळच्या इतिहासकाराना चागलें दिसून येणार आहे. गोरखपंथाविषयीं विवेचन ' कानफाटे ' या लेखात केलेंच आहे.

**गोरखपुर**, जिल्हा—संयुक्तप्रांत गोरखपूर विभागाचा पूर्वेकडचा जिल्हा याचें क्षेत्रफळ ४५३५ चौ मै. आहे मुलुख साधारणतः सपाटच आहे. नद्या, ओटे, तळीं व दलदली बऱ्याच आहेत. पश्चिम–दक्षिण भागात नेहमीं पूर येण्याची भीति असते. गोप्रा ही मोठी नदी आहे नारायणी ( अथवा गंडकी ) ही दुसरी नदी वाहून वहाते नहर, रामगड, नरहर, रामभार, भिवरीनाल वगैरे तलाव आहेत. या जिल्ह्यात ॥ अल्युमिनम सापडतो.

येथें उन्हाळा फारसा नसतो, पण हवा तरतरी आणणारी नसून शिथिलता आणणारी आहे. तराई व जंगलाचा भाग यात नेहमीं मलेरिआ असतो. इतरत्र आरोग्य नादतें. पावसाचें मान साधारण ४५इंच असून उत्तरभागीं जास्त ( ५४ ) व दक्षिण भागीं कमी ( ४४ ) पडतो.

गोरखपूर जिल्ह्याचा जुना इतिहास म्हणजे केवळ असंबद्ध दंतकथावरून काढावयाचा आहे गौतमबुद्धाची जन्मभूमी उत्तरसीमेजवळ आहे. पाचव्या शतकात मगधच्या गुप्ताच्या राज्यात दक्षिण भाग होता दंतकथेवरून उत्तर भागीं भार लोक होते व त्याना रजपुतानीं हुसकून लावलें असें दिसतें चिनी ह्युएनत्संग सातव्या शतकात तो भाग ओसाड होता असें म्हणतो १२ व्या शतकात हा भाग कनोजच्या राज्यात होता तरी प्रत्यक्ष अंमल रजपुताचाच होता अकबराच्या वेळीं गोरखपूर सरकार अयोध्येच्या सुभ्यात होता अकबरानंतर अवरंगझेब गादीवर येईपर्यंत हा भाग पुन्हा जवळ जवळ स्वतंत्रच होता. अयोध्येच्या नबाबानें येथील छोटेखानी रजपूत राजापासून बरीच खडणी वगैरे घेऊन आपला बचक बसविला होता १८०१ मध्यें येथें इंग्रजी सत्ता आली नेपाळी लोकानीं आपली हद्द वाढवण्याचा प्रयत्न केल्यामुळें नेपाळचें युद्ध झालें १८५७–५८ च्या दंगलींत थोडावेळ येथेंहि अस्वस्थता माजली होती.

बौद्धकालीन स्तूप, देवळें वगैरे बरींच आहेत. जुने ताम्रपट बरेच सापडले आहेत. संशोधन अद्याप चागलें व पूर्ण झालेलें नाहीं. गोरखपूर जिल्ह्यात १५ शहरें व ७५५० खेडीं आहेत लोकसंख्या (१९२१) ३२६६८३०. येथून बरेच लोक परप्रांतीं व परदेशीं जातात. यात सहा तालुके आहेत हिंदू शेंकडा सुमारें ९० व मुसलमान सुमारें १०. शेंकडा ९४ लोकाची भाषा बिहारी आहे. शेंकडा बहात्तर लोक शेतीवर रहातात संयुक्त प्रातात दिसणारी रेताड, चिकण वगैरे सर्व जातींची जमीन यात आढळते. पूर्व व मध्य भागची जमीन अत्यंत सुपीक आहे वायव्येला तादूळ व ईशान्य कोपऱ्यात कोदन नावाचें धान्य होतें. जमाबंदीच्या वेळीं जमीनदारी, पट्टीदारी व भैयाचारा अशा तीन पद्धती होत्या. तादूळ, गहूं, वाटाणे, चणे इत्यादि पीकें मुख्य आहेत. कापूस, ताग वगैरे पिक काढण्याचा प्रयत्न केला पण यशस्वी झाला नाहीं. निळीचे मळे यूरोपियनाचे आहेत. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा मागसलेला आहे. शेंकडा २.८ ( ५.५ पुरुष २.१ स्त्रिया ) लोक साक्षर आहेत.

त ह शी ल—गोरखपूर जिल्ह्यातला तालुका यात तीन परगणे आहेत. क्षेत्रफळ ६५२ चौ. मै. लोकसंख्या ( १९११ ) ५३३६१३. दोन शहरें व १०८१ खेडीं. काळीचें उत्पन्न ३०४ हजार व कर ६५ हजार राप्ती, अमी, रोहिणी वगैरे नद्या आहेत वहितींत ८८० चौ मै. जमीन असून १९७ मैल जमीनीला पाणीपुरवठा होतो.

शहर.—संयुक्तप्रांत गोरखपूर जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. उ. अ. २६° ४५' व पू. रे. ८३° २२' हें रेल्वे स्टेशन आहे. लोकसंख्या (१९११) ५६८९२. शहर १८०० मध्यें वसलें. अकबराच्या वेळीं हें एका सरकारचें मुख्य ठिकाण होतें.

गोरखपूर शहर हें दिसण्यांत मोठेंसें सुंदर शहर नाहीं. वस्ती तुटक आहे म्हणजे घरांचशीं रोडीं जवळ जवळ असून मध्यंतरीं बगीच व शेती पसरली आहे. जिल्हा व डिव्हिजन व बंगाल नॉर्थवेस्टर्न रेल्वेची मुख्य ऑफिसें येथें आहेत. एक मोठा बगीचा व टाऊनहॉल आहे येथें हिंवाळ्यात गुरख्याच्या सैनिक भरतीकरिता डेपो उघडतात. येथें उद्योग धंदे, व्यापार वगैरे म्हणण्यासारखें काहीं नाहीं तरी येथील सुतार व पातारी प्रसिद्ध आहेत एक कॉलेज, दोन हायस्कुलें, व एक औद्योगिक शाळा आहे १८७३ पासून येथें स्थानिक स्वराज्याचे अधिकार मिळाले. येथें गोरखाचीगादी आहे येथें प्रथम गोरक्षनाथाचें एक भव्य देवालय होतें तें अल्लाउद्दीन बादशहानें मोडून त्यावर एक मशीद बांधिली नंतर पुन्हा नाथसंप्रदायिकांनीं मशीद मोडून देऊळ बांधिलें. पुन्हा अवरंगजेबानें तें मोडून मशीद बांधली. तेव्हा संप्रदायिकांनी दुसरीकडे देऊळ बांधलें तें हल्लीं कायम असून गोरखपुराच्या पश्चिमेस काहीं अंतरावर आहे. या देवळाच्या दक्षिणेस एक महादेवाचें व एक मारुतीचें अशीं दोन देवालयें आहेत

**गोरखमठा**—मुंबई. काठेवाड. सरस्वती नदीच्या तीरावरील पाटणापासून सुमारें ९मैल पूर्वेस असलेलें ठिकाण. कानफाट्या जोग्याचें हें मुख्य स्थान आहे देवांत गोरखनाथ व मच्छेंद्रनाथ याच्या मूर्ती आहेत

**गोरक्षण**—या चळवळीचा इतिहास दोन तऱ्हांनीं दिला पाहिजे. एक तर गोरक्षण ही धार्मिक चळवळ म्हणून इतिहास द्यावयाचा व ती आर्थिक चळवळ म्हणून द्यावयाचा धार्मिक चळवळीस प्रारंभ फारच प्राचीनकाळीं झाला असावा गाईसंबंधानें पूज्य बुद्धि व तिचें देवत्व हीं स्थापित कशीं झालीं यासंबधानें प्रो. राजारामशास्त्री भागवत असें स्पष्टीकरण करतात कीं भागवत या प्रथाचाच हेतु गोरक्षण धर्म गोपातळी ब्राह्मण समाजावर लादावयाचा होता काहीं जरी असलें तरी हें खास कीं सूत्रकाळी गोहननजुगुप्सा समाजांत वाढत चालली होती (वेदविद्या पृ. २२० पहा) गाईच्या पूज्यत्वविषयींची वृत्ति हिंदु संस्कृतीचा मुसलमानांनीं पाडाव करीपर्यंत होती आणि जेव्हा शिवाजीसारखे हिंदुत्वे पुरस्कर्ते पुढें झाले त्यावेळेस ते गोब्राह्मणप्रतिपालक हें नाव धारण करीत असत हिंदु राजे सामान्यतः गोवधास मनाई करीत असत व मुसुलमान राजे परवानगी देत ब्रिटिश राज्यामध्यें गोरक्षणाची चळवळ गेल्या पन्नास वर्षांत बरीच दिसून येते परंतु ती कोणत्याहि तऱ्हेनें व्यवस्थेशीर चालू नसल्यानें कधींकधीं गोरक्षणफंड, फंडगुडास किंवा कसायास श्रीमंत करण्यास योजिले जातात किंवा म्हाताऱ्या गाई पोसण्यास उपयोगी पडतात. या चळवळीकडे सर्व हिंदुस्थानचें थोडेंबहुत लक्ष लागलें आहे हें खरें. १९२४ डिसेंबरच्या काँग्रेसअधिवेशनाच्या वेळगावास भारतीय गोरक्षण परिषदहि भरली होती

गोरक्षण ही धार्मिक चळवळ या नात्यानें चालणें राजकीय परिस्थितीच्या विरुद्धतेमुळें शक्य नाहीं आर्थिक चळवळ म्हणून चालविली तर ती देशांतील पशुसपत्ति सुधारणें व वाढविणें हें ध्येय असलेली चळवळ म्हणून चालविणें आणि महत्वाची करणें शक्य आहे. व निरनिराळ्या प्रांतिक सरकारांनीं हिला सहानुभूति दाखविली आहे. तथापि पद्धतशीरपणानें ही संपत्ति वाढविण्याकडे सर्वच प्रांतिक सरकारांनीं जवळ जवळ सारखेंच औदासिन्य दाखविलें आहे.

**गोराकुंभार.**—हा भगवद्भक्त सर्व संतमंडळांत पोक्त असल्यामुळें यास गोरोबा काका किंवा नुसतें काका म्हणत हा जसा भगवद्भक्त तसाच स्पष्टवक्ताहि होता. हा वालेघाटावर तेरढोका म्हणून गाव आहे, तेथील रहाणारा. हा रात्रंदिवस विठोबाचें भजन करण्यात निमग्न असे त्यानं बरेच अभंग केलेले आहेत नामदेवाच्या डोक्यावर मडकीं घडण्याचें थापटणें मारून गोऱ्या कुंभारानें त्यास गुरुस शरण जाण्यास लाविलें अशी कथा आहे उद्धवचिद्धन यानें याचें ओवीबद्ध चरित्र मराठींत लिहिलें आहे. त्याचें देहावसान हा पंनास वर्षांचा असता पंढरपूर मुक्कामीं झालें. याचा जन्म शके ११८९ मधील होता तेरढोकी येथें त्याला इनाम होतें. नामदेवाच्या ठिकाणीं याचें प्रेम फार होतें [ मराठी रियासत पूर्वार्ध ]

**गोराडू**—यास नावें गुजराथी–रताळू, मराठी–कोनफळ किंवा गोराडू, कानडी हेग्गेणसू लॅटिन–डायोस्कोरा बल्बिफोरा अशीं आहेत गोराडू हा कंद असून तो जमिनींत तयार होतो वर चौधारी किंवा सहाधारी वेल येत असून त्याला करथासारखीं पानें येतात कित्येक वेळा पानावर व देठावर रंगीबेरंगी झाक असते. कंदाचा विशेष लागवड गुजराथेंत, इडर व आल्याच्या पिकांत करतात व ती दक्षिणगुजराथेंत जास्त प्रमाणांत आढळते कंदाचे लहान तुकडे करून तीन फूट अंतरानें वाफ्याच्या कडेनें लावितात. लागण मे महिन्यात होते असून कंद नोव्हेंबर डिसेंबरात काढण्यास तयार होतात कोंकणात वेलाटींत कोठें कोठें हे कंद करितात याच्या बऱ्याच जाती आहेत,

**गोराडूच्या मुख्य जाती**—(१) खाव अळू. याच्या प्रत्येक वेलाला ११३ लाव मुळ्या येतात. मुळातील मगज पांढऱ्या रंगाचा असतो. (२) छपरी अळू. याच्या मुळ्या आकारानें वाटोळ्या असतात व आंतील मगज पांढरा असतो (३) लाल अळू (तलवदा रताळू) याच्या मुळ्या दोन्ही टोंकाना बारीक असून मध्यें जाड्या असतात. आंतील मगजाचा रंग जांभळा पांढरा असतो दर एकरीं सरासरी उत्पन्न ५००० ते ८००० पाउंडपर्यंत येतें व कित्येक

वेळा एकएका कंदाचें वजन १० ते २० पौंडपर्यंत भरतें. कंद भाजून किंवा उकडून उपासाला खातात व गुजराथेंत याची भाजी करितात. पूर्वीच्या पावसाळ्यात तयार झालेले कंदाचे लहान लहान तुकडे करून निवाऱ्याच्या जागीं वेंशास मडक्यात पसरून ठेवावे व त्यावर माती टाकून ती ओली होईल इतकें तीवर पाणी शिंपडावें.थोड्याच दिवसानीं पावसाळ्याच्या प्रारंभास त्या तुकड्यास धुमारे फुटतात. फोनफळाचे कंद अवसर मिळाल्यास १-१॥ हातहि वाढतात व त्यास आजू-बाजूस फरगडे फुटतात म्हणून हे कंद लावण्याची जागा खोल व भुसभुशीत पाहिजे. खत दिल्यास कंद चागले फोसतात. हे कंद २।३ वर्षे सुद्धा जमिनींत ठेवितात. थंडीच्या दिवसात वेल मरून जातात; पण जमिनींत असलेल्या कंदास पावसाळ्यात पुन्हा धुमारे फुटून वेलाची व कंदाची वाढ पुन्हा सुरू होते. एका पावसाळ्याची वाढ कमी असते. दर वेलास २ ते ५ शेर वजनाचे कंद तयार होतात दोन वर्षांच्या वेलास दहा ते वीस शेरपर्यंत वजनाचे कंद वाढले आहेत काद्याचा कोंवळा भाग कापून खाण्यास उपयोग करावा जून भाग पुढील सालच्या पेण्याकरिता निवाऱ्याच्या जागीं रारेंत पुरून ठेवावा. फोनफळ उपासास खातात. बारीक तुकडे करून त्याची भाजी करितात. याचें किसून थालिपीठ करण्याकरिता दुसऱ्या पिठांत मिश्रण घालतात. याचा फुपाट्यात भाजून त्यात साखर अथवा गूळ घालून गोड पदार्थहि करितात.

*गोराण*—या झाडास लॅटिनमध्यें सेरिओप्स कँडोलिआना व रॉक्सबरघिआना; इंग्रजीत मॅंग्रोव्ह; देशी भाषेत गोराण किंवा गराण, किरारि, किरि, चंर्चरिअशीं निरनिराळीं नावें आहेत. सेरिऑप्स कॅन्डोलिआना व रॉक्सबुरघिआना या दोघांनाहि *गोराण, गरण, किंवा चवरी असें म्हणतात. यांपैकीं पहिलें नेहमीं* हिरवें असणारें झाड असून दलदलीच्या किनाऱ्यावर व खाडीच्या किनाऱ्यावर आढळतें. विशेषतः सिंधमध्यें हीं झाडें पुष्कळ आहेत. दुसऱ्या प्रकारचें झाड सुंदरवन आणि चितागॉंग किनाऱ्यापासून तों थेट खालीं तेनासरीमपर्यंत होतें. दोघाच्याहि वाढीला परिस्थिति सारखीच लागते. ह्या दोन्हीहि झाडाच्या सालींचा कातडीं कमाविण्याकडे चागला उपयोग होतो. *निरनिराळ्या सालींच्या नमुन्यातून टॅनिन्* आम्ल ( कातडीं कमाविण्याचें द्रव्य ) शेंकडा सुमारें १३ पासून ३१ पर्यंत निघतें. *या झाडापासून होणाऱ्या अर्कांचा कपड्यांना तपकिरी लाल रंग देण्याला* चागला उपयोग होतो. हा अर्क नीळीत मिसळल्यास त्यापासून उत्तम काळा अथवा जांभळा रंग तयार होतो. या झाडाच्या सर्व भागाचा स्तंभकासारखा उपयोग होतो. सालींचा काढा रक्तस्रावावर देतात. आफ्रिकेंत कोंवळ्या अंकुराचा उपयोग क्विनाइनच्या ऐवजीं करितात. याचें लाकूड कणखर असून त्यापासून कोळसा तयार होतो.

व्यापारः—कलकत्त्यास सुमारें १० पासून बारा हजार मण साल दर वर्षी विकली जाते. वाळलेल्या सालींचा उप फार मोठ्या प्रमाणावर होतो.

**गोरी बिदनूर**—म्हैसूरच्या कोलार जिल्ह्यातला तालुका. क्षेत्रफळ ३४३ चौ. मै. लो. संख्या ( १९११ ) १०५१६. *गोरीबिदनूर हें एकच शहर व २१७ खेडीं आहेत.* १९०३-४ सालीं सान्याचें उत्पन्न १६०,०००. पेनार नदी यांतून वहाते. जमीन फार सपाट आहे. शहर भोंवतीं बरीच सुपीक जमीन आहे. इकडील विहिरी फार खोल नसतात तरी भा त नाहींत ऊंस, तांदुळ, हळद, भुईमुग, नारळ वगैरेंची पुष्कळ लागवड होते. या जिल्ह्यात टॅंकल्यातून लोखंडहि विपुल आहे.

**गोरी**—हें आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील एक बेट. *सेनिगॉलच्या फ्रेंच वसाहतीचा एक भाग आहे. केपव्हर्ड द्वीप* कल्पानें बनविलेल्या नैसर्गिक बंदराच्या मुखाशीं हें बेट आहे. हें बेट९०० यार्ड लाब,३३० यार्ड रुंद व मुख्य भूमिभाग पासून ३ मैल अंतरावर असून बहुतेक रुक्ष खडक आहे. याचा बराच भाग एका शहरानें व्यापलेला आहे. हें शहर पूर्वी भरभराटीचें व्यापारी ठिकाण व मजबूत लष्करी ठाणें होतें. १९०६ सालापर्यंत हें स्वतंत्र बंदर होतें. जवळच डॅकर शहराची भरभराट झाल्यामुळें येथील व्यापार मंदावला १९०५ मध्यें येथील जोलोफ लोकाची संख्या १५०० होती. येथील निरोगी हवेमुळें याचा स्नानालयासारखा उपयोग होतो. येथील रस्ते अरुंद आहेत व घरें फारकरून तांबड्या दगडाचीं बांधलेलीं असून त्याचीं छपरें सपाट असतात. सेंटमायकलचा किल्ला, गव्हर्नरचें गृह, इस्पितळ व लष्करी चाळी या इमारती याच्या पूर्वमहत्वाची साक्ष पटवितात. किल्ल्यात एक विहीर आहे. हिचें पाणी व पावसाचें साठविलेलें पाणी हाच येथील पाणीपुरवठा होय. सातव्या शतकाच्या आरंभीं डच लोकानीं या बेटाचा ताबा घेतला व त्यानींच याला हें नाव दिलें. याचें एतद्देशीय नाव बिर बीर म्हणजे पोट. याचा आकार पोटासारखा आहे. १६६३ मध्यें हें इंग्लिशानीं घेतलें होतें. परंतु डि रूटरनें पुढल्या वर्षी परत घेतलें. १६७७ मध्यें फ्रेंच लोकानीं डच लोकाना कायमचें हाकून लावलें लागलीच गोरी इंग्लिशाच्या हातीं पडलें परंतु फ्रेंचानीं याचा १८१५ मध्यें ताबा घेतला.

**गॉर्डियम**—गॉर्डियम हें फ्रिजियातील प्राचीन शहर सॅंजेरियस नदीजवळ असून पेसिनसपासून ॲंसिराला जाणाऱ्या इराणी 'राजमार्गावर' हें शहर होतें. गॉर्डियस नावाच्या एका फ्रिजियन शेतकऱ्यानें हें शहर स्थापिलें. चार *चाकाच्या गाड्यात बसून देवळापर्यंत जो पुरुष पहिल्यानें येईल त्याला राजा निवडावें अशी देववाणी झाली व त्या* प्रमाणें गॉर्डियस राजा झाला. त्याच प्रमाणें येथील गॉर्डियस गाठ जो सोडील त्यास आशीयाचें साम्राज्यपद मिळेल अशी देववाणी असल्यामुळें शिकंदर बादशहानें तरवारीनें

ही गांठ कापली. इ. स. पूर्वी १८९ त हें शहर गॉल लोकांनी काबीज केलें व याचा नाश केला.

**गोलपाडा जिल्हा.**—आसाममधील एक जिल्हा. ब्रह्मपुत्रेच्या दोन्ही बाजूंस पसरला आहे. ब्रह्मपुत्रेच्या आसाम-बंगालच्या वळणाच्या बाजूचा (२३१९ चौ. मैलाचा) प्रदेश. हा कायमधारा याच्या पद्धतीखालीं आहे. पूर्वद्वाराचा प्रदेश भूतानच्या डोंगराच्या पायथ्याशीं आहे (क्षे. १५७० चौ. मै.). जिल्ह्याचें एकंदर क्षेत्रफळ ३९११ चौ. मै. भूतान पर्वतांतून उतरणाऱ्या नद्यांतून बहुधा वर्षभर होड्या चालतात. खालून गारो पर्वतांतून दोन नद्या येतात. ह्या प्रदेशांतील बहुतेक जमीन वालुकायुक्त मातीची बनली असून आसामपेक्षा येथील थंडी ( हिंवाळा ) कमी व उन्हाळा जास्त कडक असतो. उष्णतामान साधारणतः ८३° च्या वर जात नाहीं. पूर्वद्वार व सराई हीं मलेरियादूषित आहेत. इतरत्र पावसाचें मान ८०।९० इंच आहे. पण पूर्वद्वारात ६०।७० पडतें. ह्या बाजूच्या सर्व प्रदेशाप्रमाणेंच ह्या भागात बरेच वेळा भूकंप होतात. त्याचप्रमाणें पुरापासूनहि या भागाला भय असतें. साधारणतः घरें बांबूंच्या कुडाचीं करतात. या प्रदेशाचा पूर्वेतिहास ज्ञात नाहीं. १६ व्या शतकात कोच जातीचा विश्वसिंह याचें व नंतर त्याच्या वंशजाचें राज्य होतें. त्यापुढें मोंगलाची सत्ता येथें प्रस्थापित झाली. १७६५ मध्यें बंगालच्या दिवाण-गिरीबरोबर हा इंग्रजाकडे आला. पूर्वद्वार तर १८६५ पर्यंत भूतिया लोकाकडे होतें. त्या सालीं तो भाग इंग्रजाकडे आला. उत्तर व दक्षिण टेकड्यांतल्या रानटी जाती नेहमीं त्रास देत व हल्ले करीत. १८६१ मध्यें त्याचा बराच बंदोबस्त करण्यात आला. १८७४ मध्यें ह्याला व्यवस्थित स्वरूप देऊन आसामला जोडला. १९२१ मध्यें लो. सं. ७६२५२३ होती. शेंकडा ६९ बंगाली भाषा बोलतात. बोडो भाषा व बोडो लोक यांचा भरणा बराच आहे. या जिल्ह्याचे धुब्री व गोलपाडा असे दोन भाग पाडले आहेत. शहरें २ व खेडीं २१३५ आहेत. शेती हाच मुख्य धंदा असून शेंकडा ८४ लोक शेतीवर रहातात. जमीन साधारण प्रतीचीच आहे. पूर्वद्वारात टेकड्यांमधून वहाणाऱ्या प्रवाहावर भातशेती करतात व पीक उत्तम येतें. येथें पुराचें भय नाहीं पण दुसऱ्या (कायम धान्याच्या ) भागात पुराचें भय असून पिकाचीहि खात्री नसते. इकडील जंगल फार दाट व महत्वाचें आणि पैदाशीचें आहे. कनिष्ठ प्रतीचा कोळसा गारो टेकड्यांत आढळतो. उद्योगधंदेहि महत्वाचे व मोठाले नाहींत. पितळेचीं भांडीं, मातीचीं भांडीं व टोपल्या वगैरे होतात. रेशमी सुती कपडा स्थानिक खपापुरताहि होत नाहीं. परदेशी मालाच्या व्यापारालाहि चांगली जागा आहे. सर्व व्यापार कलकत्त्यापासून चालतो. आयात माल कापड, मीठ, करण्या, तेल, तंबाखू, डाळी, चटया वगैरे निर्यात माल मोहरी, ताग, लाकूड, धान्य, पानें वगैरे. बिलासीपारा येथें इमारती लाकडाचा व्यापार चालतो. भूतानमधून रुई व रबर येतो. रेल्वे अद्याप चांगली पडली नाहीं. व्यापार बोटींनी होतो. ब्रह्मपुत्रेतून बोटी चालतात व लहान नद्यांतून होड्या येतात. रेल्वे होत आहे ( १९०८ ) ४६४ मैल कच्ची सडक आहे. नद्यांवर पूल नाहींत; होड्या व बोटी चालतात.

**शहर**—१८७९ पर्यंत जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें. उ. अ. २६°१०′ व पू. रे. ९०°३८′. लो. सं. ( १९११ ) ५९६४. पूर्वी हें कंपनीच्या सरहद्दीवर होतें. व येथें वस्ती करून राहिलेल्या यूरोपियनांनीं ( इंग्रजांनीं ) केवळ जबर-दस्तीनें बंगालचा व्यापार आपल्या ताब्यात घेतला. १८९७ च्या भूकंपानें येथें बरेंच नुकसान झालें. १८७८ त येथें म्यु. क. स्थापन झाली. येथें मिशनरी आहेतच. हें व्यापाराचें ठिकाण आहे. येथें बोटी येतात. ताग, मोहरी, कापूस, साल यांचा व्यापार दांडगा आहे. मीठ, धान्य, तेल, कापड वगैरेची आयात होते. ठोक व्यापारी मारवाडी व किरकोळ दुकानदार मुसुलमान आहेत.

**गोलमापक**—या यंत्रास इंग्रजींत ( स्फेरोमिटर ) असें नाव आहे. या यंत्राच्या सहाय्यानें कोणत्याहि गोलकाची किंवा गोलकाच्या तुकड्याची त्रिज्या काढता येते. तसेंच एखाद्या पदार्थाची जाडी सूक्ष्म प्रमाणात काढता येते.

या यंत्रास तीन पाय असतात. मध्यंतरीं एक मळसूत्र ( स्क्रू ) बसविलेलें असतें या स्क्रूचा एक फेरा ५ मिलिमि-टरइतका असल्यास वरील तबकडीच्या वर्तुलाचे ५०० भाग केलेले असतात. यामुळें एका भागाच्या योगानें ·०१ मिलिमिटर इतकें अंतर मापता येतें. एक इंच म्हणजे सुमारें २५·४ मिलिमिटर होतात अर्थात् वरील यंत्रानें इंचाच्या इवाइतक्या सूक्ष्म प्रमाणात अंतराचें मापन करता येतें. या यंत्रानें गोलकाची त्रिज्या कशी काढतात हें सांगण्या-पूर्वी अंतराचें मापन कसें करितात हें प्रथमतः देतों. समजा की आपणास एका कांचेच्या तुकड्याची जाडी मोजावयाची आहे, तर प्रथमतः हें यंत्र एका सपाट पृष्ठ-भागावर ठेऊन मध्य स्क्रू किंचितसा चिकटेल असा ठेवून नंतर तो स्क्रू वर उचलतात. नंतर कांचेचा तुकडा ठेवून फिरून एकवार तो स्क्रू त्या कांचेच्या तुकड्यास स्पर्श करील असा आणून ठेवतात. सपाटीवर स्क्रू असताना व सध्याच्या स्थितींत असताना किती फेऱ्याचा फरक असतो हें मोजून काढतात, व त्यावरून कांचेची जाडी काढता येते.

आता गोलकाची त्रिज्या कशी काढतात ते पाहूं. प्रथ-मतः पायाचें अंतर मोजतात. या यंत्राचे तीन पाय मिळून एक समभुज-त्रिकोण होतो. नंतर एका सपाट पृष्ठ-भागावर हें यंत्र ठेऊन मध्य स्क्रू सपाटीपर्यंत आणतात. नंतर स्क्रू वर उचलून घेऊन यंत्र इष्टगोलकावर किंवा गोल-काच्या तुकड्यावर ठेवितात. व स्क्रू खालीं आणून तो गोलकाच्या भागास किंचित चिकटेल असा ठेवतात. यामुळें त्या तीन पायांच्या दरम्यान त्या गोलकाची

आहे ह कळलें समजा कीं ही उंची 'ह' आहे, आणि त्या दोन पायामधील अंतर 'अ' आहे, तर र =(त्या गोलकाची त्रिज्या) पुढील नित्य-समीकरणानें काढता येते –

$$र = \frac{(अ^2 + ३ ह^2)}{६ ह}$$

याप्रमाणे वरील समीकरणाचा उपयोग होतो वरील समीकरण गणिताच्या आधारें सिद्ध झालें आहे

**गोला**—मुंबई इलाख्यांत यांची लो स १३०९१ आहे राणा नांवाचे गोला लोक सर्व गुजराथ व काठेवाड प्रांतभर आहेत यांचा परंपरागत धंदा तांदूळ कांडण्याचा असून आपण रजपूत आहों असें ते म्हणतात व आपल्या नांवाला राणा हा शब्द जोडतात हे काश्यप व बाजसानी गोत्राचे असून यांमध्यें पुष्कळ आडनांवें आहेत औदिच, रायकवाल, मेवाड अथवा श्रीमाळी ब्राह्मण हे यांचे उपाध्ये आहेत

सुरत शहरांमधील गोला लोकांमध्यें मूळचे नवापुरा व बेगमपुरा असे दोन वर्ग होते पुढें कांहीं दिवसांनीं नवापुरा लोकांचे १५ व बेगमपुरा लोकांचे ७ पोटवर्ग झाले या पोट वर्गांचेहि लहान लहान तुकडे झालेले आहेत प्रत्येक पोटवर्गाची वेगळी पंचायत असून तिचा अधिकार त्या पोट वर्गातील सर्व तुकड्यांवर असतो जातीच्या सर्व लोकांची एक कायमची मध्यवर्ती पंचायतहि आहे हींत २२ पटेल व २२ मोहोलदार असून हिचा मुख्य पटेल सुरत येथील गोला लोकांमधून निवडला जातो मुख्य पटेलाच्या हाता खालीं नवापुराचा एक व बेगमपुराचा एक असे दोन अधिकारी असतात पोटवर्गाच्या अधिकाऱ्याच्या निकालावर मध्यवर्ती पंचायतीकडे अपील करता येतें पोटवर्गाची पंचायत बोलाविण्याबद्दल (फिर्याद आणणाराला) ८ आण्या पासून ५ रु पर्यंत फी भरावी लागते पटेलाला पंचायत बोलवावयाची असल्यास फी लागत नाहीं मध्यवर्ती पंचायत बोलविण्याबद्दल ७ रु ८ आ भरावे लागतात बोलविण्याचें काम ब्राह्मण करितो व त्याबद्दल त्याला ८ आणे मिळतात मध्यवर्ती पंचायतीच्या सभेस सर्व पटेल मोहोलवाले हजर असावे लागतात मध्यवर्ती पंचायतीच्या सभेस सर्व गोला लोकांना येण्याची परवानगी आहे परंतु सभेंत बोलण्याची व मतें देण्याची मनाई आहे अंत्यविधीला न जाणे, ठरलेला हुंडा न देणें इत्यादि जातिनियमभंगाबद्दल पोटवर्गाच्या पंचायती दंड करतात लग्न मोडणें, दारू पिणें व मांस खाणें परजातीय स्त्रीशीं संबंध ठेवणें इत्यादि विशेष मोठ्या गुन्ह्यांचा निकाल मध्यवर्ती पंचायत करिते दक्षिण उत्पन्न जातभेवणाची माडी विकत घेण्याकडे साधू व ब्राह्मण भोजनाकडे खर्चिलें जातें बंगाल–बिहार–ओरिसांत गोलांची बरीच वस्ती आहे [ से रि १९११ ]

**गोला**—संयुक्तप्रांत खेरी जिल्हा महमदी तालुक्यांतलें एक शहर लखनौ बरली रेल्वेचें स्टेशन याची लो स (१९०१) ४९१३ हें ठिकाण बरेंच जुनें असून बौद्ध कालीन लेणीं व मातीच्या पक्क्या मूर्ती आसपास सांपडतात जवळच साल जंगल आहे पूर्वेला गोकर्णनाथाचें मंदिर आहे तें सर्व अयोध्याप्रांतांत प्रख्यात आहे गोला हें व्यापाराचें एक मुख्य ठिकाण आहे धान्य व साखर हीं बाहेर जातात येथें शाळा व दवाखाना आहे गोरखपूर जिल्ह्यातहि एक गोला नांवाचें गांव आहे

**गोलाघाट**—आसामच्या शिवसागर जिल्ह्यातील गोला घाट पोटविभागाचें मुख्य ठिकाण धनसीरी नदीच्या उजव्या तीरावर उ अ २६ ° ३१' व पू रे ९३ ° ५९' वर वसलें आहे लो स (१९०१) २३५९ येथें 'युनिअन' आहे व्यापार वाढता आहे मुख्यत तो मारवाड्यांच्या हातीं असून ते जवळच्या चहाच्या मळ्याच्या मालकांशीं व्यापार करतात कापूस, मोहरी व गूळ हीं बाहेर जातात व कापसाचा कपडा, धान्य, डाळी, रॉकेल, मीठ, तेल वगैरे आंत येतात पावसाळ्यात गोलाघाटपर्यंत लहान आगबोटी येतात पण उन्हाळ्यात त्या शिकारी घाटपर्यंत ( १८ मैला वर ) येतात रेल्वे स्टेशन ८ मैलावर कमरबंदअली म्हणून आहे खासगी हायस्कूल व इतर कचेऱ्या, दवाखाना, पोलिस वगैरे नेहमींप्रमाणें व्यवस्था आहे

**गोलुंदो**—बंगाल फरीदपूर जिल्ह्यातला एक पोटविभाग क्षेत्रफळ ४६६ चौ मैल यांत खेडीं १२३३ आहेत पैकीं राजबारी हें मुख्य ठिकाण आहे जमीन उत्तम सुपीक आहे हवामान चांगलें आहे नेहमीं मलेरिया असतो ईस्टर्न बंगाल स्टेट रेल्वे यातून जाते व आगबोटीहि ( नद्यातून ) चालतात मुख्य ठिकाण गोलुंदो हें रेल्वे व आगबोटी यांचें स्टेशन आहे उ अ २३° ५२' व पू रे ८९° ४६' हें व्यापाराचें केंद्र आहे पागसा व बेलगांची हीं व्यापाराचीं ठिकाणें आहेत येथून आसामांत मजूर रवाना होतात

**गोलेर**—पंजाब कांग्राजिल्हा डेरा तालुक्यातलें एक वतन क्षेत्रफळ २५ चौ मैल हें कांग्राचा राजा हरिचंदानें स्थापलें. अकबर व शहाजहान यांच्या वेळीं या घराण्यातील पुरुषांनीं बादशाहीस बरेंच साहाय्य केलें १८१२ मध्यें या घराण्याचें संस्थान जप्त करण्यांत आलें व हल्लीचें २० खेड्यांचें वतन पुन्हा चालू करण्यात आलें याचा वसूल २६००० रु आहे

**गोल्ड कोस्ट**—पश्चिम आफ्रिकेंतील गिनीकोस्टचा एक भाग हा भाग पश्चिमेस असीनीपासून पूर्वेस व्होल्टा नदी पर्यंत पसरला आहे येथील नद्यांतील वाळूत सोनें सांपडतें म्हणून या प्रांताला गोल्डकोस्ट हें नांव पडलें आहे सध्या हें नांव साधारणपणें ब्रिटिशांच्या गोल्डकोस्ट वसाहतीला लावतात हिच्या पश्चिमेस आयव्हरी कोस्ट वसाहत ( फ्रेंच ), पूर्वेस टोगोलॅंड ( जर्मन ) व उत्तरेस अशांटी व ब्रिटिशांचा मुलूख आहे गोल्ड कोस्ट वसाहतीचें क्षेत्रफळ २४,२००

चौरस मैल असून लोकसंख्या दहा लक्षाहून जास्त आहे. प्रा, व्होल्टा, अँकोत्रा ह्या येथील मुख्य नद्या होत.

किनाऱ्याच्या बाजूनें मधून मधून चुनखडीचे खडक आहेत; पण ते वाळूच्या थराखाली झाकलेले आहेत अंतर्भागांत चिकणमातीचा व सुवर्णप्रसव गारगोट्याचा मोठा संचय आहे. किनाऱ्यावरील हवा फार उष्ण,सर्द व रोगकारक आहे. एप्रिलपासून ऑगस्टपर्यंत जोराचा पाऊस पडतो. डिसेंबरच्या अखेरीपासून मार्चपर्यंत कडक उन्हाळा असतो.

वसाहतींचा तीनचतुर्थांश भाग अरण्याच्छादित आहे. महोगनी, टेंपुरणी, शेवरी वगैरेंची झाडें या जंगलात पुष्कळ आहेत काळवीट, चित्ते, कोल्हे, म्हशी, वानर, वगैरे प्राणी या जंगलात संचार करीत असतात. एतद्देशीय लोक हे निग्रो जातीचे आहेत. फाटी ही पुष्कळ जातींपैकीं एक प्रमुख जात होय फाटी भाषा वसाहतींत सर्वत्र चालते हे लोक उत्तरेकडून आले व किनाऱ्यावरील जातींना यानीं जिंकलें. फाटी खेरीज करून आकीम, आगा, आक्विम वगैरे जातीहि या ठिकाणीं वास करितात

गोल्डकोस्ट येथें बोलण्यात येणाऱ्या भाषेचीं, ट्वी, त्वी किंवा चीं अशीं निरनिराळीं नावें आहेत. हींत फाटी, अक्याम वगैरे पुष्कळ प्रांतिक भाषांचा समावेश होतो. गोल्ड कोस्टच्या आग्नेय भागात गा अथवा आक्रा ही भाषा बोलतात

महमदी व ख्रिस्ती या दोन्ही धर्मांचा प्रसार येथें होत आहे. मिशन यानीं प्राथमिक शिक्षणाच्या शाळा घातल्या आहेत. सरकारनें चालविलेल्याहि कांहीं शाळा आहेत. एतद्देशीय लोक बुद्धिमान आहेत. या लोकात प्रेताला घराच्या आवारात पुरण्याची चाल होती पण ब्रिटिश अधिकाऱ्यानीं १८७४ ती बंद केली.

येथील जमीन फार सुपीक आहे. लोकाच्या गरजा फार थोड्या असल्यामुळें त्यांची प्रवृत्ति आळसाकडे विशेष दिसून येते. नुसत्या जंगलाचेंच उत्पन्न पुरून उरेल इतकें होतें. कापूस, बटाटे, कांदे, भुईमूग इत्यादि पिकाची लागवड होते. सोनें, ताडाचें तेल, कोको, रबर, इमारतीचे लांकूड इत्यादि वस्तू येथून बाहेर देशीं व्यापाराकरिता जातात. तांदूळ, साखर, तंबाखू, कापसाचा तयार केलेला माल वगैरे जिन्नस बाहेरून या ठिकाणीं येतात.

वसाहतींत सरकारनें बांधलेला व सरकारच्या मालकीचा एक लोहमार्ग आहे. शिवाय बैलगाडीचे रस्ते, नद्या, तारायंत्रें वगैरे दळणवळणाचीं साधनें आहेतच गोल्ड कोस्ट ही बादशाही वसाहत (क्राउन कॉलनी) आहे येथील राज्यकारभार गव्हर्नर पहात असून त्याला मदतगार म्हणून एक कायदेमंडळ आहे. त्यात सरकारी व सरकार-नियुक्त-बिनसरकारी सभासद आहेत. एतद्देशीय कायद्यांना व चालीरीतींना सरकार होता होईतो हात लावीत नाहीं. हे कायदे फार विस्तृत व गुंतागुंतीचे आहेत. जमीनीवर व्यक्तीची मालकी फार करून नसते कुटुंबाचा किंवा जातीचा जमीनीवर सार्वजनिक ताबा असतो. कुटुंबाच्या किंवा जातीच्या प्रत्येक माणसाला आपल्या उपयोगापुरता जमीनीचा कोणताहि भाग तोडून घेण्याचा हक्क आहे मनुष्याच्या मरणानंतर त्याची मालमत्ता त्याच्या बहिणीच्या मुलाना मिळते. प्रत्येक जातीचा राज्यकारभार त्या त्या जातीचा राजा पहात असतो राज्यकारभाराकरिता वसाहतीचे तीन प्रांत केले आहेत प्रांताचे जिल्हे पाडले आहेत प्रत्येक जिल्ह्यावर कमिशनर असून तो न्याय व अंमलबजावणी हीं दोन्ही कामें करतो. वसाहतींतून गुलामगिरी मोडण्यात आली आहे जकात व रेल्वे ह्या उत्पन्नाच्या मुख्य बाबी होत.

गोल्डकोस्ट फ्रेंच नाविकानीं शोधून काढला की पोर्तुगीज लोकानीं शोधून काढला हा मोठा वादग्रस्त प्रश्न आहे. इतकें मात्र खरें कीं डायओगोडी आझाबुजा याच्या नेतृत्वाखालीं पोर्तुगीजाच्या ताब्यानें १४८१-८२ या वर्षी एलमिना काबीज केलें. १५५३ त इंग्रजी जहाजानी गिनीमधून १५० पौंड वजनाचें सोनें आणलें यामुळें गोल्डकोस्टच्या सुवर्णभूमीची कीर्ति यूरोपमध्यें सर्वत्र पसरून यूरोपीयन राष्ट्राच्या झुंडीच्या झुंडी या ठिकाणीं लोटू लागल्या पोर्तुगीजाना एलमिना येथून डच लोकानीं हुसकून लावलें. १६५१ च्या आधींच इंग्रजी कंपनीनें कॉरमॅंटाईन येथें एक किल्ला बांधला होता पुढें दहा वर्षांनीं केप कोस्ट कॅसल बांधण्यात आला १६६४-६५ मध्यें इंग्लंड व हॉलंडमध्यें झालेल्या युद्धात केप कोस्टचा किल्ला वचावला. १६७२ त दुसऱ्या चार्लसनें दिलेल्या सनदेच्या आधारावर रॉयल आफ्रिकन कंपनीनें पुष्कळ ठिकाणीं किल्ले बांधले. १७०० मध्यें रॉयल ऑफ्रिकन कंपनी मोडण्यात येऊन तिची जागा १७५० त आफ्रिकन कंपनी ऑफ मर्चन्टसनें घेतली. १८२१ त तीहि मोडण्यात येऊन किल्ल्याचा ताबा प्रत्यक्ष राजेसाहेबांनीं आपल्याकडे घेतला १८१७ त अशाटीनें किनाऱ्यावरील शहरांतील देश्य लोकावर ब्रिटिशाचा ताबा मान्य केला. १८२४ त फाटी व अशांटी यांत कलह लावून आपलें वजन अन्तर्भागात स्थापण्याचा सर चार्लस मॅकार्थी या इंग्रजी गव्हर्नरानें प्रयत्न केला पण त्यात त्याला यश न येऊन तो मारला गेला. १८२६ त दोदोवा येथे इंग्रजांनीं अशांटीवर जय मिळविला. १८२८ त येथील सर्व किल्ले एका व्यापारी कमीटीकडे सोंपविण्यांत आले. या कमीटीनें जार्ज मॅक्लीअन याला आपला गव्हर्नर नेमलं. या गृहस्थानें ब्रिटिश सत्ता अन्तर्भागात अबाधीतपणें स्थापिली, १८४३ त वसाहत कचेरीनें येथील कारभार स्वत च्या हातात घेतला. १८४४ त एतद्देशीय अधिकाऱ्याशीं करार होऊन गोल्डकोस्ट वसाहतींवरील अपराध्याची चवकशी करण्याचा व नरबली अर्पण करण्याच्या चालीचा उच्छेद करण्याचा हक्क ब्रिटिशास मिळाला १८५० त डॅनिश किल्ला व १८७१

त इच किल्ला विकत घेऊन ब्रिटिशांनी किनाऱ्याकडील आपली सत्ता अधिक कायम केली. १८७३–७४ च्या अशांटी युद्धानें तर ब्रिटिश वर्चस्वाचें क्षेत्र आधिकच वाढलें. १८७४ त गोल्डकोस्ट लेगॉस येथील ठाण्याची मिळून स्वतंत्र बादशाही वसाहत ( क्रौन कॉलनी ) करण्यात आली. पण १८८६ त गोल्डकोस्टपासून लेगॉस वेगळें काढण्यांत आलें.

**गोल्ड-स्टकर, प्रोफेसर**–हा एक संस्कृत पंडित एका यहुदी कुळात जन्मास आला होता. त्याचें उच्च शिक्षण बॉन येथें झालें. बर्लिन येथे अध्यापकाचें काम करण्यास जरुर तेवढें शिक्षण त्यानें मिळविलें. त्यानें प्रथम अमरकोशाच्या प्रास्ताविक श्लोकावर लेख लिहून तो प्रसिद्ध केला यानंतर त्यानें 'प्रबोध चंद्रोदय' या पुस्तकाचें भाषान्तर प्रसिद्ध केलें. व 'मानव कल्पसूत्र' या हस्तलिखित पुस्तकास प्रस्तावना लिहिली ती पुढें पाणिनि व त्याचें संस्कृत वाङ्मयात स्थान या नावानें प्रसिद्ध झाली आहे डॉ विल्सन याच्या संस्कृत कोशाची सुधारलेली आवृत्ति तो तयार करीत होता पण त्याच्या अनपेक्षित मृत्यूमुळें हें काम अपुरें राहिलें त्याला हिंदी वैद्यकाचीहि माहिती होती प्रोफेसर गोल्डस्टकर घरचा श्रीमंत होता. लंडन येथें विद्यालयात त्यानें संस्कृत भाषेच्या अध्यापकाचें काम केलें होतें

मृत्यूसमयीं तो भाषाशास्त्रविषयक मंडळाचा अध्यक्ष व रॉयल एशियाटिक सोसायटी मंडळाचा सभासद होता कोणतीहि गोष्ट लिहीत असता त्याला लेखात येणाऱ्या विधानाच्या सत्यतेची चाड विशेष असे त्यामुळें त्याचीं कांहीं पुस्तकें अपुरीं राहिलीं.

**गोल्डस्मिथ ऑलिव्हर** ( १७२८–१७७४ )—एक आंग्ल कवि. याचें बी. ए. पर्यंत शिक्षण झालें होतें द्रव्यार्जनाकरिता त्यानें पाच सहा धंदे करून पाहिले, परंतु दुर्दैवानें त्या सर्वांत त्याला अपयश आलें शेवटीं त्यानें परदेशगमन केलें त्याच्या परदेशच्या प्रवासांत त्याच्या उपजीविकेचें साधन बासरी होतें. १७५६ सालीं तो इंग्लंडला परत आला. तेथें आल्यावर पुस्तकें विकण्याच्या दुकानातून नोकरी केली व अखेर या सर्व उद्योगांना कंटाळून त्यानें लेखक होण्याचें ठरविलें गोल्डस्मिथचें ज्ञान फार तुटपुंजें होतें. त्याला एकाहि विषयाची पूर्ण माहिती नव्हती, परंतु स्वतःच्या ज्ञानाचा त्यानें लोकांना आश्चर्य वाटेल असे लेख लिहिण्यात उपयोग करून घेतला त्याचीं काल्पनिक संविधानकें चांगली नाहींत परंतु त्याची मांडणी चांगली केलेली आहे. ' दि ट्रॅव्हलर '(प्रवासी) नांवाच्या काव्यात त्यानें एका प्रवाशाचें वर्णन दिलें असून शेवटीं सुख हें राजकीय संस्थांवर अवलंबून नसून मनाच्या स्थितीवर अवलंबून असतें असें दाखविलें आहे. ' डेझर्टेड व्हिलेज ' नांवाच्या त्याच्या दुसऱ्या काव्यात त्यानें पुष्कळ असंबद्ध विधानें केलीं आहेत. परंतु केवळ काव्य या दृष्टीनें त्याच्याकडे आपण पाहिल्यास किंमत कमी ठरत नाहीं त्याच्या ' दि व्हिकार ऑफ वेकफील्ड ' नावाच्या पुस्तकातील कथानकाचें इंग्लिश राहणीशीं साम्य असल्याचें संभवत नाहीं तरी पण त्याच्या पहिल्या प्रकरणांतून येणाऱ्यातील लोकस्थितीसंबंधींच्या साध्या गाण्यातील गोडी व आनंदपर्यवसायी नाटकांतून दिसून येणारा उत्साह हीं आढळतात. गोष्टीच्या पूर्वार्धाच्या मानानें उत्तरार्ध फारच फिक्का पडतो, व उपसंहाराच्या सुमाराला तर असंबद्धता आढळून येते त्यानें लिहिलेल्या ' शी स्टूप्स टु कॉंकर ' ( मराठी भाषांतर–' समजुतीचा घोंटाळा ' ) नावाच्या लोकप्रिय आनंदपर्यवसायी नाटकात तर त्यानें विक्षिप्तपणाची कमालच केली आहे याशिवाय त्यानें निरनिराळ्या देशाचे इतिहास लिहिले आहेत. त्याची लेखनपद्धति साधी व समजण्यास सोपी आहे. गोल्डस्मिथ १७७४ सालीं मरण पावला शेवटपर्यंत त्याची सांपत्तिक स्थिति निकृष्ट होती.

**गोंवर**.—अंगावर लाल अगर गुलाबी रंगाचा पुरळ उठणें, पडसें, खोकला या लक्षणासह असलेल्या सांसर्गिक ज्वरास हे नाव आहे याची बहुधा गावात अगर शहरात साथ येऊन प्रौढ माणसापेक्षा लहान व तरुण माणसात ती लवकर पसरते याचें कारण प्रौढ माणसाना बालपणीं एकदां गोंवर येऊन गेला असल्यामुळें तितका प्रतिबंध होतो, अगर सर्वस्वी प्रतिबंध न झाल्यास नवीन आलेला गोंवर फार सौम्य असतो अति कोंवळया अर्भकानाहि यावप्रमाणें गोंवर येत नाहीं व आलाच तर सौम्य प्रकारचा येतो मुंबईपुण्यासारख्या मोठ्या शहरात कोठल्याना कोठल्यातरी मोहल्यात थोडाबहुत गोंवर सतत असतो म्हटलें तरी चालेल. थोडा वेळ बंद झाला तर दुसऱ्या मोहोल्यात गोंवर प्रगट होत असतो. परंतु ज्या गावीं अगर ज्या ठिकाणीं पूर्वी कधीं गोंवर नव्हता अगर बरींच वर्षें आला नाहीं अशा ठिकाणीं लहान अगर प्रौढ वयाच्या सर्वच माणसानां सार्थीत गोंवर येण्याचा संभव असून तो गोंवर आला तर तो उग्र स्वरूपाचा असतो. या प्रकारें फेरो नामक बेटात १८४६ सालीं या साथीच्या दुखण्यानें तेथील रहिवाश्यात अनर्थ करून सोडला व फार माणसें मेलीं रोग्याशीं अन्य लोकांचा संसर्ग घडून अगर त्या दूषित हवेनें किंवा कपडे व रोग्याच्या खोलींतील इतर पदार्थ बाहेर दुसऱ्या ठिकाणीं जाऊन त्याच्यामुळें संसर्ग पसरतो. गोंवराची उगवण होण्याच्या अगोदर नाकातून जें पाणी वहातें तें चिकट पाणी महासांसर्गिक असतें. तें घेऊन दुसऱ्या माणसाला गोंवर उत्पन्न केल्याचा प्रयोग करून पाहिला आहे.

*रोगलक्षणें*.—या ज्वराची गर्भावस्था दहा अकरा दिवस फारतर असते ताप व पडसें येऊन दुखण्यास आरंभ होतो. तापाचें उष्णतामान १०२° पर्यंत असतें मुलास चैन पडेनासें होऊन कांहीं न खातांपितां गुंगी व झांपड येऊन मूल आजारतें. थोडी धंटी वाजते अगर वांती होते. मूल लहान असल्यास झटके येतात, डोळ्यांतून व नाकांतून पाणी

गळूं लागून पापण्यांना मालरी बरची पोर्टे भरून आल्याप्रमाणें फुगीर दिसतात. श्वासनलिका, कंठ व श्वासमार्गांत सर्दीकफ होतो. दुसऱ्या दिवशीं ताप निघतो अगर एक दोन दिवस असला तर फार कमी असतो व नंतर अंगावर लाल रंगाचा अगर पित्त उठल्याप्रमाणें पुरळ उठतो. चवथ्या दिवसापासून अगर त्याच्या आदल्या दिवशीं तोंड, मस्तक, कपाळ, कानशील येथें गोंवराचा पुरळ येऊन नंतर भराभर कान, गळा, मान, छाती, पाठ, पोट व हातापायांवर तो पसरतो. पुरळाचे वर्तुलाकार अगर लंबवर्तुलाकार अगर अनियमित आकाराचे गुलाबी, लाल रंगाचे डाग उठतात. ते एकमेकांत मिसळून त्या वर्तुलाकार डागांच्या समूहाच्या एका बाजूस चंद्राकृति कडा दिसतात व त्याच्या पुढें पुरळरहित अशी थोडी साधी त्वचा असते. या डागामध्यें सूक्ष्म रक्तवाहिन्या फुटून तो रक्ताळलेला भाग अगर त्या गांधींच्या मधोमध पुटकुळी वगलेली काहीं ठिकाणीं आढळते. त्यामुळें तोंड व चेहरा फुगलेला आणि सुजलेला दिसतो. पाठीवर तसच हातापायावर गोंवराचा पुरळ एकसारखा व बराच उठलेला असतो. तो पूर्णत्वास पोंचण्यास एकपासून तीन दिवस लागतात. नंतर तो भराभर मावळूं लागतो. जेथें तो प्रथम दिसतो तेथूनच तो मावळण्यास आरंभ होतो मावळल्यावरहि त्याचे पिंगट व काळसर डाग कांहीं दिवस रहातात रक्ताळलेल्या पुरळाचे डाग फार दिवस मागाहून रहातात. याशिवाय सर्वांगावरून कोंडा निघून तो गळून पडतो. पुरळ दिसूं लागताक्षणीं आरंभीं कमी झालेला ताप १०२°–१०३ पर्यंत वाढतो अगर कधीं जास्तहि वाढतो. नंतर तो दोन ते चार दिवस टिकून पुरळ मावळण्याच्या सुमारास ताप एकदम कमी होतो व एक ते दीड दिवसांत साफ निघतो. पडसे, खोकला चालू असतो, सर्दीमुळें कपाळ दुखतें. कांहीं रोग्यांना श्वासनलिकादाह होऊन छाती सूंसूं वाजते, घसा बसतो, श्वास लागतो व खोकल्याची ढास सुरू होते. टाळू व घसा पाहिला तर तो सर्व अगर ठिकठिकाणीं लाल झालेला दिसतो. जिभेस बुरशी व तोंडास थोडी दुर्गंधी येते. ज्वरानंतर जीभ साफ होऊन अन्नपाण्यास रुचि येते व झोप चांगली लागते.

आ गं तु क दो ष व दु ष्प रि णा म.—श्वासमार्गापैकीं सर्व प्रकारचा फुफ्फुसदाह अगर कंठदाह होऊन मुदमरणें या आगंतुक कारणानें बरेच रोगी मरतात. अक्षिपुटदाह, अक्षिकाचदाह, कनीनिकादाह यामुळें डोळे बिघडतात मुखदाह, गालगुंड, कान फुटणें व ठणकणें, आल्ब्युमिनमेह, आतड्यांतून रक्तस्राव, मुखकोथ (सडणें) हेहि आगंतुक रोग उत्पन्न होतात दुष्परिणामांपैकीं खोकला जुनाट होऊन फुप्फुसें बिघडणें, डोळे बिघडणें, गलग्रंथि मोठ्या होणें, कान वाहणें, व त्याचे दुष्परिणाम क्षय, हृद्रोग, कृशता वगैरे होत.

गों व रा चे प्र का र.—पडसें व पुरळ याशिवाय गोंवर येतो असें कोणी डॉक्टर म्हणतात पण याविषयीं बरीच शंका वाटते. उग्र भेदामध्यें पुरळ रक्ताळतो व श्लेष्मल त्वचेंतूनहि रक्तस्राव होतो. ज्वरप्रधान भेदांत पुरळ काळवंडतो अगर तो नीट येतहि नाहीं अगर येऊन तो नीट बाहेर पडत नाहीं अशा वेळीं ताप वाढून नाडी बिघडते, रोगी वातानें बडबडतो. जिभेस दाट बुरशी येऊन विषमज्वराच्या रोग्याप्रमाणें रोग्याची स्थिति होते.

ज्व र नि दा न.—(१) विषमज्वरामध्यें तोंडावर लाली व सूज येत नाहीं पडसें नसतें (२) देवीच्या तापामध्यें प्राथमिक गुलाबी पुरळ कांहीं रोग्यामध्यें येतो पण या रोग्यांना पडसें नसतें त्याऐवजीं कंबर व डोकें फार दुखणें आणि वांति होणें यावरून गोंवर नाहीं असा तर्क करावा.

सा ध्या सा ध्य वि चा र.—शेंकडा एक दोन रोग्यांपेक्षा अधिक रोगी दगावत नाहींत. उग्र साथ अगर ज्वरप्रधान भेद अगर फुप्फुसदाहादि आगंतुक दोष या आपत्ती वगळल्या असता हा सुसाध्यच ज्वर आहे असें मानतात.

उ प चा र.—रोग्यास ऊब असेल अशा खोलींत ठेवावें. परंतु ती कोंदटहि नसावी व अंगावर झुळूक न येईल अशी बेताची ताजी हवा आत यावी, म्हणजे दुसऱ्या मुलांमध्यें रोग फार पसरणार नाहीं पुरळ येईपर्यंत मूल अमळ हिंडलें फिरलें तरी हरकत नसावी परंतु गोंवराचा पुरळ दिसूं लागल्यावर मात्र रोगी अंथरुणावर पडून असलेलाच बरा खाण्यास मुख्यत दूध, पिठूळ पदार्थ वगैरे अगदीं हलकें अन्न द्यावें. सर्दी घालविण्याची व कफ पातळ होऊन तो पडण्यासाठीं औषधयोजना करावी दिवसातून तीन चार वेळ टाळू व घसा या ठिकाणीं बोरीक ॲसीड व ग्लिसरीन यांचे मिश्रण लावल्यानें तें ठिकाण जंतुरहित व शुद्ध होऊन त्यामुळें श्वासमार्ग व कानात होणारे दुष्परिणाम टळतात. शेंकडा १० प्रमाणात रिसॉर्सीन पाण्यात विरवून तें अगर पोटयाश परमॅंगनेटच्या पाण्यानें पिचकारीन्या साहानें धुणें हेहि इलाज यासाठीं योजतात ताप फार वाढल्यास थंड पाण्यांत फडक्याचा बोळा भिजवून त्यानें अंग चोळावें अगर रोग्यास १०°ते१५° उष्णमान असलेल्या पाण्यांत बसवून त्यांत आणखी थंड पाणी मागाहून रोग्यास त्रास न होईतोंपर्यंत घालीत जावें हा इलाज १००°ते१०३° ताप असला तरी करावा म्हणजे १०५° सारख्या तापानें भावी संकट टळतें. व हें संकट रोग्यास न येईल तितकें बरें. ताप उतरल्यावर आंथरुणात पडून रहाण्याची गरज नाहीं. तरी पण आणखी आठ दहा दिवस रोग्यानें वाऱ्यात हिंडू फिरूं नये हें चांगलें. उग्रप्रकारात ब्रँडी वगैरेसारख्या उत्तेजक औषधाची गरज क्वचितच पडते दुखण्यातून उठल्यानंतर लोह, कॉडलिव्हर तेल वगैरे पौष्टिक औषधें सुरू करावी रोग्यास हवापालट करण्यासाठीं काहीं कालपर्यंत अन्यस्थलीं पाठवावें. दुष्परिणाम (कान वहाणें इत्यादि) झाले असतील त्यांवर जरूर ते उपचार योजावेत.

**गोवर्धन**—संयुक्तप्रांत. मथुरा जिल्हा व तालुका यांतील एक शहर. हें मथुरा डींग रस्त्यावर गिरिराज पर्वताच्या पायथ्याशीं मानसीगंगा तीर्थाच्या भोंवतीं वसलें आहे. लो. सं. सुमारें तीन हजार. श्रीकृष्णाचें हें आवडतें ठिकाण होतें असें सांगतात. येथें श्रीहरीचें एक जुनाट देऊळ आहे. येथें बरीच ऐतिहासिक स्थळें आहेत. याची व्यवस्था १८५६ च्या २० व्या कायद्यान्वयें होते.

**गोवर्धन-गंगापूर**—हें ऐतिहासिक ठिकाण नाशीक जवळ आनंदवल्लीच्या पश्चिमेस सुमारें तीन मैलावर आहे. गोवर्धन हें फार प्राचीन स्थळ असून याचा उल्लेख लेण्यांतील शिलालेखामध्यें पांच वेळा आलेला आहे. त्यावरून हें आंध्रभृत्य राजाच्या प्रतिनिधींचें 'आहार' म्हणजे रहाण्याचें ठिकाण होतें असें दिसून येतें. येथें जुन्या इमारतींचे कांहीं शेषभाग अद्यापि आढळून येतात. येथील गोवर्धनेश्वर व इतर मंदिरें प्रसिद्ध आहेत. येथील नदीचा घाट प्रेक्षणीय आहे. गोवर्धनापासून अगदीं नजीक गंगापूर आहे. येथें गोपिकाबाई पेशवे यांनीं आपलें शेवटचें आयुष्य घालविलें. नदीच्या कांठीं त्यांनीं एक सुंदर वाडा बांधून नदीस घाट बांधिले. व तेथेंच नदीचा देखावा अवलोकन करण्यासाठीं लहान लहान आराममंदिरें बांधिलीं. येथें 'दुधस्थळी' या नावाचा एक सुंदर धबधबा आहे. गोपिकाबाई या येथें इ० स० १७६४ मध्यें राहण्यास आल्या, तेव्हांपासून त्या मरेपर्यंत येथेंच रहात असत. हल्लीं येथील त्यांचा वाडा अगदीं पडला असून फक्त जोतें मात्र कोठें कोठें शाबूत आहे. [ इतिहाससंग्रह. पु. ६ पृ. ९२ ]

**गोवर्धन गिरी**—म्हैसूर, शिमोगा जिल्ह्यांतील एक पर्वत. यावर किल्ला व तटबंदी आहे. उ. अ. १४°१०' व पू. रे. ७४°४०'. उंची १७२० फूट. यावरून गिरसप्पा खेडें दिसतें. येथील किल्ला जिनदत्तराय यानें आठव्या शतकात बांधला. आतां तो पडीत आहे व त्याच्यावर जगंल वाढलें आहे. जैनांचें येथें एक देऊळ आहे. त्यासमोर गिरसप्पाच्या व्यापाऱ्यांनीं १६ व्या शतकांत उभारलेला एक धातूचा स्तंभ असून त्यावर एक लेख आहे.

**गोवर्धन पर्वत**—वृन्दावनांतील एक पर्वत. इन्द्रानें एकदां गोकुलावर अतिशय जोराची वृष्टि केली असतां, कृष्णानें सर्व गोकुळवासी गोपगोपींना इन्द्राच्या पूजेऐवजीं या पर्वताची पूजा करण्यास सांगितलें. या कृत्यामुळें इन्द्रास अनावर क्रोध येऊन त्यानें सर्व गोकूल वाहून जाण्यासारखी प्रचंड वृष्टि केली. तेव्हां सर्व गोकुलवासीयांचें रक्षण करण्याकरितां कृष्णानें सात दिवसपर्यंत अहोरात्र तो पर्वत आपल्या करंगळीवर उचलून धरिला. अशा रीतीनें त्या प्रचंड वृष्टीपासून कृष्णानें गोकुलाचें रक्षण केलें, तेव्हां पराभूत होऊन इन्द्रानें वृष्टि बंद केली, व नंतर कृष्णाशीं सख्य केलें. या पराक्रमाबद्दल कृष्णास 'गोवर्धनधारी' असें विशेषण मिळालें असें भागव— —त आहे.

**गोवर्धन ब्राह्मण**—महाराष्ट्रांतील एक प्रादेशिक जात. देशस्थादि ब्राह्मणवर्गाप्रमाणें याचे आचार व राहणी असल्यानें या ठिकाणीं फक्त ही ब्राह्मण जात विशिष्ट कशी आहे येवढेंच दाखविलें आहे. "गोवर्धनब्राह्मणज्ञाति" ही गोळक या नावानें कधीं कधीं ओळखली जाते. तेव्हां तिच्याविषयींचा मुख्य ऐतिहासिक प्रश्न म्हटला म्हणजे ही ज्ञाति मूळची ब्राह्मण आहे कीं व्यभिचारोत्पन्न एका जातीनें आपणांस गोवर्धन हें नांव वर्णविषयक महत्वाकांक्षेनें लावून घेतलें आहे. याची छाननी करण्यासाठीं आपणांस पहावयाचें तें हें कीं, ( १ ) गोवर्धन ब्राह्मणाच्या अस्तित्वाबद्दलचा आधार कितपत जुना आहे. व ( २ ) ज्या ज्या काळीं त्याचा उल्लेख सनदांतून केला जातो त्या काळीं त्याचा अंतर्भाव ब्राह्मणांत होत होता काय ?

आमच्यापुढें जीं अनेक पत्रें व सनदा आल्या त्यांत शालिवाहन शक १६८१ सालचें पत्र जुनें आहे. याहून जुनें अस्सल पत्रें आमच्यापुढें आलें नाहीं. त्यांत लक्ष्मण नरहर भट उपाध्ये यास गोवर्धन म्हणून धर्माधिकार दिलेले आहेत म्हणजे बाळाजी बाजीरावाच्या कारकीर्दीत गोवर्धन हें नांव रूढ होतें, त्यास ब्राह्मण म्हणत होते, आणि त्यास धर्माधिकार होते एवढें निश्चित होतें. आदिलशाहींतील सनद आणि त्या सनदेवर पेशवाईतील ठराव हीं दोन्हीं अस्सल आमच्यापुढें न आल्यामुळें जमेस धरलीं नाहींत. पण तो पुरावा खरा ठरणें अशक्य नाहीं.

गोवर्धन हा शब्द महाराष्ट्राच्या बऱ्याच भागास लावीत असत ही गोष्ट निश्चित आहे. तसेंच गोवर्धन हे आज अनेक जातींचें व ठिकाणाचें उपाध्येपण व जोशीपण करतात ही गोष्टहि निश्चित आहे. अगदीं ज्ञातीकडून ज्ञानकोश मंडळास आलेल्या माहितींत ही गोष्ट नमूद केली आहे. आज ब्राह्मणाचे सर्व कर्माधिकार गोवर्धनास आहेत. शिवाय उत्तरकोंकणांतील माध्यंदिनाच्या प्रसिद्ध सनदांत त्यांनीं आपली वृत्ति गोवर्धनापासून विवामार्फत घेतली असा पुरावा आहे. यावरून गोवर्धन ही ब्राह्मणाची जुनी जात असावी असें दिसतें.

गोवर्धनानीं ज्ञानकोश ज्ञातिनिर्णायक कमिटीपुढें मांडलेल्या पुराव्यांत असें सांगितलें आहे कीं ते अधर्मसंतति नाहींत. ते तसे असते तर त्यांचीं आडनांवें इतर ब्राह्मणांतली असतीं. पण त्यांचीं आडनावें इतर ब्राह्मणांतलीं नाहींत. प्रस्तुत विधान अयथार्थ आहे. गोवर्धनांतहि विवलकर, मंडलिक, खरे, साठ्ये, फाटक वगैरे कोंकणस्थांत असलेलीं आडनावें आहेत. भालेराव, दास्ताने, डागे वगैरे देशस्थांतील आडनावें आहेत. तथापि गोवर्धनांतील बरींचशीं आडनावें, ( उदाहरणार्थ, विश्वाते, शूल, दापरे, कंथ इ. ) कित्येक निम्म्याहून अधिक अगदीं स्वतंत्र आहेत यांत शंका नाहीं. निराळ्या आडनांवाच्या पुराव्यावरून यासंबंधानें कांहीं निर्णय करता येईल तर हा कीं ही जात

इतर ब्राह्मण जातीपासून अगदीं पृथक् आहे. सदरा आड-नांवावरून निर्णय दोन प्रकारचे निघतील ते हे कीं, कोंक-णस्थ, देशस्थ व कऱ्हाडे ब्राह्मण, प्रभु, मराठे यांत अनेक आड-नांवें ज्या कारणामुळें सामान्य असतील त्याच कारणामुळें कांहीं आडनांवें देशस्थादि ब्राह्मणांत व गोवर्धनांत असतील दुसरा असा संभव आहे कीं अन्य जातींतील माणसें गोवर्धनांत शिरलीं असतील व त्यास कारण शिरलेल्या व्यक्तींना जन्म विधवेपासून झाला असावा. याखेरीज अन्य कारणेंहि असणें अशक्य नाहींत. भिन्न ब्राह्मण जातींतील माणसें गोवर्धनांत शिरली असल्यास व विधवा-संततीहि गोवर्धनांनीं स्वीकारली असल्यास जातीची कांहीं कालपर्यंत ज्ञातिनियमनविषयक नीति मात्र स्पष्ट होईल. तेवढ्यावरून जातीच्या स्वतंत्र अस्तित्वास बाध येत नाहीं.

गोवर्धनाशीं इतर ब्राह्मण आज उघडपणें अन्नव्यवहार करीत नाहींत असें अ.धेरुकाशीं पुढें आणलें आहे व गोवर्ध-नांनींहि ही गोष्ट मान्य केली आहे. ही गोष्ट त्यांच्या ब्राह्म-ण्यास बाध आणूं शकत नाहीं असें अनेक ब्राह्मणांमध्यें असलेला अन्नोदक-व्यवहाराचा अभाव पुराव्यादाखल मांडून दाखविलें आहे. गोवर्धनांनीं याचें कारण व्यावहारिक स्पर्धा असावी असें मांडलें आहे व तें अशक्य नाहीं. आज गोवर्धन ब्राह्मण ज्ञातींत ऋग्वेदी गंगातीरवासी व उत्तर कोंकणांतील यजुर्वेदी असे दोन भेद दिसतात. या ज्ञातीची साधार माहिती ज्ञातीच्या संजीवन मासिकांत आढळेल. मासिकाचे संपा. दे. वि. नाईक.

**गोवर्धनाचार्य** ( इ. स. ११७५-११२५ )—वंग ( बंगाल ) देशाचा राजा बल्लाळसेन याचा पुत्र जो लक्ष्मणसेन याच्या पदरीं हा कवि होता. याच्या बापाचें नांव नीलांबर असून याचे शिष्य उदयन व सहोदर बलभद्र होते. याच्या नांवाचा उल्लेख कवीनें आपल्या सप्तशतींत केला आहे. वाल्मीकि, व्यास, गुणाढ्य, कालिदास, बाण, भवभूति या आपणापूर्वी होऊन गेलेल्या कवींचा उल्लेख कवीनें आपल्या काव्यांत केला आहे.

आपले समकालीन असे लक्ष्मणसेन राजाच्या दरबारीं शरण, जयदेव, उमापति व धविराज हे कवी होते असें एका पद्यांत सांगितलें आहे. जयदेव कवीनें गीतगोविंदांत या गोवर्धनाची स्तुति केली आहे. यावरून कालिदास, बाण व भवभूति यांच्या नंतर हा कवि झाला हें उघड आहे. तसेंच गीतगोविंदाचा कर्ता जयदेव याचा समकालीन किंवा याच्या किंचित पूर्वीचा हा कवि होता असें दिसतें. इ. स. ११ व्या शतकाच्या समाप्तीपर्यंत लक्ष्मणसेन वंग देशांत राज्य करीत होता असें इतिहासज्ञांचें मत आहे. यावरून त्याच्या दरबारीं असणारा हा गोवर्धन कवि अकराव्या शतकांत असावा. याचा आर्यासप्तशती या नांवाचा एक ग्रंथ आहे. या ग्रंथांत एकंदर ७५६ आर्या असून पहिल्या ५४ आर्यांत उपोद्धात आणि शेवटच्या सहात ग्रंथोपसंहार आहे. ग्रंथ शृंगाररसात्मक आहे. ( वि. विस्तार. पु. २१. अं. ९-१० ).

**गोवळकोंडा**—उ. अ. १७°२३'' व पू रे. ७८°२४.'' हैद्राबादच्या पश्चिमेला पाच मैलावर वसलेलें एक पडकें व जुनें शहर आणि किल्ला. हा किल्ला वरंगळच्या राजांनीं बांधला. १३६४ मध्यें तो बहामनी घराण्यांत गेला. १५१२ मध्यें कुतुबशाहीनें घेतला. १६८७मध्यें औरंगझेबानें आठ महिनेपर्यंत येथें वेढा दिला होता. गोवळकोंड्याचा इतिहास 'कुतुबशाही' या लेखांत आढळेल किल्ला ग्रानाइटच्या गडकावर असून त्याच्या भोंवतीं बरेच तट आहेत. सर्वांबाहेर पक्क्या दगडाचा ३ मैल परिघाचा तट असून त्याला आठ दरवाजे व ८७ बुरूज आहेत. कांहीं बुरुजांत जुन्या तोफा वगैरेंचे मोठे तुकडे पडले आहेत. तटाच्या आंत मशिदी, घरें व इतर इमारती वगैरेंचे पडीत भाग सर्वत्र पसरलेले आहेत. फक्त बालाहिसार ( बालेकिल्ला ) मात्र अद्याप टिकला आहे. किल्ल्याभोंवतीं खंदक आहे पण तोहि बहुतेक बुजून गेला आहे. शहराच्या उत्तरेस बादशाही कबरस्तान आहे पण तेथील सर्व इमारतींना कालगतीनें व विशेषतः औरंगझेबाच्या तोफांनीं फारच हानी पोहोंचली आहे. गोवळकोंडा येथें हल्लीं थोडीशी अरब शिबंदी व गोवळकोंडाब्रिगेड ही असतात. दक्षिणेकडून मुशी नदी वहाते. गोवळकोंड्याच्या आसपास पूर्वी हिरे सांपडत असत व ते गोवळकोंड्याचे हिरे म्हणून प्रसिद्ध होते खुद्द गोवळकोंडा येथें मात्र हिऱ्याच्या खाणी वगैरे कांहीं नाहींत.

**गोविंद कवि**—हा तेलंगी तंजावरच्या तेलगू राजाच्या वेळीं उदयास आला त्यानें गुजराथची कन्या इंदुमति हिच्या स्वयंवरावर काव्य रचिलें. त्याला इंदुमतिपरिणय असें नांव दिलें. याशिवाय त्यानें द्राविड देशांतील अनेक देवालयांचा वर्णनात्मक इतिहास लिहिला आहे.

**गोविंदगड**—( १ ) रेवासंस्थानामधलें एक शहर. उ. अ. २४°२३' व पू. रे. ८१° १८'. केमुरकड्याच्या एकावर वसलें आहे. उंची १२०० फूट. लो. सं. ( १९११ ) ४५१९. शहर उंचावर असल्यानें कड्यावरून खालच्या मुलुखाची व अरण्याची शोभा दिसते, व जवळच्या संरक्षित जंगलांत शिकार सांपडते. राजेसाहेबांचा येथें एक बंगला आहे. शाळा, पोस्ट, दवाखाना वगैरे मामूल गोष्टी आहेत.

( २ )—अलवार संस्थानांतील गोविंदगड तालुक्याचें मुख्य ठिकाण. येथील किल्ला महाराजानें बांधला ( १८०५ ). गोविंदपूर येथें म्यु. क आहे. पूर्वी हा तालुका आमा मुभ्यांत मोगलांच्या हातीं होता. १८०३ मध्यें महाराव राजा बख-तावरसिंग याच्या करितां मराठ्यांनीं घेतला. तेव्हांपासून तो अलवारकडेच आहे. तालुक्यांत लो.सं २०,६४६. खेडीं ५७ व शहर एक गोविंदगड. त्याची लो. सं. (१९११)३८७१.

**गोविंदगड** ( भटिन्डा )—पतियाळामधला एक तालुका. क्षेत्रफळ ८६८ चौ. मै. लो.सं (१९११)१६६२५७. सारा व कर यांचें उत्पन्न ( १९०३-४ ) २.७ लाख. भटिंडा शहर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. खेडीं २०१ आहेत.

**गोविंद ठक्कुर**—याचा बाप केशव, आई सोनादेवी बाई, वडिल भाऊ रुचिकर कवि, गुरु नारायण व धाकटा भाऊ श्रीहर्ष कवि होता. यानें दोन प्रदीप व दोन दीपिका केल्या होत्या असें एका पद्यावरून दिसतें. यानें मम्मटाच्या काव्यप्रकाशावर टीका केली आहे. याच्या टीकेला 'छाया टीका' म्हणतात. इतरहि टीकाकारांनीं मम्मटाच्या वृत्तीवर टीका केली आहे. यानें मम्मटाच्या कारिकावर त्याच्या टीकेसारखीच वृत्ति स्वतः लिहिली आहे. म्हणून याची टीका ही मम्मटाच्या वृत्तीवर टीका नव्हे तर कारिकावर स्वतंत्र वृत्ती असल्यामुळे मम्मटाच्या वृत्तीच्या छायेची उपमा देतात. मम्मटानें दिलेल्या पद्याखेरीज यानें कांहीं अधिक उदाहरणपद्यें दिलीं आहेत. या टीकेंत भास्कर भट्टाचार्य व चंडादास भट्टाचार्य यांचीं नांवें आढळतात. यानें एक काव्य केलें होतें व याचा धाकटा भाऊ श्रीहर्ष यानेंहि एक काव्य केलें होतें. असें त्यांतून उदाहरणादाखल घेतलेल्या श्लोकावरून दिसतें. काव्यप्रकाशांतील ( मम्मटाच्या ) उदाहरणपद्यावर उदाहरणदीपिका नांवाची टीका यानें केलेली आहे. याच्या प्रदीप नांवाच्या टीकेवर वैद्यनाथानें प्रभा नांवाची व नागोजी भट्टानें उद्योत नांवाची टीका केली आहे हा तर्कशास्त्रज्ञ होता. [वि. वि. पुस्तक २२ अंक १-२ ]

**गोविंदपंत बुंदेले**—याचें मूळगाव रत्नागिरी जिल्ह्यांतील नेवरें असून हा तेथील कुळकर्णी होता. हा तेराचौदा वर्षांचा असतांना याचा बाप ( बाळाजी ) वारल्यानें कुळकर्णाचें काम त्याच्यावर पडलें. याचें सबंध नांव गोविंद बल्लाळ खेर असून हा कऱ्हाडा ब्राह्मण होता. जातीनें हूड असल्यानें कुळकर्ण बराबर चालेना व भाऊबंदांनींहि त्रास दिला त्यामुळें व नेवरें येथील बन्यांचें उदाहरण पाहून हा तेथून देशावर आला व पुण्यास थोरल्या बाजीरावाजवळ त्यानें शागीर्दाची नौकरी धरली. पुढें त्याच्या अंगचे अनेक गुण दृष्टोत्पत्तीस आल्यानें बाजीरावानें त्याला नवीनच मिळालेल्या बुंदेलखंडाच्या कारभारावर नेमिलें ( १७३३ ). तिकडे त्यानें शौर्यानें व धूर्ततेनें वागून रजपूत राजावर दाब बसवून मराठी राज्याचा दरारा पसरविल्यानें त्याची प्रमुख मराठे सरदारांत गणना होऊं लागली. हळू हळू त्यानें नवीन किल्ले बांधून व ठाणीं घालून राज्यविस्तारहि केला. कुरईच्या नबाबाकडून त्यानें जो प्रांत हस्तगत केला त्यांत सागर म्हणून एक प्रचंड तलाव होता. त्याच्या कांठीं सागर नांवाचेंच शहर वसवून, तें त्यानें आपलें राहण्याचें मुख्य ठिकाण केलें ( १७३६–३७ ). पुढें फर्रूकाबादच्या लढाईंत रोहिल्यांचा जंगी पराभव करून ज्या मराठेसरदारांनीं दिल्लीच्या बादशहास धाक बसविला व ज्या लढाईबद्दल "शाबास तुमच्या हिंमतीची व दिलेरी रुस्तुमेची" अशी शाबासकी पेशव्याकडून मिळविली, त्यांत गोविंदपंतहि एक मुख्य सरदार होता ( १७५१ ) राजवाडे यांनीं याला पानपतप्रकरणीं म्हणून अपयशाचा बराच मोठा वाटा त्याच्या माथीं मारला आहे परंतु सरदेसायांच्या मतें तें चूक आहे. त्यांचें म्हणणें कीं, "त्याच्याहिपेक्षां मल्हारराव वगैरे दुसऱ्या अनेक व्यक्ती आपमतलबी होत्या, व पंत आपमतलबी नसता तरीहि तेवढ्यानें पानपतचा परिणाम कांहीं निराळा झाला असता असें नाहीं. पंताचीं २८ वर्षें त्या प्रांतांत गेल्यानें त्याला तिकडील सर्वत्रांची खडानखडा माहिती झाली होती. तो मूळचा कारकुनी पेशाचा असून प्रसंगानें शिपाईगिरीचें काम त्याच्यावर शक्तीबाहेर पडल्यानें त्यास यश आलें नाहीं. तिकडील कापड व निरनिराळ्या चिजा तो पेशव्यास पुरवीत असे. त्याचा धाकटा भाऊ पुण्यास दरबारांत वकील असे उत्तरेकडील कामाविशींचा पुष्कळ पैका तो पुण्यास धाडी, चौदा लाखापर्यंतची ही रसद दरसाल नियमीतपणें धाडण्याबद्दल त्याची ख्याती होती त्याला पालखीची नेमणूक १७५० त झाली. रोहिल्याच्या युद्धापासून त्याच्या प्रांतात दंगे फार होऊं लागल्यानें वसुलास अडचण पडली व त्याचा पानपतावर कळस झाला. अर्थात् यांत मुद्दाम लबाडी केल्याचा आरोप सिद्ध होत नाहीं. त्यानें आपल्या या अडचणी नेहमीं आपल्या भावास कळविल्या आहेत. सर्व कारस्थानाची माहिती ठेवून, कोणाशींहि विकोपास न जाता, सावधगिरीनें आपला मार्ग सुधारावा असा त्याचा स्वभाव होता. मात्र तो थोडा बहुत संशयी व कपटी असावा. हिंदुस्थानांत उत्तम व जय्यत अशी वीसहजार फौज सतत पाहिजे अशी त्याची पेशव्याकडे सक्त मागणी आहे, नाहींतर "रांगडे लोक हरामजादे...फौज नसलिया बंदोवस्त राहणार नाहीं, वसूल येणार नाहीं, हयगय जालिया फजिती" असें तो स्पष्ट लिही (१७५५). पुढें शिंदेहोळकरांतील तंट्याबद्दल लिहून, 'पातशहात व वजिरांत कलागत लागली, त्यामुळें सरकारी कार्य जें म्हणावें तें होणार असा समय कधीं येणार नाहीं' तरी आपण या, असा तो १७५६ त पेशव्याना आग्रह करी. परंतु या संधीचा फायदा पेशव्यांनीं घेतला नाहीं. पंतानें नजीबखानास बडवून सर्व कुराकडा प्रांत काबीज केला; परंतु राघोबादादानें तो आपला मेहुणा गोपाळराव बर्वे याच्या हवाली केला. त्यामुळें पंत व बर्वे यांचें वाकडें आलें. या कुराकडा प्रांतांत १८ परगणे होते. पुढें त्यानें अंतर्वेदी जिंकून इटावा येथें जबरदस्त लढाई देऊन अस्करअलीस ठार केलें ( १८५६ ) व पुष्कळ प्रांत मराठी राज्यास जोडून १७५७ त देशीं परत आला. यानंतर अबदालीच्या स्वाऱ्यामुळें उत्तरेंस वसूल बरोबर जमत नसे व अशा तक्रारी पंतानेंच एकट्यानें केलेल्या नसून शिंदेहोळकरानींहि केलेल्या आहेत. देशीं आल्यावर त्यानें वाईजवळील वाकेश्वराचा जीर्णोद्धार करून देवास बावधन येथें इनाम दिलें. बावधनास तो रहात असे. हल्लीं तेथें त्याचा पडका वाडा आहे. हिंदुस्थानांत परत जातांना पेशव्यानीं त्याचा गौरव केला होता. कुंजपुऱ्याच्या ( १७६० ) अबदालीच्या लढाईंत पंत हजर होता.

उत्तरेंत आल्यापासून मरणापावेपर्यंत ( १७५८-६० ) पंत एकसारखा लढायांत खपत होता त्याचे हिंगेथ तपासण्यास पुण्याहून सरकारांतून हिंगेजनपासनीस गेले होत परंतु रोहिल्याच्या मोहिमा न संपल्यामुळें हिशेबाचें काम तसेंच राहिलें आणि पुढें तर पानपतच झालें पंतावर कान्हिलेली कलमें ( शक ) इतर पुष्कळ सरदारासहि लागू होतीं भाऊ साहेबानीं पानपत मोहिमेंत पंताकडून तिकडील माहितींचें पुष्कळ सहाय्य घेतलें होतें ( राजवाडे खंड १ पहा ) नोव्हेंबरमध्यें पंतानें अब्दालीची रसद बहुतेक बंद पाडला व त्याला शहहि दिला ( काशीरामाची बखर ) तो उठविण्यास आताईखान हा शिकारीच्या निमित्तानें गाजिउद्दीन नगराजवळ पंतावर चालून आला, त्यावेळीं खानानें लवाडीनें होळकराचें निशाण पुढें धरलें होतें, त्यामुळें पंत फसला एकाएकीं कापाकापी झाली तीन घोड्यावरून पडल्यानं पंत आताईखानाच्या हातीं लागला खानानें त्याचें शीर कापून अब्दालीकडे व त्यानें तें भाऊसाहेबाकडे पाठविलें ( २२ डिसेंबर १७६० ) पंताचा मुलगा बाळाजी हा व याचे वंशज पेशवाई अखेर बुंदेलखंडप्रांतीं कारभार करीत असत पुढें या घराण्याच्या सागरकर व जालवणकर अशा दोन शाखा झाल्या [ राजवाडे ख १, मराठी रियासत मध्यविभाग ३, इतिहाससंग्रह, भारतवर्ष पु १ ]

**गोविंदपुर**—बिहार–ओरिसा मानभूम जिल्ह्यांतील हा एक तालुका आहे यांत क्षेत्रफळ १०७चौ मै व लोकसंख्या ( १९११ ) ४००७५ शहर मुळींच नाहीं खेडीं २४५ झेरिआच्या कोळशाच्या खाणी याच भागात आहेत त्याच्या कामाच्या वाढीबरोबर लोकसंख्या वाढत आहे मुख्य ठिकाण गोविंदपूर आहे

**गोविंदराव काळे**—याच्या वडिलाचें नाव कृष्णराव बल्लाळ असून ते काशांत रहात असत त्यानीं दक्षिणेंत येऊन बापूजीनाईक बारामतीकराचे तर्फे नानासाहेब पेशवे याच्या वेळीं मराठेदरबारीं प्रवेश मिळविला पुढें राघोबादादाच्या उत्तरेकडील स्वारींत यानीं कामगिरी केल्यानें याना दहा हजाराची तैनात व पालखीची नेमणूक झाली राक्षसभुवनाच्या लढाईच्या सुमारास याना निजामाकडील पेशव्याचा वकिली मिळाली व तैनात पंधरा हजाराची वाढवून एकंदर सरंजाम तीस हजाराचा दिला तिकडे निजामानेंहि तीस पंधरा हजाराचा जातीस सरंजाम व चाळीस हजाराचा लष्करी सरंजाम दिला पुढें कृष्णराव वारल्यानंतर त्याच पुत्र गोविंदराव यास निजामाकडील वकिलातीचें काम मिळालें खर्ड्याच्या लढाईस जीं कारणें घडलीं, तीं गोविंदरावाच्या कारकीर्दींत झालेली होतीं गोविंदराव हा नानाफडणीसाचा प्रथम विश्वासु अनुयायी होता, परंतु तोच पुढें रावबाजींना फितुर होऊन नानांना कैदेंत टाकण्यास तयार झाला यावेळीं रावबाजींना सल्लामसलत देणाऱ्या अमृतरावादि कारभारीमंडळांत गोविंदराव मुख्य होता पुढें दौलतराव शिंद्यानें रावबाजीवर जरब बसविण्यासाठीं टिपूकडे वकील पाठविला असता गोविंदरावाच्याच युक्तीनें दौलतरावाची ती मसलत फिकी पडली रावबाजीनें पुन्हा नानाना कैद करण्याकरितां खटपट चालविली असता, तींत हा मुख्य होता, परंतु शिंद्यानें ही बातमी नानाना आगाऊ दिल्यामुळें त्यानीं रावबाजीस खुलासा विचारला असतां, रावबाजीनें हा गोष्ट नाकारून उलट गोविंदरावास कैद करण्यास सांगितलें, त्याप्रमाणें नानांनीं त्यास कैदेंत टाकलें ( १७९१ ) तरीहि त्यानें रावबाजाचें नाव सांगितलें नाहीं यावेळीं याचा सव्वा लक्षाचा सरंजाम होता तो जप्त करण्यात आला टिपूवरील दुसऱ्या स्वारींतहि हा हजर होता, त्यावेळीं त्यानें उत्तम कामगिरी बजावल्याबद्दल इंग्रजानीं त्यास दोन तोफा बक्षीस दिल्या होत्या रावबाजीच्या शेवटच्या दिवसांत हा त्याचेबरोबर अखेरपर्यंत होता पुढें ( १८१८ ) इंग्रजींत हा बारामतीस येऊन राहिला, त्यावेळीं त्यास पेशवाईंतील दोन गाव इनाम व पोलिटिकल पेनशन तीन हजार इंग्रजानीं कायम केलें यास कृष्णराव नावाचा पुत्र होता गोविंदराव १८२३ पर्यंत हयात होता पेशवाई गेल्यानंतर इंग्रजीराज्याविरुद्ध एक गुप्त कट झाला होता, त्यांत गोविंदराव सामील होता असें भासविण्याचा कांहीं जणानीं प्रयत्न केला, यथापि त्या म्हणण्यावर एल्फिन्स्टनचा विश्वास नव्हता तथापि त्याला धरून आणण्यास शिबंदी गेली, परंतु त्याच वेळीं तिकडे गोविंदराव मृत्यु पावून त्याचा प्रेतयात्रा चालली होती तें ऐकून एल्फिन्स्टन म्हणाला कीं, 'थोर मुत्सद्याची अब्रु मृत्यूनें बचावली ' ही एक दंतकथा आहे याचें निरीक्षण सूक्ष्म असे, त्यास एकदा निजामाचें उघडें शरीर पाहण्याची संधि आली होती त्यावेळीं त्यानें तें बारकाईनें पाहून त्याचें वर्णन खुलासेवार नाना फडणिसाना कळविलें होते [ डफ, इतिहाससंग्रह वर्ष १ अं ४, व ३ अं ४ वाड–कैफियती ]

**गोवें, प्रांत**—उत्तर अक्षांश १४° ५३' ते १५° ४८' व पूर्व रेखांश ७३° ४५ ते ७४° २४' याच्या दरम्यान १३०१ चौ मै क्षेत्रफळाचा ही पोर्तुगीज वसाहत पश्चिम किनाऱ्यावर आहे याची दक्षिणोत्तर कमाल लांबी ६२ मैल व पूर्वपश्चिम कमाल रुंदी ४० मैल आहे पोर्तुगीजानीं गोवा बेट १५४० मध्यें घेतलें व सासष्टी १५४३ मध्यें घेतलें आणि बारदेश सन १५४३ मध्यें घेतलें हे दोन प्रांत मिळून जुनी कान्क्विस्ट आणि पेडण, बटग्राम, सत्तारी फोन्डा, पचमहाल व कनकोन हे जिल्हे व नवी काबिजात मिळून एकंदर गोवें प्रांत होतो नवीन मुलुखाची संपादणी १८ व्या शतकाच्या उत्तरार्धांत झाली कारवारसमोरचें अंजिदिव बेट १५०५ मध्यें घेऊन तें गोवें प्रांतात समाविष्ट केलें

हा सर्व प्रदेश विशेषत नवीन काबिजात, डोंगर व पहाड यानीं पूर्ण आहे सह्याद्री व त्याच्या शाखा यातून

पसरल्या असून त्याची उंची ३५०० ते ४००० फूट आहे. सोनसागर, दुधसागर वगैरे शिखरें आहेत. या प्रदेशात नद्याहि बऱ्याच आहेत. त्यात आठ मुख्य आहेत. त्यातून बोटीहि चालतात. मांडवी वगैरे ३८ । ३९ मैल लांब असून त्याच्या शाखा बऱ्याच फुटतात या सर्वांतून होड्या चालतात

या प्रदेशात साष्टी व बारदेश याच्या भूशिरानीं एक छानदार बंदर बनलें आहे या दोहोंच्या मध्यें गोवा बेटाचें भूशीर घुसतें व अग्वादा आणि मारमागोवा अशीं दोन उपबंदरें बनलीं आहेत. पैकीं पहिलें पावसाळ्यात बंद असतें. दुसरें बाराहि महिने उघडें असतें लॅटेरा ईट नावाचा दगड सर्वत्र व मुबलक आहे जमिनीची भूस्तरशास्त्रीय पहाणी अद्याप झाली नाहीं हवामान उष्ण आहे. पावसाचें सरासरी मान ९० इंच आहे. सर्प, विंचू वगैरे विषारी प्राणी थोडे असून वाघाचा फारसा उपसर्ग होत नाहीं ताप, आमांश वगैरे किरकोळ रोग चालू असतात

पुराणातरी या देशाविषयीं विविध गोष्टी आहेत पुराणातील या प्रदेशाच्या नावांपैकीं कांहीं नावें शिलालेख वगैरेंतून आढळतात. गोमातक हें त्यातलेंच एक आहे स्कंधपुराण सह्याद्रिखंड यात असें लिहिलें आहे कीं, तिर्होत्तरपूर (हल्लींचें तिरहूट) येथून परशुरामानें बरेच आर्यलोक येथें वसाहतीकरिता आणले परशुरामानें गौड ब्राह्मणाचीं दहा कुलें बभाल्यातून आणिली व या ब्राह्मणानीं सासष्टी, तिसवाड (यात तीस गावें आहेत) या भागातील ९६ गावात आपली वस्ती केली म्हणून याना शाणवी-शेणवी-म्हणू लागले. काहीं शिलालेख वगैरेंवरून १३१२ पर्यंत येथें बनवासीचें कदंब घराणें राज्य करीत होतें असें दिसतें कदंबानीं गोवें ही राजधानी केली होती १३१२ मध्यें हा प्रदेश मुसुलमानाच्या हातीं गेला १३७० मध्यें विजयानगरचा प्रधान विद्यारण्य माधव यानें येथें आपला अमल बसवला, १४७० मध्यें बहामनी राज्यात याचा समावेश महंमद गव्हाण यानें केला, १४९८ च्या सुमारास आदिलशाहीनें आपला अंमल या प्रदेशात बसवला. व १५१० मध्यें अल्बुकर्क यानें हा प्रदेश घेतला. इकडील ग्रामसंस्थांची रचना पाहून त्याला मोठें आश्चर्य वाटलें त्या वेळीं या फिरंग्यानें तीन दिवसपर्यंत गोवा शहरावर हरतऱ्हेचा जुलूम केला व १० । १२ लाखाची लूट केली यापुढें गोवा येथें पोर्तुगीजाचें मुख्य ठाणें राहिलें व गोवा शहर चैनी व भपकेबाज लोकाचें ठिकाण बनलें व त्यामुळेंच त्याला पुढें उतरती कळा लागली. गोव्याला 'सुवर्ण खचित शहर' म्हणत इतकें वैभव तेथें भरलें होतें. लष्करी बाणा सुटला पण बडेजाव कायम राहिला जुवेयाजी व इतर शोक वाढले आणि सर्वत्र आळस, चैन, व अनीति याचा सुळसुळाट ... व गोवानीज सत्ता व डामडौल याचा डोलारा डच लोकाच्या आगमनानें डळमळूं लागला फिरंग्यानीं बाटविण्याच्या बाबतींत फार जुलूम केला. गावातील एखाद्या विहिरींत एखादें हाडूक टाकून गावचागाव बाटविला जाई. अशा रीतीनें बाटयाची संख्या फार वाढल्यानें माधवतीर्थावर त्याना गुपचुप प्रायश्चित्तें देण्यास सुरवात झाली, पण पाद्री लोकाना ही बातमी पोहोंचताच त्यानीं तें तीर्थच हाडूक टाकून बाटविलें. त्यावेळीं शेंडीवर प्रत्येकीं आठ रु प्रमाणें कर असे व त्याचें उत्पन्न तीन हजाराचें येई. फिरंग्याच्या सहवासानें कोंकणी भाषेवरहि परिणाम होऊन बरेचसे फिरंगीभाषेचे शब्द या भाषेंत घुसले आहेत १६०३ मध्यें डचानीं गोव्याला वेढा दिला तो त्याना उठवावा लागला. पण हलके हलके थोडा थोडा पोर्तुगीज मुलूख त्याच्या घशात उतरत होता. १६३९ त तसाच दुसरा प्रयत्न त्यानीं गोव्यावर केला पण तोहि फसला " शहरभर चर्च व सुंदर इमारती" आहेत जगामध्ये दुसरीकडे क्वचितच दिसणारें वैभव पोर्तुगीजाच्या वाट्यास हिंदुस्थानात आलें आहे व गोवा हें प्रति राम शहर आहे पण या सर्वांच्या मुळाशीं पोर्तुगीजाचा पोकळ डौल व खोटा अभिमान याची कीड लागली आहे " अशा तऱ्हेचीं वर्णनें त्यावेळच्या काहीं प्रवाशानीं केलीं आहेत. गोव्याची त्या वेळची इतकी अनुकंपनीय स्थिति झाली होती कीं, स्थानिक स्वतंत्रतावादी मूठभर लोकहि निकरानें प्रयत्न करते तर गोवा लढवण्याचें सामर्थ्य व धमक पोर्तुगीजात राहिली नव्हती. संभाजीमहाराजाच्या हातून हा प्रदेश स्वतंत्र होण्याचा योग अगदीं आलाच होता पण त्याना मध्येंच मोंगल सैन्याशीं टक्कर द्यावी लागल्यानें गोव्याचा बचाव झाला यानंतर सावतवाडीचे भोंसले व इतर मराठे याच्याशीं फिरंग्याच्या नेहमीं चकमकी होत असत व हे एकमेकाचे मुलूख व किल्ले घेत असत वसईच्या मोहिमेच्या सुमारास व्यंकटराव घोरपडे यानें गोव्यावर स्वारी करून साष्टी प्रांत काबीज केला होता (१७३९ जानेवारी) इ स १७४१ त १२००० युरोपियन शिपाई गोव्यास कुमकेस आले व त्यानीं बऱ्याच लोकाची कत्तल करून वाडीकराकडून किल्ले परत घेतले. व वाडीवर आपली अधिसत्ता बसविली. इतक्यात वरिष्ठ सरकार (लिस्बन) कडून घेतलेले किल्ले व मुलूख वाडीकरास परत देण्यास व सावंत व मराठे याच्याशीं वैर थांबविण्यास हुकूम आला पण त्याप्रमाणें घडलें नाहीं व हे खटके तसेच चालू राहिले

गोवा शहरची निकृष्टावस्था वरिष्ठसरकारच्या नजरेस येऊन बराच काळ लोटला होता म्हणून यावेळीं त्यानी पणजी येथें नवीन गोवा शहर बाधण्याकरिता खर्च मंजूर केला कारण जुनें शहर सुधारण्याची आशा नव्हतीच व त्यावर गैरवाजवी खर्च होऊन चुकला होता या सुमारास मराठे व स्थानिक लोक मिळून आपलें स्वातंत्र्य मिळवि

येोजिलें होतें असें कळतें. संजय, तारीख ४ आगष्ट १९१८ पहा ].

आपल्या वैभवाच्या दिवसात गोवा हें व्यापाराचें केंद्र होतें. सर्व व्यापार पोर्तुगीजांच्या हातीं होता व इराणी आखाताशीं होणारा घोड्यांचा व्यापार येथूनच होत असे. आता येथून व्यापार फार थोडा होतो. तरी अद्याप येथील सर्वच कारागीर नष्ट झाले नाहींत. अद्यापि सोनार, लोहार, सुतार व चाभार हे चांगलें कौशल्याचें काम करतात. निर्गत माल मुख्यतः नारळ, सुपारी, आंबा, फणस, दालचिनी, मीठ, काम्या वगैरे असून आयात माल तांदूळ, कपडा, साखर, दारू, तंबाखू वगैरे आहे १९०३-४ सालीं कस्टमचें उत्पन्न ५ लाखांचें झालें.

कॅसलरॉकपासून ५१ मैलपर्यंत रेल्वे गेली आहे. १९ इतर रस्ते आहेत, शिवाय लहानमोठे मार्ग आहेत. पणजी हें पोस्टऑफीस ( तार ऑफिससह ) आहे

या प्रदेशात मोठे पूर क्वचितच येतात. अतिवृष्टीनें मात्र कांहीं जिल्ह्यात बरेंच पाणी होतें अवर्षण पडलें म्हणजे शेतकरी लोकांचें फार नुकसान होतें पण इंग्रजी मुलुखातून धान्य येतें व सामान्यतः महाग तरी पण मिळतें

गोवा हा पोर्तुगीज साम्राज्याचाच एक भाग आहे असें मानण्यांत येतें व त्यावर गव्हर्नरजनरल ऑफ पोर्तुगीज-इंडिया म्हणून एक अधिकारी असतो. दिवाणी अधिकाराबरोबर लष्करी अधिकारहि त्याच्याकडे असतात. तरी प्रचलित राज्यव्यवस्थेंत कमजास्त करणें किंवा परराष्ट्रीयसंबंध वगैरेमध्यें त्याचे अधिकार मर्यादित आहेत. त्याच्या मदतीला एक लेजिस्लेटिव्ह कौन्सिल असतें त्यात ११निवडलेले व ७सरकारी सभासद असतात. शिवाय एक्झिक्युटिव्ह कौन्सिलहि आहे. शिवाय आणखी ५ कौन्सिलें आहेत. हल्लीं पोर्तुगालमध्यें लोकसत्ताक राज्य सुरू आहे व त्याचा थोडाबहुत फायदा गोव्यासहि मिळतो.

कारभाराच्या सोयीकरिता ' जुन्या काबिजातीचे ' तीन व नव्याचे ७ विभाग पाडले आहेत. या प्रत्येकाचे पुनः पोटविभाग आहेत प्रत्येक मोठ्या पोटविभागाला कौन्सिलें वगैरे आहेत. मोठ्या ( जुन्या काबिजातीच्या ) विभागात म्युनिसिपालिटी आहे.

दिवाणी कामाकरितां गोवा प्रदेश एक विभाग मानतात. याचे कोमेरकस म्हणून पुन्हा भाग पाडतात व त्यांचेहि आणखी पोटविभाग आहेत. प्रत्येक ठिकाणीं स्वतंत्र न्यायाधीश आहे. एकंदर सर्वांवर हायकोर्टाची देखरेख व अधिकार आहे. हायकोर्टाला दिवाणी व फौजदारी हे दोन्ही अधिकार आहेत व तेच अपीलकोर्ट असून १५०० पर्यंतच्या मालमत्तेसंबंधीं यांचा निकाल शेवटचा समजतात. १५०० वर पोर्तुगालच्या सुप्रीम ट्रिब्युनल पुढें अपील होतें.

१९०३-४ सालीं २० लाख उत्पन्न व तितकाच खर्च झाला. उत्पन्नाच्या बाबी जमिनीवरचा कर, कस्टम, पोस्ट, स्टँप, तंबाखू ( लायसेन्सें ), दारूवरील कर वगैरे. मिठाचें उत्पन्न म्हणण्यासारखें नाहीं. गोवा येथें टांकसाळ नाहीं.

१८७१ पासून एतद्देशीय सैन्य कमी करण्यात आलें. त्यासालीं एक युरोपियन तुकडी पोर्तुगालहून आली. १९०४ सालीं सैन्यसंख्या २७३० होती व पोलीस ३९०. होते दोहोंसाठीं मिळून खर्च १ लाखाच्या जवळजवळ होता.

शिक्षणाची प्रगति होत आहे. १९११ सालीं शेकडा १४ शिक्षित होते. १९०३-४ सालीं १२१ (९८ सरकारी व २३ खाजगी ) शाळा प्राथमिक शिक्षणाच्या होत्या. सरकारी गॅझेटशिवाय १२ पोर्तुगीज भाषेमध्यें एतद्देशीयांनीं चालविलेलीं वृत्तपत्रें होतीं. एक पुराणवस्तुसंशोधक मासिक होतें. सरकारी, साधें व लष्करी दवाखाने आहेत व बऱ्याच धर्मादाय संस्था आहेत. त्यांतील ४१५ बऱ्याच मोठ्या व जुन्या आहेत.

गोव्यातील एकंदर बंडें:—छुगितातु किंवा पोर्तुगीज लोक यांचें ज्यावेळीं वैभव संपलें, त्याचवेळीं त्यांचें शहाणपणहि गेलें. पूर्वींचे गामा, आलेमदा, आलबुकर्क, दों ज्युवावकास्त्र इ. मासल्याचे साहसी मुत्सद्दी, तसेच कामोईससारखे कवी, ढुक्दि सालदान्यासारखे शूर इ. त्याच वेळीं गेले. आणि एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस तर गोव्यास तीन वर्षात आठ आठ गव्हर्नर जनरल झाले. यात कांहीं अतिशयोक्ति नाहीं. त्यावेळीं पोर्तुगीज सरकारनें हें एक मासलेवाईक उदाहरण इतर राजास घालून दिल्यासारखें होतें. स. १८९९ त जकात व कर मनस्वी वाढले होते कलाकौशल्य, व्यापारउदीम वाढविण्याच्या हेतूनें बाहेरच्या मालावर शेकडा ४० इ. प्रमाणें जकात वाढविली होती. त्या वेळीं गोव्यात गिरणीचा धूरच दिसत नसे. तांदूळ, कपडा वगैरे त्यावेळीं बाहेरून येत असे. निर्गत माल म्हणजे नारळ, आंबे, सुपाऱ्या व खारी मासळी हा होता.

इ.स. १८९९ सालीं झालेल्या दंग्याच्या पायीं लोक हैराण झाले होते. त्या वेळीं बंदोबस्त एकाहि गव्हर्नराच्यानें झाला नाहीं. रा. रावजी राणे यास मारल्याबद्दल इतर राणे खवळलेले होते, ते पोर्तुगॉलहून ड्यूक ऑफ पोर्टो यास पाठविलेल्या अर्जाच्या प्रत्युत्तराची वाट पहात होते. परंतु अर्जाचा कांहीं उपयोग झाला नाहीं. बंड मोडताना सरकारनें प्रजेची परदारें, धान्यसाठा जाळून घराचे दगडहि पणजीस पाठविले. त्यामुळें साठ हजार लोक त्यावेळीं निराश्रित झाले होते. पुन्हां त्यांनीं पोर्टोच्या ड्यूकास अर्ज पाठविला होता. त्याचाहि उपयोग झाला नाहीं. हीं राणे मंडळी सत्तरी प्रांताची होती. राण्यांना पूर्वीं सरकारनें त्यांचे हक्क कायम ठेवण्याबद्दल व त्याना सुशिक्षित करण्याबद्दल आश्वासनें दिली होतीं व भर्ती आश्वासनें देऊन मग त्यांचा प्रांत खालसा केला होता परंतु तें एकीकडे राहून त्यांचा देतसारा चौपटीपासून दसपटीपर्यंत वाढविला गेला. तो देण्यास असमर्थ

शेतकऱ्यांनी ८०० रुपयाची जमीन २५ रु सार्‍याकरिता जप्त म्हणावी, त्याची गुरेंढोरें न्यावी असा प्रकार झाला. म्हाद्मरायाकडे अर्ज केला तर कांहीं परिणाम होईना म्हणून राणे लोकांनी वरीलप्रमाणें धोंडोशी उचल केली होती मागें बादशहाचे गाऊ येऊन जी स्वस्थता झाली होती, त्याच्या उलट या वेळच्या फेरेरा या गव्हर्नरनें मुद्दाम मिनिस्टरच्या सांगण्यावरून ही दडपशाही केली म्हणतात. त्यामुळें १८९६ चा दंगा झाला.

स. १८९६ च्या पूर्वी जे दंगे झाले होते त्याची त्रोटक हकी-कत अशी आहे. इ. स. १८२१ त पोर्तुगॉलमध्यें राज्यासं-बंधी फेरफार झाल्यामुळें गोंव्यातील सैन्यानें बंड केलें आणि रियुदे गर्द या सुभेदारास काबद्या किल्ल्यात कैद करून पांचे जणांची राज्यव्यवस्था राखण्यास नेमिले इ. स. १८४४ साली साखळी संस्थानांतील फोंडसावंत नामक सरदारानें इंग्रज-सरकाराविरुद्ध बंड केलें त्यांत त्याचे आठ मुलगेहि सामील होते. बडास विशेष बळकटी येण्याकरिता त्यानें आपला ज्येष्ठ मुलगा अण्णासाहेब याच्या साह्यानें मनोहर किल्ला आपल्या स्वाधीन करून घेतला. परंतु नंतर मेजर देलामोत यानें छापा घालून तो परत घेतला. त्या वेळीं निरुपाय होऊन ते गोंव्याच्या सरहद्दीवर रेसलकर व हवेलकर देसाई यांच्या आश्रयास जाऊन राहिले. त्यांनींहि त्या वेळीं मोठें बंड माज-विलें होतें. मेजर जेकब सावंतवाडीचा पोलिटिकल एजंट यानें बंडवाल्यास धरण्याकरिता ३००० रु चें व फोंड साव-ताचे मुलगे भीम सावंत, तान सावंत, हनुमंत सावंत, अण्णा देसाई आणि फोंड सावंत यास धरण्याकरिता रु २००० चें बक्षीस लाविलें होतें. हें वर्तमान समजताच त्यांनीं अण्णा-साहेबासहित पोर्तुगीज सर सुभेदार जुझे फेरेरा पेस्तान याकडे जाऊन आश्रय मागितला. फिरंगी सुभेदारानें त्याचा चांगला इतमाम ठेऊन त्यास पणजी येथें ठेविलें हें वर्तमान इंग्रजास समजतांच मुंबईचे गव्हर्नर यांनी कप्तन ऑर्थर यास गोमांतकांत पाठविलें, परंतु त्याच्या वकिलीचा कांहीं उपयोग झाला नाहीं. नंतर जेकब स्वतः पणजीस आला पण त्याचेहि श्रम व्यर्थ गेले. इ स. १८४७ त अण्णासाहेब व दुसरे बंडवाले यांनीं जेकब यास फिरंगी सरकारच्या संमतीनें अपराधाची क्षमा करावी म्हणून पत्र लिहिलें, त्यास अनुमोदन मिळून माफी झाली. त्या सर्वांस फिरंगी सुभेदारानें सोडून बाकीच्या बंडवाल्यास समुद्रपार केलें.

इ. स. १८५२ सत्तराचे राणे व सरदेसाई यांच्या कांहीं मागण्या गोंव्याचा सुभेदार बाराव दे बोरे; यानें कबूल केल्या नाहींत, म्हणून त्यांनीं दिपाराण्याच्या हाताखालीं फिरंगीसरकारविरुद्ध बंड केलें बंडवाले ५०० होते, ते प्रसिद्धपणें लढाईस तयार असत. ते श्रीमंतास व गरीबासहि त्रास देत. त्यामुळें सगळे लोक भयभीत होऊन गेले अशा प्रसंगी वाटे लोकांनीहि संधि साधून लूट सुरू केली. पये म्हणून बेरचे भट तेहि निष्ठूरपणें लोकांस त्रास देऊं लागले. ज्या वेळीं दिपाराण्यानें कुंभारजुवें बेट लुटलें, त्या वेळीं पथानीं बहुतेक घरें जाळून टाकिलीं.

राणे लोकांची रीत निराळी होती. त्यांनीं एकदम घरात शिरून मालकास पकडावें व त्याच्या तोंडून माहिती काढून घेऊन लुटालूट करावी. ‘ राणा आला रे राणा आला ’ असें एकानें म्हटलें कीं सर्व लोक आपली चीजवस्त कोठें तरी लपवून डोंगरावर जाऊन दडत व उजाडलें म्हणजे घरीं येत. इकडे बेरीचे भट यांनीं भरवस्तीचीं गावें उध्वस्त करून टाकलीं अशा तऱ्हेचा प्रजेचा छळ झाला तेव्हा फिरंग्यांनीं बंडवाल्या-पैकीं कित्येकास पकडून अर्धे गाडून त्यांचीं डोकीं उडविलीं व इतरास तोफेच्या तोंडीं दिलें व बहुतेक लष्कर बंडखोराचा पाठलाग करण्यास पाठविलें यावेळीं बहुतेक सैन्य काळ्या लोकाचें होतें त्याची बंडवाल्याशीं गांठ पडली कीं ते पळून जाई त्यात फोंडे महालातील सेनाधीश ‘ माज्योर ’ यानें महत्प्रयासानें तें बंड मोडलें या सरदारानें कांहीं जणास फांशीवरच फाशीं देऊन इतरास जेथें सांपडतील तेथें गोळी घालून मारलें.

नंतर बंडखोरांचा व सरकारचा सला झाला, तेव्हा पेस्तान हा सुभेदार होता त्यावेळीं दिपा राण्यास ५०० रु वर्षासन करून द्यावें लागलें तेव्हा राण्याच्या नांवावर जे लुटारू लोक बंड करीत होते ते आपोआप स्वस्थ बसले

इ स १८७० त पेस्तानच्या कारकीर्दीत गोमांतकात सर्वत्र शांतता होती. इतक्यात फौजेनें एकाएकी बंड केलें. हें बंड करण्याचें कारण असें झालें कीं, इ स १८६९ च्या डिसेंबर २ तारखेस पोर्तुगॉलच्या बादशहाकडून जें आज्ञापत्र आलें होतें त्यात कांहीं लष्करी लोकास बडतर्फ करून बाकी च्याचा पगार कमी करावा असें होतें त्यावरून शिपाई लोकांनीं बंड उभारलें या वेळीं गोमांतकात, मठग्राम, फोंडें, डिचोली, पणजी या शहरात ३००० वर सैन्य होतें

त्याशिवाय म्हापसें येथेंहि होतें, पणजीचें लष्कर म्हण-ण्याप्रमाणें सरकारच्या ताब्यात होतें. मठग्राम येथील पहिल्या पलटणींतील कांहीं शिपायास बडतर्फ केलें, हें जिकडे तिकडे समजताच सगळ्या लष्कराचा एकोपा झाला. प्रजा सगळी घाबरून गेली. गव्हर्नर पेस्तान हुशार होता त्यानें त्याचें मागणें मान्य करून त्यास माफी दिली चारीहि पलटणी फिरल्यावर त्याचा नाइलाज झाला. त्यानें त्यावेळीं निधडक मंडळी बंडवाल्याचा काय उद्देश आहे हें समजून घेण्याकरिता पाठविली होती

नंतर विस्कोंददे सा कानुआर याच्या कारकीर्दीत तसेंच बंड झालें हा सुभेदार मोठा शूर शिपाई होता त्यानें पणजी शहराभोंवतीं तोफा मांडल्या, पणजी शहर केवळ समरांगण होऊन गेलें होतें सर्व पलटणी एकत्र झाल्या हें वर्तमान सर सुभेदार यांस समजताच, राजवाड्याकडे येण्यास जेवढे मार्ग होते, तेथें त्यांनी चार मेढेकोट उभा-रले, आणि गोलंदाज लोकास असा हुकूम सोडला कीं, जर

येईजेल झातें असें कळतें सजय, तारीख ४ आगष्ट १९१८ पहा ].

आपल्या वैभवाच्या दिवसात गोवा हं व्यापाराचें केंद्र होतें सर्व व्यापार पोर्तुगीजाच्या हातीं होता व इराणी आखाताशीं होणारा घोड्याचा व्यापार येथूनच होत असे आता येथून व्यापार भरा फारच थोडा होतो तरी अद्याप येथील सर्वच कारागीर नष्ट झाले नाहींत अद्यापि सोनार, लोहार, सुतार व चाभार हे चागले कौशल्याचें काम करतात निर्गत माल मुख्यत नारळ, सुपारी, आंबा, फणस, दालचिनी, मीठ, काथ्या वगैरे असून आयात माल तादूळ, कपडा, साखर, दारू, तबाखू वगैरे आहे १९०३ ४ सालीं कस्टमचें उत्पन्न ५ लाखाचें झालें.

कॅसलरॉकपासून ५१ मैलपर्यंत रेल्वे गेली आहे १९ इतर रस्ते आहेत, शिवाय लहानमोठे मार्ग आहेत पणजी हें पोस्टऑफीस ( तार ऑफिससह ) आहे

या प्रदेशात मोठे पूर क्वचितच येतात अतिवृष्टीनें मात्र काहीं जिल्ह्यात बरेंच पाणी होतें अवर्षण पडलें म्हणजे शेतकरी लोकाचें फार नुकसान होतें पण इमजी मुलुखातून धान्य येतें व सामान्यत महाग तरी पण मिळतें

गोवा हा पोर्तुगीज साम्राज्याचाच एक भाग आहे असें मानण्यात येतें व त्यावर गव्हर्नरजनरल ऑफ पोर्तुगीज-इंडिया म्हणून एक अधिकारी असतो दिवाणी अधिकाराबरोबर लष्करी अधिकारहि त्याच्याकडे असतात तरी प्रचलित राज्यव्यवस्थेत कमजास्त करणें किंवा परराष्ट्रीयसबंध वगैरेमध्यें त्याचे अधिकार मर्यादित आहेत त्याच्या मदतीला एक लेजिस्लेटिव्ह कौन्सिल असतें त्यात ११निवडलेले व ७सरकारी सभासद असतात शिवाय एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलहि आहे शिवाय आणखी ५ कौन्सिलें आहेत हल्लीं पोर्तुगालमध्यें लोकसत्ताक राज्य सुरू आहे व त्याचा थोडाबहुत फायदा गोव्यासहि मिळतो

कारभाराच्या सोयीकरिता ' जुन्या काबिजातीचे ' तीन व नव्याचे ७ विभाग पाडले आहेत या प्रत्येकाचे पुन पोटविभाग आहेत प्रत्येक मोठ्या पोटविभागाला कौन्सिलें वगैरे आहेत मोठ्या ( जुन्या काबिजातीच्या ) विभागात म्युनिसिपालिटी आहे

दिवाणी कामाकरिता गोवा प्रदेश एक विभाग मानतात याचे कोमॅरकस म्हणून पुन्हा भाग पाडतात व त्यांचेहि आणखी पोटविभाग आहेत प्रत्येक ठिकाणीं स्वतंत्र न्यायाधीश आहे एकदर सर्वांवर हायकोर्टाची देखरेख व अधिकार आहे हायकोर्टाला दिवाणी व फौजदारी हे दोन्हा अधिकार आहेत व तेंच अपीलकोर्ट असून १५०० पर्यंतच्या मालमत्तेसबंधीं याचा निकाल शेवटचा समजतात १५०० वर पोर्तुगालच्या सुप्रीम ट्रिब्युनल पुढें अपील होतें

१९०३-४ सालीं २० लाख उत्पन्न व तितकाच खर्च । उत्पन्नाच्या बाबी जमिनीवरचा कर, कस्टम, पोस्ट, स्टँप, तबाखू ( लायसेन्सें ) दारूवरील कर वगैरे मिठाचें उत्पन्न म्हणण्यासारखें नाहीं गोवा येथें टाकसाळ नाहीं

१८७१ पासून एतद्देशीय सैन्य कमी करण्यात आलें त्याऐवजीं एक युरोपियन तुकडा पोर्तुगालहून आला १९०४ सालीं सैन्यसख्या २७३० होती व पोलीस ३९० होते दोहोंसाठी मिळून खर्च १ लाखाच्या जवळजवळ होता

शिक्षणाची प्रगति होत आहे १९१० सालीं शेकडा १४ शिक्षित होते १९०३-४ सालीं १२१ (९८ सरकारी व २३ खाजगी ) शाळा प्राथमिक शिक्षणाच्या होत्या सरकारी गॅझेटशिवाय १२ पोर्तुगीज भाषेमध्यें एतद्देशीयांनीं चालविलेलीं वृत्तपत्रें होतीं एक पुराणवस्तुसशोधक मासिक होतें सरकारी, साधे व लष्करी दवाखाने आहेत व बऱ्याच धर्मादाय सस्था आहेत त्यातील ४१५ बऱ्याच मोठ्या व जुन्या आहेत

गोव्यातील एकदर वर्ग —इजितानु किंवा पोर्तुगीज लोक यांचें ज्यावेळीं वैभव सपलें, त्याचवेळीं त्यांचें शहाणपणहि गेलें पूर्वींचे गामा, आलेमदा, आलबुकर्क, दों, ज्युवावकास इ मासल्याचे साहसी मुत्सद्दी, तसेच कामोंईससारखे कवी, हुफिद साल्दान्यासारखे शूर इ त्याच वेळीं गेले आणि एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस तर गोव्यास तीन वर्षांत आठ आठ गव्हर्नर जनरल झाले यात काहीं अतिशयोक्ति नाहीं त्यावेळीं पोर्तुगीज सरकारनें हें एक मासलेवाईक उदाहरण इतर राज्यास घालून दिल्यासारखें होतें स १८९६ त जकात व कर भरमसाठ वाढले होते कलाकौशल्य, व्यापारउदीम वाढविण्याच्या हेतूनें बाहेरच्या मालावर शेकडा ४० ६ प्रमाणें जकात वाढविली होती त्या वेळीं गोव्यात गिरणीचा धूरच दिसत नसे तादूळ, कपडा वगैरे त्यावेळीं बाहेरून येत असे निर्गत माल म्हणजे नारळ, आंबे, सुपाऱ्या व खारी मासळी हा होता

इ स १८९६ सालीं झालेल्या दग्याच्या पायीं लोक हैराण झाले होते त्या वेळीं बदोबस्त एकाहि गव्हर्नराच्यानें झाला नाहीं रा रावजी राणे यास मारल्याबद्दल इतर राणे खवळलेले होते, ते पोर्तुगालहून ड्यूक ऑफ पोर्टो यास पाठविलेल्या अर्जाच्या प्रत्युत्तराची वाट पहात होते परतु अर्जाचा काहीं उपयोग झाला नाहीं बड मोडताना सरकारनें प्रजेचीं घरेंदारें, धान्यसाठा जाळून घराचे दगडहि पणजीस पाठविले त्यामुळें साठ हजार लोक त्यावेळीं निराश्रित झाले होते पुन्हा त्यानीं पोर्टोच्या ड्यूकास अर्ज पाठविला होता त्याचाहि उपयोग झाला नाहीं ही राणे मडळी सत्तरी प्रांताची होती राण्याना पूर्वी सरकारनें त्याचे हक्क कायम ठेवण्याबद्दल व त्याना सुशिक्षित करण्याबद्दल आश्वासनें दिलीं होतीं व अशीं आश्वासनें देऊन मग त्याचा प्रांत खालसा केला होता परतु तें एकीकडे राहून त्याचा शेतसारा चौपटी पासून दसपटीपर्यंत वाढविला गेला तो देण्यास असमर्थ

शेतकऱ्याची ८०० रुपयांची जमीन ७५ रु सान्याकरिता जप्त व्हावी, त्याची गुरेंढोरें न्यावी असा प्रकार झाला. व्हाइसरायाकडे अर्ज केला तर कांहीं परिणाम होईना म्हणून राणे लोकांनीं वरीलप्रमाणें थोडीशी उचल केली होती मागें बादशहाचें माफ येऊन जी स्वस्थता झाली होती, त्याच्या उलट या वेळच्या फेरेरा या गव्हर्नरनें मुद्दाम मिनिस्टरच्या सांगण्यावरून ही दडपशाही केली म्हणतात. त्यामुळें १८९५ चा दंगा झाला.

स. १८९६ च्या पूर्वी जे दंगे झाले होते त्यांची थोडक्यांत हकीकत अशी आहे. इ. स. १८२१ त पोर्तुगालमध्यें राज्यासंबंधी फेरफार झाल्यामुळें गोव्यातील सैन्यानें बंड केलें आणि रियुदेगार्द या सुभेदारास कावळ्या किल्ल्यात कैद करून पांचे असामी राज्यव्यवस्था राखण्यास नेमिले. इ. स. १८४४ सालीं वार्डा मस्थानातील फोंडसावत नामक सरदारानें इंग्रजसरकारविरुद्ध बंड केलें त्यांत त्याचे आठ मुलगेहि सामील होते. बंडास विशेष बळकटी येण्याकरिता त्यानें आपला ज्येष्ठ मुलगा अण्णासाहेब याच्या साह्यानें मनोहर किल्ला आपल्या स्वाधीन करून घेतला. परंतु नंतर मेजर देलामोत यानें छापा घालून तो परत घेतला. त्या वेळीं निरुपाय होऊन ते गोव्याच्या सरहद्दीवर ३ सलकर व हवेलकर देसाई यांच्या आश्रयास जाऊन राहिले. त्यांनींहि त्या वेळीं मोठें बंड माजविलें होतें. मेजर जेकब सावंतवाडीचा पोलिटिकल एजंट यानें बंडवाल्यास धरण्याकरितां ३००० रु चें व फोंड सावंताचे मुलगे भीम सावंत, नाना सावंत, हनुमंत सावंत, अण्णा देसाई आणि फोंड सावंत यास धरण्याकरितां रु २००० चें बक्षीस लाविलें होतें. हें वर्तमान समजताच त्यांनीं अण्णासाहेबासहित पोर्तुगीज सर सुभेदार जुजे फेरेरा पेस्तान याकडे जाऊन आश्रय मागितला. फिरंगी सुभेदारानें त्याचा चांगला इतमाम ठेऊन त्यांस पणजी येथें ठेविलें हें वर्तमान इंग्रजास समजताच मुंबईचे गव्हर्नर यांनीं कप्तन ऑर्थर यास गोमांतकांत पाठविलें, परंतु त्याच्या वकिलीचा कांहीं उपयोग झाला नाहीं. नंतर जेकब स्वतः पणजीस आला पण त्याचेहि श्रम व्यर्थ गेले. इ स. १८४७ त अण्णासाहेब व दुसरे बंडवाले यांनीं जेकब यास फिरंगी सरकारच्या संमतीनें अपराधाची क्षमा करावी म्हणून पत्र लिहिलें, त्यास अनुमोदन मिळून माफी झाली. त्या सर्वांस फिरंगी सुभेदारानें सोडून बाकीच्या बंडवाल्यांस समुद्रपार केलें.

इ. स. १८५२ सत्तराचे राणे व सरदेसाई यांच्या कांहीं मागण्या गोव्याचा सुभेदार बाराव दे कोरे; यानें कबूल केल्या नाहींत, म्हणून त्यांनीं दिपाराण्याच्या हाताखालीं फिरंगीसरकारविरुद्ध बंड केलें. बंडवाले ५०० होते, ते प्रसिद्धपणें लढाईस तयार असत. ते श्रीमंतास व गरीबासहि त्रास देत. त्यामुळें सगळे लोक भयभीत होऊन गेले. अशा प्रसंगीं चाडे लोकांनींहि संधि साधून लूट सुरू केली. पण्ये म्हणून केरचे भट तेहि निष्ठूरपणें लोकांस त्रास देऊं लागले. ज्या वेळीं दिपाराण्यानें कुंभारजुवें येट लुटलें, त्या वेळीं पण्यांनीं बहुतेक घरें जाळून टाकिलीं.

राणे लोकांची रीत निराळी होती. त्यांनीं एकदम घरात शिरून मालकास पकडावें व त्याच्या तोंडून माहिती काढून घेऊन लुटालूट करावी. ' राणा आला रे राणा आला ' असें एकानें म्हटलें कीं सर्व लोक आपली चीजवस्त कोठें तरी लपवून डोंगरावर जाऊन दडत व उजाडलें म्हणजे घरीं येत. इकडे केरीचे भट यांनीं भरवस्तीचीं गावें उध्वस्त करून टाकलीं अशा तऱ्हेचा प्रजेचा छळ झाला तेव्हां फिरंग्यांनीं बंडवाल्यापैकीं कित्येकास पकडून अर्धे गाडून त्यांचीं डोकीं उडविलीं व इतरांस तोफेच्या तोंडीं दिलें व बहुतेक लष्कर बंडखोरांचा पाठलाग करण्यास पाठविलें यावेळीं बहुतेक सैन्य काळ्या लोकांचें होतें. त्याची बंडवाल्यांशीं गांठ पडली कीं ते पळून जाई. त्यात फोंडे महालातील सेनाधीश ' माज्योर ' यानें महत्प्रयासानें तें बंड मोडलें या सरदारानें कांहीं जणांस फोंड्याजवळच फांशीं देऊन इतरास जेथें सापडतील तेथें गोळी घालून मारलें.

नंतर बंडखोरांचा व सरकारचा सल्ला झाला, तेव्हां पेस्तान हा सुभेदार होता त्यावेळीं दिपा राण्यास ५०० रु वर्षासन करून द्यावें लागलें तेव्हां राण्याच्या नांवावर जे लुटारू लोक बंड करीत होते ते अजीयात स्वस्थ बसले.

इ स १८७० त पेस्तानच्या कारकीर्दींत गोमांतकांत सर्वत्र शांतता होती. इतक्यात फौजेनें एकाएकीं बंड केलें. हें बंड करण्याचें कारण असें झालें कीं, इ स १८६९ च्या डिसेंबर २ तारखेस पोर्तुगालच्या बादशहाकडून जें आज्ञापत्र आलें होतें त्यात कांहीं लष्करी लोकास बडतर्फ करून बाकी च्याचा पगार कमी करावा असें होतें त्यावरून शिपाई लोकांनीं बंड उभारलें या वेळीं गोमांतकांत, मठग्राम, फोंडें, डिचोली, पणजी या शहरात ३००० वर सैन्य होतें

त्याशिवाय म्हापसें येथेंहि होतें, पणजीचें लष्कर म्हणण्यासारखें सरकारच्या ताब्यात होतें. मठग्राम येथील पहिल्या पलटणींतील कांहीं शिपायास बडतर्फ केलें, हें जिकडे तिकडे समजताच सगळ्या लष्कराचा एकोपा झाला. प्रजा सगळी घाबरून गेली. गव्हर्नर पेस्तान हुशार होता. त्यानें त्याचें मागणें मान्य करून त्यास माफी दिली. चारीहि पलटणी फिरल्यावर त्याचा नाइलाज झाला त्यानें त्यावेळीं निवडक मंडळी बंडवाल्याचा काय उद्देश आहे हें समजून घेण्याकरिता पाठविली होती

नंतर विस्कोंददे सा आनुआर याच्या कारकीर्दींत तसेंच बंड झालें हा सुभेदार जात्या शूर शिपाई होता त्यानें पणजी शहराभोंवती तोफा मांडल्या, पणजी शहर केवळ समरांगण होऊन गेलें होतें सर्व पलटणी एकत्र झाल्या हें वर्तमान सर सुभेदार यांस समजताच, राजवाड्याकडे येण्यास जेवढे मार्ग होते, तेथें त्यांनीं चार मेढेकोट उभारले, आणि गोलंदाज लोकांस असा हुकूम सोडला कीं, जर

बंडवाले शहरावर चालून येतील तर त्यावर एकदम तोफा सोडाव्या नंतर शहरसंरक्षणार्थ जेवढे राजनिष्ठ लोक होते, त्याकडून शपथ घेवविली दुसऱ्या दिवशीं लोकांत जाहीरनामा प्रसिद्ध केला तो प्रसिद्ध होताच बंडवाले आपल्या छावणींत परत गेले व बंड आपोआप मोडलें यावेळीं ड्यूक आगुस्त हा त्यावेळच्या बादशहाचा भाऊ आला होता, त्यानें बंडवाल्यांना माफी दिली यानंतर सन १९१२ सालींहि राणे लोकांनीं बंड केलें होतें [ इंपेरियल ग्याझे पु १२, मंदेस, पोर्तुगीज इंडिया कूज गोवा केसरी ३।३।१८९६, १२।८।१८९६.]

शहर—उ अक्षांश १५°३०' व पू रेखांश ७३°५७' पोर्तुगीज हिंदुस्थानची राजधानी मांडवी नदीच्या मुखापाशीं हें शहर वसलें आहे गोवा या नावाचीं तीन शहरें होतीं पहिलें अगदीं जुनें हिंदूच्या वेळेचें, याचा आता मागमूसहि नाहीं, दुसरें मुसलमानांचें म्हणजे जुनें गोवें अथवा रोमन कॅथोलिक पंथाचें पूर्वेकडचें आद्यपीठ व तिसरें नवें गोवें अथवा राजकीय सत्तेचें मुख्य ठिकाण नवें गोवें लोकसंख्या (१९००)२३०२ व घरें ५०० जुन्या गोव्याची लो. स ९३२५ व घरें १७३५ जुन्या गोव्यात पूर्वी २००००० पर्यंत लोक रहात असत ३।-३।। शें वर्षांच्या अल्पकालात पूर्वींचा गोव्यातील फरक केवळ कालमहिम्यानेंच घडून आला त्या ठिकाणीं आज काहीं चर्चेस व कॅथेड्रल्स मात्र दिसतात व तेहि अद्याप धर्माची गादी तेथें आहे म्हणून जुन्या ऐतिहासिक वस्तूंपैकीं व्हाइसरायचा बंगला, कॉलेज, चर्च वगैरे सर्व इमारती कालाच्या भक्ष्यस्थानीं पडल्या व त्याच्या जागीं आता रान व जंगल माजलें आहे जुनें शहर हें नव्या गोव्याचें आता केवळ उपनगरच झालें आहे. १७५९ पर्यंत जुनें गोवें आबाद होतें त्या सालीं जेसुइट लोकांना हाकलून दिलें नवीन गोवा शहरांत पणजी, जुना गोवा व रायबंदर असे तीन भाग आहेत यांचें क्षेत्रफळ सहा चौ मैल आहे येथेंहि मुंबईप्रमाणेंच समुद्र हटवून व भर घालून जागा वाढवीत आहेत पूर्वीपासून येथें फक्त एक किल्ला असे व हल्लीं तो व्हाइसरिगल लॉज म्हणून उपयोगात आहे. नवीन शहर सुंदर रेखीव व स्वच्छ आहे. अल्बुकर्कचा एक पुतळाहि येथें आहे

मार्मागोवा बंदराची वाढ करण्यासाठीं एक इम्प्रूव्हमेंट ट्रस्ट स्थापन करण्यात आलें, या ट्रस्टच्या ताब्यात २००० एकर जमिनीचे तुकडे असून त्यांचें क्षेत्रफळ प्रत्येकीं ८०० ते १६०० चौ. यार्ड आहे हे जमानीचे तुकडे कायमच्या भाडेपट्टीनें देण्यांत येतात या तुकड्याचें भाडें जागेच्या महत्त्वावर अवलंबून असतें जागेचा तुकडा जर बंदरीं एकीकडे असेल तर प्रत्येक चौरस मीटरला २ आणे भाडें आहे व तीच ऐन तिव्यावर जर जागा असेल तर १ रुपया ८ आणे भाडें पडतें याशिवाय प्रत्येक चौरस मीटरगणीक ४ पै ही पट्टी निराळी द्यावी लागतेच या जागेपैकीं बराच भाग उद्योगधंदे व व्यापार यासाठीं राखून ठेवण्यात आला आहे आयात व निर्गत मालावर फार कमी जकात ठेवण्यात आली असल्यामुळें, येथील व्यापार बराच वाढेल व मार्मागोवा हें व्यापाराचें केंद्र बनेल असें वाटतें

सर केंटनो गोनसालव्हज याला वरिष्ठ कोर्टाच्या न्यायाधीशाचा जागा १९२४ मध्यें देण्यात आली हा स्वत गोव्याचा रहिवाशी व गोआन असल्यानें गोव्यातील लोकांना त्याबद्दल फार समाधान वाटत आहे गोनसाल्व्हज याचें शिक्षण कोइंब्रा विश्वविद्यालयात झालें असून, मॅजिस्ट्रेटची जागा पटकाविणारा हा पहिलाच गोआन होय १९१० त पोर्तुगीज रिपब्लिक जाहीर करण्यात आलें, त्यावेळीं याला पोर्तुगीज वेस्ट आफ्रिकेचा गव्हर्नर जनरल नेमण्यात आलें

१९२४ त, पोर्तुगीज वसाहतपरिषदेचें दुसरें अधिवेशन लिस्बनमध्यें भरलें त्यात वसाहतींना कायदेमंडळात जे हक्क देण्यात आले आहेत त्यापेक्षा अधिक हक्क देण्यात यावेत असा ठराव पसार झाला गोआन लोकांना पोर्तुगीज लोकांच्या बरोबरीनें वागविण्यात येत असल्यानें येथें ब्रिटिश हिंदुस्थानातल्याप्रमाणें सरकार व प्रजा यामध्यें फारसा वेबनाव दिसून येत नाहीं

**गोशीर्ष**—ह्युएनत्सिन् यानें गोशीर्ष पर्वताचें जें वर्णन दिलें आहे त्यावरून हा पर्वत व ह्युएनत्संग यानें वर्णिलेला गोशृंग पर्वत हे एकच असावे गोशृंगाचा निषाद भूमी म्हणून महाभारतात उल्लेख आहे (सभा ३२ ५) या पर्वताचें माहात्म्य तिबेटी कन्जीरमध्यें सुरक्षित ठेवलेल्या (रि ग्लान–ह लुंग बस्तान) ' गोशृंग व्याकरण ' या ग्रथात वर्णन केलें आहे.

' नरेन्द्रयश ' याच्या बुद्धपीठाच्या यादीच्या शेवटीं (सूर्यगर्भसूत्र याचें चिनी भाषांतर) असें म्हटलें आहे कीं यु–तिएँ या ठिकाणीं नदीजवळ एक तुटलेला कडा आहे. त्या ' निङ्गोयु–तङ्गोयु ' (गोशीर्ष) पर्वतावर एक चैत्य व ' किङ–मो सो (सें) लो हि आग ' (सुगंध) या साधूचा मठ आहे

सूर्यगर्भसूत्राच्या तिबेटी भाषांतरांत असें म्हटलें आहे कीं, पृथ्वीवरील खश प्रदेशात गोमति (ति गो म ति) नदीच्या डोंगराळ तीरावर गोशृंग (ग्लान रु) पर्वताजवळ गोमपालगंध रहातो

यावरून गोशीर्ष व गोशृंग हे एकच आहेत याबद्दल संशय रहात नाहीं या ठिकाणचा मॉ ग्रेनड यानीं शोधून व त्याचें प्रत्यंतर डॉ स्टेन यानीं घेऊन असें ठरविलें आहे कीं हें गोशीर्ष म्हणजे हल्लींची जी 'कारकष' नदी, तिच्या उजव्या तीरावरील उभा सुळका हमरी होय यावरील गोमपालगन्ध साधू हा ह्युएनत्संग यानें वर्णन केलेला मैत्रेय याच्या आगमनाची वाट पहात असलेला विचारमग्न अर्हत असावा

याच्याच गुहेंत इ स १८७२ मध्यें सांपडलेलें खरोष्ट्री लिपींत लिहिलेलें धम्मपद ' हें पुस्तक सापडलें असावें

यापैकी काही भाग डुट्रेल-द-हिन्स-मिशन ह्यांनें व काही भाग मि. पेट्रोव्हस्की यांनी मिळविला [ इं. ॲं. १९०६ ]

**गोसावी**—गोसाई, गुसाई, गोस्वामी वगैरे अनेक नावांनी हा वर्ग ओळखिला जातो. गोसावी हा एक हिंदु यतींचा वर्ग असून त्यांत शैव व वैष्णव असे दोन पंथ आहेत. वैष्णव गोसावी आसाम बंगाल्यांत फार आहेत. वऱ्हाड, महाराष्ट्रांत बहुतेक शैवच आहेत. गोसावी वर्गांत भटके (भिक्षेकरी) व गृहस्थ असे दोन भेद करता येतील भटके गोसावी देवाच्या नावाखाली वाटेल तसा अनाचार करतात हें सर्वत्रास माहीत आहे. त्यांच्यापासून मनौरस संततीहि उत्पन्न होत असते चेले करण्याकरितां ते कित्येकदां मुलें चाळवतात किंवा विकत घेतात. उन्हा तान्हांत व जंगलांत राहून व विलक्षण कृती करून ते सशक्त व क्रूर बनलेले असतात.

त्यांनी जर एकदां शस्त्र हातीं घेतलें तर त्यांना दाबांत ठेवणें फार मुष्किलीचें होतें असा अनुभव आहे प्राचीन काळीं निरनिराळ्या गोसाव्यांच्या संघाच्या आपआपसांत निकराच्या लढाया झाल्या आहेत. ते नेहमीं टोळ्या करून फिरत असत व भिक्षेच्या नांवाखालीं लोकांपासून एक प्रकारचा करच वसूल करीत असत जर त्यांना भिक्षा घातली नाहीं, तर ते लोकांना लुटीत असत व प्रसंग विशेषीं खून करण्यासहि देखील त्यांनी मागपुढें पाहिलें नाहीं. सशस्त्र गोसाव्यांच्या भटकणाऱ्या टोळ्यांनीं पूर्वी समाजांत पशुतुल्य अत्याचार केले आहेत. पूर्वी गोसावी लष्करांत देखील भरती होत असत. मराठा लष्करांत गोसाव्यांना घेण्याची चाल महादजी शिंद्यानें पाडली त्यानें त्यांची एक पृथक् तुकडी करून ती अंबाजी इंगळ्याच्या हाताखालीं दिलेला होती. हिंमतबहादर नावाचा मनुष्य या गोसाव्यांचा गुरु असून तो त्याच्या तुकडीवरील अधिकारी होता हे गोसावी लोक शिपाईगिरीच्या पेशांत पुढें पुढें तर इतके हलके गेले कीं, नंतर काहीं वर्षांनीं हिंमतबहादर शिंद्यास सोडून निघून गेला तरी त्याच्या तुकडीनें शिंद्यांची नोकरी सोडली नाहीं (डफचा इतिहास पहा) येथपर्यंत सामान्य गोसावी वर्गाचें विवेचन झालें, आतां गृहस्थ गोसावी जातीविषयीं माहिती देऊं

'गोसावी' ही निराळी जात मानली जाते महाराष्ट्र, वऱ्हाड, मध्यप्रांत व हिंदुस्थानांतील पुष्कळ भाग यांत या जातीचें वास्तव्य आहे. सबंध हिंदुस्थानांतील एकंदर गोसाव्यांची संख्या अडीच लाखांवर आहे, पैकीं सुमारें १४ हजार संयुक्त प्रांतांत, ४२ हजार वऱ्हाडमध्यप्रांतांत, ३० हजार हैद्राबाद संस्थानांत, २८ हजार राजपुतान्यांत, २५ हजार बिहार-ओरिसांत व २१ हजार मध्यहिंदुस्थानांत आहेत ही जात श्रीशंकराचार्यांच्या अद्वैतमताची अनुयायी आहे. गिरी, पुरि, भारती इत्यादि यांचीं दहा आडनांवें आहेत. जातींत 'घरबारी', 'मठधारी' संन्यासी वगैरे भेद आहेत. मात्र कोणालाहि 'घरबारी' म्हणजे 'गृहस्थ' होतां येतें किंवा 'मठधारी' किंवा संन्यासी राहतां येतें. हल्लीं कित्येक मठधारी लग्न करूं लागले आहेत. गुजराथेंत काहीं 'मठधारी' 'घरबारी' झाले आहेत वऱ्हाडांतील वज्रेश्वरी संस्थानचे अधिपति 'घरबारी' झाले आहेत (वज्रेश्वरी संस्थानचा इतिहास य. रा. पारख यांनीं लिहिला आहे) 'मठधारी' गोसाव्यांत 'महंत' व 'परमहंस' आहेत परंतु बहुतेक व्यवहार घरबाऱ्यासारखाच आहे या 'मठधारी' मध्यें बरेच गोसावी 'नवकोट नारायण' आहेत. मस्कामंडी, बुद्धगया, हैद्राबाद इत्यादि ठिकाणच्या गोसाव्यांत राजे, महाराजे किताब धारण करणारे आहेत

शिक्षणांत ही जात बरीच मागें आहे उदाहरणार्थ, मध्यप्रांत व वऱ्हाड मिळून सरासरी चाळीस बेचाळीस हजार लोक आहेत. पण इंग्रजी अंमल सुरू झाल्यापासून या भागांत एकच ग्राज्युएट झाला महाराष्ट्रांतहि हीच स्थिति आहे. ज्ञातीची वंशावळ भाट लोकांजवळ आहे त्यावरून व इतर ऐतिहासिक पुराव्यावरून या जातींत ब्राह्मणाचा व सर्व वर्णांच्या लोकांचा भरणा आहे असें दिसतें वऱ्हाडांत देशमुखांचीं मुलें काहीं गोसाव्यांच्या घराण्यांत दिलेलीं आढळतात. यांचा मुख्य धंदा शेतीचा, त्याच्या खालोखाल व्यापार. कित्येक धर्मगुरुहि आहेत वऱ्हाड व मध्यप्रांतांत ब्राह्मणेतर मंडळींत गोसाव्यांचे शिष्य पुष्कळ आहेत कित्येकांस मोठमोठ्या जहागिरी मिळाल्या आहेत

उत्तरहिंदुस्थानी व महाराष्ट्रीय पुष्कळ ब्राह्मण गोसाव्यांचीं पुरोहितपणाचीं कामें करतात गोसावी मुख्यत नारायण व शंकराचे उपासक आहेत परंतु इतर देवांविषयीं त्यांच्यांत अनादर नाहीं यांत त्रिकाळसंध्या करणारे कित्येक आढळतात. गायत्री, महिम्न, गीता यांचा पाठ पुष्कळ करतात वैदिक संन्यास संस्काराचा अवशेष 'विरजाहोम' मात्र राहिला आहे. बाकीचे बहुतेक पुराणोक्त होतात संन्याशाप्रमाणें गृहस्थ मृतासहि पुरतात व श्राद्धाऐवजीं पुण्यतिथि ('बरसी') पाळतात मध्यप्रांतांतील विवाह बहुतेक उत्तरहिंदुस्थानांतील 'भावरे' पद्धतीनें होतात व वऱ्हाडांत पुराणोक्त होतात. महाराष्ट्र व काठेवाड यांत कित्येक जागीं वेदोक्त संस्कार झालेले आहेत.

गोसाव्यांत पोटजाती नाहींत. गिरी, पुरी, पर्वत, सागर, वन, तीर्थ, भारती, सरस्वती, अरण्य व आश्रम हीं मुख्य १० आडनावें आहेत त्यांनाच इतराकडून पोटजाती म्हणून समजण्यांत येतें लग्न वगैरे एकाच 'मठी' च्या घराण्यांत होत नाहीं. एका मठीचे लोक हल्लीं 'मठी' चा भेद पाळतात. गिरी गिरीमध्यें लग्नव्यवहार होतो परंतु एकाच 'मठी' च्या गिरींत होत नाहीं. या मठी ५२ (कित्येकांच्या मतें ५३,) आहेत. पूर्वीच्या गोत्रप्रवराचा विसर पडल्यानें हल्लीं 'मठी' ही गोत्रासारखी समजली जाते. शारदा, ज्योतिर्मठ किंवा जोशी मठ, गोवर्धनमठ व

शृंगेरीमठ असे मुख्य चार मठ आहेत इतर तीन मिळून एकंदर ७ मठ आहेत. आणि मढी उर्फ मढी ५२ आहेत.

आपला सामाजिक दर्जा द्विजाप्रमाणें आहे असें सुशिक्षित गोसावी म्हणतात. यांनीं दशनामगोस्वामीमंडळ नावाची एक संस्था काढिली आहे. पेशवाईत महानुभाव व गोसावी यांच्यात सामाजिक दर्जाबद्दल भांडणें झालीं आहेत त्यात 'गोसावी' हे सनातनधर्माचे अनुयायी ठरले आहेत मुंबई व मध्यप्रांत हायकोर्टाच्या ठरावात गोसाव्यात 'याज्ञवल्क्यस्मृति'–'दायभाग' लागू आहे असें मानलें गेलें आहे पूर्वी जातीच्या पंचायती होत्या.आता बहुतेक लुप्त झाल्या. [ यवतमाळचे रा. पृथ्वीगीर हरिगीर यांजकडून आलेल्या माहितीचा या लेखात संक्षेपानें उपयोग केला आहे इतर संदर्भग्रंथः-विल्सन-रिलिजियस सेक्टस ऑफ दि हिंदूज: सेन्सस रिपोर्ट १८८१–१९११, क्रूक, रसेल व हिरालाल; एंथोवेन, जोगेंद्र नाथ भट्टाचार्य-हिंदु कास्ट्स ॲंड सेक्टस. ]

**गोसावीनंदन.**—याचें नाव वासुदेव असून बापाचें नाव गोस्वामी ( गोसावी ) होतें. हा तंजावरकडील राहणारा असून याचे गुरु गोपालाश्रमगजानन नावाचे होते अर्वाचीनकोशकार याच्या गुरूंचे नाव निरंजनस्वामी असें देतात. याचा काल इ.स १६५०–१७०० चा होय याचा मुख्य ग्रंथ ज्ञानमोदक नावाचा असून शिवाय सीतास्वयंवर व अभंग, पदें वगैरे स्फुटकाव्य बरेंच आहे. याचीं स्तोत्रें व अष्टकें लहान मुलांना शिकता येतील अशीं सोपीं व साधीं आहेत, हा गाणपत्य होता [ महाराष्ट्रसारस्वत ]

**गोहद**—ग्वाल्हेर संस्थानातील तोंवरघाट जिल्ह्यातील एक शहर. लो. सं. ( १९०१ ) ५३८३. अठराव्या शतकापासून याचें नाव ऐकूं येतें. त्या वेळीं हें जाट लोकांनीं घेतलें. मध्यंतरीं ३०१३२ वर्षें तें रजपुताच्या ताब्यात होतें. पण पुन्हा जाटाकडे आलें १७७९ मध्यें इंग्रजांशीं त्यांनीं तह केला पण तहाच्या अटी न पाळल्या गेल्याच्या सबबीवर शिंद्यापासून १७८४ मध्ये इंग्रजांनीं त्याचें संरक्षण केलें नाहीं. १८०३ जर्ध्ये शिंद्याचा मुखत्यार स्वतंत्र झाला व त्यानें गोहद इंग्रजांच्या स्वाधीन केलें तें १८०४ मध्यें त्याला परत मिळालें व लवकरच इंग्रजांनीं मदत देण्याचें नाकारल्यामुळें तें शिंद्याच्या हातीं गेलें. हें शहर वैसाली नदीच्या काठावर आहे. भोंवती तट आहेत आतील भागात एक भक्कम किल्ला आहे व त्यातील जुन्या राजवाड्यात कचेरी भरते. इतर इमारती व त्यांचें काम महत्त्वाचें नाहीं. लक्ष्मणताल नावाचा तलाव व त्यातील देऊळ हीं पाहण्यासारखीं व शोभादायक आहेत शाळा, डाकबंगला व पोलीस चौकी वगैरे आहेत.

गोहद येथें जाट घराण्याचा एक छोटासा राणा होता. थोरल्या बाजीरावानें त्याला आपलें मांडलिक बनविलें होतें पुढें पानिपत झाल्यामुळें व मल्हारराव होळकर मेल्यामुळें राण्यानें बंडाळी चालविली, त्या वेळीं राघोबादादा हे उत्तरेकडे होते. ते परत दक्षिणेत येताना त्यांनीं राण्याचा मोड करून तीन लाख रुपये खंडणी घेतली. यानंतर ( १७७९ ) जनरल गॉडर्डच्या मदतीस कलकत्त्याहून इंग्रजी पलटणें पुण्याकडे चालून येत असता हेस्टिंग्जनें या राण्यास पेशव्याविरुद्ध आपल्याकडे वळवून घेतलें होतें सालबाईच्या तहानंतर महादजी शिंद्यानें याबद्दल राण्यास नतिजा देऊन त्याच्यापासून ग्वाल्हेरचा किल्ला काबीज करून त्याला कैद केलें ( १७८४ ) आणि त्या ठिकाणीं आपला सरदार अंबाजी इंगळे यास २५।३० हजार फौजेसह, इनमास शह म्हणून ठेविलें परंतु पुढें अंबाजी हा शिंद्याच्या विरुद्ध इंग्रजास फितला व त्यानें त्याना ग्वाल्हेरचा किल्ला देऊन गोहदचा अर्धा प्रांत आपल्यास जहागीर मिळविला. तेव्हा बाकीचा अर्धा प्रांत इंग्रजानें राण्यास दिला. त्यावेळीं इतर रजपुत राजाशीं जसे तह इंग्रजानें केले होते तसेच अंबाजी व राण्याशींहि केले ( १०८४ ) त्या तहान्वयें राण्यानें इंग्रजाचीं तीन पलटणें चाकरीस ठेवून त्याबद्दल दरमहा पाऊण लाख रु त्याना द्यावे असें ठरलें होतें परंतु राण्याला आपलें राज्य चांगलें चालविता येत नाहीं असें पुढें आढळून आल्यावर इंग्रजानें त्याला पदच्युत करून त्याचें सर्व राज्य व ग्वाल्हेरचा किल्ला शिंद्यास दिला ( १८०१ ). आणि राण्याला थोडीशी नेमणूक करून दिली, तेव्हा शिंद्यानेंहि आपल्याकडून राण्यास कांहीं पैक्याची मदत केली. [ राम० वाडे खं. ६,१२; डफ. पु. २,३. ]

**गोहान**, ता लु का.—पंजाब. रोहटक जिल्ह्यातला एक तालुका. क्षेत्रफळ ७५३ चौ. मै. लो. सं. (१९११)१६१११. यात १ शहर व ११६ खेडीं आहेत. उत्पन्न २६० हजार. तालुका सपाट आहे व पाण्याचा पुरवठाहि विपुल करता येण्याजोगा आहे झाडींहि बरीच आहे. मुख्य ठिकाण गोहन हें रोहटकपासून २० मैलावर काल-व्याच्या पश्चिमेस आहे. येथें पृथ्वीराजाचा किल्ला होता तो महंमद घोरीनें पाडला असें सांगतात. शाहझियाउद्दिन याच्या कबरीशीं वार्षिक जत्रा भरते. जैनांचीहि कांहीं देवळें आहेत. १८७३ पासून म्युनिसिपालिटी आहे येथें शाळा व दवाखाना आहे.

**गोहिलवाड**—मुंबई, काठेवाडचा एक 'प्रांत'(भाग). खंबायतच्या आखाताच्या किनाऱ्यानें ४२०६चौ मैलाचा पट्टा गोहेल लोकाची पुष्कळ वस्ती असलेला आहे. प्रांत भावनगर पालीठाणा वगैरे लहान संस्थानें आहेत लो. सं. ( १९११ ) ६२५७६१. वसूल ५५२७८७ रुपये

**गोळकोंडा**—मद्रास, विजगापट्टम जिल्ह्यातील तालुका; क्षेत्रफळ ८९३ चौ मै.लो.सं.(१९२१)१५७०४८.नरसपट्टणम् हें मुख्य ठिकाण आहे. सारा व कर मिळून वसूल( १९२० साली ) २१९००० होता. एजन्सी पट्टा अति डोंगराळ आहे व यातील सर्व पाणी मुचकुंद नदीनें गोदावरीस मिळतें. सुमारें २६० चौ. मै. जिल्ह्यातलें महत्त्वाचें

सराक्षित अरण्य यात्र तालुक्यात आहे इ स १८३७ पर्यंत हा कायम धान्याच्या पद्धतीचा जमीनदारी तालुका होता पण त्यासाली पडलेल्या बाकी-या निमित्तानें त्याना लिलाव करून सरकारनेंच विकत घेतला मैदानी मुलुखाचा पूर्वभाग नेहमी लागवडीखाली असतो कारण त्योला 'कोमरवोलु अवाचें पाणी मिळतें घाटावर दोन रस्ते जातात पैकी हगदेवी पेठवरून जाणाऱ्या रस्त्यानें धान्य मीठ व बगलचा माल यावा बराच मोठा व्यापार चालतो

**गोळिहळ्ळी**—मुबई इलाखा बेळगाव जिल्हा बिडी-या दक्षिणेस एक मैलावर हें खेडें असून येथें कळमेश्वर, राम लिंग आणि सिद्धलिंग यांचीं देवळें आहेत कळमेश्वराच्या देवळाजवळ एक व गावाबाहेर एक असे दोन कदबाच्या वेळचे अकराव्या बाराव्या शतकातील शिलालेख आहेत

**गोळे, महादेव शिवराम (१८५९–१९०६)**—हे पुण्याच्या डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे लाइफ मेंबर असून आगरकरानतर फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपाल झाले प्रचलित शिक्षणपद्धतीवरचा उडत चाललेला याचा विश्वास 'ब्राह्मण आणि त्याची विद्या' या ग्रंथांत दृग्गोचर होतो हा ग्रंथ अत्यंत कळकळीनें लिहिला असल्यानें वाचनीय झाला आहे गोळे मोठे मार्मिक लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत केसरी-तील लेख, हिंदुधर्म आणि सुधारणा, शाळेचा अभिमान इत्यादि पुस्तकातून त्याचे लेखनगुण दृष्टीस पडतात

**गौड (गौर)**—बगाल, माल्दा जिल्ह्यातलें एक पडकें व जुनाट शहर उ अ २४°४' व पू रे ८८°८' हें प्रथम केव्हां वसवलें गेलें याचा अदाज बाधता येत नाहीं या शहराला अंग्रेझाबादच्या पूर्वेस ८ मैलावर असणाऱ्या लख नौती किंवा लक्ष्मणावती गावच्या नावानेंहि संबोधिलें जातें गौडबगाल असें या प्रातास पूर्वी या शहरावरून नाव पडलें होतें. प्राचीन हिंदुराजाची येथें राजधानी होती व हें संस्कृत विद्येचें केंद्र होतें यास टॉलेमी उल्लेखित नाहीं ११९८ मध्ये मुसुलमानांनीं बगाल घेतला तेव्हांपासून ३०० वर्षे तें त्यांचें मुख्य ठिकाण होतें मध्यतरी फिरोझाबाद हें मुख्य ठिकाण करण्यात आलें होतें पण जलालुद्दीन महमदशहानें गौड येथें पुन्हा राजध नी आणली आफगाणी अमलात शीर-शहानें पुन्हां येथून राजधानी हालवली (१५३९) अक बरचा सरदार मुनीम दाऊदखान यानें (१५७५) अक बरची सत्ता स्थापन केली याच वेळीं एक प्रकारच्या रोगाची भयकर साथ येथें पसरली व सर्व शहर बेचिराख झालें दाऊदखानहि मरण पावला एकदर मुसलमानी अमलात येथें बऱ्याच मसजिदी व इमारती बाधल्या गेल्या १६५० च्या सुमारास सुलतान सुजाची राजधानी राजमहाल येथें होती पण तो स्वत बरेच दिवस येथेंच रहात असे ढाका आणि मुर्शिदाबाद येथें राजधानी गेल्यापासून मात्र हें शहर कायमचें मागें पडलें (१६७३). १६ व्या शतकात पोर्तुगाल इतिहासकार फारियासूझा हा लिहितो कीं गौडात १२ लाख वस्ती होती

१७८७मध्यें क्रो लिहितो "या जुन्या सुदर शहरांत आज पूर्ण व शाबूद अशी एकहि इमारत नाहीं, व केवळ हवापाणी व ऊन याच्यापेक्षा या शहराच्या नाशाचें श्रेय सर्वथा मनु-ष्यानाच दिलें पाहिजे राजमहाल, माल्डा व मुर्शिदाबाद या शहराना कित्येक शतकें येथूनच दगड विटाचा व इतर इमारती जिनसाचा पुरवठा होत आहे" गँट म्हणतो " निझामत तफनरला स्थानिक जमीनदाराकडून सुदर इमारती पाडून तेथलें सामान नेण्याबद्दल कर म्हणून ८०० रुपये दरसाल मिळत येथील इमारतींतून सगमवरी दगड व रगीत फरशाच्या विटा वगैरे सामान जाई गेल्या ३० ४० वर्षांत तेथील जगल वगैरे तोडून या प्रकारास आळा घालण्यात आला आहे १८२० मध्यें अवशिष्ट भागा-वरून कोणी इसमानें या शहराचें वर्णन केलें आहे यावरून असें दिसतें कीं, मुख्य शहराचा विस्तार १३ चौ मै व इतर उपनगरें मिळून हा विस्तार २५–३० मैलापर्यंत असावा शहराच्या पूर्व, पश्चिम व दक्षिण भागाला गगा, महानदी व इतर प्रवाह याचा वेढा असून उत्तरेला भक्कम किल्ले व तट-बदी होती सर्व शहराला विस्तीर्ण तट होता येथें बऱ्याच इमारती व मसजिदी आहेत व त्या वेळोवेळीं निरनिराळ्या सुलतानानीं वगैरे बाधलेल्या आहेत शहर पूर्वी फार दाट वस्तीचें असावें त्याच्या ७७ मैलाच्या लाबीच्या उपनगरात सुद्धा दाट वस्ती असावी १८९८ च्या भूकपात काहीं राहि-लेल्या इमारती व दक्षिण तटाचा मध्य दरवाजा हीं कोस ळून पडलीं याला कोतवाली दरवाजा हें नाव असे

१९०० पासून अवशिष्ट राहिलेल्या सुदर व महत्वाच्या इमारतींचें रक्षण करण्याचा सरकारनें व्यवस्था केली आहे फिरोझ मिनार, लकाचुरी व दाखिल दरवाजा वगैरे इमारती अद्यापहि चांगल्या पहाण्यासारख्या आहेत

आजच्या धार्मिक महत्वाच्या इमारती (त्याचे अवशेष) म्हणजे (१) मखदूम अखा सिराज-उद्दीन-साभूची मशीद (काल १५१०) (२) जान जन मियान ही मशीद (१५३४–३५), (३) सादुल्लापूर घाट, स्मशान, (४) बाराद्वारी (१५२६) ही गौडमधील सर्वात सुदर इमारत आहे, (५) कादम-इ रसूल मशीद (१५३०) (६) मिनार (जयस्तंभ), याचा काल फर्ग्युसनच्या मतें १३०२–१५ या मधला आहे (७) तांतिपार (१४७१), (८) लहान ही मशीद यूसफशहा (१४७४–८१) यानें बाधिली असें मानतात, व (१०) छोटीशी सुवर्णकबर, याला शहराचें रत्न म्हणून मान देतात यावरचा शिलालेख पुसून गेला आहे हुसनशहा (१४९४–१५२४) नें ही बांधली असें म्हणतात या इमारतींवरील सर्व लेख तुघ्र लिपींत सुदर लिहिलेले आहेत इ स १३६९–१५३५ या काळांतले हे सर्व लेख असून बंगालच्या राजाचा काळ नक्की करण्याच्या कामीं याचा

फार उपयोग होतो. [ रॅव्हेनशा-गौर, इट्स रुइन्स अँड इन्स्क्रिप्शन्स, कनिंगहॅमचे रिपोर्ट; फर्ग्युसन-हिस्टरी ऑफ इंडियन आर्किटेक्चर ].

**गौडपादाचार्य**—शुकाचा शिष्य व शंकराचार्यांचा गुरु जो गोविंदाचार्य त्याचा गुरु. अनुगीताभाष्य, उत्तरगीताभाष्य, चिदानंद केलिविलास, देवीमाहात्म्यटीका, सांख्यकारिकाभाष्य व मांडूक्योपनिषत्कारिका यासारखी याची ग्रंथरचना आहे.

**गौड ब्राह्मण**—उत्तरेकडील पंचगौड ब्राह्मणांपैकीं गौर अथवा गौड हा एक विभाग असून या नावाच्या उत्पत्तीविषयीं बरींच निरनिराळीं मतें आढळतात. गौड हा उत्तरकौशिकाचा एक पोटविभाग असून, गौड अथवा गोंड जिल्ह्यांत श्रावस्ति शहराचे अवशेष उपलब्ध झाले आहेत. गौड हे *या जिल्ह्यांतील मूळचे रहिवाशी असावेत.* गौड या नावाचे ब्राह्मण अयोध्या, जहांगिराबाद, गोंडजिल्हा व गोरखपूर वगैरे ठिकाणीं अद्यापीहि पुष्कळ आहेत. खानेसुमारीवरून पाहतां मीरत विभागांत गौर अथवा गौड ब्राह्मणांची वस्ती बरीच आहे.

या जातीच्या अनेक शाखा आहेत. केवळ गौड, आदिगौड, शुक्लवाल, सनाढ्य, श्रीगौड, गुजरगौड, टेकवारागौड, चामार गौड, हरियानागौड, किर्तानीयागौड व सुकाळगौड इत्यादि. संयुक्त प्रांतांत आदिगौड, जुगाडगौर, कैथालगौर, गुजरगौर, धरमगौर, व सिद्धगौर वगैरे ज्ञाती प्रसिद्ध आहेत. गुजरगौर, दधीच, सिखवाल, परीख, खंडेलवाल व सारस्वत असेहि विभाग प्रसिद्ध आहेत. दधीचाचा मुलगा पिप्पलायन म्हणून होता. त्याच्या बारा मुलांपासून गौड जातीचीं द्वादश गोत्रें प्रचारांत आलीं असेंहि म्हणतात. गुजरगौरांचींहि द्वादशगोत्रें आहेत. कनौजियांपेक्षां गौरब्राह्मण जास्त सुधारलेले असून विहार येथें सारस्वत ब्राह्मणांशीं ते विवाह करूं लागले आहेत. असगोत्र विवाह त्यांच्यांत सर्वत्र रूढ आहे, व *त्यांचे सर्व घरगुती समारंभ जुन्या पद्धतीप्रमाणेंच* चालतात. गौडसारस्वतांसंबंधीं माहिती 'सारस्वत' या लेखांत आढळेल.

**गौतम**—( १ ) न्यायशास्त्रकर्ता ऋषि. यास अक्षचरण किंवा अक्षपाद असें नांव आहे ( न्याय पहा ). ( २ ) शरद्वत ऋषीलाच गौतम असें म्हणतात. गौतम हा अहिल्येचा पति होय. अहिल्येस इन्द्रानें फसवून नेलें अशी कथा आहे. रजनीचें हरण, सूर्यानें केलें असा वरील कथेचा अर्थ केल्यास अहिल्या म्हणजे रजनी व इन्द्र म्हणजे सूर्य असा अर्थ होतो.

**गौतमधर्मसूत्र**—आपस्तंब धर्मसूत्राच्या मानानें पाहतां गौतमधर्मसूत्रासंबंधीं फारच थोडी माहिती मिळते. दोनच गोष्टींसंबंधानें आपणास विचार करतां येईल. पहिली *गौतमधर्मशास्त्राचा सामवेदाशीं संबंध* व दुसरी इतर धर्मशास्त्रांशीं त्याचें आनुपूर्व्य. गौतम-धर्मशास्त्राचें बौधायन, वसिष्ठ आणि आपस्तंब यांच्याशीं बरेंचसें साम्य आहे. पुरातनकालीं प्रत्येक वेदशाखेचीं श्रौत, गृह्य आणि धर्म सूत्रें असत. त्यांपैकीं कित्येक नाहींशीं झालीं व बाकीचीं कालांतरानें एकमेकांत मिसळलीं गेलीं. गौतम ऋषींचें म्हणून जें धर्मसूत्र समजलें जातें तें त्याचें नसून एखाद्या गौतमचरणाचें असावें. सामवेदाच्या वंशब्राह्मणांत सामवेदी गौतमाची हकीकत आहे. ज्या गौतमानें धर्मसूत्रें रचिलीं तो सामवेदी होता हें अनेक प्रमाणांनीं दाखवितां येईल कारण यांतील सव्विसावा अध्याय ज्यांत कृच्छ्रादिकांचें वर्णन आहे तो संपूर्ण अध्याय सामवेदाच्या ' सामविधान ' ब्राह्मणांतून जसाच्या तसाच घेतला आहे. इतकेंच नव्हे तर ठिकठिकाणीं ( १९.१२ ) सामवेदांतला भाग बराच आढळून येतो परंतु अमक्या गौतमाचें हें धर्मसूत्र हें सांगतां येत नाहीं सामवेदाच्या सर्व शाखांची माहिती *अद्यापि उपलब्ध नाहीं, ती मिळेपावेतों या बाबतींत स्वस्थ* बसणेंच बरें.

यानंतर दुसरा मुद्दा विचारासाठीं घेऊं गौतम हा बौधायन आणि वसिष्ठ यांच्या पूर्वीचा आहे. कारण दोघांनींहि गौतमाचीं वचनें उद्धृत केलीं आहेत. ( बौधायन सूत्र १.१-१७-२४ ) बौधायनानें एकोणिसावा अध्याय गौतमसूत्रांतून घेतला. वसिष्ठ धर्मसूत्राची हीच स्थिति आहे. अर्थात् गौतम हा बौधायन आणि वसिष्ठ यांच्या पूर्वीचा असल्यामुळें त्याचें धर्मसूत्र अस्तित्वांत असलेल्या धर्मसूत्रांपेक्षा फार प्राचीन असलें पाहिजे. पण यावर संशय येण्यास एक जागा आहे व ती ही कीं,गौतम सूत्राची भाषा पाणिनीच्या व्याकरणाशीं फार जुळते व गौतमाच्या मानानें पाहतां पाणिनी फार अलीकडला आहे. या संशयाचें समाधान अशा रीतीनें करतां येईल कीं, जुने पंडित गौतमसूत्राला फार मान देत असत व तो प्रमाणभूत ग्रंथ मानीत असत. तेव्हां पाणिनीच्या व्याकरणाला जुळतील असे त्यांनीं मधेंच फेरबदल केले असल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं.परंतु गौतम धर्मसूत्राची एकंदर रूपरेषा मात्र बदलण्यांत आली नाहीं.

बौधायन आणि गौतम हे कालानें जितके जवळ आहेत तितके वसिष्ठ आणि गौतम नाहींत. दुसरी अशी एक महत्त्वाची गोष्ट आहे कीं, कित्येक लोक गौतमाचा ऐतिहासिक कालाशीं संबंध जोडितात का तर त्यांत एके ठिकाणीं ' यवन ' शब्द आला आहे. गौतमाच्या मतें क्षत्रियास शूद्र-स्त्रीपासून जें अपत्य होतें त्यास ' यवन ' म्हणतात. आतां ' अयोनियन्स ' व ग्रीक या लोकांस ' यवन ' म्हणत असत हें इतिहासप्रसिद्ध आहे. ग्रीक लोकांची आणि हिंदुस्थानवासी लोकांची परस्पर ओळख अलेक्झांडरच्या वेळीं झाली. म्हणून गौतमधर्मसूत्राचा काल इसवी सनापूर्वी तीन शतकें हा होय असें अनुमान काढतात. परंतु मॅक्समुल्लरच्या मतें हें चुकीचें आहे. प्रथमतः धर्मसूत्राचें मूळ हेंच विश्वसनीय नाहीं. आणि पुनः एखाद्या शब्दावरून इतर प्रमाणें झुगारून देऊन एखाद्या

ग्रंथाचा कालनिश्चय ठरविणें हें जरा धोक्याचें आहे. गौतमधर्मसूत्रावरून वैदिक वाङ्मयासंबंधानें फार थोडी माहिती मिळते हें प्रथमारंभींच सांगितलें आहे. तैत्तिरीय आरण्यकांतून पंचविसाव्या अध्यायाचीं पहिलीं सहा सूत्रें घेतलीं आहेत. सामविधानब्राह्मणांतून सव्विसावा अध्याय घेतला आहे. अथर्ववेदाच्या एका उपनिषदांतून कांहीं भाग घेतला आहे. सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे गौतमानें मनूचीं कांहीं वचनें उद्धृत केलीं आहेत (गौतम २१.७). म्हणजे गौतमाचें धर्मसूत्र जरी अत्यंत प्राचीन असलें तरी तें पहिलें खास नाहीं.

**गौतमपुरा** —इंदूर संस्थान. देपाळपूर परगण्यांतील एक शहर. इंदूरपासून अंतर ३० मैल, व राजपुताना माळवा-रेल्वेच्या चंबळ स्टेशनापासून तीन मैल इतर गौतमपुरापासून ओळखण्याकरितां याला रुणाजी गौतमपूर म्हणतात. लोकसंख्या सुमारें चार हजार हें मल्हाररावाच्या बायको (गौतमाबाई )नें वसविलें व अहल्याबाईच्या कारकीर्दीत भरभराटीला आलें. गौतमपुरा येथें चिटाचें व रंगाचें काम चांगलें होतें. १९०५ मध्यें येथें म्युनिसिपल कमिटी स्थापन करण्यांत आली. शहरांत गौतमाबाईनें बांधलेलें अचलेश्वराचें देऊळ व रामसनेही पंथाचे मठ आहेत. येथें शाळा व एक दवाखाना आहे.

**गौरा-बऱ्हाज**—संयुक्तप्रांत. गोरखपूर जिल्ह्यांतील एक शहर. जवळच बऱ्हाज शहर आहे त्याचें हें एक उपनगर आहे. याची लोकसंख्या ( १९११ ) १२२९४ आहे. बऱ्हाज व गौरा याची व्यवस्था १८५६च्या२० व्या कायद्याप्रमाणें चालते. येथें साखरेचे कांहीं कारखाने आहेत. इतर व्यापार कांहीं नाहीं.

**गौरी**—शिवपत्नी पार्वतीचें एक नाव. पूर्वी पार्वती श्यामवर्ण असल्यामुळें महादेवानें एकदा लीलेनें तिला काली असें म्हटलें. त्यावरून तिनें तप करून गौरवर्ण प्राप्त करून घेऊन हें नाव संपादन केलें ( मत्स्य पु. अ २५६ ) वरुणाच्या स्त्रीलाहि गौरी हें नामाभिधान आहे. ( महा भा. उद्योग. अ. १७१ )

**गौरीपूर**—बंगाल, गोलपारा जिल्ह्यांतील कायमधारा पद्धतीची एक जमीनदारी क्षेत्रफळ ४८३ चौरसमैल जमीनीचा खंड २,३४,०१० रुपये असून एन्याचें उत्पन्न फक्त ५,३९६ च आहे व इतर करांचें २५,००० रु. आहे. ब्रह्मी नदीपासून ६ मैलावर गौरिपूर नावाचेंच भरभराटीस आलेलें खेडें जमीनदाराचें रहाण्याचें मुख्य ठिकाण आहे. तेथें एक हायस्कूल व दवाखाना आहे आणि व्यापारहि चांगला चालतो. मारवाड्यांची वस्ती आहे व तेच ताग, धान्य व कपडा यांचा मोठा व्यापार करतात

**गौरीशंकर उदयाशंकर**—हे काठेवाडचे दिवाण होते यांनीं १८७९ सालीं भावनगरची नोकरी सोडून चतुर्थाश्रम धारण केला हे मोठे मुत्सद्दी होते. भावनगर संस्थान भरभराटीस यांनी आणलें व संस्थानाचे तंटे तोडून कांहीं गेलेले गाव परत मिळविले यांना सी. आय. ई पदवी होती यांचे चरित्र जव्हेरिलाल उमियाशंकर याज्ञिक यांनीं इंग्रजींत लिहिलें आहे हे १८९१ मध्यें वयाच्या ८६ व्या वर्षी वारले.

**गौरीशंकर पर्वत**—जगातील सर्वांत उंच असा पर्वत. हें हिमालय पर्वताचें शिखर असून नेपाळांत आहे. त्रिकोणमितीनें अजमावता त्याची उंची २९००२ फूट असावी असें दिसतें कॅप्टन वुड, मेजर रायडर वगैरे शोधकाच्या एकंदर निरीक्षणावरुन हिमालयांतील हेंच सर्वांत उंच शिखर आहे असें साधारणपणें निश्चित झालें आहे त्रिकोणमितिनियमानुसार सर जॉर्ज एव्हरेस्ट नावाच्या एका भूगोलज्ञानें या पर्वताचें निरीक्षण इ स १८४१ सालीं केल या गृहस्थाच्या स्मरणार्थ या शिखराचें नाव एव्हरेस्ट असें ठेविलें गेलें आहे

गौ री शं क रा रो ह णा र्थ प्र य त्न.—इ स.१९२१, १९२२ व १९२४ सालीं अनुक्रमें तीनदा गौरीशंकर अथवा एव्हरेस्ट शिखर गाठण्याचे प्रयत्न ब्रिटिश लोकांकडून करण्यांत आले. १९२५ सालीं त्यावर एक मोहीम करण्याचा अमेरिकन व जर्मन लोकांनाहि येत आहे. हिमालयाच्या तिबेटाकडील बाजूचे लोक या शिखरास 'चोमोलुंगमा' ( देशदेवी ) म्हणतात, आणि हिमालयाच्या हिंदुस्थानाकडील बाजूस, एव्हरेस्टला 'नदादेवी' ( देवेश ) अशी संज्ञा आहे

१९२१ ची मोहीमः—कर्नल हॉवर्ड ब्यूरी यानें ही मोहीम केली व तो सिक्कीमच्या मार्गानें दार्जिलिंगहून तिबेटाकडे वळला तारीख १६ मे रोजीं ही मोहीम निघाली. परंतु बरोबर न्यावयाचीं खेचरें नालायक ठरल्यामुळें ती अल्पकाळ रहित झाली. जुलैमध्यें या मोहिमेंतील डॉ केलास नावाचा इसम मृत्यु पावला. या मोहिमेच्या हकीगतीवरून असें कळतें कीं, १६५०० फूट उंचीवर रोंगबक नावाच्या दरींत एक मठ असून त्या ठिकाणीं ३०० ते ४०० पर्यंत साधू व जोगिणी रहातात. कड्याखालील प्रशांत गुहेत त्यांचें निवासस्थान आहे व तें शिखरावरून दृग्गोचर होतें. टिंग्रीसोमहून ही प्रवासी मंडळी खोंबू नावाच्या बर्फाच्या डोंगरावर गेली १९००० फूट उंच असलेल्या खोंबू घाटाच्या शिखरास वरील बर्फाच्या डोंगरावरूनच रस्ता गेलेला आहे. टिंग्रीच्या साधारणत- ओसाड अशा प्रदेशांतून ही मोहीम रोंगशारदरीकडे गेली ज्यावर सूर्यप्रकाश पडूं शकतो अशा या दरीचा एक भाग कांटेरी झुडुपें व रानगुलाब यांनीं फुलून गेला होता व सावली असणाऱ्या दुसऱ्या भागांत बालुग व भूर्जवृक्ष यांचें अरण्यच बनलें होतें. उपर्युक्त दरींतून खार्ताकडे एक रस्ता आहे. खार्ता सोडल्यावर १७००० फूट उंचीचा संजुंमला घाट लागतो. तेथून १६००० फूट उंच असलेला चोगला घाट लागतो. या घाटाहून निघाले म्हणजे पुढें देवदारवृक्ष असलेला

प्रदेश दिसूं लागतो. या प्रचंड देवद्वारवृक्षांच्या खोडाचा घेर २० ते २५ फूट असतो. हा प्रदेश सोडला की, कामचू दरी लागते. येथील देवद्वारवृक्षाचा घेर वरीलप्रमाणेच असून काहींची उंची १५० फूट असते. त्या ठिकाणचें सृष्टिसौन्दर्य अप्रतिम आहे. अरुण नांवाची दरी ७५०० फूट उंचीवर आहे. व तेथें अनेक वनस्पती व झुडुपें उगवलेली असतात. कामाचू दरी, एव्हरेस्ट व मकालू याच्या बर्फाच्छादित प्रचंड कड्याला अगदीं लागून आहे. व तें स्थान अत्यंत दुर्गम आहे. २६००० फूट उंचीच्या ठिकाणाकडे जाण्याचा एक रस्ता ठरवून ही मोहिम आक्टोबरमध्यें परत फिरली.

या मोहिमेंत बारा हजार चौ. मैल इतक्या टापूची पहाणी करण्यात आली व या कामी कर्नल रायडर यानें १९०४ मध्यें तिबेटात जाऊन केलेले नकाशे उपयोगी पडले. अनेक प्रदेशाचे फोटो घेऊन सर्व पाहणी झाली. ३३ अंशाइतकी थंडी असताना २३००० फूट उंचीचा प्रदेश आक्रमिता आला. या मोहिमेस एकंदर ५००० पौंड खर्च आला.

१९२२ ची मोहिमः— जनरल ब्रूसच्या नेतृत्वाखाली ही मोहीम मार्च महिन्यात ऑक्सिजन वायूचें सर्व साहित्य घेऊन निघाली. प्रवासात काहीं वाहतुकीसंबंधीं अडथळे आले नाहींत व ऑक्सिजनच्या मदतीशिवाय २६००० फूट उंचीवर ब्रूस जाऊं शकला ही खरोखर आश्चर्योत्पादक गोष्ट होय. थोडका अवधी व हवामानाची अनिश्चितता अशा अडचणी मुख्य होत्या. नाकातोंडातील लाळ गोठून गेल्यामुळें ऑक्सिजनचा उपयोग करण्याची अडचण आली; परंतु ती ऑक्सिजनच्या यंत्रास एक रबरी नळी जोडून व ती दातात धरून ऑक्सिजनचा उपयोग करता येऊं लागल्यामुळें दूर झाली. एकदा या मोहिमेंत मोठें वादळ झालें व त्या योगानें आपल्या तंबूसह ही प्रवासी मंडळी दुसरीकडे जाऊन आदळली. ऑक्सिजनच्या उपयोगामुळें २७२०० फूट उंचीचें स्थान त्याना गाठता आलें. जुलैमध्यें सात असामी हिमावसरणात गतप्राण झाले व कडक थंडीमुळें मोहीम मागें फिरली. या मोहिमेची हकीगत जनरल ब्रूस यानें आपल्या 'दि असॉल्ट ऑन माऊंट एव्हरेस्ट १९२२'नामक पुस्तकांत ग्रथित केली असून एडवर्ड अर्नोल्ड हा त्या पुस्तकाचा प्रकाशक आहे.

१९२४ ची मोहिमः— एव्हरेस्टगिर्यारोहणाचा तिसरा प्रयत्न जनरल ब्रूसच्या नेतृत्वाखाली पुन्हां १९२४ मार्चमध्यें करण्यांत आला. कॅप्टन नोएल यानें या मोहिमेंत सिनेमा फिल्म्स घेतल्या व डॉ. सोमरव्हेल यानें तिबेटी गाण्याची माहिती मिळविली. सहा जुने व सात नवे लोक या मोहिमेंत असून दोन्ही मोहिमेंत मॅलरी हा गृहस्थ हजर होता. प्रारंभीचा प्रवास यशस्वी झाला, नंतर हवामानांत एकदम फरक पडला. एक असामी ठार झाला व चौघांनी बर्फमय प्रदेशांतील रस्ता पाडूनच हातपाय गाळले. जूनमध्यें मॅलरी व आयर्व्हिन थंडीमुळें ठार झाले; हे दोन गृहस्थ कदाचित् एव्हरेस्ट नजीक गेले असावे. ही मोहिम जूनमध्यें परतली.

एकंदर निष्कर्षः— ( १ ) अत्युच्चस्थळीं गेल्यानें मनुष्यावर होणारे परिणाम अनेक स्वरूपाचे आहेत. ऑक्सिजनच्या साह्यानें १९२४ मध्यें २८२२७ फूट उंचीवर जाणें शक्य झालें, ऑक्सिजनशिवाय २८१२८ फूट उंचीचें ठिकाण मनुष्यास गाठता आलें. उंच मनुष्य फारसा थकत नाहीं. परंतु खुजा मनुष्य मात्र थकतो. लांबलचक असून ज्याचा पोटाचा आकार लहान आहे असा मनुष्य या मोहिमेला योग्य असतो. फार उंचावरचें हवामानहि अंगवळणीं पडतें, असा अनुभव आहे. तथापि थकवा मात्र अतिशय येतो ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. अत्यंत उंचीवर असलेल्या प्रदेशातून जाताना घसा बसतो, तहान लागते व पुढें दर पावलागणिक दहा वेळा दम घेणें जरूर असतें. १९२२ च्या मोहिमेंतील अनुभवावरून असें आढळून येतें कीं, मनुष्यास अत्युच्च ठिकाणींहि झोंप लागते. (२) जेथें वनस्पतीहि उगवूं शकत नाहीं अशा उंच ठिकाणीं प्राणी राहूं शकतो २२००० फूट उंचीवर एक लहानसा काळा कोळी आढळला होता. रोंगबक नामक बर्फाच्या डोंगरावर एक करड्या रंगाचा कोळी व काहीं पतंग आढळले. २१००० फूट उंचीवर एक फुलपाखरूं आढळलें व ३००० फूट उंचीच्या ठिकाणीं एक मधमाशी आढळल्याचें सांगतात. कावळ्यासारखा एक पक्षी २४००० ते २७००० फूट उंचीच्या प्रदेशातून भराऱ्या मारतो. १५००० फूट उंचीवर मुंग्या आढळतात. हिमालयावरील वनस्पतीवर उपजीविका करून असणारे ससाएवढे व उंदराच्या किंवा खारीच्या जातीचे प्राणी २०००० फूट उंचीवर आढळतात. खारीहि त्यांच ठिकाणीं आढळतात. २०००० फुटापेक्षाहि जास्त उंच असलेल्या ठिकाणीं मनुष्याच्या पावलासारखीं पावलें उमटलेलीं दिसून येतात. केसाळ जंगली माणसांचीं हीं पावलें असावी असें म्हणतात. तथापि यघून जातीच्या वानरांचीं तीं पावलें असावीं हेंच जास्त संभवनीय दिसतें (३) १८००० फुटापेक्षा जास्त उंचीवर वनस्पति असल्याचें आढळत नाहीं. (४) सर जॉर्ज एव्हरेस्ट यानेंच प्रथम एव्हरेस्टची उंची अजमाविली व ती २९००२ फूट आहे असें त्याचें मत आहे. परंतु गौरीशंकर अथवा एव्हरेस्ट शिखराची उंची अलीकडे घेतलेल्या मापनावरून २९१४१ फूट आहे असें समजतें.

**गौरीहार**—मध्यहिंदुस्थान. बुंदेलखंड एजन्सीमधलें हें छोटेसें सनदी संस्थान आहे. क्षेत्रफळ ७१ चौ. मैल. पैकीं १२ लागवडीखालीं व ३९ लागवडीच्या लायक. बाकी सर्व जंगल व ओसाड आहे. लो.सं ( १९०१ )७७६०. उत्पन्न २७०००. मुख्य ठिकाण गौरीहार. हें झांशी माणिकपूर रेल्वेवरील बांदा स्टेशनपासून १५ मैल आहे. लो.सं. १८५७. येथील संस्थानिक स्वतःच कारभार पहातो पण मुख्य व महत्वाच्या बाबी पोलीटिकल एजंटच्या मार्फतच व्हाव्या लागतात.

संस्थानिक मिश्रोटिया ब्राह्मण आहे. पूर्वी त्याच्या पूर्वजांकडे महापूर ( चारखिरी ) रोड असे. राजाराम तिवारी भूगडचा किल्लेदार होता. त्यानें बंड केलें. परंतु अखेरीस शरण आल्यावरून त्याला १८०७ मध्यें या गावची सनद देण्यात आली. त्याच्या मुलानें १८५७ च्या दंगलींत कित्येक युरोपिअनांचे जीव वाचवले. त्याबद्दल त्याला १००० ची खिलात व रावबहादूर हा किताब मिळाला. १८६२ मध्यें दत्तकाच्या हक्काची सनद मिळाली.

गौहत्ता, पो ट वि भा ग—आसाम. कामरूप जिल्ह्याचा पोटविभाग क्षे. फ. २५८४ चौ. मैल. याच्यामधून ब्रह्मपुत्रा जाते. लो. सं. (१९११) ५२८६७९. गौहत्ती हें एकच शहर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. १५२१ खेडीं आहेत. १९०३–४ सालीं १०९७००० रु. उत्पन्न झालें. दक्षिण-तीराची बाजू डोंगराळ व टेकड्यांनीं व्यापलेली आहे. उत्तर तीरावर थेट भूतानपर्यंत सपाट मुलूख आहे. सपाट मुलखात फार दाट वस्ती आहे व मध्यभागीं ती दर चौ. मै. ६१३ पर्यंत गेली आहे. सामान्यतः वस्तीचें मान दर चौ.मैलास १८२ पडतें. इतकी जिल्ह्याच्या इतर भागात पातळ वस्ती आहे.पाऊस निरनिराळ्या ठिकाणीं ६५ पासून ८० इंचांपर्यंत पडतो. वस्ती मुख्यतः कलिता, किवट वगैरे उच्च शूद्रांची आहे भूतानजवळील भागात मात्र फक्त काचारी नावाचीच जात रहाते. १८९७ मधल्या भूकंपानें जमीनीचें स्वरूप फारच बिघडलें. साळीचें पीक मुख्य आहे. मोहरी, ताडु-ळाची ' बाव ' नावाची जात व अलिकडेच पेरण्यात आलेला साग हीं पिकेंहि मोठीं आहेत. काचारी लोक पाटाचें पाणी डोंगरी प्रवाहातून घेतात. इतर ठिकाणीं उलट पाणी काढून द्यावें लागतें व बांध घालावे लागतात चहाचीहि लागवड योड्याशा प्रमाणावर होते. १९०३–४ सालीं १९ मळ्याखालीं ३६५९ एकर जमीन होती. कामाख्य, वशिष्ट अश्वक्रांत, उमानंद वगैरे क्षेत्रें आहेत. चित्राचल येथें नवग्रहाचें देऊळ आहे.

श ह र—कामरूप जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. ब्रह्मपुत्रेच्या दोन्ही तीरावर वसलें आहे. दक्षिण व उत्तर गौहत्ती मिळून लोकसंख्या ( १९११ ) १२४८१ आहे. स्थानिक रहिवाशी फार थोडे असून बहुतेक भरणा परप्रांतियांचाच आहे. भगदत्ताची राजधानी प्राग्ज्योतिषपूर तें हेंच असावें असें म्हणतात. सर्वत्र सापडणाऱ्या जुन्या अवशेषावरून हें पूर्वी फार मोठें वस्तीचें विस्तीर्ण शहर असावें असें दिसतें. सोळाव्या शतकांत कोच राज्यामध्यें याचा समावेश होता. १६८१ त अहोम राजांनीं आपली राजधानी येथें आणली. १८०९ मध्यें एक भिकार गाव असें याचें वर्णन एका इंग्रजानें केलें आहे. १८२६ मध्यें आसाम इंग्रजांकडे आल्यापासून तें आसाम पोटविभागाचें मुख्य ठिकाण होतें व अद्यापीहि आसाम व्हॅलीचे कमिशनर व जज्ज तेथेंच रहातात. या शहराची जागा व आसपासचा भाग मोठा रमणीय असून एकीकडे दाट जंगल व एकीकडे मैलभर रुंदीच्या पात्राची नदी असा मनोहर देखावा दिसतो.पण त्याच्या या सौंदर्याला मोहून तेथें रहाणें धोक्याचें आहे. कारण सर्व भाग मलेरिआ-दूषित आहे व उन्हाळ्याचा फार त्रास होतो. १८९७ च्या भूकंपानें सर्व कचेऱ्या व इमारती पडून गेल्या होत्या. आता शहर पुन्हा नव्यानें बांधलें गेलें आहे. व येथें देवळें वगैरे बरींच असल्यानें यात्रेचें ठिकाण आहे. १८७८ मध्यें गौहत्ती म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें दोन हायस्कुलें व कॉटन कॉलेज आहे. एक कायदेशिक्षणाचें कॉलेज आहे.

ग्मेलिन (१७९२–१८६०).—जर्मनींतील ट्यूबिंजन कुलांतील कित्येक विद्वान शास्त्रज्ञ ग्मेलिन या नावानें प्रसिद्ध आहेत. पैकी क्रिस्टियन गोटलॉब यानें कृत्रिम समुद्रपार तयार करण्याची रीत शोधून काढली व लिओपल्ड (जन्म. १७८८ मृ. १८५३ )नें पालाश लोहिकर्बनीनिद या रासाय-निक द्रव्याचा शोध लाविला.

ग्यासबेग—खुरासानच्या सुलतानापाशीं ख्वाजामहंमद शरीफ नावाचा एक वजीर होता. त्याच्या मुलाचें नाव ग्यासबेग होतें हा नूरजहानचा बाप होता.त्यास मिर्झा ग्यास-उद्दीन महंमद किंवा अयाझ असेंहि म्हणत. बाप मरण पावल्यावर त्यास कष्टदशा प्राप्त झाली, तेव्हां आपले दोन मुलगे व एक मुलगी बरोबर घेऊन बायकोसह तो इराणा-तून पळून गेला रस्त्यात त्यास दरोडेखोरांनीं लुटलें कंदाहार येथें पोंचल्यावर त्याची बायको प्रसूत होऊन ( १५७६ ) मुलगी झाली,तिचें नाव मिहरुन्निसा (म्ह स्त्रियांमधील सूर्य). हीच नूरजहान होय मसूद नावाच्या अकबराच्या एका ओळखीच्या व्यापाऱ्याबरोबर तो हिंदुस्थानात आला. अकबरानें त्यास प्रथम लहानशी मनसब देऊन काबुलात वसुलीच्या कामावर नेमिलें. ग्यासबेगच्या बायकोचें वाड्यात जाणें येणें असे. तिला चित्रें व कशिदा काढण्याचा नाद असे ती फारशी भाषेत कवनेंहि करी. जहांगीर तख्तावर आल्यावर त्यानें ग्यासबेग यास इतिमा दुद्दौला ही पदवी दिली. परंतु पुढें तो खुसृस सामील आहे असा संशय आल्यावरून जहांगीरनें त्यास कैदेंत ठेविलें. नूरजहानच्या लग्नापासून सर्व कुटुंबाचें भाग्य उदयास आलें. ग्यासबेग मुख्य वजीर बनून त्यास सहा हजारांची मनसब मिळाली. तो इ. स. १६२२ त मरण पावला. तो शांत,उदार, धार्मिक कवि व उत्तम लेखक होता. तथापि तो लांच मात्र सडकून घेत असे त्याची कबर आग्र्यानजीक आहे. त्याचा मुलगा मीर्झा अबुल् हसन ( आसफखान) हा पुढें फार प्रसिद्धीस आला. आसफखानाची मुलगी मुम्ताजमहाल ही शहाजहानाची बायको होय. तो इ. स. १६४२ त मरण पावला. त्याची कबर लाहोरास जहांगीरच्या कबरीशेजारी आहे. त्याचा सालाचा पगार चाळीस लाख रुपये असून शिवाय त्यास आणखी जहागिरी देखील होत्या. मरणसमयीं त्याची संपत्ति अडीच कोटि रुपये होती. त्याचा लाहोरचा वाडा दाराशुकोह यास देण्यात

आला आसफखानाचा मुलगा मिर्झा आबू तालीब उर्फ शाय स्तेखान, हा अवरंगजेबाच्या कारकीर्दीत प्रसिद्धीस आला याशिवाय ग्यासबेगाच्या कुटुंबाचा विस्तार अति मोठा होता त्याचे कुटुंबानें पन्नास वर्षांवर मोगल बादशाहीचा कारभार केला [ मुसलमानी रियासत ]

**ग्योगिगाक** —हें शहर याच नावाच्या लहान जिल्ह्यामध्य खालच्या ब्रह्मदेशात मुख्य ठिकाण आहे या शहरी उन्हा ळ्यांत पाण्याचा दुष्काळ पडतो हें शहर रंगून-प्रोम-रेल्वे लायनीवर तादुळाच्या व्यापाराचें अतिशय महत्वाचें ठिकाण आहे या शहरी म्युनिसिपालिटी व इस्पितळें आहेत. म्युनिसिपालिटीचें उत्पन्न १९०४ सालीं ४१००० रुपये व खर्च ४५००० रुपये होत

**ग्रँट डफ**—याचें संबध नाव जेम्स फार्युसन ग्रँट डफ असून हा इंग्लंडच्या उत्तरेकडील इडेन गावचा रहिवासी होता याचें शिक्षण वेताचेंच झालें होतें, प्रथम हा ईस्ट इंडिया कंपनीत नौकरीस राहिल्यानतर क्रमानें वाढत वाढत पेशवाईअखेर सातारा येथें रेसिडेंट झाला प्रतापसिंहाचा व याचा बराच स्नेह होता साताऱ्यास असताना यानें आपल्या मराठ्याच्या (बखरवजा) इतिहासाची साधनें गोळा केलीं होतीं खास प्रतापसिंहानेंहि आपल्या घराण्यात व दप्तरात असलेलीं अस्सल पत्रव्यवहारादि साधनें त्याच्या हवाली केलीं होतीं तो विलायतेस गेल्यानतर त्यानें आपला मराठ्यांचा इतिहास हा ग्रंथ लिहिला (१८२६) त्या कामीं त्याला फार त्रास झाला प्रथम तो इतिहास कोणीहि पुस्तकविक्रया विकत घेईना, दुसरें त्या लेखनापायीं त्याला कर्जहि बरेंच (१७०० पौंड) झालें त्याला डोळे दुखण्याची व्यथा असल्यानें पाण्याच्या घड्या डोळ्यांवर ठेऊन त्यानें हें पुस्तक लिहिलें पण इतक्या अडचणींतहि त्यानें जो ग्रंथ लिहिला तो फारसा विश्वसनीय निपजला नाहीं त्यात पुष्कळशा चुका राहिलेल्या आहेत काहीं चुक्या अशा आहेत कीं त्याचा सुधारणा त्याच्या वेळीं त्याला सहज करता आली असती परतु मराठ्याचा खरा इतिहास देण्याची तीव्र इच्छाच त्याला नव्हती व मराठ्यासंबधानें त्याची आदरबुद्धि नव्हती ज्याचें राज्य आपण घेतलें त्याची त्रोटक माहिती आपल्या लोकास थोडीफार असावी अशा हेतूनें त्यानें ही बखर रचिली लिहिण्यात आत्मीयता नसल्यानें त्याच्या रच नेस विहृत स्वरूप आलें आहे त्याच्या ग्रंथावर कै नीलक-ठराव कीर्तने यांनीं प्रथम टीका केली व त्यानतर कै खरे, राजवाडे वगैरे सशोधकानीं त्याच्या चुकयाचें ढमेच प्रसिद्ध केले सारांश, त्याच्या इतिहासात पुष्कळ सुधारणा झाल्या शिवाय तो प्रमाण मानता येत नाहीं विलायतेस गेल्यानतर तो प्रतापसिंहास तिकडील सामान व निरनिराळ्या विषा पाठवीत असे, व त्याच्याशीं पत्रव्यवहारादि ठेवीत असे पुण्याचा पहिला कलेक्टर रॉबर्टसन यानें एल्फिन्स्टनच्या [illegible]नें दप्तरखान्यातील पेशव्यांचें सर्व दफ्तर डफच्या स्वाधीन केलें होतें तसेंच सुरतच्या वखारीतील मुंबई सर कारचीं, गोवेसरकारचीं, इंडिया हाऊसमधील व इतर पुष्कळ ठिकाणचीं दप्तरें त्याला मिळालीं होतीं त्याचा त्यानें भरपूर व खराखरा उपयोग केला असता तरीहि फारशा चुक्या झाल्या नसत्या विलायतेस १८२५ च्या सुमा रास तो परत गेला त्यानें गोल्डस्मिथ याला लिहिलेल्या पत्रावरून (१८४६) त्याच्या या लिहिण्याच्या बाबतीतील सर्व माहिती समजून येते पुढें पुस्तकविक्रयाना नको असलेली माहिती छाटून टाकून त्यानें दुसरी आवृत्ति प्रसिद्ध केली होती त्यानें अखेरचे दिवस शेती करण्यात घालविले [ डफचा इतिहास प्रस्तावना, भा स म त्रैमासिक व ४ जोडअक, राजवाडे खड, १ प्रस्तावना ]

**ग्रँट, रॉबर्ट** ( १८१४-१८९२ )—एक ब्रिटिश ज्योतिषशास्त्रज्ञ यानें 'दि हिस्टरी ऑफ फिजिकल ॲस्ट्रॉनॉमी फ्रॉम दि अर्लिएस्ट एजेस टु दि मिडल आफ दि नाइन्टीन्थ सेंचरी' (प्राचीनतम युगापासून १९ व्या शत काच्या मध्यापर्यंतचा भौतिक ज्योतिषशास्त्राचा इतिहास ) हा ग्रंथ खडश लिहून, १८५२ त सबध पुरा केला ज्योतिषवाङ्मयात या ग्रंथाला पहिलें स्थान मिळून कर्त्याला रॉयल ॲस्ट्रॉनॉमिकल सोसायटीचें सुवर्णपदक मिळालें याखेरीज ग्रँटनें बऱ्याच मासिकातून शास्त्रीय लेख प्रसिद्ध केले ग्लासगो विश्वविद्यालयाचा प्रोफेसर असताना त्यानें बऱ्याच ताऱ्याचीं स्थानें नक्की केलीं व त्याचें कॅटलॉग छापले ( १८८३-१८९२ )

**ग्रंथप्रकाशनाचा मालकी हक्क** ( कॉपी राईट )— मुद्रणकलेच्या उत्पत्तिपासूनच या प्रकाराच्या हक्काच्या जाणि वेस विशेष सुरुवात झाली असें म्हणावयास हरकत नाहीं या हक्काचें महत्व ज्या भाषेत ग्रंथप्रकाशन व्हावयाचें त्या भाषेच्या प्रसारावर अवलबून असणार हें साहजिक आहे तेव्हा इंग्रजी भाषेतील ग्रंथप्रकाशनाच्या मालकी हक्कास आज सर्वांत जास्त महत्व आहे व त्यामुळेंच या हक्कासबधींचा कायदा विशेष स्पष्ट व सूक्ष्म करावा लागला प्रथम या कायद्याच्या इतिहासानें अवलोकन करून मग प्रत्यक्ष कायद्याकडे वळू

**इतिहास, इंग्लड** — इंग्लंडमध्यें ग्रंथ छापण्या सबधीं जे निर्बंध घालण्यात आले त्यामुळें ग्रंथप्रकाशनाचे हक्क प्रस्थापित होण्यास सुरुवात झाली पुढें 'स्टेशनर्स हॉल' म्हणून छापखानेवाल्यानीं आपला सघ स्थापन केला, व सरकाराकडून त्याला १५५६ सालीं 'चार्टर' किंवा सनद मिळाली सन १५५६ पासून सन १६४० पर्यंत ग्रंथ छापण्याचे परवाने देण्याचा अधिकार स्टार चेंबरकडे होता व छापलेल्या ग्रंथाची नोंद ठेवण्याची व्यवस्था वर दर्शविलेल्या 'स्टेशनर्स हॉल' या सस्थेनें केली होती सन १६३७ सालीं स्टार चेंबरनें फर्मान काढून या नोंदींत अना धिकारी लोकानीं छापलेल्या ग्रंथाची नोंद करण्याविषयीं मनाई केली सन १७०९ सालीं स्टेशनर्स हॉल सस्थेनें

ग्रंथप्रकाशनाच्या हक्कास कायदेशीर स्वरूप मिळावें म्हणून पार्लमेंटकडे अर्ज केला. त्याच वर्षी ग्रंथप्रकाशनाच्या हक्कासंबंधी कायदा झाला. या कायद्यानें कर्त्यास ग्रंथप्रकाशनाचा मालकी हक्क सन १७१० पर्यंत छापलेल्या ग्रंथाच्या बाबतींत त्या सालापासून एकवीस वर्षें, व १७१० सालानंतर छापलेल्या ग्रंथाच्या बाबतींत ग्रंथ छापल्यानंतर १४ वर्षें व यापुढें ग्रंथकर्ता हयात असल्यास आणखी चौदा वर्षें अशा मुदतीनें दिला होता. सन १८११ मध्यें ग्रंथप्रकाशनाच्या हक्काच्या मुदतींत कायद्यानें कांहींशी भर घातली; म्हणजे ग्रंथप्रसिद्धीच्या तारखेपासून २८ वर्षें, व ग्रंथकार त्यापुढें हयात राहिल्यास त्याच्या मरणापर्यंत, अशी ही मुदत ठरविण्यात आली. पुन्हा १८४२ सालीं या मुदतींत ज्यादा भर घालण्यात आली. म्हणजे ग्रंथप्रकाशनाच्या तारखेपासून ग्रंथप्रकाशकाच्या निधनापर्यंत व त्यापुढें आणखी सात वर्षें, व जर ही मुदत ४२ वर्षांहून कमी भरली तर एकंदर ४२ वर्षें, अशी ग्रंथप्रकाशनाच्या हक्काची मुदत ठरली. १९११ सालीं झालेल्या कायद्यानें ग्रंथप्रकाशनाच्या हक्काची मुदत साधारणतः ग्रंथकर्ता हयात असेतोंपर्यंत व त्यापुढें पन्नास वर्षें, अशी ठरविलेली आहे. परंतु कर्त्याच्या मरणानंतर पंचवीस वर्षांच्या पुढें, व सन १९११ पूर्वी प्रसिद्ध झालेल्या ग्रंथाच्या बाबतींत तीस वर्षांपुढें, ग्रंथाच्या प्रती करून विकण्याची मुभा इतरास कांहीं अटींवर दिली आहे. पहिली अट अशी कीं, अशा रीतीनें प्रती काढणारानें ग्रंथकर्त्याच्या वारसाला अगाऊ नोटीस द्यावी, व ज्या प्रती विकल्या जातील त्याच्या किंमतींतून त्यास स्वामित्वाबद्दल दहा टक्के द्यावे. तसेंच कॉपीराइटसाठीं स्टेशनर्स हॉलमध्यें ग्रंथ रजिस्टर करण्याविषयींची अट या कायद्यानें काढून टाकली. सन १९११ च्या या कायद्यास " इंपीरियल कॉपीराइट ॲक्ट " म्हणजे " साम्राज्यांतील ग्रंथप्रकाशनाचा कायदा " अशी संज्ञा आहे. कारण ब्रिटिश साम्राज्यांत अंतर्भूत होणाऱ्या सर्व देशांत त्याचा अंमल होईल असें या कायद्यांत फर्माविलें आहे.

हिंदुस्थान.—हिंदुस्थानांत ग्रंथप्रकाशनाचा पहिला कायदा ईस्ट इंडिया कंपनीच्या अमदानींत सन १८४७ च्या २० व्या ॲक्टानें झाला. सन १८४७ चा २० वा ॲक्ट हिंदुस्थानाकरितां स्वतंत्र कायदा म्हणून करावा लागला. हा ॲक्ट म्हणजे जवळ जवळ इंग्लंडमधील सन १८४२ च्या कायद्याची नक्कल आहे. म्हणजे या कायद्यानें ग्रंथप्रकाशनाच्या मालकी हक्काची मुदत ग्रंथप्रसिद्धीच्या तारखेपासून ग्रंथकर्त्याच्या निधनापर्यंत व त्यानंतर सात वर्षें व जर ही मुदत बेचाळीस वर्षांहून कमी भरली तर एकंदर बेचाळीस वर्षें अशी ठरविली व ग्रंथप्रकाशनाचा मालकी हक्क प्रस्थापित होण्याकरितां ग्रंथ सरकारांत रजिष्टर करावा असा निर्बंध घातला. हा ॲक्ट सन १९१२ तील आक्टोबर महिन्याच्या ३० तारखेपर्यंत अंमलांत राहिला. या तारखेस हिंदुस्थान सरकारच्या प्रसिद्धी-पत्रकानें इंग्लंडांतील १९११ चा इंपीरियल कॉपीराइट ॲक्ट हिंदुस्थानास लागू करण्यांत आला व त्या वेळीं १८४७ च्या २० व्या ॲक्टाचा लोप झाला. पुढें सन १९१४ मध्यें इंग्लंडांतील या कायद्यांत इकडील परिस्थितीप्रमाणें फेरफार करून हिंदुस्थानाकरितां ग्रंथप्रकाशनाचा कायदा म्हणून सन १९१४ चा ३ रा ॲक्ट पसार करण्यांत आला. सध्या हिंदुस्थानांत ग्रंथप्रकाशनाचा हाच कायदा अमलांत आहे.

इतर देश.— आस्ट्रिया, जर्मनी, जपान व स्वित्झर्लंड या राष्ट्रांत ग्रंथकर्त्यांच्या हयातींत व त्यानंतर ३० वर्षें हा हक्क राहतो. बेल्जम, फ्रान्स, हंगेरी, नॉर्वे, पोर्तुगाल, रशिया, स्वीडन आणि डेन्मार्क या देशांत कर्त्यांच्या हयातीपर्यंत व पुढें ५० वर्षें मालकी हक्क टिकतो. स्पेनमध्यें कर्त्याच्या मृत्यूनंतर ८० वर्षें टिकतो. हालंडमध्यें कर्त्याच्या हयातीपर्यंत किंवा ५० वर्षें, यापैकीं जो काळ जास्त असेल तेथपर्यंत हा हक्क रहातो. इटली देशांत कर्त्याच्या हयातीपर्यंत किंवा प्रकाशनानंतर ४० वर्षें मालकी हक्क टिकतो. ग्रीसमध्यें प्रकाशनानंतर फक्त १५ वर्षें हक्क असतो. अमेरिकेंत कर्त्याला प्रथम प्रकाशनाच्या तारखेपासून २८ वर्षें व या मुदतीनंतर कर्ता जिवंत असेल तर त्याला किंवा त्याच्या नातलगाला पुन्हा २८ वर्षेंपर्यंत मालकी हक्क मिळवितां येतो. एका देशांत ग्रंथ नोंदल्यापासून मिळालेला हक्क दुसऱ्या देशांत चालत नाहीं.

ग्रं थ प्र का श ना चे ह क्क.—ग्रंथस्वामित्वाचीं तीन अंगें आहेत. (१) ग्रंथ म्हणजे केवळ जंगम माल या दृष्टीनें ज्या कागदावर ग्रंथ लिहिला असेल त्या कागदावरील मालकी. (२) ग्रंथाच्या प्रती प्रसिद्ध करण्याची व इतरास प्रती करण्यास प्रतिबंध करण्याची सत्ता, म्हणजे कॉपीराइट अथवा ग्रंथप्रकाशनाचा हक्क व (३) ग्रंथांतील (शब्दाविरहित) केवळ कल्पना, विचार किंवा माहिती यांचा स्वतंत्र ग्रंथरचना करण्यांत उपयोग करण्याचा अधिकार. ग्रंथ प्रसिद्ध केल्यानंतर देखील इतरास विक्रीकरितां त्याच्या प्रती करण्याविषयीं प्रतिबंध करण्याचा अधिकार ग्रंथकर्त्यास आहे. तथापि ग्रन्थांत ग्रथित झालेल्या कल्पना, नमूद केलेले विचार किंवा दिलेली माहिती, स्वतंत्र ग्रंथरचनेनें प्रसिद्ध करण्याविषयीं इतरास प्रतिबंध करण्याची सत्ता ग्रंथकर्त्यास नाहीं. ज्या ठिकाणीं विश्वासघात किंवा दगलबाजी करून ग्रंथाचें कर्तृत्व कोणीं पटकाविलें असेल तर त्या ठिकाणीं कॉपीराइट ॲक्टांतील नियमास न जुमानतां असल्या विश्वासघातकी किंवा दगलबाजीच्या कृत्यास मनाई करण्याचा व त्यासंबंधीं कायद्यास अनुसरून मूळ ग्रंथकारास इतर दाद देण्याचा अधिकार कोर्टास आहे.

कोणत्याहि ग्रंथाच्या किंवा त्यांतील महत्वाच्या भागाच्या प्रती काढण्याचा किंवा ग्रंथ अप्रकाशित असल्यास तो ग्रंथ किंवा त्यांतील महत्वाचा भाग प्रसिद्ध करण्याचा कर्त्याच

जो हक्क तो कॉपीराइट अशी ग्रंथप्रकाशनाच्या हक्काची व्याख्या आहे. ग्रंथप्रकाशनाविषयीं कायदा करण्याचा मुख्य हेतु विद्येस उत्तेजन देणें हा होय. ग्रंथकर्त्यावाचून इतरांस ग्रंथप्रती न करूं देण्याचा उद्देश ग्रंथलेखनास उत्तेजन मिळावें व चांगले ग्रंथ निर्माण होऊन विद्येचा प्रसार व्हावा हा आहे. परंतु ग्रंथकर्त्याचे हक्क संरक्षणाच्या बाबतींत उपाय योजतांना, ज्ञानप्रसाराच्या मार्गांत प्रतिबंध न येण्याविषयीं खबरदारी घेणें अवश्य आहे. शाळेंतील विद्यार्थ्यांकरितां रचलेल्या जुन्या ग्रंथांतील उताऱ्याच्या पुस्तकांत जरी आधुनिक ग्रंथकर्त्यांच्या ग्रंथांतून त्यांच्या ग्रंथप्रकाशनाच्या हक्कास बाध आणणारी वरील तऱ्हेचीं अवतरणें दिलीं, तरी तें क्षम्य आहे असें कायद्यानें ठरविलें आहे फक्त त्याबद्दल दोन अटी प्रकाशकानें पाळल्या पाहिजेत. पहिली अट, पांच वर्षांच्या मुदतींत त्याच प्रकाशकानें त्याच ग्रंथकाराच्या ग्रंथांतून दोहोंहून अधिक अवतरणें घेऊं नयेत; व दुसरी अट, अवतरणें घेतल्याबद्दल ज्या ग्रंथांतून तीं घेतलीं असतील त्या ग्रंथाचा उल्लेख करून कबुली देण्यांत यावी. ग्रन्थप्रकाशनाच्या हक्कास तिसरा एक अपवाद आहे. कांहीं लोक उपजीविकेचें साधन म्हणून लहान किंवा मोठ्या जनसमूहापुढें निरनिराळ्या ग्रंथांतून चुटके किंवा उतारे किंवा पाठ बोलून दाखवितात. त्यामुळें ग्रंथकर्त्यांच्या हक्कांचें तात्त्विकदृष्ट्या उल्लंघन होतें खरें, परंतु जोंपर्यंत अशा रीतीनें उपयोगांत आणलेले उतारे बेसुमार नाहींत तोंपर्यंत त्याविषयीं ग्रंथकर्त्यांस आक्षेप घेण्याचें कारण नाहीं असें कायद्यानें फर्माविलें आहे

*प्रकाशित झालेल्या कोणत्याहि ग्रंथासंबंधीं कॉपीराइट* उत्पन्न होण्यास, तो ग्रंथ सन १९११ च्या कॉपीराइट कॅक्टाचा अंमल असेल अशा ब्रिटिश साम्राज्यांतील देशांत प्रथम प्रकाशित झाला पाहिजे. मित्र, शिष्य, वृत्तपत्राचे संपादक वगैरे निवडक मंडळींत ग्रंथ प्रसिद्ध केल्यानें ग्रंथप्रकाशन होत नाहीं. रंगभूमीवर प्रयोग केल्यानें ग्रन्थप्रकाशन होत नाहीं ग्रंथप्रकाशन म्हणजे लोकांस ग्रंथ उपलब्ध करणें, मग ग्रंथ विक्रीसाठीं ठेवून हें घडो किंवा मोफत ग्रंथ वाटल्यामुळें हें होवो. परंतु प्रकाशन घडून येण्यास अमुक प्रती खपल्या पाहिजेत असा मात्र निर्बंध नाहीं. प्रकाशनाची क्रिया एक प्रत खपल्यानें देखील होते.

ग्रंथासंबंधीं कॉपीराइट प्राप्त होण्यास तो ग्रंथ, ग्रंथकर्त्यांची मूळ कृति असली पाहिजे असा निर्बंध सन १९११ च्या कायद्यानें घातला आहे. अनेक जुन्या ग्रंथांतून जरी उतारे घेऊन ग्रंथ बनविला असला, ग्रंथांत कर्त्यांची कृति अगदीं अल्पाशानें जरी असली, ग्रंथांत वैचित्र्य किंवा नाविन्यानें नोंद जरी नसलें व वाङ्मयदृष्ट्या ग्रंथ कुचकामाचा असला, तरी त्या ग्रंथाविषयीं कर्त्यांस ग्रंथप्रकाशनाचे सर्व हक्क मिळतात. न्यायाधिशांनीं तयार केलेल्या निर्णयांच्या भिन्नभिन्न पाठांविषयीं देखील कॉपीराइट प्रस्थापित करण्याकडे कोर्टाची प्रवृत्ति आहे. निरनिराळ्या ग्रंथांतील उतारे एकत्र छापल्यास त्या उताऱ्यावर हक्क प्राप्त होत नाहीं. परंतु त्यास स्पष्टीकरणार्थ टीपा जोडल्यास त्या टीपांवर कॉपीराइट राहतो असा प्रीव्ही कौन्सिलनें निकाल दिला आहे. परंतु कृतींत परिणामीं उतरणाऱ्या साम्यामुळें एकानें दुसऱ्याची नक्कल करण्यास कायद्यानें प्रत्यवाय नाहीं असें समजूं नये.

अनेकदा ग्रंथकार आपल्या ग्रंथाच्या अनेक आवृत्त्या काढतो. त्यापैकीं कांहीं *आवृत्त्या ग्रंथकार स्वतः काढतो.* व या निरनिराळ्या आवृत्त्या काढतांना त्यांत सुधारणा करतो किंवा भर घालतो. जर ही सुधारणा किंवा भर महत्त्वाची असली तर ती आवृत्ति मूळकृति म्हणून गणली जाते व त्या आवृत्तीसंबंधीं त्या ग्रंथकर्त्यास स्वतंत्र कॉपीराइट प्राप्त होतो. ग्रंथाच्या नांवासंबंधीं जरी ग्रंथकारास मालकी हक्क पोंहोंचत नसला तरी ट्रेडमार्कचा हक्क पोहोंचतो. क्वचित् प्रसंगीं नांवाच्या वैचित्र्यामुळें ग्रंथाचें नांव देखील कॉपीराइटचा विषय होणें शक्य आहे व अशीं कांहीं उदाहरणें झालींहि आहेत. मराठींत 'नवनीत' नांवानें कवितासंग्रह प्रसिद्ध आहे तें नांव ज्या अर्थानें योजिलें आहे, त्यांत वैचित्र्य आहे. त्यामुळें त्याविषयीं कॉपीराइट आहे असें मानल्यास तें अपवादात्मक होणार नाहीं.

ह क्का ची मु द त.—कॉपीराइटची अर्थात् ग्रंथप्रकाशनाच्या हक्काची मुदत हल्लींच्या कायद्यानें ग्रंथकर्त्यांच्या हयातीपर्यंत व त्यापुढें पन्नास वर्षें इतकी ठरविली आहे. परंतु ग्रंथकर्त्यांच्या हयातींतील कॉपीराइट व त्याच्या मरणानंतरचा कॉपीराइट सारख्या दर्जाचे नाहींत. ग्रंथकर्त्यांच्या हयातींतील कॉपीराइट अगदीं पूर्ण किंवा अबाधित असतो. म्हणजे ग्रंथकर्त्यांखेरीज इतरांस ग्रंथाच्या प्रती प्रसिद्ध करण्यास अनियंत्रित प्रतिबंध असतो. ग्रंथकर्त्याच्या निधनानंतरच्या पन्नास वर्षांपैकीं पहिलीं पंचवीस वर्षें (व सन १९११ च्या अगोदर प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांच्या बाबतींत तीस वर्षें) कॉपीराइट तसाच अबाधित असतो. म्हणजे कॉपीराइटच्या मालकाशिवाय इतरांस त्या ग्रंथाच्या प्रती प्रसिद्ध करण्याचा पूर्ण प्रतिबंध असतो. परंतु शेवटच्या पंचवीस (१९११ साला अगोदर प्रसिद्ध झालेल्या *ग्रंथाच्या बाबतींत वीस*) वर्षांत कॉपीराइट मर्यादित स्वरूपाचा होतो. तो असा कीं, या मुदतींत कांहीं अटींवर ग्रंथाच्या प्रती प्रसिद्ध करून विकण्याचा अधिकार इतरांस संपादन करणें शक्य असतें. त्या अटी अशाः—प्रती प्रसिद्ध करणारानें कॉपीराइटच्या मालकास आपण प्रती प्रसिद्ध करणार आहोंत याबद्दल आगाऊ नोटीस द्यावी, व ज्या प्रती विकल्या जातील त्यांच्या किंमतींतून स्वामित्वाबद्दल म्हणून शेकडा दहा टक्के त्यास द्यावे. नोटीस कशी द्यावयाची, नोटिशींत कोणता खुलासा करावयाचा, स्वामित्वाबद्दल रक्कम कशी व केव्हां आगाऊ किंवा पाहिल्यानें मागाहून पटून नंतर द्यावयाची वगैरे बाबींविषयीं नियम करण्याची

सत्ता कायद्यानें हिंदुस्थान सरकारकडे सोंपविली आहे. ग्रंथकर्त्याच्या हयातींतील कॉपीराइट व हयातीनंतरचा कॉपीराइट यामध्यें दुसरा एक महत्वाचा फरक कायद्यानें केला आहे तो असा कीं, ग्रंथकर्ता हयात असतां आपला ग्रंथ आरंभीं प्रसिद्ध करणें किंवा न करणें हें त्याच्या मर्जीवर असतेंच, परंतु ग्रंथ प्रसिद्ध केल्यानंतर देखील ग्रंथाच्या अधिक प्रती छापून विकणें किंवा न विकणें तसेंच देशांत त्या छापून विकण्याचा परवानगी देणें किंवा न देणें हें सर्वस्वी ग्रंथकर्त्याच्या अगर कॉपीराइटच्या मालकाच्या इच्छेवर अवलंबून असतें ग्रंथकर्त्याच्या निधनानंतर हा प्रकार बदलतो तो असा की ग्रंथकर्त्याच्या हयातींत प्रसिद्ध झालेल्या कोणत्याहि ग्रंथाच्या अधिक प्रती छापून विकण्याचें किंवा इतरास छापून विकण्याबद्दल परवानगी देण्याचें कॉपीराइटच्या मालकानें नाकारल्यामुळें लोकास तो ग्रंथ मिळेनासा झाला तर प्रीव्ही कौन्सिलकडे अर्ज करून तो ग्रंथ छापून विकण्याचें लायसन्स—अर्थात् परवाना—संपादन करण्याचा हक्क इतरास कायद्यानें ठेविला आहे हा परवाना देतांना प्रीव्ही कौन्सिलनें कॉपीराइटच्या मालकास स्वामित्वाबद्दल काय द्यावयाचें वगैरेंबद्दल अटी घालावयाच्या असतात

अनेक लेखकाचे पृथक् पृथक् लेख एकत्र ग्रथित करून बनलेला ग्रंथ कायद्याच्या दृष्टीनें एक ग्रंथ नव्हे. परंतु जो ग्रंथ अनेक ग्रंथकार एकमेकाच्या सहकारित्वानें लिहितात व ज्यातील अमका भाग अमक्याची पृथक् कृति म्हणून दाखवितां येणें शक्य नसतें, अशा ग्रंथास अनेक ग्रंथकारांनीं लिहिलेला एक ग्रंथ असें कायद्यानें मानिलें आहे अशा ग्रंथाच्या कॉपीराइटची मुदत त्याच्या अनेक कर्त्यांपैकीं प्रथम जो मरण पावेल त्याच्या हयातीपर्यंत व त्यापुढें पन्नास वर्षें किंवा सर्वांच्या मागून मरणाऱ्या कर्त्याच्या हयातीपर्यंत, ह्या दोन मुदतींपैकीं जी मुदत ज्यास्त असेल ती कॉपीराइटची मुदत असें कायद्यानें ठरविलें आहे हा नियम कर्त्यांपैकीं एक किंवा अधिक हयात असतांना ग्रंथ प्रसिद्ध झाल्यास लागू पडतो ग्रंथकर्त्यांपैकीं सर्वच मयत झाल्यानंतर जर ग्रंथ प्रसिद्ध झाला तर कॉपीराइटची मुदत प्रसिद्धीच्या तारखेपासून पन्नास वर्षें समजावयाची असते. १९११ सालच्या कायद्यानें भाषांतर करण्याच्या हक्काचा समावेश कॉपीराइटमध्यें केला आहे हिंदुस्थान सरकारच्या १९१४ सालच्या ॲक्टानें हिंदुस्थानांत प्रथम प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथाच्या बाबतींत भाषांतर करण्याच्या मालकी—हक्काची मुदत दहा वर्षें ठरविली आहे परंतु ही दहा वर्षें संपण्यापूर्वी ग्रंथकर्त्यानें अगर त्याच्या परवानगीनें कोणी भाषांतर प्रसिद्ध केलें तर भाषांतर करण्याविषयींच्या हक्काची मुदत कॉपीराइटमधील इतर हक्काच्या इतकीच—म्हणजे ग्रंथकर्त्याची हयाती व त्यापुढें पन्नास वर्षें अशी होते शिवाय भाषांतरकार आपल्या भाषांतराचा स्वतंत्र कृति ह्या नात्यानें मालक असल्यामुळें भाषांतररूपी ग्रंथाचा त्याला स्वतंत्र कॉपीराइट मिळतो, व इतरास त्याची नक्कल करण्यास प्रतिबंध होतो

कॉपीराइटच्या दृष्टीनें ग्रंथाचे दोन विभाग आहेत. पहिला विभाग, निरनिराळ्या कर्त्यांच्या पृथक् प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथाचा, व दुसरा विभाग अनेक कर्त्यांनीं लिहिलेल्या अनेक लेखाचा समुच्चय करून बनलेल्या ग्रंथाचा पहिल्या विभागांतील ग्रंथाच्या स्वामित्वावर प्रथम हक्क अर्थात् कर्त्याचा असतो ह्या नियमास एक अपवाद आहे तो असा कीं, जर कर्त्यानें ग्रंथरचनेची नोकरी पतकरून, नोकरींतील कामगिरी म्हणून ग्रंथरचना केली, तर त्या ग्रंथाचें स्वामित्व तत्संबंधीं निराळ्या ठरावाच्या अभावीं कर्त्याच्या मालकाकडे जातें दुसऱ्या विभागांत वृत्तपत्रें, मासिकें, ज्ञानकोश वगैरे अनेक लेखकाचे पृथक लेख एकत्र करून बनलेल्या कृतींचा समावेश होतो अशा अनेक लेखकाचें एक किंवा अनेक लेखकाचें पृथक लेख एकत्र ग्रथित करून बनलेल्या कृतीचें अथवा ग्रंथाचें स्वामित्व कायद्यानें ग्रंथप्रकाशकास दिलें आहे कॉपीराइटची मुदत संपेपर्यंत प्रकाशक व कर्ता यांनीं आपसांत तडजोड केल्यावाचून लेखसमुच्चयांतील कोणताहि लेख पृथक ग्रंथरूपानें प्रसिद्ध होण्यास मार्ग नाहीं

कॉपीराइट बेचन करून देण्याचा तसेंच मृत्युपत्रानें त्याची विल्हेवाट लावण्याचा अधिकार कर्त्यास आहे मृत्युपत्राच्या अभावीं कॉपीराइट कर्त्याच्या वारसामध्यें विभागला जातो

कोणताहि ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वी त्याच्या कॉपीराइटचें बेचन करतां येतें परंतु केवळ ग्रंथाच्या हस्तलिखित किंवा मूळ प्रतीची मालकी मिळाल्यामुळें त्या ग्रंथाचा कॉपीराइट मिळत नाहीं

१९१४ सालच्या कायद्यानें कॉपीराइटसाठीं सरकारांत ग्रंथ रजिस्टर करण्याविषयीं निर्बंध काढून टाकला आहे ग्रंथकर्त्याचें नाव व प्रकाशकाचें नाव ग्रंथाच्या छापील प्रतींतील मूळ पृष्ठावर देण्यांत यावें, व तेंच कॉपीराइटकरितां प्रमाणभूत मानलें जावें, असें या कायद्यानें फर्माविलें आहे [—वि ज्ञा. विस्तार, ज्युबिली ग्रंथ पहिला, उत्तरार्ध निबंधावली " १९२३ ]

**ग्रंथिरोग**—पुरातन काळीं शरीरांत कोठल्याहि भागात गांठ उत्पन्न झालेली दिसली अगर हातानें शरीर, उदर वगैरे चाचपतांना लागली म्हणजे तिला गांठ अगर गुल्म (अर्बुद) असें संदिग्ध नांव देत यावें कारण ती कोणत्या प्रकारची आहे याचें निदान करण्याची माहिती इतकी उपलब्ध नव्हती म्हणून गंडमाळेच्या गांठी, पाणथरी एखादें पोटांतील गळूं अगर क्यान्सरसारखा असाध्य अगर अन्य तऱ्हेची सुसाध्य व्याधि शरीरांत उत्पन्न झाली तरी सामान्यतः सर्वच प्रकारच्या गांठींना वर सांगितलें त्यांपैकीं एखादें नाव देत परंतु हल्लीं जंतुशास्त्राची प्रगति व सूक्ष्म दर्शक यंत्राचा निरनिराळ्या ग्रंथिरोगांशीं सूक्ष्म रचना कशी

आहे व तिचें शरीरातील अस्थि, मांस, त्वचा इत्यादि कोणत्या रचनेशीं साम्य आहे हें पाहण्याच्या कामीं अधिक उपयोग करूं लागल्यामुळें पूर्वीइतकी या रोगाविषयीं संदिग्धता राहिली नाहीं म्हणून या रोगाची व्याख्या व वर्गीकरण नवीन तऱ्हेनें करणें जरूर आहे. दाह, सूज, अथवा रचनावृद्धि या व्यतिरिक्त अगर यामुळें जी गाठ शरीरात अगर शरीराबाहेर उत्पन्न होते व जी आपोआप अगर अंतर्बाह्य उपचारांनीं व औषधांनीं बरी होत नाहीं तिला ग्रंथि म्हणावें याल पुरवणीदाखल असेंहि म्हणता येईल कीं या ग्रंथीचा शरीरातील आयव्ययादि व्यापारामध्यें काहीं-एक उपयोग नसतो. वर्गीकरणाच्या अनेक प्रकारांपैकीं एक दोन प्रकारचें वर्गीकरण पुढें दिलें आहे (१) दाहयुक्त अगर जंतुजन्य ग्रंथि (२) विशिष्ट शारीरिक रचनावृद्धि-जन्य ग्रंथि (३) कोटर ग्रंथि (४) शुद्ध अगर यादृच्छिक ग्रंथि.

(१) दाहयुक्त ग्रंथि—यात कोणत्या तरी प्रकारच्या दाहजंतुप्रवेशाचें निमित्त होऊन त्यानंतर ती दाहक्रिया ठरीव क्रमानें सुरू होऊन संपते म्हणजे त्या ठिकाणीं रक्तसंचय व लशीची उत्पत्ति फार होऊन दुखणारें, ठणकणारें व लाल गळूं सर्वांस परिचित असलेलें बनतें, व त्या ठिकाणीं शरीर रचना व आगंतुक जंतूमध्यें युद्ध असून त्यात जंतूचा पराभव झाल्यास गळूं अगर सूज न पिकता अगर न वाढता ती जिरूं लागते. परंतु उलट प्रकार म्हणजे जंतु प्रबल झाल्यास रचनेंतील पेशी मृत होऊन पातळ होतात व त्याचा पू बनतो असा प्रकार घडविणारे जंतू स्टेप्टोकॉकस व स्टयाफिलोकॉकस या जातीचे असतात पू बनवीत नाहींत असे क्षय व उपदंश या रोगाचे जंतू आहेत. ते वरील प्रकारचा तीव्र व त्वरित संपणारा दाह उत्पन्न न करता अति दीर्घकालीन प्रकारचे फार थोड्या अगर बिन पुवाचे दाह सुरू करितात. पुवाच्या ऐवजीं त्यामुळें जाड पुटकळी (क्षय—उपदंश) रोगामध्यें तयार होऊन ती सावकाश वाढून पुष्कळ महिने अगर वर्षें टिकते दिसण्यात या गाठी जरी यादृच्छिक ग्रंथींसारख्या दिसल्या तरी सूक्ष्मदर्शक यंत्रानें पाहिल्यास त्यात शरीररचना पेशी न आढळता दाहावस्थेंत असलेल्या पेशींचे अनेक समूह दिसून येतात. अशा प्रकारच्या ग्रंथींस पूयग्रंथि अगर विद्रधि अथवा गळूं म्हणतात व ती शरीराच्या कोणत्याहि बहिरउदरादि अंतर्बाह्य भागांत यकृत, फुप्फुसादि इंद्रियांत अथवा अस्थिमांसमज्जादि रचनेमध्यें होऊं शकते.

(२) शारीरिक रचनावृद्धिजन्य ग्रंथि:—एखाद्या स्नायूवर अगर अवयवावर अधिक काम अगर व्यायाम पडला तर तो अवयव कालांतरानें मोठा होतो. म्हणजे त्याची सूक्ष्मदर्शनीय रचना न बदलता त्याचा आकार अगर क्षेत्रफळ मात्र वाढतें. हृदयाच्या पडद्यास विकृति होऊन हृदयांत अधिक रक्त सांचल्यानें त्यास श्रम अधिक पडून हृदयस्नायु मोठा होतो व म्हणून हृदयाहि मोठें होतें. पण यास कोणी ग्रंथि म्हणत नाहीं तथापि तें नाव, हिमज्वरात होणाऱ्या अति मोठ्या प्लीहेस अगर थायरॉईडवृद्धि नामक रोगात आढळणारी त्या थायरॉइड ग्रंथीच्या वृद्धीस किंवा हॉजकिनच्या रोगात शरीरातील सर्वच रसग्रंथींची वृद्धि होते, त्या वृद्धीस समर्पकतेनें देता येतें. या रचनांपैकीं कोणतीहि सूक्ष्मदर्शक यंत्रानें पाहिली असता निरोगी स्थितींत असल्याप्रमाणेंच ती रचना असलेली दिसते फक्त आकार एकंदर त्या सबंध रचनेचा वाढून ती रचना ग्रंथीप्रमाणें दिसतें व चाचपल्यास हातास गाठीप्रमाणें लागते रचनेंत विकृति नाहीं फक्त वृद्धि आहे तर या स्थितीस रोग तरी का म्हणावें? तर या वृद्धीबरोबर रक्तात व मज्जातंतूत बदल होऊन ठराविक तऱ्हेचीं लक्षणें रोग्यास होतात म्हणून हे रोग ठरविले गेले आहेत हें त्याचें उत्तर आहे तथापि ही वृद्धि काहीं प्रकारच्या जंतुमुळें होते किंवा कसें याविषयीं अद्याप पुष्कळ वाद व अनिश्चितपणा आहे

(३) कोटर ग्रंथि.—अर्बुद रोग अगर पोकळ गाठी यातच गुल्मरोगाचा समावेश होतो त्याच्या आत द्रव पदार्थ असून भोंवताली सालीप्रमाणें तंतुमय व अतिचिवट कोष अगर वेष्टण असतें आतील द्रवपदार्थाचें स्वरूप भिन्न जागीं भिन्न प्रकारचें आढळतें अगोदर मूळची लहान पोकळी असून ती विकृतीनें व आतील स्वाभाविक द्रवबिंदूची वृद्धि होत गेल्यानं बाहेरील वेष्टणास ताण पडून तें मोठें होतें व भरीव ग्रंथीप्रमाणें रोगग्रंथि दिसते, व हातास लागते. अशा पोकळ रचना शरीरात मूळच्याच गाठी पुष्कळ असल्यामुळें लहान मोठ्या अशा अनेकप्रकाराच्या व आकाराच्या पोकळ गाठी शरीरात झालेले रोगी पुष्कळ आढळतात व खरें पाहूं गेलें तर त्या रोग्या गाठीहि नव्हेत; परंतु रोगनिदानामध्यें चूकभूल होऊं नये म्हणून त्यांना येथें स्थान दिलें आहे. या कोटरग्रंथि रोगाचें असें वेगळें वर्गीकरण करण्यालायक तो विविधस्वरूपी रोग असल्यामुळें वैद्यकीय प्रथात त्यास स्वतंत्र रोग समजतात यासच अर्बुदरोग, गुल्मरोग (पद्मा) असें म्हणतात व बाह्य साम्यतेखेरीज ग्रंथिरोगाशीं त्याचा फारसा संबंध नाहीं.

(४) शेवटचा प्रकार शुद्ध अगर यादृच्छिक ग्रंथि:—या गाठींचा उगम मूळ एखाद्या जीवन पेशीचें अगर त्याच्या समूहाचें वर्धितसंख्यामान सावकाशपणें अगर एकाएकीं होऊं लागून ती ग्रंथि तयार होऊं लागते. याच्या भोंवतालच्या रचनेपैकीं या ग्रंथीचा सांगाडा जुळविण्यापुरती तंतुमय सामुग्री संधायक रचनेंतून घेतली जाते. भोंवतालची रचना हा वृक्ष आहे असें कल्पिलें तर ही नवग्रंथि तिचें अपत्य अगर शाखा होय, म्हणून कोठल्याहि ठिकाणचा ग्रंथिरोग ज्या प्रकारच्या (अस्थि, स्नायु इ.) रचनेंतून निर्माण झाला असेल त्या रचनेची हुबेहुब प्रतिकृतीच ती ग्रंथि असते त्वग्ग्रंथीची रचना साध्या चामडीच्या रचने-

प्रमाणेंच असते सुसाध्य स्तनग्रंथिरोगाचा पातळ पापुद्रा व स्तनरचनेचा पापुद्रा सूक्ष्मदर्शक यंत्रानें पाहिल्यास फरक दिसून येत नाहीं अगर फरक असलाच तर तो सूक्ष्म असून तो ओळखण्यास अडचण पडते हें समान-रचनालक्षण पहिल्या म्हणजे दाहजन्य ग्रंथीपासून या ग्रंथीचें निदान निश्चित करण्यास उपयोगी पडतें असा एक या रोगाचा नैसर्गिक नियम दिसतो कीं, संधायक अगर अन्य प्रकारच्या रचनेपासून त्या त्या विशिष्ट प्रकारचीच ग्रंथि उत्पन्न व्हावयाचा याच्या उलट सिद्धांतहि खरा आहे कीं सुसाध्य ग्रंथि अगर असाध्य वाह्यत्वग्ग्रंथि म्हणजे क्यान्सरची ग्रंथि ही फक्त बाह्यत्वचेपासूनच उद्भवणें संभवनीय असतें व संधायक रोगग्रंथि बाह्यत्वचेपासून कदापि निर्माण होत नाहीं अनेक शोधकाच्या दीर्घकाल सूक्ष्म निरीक्षणानें हें आता ठाम निश्चित झालें आहे या प्रकारच्या रोगग्रंथींचा आणखी दुसरा विशेष हा आहे कीं शरीररचनेला जे नैसर्गिक निर्बंध आहेत व ज्यामुळें त्याचें वर्धन, पोषण व झीज भरून येणें आपोआप चालतें तसले नियम व निर्बंध या नवग्रंथींना काहींच नसल्यामुळ त्यांची वाढ स्वतंत्रपणे व कशीतरी अव्यवस्थितपण होते या ग्रंथीपैकीं सुसाध्य नामक भेदातील ग्रंथी असे निर्बंध नसताहि विशेष बेसुमारपणें वाढून शरीरहानि प्राय करीत नाहींत ही गोष्ट जरी खरी असली तरी या ग्रथाची बेशिस्त वाढण्याकडे प्रवृत्ति असते हें खास ही प्रवृत्ति असाध्यग्रंथीमध्यें इतकी असते कीं ग्रंथिवृद्धीकडेच रोग्याच्या शर्कराचा, रक्ताचा व अन्नाचा व्यय झाल्यामुळें इतर इंद्रियांची उपासमार होऊन रोग्याचे प्राण हरण झाल्याविना ही रोगग्रंथीची वाढ थांबत नाहीं या असाध्य ग्रंथिवर्गांपैकीं क्यान्सर व सार्कोमा या भयंकर ग्रंथी होत

या सुसाध्य व असाध्य दोन्ही प्रकारच्या ग्रंथी कोठेंहि शरीरात होतात तथापि काहीं स्थानीं ( स्तन, जननेंद्रिय, जाभ, गुद इत्यादि ) त्या बहुतकरून होतात मानवजाती व अस्थिपंजरसहित इतर हीन प्राण्यामध्येंहि हे रोग आढळतात सुधारणेचें हें फल असल्यामुळें यूरोपियन लोकात हा रोग फार आहे असें एक मत फैलावलें होतें पण तें खरें नसावें

सुधारणेबरोबर अशा असाध्य ग्रंथींचीं उदाहरणें लेखी नमूद करण्याचा परिपाठ अधिक पडतो व शुद्धतर व शास्त्रीय तऱ्हेनें शिक्षणपारंगत झालेला त्यातील भिषग्वर्गांत अगर डॉक्टर लोकात या व सुसाध्य ग्रंथींचें निदान करण्याची पात्रता अधिक वाढल्यामुळें हा रोग सुधारणेच्या मन्वंतरात वाढत आहे असा भ्रम पसरला असावा या रोगान मृत होत असलेली माणसें पूर्वी पोटातील रोग, म्हातारपण अगर अन्य सदराखाली बहुधा नोंदलीं जात असत म्हणून हल्लीं क्यान्सर रोगामुळें मृत्यू झालेल्या रोग्याची संख्या डाक्तराच्या वाढत्या ज्ञानामुळ रोगनिदानक्षमतेमुळें वाढली असावी वरील मुख्य दोन भेदांपैकीं हा असाध्य ग्रंथि (क्यान्सर) रोग महा प्राणघातक असल्यामुळ सर्व शोधक शास्त्रज्ञाचें लक्ष त्याकडे अधिक वेधावें यात नवल नाहीं या प्राणघातकतेमुळें यास महत्व आलें असलें तरी या प्रकारच्या रोग्यांची संख्या नेहमीं सुसाध्य ग्रंथीमुळें पिडलेल्या रोग्याच्या संख्येपेक्षां पुष्कळच कमी असते असाध्यग्रंथि एका रोग्यास एके वेळीं एकच होते ( पुढें ती रक्तातून अगर रसवाहिन्यांतून इतर ठिकाणी पसरते ही गोष्ट निराळी आहे ) परंतु सुसाध्यग्रंथि एके वेळीं रोग्यास एक दोन अगर अधिकहि होतात सुसाध्य आणि असाध्य ग्रंथींतील लक्षणें व प्रकार तुलनात्मक पद्धतीनें दाखविल्यास समजण्यास विशेष सुलभ पडेल म्हणून तसें पुढें केलें आहे

सुसाध्य ग्रंथी —(१)ज्या ठिकाणी ही ग्रंथि उत्पन्न होते तेथेंच ती वाढते भोंवतालच्या रचनेंत प्रवेश करून ती दूरवर तडून त्यावर हल्ला करीत नाहीं भोवतालची रचना फार तर दबली अगर बाजूस ढकलला जाते या ग्रंथीच्या भोंवताली चिवट तंतुमय वेष्टण असतें कारण भोंवतालच्या रचनेशीं जणू काय सौम्य कलहामुळें दाहक्रिया उत्पन्न होऊन कुंपणाप्रमाणें हें वेष्टण दोहोंमध्यें असतें याचा उगम व वृद्धि सावकाशपणें होत असतात. आकार वाटोळा असतो, गाठ हलविता येते व त्यावरील त्वचेशीं चिकटलेली नसते गाठ भोंवतालच्या प्रदेशात रुतून बसलेली नसते ( २ ) गाठीपासून विवास धोका नसतो, मात्र त्याचा दाब मर्मस्थानीं, हृदय अगर मज्जातंतूवर पडल्यास मात्र फार वेदना होतात किंवा मृत्यु येतो एरवीं वेदना व भीति नसते शिरेवर दाब पडल्यास सूज येते श्वासनलिकेवरचा दाब प्राण कासावीस करील एरवीं त्यापासून धोका नसतो (३) या गाठी रक्तात शिरून इतर ठिकाणीं आपली वृद्धि करीत नाहींत (४) शस्त्रक्रियेनें कापून काढिल्या असता त्या पुन उत्पन्न होत नाहींत त्या भोंवतालीं वेष्टण असल्यामुळें कोठपर्यंत गाठ कापावयाची हें कळतें

असाध्य ग्रंथी —( १ )उगमस्थानापासून ग्रंथि वाढून भोंवतालच्या, स्नायु, चरबी, अस्थि वगैरेंच्या रचनेमध्यें शिरते व भोंवताली हल्ला करून सर्व ठिकाणी घर करून तेथें चिकटून बसते या ग्रंथीभोंवतालीं वेष्टण नसतें कारण हिच्या वृद्धीचा जोर अतिशय असल्यामुळें प्रतिकारार्थ दाहक्रिया उत्पन्न होऊन प्रतिबंधक कुंपण घालण्याइतकी शक्ति भोंवतालच्या रचनेंत नसते हीचा उगम, वाढ व शेवट सुसाध्य ग्रंथीपेक्षा फार झपाट्यानें होतो यापैकीं सार्कोमा ग्रंथीचा आकार सुताच्या चातीप्रमाणें लांबट असतो इतर प्रकारचा आकार अनियमित असतो व त्यावरील त्वचेंत गाठ रुतलेली असते

(२) यापासून—मग ती गाठ कोठें का असेना—मृत्यु बहुधा येतो म्हणून या कष्टसाध्य अगर असाध्य असतात यकृत, प्लीहा, मूत्रपिंड यांसारख्या इंद्रियामध्येंहि रोगानें वसाहत

घेतल्यावर ही इंद्रियें निरुपयोगी होतात. अशा प्रकारें चोहों-कडे ग्रंथीची वृद्धि झाल्यानें मरण त्वरित येतें. शस्त्रक्रियेनें कदाचित् रोग काढून टाकता येतो. क्यान्सर ग्रंथी रसग्रंथी-मार्गे व सार्कोमाग्रंथि रक्तवाहिन्यातून शरीरांत इतर जागीं पसरतात.

( ३ ) कापल्या जागीं पुनः गांठ येते. ती येऊं नये म्हणून त्याजवळील रसग्रंथी दूषित न दिसली तरी कापून काढतात. त्यामुळें किती रसग्रंथी कापाव्या हें नीट कळत नाहीं. जेथें ही गांठ उत्पन्न होते तेथाल रचनेहून भिन्न प्रकारची रचना या गाठीची असते.

वरील विवेचनावरून ध्यानांत येईल कीं क्यान्सरच्या शस्त्रक्रियेमध्यें जवळील म्हणजे जाघाड,काख व मानेतील रसग्रंथी-सुद्धा रोग कापून काढणें हें स्तन व जीभ या ठिकाणीं क्यान्सर झालें असता इष्ट असतें म्हणून सूक्ष्मदर्शकयंत्रानें परीक्षा न करिता तें काढून टाकणें हा हल्लीं प्रघातच पडला आहे. त्वचेस क्यान्सर झालें असता जवळील रसग्रंथि याप्रमाणें काढून टाकली म्हणजे बहुधा शरीरातील इंद्रियात रोगप्रसार होत नाहीं. बाकी सर्व ठिकाणच्या क्यान्सरमुळें तसें होतें व म्हणून वेदना, रक्तपात, रक्तस्राव इत्यादींमुळें मृत्यु येतो.

काहीं वेळे ग्रंथि सुसाध्य प्रकारची असून एकाएकी तिला असाध्य स्वरूप प्राप्त होतें हाहि एक प्रकार आहे. तसेंच स्वरिछद्रितग्रंथिव्रण, चिबुकमनुष्यग्रंथि, या कष्टसाध्य ग्रंथि-वर्गांपैकीं असूनहि रसवाहिन्यामार्गे त्या शरीरातील इंद्रियात पसरत नाहींत. यावरून व इतर कारणावरून कष्टसाध्य, असाध्य व सुसाध्य यामधील सीमा ठाम नाहीं व या सीमे-मधील प्रांतात मोडणाऱ्या या व अशा दुसऱ्या ग्रंथी असतात हें कळून येईल.

या रोगाचीं कारणें:—सर्वच ग्रंथी कोणत्या कारणानें झाल्या हें निश्चितपणें सांगता येत नाहीं. परंतु काहीं ग्रंथी होण्यास मात्र ( १ ) बरेच दिवस तो भाग घासला अगर चोळवटला जाणें, (२) बरेच दिवस टिकलेली सूज व दाह, (३) दुखापत, हीं व अशा प्रकारचीं स्थानिक कारणें उघड दिसतात. परंतु अशीं कारणें असून सर्वच माणसांना ग्रंथि-रोग जर होत नाहीं, तर अगोदरच ज्या रोग्याच्या शरीरात ग्रंथीचा उद्भव होण्यास अनुकूल स्थिति असते तेवढ्याच रोग्यांना हा रोग होतो हें अनुमान चावर्गे नाहीं. (४) गर्भ वृद्धीमध्यें ज्या नवीन रचनापेशीपासून पूर्ण शरीर बनलें त्या गर्भपेशींपैकीं काहीं पेशींचा लहान समूह शरीरात काहीं काल निद्रितावस्थेत राहून त्यांना अनुकूल वेळीं गर्भ झाल्यानें मोठा होतो. तद्वत् एकाएकी ग्रंथि निर्माण करतात. परंतु हें कारण क्यान्सर ग्रंथीस लागू पडत नाहीं. कारण गर्भपेशी पूर्ण रूपांतर पावून झालेल्या रचनेंतून क्यान्सर तयार होते व त्यात गर्भपेशींपैकीं नवीन रचनापेशी कधीं आढळत नाहींत. सार्कोमा ग्रंथीमध्यें मात्र त्या पेशी आढ-ळ. (५) काहीं प्रकारच्या जंतूपासून ही ग्रंथि होते असें एकमत आहे पण यास फारशी पुष्टि मिळाली नाहीं. ( ६ ) आनुवंशिकता, म्हातारपण, दुःख, काळजी, मानसिकश्रमातिरेक यामुळें आलेलें शरीरदौर्बल्य व रोगप्रतिकारदौर्बल्य हीं कारणें पुष्कळ रोग्यात उघड दिसतात. तसेंच काहीं विशिष्ट प्रांतात तो रोग अधिक आहे असें दिसलें.

मागें ढोबळपणें वर्गीकरण केलेंच आहे. तथापि ग्रंथि-रोगाच्या रचनेस अनुसरून केलेलें पुढील वर्गीकरण पाहिलें म्हणजे त्या ग्रंथींची बहुसंख्याकता, वैचित्र्य व विविधता ध्यानात येईल.यापेक्षा अधिक वर्णनासाठीं त्या त्या रोगावरील स्वतंत्र लेख पहावे आकार व वजन यातहि फार वैचित्र्य आढळतें. म्हणजे लहान गुंज अगर पावट्यापासून तो नारळ किंवा भोंपळ्याएवढी ग्रंथि अगर आवाळूं असूं शकतें

## रोगग्रंथींचें वर्गीकरण

( १ ) शुद्धसंधायक रचनापेशीपासून होणाऱ्या ग्रंथी

| | ग्रंथींचे संभवनीय स्थान | स्वरूप |
|---|---|---|
| तंतुस्नायुग्रंथि | अस्थ्यावरण,जबडा, गर्भाशय,गुद, नाक, घसा, अंडाशय, मस्तक, त्वचेखालीं ( चामखीळ ). | वर्तुळाकार अथवा लंबवर्तुळाकार, न दुखणारी, हलणारी, लोंबणारी, मऊ अगर कठिण. |
| वसामयग्रंथि | खांदा, पाठ, ढुंगण, | वाटोळी,गांठाळ, बिलबिलीत,न दुखणारी, मऊ लहान मोठी. |
| कोमलास्थि-ग्रंथि | हाताचीं बोटें (क्वचित पायाचीं बोटें), जंघास्थीचें खालील टोंक,पादास्थि आणि दंडाच्या हाडाचें वरील टोंक. | अति कठिण, न दुखणारी, जास्त लक्षणें अस्थिरोगावरील ग्रंथात पहावीं. |
| अस्थिग्रंथि | हाडाप्रमाणें कठिण असून हाडापासून वाढतात. अस्थिरोगांत याविषयीं माहिती पहावी. | हाडाप्रमाणें मजीव अगर पोकळ, भुसभुशीत रचना. |
| श्लेष्मलत्वग्रंथि | नाक, त्वचेखालीं अस्थ्यावरण, हाडांच्या मगजात. | दिसण्यांत घसा अगर तंतुग्रंथीप्रमाणें; नाकातील मात्र ओळखण्यास सोपी. |
| शुद्ध आणि श्लेष्मलत्व-योगोत्पन्न ग्रंथि | हे स्तन, फिरंगोपदंश, मूत्राशय, गुद, कंठ, या रोगात व या स्थानीं होतात. तेथील माहिती पहावी. | कालीफ्लावरच्या प्रमाणें मोठे अगर लहान, चिकट व सपाट, चपटे वगैरे प्रकार काहीं कॅन्सर ग्रंथीप्रमाणें |

( पुढें चालू )

(२) महाप्रधानसंधायक रचनापेशीनिर्मित ग्रंथि.

स्नायूमय ग्रंथि, मज्जानिर्मित ग्रंथि, रक्तवाहिनीनिर्मित ग्रंथि, रसवाहिनीनिर्मित ग्रंथि, रसग्रंथिनिर्मित ग्रंथि इत्यादिकांच्या नांवावरून त्यांच्या रचनेचा व स्वरूपाचा बराचसा बोध होत असल्यामुळें येथें संक्षिप्त वर्णन दिलें नाहीं. त्याच्यासाठीं रस व रक्तवाहिन्यादि रोगावरील ग्रंथ पहावे. येथें थोडक्यात वर्णन करणें शक्य नाहीं.

( ३ ) नवीन संधायक रचनोत्पन्न ग्रंथि उर्फ सार्कोमा.

| | ग्रंथींचें संभवनीय स्थान | लक्षणें व स्वरूप |
|---|---|---|
| वर्तुलपेशी-विशिष्ट ग्रंथि | अस्थि, अंड, स्तन याच्या रोगावरील ग्रंथ पहावे | लवकर वृद्धि, त्यावर लाल त्वचा व शिरा, त्वचा फाटून व्रण, शक्तिपात, इंद्रियांत रोगप्रसार, मृत्यु हीं सर्व असाध्य लक्षणें. |
| वर्तुल पेशी-विशिष्ट ग्रंथि | स्नायू त्वचा याच्या मध्यें. | यात दाहलक्षणें नसून मऊ अगर अर्धवट मऊ ग्रंथि काढून टाकली तरी पुनः येणारी, इंद्रियात न पसरणारी. |
| दिपमाकार पेशीविशिष्ट ग्रंथि | लांब हाडाच्या पोकळींत, जघास्थि, खालील जबडा, वगैरे. | हाडाच्या रोगावरील स्वतंत्र ग्रंथ पहावा. |

( ४ ) सर्व संमिश्र प्रकार.

यात वरील तीनहि प्रकारच्या पेशी रचनेंत सापडतात. ही ग्रंथि कापली तर रक्तप्रवाह थांबविणें अवघड पडतें.

( ५ ) रसोत्पादकपिंडपेशीसंभूत व बाह्यत्वचोत्पन्न ग्रंथी.

| | ग्रंथींचें संभवनीय स्थान | लक्षणें व स्वरूप |
|---|---|---|
| सुसाध्य | स्तन, जिव्हामूल, ओठ, शिश्नमूलग्रंथि, थायराइड व जबड्यामागील गाठ, अश्रुग्रंथि, स्वग्रंथि. | यांचीं लक्षणें त्या त्या रोगाच्या सदराखालीं अगर स्वतंत्र ग्रंथात पहावीं. या साध्य आहेत. |
| असाध्य (१) वर्तुल पेशीनिर्मित (अ) कठिण वर्तुलपेशी | स्तन व जठराच्या खालील छिद्र. | कठिण, गाठाळ, हळू वाढणारी, मध्यम आकाराची. |
| (आ) मृदु वर्तुलपेशी | अंडयकृत, मूत्राशय, मूत्रपिंड, स्त्रियाचे अंडाशय, स्तन. | जलद वाढणारी व मोठी. |
| (इ) श्लेष्मल वर्तुलपेशी | जठर, आतडें, अंडाशय. | |
| (२) त्वचोत्पन्न | जुनाट व्रण, व्रण, जीभ, खालील ओठ, हिरड्या, अंडाशय, शिश्न, गुद | खरवडींत पुटकुळी चरते व कडा फुगतात, शेजारील गांठी मोठ्या होतात अगर आयंत आरंभ, शेवटीं फालीफ्लावरचा आकार येणें. |
| (३) स्तंभाकार पेशीनिर्मित | गुद, आतडें, गर्भाशय, स्तनातील दुग्धनलिका. | त्या त्या रोगावरील सदरें अथवा ग्रंथ पहा. |

उपचार—वरील सर्व ग्रंथींवर शस्त्रक्रिया हाच उपचार आहे. मात्र वर्तुलपेशीनिर्मित ग्रंथींत शक्य तेथें शस्त्रक्रिया व वेदनाशमनासाठीं अफू, शक्तिवर्धक व उत्तेजक औषधें द्यावीं व साधल्यास जवळील रसग्रंथींहि काढून टाकाव्या.

मृतगर्भावशेषग्रंथि—ह्या प्रकारचा रोग फार क्वचितच आढळतो व त्यात गर्भाचे दात, केस, अस्थि व इंद्रियांचे अवशेष इत्यादि भाग सापडतात. वरील वर्गीकरणावरून या ग्रंथिरोगाचें अतिवैचित्र्य, कष्टसाध्यता, असाध्यता व सुसाध्यता, स्वरूप, स्थानें, लक्षणें या सर्वांची विहंगमदृष्टीनें कल्पना करता येईल या वर्गीकरणावरून हेंहि कळेल कीं, कष्टसाध्य अगर असाध्य ग्रंथी दोनच प्रकारच्या आहेत. एकीचें नांव बाह्यत्वचोत्पन्न व दुसऱ्या प्रकाराचें नांव नवीन संघायकरचनोत्पन्नग्रंथि. हे भेद महत्वाचे असल्यामुळें वरील अल्प वर्णनापेक्षां त्याचें स्वरूप अधिक नीटपणें कळावें म्हणून खालील दोन्ही प्रकाराची तुलनात्मक पद्धतीनें मांडणी केली आहे.

(१) ज्या नूतनसंघायक पेशींच्या या सार्कोमा ग्रंथी बनतात त्यांत जीवनपेशी द्रव्य असून त्याभोंवती वेष्टण नसतें व त्यास एक अगर दोन मध्यबिंदु असतात. (२) वरील पेशी व अन्यपेशी याच्यामध्यें व भोंवताली संघायक प्रकारचा पदार्थ व तशा प्रकारची रचना अनियमित प्रकारची असते. परंतु क्यान्सरग्रंथींच्या रचनेंत जशा पोकळ जागा ठिकठिकाणीं असतात तशा जागा या प्रकारच्या ग्रंथींत नसतात. ( ३ ) या पेशीमध्यें अति पातळ पापुद्र्याच्या रक्तवाहिन्या असतात, म्हणून या ग्रंथींमध्यें रक्तस्राव अतिशय होण्याचा संभव असतो. क्यान्सरग्रंथीमध्यें रक्तवाहिन्या संघायकरचनेमध्यें वेगळ्या असतात; म्हणून रक्तस्राव इतका होत नाहीं. ( ४ ) या ग्रंथींचा प्रसार शरीरातील इंद्रियांत या रक्तवाहिन्यांच्या मार्गें होतो.

परंतु क्यान्सर ग्रंथींत हा प्रसार रसग्रंथी व रसवाहिन्यामुळें होतो. (५) या प्रसारामुळें होणाऱ्या अन्य ग्रंथी मूळग्रंथीप्रमाणें असतात. व त्या बहुधा फुफ्फुसांत असतात (६) भोंवतालच्या रचनेवर हल्ला चढवून या ग्रंथी मोठ्या होतात. व कापल्या असतां त्या जागीं कांहीं ग्रंथिरचनापेशी कापताना रहाणें साहजिकच असल्यामुळें तेथें पुनः तसली ग्रंथि उद्भवते (७) त्या रसग्रंथींत प्रवेश करीत नाहीत. यास अपवाद अस्थ्यावरण, अंडगलग्रंथि अगर रसग्रंथि या ठिकाणीं हा रोग झाल्यास रसग्रंथींसहि रोग होतो. (८) बालपण, तरुणपण या वयांत निदान ४० वर्षांच्या वयाच्या आंतील मनुष्यास हा रोग होतो परंतु क्यान्सर रोग ४० वर्षांच्या पुढें व उतारवयांत फार करून होतो व त्यामध्यें गांठीजवळील रसग्रंथी वाढतात असा नियमच आहे. (९) या कापल्या अगर खरडून काढल्या तर क्यान्सर ग्रंथींतून निघतो तसा पांढरा दुधासारखा पदार्थ त्यांतून निघत नाहीं. वरील दोन्ही प्रकारच्या वर्गीकरणांत आलेल्या ग्रंथी, दाहात्मकग्रंथि (गळूं), पोकळ व इतर सुसाध्य, असाध्य अशा अनेक प्रकारच्या ग्रंथी स्तन या इंद्रियांत होतात. सर्व ठिकाणच्या व सर्व प्रकारच्या ग्रंथींचें वर्णन या ठिकाणीं देणें शक्य नाहीं हें उघड आहे. तथापि या असाध्य क्यान्सर रोगाचें वर्णन व माहिती कळावी म्हणून ती स्तनाविषयीं पुढें दिली आहे त्यावरून इतर स्थानीं हा रोग झाला असता काय स्थिति होते याची कल्पना करता येईल.

स्तनांतील कठिण रचनापेशीयुक्त ग्रंथी (क्यान्सर) — प्रथम स्तनांत फार जडपणा व गाठाळपणा उत्पन्न होऊन भोंवतालीं कवच लागत नसलेला एक गोळा स्तनांत बनतो. त्याचा आकार मध्यम असतो; परंतु त्या रोगाचे लांब फांटे स्तनाच्या आंत नाना ठिकाणीं घुसतात आणि रोग स्थापित झाल्यावर त्वचा व मांस यांत हे घुसतात. कापताना ह्या गाठींतून कुरकुर आवाज होतो व कापलेला अर्धा भाग वरील तंतुमय फांद्यांची ओढ थांबल्यामुळें खोलगट दिसतो. कापलेला भाग घट्ट व कठिण असून काळसर पांढऱ्या रंगाचा व ठिकठिकाणीं गुलाबी छटा असलेला, कांहींसा कापलेल्या बटाट्याच्या रंगाचा असतो. व त्यांत चमकणारे पांढरे तंतू पिवळ्या रेघा व ठिपके दिसतात. गाठ कापताना एक प्रकारचा पांढरा द्रव पदार्थ निघतो.

लक्षणेंः—रोगाच्या आरंभीं स्तनांत सावकाशपणें वाढत असलेली गाठ उत्पन्न होते. नंतर ती भराभर वाढूं लागते. व त्वचा व त्याखालील मांसांत घुसते. त्यामुळें त्वचा फाटून वेडावांकडा दिसणारा व दुर्गंधिमय व्रण तयार होतो. याच सुमारास काखेंतील रसग्रंथी वाढून त्यांचा दाब तेथील मोठ्या शिरेवर व मज्जातंतूवर पडल्यामुळें हातास सूज येते व वेदना होतात. यापुढें शरीरांतील बऱ्याच इंद्रियांत या क्यान्सरपेशींचा प्रवेश होऊन रोगाच्या आरंभीं रोग्याची प्रकृति दिसण्यांत बरी दिसत असली तरी या सुमारास ती बिघडून त्यावर क्यान्सरची कळा येते, वर्ण निस्तेज व फिकट अगर मातट होऊन रोगी खंगत जातो. व्रणांतून एखादसारखा वाहणारा घाणेरा व पुष्कळ स्राव, शारीरिक व मानसिक दुःख व यातना व इंद्रियांत रोग झाल्यामुळें आलेली दुर्बलता यामुळें रोग्याचा भयंकर शक्तिपात होतो. नंतर मृत्यु येऊन रोगी यातनांतून मुक्त होतो. शस्त्रक्रिया केली नाहीं तर या रीतीनें रोग्याचा शेवट होतो.

रोगग्रंथि स्तनाच्या वरच्या व बाहेरील एक चतुर्थांश भागांत असते. अगर स्तनाग्राच्या खालीं असते. ती हातास कठिण, गाठाळ व उंचसखल लागून भोंवताली कोठें सुरवात होते हें हातास नक्की समजत नाहीं. आरंभीं त्यावरील त्वचा चिमटींत धरली तर तेथें किंचित् खळगा आहे असें भासतें. नंतर तो खळगा वाढून स्पष्टपणें तेथें सुरकुत्या पडतात व कातडीस गाठ चिकटली आहे हें स्पष्ट दिसतें. प्रथम स्तनग्रंथि हलवून पाहिली तर ती छातीवर मोकळी व हलती आहे असें दिसतें; परंतु पुढें ती याप्रमाणें हलवूं जातां पहिल्याइतकी हलती व सुटी नाहीं हें दिसून येतें व नंतर ती छातीवरील मांसांत रुतून बसते; हालत नाहीं जेथें स्तनाग्र असावयाचें तेथें खळगा होतो, कारण मागील ग्रंथि दुग्धनलिकांना आंत ओढते. परंतु स्तनाच्या परिघाच्या सुमारास रोग असल्यास असा खळगा पडत नाहीं; अगर तो अर्धवट पडतो. स्तनाग्रालच रोगास आरंभ झाल्यास तें कठिण व नेहमींपेक्षां अधिक उन्नत दिसतें फार तपासून पाहिल्यास एक अगर अनेक दोरखंड हातास लागावे त्याप्रमाणें त्वचेखालील रसवाहिन्या रोगग्रंथींपासून निघालेल्या लागतात व रोग तितका वाढत असल्यास त्या पोकळ जागेंत अनेक मोठाल्या रसग्रंथीहि चाचपून पहातां येतात. या ग्रंथी प्रथम मोठ्या, मऊ व सुट्या असतात; परंतु पुढील स्थितींत त्यांचा एकच कठिण व उंचसखल गोळा बनून तो शेवटीं तर गळ्याजवळील हाडापर्यंत पोंचतो. त्वचा फाटून व्रण बनल्यावर त्या व्रणाच्या कडा कठिण, वाकड्या, खालून पोकळ व बाहेर त्याची लाली फिरलेली असते. व त्याचा पृष्ठभाग छिद्रमय घाणेरडा व टणक असून त्यांतून अति घाण मारीत असलेला लाल स्राव गळत असतो. या व्रणाभोंवतालच्या त्वचेखालीं रोगग्रंथींमुळें कठिणपणा, टेंकाळें, गाठी, उंचसखलपणा भोंवतालीं सर्व बाजूस लागतो. किंवा एकट्या दुकट्या वाटोळ्या ग्रंथी भोंवतालीं हातानें चाचपल्यास हातास लागतात. इतकीं सर्व लक्षणें दिसल्यावर रोगाच्या प्रकाराविषयीं संशय रहातच नाहीं. परंतु रोगाच्या आरंभीं मात्र सुसाध्य अगर पोकळ ग्रंथी आहेत किंवा क्यान्सर ग्रंथी आहेत याविषयीं संशय येणें साहजिकच आहे. रोग्याचें वय त्यावेळीं ४० च्या वर असल्यास हा संशय वाढतो व अशा वेळीं रोग्याची समजूत पाडून रोगनिदान

करण्यासाठी गांठीमध्यें चीर पाडून तिचा पापुदरा सूक्ष्म दर्शकयंत्रानें तपासल्यास रोगनिदान ठरून त्याप्रमाणें पुढें जरूर ती शस्त्रक्रिया करण्यास बरें पडतें.

या रोगावर उपचारः—रोगाचें हें पुढील स्वरूप जरी माहीत आहे तरी रोग लहान असला तरी तो लवकर, रोगाच्या आरंभीच पूर्णपणें काढणें श्रेयस्कर आहे. म्हणजे तो पुनः तेथें उद्भवणार नाहीं अशी आशा करण्यास अल्पस्वल्प आधार असतो. पुनरुद्भव न झाला तर रोगी अनेक वर्षे जगण्याचा संभव असतो. रोग वाढल्यानंतर म्हणजे तो मांस व त्वचेंत शिरल्यावर मग शस्त्रक्रिया केल्यानें शस्त्रवैद्यकाच्या कीर्तीस बट्टा लागतो. कारण रोगी पुढें मरणार हें ठरलेलेंच असतें या मताचे काहीं शस्त्रवैद्य पूर्वी व हल्लीं असण्याचा संभव आहे. कारण ते म्हणतात असे रोगी शस्त्रक्रियेनंतर दगावल्यानें आरंभावस्थेंतील रोगी—कीं जे लवकर इलाज केल्यानें खरोखरी बचावण्याचा संभव असतो तेहि-या उदाहरणामुळें शस्त्रक्रिया करून घेण्यास कचरतात. व हें थोडें बहुत खरें आहे ही गोष्ट नाकबूल करून उपयोग नाहीं. तथापि हेंहि खरें आहे कीं, अशा स्थितींत शस्त्रक्रिया केल्यानें जरी त्या व्रणाच्या जागीं पुनः रोगोद्भव झाला अगर शरीरांतील इंद्रियांत झाला तरी आयुष्य फारसें वाढत नाहीं. हें पतकरूनहि केवळ रोगाची अत्यंत घाण व शारीरिक व मानसिक दुःख व घोर यातना यांतून मृत्यु सोडवीपर्यंत तरी रोगी मुक्त होतो व त्यास मन:स्वास्थ्य मिळणें हाहि एक त्या यातना व तो दुर्गंधि माहीत असणाराना व रडून न होणाऱ्या रोग्यांना मोठा फायदा वाटतो. म्हणून या स्थितींतहि रोग काढावा अशा मताचेहि शस्त्रवैद्य व रोगी असतात. तेव्हां शस्त्रक्रिया करणें न करणें हें अशा अत्यवस्थ स्थितींत रोग्याच्या व त्याच्या आप्तेष्ट व मित्राच्या मर्जीप्रमाणें ठरवावें हा उत्तम मार्ग होय. शस्त्रक्रिया न करणें ठरल्यास अफू अगर मार्फीया देऊन वेदना कमी करून मृत्यु येईपर्यंत रोग्याचे हाल कमी करावे.

नूतन संधायक रचनोत्पन्न ग्रंथि (सार्कोमा):—याचें सर्व वर्णन येथें देणें शक्य नाहीं. तथापि उपरिनिर्दिष्ट सार्कोमा नामक ग्रंथि क्यान्सरप्रमाणें महत्त्वाची व अनेक जागीं उत्पन्न होणारी असून कष्टसाध्य व असाध्य वर्गांतील असल्यामुळें तिचें वर्णन पुढें दिलें आहे. ती होण्याच्या अनेक स्थानांपैकीं लांब हाडाचीं पोंकळी अगर अस्थींचें बाह्यावरण यापैकीं कोठून तरी ग्रंथीच्या वृद्धीस आरंभ होतो. अस्थिबाह्यावरणोत्पन्नग्रंथि जलद वाढणारी, असाध्य व दुसऱ्या प्रकाराची सावकाश वाढणारी व कष्टसाध्य असते. यांखेरीज मिश्र भेदहि असतो ग्रंथि हाडाच्या आंत व बाहेर मांसांत व त्वचेंत जलद वाढते. त्वचेबाहेर पडल्यावर तेथें मोठा व्रण पडतो व इतर इंद्रियांत रोगगर्भाजें ग्रंथींतील रक्तवाहिन्यामार्गे जाऊन रोगी मृत्युपंथास पुरा लागला नसल्यास हा व्रण पडल्याबरोबर तो मरणाच्या दारींच असतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांत ठणका व दुःख फारसें नसतें. ग्रंथीस हात लावला तर ती कोमट, सुजलेलीहि लागत नाहीं; बहुधा लाल असते व कधीं नसते, काहीं ठिकाणीं बिलबिलीत, मऊ व अन्य ठिकाणीं कठिण लागते तीवरील शिरा फुगून ताठ झालेल्या दिसतात. अस्थींत ग्रंथिरोग आहे म्हणून जवळील रसग्रंथी मोठ्या होतात. इतर जागीं रोग असल्यास त्या मोठ्या होत नाहींत. हा रोग तरण्या माणसास होतो व त्याचें वजन शरीरप्रकृति एकदम ढासळल्याप्रमाणें उतरतें. कधीं ग्रंथी होणाऱ्या जागीं अगोदर काहीं इजा झाली होती असा वृत्तांत आढळतो. अस्थ्यावरणापासून झालेली ग्रंथि अंमळ लंबवर्तुळाकार आणि मऊ अशी असते, अस्थींच्या पोकळींतून वाढलेली ग्रंथि वाटोळी व हातास कठिण लागते, व सावकाश वाढते.

रोगनिदान.—ही असाध्य अगर कष्टसाध्य ग्रंथि असल्यामुळें चूकभूल होऊं नये याविषयीं दक्षता बाळगणें जरूर आहे. म्हणून यासारखे दिसणारे सुसाध्य ग्रंथिअस्थ्यावरणदाह, अस्थिदाह, हाडांतील व्रण, हाडांतील विद्रधि हे रोग नाहींत याविषयीं काळजीपूर्वक परीक्षा करावी. एखादे वेळीं ही परीक्षा करणें बिकट असतें पण जर ज्वर व ग्रंथींत सूज, उष्णता, लाली, दुःख, ठणका हीं लक्षणें असून रोगी खंगत जाईल तर हाच रोग असण्याचा संभव अधिक असतो

उपचार.—रसग्रंथी जर फार मोठ्या झाल्या नसतील तर आणि शरीरांतील इंद्रियांत हा रोग फैलावला नाहीं असें वाटत असेल तर ज्या भागास हा रोग असेल त्या हस्त अगर पायादिकाचें शक्य असेल तर जरूर गात्रच्छेदन करावें हें प्रशस्त होय मस्तक व धड या ठिकाणीं असें करणें शक्य नसतें अशा ठिकाणीं व अन्य अशा प्रसंगीं रोगग्रंथीच तेवढी जपून कापून काढावी व त्याखालील हाड पूर्णपणें खरवडून त्यास भाजून (म्हणजे दाहक औषधाचा चरका देऊन) काढावें म्हणजे पुन्हा वाढणारीं रोगबीजें नष्ट होतील. या शस्त्रक्रियेंत रक्तस्राव होण्याचा संभव असतो म्हणून तो थांबविण्याची भरपूर साधनसामुग्रीची अगोदर तरतूद करून मग शस्त्रक्रियेस आरंभ केल्यानें यशसिद्धीस मदत होते.

ग्रंथिरोग व गुल्मरोगाच्या प्रकाराची व ते होणाऱ्या स्थानांची संख्या मोठी असल्यामुळें त्यांचें संकलित स्थानपरत्वें संक्षिप्त नामनिर्देश उपयुक्त असल्यानें पुढें दिला आहे. कारण हे रोग शरीराच्या आंत असतांना ओळखणें कठिण असतें. व शरीरावर असल्यास रोगनिदान करण्यास सुलभ पडतें.

छातींतील ग्रंथी— धमनीविस्तरणग्रंथि, क्यान्सर, व सार्कोमा ग्रंथि, मोठाल्या, रसग्रंथि, विद्रधि, तंतुमय व वसामय ग्रंथि वगैरे. उराच्या पोकळींत होणाऱ्या ग्रंथींपैकीं महत्त्वाच्या तेवढ्या ग्रंथिः–(१) यकृत्संबंधी.—यकृतवृद्धि, विद्रधि, जंतोत्पन्नगुल्म, अवरोधित पित्ताशय (२) प्लीहसंबंधीः—वृद्धि, विद्रधि, क्यान्सर, जंतोत्पन्नगुल्म. (३) जठरसंबंधी.—क्यान्सर

विदारण (४) आन्त्रसंबंधीः-क्यान्सर, अन्नरसपिंडग्रंथी, तिढा पडणें, एकात एक घुसून दुहेरी तिहेरी घडी पडणें,आन्त्रपुच्छ-दाह, ड्वा रोग (आंत्रक्षय) मळाच्या गांठी. (५) प्यांक्रिया संबंधीः-जुनाट दाह, क्यान्सरगुल्म. (६) मूत्रपिंडसंबंधीः — वृद्धिचलनशीलता विद्रधि, क्यान्सर जतोत्पन्न गुल्म, मूत्र-गुल्म, पूयगुल्म, क्षयजंतुजनित गुल्म. (७) मूत्र पिंडस्थ ग्रंथिसंबंधीः —क्यान्सर, क्षयग्रंथि (८) आन्त्रावरणसंबंधी-जुनाट दाह, क्षयादिकारणामुळें शुक्रगुत, विद्रधि, जठरव्रण, क्यान्सरजतोत्पन्न व इतर प्रकारचा फुटलेला गुल्मरोग यातून स्रवणाऱ्या दूषित पाणीमुळें स्थानिक दाह. (९) रसग्रंथि-संबंधीः-क्षय, क्यान्सर,(१०)गर्भाशय व तत्संबंधी रचना. — तंतुस्नायुमय ग्रंथि, क्यान्सर, विशालबंधनोत्पन्न गुल्म, रक्त गुल्म, गर्भाशयदाहवृद्धि गरोदरपण. (११) मूत्राशयसंबंधीः-कोंडलेलें मूत्र. (१२) एखादे वेळीं उदराचे स्नायू वाटोळे आकुंचन पावून ग्रंथिरोग अगर गरोदरपण आत झालें आहे असा भास रोग्यास व परीक्षकास उत्पन्न करतात, या सर्वांचें निदान व ज्ञान तज्ज्ञाच्या सहाय्यानें करून घ्यावें लागतें.

अन्य ठिकाणच्या.—मेंदू, पृष्ठवंशरज्जु, अंड, स्तन, मूत्राशय व जननेंद्रियें या व इतर जागीं ग्रंथि व गुल्मरोग होतो. या ग्रंथिरोगाचें बाह्यतः गुल्म रोगाशीं साम्य असल्यामुळें गुल्मरोगावरील लेख पहावा.

कोटर ग्रंथि (गुल्म रोग व अर्बुद रोग):—चामडी अगर अन्य रचनेचें वेष्टन असून त्याच्या आत द्रव अगर अर्धवट द्रावक स्थितींतील पदार्थ असलेला जो फुगा शरीरावर अगर शरीराच्या आत उत्पन्न होतो त्या व्याधीस हें नाव आहे. आकारावरून ही व्याधि एखाद्या भरीव गाठीप्रमाणेंच दिसते. परंतु हा रोग व ग्रंथिरोग हे भिन्न भिन्न वर्गांतील आहेत. तथापि त्याच्या रोगनिदानाच्या वेळीं घोटाळा होण्याचा संभव असतो. गळूं,गुल्म अगर ग्रंथि यापैकीं शरीरामध्यें काय झालें आहे हें अनभिज्ञ माणसास कळत नाहीं; व तज्ज्ञ माणसासहि जपून मत बनवावें लागतें. या गुल्म रोगाचे मुख्य तीन प्रकार आहेत त्याचें क्रमशः वर्णन करितों.

( अ ) नैसर्गिक पिंडोत्पन्न गुल्मः—(१) शरीरात स्वाभाविक लहान मोठ्या पोकळ जागा व त्यात किंचित जरूरीपुरता उपयुक्त द्रव स्निग्ध पदार्थ ठिकठिकाणीं असतो. याचीं कांहीं उदाहरणें:—स्नायु, स्नायुबंधनें, सांधे. याच्या ठिकाणीं चलनादि क्रिया सुकर होण्यासाठीं लहान मऊ पिशवीप्रमाणें या पोकळ रचना असतात. (२) त्वचेंत तैलयुक्त अगर स्निग्ध पदार्थपिंड निसर्गतः असतात. तसेंच श्लेष्मलत्वचेंत श्लेष्मल पिंड पुष्कळ असतात. (३) लाळ, दुग्ध, पित्त, मूत्र, शुक्र, धातू हीं वाहून जाण्यासाठीं अनेक नलिका असतात. या सर्वांचें संकलित वर्णन हें कीं, त्यातील द्रव पदार्थ बाहेरील नलिकामध्यें अवरोध उत्पन्न झाल्यानें व अर्थातच त्याचें पोकळ गुल्म बनतें. यावर उपचारः—या गुल्मावरील त्वचा चिरून तिच्या वेष्टनासह साधल्यास ती कापून काढावी. तसें न साधल्यास खंडशः काढावी; अगर ती मधोमध चिरून आंतील मगज काढून टाकून आतील अंगास दाहक औषध लाविल्यानें पुनः तेथें तो गुल्म उद्भवत नाहीं.

( आ ) नवीनोत्पन्न गुल्मः—याचीं कारणें, उदाहरणें संक्षिप्त वर्णे,व उपचारः—(१) शरीरात कांहीं स्थळीं घर्षण दाबादिकारणामुळें पाण्याप्रमाणें लस उत्पन्न होऊन तीभोंवती वेष्टण तयार होतें ती लस गुल्म होय.(२)मान,मस्तक व कान या ठिकाणीं कांहीं माणसात शिराशीं संबंध असलेले रक्तगुल्म पहाण्यात येतात. यास रक्तगुल्म म्हणतात. मार लागून दुखा झाल्यानें व रक्त साखळून गाठ बनतें तें एक याचेंच उदाहरण आहे. (३) संमिश्र गुल्म म्हणजे स्त्रीतील अण्डाशय व स्तन यातील रचनावृद्धि होत असताना मध्यें पोकळी राहून गुल्म तयार होतो तो.( ४ ) आगंतुक गुल्म म्हणजे हाताच्या पंजात व इतर थोड्या ठिकाणीं छिद्राप्रमाणें खोल जखम होऊन तींत बाह्य त्वचेचे तुकडे घुसून तेथें त्यातील स्निग्ध तैलपिंडाची वृद्धि होऊन गुल्म तयार होतो. (५) परोपजीवी चपटया जंतापासून होणारा गुल्मः—यापैकीं एका प्रकारचे जंत डुकर, गाई, म्हशींचें विघडलेलें मांस खाणारांना होतात. अन्य प्रकार कुत्र्यांना होतो. या रोगानें पीडित कुत्र्याच्या विष्टेमध्यें या जंतांचीं सूक्ष्म अंडीं असतात व तीं अन्नपाण्याबरोबर माणसाच्या पोटांत जाऊन प्रसवतात व यकृतमार्गें शरीरातील कांहीं अवयवांस त्याचे गर्भ चिकटून त्याभोंवतीं दोन तीन पापुद्र्याचा गुल्म तयार होतो व तो मोठ्या वाढीस लागतो. यास प्रतिबंधक उपचार कुत्र्यास डुकर,मेंढी,याची विष्टा खाण्याची संवय असते त्यास जपावें.त्याला जंत झाल्यास जंतनाशक औषध व रेचक द्यावें. कुत्र्यास ५. ेानें खावयाच्या अन्नाजवळ फिरकूं देऊं नये. माणसा.ऽ रोग झाल्यास पूर्णपणें हा गुल्म वेष्टणा-सह शस्त्रक्रियेनें काढला पाहिजे. नाहीं तर पुनः वाढीस लागतो. कापून काढल्यावर त्यातील द्रवपदार्थ वगैरे काढून त्याचें अंतर्वेष्टणहि साफ कापून काढलें पाहिजे. म्हणजे मग जखमेंत निचरा होण्यासाठीं कांहीं दिवस रबरी नळी ठेविल्यानें जखम मूळापासून चांगली भरून येते. या रोगाचीं लक्षणें:—डोळयांनीं पहाण्याजोग्या व हातानें चाच-पण्यासारख्या जागीं या प्रकारचा गुल्म असल्यास वाटोळी, ताठ, दाबल्यावर दबणारी, नंतर पूर्ववत् होणारी पोकळ गाठ दिसते अगर हातास लागते. तीवर आडवें बोट ठेवून दुसऱ्या बोटानें ठोकून अगर टिचकी मारून तपासलें तर पाण्यावर तरंग अगर लाटाचीं हालचाल व्हावी तद्वत हालचाल झालेली भासते. हा रोग शरीरात पुष्कळ ठिकाणीं होतो. व त्या त्या स्थानाप्रमाणें निरनिराळीं दुसरीं लक्षणें होतात.

(६) गर्भाविशिष्ट गुल्मः—(१) गर्भसंभव झाल्यानंतर त्याचे जे तीन थर होतात त्यांपैकीं बाह्य थर मधील थरात गुरफटला गेल्यामुळें त्या भागांत पोकळी राहून, (२) गर्भावस्थेंत कांहीं पोकळी निर्माण होतात व प्रसूतीनंतर त्या आपोआप बुजतात. परंतु कांहीं माणसांत अशा कांहीं रचना न बुजल्यामुळें तेथें गुल्म होतो. वृषणरज्जुशोथवृद्धि नामक गुल्म हा रोग, थायराइडची नलिका न बुजण्यानें गळ्याच्या मधोमध होणारा गुल्म, व गर्भाशयाच्या डाव्या अगर उजव्या बाजूच्या विशालनामक बंधनांत उद्भवणारा गुल्म हीं या प्रकारांची व नेहमींच्या प्रचारांतील उदाहरणें होत. असल्याच कारणामुळें स्त्रीअण्डाशय व वृषण यांतून बनणारे गुल्म होतात. यांचीं स्थानें व लक्षणें:—वरील गर्भाविशिष्ट गुल्म वर्गांपैकीं त्वचोत्पन्न गुल्म डोळ्याच्या अस्थिरंध्राच्या बाहेरच्या बाजूस उत्पन्न होतो. तो ठणक, वाटोळा, हलविला तर हलणारा, गुळगुळीत, जन्मतः लहान असून हळू हळू वाढणारा, मध्यम अगर लहान आकाराचा गुल्म असतो. याच्या आंत केस, तैलपिंड, घर्मपिंडादि त्वचारचनेचे अवशेष सापडतात. यास उपचारः—मोठा वण मागून न राहील अशी शस्त्रानें गुल्मावर चीर पाडून सोलून रोग कापून काढावा. एखाद्या वेळीं त्याचे फांटे आंतील उगमापर्यंत गेलेले असतात. अगर हाडांतहि घुसलेले असतात. ते जपून कापावे. अंडाशयच्छेदन नामक महत्त्वाची शस्त्रक्रिया करून गर्भाशयालगत असलेला मोठा गुल्मरोग कापून काढतात. त्याच शस्त्रक्रियेनें त्या स्थानीं सार्कोमा अगर क्यान्सरग्रंथि हा रोग असल्यास तो काढतां येतो. उदर चिरूनहि शस्त्रक्रिया करावी लागत असल्यामुळें ती फार महत्त्वाची आहे. हा रोग शरीराच्या आंत असल्यास त्याचें ग्रंथिरोगापासून निदान करण्यास अडचण पडते. यासाठीं ग्रंथिरोगावरील लेख पहावा. कारण ग्रंथिरोगाचे व या रोगाचे नाना प्रकार नाना स्थानीं व नाना इंद्रियांमध्यें उद्भवतात.

ग्रॅफाइट—हा खनिज पदार्थ कोळशाचा दुसरा प्रकार आहे. रासायनिक दृष्ट्या कोळसा, ग्रॅफाइट व हिरा हे एकच आहेत; परंतु त्यांचा आकार व गुणधर्म यांत फार फरक आहे. ग्रॅफाइट काळा व मऊ असतो. याचें विशिष्ट गुरुत्व २.२ आहे. याच्या वड्या सांपडतात. हा बोटांनीं चुरडला व चोळल्यास सर्व हात काळा होऊन जातो. लिहिण्याकरितां पेन्सिली शिशाच्या करीत नसून ग्रॅफाइटच्या करतात. परंतु त्यास चुकीनें शिसपेन्सिली म्हणतात.

हा चुनखडीच्या खाणींत पुष्कळ वेळा सांपडतो. याच्या मुख्य खाणी न्यूयॉर्क, कानडा, आस्ट्रिया व सिलोनमध्यें आहेत. मेक्सिकोमध्यें सर्वांत मोठी खाण आहे. तेथील ग्रॅफाइट अमेरिका खंडभर पेन्सिलीस पुरतो.

हिंदुस्थानांत सांपडणाऱ्या ग्रॅफाइटचा उपयोग फक्त भांडी साफ करण्याकडे करतात. विद्युत्प्रवाहाच्या साहाय्यानें कृत्रिम ग्रॅफाइट तयार करतां येतो. इ. स. १८९३ मध्यें ही युक्ति निघाली. फक्त कोळसा बारीक वांटून त्याची पूड करितात व विद्युत्प्रवाहांत ती पूड हळू हळू सोडतात, म्हणजे त्या कोळशाचा कांहीं भाग ग्रॅफाइट बनतो.

ग्रह—सूर्याभोंवती फिरणारे लहान मोठे ग्रह, त्यांचें गतिमान व कक्षा यांचें सविस्तर विवेचन 'सूर्यमाला' या लेखांत आढळेल. मंगळ, गुरु, शनि यांसारख्या मोठ्या ग्रहांवर स्वतंत्र लेख या कोशांत दुसरीकडे सांपडतील. ग्रहांविषयीं प्राचीन माहिती व शोध 'विज्ञानेतिहासाच्या' 'ज्योतिषशास्त्राचा इतिहास' या प्रकरणांत (ज्ञानकोश, वि. ५ प्र. ८) ग्रथित केले आहेत.

ग्रहण—हा एक विश्वचमत्कार जगाच्या किंवा मनुष्योत्पत्तीच्या आरंभापासून दृग्गोचर होत असावा असें मानण्यास हरकत नाहीं. ऋग्वेदांतलें सौरसूक्त नांवाचें सूर्याचें जें सूक्त आहे त्या सूक्तांत पुढील वर्णन (ऋ. ५.४०, ६-९) आहे:—"हे सूर्या, असुर स्वर्भानूनें तुला तमानें आच्छादिलें, तेव्हां कोणासहि आपलें स्थान दिसेना सगळे लोक अगदीं भांबावल्यासारखे झाले हे इंद्रा, तूं स्वर्भानूच्या मायाचा नाश करितोस तमानें झांकलेल्या सूर्यास अत्रीनें ब्रह्मज्ञानानें मुक्त केलें, अत्रीनें स्वर्भानूच्या मायेचें निवारण केलें अत्रि सूर्याला मिळविते झाले, इतर कोणी मिळवूं शकले नाहींत" महाभारतादिकांत ग्रहणाचें वर्णन पुष्कळ ठिकाणीं आहे. त्यांत बहुधा कांहीं विपरीत किंवा फारशी कधीं न घडणारी गोष्ट घडण्याच्या वेळीं ग्रहण पडलें होतें अथवा ग्रहण झाल्यावर विपरीत गोष्टी झाल्या असें वर्णन असतें. या देशांतील बहुतेक क्षत्रियांचा संहार करणारें कौरवपांडवांचें महाभयंकर युद्ध झालें, त्याच्या पूर्वी सुरुवातीच एका महिन्यांत चंद्राचें व सूर्याचें अशीं दोन ग्रहणें झालीं होतीं, आणि त्यावरून त्या प्रकारचें चिन्ह दिसून आलें होतें असें वर्णन आहे.

ता १९ मार्च इ. स. ७२०, ८ मार्च इ.स. ६१९ व १ सप्टेंबर इ. पू. ७११ हीं अति प्राचीन चंद्रग्रहणें ग्रंथांतरीं उल्लेखिलेलीं सापडतात. गेल्या सोळाशें वर्षांतले अनेक राजांचे शेंकडो ताम्रपट हल्लीं सांपडले आहेत. आणि त्यावरून या देशाच्या प्राचीन इतिहासाचा पुष्कळ चांगला विश्वसनीय शोध लागत चालला आहे. बहुतेक ताम्रपट एखाद्या पुण्यकारक पर्वाच्या वेळीं ब्राह्मणास भूमि इत्यादिकांचें दान केल्याच्या संबंधाचे आहेत. त्यांत सूर्यग्रहण अथवा चंद्रग्रहण यांच्या वेळीं भूमिदान केल्याचा लेख पुष्कळ ताम्रपटांत आहे. ग्रहणाच्या वेळीं भूमिदान केलें असता फार पुण्य लागतें, "चंद्रसूर्यग्रहणाच्या वेळीं दिलेलें दान अक्षय्य होतें" असें धर्मशास्त्रादिकांत सांगितलें आहे.

ग्रहणाच्या खऱ्या कारणाची कल्पना त्यावेळीं असावी असें दिसतें. महाभारतांत जागोजाग वर्णनें आहेत, त्यांतहि ग्रहण पाहून लोक भिऊन गेले असें वर्णन कोठेंहि नाहीं. ग्रहणाचे परिणाम वाईट होतील अशी मात्र भीति लोकांस

पडत असे. भारतीयुद्धाच्या वेळीं एका महिन्यात दोन ग्रहणें आल्यामुळें तें लोकांनीं दुश्चिन्ह मानलें.

ग्रहणाच्या काळाचें एक चक्र आहे. १८ सौर वर्षें आणि ११ दिवस इतक्या काळात जीं जीं ग्रहणें ज्या ज्या क्रमानें येतात तींच बहुधा त्याच क्रमानें पुढें तितक्या काळात येतात. चांद्रसौरमानानें या काळात कधीं १८ वर्षें होतात, तर कधीं १८ वर्षें आणि एक चांद्रमास होतो. सूर्यचंद्र हे राहुबिंदूंत एकदा आल्यापासून पुनः सुमारें इतक्या काळानें ते एकाच वेळीं फार थोड्या अंतरानें त्या स्थळीं येतात. त्याच्या स्थितींत कांहीं कलांचें अंतर पडतें यामुळें, व चंद्राची स्पष्टगति थोडी कमजास्त होत, यामुळें एका चक्रांतलें एखादें ग्रहण पुढल्यात कमी होतें आणि एखादें वाढतें. सुमारें १००० वर्षांनीं यात पुष्कळ फरक पडतो एका चक्रांत बहुधा ७० ग्रहणें होतात. त्यात ४२ सूर्याचीं आणि २८ चंद्राचीं होतात. म्हणजे चंद्राच्या दीडपट सूर्याचीं ग्रहणें होतात. कधीं चक्रात ७१ ग्रहणें होतात, तेव्हां चंद्राचीं २९ होतात चक्रात सूर्याचीं ग्रहणें पुष्कळ होतात, परंतु एकाच स्थळीं त्यातलीं थोडींच दिसतात तीं एकंदर जितकीं होतात त्याचा सहावा हिस्सा म्हणजे सुमारें ७ ग्रहणें एका ठिकाणीं दिसतात तींहि पृथ्वीवर अन्य स्थळीं खग्रास किंवा कंकणाकृति असलीं तर विवक्षित ठिकाणीं तशीं दिसतात असें नाहीं. बहुतेक खंडित म्हणजे अपूर्ण दिसतात. खग्रास किंवा कंकणाकृति फार थोडीं दिसतात. चक्रातील २८ चंद्रग्रहणांपैकीं सरासरीनें १८ एका ठिकाणीं दिसतात म्हणजे १८ वर्षांत पृथ्वीवर होणाऱ्या एकंदर ७० ग्रहणांपैकीं ७ सूर्यग्रहणें व १८ चंद्रग्रहणें एका ठिकाणीं दिसतात. ४५ दिसत नाहींत.

पृथ्वीभोंवतीं चंद्र फिरतो आणि चंद्राच्या पलीकडे सूर्य फार लांब आहे. पृथ्वी आणि चंद्र हे दोन्ही गोल अपारदर्शक आहेत. यामुळें सूर्याचा प्रकाश त्यावर पडतो, तेव्हां सूर्य जिकडे असतो, त्याच्या दुसऱ्या बाजूस ह्यांची छाया पडते. रात्रीस पृथ्वीच्या ज्या अंगीं आपण असतो, त्याच्या दुसऱ्या अंगास खालीं सूर्य असतो. म्हणून आपल्या वरच्या बाजूस आकाशात पृथ्वीची छाया पसरलेली असते. चांदणें नसलें तर ही छाया आपल्या अनुभवास येतेच. याप्रमाणेंच चंद्राची छाया पडते. अमावस्येच्या दिवशीं सूर्याच्या थेट समोर चंद्र असला म्हणजे चंद्राची छाया पृथ्वीवर पडली पाहिजे. या छायामुळें चंद्रसूर्यांस ग्रहणें लागतात. सूर्य स्वयंप्रकाश आहे. म्हणून वास्तविक म्हटलें म्हणजे त्यास ग्रहण कधींच नाहीं. म्हणजे त्यावर कोणाची छाया कधींच पडावयाची नाहीं परंतु त्याच्या आड चंद्र येऊन चंद्राची छाया पृथ्वीवर पडली म्हणजे, जेथें ती पडते तेथील लोकास सूर्य दिसत नाहीं. म्हणून सूर्यास ग्रहण लागलें असें म्हणतात पण जेथें छाया नसते तेथें सूर्य दिसतच असतो.

अमावस्येच्या वेळीं सूर्याच्या व पृथ्वीच्यामध्यें चंद्र कोठें तरी असतो. आणि सूर्य क्रांतिवृत्तात कोठें तरी असतो व पृथ्वी क्रांतिवृत्ताच्या मध्यबिंदूंत असते. अर्थात् पृथ्वीची छाया क्रांतिवृत्तातच समोर असते. ती छाया आणि सूर्य ह्यामध्यें नेहमीं अर्ध्या परिघाइतकें म्हणजे ६ राशींचें अंतर असतें. पौर्णिमेच्या रात्रीं चंद्र जेथें असतो, त्याच्या आसपास भूछाया क्रांतिवृत्तात असते. सूर्याइतकीच भूछायेची गति असते तिच्याहून चंद्र जलद चालतो तो पश्चिमेकडून पूर्वेस जातां जातां तो आणि भूछाया यांचें पूर्वपश्चिम अंतर शून्य होतें तेव्हांच दक्षिणोत्तर अंतर शून्य झालें तर त्यास ग्रहण लागतें. परंतु दर पौर्णिमेस तें अंतर शून्य होत नाहीं चंद्रकक्षा आणि क्रांतिवृत्त या दोहोंच्या पातळयात ५ अंशांचा कोन आहे त्या पातळ्या दोन ठिकाणीं परस्परास छेदितात. त्या बिंदूस राहु केतु म्हणतात. राहुकेतूंत किंवा त्यांच्याजवळ चंद्र असतो तेव्हां चंद्राचा शर शून्य किंवा अगदीं थोडा असतो म्हणजे क्रांतिवृत्ताच्या जवळच चंद्र असतो यामुळें तेव्हां सूर्यहि तेथेंच असला तर त्याच्या आड चंद्र येतो किंवा भूछाया तेथें असली तर तींत चंद्र सापडतो यामुळें ग्रहणें होतात. राहूरेतूंपासून चंद्र लांब असला तर तो क्रांतिवृत्तापासून लांब असतो. यामुळें त्याचा शर सूर्यबिंब किंवा भूभाबिंब याहून जास्त होतो. यामुळें तो सूर्याच्या आड येत नाहीं किंवा भूछायेंत सापडत नाहीं. यामुळें ग्रहण होत नाहीं. एकदा पौर्णिमेस किंवा अमावस्येस ग्रहण झाल्यापासून पुढें एक किंवा दोन पर्वांस ग्रहणें होतात. म्हणजे लगत दोन किंवा तीन होतात किंवा कधीं एकच होतें. व त्यापुढें पांच साडेपांच किंवा सहा चांद्र महिन्यांनीं पुन. ग्रहण होतें. चंद्रग्रहण नेहमीं पौर्णिमेस आणि सूर्यग्रहण अमावस्येस होतें. सूर्यग्रहण लागण्यापूर्वी सूर्याच्या पश्चिमेस चंद्र असतो. परंतु तो जलद चालणारा असल्यामुळें सूर्याचें बिंब ओलांडून कांहीं वेळानें सूर्याच्या पूर्वेस येतो. पश्चिमेकडून चंद्र येता येता सूर्याच्या पश्चिमकडेच्या आड तो येताच सूर्यास त्या दिशेनें ग्रहण लागू लागतें. तेव्हां ग्रहणाचा स्पर्श झाला असें मानतात. अर्थात् सूर्यग्रहणाचा स्पर्श सूर्यबिंबाच्या पश्चिमेकडून होतो आणि पुढें सूर्यबिंबाचा अधिकाधिक भाग आच्छादित होऊं लागतो. नंतर कांहीं वेळानें तो कमी व्हावयास लागून सूर्याच्या पूर्व बाजूनें चंद्र सूर्यास मोकळा करतो, म्हणजे ग्रहण सुटतें. त्यावेळीं ग्रहणाचा मोक्ष झाला असें म्हणतात. मोक्ष याचा अर्थ सुटका असा आहे ह्याप्रमाणेंच चंद्र भूछायेच्या पश्चिमेकडून येऊन पूर्वेस जातो. यामुळें त्याचा पूर्व भाग प्रथम आच्छादित होतो आणि पश्चिम भाग शेवटीं छायेंतून बाहेर पडतो. म्हणून चंद्रग्रहणाचा स्पर्श बिंबाच्या पूर्वेकडून आणि मोक्ष पश्चिमेकडून होतो बिंबाचा जितका भाग आच्छादित होतो, तितका ग्रास झाला असें म्हणतात स्पर्शापासून मोक्षापर्यंत जो काळ जातो त्यास पर्वकाळ म्हणतात. या काळाच्या मध्याच्या

सुमारास महत्तम ग्रास होतो. तेव्हां ग्रहणाचा मध्य झाला असें म्हणतात. त्यावेळीं जो भाग आच्छादित होतो तो ग्रास पंचांगात देतात. आणि ग्रहणाची आकृति पंचांगात काढितात तींत तो दाखवितात.

चंद्रसूर्यांचीं बिंबें विस्तारानें बहुधा सारखींच दिसतात. तरी पृथ्वी आणि चंद्र यांच्या कक्षा दीर्घवर्तुल असल्यामुळें चंद्रसूर्यांचें पृथ्वीपासून अंतर नेहमीं सारखें नसतें; कमजास्त होतें. यामुळें बिंबें लहान मोठीं दिसतात. कक्षेंतला जो बिंदु मध्यवर्ती ज्योतीपासून लांब असतो त्यास उच्च म्हणतात आणि जवळ असतो त्यास नीच म्हणतात. चंद्र सुमारें २७॥ दिवसांत एकदा आपल्या कक्षेच्या नीचीं आणि एकदा उच्चीं येतो. चंद्रसूर्य उच्चीं असतात तेव्हां त्यांचीं बिंबें लहान दिसतात. आणि नीचीं असतात तेव्हां मोठीं दिसतात. चंद्र नीचीं आणि सूर्य उच्चीं असतां सूर्यबिंबाहून चंद्राचें बिंब बरेंच मोठें दिसतें. अशा वेळीं ग्रहण झालें तर तें खग्रास होतें. सूर्यबिंबाहून चंद्रबिंब लहान असतें तेव्हां कंकणग्रहण होतें. खग्रास होतें तेव्हां चंद्राची छाया पृथ्वीवर पडते. तिचा व्यास फार तर १८० मैल असतो. यामुळें इतक्या रुंदीचा पृथ्वीचा जितका पूर्वपश्चिम पट्टा, सूर्यबिंबावरून चंद्र पलीकडे जाईपर्यंत दैनंदिनगतीमुळें छायेंत येतो तेथें मात्र खग्रास ग्रहण होतें कंकणग्रहणांत तें कंकण दिसण्याचा पट्टा सुमारें १०० मैल रुंद असतो. या पट्ट्यांच्या उत्तरेस व दक्षिणेस तींच ग्रहणें खंडित मात्र दिसतात. यामुळें स्थलविशेषीं खग्रास किंवा कंकणसूर्यग्रहण फार वर्षांनीं दिसतें. खग्रास सूर्यग्रहणांत सूर्य अगदीं आच्छादिलेला असा फार तर ८ मिनिटें असतो आणि कंकणग्रहण फार तर ३१ पळें दिसतें. चंद्र जेथें असतो तेथें पृथ्वीच्या छायेचा व्यास चंद्रबिंबाहून पुष्कळ मोठा असतो. कधीं कधीं तो चंद्रबिंबाच्या तिप्पट असतो. म्हणजे ग्रहणाच्या वेळीं भूभा आणि चंद्र यांचे मध्यबिंदु एका ठिकाणीं आले तर चंद्राभोंवतीं चंद्रबिंबाच्या दीडपट रुंदीचें भूभावेष्टण असतें. यामुळें चंद्रास कंकणग्रहण कधींहि लागावयाचें नाहीं. भूभेंत आणग्रास चंद्रास फार वेळ लागतो म्हणून खग्रास चंद्रग्रहण फार वेळ दिसतें. यावेळीं भूभेनें चंद्राचा ग्रास होऊन ख म्हणजे आकाश छाचादि होतो, म्हणून त्यास खग्रास ग्रहण म्हणतात. भूभेच्या भोंवतीं छायाकल्प असतो त्यांत चंद्र येतो तेव्हां तो अंमळ निस्तेज दिसतो. यामुळेंच खग्रास चंद्रग्रहणांत स्पर्शापूर्वी व नंतर कांहीं वेळ चंद्र फिकट दिसत असतो. चंद्रग्रहणाच्या वेळीं पृथ्वीवर चंद्र जेथें जेथें दिसेल तेथें चंद्रग्रहण दिसतें व तें सर्वत्र सारखें दिसतें, कमजास्त दिसत नाहीं [ दीक्षित ज्योतिर्विलास ]

ग्रहणासंबंधीं पुढील गणितविषयक माहिती प्रसिद्ध महाराष्ट्रीय ज्योतिषशास्त्रज्ञ रा. वें. बा. केतकर यांच्या 'ग्रहगणितां'तून घेतली आहे.

चंद्रग्रहण.—पंचांगामध्यें दर पौर्णिमेस प्रातःकालचे सूर्य आणि राहू यांचे भोग दिलेले असतात. राहूमध्यें १८० अंश मिळविले म्हणजे केतूचा भोग होतो. सूर्य आणि त्याच्याजवळ असणारा राहू किंवा केतु यांच्यामध्यें अंतर १३ अंशापेक्षां कमी असेल तर ग्रहणाचा मात्र संभव असतो पण ९ अंशापेक्षां कमी अंतर असेल तर ग्रहण खचित होतें असें समजावें संभव असेल तर चंद्रगणितांत सांगितलेल्या रीतीनें पौर्णिमातानजीकच्या पूर्ण घटकेचीं पुढील मानें आणावीं. पहिलें उपकरण रविमंदकेंद्र असतें म्हणून त्यावरूनच सूर्याचें मंदफल, गति, बिंब वगैरे मानें साधावीं त्याप्रमाणेंच स्पष्टसूर्य, सूर्यदिनगति, सूर्यबिंब, राहु, अयनांश, स्पष्टचंद्र, चंद्रदिनगति, चंद्रबिंब व चंद्रक्षितिजलंबन हीं मानें काढावीं.

पौर्णिमांत समय.—स्पष्टसूर्यांत १८० अंश मिळविले म्हणजे भूभाभोग येतो भूभा म्हणजे भूछाया भूछायेंत चंद्र शिरतो म्हणून चंद्रास ग्रहण लागतें हें ध्यानांत ठेवावें भूभा आणि स्पष्टचंद्र यांच्या अंतराच्या कलांस ६० नीं गुणून गुणाकारास सूर्यचंद्रांच्या दिनगत्यंतरकलांनीं भागून घटिकादि चालनसंस्कार आणावा. चंद्रापेक्षां भूभाभोग जास्त असेल तर, चालन धन कमी असेल तर ऋण समजून गणित ज्या घटकेचें असेल त्या घटकेला चालनाचा संस्कार करावा म्हणजे पौर्णिमांत समय येतो

दिनगतीच्या साहाय्यानें पौर्णिमांतीचा सूर्य आणून त्यांत १८० अंश मिळवावे म्हणजे पौर्णिमांतीचा चंद्र येतो या चंद्रांत चक्रशुद्ध राहु आणि ०° ५५ मिळवून येणाऱ्या उपकरणानें चंद्राचा शर आणून तो आपल्या ३४ व्या हिश्शानें लहान करावा. म्हणजे आकर्षणस्पष्ट चंद्रशर येतो

चंद्रशराची घटीगति.—चंद्रदिनगतीला ६६७ नीं भागिलें म्हणजे कलादि घटीगति येते ग्रहण राहु सन्निध असेल तर ही गति धन म्हणजे उत्तर व केतु सन्निध असेल तर ऋण म्हणजे दक्षिण असते ग्रहणपरिलेख काढतांना पौर्णिमांत समयाच्या पुढील आणि मागील पांच पांच घटिकांस चंद्रशराची जरूर लागते म्हणून ५ घटिकांची शरगति आणून तिचा पौर्णिमांतीच्या चंद्रशराला संस्कार करावा. म्हणजे त्या त्या वेळचे चंद्रशर येतात.

ग्रहणमध्यकाल.—चंद्रापासून जवळच्या राहु किंवा केतु संपातापर्यंत जें अंशात्मक अंतर त्याच्या दुपटी इतक्या पळांस पर्वसंस्कार म्हणतात संपात चंद्राच्या पुढें असेल तर पर्वसंस्कार धन, मागें असेल तर ऋण समजून त्याचा पौर्णिमांत कालाला संस्कार करावा म्हणजे ग्रहणमध्यकाल येतो. मग पुढील समीकरणसूत्राप्रमाणें गणित करून स्पर्श, संमीलन इत्यादि काल आणावे जसें:—

| | | |
|---|---|---|
| भूभाबिंब | = | $\frac{५१}{५०}$ ( द्विगुणचंद्रक्षितिजलंबन—सूर्यबिंब ) |
| मान्यैक्यखंड | = | $\frac{१}{२}$ ( भूभाबिंब+चंद्रबिंब ) |
| मानांतरखंड | = | $\frac{१}{२}$ ( भूभाबिंब-चंद्रबिंब ) |
| ग्रास | = | ( मान्यैक्यखंड-चंद्रशर ) |

ग्रास = (मानांतरखंड-चंद्रशर)

ग्रहणस्थितिघटी = $\sqrt{}$(मान्यैकखंड²+चंद्रशर²) × दिनगत्यंतर

मर्दस्थितिघटी = $\sqrt{}$(मानांतरखंड²+चंद्रशर²) × दिनगत्यंतर

स्पर्शकाल = ग्रहणमध्यकाल - ग्रहणस्थिति

संमीलनकाल = ग्रहणमध्यकाल-मर्दस्थिति

ग्रहणमध्यकाल = ... ग्रहणमध्यकाल

उन्मीलनकाल = ग्रहणमध्यकाल + मर्दस्थिति

मोक्षकाल = ग्रहणमध्यकाल + ग्रहणस्थिति

ग्रास आणि बिंब यांची मानें अंगुलात्मक सांगण्याची प्राचीन ग्रंथकारांची वहिवाट आहे त्याप्रमाणें तीन कलांचें एक अंगुल होतें. ग्रहणस्थितीच्या दुपटीस पर्वकाल म्हणतात. शर उत्तर असेल तर चंद्रबिंबाच्या दक्षिणेकडे ग्रास होतो. दक्षिण असेल तर उत्तरेकडे ग्रास होतो.

सू र्य ग्र ह ण, *ग्रहणसंभवासंभव*—अमावास्येस राहु किंवा केतु यांच्यापासून पुढें किंवा मागें १९ अंशाच्या आत सूर्य असेल तरच सूर्यग्रहणाचा संभव असतो. हें अंतर १३ अंशापेक्षा कमी असेल तर पृथ्वीवर कोठें तरी सूर्यग्रहण दिसलेंच पाहिजे, पण तें इष्टग्रामीं दिसेल किंवा नाहीं, या गोष्टीचा निर्णय बरेंच गणित केल्याशिवाय करता येत नाहीं. संभव असेल तर पंचांगातील दर्शांताच्या जवळच्या पूर्ण घटिकेचीं पुढें लिहिलेलीं मानें आणावीं.-स्पष्टसूर्य, सूर्यदिनस्पष्टगति, सूर्यबिंब, राहु, अयनांश, मध्यमसूर्य, स्पष्टचंद्र, चंद्रदिनस्पष्टगति, चंद्रबिंब, चंद्राचें क्षितिजलंबन, चंद्रशर आणि चंद्रशर घटीगति. नंतर या मानांच्या साहाय्यानें सूर्यचंद्रांचा भोग समान होण्याची वेळ काढावी. ती उज्जयिनीची मध्यमवेळ येईल तिला रेखांतराचा संस्कार करावा म्हणजे इष्ट गांवचा दर्शांतसमय येईल.

सुमाराचा ग्रहणमध्यकाल व स्पर्शकाल काढण्याची पद्धति-दर्शांतकाल आणि १५ घटी यांचें अंतर करून त्यास नतकाल म्हणावें. दर्शांत पूर्वान्हीं असेल तर नतघटी ऋण, येरव्हीं धन समजाव्या. नतघटी ०,१,२,३, पर्यंत असतील तर त्याचा दर्शांतघटीला संस्कार करावा. नतघटी तीनपेक्षा जास्त असतील तर चारच घटिकांचा संस्कार करावा. म्हणजे सुमाराचा ग्रहणमध्यकाल येतो मध्यकाळांत ५घटिका वजा कराव्या. म्हणजे सुमाराचा ग्रहणस्पर्शकाल येतो. या स्पर्शकालापासून पुढें सुमारें दहा घटिकापर्यंत दर दुसऱ्या घटिकेस सूर्यचंद्रांमधील दृश्य अंतर काढण्यासाठीं गणित करावें लागतें.

सूर्यग्रहणीं स्पर्शमोक्षकाल, लंबन आणि नति या दोन संस्कारावर अवलंबून असतात लंबन व नति हे संस्कार, त्रिभोनलग्न आणि नतांश यावर अवलंबून असतात. आणि त्रिभोनलग्न व नतांश हे गांवाचे अक्षांश आणि विषुवकाल यावर अवलंबून असतात मध्यम सूर्योदयीं सायन मध्यम सूर्याच्या घटिकात्मक भोगाएवढा विषुवकाल असतो. म्हणून औदयिक सायनमध्यमसूर्याचे अंश करून त्यास ६ नीं भागावें म्हणजे औदयिक घटिकारूप विषुवकाल येतो. यांत सुमाराचा स्पर्शकाल मिळवावा. ही बेरीज समसंख्याक पूर्ण विषुवघटी नसेल तर तींत काहीं भरती घालून ती तशी करावी आणि जी भरती घातली असेल ती मध्यमकालांतहि मिळवावी म्हणजे इष्टघटीइतका विषुवकाल असतेवेळीं मध्यमकाल किती झाला असेल तें निघतें. त्या त्या मध्यमघटिकेच्या सायनसूर्यांतून त्या त्या घटिकेचें त्रिभोनलग्न वजा करावें म्हणजे विक्षेपांश येतात

सूर्यचंद्रांचें दृश्य पूर्वापरांतर आणि दृश्यदर्शांत—त्या त्या मध्यमघटीपुढें इष्टगावचीं ग्रहणमध्यघटी मांडून त्याच्या बैजिक अंतरघटीला चंद्रसूर्यांच्या घटीगत्यंतरानें गुणावें म्हणजे भूमध्यस्थ द्रष्ट्याला दिसणारें सूर्यचंद्राच्या मध्यबिंदूमधील अंतर येतें त्याला लंबनाचा संस्कार करावा म्हणजे इष्टग्रामीं दिसणारें अंतर निघतें. हें पूर्वापरांतर होण्याची जी वेळ तोच येथील दृश्यदर्शांत. यावेळेच्या सुमारास परमग्रास असतो.

चंद्रसूर्यांचें दृश्य दक्षिणोत्तर अंतर, मध्यांतर आणि ग्रास चंद्रशराच्या घटीगतीच्या मदतीनें त्या त्या मध्यमघटिकेचे चंद्रशर आणून त्यांना त्या त्या वेळेच्या नतीचा संस्कार करावा. म्हणजे त्या त्या वेळेचें सूर्यचंद्रांमधील दृश्यदक्षिणोत्तर अंतर, किंवा स्फुटशर निघतात. नंतर त्या त्या घटिकेचें दृश्य पूर्वापरांतराच्या वर्गांत दृश्यदक्षिणोत्तरांतराचा वर्ग मिळवून बेरजेचें वर्गमूळ काढावें म्हणजे मध्यांतर होतें. मध्यांतरांतून सूर्यचंद्रांचें बिंबैक्यार्ध वजा करावें म्हणजे ग्रास किंवा बिंबांतर येतें. हें जितकें ऋण असेल तितका त्यावेळीं ग्रास समजावा.

चंद्रबिंबवृद्धिः—आता ग्रहण खग्रास होईल किंवा नाहीं तें ठरविण्यापूर्वीं ग्रहणमध्यकालीं चंद्रबिंब केवढें असेल तें ठरविलें पाहिजे. कारण चंद्राच्या उदयापासून तो मध्यान्हीं येईपर्यंत चंद्रबिंब हळू हळू वाढत असतें. नंतर त्याचा अस्त होईपर्यंत पुन: कमी होत जातें. म्हणून इष्ट वेळेची चंद्रबिंबवृद्धि पुढील समीकरणसूत्रावरून आणून ती पूर्वी आणलेल्या चंद्रबिंबांत मिळवावी जसें —

बिंबवृद्धि = ३१.०×नतांशकोटिज्या ×विक्षेपांशकोटिज्या.

स्पर्शमोक्षस्थानें:—शिरोबिंदुसंबंधानें स्पर्शमोक्षस्थानें काढण्याची सोपी रीति पुढें सांगितली आहे आपल्या खिशातील घड्याळास सूर्यबिंब मानावें आणि या स्थानांशास ६ नीं भागून येणाऱ्या संख्येस मिनिटें मानावीं. मग धन मिनिटें उजवीकडे आणि ऋण मिनिटें डावीकडे मोजून जीं स्थानें येतील त्या स्थानीं स्पर्शमोक्ष होतील मात्र घड्याळ पहाताना १२ चा आकडा उभ्या रेषेंत धरावा. उदा. + ११७° ÷ ६ = २०, म्हणजे घड्याळांत जेथें २० मिनिटांचें मार्क असतें तेथें सूर्यबिंबावर स्पर्श होईल असें जाणावें.

स्टँडर्डटाईमप्रमाणें स्पर्शादि काल काढणें—वर जे घटिकादि स्पर्शादि काल आले आहेत ते स्थानिक मध्यम आहेत त्यास रेखांतराचा व्यस्त संस्कार करावा, म्हणजे रेखांतर मिनिटें धन असलीं तर ऋण समजावीं आणि ऋण असलीं तर धन समजून स्पर्शादि स्थानिकमध्यम कालांना संस्कार करावा म्हणजे उज्जयिनी मध्यमकाल येतात. त्यांत ६ अ. २७ मि. मिळवावीं म्हणजे स्टँडर्ड टाईमप्रमाणें स्पर्शादिकाल येतील. असें –

स्थानिक काल–रेखांतर + ६ अ २७ मि. = स्टँडर्ड टा

उदाहरणः—

घ अ मि. मि रेखा अ मि. स्टँ टा
स्पर्श = १८.८ = ५ ५५.२,—१३.० + ६ २७ = १२ ९.
मध्य = १८.८ = ७ ३१ २,—१३.० + ६ २७ = १ ४५
मोक्ष = २२.१ = ८ ५०.४,—१३.० + ६ २७ = ३ ८.

ग्रहविप्र ( गणक )--आसामांतील ह्या जातीची लोकसंख्या २१८८९ आहे. सुरमाथडी व बंगालमधील गणक लोकांपेक्षा ब्रम्हपुत्रा नदीच्या थडींतील गणक लोक अधिक उच्च वर्गाचे समजले जातात. त्याच्या मधील सालेख्या वडाळीनंतर ब्रम्हपुत्रा नदीच्या थडींतील गणकांनीं 'ग्रहविप्र' हें नवीन नांव घेतलें. बंगल्यांत ह्या लोकांना आचारजी अथवा दैवज्ञ ब्राम्हण म्हणतात. ब्रम्हपुत्रा नदीच्या थडींतील उच्च दर्जाचे ब्राह्मण 'ग्रहविप्र' ह्या नांवाला उघडपणें आक्षेप घेतात. ( से. रि. )

ग्रॉड्नो—हें शहर रशियांतील ग्रॉड्नो प्रांताची राजधानी असून नेमन नदीच्या उजव्या तीरावर आहे. हें वार्सापासून ईशान्येस १८० मैल विल्नापासून नैर्ऋत्येस ९८ मैल आहे. सेंटपीटर्स बर्ग (पेट्रोग्राड, लेनिनग्राड)ला जाणाऱ्या मुख्य आगगाडीच्या रस्त्यावर आहे. येथील लोकसंख्या १९१३ मध्यें ६४१०० होती. पैकीं ½ यहुदी होते. तंबाखूचे कारखाने व दारूच्या भट्या हे मुख्य कारखाने असून यंत्रें, साबण, मेणबत्त्या वाहनें वगैरे येथें होतात. ग्रॉड्नो १२व्या शतकांत वसलें गेलें. परंतु १२४१ मध्यें मंगोलांच्या स्वारीनें जवळ जवळ याचा नाश झाला. पोलंडचा राजा स्टिफन ब्याथोरी यानें १५८६ त हें शहर आपली राजधानी केली. १७०३ नंतर पोलिश लोकसभा नेहमीं येथें भरत असे व १७९३ मध्यें त्यांनीं येथें पोलंडच्या दुसऱ्या विभागणीवर सही केली. १७९५ मध्यें पोलिश राजा स्टॅनिशलास पॉनियाटोव्हस्की यानें येथेंच राजिनामा दिला.

ग्रानाइट,घटना—ग्रानाइट हा साधा व एकाच पदार्थाचा बनलेला असा खनिज पदार्थ नसून कार्टस (स्फटिक), फेलस्पार ( चंद्रकांत ) आणि अभ्रक हे तीन पदार्थ भिन्न भिन्न प्रमाणानें या दगडाच्या घटनेंत असतात. या तीन स्फटिकरूप पदार्थांचे कण अनियमीत रीतीनें एकत्र झालेले असतात व या घटक पदार्थांचे कण वेगवेगळे दिसतात व यावरून यास इंग्रजींतील ग्रानाइट (ग्रेन म्हणजे कण दिसणारे)हें नाव पडलें आहे. निरनिराळ्या घटकांच्या परिणामावरून व रंगावरून ग्रानाइट दगडाच्या अनेक जाती होतात. स्फटिक बहुधा पांढरा, पण कधीं काळसर, करडा व तांबूसहि असतो. शुभ्र पांढऱ्यापासून तांबूस रंगापर्यंत, किंवा काळसर रंगापर्यंत अभ्रकाचा रंग भिन्न भिन्न असतो. या घटकांपैकीं ज्याचा अंश जास्त असेल त्याचा रंग सगळ्या दगडास प्राप्त होतो. त्यावरून करडे किंवा तांबडे असे ग्रानाइटचे वर्ग करितात. कधीं कधीं अभ्रक मुळींच नसून अभ्रकाच्याच जातीचा दुसरा एक घटक, ज्यास इंग्रजींत हॉर्न ब्लेंड म्हणतात तो असतो.

धर्म व उपयोग—ज्या खनिज पदार्थांचा हा दगड बनला आहे, ते जाडे भरडे किंवा सफाईदार असतील त्याप्रमाणें ग्रानाइट दगडाचे धर्म भिन्न असतात. बारीक कणदार जो दगड असतो तो फार कठीण व टिकाऊ असून, मोठमोठे पूल, उंच इमारतींचे पाये, मोठाल्या शहरांतील गाड्या जाणाऱ्या फरशा अशा ज्या बांधकामांत बळकटीची आवश्यकता असते, त्या कामास या दगडाचा उपयोग करतात. लंडनच्या सर्व रस्त्यांवर या दगडांची फरशी केलेली आहे व तेथील गोद्यांतहि याचीच फरशी व धक्के बांधलेले आहेत. हे दगड घट्ट असल्यामुळें यावर करवत वगैरे चालत नाहीं, व टांकण्या, गिरणी व हातोडे यानींच यावर काम करावें लागतें.

व्याप्ति.—ग्रानाइट नांवाचे दगड हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं आढळतात. समुद्रापासून दूर अशा मध्यप्रदेशांतील डोंगराळ मुलुखांत ते सांपडतात. दक्षिण हिंदुस्थानांत रायचूरच्या आसपास या दगडाचे खडकच्या खडक चोहोंकडे आहेत. दक्षिण हिंदुस्थानांत, मद्रास इलाख्यांतील व म्हैसूर प्रांतांतील जुनाट सुंदर देवळें व इमारती याच दगडाच्या बांधलेल्या आहेत. तंजावर प्रांतांत तेथील राजाचा वाडा, त्रिचनापल्ली प्रांतांतील सुंदर खोदीव काम केलेलीं देवळें, विजयानगर ( हंपी ) च्या सुंदर व भव्य प्राचीन इमारती याच दगडानीं बांधलेल्या आहेत. त्याचप्रमाणें बंगाल व बहार प्रांतांत व ज्या प्रदेशांतून भागीरथी वाहत गेली आहे त्या प्रदेशांतहि हे दगड सांपडतात. गया येथील विष्णुपदाचें प्रसिद्ध देवालय, व बुद्धगयेंतील बौद्धांचीं प्रसिद्ध देवळें याच दगडाचीं बांधलेलीं आहेत. युरोपांतहि हा दगड बराच आढळतो. स्कॉटलंडांतील डोंगराळ प्रदेशांत इंग्लंडांत व कार्नवाल डेव्हन्शायर प्रांतीं हे दगड असून तिकडेहि याचा उपयोग करतात. हिंदुस्थानांत, नर्मदा, कृष्णा, भागीरथी व यमुना या नद्यांवरील प्रचंड पुलांच्या कामीं या दगडाचाच उपयोग केला आहे.

ग्राहाम ( १८०५–१८६९ )–हा इंग्रज रसायनशास्त्रज्ञ ग्लासगो येथें ता. २० डिसेंबर १८०५ रोजीं जन्मला. याचा बाप त्या शहरीं एक व्यापारी होता तो १८१९ त

ग्लासगो येथील विश्वविद्यालयात गेला. तेथील रसायनशास्त्राध्यापक थॉमस थॉमसन (१७७३–१८५२) याच्या संगतीनें त्याला पदार्थविज्ञान व प्रयोगशास्त्र यांची चटक लागली १८२४ त त्याला पदवी मिळाल्यानंतर तो दोन वर्षे एडिंबरो येथें टी. सी. होप याच्या प्रयोगशाळेत राहिला. ग्लासगोस परत आल्यावर तो गणित व रसायन शास्त्र यावर व्याख्यानें देऊं लागला व १८२९ त त्याला यंत्रशाळेत अध्यापकाची जागा मिळाली. १८३० त डॉ. अँड्र्यू उर याच्या पश्चात् अंडरसोनियन विद्यालयांत अध्यापकाची जागा मिळाली. १८३७ त डॉ एडवर्ड टर्नर याच्या निधनानंतर त्याची लंडन येथील विश्वविद्यालयीं विद्यालयात बदली झाली. १८५५ त सर जॉन हर्शल याच्या नंतर टाकसाळीच्या व्यवस्थापकाच्या जागीं याची नेमणूक झाली व या जागेवर तो मरेपर्यंत राहिला. हा ता. १६ सप्टेंबर १८६९ रोजीं मरण पावला.

टाकसाळींत त्याला पुष्कळसें दप्तरी काम करावें लागे. यामुळें त्याच्या शास्त्रीय शोधांत व्यत्यय येत असे तरी १८६१ ते १८६९ पर्यंत त्यानें लावलेले शोधच फार महत्वाचे आहेत. तो १८३६ मध्यें राजसंस्थेचा सभासद झाला. व १८४७ मध्यें तशाच फ्रेंच संस्थेचाहि सभासद झाला. त्यानें लंडनरासायनिक संस्था व कॅव्हेंडिश संस्था या स्थापन करण्याकरिता फार खटपट केली व त्या दोनहि संस्थात्रा तो अनुक्रमें १८४१ व १८४८ त अध्यक्ष झाला. शेवटीं त्याला राजसंस्थेच्या अध्यक्षाची जागाहि देऊं केली होती पण त्यानें प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें ती नाकारली. त्याचे शोध स्वतःच्या कल्पनेवर व प्रयोगावर बसविलेले असत. व याच्या निर्णय करण्याच्या रीती देखील सोप्या असत. याचा "वायूंचें द्रवाभिसरण" केलेलें शोधण हा लेख तत्वज्ञानेतिहासाच्या १८२६ सालच्या अंकात प्रसिद्ध झाला. याच्या नावानें प्रसिद्ध असलेला शोध म्हणजे वाय्वभिसरण (डिफ्यूजन ऑफ गॅसेस) हा होय. १८२९ त प्रसिद्ध केलेल्या त्याच्या ग्रंथात वायूंची चळवळ कोणत्या नियमान्वयें चाललेली असते याचें स्पष्टीकरण केलें आहे. डोबरेनरच्या भोक पाडलेल्या घटाऐवजीं यानें एका काचेच्या नळीचें एक तोंड पारिसच्या प्लास्टरनें बंद करून त्या नळीचा उपयोग केला. याच नळीच्या सहाय्यानें "वाय्वभिसरणाचा वेग त्याच्या विशिष्ट गुरुत्वाच्या वर्गमूळाशीं व्यस्त प्रमाणात असतो" हा प्रख्यात शोध लावला. त्यानें ठरविलें कीं वायू तीन प्रकारांनीं पोकळींत जाऊं शकतात. (१) ग्रफाइटच्या दाबून तयार केलेल्या वडींतून. (२) प्लॅटिनम धातूच्या तुकड्यातील फटींतून (३) बारीक नळ्यातून काहीं विचित्र रीतीनें वायू जाऊं शकतात. परंतु या जाण्याचा वेग त्याच्या इतर कोणत्याहि धर्मांच्या प्रमाणांत असलेला आढळत नाहीं. उदा० उष्ण वायू नत्र वायूच्या दुप्पट वेगानें जातो परंतु त्याच्या विगुरुत्वाचें प्रमाण १:१४ असें आहे. रबर, कच्ची मातीची भांडीं व पलाडियमसारख्या धातूंचे तुकडे यामधून वायू जातात कीं नाहीं व जात असल्यास त्याचा वेग किती असतो यावरहि त्यानें प्रयोग करून पाहिले. त्याला आढळून आलें कीं कांहीं विवक्षित धातूंच्या सान्निध्यात विवक्षित वायू ठेवले असता त्या सान्निध्याच्या योगानेंच ते त्या धातूंतून पलीकडे जातात. या रीतीनें त्यानें प्राणवायूचा थोडासा भाग हवेंतून निराळा काढला होता.

वायूंच्या गतीनंतर त्याचें लक्ष द्रव्याच्या गतीकडे वेधलें. त्यानें पदार्थांचे दोन भाग केले एक मिठासारखा म्हणजे अनुस्फटिक (क्रिस्टलॉइड) व दुसरा सरसासारखा म्हणजे प्रतिस्फटिक (कोलॉइड). पैकीं पहिल्या वर्गाचें अभिसरण (डिफ्यूजन) फार होतें व दुसऱ्या वर्गाचें कमी होतें. तुरटीनें द्रावणाच्या अभिसरणानें दोन विभाग करता येतात. १ पालाशगंधकित २ स्फटगंधकित. कारण पहिल्या लवणाचें अभिसरण फार होतें व दुसऱ्याचें कमी होतें. द्रावण पाणी घालून पातळ केल्यास अभिसरणाच्या वेगाच्या प्रमाणात फरक पडत नाहीं. परंतु कांहीं मर्यादेच्या पलीकडे द्रावण पातळ केल्यास मात्र अभिसरणाचा वेग कमी होतो.

१८३३ त त्यानें दाखविलें कीं स्फुरिक प्राणिलाचे तीन आम्ल तयार होतात व यावरून बहुअनाम्लिक (पॉलिबेसिक) आम्लाचें अस्तित्व त्यानें सिद्ध केलें. या बहुअनाम्लिक आम्लातील प्रत्येक उज्जअणूबद्दल एक एक धातूचा अणु येऊ शकतो. १८३५ त लवणातील स्फटिकजलाचें त्यानें निरीक्षण केलें. यात असा चमत्कार आढळला कीं कित्येक लवणांत पाण्याऐवजीं मद्यसारहि स्फटिकात राहूं शकतो. अशा लवणास "मद्यसारितें" म्हणतात. १८६३ त त्यानें एक "प्रकृतीच्या घटनेसंबंधीं विचार" या नावाचा लेख लिहिला. त्यात तो म्हणतो कीं जगात असलेले निरनिराळे पदार्थ एकाच प्रकारच्या अणूंचीं निरनिराळीं रूपें आहेत. त्याच्या मरणानंतर जी शास्त्रीय प्रगति झाली त्यातील विचाराचा अंकुर ग्राहामच्या विचारात होता असें यावरून दिसतें व म्हणूनच हा लेख फार मजेदार वाटतो.

याचा रसायनशास्त्राचीं मूलतत्वें हा ग्रंथ १८३३ त प्रसिद्ध झाला. त्यानंतर त्याच्या अनेक आवृत्त्या निघाल्या व अनेक भाषांत भाषांतरें झालीं. "पदार्थविज्ञान व रसायनशास्त्रातील शोध" हा ग्रंथ १८७६ त प्रसिद्ध झाला.

**ग्रीन जॉन रिचर्ड** (१८३७–१८८३)—हा सुप्रसिद्ध इतिहासकार ऑक्सफोर्ड येथील एका व्यापाऱ्याचा मुलगा होता. मॅग्डेलन कॉलेजस्कूल व जीसस कॉलेज यामध्यें त्याचा अभ्यासक्रम झाला. पुढें तो धर्मोपदेशकाचा धंदा करूं लागला. गरीब लोकांची दुःस्थिति निवारण करण्याकडे त्याचें नेहमीं लक्ष असे. इतिहास हा त्याचा आवडता विषय होता; व त्यानें त्याचा फार काळजीपूर्वक अभ्यास करण्यास सुरवात केली होती. 'सॅटरडे रिव्ह्यू' या साप्ताहिकाला त्यानें पुष्कळ

लेख लिहून दिले होते प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्यानें धर्मोपदेशकाचा धंदा सोडून इतिहासाचें अध्ययन करण्यास सुरवात केली. १८६८ मध्यें त्यानें लॅबेथ येथें लायब्ररिअनची जागा पतकरली. १८७४ मध्यें त्यानें 'शॉर्ट हिस्ट्री ऑफ दि इंग्लिश पीपल' हें छोटेखानी पुस्तक लिहिलें. हें अतिशय लोकप्रिय झाल्यामुळें ग्रीननें यामध्यें बरीच माहिती घालून या पुस्तकाचे चार मोठे ग्रंथ केले. याशिवाय १८८२ मध्यें 'दि मेकिंग ऑफ इंग्लंड' व १८८३ मध्यें 'दि कॉन्क्वेस्ट ऑफ इंग्लंड' हे महत्त्वाचे ग्रंथ त्यानें प्रसिद्ध केले. इतिहासाविषयीं भरपूर माहिती त्याच्या ग्रंथांत सांपडते. तो मेंटोन येथें मरण पावला.

**ग्रीन थॉमस हिल** ( १८३६–१८८२ )—हा इंग्लिश तत्त्वज्ञ यॉर्कशायरमधील बर्कनरेक्टरी येथें जन्मला. रग्बी व बेलियल कॉलेज येथें त्याचें शिक्षण झाल्यानंतर तो 'नैतिक तत्त्वज्ञाना'चा प्रोफेसर झाला. सामाजिक प्रश्नाचा त्यानें आस्थापूर्वक अभ्यास केला असल्यामुळें त्याचें तत्कालीन समाजावर मोठें वजन बसलें होतें.'इंट्रोडक्शन टु ह्यूम्स ट्रीटाइज ऑन ह्यूमन नेचर' व 'प्रोलेगोमेना टु एथिक्स' हे त्याचे दोन प्रसिद्ध ग्रंथ आहेत. मनुष्य हा आधिभौतिक शक्तींचा परिपाक होय हें जें ह्यूमचें म्हणणें तें त्यानें सप्रमाण खोडून टाकून आत्मतत्त्व हें दृष्टीच्या बुडाशीं आहे असें मत प्रतिपादन केलें आहे.

**ग्रीन रॉबर्ट** (१५६०–१५९२)—हा कवि नॉरविच येथें जन्मला.त्याचें शिक्षण केंब्रिज व ऑक्सफोर्ड येथें झालें. स्पेन, इटली इत्यादि देशांतून प्रवास करून आल्यानंतर त्यानें लेखनाचा व्यवसाय पतकरला. आंग्लनाटयवाङ्मयाचा हा एक जनक होता. त्यानें पुष्कळ नाटकें, कविता व लेख लिहिले. 'स्कॉटिश हिस्टरी ऑफ जेम्स दि फोर्थ', 'ऑर्लेंडो फ्युरिओसो' हीं त्याचीं दोन नाटकें प्रसिद्ध आहेत.

**ग्रीनलंड**—डेन्मार्कच्या ताब्यांत असलेली ग्रीनलंड ही एकच वसाहत होय. १९११ सालीं या वसाहतीचें क्षेत्रफळ ४६७४० चौ. मै. होतें व लोकसंख्या १३४४९ होती. ग्रीनलंडमधील सर्वांत मोठी वसाहत सिद्प्रोव्हन ही असून त्या ठिकाणीं ७८९ लोक होते. स्कॅन्सेन ही सर्वांत लहान वसाहत आहे. ग्रीनलंडचा बराचसा भाग ध्रुवप्रदेशांत आहे. ग्रीनलंड आणि युरोप व अमेरिका हे परस्परांशीं सागरांतर्गत कड्यांनीं जोडले गेले आहेत. ग्रीनलंडच्या पूर्वेस उत्तर अटलांटिक समुद्र, नॉर्वेजियन व ग्रीनलंडचा समुद्र, पश्चिमेस डेव्हीस व बाफिनच्या सामुद्रधुन्या, उत्तरेस ध्रुवसमुद्र व दक्षिणेस केप फेअरवेल हें लहानसें बेट आहे. ग्रीनलंडची सर्वांत अधिक लांबी १६५० मैल व सर्वांत अधिक रुंदी ८०० मैल आहे. ग्रीनलंडच्या शोधासंबंधींची माहिती 'उत्तरध्रुवप्रदेश' लेखांत दिली आहे.

ग्रीनलंडमधील सस्तन प्राणी, हे अमेरिकेंतील सस्तन प्राण्यासारखे आहेत. कस्तुरीमृग, शशमृग, कुत्री, लांडगे, इत्यादि प्राणी युरोपमधील त्या त्या प्राण्यापेक्षा अमेरिकेंत सांपडणाऱ्या त्या त्या प्राण्याशीं अधिक सारखे दिसतात. याशिवाय, अस्वल, कोल्हे, ससे इत्यादि पशूहि या ठिकाणीं आढळतात. सीलमासा व देवमासा यांनी ग्रीनलंडच्या समुद्रांत समृद्धि आहे. ग्रीनलंडमध्यें ६८प्रकारचे पक्षी सांपडतात असें प्राणिशास्त्रकोविदांनीं म्हटलें आहे. वनस्पतिशास्त्रज्ञाच्या मतें ग्रीनलंडमध्यें ११२ प्रकारच्या वनस्पती सांपडतात. टसियुसक या अगदीं उत्तरेकडील वसाहतींत बाग तयार करण्याचे प्रयत्न झाले पण त्यांत पाहिजे तसें यश आलें नाहीं. उमनक या अगदीं उत्तरेकडील वसाहतींत जी मोठी बाग आहे, तींत मुळा, टर्निप–फळें, लेटिस कोबी इत्यादि अनेक प्रकारचीं फळें व भाज्या तयार होतात. जॅकोबेशॅव्हन येथील बागहि सुंदर आहे. ग्रीनलंडमध्यें बटाटे, काकड्या, स्ट्रॉबेरी, इत्यादिहि जिन्नस होतात. फुलझाडांचीहि संख्या येथ बरीच आहे. ग्रीनलंडमधील हवामान अगदीं अनिश्चित स्वरूपाचें असतें. क्षणांत कडक ऊन तर क्षणांत दाट धुकें, बर्फाचा वर्षाव आणि शीतसमीरण, असले देखावे तेथें नेहमीं पहाण्यास सापडतात. ग्रीनलंडच्या मध्यप्रांताची हवा साधारणतः युरोपांतील हवेप्रमाणें नेहमीं थंड असते. परंतु कांहीं ठिकाणची थंडी मात्र सैबेरिया येथील थंडीप्रमाणें कडक असते. तेथील जमीन बहुधा बर्फाच्छादित असते. मृगजळ व अरुणप्रकाश ग्रीनलंडमध्यें नेहमीं पहाण्यास सापडतो.

**व्यापार व राज्यव्यवस्था.**—ग्रीनलंडमधील सर्व व्यापारावर डच सरकारचें नियंत्रण असून कोपनहेगन येथील अधिकारी व ग्रीनलंडमध्यें असलेले सरकारी नोकर यांच्या तर्फे सर्व व्यापारासंबंधीं सर्व कारभार असतो. राज्यव्यवस्था व व्यापार नीट चालावा म्हणून पश्चिम किनाऱ्याचे दोन विभाग करण्यांत आलेले आहेत व त्यांस इन्स्पेक्टोरेट्स म्हणतात. कोपनहेगन येथील डायरेक्टर ऑफ दि बोर्डला जबाबदार असणारे दोन गव्हर्नरांच्या ताब्यांत वरील इन्स्पेक्टोरेट्स असतात. प्रत्येक इन्स्पेक्टोरेटचे अनेक जिल्हे असतात व प्रत्येक जिल्ह्यांत कांहीं अधिकारी असतात. पश्चिम किनाऱ्याच्या बाजूस व्यापाराचीं सुंदर ठिकाणें १० आहेत. देवमाशाची चरबी पैदा करणें व ती कोपन हेगनला पाठविणें हें काम मेपासून नोव्हेंबरपर्यंत मुख्यतः करण्यांत येतें. हिवाळ्यांत सील मासे मारण्याचा धंदा करण्यांत येतो. ग्रीनलंडच्या लोकांकडून कच्चा माल घेणें व त्यांना युरोपांतील माल पुरविणें हें काम सरकारी व्यापाऱ्यांमार्फत मुख्यतः करण्यांत येतें. दरवर्षी मालाच्या किंमती मुकर करण्यांत येतात आणि एस्किमो व डेन्मार्क येथील व्यापारी भाव सरकारी रीतीनें प्रसिद्ध होतो. इन्स्पेक्टरला व्यापारावर देखरेख ठेवण्याचा अधिकार असतो व त्यांना मॅजिस्ट्रेटचीहि सत्ता असते.१८५७सालीं प्रत्येक जिल्ह्यांत एक कौन्सिल स्थापण्यांत आलें त्यासालीं म्युनिसिपल कौन्सिलेंहि अस्तित्वांत आलीं.

प्रतिवर्षी दोन सभा भरतात व सर्व काम एस्किमो आपेतूनच चालतें. वरील कौन्सिलांतील अधिकाऱ्यांना दिवाणी व फौजदारी अधिकार असतात.

ग्रीनलंडचे रहिवाशी साधारणतः दगडाच्या व गवताच्या झोंपड्यांत राहतात. परंतु तेथील डॅनिश रहिवासी लाकडाच्या इमारती बांधून त्यांत राहतात. पश्चिम किनाऱ्याच्या उत्तरेकडील भागांत गॉडहाव्हन, जेकबशाव्हन, उपरनिव्हिक. क्रिश्चन शाब व जेकब शाव्ह हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें असून दक्षिणेकडील विभागांत ज्यूलिआनेहाब, फ्रेडरिकहाब, सुकरटोपेन व होलस्टेनबर्ग हीं व्यापारी शहरें आहेत. पूर्वकिनाऱ्यास अंगमासालिक हें ठिकाण व्यापाराबद्दल तर प्रसिद्ध आहे. देवमाशाचें व सील माशाचें तेल काढण्याचा धंदा तेथें नामांकित चालतो. सील माशाचें तेल सीलमासे काढले. पक्षी देवमाशाचा चरबा व अस्वलांची कातडीं वगैरे माल परदेशीं पाठविण्यांत येतो. नॉर्स लोकांच्या वसाहतींच्या काळांत वॉलरस नांवाच्या प्राण्याचे दांत व कातडे परदेशांत पाठविले जात असत. पण हल्लीं या मालास फारसें महत्त्व देण्यांत येत नाहीं.

इतिहास—इ. स. ९८२ मध्यें एरिक दि रेड यानें ग्रीनलंडचा शोध लावण्याकरितां सफर केली. ९८५ साली तो आइसलंड येथें परत आला व लगेच दुसऱ्या वर्षी त्यानें आपल्याबरोबर पुष्कळ लोक घेऊन ग्रीनलंडमध्यें वसाहत स्थापन केली. थोडक्याच अवधींत या मुलुखांत राहण्याकरितां पुष्कळ लोक येऊं लागले व त्यामुळें अवघ्या दोन वर्षांच्या अवधींत ऑस्टर बिग्ड व वेस्टर बिग्ड अशा दोन वसाहती अस्तित्वांत आल्या. यांपैकीं एक वसाहत हल्लींच्या ज्यूलियनेहाब जिल्ह्यामध्यें व दुसरी गॉडथाब जिल्ह्यांत होती. या ठिकाणीं लाकडांचीं घरें, मृतांचे सांगाडे व रूनिक लिपीमध्यें लिहिलेले शिलालेख सांपडले आहेत व त्यावरून या वसाहती कोठें स्थापन झाल्या होत्या त्याविषयीं अनुमान काढतां येतें. दहाव्या शतकांत नॉर्वेमधून नॉर्स लोक ग्रीनलंडमध्यें वसाहत करण्यास आले परंतु तत्पूर्वी या भागांत मूळचे रहिवाशी जे एस्किमो लोक त्यांची वस्ती होती असेंहि ग्रीनलंडमध्यें सांपडलेल्या अवशेषांवरून दिसून येतें. नॉर्स लोक धाडशी असल्याकारणानें त्यांनीं समुद्रावर पुष्कळ सफरी केल्या व उत्तर ध्रुवाच्या प्रदेशांत देखील ते गेले होते, असें १४ व्या शतकांतील रूनिक लिपीमध्यें लिहिलेल्या एका शिलालेखावरून आढळून येतें.

नॉर्वेचा राजा ओलफ ट्रिग्व्हेसन याच्या कारकीर्दींत लीफ एरिकसन यानें ख्रिस्ती धर्माची या ग्रीनलंडमध्यें प्राणप्रतिष्ठा केली. बाराव्या शतकांत ज्यूलियनेहाब जिल्ह्यांत गरोलरगावीं ग्रीनलंडमध्यें एक मोठें ख्रिस्ती चर्च स्थापन झालें होतें. याशिवाय नॉर्स लोकांनीं ग्रीनलंडच्या ज्या ज्या भागांत वसाहती स्थापन केल्या त्या प्रत्येक वसाहतीचें एक स्वतंत्र चर्च होतें. तेराव्या शतकांत ग्रीनलंडचा शासनपद्धति आइसलंडप्रमाणेंच गणसत्ताक असण्याचें आढळतें. १८१४ पर्यंत ग्रीनलंड हें नॉर्वेच्या ताब्यांत होतें पण त्यानंतर तें डेन्मार्कच्या राज्यांत मोडूं लागलें. ऑस्टर बिग्ड व वेस्टरबिग्ड या वसाहती १४ व्या शतकापर्यंत भरभराटींत होत्या. पण पुढें नॉर्वेच्या लोकांचें लक्ष या वसाहतींकडे कमी होत चालल्यामुळें या वसाहतींना उतरती कळा लागली व पुढें पुढें तर या वसाहतीकडे कोणी ढुंकूनहि पाहीनासें झालें. १७२१ मध्यें यूरोपीयन लोकांनीं पुन्हां इकडे लक्ष घातलें व या वर्षी नॉर्वेच्या हन्स एगेडे नांवाच्या एका पाद्र्यानें गॉडथाबजवळ एक वसाहत स्थापन केली. यावेळीं ग्रीनलंडमध्यें एस्किमो लोक रहात असत. त्या लोकांशीं एगेडे याला बरेच झगडावें लागत असे पण शेवटीं मोठ्या चिकाटीनें त्यानें तेथ ख्रिस्तधर्माचा फैलाव केला. १८ व्या शतकांत या वसाहतींमध्यें रहावयास येणाऱ्या लोकांपैकीं बरेच लोक गुन्हेगार होते. १७७४ सालीं या वसाहतीशीं व्यापार करण्यासाठीं एक खासगी कंपनी स्थापन झाली होती. पण पुढें नॉर्वे सरकारनें सर्व व्यापार हातीं घेतला. १७७५ मध्यें ज्यूलियनेहाब शहर वसविण्यांत आलें. १८०८–१८१४ या अवधींत युद्ध सुरू झाल्यानें ग्रीनलंडचें नॉर्वे व डेन्मार्कशीं असलेलें दळण वळण बंद करण्यांत आलें होतें पण तें लवकरच पूर्ववत् सुरू झालें. त्यानंतर ग्रीनलंड येथील वसाहत हळूहळू भरभराटीस पावत आहे.

[ संदर्भग्रंथ—जोसेफ फिस्कर—दि डिस्कव्हरीज ऑफ दि नॉर्समेन इन अमेरिका ( लंडन १९०३ ), हॅन्सएगेडे—डिस्क्रिप्शन ऑफ ग्रीनलंड ( लंडन १७४५ ), क्रान्झ—हिस्टरी ऑफ ग्रीनलंड ( २ भाग लंडन १८५० ), रिंक—डॅनिश ग्रीनलंड ( लंडन १८७७ ), एच रिंक—टेल्स ऑफ दि एस्किमो ( लंडन १८७५ ) ]

ग्रीनिच—ग्रीनिच हें इंग्लंड देशांतील लंडनच्या आग्नेयाकडील मुख्य शहर. याच्या उत्तरेस थेम्स नदी, पूर्वेस वुलविच, दक्षिणेस ल्युविशॅम व पश्चिमेस डेप्टफर्ड आहे. लोकसंख्या ( इ. स. १९२१ ) १०२००० ग्रीनिचचा प्रथम उल्लेख एथेलरेडच्या वेळीं येतो. या वेळीं डॅनिश आरमाराचें येथें एक ठाणें होतें.

ग्रीनिचच्या फार महत्त्वाच्या इमारती म्हणजे इस्पितळ व वेधशाळा ह्या होत. ग्रीनिच इस्पितळ हें नाव अद्यापि कायम असून १८७३ त येथें रॉयल नेव्हल कॉलेज ( आरमारी विद्यालय ) स्थापन झालें. या ठिकाणीं ग्रीनिच हाउस नांवाचा एक राजवाडा होता. ह्या ठिकाणीं आठवा हेनरी, मेरी व इलिझाबेथ यांचा जन्म झाला व ६ वा एडवर्ड येथेंच मरण पावला. चवथा एडवर्ड, आठवा हेनरी, पहिला जेम्स व पहिला चार्लस यांनीं राजवाड्यांत वेळोवेळीं सुधारणा केल्या. राजसत्ता स्थापन झाल्यावर दुसऱ्या चार्लसनें हा राजवाडा पाडून सध्याच्या इस्पितळाची पश्चिम बाजू

बांधली. अशाच अर्धवट स्थितींत ही इमारत विल्यम व मेरी यांनी खलाशासाठीं इस्पितळ म्हणून दिली १७०५ मध्यें हें इस्पितळ सुरू झालें. या इस्पितळाला मिळणाऱ्या देणग्या सारख्या वाढत गेल्या. पैकीं रॉयल नेव्हल कॉलेजची स्थापना झाल्यावर इन्फर्मरी सीमेन्स हॉस्पिटल सोसायटीस देण्यांत आली. इस्पितळाच्या दक्षिणेस ग्रीनिच पार्क आहे. यांत प्रसिद्ध राजवेधशाळा आहे. हिची स्थापना इ. स. १६७५ त नौकानयन व नाविक ज्योतिष या शास्त्रांची प्रगति होण्यास केली. देशांतील प्रमुख शहरास दररोज एक वाजतां विद्युतसंदेशानें बरोबर वेळ कळविण्यांत येते. ग्रीनिचच्या याम्योत्तर रेषेवरून बहुतेक ठिकाणीं याम्योत्तरवृत्तें ( रेखावृत्तें ) मोजण्याची पद्धत चालू आहे. पूर्वी या ठिकाणीं मंत्रिमंडळाची एक वार्षिक मेजवानी होत असे. १८९४ सालीं झालेली मेजवानी शेवटचीच होती. येथील धर्ममंदिरात वुल्फ ( क्विबेक १७५९) व गवई टॅलिस यांना पुरण्यांत आलें. ग्रीनिच बरोंतून पार्लमेंटात एक सभासद निवडून दिला जातो.

ग्रीस—हा देश यूरोपखंडाच्या आग्नेय टोंकास व बाल्कन द्वीपकल्पाच्या अगदीं दक्षिणभागात आहे. रोमन लोकांनीं प्राचीन देशाला दिलेलें हें नांव थोडेबहुत सोयम होतें. पूर्वीचे ग्रीक लोक आपल्या देशाला व आपल्या जातिबांधवांना हेलास, हेलेनेस या नावांनीं संबोधीत असत. त्यांचा देश म्हणजे थेसलीतील फिथओटिसमधील एक भाग ( जिल्हा ) होता.

प्राचीन ग्रीस देशाला हेलास म्हणत असत. हा देश जेव्हां पूर्णपणें भरभराटींत होता त्या वेळची त्याची मर्यादा म्हटली म्हणजे साधारणपणें पश्चिमेकडे अँब्रेशिआ आखाताच्या उत्तर किनाऱ्यापासून पूर्वेकडे पेनिअसच्या मुखापर्यंत गेलेल्या रेषेपर्यंतचा भाग होय. इ. सनापूर्वी ३८६ पर्यंत मॅसिडोनिआ आणि थ्रेस यांत मोडत नव्हते. येथील लोक नेहमीं व्यापारी, गलबतें व आरमार बाळगीत असत. इजिअन समुद्र किंवा द्वीपसमूह हें त्यांच्या राष्ट्राचें केंद्रस्थान होय. हा देश फार डोंगराळ असल्यामुळें स्वाभाविकपणें त्याचे निरनिराळे भाग पडले आहेत. प्राचीन काळीं हे भाग १७ होते व प्रत्येक भागांत स्वतंत्र राज्य होतें.

भौ गो लि क व र्ण न —थेसलीमधील काहीं ठिकाणें सोडून या देशाचा कोणताहि भाग समुद्रकिनाऱ्यापासून ५० मैलांहून दूर नाहीं. याचें क्षेत्रफळ पोर्तुगालपेक्षा कमी आहे, परंतु समुद्रकिनाऱ्याची रेषा स्पेन आणि पोर्तुगालच्या समुद्रकिनाऱ्याच्या रेषेपेक्षा मोठी आहे. जमिनींत बरींच आखातें शिरलेलीं आहेत व समुद्रांत ठिकठिकाणीं बेटें आहेत. येथील पर्वतांच्या रांगांची संख्या बरीच असून या रांगांची बरीच गुंतागुंत झालेली आहे, त्यामुळें तेथील लोकांना बरीच गुंतागुंत झालेली आहे; त्यामुळें तेथील लोकांना खुष्कीच्या मार्गानें दळणवळण ठेवणें कठिण पडतें. पण त्यांना समुद्रावर मार्ग सुलभ असल्यामुळें ते आपलें दळणवळण जलमार्गानें चालू ठेवितात. देशाच्या या नैसर्गिक स्थितीमुळें तेथील लोक फार स्वदेशाभिमानी व एक प्रकारच्या विशिष्ट वळणाचे बनले. तेथील लोकांत व्यापारी धाडस व त्याचप्रमाणें काव्य आणि कला यांची अभिरुचि होती.

प र्व त —पिंडस पर्वताची रांग, मौन्ट ऑर्थ्रीस ऑथ्रीसची रांग, कॅंबुनिअनपर्वत, हेलीकॉन पर्वत, कनावेंपर्वत, एटोलिआ आणि अकारनेनिआ, किओना, हा सर्वांत उंच पर्वत आहे, व्हर्डुसिलिआ, कोरा, पाराइओन्डीनो, एलाइजि, अटिकामधील पर्वत, मोरिआमधील पर्वत—झिरिआ, चेलमोस, ओलोनोस आणि ऱ्हाइकिआ, आरगोलिस द्वीपकल्पांत शाजिआस एक्लिआस हें शिखर सर्वांत उंच आहे, व टेगेटस पर्वताची रांग. हे पर्वत होत. जास्त तटबंदीची आणि महत्त्वाची ठिकाणें म्हणजे ॲक्रोकोरिन्थस, इथोम, लारिस्सा, ॲक्रोपोलिस, टिरिन्स, आणि कद्मिआ हीं होत.

न द्या —येथें फार थोड्या नद्या असून त्याहि अगदीं लहान आहेत. त्यांत कालॅमिआ, मव्होपाटॅमोहेलदा, अस्प्रोपोटॅमो, रुफिआ आणि व्हासिलिको या मुख्य होत.

स रो व रें —कर्ला, त्रिचोनिस, कोपेस, फेनिअस आणि स्टिम्फालस हीं सर्वांत मोठीं आहेत.

बं द रें —थेसलि, बोइओशिआ, मेसेनिआ, अरगास, एलिस आणि माराथन हीं मुख्य बंदरें आहेत.

स मु द्र कि ना रा —उपसागर आणि आखातें यांनीं सर्व समुद्रकिनारा भरून गेला आहे. एजिना आणि लिपान्टो हीं आखातें मुख्य आहेत. याशिवाय मोरिआच्या किनाऱ्यावरहि आखातें आहेत.

ज्वा ला मु खी प र्व त —येथें ज्वालामुखी पर्वत मुळींच नाहींत. तरी पण सांटोरिन बेटांतील ज्वालामुखी पर्वत जवळ असल्याकारणानें त्याच्या स्फोटाचे व भूकंपाचे धक्के येथें नेहमीं बसतात. बोतुशिआमधील लाफिस्टिअम नावाच्या पर्वताचें धक्के झालेले तोंड अजून अस्तित्वात आहे.

व न स्प ती —येथील वनस्पतींचें दक्षिण इटाली व आशिया मायनरमधील वनस्पतींशीं बरेंच साम्य आहे. समुद्रसपाटीपासून निरनिराळ्या उंचीच्या प्रदेशांत निरनिराळ्या प्रकारचीं झाडें व वनस्पती होतात. १५०० फूट उंचीपर्यंतच्या प्रदेशांत नारिंगें, खजूर, अंजीर, द्राक्षें, कापूस, तंबाखू वगैरे होतात.

प्रा णी —ॲरिस्टॉटलपर्यंतच्या काळांत सिंह असे. हल्लीं अस्वल, लांडगे, कोल्हे, रानडुकर, हरिण, ससे, वगैरे जातींचे पशू असून ३५८ जातींचे पक्षी, ६१ जातींचे सर्पटणारे प्राणी व २४६ जातींचे मासे आढळतात.

ह वा मा न —येथील हवा स्पेन आणि इटली येथील हवेपेक्षा जास्त उष्ण व थंड आहे. काहीं ठिकाणीं हवेमध्यें एकदम फेरफार होतात. वसंतकाल आर्द्र थोडा असतो. मार्च महिन्यांत उन्हाळा कडक असतो. पण उत्तरेकडून

येणाऱ्या थंड वाऱ्यामुळें ती जास्त वाढत नाहीं शरदृतूंतील हवा सर्व ऋतूंतील हवेपेक्षां जास्त रोगट असते हिवाळ्यातील हवा सौम्य असते पावसाचें मान निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळें असतें

इ स १९१२ पर्यंत ग्रीसचें क्षेत्रफळ २५०१४ चौ मै होतें पण बाल्कन युद्धात ईजियन समुद्राच्या काठचा मॅसेडानिया, एपिरस, क्रेट इत्यादि मुलुख मिळाल्यामुळें ग्रीसचें क्षेत्रफळ १,८०,९९,९०८ चौ किलोमीटर झालें १९२१ सालीं ग्रीसची लोकसंख्या ६०,२०,८०० इतकी होती

ग्रीक लोकांची सायप्रस, ॲनाटोलिया, बाल्कन संस्थानें इजिप्त इत्यादि ठिकाणी बरीच संख्या होती अमेरिकेंतहि दरवर्षी पुष्कळच ग्रीक लोक वस्तीसाठीं जात असत १९१४ सालीं ग्रीसमधून ४५८८९ लोक अमेरिकेंत गेले व यानंतर १९१५-२० च्या दरम्यान ग्रीसमधून अमेरिकेंत जाणाऱ्या लोकांची सरासरी २६५०० होती

लो क —ग्रीक अल्बेनिअन व व्हलाच या तीन वंशाचे लोक आढळतात आणि ग्रीक लोकांचा संख्या सर्वांत जास्त आहे व त्यात इतर वंशाचे लोक मिसळून एक झाले आहेत यूरोपांतील इतर राष्ट्राप्रमाणें येथील हलींचे लोकहि मिश्र वंशाचे आहेत याच्या मूळ उत्पत्तीविषयींचा प्रश्न बराच वादग्रस्त आहे हल्लींचे ग्रीक प्राचीन ग्रीक लोकांचे वंशज आहेत असा सर्वसाधारण समज आहे व ह्या समजुतीमुळें राष्ट्राची योग्यता जास्त वाढला आहे उत्तरग्रीस आणि मोरिआमधील मूळच्या लोकांची जागा ८ व्या शतकाच्या शेवटीं स्लाव्ह लोकांनी घेतली आणि हल्लींचे ग्रीक लोक बायझन्टाइन आणि स्लाव्ह यांच्या पासून बनलेल्या मिश्र वंशाचे आहेत असें काहीं शास्त्रज्ञांचें मत आहे या मतावर बरीच टीका होऊन हल्लीं साधारणपणे असें ठरलें आहे कीं ग्रीसचा मुख्य भाग आणि मोरिआ या दोन ठिकाणचे लोक स्लाव्ह वंशाचे नसून हेलेन वंशाचे आहेत

ग्रीक लोक उच्च प्रकारच्या संस्कृतीचे होते व त्यामुळें इतर लोकांचा ते आपल्यांत अंतर्भाव करून घेत असत ही गोष्ट जरी खरी आहे तरी इतकें पूर्णपणें साम्य होण्याला हेलेन लोकांचीच संख्या त्यांत जास्त असावी वाटोळें तोंड, लांब व थोडेंसें गरुडासारखें नाक, सारखी दंतपंक्ति, उत्साहपूर्ण आणि विशेष चमक मारणारे डोळे हा हल्लींच्या लोकांच्या चेहऱ्याचा साधारण नमुना आहे उत्तम शरीरप्रकृतीचे लोक आरकेडिआ ईजिअन बेटें आणि क्रीट या ठिकाणीं सांपडतात

अलबेनियन लोक स्वत ला स्किपेटर म्हणतात व ग्रीक लोक त्यांना आरव्हानिटे म्हणतात हे टोस्क वंशाचे आहेत १४ व्या शतकाच्या पूर्वार्धात त्यांनीं देशांतर केलें अलबेनियन लोकांचें वसाहत करण्याचें काम तुर्की लोकांनीं बंद पाडलें हे लोक हळूहळू हेलेन लोकांत मिसळले आतां सर्व अलबेनियन लोक ग्रीक भाषा बोलू शकतात परंतु घरी ते अल्बेनिअन भाषाच बोलतात हे लोक बहुतेक शेतकरी पेशाचे आहेत

व्हलाच लोक आपल्याला अरोमानि म्हणजे रोमन वंशाचे समजतात यांच्यापैकीं बहुतेक धनगराचा किंवा ओझी वाहण्याचा धंदा करणारे आहेत व ते नेहमीं एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं हिंडत असतात ह्या लोकांतील जे शहरांत रहाणारे आहेत त्यांच्यावर बहुतेक हेलेन संस्कृतीचा पूर्ण पगडा बसलेला आहे व त्यांना व्यापारकरण्याची जास्त चटक लागली आहे डोंगराळ प्रदेशांतील भटकणाऱ्या लोकांनीं आपला राष्ट्रीय बाणा व आपल्या चालीरीती कायम ठेवल्या आहेत आणि यांच्या पैकीं बरेच लोक जरी ग्रीक भाषा बोलू शकतात तरी त्यांनीं आपली लॅटिन भाषा अजून सोडली नाहीं ह्यांचे ग्रीक लोकांशीं फारच थोडे लग्नविवाहसंबंध होतात हे बहुतेक अशिक्षित आहेत व त्यामुळें ग्रीक लोक त्यांना तुच्छ मानतात तेराव्या शतकाच्या सुमारास आयानियन बेटांत वगैरे इटालियन लोकांचा भरणा झाला व त्यामुळें तेथील उच्च दर्जाच्या ग्रीक लोकांच्या भाषेंत व धर्मांत बराच फेरफार झाला इटालियन लोकांचे वरच्या वर्गांतील लोकांशीं लग्नसंबंधहि होऊं लागले खालच्या वर्गाच्या किंवा शेतकरी वर्गाच्या लोकांवर इटालियन संस्कृतीचा अगदीं परिणाम झाला नाहीं शेवटीं इटालियन लोकांचें ग्रीक लोकांशीं पूर्णपणें तादात्म्य झालें स्वातंत्र्यासाठीं लढाई होण्यापूर्वी येथें तुर्की लोकांची संख्या ७०००० होती परंतु लढाईनंतर हे लोक येथून नाहींसे झाले

रा ष्ट्री य गु ण ध र्म —ग्रीसचे ग्रीक लोक सारख्या गुणधर्मांचे आहेत व त्यांचे गुणधर्म शेजारच्या राष्ट्रांतील लोकांपेक्षां अगदीं भिन्न आहेत हे राष्ट्रीय ध्येय डोळ्यापुढें ठेवून जुटीनें काम करितात व स्वत ला इतर राष्ट्रापेक्षां उच्च प्रकारचे समजतात पर्वेकडील भागांत हे नेहमीं जास्त सुधारलेले असल्यामुळें मॅसिडोनियन, रोमन आणि तुर्की लोकांनीं जरी त्यांना जिंकलें तरी त्यांच्या सुधारणेचा त्यांच्यावर छाप पडत असे त्यांचें बुद्धिसामर्थ्यहि दांडगें असल्यामुळें पुढें होणाऱ्या राष्ट्रांच्या उलाढालींत त्यांना वरची जागा मिळाली यांच्या देशाभिमानाच्या कळकळीविषयीं विचार करतांना यांची अमेरियन लोकांशीं तुलना करण्यास हरकत नाहीं ह्या कळकळीचें कधीं कधीं उद्दामपणांत आणि असहिष्णुतेंत पर्यवसान होण्याचा संभव असतो व कधीं कधीं त्यांचा विवेकबुद्धि नाहींशी होऊन त्यांना अविचाराची व धाडसाचीं कामें करण्याची बुद्धि होते परंतु शेवटीं या कळकळीमुळें त्यांना आपलें राज्यकार्य साधेल हा पूर्ण खात्री असते मोठ्यापासून लहानापर्यंत सर्व लोकांत राजकीय विषयांची चर्चा होत प्रत्येकजण या बाबतींत आपलें स्वतंत्र मत देतो त्यामुळें घोंटाळा उडतो व कोणतीहि गोष्ट प्रत्यक्ष रीतीनें घडून न येतां उलट शब्दावडंबरच माजतें यांच्या पैकीं प्रत्येक

सैनिक सेनापति आहे व प्रत्येक खलाशी ॲडमिरल आहे असें म्हटलें आहे यामुळें कोणतेंहि कार्य एका तत्वाला अनुसरून चालत नाहीं. युरोपांतील राष्ट्रांत हे लोकसत्ताक राज्यपद्धतीचे सर्वांत जास्त चाहाते आहेत. सामाजिक दृष्ट्या यांच्यांत जातिभेद मुळींच नाहीं. हे फार तीक्ष्ण बुद्धीचे, चौकस, प्रसंगावधानी आणि शोधक आहेत. पण यांचें ज्ञान फार खोल गेलेलें नसतें. यांना अगमेहनतीचा विशेष कंटाळा आहे. अलीकडील शास्त्रीय ज्ञान संपादन करण्याकडे त्यांची प्रवृत्ति नाहीं. हे उत्साहपूर्ण, आनंदी, कर्तबगार, दयाळु, परकीयांशी मिळून मिसळून वागणारे, आतिथ्य करणारे, नौकरचाकरांवर दया करणारे, बेतानें व काटकसरीनें वागणारे, कुटुंबांत मिळून मिसळून वागणारे आहेत. त्यांच्यावर पारतंत्र्याचें जोखड नेहमीं राहत गेलें व त्यामुळें त्यांच्या अंगीं बरेच दुर्गुण आले. ते लवकर क्षुब्ध होऊन त्यांचा राग मनावर होण्याचा फार संभव असतो. हे धार्मिक आहेत पण त्यांच्यांत धर्मवेडेपणाचें खूळ नाहीं.

चा ली री ती.—शहरांत आणि खेड्यांत प्राचीन आचारविचाराचेंच वर्चस्व असून आढळून येतें. शहरांतून उच्च दर्जाच्या लोकांची फ्रेंच चालीरीतींचें अनुकरण करण्याकडे जास्त प्रवृत्ति दिसून येते. खेडेगांवांतील बायका समाजांत मोकळ्या रीतीनें वावरत नाहींत व त्यांचे हक्क पुरुषांपेक्षा कमी दर्जाचे आहेत. जन्म, धर्मदीक्षा, लग्न, आणि प्रेताचें दहन करणें या विषयींचे विधी फार गमतीचे आहेत व कांहीं विधी फार पुरातन कालापासून चालत आलेले आहेत. सामान्यतः स्वच्छतेकडे आणि आरोग्याकडे दुर्लक्ष केलें जातें. नृत्यकला फार लोकप्रिय होती. जुना, सुंदर राष्ट्रीय पोषाख वरच्या दर्जाच्या लोकांनीं टाकून दिला आहे. बायकांच्या पोषाखांत बरेंच वैचित्र्य आढळतें.

रा ज्य का र भा र.—येथील कारभार राजाच्या हातीं असतो. गादी वंशपरंपरेनें पुरुषांच्याचकडे चालत येते, परंतु वंशांत जर पुरुष नसला तर गादीचा वारसा स्त्रियांकडे जातो. आगष्ट १८६३ च्या लंडनच्या कॉन्फरन्समध्यें राजाला ‘ हेलेन लोकांचा राजा ’ ही पदवी दिली गेली आहे. राजा अठराव्या वर्षी कायदेशीरपणें वयांत येतो. गादीवर बसतांना त्याला धर्मोपदेशकापुढें शपथ घ्यावी लागते. राजकीय घटना २९ आक्टोबर १८६४ पासून चालत आलेली आहे. राजा आणि लोकनियुक्त ( एक ) मंडळ यांच्यामध्यें कायदे करण्याचा अधिकार वाटून घेतलेला असतो. १९०६ सालीं या मंडळाचे १७७ डेप्युटी होते. १९११ सालीं कौन्सिल ऑफ स्टेटची पुनर्घटना झाली. सर्व कार्यकारी सत्ता राजाच्या हातीं असते, पण या सत्तेची जबाबदारी त्याच्यावर नसून त्यानें निवडलेल्या मंत्र्यांवर असते. या शिवाय सरकारी नेमणुका करणें, कायदे करणें, नाणें पाडणें वगैरे अधिकारहि राजाकडेच असत. परराष्ट्रीय काम करणारे ७ प्रधान असतात. चेंबरमधील डेप्युटी संख्या ( १९१९ ) ३१२ आहेत.

स्था नि क रा ज्य का र भा र.—यासाठीं देशाचे २६ भाग केलेले असून प्रत्येक भाग प्रिफेक्टच्या ताब्यांत आहे. २६ भागांचे ६९ पोटभाग आणि या पोटभागांचे ४४५ कम्यून केले आहेत. लोकनियुक्त डिपार्टमेंटल कौन्सिलची प्रिफेक्टला मदत असते. मेयरच्या अध्यक्षतेखालीं आणखी कम्युनल कौन्सिल असे.

शि क्ष ण.—येथील लोक बुद्धिवान् आहेत व शिक्षणाच्या बाबतींत त्यांचें पाऊल बरेंच पुढें गेलेलें आहे. खेड्यांतील लोकांनाहि शिक्षणाची गोडी असल्यामुळें तेथें शाळा स्थापन केलेल्या आहेत. शेतकरी वगैरे लोकांचीं मुलें उच्च शिक्षणासाठीं अथेन्समध्यें येत, व तेथें मोलमजुरी करून राहिलेल्या वेळांत विश्वविद्यालयांत शिक्षण मिळविण्यासाठीं जात. ओथो हा राजा गादीवर आल्यानंतर लवकरच प्राथमिक शिक्षण सक्तीचें केलें गेलें. १९१०–११ सालीं ३५७१ प्राथमिक शाळा ४१ हायस्कुलें, २८४ दुय्यम शाळा ६ व्यापारी शाळा व २ शेतकी शाळा होत्या. अथेन्समध्यें २ विश्वविद्यालयें होतीं. शेतकीच्या शास्त्रीय शिक्षणाकडे बरेंच दुर्लक्ष केलें जाई. धर्मशास्त्राच्या शिक्षणाच्या दोन शाळा होत्या. व्यापारी आणि औद्योगिक शिक्षणाची एक शाळा असून तिच्यापासून लोकांना बराच फायदा होत असे. अथेन्समध्यें स्त्रीशिक्षणासाठीं एक मोठी शाळा होती व तींत १५०० मुली होत्या. या शिवाय इतर शाळा व विश्वविद्यालयें होतीं.

ध र्म.—धर्मासंबंधीं सर्व कारभार मिनिस्ट्री ऑफ एज्युकेशनच्या ताब्यांत आहे. चर्चचा कारभार होली सिनॉडच्याकडे आहे. धर्मविरुद्ध वागणाऱ्याला दंड करण्यासाठीं चर्च सरकारी मदत मागूं शकतें.

शे ती.—हा देश मुख्यत्वेंकरून शेतीचा आहे. याची भरभराट शेतीच्या उत्पन्नावर अवलंबून आहे आणि येथील अर्धेअधिक लोक शेती आणि तत्संबंधीं इतर धंदे यांवर आपली उपजीविका करतात. मैदानांतील आणि खोऱ्यांतील जमीन अतिशय सुपीक आहे आणि जेथें पाण्याचा पुरवठा पुरेसा असतो तेथें पिकेंहि उत्तम निघतात. आतापर्यंत जे राजे होऊन गेले त्यांनीं इकडे दुर्लक्ष केल्यामुळें शेतकीची जुनी पद्धतच चालू आहे. सुधारलेल्या आउताचा आतां हळू हळू उपयोग करण्यास सुरुवात झाली आहे. जमीन फार असली म्हणजे ती भागानें लावून देतात. थेसली प्रांतांतील जमीन विशेष सुपीक आहे. १९१८ सालीं ग्रीसमधील पेरणीखालीं आलेल्या जमिनीचें प्रमाण १४१५६३३ हेक्टेर होतें. १९१८ सालीं या जमीनीचें उत्पन्न १५९१५२६०२४ डूकमे झालें. गहूं, मका, मद्य, ऑलिव्ह तेल, ओट इत्यादि मुख्य धान्य ग्रीसमध्यें पिकतात. या सालीं शेतकीसुधारणा करण्यासाठीं स्थापना झालेल्या संस्थांची संख्या ७३० होती व त्या संस्थांच्या सभासदांची संख्या एकंदर २७०५१ होती. १९१४ सालच्या गणनेप्रमाणें ग्रीसमध्यें ( बाल्कन युद्धानंतरचा सर्व

दित मुलूख धरून) १६०००००हेक्टेर जंगल होतें या जंगलाचें उत्पन्न ३८०००००० ड्रक्मे होतें. १९१८ साली ग्रीसमध्यें १५४४१२० ड्रक्मे किमतीचे मासे पकडण्यात आले १९१९ साली मासे पकडणाऱ्या जहाजांची संख्या १९४१ होती व मासे पकडणाऱ्या लोकांची संख्या ७६७९ होती.

*खा णी.*—चांदी, शिसें, जस्त, कॉपरमॅगॅनीज, मॅगनेशिया, लोखंड, गंधक आणि कोळसा हीं मुख्य खनिजद्रव्यें येथें सापडतात. कुरुंद, मीठ, चक्कीचा दगड आणि जिप्सम हीं बऱ्याच प्रमाणात सापडतात व हीं खोदून काढण्याचें काम सरकार स्वतः करतें.

व्या पा र आ णि उ द्यो ग धं दे.—ग्रीक लोकांची व्यापाराकडे नैसर्गिक प्रवृत्ति असल्यामुळें व नौकायनाची त्यांना आवड असल्यामुळें लिव्हाटमधील बराच व्यापार त्यांच्या हातीं आला होता. तुर्कस्तानचा धान्याचा सर्व व्यापार ग्रीसच्याच ताब्यात आहे १९२० साली ग्रीसमध्यें २९३१०३८३२१ इतक्या ड्रक्मेची आयात झाली व ६६८११२६४७ इतक्या ड्रक्मेची निर्गत झाली. १९२० मध्यें ग्रीसचें नौकाबल २९८९०३ टन होतें ग्रीसजवळ या सालीं२२८ आगबोटी व १०४८ जहाजें होतीं.

का र खा ने — इसवी सन १९२० साली ग्रीसमध्यें एकंदरींत २२११ कारखाने असून त्यात काम करणाऱ्यांची संख्या ३६३१२४ होती कारखान्यात एकंदर ८७१४९४५०८ ड्रक्मेचा माल तयार झाला या कारखान्यांपैकीं ५७० कारखाने वाफेच्या जोरावर व ३८३ विजेच्या साहाय्यानें चालत होते. या कारखान्यात तेल काढणें, कापड विणणें, चामडीं तयार करणें, इत्यादि धंदे चालू असतात. ग्रीसमध्यें लोखंडाची पैदास सर्व धातूंपेक्षा अधिक आहे. १९१८ मध्यें या खाणींतून ६८००० मेट्रिक टन लोखंड निघालें जस्त१८०००टन निघालें व लिमाईट धातू ३१४००० टन निघाली. १९१८त या खाणींतून बाहेर काढलेल्या धातूंची किंमत२०९२०००० फ्रँक्स झाली येथें लिमाईट धातू काढणारी सोसायेट फायनॅन्सियरेड ग्रीस, इतर धातू काढणारी कँपेग्नी मॅकैस, ड माइन्स, ड लारियम, मॅग्नेसाइट काढणारी एल डेपियन, एन रफायल इत्यादि खोदकंपन्या प्रसिद्ध आहेत.

ग्रीसमध्यें मजूराचा प्रश्न १९१८ पर्यंत फारसा विकट नव्हता. पण १९१८ साली मात्र मजुरामध्यें मजुरीच्या प्रश्नानें ग्रीसमध्यें थोडी फार खळबळ उडाली १९१९ साली जवळजवळ ३०० संप झाले त्यात २००सरकारनें सलोख्यानें मिटवले. १९१८ साली मजुरांच्या संस्थांची बेरीज ९९८ होती. महायुद्धानंतर सार्वराष्ट्रिक मजूरपरिषद वाशिंग्टन येथें भरली होती. त्यात ठरलेल्या अटींना ग्रीसनें पूर्ण मान्यता दिली त्याप्रमाणें मजुराचे तास आठ करण्यात आले. १९१४ मध्यें मजुरांच्या हितासाठीं पुष्कळ कायदे करण्यांत आले होते.

द ळ ण व ळ ण —१९१९ सालीं ग्रीक रेल्वेची लांबी २३०७.५ किलोमीटर्स होती. पुढें सॅलोनिका ते कॉन्स्टांटिनोपलपर्यंत रेल्वे झाल्यानंतर ७०० किलोमीटरची भर पडली. मार्च १९१९ च्या तहानें ३४० किलोमीटरची वाढ झाली. याशिवाय कवला ते ड्रम इत्यादि ठिकाणीं रेल्वे बांधण्याचें काम चालूच आहे ग्रीसमध्यें वैमानिक दळणवळण अद्यापि सुरू झालेलें नाहीं.

ल ष्क र.—ग्रीसची पूर्वीची लष्करी स्थिति समाधानकारक नव्हती १८९७ सालच्या लढाईत सैन्यातील बरेच दोष उघडकीस आले व त्यामुळें लष्कराची पुनर्घटना करण्याची योजना तयार करण्यात आली या नव्या योजनेप्रमाणें शांततेच्या वेळीं १८८७ वरिष्ठ अधिकारी, बिनकमिशनाचे अधिकारी इतर लोक आणि ४०९९ घोडे व खेचरें ठेवण्याचें ठरविलें आणि लढाईच्या वेळीं कमीतकमी १२०००० सैन्य लढाईवर पाठवावयाचें आणि ६०००० स्वदेशी सैन्य ठेवावयाचें असें ठरलें या योजनेस मूर्तस्वरूप देण्यास अतिशय खर्च लागत असल्यामुळें ही योजना अंशतः अमलात आणावयाची नाहीं असें १९०६ सालात ठरविलें येथें लष्करी शिक्षण सक्तीचें आहे आणि या शिक्षणाची जबाबदारी वयाच्या २१ व्या वर्षापासून सुरू होते.

सां प त्ति क स्थि ति.—१८९८-१९१३ या काळाच्या दरम्यान ग्रीसनें पुष्कळदा कर्ज काढलें होतें. शिवाय युद्धामुळें तर ग्रीसची आर्थिक स्थिति अधिकच खालावत चालली. पुढें महायुद्धाला सुरवात झाल्यावर तर, ग्रीसला पुष्कळच कर्ज काढावें लागलें. १९२१ सालीं ग्रीसचें एकंदर कर्ज ३००००००००० ड्रॅक्मे इतकें होते १९२१ सालीं ग्रीसचें उत्पन्न ५९७०११००० इतकें ड्रॅक्मे असून खर्च २००९२०४००० इतका होता.

प्रा ची न इ ति हा स —ग्रीस देशाचा इतिहास म्हणजे कोणत्याहि एक जात अशा एकाच राष्ट्राचा इतिहास नसून तो भिन्न भिन्न व एकमेकापासून अगदीं स्वतंत्र असणाऱ्या अशा राजकारणविशिष्ट शहरांचा इतिहास आहे. म्हणून ग्रीक इतिहासात घडलेल्या वृत्तांची जन्त्री देत न बसता त्या वृत्तांची कारणमीमांसा करणें, या इतिहासापासून कोणते सिद्धांत काढतां येतील व काय बोध घेता येईल हें पाहणें व त्याचप्रमाणें एकंदर जगाच्या सुधारणेंत ग्रीस देशाचें महत्व काय आहे याचा विचार करणें हेंच जास्त सयुक्तिक व फायदेशीर होईल

अशा पद्धतीनें ग्रीसचा त्या देशावर रोमन लोकांचा अम्मल सुरू होईपर्यंतचा (खि पू. १४६) इतिहास चवथ्या विभागात (बुद्धोत्तरजग, प्र ४ थें-ग्रीक संस्कृतीची व्यापकता) दिला आहे. त्याचा सारांश पुढीलप्रमाणें आहे

(१) पुराणवस्तुसंशोधनशास्त्रीय पुराव्यावरून ग्रीसच्या इतिहासाचा आरंभ खि. पू ३ ऱ्या किंवा ४ थ्या सहस्रकापासून धरला पाहिजे.

( २ ) मायसीनीयुग व होमरयुग यांचा संबंध जोडतां येतो.पण पुराणवस्तुयुग आणि खिस्त पू.८ व्या शतकापासूनचें ऐतिहासिक युग यांच्यामध्यें मोठें खिंडार आहे

(३) खि पू. १२ व्या शतकाच्या सुमाराच्या माहितीला आधार होमरचीं काव्य हा आहे

(४) खि. पू. ८ ते ६ या शतकापर्यंतच्या काळात ग्रीकांचा व्यापार व वसाहत यांची वाढ होत होती.

( ५ ) खि. पू. ७ व्या ते ४ थ्या शतकात बेजबाबदार (टायरंट ) राजे होऊन गेले पण त्यांच्या ग्रीक संस्थानांना अनेक फायदे झाले.

(६) खि. पू ६ व्या व ५ व्या शतकात ग्रीकांचीं पर्शियन लोकांबरोबर युद्धें झालीं त्यात अखेर ग्रीकांना विजय मिळाला.

(७) खि. पू. ४८० ते ३३८ पर्यंतच्या काळाला महायुग ( ग्रेट एज ) म्हणतात, त्यात प्रथम अथेन्सचें, नंतर स्पार्टाचें व शेवटीं मॅसिडोनियाचे वर्चस्व होऊन एकंदर ग्रीस देशाचीं सर्व अंगानीं फार भरभराट झाली व ग्रीकसंस्कृति अनेक देशात पसरली.

(८) ग्रीक लोकांचे लष्करी गुण व भौतिक शास्त्राचें ज्ञान यांचा फायदा इराणी लोकानीं करून घेतला.

(९) हिंदुस्थानातील ज्योतिषशास्त्र, नाट्य, कलाकौशल्य वगैरेंवर झालेल्या ग्रीकसंस्कृतीच्या परिणामाबद्दलची माहिती पहिल्या विभागात (हिंदुस्थान आणि जग, प्र. ११ वें) दिली आहे.

(१०) सीरियामध्यें भाषा व चालीरीती यावर ग्रीकसंस्कृतीचा बराच परिणाम झाला.

(११) ईजिप्तमध्यें देश्य संस्कृतीनें ग्रीक संस्कृतीच्या प्रसारास फार अडथळा केला. फक्त अलेक्झांड्रिया हें शहर ग्रीक संस्कृतीचें केंद्र बनलें होतें.

अलेक्झांडरच्या स्वाऱ्यांमुळे ग्रीक संस्कृतीचा दूरवर प्रसार झाला पण नंतर लवकरच सर्व ग्रीस रोमन सत्तेखालीं जाऊन ग्रीसच्या इतिहासास निराळें वळण लागलें.

रोमनकारकीर्दीचा काळ(खि. पू.१४६ ते सन १८००);—ग्रीस रोमचें अंकित बनल्यावर रोमन सीनेटनें कमिशन नेमून ग्रीसची पुनर्घटना करण्याचा त्या कमिशनला हुकूम केला. कॉरिन्थ शहरानें सर्वांत जास्त विरोध केला असल्यामुळें तें शहर उध्वस्त करण्यात येऊन तेथील रहिवाशी गुलाम म्हणून विकण्यात आले एका शहराचें दुसऱ्या शहरांशीं असलेलें व्यापारी दळणवळण नियंत्रित करण्यात आलें व सर्व साधारण लोकांच्या हातीं असलेली राजकीय सत्ता काढून घेण्यात येऊन ती इस्टेटदार वर्गाच्या हातीं देण्यात आली अथेन्सवगैरेसारख्या मित्रांच्या ग्रीसांतील संस्थानें होतीं त्यांचे राजकीय हक्क कायम ठेवण्यांत आले. मॅसिडोनियाच्या गव्हर्नराला देखरेखीचा अधिकार देण्यांत आला

यापुढें विरोध करणें व्यर्थ आहे असें पाहून ग्रीक लोकांनी या व्यवस्थेस मुकाट्यानें मान्यता दिली. पारतंत्र्याच्या यातना किती भंयकर असतात याचा आता ग्रीक लोकांना चांगला अनुभव येऊं लागला. रोमन व्यापारी व भांडवलवाले यांच्या अपहारबुद्धीमुळें व अधाशीपणामुळें कित्येकांना आपल्या अत्यंत आवडत्या अशा कलाकौशल्याच्या वस्तू विकाव्या लागल्या. सरकारी अधिकाऱ्यांच्या जबरदस्तीमुळें त्यांना नजराणे देतां देतां व त्यांचा आदरसत्कार करता करता ग्रीक लोकांच्या नाकीं नव येऊं लागले. इटाली व लीव्हँट यांच्या दरम्यान प्रत्यक्ष दळणवळण सुरू करण्यात आल्यामुळें ग्रीक व्यापाराला जबरदस्त धक्का बसला. पशुपालनाचा धंदा मात्र ग्रीकलोकांच्याच हातीं ठेवण्यात आला होता. परंतु त्यापासून श्रीमंतांचाच तेवढा फायदा होऊं लागल्यामुळें भांडवलवाला वर्ग व गरीब वर्ग यांच्यातील विरोध विकोपाला जाऊन गरीबांची फारच दैना होऊं लागली.

पांपे व ज्यूलिअस सीझर यांच्यात झालेल्या युद्धात ज्यूलिअस सीझरला जय मिळून ग्रीसचें आधिपत्य ज्यूलिअस सीझरकडे गेलें सीझरच्या खुनानंतर ग्रीक लोकांनीं ब्रूटसची बाजू घेतली. खि. पू. २९ या वर्षी पेलापोनीज सेक्सटस् पाँपेअसच्या ताब्यात देण्यात आलें. याच्या पुढील काळात ग्रीसवर मार्क ॲन्टनीचा अंमल होता लढायांचा खर्च भागावा म्हणून यानें ग्रीसवर जबरदस्त कर लादण्यास सुरवात केली सैन्याच्या खर्चाची तरतूद करता करता ग्रीसचें साधनबळ संपूर्ण खलास झालें व देशाचें दुष्काळापासून संरक्षण करण्याला फारच त्रास पडला.

आगस्टस बादशहाच्या अमदानींत थेसली संस्थान मॅसिडोनियात सामील करण्यात आलें व बाकीच्या सर्व ग्रीस देशाचा एक प्रांत बनविण्यात येऊन त्याला अकेइआ हें नाव देण्यात आलें रोमन साम्राज्याखाली ग्रीसची आर्थिक स्थिति फारशी सुधारली नाहीं रोमन लोकांच्या चैनी भागविण्यां याव्या म्हणून पुष्कळ नवीन धंदे काढण्यात आले पण त्या धंद्यांपासून ग्रीकांचा फायदा न होता इटालियनांचे खिसे गरम होऊं लागले. भांडवलवाले व जमीनदारवर्ग यांच्या हातात सर्व संपत्ति जाऊन मध्यम वर्गाचे फारच हाल होऊ लागले व बऱ्याचशा लोकांना उदरनिर्वाह चालविण्याची देखील पंचाईत पडूं लागली.

रोमन राज्यव्यवस्था.—अकेइआ प्रांताची राज्यव्यवस्था सीनेटकडून काढून घेऊन ती बादशाही प्रतिनिधींकडे सोंपविण्यात यावी अशी ग्रीक लोकांनीं टायबेरिअस बादशहाला इ. स. १५ मध्यें विनंति केली ही नवीन व्यवस्था मान्य करण्यात आली पण ती फार दिवस टिकली नाहीं. इ. स. ४४ मध्यें क्लॉडिअस बादशहानें फिरून अकेइआ प्रांत सीनेटच्या स्वाधीन केला. इ. स. ६६–६७ या वर्षी नीरो बादशहानें ग्रीसला भेट दिली. ग्रीक लोकांनीं केलेल्या

दिखाऊ आदरसत्कारानें खुष होऊन त्यानें खंडणी भरण्याच्या करारापासून ग्रीसला मुक्त केलें व आपल्या भेटीच्या स्मरणार्थ ग्रीसला स्वराज्याची देणगी बहाल केली. परंतु या देणगीपासून ग्रीक लोकाचा काहीं फायदा होऊं शकला नाहीं. कारण व्हेस्पेशियन बादशहानें ही देणगी रद्द केली व अकेइआचा फिरून प्रांत बनवून त्यावर जास्त करांचे ओझें लादलें. दुसऱ्या शतकांतील बादशहांनी मात्र ग्रीसची सुबत्ता वाढविण्याचे मनापासून प्रयत्न केले. हेड्रिअन बादशहानें राहिलेली खंडणी माफ करून निरनिराळ्या जाचक करापासून ग्रीसची मुक्तता केली ग्रीक लोकांत राष्ट्रीय भावनाचें पोषण व्हावें म्हणून त्यानें अथेन्स येथें 'ग्रीक संस्कृतीचें वर्धन करणारी एक कमिटी स्थापन केली व रोम येथेंहि त्या संस्कृतीचा सन्मान व्हावा म्हणून त्यानें काहीं संस्था स्थापन केल्या.

तिसऱ्या शतकांत ग्रीसला परकीय स्वाऱ्यापासून फार त्रास झाला. इ स १७५ मध्यें कॉस्टोबोसी नामक टोळी मध्य ग्रीसपर्यंत चाल करून गेली होती परंतु स्थानिक गुजबी फौजेनें त्वरा करून टोळीवाल्यांना हाकून लावलें. इ. स. २५३ त या टोळीनें फिरून ग्रीसवर चाल करून जाण्याचा प्रयत्न केला पण थेसलोनिका शहरानें जोराचा विरोध केल्यामुळें या वेळींहि टोळीवाल्यांना यश आलें नाहीं इ.स.२६७-२६८ त गॉथिक टोळ्यांनी अकेइआ प्रांतावर स्वारी करून अथेन्स व इतर काहीं शहरें काबीज केलीं पण रोमन आरमाराची ऐन वेळीं कुमक आल्यामुळें स्वारीवाल्यांना पिटाळून लावण्यांत आलें.

पहिल्या कॉन्स्टंटाइन बादशहाच्या अमदानींत ग्रीसचे हेलास, पेलापोनेसास, नीकापोलीस व इतर बेटें असे लहान लहान तुकडे पाडण्यांत आले. थेसली शहर मॅसिडोनियांत सामील करण्यांत आलें. ज्या पद्धतीच्या योगानें मध्यवर्ती सरकारला बिनचूकपणें उत्पन्न मिळत जाईल अशी कर उकळण्याची पद्धत तयार करण्यांत आली. सर्व घटना रोम येथील म्युनिसिपालटीच्या धर्तीवर तयार करण्यांत आल्या.कॉन्स्टँटिनोपल हें राजधानीचें ठिकाण करण्यांत आलें ईजिप्तपासून युक्झाइन व ईजिअन समुद्रापर्यंत पूर्वेकडे व्यापारी रस्ते खुले करण्यांत आल्यामुळें मंदावलेल्या व्यापाराला फिरून चलन मिळालें ज्याच्या मिळकती अल्प होत्या अशांची स्थिति फार हलाखीची झालेली होती. परंतु या वर्गाला निकृष्टावस्थेंत ठेवण्यांत सरकारच्या हिताला बाध होता. सरकारचे वसूलविषयक हितसंबंध या वर्गाशीं निगडित झालेले होते व यामुळें या वर्गाची स्थिति सुधारणें सरकारला भाग पडलें. या कारणास्तव या वर्गाची स्थिति उत्तरोत्तर सुधारत जाऊन देशाची सुबत्ता व भरभराट यांचें साधारण मान बादल्या प्रमाणांत राहिलें.

परंतु ही भरभराट फार वेळ टिकूं शकली नाहीं. इ. स. ३७५ त ग्रीस देशाला एकामागून एक असे भूकंपाचे धक्के बसूं लागल्यामुळें व इ. स. ३९५-९६ त व्हीजीगॉथ लोकांनीं स्वारी करून नेववेल तितकी संपत्ति लुटून नेल्यामुळें कित्येक शतकांपर्यंत ग्रीसला वर डोकें काढतां आलें नाहीं.

चवथ्या शतकांतील बादशहांनीं ग्रीक लोकांची खोट्या धर्मावरील (पेगन रिलिजन)श्रद्धा उडून जावी म्हणून पुष्कळ प्रयत्न केले परंतु त्यांना फारसें यश आलें नाहीं. इ स. ६०० पर्यंत हा असद्धर्माचार (पेगॅनिझम) ग्रीसमध्यें चालू होता, पण खिस्ती धर्माच्या पुष्कळ दिवसाच्या सहवासानें त्याचें स्वरूप बरेंच पालटलें होतें. पाद्री लोकांच्या मनमिळाऊपणानें नेहमीं लोकांचा पक्ष उचलून धरणाच्या खुबीदार युक्तीमुळें अगोदरच ग्रीक लोकांचें मन खिस्तिधर्मोन्मुख होऊं लागलें होतें हळू हळू हे लोक खिस्ती धर्माच्या जाळ्यांत अडकूं लागले व शेवटीं सबंध ग्रीस देशानें या धर्माचा स्वीकार केला. ५ व्या व ६व्या शतकांतील बादशहांना ग्रीकसंस्कृतीविषयीं मुळींच आदर नसे. कॉन्स्टन्स्टाइन व त्याच्यानंतर गादीवर आलेल्या बादशहांनीं सबंध साम्राज्यांत रोमन सुधारणा फैलावण्याचें धोरण स्वीकारलें होतें. या धोरणाप्रमाणें पहिल्या जस्टीनियन बादशहानें ग्रीसमध्यें रोमन कायदा लागू करून स्वराज्योपभोगी शहरांचे हक्क काढून घेतले व अथेन्स येथील तत्वज्ञानाचीं सर्व पीठें बंद केलीं. याचा परिणाम असा झाला कीं लोकांना आपल्या प्राचीन संस्कृतीची विस्मृति पडली व हेलिनीज हें नाव टाकून देऊन त्यांनीं रोमन्स नाव स्वीकारलें. ग्रीकसंस्कृति अजीबात नष्टच झाली असती, परंतु साम्राज्यांतील प्रांताचे पूर्व व पश्चिम असे वेगवेगळे भाग करण्यांत आल्यामुळें ग्रीक आपेला व ज्यालीरीतींना पुनरपि त्यांचें अग्रस्थान प्राप्त होऊन, ग्रीक संस्कृतीवरील हा प्रसंग एकदाचा टळला.

सहाव्या शतकाच्या शेवटीं स्लाव्होनिक टोळ्यांनीं ग्रीसवर स्वारी केली. स्लाव्होनीस व वेंदस् या जातींनीं ग्रीसमध्यें प्रवेश करून पुढें त्या ठिकाणीं जें कायमचें ठाणें दिलें त्याचें ही स्वारी म्हणजे पूर्वचिन्हच होय. स्लाव्होनिक लोकांचा अंश वायव्य ग्रीस व पेलॉपोनेशस येथें जितका दिसतो तितका ग्रीसमध्यें दिसत नाहीं. इ. स. ७८३ मध्यें महाराणी आयरीनी हिनें या लोकांविरुद्ध सैन्य पाठवून, त्यांना मध्यवर्ती सरकारला खंडणी भरण्यास भाग पाडलें. इ. स. ८१० मध्यें स्लाव्ह लोकांनीं पॅट्री काबीज करण्याचा प्रयत्न केला. पण तो सिद्धीस गेला नाहीं. यापुढें ते बादशहाचें एकनिष्ठ प्रजाजन होऊन राहिले

बायझंटाइन काळ:—७ व्या शतकांत ग्रीसचे ४ विभाग करण्यांत आले व प्रत्येक विभागावर एक वर्षाकरितां नेमलेल्या मुलकी व लष्करी अमलदाराची नेमणूक करण्यांत आली तिसरा लीओ याच्या मूर्तिभंजक आज्ञापत्रामुळें चिडून जाऊन ग्रीक लोकांनीं इ. स. ७२७ त बंड उभारलें पण

बादशाही आरमाराच्या जोरावर तें लश्करच मोडण्यात आलें. ७ व्या शतकात ग्रीसचा व्यापार व उद्योगधंदे फिरून भरभराटीस आले. इटालींत लोकसत्ताक राज्याचा उदय होईपर्यंत सर्व युरोपाला ग्रीस देशच रेशीम पुरवीत असे. १० व्या शतकात बाल्कन द्वीपकल्पातील टोळ्यांनीं फिरून ग्रीसवर स्वाऱ्या करण्याला सुरुवात केली. इ. स. ९२९ नंतर बल्गेरिअनांनीं ग्रीसवर स्वारी करून इस्थमसपर्यंत शिरकाव केला. परंतु इ. स. ९९५त बायझंटाईन सैन्यानें सार्कोभ्रा येथें त्यांचा पराभव करून त्यांना पिटाळून लावलें. इ. स. १०८४ मध्यें व्ह्लाक्स येथील पशुचारणानुसारी टोळ्यांनीं थेसली शहर काबीज केलें. त्याच वर्षी सिसिली येथील नॉर्मन लोकांनीं आयोनियन बेटावर स्वारी करून तेथें आपला पाय रोवून घेतला. इ. स. ११४५-४६ त याच लोकांनीं थीब्ज व कॉरिंथ हीं शहरें मनसोक्त लुटून काढलीं.

तुर्की विजय व तुर्क अंमलः—बायझंटाईन साम्राज्य ढासळून पडल्यानंतर नवीन मुलुख मिळविण्याच्या लालसेनें फ्रॅंकिश सरदारांनीं ग्रीसवर हल्ले करण्याला सुरुवात केली. ग्रीसचा वायव्य भाग काय तो या स्वाऱ्यापासून सुरक्षित राहिला. हा भाग खेरीज करून बाकीचा सर्व देश फ्रँकिश सरदार, व्हेनिशियन्स व इटालींतील साहसी लोक यांनीं आपापसात विभागून घेतला. इ. स. १३०८ पर्यंत थेसली शहरावर एपीरोट वंशशाखेचा अंमल होता. या वंशाच्या मृत्यूनंतर तें शहर ग्रँड कॅटलान कंपनीकडे गेलें. इ. स. ११३५० त सर्व्हियाचा राजा स्टीफनडूशान यानें तें काबीज केलें. १३९७ च्या सुमारास तुर्कांनीं तें आपल्या साम्राज्यास जोडून घेतलें.

मध्य ग्रीसमधील मुख्य सत्ता बर्गंडियन घराण्याकडे होती. इ. स. १२९६ त या घराण्याला फ्रान्सचा राजा नववा लुई यानें ड्यूकच्या पदाला चढविलें. इ. स. १३११ मध्यें ग्रँड कॅटलान कंपनीशीं झालेल्या युद्धात फ्रॅंक लोकांचा पराभव झाला व मध्यग्रीसचें स्वामित्व स्पेन येथील भाडोत्री सैनिकाकडे गेलें. कॅटलनांनीं मध्यग्रीसमध्यें ७५ वर्षेंपर्यंत मनसोक्त सुलतानी गाजविली व शेवटीं पेलापोनेशस येथील नेरीओ आक्कीआईऊओली या सरदारानें त्यांना तेथून हाकून लावलें. इ. स. १४५६ त सुलतान दुसरा महंमद यानें या नवीन घराण्याला अधिकारभ्रष्ट करून मध्यग्रीस आपल्या साम्राज्यास जोडून घेतला. फ्रेंच नाईट जीऑफ्रे व्हीलीहार्डोइन यानें पेलापोनीज जिंकून तेथें स्वतंत्र वंशाची स्थापना केली. इ. स. १४०० च्या सुमारास बायझंटाईन राजपुत्रांनीं या घराण्यापासून पेलापोनीज काढून घेऊन तें आपापसात विभागून घेतलें. इ. स. १४१५ मध्यें तुर्की सैन्यानें मोरियामध्यें शिरून, तेथील कित्येक रहिवाशांना देश सोडून जाण्यास भाग पाडलें. बायझंटाईन राजपुत्र थॉमस यानें खंडणी देण्याचें नाकारल्यावरून दुसऱ्या महमदानें इ. स. १४५८ त फिरून मोरियावर स्वारी केली व थॉमसला खंडणी देण्याशिवाय दुसरा मार्गच उरला नाहीं. इ. स. १४६० मध्यें मोरिया तुर्कस्तानला जोडण्यात आला.

तुर्की राज्यव्यवस्थेखालीं ग्रीसचे सहा लष्करी विभाग करण्यात आले ते येणंप्रमाणें:—( १ ) मोरिया, ( २ ) एपीरस, ( ३ ) थेसली, ( ४ ) युबोईआ, बोटिया आणि ॲटिक व ( ५ ) आईटोलिया, आकार्नानिया, व ( ६ ) उरलेला मध्य ग्रीस. सुलतानाच्या सैन्याला मनुष्यबळ पुरविण्याच्या अटीवर प्रत्येक विभागातील काहीं जमिनी तुर्की रहिवाशांना तोडून देण्यात आल्या. स्थानिक राज्यव्यवस्था पाहण्याचें काम प्रत्येक ज्ञातींतील आर्चबिशपाकडे सोंपविण्यात आलें.

इ. स. १४६३-७९ व १४९८-१५०४ या वर्षांच्या दरम्यान टर्की व व्हेनिस यांच्यात बऱ्याच लढाया होऊन भूखण्डावरील इटलीच्या ताब्यातील मुख्य मुख्य ठाणीं तुर्क लोकांनीं काबीज केलीं. १५७० च्या सुमारास ईजिअन समुद्राच्या आसपासचा प्रदेश तुर्कांनीं पूर्णपणें काबीज केला. इ. स. १६८४ मध्यें तुर्कांचें लक्ष डान्यूबकडे गुंतलें असल्यामुळें व्हेनिशिअनांनीं त्याचा फायदा घेऊन मोरियावर स्वारी केली. १६८७ मध्यें त्यांनीं अथेन्स व लीपँटो हीं शहरें देखील काबीज केलीं. १६९९ त कार्लोविट्झ येथें तह होऊन मोरिया व्हेनिसला देण्यात आला. परंतु इ. स. १७१५ मध्यें तुर्कांनीं फिरून मोरियावर स्वारी केली व व्हेनिशिअनांचा पराभव करून तो प्रान्त त्यांच्याकडून हिसकून घेतला. तुर्कांच्या बेजबाबदार व जुलमी राज्यपद्धतीमुळें ग्रीक लोक नेहमीं असंतुष्ट असत. ' जॅनीसरी ' नामक तुर्की शिपायांच्या पायदळात भरती होण्याकरितां मुलांची खण्डणी द्यावी लागत असे व ही खण्डणी फारच क्रूरपणें वसूल करण्यात येत असे. त्याचप्रमाणें तुर्की रहिवाशी एतद्देशीयांचा फार छळ करीत. या जुलमाला ग्रीक लोक फार त्रासून गेले होते. तथापि आरंभीं आरंभीं भीतीमुळें ते आपला असंतोष बाहेर प्रगट करीत नसत. ही निराशाजनक स्थिति १८ व्या शतकापर्यंत चालू होती. परंतु १८ व्या शतकात नवीन शाळा व नवीन विद्यापीठाच्या द्वारें शिक्षणाचा झपाट्यानें प्रसार होऊं लागल्यामुळें लोकांना आपल्या पारतंत्र्याची जाणीव हळू हळू उत्पन्न होऊं लागली व शिक्षणाचा लाभ झाला असल्यामुळें असंतोष बाहेर प्रगट करण्याचें धैर्यहि त्यांना प्राप्त झालें. वाढत्या शिक्षणामुळें आकांक्षाहि उत्तरोत्तर वाढूं लागल्या व तुर्की अंमलापासून स्वतंत्र होण्याची इच्छा दिवसेंदिवस बळावूं लागली.

ग्रीसच्या राजकारणात युरोपियन राष्ट्रें फारकरून ढवळाढवळ करीत नसत. परंतु इ. स. १७६४ त रशियानें ग्रीक लोकांना तुर्क सत्तेविरुद्ध चेतविता आल्यास पहावें म्हणून काहीं लोक मुद्दाम ग्रीसमध्यें पाठविले इ. स. १७७० त रशियाचें सैन्य मोरियात उतरलें पण तें ग्रीक लोकांच्या राष्ट्रीय भावना जागृत करूं शकलें नाहीं. इ. स. १७७४ त कुचुककैनारजी येथें रशिया व टर्की यांच्यात जो तह झाला

त्यायोगें ग्रीक व्यापार भूमध्यसमुद्रावर झपाट्यानें वाढूं लागला व वाढत्या दळणवळणामुळें लुप्तप्राय झालेली ऐक्य-भावना ग्रीक लोकांत फिरून उदित झाली. पूर्वजांनीं केलेल्या वैभवशाली कृत्यांचा व फ्रेंच राज्यक्रान्तीचा ग्रीक लोकांच्या मनावर विलक्षण परिणाम होऊन त्यांनीं स्वातंत्र्यप्राप्तीचा प्रयत्न करण्याचा ठाम निश्चय केला. १८०० च्या सुमारास ग्रीसमध्यें १००००००लोकसंख्या होती. पैकीं २००००० अल्बेनियन्स होते तथापि मुसुलमानी सत्तेचा ग्रीक व अल्बेनियन्स यांना सारखाच तिटकारा असल्यामुळें या दोन जातींचें ऐक्य घडून येण्यास फार वेळ लागला नाहीं

अ र्वा ची न इ ति हा स.—(१८००–१९२४) १९ व्या शतकाच्या आरंभीं ग्रीस तुर्की आधिपत्याखालीच होता. परंतु स्वातंत्र्याची उषा अगोदरच दिसूं लागली होती व राष्ट्रीय स्वातंत्र्यप्राप्तीचा मार्ग सुलभ करण्याचें कार्य सुरू झालेलें होतें. तुर्क साम्राज्याचा पाया ढासळूं लागण्याला १७ व्या शतकातच सुरवात झालेली होती. १९ व्या शतकांत साम्राज्यातील ख्रिस्ती प्रजेनें प्रथम बंड उभारलें. इ. स. १८०४ मध्यें सर्व्हिया व १८२१ त ग्रीस हे देश तुर्कांविरुद्ध उठले. या दोन्ही देशांना बंडास प्रवृत्त करण्याला मुख्यतः रशिया कारणीभूत झाला. फार दिवसापासून रशियाचा कॉन्स्टान्टिनोपलवर डोळा होता. ग्रीसमधील ख्रिस्ती लोकांना तुर्कांविरुद्ध चिथावण्याच्या धोरणात प्रथम महाराणी आना हिनें सुरवात केली व दुसऱ्या कॅथराईननें हेंच धोरण पुढें चालविलें इ. स. १७८१ त रशिया व ऑस्ट्रिया यांच्यात संगनमत होऊन तुर्की मुलुखाची विभागणी करून त्या ठिकाणीं दुसऱ्या कॅथराईनचा मुलगा कॉन्स्टन्टाईन याच्या आधिपत्याखालीं बायझंटाईन साम्राज्याची पुनःस्थापना करावी असें ठरलें.

फ्रेंच राज्यक्रान्तीनें ग्रीक लोकांच्या राष्ट्रीय भावनांना चलन देऊन, त्यांच्यांत स्वातंत्र्यलालसा उत्पन्न केली. लोकांत स्वाभिमान व स्वदेशाभिमान उत्पन्न व्हावा म्हणून निरनिराळ्या संस्था स्थापन करण्यात आल्या. इ. स. १८१५ त एक क्रान्तिकारक संस्था स्थापन करण्यात आली व मॉस्को, बुखारेस्ट, ट्रीस्ट व ग्रीसमधील प्रत्येक शहरीं तिच्या शाखा निर्माण करण्यात आल्या. इ स. १८२० त आयोनिनाचा अलीपाशा यानें सुलतानच्या सत्तेविरुद्ध बंड उभारलें व तो या क्रान्तिकारक पक्षास जाऊन मिळाला. १८२१च्या मार्च महिन्यात रशियाचा झार पहिला अलेक्झांडर याचा देहरक्षक व वरील क्रान्तिकारक संस्थेचा अध्यक्ष अलेक्झांडर यीप्सीलांटी हा लहानसें सैन्य घेऊन मोलडेव्हियात शिरला व त्याच महिन्यात पेट्रासच्या आर्चबिशपनें मोरियात बंडाचें निशाण उभारलें.

या स्वातंत्र्याच्या युद्धात ग्रेटब्रिटन, फ्रान्स व रशिया हीं तीन बलाढ्य राष्ट्रें ग्रीसच्या बाजूनें लढत असल्यामुळें ग्रीसला या युद्धांत विजय मिळाला व स्वातंत्र्यप्राप्तीस्तव केलेल्या ग्रीक लोकांच्या प्रयत्नाला शेवटीं यश मिळालें. तारीख २० आक्टोबर १८२८ रोजीं नेव्हारीनो येथें तुर्की आरमाराचा पराभव झाला व ग्रीसमध्यें स्वतंत्र राजसत्तेची स्थापना करण्यात आली. तारीख ७ मे १८३२ रोजीं लंडन येथील तहान्वयें ग्रेटब्रिटन, फ्रान्स व रशिया या राष्ट्रत्रयीच्या संरक्षणाखालीं ग्रीस हें स्वतंत्र राज्य आहे असें जाहीर करण्यात आलें बव्हेरियाचा राजा पहिला लुई याचा मुलगा ओटो याची ग्रीसच्या राजसिंहासनावर स्थापना करण्यात आली ओटो हा अनियंत्रितपणें व जुलमानें राज्य करूं लागल्यामुळें सैन्यानें चिडून जाऊन तारीख १५ सप्टेंबर १८४३ रोजीं बंड उभारलें व ओटोला राज्यघटना स्वीकारण्यास भाग पाडलें जबाबदार मंत्रिमंडळ, राजनियुक्त सीनेट व सार्वत्रिक मताधिकारानुसार निवडलेलें लोकसभागृह इत्यादि संस्था स्थापन करण्यात आल्या ओटो यानें प्रथम प्रथम या घटनेनुसार राज्यकारभार चालविला पण लवकरच तो फिरून बेजबाबदारपणें राज्य करूं लागला यामुळें १८६२ त सैन्यानें फिरून बंड उभारलें व ' राष्ट्रीय सभेच्या ' मार्फतीनें ओटोला पदच्युत करण्यात आलें. इ. स १८६३ त श्लेस्विग-हॉलस्टेन-सॉडरबर्ग–ग्लुक्सबर्ग येथील राजपुत्र विल्यम जॉर्ज याला 'राष्ट्रीयसभेनें 'ग्रीसच्या रिकाम्या झालेल्या राजपदावर अधिष्ठित केलें तारीख १३ जुलै १८६३ रोजीं ग्रेटब्रिटन, फ्रान्स व रशिया या संरक्षक राष्ट्रांनीं या नूतन राजवंशाला आपली संमति दिली

पहिला जॉर्ज हा गादीवर येतो न येतो तोंच कित्येक भानगडीचे राजकीय प्रश्न याच्यापुढें दत्त म्हणून उभे राहिले. इ स. १८६४ त त्याला राष्ट्रीय सभेनें तयार केलेली अत्यंत लोकसत्ताक स्वरूपाची अशी राज्यघटना स्वीकारणें भाग पडलें ग्रीसमध्यें अद्यापि हीच राज्यघटना चालू आहे. क्रीट बेटांतील राज्यक्रान्तीच्या प्रयत्नाला ग्रीक सरकारचा पाठिंबा असल्यामुळें टर्की व ग्रीस यांच्यांतील मित्रभाव दिवसेंदिवस कमी होत चालला होता. इ. स. १८६९ त क्रीट बेटांतील बंडाचा टर्कीनें बीमोड केला व पॅरिस येथें भरलेल्या यूरोपीयन राष्ट्रांच्या परिषदेनें टर्कीच्या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल लावून तो निकाल मान्य करण्यास ग्रीसला भाग पाडलें. रशिया व टर्की यांच्यांतील युद्धानें ग्रीसमध्यें चलबिचल उडवून दिली आपली सरहद्द वाढविण्याची ग्रीसचा फार दिवसापासून इच्छा होती व म्हणून बर्लिन येथील कॉंग्रेसनें ग्रीसच्या आग्रहामुळें हा प्रश्न विचारात घेतला. टर्की व ग्रीस यांनीं होता होईतों या प्रश्नाचा गोडीगुलाबीनें आपसांत निकाल लावून घ्यावा व सलोखा न झाल्यास यूरोपीयन राष्ट्रांनीं मध्यस्थी करावी असें कॉंग्रेसनें ठरविलें. त्याप्रमाणें नवीन सरहद्द कोठून कोठपर्यंत आखण्यात यावी हेंहि कॉंग्रेसनें सुचवून ठेवलें. ग्रीस व टर्की यांनीं या प्रश्नाचा विचार करण्याकरितां एका संयुक्त कमिशनची नेमणूक केली. पण बर्लिन कॉंग्रेसनें आखून दिलेली

सरहद्द टर्की मान्य करीना. तेव्हां ग्रीसनें यूरोपियन राष्ट्रांनी मध्यस्थी करण्याविषयीं विनंति केली. त्याप्रमाणें इ. स. १८८१ च्या पुढें महिन्यात सहा यूरोपियन राष्ट्रें, ग्रीस आणि टर्की यांचें संयुक्त कमिशन नेमण्यात येऊन त्या कमिशनच्या अनुमतें एक नवीन सरहद्द आखण्यांत आली. यायोगें १३३९५ चौरस किलोमीटरांचें क्षेत्र व ३०००० लोकसंख्या ग्रीसच्या राज्याला जोडण्यात आली.

या वेळीं ग्रीसच्या राजकारणातील दोन विरोधी पक्षाचें पुढारीपण ट्रीकूप्स व डेलीआनीज या दोन पुढाऱ्याकडे होतें. १८८२ मध्यें ट्रीकूप्स यास मुख्य प्रधानाची जागा देण्यात आली. परंतु त्यानें राज्यकारभारात घडवून आणलेल्या सुधारणा लोकांना न आवडल्यामुळें त्याला लवकरच म्हणजे १८८५ त आपल्या जागेचा राजीनामा द्यावा लागला व डेलीआनीज याला मुख्य प्रधान निवडण्यात आलें. डेलीआनीज हा तुर्कद्वेषी धोरणाचा पुरस्कर्ता होता. बल्गेरि. याच्या संबंधांत काहीं भानगड उपस्थित झाल्यामुळें त्यानें तावडतोब सैन्य व आरमार यांची लढाईकरितां हालचाल सुरू केली परंतु इतर राष्ट्रांनीं या कृत्याचा कडक निषेध केल्यामुळें डेलीआनीज याचा नाइलाज होऊन त्याला आपल्या अधिकाराचा राजीनामा देणें भाग पडलें. ट्रीकूप्स यांची फिरून मुख्य मंत्रिपदावर योजना करण्यात आली डेलीआनीज यानें युद्धाची तयारी करण्यात बराच पैसा खर्च केल्यामुळें राज्याची वसूलविषयक परिस्थिति सुधारण्याचें काम आतां ट्रीकूप्सवर येऊन पडलें अधिकारावर येताच ट्रीकूप्सनें लोकांवर जबर कर लादण्यास सुरवात केली याचा डेली-आनीज यानें फायदा घेऊन ट्रीकूप्सविषयीं लोकांच्या मनांत अप्रीति उत्पन्न करण्याच्या प्रयत्नास तो जारीनें लागला. कर हलके करण्याचें लोकांना अभिवचन देऊन त्यानें लोकांची मनें आपल्याकडे वळवून घेतलीं. निवडणुकींत ट्रीकूप्स याचा पराभव झाला व फिरून डेलीआनीज याची अधिकारावर योजना करण्यात आली परंतु वसूलविषयक अडचणीला डेलीआनीज तोंड देऊ न शकल्यामुळें राजानें त्याला अधिकारावरून दूर करून ट्रीकूप्स याला मंत्रिपदावर बोलाविलें. ट्रीकूप्स अधिकारसूत्रें हातीं घेतो न घेतो तोंच त्याच्यात व राजात काहीं गैरसमज उत्पन्न होऊन त्याला फिरून राजीनामा देणें भाग पडलें. यानंतर फक्त एकदांच ट्रीकूप्स यानें मुख्य मंत्र्याचें काम केलें १८९५ त त्यानें आपल्या अधिकाराचा व त्याबरोबरच राजकारणाचा निरोप घेऊन तारीख ११ एप्रिल १८९६ रोजीं परलोकीं प्रयाण केलें.

तारीख २३ एप्रिल १८९६ रोजीं ट्रीकूप्सच्या प्रेताचा अथेन्स येथें मोठ्या समारंभानें दफनविधि करण्यांत आला ऑलिम्पियन उत्सवाच्या वेळीं ज्याप्रमाणें शहर शृंगारून काढीत असत त्याचप्रमाणें यावेळीं पताका व तोरणें यांनीं सर्व शहराला शोभा आणण्यांत आली होती. प्राचीन ऑलिंपिक उत्सवाचें पुनरुज्जीवन करण्यात आल्यामुळें दूरदूरचे ग्रीक लोक उत्सवाकरितां अथेन्समध्यें एकत्र होऊं लागले व राज्यान्तील बिघडलेल्या आर्थिक परिस्थितीमुळें दडपून गेलेल्या ग्रीक लोकांच्या राष्ट्रीय भावना फिरून उद्दीपित झाल्या. १८९४ त स्थापन करण्यांत आलेल्या 'एथनिकी हेटेरिया' नामक गुप्त मंडळानें आता जोराची चळवळ सुरू केली. बल्गेरियनांनीं मॅसिडोनियात टर्कीपासून विभक्त होण्याची सुरु केलेली चळवळ व प्रिन्स फर्डीनंड याचा रशियाशीं झालेला सलोखा यामुळें मॅसिडोनिया ग्रीक संस्कृतीच्या तटा-तून फुटून निघणार अशी कित्येकांना भीती वाटून त्यांनीं त्या ठिकाणीं बंडखोरीच्या चळवळींची तयारी करण्याच्या उद्देशानें वरील मंडळ स्थापन केलें होतें १८९६ त क्रीट-मधील लोकांना टर्कीनें काहीं राजकीय सुधारणा दिल्या परंतु त्या अमलात आणण्याचा प्रश्न दिरंगाईवर टाकण्याचा टर्कीचा निश्चय दिसून आल्यामुळें तेथील ख्रिश्चन लोकांचा धीर सुटला व वरील मंडळाच्या सभासदांनीं तेथें जाऊन त्यांना बंड करण्यास प्रोत्साहन दिलें तारीख ४ फेब्रुवारी १८९७ रोजीं कॅनिआ येथें दंगा होण्याचें चिन्ह दिसून येताच तुर्की सैन्यानें ख्रिश्चन लोकांवर गोळीबार करण्यास सुरवात केली व याप्रमाणें लोकांच्या असंतोषाच्या अग्नींत तेल ओतलें जाऊन तो जास्तच भडकला

या वेळीं डेलीआनीज हा मुख्य प्रधानाच्या जागेवर होता. क्रीट येथील गोळीबाराचें वृत्त ऐकताच त्यानें ग्रीकसरकार क्रीट प्रकरणासंबंधानें यापुढें मुग्धता धारण करणार नाहीं असें जाहीर करून कॅनिआ येथें दोन लढाऊ जहाजें रवाना केलीं. 'एथनिकी हेटेरिआ' मंडळानें प्रधानमंडळांतील बहुमत आपल्या बाजूस करून घेऊन राजाला टर्कीविरुद्ध युद्ध पुकारण्यास भाग पाडलें यूरोपीय राष्ट्राकडे एक खलिता पाठवून ग्रीक सरकारनें त्यांना आपला उद्देश कळविला. तेव्हां ग्रेटब्रिटन, फ्रान्स, जर्मनी वगैरे राष्ट्रांनीं ग्रीक व तुर्क सरकाराकडे उलट खलिते पाठवून असें कळविलें की, सद्य-स्थितींत क्रीट हें ग्रीसच्या राज्याला जोडता येणें शक्य नसल्यामुळें सुलतानाच्या आधिपत्याखालीं अन्तर्गत राज्य-कारभारात क्रीटला स्वातंत्र्य देण्यात येऊन हा युद्धप्रसंग टाळावा या उत्तराला ग्रीक सरकारनें प्रत्युत्तर पाठवून अन्तर्गत स्वातंत्र्यानें क्रीटचा काहीं फायदा होणार नाहीं व आपण आपलें सैन्य क्रीटमधून हालवणार नाहीं असें कळ-विलें यापुढें काय करावें यासंबंधी यूरोपीयन राष्ट्रें भवती न भवती करू लागलीं. तोंच इकडे 'एथनिकी हेटेरिया' मंडळाच्या बाजारबुणग्या फौजेनें कित्येक तुर्की ठाण्यावर हल्ला चढवून गोष्टी हातघाईवर आणल्या. तारीख १७ एप्रिल १८९७ रोजीं तुर्कांनीं ग्रीसविरुद्ध युद्ध पुकारलें. तुर्कांच्या लष्करी बलाबलाचा ग्रीकांनीं पूर्ण विचार केला नव्हता हें आरंभींच दिसून आलें. लवकरच ग्रीक सैन्य हतपाईस आलें व यूरोपीय राष्ट्रांच्या मध्यस्थीनें तारीख १९

मे रोजीं तात्पुरत्या तहान्वयें युद्ध थांबविण्यात आलें तारीख ६ डिसेंबर १८९७ रोजीं कॉंस्टांटिनोपल येथें ग्रीस व टर्की यानीं तहनाम्यावर सह्या केल्या टर्कीला जेणेंकरून कि येक लष्करी नाक्यांचीं ठाणें मिळतील अशा रीतीनें या दोन राष्ट्रांमधील सरहद्दींत थोडा फेरफार करण्यात आला युरोपियन राष्ट्रांना यापुढें क्रीट टर्कीच्या ताब्यात ठेवणें योग्य होणार नाहीं असें वाटून त्यानीं ग्रीसचा राजपुत्र जॉर्ज याजकडे क्रीट बेटाची राज्यव्यवस्था सोंपविण्याचें ठरविलें हा निकाल तारीख २६ नोव्हेंबर १८९८ रोजीं अथेन्स येथें कळविण्यात आला व तारीख २१ डिसेंबर रोजीं राजपुत्र जॉर्ज याचें क्रीट येथील लोकांनीं मोठ्या अ नदानें व उत्साहानें स्वागत केलें इ स १८९९ च्या एप्रिल महिन्यात ट्रीकूप्स पक्षाचा मुख्य आधारस्तंभ थीओटोकस याला मुख्य प्रधान नेमण्यात आलें यानें न्यायखात्यात पुष्कळ सुधारणा घडवून आणल्या राणीच्या इच्छेप्रमाणें बायबलाचें भाषांतर अर्वाचीन ग्रीक भाषेंत करण्याचें प्रधानमंडळानें ठरविल्यामुळें लोकाची माथीं भडकून गेलीं पुराणमताभिमानी ख्रिस्ती लोकांवरील ग्रीक वर्चस्व ह्याणून पाडणें हा या भाषांतराचा उद्देश आहे असें लोकांना वाटून पुष्कळ लोकांनीं व विश्वविद्यालयातील विद्यार्थ्यांनीं अथेन्स येथें १९०१ च्या नोव्हेंबरात दंगे व मारामाऱ्या केल्या थीओटोकस याच्या खुनाचा प्रयत्न करण्यात आल्यामुळें त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला व अथेन्सच्या आर्चबिशपालाहि आपला अधिकार सोडावा लागला थीओटोकस याची जागा झेमीज याला देण्यात आली १९०२ मधील निवडणुकींत झेमीजचा पराभव झाला व डेलीयानीज याला प्रधान निवडण्यात आलें जून इ स १९०३ मध्यें डेलीयानीज यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला व थीओटोकस याला फिरून अधिकारावर घेण्यात आलें एका महिन्याच्या आतच थीओटोकस याचें प्रधानमंडळ अधिकारभ्रष्ट झालें व ऱ्हालीज यानें नवीन प्रधानमंडळाची स्थापना केली ऱ्हालीज याचें टर्कीविषयीं मित्रभावाचें धोरण होतें १९०३ च्या डिसेंबरात ऱ्हालीज यानें राजीनामा दिल्यामुळें थीओटोकसला फिरून प्रधान निवडण्यात आलें परंतु लोकांवर नवीन कर लादण्यास त्यानें सुरवात केल्यामुळें त्याला लवकरच आपल्या जागेचा निरोप घ्यावा लागला व मुख्य प्रधानकीचीं सूत्रें फिरून एकदा डेलीयानीजच्या हातांत गेलीं तारीख १३ जून १९०५ रोजीं डेलीयानीजचा खून करण्यात आल्यामुळें मुख्य मंत्रिपदावर ऱ्हालीज याची पुनरपि योजना करण्यात आली

तारीख २६ सप्टेंबर १९०६ रोजीं राजपुत्र जॉर्ज यानें क्रीटच्या हाय कमिशनरच्या जागेचा राजीनामा दिला १९०८ च्या आक्टोबरात क्रीट येथील लोकसभेनें ग्रीसशीं एकत्र होण्याचा आपला निश्चय जाहीर केल्यामुळें तेथील मुसुलमानी लोकपक्षाचा क्षोभ होऊन युद्धाचा प्रसंग ओढवतो कीं काय अशी भीति उत्पन्न झाली ग्रीक सरकारनें संशयास्पद धोरण स्वीकारल्यामुळें सैन्यात चळवळ सुरू झाली व १९०९ मध्यें या चळवळीला चागलाच रंग चढला या वेळीं थीओटोकस हा मुख्य प्रधानाच्या जागेवर होता त्याचें क्रीटसबधींचें धोरण लोकांना नापसंत पडल्यामुळें त्याला आपल्या जागेचा राजीनामा द्यावा लागला व ती जागा ऱ्हालीज यानें भरून काढली सैनिकांना शांत करण्याकरिता ऱ्हालीज यानें आपला लष्करी व आर्थिक सुधारणेचा कार्यक्रम जाहीर केला परंतु सैनिकांचें समाधान न होऊन त्यांनीं स्वत स्थापन केलेल्या 'लष्करी संघाच्या' एका पुढाऱ्याला ऱ्हालीजच्या जागीं मुख्य प्रधान नेमलें यामुळें कांहीं काळपर्यंत सर्व कारभार 'लष्करी संघा'कडे जाऊन राजवंश ढासळून पडण्याचीं चिन्हें दिसू लागलीं परंतु सैन्य व आरमार यांच्यात एकसारखीं भांडणें उपस्थित होऊं लागल्यामुळें संघाचें वर्चस्व व शक्ति हीं नाहींशीं होऊन संघाचा पुढारी माव्होमायकेलस याला मुख्य प्रधानाची जागा सोडावी लागली तारीख २९ मार्च १९१० रोजीं संघ मोडण्यात आला व सर्वत्र स्थैरस्थावर करण्यात आलें

इ स १९१० च्या जानेवारी महिन्यात लष्करीसंघानें आपला सत्ता पूर्णपणें ग्रीसवर प्रस्थापित केल्यानंतर व्हेनीझोलास याला सल्लागार या नात्यानें बोलावण्यात आलें १९१० च्या सप्टेंबरमध्य राष्ट्रीय सभेची बैठक भरली त्यावेळीं व्हेनिझोलास हा सभासद निवडला गेला असताना देखील तुर्कस्तानच्या इच्छेला मान देऊन त्यानें राष्ट्रीय सभेला न जाण्याचें ठरविलें होतें पण पुढें व्हेनिझोलास याचा व ड्रॅगूमेस या प्रधानाचा तंटा झाल्यामुळें प्रधानानें राजीनामा दिला व व्हेनिझोलास याला आपलें मंत्रिमंडळ बनविण्याची जार्ज राजानें आज्ञा केली व्हेनिझोलास हा त्यावेळीं अतिशय लोकप्रिय झाला होता त्याची सत्ता उत्तरोत्तर वाढत आहे हें पाहून जु या लोकपक्षाच्या पुढाऱ्यांनीं त्याचा नक्षा उतरविण्याचा निश्चय केला व त्याच्या कोणत्याहि बैठकीला न जाता ती बैठक कोरमच्या अभावीं बंद पाडण्याचें ठरविलें अशी परिस्थिति दिसून यताच व्हेनिझोलासनें राष्ट्रीय सभा बरखास्त करून लोकांकडे दाद मागण्याचा निश्चय केला नवीन निवडणुकींत फिरून व्हेनिझोलास हाच प्रचंड मताधिक्यानं निवडून आला

अशा रीतीनें राष्ट्रीय सभेंत आपलें बहुमत केल्यानंतर त्यानें ग्रीसमध्यें नवीन नवीन सुधारणा अमलात आणण्यास सुरुवात केली निवडणुकीच्या वेळीं जे लाचलुचपतीचे अनिष्ट प्रकार घडत, त्याना आळा घालण्याचें त्यानें ठरविलें प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें करावयाची योजना त्यानें अमलात आणली ग्रीक भाषा ही राजभाषा करण्यात आली परराष्ट्रीय खात्याची पुनर्घटना करावयाचें त्यानें ठरविलें कौन्सिल

ऑफ स्टेटचें पुनरुज्जीवन झालें रुमानियाशीं राजकीय हित-संबंध पुनः सुरू करण्यात आले

१९१२ च्या जानेवारी महिन्यांत पुनः निवडणुका होऊन त्यात व्हेनिझेलोलासलाच मताधिक्य मिळालें. बल्गेरियाशीं सलोख्याचें धोरण ठेवण्यासाठीं त्यानें जॉर्ज राजाला मुद्दाम सोफियामध्यें पाठविलें होतें. त्याप्रमाणें १९१२ च्या मे महिन्याच्या २९ व्या तारखेस ग्रीस व बल्गेरियामध्यें गुप्त तह झाला. त्यात तुर्कस्तान व ग्रीस यामध्यें लढाई सुरू झाल्यास तो प्रसंग खेरीज करून इतर प्रसंगीं ग्रीस व बल्गेरिया यांनीं परस्परांना साहाय्य करावें अशा प्रकारचें कलम होतें.

तुर्कस्तानच्या सत्तेखालीं मॅसिडोनियाची स्थिति फार खालावत चालली होती तुर्की लोक मॅसिडोनियातील रहिवाश्यांना फार त्रास देत असत. त्यामुळें १९१० च्या सप्टेंबरच्या ३० व्या तारखेस बाल्कन संस्थानांनीं कान्स्टांटिनोपलवर स्वारी केली. रशियाखेरीज सर्व यूरोपियन राष्ट्रांनीं बाल्कन राष्ट्रांना धमकीवजा पत्र लिहून त्यात तुर्कस्तानच्या सार्वभौम सत्तेला बाध न आणता यूरोपीय तुर्कस्तानच्या राजकीय स्थितींत सुधारणा घडून आणण्यासाठीं आपण प्रयत्न करूं, त्यात बाल्कन राष्ट्रांनीं ढवळाढवळ करण्याचें कारण नाहीं असें कळविलें पण हा खलिता पोहोंचण्याच्यापूर्वीच मॉंटेनिग्रोनें तुर्कस्तानविरुद्ध युद्ध पुकारलें व ग्रीसनेंहि मॉंटेनिग्रो आपल्या राज्याला जोडून त्याला मदत करावयाचें ठरविलें. तुर्कस्ताननें ग्रीसविरुद्ध तेवढें युद्ध न पुकारतां त्याला आमीष दाखवून इतर बाल्कन राष्ट्रांशीं लढाई पुकारली पण या आमिषाला बळी न पडता व्हेनीझोलासनें बाल्कन राष्ट्रांनाच मदत करावयाचें ठरविलें.

लगेच ग्रीक सैन्यानें ग्रीसच्या युवराजाच्या आधिपत्याखालीं सरहद्द ओलांडून तुर्कस्तानचा सॅराडोपोराम, सॅलोनिका इत्यादि ठिकाणीं पराजय केला. मॉंटेनिग्रो, बल्गेरिया, सर्व्हिया इत्यादि राष्ट्रांच्या सैन्यानांहि तुर्कस्तानवर ठिकठिकाणी जय मिळविले. तेव्हां तुर्कस्ताननें या बाल्कन राष्ट्रांशी तह करावयाचें ठरविलें. बाल्कन राष्ट्रांच्या प्रतिनिधींचीं व तुर्कस्तानच्या वकिलाची लंडनमध्यें तहाच्या वाटाघाटी करतां बैठक भरली त्यावेळीं ग्रीसनेंहि त्यात भाग घेतला होता. ही तहाची वाटाघाट चालू असता, तुर्कस्तानमधील राष्ट्रीयपक्षानें बंड करून, आपली सत्ता प्रस्थापित केली व पुन्हा बाल्कन राष्ट्रांशी लढाई सुरू केली. ग्रीक सैन्यानें यनींना शहरावर हल्ला करून तें काबीज केलें व बल्गेरियन व सर्व्हियन सैन्यानें ॲड्रियानोपल, स्कुटारी इत्यादि ठिकाणें काबीज केली. तेव्हां पुन्हा लंडन येथें तुर्कस्तान व बाल्कन राष्ट्रें याच्यामध्यें तारीख ३० मे इ. स. १९१३ रोजीं तह होऊन यूरोपमधील आपल्या ताब्यांतील प्रदेशापैकीं बहुतेक सगळा भाग तुर्कस्तानला सोडून द्यावा लागला. ग्रीक, बल्गेरिया व सर्व्हिया यांच्यामधील सरहद्द देखील याच वेळीं निश्चित ठरविण्याचा या राष्ट्रांनीं बेत केला होता, पण ॲड्रियाटिक समुद्रकांठच्या मुलखांतून सर्व्हियाला वाट मिळावी हा जो ऑस्ट्रियाचा डाव होता त्याला इंग्लंडनें पाठिंबा दिल्यामुळें या बाल्कन राष्ट्रांत असंतोष पसरला बल्गेरियानेंहि यावेळीं बाल्कनमध्यें आपलें सर्वांत अधिक वर्चस्व असावें असा हट्ट धरला व आपलें म्हणणें कबूल न झाल्यास लढाईचा प्रसंग आणण्याचेंहि ठरविलें त्यामुळें ग्रीस व सर्व्हिया या राष्ट्रांना बल्गेरियाचें वर्चस्व होऊं न देण्याकरता, आपापसात तह करणें भाग पडलें. शेवटीं बल्गेरियानें ग्रीक व सर्व्हियन सैन्यावर किल्की येथें हल्ला केला पण त्यात बल्गेरियाचा पराभव झाला.

बल्गेरियाचा पराभव झालेला पहाताच व बाल्कन राष्ट्रांत फुटाफुट झालेली पहाताच या संधीचा फायदा घेऊन तुर्कस्ताननें पुन्हा ॲड्रियानोपल काबीज केलें शेवटीं बुखारेस्टच्या तहानें या सर्व बाल्कन राष्ट्रांमध्यें तात्पुरता समेट होऊन त्यात ग्रीसला मॅसिडोनियाच्या सरहद्दीवरील बराचसा मुलूख घशात टाकावयास मिळाला पण बल्गेरिया, हे नूतन संपादित मुलूख आपल्याला पचूं देणार नाहीं अशी व्हेनाझोलासला सकारण भीति वाटत होती. त्यामुळें त्यानें सर्व्हिया व रुमानियाशीं तहाचें संधान जमविलें

पण या बुखारेस्ट येथील तहामुळें ग्रीसला ईजियन बेटांवर जो ताबा प्राप्त झाला त्याला तुर्कस्ताननें संमति दिली नाहीं व त्यानें याचा सूड म्हणून ग्रीक जहाजावर बहिष्कार घालून आशियामायनरमध्यें ग्रीकांचा छळ करण्यास सुरवात केली व ग्रीसला धमकी देण्यास सुरवात केली अशी स्थिति पहाताच ग्रीसनें सर्व्हियाजवळ मदतीसाठीं याचना केली. सर्व्हियानें ती कबूल करून तुर्कस्तानच्या विरुद्ध आपली बाजू घेण्यासाठीं, यूरोपियन राष्ट्रांना विनंति केली पण तुर्कांच्या विरुद्ध ग्रीस व सर्व्हिया यांना कोणी मदत करण्यास तयार होईना व त्यामुळें यूरोपियन राष्ट्रेंहि तुर्कस्तानविरुद्ध आपली बाजू घेण्यात राजीखुषी नाहींत असें व्हेनिझेलासयाला दिसल्यावरून त्यानें दोन अमेरिकन जहाजें खरेदी करून आपलें आरमारी सामर्थ्य वाढविलें अर्थातच तुर्कस्तानला ग्रीक आरमारी सामर्थ्यापुढें आपला टिकाव धरणें अशक्य असल्याचें आढळून आल्यामुळें त्यानें तहाची वाटाघाट करण्यास संमति दिली पण इतक्यात महायुद्ध सुरू झाल्यामुळें या सर्व गोष्टींना नवीनच वळण लागलें

ग्रीस व महायुद्ध—महायुद्ध सुरू होताच जर्मनीनें ग्रीसला एक विनंतीपत्र पाठवून ग्रीसनें आपल्याला मदत करावी असें ग्रीसला कळविलें पण कॉन्स्टंटाईन राजानें तें नाकारलें. व्हेनीझोलासनें बाल्कनसंघाचें सामर्थ्य वाढविण्याची खटपट केली. जर्मनीच्या आरमारी मदतीमुळें तुर्कस्तानला जोर चढून आशियामायनरच्या युद्धाचा वणवा पेटल्याखेरीज रहाणार नाहीं असें व्हेनीझोलास याला पक्कें वाटत होतें. यासाठीं त्यानें दोस्तराष्ट्रांच्या बाजूचें आपण राहूं असें जाहीर केलें. अर्थातच इंग्रज सरकारला ही गोष्ट पसंत

पडण्यासारखी होती. तेव्हां गॅलिपोलीचा टापू आपल्या ताब्यात घेण्यासाठीं ग्रीसशीं संगनमत करण्याकरतां इंग्रज-सरकारनें ॲडमिरल कर यास ग्रीस येथें पाठविलें. पण ग्रीसमध्यें येताच कान्स्टंटाईननें तुर्कस्तानने आपण होऊन कुरापत काढीतों आपण तुर्कस्तानशीं लढाई करण्याच्या विरुद्ध आहों असा कर यास खणखणीत जबाब दिला. व्हेनीझोलास याचें मत राजाच्या उलट होतें. त्यानें राजाचें मन आपल्या निश्चयापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला पण व्यर्थ. शेवटीं व्हेनीझोलास यानें राजिनामा देण्याची धमकी घातली पण राजाच्या आग्रहावरून त्यानें राजीनामा दिला नाहीं पुढें एक महिन्याच्या आतच तुर्कस्ताननें दोस्तराष्ट्रा-विरुद्ध लढाई पुकारली

१९१५ सालच्या जानेवारीमध्यें इंग्लंडनें बाल्कन राष्ट्रांत जूट करून जर्मनीला शह देण्यासाठीं ग्रीसची मदत मागितली. पण कॉन्स्टंटाईननें तिकडे दुर्लक्षच केलें व्हेनीझोलासनें वारंवार राजाला इंग्रजांना साहाय्य करण्यासाठीं विनंति केली. पण कॉन्स्टंटाईन हा त्याचें मुळींच ऐकेना पुढें ब्रिटिशांनीं दार्दानेलसचा समुद्र ताब्यात घेण्यासाठीं ज्यावेळीं स्वारी करावयाचें ठरविलें त्यावेळीं त्यांना साहाय्य करण्यासाठीं राजाचें मन वळवण्याचा व्हेनिझोलासनें अखेरचा प्रयत्न केला. त्यात त्याला थोडेसें यश येण्याचा रंग दिसूं लागला. पण इतक्यात लष्करी अधिकाऱ्यांचा नायक कर्नल मेटाक्सस यानें राजीनामा दिल्यामुळें राजाचें मन पुन्हां पालटलें. शेवटीं राजाच्या अध्यक्षतेखालीं ग्रीसमधील सर्व पक्षाच्या प्रतिनिधींची बैठक भरून दार्दानेलसवरील ब्रिटिशांच्या स्वारीला साहाय्य करण्यासाठीं म्हणून एक पलटण पाठविण्याचा ठराव सर्वानुमतें मंजूर झाला. पण कॉन्स्टंटाईननें या सूचनेलाहि विरोध केला. त्यामुळें अखेर व्हेनीझोलास याला राजीनामा देणें भाग पडलें.

व्हेनीझोलासच्या जागीं गोनारेस याला मुख्य प्रधान नेमण्यात आलें व त्यानें आपलें नवीन मंत्रिमंडळ बनविलें. ग्रीसनें या महायुद्धात कोणताहि भाग न घेता तटस्थ रहावें या मताचा गोनारेस हा होता. पण त्यानें ग्रीसचें बल्गेरियापासून संरक्षण करण्याच्या अटीवर दोस्तांना आरमारी साहाय्य करण्यास संमति दिली व तसें फ्रेंच सरकारला कळविण्यातहि आलें. पण कोणतीहि अट कबूल न करता ग्रीस जर मदत करण्याचें कबूल करील तर ती स्वीकारण्यास दोस्त राष्ट्रें तयार आहेत असें फ्रेंच सरकारनें ग्रीसला कळविलें. कॉन्स्टंटाईन राजा हा जर्मनीच्या बाजूचा आहे हें फ्रेंच सरकारला पक्कें कळून चुकलें होतें व ग्रीसनें मदत करण्याचें कबूल करण्यात कॉन्स्टंटाईनचा कांहीं तरी डाव असला पाहिजे अशी त्याची कल्पना होती. जर्मन वृत्तपत्रकारांनी तर कॉन्स्टंटाईन व त्याचा पक्ष यांनीं तटस्थपणा ठेवावा यासाठीं जोरानें चळवळ चालू ठेवली होती व व्हेनीझोलासच्या पक्षाविरुद्ध वाटेल तीं विधानें करून त्या पक्षाचें वजन कमी करण्याचा प्रयत्न चालविला होता. पण जून महिन्याच्या १३ व्या तारखेस जी नवी निवडणूक झाली तींत व्हेनीझोलासच्याच बाजूला अखेर अधिक मतें मिळून त्याचा पक्ष विजयी झाला. असें असून देखील राजा आजारी आहे व त्याच्या परवानगीशिवाय आपण प्रधानकी सोडणार नाहीं या सबबीवर गोनारेस व त्याच्या मंत्रिमंडळानें राजीनामा देण्याचें नाकारलें. पुढें आगस्ट महिन्यात व्हेनीझोलास हा अधिकारारूढ झाला.

तथापि व्हेनिझोलास याला अनेक हितशत्रू उत्पन्न झाले होते. जर्मन वृत्तपत्रकारांनीं तर त्याची एकजात नालस्ती करण्याचाच विडा उचलला होता. व्हेनीझोलासनें अधिकारारूढ होतांच बल्गेरियापासून सर्व्हियाचें संरक्षण करण्याचें आपलें धोरण जाहीर केलें. बाल्गेरियानें ज्या वेळीं सर्व्हियावर स्वारी करण्यासाठीं आपलें सैन्य जमा करण्यास सुरवात केली. त्यावेळीं नाइलाजास्तव व्हेनीझोलासनेंहि आपलें सैन्य गोळा करण्यास सुरवात केली. सर्व्हियाच्या हातून ग्रीसला जितकी मदत व्हावयाला पाहिजे तितकी मदत मिळणें अशक्य आहे, या सबबीवर राजानें व्हेनीझोलासला फ्रान्सनें व इंग्लंडनें बल्गेरियाविरुद्ध मदत करावी अशी विनंति करण्यास सांगितलें त्याप्रमाणें या सरकारास कळविण्यातहि आलें व फ्रान्स व इंग्लंड यांनीं आपलें सैन्य व पलटणी सॅलोनिकाला पाठविल्याचें जाहीर केलें. पण या संधीस पुन्हां राजाचें मन पालटून त्यानें बल्गेरियानें आपण होऊन लढाई पुकारल्याशिवाय फ्रेंच व इंग्लिश पलटणींनीं कोणत्याहि प्रकारची हालचाल करतां कामा नये असें जाहीर केलें. त्यामुळें व्हेनीझोलासचा नाइलाज झाला. पुढें थोडक्याच दिवसात, व्हेनिझोलासचें व राजाचें पटेनासें झाल्यामुळें व्हेनीझोलासला राजीनामा देणें भाग पडलें व त्याच्या जागीं झैमेसची नेमणूक झाली.

झैमेस हा ग्रीस व सर्व्हियामध्यें जो तह झाला तो बाल्कन पुरताच आहे अशा मताचा होता. महायुद्धात ग्रीसनें आपली बाहेरून तटस्थपणाची वृत्ति राखावी पण आतून मात्र आपली जास्त तयारी ठेवावी असें त्यानें आपलें धोरण जाहीर, केलें होतें. व्हेनीझोलासला जरी ग्रीसनें दोस्त राष्ट्राच्या बाजूनें युद्धांत पडावें असें वाटत होतें तरी पण राष्ट्रीय सभेमध्यें बखेडा होऊं नये यासाठीं, झैमेसच्या पक्षाच्या बाजूनें तो आपल्या पक्षाला मतें देण्यास सांगत असे. पण युद्धमंत्र्यानें कांहीं आगळीक केल्याच्या निमित्तावरून व्हेनीझोलासला फार चीड येऊन त्यानें एका प्रश्नावर प्रधानमंडळाचा पराभव केला अर्थातच प्रधानाला राजीनामा देणें भाग पडलें. तेव्हां त्याच्या बदली राजानें स्कौलौडेस याला प्रधान नेमलें.

लवकरच नवी निवडणूक सुरू झाली, पण या निवडणुकीच्या वेळीं, व्हेनीझोलास व त्याचा उदार पक्ष यांनीं निवडणुकींत मतें न देण्याचें ठरविलें. यामुळें स्कौलौडिस

हाच पुन्हां अधिकारारूढ झाला. मे महिन्याच्या २३ व्या तारखेस जर्मनीनें ग्रीसला एक खालेता पाठवून त्यांत पूर्व मॅसिडोनियाकडे जाताना मार्गामध्यें रूपेला नांवाचा जो किल्ला आहे तो आत्मसंरक्षणासाठीं आपल्या ताब्यात जर्मनीनें घ्यावयाचें ठरविलें असून ग्रीसच्या सार्वभौमत्वाला यत्किंचित् कमीपणा न येईल अशा तऱ्हेची खबरदारी जर्मनी घ्यावयास तयार आहे असें लिहिलें होतें. स्कौलौडिसनें याला कबुली दिली पण भर सभेंत जर्मनीला आपण कबुली दिली नसल्याचें त्यानें प्रतिपादन केलें. पण जर्मनीला अशी सवलत दिल्याचा परिणाम असा झाला कीं, दोस्त राष्ट्रें व ग्रीस यांच्यामध्यें वैरभाव उत्पन्न झाला. कान्स्टंटाईन राजाविरुद्ध दोस्त राष्ट्रांतील पत्रांनीं टीका करण्यास सुरुवात केली. तर जर्मन पत्रकारांनीं त्याची पाठ थोपटण्यास सुरवात केली. कान्स्टंटाईन तर पूर्णपणें जर्मनीच्या बाजूचा झाला होता व जर्मनीचा जय व्हावा अशी त्याची मनापासूनच इच्छा होती.

शेवटीं जून महिन्यांत दोस्तराष्ट्रांनीं सालोनिका शहरावर लष्करी कायदा बजावला व तेथील ग्रीक सैन्य ताबडतोब काढून नेण्यात यावें असें ग्रीसला कळविलें. स्कौलौडिसला या अटी जाचक वाटून त्यानें राजीनामा दिला. त्याच्या जागीं झैमेस हा प्रधान म्हणून नेमला गेला. त्यानें, सॅलोनिकामधून ग्रीक लष्कर दुसरीकडे नेण्याचें ठरविलें. पण या दोस्ताच्या कृत्यानें मात्र कॉन्स्टंटाईन हा पूर्णपणें जर्मनीच्या बाजूला झाला. इतक्यात बल्गेरियन लोकांनीं मॅसिडोनियावर स्वारी केली. व त्यांनीं मॅसिडोनियाचा बराच मुलूख काबीज केला. हें पहाताच राजाचे डोळे उघडले व त्यान दोस्तराष्ट्राशीं बोलणें लावण्याकरिता झैमेसला हुकूम केला. रूमानियानें यान सुमारास जर्मनीच्याविरुद्ध लढाई पुकारली. हें पहाताच व्हेनीझोलास व त्याच्या अनुयायांनीं पुन्हां एकदा, जर्मनीविरुद्ध युद्ध पुकरण्यासाठीं राजाला विनंति करावयाचें ठरविलें पण राजानें व्हेनीझोलसनें पाठविलेल्या प्रतिनिधिमंडळाची भेटच घेतली नाहीं. अशी परिस्थिति उत्पन्न झाल्यामुळें, व्हेनीझोलासच्या काहीं प्रमुख अनुयायांनीं एक क्रांतिकारक मंडळ स्थापन केलें व राष्ट्रसंरक्षकमंडळ निर्माण करून त्यातर्फे ब्रिटिशांना व दोस्तराष्ट्रांना शक्य ती मदत करण्यास सुरवात केली काहीं दिवसानंतर दोस्तराष्ट्रांनीं, ग्रीसमधील पोस्ट व तारऑफीसें आपल्या ताब्यांत घेण्याचें ठरविलें यामुळें झैमेसनें प्रधानमंडळाचा राजीनामा दिला

सप्टेंबरच्या २५ व्या तारखेला व्हेनीझोलासनें क्रीट येथें येऊन ॲडमिरल कौंटोरियोटिस व जनरल डँकल्स यांच्या साहाय्यानें क्रांतिकारक पक्षाची स्थापना केली. या पक्षाचा उद्देश ग्रीसमध्यें राजाच्या विरुद्ध चळवळ करून राजाला दोस्तांच्या बाजूनें लढाईंत भाग घेण्याला भाग पाडण्याचा होता. या त्रिमूर्तींनीं ग्रीसभर चळवळ करून सॅलोनिका येथें एक तात्पुरतें सरकार स्थापन करून दोस्तांच्या साहाय्यानें राष्ट्रसंरक्षक सैन्य उभारण्यास सुरवात केली. पुढें एक दोन महिन्यात या नूतन सैन्याच्या जोरावर व्हेनीझोलासनें जर्मनी व बल्गेरियाच्या विरुद्ध युद्ध पुकारलें पण दोस्त राष्ट्रांनीं व्हेनीझोलासच्या पक्षाला उघड मान्यता दिली नाहीं. अद्यापिहि ग्रीसमध्यें राजाच्या बाजूचे पुष्कळच अनुयायी होते व त्याचा शब्द झेलण्यास लोक तयार होते असें दोस्तराष्ट्रांना वाटत होतें. दोस्त राष्ट्रें व्हेनीझोलासचा पक्ष मान्य करीत नाहींत हें पहाताच कॉन्स्टटाईनला फार आनंद झाला व त्यानें व्हेनीझोलास व त्याचा पक्ष हे बंडखोर आहेत असें जाहीर केलें

नोव्हेंबरच्या १९व्या तारखेस फ्रेंच ॲडमिरल डार्टिंग यानें शत्रुराष्ट्राच्या वकीलांना अथेन्समधून हाकून लावलें व ग्रीक तोफखाना आपल्या स्वाधीन करून घेण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें तो तोफखाना आपल्या स्वाधीन करून घेण्यास जात असता ग्रीक सैन्यानें राजाच्या हुकुमावरून त्यास अडथळा केला व फ्रेंच सैन्याची कत्तल केली व व्हेनीझोलासच्या बाजूच्या अथेन्समधील नागरिकांचीहि कापाकाप केली तेव्हां दोस्तराष्ट्रांनीं झालेल्या नुकसानीबद्दल भरपाई करून देण्याबद्दल व ग्रीक सैन्य कमी करणें, बंदीवानांना मुक्त करणें इत्यादि अटी कबूल करण्याबद्दल राजाला कळविलें. व्हेनीझोलसच्या पक्षाला दोस्तराष्ट्रांनीं पूर्ण मान्यता दिल्याचें जाहीर करण्यात आलें

राजाला या गोष्टी इतक्या थरावर येतील अशी कल्पना नव्हती. पण इतक्या निकरावर गोष्टी आलेल्या पहाताच त्यानें दोस्ताच्या अटी पाळण्याचें कबूल केलें व दोस्तांचे निशाणहि अथेन्सवर डौलूं लागलें. पण अद्यापिहि राजाला जर्मनीकडून आपल्याला मदत मिळेल अशी मनातून खात्री वाटत होती. पण ती मिळण्याचा रंग दिसेना. इतक्यात अमेरिकेनेंहि दोस्ताच्या बाजूनें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारल्याचें जाहीर केलें. तेव्हां निराश होऊन दोस्तराष्ट्राशीं बोलणें लावण्याचें राजानें नक्की ठरविलें.

पण राजाच्या या बेताला दोस्त राष्ट्रांनीं संमति दिली नाहीं. राजा हा अद्यापि जर्मनीच्या बाजूचाच आहे असें त्यांना नक्की वाटत होतें तेव्हां राजानें व युवराजानें ग्रीसचें राज्यपद सोडून व आपल्यापैकीं दुसऱ्या कोणालाहि राज्यपद देऊन, दुसरीकडे कोठेंहि निघून जावें असें त्यांनीं राजाला कळविलें राजालाहि निरुपायास्तव हें कबूल करणें भाग पडलें त्यानें अलेक्झांडर या आपल्या धाकट्या मुलास राज्यपद देऊन स्विझरलंडला प्रयाण करावयाचें ठरविलें व्हेनीझोलास हा पुन्हा अथेन्समध्यें परत आला व त्यानें राजनिष्ठेची शपथ घेतली. त्यानें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारल्याचें ताबडतोब जाहीर केलें अशा रीतीनें ग्रीसमध्यें तात्पुरती शांतता झाली तथापि अद्यापि कान्स्टंटाईनच्या बाजूचे लोक ग्रीसमध्यें पुष्कळच होते व कॉन्स्टंटाईन

हाहि स्वित्झर्लंडमधून अनेक कारस्थानें करून ग्रीसमध्यें आपल्या बाजूचें अनुकूल मत करून घेण्यासाठीं हरप्रयत्न करीत होता. व्हेनीझेलासनें ग्रीक सैन्याची वाढ करून दोस्त राष्ट्रांना पुष्कळ ठिकाणीं चांगलें साहाय्य केलें. विशेषत मॅसिडोनियामधील लढायांत तर दोस्तांना ग्रीक सैन्याचें फारच साहाय्य झालें. या सैन्याच्या जोरावर २० सप्टेंबर इ. स. १९१७ रोजीं बल्गेरियाचा दोस्तराष्ट्रांनीं पूर्णपणें पाडाव केला.

महायुद्ध संपल्यानंतर शांततापरिषदेची बैठक भरली. तींत व्हेनीझेलास हा ग्रीसतर्फे प्रामुख्यानें भाग घेत होता. उत्तर एपिरस, थ्रेस, स्मर्ना हे प्रदेश आपल्याला मिळावे असें आपलें म्हणणें ग्रीसनें या परिषदेपुढें मांडलें. न्युइली येथें ग्रीस व बल्गेरिया यामध्यें तह होऊन बल्गेरियानें ईजियन बेटांवरील आपला हक्क सोडून दिला व बाल्कनमधील दोस्त राष्ट्रांचे हितसंबंध राखण्याला त्यानें संमति दिली. तुर्कस्तानसंबंधींच्या प्रश्नाचा निकाल लावण्याला बराच अवधी लागला.

शेवटीं पुष्कळ वाटाघाटींनंतर ग्रीस व तुर्कस्तानामध्यें सेव्हर्स येथें तह घडून आला. या तहान्वयें आड्रियानोपलपासून चटलजापर्यंतचा थ्रेसमधील प्रदेश, गॅलिपोली इत्यादि टापू ग्रीसला मिळाला. स्मर्नावर जरी तुर्कस्तानचा ताबा राहिला तरी तेथील राज्यकारभार पहाण्याचें काम ग्रीसकडे आलें.

अशा रीतीनें शांततापरिषदेचें काम संपल्यानंतर व्हेनीझेलास हा पॅरिस येथून अथेन्स येथें जाण्यास निघाला. त्याचा पॅरिस येथें खून करण्याचा प्रयत्न करण्यांत आला होता पण तो सुदैवानें फसला. पुढें अथेन्समध्यें आल्यावर त्यानें ग्रीसमध्यें सुधारणा करण्याचें मनावर घेतलें. पण व्हेनीझेलासच्या गैरहजेरींत कॉन्स्टंटाईन राजानें व्हेनीझेलासचें वजन कमी करण्याचा प्रयत्न चालविला होता व त्याला यश येत चाललें होतें. याच सुमारास अलेक्झांडर राजा वारल्यामुळें गादीवर कोणाला राजा नेमावें याविषयीं वाटाघाट सुरू झाली. कॉन्स्टंटाईनचा सर्वांत लहान मुलगा पॉल यास राजपदारूढ करावयाचें ठरलें पण कॉन्स्टंटाईन अगर युवराज यांनीं राज्यावरील आपला हक्क सोडल्याचें जाहीर करीतोंपर्यंत आपण ग्रीसचें राज्यपद स्वीकारणार नाहीं असें पॉलनें जाहीर केलें. नवीन निवडणुकींत या प्रश्नावर बराच वादविवाद होऊन व्हेनीझेलासच्या पक्षाचा पराभव झाला. व्हेनीझेलासनें व त्याच्या अनुयायांनीं ग्रीस सोडून परदेशीं जावयाचें ठरविलें. कॉन्स्टंटाईन राजा पुन्हां ग्रीसमध्यें आला व त्यानें राज्यपद स्वीकारलें. कॉन्स्टंटाईननें राज्यपद स्वीकारल्यामुळें दोस्त राष्ट्रांनीं ग्रीसला कोणतीहि मदत न करण्याचें ठरविलें. इकडे मुस्तफा कमालपाशा यानें अनाटोलियामध्यें तुर्कस्तानची सत्ता वाढविण्याचा प्रयत्न चालविला होता. दोस्त राष्ट्रांनींहि कॉन्स्टंटाईन यानें राज्यपद स्वीकारल्यामुळें सेव्हर्सच्या तहाची पुनर्घटना झाली पाहिजे असें जाहीर केलें व केमालपाशाची बाजू घ्यावयाचें ठरविलें. लंडन येथें इंग्लंड, फ्रान्स, इटली या त्रिकूटाची बैठक भरली. त्या बैठकीला कान्स्टंटिनोपल व अंगोरा येथील दोन प्रतिनिधिमंडळें हजर होतीं. ग्रीसतर्फे कलोजरोपालस हा हजर होता. या बैठकीमध्यें बराच वादविवाद झाला पण ग्रीसच्या प्रतिनिधींचें कोणत्याच अटींनीं समाधान होईना. तेव्हां या परिषदेनें ग्रीसच्या प्रतिनिधीला आपल्या अटी कळविल्या. त्यांतील मुख्य अटी अशा होत्या कीं, ग्रीसकडे थ्रेसमधील मुलुख रहावयाचा, स्मर्नाचा राज्यकारभार संयुक्तमंडळातर्फे चालावयाचा व राष्ट्रसंघानें आपला एक गव्हर्नर या प्रांतावर देखरेख करण्याकरितां ठेवावयाचा. या अटींना ग्रीसनें संमति दिली नाहीं. उलट थोडक्याच दिवसांत ग्रीसच्या सैन्यानें अंगोरा रेल्वे लाईनवरील हिसर व एस्कीशेहर हीं शहरें आपल्या ताब्यांत घेतलीं. एस्कीशेहरजवळ तुर्की सैन्यानें ग्रीक सैन्याचा मोठा पराभव केला.

यावेळीं गोनारेस हा ग्रीसचा मुख्य प्रधान होता. यानें ग्रीसच्या अंतस्थ कारभारांत पुष्कळच सुधारणा घडवून आणल्या होत्या. कॉन्स्टंटाईन राजाला स्मर्ना आपल्या केव्हां ताब्यांत घेईन असें झालें होतें. तुर्कस्तानमध्यें व इंग्लंडमध्यें कांहीं बाबतींमुळें वितुष्ट उत्पन्न झालें होतें. ही संधि साधून कॉन्स्टंटाईननें स्मर्नावर स्वारी करून तें आपल्या ताब्यांत घेतलें व कान्स्टांटिनोपलचा बादशहा असल्याचें जाहीर केलें. ग्रीस व तुर्कस्तानमधील या बेबंदशाहीला आळा घालण्याचा पुन्हां दोस्त राष्ट्रांनीं प्रयत्न केला. पण त्या प्रयत्नास यश आलें नाहीं. ग्रीसनें तुर्कस्तानविरुद्ध आपलें चढाईचें धोरण चालूच ठेवलें व एस्कीशेहर, हिसर, कुतहिया हीं शहरें काबीज केलीं. पण शेवटीं हिसर येथें तुर्कस्ताननें ग्रीक लोकांना जोराचा प्रतिकार करून ग्रीसला थोपवून धरलें.

मे इ. स. १९२१ ते ऑगस्ट इ. स. १९२४ या कालाच्या अवधींत ग्रीसमध्यें पुष्कळ महत्त्वाचीं स्थित्यंतरें घडून आलीं. ग्रीसनें या काळांत इटली व तुर्कस्तान यांच्याशीं युद्ध केलें. खुद्द ग्रीसमध्यें क्रांति होऊन कॉन्स्टंटाईन व त्याचा मुलगा जार्ज या दोन्हीं राजांची उचलबांगडी करण्यांत आली व प्रजासत्ताक राज्याच्या कल्पनेला अनुकूल वातावरण तयार झालें.

तुर्कस्तानशीं लढा.—इ. स. १९२१ च्या मे महिन्यांत आशियामायनरमध्यें ग्रीक सैन्यानें बरेच दंगेधोपे सुरू केल्यामुळें त्याच्या त्या पुंडाईबद्दल पोर्टनें तक्रार केली. जून मध्यें ग्रीकांनीं आशियामायनरमधील काळ्या समुद्रावरील एरेगली व इनेबोली या बंदरांवर तोफांचा मारा केला. हा मुलुख सर्वांना खुला असल्याचें दोस्त राष्ट्रांनीं ठरविलें होतें.

असें असता, ग्रीकांनीं या तटस्थ मुलुखांतील शांततेचा भंग केला व दोस्तांच्या अटींविरुद्ध आचरण केलें अशी पोर्टेनें तक्रार केली. अर्थातच ब्रिटन, फ्रान्स व इटली यांनीं हा प्रश्न सोडविण्याचें मनावर घेतलें. ग्रीक लोकांनीं आशियामायनर वरील आपला हक्क सोडून द्यावा असें फ्रेंच सरकारचें म्हणणें होतें पण ग्रीक लोक त्या म्हणण्याला तयार होईनात. ग्रीस व तुर्कस्तान यामध्यें शांतता प्रस्थापित करण्याचा युद्ध हाच काय तो उपाय आहे असें ग्रीकांचें म्हणणें होतें पण तें कोणालाच पसंत पडलें नाहीं. तरी पण ग्रीसनें या अपूर्ण चढाई करून कुतहिया व एस्कीशेहर येथें जय मिळविले. या जयानीं हुरळून जाऊन अथेन्समधील वर्तमानपत्रकारांनीं कॉन्स्टांटिनोपलवर ग्रीसचाच हक्क आहे व ग्रीसला तें परत मिळालें पाहिजे अशी जुनी हाकाटी पुन्हा मारण्यास सुरवात केली. १९२१च्या ऑगस्टमध्यें अंगोरावर ग्रीकांनीं विमानांतून बाँब फेंकण्यास सुरवात केली व त्यामुळें केमलपाशाला तें शहर सोडणें भाग पडलें. पण सप्टेंबर महिन्यात ही स्थिति पालटूं लागली. तुर्की सैन्यानें त्यांना जोराचा प्रतिकार करून त्यांच्या सैन्याची दुर्दशा केली त्यामुळें अंगोरा हस्तगत करण्याचा ग्रीकांचा बेत फसला. फ्रान्स व इटली या राष्ट्रांनीं या झगड्यांत भाग न घेण्याचें ठरविल्यामुळें ग्रीक लोकांनीं युद्धतहकुबी घडवून आणण्याबद्दल दोस्त राष्ट्रांना विनंति केली. तुर्कांना सारखे विजय मिळूं लागल्यामुळें, ग्रीक लोक नामोहरम झाले. हें पहाताच ग्रीक व बल्गेरिया याच्या सरहद्दीवर ग्रीक व बल्गेरियन लोकांत चकमकी होऊं लागल्या रुमानिया व जुगोस्लाव्हिया या राष्ट्रांनीं ग्रीसला मदत करण्याचें ठरविलें. पण आक्टोबरमध्यें ग्रीक लोकांची नागी बरीच खाली उतरली आर्थिक व लष्करीदृष्ट्या हमी म्हणून ॲनटोलियाचा मुलूख आपल्या लष्कराच्या ताब्यांत रहावा असें ग्रीकचें म्हणणें पडलें. पण ही सुबुद्धि ग्रीकांना अगोदर सुचली नाहीं. तुर्क लोकांनीं याच्या म्हणण्याकडे लक्ष्य न देता ग्रीकांच्या ताब्यांत असलेल्या शेंकडों खेड्यांचा विध्वंस केला व त्यांतील लोकांची कत्तल केली. तेव्हां ग्रीक लोक थोडेसे शुद्धीवर आले व १९२२ च्या एप्रिल महिन्यात त्यांनीं तहाची वाटाघाट करण्यास सुरवात केली. दोस्त राष्ट्रांनीं तहाचा कच्चा मसुदा तयार केला पण ग्रीस व तुर्कस्तान या दोन्ही राष्ट्रांना तो पसंत पडला नाहीं. शेवटीं बरीच भवती न भवती होऊन १९२३च्या आगस्टमध्यें लॉसेन येथें दोन्ही राष्ट्रांत तह घडून आला.

१९२२ च्या एप्रिलमध्यें राजपक्ष व आशियामायनरमधील ग्रीक राष्ट्रसंरक्षक कमीटी यामध्यें बेबनाव माजला या कमीटींत व्हेनीझोलासच्या पक्षाचे पुष्कळ लोक होते. त्यांनीं अंगोरा सरकारच्या घटनेबरहुकुम आयोनियन सरकार स्थापन करण्याची धमकी घातली. सप्टेंबर महिन्यात ग्रीक आरमारी व लष्करी सैन्यानें कॉन्स्टंटाईन राजाला पदच्युत करून त्याच्या जागीं त्याच्या प्रिन्सला गादीवर बसविलें. कॉन्स्टंटाईन हा १९२३ च्या जानेवारींत मरण पावला. पण बंडखोर ग्रीक सैन्यानें कॉन्स्टंटाईनला पदच्युत करूनच न थांबता मागीं मंत्रिमंडळांपैकीं पुष्कळांचा शिरच्छेद केला त्यामुळें दोस्तराष्ट्रांची ग्रीसविषयींची सहानुभूति नष्ट झाली.

१९२०–२३ च्या दरम्यान ग्रीसची आर्थिक स्थिति फारच वाईट झाली होती. १९२३ च्या फेब्रुवारींत ग्रीसनें राष्ट्रसंघाकडे एक कोटी पौंडाचें कर्ज मिळण्यासाठीं हमी राहण्याबद्दल विनंति अर्ज पाठविला १९२३ मध्यें कम्युनिस्ट पक्षानें अथेन्समध्यें मोठा संप केला.

ग्रीस व इटली यामधील लढायाची माहिती इटली या लेखांत आलीच आहे. इटलीनें नुकसानभरपाईखातर ग्रीसवर जबर अटी लादल्या होत्या व ग्रीसनेंहि त्या नाइलाजास्तव मान्य केल्या होत्या पण इटलीचें निशाण ग्रीसमध्यें फडफडविण्यासंबंधींची अट मात्र ग्रीसनें अजीबात मान्य केली नाहीं.

ग्रीसमधील अंतस्थितिः—इ स. १९२३ मध्यें, निवडणुकींमध्यें जो पक्षपात होत असे तो नष्ट व्हावा यासाठीं सैन्यानें बंड केलें, पण तें बंड मोडण्यांत आलें. इ स. १९२३ च्या डिसेंबरमध्यें राष्ट्रीय सभेनें ग्रीसला कशा प्रकारची शासनपद्धति पाहिजे हें नक्की ठरेतोंपर्यंत ग्रीसच्या राजानें बाहेर कोठेंतरी रहाण्यास जावें असें ठरविलें त्याचप्रमाणें ग्रीसचा राजा जॉर्ज यानें रुमानियाची वाट धरली. राजाच्या गैरहजेरींत ॲडमिरल कौंडोरियोटिस याला रीजंट नेमण्यांत आलें पुढें इ स १९२४ मध्यें व्हेनीझोलास याला मंत्रिमंडळ बनविण्यासाठीं विनंति करण्यांत आली. पण व्हेनीझोलासनें मंत्रिमंडळ बनवून थोडे दिवस लोटतात न लोटतात तोंच नवीन संकट उपस्थित झालें प्रजापक्षानें ग्रीक राजघराण्याची सत्ता संपुष्टांत आल्याचें राष्ट्रीय सभेकडून वदविण्याचा घाट घातला यामुळें व्हेनिझोलासच्या मंत्रिमंडळाला मार्चमध्यें राजीनामा देणें भाग पडलें या अंदाधुंदींतून मार्ग काढण्यासाठीं, नेमस्त राजपक्षीयांचें एक मंडळ स्थापन झालें. त्या मंडळानें प्रजासत्ताक राज्यपद्धति स्थापन करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें जॉर्ज याला विधिपूर्वक पदच्युत करण्यांत आल्याचें जाहीर करण्यांत आलें. इ स १९२४ च्या मे महिन्यात जॉर्जनें राजसत्ता स्थापित करण्याबद्दल मागणी केली पण त्या गोष्टीला लोकमत अनुकूल पडलें नाहीं

मॅसिडोनिया प्रांत हा जुगोस्लाव्हियसच्या ताब्यांत आहे तो पुन्हा स्वतंत्र व्हावा या हेतूनें तेथें नवीन चळवळ सुरू झालेली आहे. सप्टेंबरमध्यें मॅसिडोनियांतील बंडखोर सैन्याचे अधिपति होडॉट अलेक्झांड्रोफ याचा मॅसिडोनियांतील विरुद्ध पक्षाकडून खून करण्यांत आला खुनी इसमाला तात्काल पकडण्यांत येऊन त्याचा शिरच्छेद करण्यांत आला.

इ. स. १९२४ च्या जुलै महिन्यांत एका ग्रीक सेनापतीनें ‘१७ बल्गेरियन शेतकऱ्यांची कत्तल केली त्यामुळें

ग्रीस व बल्गेरियात तटा उपस्थित होऊन तें प्रकरण राष्ट्रसंघाकडे निकालाकरतां आलें तेव्हां या तंट्याचा निकाल लावण्यासाठीं, राष्ट्रसंघानें एक न्यूझालंडचा व एक बेरजमचा तज्ज्ञ असा दोन तज्ज्ञांची कमिटी नेमिली आहे

[संदर्भग्रंथ :फनले-अर्ली हिस्टरी ऑफ ग्रीस (ऑक्स १८७७) ग्रोट्स-हिस्टरी ऑफ ग्रीस, महाफी-सोशल लाइफ इन ग्रीस, रॅंबल्स अँड स्टडीज इन ग्रीस, हिल-हँडबुक ऑफ ग्रीक अँड रोमन कॉइन्स, ग्रीनिज-हँडबुक ऑफ ग्रीक कॉन्स्टिट्यूशनल हिस्टरी ( मॅकमिलन १८९६ ), बेंट- मॉडर्न लाइफ अँड थॉट अमंग दि ग्रीक्स ( लंडन १८९१ ), रॉड-दि कस्टम्स अँड लोअर ऑफ मॉडर्न ग्रीस ( लंडन, १८९२ ), केनेथ ब्राऊन-कॉन्स्टंटाइन किंग अँड ट्रेटर ( १९१७ ), कॅसाविटी-हेलास अँड दि बाल्कन वार्स ( १९१४ ), मेरियट-दि ईस्टर्न क्वश्चन ( १९१८ ), मार्टिन-ग्रीस ऑफ दि ट्वेंटिएथ सेंचरी ( १९१३ ), रॅंकीन-दि इनर हिस्टरी ऑफ दि बाल्कन वार्स १९१४ ]

ग्री क वा ङ्म य —प्राचीन ग्रीक वाङ्मय हें स्वतःसिद्ध आहे यामध्यें दुसऱ्या कोणत्याहि वाङ्मयाचा भाग भाषांतरानें अथवा रूपांतरानें आलेला नाहीं हें वाङ्मय म्हणजे ग्रीक समाजाची बाल्यावस्था, तारुण्य व ऱ्हास यांचें चित्र आहे हें सर्वांगयुक्त आहे ग्रीक भाषेच्या ज्या तीन मुख्य उपभाषा ' आयोनियन ' ' एओलियन ' व ' डोरियन ' या तिन्ही मिळून या वाङ्मयास पूर्णत्व आलें आहे

सध्या आपल्याला होमरच्या काव्यापासूनचेंच वाङमय उपलब्ध आहे याच्या पूर्वी पुष्कळ गाणीं प्रचलित असावीं असें दिसतें पहिलीं गाणीं निरनिराळ्या ऋतूंवर रचलेलीं असावीं यानंतर निसर्गाच्या निरनिराळ्या शक्तींस दैवतें कल्पून त्यांच्या स्तुतिपर गाणीं प्रचारात आलीं हीं पारमार्थिक स्वरूपाचीं काव्यें झालीं, परंतु कांहीं विषयांमध्यें म्हणावयाचे ऋतु वगैरे सुद्धां लौकिक स्वरूपाचे असत लौकिक काव्यास सामान्यतः आरंभ युद्धाच्या पोवाड्यापासून होतो याच पोवाड्यांचें व वीरकथांचें पुढें ऐतिहासिक महाकाव्यामध्यें रूपांतर झालें होमरनें आपलें ' इलियड ' हें महाकाव्य असेंच निरनिराळ्या वीरकथा एकत्र करून तयार केलें असें म्हणतात होमरचा काल ' ॲरिस्टॉटल ' व ' ॲरिस्टार्कस ' याच्या म्हणण्याप्रमाणें खि पू १०४४ व ' हिरोडोटस ' याच्या मतानें खि पू ८५० हा आहे

हेसिअड याचीं काव्यें निराळ्या प्रकारचीं आहेत एका काव्यात त्यानें ऋतू व शेतकऱ्यांच्या कामांचें वर्णन करून शेवटीं शुभ व अशुभ दिवस कोणते तें सांगितलें आहे ' थिओगानी ' या काव्यात त्यानें देवांची उत्पत्ति वर्णन केली आहे एकंदर याच्या काव्यात त्या वेळच्या प्रचलित दंतकथा, स्तोत्रें व विश्वोत्पत्तीच्या कल्पना यांचा संग्रह दृष्टीस पडतो याचा काल अजमासें खि पू ८५०—८०० हा असावा, परंतु कांहींच्या मतें तो खि पू ७व्या शतकातला असावा कवि व ईश्वरप्रेरित भविष्यवादी हीं दोन्हींहि कामें यानें केला व हेंच तो स्वतःचें कार्यक्षेत्र समजत असे होमरच्या वेळचीं जीं ' हिम्स ' आहेत तीं प्रार्थनेचीं स्तोत्रें नसून महाकाव्यास प्रस्तावनेदाखल म्हणावयाचीं आहेत

वरील काव्यांवरून कवीचें हृद्गत स्पष्टपणें दिसून येत नसे त्याबद्दल फक्त अनुमानें काढतां येत असत हेसिअड याच्या काव्यामध्यें त्याची मनःस्थिति कांहीं ठिकाणीं आपणास ओळखू येते ग्रीक काव्याचा आरंभ महाकाव्यापासूनच होतो पुष्कळ वर्षेपर्यंत दुसऱ्या तऱ्हेचीं काव्यें कोणी लिहिलींच नाहींत कारण त्यावेळीं साम्राज्यसत्ता एका राजा ह्याच्या अथवा कांहीं वडे लोकांच्या हातांत असे त्यांनां आपल्या पूर्वजांबद्दलचीं गाणीं आवडत असत व सामान्य जनतेसहि दुसरें कांहीं वाङ्मय नसल्यामुळें हींच बरीं वाटत परंतु हळूहळू लोकसत्ताकपद्धतीचा जय होत जाऊन सर्व साम्राज्यसत्ता लोकांच्या हातांत आल्याबरोबर सामान्य जनतेचें महत्व व कार्यक्षेत्र वाढलें त्याबरोबर लोकांच्या मानसिक व कर्तृत्व शक्तींची वाढ झाली व सामान्य लोकास आपले विचार प्रकट करावेसें वाटू लागलें, पण गद्यवाङ्मय प्रचारात नसल्यामुळें हे विचार काव्यातच प्रकट होऊं लागले व त्यामुळेंच ' एलेजी ' व आयंबिक ' या चालींच्या कविता प्रचारात आल्या

ग्रीक ' एलेजी ' म्हणजे केवळ शोकगीतें नव्हत. या कवितांचे विषय निरनिराळे असून त्यांमध्यें कवीचे व त्याच्या मित्रमंडळीचे विचार प्रकट केलेले असत ' आयंबिक ' चालीचा प्रथम औपरोधिक काव्यात उपयोग करीत असत या चालीच्या काव्यामध्यें ' एलेजी ' पेक्षां जास्त स्पष्टरीतीनें कवीचें हृद्गत दिसून येतें

'एलेजी' काव्याचा उपयोग निरनिराळ्या ग्रंथकारांनीं निरनिराळ्या कामीं केला प्रथम 'कॅलिनस' व 'टिर्टिअस' या प्राचीन कवींनीं लोकांत वीरश्रीचा प्रसार करण्याच्या कामीं केला नंतर 'आर्चिलोकस' यानें याच काव्यांतून आपले मृतांबद्दलचे दुःखोद्गार काढले आयोनियन लोकांचें स्वातंत्र्य गेल्याबद्दलचा शोक मिम्नरमसयानें याच काव्यात प्रगट केला सोलन यानें याच काव्याचा उपयोग राजकीय व नैतिक बाबतींत केला थिऑग्निस यानें राजनीति व तत्वज्ञान याच काव्यातून प्रचारात आणलें झेनोफेनस यानें आपलें तत्वज्ञान याच काव्यात सांठविलें आहे सिमॉनिड्स यानें पुन्हा ( सिऑस येथील ) इराणी युद्धात पतन पावलेल्या वीरांचें शौर्य याच काव्यात वर्णन केलें 'अमॉर्गस' येथील सिमॉनिड्स यानें या काव्याचा औपरोधिक रीतीनें उपयोग केला

यानंतर लिरिक' कविता प्रचारांत आल्या या काव्यामध्यें कवीचें हृद्गत अधिक स्पष्टपणें दिसून येतें या कालात संगीताची व वाद्यांचीहि प्रगति बरीच झाली होती 'लेस्बॉस' येथील 'लिरिक' काव्यामध्यें त्या वेळची समाजाची आंदोलनें व त्याबरोबर कवींची निरनिराळ्या प्रसंगींची मनःस्थिति यांचें

स्पष्ट भिन्न दिसतें. येथील प्रमुख कवि 'अलसीअस' हा दोघे सॅफो या कवयित्रीची निरनिराळे मनोविकार वर्णन करण्याची शैली अप्रतिम आहे. वरील कवी 'एओलियन' होते. यांची चित्रें विशेषतः वैयक्तिक असत. डोरिअन कवींच्या 'लिरिक' कविता सामान्यतः सर्व समाजाचें वर्णन करीत व हीं काव्यें पुष्कळजणांनी मिळून म्हणावयाची असत. सार्वजनिक देवतार्चनाच्या वेळीं व उत्सवप्रसंगीं हीं काव्यें म्हणण्याचा प्रघात असे. यांच्या स्वरूपांत निरनिराळ्या कवींनीं सुधारणा केली. 'सिमॉनिड्स' व 'पिंडार' या दोन कवींनीं या काव्यास पूर्णत्वास नेलें.

ॲटिक.—निरनिराळ्या समाजस्थितीस अनुरूप अशा प्रकारचीं काव्यें आतापर्यंत तयार झालीं होतीं. यापुढें आणखी निरनिराळ्या प्रकाराची जरूर लोकांस भासूं लागली व त्याचें फळ म्हणजे नाटक हें होय. 'डायोनिसस' याच्या उत्सवाच्या वेळीं त्याच्या वेदीभोंवतीं लोक जमून त्याच्या पराक्रमाचें वर्णन करीत असत. त्यांचा पुढारी आपण 'डायोनिसस' याचा दूत आहों अशी कल्पना करून त्याच्या एखाद्या प्रसंगीच्या पराक्रमाचें वर्णन करी, व बाकीचे सर्व त्यास उत्तर देत. पुढें उत्तर देणारा दुसरा एक इसम निवडूं लागले. पुढें या दोहोंचे वाढतां वाढतां चार झाले व याप्रमाणें नाटकाचा आरंभ झाला.

'ट्रॅजडी' हें नांव मूळ ग्रीकड (ट्रॅगॉस) या शब्दापासून निघालें व हें नांव बोकड बळी दिल्यानंतर जें गाणें म्हणावयाचें असे त्यास मिळालें. 'कॉमेडी' याचा अर्थ खेळकळ असा आहे व हें नांव वरील गाणें इतर प्रसंगीं म्हटलें असतां त्यास लावीत. 'ट्रॅजडी' या नाटकाचा खरा आरंभ 'इस्किलस' यानें प्रथम दोन नटांस भूमिका देऊन केला व यानें संभाषणास अग्रस्थान देऊन ताफ्याच्या गायनास गौणस्थान दिलें. याच्याच वेळेस डायोनिससचें नाटकगृह बांधलें. यानंतर 'सोफोक्लिस' हा नाटककार झाला. यानें नाटकांत पुष्कळ प्रगति केली. युरिपिडिस यानें वरील नाटककाराप्रमाणें पौराणिक नाटकें न लिहितां सामान्य विषयांवर लिहिलीं. या वेळेस या नाटकांची वाट पूर्णत्वास पोंचली.

'ट्रॅजडी' ज्याप्रमाणें भारदस्त विषयावर असत त्याचप्रमाणें सामान्य विषयांवर 'कॉमेडी' रचीत असत. पहिल्या प्रकारचीं नाटकें ॲटिकामध्यें विशेष झालीं तर दुसऱ्या प्रकारच्या नाटकाची वाढ डोरिअन लोकांनीं केली. मेगारा येथील सुसारिअन यानें कांहीं प्रहसनें लिहिलीं. सायराक्यूज येथील सोफ्रन यानें कांहीं 'कॉमेडी' लिहिल्या. परंतु या नाटकासहि परिणत स्वरूप ॲटिका प्रांतातच मिळालें. यांपैकीं ॲरिस्टोफेनिस हा प्रमुख नाटककार होऊन गेला. याचीं ११ नाटकें उपलब्ध आहेत.

यानंतर 'मिडल कॉमेडी' (मध्ययुगीन नाटकें) प्रचारांत आलीं. यांमध्यें जी औपरोधिक टीका पूर्वी राजकीय गोष्टींवर होत असे तीच आतां सामाजिक गोष्टींवर व वाङ्मयावर होऊं लागली. या तऱ्हेचीं नाटकें विशेषतः 'अथेन्स' येथील 'ॲंटिफेन्स' व 'थुरी' येथील 'ॲलेक्सीस' यांनीं लिहिलीं. यानंतर 'न्यू कॉमेडी' अर्वाचीन सामाजिक नाटकाच्या धर्तीवर तयार झाली. या तऱ्हेचीं नाटकें विशेषतः मिनँडर यानें लिहिलीं.

यांपैकीं 'ओल्डकॉमेडी' हीं नाटकें वैयक्तिक टीकांनीं भरलेलीं असत व त्यांतील टीका ही फार कडक असे. हीं नाटकें धार्मिक व उत्सवाच्या प्रसंगीं करीत असत. त्यामुळें या नाटकांत केलेली टीका अगर गौरव हजारों मनुष्यांच्या तोंडीं एकदम होत असे.

ग्रीक भाषेंत गद्यवाङ्मयाचा आरंभ होण्यापूर्वीच काव्याची वाढ पूर्ण झाली होती. पहिला गद्यग्रंथकार 'हिरोडोटस' याचें नांव ऐकूं येण्यापूर्वीच नाटकाची वाढ पूर्ण होऊन गेली होती. हिरोडोटस च्या पूर्वी कांहीं ग्रंथकारांनीं गद्यामध्यें ग्रंथरचना केली होती परंतु अद्यापि गद्यवाङ्मय असें तयार झालें नव्हतें. 'हिरोडोटस याचा इतिहास' हा ज्याप्रमाणें काव्यामध्यें 'इलियड' त्याप्रमाणें गद्यामध्यें मूळ आधार आहे. याच्या इतिहासाचा विषय ग्रीस व आशिया यांच्यामधील लढाया हा आहे. हा पौराणिक गोष्टींना जरी ऐतिहासिक गोष्टींइतकें महत्त्व देत नाहीं तरी त्यांचा उल्लेख करणें अवश्य समजतो. यानें आपल्या इतिहासांत भूवर्णनहि केलें आहे. परंतु यानें राजनीतीच्या दृष्टीनें विचार केलेला दिसत नाहीं. यामुळें याच्या इतिहासांत राजकीय व शासनसंस्थांचा इतिहास आढळत नाहीं.

याचा समकालीन थुसिडाइड्स यानें 'पिलोपोनिशियन' युद्धावर एक इतिहास लिहिला आहे. याच्या इतिहासांत विचारशक्ति जास्त दिसून येते. यानें कोणत्याहि गोष्टीवर आपलें मत दिलें नाहीं व निःपक्षपातीपणानें केवळ त्या वेळीं घडलेल्या एकंदर घडामोडींच्या महत्त्वाकडे लक्ष्य देऊन लिहिला आहे.

यानंतर याच्याच पुढील काळाचा खि. पू. ३६२ सालापर्यंतचा इतिहास झेनोफोन यानें लिहिला आहे. हा स्वतः योद्धा होता व त्यानें पुष्कळ लढाया व देश पाहिले होते व तो चांगला लेखकहि होता. परंतु याच्या इतिहासास वरील इतिहासाची सर येत नाहीं व तो स्पार्टाचा पक्षपाती दिसतो. यानें कांहीं विषयांवर निबंध लिहिले. याच वेळीं 'टेसिअस' यानें इराणच्या व 'फिलिस्टस' यानें सिसिलीचा इतिहास लिहिला. यानंतर कांहीं किरकोळ इतिहासकार झाले.

ॲटिका प्रांतांत एकंदर गद्यवाङ्मयाची वाढ कशी झाली व गद्यलेखनपद्धतीमध्यें कसकशी सुधारणा होत गेली हें आपणास वक्तृत्वामध्यें चांगलें स्पष्ट दिसतें. अथेन्समधील प्रत्येक नागरिकास राजकारणांत भाग घेणें असल्यास अथवा न्यायकचेरींत स्वसमर्थन करण्याकरितां तरी

निदान सभेमध्यें भाषण करण्याची विद्या अवगत करावी लागत असे. सार्वजनिक वादविवादप्रसंगीं नागरिकांचें वक्तृत्वांतील प्रावीण्य दिसून येत असे. यामुळें ग्रीसमध्यें वाङ्मयावर वक्तृत्वाचा परिणाम विशेष झाला.या वाङ्मयाचा आरंभ सिसिलीमध्यें सायराक्यूज येथील 'कोरॅक्स ' यानें ' आर्ट ऑफ वर्ड्स ' हा ग्रंथ लिहिल्यापासून झाला. 'कोरॅक्स याचा शिष्य टिसिअस यानें हा ग्रंथ अथेन्स येथें आणला. पुढें ' सोफिस्ट ' यांच्या शिक्षणामुळें व्याकरण व तर्कशास्त्र याजकडे लक्ष्य गेलें जॉर्जिअस यानें एकंदर वक्तृत्वामध्यें ओजस्विता आणिली.

गद्यवाङ्मयास व लेखनशैलीस वळण देणारा पहिला ग्रंथकार ॲंटिफन हा होय. याची भाषासरणी गंभीर व भारदस्त असून ती परस्परविरुद्धार्थी क्रियापदावर जोर देत असे ॲंडोसाइड्स याचें महत्व फक्त ऐतिहासिक आहे याची वर्णनशक्ति चांगली आहे. ' लिसिअस ' यानें पूर्वीच्याप्रमाणें अपरिचित व क्लिष्ट भाषा वापरण्याचें सोडून सामान्य प्रचारांतील भाषा वापरण्यास सुरुवात केली. ' इसोक्रेटस ' याची भाषा ' ॲंटिफन ' व ' लिसिअस ' यांच्या दरम्यानची आहे. यानें ऐकणारापेक्षा वाचणाराकरिताच ग्रंथरचना केलेली दिसते. याच्याच भाषासरणीचें अनुकरण यानंतरच्या ग्रंथकारानीं केलेलें दिसतें. सिसरोनें ह्याचाच अंगिकार केला व पुढील अर्वाचीन वाङ्मयास वळण लावलें. इसिअस याचीं कांहीं भाषणें महत्वाचीं आहेत व त्यामध्यें ' लिसिअस 'च्या भाषाशैलीची छटा मारते. डेमॉस्थेनीस हा गद्यवाङ्मयामध्यें आपल्या सर्वांगपरिपूर्णतेनें व अलौकिक वक्तृत्वशक्तीनें सर्वोपरि स्थान करतो. त्याचीं राजकीय व सामाजिक विषयावरील भाषणें व कांहीं खटल्यांतील विषय प्रतिपादन यामध्यें त्याचें भाषेवरील प्रभुत्व स्पष्टपणें दिसून येतें.यानें गद्यवाङ्मयास पूर्णता आणली. याच्यानंतर साधारण नांव घेण्यासारखा असा हायपराइडस हा वक्ता होऊन गेला. ॲरिस्टॉटलचा शिष्य फॅलेरम येथील डेमेट्रिअस याच्यापासून ग्रीक वक्तृत्वाचा ऱ्हास होत गेला. यानें कल्पित विषयांवर भाषणें करण्याचा प्रघात पाडला. यानें अलेक्झांड्रिया येथील ग्रंथसंग्रहालयाची स्थापना केली.

यानंतर वक्तृत्वाचा अभ्यास ग्रीसच्या किनाऱ्यावर एशीयामायनरमधील वसाहतींत व विशेषतः ऱ्होड्स बेटांत चालू असे. तत्वज्ञानामध्यें ज्याप्रमाणें प्लेटो याला अग्रस्थान आहे त्याप्रमाणेंच ग्रीक वाङ्मयांतहि आहे. याच्या संभाषणामध्यें सर्वांगपरिपूर्णता दिसून येते.

ॲरिस्टॉटल याचीं भाषणें जर ग्रीक वक्तृत्वाच्या भरभराटीच्या काळांत प्रसिद्ध झालीं असतीं तर त्यांचा परिणाम ग्रीक वाङ्मयावर फार झाला असता. यानें विचारशक्तीस चालना देऊन एक नवीनच शास्त्राचा पाया घातला. याचा शिष्य थिओफ्रेस्टस यानें वनस्पतिशास्त्रावर ग्रंथ लिहून संशोधन करण्यास व शास्त्रीय वर्गीकरणपद्धतीस उत्तेजन दिलें.

ऱ्हासकाल —ग्रीक लोकांच्या राजकीय स्वातंत्र्याच्या अस्ताबरोबर ग्रीक वाङ्मयाच्या ऱ्हासास आरंभ झाला. जोंपर्यंत ग्रीक नगरसंस्था अस्तित्वांत होत्या तोंपर्यंत प्रत्येक मनुष्य हा नागरिक या नात्यानें त्या नगरसंस्थेचा एक अवयव समजला जात असे व त्या दर्जास योग्य असें त्याचें शिक्षण झालेलें असे. फिलिप राजानें जरी ग्रीक शहराचे सर्व हक्क काढून घेतले नाहींत,तरी नगरसंस्थाच्या स्वातंत्र्यास फार मोठा धक्का बसला व त्यामुळें ग्रीक नागरिकामधील पूर्वीचें स्वतंत्रतेचें वारें अस्तंगत होऊं लागलें व त्याचे हात, त्याची जीभ व त्याची कलाकौशल्याची इत्यादी हीं पूर्वीच्या स्फूर्तीनें उचलत नाहींशीं झालीं ॲलेक्झांडर याच्या स्वाऱ्यामुळें ग्रीक संस्कृतीचा पूर्वेकडे प्रसार झाला व त्याच्या वसाहतींमध्यें प्राच्य संस्कृति व ग्रीक संस्कृतीचा मिलाफ झाला. ॲलेक्झांडर याचें साम्राज्य मोडल्यावर या वसाहतींमध्यें स्वायत्त शासनसंस्थांचें तेज राहिलें नाहीं. परंतु रहाणी मात्र बाह्यतः ग्रीक राहिली ग्रीक देवळें, पुतळे, नाटकगृहें वगैरे सर्व तशींच चालू राहिलीं. ग्रीक भाषा बोलण्यांत येऊं लागली. ग्रीक पद्धतींनेंच उत्सव साजरे करूं लागले. परंतु हें एकीकरण निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळ्या प्रमाणावर झालें सीरिया प्रांत लवकर व पूर्णपणें ग्रीक संस्कृतीच्या कह्यांत आला. परंतु जुडिया प्रांत शेवटपर्यंत तीपासून अलग राहिला.

ईजिप्त देशामध्यें कित्येक ग्रीक सरदार, उच्च कुलांतील स्त्रीपुरुष व विद्वान लोक पुष्कळ दिवसांपासून रहात असत. अलेक्झांडरपासून ऑगस्टसपर्यंत अलेक्झांड्रिया हें वाङ्मयाचें व विद्वत्तेचें केंद्र होतें. तेथें पहिल्या टॉलेमीनें येथील पदार्थसंग्रहालय व विद्यालय याची स्थापना केली. व त्यावेळीं दुसरी कोणतीहि जागा नसल्यामुळें सर्व विद्वान लोक तेथें जमा होऊं लागले या कालामध्यें संशोधनाचें व वर्गीकरणाचें कार्य विशेषतः चालू होतें. या काळच्या काव्यामध्येंहि स्फूर्ति अथवा कल्पनेपेक्षा बाह्यांगाकडेच विशेष लक्ष्य दिलेलें असतें. याचीं उदाहरणें म्हणजे अपोलोनिअस ऱ्होडिअस याचें महाकाव्य व ॲरेटस आणि निकॅंडर याचीं ज्योतिष व वैद्यक यावरील काव्यें हीं होत. या कालांतली शेरिअन गोपगीतें हीं फार आल्हादकारक आहेत. या प्रकारचीं काव्येंहि लिहिण्यांत थिऑक्रिटस हा अग्रगण्य आहे परंतु याच्या काव्यांतहि कृत्रिमता दिसून येते वर लिहिल्याप्रमाणें या कालांतलें संशोधनाचें काम व शास्त्रीय विषयावरील वाङ्मय हीं फार महत्वाचीं आहेत. ॲरिस्टार्कस यानें पूर्वार्ध ग्रंथ तपासून शुद्ध करण्याचें काम केलें याच्या मागून येणाऱ्या ग्रंथकारानीं यानेंच काम पुढें चालवून व्याकरणशास्त्राचा पाया घातला. पहिलें ग्रीक व्याकरण डायोनेशिअस थ्रॅक्स याचें आहे. याच वेळेस

भाषांतर करण्याचेंहि काम झपाट्यानें चाललें होतें जुन्या करारांचें भाषांतर याच वेळेस झालें एरॅटोस्थेनीस यानें सनवार माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला व यानेंच परिणत स्वरूप मॅनेथोनें लिहिलेला ईजिप्तचा इतिहास व बेरॉसस यानं लिहिलेला खाल्डियाचा इतिहास होय. सोटर टॉलेमी याच्या कारकीर्दीत युक्लिड हा ॲलेक्झाड्रिया येथें होता. 'हेरोफिलस' व 'एरिसिस्ट्रेटस' हे प्रख्यात वैद्य व इंद्रियविज्ञानशास्त्रवेत्ते होते व यांनीं वैद्यकावर बरेच ग्रंथ लिहिले आहेत.

रोमन लोकांनीं ग्रीस देश जिंकल्यावर जरी रोमन संस्कृतीवर ग्रीक संस्कृतीचा पगडा पूर्णपणें बसला तरी ग्रीस हें कांहीं जगांतील विद्वत्तेचें केंद्र राहिलें नाहीं रोमन साम्राज्याच्या कालात अथेन्स येथील विद्यालयाची कीर्ति सर्वत्र कायम होती. परंतु हळूहळू विद्वान् लोक रोमकडे जाऊं लागले रोममध्यें ग्रीक वाङ्मयानें ख्रि पू २ ऱ्या शतकातच कायमचें ठाणें दिलें होतें 'सल्ला' यानें कांहीं ग्रीक पुस्तकें रोममध्यें अथेन्स येथून आणलीं. सिसरो व ॲटिकस यांनीं ग्रीक पुस्तकाचा मोठा संग्रह केला ग्रीक भाषेचें ज्ञान प्रत्येक रोमन नागरिकास अवश्यक झालें सीझर यानें ज्या ग्रंथसंग्रहालयाची कल्पना काढली व ऑगस्टस यानें ज्याची स्थापना केली त्यात लॅटिन व ग्रीक असे ग्रंथसमूहाचे दोन मुख्य भाग होते टायबेरिअस वगैरे बादशहांनीं हा ग्रंथ-समूह बराच वाढविला हळूहळू रोम शहर ॲलेक्झॅड्रिया शहराचें प्रतिस्पर्धी झालें व तेथें विद्वान लोकहि चोहोंकडून जमा होऊं लागले व त्यांची तेथें चहा व सन्मान होऊं लागला व त्यास उत्तेजन मिळूं लागलें ग्रीक वाङ्मयाच्या विशेषत वक्तृत्व, ग्रंथनिरीक्षण, इतिहास व तत्वज्ञान अंगाची वाढ रोम येथेंच झाली

यापैकीं लोकसत्ताक राज्याच्या अमदानींतील कालात प्रथम आपणास पॉलिबिअस याच्या रोमन स्वारीचा इतिहास आढळतो यांच्यामध्यें ग्रीक नागरिकांचें पाणी आढळतें यानंतरच्या शतकात डायोडोरस सिक्युलस याचा जगाचा इतिहास वाहेर आला या इतिहासात केवळ हकीकत सांगण्यापलीकडे ग्रंथकारानें कांहीं केलेलें दिसत नाहीं ऑगस्टसपासून जस्टिनिअनपर्यंतच्या कालातलें रोमन साम्राज्यातील ग्रीक वाङ्मय हें जास्त सर्वांगी दिसतें यावेळीं ग्रीक भाषेचा प्रसार फार दूरवर झालेला होता परंतु या वाङ्मयामध्यें एक गोष्ट दिसून येते ती ही कीं, यापैकीं मूळ अथवा अस्सल असा एकहि ग्रंथ आढळत नाहीं याला ल्युकन हाच काय तो अपवाद आहे

या वेळच्या गद्यवाङ्मयांत (१) इतिहास, भूगोल व चरित्रें, (२) टीकात्मक व शास्त्रीय वाङ्मय, (३) वक्तृत्व व उच्च सारस्वत (४) आणि तत्वज्ञान इतके प्रकार आढळतात.

इतिहासांत डायोनिशिअस, कॅशिअसडायो वगैरे ग्रंथकार प्रमुख आहेत भूगोलामध्यें निकाया येथील हिपार्कस, स्ट्रेबो, टॉलेमी, वगैरेंचीं नांवें आढळतात चरित्रें विशेषतः प्लुटार्च, डायोजिनस, लार्टियस, फिलॉस्ट्रेटस यांनीं लिहिलीं ग्रंथसंशोधन व टीका लिहिण्याचें काम ॲलेक्झँड्रिया येथें चालूच होतें यांपैकीं जुलिअसपोलक्स, हार्पोक्रेटिअन याचे कोश, हेफिस्टिऑन याचा छंद शास्त्रावरील ग्रंथ, गॅलन याच्या प्लेटोवरील टीका हे ग्रंथ प्रमुख आहेत त्याप्रमाणेंच अथेनिअस, एइलियन व स्टोबिअस याचे ग्रंथहि महत्वाचे आहेत वक्तृत्वावर हरमॅगोरास, हरमोजिनिस, कॅशिअस लॉंगिनस यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत सोफिस्ट लोकांपैकीं डायोक्रिसोस्टोम एलिअस, ॲरिस्टाइड्स वगैरे प्रसिद्ध आहेत ज्यूलिअन याचेहि ग्रंथ प्रसिद्ध आहेत. तत्वज्ञानामध्यें एपिक्टेटस आणि मार्कस आरेलियस याच्या नावांचा उल्लेख करणें अवश्य आहे यांचें तत्वज्ञान स्टोइक पद्धतीचे असे

ग्रीक काव्यामध्यें या कालात नांव घेण्यासारखें एकहि काव्य दिसत नाहीं बेब्रिअस यानें इसापच्या गोष्टी कविता-रूपात लिहिल्या सिबिलाइन आरेकल्स याच सुमारास(ख्रि पू. १७०–इ स ७००) तयार होत होतीं या वेळचें कांहीं काव्यसमुच्चय फार नावाजण्यासारखे आहेत

इसवी सनाच्या चवथ्या शतकात ग्रीक वाङ्मयाचा ऱ्हास फार जोरानें सुरू झाला दिवसेंदिवस ख्रिस्ती धर्मोपदेशकाची या प्राचीन ग्रीक वाङ्मयाकडे वक्र दृष्टी वळूं लागली ख्रिस्ती सांप्रदायिक नवें ग्रीक वाङ्मय तयार होऊं लागलें होतें. त्यामुळें गृहस्थ वर्ग ग्रीक वाङ्मयापासून हळूहळू दूर होऊं लागला ग्रीक भाषाहि रोमनसाम्राज्यकालापर्यंत शुद्ध राहिली होती ती दूषित होऊं लागला शेवटीं इ स ५२९ ऱ्या जस्टीनिअनच्या हुकुमानें सर्व ख्रिस्त संप्रदायाखेरीज अमलांतील ग्रीक विद्यालयें कायमचीं बंद झालीं

बायझंटाइन वाङ्मय –रोमच्या पूर्वेकडील साम्राज्याच्या कालात ग्रीक भाषेमध्यें जें वाङ्मय तयार झालें त्यास बायझंटाइन वाङ्मय हें नाव देतात या वाङ्मयाचा आरंभ जरी कांहीं लोक जस्टीनिअन राजापासून धरतात तरी तसें समजण्यास पुरेसा आधार नाहीं याचा आरंभ वास्तविक कॉन्स्टन्टाइन राजापासून होतो व १४५३ त कॉन्स्टांटिनोपल शहर तुर्कांच्या हातात गेल्यावर अस्त होतो या बादशहानें ख्रिस्ति संप्रदायाचा राजधर्म म्हणून स्वीकार करून कॉन्स्टँटिनोपल येथें नवीन गादी स्थापिली. याच सुमारास ग्रीक भाषेमध्येंहि फरक होऊन पूर्वीची संगीताच्या धर्तीवरची भाषा जाऊन साधी संभाषणासारखी भाषा प्रचारात आली

तथापि सामान्यत देशाच्या राजकीय अथवा धार्मिक इतिहासामध्यें जसा कांहीं कारणामुळें एकदम फरक होतो तसा बौद्धिक परंपरेमध्यें एकदम होत नाहीं याच कारणामुळें प्राचीन ग्रीक वाङ्मयाचें वर्चस्व बरेच दिवस कायम राहिलें याप्रमाणे नवीन (ख्रिस्त) सांप्रदायिक वाङ्मयास व नवीन समजुतींस व कल्पनांस आपलें वर्चस्व सर्वत्र स्थापन

करण्यास बरींच शतकें लागली. अथेन्स येथील विद्यापीठ इ. स. ५२९ पर्यंत बंद झालें नव्हतें. याप्रमाणें ४ थ्या शतकापासून ७ व्या शतकापर्यंतचा काल हा प्राचीन व मध्ययुगीन कालातील संक्रमणकाल होय. या कालांत यद्यपि नव्याजुन्या कल्पना एकत्र वावरत असून त्यांची चढाओढ चालली होती तरी नव्या कल्पनांचा उत्कर्ष स्पष्टपणें दिसत होता.

पश्चिम साम्राज्याप्रमाणें रोमनपूर्वसाम्राज्यांत संस्कृतीचा मिलाफ चांगला झाला नव्हता. पश्चिम साम्राज्यांत रोमन व ग्रीक संस्कृतींचा मिलाफ होऊन जी रोमन संस्कृति तयार झाली. तिचा प्रसार तेथील राज्यकर्त्यांनीं सर्व जित राष्ट्रांत करून सर्व साम्राज्याची भाषा लॅटिन व सर्वत्र रोमन संस्कृतीचा पूर्णपणें प्रसार केला. ख्रिस्त सांप्रदायिक प्रार्थना सर्वत्र लॅटिन भाषेमध्यें होऊं लागली व त्यामुळें हें एक जबरदस्त बंधन त्या सर्व देशामध्यें ऐक्य घडवून आणण्यास कारण झालें. पूर्वसाम्राज्याची स्थिति याच्या उलट होती. तेथें ग्रीक संस्कृति सर्वत्र पसरली असून ग्रीक भाषा सार्वत्रिक असून राजभाषा मात्र लॅटिन होती पूर्वेकडील निरनिराळ्या जित राष्ट्रांनीं आपलें राष्ट्रीयत्व कायम ठेवलें होतें व तसें करण्यास ते समर्थहि होते. या साम्राज्यांतील निरनिराळे भाग जरी ख्रिस्त संप्रदायानुयायी होते तरी त्यांनीं बायबलचें आपआपल्या भाषांत भाषांतर करून घेतलें होतें व त्यांच्या प्रार्थनाहि त्यांच्या जन्मभाषेंतच चालत. यामुळें पुढें ग्रीक संप्रदायामध्यें निरनिराळे पंथ निघाले. या लोकांनीं ग्रीक संस्कृतीचा पूर्णपणें स्वीकार केला नव्हता त्यामुळें पूर्वसाम्राज्यास केव्हांहि एकत्व आलें नाहीं.

पूर्वसाम्राज्यामध्यें जरी ग्रीक संस्कृति विशेष प्रचलित होती व पुष्कळ काळपर्यंत राजा व मंत्री हे सर्व जरी ग्रीक होते तरी त्यातील रोमन वर्चस्व पूर्णपणें केव्हांहि नष्ट झालें नाहीं. कायदेकानू व राज्यकारभाराची पद्धति ही पूर्णपणें रोमन होती व हीच पद्धति साम्राज्यावरील विकट प्रसंगींहि तशीच कायम राहिली. कांहीं ग्रीक लोकहि आपणास हेलेन्सच्या ऐवजीं रोमन्स म्हणूं लागले. ग्रीक भाषेमध्येंहि न्याय व राज्यकारभारासंबंधींचे रोमन शब्द शिरले वाङ्मयामध्यें मात्र याचा उपयोग होता होईल तो टाळून त्याच्या समानार्थी ग्रीक शब्द वापरीत.

ग्रीक संस्कृतीवर विशेष महत्त्वाचा परिणाम ख्रिस्ती संप्रदायानें घडवून आणला. परंतु हा परिणाम एकदम न होता फार सावकाश झाला. परंतु याची पूर्वतयारी जुन्या दैवतावरील विश्वास हळू हळू नाहींसा होऊन स्टोइक तत्त्वज्ञानाचा प्रसार होऊन, 'निआप्लेटोनिझम' च्या कल्पना अस्तित्वात येऊन अगोदरच झाली होती. ख्रिस्ती संप्रदायामध्येंहि कांहीं जुन्या चाली तशाच चालू ठेवून बरेंच जुनें वाङ्मयहि सामील करण्यात आलें शिक्षणपद्धति तर जुनीच कायम राहिली. प्राच्य संस्कृतीचाहि परिणाम या कालच्या ग्रीक वाङ्मयावर विशेष झाला ज्या प्राच्य संस्कृतीचा ग्रीक संस्कृतीशीं संबंध आला तिचा आरंभ अलेक्झांडर याच्या स्वाऱ्यापासून होतो. ईजिप्तमध्यें या संस्कृतीची वाढ विशेष होऊन ती बरेच दिवस टिकली. अलेक्झांड्रिया शहराच्या स्थापनेपासून तें अरब लोकांच्या हातांत पडेपर्यंत सुमारें १००० वर्षें ही संस्कृति ईजिप्तमध्यें टिकाव धरून होती. या देशानें ग्रीक वाङ्मयामध्यें फारच मोठी भर टाकली आहे.

सिरिआ व पॅलेस्टाइन हे प्रांत ईजिप्तनंतर ग्रीक संस्कृतीखालीं आले परंतु ख्रिस्ती सांप्रदायिक वाङ्मय हें येथेंच जन्म पावलें.

एशियामायनरमध्यें टार्सस, सीझरिया वगैरे शहरें ग्रीक संस्कृति व वाङ्मय यांचीं केंद्रें होतीं. याच प्रांतांतून कॅपॅडोशिया येथील तीन धर्मोपदेशक बाहेर पडले या कालीं झालेल्या एकंदर ग्रंथकारांपैकीं साधारणपणें ¾ ग्रंथकार आशिया व आफ्रिका खंडांतूनच आलेले दिसतात व बाकीचे ¼ यूरोपमधील ग्रीस देशांतील दिसतात. त्यामुळें यावेळच्या वाङ्मयावर प्राच्य संस्कृतीचाहि ठसा उमटलेला दिसतो.

प्राचीन कालानंतरच्या अर्वाचीन ऐतिहासिक कालापर्यंतचें वाङ्मय बहुतेक कोइनें नावाची जी भाषा अॅलेक्झांडरच्या कालीं प्रचारांत आली त्याच भाषेंत लिहिलेलें आढळतें. हीच भाषा बहुतेक सार्वत्रिक असून सर्व वाङ्मयामध्यें आढळते. ही भाषा लेखनामध्यें पुष्कळ दिवसपर्यंत जरी उपयोगांत येत होती तरी तिच्यामध्यें अथेन्स येथील भाषेपासून तो तहत अर्वाचीन नव्या प्रकाराच्या भाषेपर्यंतचीं निरनिराळीं रूपें आढळतात. यावरून जी भाषा लिहिण्यांत वापरीत असत तीच भाषा बोलण्याच्या प्रचारांत असावी असें वाटत नाहीं. कारण प्रत्येक चालू भाषेप्रमाणें ग्रीक भाषेची जी प्रचारांतील भाषा तिच्या रूपामध्यें वरचेवर फरक होत होता. व त्याबरोबर तिच्यांतील शब्द व तिचें व्याकरणहि बदलत होतें. व त्याचप्रमाणें व्यवहारांतील भाषा व ग्रंथाची भाषा यामध्यें पुष्कळसें अंतर पडलें. डायोनिसिअस यानें ही ग्रंथाची भाषा पुन्हा अॅटिक भाषेच्या वळणावर नेण्याचा प्रयत्न केल्यामुळें त्या भाषेला उलट गति मिळाली. कांहीं ग्रंथकारांनीं 'प्रचारांतील' भाषेंतच ग्रंथरचना केली. परंतु या तऱ्हेचे ६ व्या शतकापासून १० व्या शतकापर्यंतचे सर्व प्रयत्न फुकट जाऊन जुन्या भाषाचा उद्धार करण्याची चळवळ ९ व्या शतकांत सुरू झाली, व 'काम्नेनी' व 'पॅलिऑलॉगी' पर्यंत तशीच ती जोरांत चालली पश्चिमेकडे यावेळीं सिसरोच्या काळची लॅटिन भाषा प्रचारांत आणण्याची खटपट चालली होती परंतु तिचा तादृश परिणाम झाला नाहीं यामुळें या कालच्या (११ व्या पासून १५ व्या शतकापर्यंतच्या) सर्व ग्रंथकाराची भाषा प्राचीन ग्रीक आहे यामुळें प्रचारांतील भाषा व ग्रंथाची भाषा यामध्यें फार मोठा फरक पडला व त्याचा

परिणाम वाङ्मयावरहि झाला. बाराव्या शतकांत कांही ग्रंथकारांनीं देशी भाषेत ग्रंथरचना केली. ग्रीक भाषेंतील ग्रंथांची भाषांतरें इटालियन, फ्रेंच वगैरे भाषांत केलीं. १६ व्या व १७ व्या शतकात पुन्हां देशी भाषास ऊर्जितावस्था आणण्याचा प्रयत्न सुरू झाला. परंतु १९ व्या शतकांत पुन्हां जुन्या भाषेच्या जीर्णोद्धारार्थ चळवळ सुरू होऊन हा प्रश्न मागें पडला. यामुळें २० व्या शतकांतील ग्रंथांतहि कांहीं ग्रीक शब्दांचीं रूपें अशीं सांपडतात कीं तीं १० व्या शतकापूर्वीच प्रचारांतून गेलीं होतीं. याप्रमाणें ग्रीक वाङ्मयाची स्थिति अरबी अथवा चिनी वाङ्मयाप्रमाणेंच आहे. या कालामध्यें ख्रिस्त संप्रदायाचा सर्वत्र जोरानें प्रसार होत होता त्यामुळें या कालांतील वाङ्मयामध्यें ख्रिस्त सांप्रदायिक वाङ्मयासच अग्रस्थान मिळालें. याच्या खालोखाल ऐतिहासिक वाङ्मय येतें. त्या वाङ्मयाची वाढ साम्राज्याच्या अस्तापर्यंत सारखी चालू होती. इतर प्रकारच्या गद्य वाङ्मयाकडे म्हणजे भूगोल, तत्वज्ञान, वक्तृत्व व भौतिक शास्त्रें या विषयाकडे दुर्लक्ष्यच दिसून येतें. या विषयावरील पूर्वीचें वाङ्मय मात्र यांनीं जतन करून ठेवलें. काव्यामध्येंहि ख्रिस्त सांप्रदायिक काव्यें अग्रगण्य आहेत. लौकिक काव्यामध्यें चुटक्याची मात्र बरीच वाढ झालेली दिसते. इतरहि कांहीं चांगलीं काव्यें नजरेस पडतात.

ख्रिस्त सांप्रदायिक वाङ्मयाची वाढ ४ थ्या शतकामध्यें फार झाली. कारण यावेळीं ख्रिस्त संप्रदाय हा राजधर्म झाला व त्याच सुमारास ॲरिअस याच्या मताचा प्रचार होत होता व त्याच्या खंडनाकरितां ' ॲथॅनेशिअस ' सारख्या ग्रंथकारांनीं बरेच ग्रंथ लिहिले. ' युसेबिअस ' यानें सांप्रदायिक इतिहासास आरंभ केला व ॲंटोनिअस यानें ईजिप्तमध्यें मठांची स्थापना केली. यावेळीं प्लेटोच्या तत्वज्ञानाचा अस्त होत जाऊन ख्रिस्त सांप्रदायिक तत्वाचा प्रसार होत होता, हें विशेपतः 'सायरन' येथील 'सायनेशिअस' याच्या ग्रंथावरून स्पष्ट दिसतें. या कालांत कॅपॅडोशिआ येथील तीन धर्मोपदेशकांनीं विशेष कार्य केलें. ते महात्मा बॅसिल, निस्सा येथील ग्रेगरी, व नॅझिॲंझस येथील ग्रेगरी होत.

चवथ्या शतकानंतर सांप्रदायिक वाङ्मयाचा हळू हळू ऱ्हासच होत गेला. यानंतर निरनिराळ्या नवीन निघणाऱ्या पंथाच्या मतखंडणार्थ कांहीं ग्रंथकारांनीं लेखणी उचललेली दिसते. ५ व्या ६ व्या शतकांत ' मोनोफिसाइट्स ' पंथांतील लोकांनीं वाङ्मयामध्यें पुष्कळ भर टाकली. ७ व्या शतकात ' मोनोथेलाइट्स ' या पंथानें ही कामगिरी केली व ८ व्या शतकात इकॉनोक्लॅस्टस यांनीं व नवीन महंमदी संप्रदायानें ही कामगिरी केली. ६ व्या शतकामध्यें बायझॅंटाइन येथील ' लिओन्टिअस ' या ग्रंथकारानें प्रथम या सांप्रदायिक वाङ्मयामध्यें ॲरिस्टॉटल याच्या व्याख्यांचा उपयोग केला. गाझा येथील ' प्रोकोपिअस ' यानें ग्रंथसंशोधन व टीका लिहिण्याचें काम केलें. 'जोहॅनिस क्लिमॅक्स' यानें निवृत्तीपर वाङ्मय लिहिलें. जोहॅनिस मॉस्कस याच्या ग्रंथावरून त्यावेळच्या मठांतील भिक्षूंची राहणी त्याच्याच शब्दांमध्यें वर्णन केल्याप्रमाणें दिसते. दमास्कस येथील जॉन यानें इकॉनोक्लॅस्ट या पंथाविरुद्ध लेख लिहिण्याचें काम करून शिवाय ' ज्ञाननिर्झर ' या नांवाचा एक विद्वत्ताप्रचुर ग्रंथ लिहिला. ग्रीक ख्रिस्त संप्रदायामध्यें हा ग्रंथ आदर्श मानतात. यानंतरचें सांप्रदायिक वाङ्मय म्हणजे पूर्वींच्याच ग्रंथावरील टीका व संशोधनात्मक स्वरूपाचें होतें. या कालच्या लेखकामध्यें बादशहा सहावा लिओ, थीओडोरस, फोटिअस वगैरे नांवें प्रामुख्यानें पुढें येतात. कामेनी बादशहाच्या अंमलाखालीं सांप्रदायिक वाङ्मयास पुन्हा थोडेसें चालन मिळालें. यावेळीं क्लिमॅकोनस याचा ' पेनोप्ली' हा ग्रंथ बाहेर आला. महंमदी संप्रदायाच्याविरुद्ध बादशहा मॅन्युअल दुसरा पॅलिऑलोगस यानें पुष्कळ चळवळ केली. शेवटीं शेवटीं सर्व सांप्रदायिक वाङ्मयाचा विषय रोमशीं ऐक्य करावें कीं नाहीं हा होता. ऐक्याच्या बाजूनें बेसॅरिअन हा असून त्याचा प्रतिस्पर्धी मार्कस युजेनिकस हा होता.

या कालांत साधुसंतांचीं चरित्रें व त्यांचीं कार्यें वर्णन करणारें एक स्वतंत्रच वाङ्मय तयार झालें. यापैकीं बरेचसें वाङ्मय सिथियन मेटॅफ्रेस्टस यानें संपादन केलें आहे. अलेक्झाड्रिया येथील अथॅनॅशिअस यानें सेंट ॲंथनी याचें चरित्र लिहिलें आहे.

ग्रीक काव्यरचनेच्या ठरांवक स्वरूपामुळें ख्रिस्त सांप्रदायिक काव्याच्या वाढीस आरंभीं बराच अडथळा झाला. याचा आरंभ अलेक्झाड्रिया येथील क्लेमेंटपासून त्याच्या पेडॅगॉगसबरोबर जीं कांहीं हस्तलिखित स्तोत्रें चालत आलीं तेंव्हापासून होतो. यानंतर ' कुमारींचें गीत ' बाहेर आलें. निझीॲंझस येथील ग्रेगरी याचीं गीतें क्लिष्ट असल्यामुळें प्रार्थनेंत सामील झालीं नाहींत. यानंतर 'समगतिक'कविता प्रचारांत आल्या व या कविता प्रचलित भाषेस योग्य असल्यामुळें लोकांस आवडूं लागल्या. प्रथम स्तोत्रें अस्तित्वांत आलीं व त्याची हळू हळू वाढ होऊन ६ व्या शतकामध्यें याची वाढ पूर्ण होऊन या कालचीं विशेपतः रोमॅनोस याचीं स्तोत्रें सर्व स्तोत्रांमध्यें श्रेष्ठ पद पावलीं.ग्रीक संप्रदायामध्यें 'ॲकॅथिस्टस' हें कुमारीवरचें काव्य ' सर्गिअस ' यानें लिहिलें होतें असें म्हणतात. यानंतर ' कॅनन्स ' हीं गीतें प्रचारात आलीं. हीं प्रथम क्रीट येथील आर्चबिशप ॲंड्रिअस यानें प्रचारांत आणलीं असें म्हणतात. दमास्कसचा, ' जॉन ' व जेरुसलेम येथील ' कॉसमस ' यांनीं या प्रकारचीं काव्यें पुष्कळ लिहिलीं. यांचीं काव्यें फार लोकप्रिय होऊन त्यांवर टीकाहि बऱ्याच झाल्या यानंतर दुसरेहि कांहीं नावाजण्यासारखे कवी झाले. रोमजवळील ग्रोटाफेरॅटा याचा मठ हें या काव्याचें आगर होतें.

लौकिक वाङ्मयामध्यें विशेपतः ऐतिहासिक वाङ्मयाची वाढ विशेष झाली कारण ग्रीक लोकांनीं आपल्या निरनिराळ्या

पालटलेल्या स्थितीमध्यें आपला पूर्वीपासूनचा इतिहास लिहून ठेऊन तो पुढच्या पिढीच्या हवाली केला आहे. यामुळें यांचें ऐतिहासिक वाङ्मय हिरोडोटसपासून दुसऱ्या सुलतान महमुदापर्यंत अखंड चालू राहिलें. या ऐतिहासिक वाङ्मयाचे दोन भाग करता येतात. (१) इतिहासकारानें आपल्याच कालाचा अथवा आपल्या पूर्वी नुकत्याच लोटलेल्या कालाचा लिहून ठेवलेला इतिहास; व (२)सर्व जगाचा संक्षिप्तरूपानें दुसऱ्या ग्रंथावरून तयार केलेला इतिहास या दुसऱ्या प्रकारचा ख्रिस्ती सांप्रदायिक दृष्टीनें विशेष उल्लेख करण्यासारखा इतिहास म्हटला म्हणजे जस्टस टायबेरियस याचा होय. याचा आरंभ मोझेसपासून होत असून तो इसवी सनाच्या दुसऱ्या शतकात लिहिला गेला होता. हा अनुपलब्ध आहे.

*या कालातील तत्कालीन इतिहास हे पूर्वीच्या इतिहासा*प्रमाणेंच आहेत. मात्र यामध्यें ख्रिस्ती साप्रदायिक छटा *मारते. कॉन्स्टन्टाइनच्या कालापासून साम्राज्याचा इतिहास* लिहिण्याचें काम—साम्राज्य जरी रोमन होतें तरी–ग्रीक *लोकच करीत यापैकीं ' युनॅपिअस ', ' ऑलिंपिओडोरस '* 'प्रिस्कस'वगैरेंच्या इतिहासाचे फक्त काहीं भाग शिल्लक आहेत. ६ *व्या शतकामध्यें या वाङ्मयास* बरेंच चालन मिळालें. ' प्रोकोपिअस ' व ' अॅगॅथिअस ' यानीं ' जस्टीनिअन'च्या *कारकिर्दीचें वर्णन केलें व ' थिओफेन्स ,' ' मिनॅन्डर प्रोटे*क्टर ' वगैरेंनीं या शतकाच्या उत्तरार्धाचा इतिहास लिहिला. ' इव्हॅग्रियस ' यानें ख्रिस्त संप्रदायाचा ४३१—५९३ पर्यंतचा इतिहास लिहिला. यानंतर दहाव्या शतकापर्यंत नाव घेण्यासारखा एकहि ग्रंथ तयार झाला नाहीं. सातवा कॉन्स्टंटाइन पोर्फिरो जेनिटस बादशहा यानें या वाङ्मयास उत्तेजन दिलें व याच्या कारकीर्दीत जोसेफ जेनेशिअस यानें ८१३—८८६ पर्यंतचा इतिहास लिहिला. ' जोसेफ कॅमेनिआटा ' यानें थेसोलोनिका शहराचा पाडाव कॉर्सेअर्स यानें केल्याचें वर्णन केलें आहे. तें मानवेतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. यानंतरच्या कालाचा इतिहास लिहिण्याचें काम *निरनिराळ्या ग्रंथकारांनीं केलें आहे. ख्रिस्ती धर्मयुद्धाचा* इतिहास निरनिराळ्या चार ग्रंथात आढळतो. यानंतरचा इतिहास काहीं ग्रंथकारांनीं लिहून ठेवला आहे. शेवटीं पूर्वसाम्राज्य व तुर्क यांच्या युद्धाचा इतिहास तीन निरनिराळ्या ग्रंथकारानीं निरनिराळ्या पद्धतीनें लिहिलेला आढळतो.

बायझंटाइन कालातील जगाच्या इतिहासाचें महत्त्व विशेषतः त्यांनीं पूर्वीच्या नष्ट झालेल्या इतिहासात कायम ठेवलें या दृष्टीनें फार आहे वाङ्मयदृष्ट्या याचें महत्त्व फारसें नाहीं. परंतु भाषेच्या इतिहासाच्या दृष्टीनें हे ग्रंथ उपयुक्त आहेत. या ग्रंथात काहीं चित्रेंहि असत हे इतिहास बहुतकरून मठातील जोग्यानीं लिहिलेले असत. व त्याचा उद्देश आपल्या अनुयायामध्यें लहान लहान ग्रंथ लिहून ज्ञानाचा प्रसार करण्याचा होता. यामुळें या ग्रंथाचाहि प्रसार फार दूरवर झाला. याच्यापैकीं सर्वांत जुनी बखर मलालास (६ वें शतक) याची आहे. ९ व्या शतकाच्या आरंभाच्या सुमारास जॉर्जि*अस सिन्सेलस यानें एक जगाच्या आरंभापासून* इ. स. २८४ पर्यंतच्या कालाची संक्षिप्त बखर लिहिली. याच्याच विनंतीवरून थिओफेन्स कन्फेसर यानें ही बखर इ. स. ८१३ पर्यंत आणली. यानंतर निरनिराळ्या ग्रंथकारांनीं हिचा धागा१०५७ पर्यंत आणल्यानंतर जॉर्जिअस सेड्रेनस यानें आपल्या जगाच्या बखरीमध्यें या सर्व बखरींचा समावेश केला यानंतर जॉन झोनॅरस यानें आपली जगाची बखर *लिहिली. मायकेल ग्लायकस याची बखर याच कालीं झाली. यानंतर मॅनॅलस यानें कवितात्मक बखर लिहिली. अशाच तऱ्हेची एक बखर एफ्रेमस यानें लिहिली आहे.*

भूगोल व भूपृष्ठवर्णन या विषयाकडे रोमन लोकाप्रमाणें *यांचेंहि दुर्लक्ष दिसतें. नौकानयन, प्रवास, यात्राचे* मार्गदर्शक वगैरे ग्रंथ आढळतात व काहीं स्थळाच्या याद्या दिसतात. *या कालातील* कॉसमॉस इंडिकोप्ल्युस्टस याचा ' ख्रिस्ती भूपृष्ठवर्णन ' हा ग्रंथ उपलब्ध आहे. ' कॉन्स्टॉंटिनोपलचा प्राचीन इतिहास ' या ग्रंथात कॉन्स्टाटिनोपलचें भूपृष्ठवर्णन आलें आहे.

ग्रीक तत्वज्ञानामध्यें रोमन साम्राज्याच्या काळात दोन पंथ निघाले. ते 'निओपायथागोरिॲनिझम' आणि ' निओप्लेटॉनिझम'होत. यापैकीं दुसऱ्या पंथानें ख्रिस्ती धर्मप्रसारास बराच प्रतिबंध केला. त्याच्यापैकीं शेवटचा तत्ववेत्ता प्रोक्लिअस हा अथेन्स येथें होऊन गेला (मृ. ४८५). जस्टिनिअन यानें इ. स. ५२९ मध्यें अथेन्स येथील विद्यापीठ बंद केल्यामुळें या तत्वज्ञानाच्या प्रसारास जबरदस्त धक्का पोहोंचला. यानंतर तात्त्विक वाङ्मय ॲरिस्टॉटलचीं तत्वें ख्रिस्ती संप्रदायास लागू करून त्यास व्यवस्थित रूप देण्यामध्यें व पूर्वीच्या ग्रंथावर टीका लिहिण्यामध्यें तयार झालें.बायझंटिअन येथील ' लिओंटिअस ' *यानें आधींच ॲरिस्टाटलचा प्रवेश केला* होता.परंतु ख्रिस्त साप्रदायिक तत्वज्ञानाचा वास्तविक आरंभ दमास्कस येथील जॉन यानें केला. परंतु त्याचें हें काम लवकरच बंद पडलें. यानंतर ११ व्या शतकात या वाङ्मयाचें पुनरुज्जीवन झालें व मायकेल सेलस यानें प्लेटो व ॲरिस्टॉटल याच्या मताचा अभ्यास पुनः सुरू केला. वक्तृत्वाचें अध्यापनाच्या दृष्टीनें महत्व वाढून या काळात वाङ्मयाच्या या अंगाची वाढ विशेष झाली. परंतु त्यात *कृत्रिमता अतिशय दिसून येते.* भाषेची ठराविक पद्धति व नियम अक्षरशः पाळण्याची चाल पडल्यामुळें *त्याचा इतर वाङमयावरहि* अनिष्ट परिणाम झाला. व भाषेमधील वैयक्तिक वैचित्र्य व साधेपणा *याचा लोप झाला. तथापि ' फिलोपॅट्रिस ' 'टिमॅरिऑन'* व ' जर्नी टु दि अंडर वर्ल्ड ' (पाताळाचा प्रवास) हे ग्रंथ नावाजण्यासारखे आहेत. याशिवाय ' *मायकेल अकॉमिनॅटस ' याचीं काहीं* भाषणें प्रसिद्ध आहेत.

*या काळात जें एकंदर टीकात्मक वाङ्मय तयार झालें* त्याचें भाषाशास्त्रदृष्टीनें महत्व फार आहे. फेक्टिअस याचा

लायमरी हा ग्रंथ याचें उदाहरण आहे.यानंतर सुइडास याचा 'लेक्सिकन' हा ग्रंथ येतो. 'सुस्टेथिअस' व 'ओहॅनिस झेझस' त्यांचेहि ग्रंथ महत्त्वाचे आहेत. मात्र यांच्यामध्यें पूर्ण विरोध आहे. दुसरेहि कित्येक वैयाकरण व टीकाकार होऊन गेले.

जस्टिनिअन यानें सर्व कायदा एकत्र केल्यावर त्याचें मूळचें रोमन स्वरूप व भाषा जाऊन त्याचें रूपांतर होण्यास आरंभ झाला. इन्स्टिटयूट्स व डायजेस्ट यांचीं ग्रीक भाषांतरें होऊन 'नॉव्हेल्स' ग्रीकमध्यें निघूं लागलीं. परंतु मॅसिडोन घराण्याच्या कारकीर्दींत पुनः जस्टिनिअन याचा कायदा अमलांत आणण्याची प्रवृत्ति दिसूं लागली. परंतु सहावा लिओ व सातवा कॉन्स्टंटाईन याच्या कारकीर्दींत सर्व कायद्याचें 'बॅसिलिका' या नांवानें एकीकरण होईपर्यंत हीस व्यवस्थित स्वरूप आलें नाहीं. पूर्व साम्राज्यामध्यें जस्टिनिअन याचें 'कॉर्पस ज्यूरीस' जाऊन त्याची जागा 'बॅसिलिका' कायद्यानें घेतली. निवळ सांप्रदायिक नियम प्रथम 'कॅनन'मध्यें असत. ते लौकिक कायद्यामध्यें सामील केले जाऊन 'नोमोकॅनॉन' हा ग्रंथ तयार झाला. 'थिओडोरस बेल्स्टस' यानें १०९० मध्यें संपादन केलेली याची प्रत फार महत्त्वाची आहे.

ग्रीक लोकामध्यें गणित व ज्योतिष या विषयाच्या ज्ञानाचें पुनरुज्जीवन होण्यास इराणी व अरबी लोकांचा परिचय कारण झाला. 'टॉलेमी' याचा 'मेटसिंटॅक्सिस' हा ग्रंथ 'अलमॅगेस्ट' या नांवानें पूर्वेकडे प्रचलित होता. इसवी सनाच्या तेराव्या शतकाच्या अखेरीस ग्रीक लोकांस इराणी ज्योतिषाचें ज्ञान झालें. १४ व्या शतकाच्या आरंभीं 'गॉर्जिअस क्रिसोकोका' आणि 'ऐझाक आर्जिरस' यांनीं इराणी ग्रंथांच्या आधारें ज्योतिषविषयक ग्रंथ लिहिले. या नंतर ग्रीक लोकांचें लक्ष्य आपल्या मूळच्या ग्रंथाकडे गेलें. युद्धकलेमध्यें याचें बरेंच प्राविण्य दिसतें. या विषयावर सहावा लिओ याच्या नावाचा एक ग्रंथ प्रसिद्ध आहे.

लौकिक काव्यें सर्व पूर्वीच्या वळणावर गेलेलीं आढळतात. महाकाव्यें विशेषतः ग्रीक, प्रचलित भाषेमध्यें झालीं. परंतु त्यापूर्वीहि कांहीं काव्यास महाकाव्य हें नाव देतां येईल. 'नानस'याचें 'डायोनिससचें हिंदुस्थानास प्रयाण' हें काव्य व तोच रिस्ती झाल्यावर त्यानें सेंट जॉन याच्या शुभ वर्तमानावर लिहिलेली टीका हीं काव्यें या प्रकारचीं होत. 'गॉर्जिअस पिसिडस' याचें व 'थिओडोशिअस' याचें काव्यहि याच प्रकारचें आहे. अकराव्या शतकानंतर सांप्रदायिक व्याकरण, फलज्योतिष, वैद्यक, वगैरे विषयांवर व ऐतिहासिक आणि बोधपर कविता प्रचारांत आल्या कांहीं अद्भुत काव्येंहि आढळून येतात. हीं विशेषतः १२ व्या शतकांत 'कॉम्नेनी' राजांच्या कारकीर्दींत आढळतात. या कालांत लौकिक काव्यामध्यें 'लिरिक' काव्याची मुळींच वाढ झाली नाहीं. चुटके मात्र पुष्कळ लिहिलेले आढळतात. सार्वजनिक नाटक प्रयोगांच्या अभावामुळें नाटकाची वाढ होणें या कालांत अशक्यच होतें. कांहीं बोधपर संभाषणें मात्र आढळतात. 'ख्रिस्ताचा छळ' हा ग्रंथ काय तो नाटक या नांवास पात्र असा या कालात बाहेर पडला.

या कालांत प्रचलित अथवा देशभाषेंत लिहिलें गेलेलें वाङ्मय हें अगदींच अलग दिसतें. यामध्यें आपणास नवीन कल्पना व नवीन मध्यकालीन विषय आढळतात. या वाङ्मयामध्यें काव्य हें गुणामध्यें व विपुलतेमध्यें अग्रस्थान पटकावतें. याचा आरंभ १२व्या शतकापासून झाला. पंधराव्या शतकाच्या अखेरीस यमक प्रचारात आलें. या काव्याचे विषय विविध आहेत. राजधानीमध्यें बोधपर, स्तुतीपर विनंतीपर काव्यें प्रचलित असत. या तऱ्हेची रचना 'थ्यॉडोसिअस' या काव्यामध्यें व 'मायकेल ग्लायकस' व 'थिओडोरस पेट्रोमस' या कवींनीं केलेली आढळते यानंतर शृंगारिक काव्यें आढळतात. याखेरीज वनदेवताच्या गोष्टी, प्रार्थना, संतचरित्र वगैरे विषयावर कविता आढळते. व कांहीं महाकाव्येंहि दिसून येतात. याशिवाय प्राण्याच्या अद्भुत गोष्टींवर कविता रचलेली आहे. 'डॉयजेनिस ॲक्रिटस' याचें वीररसप्रधान महाकाव्य प्रसिद्ध आहे.

गद्य वाङमयामध्यें हिंदुस्थानातील 'सात शहाण्याचें पुस्तक' याचें भाषांतर अवश्य उल्लेखिलें पाहिजे. याखेरीज हितोपदेशाचें अरबी 'कलिल व दिमन' ग्रंथावरून भाषांतरहि प्रमुख आहे. याशिवाय जेरुसलेम व सायप्रस येथील ग्रीक कायद्यावरील पुस्तकें आढळतात. परंतु लवकरच या वाङ्मयाचा ऱ्हास होत गेला. व प्राचीन पद्धतीवर ग्रंथ लिहिण्याचाच प्रघात चालू राहिला. बायझंटाईन वाङ्मयाचें जगाच्या इतिहासामध्यें फार महत्त्वाचें स्थान आहे. रानटी लोकांचे एकामागून एक सारखे हल्ले होत असतांना पूर्वसाम्राज्यानें पूर्वीची बौद्धिक परंपरा एक हजार वर्षांवर सारखी चालू ठेवली व त्यानीं मध्यकालीन संस्कृतीचा व वाङ्मयाचा पाया घातला. त्यानीं अवगत ज्ञानाचा सर्वत्र प्रसार केला. व त्यानीं आपल्या शिक्षणानें एक पूर्वयुरोप संस्कृति नवी निर्माण केली. अखेरीस तुर्कांच्या भीतीनें यांनीं पळून येऊन आपल्या सर्व ज्ञानाचा पश्चिमेकडे प्रसार करून पाश्चिमात्यामध्यें संस्कृतीचें बीजारोपण केलें.

अर्वाचीन वाङ्मयः—तुर्क लोकानी कॉन्स्टॅंटिनोपल शहर घेतल्याबरोबर त्यांचा अंमल जेवढ्या प्रांतावर बसला तेवढ्या प्रांतामधून ग्रीक संस्कृति व वाङ्मय यांची पूर्णपणें हकालपट्टी झाली. या शहरांतून जे ग्रीक विद्वान पळून दुसरीकडे जाऊन राहिले ते तेथीलच भाषा बोलूं लागले व त्याच भाषेंत ग्रंथरचना करूं लागले. परंतु ग्रीक भाषेमध्येंहि कांहीं ग्रंथ लिहित असत. यामुळें ग्रीक संस्कृतीचा व बौद्धिक परंपरेचा लोप झाला नाहीं व तिच्यामध्यें विशेषसा खंडहि पडला नाहीं. ग्रीक लोक व पश्चिमेकडील लोक यांचें धर्मयुद्धापासून

बरेचसे संघटन होऊं लागलें होतें व फ्रँक लोकांचें त्विट्झर-मध्ये व कॉन्स्टँटिनोपल येथें राज्य असल्यामुळें त्याचा संबंध वरचेवर जात येऊं लागला होता. ख्रिस्त संप्रदायाचे जे दोन मुख्य पंथ ' ग्रीक ' व ' लॅटिन ' त्यांतील विद्वानांनीं वादविवाद करून एकीकरण करण्याचा प्रयत्न चालू ठेवला होता काहीं लोक आर्योच इटालींत जाऊन राहिले होते. यांच्यापैकीं प्रमुख ग्रीक ग्रंथकार ' लिअँटिओस पिलॅटोस ' अथवा लिओन, ' जॉर्जिअस गोमिस्टस ' अथवा क्रेथो, मॅन्युअल वगैरे होत.

तुर्क लोकांनीं सपाट जमीन आक्रमण केल्यावर क्लेफ्ट व हैडुक वगैरे लोक डोंगरात पळून जाऊन आपलें स्वातंत्र्य रक्षण करून राहिले तेथें निसर्गाच्या सहवासामुळें त्यास स्फूर्ति होऊन काहीं अगदीं नवीन काव्यें, विशेषतः पोवाडे बाहेर पडले. यांच्यामध्यें निसर्गाचें वर्णन फार आढळतें.

कॉन्स्टांटिनोपल पडल्यानंतर पुष्कळ वर्षेपर्यंत क्रीट बेट व्हेनिसच्या अमलाखालीं होतें येथें काहीं ग्रीक कवींनीं काव्यरचना केलेली आढळते, पण तीवर रोमन ठसा स्पष्ट दिसतो. या काव्याची भाषा क्रेटिओट लोकांची पोटभाषा असून तींत व्हेनिस येथील भाषेतीलाहि बरेच शब्द आढळतात. ' व्हिसेन्स कोरनॅरो ' यानें लिहिलेले ' एरोटोक्रिटोस ' हें यांपैकी आद्य काव्य असून त्यामध्यें त्या वेळची रहाणी चांगली वर्णन केलेली आहे. ' जॉर्ज चोरटॅकिस ' यानें ' एरोफाइल ' नावाचें नाटक लिहिलें आहे. निकोलस ड्रिमिटिकॉस यानें ' शेपर्डेस् ' हें काव्य लिहिलें. याशिवाय ' प्रेगोरोपौलस ' आणि ' मॅलिसीनोस ' हे कवी होऊन गेले

कॉन्स्टॅन्टिनोपल शहर तुर्कांनीं घेतल्यानंतर ग्रीक भाषेचा यूरोपमध्यें प्रसार करण्याच्या कामीं जॉन आर्गिरोप्युलीस, डेमेट्रिअस चॅलकॉंडाइल्स, कॉन्स्टन्टाइन व जॉन लॅस्कॅरिस व 'मार्कस मुसुरस' यांनीं बराच पुढाकार घेतला. यांनीं ग्रीक भाषा लोकांस शिकवून तिचा प्रसार केला. काहींनीं ग्रीक व्याकरणावर ग्रंथ लिहिले. काहींनीं जुने ग्रंथ संशोधन करून पुन्हा लिहून काढले. यांच्या श्रमामुळें व्हेनिस, रोम, पॅरिस, वगैरे ठिकाणीं ग्रंथसंग्रहालयें स्थापन होऊन संपन्न झालीं. यांची ग्रंथरचना प्रचारांतील भाषेंत नसून पूर्वीच्या ग्रंथाच्या भाषेंतच आहे. परंतु यांपैकीं कोणींहि वाङ्मयामध्यें नवीन भर टाकली नाहीं १५ व्या शतकाच्या अखेरीस प्लेटो व ॲरिस्टॉटल यांच्या तत्वज्ञानपद्धतीसंबंधीं जीं भयंकर रणें माजलीं होतीं त्यामध्यें हेहि सामील झाले होते. वास्तविक हा वाद साम्प्रदायिक असून तात्विक मुळींच नव्हता. ज्यांच्या मनातून रोमन व ग्रीक पंथाचें ऐक्य करावयाचें होतें. ते प्लेटोची बाजू घेत व त्याविरुद्ध असणारे ॲरिस्टॉटलची बाजू घेत असत. याप्रमाणें बायझंयइन कालाची पुन्हा पुनरावृत्ति झाली 'ओॅनिअस' यानें 'ॲरिस्टोफेन्स व 'युरिपिडस' यांच्या ग्रंथावर टीका लिहिली. 'एमिलिअस पोर्टोस' व लिओ 'अलॅटिओस' यांनीं पुष्कळ जुने ग्रंथ संपादन केले व टीका लिहिल्या. यांखेरीज कांहीं किरकोळ कवीहि होऊन गेले

सोळाव्या शतकात बरेचसे इतिहासकार होऊन गेले. १५ व्या शतकाच्या अखेरीस इंब्रोस येथील क्रिटोब्युलॉस यानें दुसऱ्या महायुद्धाच्या कारकीर्दीचा इतिहास लिहिला. ' एमॅन्युअल मेलॅक्सॉस ' यानें ' पॅट्रिआर्चे ' याचा इतिहास लिहिला मार्कस यानें पॅलिऑलागि ' राजाचा इतिहास लिहिला 'थिओडोशिअस झिगोमॅलस' यानें १३९१–१५७८ पर्यंतचा कॉन्स्टॅंटिनोपलचा इतिहास लिहिला. दुसरेहि काहीं सायप्रस व क्रीटचे इतिहास,प्रवासवर्णनें, संतचरित्रें वगैरे ग्रंथ आहेत याकाळीं काहीं व्याकरण, कोश वगैरे ग्रंथ लिहिले गेले परंतु उच्च सारस्वताचा बहुतेक लोप झाला.

१८ व्या शतकामध्यें पुनः वाङ्मयाचें पुनरुज्जीवन झालें कान्स्टॅंटिनोपल येथें रहाणाऱ्या फॅनरिओट ' वगैरे घराण्यातील पुरुषाच्या प्रयत्नानें व ग्रीक धर्मोपदेशकाच्या अध्ययनाच्या कामीं घेतलेल्या श्रमानें ग्रीक व्यापाऱ्यांनीं मिळविलेल्या संपत्तीनें व घरंदाज ग्रीक लोकांच्या दातृत्वानें शिक्षणाच्या सार्वत्रिक प्रसारास फार साहाय्य केलें. लोकहि शिक्षणाविषयीं फार उत्सुक होते यामुळें ग्रंथांचा व शिक्षणाचा प्रसार फार जारीनें सुरू झाला. याचेंच फळ त्यास स्वातंत्र्यरूपानें मिळालें. १८ व्या शतकामध्यें साम्प्रदायिक वाङ्मयच विशेष तयार झालें. पश्चिमेकडील विद्यापीठातून शिकून आलेले तरुण धर्मोपदेशक अर्वाचीन संस्कृतीचा प्रसार करूं लागले यावेळचे साम्प्रदायिक ग्रंथकार म्हटले म्हणजे ' एलिअस मिनिएटस: ' यानें प्रचलित भाषेंत काहीं प्रार्थना लिहिल्या 'मेलेटिऑस' यानें साम्प्रदायिक इतिहास, ग्रीसचा भूगोल वगैरे ग्रंथ लिहिले. थिओटोकस यानें साम्प्रदायिक ग्रंथाशिवाय गणित, भूगोल, पदार्थविज्ञानशास्त्र वगैरे विषयावर ग्रंथरचना केली. 'वल्गेरस' यानें पुराणवस्तु-संशोधन, तत्वज्ञान, गणित, पदार्थविज्ञान, ज्योतिष वगैरे विषयावर ग्रंथ लिहिले यानें ' इनिअड ' व ' जॉर्जिक्स ' यांचें (दुसऱ्या कॅथराईनच्या विनंतीवरून) होमरच्या धर्तीवर भाषांतर केले

या वेळीं ' कॉन्स्टंटाइन ऱ्हिगास ', ' क्रिस्टोपौलस ' व ' जेकोवस रिझोस ' वगैरे कवी होऊन गेले यानंतर ग्रीसला स्वातंत्र्य मिळाल्यावर ' पॅनॅगिओटस ' व ' अलेक्झांडर ' ' सौटझोस ' बंधु आणि ' अलेक्झांडर रिझोस ऱ्हँगॅबस ' हे कवी प्रसिद्धीस आले. यांचीं स्वातंत्र्यगीतें नावाजण्यासारखीं आहेत यांनीं निरनिराळ्या प्रकारची काव्यरचना केली आहे. या दोन बंधूंपैकीं पहिल्यानें 'लिरिक काव्यें' बरींच रचलीं व दुसऱ्यानें औपरोधिक काव्यें केलीं. अलेक्झांडर रिझोस यानें विविध काव्यरचना केली आहे त्यामध्यें पोवाडे, वर्णनें, नाटकें वगैरे असून शिवाय यानें काहीं गद्यरचनाहि केली आहे.

वरेचसें संघटन होऊं लागलें होतें व फ्रँक लोकांचें लिव्हंट-मध्यें व कॉन्स्टँटिनोपल येथें राज्य असल्यामुळें त्यांचा संबंध वरचेवर आड येऊं लागला होता. ख्रिस्त संप्रदायाचे जे दोन मुख्य पंथ ' ग्रीक ' व ' लॅटिन ' त्यांतील विद्वानांनीं वादविवाद करून एकीकरण करण्याचा प्रयत्न चालू ठेवला होता. कांहीं लोक आधींच इटालींत जाऊन राहिले होते याच्यापैकीं प्रमुख ग्रीक ग्रंथकार ' लिऑंटिओस पिलॅटोस ' अथवा लिऑन, ' जॉर्जिअस गेमिस्टस ' अथवा प्लेथो, मॅन्युअल वगैरे होत.

तुर्क लोकांनीं सपाट जमीन आक्रमण केल्यावर क्लेफ्ट व हैडुक वगैरे लोक डोंगरांत पळून जाऊन आपलें स्वातंत्र्य रक्षण करून राहिले तेथें निसर्गाच्या सहवासामुळें त्यास स्फूर्ति होऊन कांहीं अगदीं नवीन काव्यें, विशेषत: पोवाडे बाहेर पडले याच्यामध्यें निसर्गाचें वर्णन फार आढळतें.

कॉन्स्टांटिनोपल पडल्यानंतर पुष्कळ वर्षेपर्यंत क्रीट बेट व्हेनिसच्या अमलाखालीं होतें येथें कांहीं ग्रीक कवींनीं काव्यरचना केलेली आढळते, पण तीवर रोमन ठसा स्पष्ट दिसतो. या काव्याची भाषा वॅडिओट लोकांची पोटभाषा असून तींत व्हेनिस येथील भाषेतीलहि वरेच शब्द आढळतात. ' व्हिन्सेन्स कोर्नरो ' यानें लिहिलेले ' एरोटोक्रिटोस ' हें यापैकीं आद्य काव्य असून त्यामध्यें त्या वेळची रहाणी चांगली वर्णन केलेली आहे. ' जॉर्ज चोरटॅकिस ' यानें ' एरोफाइल ' नावाचें नाटक लिहिलें आहे. निकोलस ड्रिमिटिकॉस यानें ' शेपर्डेस् ' हें काव्य लिहिलें. याशिवाय ' प्रेगोरोपॅालस ' आणि ' मेलिसीनोस ' हे कवी होऊन गेले

कॉन्स्टॅन्टिनोपल शहर तुर्कांनीं घेतल्यानंतर ग्रीक भाषेचा युरोपमध्यें प्रसार करण्याच्या कामीं जॉन अर्गिरोप्युलोस, डेमेट्रिअस चॅलकॉंडाइल्स, कॉन्स्टन्टाइन व जॉन लॅस्कॅरिस व 'मार्कस मुसुरस' यानीं बराच पुढाकार घेतला. यांनीं ग्रीक भाषा लोकास शिकवून तिचा प्रसार केला. कांहींनीं ग्रीक व्याकरणावर ग्रंथ लिहिले. कांहींनीं जुने ग्रंथ संशोधन करून पुन्हा लिहून काढले. याच्या श्रमामुळें व्हेनिस, रोम, पॅरिस, वगैरे ठिकाणीं ग्रंथसंग्रहालयें स्थापन होऊन संपन्न झालीं. याची ग्रंथरचना प्रचारांतील भाषेंत नसून पूर्वीच्या ग्रंथाच्या भाषेंतच आहे. परंतु यापैकीं कोणींहि वाङ्मयामध्यें नवीन भर टाकली नाहीं १५ व्या शतकाच्या अखेरीस प्लेटो व ॲरिस्टॉटल याच्या तत्त्वज्ञानपद्धतीसंबंधीं जो भयंकर रणें माजली होतीं त्यामध्यें हेहि सामील झाले होते. वास्तविक हा वाद सांप्रदायिक असून तात्त्विक मुळींच नव्हता. ज्याच्या मनांतून रोमन व ग्रीक पंथाचें ऐक्य करावयाचें होतें. ते प्लेटोची बाजू घेत व त्याविरुद्ध असणारे ॲरिस्टॉटलची बाजू घेत असत. याप्रमाणें बायझंटाइन कालाची पुन्हा पुनरावृत्ति झाली 'ऑसीनिअस' यानें 'ॲरिस्टोफेन्स व 'युरिपिड्स' यांच्या ग्रंथावर टीका लिहिली. 'एमिलिअस पोर्टोस' व लिओ 'अलॅटिओस' यानीं पुष्कळ जुने ग्रंथ संपादन केले व टीका लिहिल्या. यांखेरीज कांहीं किरकोळ कवीही होऊन गेले.

सोळाव्या शतकात वरेचसे इतिहासकार होऊन गेले. १५ व्या शतकाच्या अखेरीस ईनॉस येथील क्रिटोब्युलोस यानें दुसऱ्या महायुद्धाच्या कारकीर्दीचा इतिहास लिहिला. ' एमेन्युअल मेलॅक्सॉस ' यानें ' पॅट्रिआर्चे ' यांचा इतिहास लिहिला फ्राक्सिस यानें पॅलिऑलॉगि ' राजाचा इतिहास लिहिला. 'थिओडोसिअस झिगोमॅलस' यानें १३९१–१५७८ पर्यंतचा कॉन्स्टॅंटिनोपलचा इतिहास लिहिला. दुसरेहि कांहीं सायप्रास व क्रीटचे इतिहास, प्रवासवर्णनें, संतचरित्रें वगैरे ग्रंथ आहेत याकाळीं कांहीं व्याकरण, कोश वगैरे ग्रंथ लिहिले गेले परंतु उच्च सारस्वताचा बहुतेक लोप झाला.

१८ व्या शतकामध्यें पुनः वाङ्मयाचें पुनरुज्जीवन झालें. कान्स्टॅंटिनोपल येथें रहाणाऱ्या फॅनरिओट ' वगैरे घराण्यातील पुरुषाच्या प्रयत्नानें व ग्रीक धर्मोपदेशकाच्या अध्ययनाच्या कामीं घेतलेल्या श्रमानें ग्रीक व्यापाऱ्यांनीं मिळविलेल्या संपत्तीनें व घरंदाज ग्रीक लोकांच्या दातृत्वानें शिक्षणाच्या सार्वत्रिक प्रसारास फार साहाय्य केलें. लोकहि शिक्षणाविषयीं फार उत्सुक होते. यामुळें ग्रथांचा व शिक्षणाचा प्रसार फार जारीनें सुरू झाला. यानेंच फळ त्यास स्वातंत्र्यरूपानें मिळालें. १८ व्या शतकामध्यें सांप्रदायिक वाङ्मयच विशेष तयार झालें. पश्चिमेकडील विद्यापीठांतून शिकून आलेले तरुण धर्मोपदेशक अर्वाचीन संस्कृतीचा प्रसार करूं लागले. यावेळचे सांप्रदायिक ग्रंथकार म्हटले म्हणजे ' एलिअस मिनिएटस. ' यानें प्रचलित भाषेंत कांहीं प्रार्थना लिहिल्या 'मेलेटिऑस' यानें सांप्रदायिक इतिहास, ग्रीसचा भूगोल वगैरे ग्रंथ लिहिले थिओटोकस यानें सांप्रदायिक ग्रंथाशिवाय गणित, भूगोल, पदार्थविज्ञानशास्त्र वगैरे विषयावर ग्रंथरचना केली. 'वल्गेरस' यानें पुराणवस्तुसंशोधन, तत्त्वज्ञान, गणित, पदार्थविज्ञान, ज्योतिष वगैरे विषयावर ग्रंथ लिहिले यानें ' इनिअड ' व ' जॉर्जिक्स ' याचें (दुसऱ्या कॅथराईनच्या विनंतीवरून) होमरच्या धर्तीवर भाषांतर केलें

या वेळीं ' कॉन्स्टंटाइन र्‍हिगास ', ' क्रिस्टोपॅालस ' व ' जेकोबस रिझोस ' वगैरे कवी होऊन गेले यानंतर ग्रीसला स्वातंत्र्य मिळाल्यावर ' पॅनॅगिओटस ' व ' अलेक्झांडर ' ' सॉटझोस ' बंधु आणि ' अलेक्झांडर रिझोस र्‍हँगेबस ' हे कवी प्रसिद्धीस आले याचीं स्वातंत्र्यगीतें नावाजण्यासारखीं आहेत यानीं निरनिराळ्या प्रकारची काव्यरचना केली आहे या दोन बंधूंपैकीं पहिल्यानें 'लिरिक काव्यें' बरींच रचलीं व दुसऱ्यानें औपरोधिक काव्यें केलीं अलेक्झांडर रिझोस यानें विविध काव्यरचना केली आहे त्यामध्यें पोवाडे, वर्णनें, नाटकें वगैरे असून शिवाय यानें कांहीं गद्यरचनाहि केली आहे.

गद्य वाङ्मयामध्येंहि या पुनरुज्जीवनाच्या काळांत पुष्कळ वाढ झाली. इतिहासामध्यें 'स्पिरिडन ट्रिकोपिस' याचा 'राज्यक्रांतीचा इतिहास' हें त्याचें अखंड स्मारकच झालें आहे. या ग्रंथकाराचें या काळच्या उलाढालींत बरेंच अंग होतें. दुसऱ्याहि कित्येक सरदारांनीं आपल्या आठवणी लिहून ठेवल्या आहेत के पॅपॅऱ्हेगेपोलस याचा ग्रीक राष्ट्राचा इतिहास नामांकित आहे सॅकेलॅरिऑस यानें सायप्रसचा इतिहास व भूवर्णन लिहिलें आहे के. ॲसॉपिऑस यानें ग्रीक वाङ्मय व इतिहास यावर ग्रंथरचना केली सांप्रदायिक वाङ्मयामध्यें 'ओइकोनॉमस' याचें नाव प्रामुख्यानें आढळतें. याखेरीज 'कॉंटोगोनेस', 'फिलोथिऑस', 'कॅस्टॉर्कस' वगैरे ग्रंथकार होऊन गेले ग्रीक राज्याची स्थापना झाल्यानंतर कायदा, अर्थशास्त्र, गणित, भौतिक शास्त्रें, प्राचीनवस्तुसंशोधन वगैरे विषयावर पुष्कळ निरनिराळे ग्रंथ बाहेर पडले.

परंतु या कालचा, ज्याची सर्व समकालीन ग्रंथकारावर छाप पडलेली दिसते व ज्यानें पुढील सर्व ग्रीक वाङ्मयाचें धोरण आखून ठेवलें असा ग्रंथकार 'ॲडॅमॅटिऑस कोरेइस' हा होय. यानें भाषाशास्त्राचा अभ्यास करून पुष्कळ जुने ग्रंथ संपादन केले व यानेंच अर्वाचीन ग्रीक भाषेचा पाया घातला.

या कालच्या ग्रीक भाषेमध्यें दोन प्रकार दृष्टीस पडतात. एक लौकिक अथवा रूढ (प्रचारांतील) भाषा व दुसरी व्याकरणशुद्ध भाषा. पहिली बोलण्यांत वापरीत व दुसरीचा उपयोग ग्रंथलेखनामध्यें करीत असत पहिली भाषा निरनिराळ्या प्रांतात थोडी फार बदललेली असे पण दुसरी मात्र प्राचीन ग्रीक भाषेपासूनच थोड्या फार फरकानें चालत आली होती. या दोन भाषांच्या पुरस्कर्त्यांमधील लढा पूर्वीप्रमाणें अद्यापहि चालला आहे यामुळें या वेळींहि ग्रीक वाङ्मयामध्यें गोंधळ झालेला आहे बोलण्याची भाषा कोठेंहि शिकविली जात नाहीं, मात्र ही सर्वत्र बोलण्यात आढळते. व ही प्राचीन भाषेपासूनच थोडथोडा फरक होऊन तयार झाली आहे. परंतु ग्रंथलेखनामध्यें या भाषेचा उपयोग करणारा कोणीहि मोठा ग्रंथकार न झाल्यामुळें ही मागें पडली एकंदर ग्रीक ग्रंथकारांची प्रवृत्ति प्राचीन ग्रंथकारांचें व त्यांच्या भाषेचें अनुकरण करण्याकडेच विशेष असे सुमारें पन्नास वर्षांपासून अर्धवट प्राचीन, अर्धवट अर्वाचीन अशीच भाषा शाळा, विद्यापीठें, लोकसभा व सरकारी कागदोपत्रीं चालू आहे या भाषेचा परिणाम सुशिक्षित जनतेच्या बोलण्यांतील भाषेवर झालेला स्पष्ट दिसत आहे. या भाषेला जरी कायमचें स्वरूप अद्याप आलें नाहीं तरी तिचें सर्व श्रेय 'कोरेइस' याच्या कडे आहे यानें लेखनाच्या भाषेपासून सुरवात करून तिच्यांतील बाहेरून आलेले शब्द काढून टाकून त्यानें कांहीं जुने व कांहीं ठराविक पद्धतीनें तयार केलेले नवीन शब्द घेऊन त्या भाषेचा शब्दसंग्रह वाढविला व अशा तऱ्हेनें मध्यम मार्ग स्वीकारून त्यानें ही भाषा प्रचारात आणली

अर्वाचीन कवींपैकीं पुष्कळांनी बोलण्याच्या भाषेमध्येंच कविता केली आहे 'डायोनिसिअस सॉलोमस' याच्या लिरिक काव्यापैकीं स्वातंत्र्यावरचें काव्य फार सरस आहे. याच आयोनियन पोटभाषेमध्यें 'ॲन्ड्रिअस कॅल्व्होस,' 'जुलिअस टिपॅल्डॉस' वगैरे कवींनीं कविता केली आहे. याखेरीज व्हॅलॅओरिट्स याच्या काव्याचा ग्रीक लोकांच्या मनावर फार परिणाम झाला याशिवाय 'व्हिलॅरेस,' 'झॅलो कोस्टस' वगैरे कवी होऊन गेले. याच वेळीं कॉन्स्टाटिनोपलमध्यें कांहीं कवींनीं प्रौढ भाषेंत काव्यरचना केली यापैकीं 'स्पिरिडिअन वॅसिलिॲड्स,' 'ॲंजेलॉस व्हलॅ चॉस' वगैरे नामांकित आहेत एकंदरींत प्रौढ भाषेमध्यें अलीकडे कोणी कविता करीनासें झालें आहे अलीकडच्या काळांत नाटकें मात्र फार आढळतात 'सौटझोस' बंधूनतर 'क्लिऑन ऱ्हँगबेस', ॲंजेलॉसव्हलॅचॉस,' डेमेट्रिऑस कोरोमेलास' वगैरेंनी बरींच नाटकें रचलेली आढळतात त्यापैकीं 'रोमिओ आणि ज्युलिअट', 'ऑथेलो' 'हॅम्लेट' 'किंग लिअर' वगैरे इग्रजी नाटकांचीं भाषांतरेंहि आढळतात

'जॉर्ज सौरेस' हा औपरोधिक ग्रंथकार होऊन गेला. यानें सामाजिक व राजकीय प्रश्नांची चर्चा केली आहे. गद्यग्रंथकारांनीं मात्र सर्वत्र प्रौढ भाषेचाच उपयोग केलला आढळतो ऐतिहासिक ग्रंथलेखन व संशोधन बरेंच झालें आहे पण महत्वाचा असा ग्रंथ झालेला आढळत नाहीं. 'स्पिरिडिअन लँप्रॉस' यानें एक इतिहास लिहिला आहे व कॅरोलाइडस् याचा १९ व्या शतकाचा इतिहास नुकताच बाहेर पडला आहे याशिवाय दुसरेहि कांहीं इतिहास प्रसिद्ध झाले आहेत कांहींचें इंग्रजींत ब्यूटच्या मार्किसनें भाषांतर केलें आहे. 'पीटर पपॅऱ्हेगोपोलस,' 'कॅलिगस' वगैरेंनीं कायद्यावर ग्रंथ लिहिले आहेत 'ब्रेल्स आर्मेनिस' व 'जॉन स्कॅल्टझोनेस' यांनीं तत्वज्ञानावर ग्रंथ लिहिले. यांतील दुसऱ्यानें डार्विनच्या विरुद्ध सिद्धांत काढले आहेत. 'डायोमिडिस किरिॲकोस' याचा खिस्तसांप्रदायिक इतिहास व 'लाटास' येथील मुख्य धर्मोपदेशकानें लिहिलेले सांप्रदायिक ग्रंथ लक्षांत घेण्यासारखे आहेत

भाषाशास्त्रावरील प्रमुख ग्रंथकार 'कान्स्टटाइन कांटोस' हा होय याखेरीज 'जॉर्ज हॉर्ट्झ डेक्स' 'थिओडोर पॅपॅडेमेट्र कोपौलोस' व जॉन सिचरि यांनींहि ग्रंथ लिहिलेले आहेत प्राचीन वस्तुसंशोधनाच्या कामीं 'स्टीफन कौमनौडस' 'पॅनॅजिऑट्स कॅव्हॅडिअस' आणि क्रिस्टोस सौंट्स' हे प्रसिद्ध आहेत

'जॉन स्व्होरोनोस' यानें नाण्याच्या संशोधनात प्राविण्य मिळविलें आहे गणितामध्यें 'जॉन हॉर्टझडेक्स',

रसायनशास्त्रात क्रिस्टोमॅनॉस व ज्योतिषामध्यें डेमोट्रिअस एग्निनेट्स् हे पारंगत आहेत.

ग्रीस देशास स्वातंत्र्य मिळाल्यानंतरच्या प्रथमच्या कालात प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यांमध्यें परकी लोकांशीं असलेल्या संबंधाचा बराच परिणाम झालेला दिसतो. अर्वाचीन ग्रीस देशात नावाजण्यासारखा कादंबरीकार कोणीच झाला नाहीं. कॅलिगस याचीं एक दोन पुस्तकें बरीं आहेत. नवीन कादंबऱ्या कोणीच लिहीत नाहींत. परंतु दुसऱ्या भाषातील कादंबऱ्यांचीं भाषांतरें बरींच होतात. डी. विकेलस यानें सुरवात केल्यापासून लहान गोष्टी प्रचारात येऊं लागल्या आहेत. बोलण्याच्या भाषेंत गद्यग्रंथरचना 'जॉन सिचारि' यानें केली आहे. यापैकीं त्याचा ग्रीकचा प्रवास प्रसिद्ध आहे. एम्. पल्ली यानें इलियडचें भाषांतर केलें आहे. या भाषेचा शास्त्रीय ग्रंथ लिहिण्याच्या कामीं कोणीहि कधींच उपयोग केला नाहीं.

अथेन्स येथें कांहीं नियतकालिकें निघतात त्यात 'कॉन्स्टंटाईन कॉटॉस' यानें चालविलेलें अथेना, हारमोनिया आणि 'एथिनके अगोगे' हीं प्रमुख आहेत. याशिवाय 'पॅर्नोसॉस' 'प्राचीनवस्तुसंशोधन' वगैरे संस्थांचीं नियतकालिकें निघत असतात.

[ संदर्भग्रंथ —ग्रीक वाङ्मयावर बरेच ग्रंथ आहेत, पण बहुतेक इंग्रजीतर यूरोपीय भाषेंत आहेत पुढील कांहीं इंग्रजी ग्रंथ उपयुक्त दिसतील. मुरे–क्रिटिकल हिस्टरी ऑफ दि लॅग्वेज ॲंड लिटरेचर ऑफ एन्शंट ग्रीस (१८५०–५७). महाफी–हिस्टरी ऑफ क्लासिकल ग्रीक लिटरेचर; सँडिस–हिस्टरी ऑफ क्लासिकल स्कॉलरशिप ( १९०६–१९०८ ), गेलडार्ट–फोकलोअर ऑफ मॉडर्न ग्रीस (लंडन, १८८४ )]

**ग्रुव्ह, सर विल्यम् रावर्ट** ( १८११–१८९६ )—हा एक कायदेपंडित आणि शास्त्रज्ञ होता. याचा जन्म साउथ वेल्समधील स्वान्सी नावाच्या गावीं झाला. खाजगी शिक्षकामार्फत याचें शिक्षण होऊन हा आक्सफोर्ड येथें गेला, व त्या ठिकाणीं सन १८३२ सालीं त्यानें साधी पदवी घेतली. तीन वर्षांनीं त्यानें आपला वकीलीचा धंदा सुरू केला; परंतु प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्याला कांहीं काळ स्वस्थ बसावें लागलें या रिकाम्या काळात त्यानें भौतिकशास्त्राचा अभ्यास करून त्यात प्रावीण्य संपादन केलें. सन १८३९ च्या सुमारास जस्तप्लॅटिनम्ची विद्युद्घटमाला त्यानें शोधून काढली, हिला 'ग्रुव्हची ब्याटरी' असें नाव देण्यात आलें; व तज्जन्य विद्युद्धनुर्दीप( आर्कलाइट )नें कित्येक स्थलें प्रकाशित करून दाखविण्यात आलीं. याचा असा परिणाम झाला कीं, त्याला प्रायोगिक तत्त्वज्ञानाचा प्रोफेसर नेमण्यांत आलें व त्यानें सुमारें सात वर्षेंपर्यंत अध्यापकाचें काम केलें विद्युद्रसायनशास्त्र आणि विद्युन्मालिका यावर त्यानें पुष्कळ परिश्रम केले आहेत व त्यात त्यानें कांहीं शोध लावले आहेत. सन १८४६ सालीं त्यानें एक पुस्तक लिहिलें. त्यांत त्यानें शक्तिनित्यत्वाचा सिद्धान्त प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला याच वर्षी त्याला रायल सोसायटीकडून "रॉयलमेडल" नावाचें पदक बक्षीस मिळालें. याप्रमाणें त्यानें शास्त्रांत प्रगति करून दाखविली तरी त्यानें आपला कायदेपंडिताचा धंदा तसाच चालू ठेविला. १८७१ सालीं त्याला जज्ज करण्यात आलें. तारीख १ आगष्ट १८९६ रोजीं हा लंडन येथें मृत्यु पावला

**ग्रे, इलिशा** ( १८३५–१९०१ )—या अमेरिकन विद्युच्छास्त्रवेत्त्याचा जन्म ओहिओ संस्थानातल्या बार्नेसव्हिल गांवीं झाला बालवयात यानें सुताराच्या दुकानात काम करून पदार्थविज्ञानशास्त्राचा अभ्यास केला; नंतर ओबरलीन कॉलेजात अभ्यास केला व १८६७ त तारायंत्रोपयुक्त अशीं दोन उपकरणें तयार करून त्यांचीं पेटन्टें घेतलीं. नंतर ध्वनिवाहक अथवा तिरोभवण ( टेलेफोन ) यंत्राविषयीं बरेच परिश्रम करून एक यंत्र तयार केलें व त्याचें पेटन्ट मिळविण्याकरिता कोर्टाकडे योग्य अर्ज केला. हा अर्ज त्या कोर्टांत दाखल होण्यापूर्वी कांहीं तास अगोदर अलेक्झान्डर ग्राहाम बेल याचा अर्ज दाखल झाला होता. अर्थातच ग्रे याचा अर्ज नामंजूर झाला आणि बेल याचा अर्ज मंजूर झाला. परंतु ग्रे यानें हें यंत्र बसविण्याकरिता जे श्रम केले व जी बुद्धिमत्ता दाखविली ती भारी लक्ष्यांत घेऊन १८७८ सालीं पॅरिसच्या प्रदर्शनात लिजन ऑफ ऑनर ही पदवी त्याला अर्पण करण्यात आली कोलंबियन प्रदर्शन नावाच्या संस्थेमार्फत विद्युच्छास्त्राची जी परिषद भरविण्यात आली तिच्या अध्यक्षत्वाचा मान याला देण्यात आला त्यानें जीं विद्युद्यंत्रें शोधून काढलीं तीं तोच तयार करीत असे. म्यासाच्युसेट्स संस्थानातील न्युटनव्हिले नावाच्या गावीं तारीख २१ जानेवारी १९०१ रोजीं तो मृत्यु पावला. एकाच तारेंतून अनेक संदेश पाठविण्याची युक्ति त्यानेंच शोधून काढली हस्तलेखवाहक नांवाचें यंत्र त्यानेंच शोधून काढलें. याशिवाय समुद्राच्या तळीं तारायंत्रानें घंटा वाजवून संदेश किंवा सांकेतिक माहिती पाठविण्याविषयीं त्यानें प्रयोग केले होते.

**ग्रे कॅनॉल**—पंजाव फेरोझपूर जिल्ह्यामधील कालवे. इ स. १८७५मध्यें याचें प्रथम काम सुरू झालें. इ स.१९०८ पर्यंत एकंदर लहानमोठे १४ कालवे होते. याची लांबी सुमारें १०३४ मैल आहे या कालव्याच्या संबंधात ध्यानात ठेवण्याजोगी गोष्ट म्हणजे ही कीं याचें सर्व काम व बहुतेक खर्च सरकारी अधिकाऱ्याच्या देखरेखीखालीं केवळ शेतकऱ्यानींच केला आहे. थोडीबहुत सरकारी मदत, सरकारी अधिकाऱ्याची देखरेख हीं आरंभीं घेतल्यानें नेहमीची देखरेख व चालू खर्च याच्या तरतुदीसाठीं तीं सरकारच्या ताब्यांत असतात

**ग्रेटनाग्रीन**—ग्रेटनाग्रीन अथवा ग्रेटनेग्रीस हें खेडें स्कॉटलंड देशांत डंफ्रिसशायर परगण्यात आहे हा गांवावरून

इंग्लंड व स्कॉटलंड देश विभागणारी ( मर्यादा निश्चित करणारी ) रेषा जाते. स्कॉटलंडमधील सर्वांत जवळचें हें खेडें असल्यामुळें ज्यांच्या लग्नास आई-बापांची अथवा पालकाची संमति मिळाली नसेल अशीं पुष्कळशीं जोडपीं पळून येथें येत. इ स. १७५४ चा कायदा पास झाल्यानंतर पळून आलेल्या जोडप्यांस साक्षी-दारासमोर लग्न करणें भाग पडे. ग्रेटनाग्रीन येथें बहुधा लोहार लग्न लावीत असे. इ स १८२६ च्या नंतर ग्रेटना हॉलमध्यें घरांच लग्नें लागलीं. लग्नाची फी कमीतकमी अर्धा गिनी असे. दरवर्षी सुमारें २०० लग्नें होत. इ स. १८५६ पासून हीं लग्नें कमी होऊं लागलीं. कारण नवीन कायद्याप्रमाणें लग्न लावण्यास तयार असलेल्या पक्षांपैकीं कोणत्याहि एकाद्या पक्षास लग्नापूर्वी तीन आठवडे स्कॉट-लंडांत रहावें लागे

**ग्रेटब्रिटन**—इंग्लंड, स्कॉटलंड व वेल्स या तीन देशांचा यात समावेश होतो. या देशाची माहिती त्या त्या देश-नामाखालीं दिली आहे.

**ग्रे थॉमस** (इ. स. १७१६–१७७१)—याचें बालपण व शिक्षण याच्या आईच्या देखरेखीखालीं ईटन व केंब्रिज येथें झालें. यानें वालपोलबरोबर यूरोपमध्यें प्रवास केला व पुढें त्याच्या मातेवर एक कविता लिहिली. याचें 'एलेजी' हें काव्य प्रसिद्ध आहे. याची एकंदर कविता फारशी मोठी नाहीं व आहे तीहि स्वयंस्फूर्त नसून दुसऱ्या कवींच्याच काव्यांतील भाषा उचलून एकत्र गोंवून केलेली आहे याला राजकवीचा मान देऊं केला होता. पण तो यानें नाकारला. यानें केल्टिक वाङ्मयाचाहि, केंब्रिज येथें अर्वाचीन इतिहा-साचा प्रोफेसर असता, अभ्यास केला व 'फेटल सिस्टर्स' आणि 'डीसेंट ऑफ ओडीन' हीं काव्यें लिहिलीं यास अद्भुत काव्याच्या प्रभातकालचा कवि समजतात. [डी. सी.टोव्ही—ग्रे अँड हिज फ्रेंड्स (केंब्रिज १८९०); एडमंड गॉस लाइफ ऑफ ग्रे (मेन ऑफ लेटर्स सीरीज);]

**ग्रेनाडा**—ब्रिटिश वेस्ट इंडीजपैकीं विंडवर्ड बेटांत अगदीं दक्षिणेकडचें बेट. हें उत्तरअक्षांश ११° ५८′ व १२° १५′ आणि पश्चिम रेखांश ६१° ३५′ व ६१° ५०′ यांमध्यें आहे. हें बेट अंडाकृति असून याची लांबी २१ मैल, रुंदी १२ मैल व क्षेत्रफळ १३३ चौरस मैल आहे. दाट झाडी असलेली पर्वतांची रांग उत्तरदक्षिण जात असून तिचें सर्वांत उंच शिखर कॅथेराईन (२७५० फूट) आहे. हें ज्वालामुखी पर्वतापासून बनलेलें बेट आहे. बेटाच्या मध्यभागीं ग्रँड एटँग नांवाचें एक सरोवर ज्वालामुखी पर्वताच्या मुखाशीं आहे. अँटाईन नांवाचें दुसरें सरोवर ईशान्येस आहे. य शिवाय लहान नद्या व ओढे, गरम पाण्याचे झरे या बेटांत आहेत. हवा चांगली आहे व पाऊस सुमारें २०० इंच पडतो. जमीन अतीशय सुपीक असून कोको व मसाले मुख्यत्वेंकरून उत्पन्न होतात. कोको, मसाले, लोकर, कापूस, कॉफी, गुरेंढोरें, कातडीं, कापूर, फळें व इमारतीचें लांकूड या मालाची परदेशांत, बहुतकरून ग्रेट-ब्रिटनमध्यें निर्गत होते. येथें साखर तयार करितात. १९१७ ची आयात ३५३९७८ पौंडांची असून निर्गत ४८०५५३ पौंडाची होती.

प्राथमिक शिक्षण वेगवेगळ्या संस्थांच्या हातांत असून त्यांस सरकारी पैशाची मदत मिळते. याशिवाय सरकारी धार्मिक शाळा व मुलींसाठीं दुय्यम शाळा आहेत. सर्व शाळांवर देखरेख ठेवण्यासाठीं सरकारनियुक्त सभासदांचें एक शिक्षण-मंडळ आहे. शाळांची फी फार थोडी आहे १९१७ सालीं ११ सरकारी व ४८ सरकारच्या मदतीनें चाललेल्या प्राथ-मिक शाळा होत्या मुलांकरिता १ दुय्यम शिक्षणाची शाळा होती. विंडवर्डबेटांचा गव्हर्नर ग्रेनाडांत राहतो. कायदे-कौन्सिलांत १४ सभासद आहेत. १९१७–१८ सालचा वसूल १०५५४० पौंड व खर्च १०८७९२ पौंड होता. इंग्रजी भाषा सर्वत्र चालते सेंट्जॉर्जेस हें राजधानीचें शहर आहे. याशिवाय गुयाव्हे अथवा शार्लट टौन, व्हिक्टोरिया सौतुर्स व ग्रेनव्हिल हीं शहरें आहेत. बेटाची लोकसंख्या (१९११) ६६७५० होती.

कोलंबसानें हें बेट १४९८ त शोधून काढलें व त्याला कन्सेप्शन हें नांव दिलें १६५० त फ्रेंचांनीं हें बेट विकत घेतलें व कॅरिब लोकांचा नायनाट केला. १७६२ त ब्रिटि-शांनीं हें बेट घेतलें व पॅरिसच्या तहान्वयें त्याच्याच ताब्यांत राहिलें १७७९ त पुन्हां फ्रेंचांनीं हें बेट घेतलें परंतु व्हर्से-लीसच्या तहानें (१७८३) तें ब्रिटिशांना पुन्हा परत मिळालें.

**ग्रेनाडाईन्स**—ग्रेनाडाईन्स बेटांची रांग वेस्ट इंडीज मधील विंडवर्ड बेटांत आहे हीं बेटें व्हिन्सेंट व ग्रेनाडा यांच्यामध्यें ६० मैलपर्यंत पसरलीं आहेत. राज्यकारभा-राच्या सोयीसाठीं सेंटव्हिन्सेंट व ग्रेनाडा यांच्यामध्यें ग्रेनाडा-ईन्स बेटें वांटून दिलीं आहेत. सेंटव्हिन्सेंटपैकीं बेक्किआ मुख्य असून त्याचें क्षेत्रफळ ६ चौ मै. आहे. कॅरिआकु ग्रेनाडा द्वीपसमूहांत असून त्याची लांबी ७ मैल, रुंदी २ मैल व क्षे फ. १३ चौ. मै. आहे. कापूस व गुरेंढोरें यांची निर्गत होते. सर्व समूहाची लोकसंख्या ( १९०१ ) ६४९७ आहे.

**ग्रोट जॉर्ज**—( १७९४–१८७१ ) हा आंग्ल इतिहास-कार केंटमध्यें १७९४ त जन्मला. त्याचें लहानपणचें शिक्षण घरीं आईनेंच केलें. पण पुढें त्याला विद्यालयातील शिक्षण मिळालें नाहीं. १८१० सालीं बापानें त्याला एका पेढीवर नोकर ठेविलें. ही नोकरी करीत असतानाच त्यानें अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, इतिहास व तसेंच ग्रीक, लॅटिन, फ्रेंच व जर्मन भाषांचें ज्ञान मिळविलें. लंडनचें पहिलें विश्वविद्या-लय स्थापन करण्यांत ( २८ आक्टोबर १८२८ ) यानें बरेच श्रम घेतले.

१८३२ सालीं तो पार्लमेंटचा सभासद झाला व सभासद असतानाच त्यानें ग्रीस देशाचा इतिहास व

विषयाचा अभ्यास केला. १८४६ पासून १८५६ पर्यंत ग्रीस देशाचा इतिहास त्यानें १२ भागांत लिहून प्रसिद्ध केला. या भागातून ग्रीस देशाची भरपूर माहिती संगतवार व सोप्या भाषेत दिली असून ग्रीसच्या इतिहासाचा स्वतंत्र अभ्यास करणें या भागाच्या प्रसिद्धीपासून शक्य झालें आहे. ग्रोट हा प्रामाणिक, आत्मसंयमी, विचारी व सहनशील होता. तत्वज्ञानावर काहीं ग्रंथ लिहीत असतानाच१८७१साली तो मरण पावला.

**ग्लॅडस्टन जॉन हॉल** (१८२७–१९०२ )—हा इंग्रज रसायनशास्त्रज्ञ लंडनमधील हॅकनी येथें जन्मला. लहानपणापासून त्याला शास्त्रीय विषयाची आवड होती. त्याला भूस्तरशास्त्र फार आवडत असे. परंतु त्याच्या बापाच्या मतानें त्यांत विशेष उत्कर्ष होण्यास वाव नसल्यामुळें त्यानें लंडन येथें थॉमस ग्राहाम याच्याजवळ रसायनशास्त्र शिकण्यास सुरवात केली. नंतर हा गीसन येथें लीबिगजवळहि शिकत होता. तेथें त्याला १८४७ त पी. एच्. डी. ची पदवी मिळाली. १८५० त तो सेंट थॉमसच्या दवाखान्यांत रसायनशास्त्राचा अध्यापक झाला व वयाच्या २६ व्या वर्षीच राजसंस्थेचा सभासद(फेलो)झाला. १८५८ ते १८६१ पर्यंत दीपगृहावरील कमिशनमध्यें राजमंडळांत त्यानें नोकरी केली व १८६४ ते १८६८ पर्यंत युद्धमंडळांत स्फोटक कापसा ( गनकॉटन )संबंधीं काम केलें. १८७४ ते १८७७ पर्यंत तो अध्यापक होता. १८७४ त त्याला पदार्थविज्ञानशास्त्रमंडळाचा अध्यक्ष निवडलें व १८७७–१८७९ पर्यंत तो रसायनशास्त्रमंडळाचा अध्यक्ष होता. १८९७ त राजसंस्थेनें त्याला डेव्हीपदक देऊन त्याचा बहुमान केला. पदार्थविज्ञानशास्त्र व रसायनशास्त्र यांच्या दरम्यान असलेल्या भानगडींच्या प्रश्नासंबंधीं त्यानें शोध लाविले. त्यानें कित्येक पदार्थांचे प्रकाशगुणक ठरविले व एकाच पदार्थाला निरनिराळें अणुवक्रीभवन असतें की नाहीं हें त्यानें पाहिलें. ईथर, तेलाचें वि. गुरुत्व, रासायनिक घटना व प्रकाशासंबंधीं वर्तणूक याचा संबंध त्यानें जोडला. १८५६ तच त्यानें रसायनशास्त्रांत विच्छिन्नकिरणदर्शकाचें ( स्पेक्ट्रोस्कोप ) महत्व किती आहे हें दाखविलें. सूर्योदय, सूर्यास्त व मध्यान्ह या वेळीं फ्रान्होफरच्या रेषांत फरक असतो व यावरून वातावरणाची घटना त्या त्या वेळीं वेगळी असावी असें त्यानें ठरविलें. पुढें प्राणवायू व पाण्याची वाफ यांच्या हवेंतील अस्तित्वावर त्या रेषा अवलंबून असतात असें ठरलें. यानें संग्राहक घटाचा ( स्टोअरेजसेल ) शोध लावला व शिवाय ताम्रजस्त या जोडीचाहि शोध लावला. त्या जोडीच्या योगानें सेंद्रिय रसायनशास्त्रांतील कित्येक द्रव्यें विद्युत्साहाय्यानें तयार करता येऊं लागलीं.

याशिवाय स्फुरासंबंधीं शोध, नत्रअदिद, स्फोटक कापूस व फलिमनेट चूर्ण इत्यादि स्फोटकारक द्रव्यांचा शोध, रासायनिक प्रतिक्रियेंत पदार्थांच्या वजनाचें महत्व व फर्मेन्टाचें वनस्पतिसंवर्धनांत महत्व इत्यादि अनेक शोधांचा उल्लेख येथें केलाच पाहिजे. डॉ. ग्लॅडस्टन हा शिक्षणविषयक बाबतींत फार लक्ष घालीत असे. तो लंडन येथें ता. ६ आक्टोबर १९०२ रोजीं एकाएकीं मरण पावला.

**ग्लॅडस्टन विल्यम इवर्ट** ( १८०९–१८९८ ).—हा ब्रिटिश मुत्सद्दी लिव्हरपूल शहरीं रॉडने स्ट्रीट नं. ६२ मध्यें २९ डिसेंबर १८०९ रोजीं जन्मला. त्याचे वाडवडील मूळ लानार्कशायरमधील रहिवाशी होते. जॉन व ॲन या दांपत्याला एकंदर सहा अपत्यें झालीं. पैकीं विल्यम ग्लॅडस्टन हें चवथें अपत्य होय. लहानपणापासून या मुलाचे गुण मनात भरण्यासारखे असल्यामुळें तो घरांत सर्वांचा अत्यंत आवडता बनला. प्रथम लिव्हरपूल नजीकच्या सीफोर्थ गावीं थोडेसें शिक्षण झाल्यावर विल्यम १८२१ मध्यें ईटन येथील शाळेंत जाऊं लागला. १८२८ मध्यें ईटन येथील अभ्यासक्रम संपवून तो ऑक्सफोर्ड येथील ख्राइस्ट चर्चमध्यें शिक्षण घेऊं लागला व इ. स. १८३१ मध्यें ग्लॅडस्टननें ग्रॅज्युएट होऊन डबल फर्स्ट–क्लास मिळविला. पुढें ग्लॅडस्टन १८३२ सालीं इटलीमध्यें जाऊन तो पाच सहा भाषांचा व कलेचा अभ्यास करीत राहिला. इतक्यांत इंग्लंडांत नव्या निवडणुकीची धामधूम सुरू झाली. तींत नीवॉर्कतर्फे तो सर्वांत अधिक मतें पडून पार्लमेंटचा सभासद झाला. या पार्लमेंटांत त्यानें पहिलें भाषण गुलामगिरीविरुद्ध केलें. पुढील बैठकींतहि एक दोन महत्वाचीं भाषणें ग्लॅस्टननें केलीं. १८३४ मध्यें पीलप्रधानमंडळानें ग्लॅडस्टनला ट्रेझरीच्या ज्युनियर लॉर्डच्या जागीं नेमलें व १८३५ मध्यें वसाहतींचा अंडरसेक्रेटरी केलें. पण लवकरच पीलप्रधानमंडळ मोडलें अर्थात् ग्लॅडस्टनहि कामावरून दूर झाला.

सरकारी कामांतून मोकळा झाल्यामुळें फावणारा वेळ ग्लॅडस्टन होमर व डान्टे यांचीं काव्यें वाचण्यांत घालवूं लागला. शिवाय चर्चमध्यें होणारा धर्मोपदेश ऐकण्यासहि तो पुष्कळ वेळ हजर असे. १८३७ मध्यें ४ था विल्यम वारल्यावर व्हिक्टोरियाच्या कारकीर्दीच्या आरंभीच पार्लमेंटची नवी निवडणूक झाली तींत ग्लॅडस्टन नीवॉर्कतर्फे पुन्हा निवडून आला. १८३८ सालीं त्यानें आपला 'धर्मव्यवस्थेचा राज्यव्यवस्थेशीं असलेला संबंध'(दि स्टेट इन इट्स रिलेशन्स वुइथ दि चर्च ) हा विषयांत ग्रंथ प्रसिद्ध केला.

१८३९ जुलै २५ रोजीं हॉवर्डेन येथें मिस कॅथराईन ग्लीने या बॅरोनेट स्टीफन ग्लीनेच्या बहिणीशीं ग्लॅडस्टननें विवाह केला. स्टीफनच्या ईस्टेटीचा वारसाहि कॅथेराईनच्या मुलाकडेच जावयाचा होता. १८४० मध्यें ग्लॅडस्टननें 'चर्चसंबंधाचीं तत्वें व त्यांचे परिणाम' (चर्च प्रिन्सिपल्स कान्सिडर्ड इन देअर रिसल्टस ) हें पुस्तक प्रसिद्ध केलें. १८४१ मध्यें पार्लमेंटाची नवी निवडणूक झाली, तींत टोरीपक्षानें ऐशीनें संख्याधिक्य

झाले व पुन्हा पीलप्रधानमंडळ अधिकारावर आले ग्लॅडस्टनला बोर्ड ऑफ ट्रेडच्या व्हाइसप्रेसिडेंटची जागा मिळाली व त्या जागेवर असता त्यानें पुष्कळच आर्थिक प्रश्नांवर वादविवाद व भाषणें केलीं. पुढें १८४३ मध्यें लॉर्ड रिपनची बोर्ड ऑफ ट्रेडच्या प्रेसिडेंटची जागा मिळून ग्लॅडस्टनचा प्रधानमंडळांत प्रवेश झाला. परंतु १८४५ मध्यें आयर्लंडमध्यें निधर्मपंथी कॉलेजें काढण्याचा व मेनूथ येथील रोमन कॅथालिक कॉलेजला सरकारी मदत वरीच वाढविण्याचा प्रश्न प्रधानमंडळानें हातीं घेतला, त्या बाबतींत मतभेद असल्यामुळें ग्लॅडस्टननें आपल्या जागेचा राजीनामा दिला. पण त्याच सालीं प्रधानमंडळांत कांहीं उलथापालथ होऊन शेवटीं पीलच मुख्य प्रधान झाला व त्यानें ग्लॅडस्टनला वसाहतींच्या स्टेटसेक्रेटरीची जागा दिली. पण १८४६ च्या निवडणुकीत ग्लॅडस्टन उमेदवार म्हणून उभा राहिलाच नाहीं, व तें अत्यंत महत्वाचें वर्ष दीडवर्ष त्यानें घरीं स्वस्थ विश्रांतींत काढलें. १८४७ मध्यें ऑक्सफोर्ड युनिव्हर्सिटीतर्फे तो निवडून आला.

१८५०—५१ मध्यें नेपल्समध्यें असतां त्यानें तेथील जुलमासंबंधीं जीं पत्रें प्रसिद्ध केलीं त्यामुळें सर्व यूरोपांत खळबळ उडाली. व इटलीच्या स्वातंत्र्यास मदत झाली. १८५२ मध्यें मिलिशिया बिलावरील वादांत व्हिग प्रधानमंडळाचा पराजय होऊन लॉर्ड डर्बीचें प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें, त्यांत डिझरायली चॅन्सलर ऑफ एक्सचेकर झाला. १८५२ च्या निवडणुकींतहि तेंच प्रधानमंडळ कायम राहिलें डिझरायलीनें केलेल्या बजेटावरील वादविवादांत ग्लॅडस्टननें केलेल्या जोरदार भाषणामुळें बजेट फेटाळलें जाऊन डिझरायली पक्षाचा पराजय झाला. तेव्हां व्हिगपक्ष व पीलचे अनुयायी यांचें संयुक्त प्रधानमंडळ स्थापन होऊन आबर्डीन हा मुख्य प्रधान झाला व ग्लॅडस्टन चॅन्सलर ऑफ एक्सचेकर झाला. १८५३ मध्यें ग्लॅडस्टननें पहिल्याच प्रसंगीं बजेट तयार करून सभेपुढें मांडलें. त्यांत अनेकप्रकारें सामान्य लोकांचें जीवित कमी खर्चाचें व अधिक सुखकर होईल अशी योजना होती व उत्पन्नावर कर बसविला होता. याप्रमाणें त्यानें अनेक वर्षें फडनविशीचें काम केलें

पुढें १८५८ मध्यें पामरस्टनच्या ऐवजीं डर्बी प्रधानमंडळ आलें ग्लॅडस्टनला आयोनियन बेटावर एक्स्ट्रा आर्डिनरी हाय कमिशनर नेमिलें. १८५९ मध्यें सौम्य स्वरूपाचें सुधारणाबिल प्रधानमंडळानें पुढें आणलें पण तें नापास होऊन डर्बी प्रधानमंडळ मोडून पुन्हां पामरस्टन मुख्य प्रधान झाला व ग्लॅडस्टन फडणीसावर रुजू झाला. परंतु वास्तविक आतां कामन्ससभेचा ग्लॅडस्टनच खरा पुढारी बनला होता. १८६० व १८६१मधील बजेटांतील महत्वाच्या गोष्टी म्हणजे फ्रान्सबरोबरचा व्यापारी तह व कागदावरील कराची बंदी या होत. १८५९ ते १८६५ पर्यंत अधिकारारूढ असलेल्या पामरस्टन प्रधानमंडळांतला अत्यंत हुषार व वजनदार मंत्री ग्लॅडस्टनच होता. त्या कारकीर्दीत मतदारीचा हक्क अधिक विस्तृत करण्यासंबंधानें व ऐरिश चर्चसंबंधानें बिलें सभेपुढें आलीं त्यावेळीं ग्लॅडस्टननें प्रतिपादिलेलीं मतें अत्यंत प्रागतिक म्हणजे रॅडिकल पक्षीयांना शोभेशीं होतीं. पण त्यामुळें ऑक्सफोर्ड युनिव्हर्सिटी मतदारसंघाचा ग्लॅडस्टनवरील विश्वास उडून त्यानें १८६५ च्या निवडणुकींत हार्डी नावाचा इसम ग्लॅडस्टनच्या ऐवजीं निवडून दिला. तेव्हां ग्लॅडस्टन साऊथ लँकेशायरतर्फे उभा राहून निवडून आला. लवकरच पामरस्टन वारला व रसेल मुख्य प्रधान झाला, व ग्लॅडस्टनकडे ठराविक फडणिशी आली. कामन्स सभेचें नेतृत्वहि त्याच्या गळ्यांत पडलें. त्यानें पूर्वीचें रिफार्मबिल पुढें मांडलें व समारोपसमयीं मोठें उत्कृष्ट भाषण केलें पण सर्व निष्फळ होऊन बिलावर प्रतिकूल मतेंच अधिक पडलीं; प्रधानमंडळ मोडलें, डर्बी मुख्य प्रधान झाला व डिझरायली फडणीस झाला या अधिकारारूढ टोरी पक्षानें आपल्या तर्फेचें रिफॉर्म बिल पुढें आणलें त्यांत बरोमधल्या (शहराव्यतिरिक्त गांवांत) सर्व घरवाल्यांना मताधिकार देण्याचें योजिलें होतें हें बिल बरेंच फेरबदल होऊन अखेर १८६७च्या आगष्टमध्यें पास झालें.

१८६७ मध्यें रसेलनें राजकारणांतून कायमचें अंग काढून घेतलें, तेव्हांपासून ग्लॅडस्टन लिबरल पक्षाचा पुढारी बनला. विरुद्ध म्हणजे टोरी पक्षांत डर्बीच्या जागीं डिझरायली हा पुढारी व मुख्य प्रधान झाला होता. परंतु एकंदर पक्षांपैकीं ग्लॅडस्टनच्या पक्षाचें संख्याधिक्य होतें ही गोष्ट प्रत्ययास आल्यामुळें डिझरायलीनें व त्याच्या सहकाऱ्यांनीं राजीनामे दिले अर्थात राणीनें ग्लॅडस्टनला विंडसर राजवाड्यांत बोलावून मुख्य प्रधानकीची माळ त्याच्या गळ्यांत घातली. या नव्या प्रधानानें प्रथम ऐरिश चर्चचा प्रश्न हातीं घेऊन राणीच्या सर्वस्वीं मतानुसार तो पार्लमेंटकडून पास करविला. १८७० मध्यें ऐरिश लँड ॲक्ट पास करून ठराविक खंड शेतकरी देत राहीतोंपर्यंत जमीनदारानें त्यास काढूं नये व स्वतःच्या मेहनतीनें शेतांत केलेल्या सुधारणांची किंमत शेतकऱ्याला मिळावी अशी योजना केली. नंतर युनिव्हर्सिटयांतील धार्मिक अटी काढून टाकल्या, व खुद्द राणीच्या हुकुमानें कमिशनाची विक्री बंद करविली १८७३ सालीं आयर्लंडमध्यें रोमन कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट या दोघांच्या सोयीची युनिव्हर्सिटी स्थापण्याचें बिल त्यानें सभेपुढें मांडलें पण तें नापास झाल्यामुळें त्यानें प्रधानकी सोडली राणीनें डिझरायलीला नेमण्याचा बेत केला पण त्यानें स्वपक्षाच्या संख्याहीनत्वामुळें प्रधानकी नाकारली. नाइलाजानेंच ग्लॅडस्टननें प्रधानकी पत्करली, पण लोकमत प्रतिकूल होतें १८७३—७४सालीं राजीनामे व निवडणुकी या घोटाळ्यांत जाऊन अखेर टोरीपक्षाचें सेहचाळीसनें मताधिक्य झालें, व ग्लॅडस्टननें अधिकार सोडला. या सुमारास त्याचें वय चौसष्ट वर्षांचें होतें व

उत्तर वयांत राजकारण सोडून देण्याचा आपला बेतहि तो जाहीरपणें बोलूं लागला. त्याप्रमाणें १८७४ सालीं कॉमन्स सभेच्या बैठकींना तो फारसा हजरहि नसे. १८७५ मध्यें लिबरल पक्षाचा पुढारीपणाहि त्यानें सोडला. पण स. १८७५ च्या पावसाळ्यांत बल्गेरियांत बंड झालें तें तुर्कांनीं जुलूम व कत्तली करून मोडलें. या जुलुमाचा प्रतिकार करण्याकरितां ग्लॅडस्टन मोठ्या आवेशानें पुढें सरसावला व लेख, जाहीर व्याख्यानें व पार्लमेंटांतील भाषणें यांनीं तुर्की सरकारविरुद्ध इंग्लिश लोकमत त्यानें खवळून सोडलें. डिझरायली तुर्की सरकारचा पक्षपाती होता. त्याच्याविरुद्ध ग्लॅडस्टननें १८७६—८० या सालांत भयंकर गहजब उडवून दिला. अखेर १८८० मध्यें होणाऱ्या निवडणुकींत डिझरायलीचें परराष्ट्रीय धोरण पसंत कीं नापसंत या एकाच मुद्यावर मतदारांनीं सभासद निवडून दिले व त्यांत टोरी पक्षाचा पूर्ण पराभव होऊन लिबरलपक्ष फार मोठ्या मताधिक्यानें अधिकारारूढ झाला. तेव्हां मुख्य प्रधानकीचा प्रश्न आला; राणीनें हॅरिंगटन, ग्रॅनव्हिल यांना प्रधानकी देऊं केली; पण दोघांनीं ग्लॅडस्टनकडे बोट दाखविलें. त्यामुळें १८८० च्या एप्रिलमध्यें ग्लॅडस्टन पुनरपि मुख्य प्रधान झाला. या कारकीर्दींतील त्याची मुख्य कामगिरी म्हणजे शेतमजुरांना मताधिकार देण्याचा कायदा करणें ही होय. त्यांत त्याला यश मिळालें, पण त्याच वेळीं आयर्लंड व ईजिप्तसंबंधानें मोठे वादग्रस्त प्रश्न उपस्थित होऊन ते लिबरल पक्षास अत्यंत कमकुवत करण्यास कारण झाले. आयर्लंडांतील जमीनीबाबत हक्कांत सुधारणा करण्यासंबंधाचें व जमीनदारांनीं काढून टाकलेल्या कुळांना नुकसानभरपाई देण्यासंबंधाचें, अशीं दोन बिलें ग्लॅडस्टननें हातीं घेतलीं; पण त्यामुळें इंग्लंड व आयर्लंड या दोन्हीं देशांत बरेंच लोकमत त्याच्या विरुद्ध झालें आणि बिलें नापास झाल्यामुळें आयर्लंडांत अनेक दंगेधोपे व खूनहि झाले, व पार्लमेंटांत ऐरिश पक्ष प्रधानमंडळावर नाखूष झाला. तिकडे ईजिप्तमध्यें अलेक्झांड्रियाचा किल्ला तोफांच्या माऱ्यानें उध्वस्त करण्यांत आला ही गोष्टहि बऱ्याच लिबरलपक्षीयांना पसंत झाली नाहीं. पुढें लवकरच जनरल गॉर्डन हा अकालीं मृत्युमुखीं पडला. त्यामुळें प्रधानमंडळाविरुद्ध क्रोधाग्नि भडकून विरुद्ध पक्षानें निषेधपर ठरावहि पुढें आणले. अखेर १८८५ च्या बजेटावर प्रधानमंडळाचा पराजय होऊन ग्लॅडस्टननें राजीनामा दिला व सॅलिसबरी मुख्य प्रधान झाला. नव्या निवडणुकींत टोरी व पार्नेल पक्ष हे दोन पक्ष मिळून लिबरलपक्षापेक्षा संख्याधिक्य होतें. पण अकल्पित चमत्कार असा झाला कीं, आयर्लंडला होमरूल देण्यास ग्लॅडस्टन अनुकूल असल्याचें प्रसिद्ध झालें. त्याबरोबर पार्नेलपक्ष ग्लॅडस्टनला मिळून टोरी पक्षाच्या संख्याहीनत्वामुळें सॅलिसबरीच्या जागीं १८८६ मध्यें ग्लॅडस्टन तिसऱ्यांदा मुख्य बनला. त्यानें एप्रिलमध्यें आपलें ऐरिश होमरूल बिल पुढें मांडलें, परंतु तें तीस मतांनीं नापास झालें. तेव्हां ग्लॅडस्टनच्या आग्रहाच्या विनंतीवरून राणीनें पार्लमेंटची नवी निवडणूक केली. तींतहि होमरूल बिलाविरुद्ध संख्याधिक्य झाल्यामुळें ग्लॅडस्टननें राजीनामा दिला. व पुन्हा सॅलिसबरी प्रधान झाला. या सुमाराच्या दोन खासगी महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे एक १८८९ जुलै २५ रोजीं त्यानें आपल्या विवाहाचा पन्नासावा वार्षिक दिनोत्सव केला. व १८९१ जुलै रोजीं त्याचा वडील मुलगा विल्यम हेनरी वयाच्या ५२ व्या वर्षी वारला.

१८९२ मध्यें नवी निवडणूक झाली, तींत होमरूल पक्षाचें चाळीसांनीं मताधिक्य झालें, त्यामुळें सॅलिसबरीच्या ऐवजीं पुन्हा ग्लॅडस्टन मुख्य प्रधान झाला. येणेंप्रमाणें प्रधानकीचा अधिकार त्याला चवथ्यांदा मिळाला व चार वेळां मुख्य प्रधान झाल्याचें इंग्लिश मुत्सद्यांमध्यें ग्लॅडस्टनचेंच पहिलें उदाहरण होय. १८९३ मध्यें त्यानें आपलें नवें होमरूल बिल पुढें मांडलें व कॉमन्स सभेंत तें पासहि झालें; पण लॉर्डांच्या सभेनें तें नापास केलें. ग्लॅडस्टनला आतां आपली राजकीय कामगिरी संपली असें वाटूं लागल्यामुळें त्यानें १८९२ मार्च १ रोजीं पॅरिस कौन्सिल्स बिलावर आपलें शेवटचें भाषण केलें व मार्च ता. ३ रोजीं राजीनामा राणीच्या हातीं दिला. त्यानंतर त्यानें कामन्ससभेंत मुळींच पाऊल टाकलें नाहीं.

राहिलेलें आयुष्य ग्लॅडस्टननें हावर्डेन येथें काढलें. तेथून लंडन, स्कॉटलंड व दक्षिण फ्रान्समध्यें मित्रांना भेटण्यास तो कधींकधीं जात असे. रिकामा वेळ होरेसच्या ओड्सचें भाषांतर करण्यांत, *बटलरच्या ॲनॉलजी व सर्मन्स या पुस्तकाची* सटीक आवृत्ति तयार करण्यांत व होमरविषयीं अभ्यासांत तो घालवीत असे. १८९५ मध्यें आर्मीनियांत तुर्कांनीं कत्तली केल्या तेव्हां मात्र पुन्हा त्या राजकीय प्रकरणांवर व्याख्यानें देण्याच्या व लेख लिहिण्याच्या कामांत १८९६–९७ सालीं तो पडला होता. तथापि सरकारी काम सुटल्यापासून त्याचें शारीरिक सामर्थ्य झपाट्यानें कमी होत गेलें, व १८९७ च्या उन्हाळ्याअखेर त्याच्या शरीराला कांहीं तीव्र वेदना होऊं लागल्या, व त्यांतूनच पुढें रोग उद्भवून १८९८ मे १० रोजीं हावर्डेन येथें मरण पावला. मे २५ रोजीं त्याचें प्रेत लंडनला नेऊन वेस्टमिन्स्टर हॉलमध्यें ठेवण्यांत आलें. तेथें दोन अडीच लाख लोक त्याच्या अखेरच्या दर्शनास येऊन गेले. २८ रोजीं प्रेत वेस्टमिन्स्टर ॲबेमध्यें पुरण्यांत आलें. प्रेतयात्रेला दोन्हीं सभांचे सभासद व इतर बडेबडे गृहस्थ वगैरे मोठा जमाव जमला होता. या ग्लॅडस्टन दांपत्याला ४ मुलगे व चार मुली झाल्या. वडील मुलगा पार्लमेंटचा सभासद होता, तो १८९१ त वारला व त्याचाच मुलगा पुढें इस्टेटीचा वारस झाला. चवथा मुलगाहि पार्लमेंटचा सभासद होऊन व मोठ्या हुद्द्यावर चढून १९१० मध्यें दक्षिण आफ्रिकेचा गव्हर्नर-जनरल झाला. मुलींपैकीं शेवटची हेलन

ही कांहीं वर्षे केंब्रिज येथील न्यूहॅम कॉलेजची व्हाईस-प्रिन्सिपॉल होती.

ग्लॅडस्टनच्या स्वभावाविषयीं विचार करतां त्याच्या अंगच्या नैतिक गुणांतील मुख्य गुण म्हणजे धार्मिक बुद्धि हा होय. ही धर्मनिष्ठा त्याच्या अगदीं बालपणापासून अखेर नव्वद वर्षांपर्यंत कायम होती, व त्यामुळें त्याचें खाजगी व सार्वजनिक आचरण, साधी दूरदृष्टि किंवा व्यवहारचतुरता यांपेक्षां उच्च दर्जाच्या तत्त्वाला अनुसरूनच नेहमीं होत असे. त्याच्या स्वभावांतील दुसरा पण वरच्याइतकाच जोमदार गुण म्हणजे सत्ताप्रियता. परंतु ही महत्त्वाकांक्षा केवळ पैसा, मोठा हुद्दा व श्रेष्ठ सामाजिक दर्जा अशा क्षुद्र गोष्टींविषयीं नसून प्रत्यक्ष राज्यतंत्र आपल्या हातीं घेऊन परमेश्वरी सत्तेनें आपल्यावर सोंपविलेलीं राजकीय कर्तव्यें पार पाडण्याविषयींची होती. या अधिकारापेक्षेला निर्भयतेचीहि उत्कृष्ट जोड मिळाली. कोणत्याहि संकटांना तो भीत नसे, अडचणींमध्यें डगमगत नसे व कोणत्याहि कार्यांतील श्रमांना कंटाळत नसे. स्वसामर्थ्यापलीकडचें असें कांहींहि त्यास वाटत नसे. अधिकारलालसा व निर्भयता यांच्याप्रमाणें त्याची अधिकार बजावण्याची कदराहि विलक्षण होती. पण तींतहि त्याच्या मनाचा मोठेपणा दिसून येतो तो असा कीं, इतराबरोबर बोलण्यासवरण्यांत व वागण्यांत तो अत्यंत आदरशील, मनमिळाऊ व नम्र असे. मात्र वरील कदर व मानीपणा सरकारी अम्मलबजावणींत, स्वमताभिमानांत, दृढनिश्चयांत, स्वमताच्या व सुसंस्कृत लोकांच्या मताच्या एकवाक्यतेविषयींच्या आत्मविश्वासांत दिसून येत असे. तथापि त्याचें आत्मसंयमन इतकें विलक्षण असे कीं मोठ्या रागजेभाच्या भरांत केलेलीं विधानेंहि परत घेण्याचा प्रसंग त्याजवर कधीं आला नाहीं. वास्तविक ग्लॅडस्टन पुराणप्रेमीच होता. कारण जुन्या संस्था, चालीरीती व पद्धती प्रत्यक्ष अनर्थकारक होईपर्यंत कायम ठेवण्याकडे त्याचा नेहमीं ओढा असे. अनुभवानें ही पुराणप्रियता कमी होतां होतां उत्तर वयांत त्यानें राजकारणांत अनेक क्रांतिकारक गोष्टीहि केल्या हें खरें आहे. तथापि लोकसत्ताक राज्यपद्धति चालू असलेल्या देशांत केवळ हरएक बाबतींत क्रांति घडवून आणण्याच्या उत्कट भावनेनें प्रेरित झालेले इसम लोकनायक बनल्यानें, आणि उलटपक्षीं ग्लॅडस्टनसारखे योग्य कारणांनीं व सावकाश पूर्ण विचारांतीं मनाची खात्री पटल्यावर त्या त्या गोष्टींचा स्वीकार करून त्या योग्य मार्गांनीं अमलांत आणणारे लोकनेते लाभल्यानें लोकशासित राज्यावर अगदीं निरनिराळ्या प्रकारचे परिणाम घडत असतात, ही गोष्ट विशेष ध्यानांत ठेविली पाहिजे. वक्तृत्व व जमाखर्चाच्या कारभारांतील कौशल्य या गोष्टी ग्लॅडस्टनमध्यें उत्कृष्ट होत्या हें तर खरेंच; पण मनाची एकाग्रता करण्याची शक्ति हा गुण इतर समकालीन मुत्सद्यांपेक्षां आपणांत विशेष आहे असें तो स्वतःच म्हणत असे. कोणतीहि गोष्ट एकदां हातीं घेतल्यावर तींत तो इतका व्यग्र होत असे कीं, बाकीचें मग तो साफ विसरून जात असे. लॉर्ड मोर्लेनें १९०३ सालीं प्रसिद्ध केलेल्या ग्लॅडस्टनच्या चरित्रग्रंथाहून जास्त सविस्तर व प्रमाणभूत संदर्भग्रंथ दुसरा कोणताहि आढळणार नाहीं.

**ग्लॅसर**—हा फ्रेंच रसायनशास्त्रज्ञ १७ व्या शतकांत होऊन गेला. तो औषधें तयार करून विकीत असे. ब्रिनव्हिलीर्सच्या सरदाराच्या पत्नीकडून झालेल्या विषप्रयोगाच्या कटांत तो सामील होता असें म्हणतात. त्यानें पालाशगंधकित तयार करून त्याचा औषधींत उपयोग केला.

**ग्लाबर**—( १६०४–१६६८ ) हा जर्मन रसायनशास्त्रज्ञ बव्हेरियामध्यें कार्लस्टाड येथें जन्मला. याच्या जीवन चरित्राची फारशी माहिती उपलब्ध नाहीं. हा प्रथम व्हिएन्ना, मग साल्झबर्ग, फ्रांकफर्ट, कलोन इत्यादि ठिकाणीं राहून शेवटीं हॉलंडमध्यें स्थायिक झाला. तेथें तो रासायनिक औषधी द्रव्यें गुप्तपणें विकीत असे. याच्या ग्रंथांतून जुन्या द्रावकांचींच वर्णनें आढळतात. तरी यानें खऱ्या रसायनशास्त्राच्या ज्ञानांत थोडीशी भर टाकली आहे. साध्या मिठाशीं उज्जगंधकाम्लाचा संयोग करून उद्हराम्ल तयार करण्याच्या कृतीचा यानेंच शोध लावला. मिठाच्या ऐवजीं सोडा वापरल्यास नत्राम्ल तयार होतें हेंहि यानेंच दाखविलें. यानें शिसें, कथील, लोखंड, जस्त, ताम्र, ताल व अज्ज याचीं हरिद्रें व इतर पुष्कळ क्षार तयार केले. शिवाय द्वितपृथक्करणाचे कांहीं प्रयोग यानें करून पाहिले. औषधें तयार करून किंवा रंग वगैरे औद्योगिक उपयोगाचे जिन्नस तयार करून किंवा जमीनीकरितां खतें तयार करून आपल्या ज्ञानाचा व्यवहारांत उपयोग करतां यावा अशी त्याची फार इच्छा होती. याचा एक ट्यूटलंड वुलफर्थ नांवाचा ग्रंथ आहे. त्यांत त्यानें फार आग्रहानें सांगितलें आहे कीं, जर्मनींतील नैसर्गिक संपत्तीचा राष्ट्रानें आपल्या फायद्याकरितां शक्य तितका उपयोग करावा. एतदर्थ त्यानें अनेक उपायाहि आपल्या ग्रंथांत सुचविले आहेत.

त्याचे सरासरी ३० ग्रंथ फ्रांकफर्ट येथें १६५८त प्रसिद्ध झाले; ॲमस्टर्डाम येथें १६६१ त प्रसिद्ध झाले व त्यांचें पॅकेनें इंग्रजींत भाषांतर करून लंडन येथें १६८९ त प्रसिद्ध केले. हा ॲमस्टर्डाम येथें इ. स. १८६८ सालीं मरण पावला.

**ग्लासगो**—स्कॉटलंड देशांतील लॅनार्कशायर परगण्यांतलें मुख्य शहर, रॉयल बर्ग (सनदीगांव) व बंदर. हें शहर क्लाईड नदीच्या दोन्ही तीरावर वसलेलें असून नदीवर पुष्कळ पूल बांधिले आहेत.

**इमारती**.—शहराच्या मध्यभागीं जॉर्ज स्क्वेअर नांवाची मोकळी जागा आहे तिच्या पूर्वेस म्युनिसिपालिटीची भव्य इमारत, पूर्वेस जनरल पोस्ट ऑफीस व पश्चिमेस स्कॉटलंडची पेढी व मर्चंट्स हाऊस ( व्यापाऱ्याचा मठ ) ह्या इमारती आहेत. व्यापारी देवघेवीची इमारत

( रायल एक्स्चेंज ), ग्लासगो हेरल्ड वर्तमानपत्राची कचेरी, *ललितकला-संस्था ( फाइन आर्ट्स इन्स्टिट्यूट )* व कॉर्पोरेशनचें चित्रसंग्रहालय वगैरे इमारती आहेत आर्गाईल हा फार रहदारीचा रस्ता असून त्यांत दुकानें आहेत येथें आग्नेय भागांत सेंट मगोचें प्रार्थनामंदिर ( कथेड्रल ) आहे याची स्थापना १५ व्या शतकांत झाली फरपार्क नांवाच्या टेंकडीवर नेक्रोपोलिस नांवाची स्मशानभूमि आहे

शि क्ष ण —ग्लासगो विश्वविद्यालयाची स्थापना इ स १४५० मध्यें बिशप टर्नबुल यानें केली विश्वविद्यालयाची साम्प्रतची इमारत गिलमोअर टेंकडीवर आहे. ही इमारत १८७० साली पुरी झाली येथील ग्रंथसंग्रहालयांत हॅमि *ल्टन व हंटर यांचे ग्रंथसंग्रह असून शिवाय नाणीं,* पदकें, वगैरेंचा चांगला संग्रह डोवॅन टेंकडीवर आहे या विश्वविद्यालयांत कला, धर्म, वैद्यक, कायदा व शास्त्र हे विषय शिकवितात येथें सुमारें २००० विद्यार्थी असतात ग्लासगो व ॲबरडीन ह्या दोन विश्वविद्यालयांना पार्लमेंटसाठीं एक सभासद *निवडण्याचा हक्क आहे क्वीन मार्गारेट व म्यूर-* हेड हीं दोन विद्यालयें स्त्रियांसाठीं आहेत प्राथमिक शिक्षणाची सोय, वसतीगृह *असलेल्या शाळांतून केलेली आहे* दुय्यम, उच्च व धंदेशिक्षणाच्या बऱ्याच शाळा आहेत

येथील व्यापारी व कारखानदार यांनी कलेच्या उत्कर्षाला फारच सढळ हातानें मदत केली आहे केल्व्हिन ग्रोव्ह पार्कमध्यें चित्रसंग्रहालय, ' ललितकलासंस्था ' व पीपल्स पॅलेस ' मध्यें असलेलीं चित्रांचीं प्रदर्शनें, विश्वविद्यालयाचें ग्रंथसंग्रहालय, हंटरपदार्थसंग्रहालय, यंत्रशिल्प, तत्त्वज्ञान व वैद्यक या विषयांचीं प्रथालयें, मायकेल मिचेल, स्टर्लिंग व बेली या गृहस्थांनीं देणगी देऊन स्थापि *लेलीं प्रथालयें हीं मुख्य आहेत* येथें अनाथ, पंगू, वगैरे लोकांसाठीं संस्था असून बरींच इस्पितळें आहेत येथील बहुतेक पुतळे *'जार्ज स्क्वेअर' मध्यें आहेत* यांत सर वॉल्टर स्कॉट, व्हिक्टोरिया, पील, कॅंपबेल ( कवि ), मूर, लिव्हिंग्स्टन, बर्न्स, ग्लॅडस्टन, यांचे प्रमुख पुतळे आहेत बाजारपेठेंत वेलिंग्टनचा पुतळा असून 'ग्रीन' वर नेल्सनचें स्मारक म्हणून एक निमूळता स्तंभ आहे

येथें नाटकगृहें, सर्कशी, जलशाचीं गृहें, वेगवेगळे क्लब अशीं बरींच करमणुकीचीं साधनें आहेत येथें ग्रीन ही मुख्य विहारभूमि असून दुसऱ्या कित्येक विहारभूमी आहेत

द ळ ण व ळ णा चीं सा ध नें —येथ रेल्वेचे बरेच फाटे आहेत याशिवाय जमिनींतून चालणारी रेल्वे आहे त्याचप्रमाणें सर्व शहरभर ट्रॅमचे रस्ते आहेत

व्या पा र.—कोळसा व लोखंड यांच्या खाणी जवळ असल्यामुळें व डोंगरांतून पाण्याचा चांगला प्रवाह *बंदरांत असल्यामुळें ग्लासगो शहराचा व्यापार* वाढला प्रथमतः विणकामाबद्दल ग्लासगोची प्रसिद्धि होती अद्यापि देखील येथें बऱ्याच कापसाच्या गिरण्या आहेत निरनिराळ्या तऱ्हेची मलमल, गिंघम जातीचें सुंदर कापड याबद्दल ग्लासगोची ख्याति आहे काहीं *कारखान्यांत* जाळीदार पडदे तयार होतात धुणें, छापणें व रंग देणें हे धंदे चांगले चालतात याशिवाय बरेच किरकोळ धंदे चालतात. लोखंड गाळण्याचा धंदा येथें मोठ्या प्रमाणावर चालतो येथें रेल्वेचीं इंजिनें तयार होतात ग्लासगो येथें जहाजें बांधण्याचा सर्वांत मोठा धंदा चालतो व सर्व तऱ्हेचीं जहाजें तयार होतात

ग्लासगो बंदरानें सुमारें ८॥ मैलपर्यंत धक्के पसरले असून येथें सध्या किंग्स्टन, क्वीन व प्रिन्स या तीन मुख्य गोद्या आहेत पीठ, फळें, इमारतीचें लांकूड, अशुद्ध लोखंड, *गुरेंढोरें व गहूं यांची आयात होते* सुती कापड, *लोखंडी* व पोलादी काम, यंत्रें, व्हिस्की तागाचें कापड, कोळसा, लोकरीचें कापड वगैरे पदार्थांची निर्गत होते

का र भा र —शहराची आडवीउभी लांबी ५ मैल असून घेर २७ मैलाचा आहे येथील कारभार कार्पोरेशनच्या ताब्यांत आहे तींत ७७ सभासद असून त्याच्यावर मुख्य मॅजिस्ट्रेट असतो कार्पोरेशनच्या ताब्यांत पाणी, गॅस व *विद्युत्शक्ति, ट्रॅमगाडा व म्युनिसिपालिटीचीं* घरें आहेत या सर्व कामांत ग्लासगो कार्पोरेशनची ख्याति आहे गरीब *लोकांच्या राहत्या घरासंबंधीं कठिण प्रश्न कार्पोरेशनला* आला होता तेव्हां सुमारें १०,००० घरें पाडून नवीन बांधण्याचा उपक्रम करण्यांत आला या सर्व सुधारणाबरोबरच नवीन गटारांची पद्धति सुरू करण्यांत आली या शहराचे सात भाग केले असून प्रत्येक भागाला पार्लमेंटांत एक प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क आहे ग्लासगोची लोकसंख्या १९व्या व्या शतकांत फार वाढली १८०१ मध्यें ७७३८५ लोकसंख्या होती, १९०१ मध्यें १०३४०६९ भरली

इ ति हा स —१२ व्या शतकापासून ग्लासगो शहराची सतवार माहिती मिळते इ स १३००त वॅलेसनें हायस्ट्रीटच्या जागेवर इंग्लिशांचा पराभव केला त्याचप्रमाणें 'रॉबी *यस्टन ' येथें दंतकथेनुरूप* वॅलेस यास विश्वासघातानें इंग्लिशांच्या स्वाधीन करण्यांत आलें येथील रहिवाशी राणी *मेरीच्या विरुद्ध पक्षाचे असून त्यांनीं* मुरेला लॅंगसाईडच्या ( सध्याचा क्वीनपार्क ) युद्धांत मदत केली याच युद्धामुळें तिचें राज्य गेलें स्कॉटलंड व इंग्लंड या देशांचें एकत्र होणें ग्लासगो शहराला रुचलें नाहीं परंतु याच संघानुयें स्कॉटिश बंदराची योग्यता इंग्लिश बंदराच्या बरोबरीनें झाली व ग्लासगोचा भरभराट फारच झपाट्यानें झाली येथें तंबाखूचा व्यापार फारच वाढला अमेरिकन युद्धापासून ग्लासगोचे सध्याचे मुख्य धंदे उदयास आले इ स १७६४ त जेम्स वॅटनें वाफेचें एंजिन सुधारलें व १९ व्या शतकांत जहाजें *बांधण्याचा धंदा फारच मोठ्या प्रमाणावर* वाढला

**ग्लिसरिन**—तेलें व चरबी यांत सांपडणारा शर्करांश *शुभंकारक क्रियेनें निराळा काढल्यावर* ग्लिसरिन तयार

होतें. हें एक चिकट, रंगहीन, नवीस गोड असणारें पातळ द्रव्य आहे. तें पाण्यांत व मद्यार्कांत विरघळतें परंतु ईथरमध्यें मात्र मुळीच विरघळत नाहीं वैद्यकियेंत हें औषध फार उपयोगी पडतें. जखमेनी आग किंवा वेदना कमी होऊन ती मऊ रहाण्याकरितां तेलापेक्षांहि ग्लिसरिन जास्त गुणकारी आहे असें मानतात कारण तें जखमेस आरामकारक असून जलदी धुतलें जातें. तसेंच शरीराचा कोणताहि भाग थंडीनें फुटल्यास त्यावर ग्लिसरीनचा फार उपयोग होतो. मुखरोगानें तोंडात फोड आले असल्यास ग्लिसरीनच्या योगें विकार नाहींसा होतो. टॅनिक व कार्बोलिक ॲसिड वगैरे पदार्थांची तीव्रता कमी करण्याकरितां त्यांत ग्लिसरीन मिसळतात. हवेंत कितीहि थंडी उत्पन्न झाली असता न थिजणें, नेहमीं पातळ स्थितींत रहाणें व हवेंत उडून न जाणें या तीन गुणामुळें ग्लिसरिनचा निरनिराळे धंदेवाले उपयोग करितात. याचा घड्याळासारख्या लहान यंत्रास वंगणासारखा उपयोग होतो. प्लास्टर ऑफ पारिस, चित्रकार यांस लागणारे पाण्यातील रंग, चित्रें करण्याची नरम माती वगैरे ज्या पदार्थांस हमेष नरम व द्रवरूप ठेवण्याची जरूर असते त्या ठिकाणीं ग्लिसरीनचीच योजना होते

**ग्लूस्टर**—इंग्लंडमधील ग्लूस्टरशायर प्रांतातील बंदर व शहर. हें शहर लंडनहून ११४ मैल असून सेव्हर्न नदीच्या काठीं आहे. या शहरांत म्युनिसिपालिटि असून या शहरातर्फे पार्लमेंटात एक सभासद जातो. या शहरात जाणारी "ग्रेट वेस्टर्न रेल्वे" व "मिडलॅन्ड रेल्वे" हे दोन आगगाडीचे रस्ते आहेत. लो.स. ( १९२१ ) ५१३३०.

ग्लूस्टर शहराच्या उत्तरेस या प्रांतातील मुख्य देवालय आहे. ह्या देवालयाची स्थापना ६८१ सालीं झाली असून १५४१ सालीं याकरिता एक जॉन वेकमन नांवाचा पहिला बिशप नेमला गेला. हें देवालय फार सुंदर बांधलेलें आहे या देवालयात दुसरा एडवर्ड, बिशप वॉरबरटन, डॉ. एडवर्ड जेनर इत्यादिकांची थडगीं आहेत. प्रतिवर्षी या देवालयांत एक उत्सव होत असतो. या देवालयाखेरीज इतर चार मंदिरें या शहरात आहेत. या शहरांतील घरें जुन्या पद्धतीवर बांधलेली आहेत तथापि जुन्या सार्वजनिक इमारती आता राहिल्या नाहींत. नव्या इमारतींपैकीं मुख्य इमारती–अजबखाना, शाळा, तुरुंग, शायर हॉल व व्हाइटफील्ड मेमोरियल चर्च ह्या होत. शहराच्या दक्षिणेस एक बगीचा असून त्यांत एक खनिज झरा आहे. या खनिज झऱ्याचा शोध १८१४ सालीं लागला. या बगीच्याच्या पश्चिमेस "लॅनथोनी प्रायोरी" या जुन्या इमारतीचे कांहीं अवशेष आहेत.

या शहरांत काड्याच्या पेटया, पाटया, रासायनिक द्रव्यें, रेल्वेचे डबे, एंजिनें, शेतकीची हत्यारें व गहानें या जिनसांचे कारखाने आहेत. १८८२ सालापासून ग्लूस्टर हें बंदर झालें. बर्कले कालवा १८२७ त उघडला गेला होता. आयाती माल म्हणजे लांकूड व धान्य हा असून निर्गतीचा माल कोळसा, मीठ, लोखंड व विटा हा आहे. या शहरात माशाचा व्यापार मोठा आहे. कायदेमंडळ ३१ सभासदांचें असून त्यांत १ मेयर, १० आल्डरमन व इतर सभासद असतात. पार्लमेंटांत एक सभासद पाठविला जातो.

इ ति हा स.—इ. स. ९६–९८सालीं ग्लूस्टर येथें रोमन लोकानीं म्युनिसिपालिटीची स्थापना केली होती. ६८१ सालीं येथें एका मंदिराची स्थापना झाली. ११५५सालीं दुसरा हेनरी यानें येथील लोकांना राजकीय हक्क दिले त्यानंतर ११९४ सालीं पहिला रिचर्ड व १२०० मध्यें जॉन यांनीं जास्त हक्क दिले १४८३ सालीं तिसऱ्या रिचर्डनें हें शहर आपल्या राज्यास जोडलें व १५६० त इलिझाबेथ व १६०४त पहिला जेम्स यांनीं येथील लोकांना दिलेले हक्क मान्य केले. १२७५ ते १८८५ पर्यंत येथून पार्लमेंटात दोन सभासद जात परंतु १८८५ सालापासून फक्त एक सभासद पाठविण्याची परवानगी मिळाली. प्रतिवर्षी २८ सप्टेंबर रोजीं येथें एक यात्रा भरते

**ग्वा**—ब्रह्मदेश ( लोअर ) सॅन्डोवे जिल्ह्यातला एक परगणा क्षेत्रफळ १२६४ चौ मैं याचा विस्तार आराकान योमापासून बंगालच्या उपसागरापर्यंत आहे व समुद्रकिनाऱ्याला पक्का खडक आहे १९०१ मध्यें लोकसंख्या १८४३७ म्हणजे दर मैली अवघे १५लोक होती मुख्य ठिकाण ग्वा हें खेडें ग्वा नदीच्या मुखाशीं आहे एकंदर खेडीं १७७ १९०३–४ सालीं लागवडीखालीं २२ चौ मैं. जमीन होती व कराचें उत्पन्न २२८०० रु झालें. बहुतेक लोक बुद्धधर्मानुयायी आहेत. चिन लोक मात्र भूतपिशाच्चांची पूजा करतात.

**ग्वाटेमाला**,वि भा ग –या नांवानें सध्यां फक्त ग्वाटेमाला या प्रजासत्ताक राज्याचा व त्याच नावाच्या शहराचा बोध होतो. पण पूर्वी हें नाव स्पॅनिश अमेरिकेच्या एका विभागास दिलें होतें. यात एकंदर पंधरा प्रांत होते त्यापैकीं चिआपास, सुचीटेपीक्वेस, सॉकोनेस्को हे प्रमुख होत. थोडक्यात या नावानें पनामाखेरीज करून बहुतेक सर्व मध्यअमेरिका व मेक्सिकोचा कांहीं भाग यांचा बोध होत असे ग्वाटेमाला या शब्दाचा अर्थ 'जंगलाची जमीन' असा कांहीं जण करतात.

ग्वाटेमालाचें प्रजासत्ताक राज्य उ अ १३°४२'से१७°४९' व पू. रे. ८८° १०' से ९२° ३०' यांमध्यें वसलेलें आहे. याची लो सं इ स. १९०३ सालीं १८४२१३४ होती क्षेत्रफळ ४८२९० चौरस मैल आहे.

याच्या उत्तरेस व पश्चिमेस मेक्सिको, ईशान्येस ब्रिटिश हॉन्डुरास, पूर्वेस हॉन्डुरासचें आखात व हॉन्डुरासचें प्रजासत्ताक राज्य, आग्नेयीस सॅल्व्हाडॉर आणि दक्षिणेस पॅसिफिक महासागर आहे. या प्रांताची मेक्सिकोकडील सरहद्द ८ मे इ. स. १८९९ रोजीं भरलेल्या परिषदेंत नि[illegible] झाली. या प्रांताचे स्वाभाविक पाच विभाग पडतात (

पॅसिफिक महासागराच्या किनाऱ्यालगतचा सखल प्रदेश, (२) सिएरा मॅड्रेमधील ज्वालामुखी पर्वत, ( ३ ) या पर्वताच्या उत्तरेस असलेलें पठार, ( ४ ) अटलांटिक महासागराकडील पर्वत व ( ५ ) पेटनचें मैदान

न द्या — प्रांतात बऱ्याच नद्या आहेत सिएरा पर्वताच्या पश्चिमेकडील भागात जरी नद्या बऱ्याचशा आहेत तरी पण त्या लहान आहेत परंतु पूर्वेकडे व याचशा नद्या असून त्या मोठयाहि आहेत मॉन्टेग्युआतील रायोग्रॅन्डो नावाची नदी सुमारें २५० मैल लांब असून ती राजधानीपासून जवळ जवळ ९० मैल पर्यंत नौकानयनाजोगी आहे पॉलोचिक नांवाची १८० मैल लांबीची दुसरी एक नदी असून ती टेलेमान बंदराच्या वरच्या बाजूस सुमारें २० मैल पर्यंत नौकानयनास योग्य आहे चेक्सॉय, ग्वाडेल्यूप व रायोडीला पॅशन व इतर काहीं नद्या मिळून उसुमॅसिन्टा नदी होते

स रो व रें — या प्रांतांत विस्तृत सरोवरेंहि पुष्कळशीं आहेत पेटनचें सरोवर २७ मैल लांब व १३ मैल रुंद आहे पश्चिमेकडील एका बेटात फ्लोअर्स नांवाचें सरोवर आहे त्याच्या कांठावर कोविलिसनान्ची गुहा असून स्थानिक उत्सवासाठीं तें स्थान प्रसिद्ध आहे या तळयात कॉर्टेस याच्या घोड्याचा दगडी पुतळा अजूनहि दिसतो अशी आख्यायिका आहे याशिवाय गोल्फो डलसे नावाचें एक गोडया पाण्याचें सरोवर आहे,हें सुमारें३६ मैल लांब आहे राजधानीच्या दक्षिणेकडे सुमारें ९ मैलावर ॲमॅटिटलॅन नावाचें सरोवर आहे याशिवाय समुद्रसपाटीपासून अजमासें २१०० फूट उंची वर शिवाश नावाचें २० मैल लांब व १२ मैल रुंद असें सरोवर आहे तेथें नाना तऱ्हेचे पक्षी असून त्यातील एका सुंदर पक्ष्याची ' राष्ट्रचिन्ह ' म्हणून योजना करण्यात आली आहे

ह वा — समुद्रकिनारा खेरीजकरून इतर भागात हवा आरोग्यकारक आहे समुद्रकाठच्या प्रदेशात मात्र साथीचा ताप ( मलेरिआ ) असतो मध्यप्रदेशात पावसाळा मे महिन्या पासून आक्टोबरपर्यंत असतो, समुद्रकिनाऱ्यावर मात्र कित्येक वेळा डिसेंबर पर्यंत लांबतो

येथें सोनें, चांदी, शिसें, कथील तांबें, पारा, कोळसा, क्षार, आणि गंधक वगैरे खनिज पदार्थ सांपडतात लासबेमाडास येथें सोनें सापडतें

इ स १९०४ सालीं येथील जंगल सुमारें २०३० चौरस मैल होतें येथें रबर व बऱ्याच तऱ्हेचें लाकूड सापडतें फळें, धान्य व औषधोपयोगी वनस्पती येथें विपुल आहेत याशिवाय या प्रांतांत कॉफी, कोको, ऊंस, नारिंग, तंबाखू, नीळ वगैरे बरेच पदार्थ उत्पन्न होतात

लो क व स्ती — या देशात जननाचें प्रमाण अधिक असून मृत्यूचें प्रमाण कमी आहे यामुळें लोकसंख्या सारखी वाढत आहे याच प्रमाणें परदेशी जाणारे लोक देखील येथें थोडे आहेत १९०३ सालीं येथील लोकसंख्या १८४२१३४ अथवा मध्यअमेरिकेच्या लोकसंख्येच्या एक तृतीयांश होती १९१४ सालीं ती २००३५७९ भरली शेंकडा ६० लोक तद्देशीय रहिवाशी असून बाकीचे लॅटिन्स म्हणून ओळखले जातात या लोकांची भाषा व राहाणी स्पॅनिश धर्तीची आहे येथ सुमारें १२००० परदेशीय लोक आहेत त्यांत यूरोपियन, अमेरिकन व ज्यू हे प्रमुख होत तद्देशीय लोकांच्या संततीपैकीं सुमारें अर्धे व श्वेतवर्णीय संततीपैकीं सुमार एकतृतीयांश अनौरस असतात

येथें सुमारें अठरा भाषा प्रचारांत आहेत येथील इंडियन लोक मय जातीपैकीं आहेत सोळाव्या शतकात मय व क्विशेन ह्या जाती सुधारलेल्या म्हणून गणल्या जात होत्या बाह्यतः येथाल निरनिराळ्या लोकात फारच थोडा फरक दृष्टोत्पत्तीस येतो हे इंडियन लोक साधारणपणें ठेंगणे पण मजबूत बांध्याचे आहेत यांचें कपाळ अरुंद असून गालाची हाडें पुढें आलेलीं दिसतात व त्यांचे केस सडक व काळे असतात स्वभावतः हे लोक शांतताप्रिय आहेत परंतु स्थानिक राजकारणांत वारंवार ढवळाढवळ करणाऱ्या अनेक कारस्थानात त्यांनीं भाग घतला आहे हे लोक अतिशय धार्मिक आहेत ते साधारणपणें उधळे, आळशी व जुवेबाज आहेत सार्वजनिक उत्सव, नाच, गाणें व नाटकें करणारे असे 'बहुसमाज' आहेत त्यांची नाटकें धार्मिक व ऐतिहासिक असतात त्यांना बैलाच्या टकरींचा व कोंबडीं झुंजविण्याचा नाद आहे ते गानप्रिय असून स्पॅनिश सारंगीवर गातात गंधकयुक्त अशी पिवळट रंगाची माती खाण्याचा त्यांच्यात प्रघात आहे पगाराच्या दिवशीं व सणाच्या दिवशी ते अतिशय दारू पितात

मु ख्य श ह र — ग्वाटेमाला हें शहर राजधानीचें असून १९१० सालीं येथील लोकसंख्या ९०००० होती याशिवाय इतर प्रमुख शहरें, क्वेझॅलटेनँगो, टोटोनिकॅपम, कोबॅन, सोलोला व एस्क्विंटला हीं होत लिव्हिंग्जटन हें बंदर आहे

नौ का न य न व द ळ ण व ळ णा चीं सा ध नें — न्यूयॉर्क, न्यू ऑर्लिन्स हॅम्बर्ग वगैरे ठिकाणाशीं ग्वाटेमालाचें दळणवळण आगबोटींनीं होतें मोठमोठीं शहरें एकमेकाशीं रस्त्यांनीं जोडलेलीं आहेत आणि ह्या रस्त्यांची डागडुजी वगैरे करिता प्रत्येक पुरुषानें दोन पेसोस दिले पाहिजेत अगर त्याऐवजीं चार दिवस काम केलें पाहिजे असा नियम आहे कित्येक सडकाहि आहेत पण बहुतेक माल खेचराच्या पाठी वरून नेतात सर्व आगगाडीचे रस्ते इ स १८७५ पासून बांधण्यात आले आहेत मध्यअमेरिकेची सार्वराष्ट्रीय रेल्वेसंस्था १९१२ सालीं स्थापण्यात येऊन तिच्या वतीनें ग्वाटेमाला रेल्वे ( १९५ मैल ), ग्वाटेमाला सदर्न रेल्वे ( १३९ मैल ) वगैरे गाड्या देशातून जातात ग्वाटेमाला 'टपाल' संघात इ स १८८१ सालीं सामील झालें येथील सर्व ध्वनिवाहक यंत्रें (टेलीफोन) सरकारी

मंडळांच्या मालकीचीं आहेत १९१७ त ४२३ पोष्ट ऑफिसें, ४३३७ मैलाच्या तारा व ५३१ मैलाचे टेलिफोन होते.

व्या पा र व धं दे.—येथें कच्चे पदार्थ विपुल आहेत. पण त्यांत वाढ होण्यास अजून बरीच जागा आहे. या देशांत लढाया, क्रांत्या व आर्थिक आपत्ती वारंवार येत असल्यामुळें पुरेसें भांडवल मिळत नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं या देशाचा निर्गत व्यापार मुळींच नव्हता. इ. स. १८२५ ते १८५० च्या दरम्यान येथून किरमिजी रंगाकरितां बरीच वनस्पति निर्गत होत असे पण शास्त्रीय पद्धतीनें तयार केलेल्या रंगापुढें तिचा टिकाव न लागल्यामुळें पुढें हा व्यापार बंद पडला.

या व्यापाराची जागा लवकरच कॉफीच्या व्यापारानें भरून काढली. परदेशीय व्यापाराच्या चढाओढींत कापसाचा व निळीचा व्यापार टिकाव धरूं शकला नाहीं.

इ. स. १८९४ च्या जमिनीच्या कायद्याप्रमाणें येथील जमिनीचे कित्येक भाग विक्रीकरितां काढले होते परदेशीय लोकांस जमिनी फुकट देण्यांत आल्या. मळेवाल्याकडे नोकर असलेल्या इंडियन लोकांची स्थिति गुलामगिरीच्या तोडीची आहे. कारण मळेवाले मजुरांस पैसे अगाऊ देतात. हे लोक आपली कमाई तात्काळ खर्च करून टाकतात व पुढें कर्ज काढतात आणि या कर्जाची फेड नोकरी करून करावयाची असते.

येथें दारूचे, साखरेचे व तंबाखूचे कारखाने आहेत. याशिवाय कापसाचे व लोंकरीच्या कापडाचेहि कारखाने आहेत. १९१७ सालची आयात व निर्गत अनुक्रमें १७९८३१४ पौंड व १५६१९४६ पौंड होती.

ज मा बं दी—१९१८ सालीं नॅशनल असेंब्लीनें एक बँक ( नॅशनल बँक ) उघडली. याखेरीज खासगी मोठ्या ४ बँका येथें आहेत. १९१७—१८ सालची जमाबंदी व खर्च अनुक्रमें १३५४७१५८५ डॉलर व १३१४१३२१८ डॉलर होता.

रा ज्य व्य व स्था.—इ. स. १८७९ सालीं येथील राज्यव्यवस्था ठरविण्यात आली. ह्यावर इ. स. १८८५, १८८७, १८८९व१९०३या सालीं तींत सुधारणा करण्यात आली या कायद्याप्रमाणें कायदे करण्याचा अधिकार राष्ट्रीय सभेस देण्यात आला आहे. या कायदेकारी मंडळात ६९ प्रतिनिधी असतात ( प्रत्येक २०००० स एक याप्रमाणें ), ते चार वर्षांकरितां लोकांनीं निवडलेले असतात. या निवडणुकींत मताधिकार सर्वांना असतो. या मंडळाचा अध्यक्षहि याचप्रमाणें निवडलेला असतो आणि तो पुढील निवडणुकींत पुन्हां उमेदवार म्हणून उभा राहूं शकत नाहीं. त्याला सहा मंत्र्यांची मदत असते. यापैकीं प्रत्येकजण निरनिराळ्या खात्याचा मुख्य असतो. याशिवाय त्यास १३ जणांचें राष्ट्रीय सल्लागार मंडळ ( कौन्सिल ऑफ स्टेट ) मदत करण्याकरितां असतें यातील कांहीं सभासद अध्यक्षानें व कांहीं कायदेकारी मंडळानें नेमिलेले असतात.

स्था नि क रा ज्य व्य व स्था.—यात एकंदर २१ खातीं असतात. प्रत्येक खात्यावर एक वेगळा अधिकारी असतो. याचे निरनिराळे जिल्हे पाडलेले असतात. या प्रत्येक जिल्ह्यावर मेयर ( अध्यक्ष ) असतो. त्याला मदत करण्याकरितां एक मंडळ असतें. हें मंडळ आणि अध्यक्ष लोकांनीं निवडलेला असतो.

न्या य खा तें.—येथील दिवाणी अधिकार सदर अदालतीस दिलेला आहे. यात एक सर न्यायाधीश व याला मदतीस म्हणून चार लोकनियुक्त न्यायाधीश दिलेले असतात. या सहा अपील कचेऱ्या असून प्रत्येकीवर लोकनियुक्त तीन न्यायाधीश असतात

याशिवाय येथें एकंदर२६कनिष्ठ दर्जाच्या कचेऱ्या आहेत. या प्रत्येकीवरील न्यायाधिशांपैकीं एक अध्यक्षानें व दोन वरिष्ठ कोर्टाच्या सरन्यायाधिशानें नेमलेले असतात.

ध र्म आ णि शि क्ष ण —रोमन कॅथोलिक हा प्रचलित धर्म येथें आहे. १८९३ सालीं लोकसंख्येपैकीं शेंकडा ९० लोकांना लिहितांवाचतां येत नसे, शेंकडा २ लोकांस फक्त वाचता येत असे आणि शेंकडा ८ लोकांस लिहिता व वाचता येत असे मुलांना ६–१४ वर्षें वयापर्यंत प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें आहे १९१७ सालीं येथें एकंदर १९४२सरकारी शाळा होत्या, पैकीं १८ किंडरगार्टन, ४९२ मुलांच्या प्राथमिक व ५१६ मुलींच्या प्राथमिक शाळा. २४ मुलींसाठीं ट्रेनिंग शाळा, ४९ मजुरासाठीं रात्रीच्या शाळा, ३ कलाशिक्षणाच्या शाळा व ३१७ खेड्यातील शाळा होत्या. उच्च प्रतीचें शिक्षण राजधानींतील दोन राष्ट्रीय संस्थांतून दिलें जातें. या शिवाय धंदेशिक्षणाकरिता ( उदा कायदा, वैद्यक, यंत्रशास्त्र ) खाजगी संस्था आहेत. १९१८ त ग्वाटेमाला विश्वविद्यालयाची स्थापना झाली

सं र क्ष ण.—श्वेतवर्णीय व मिश्र लोकांकरिता लष्करी शिक्षण सक्तीचें आहे. अठरा ते तीस वयाचा पुरुषास चालू लष्करांत सामील करण्यात येतें व तीस ते पन्नास वयाच्या पुरुषास राखीव सैन्यांत सामील करण्याची पद्धत येथें आहे.

इ ति हा स —हा देश स्पॅनिश लोकांनीं इ. स १५२२ व १५२४ च्या दरम्यान काबीज केला. या लोकांनीं येथें रोमन कॅथोलिक धर्माचा प्रसार केला व स्पॅनिश भाषा प्रचारात आणिली.

प्रारंभीं या देशात निराळ्या पक्षांचे लोक होते. त्यात संयुक्त प्रजासत्ताक राज्यपद्धतीच्या विरुद्ध असलेला एक पक्ष अस्तित्वांत होता त्यानें संयुक्त प्रजासत्ताक राज्यपद्धति उलथून पाडून लोकसत्ताक राज्यपद्धति अस्तित्वात आणिली. संयुक्त प्रजासत्ताक राज्यपद्धतीच्या पुरस्कर्त्यांनीं ती अमलात आणण्याकरितां अनेक वेळा प्रयत्न केले पण ते अयशस्वी

झाले. इ. स. १८५१ साली येथें एक नवीन तऱ्हेची राज्यव्यवस्था अमलांत आली व तीप्रमाणें कॅरेरा यास अध्यक्ष नेमलें व पुढें इ. स. १८५४ मध्यें कॅरेरा यानें आमरण अध्यक्ष असावें असें ठरलें.

कॅरेरा यास आपलें पद अढळ राखण्याकरितां लढावें लागलें पण शेवटीं तोच यशस्वी झाला. कॅरेराच्या मागून सेनापति केर्ने हा अध्यक्ष झाला. पण इ. स. १८७० च्या सुमारास उदारमतवादी पक्ष प्रबल होत चालला व शेवटीं रुफीनो बॅरिऑस ( १८३५–१८८५ ) यास १८७३ सालीं अध्यक्ष निवडण्यात आलें जरी त्यानें शिक्षण, आगगाड्या व उद्योगधंदे यास अनेक प्रकारें मदत केली व मेक्सिकोची सरहद्द ठरविली तरी पण त्याची कारकीर्द लोकास दु:खाकारकच झाली. याच्यामागून मॅन्युअल बॅरिआस हा अध्यक्ष झाला. या वेळीं तात्पुरती शांतता झाली पण शेवटीं खून व क्रांती हे हेतु असणारे कट झाले

इ. स १८९२ सालीं जोसे मेरिआ रीना बॅरिऑस यास अध्यक्ष निवडण्यात आलें. पण ता. ८ फेब्रुवारी १८९८ रोजीं तो मारला गेला उपाध्यक्ष सेनॉर मॉरेल्स हा अध्यक्ष झाला; पण त्याच वर्षी इस्ट्राडा कॅब्रेरा यास १९०५ पर्यंत अध्यक्ष निवडलें कॅब्रेरा यानें शिक्षण व व्यापाराची वाढ केली आणि दळणवळणाच्या साधनाची सुधारणा केली.

इ. स. १९०५ पासून १९११ पर्यंत त्यास पुन्हा अध्यक्ष निवडलं पण त्यामुळें बराच असंतोष माजला. माजी अध्यक्ष बॅरिलास यानें सॅनफ्रॅन्सिस्को येथील कित्येक साहसी लोक जमा केले व १९०६ सालीं मेक्सिकोमधून ग्वाटेमालावर स्वारी केली. बॅरिलॉस यानें चादींचें नाणें प्रचारात आणण्याचा आपला मनोदय प्रकट केला व त्यामुळें त्याला ब्रिटिश व जर्मन रहिवाशांची सहानुभूति मिळाली. बॅरिलॉसच्या लोकांनीं ऑकास हस्तगत केलें; पण कॅब्रेरा यानें आपली जागा यत्किंचितहि न सोडता कित्येक जय मिळविले पण अमेरिकन अध्यक्ष रूझवेल्ट व मेक्सकोचा अध्यक्ष डिआझ हे मध्यें पडल्यामुळें ता. १९ जुलै रोजीं तात्पुरती लढाई थांबली. शेवटीं ता. २८ सप्टेंबर रोजीं कायमचा तह करण्यात आला. या तहात लढाईच्या भागात व्यापार व नौकानयनासंबंधीं सुधारणा करण्याची अट होतीः आणि यापुढें कोणत्याहि भानगडीचा निकाल संयुक्त संस्थान व मेक्सिको याच्या मध्यस्थीनें लावण्याचें ठरलें

[ संदर्भग्रंथ–सरकारी रिपोर्ट; ब्रिगहॅम–ग्वाटेमाला, कीन–सेंट्रल अँड साऊथ अमेरिका; विंटर–ग्वाटेमाला अँड हर पीपल टु डे, बोस्टन, १९०९. ]

**शहर.**—हें ग्वाटेमाला प्रजासत्ताक संस्थानाची राजधानी आहे. हें शहर सुमारें ५००० फूट उंचीच्या अफाट पठारावर वसलेलें असून याची एकंदर लोकसंख्या सुमारें ९०००० आहे. ' काऊ ' नावाची नदी या पठारावर आडवी वहात जाते. या पठाराच्या कडेकडेनें बऱ्याच खोल दऱ्या असून त्याच्या पलीकडे चोहोंबाजूंस उंच पर्वतओळी आहेत. पर्वतांतील सर्वांत उंच अशीं शिखरें दक्षिण बाजूस आहेत. व्यापाराच्या दृष्टीनें हें शहर महत्वाचें आहे. मुख्यतः कॉफीचा व्यापार येथें चालतो. याशिवाय रेशीम, सूत, सिगारेट्स, कातडी जिन्नस, दारू वगैरेसंबंधीं बरेच कारखाने आहेत परदेशचा व्यापार बहुतेक जर्मनांच्या हातीं असतो. शहराचे रस्ते रुंद व व्यवस्थित असे असून रस्त्यांच्या कडेकडेनें शोभेकरितां व सोयीकरितां मोठीं झाडें लाविलीं आहेत. शहराच्या आसपास बरींच खेडीं वसलेलीं आहेत. घरें प्रायः एकमजली असून मजबूत व सोयीचीं अशीं आहेत. घराभोंवतीं बगीचे, खेळण्याच्या जागा वगैरे असतात. येथील " प्लाझा मेयर " नावाचें मोकळें मैदान पाहण्यासारखें असून येथें ख्रिस्ती देवालय, सरकारी कचेऱ्या, टाकसाळ वगैरे इमारती आहेत. " रीफार्मा पार्क " व " प्लाझा डी ला काकार्डिया " हे दोन रमणबाग ( अगर पार्क ) प्रसिद्ध आहेत. शहरात शालागृहें, रुग्णालयें, अनाथवसतिगृहें, पदार्थसंग्रहालय वगैरे आहेत. येथील नाटकगृह मध्यअमेरिकेंत अप्रतीम असें आहे.

येथील दोन किल्ले ( कॅस्टेलो मेटॅमोरोस व कॅस्टेलो डीसान जोसे ) प्रेक्षणीय आहेत. शहरात विजेचे दिवे, टेलिफोन वगैरेंची सोय केलेली आहे वाढतें महत्व व नगररचना या दृष्टीनें हें शहर मध्यअमेरिकेंतील " पॅरिस " समजलें जातें.

**ग्वाटलक्विव्हर नदी**—दक्षिणस्पेनमधील नदी. हिचा उगम जेन प्रान्तात होतो हिला डावीकडून ग्वाडियाना मेनॉर व उजवीकडून ग्वाडलीमर या उपनद्या मिळतात हिची लांबी ३६० मैल असून ही अटलांटिक महासागरास मिळते. ही स्पेनमधील लहान नदी आहे. तरी हिचें पाणी आटत नाहीं. सेव्हिलेपर्यंत हिच्यात जहाजें चालतात.

**ग्वाडा**—न्होडेशियातील एक शहर.

**ग्वाडेलोपी**—फ्रेंच वेस्ट इंडीजमधील एक बेट. हें उत्तर अक्षांश १५°. ५९' ते १६°. २०' आणि ६१° ३१' ते ६१°. ५०' पश्चिम रेखांशात आहे. या बेटाचे बासेटेरी व ग्राडेटेरी असे दोन भाग होतात. ला सुफ्री नावाचें सर्वांत उंचशिखर ( ४९०० फूट ) आहे. बासेटेरीमध्यें लहान नद्या पुष्कळ आहेत. ग्राडेटेरीला तळीं व हौद यामधून पाण्याचा पुरवठा होतो. ह्या बेटात भयंकर वादळें होतात. जमीन चांगली असून मुख्यत्वेंकरून साखर तयार होते. द्विदलधान्यें, कोको, कापूस, याम व रबर हे इतर पदार्थहि तयार होतात. बहुतेक निर्गत फ्रान्समध्यें होते. आयात मालांत फ्रान्स, संयुक्त संस्थानें, ग्रेटब्रिटन व हिंदुस्थान यांच्याशीं संबंध येतो. या बेटात कांहीं गोरे, फ्रेंचहद्दींतील कांहीं हिंदी व बाकीचे निग्रो व म्युलेटो लोक आहेत. म्युलेटो लोकांची सौंदर्याबद्दल प्रसिद्धि आहे. लो. सं. ( १९११ ) २१२४३०. बासटेरी ( ८९५९ ) येथें राजधानी.

आहे. पॉइंट-आ पिटर (२२६६४) हें सर्वांत मोठें शहर व मुख्य बंदर आहे.

ग्वाडेलोपच्या भोंवतीं लाडेसिराद, मेरी, गॅलांटी, लेस-सेंटीस, नार्टिन व सेंट पार्थोलोम्यू ही मांडलिक बेटें आहेत. एक गव्हर्नर व लोकनियुक्त कौन्सिल याकडून राज्यव्यवस्था होते.

इतिहास.—ग्वाडेलोपी बेट १४९३ त कोलंबसानें शोधून काढिलें व स्पेनमधील एका मठावरून त्यांचें नाव दिलें. १६३५ सालीं फ्रेंचांनीं हें बेट घेतलें. ब्रिटिशानीं हें बेट १७५९ त मोठया शिकस्तीनें काबीज केलें. बोनापार्टनें १८०२ त व्हिक्टर ह्युगेसनें मोडिलेली गुलामगिरी स्थापण्यासाठीं कांहीं सैन्य पाठविलें.१८१० त पुन्हा ब्रिटिशानीं हें बेट घेतलें. परंतु १८१६ त मात्र त्यांना परत द्यावें लागलें १८४८ त गुलामगिरी बंद करण्यात आली.

ग्वादर—बलुचिस्तान,मकरानमधील एक बंदर. उ. अ० २५°८' पू.रे० ६२.१९'. लो. सं. (१९०३) ४३५०. कराचीपासून २९० मैल. १५८१ मध्यें पोर्तुगीजांनीं यावर स्वारी केली होती.कलात (खिलातच्या)खानानें तें जिंकून मस्कतच्या नवाबास दिलें. तेव्हांपासून ३०० चौ. मैलाच्या मुलुखासह तें त्याच्याच ताब्यात आहे. व्यापार हिंदू व खोजा लोकांच्या हातीं आहे. आयात माल २ लाखाचा व निर्यात ५॥ लाख. ब्रिटिश इंडिया स्टीम नॅव्हिगेशन कंपनीची बोट येथें दर पंधरवड्याला लागते.

ग्वाम—अमेरिका. मरिआना द्वीपसमूहांतील एक बेट. उ. अ. १३°२६' व पू. रे. १४४°४३'. बेटाची लांबी ३२ मैल व रुंदी ४ ते १० मैल आहे. क्षे. फ. सुमारें २२५ चौ. मै. आहे. लो. सं. ( १९१८ ) १४,३४४, पैकीं बहुतेक ' नेटिव ' आहेत. स्थानिक भाषा चामोरो आहे. पण इंग्रजी व स्पॅनिश भाषाहि प्रचारात आहे.

युनायटेड स्टेट्सच्या आरमारी खात्याकडे याचा कारभार असून हें एक आरमारी ठिकाण म्हणून गणण्यात येतें. येथील गव्हर्नर एक आरमारी अधिकारी असून त्याची निवडणूक अमेरिकेच्या प्रेसिडेंटाकडून होते व तोच सर्व राज्यव्यवस्था पाहतो. स्पॅनिश वसाहती कायदे अद्याप अमलात आहेत. आगना हें राजधानीचें ठिकाण आहे.

या बेटात प्राथमिक शिक्षण सक्तीचें आहे. शाळांतून इंग्रजी भाषा, कलाकुसरीचीं कामें व शेतकी यांचें शिक्षण देण्यात येतें. मका, तांदूळ, बटाटे, कॉफी, कोको आणि साखर या ठिकाणीं होतें; उत्तम सागवानहि निपजतें. १९१८ साली १३१७५७ डॉलरची निर्यात व ३५८१४६ डॉलरची आयात होती. येथील चलन ( नाणीं ) अमेरिकनच आहेत.

ग्वायना—हें नांव दक्षिण अमेरिकेच्या ईशान्येकडील उ.अ.८°४०' ते द.अ.३°३०' व पू. रे. ५०°ते ६८°३०'यांवर असलेल्या प्रदेशाला दिलें आहे. याची लांबी केपोरीनोर्टेपासून रायोक्साय व रायो नीग्रो या नद्यांच्या संगमापर्यंत १२५० मैल व रुंदी बॅरिमा पॉइंटपासून रायोनिग्रो व ॲमेझॉन नद्यांच्या संगमापर्यंत ८०० मैल आहे. क्षेत्रफळ ६९०००० चौरस मैल आहे. या प्रदेशात व्हेनेझुएलिअन ग्वायना, ब्रिटिश ग्वायना, डच ग्वायना, व फ्रेंच ग्वायना हे प्रदेश आहेत. पैकीं ब्रिटिश, फ्रेंच व डच ग्वायना यांचें वर्णन येथें केलें आहे.

इतिहास.—१४९८ मध्यें कोलंबसला ग्वायनाचा समुद्रकिनारा दिसला व त्यानें ट्रिनिदाद बेट व पेरिआचें द्वीपकल्प शोधून काढिलें; पुढल्या वर्षी आलेंझो डिओजेडा व ॲमेरिगो व्हेस्पुसी यांनीं शोध लावला. व्हिन्सेंट यानेझ पिंझॉन यानें ॲमेझॉन नदीचा शोध लावला. काबीज केलेल्या जहाजात सापडलेल्या पत्रावरून सर वाल्टर रॅले१५९५ मध्यें एल्डोरॅडो अथवा ' सुवर्णनगरी ' याच्या शोधाकरितां ॲमेझॉन नदी उतरून गेला इ. सन १५९८ मध्यें प्रथम डच लोक ग्वायनामध्यें आले. १६१३ मध्यें डेमेरेरा व एसेक्विबोच्या समुद्रकिनाऱ्यावर डचांच्या तीन चार वसाहती होत्या. १६१६ मध्यें हॉलंडर लोक किक ओवर आल नावाच्या लहानशा बेटावर वसाहत करून राहिले होते. ज्यावेळीं डच व्यापारी एसेक्विबो व डेमेरेरामध्यें ठाणें वसविण्याची खटपट करीत होते त्याच वेळीं इंग्लिश व फ्रेंच व्यापारी ओयॅपॉक नदीवर कायेनी व सुरिनाममध्यें वसाहत करण्याचा प्रयत्न करीत होते. डच ईस्ट इंडिया कंपनीनें एसेक्विबोचा ताबा मिळवून १७९१ पर्यंत या लोकांनीं येथें सत्ता चालविली. १६२४ मध्यें बर्बाइस नदीमध्यें एक डच वसाहत झाली व हीपासून बर्बाइस नावाची एक स्वतंत्र वसाहत झाली. १६५७ मध्यें हॉलंडर लोकांनीं पोमेरून, मोरूका व डेमेरेरामध्यें आपला पाय कायमचा रोंविला; व १६७४ मध्यें डच लोक सध्या ज्याला ब्रिटिश व डच ग्वायना म्हणतात त्या सर्व प्रदेशात वसाहत करीत होते. १७८१ मध्यें डेमेरेरा, एसेक्विबो व बर्बाइस या तिन्ही वसाहती ब्रिटिशांनीं घेतल्या. परंतु १७८२ मध्यें फ्रेंचांनीं त्या घेऊन १७८३ मध्यें हॉलंडला परत दिल्या. १७९६ मध्यें ब्रिटिशानीं पुन्हा या वसाहती घेतल्या व १८०२ पर्यंत त्या आपल्या ताब्यात ठेविल्या व पुन्हा हॉलंडला दिल्या. १८०३ मध्यें ग्रेटब्रिटननें त्या पुन्हा काबीज केल्या व ह्या वेळेपासून ब्रिटिश ग्वायनाच्या इतिहासास सुरुवात झाली.

ब्रिटिश ग्वायना.—ब्रिटिश ग्वायना हा दक्षिण अमेरिकेंतील ब्रिटिश लोकांचा मुलूख आहे. हा १८१४-१८१५ मध्यें दिला गेला. याचे बर्बाइस, डेमेरेरा व एसेक्विबो असे तीन विभाग आहेत. १८४० मध्यें सर रॉबर्ट स्कोम्बर्ग यानें व्हेनेझुएला व ब्रिटिश ग्वायना यांच्यामध्यें एक सरहद्दीची रेषा सुचविली होती. हिला स्कोम्बर्ग लाइन म्हणतात. या हद्दीच्या प्रश्नाचा निकाल आंतरराष्ट्रीय कमिशननें केला व १९०२ मध्यें ब्रिटिश ग्वायना व ब्राझिल यांच्यामधील

सरहद्दींच्या प्रश्नाचा निकाल इटलीच्या राजाच्या मध्यस्तीमुळें लागला. ब्रिटिश ग्वायनाचें क्षेत्रफळ ८९४८० चौ. मैल आहे.

शहरें:—ब्रिटिश ग्वायनाची राजधानी जॉर्ज टाऊन हें शहर आहे. हें डेमेरॅरा नदीच्या उजव्या तीरावर असून याची लोकसंख्या सुमारें ५०,००० आहे. न्यु ॲमस्टरडॅम हें बर्बाइस नदीच्या उजव्या तीरावर असून याची लोकसंख्या सुमारें ७५०० आहे. प्रत्येक शहरात एक मेयर असून कौन्सिल आहे व याना कर बसविण्याचा अधिकार आहे एकोणीस खेडीं व स्थानिक स्वराज्याचा हक्क असलेलीं दुसरीं दहा क्षेत्रें आहेत याचा कारभार खेड्यातील कौन्सिल व अधिकारी चालवितात

लोकसंख्या:—१९११ मध्यें येथील लोकसंख्या २९६००० ( मूळचे रानटी लोक सोडून ) होती. मूळचे रहिवाशी याची संख्या १२००० होती.

ग्वायनातील हिंदी मजूर.—या वसाहतींत एकंदर मजूर पुष्कळ आहेत. ईस्ट इंडियन मजूर एकंदर ६० । ७० हजार आहेत आणखी हिंदी लोक यावेत अशी वसाहतसरकारची इच्छा दिसते.

इ. स. १८३८ पर्यंत येथें गुलामगिरीची पद्धत चालू होती. त्यानंतर मुदतबंदीच्या मजुराची पद्धत चालू होऊन एकप्रकारें गुलामगिरीच चालू ठेवण्यात आली होती ही मुदतबंदीची पद्धत इ. स. १९१७ सालीं कायद्यानें नष्ट करण्यात आली. इ स. १८३८ सालीं हिंदुस्थानातील मुदतबंदीचे मजूर घेऊन हिंदुस्थानचें पहिलें जहाज तेथें गेलें. तेव्हापासून मुदतबंदीच्या करारावर दरवर्षी हिंदुस्थानातून मजूर जात असत व त्यातील कांहीं लोकानीं पुढें तेथेंच वस्ती केली. पण इ स. १९१७ पासून मुदतबंदीची पद्धत बंद झाल्यामुळें हिंदुस्थानातून थेट ब्रिटिश ग्वायनात जाणाऱ्या बोटी बंद झाल्या आणि हिंदुस्थानचा व या वसाहतीचा संबंध तुटल्यासारखा झाला. हल्लीं या वसाहतीकडे जावयाचें असल्यास प्रथम इंग्लंडला यावें लागतें व तेथून ग्वायनाची बोट मिळते. कलकत्ता, मुंबईहूनहि ग्वायनाला जाणारी एखादी बोट कधीं कधीं मिळते. हा संबंध पुन्हा जोडण्याची ग्वायनाच्या सरकारची खटपट चालू आहे.

सरकारी मदत घेऊन हिंदुस्थानातील कांहीं लोकानीं ब्रिटिश ग्वायनामध्यें राहण्यास यावें अशा अर्थाची एक वसाहतीची योजना हिंदुस्थान सरकारपुढें विचारार्थ ठेवण्याकरिता स. १९१९ अखेर एक ब्रिटिश ग्वायना येथील शिष्ट मंडळ इकडे आलें होतें. इतर ब्रिटिश प्रजाजनाप्रमाणें हिंदी लोकाचा फायदा होईल किंवा नाहीं आणि त्याचा योग्य दर्जा ठेवण्यात येईल किंवा नाहीं या प्रश्नासंबंधीं खात्री करून घेण्याकरिता व तेथील स्थानिक परिस्थितीचा अभ्यास करण्याकरिता हिंदुस्थान सरकारच्या कमिटीनें एक शिष्ट मंडळ ग्वायनास पाठविलें. देशातर करणाऱ्या हिंदी लोकास समान राजकीय हक्क आम्ही खुषीनें देऊं असें वसाहतसरकारनें १९२१ सालीं प्रसिद्ध केलें १९२२ च्या एप्रिल मध्यें हिंदुस्थान सरकारनें, ग्वायनाहून परत स्वदेशीं आलेल्या ११६ हिंदी लोकाना व त्याचप्रमाणें इतर वसाहतींतून परत आलेल्या १६७ इसमाना पुनः ब्रिटिश ग्वायनास परत जाण्याची मंजुरी दिली. ब्रिटिश ग्वायना सरकारनेंहि लोकाच्या वाटखर्चाची व ते तेथें पोचतांच त्याच्या निर्वाहाच्या साधनाची हमी घेतली. अशा रीतीनें डॉ. नूनन व वॅ. लक्रू याची योजना १९२४ सालापर्यंत तरी यशस्वी झाली, व त्याच वर्षी जून महिन्यात वरील गृहस्थ स्वदेशीं जाण्यास निघाले हिंदुस्थानातील प्रतिनिधींनें रिपोर्ट केल्यावर वसाहतीच्या योजनेची शिफारस करण्याचें येथील कायदेकौन्सिलच्या एमिग्रेशन कमिटीनें ठरविलें

एप्रिल १९२४ मध्यें मजुराचा मोठा दंगा झाला. तारीख १ एप्रिल १९२४ रोजीं धक्क्यावरील नीग्रो कामकऱ्यानीं संप केला व दंग्यास सुरुवात झाली. संप करण्याबद्दल व जॉर्ज टाउन येथें जाऊन अधिक वेतन मिळविण्याच्या चळवळींत भाग घेण्याबद्दल डायमंड व प्रॉव्हिडन्स येथील ईस्ट इंडियन मजुराचें मन चळवळ्या लोकानीं वळविलें. जबरदस्तीनें दंगे थोपविण्यात येतील असे जाहिरनामे ठिकठिकाणीं वाचण्यात आले; तथापि ईस्ट इंडियन मजुरानीं शहरात प्रवेश केला. पोलिसावर हल्ले झाले, त्यावेळीं गोळीबाराचा हुकुम देण्यात आला, त्यामुळें नऊ ईस्टइंडियन मजूर ठार झाले आणि बारा जणाना जखमा झाल्या.

भौगोलिक रचना.—ब्रिटिश ग्वायनाचे भूपृष्ठभागाच्या विशिष्ट लक्षणावरून चार भाग करता येतील. ( १ ) सपाट, ' हायवाटर'च्या खालचा समुद्रकाठचा मळईचा प्रदेश,( २ )जंगलमय पट्टी,(३)सॅव्हाना (४ )डोंगराच्या रागा. या देशात पॅकॅरैमा व मेरुमे पर्वत या मोठ्या रागा व कॅनुकू व ॲकराय या लहान रागा आहेत. माऊंट रोरैमा माऊंट कुकेनाम, इवाल्करिमा,इलवारिमा, इडटिपू, वैभाकापिआपु हीं उच शिखरें आहेत.

नद्या.—बैनि, एसेक्विबो, मॅझॅरुनि, कुयुनि, डेमेरॅरा, बर्बाइस, कोरेन्टान, या मुख्य नद्या आहेत. कायेटुर, व सिपॅरुनि, युरोवुरो. रैवा, इयुविनी, कासीकूइनी या एसेक्विबोला मिळणाऱ्या साधारण नद्या आहेत. पोमेरून,मोरूका व वरिना या नद्या अटलांटिक महासागराला मिळतात. अवारी, महैकानी व माहिका या इतर नद्या आहेत.

हवाः-हवा इतर उष्ण देशाप्रमाणें रोगिट नाहीं हिंवताप सर्वसाधारण आहेत. क्षयरोगहि आहे. देशाच्या आंतील भागात रात्री थंड व ओलसर असतात. कधीं कधीं अवर्षणें पडतात. दोन पावसाळे व दोन उन्हाळे प्रत्येक वर्षांत येतात. देशाच्या निरनिराळ्या भागात पाऊस निरनिराळ्या प्रमाणांत पडतो.

राज्यव्यवस्था—पाच अधिकारी व राजानें निवडलेले तीन मेंबरांचें एक कौन्सिल याच्या सहाय्यानें एक गव्हर्नर राज्यकारभार चालवितो. कायदे करण्याचा अधिकार "कोर्ट ऑफ पॉलिसी" च्या हातीं असतो. कोर्ट ऑफ पॉलिसी व सहा जमाबंदी मेंबर याच्या संयुक्त कोर्टाचे हातीं कर बसवणें व खर्च करणें या बाबी असतात. कोर्ट ऑफ पॉलिसीचा सभासद होण्यास ८० एकर जमीन मालकीची अथवा २१ वर्षांच्या पट्ट्यानें मुदतीच्या मालकीची प्रत्येक इसमाजवळ असली पाहिजे फडणीसी प्रतिनिधि होण्यास अशाच प्रकारची लायकी अथवा सालिना८०० पौंडांचें उत्पन्न असलें पाहिजे. ज्याच्या जवळ लागवड केलेली तीन एकर जमीन असते अथवा ज्याचें उत्पन्न सालिना ८० पौंड असतें त्या प्रत्येक इसमाला मतदार म्हणून नोंदतात. संस्थानचा वसूल १९१७ सालीं ७३६४७३ पौंड असून खर्च ७३३६८९ पौंड होता

व्यापार व उद्योगधंदे—या देशातून गुल्मेंद,साखर,दारू, गूळ, सागवान, सोनें, लाकडी तक्ते,गुरें हीं बाहेर पाठवितात हिरे व इतर जवाहीर थोड्या प्रमाणावर सापडतात १९१७ सालची आयात व निर्गत अनुक्रमें ३२७१०१७ पौंड व ४३१५९३९ पौंड होती येथें प्रचारात डॉलर व सेंट हीं नाणीं आहेत. दोन बँका नोटा काढतात.

दळणवळणाचे मार्ग.—समुद्रकिनाऱ्यानें व मुख्य नद्याच्या काठानें सडका गेलेल्या आहेत. या संस्थानातून ८७॥ मैल लांबीची रेल्वे जाते. ४५० मैलांच्या नदीमार्गें नौकानयन चालतें व ३२२ मैलाचे रस्ते आहेत रॉयल मेल स्टीम पॅकेट कंपनीच्या बोटींनीं इंग्लंडहून ब्रिटिश ग्वायनाला सोळा दिवसात येतां येतें. लंडन व ग्लास्गोहून सरळ मार्गानें एकोणीस दिवसात प्रवासी येऊं शकतो कानडा, युनायटेड स्टेट्स, फ्रान्स व हॉलंड येथून नियमितपणें बोटी येतात.

इतिहास.—इ. स. १८०३ मध्यें ह्या वसाहती ब्रिटिशानीं घेतल्या या वेळेची स्थिति समाधानकारक नव्हती. साखर जास्त पिकल्यामुळें बाजारांत भाव चांगला येत नव्हता. व नेपोलियन बोनापार्टनें बंदरें बंद केल्यामुळें यूरोपात माल पाठविण्याची सोय नव्हती व याच सुमारास इंग्लंड व युनायटेड स्टेटस याच्यामध्यें लढाई उपस्थित झाल्यामुळें स्टेट्समध्येंहि माल पाठविणें शक्य नव्हतें यावेळीं इंग्लंडांत गुलामगिरी बंद करण्याच्या प्रश्नाचा विचार चालल्याच्या बातम्या नीग्रो लोकाना कळल्यामुळें त्यानीं बंड करून आपल्या मालकावर हल्ले केले होते. परंतु या बंडाचा लवकरच बंदोबस्त करण्यात आला व लष्करी मदत मागविण्यात येऊन नीग्रो लोकाच्या पुढाऱ्यांना पकडून त्याची लष्करी कोर्टापुढें चौकशी करण्यात आली व त्याना जबर शिक्षा देण्यांत आल्या.

इ. स. १८२४ पासून १८३८ पर्यंत सर बेंजामिन डि अर्बन हा गव्हर्नर होता. याच्या कारकीर्दींतील मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे १८३१ मध्यें तिन्ही वसाहतींची एक वसाहत करून तिच्या बर्बाइस, डेमेरेरा, व एसेक्विबो अशा तीन कौंटी केल्या.

अर्बनच्या मागून १८३३मध्यें सर जेम्स कार्मायकल स्मिथ गव्हर्नर झाला यानें जाहीर केलें कीं, राजाच्या मनातून गुलामाची स्थिति सुधारण्याचा विचार आहे पण गुलामानीं कोणत्याहि प्रकारचा दंगाधोपा करता कामा नये. कामन्स सभेनें १८३३ मध्यें दास्यविमोचनाचा कायदा पास केला. मळेवाल्याना अत्यंत दुःख झालें व गुलामाना अत्यानंद झाला. देशाची स्थिति फार कष्टमय झाली, परंतु गव्हर्नरनें मोठ्या धोरणानें प्रसंग निभवून नेला व दंगेधोपे उपस्थित झाल्याबरोबर त्यानें स्वतः मोडून टाकले. हा गव्हर्नर १८३८ मध्यें कँप हाऊस येथें मरण पावला

दास्यविमोचनाच्या नंतरच्या काळात देशाची स्थिति फार शोचनीय होती. १८५० मध्यें नेमलेल्या कमिशनच्या रिपोर्टावरून असें आढळून आलें कीं देशाची खरोखरी नासाडी झाली होती, व मजूरलोक बाहेर देशातून आणल्यामुळें मळे वाचले १८५३ मध्यें वसाहत थोडी पुढें येऊं लागली व त्या वेळचा गव्हर्नर सर हेन्री बार्कली यानें असें बोलून दाखविलें कीं, देशाची प्रगति समाधानकारक आहे. याच्या कारकीर्दीत कायदेकौन्सिल व कार्यकारी मंडळ याच्यामधील तंटेबखेडे मिटले पण मजूर लोकाचा पुरवठा आशाशिल्य झाला नाहीं. १८४७ मध्यें बर्बाइसमधल्या नीग्रो लोकानीं पोर्तुगीज मळेवाल्याच्या मालमत्तेवर हल्ला केला व लष्करी साहाय्यानें हीं बंडें मोडण्यात आलीं. १८६२ मध्यें अशाच प्रकारचे दंगे नवीन गव्हर्नर सर फ्रॅन्सिस हिंक्स याच्या कर्तबगारीनें मोडण्यात आले हळू हळू १८८३ पर्यंत सर्व गोष्टींचा चांगला बंदोबस्त झाला. १८८४ मध्यें साखरेचा भाव देणग्या देऊन उत्पन्न केलेल्या "बीट साखरे" मुळें फार उतरला व सबंध वसाहतींतील बऱ्याच मळ्यांचें फार नुकसान झालें,व फार थोड्या मळ्याच्या चालकानीं केलेल्या काटकसरीमुळें व लागवडीच्या व पैदासीच्या शास्त्रीय शोधामुळें काहीं थोडे मळे वाचले.

१८८९ सालीं जॉर्ज टॉऊनमध्यें रहाणाऱ्या पोर्तुगीज लोकाविरुद्ध तेथील नीग्रो लोकानीं बंड केलें बंडाचें कारण एका पोर्तुगीज मनुष्यानें आपल्या नीग्रो राखेचा खून केला होता व दुसऱ्या एका पोर्तुगीजानें एका नीग्रो पोराला चोरी केल्याबद्दल मारलें होतें. नीग्रो लोकानीं ओरड केली कीं पोर्तुगीज लोकाना शिक्षा न होता नीग्रो लोकाना ठार करता येतें म्हणून नीग्रो लोकानीं सूड उगवला पाहिजे दोन दिवस सर्व शहरभर अव्यवस्था माजली होती. नंतर पोलीस

लोकांनी हा दंगा मोडला व पोर्तुगीज लोकांना नुकसान-भरपाई देण्यांत आली.

१८८४ त व्हेनेझुएला व ग्वायना यांच्यामधील सरहद्दी-बद्दल तंटा उपस्थित झाला. अखेरीस या प्रश्नाचा निकाल कसा झाला यांचें वर्णन व्हेनेझुएला देशाच्या वर्णनाखालीं आलें आहे. १९०५ च्या डिसेंबरच्या दोन महिन्यांत जॉर्ज टाऊन व डेमेररा नदीच्या पूर्व व पश्चिम किनाऱ्यावरील नीग्रो लोकांची चढाई झाला. या लोकांनी मळेवाल्यांच्या घरावर हल्ले करून खिडक्या फोडल्या व गोरे लोकांवर हल्ला केला. पोलीस लोकांना बडखोरांच्या जमावावर गोळ्या झाडाव्या लागल्या. अखेरीस साको व डायमंड हीं जहाज आलीं. बंडखोरांपैकीं पुष्कळ लोकांना पकडून त्यांची चौकशी करण्यांत आली व अशा रीतीनें शांतता पुन्हा प्रस्थापित करण्यांत आली.

ड च ग्वा य ना.—या देशाचें क्षेत्रफळ ४६०६० चौरस मैल आहे. याच्या पश्चिमेस ब्रिटिश ग्वायना व पूर्वेस फ्रेंच ग्वायना आहे. या देशांतील जमीन व उत्पन्न होणारे पदार्थ यांच्याप्रमाणें येथें रहाणारे निरनिराळे लोक यांचा वाटणी झाली आहे. इंडियन लोक (कारिब, अॅरावाक, वारस) हे सॅव्हानामध्यें अथवा वरचा निकेरी, कोपनेम व मरोनि यांच्या भाठावर मळ्यांपासून फार दूर रहातात. हे लोक मनीऑकच्या शेताची लागवड करतात व मासे धरतात आणि शिकार करतात. यांची संख्या सरासरी २००० आहे. बुशनीग्रो (मॅरॉन्स) हे बेटें व धबधबे यांच्याजवळ राहतात. यांची संख्या १०००० आहे सोन्याच्या खाणींवर माणसें व माल पाठविणें, इंडियन लोकांशी नदीच्या मार्गानें व्यापार करणें व पॅरॅमॅरिबो व मळे यांच्याकडे लाकूड नेणें हे यांचे धंदे होत. पळून गेलेल्या गुलामांचे हे वंशज आहेत व मिशनरी लोक यांच्यामध्यें जाण्यापूर्वी यांच्या पाखंडवादी धर्मामध्यें ख्रिस्ती धर्माचा संबंध दाखविणारीं वरीच चिन्हें होतीं. यांच्या मुख्य देवाला ग्रॅनगॅडो (ग्रॅडगॉड) म्हणत व त्याच्या बायकोला मेरिआ व मुलाला जेसी क्रिस्ट म्हणत. अॅम्पुका (वनदेवता) व टोंनी (जलदेवता) इत्यादि आणखी देवतांची पूजा हे लोक करीत. डच, पोर्तुगीज व दुसऱ्या कित्येक भाषांचें संमिश्रण होऊन बनलेल्या एका अशुद्ध भाषेवर बसविलेली यांची भाषा आहे. यांच्या नायकांना ग्रमन अथवा मोठा मनुष्य म्हणतात, परंतु त्या लोकांची एकता व यांची भाषाधर्मवैचित्र्य आतां डच व इतर लोकांशी त्यांच्या झालेल्या दळणवळणामुळें बरेच नाहींसें झालें आहे. पॅरॅमॅरिबो व मळे यांतील लोक, चिनी, जावा नीज, हिंदुस्थानी व वेस्टइंडीजमधील मजूर, निग्रो व गोरे लोक हे आहेत. १२४८९ मुसुलमान, २०८५० हिंदु व ८४७ यहुदी आहेत. जंगलांतील निग्रो व इंडियन लोक सोडून १९१८ त येथील लोकसंख्या ९२२८४ होती. यांतील अर्धे लोक पॅरॅमॅरिबोमध्यें व बाकीचे जिल्ह्यांत रहातात.

मुख्य वसाहती सुरिनाम नदीच्या खालच्या दरींत किंवा सुरिनाम व पश्चिमेस सारामाका व पूर्वेस कोमेविने या नद्यांच्या मध्यें केल्या आहेत. देशाचा आंतील भाग बहुतेक लहान लहान टेंकड्यांचा बनलेला आहे. हिंटरलँड व टुमकहुमाक या भागाचा अद्याप शोध लागला नाहीं. ग्वायनाच्या इतर भागाप्रमाणें डच वसाहतीच सपाट समुद्रकांठची जमीन सव्हाना, अगम्य जंगल असे नैसर्गिक विभाग आहेत. पॅरॅमॅरिबो, कोरोनी, सोमेल्सडिज्क, नियु निकेरी व ग्रोनिंगेन येथें हवामानाचे फरक नोंदून ठेवण्यांत येतात. मोठा व छोटा उन्हाळा आणि थोडा पाऊस व जोराचा पावसाळा असें वर्षाचें ऋतुमान आहे.

व्यापार.—कोको, कॉफी, साखर, तांदूळ, मका व सोनकेळीं हे पदार्थ बाहेर देशीं पाठवितात. बहुतेक मोठे मळे सुरिनाम, कोमेविन, निकेरी व कॉटिका या नद्यांच्या खालच्या प्रवाहावर आहेत. वरच्या सुरिनाम, सॅरमाका व मॅरोनी नद्यांच्या खडकांत सोनें सांपडतें. १९०६ त पॅरॅमॅरिबो व सोन्याच्या खाणी यांच्यामध्यें रेल्वेरस्ता सुरू करण्यांत आला. शेतकी हा मुख्य धंदा आहे. १९१७ सालची आयात व निर्गत अनुक्रमें ७६४५९४१ गिल्डर व ८८५२१७० गिल्डर होती.

राज्यकारभार.— ही वसाहत एका गव्हर्नरच्या ताब्यांत आहे. व्हाईस प्रेसिडेंट व राजानें निवडलेल्या तीन मेंबरांच्या बनलेल्या कार्यकारी कौन्सिलचा हा गव्हर्नर प्रेसिडेंट असतो. कायदे करणाऱ्या मंडळाला स्टेट्स म्हणतात. याचे मेंबर नऊ वर्षांकरितां निवडलेले असतात. या वसाहतीचे तेरा जिल्हे केले आहेत. न्याय देण्याकरितां तीन परगण्यांचीं कोर्टें, दोन जिल्हाकोर्टें व पॅरॅमॅरिबो येथील वरिष्ठ कोर्ट स्थापन करण्यांत आलीं आहेत. याचा प्रेसिडेंट व व यमरे मेंबर राजानें निवडलेले असतात. सरासरी उत्पन्न २७५००० पौंड व खर्च ३१७००० पौंड आहे.

इतिहास.— ग्वायनाच्या इतिहासांत डच लोकांच्या इतिहासाचा उल्लेख केलेला आहे. १८२८ त सुरिनाम व वेस्टइंडीजमधील डच बेटें यांचा राज्यकारभार पॅरॅमॅरिबो येथें राहणाऱ्या एकाच गव्हर्नरच्या हातीं दिला होता. परंतु १८४५ त हे अलग करण्यांत आले. १८६३ त गुलामगिरी बंद करण्यांत आली. मजूर मिळणें मुष्किलीचें झालें व १८७० मध्यें हॉलंड व इंग्लंड यांच्यामध्यें मजूर लोकांचा व्यापार नियमित करण्यासंबंधीं करार होऊन कलकत्याला एक डच सरकारचा एजंट नेमण्यांत आला. या प्रश्नाचा बरीच समाधानकारक निकाल लागला नाहीं परंतु एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या वीस वर्षांत हॉलंडचें लक्ष वसाहतींकडे जास्त मधून लागलें, व सुरिनाम असोसिएशन, पॅरॅमॅरिबोला येणारी नॅव्हिगेशन कंपनीची एजन्सि, वनस्पतींची बाग,

भूगर्भशास्त्रविषयक व दुसऱ्या शास्त्रीय मोहिमा, व १८९८ मधील हार्लेम येथील प्रदर्शन वगैरे गोष्टी घडून आल्या.

फ्रेंच ग्वायना.—ही वसाहत डच ग्वायना व ब्राझील यामध्ये आहे. फ्रान्सचा प्रदेश व नेदर्लंडचा देश याच्या मधील सीमा १८९१ मध्ये रशियाच्या पादशहानें दिलेल्या निकालान्वयें निश्चित करण्यात आला. मॅरोनी नदी ही सीमा असावी व आवा अथवा टॅपानाहोनीला मेरोनीचा मुख्य प्रवाह समजावा अशी ही व्यवस्था होती. १९०५ त मरोनी व इटनीमधला प्रदेश फ्रान्सला डच व फ्रेंच सरकार याच्या मधील करारान्वयें मिळाला. सोनें काढण्याच्या प्रश्नाचा निकाल फ्रान्स व हॉलंड याना मॅरोना नदीचा वांटून देऊन लावण्यांत आला. फ्रेंच ग्वायना व ब्राझिल याच्या मधील ओयापॉक नदी सीमा, स्विस सरकारनें ठरविली १८९५ त रायोडिजेनिरो येथे एक करार होऊन फ्रेंच व ब्राझिल प्रदेश यांमधील सीमा ठरविण्यात आला. फ्रेंच ग्वायनाचें क्षेत्रफळ ३२००० चौरस मैल आहे. लोकसंख्या (१९११) सुमारें ४९००९ आहे. कायना शिवाय सिनामारा, माना, रोरा व ॲप्रुएग्यु हीं इतर शहरें आहेत १८९२ मध्यें फ्रेंच ग्वायनाचे मॅरोना जिल्हा दोराग करून १४ काम्यून करण्यात आले तीन सेफ्टी बेटें (रॉयल, जोसेफ व डुडायबल), एन्फन्ट पेर्डुवेट व पांच रोमिरे बेटें ही या वसाहतीपैकीं आहेत

मुख्य नद्या मॅरोनी व ओयापाक या आहेत. शिवाय, माना, सिन्नामारी, कूरू, ओयॉक या इतर नद्या आहेत. कायेना हें राजधानीचें शहर ओयॉकच्या मुखाजवळ आहे. व पुढेंच ॲप्रुएग्यु आहे. वनस्पती व प्राणी ग्वायनातील इतर भागाप्रमाणेंच आहेत. वनस्पती फार विपुल आहेत याकापू, कामुट,चाऊ व इतर ताडाचीं झाडें येथ साधारणपणें उत्पन्न होतात. मॅनिऑक हा मुख्य खाण्याचा पदार्थ आहे, तांदूळ, मका, याम, आरारूट, सोनकेळीं, बनाना व ब्रेडफ्रूट (भाकरीचें फळ) येथ पिकतात. व्हॅनिला हें येथें होणारें रानटी झाड आहे. या देशात फार थोडी जमीन लागवडींत आहे.

खाणींतून सोनें काढणें हा या वसाहतींतला मुख्य धंदा आहे. रुपें व लोखंड कित्येक जिल्ह्यात सापडतें, मॉन्ट्सिनेरीच्या मैदानांत केओलिन सापडतें व कित्येक ठिकाणीं फॉस्फेट्स सापडतात शिवाय कापण्याच्या चक्क्या, दारू गाळण्याचे कारखाने, विटाचे कारखाने व साखरेचे कारखाने आहेत.

व्यापार व दळणवळणाचे मार्ग —दारू, कणीक, कपडे वगैरे जिनस बाहेर देशातून या देशांत येतात सोन, फॉस्फेट, सागवानी लाकूड, कोको व गुलाबपाणी हे जिन्नस बाहेर देशीं रवाना होतात. कायेना हें मुख्य बंदर आहे. मजुरांचा तोटा असल्यामुळें या वसाहतींची भरभराट होत नाहीं. एतद्देशीय मजूर मिळत नाहींत व हद्दपार केलेल्या लोकांनी काम करावयास लावणें फायदेशीर होत नाहीं जमिनीवराल रस्ते पुष्कळ नाहींत. राजधानी व इतर शहरें यांमधील दळणवळण आगबोटींनेंहि चालतें कायेनी व वेस्ट याच्या मध्यें समुद्रातील तारायंत्र आहे

राज्यकारभार —या वसाहतीचा कारभार एक कमिशनर–जनरल पहातो. याच्या मदतीला सेक्रेटरी–जनरल,न्याय, लष्कर, धर्म वगैरे राज्यकारभार खात्याच्या मुख्य अधिकाऱ्यांचें बनलेलें प्रिव्हीं कौन्सिल असतें १८७९ मध्यें सोळा मेंबराचें एक लोकनियुक्त जनरल कौन्सिल स्थापन करण्यात आलें कायेनी येथें अव्वल दर्जाचें एक कोर्ट व एक उच्च प्रतीचें कोर्ट आहे. शिवाय चार जस्टिस ऑफ पीस आहेत. पैकीं एकाला इतर ठिकाणीं सत्ता चालविता येते १९१५ त ३३ प्राथमिक शाळा व ७ कॉंग्रेगेशनल शाळा होत्या धर्मोपदेशकावर एक ॲपोस्टोलिक प्रिफेक्ट मुख्य आहे. सैन्यांत एकंदर १५० यूरोपियन अधिकारी व सैनिक आहेत. इ स. १८५२ च्या हुकुमान्वयें येथ कैदी लोकाचा वसाहत स्थापन करण्यात आली

इतिहास —१६०४ मध्यें चौथ्या हेनरानें पहाणी करण्याकरिता पाठविलेल्या सिउर ला रेव्हार्डिरे यानें अनुकूल बातमी आणली परंतु राजा मरण पावल्यामुळें वसाहत करण्याचे बेत रहित झाले १६२६ मध्यें रूयेनच्या काहीं व्यापाऱ्यांनीं सिनेमारी येथें वसाहत केली. १६३५ मध्यें अशाच एका टोळीनें कायेनाचा पाया घातला. १६५४ पासून काहीं वर्षेपर्यंत ही वसाहत डचाच्या ताब्यांत होती १६७४ मध्यें ही वसाहत फ्रान्सच्या ताब्यात गेली व कोलबर्टची राज्यव्यवस्था देशाच्या प्रगतीला विघातक झाली

१६७३ मध्यें मोठी आपत्ति आली मुख्य प्रधान चोसील यानें पाठविलेल्या वसाहतवाल्याना अन्न व शेतकीचीं आउतें मिळत नव्हती. १८०० मध्यें व्हिक्टर हुजेसला गव्हर्नर नेमण्यात आलें व यानें या वसाहतीची चागला व्यवस्था लावली. परंतु १८०९ मध्यें पोर्तुगीज व ब्रिटिश लोकानीं केलेल्या स्वारीमुळें या गव्हर्नरच्या कामाला अडथळा आला.

जरी १८१४ मध्यें फ्रेंच ग्वायना फ्रेंच लोकाना परत देण्यात आला होता तरी पोर्तुगीज लोकांनीं ही वसाहत १८१७ पर्यंत सोडली नव्हती. या वसाहतीची चांगली व्यवस्था करण्याचे प्रयत्न करण्यात आले, परंतु मागें आलेल्या आपत्तीमुळें फ्रान्सांतील लोकमत कलुषित झालें होतें १८२२ मध्यें साखरेचे कारखाने स्थापन करण्यात आले, १८२४ मध्यें माना जिल्ह्यामध्यें शेतकीची वसाहत स्थापन करण्यांत आली दास्यविमोचनामुळें शेतकीचें नुकसान झालें होतें, परंतु आफ्रिकेंतील लोक आणून ही स्थिति सुधारण्यांत आली. १८५५ मध्यें ॲप्रुएग्युवर सोन्याच्या खाणींचा शोध लागल्यामुळें देशाच्या आर्थिक परिस्थितींत फरक पडला.

लोकांनीं हा दंगा मोडला व पोर्तुगीज लोकांना नुकसान-भरपाई देण्यात आली.

१८८४ त व्हेनेझुएला व ग्वायना यांच्यामधील सरहद्दी-बद्दल तटा उपस्थित झाला अखेरीस या प्रश्नाचा निकाल कसा झाला याचें वर्णन व्हेनेझुएला देशाच्या वर्णनाखालीं आलें आहे १९०५ च्या शेवटच्या दोन महिन्यात जॉर्ज टाऊन व डेमेरेरा नदीच्या पूर्व व पश्चिम किनाऱ्यावरील नीग्रो लोकांची बंडाळी झाली या लोकांनीं मळेवाल्याच्या घरावर हल्ले करून खिडक्या फोडल्या व गोरे लोकांवर हल्ला केला पोलीस लोकांना बंडखोरांच्या जमावावर गोळ्या झाडाव्या लागल्या अखेरीस साफो व डायमंड हीं जहाज आलीं बंडखोरांपैकीं पुष्कळ लोकांना पकडून त्यांची चौकशी करण्यात आली व अशा रीतीनें शांतता पुन्हा प्रस्थापित करण्यात आली.

*ड च ग्वा य ना.*—या देशाचें क्षेत्रफळ ४६०६० चौरस मैल आहे याच्या पश्चिमेस ब्रिटिश ग्वायना व पूर्वेस फ्रेंच ग्वायना आहे या देशांतील जमीन व उत्पन्न होणारे पदार्थ यांच्याप्रमाणें येथें रहाणारे निरनिराळे लोक यांची वाटणी झाली आहे इंडियन लोक ( कारिब, ॲरावाक, वारस ) हे सॅव्हानामध्यें अथवा वरच्या निकेरी, कोप्पेनेम व मरोनि यांच्या काठावर मळ्यापासून फार दूर रहातात हे लोक मनीऑकच्या शेतांची लागवड करतात व मासे धरतात आणि शिकार करतात. यांची संख्या सरासरी २००० आहे बुशनीग्रो ( मरोन्स ) हे वेडे व धष्टपुष्ट याच्याजवळ राहतात यांची संख्या १०००० आहे सोन्याच्या खाणीवर माणसें व माल पाठविणें, इंडियन लोकांशीं नदीच्या मार्गानें व्यापार करणें व पॅरॅमॅरिबो व मळे यांच्याकडे लाकूड नेणें हे यांचे धंदे होत पळून गेलेल्या गुलामांचे हे वंशज आहेत व मिशनरी लोक यांच्यामध्यें आल्यापूर्वी यांच्या पाखंडवादी धर्मामध्यें ख्रिस्ती धर्माचा संबंध दाखविणारीं बरींच चिन्हें होतीं.यांच्या मुख्य देवाला ग्रॅन गॅडो (ग्रँडगॉड) म्हणत व त्याच्या बायकोला मेरिआ व मुलाला जेसी क्रिट म्हणत ॲम्पुका (वनदेवता) व टोनी (जलदेवता) इत्यादि आणखी देवतांची पूजा हे लोक करीत डच, पोर्तुगीज व दुसऱ्या कित्येक भाषांचें संमिश्रण होऊन बनलेल्या एका अशुद्ध भाषेवर बसविलेली यांची भाषा आहे यांच्या नायकांना ग्रमन अथवा मोठा मनुष्य म्हणतात, परंतु त्या लोकांची सत्ता व यांचें भाषाधर्मवैचित्र्य आता डच व इतर लोकांशीं त्यांच्या झालेल्या दळणवळणामुळें बरेंच नाहींसें झालें आहे पॅरॅमॅरिबो व मळे यांतील लोक, चिनी, जावा-नीज, हिंदुस्थानी व वेस्टइंडीजमधील मजूर, निग्रो व गोरे लोक हे आहेत. १२४८९ मुसुलमान, २०८५० हिंदु व ८४७ यहुदी आहेत. जंगलांतील निग्रो व इंडियन लोक सोडून १९१८ त येथील लोकसंख्या ९२२८४ होती. यांतील अर्धे लोक पॅरॅमॅरिबोमध्यें व बाकीचे जिल्ह्यांत रहातात

मुख्य वसाहती सुरिनाम नदीच्या खालच्या दरींत किंवा सुरिनाम व पश्चिमेस सारामाका व पूर्वेस कोमेविने या नद्यांमध्यें केल्या आहेत. देशाचा आंतील भाग बहुतेक लहान लहान टेकड्यांचा बनलेला आहे. हिंटरलँड व टुमकहुम या भागाचा अद्याप शोध लागला नाहीं. ग्वायनाच्या इतर भागाप्रमाणें डच वसाहतीचे सखल समुद्रकांठची जमीन सॅव्हाना, अगम्य जंगल असे नैसर्गिक विभाग आहेत. पॅरॅमॅरिबो, कोरोनी, सॉमेल्सडिज्क, नियु निकेरी व मोंगो येथें हवामानाचे फरक नोंदून ठेवण्यात येतात. मोठा व छोटा उन्हाळा आणि थोडा पाऊस व जोराचा पाऊस असे वर्षाचें ऋतुमान आहे

*व्यापारः*—कोको, कॉफी, साखर, तांदूळ, मका व सोनें केळीं हे पदार्थ बाहेर देशीं पाठवितात बहुतेक मळे मध्य-सुरिनाम,कोमेविन, निकेरी व कोटिका या नद्यांच्या खालच्या प्रवाहावर आहेत वरच्या सुरिनाम, सॅरमाका व मॅरो-नद्यांच्या खडकांत सोनें सापडतें १९०६ पॅरॅमॅरिबो व सोन्याच्या खाणी यांच्यामध्यें रेल्वेरस्ता सुरू करण्यात आला शेतकी हा मुख्य धंदा आहे. १९१ सालची आयात व निर्गत अनुक्रमें ७६४५९६९ गिल्डर व ८८५२१७० गिल्डर होती

*राज्यकारभारः*— ही वसाहत एका गव्हर्नरच्या ताब्यात आहे. व्हाइस प्रेसिडेंट व राजानें निवडलेल्या तीन मेंबरांच्या बनलेल्या कार्यकारी कौन्सिलचा हा गव्हर्नर प्रेसिडेंट असतो कायदे करणाऱ्या मंडळाला स्टेट्स म्हणतात याचे मेंबर नऊ वर्षांकरितां निवडलेले असतात. या वसाहतीचे तेरा जिल्हे केले आहेत न्याय देण्याकरितां तीन परगण्यांचीं कोर्टें, दोन जिल्ह्यांचीं कोर्टें व पॅरॅमॅरिबो येथील वरिष्ठ कोर्ट स्थापन करण्यात आलीं आहेत. याचा प्रेसिडेंट व कायमचे मेंबर राजानें निवडलेले असतात. सरासरी उत्पन्न २७६००० पौंड व खर्च ३१७००० पौंड आहे.

*इतिहासः*— ग्वायनाच्या इतिहासांत डच लोकांच्या इतिहासाचा उल्लेख केलेला आहे. १८२८ त सुरिनाम व वेस्ट इंडीजमधील डच वेटें यांचा राज्यकारभार पॅरॅमॅरिबो येथें राहणाऱ्या एकाच गव्हर्नराच्या हातीं दिला होता. परंतु १८४५ त हे अलग करण्यात आले. १८६३ त गुलामगिरी बंद करण्यात आली. मजूर मिळणें मुष्किलीचें झालें व १८७० मध्यें हॉलंड व इंग्लंड यांच्यामध्यें मजूर लोकांचा व्यापार नियमित करण्यासंबंधीं करार होऊन कलकत्याला एक डच सरकारचा एजंट नेमण्यात आला. या प्रश्नाचा कधींच समाधानकारक निकाल लागला नाहीं.परंतु एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या वीस वर्षांत हॉलंडचें लक्ष वसाहतींकडे जास्त वेधूं लागलें, व सुरिनाम असोसिएशन, पॅरॅमॅरिबोला येणारी नॅव्हिगेशन कंपनीची सर्व्हिस, वनस्पतींची बाग,

भूगर्भशास्त्रविषयक व दुसऱ्या शास्त्रांच्या मोहिमा, व १८९८ मधील हार्लेम येथील प्रदर्शन वगैरे गोष्टी घडून आल्या.

फ्रेंच ग्वा य ना.—ही वसाहत डच ग्वायना व ब्राझील या-मध्ये आहे. फ्रान्सचा प्रदेश व नेदर्लंडचा देश यांच्या मधील सीमा १८९१ मध्ये रशियाच्या बादशहानें दिलेल्या निकाला-न्वयें निश्चित करण्यात आला. मरोनी नदी ही सीमा असावी व आवा अथवा टॅपानाहोनीला मरोनीचा मुख्य प्रवाह समजावा असा हा व्यवस्था होती. १९०५ त मरोनी व इटर्नीमधला प्रदेश फ्रान्सला डच व फ्रेंच सरकार यांच्या मधील करारान्वयें मिळाला. सोनें काढण्याच्या प्रश्नावा निराळ फ्रान्स व हॉलंड यांनी मरोनी नदीचा थोडून देऊन ठावगात आला. फ्रेंच ग्वायना व ब्राझिल यांच्या मधील ओयापॉक नदी सीमा, स्विस सरकारनें ठरविला. १८९७ त रायोडिजेनिरो येथे एक करार होऊन फ्रेंच व ब्राझिल प्रदेश यांमधील सभा ठरविण्यात आला. फ्रेंच ग्वायनाचें क्षेत्रफळ ३२००० चौरस मैल आहे. लोकसंख्या (१९११) सुमारें ४९००९ आहे. कायना शिवाय सिनामारी, माना, रौरा व अॅप्रुएग्यु ही इतर शहरें आहेत. १८९२ मध्यें फ्रेंच ग्वायनाचे मरोनी जिल्हा खेराज करून १४ कम्यून करण्यात आले. तीन सेफटी बेटें (रॉयल, जोसेफ व डुडायबल), एन्फन्ट पेर्डुवेट व पाच रेमिरे बेटें ही या वसाहतींपैकी आहेत.

मुख्य नद्या मरोनी व ओयापाक या आहेत. शिवाय, माना, सिन्नामारी, कूरू, ओयॅाक या इतर नद्या आहेत. कायेना हें राजधानीचें शहर ओयॅाकच्या मुखाजवळ आहे व पुढें अॅप्रुएग्यु आहे. वनस्पती व प्राणी ग्वायनातील इतर भागाप्रमाणेंच आहेत. वनस्पती फार विपुल आहेत. साकाटू, कामुट,चाऊ व इतर ताडाचीं झाडें येथे साधारणपणें उत्पन्न होतात. मॅनिऑक हा मुख्य खाण्याचा पदार्थ आहे, तांदूळ, मका, याम, आरारूट, सानकळी, बनाना व मेक्कुट (माकरीचें फळ) येथें पिकतात. कहॅनिला हें येथें होणारें रानटी झाड आहे. या देशांत फार थोडी जमीन लागवडींत आहे.

खाणींतून सोनें काढणें हा या वसाहतींतला मुख्य धंदा आहे. रुपें व लोखंड कित्येक जिल्ह्यांत सांपडतें, माट्-सिनेराच्या मैदानांत केओलिन सांपडतें व कित्येक ठिकाणीं फॉस्फेट्स सांपडतात. शिवाय कापण्याच्या चक्क्या, दारू गाळण्याचे कारखाने, विटांचे कारखाने व साखरेचे कारखाने आहेत.

व्यापार व दळणवळणाचे मार्ग.—दारू, धणाक, कपडे वगैरे जिन्नस बाहेर देशांतून या देशांत येतात. सोनें, फास्फेट, सागवानी लॅाकूड, कोको व गुलाबपाणी हे जिन्नस बाहेर देशीं रवाना होतात. कायेनी हें मुख्य बंदर आहे. मजुरांचा तोटा असल्यामुळें या वसाहतींची भरभराट होत नाहीं. एतद्देशीय मजूर मिळत नाहींत व हद्दपार केलेल्या लोकांनी काम करावयास लावणें फायदेशीर होत नाहीं. जमिनी-वरील रस्ते पुष्कळ नाहींत. राजधानी व इतर शहरें यांमधील दळणवळण आगबोटीनेंहि चालतें. कायेनी व ब्रेस्ट यांच्या मध्यें समुद्रांतील तारायंत्र आहे.

राज्यकारभार.—या वसाहतीचा कारभार एक कमिश-नर-जनरल पहातो. याच्या मदतीला सेक्रेटरी-जनरल,न्याय, लष्कर, धर्म वगैरे राज्यकारभार खात्याच्या मुख्य अधि-काऱ्यांचें बनलेलें प्रिव्ही कौन्सिल असतें. १८७९ मध्यें सोळा मेंबरांचें एक लोकनियुक्त जनरल कौन्सिल स्थापन करण्यांत आलें. कायेनी येथें अव्वल दर्जाचें एक कोर्ट व एक उच्च प्रतीचें कोर्ट आहे. शिवाय चार जस्टिस आफ पीस आहेत. पैकीं एकाला इतर ठिकाणीं सत्ता चालविता येते. १९१५ त ३३ प्राथमिक शाळा व ७ कॉंग्रिगेशनल शाळा होत्या. धर्मो-पदेशकावर एक अॅपोस्टोलिक प्रिफेक्ट मुख्य आहे. सैन्यांत एकंदर १५० यूरोपियन अधिकारी व सैनिक आहेत. इ. स. १८५२ च्या हुकुमान्वयें येथे कैदी लोकांची वसाहत स्थापन करण्यात आली.

इतिहास.—१६०४ मध्यें चौथ्या हेनरीनें पहाणी कर-ण्याकरितां पाठविलेल्या सिउर ला रेव्हार्डिर यानें अनुकूल बातमी आणली. परंतु राजा मरण पावल्यामुळें वसाहत कर-ण्याचे बेत रहित झाले. १६२६ मध्यें रूयेनच्या कांहीं व्यापाऱ्यांनीं सिनेमारी येथें वसाहत केली. १६३५ मध्यें अशाच एका टोळीनें कायेनीचा पाया घातला. १६५४ पासून कांहीं वर्षेपर्यंत ही वसाहत डचांच्या ताब्यांत होती. १६७४ मध्यें ही वसाहत फ्रान्सच्या ताब्यांत गेली व कोलबर्टची राज्य व्यवस्था देशाच्या प्रगतीला विघातक झाली.

[ संदर्भग्रंथ.—ब्रिटिश ग्वायना:—अँडर्सन—कॉपेंडियम ऑफ जनरल इन्फॉर्मेशन रिलेटिंग टु ब्रिटिश ग्वायना, १९१२; बेले—हँडबुक ऑफ ब्रिटिश ग्वायना, हॅरिसन—ब्रिटिश ग्वायना अँड इट्स रिसोर्सेस, इम् थुर्न—अमंग दि इंडियन्स ऑफ ग्वायना; रोडवे—हिस्टरी ऑफ ब्रिटिश ग्वायना, डच ग्वायना.—पालमेन्ह्—डच ग्वायना, लंडन १८७६. फ्रेंच ग्वायनावरचे चागले संदर्भ ग्रंथ फ्रेंच भाषेंत आहेत; ब्रिटानिकामध्यें यावर कांहीं माहिती सापडेल ]

**ग्वायना वॅंकोआ**—हॅवाना प्रांतात क्यूबामधील हें एक प्रसिद्ध शहर असून त्याची लोकसंख्या १९०७ सालीं १४३६८ इतकी होती ग्वायना वॅंकोआ व हॅवाना याना जोडणारा आगगाडीचा एक रस्ता आहे. उंच डोंगरावरील झाडींत हें शहर वसलेलें असल्यामुळें त्यास फार शोभा आली आहे. या शहरात व आसमंतात पाण्याचे झरे असून त्यातील पाण्यात औषधी धर्म आहेत. या शहरातील वीथिका सुंदर असून तेथें कांहीं जुन्या चर्चच्या इमारती आहेत. या शहराबाहेर पोटोसीचें चर्च असून तेथील देवालय व मूर्ती सुंदर आहेत उन्हाळ्यांत हवा खाण्यास जाऊन राहण्याकरिता निसर्गमनोहर स्थान म्हणून हॅवाना प्रांतात या शहराची फार प्रसिद्धि आहे. १८ व्या आणि १९ व्या शतकांत उपर्युक्त कारणामुळें तेथील लोकसंख्याहि वाढली आहे. १७४३ त तेथें एक कौन्सिल स्थापण्यात आलें होतें. १७६२ मध्यें लिटिलमॉरो नावाचा तेथील एक किल्ला इंग्रजानीं हस्तगत केला.

**ग्वाल्हेर संस्थान.**—हें संस्थान सेंट्रल इंडिया एजन्सीचा एक भाग असून त्याचा विस्तार चंबळपासून भिलसापर्यंत व बुंदेलखंड आणि झांशी येथून रजपुताना एजन्सीपर्यंत आहे. याचें क्षेत्रफळ २५०४१ चौ. मैल आहे. संस्थानच्या ( १९२१ ) ३१८६०७५ या एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा ८६ हिंदु, ४ मुसलमान, १ जैन व बाकी इतर जाती असून लो. सं. चें दर चौ. मैलास १३३ हें प्रमाण येतें. खुद्द ग्वाल्हेरची लो. सं. ( १९२१ ) ८०३८७ आहे. संस्थानांत शहरें २३ असून भिलसा, मोणिया व गुणा हीं धान्याच्या व्यापाराचीं मुख्य केंद्रें आहेत

**रेसिडेन्सी.**—सालबाईच्या ( १७८२ ) तहानंतर शिंद्याच्या दरबारीं रेसिडेन्ट नेमला गेला. मात्र वेळोवेळीं त्याच्या अधिकारक्षेत्रात थोडाबहुत फरक पडलेला आहे. लहान पलटणें व ब्रिटिश हद्दींतील रेल्वेवर त्याची देखरेख असते. रेसिडेन्सी हेडक्वार्टर्सकरिता जागा स्वतंत्र आहे. त्यांतील तीन सैन्यांचा खुद्द रेसिडेन्सीच्याच कामाकरिता गर्व होता. ग्वाल्हेर संस्थान हें उत्तरविभाग आणि माळवा असा दोन विभागांत विभागलें गेलें आहे. एकंदर संस्थानचें उत्पन्न दीड कोटीचें आहे.

ग्वाल्हेरच्या पूर्व, उत्तर व पश्चिमेला मैदान आहे. ग्वाल्हेर, तावरगड भिंड आणि शिवपूर हे चार जिल्हे यात येतात. हा भाग ५०० पासून ९०० फूटांपर्यंत उंचीचा आहे. दक्षिणेकडे जमीन झपाट्यानें उंच होत होत पुढें माळव्याचा माळ लागतो. तेथपर्यंत त्याची साधारण उंची १५०० फूट आहे. तिसरा भाग टेंकड्या व दऱ्या मिळून बनलेला अमझरा जिल्ह्यात असून त्याची साधारण उंची १८०० फूट आहे. विंध्याचलाच्या दोन शाखा यातूनच गेल्या असून त्यातून ज्या बऱ्याच नद्या निघतात त्यात चंबळा, क्षिप्रा वगैरे मुख्य आहेत. पण याचा शेतीला कांहींच उपयोग होत नाहीं.

विशेषतः उत्तरेकडील जंगलात वाघ, अस्वल वगैरे सर्व जातींचीं श्वापदें सापडतात. माळावरलि हवा साधारण समशीतोष्ण असते मैदानात मात्र उन्हाळा अत्यंत कडक असतो. पावसाचें मान साधारण मैदानावर ४० व माळावर ३० इंच आहे. येथील राजघराणें शिंद्याचें आहे. त्याचा मूळगाव सातार्‍यापासून पूर्वेस १६ मैलावरील कण्हेरखेड नावाचा आहे. तेथची पाटीलकी शिंद्याकडे होती. त्याचा मूळ पुरुष राणोजी हा प्रथम पेशवे याचा हुजऱ्या होता. पुढें त्याची मल्हारराव होळकराबरोबर उत्तरेकडे रवानगी झाली. तिकडे त्यानें बरीच कामगिरी केली (पहा). त्याला पाच मुलें होतीं प्रथम शिंद्याची राजधानी उज्जनी येथें होती राणोजीच्या मागून जयाप्पा, जनकोजी, महादजी व दौलतराव असे पुरुष अनुक्रमें अधिकारारूढ झाले महादजी व दौलतराव या दोघानीं हिंदुस्थानच्या इतिहासांत बराच प्रमुख भाग घेतलेला आहे. थोरले माधवराव पेशवे वारल्यावर जी गडबड झाली त्या संधींत महादजीनं आपली सत्ता व वैभव याची बरीच वाढ केली. राघोबादादांच्या निमित्तानें इंग्रज व शिंदे याच्यात बरेच वेळा लढाया झाल्या. १७८२ साली सालबाईच्या तहानंतर शिंद्यानें पुन्हा उत्तरेकडे सत्तेचा विकास केला, दिल्लीवर छाप बसवली व त्याकरिता इंग्रजी पद्धतीनें कवाईत वगैरे शिकवून सैन्य तयार केलें. थोड्याच दिवसात वानवडी येथें महादजी वारला. इंग्रजी इतिहासकारानीं सुद्धा महादजीबद्दल गौरवपरच लिहिलें आहे.

नंतर दौलतराव गादीवर आला. त्यानंतर त्याचें आणि होळकराचें युद्ध झालें. वसईचा तह दौलतराव कबूल करीना म्हणून त्याचीं व इंग्रजाचीं अनेक युद्धें होऊन शेवटीं सुर्जीअंजनगाव येथें तह झाला. पुन्हां मध्यंतरीं बरीच वाटाघाट व फेरफार होऊन १८१७-१८ मध्यें नवे तह झाले दौलतरावाच्या मागून पुष्कळच अंदाधुंदी माजली व बायकाचा कारभार झाला. व पुढें इंग्रजी सैन्याच्या खर्चाकरतां बराच मुलूख तोडून द्यावा लागला

दौलतरावानंतर जनकोजी गादीवर आला तो तरुणपणींच वारल्यानंतर ( १८४३ ) जयाजीराव गादीवर बसला १८५२ मध्यें दिनकरराव दिवाण झाला; त्यानें सर्व राज्य व्यवस्थित व संघटित केलें. १८५७ च्या बंडांत जयाजीरावानें इंग्रज सरकारला स्वतः बरीच झीज व तसदी सोसूनहि मदत केली. बंडानंतर जी शांतता झाली तीमु

संस्थानची सुधारणा करण्यास वाव मिळाला व रेल्वेला सवलती दिल्या गेल्या १८८६ मध्यें झाशी शहर इंग्रजानी घेतलें व त्याबद्दल ब्रिटिश ग्वाल्हेर, मोरार व कांहीं गेडी दिलीं. १८८६ मध्येंच हल्लींचे महाराज माधवराव गादीवर आले व १८९४ मध्यें त्यांना अखत्यारीचा अधिकार मिळाला १९०१ मध्यें ते चीनमध्यें लढाईवर गेले होते. हे ब्रिटिश सैन्याचे सन्माननीय ले. जनरल असून, केंब्रिजचे एलएल डी. आणि ऑक्सफर्डचे डी सी एल् आहेत. यांना २१ तोफांची सलामी आहे. संस्थानचा संबंध थेट हिंदुस्थान सरकारशीं येतो मजलीस ई-खास नावाच्या नऊ सभासदांच्या मंडळाच्या मदतीनें महाराज स्वत: संस्थानचा कारभार पहातात. हल्लीं (१९२१) महाराजानीं ग्वालेर नॅशनल असेंब्ली म्हणून एक मंडळ नेमलें आहे.

या संस्थानात ऐतिहासिक महत्वाचीं क्षेत्रें बरींच आहेत. उज्जयिनी तर प्रसिद्धच आहे. शिवाय भिलसा, उदयगिरी, बारो, नरोड, ग्वाल्हेर, चंदेरी, मंदसोर वगैरे ठिकाणीं हिंदु, जैन व मुसुलमान यांच्या धार्मिक व ऐतिहासिक इमारती बऱ्याच आहेत. त्यापैकीं पुष्कळ कामें ख्रिस्ती शकाच्या पाचव्या शतकाच्याहि अगोदरचीं आहेत काहीं ठिकाणीं बौद्ध स्तूप आहेत. उज्जयिनीजवळ (कालियादोह) कालियादेह येथें क्षिप्रा नदीच्या पात्रांत बांधलेला राजवाडा नदीचें पाणी ज्यात खेळविलें आहे असें विविध प्रकारचें बांधकाम फार पहाण्यालायक आहे.

लोकसंख्येपैकीं १८९९-१९००च्या दुष्काळानें शेकडा १३ पर्यंत लोकसंख्या कमी झाली. संस्थानात शहरें २३ आहेत. त्यांतील ९ मैदानांत व १४ माळावर आहेत. एकंदर गावें ९३१८ आहेत. लोकसंख्येपैकीं शेकडा अडीच माणसें शिकलेलीं आहेत. क्षेत्रविस्तारामुळें भाषावैचित्र्य बरेंच आहे. शेकडा २५ माळवी भाषा बोलणारे, शेकडा १८ बुंदेली भाषा बोलणारे, शेकडा १८ उर्दू बोलणारे व शेकडा १३ बागडी भाषा बोलणारे आहेत. जंगली लोकात किराड, मीना व भील हे लोक (दीड लाखावर) आहेत. मैदानांत शेकडा ५७ व माळावर ४७ लोक शेतीवर रहातात. शे. २६ धंद्याचा धंदा करतात. शेकडा १५ उद्योगधंदे व शेकडा तीन व्यापार करतात.

माळव्यामध्यें उत्कृष्ठ प्रतीची शेतजमीन आहे. तोंवरगड भिंडमध्यें साधारण प्रतीची आहे; इतरत्र विंध्याचलाच्या रांग्या पसरल्यानें तेथील जमीन शेतीला निरुपयोगी आहे शिवाय जेथें जमीन चांगली तेथें वस्ती पातळ असल्यानें ती जमीन लागवडीखालीं येत नाहीं जमीनीचे (पिकाच्या मानानें) दहा भाग पाडले आहेत पैकीं थोड्याश्या जमीनीत दोन पिकें निघतात. शेकडा २२ प्रमाणें जमीन इनाम आहे. सरकारी १९४५४ चौ. मैलापैकीं ३६१ चौ. मैल जमीन पाण्याखालीं आहे. पाण्याबद्दल शेतकऱ्यावर फारसा कर नाही. गहूं व ज्वारी हीं मुख्य पीक असून शिवाय हरभरा, बाजरी, मका, गळिताचीं धान्यें. कापूस, अफू, डाळी, नीळ, ताग वगैरेंची लागवड होते. नवीन लागवड करणारास बऱ्याच सवलती मिळतात सरकार हे सावकारांपेक्षा कमी व्याजानें रयतेस कर्ज देतें.

संस्थानच्या क्षेत्रफळाचा एकनवमांश भाग जंगलानें वेष्टित आहे. जंगलापासून इमारती लाकूड, गवत, लाख, मोह वगैरे पाऊण लाखापर्यंतचें उत्पन्न निघतें. संस्थानात लोखंड पुष्कळ ठिकाणीं सापडतें. त्यामुळें पूर्वी लोखंडाचे कारखाने उत्तम रीतानें चालत असत परंतु अलीकडे परदेशी माल जास्त स्वस्त पडूं लागल्यानें स्थानिक धंद्याचा मागमूस राहिला नाहीं त्यामुळें नवीन खाणी खोदल्या जात नाहींत. येथील दगड इमारतीकरिता पूर्वीपासूनच प्रसिद्ध आहे दगडाच्या खाणी चांभारांच्या मालकीच्या आहेत व त्यांना दर इसमामागें ४ रुपये कर द्यावा लागतो. हल्लीं संस्थाननें खाणींच्याबद्दल पुन: प्रयत्न सुरू केले आहेत (१९२३) सर्वच दगडावरील नक्षीकामास सरकारकडून उत्तेजन मिळालें आहे सिमीटला लागणारा दगड संस्थानात मुबलक असल्यामुळें सिमींटचा धंदा हल्ली सुरू झाला आहे. ग्वाल्हेरजवळील बनमोरच्या सिमीटाच्या कारखान्यात दरवर्षी ४० हजार टन सिमींट निघतें. अभ्रक, जस्त व लोखंड यांच्या खाणी खोदण्याकडे सरकार लक्ष घालूं लागलें आहे.

संस्थानात कापूस वटाविण्याच्या व सुताच्या गिरण्याहि आहेत. चंदेरी येथें तलम कापड निघतें. मंदसोर येथें चीट निघतें. व शिवपूर येथें उत्तम लाखकाम होतें. निरनिराळ्या प्रकारचे एकंदर १९९ कारखाने संस्थानात आहेत. साबणाचा, चामड्याच्या वस्तु करण्याचा व चिनी मातीच्या वस्तू करण्याचा हे तीन कारखाने चांगले चालले आहेत. धान्य, अफू, कपडा, तूप याची निर्गत होते; तर आयात मालात हत्यारें, यंत्रसामुग्री, रॉकेल, कागद, लोखंडी सामान हा माल येतो. लष्कर, उज्जैन, मंदसोर, निमच वगैरे व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत.

संस्थानात आगगाडी बरीच पसरली आहे. इतर कंपन्यांशिवाय संस्थाननें स्वतःची रेल्वे म्हणून काढली आहे. हल्लीं माळव्यामध्यें नवीन नवीन फाटे काढण्याचें काम सुरू झालें आहे. इ. स. १९२३ सालीं आगगाडीचें उत्पन्न एकंदर वसुलाच्या शेकडा ४५.५६ होतें. सडकाहि बऱ्याच आहेत. १८८५ मध्यें संस्थानात पोस्ट सुरू झालें. व्यवस्थेकरितां संस्थानचे दोन (ग्वाल्हेर व माळवा असे) भाग केले आहेत ग्वाल्हेरमध्यें ७ जिल्हे व माळव्यात ४ आहेत. प्रत्येक जिल्ह्याला एकेक सुभा आहे. तेच जिल्हामॅजिस्ट्रेट होत. परगण्याच्या ठिकाणीं कमाविसदार असतो. १८४४त न्यायकोर्टें सुरू झालीं. प्रांत अदालत हें सेशनकोर्ट असून अपीलें शहर अदालत व शेवटीं खुद्द महाराज यांच्या पुढें चालतात

संस्थानच्या दीड कोटी उत्पन्नात ( यातच जहागिरदाराचें अकरा लाखाचें उत्पन्न आहे. ) सारा ८५, कस्टम ११, स्टॅम्प २.८, अफू २ ८, अबकारी १'४, रेल्वेव्याज २१ ३ व रेल्वे नफा ३ लाख असून खर्च एक कोटी सेहतीस लाख आहे. त्यात ४१ लाख लष्करावर तर अडीच लाख शिक्षणाकडे खर्च होतात. शेतकऱ्याचे ठाकूर, जहागिरदार, कायमसारा देणारे व माफीदार असे वर्ग असून साऱ्याचें प्रमाण जिराईत जमीनीवर आठ आण्यापासून सहा रु. पर्यंत व बागायतीवर चार ते चाळीस रु पर्यंत आहे. नवीन यांत्रिक उपकरणी शेतकऱ्याना सरकारकडून पुरविण्याचा उपक्रम नुकाच ( १९२३ ) सुरू झाला आहे त्यासाठी शेतकी प्रदर्शनेंहि भरविण्यात येतात. ' शिंदा नागर ' नावाचा नांगर स्वस्त किमतींत सरकार शेतकऱ्यास देत असतें.

मिठाबद्दल संस्थानचा व ब्रिटिशाचा पुढीलप्रमाणें ठराव झाला आहे. संस्थाननें १९३० टनापेक्षा अधिक मीठ तयार करूं नये व तें ब्रिटिश मुलुखात पाठवूं नये; आणि ब्रिटिश मुलखातलें मीठ संस्थानात येईल त्यावर ( पूर्वी ब्रिटिश सरकारनें कर घेतलेला असतो म्हणून ) संस्थानानें कर घसवूं नये, व यामुळें संस्थानचें जें नुकसान होईल त्याची भरपाई म्हणून इंग्रजानीं ३ १ लाख रुपये संस्थानला यावे. हा ठराव १८७८ मध्यें झाला.

स.१८९९ पर्यंत अनेक प्रकारचें नाणें प्रचारात होतें. हाडी सर्वत्र इंग्रजी शिक्का चालतो

पूर्वीपासून शिंदे हे लष्करी खात्याकडे फार लक्ष देत आले आहेत. जवळ जवळ दहा हजारापर्यंत लष्कर त्याच्या पदरीं आहे. पोलीसखातें पूर्वी लष्करात समाविष्ट होतें तें १८७४ पासून स्वतंत्र केलें.

जयाजीराव महाराज यांचें शिक्षणाकडे फार लक्ष असे. त्यानीं शिक्षणावरचा खर्च वाढविला १८६३ त शिक्षणखातें स्थापन झालें. स. १९२३ त एक आर्टस् कॉलेज, ६६ दुय्यम प्रतीच्या व ७९७ प्राथमिक शाळा होत्या. त्याशिवाय कामगाराच्या शिक्षणाची शाळा, सरदार शाळा, लष्करी शाळा, इंजिनिअरिंग वगैरे शाळाहि आहेत. शिवपुर येथें हल्ली एक औद्योगिक शिक्षणाची शाळा सरकारनें काढिली आहे. ग्वाल्हेरीस एक नार्मल स्कूलहि आहे. उज्जन येथें व ग्वालेरीस स्त्रीशिक्षकिणींसाठीं शाळा आहेत. भील व अस्पृश्य यांच्याहि शाळा आहेत. खास मराठ्यासाठीं लष्कर येथें एक हायस्कूल आहे.

जि ल्हा.—लष्करामोंवतालचा १५१३ चौ मै. क्षेत्रफळाचा जिल्हा. लोकसंख्या ३,२३,९९३ असून शहरें ३ व ६१४ गांवें आहेत. याचे तीन परगणे आहेत. साऱ्याचें उत्पन्न ५,१५,००० येतें. अंत्री येथें ( रेल्वे स्टेशन जवळच) प्रसिद्ध अबुलफजलची कबर आहे. या जिल्ह्यात नद्या ...रे नाहींत. [ इंपे. ग्याझे. पु. १२ ]

श ह र.—ग्वाल्हेर शहर हा शब्द दोन शहराचा वाचक आहे लष्कर म्हणून ज्याला म्हणतात त्यालाच इंग्रज लोकानीं ग्वाल्हेर म्हणण्याची चुकीची वहिवाट पाडली आहे. खरें ग्वाल्हेर शहर हें लष्कराच्या उत्तरेला ग्वाल्हेर किल्ल्याच्या पायथ्याशीं जुन्या ग्वाल्हेर शहराच्याच जाग्यावर आहे. ग्वाल्हेरचें रेल्वे स्टेशन हें लष्करपासून तीन मैल व ग्वाल्हेरपासून दोन मैल अंतरावर आहे. ग्वाल्हेर, लष्कर व ब्रिगेड मिळून लोकसंख्या १ लाख २० हजार आहे त्यात हिंदू शेकडा ७४ व मुसुलमान २३ आहेत. मुसलमानाच्या वेळीं १६ व्या शतकात ग्वाल्हेर हें माळवा सुभ्यांतील ग्वाल्हेर सरकारचें ( जिल्ह्याचें ) मुख्य ठिकाण होतें खुद्द ग्वाल्हेर शहर अगदीं लहान पडीत असून त्याला उतरती कळा लागली आहे. पूर्वी ग्वाल्हेर येथें दगडावर कोरीव व खोदकाम सुबक व नक्षीदार होत असे. अद्यापहि त्याचा हा लौकिक समूळ गेला नाहीं. मुंबईची आग्रारोड सडक होण्याच्या अगोदरचा आग्र्याचा हमरस्ता येथून जात असे. जुन्या शहरांत जिकडे तिकडे मोडके वाडे व पडक्या मशिदी आणि कित्येक इमारती आहेत. त्यातच प्रसिद्ध तानसेन गवयाची कबर आहे. लष्कर हें १८१० पासुन वसलें व राजवाडे वगैरे या भागातच आहेत. ग्वाल्हेरचा किल्ला हिंदुस्थानात प्रसिद्ध, मजबूत व महत्वाचा किल्ला होता. हा केव्हा व अर्थात् कोणी बांधला वगैरेचा मागमूस नाहीं. पण इसवीसनाच्या ६ व्या शतकापासून इतिहासात त्याचा उल्लेख व संबंध बराच येतो. सूर्यसेन नांवाच्या राजाला असलेलें कोड ग्वालीप नांवाच्या साधूच्या प्रसादानें गेलें म्हणून त्यानें त्याच्या नावानें हा किल्ला बांधला अशी दंतकथा आहे. शिलालेख वगैरेंतून याचा उल्लेख गोपाद्री, गोपगिरी, गोपाचल असा आहे ग्वाल्हेर हें नाव त्यापासूनच आलें आहे.

६ व्या शतकात येथें गुप्तांचें राज्य होतें. पुढें हा मिहिरकुलानें घेतला. नंतर तो कनोजच्या राजाकडे गेला. दहाव्या शतकात येथें रजपुताचाच अंमल होता. महेंद्रचंद्र (स.९५६), महिपाल ( ११०४ ), भुवनपाल, मधुसूदन, तोमरवंशीय धीरेंद्रदेव ( १४४० ) व निलंगदेव ( १४१० ) वगैरे राजे होऊन गेल्याचें त्या वेळच्या शिलालेखांवरून दिसतें. पुढें मुसुलमान, मोंगल व अफगाण यांच्या ताब्यात तो होता. पानिपतच्या घनघोर संग्रामानंतर गोहदकरानें ( जाट राणा ) त्याला आपलासा केला. पण लवकरच ता महादजी शिंद्यानें आपल्या कबजात घेतला. मध्यंतरी इंग्रजानीं मध्यें पडून तो राण्याला परत दिला होता, पण तो पुन्हां शिंद्याकडे आला १८५८ मध्यें महाराणी लक्ष्मीबाई झांशीवाली हिनें हा काबीज केला होता परंतु पुढें सरह्यूरोज यानें तो राणीपासून परत घेतला पण त्यातच महाराणीच्या हल्ल्यास तो बळी पडला. १८८६ पर्यंत तो इंग्रजसरकारच्या ताब्यांत होता. पुढें इंग्रज व शिंदे यानीं ग्वाल्हेर व झांशी यांची परस्परात अदलाबदल केली

किल्ल्यामध्यें ऐतिहासिक व पुराण वस्तु पुष्कळ आहेत तट मोठा व विशाल असून त्याचे बहुतेक दरवाजे हिंदु पद्धतीचे व एक मुसलमानी पद्धतीचा आहे. आन हिंदूंची पांच देवळें असून जैनांचाहि एक देऊळ आहे. किल्ल्यांत जैनांच्या प्रचंड मूर्ती आहेत. त्यांत एक तर ५७ फुट उंचीची आहे.

मुसलमानी मशीदी पुष्कळ आहेत ४ हिंदु पद्धतीचे व २ मुसलमानी धर्तीचे राजवाडे आहेत ते फारच सुंदर व मजबूत आहेत किल्ल्यावर पाण्याचीं अनेक टांकीं आहेत त्यांचें पाणी कधी आटत नाही. त्यांपैकी सूर्यकुंड हें जुनें व प्रख्यात आहे. जोहार नांवाचा जो तलाव आहे तेथें १२३२ मध्यें आपल्या बायकामुलांचा प्रथम जोहार करून मग अजमशहावरोबर किल्ल्यांतील रजपूत लोक लढले, अशी कथा सांगतात [ इंपे ग्याझे पु १२, आर्किऑलॉजिकल रिपोर्ट, पु २ ]

**ग्विडो**—हा प्रसिद्ध संगीतशास्त्रज्ञ ११ व्या शतकांत होऊन गेला 'आधुनिक संगीताचा आद्यजनक' असें त्यास मानण्यांत येत असून अव्हेलेनाच्या मठांतील त्याच्या तसबिरीवरहि वरील उल्लेख आढळतो त्याचें विश्वसनीय चरित्र उपलब्ध नसून, अरेझो येथील बिशप थिओडाल्ड व पाँपोसा येथील मिकाएल नांवाचा एक भिक्षु यांना लिहिलेल्या आपल्या ग्रंथाच्या समर्पणविषयक पत्रावरूनहि ग्विडोच्या अस्सल चरित्रावर फारसा प्रकाश पडत नाही समकालीन ग्रंथकारांच्या पुस्तकांतून या संगीताचार्याचा उल्लेख आढळतो व त्यावरून ग्विडो हा दहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत जन्मला असावा असें अनुमान निघतें त्याचें जन्मस्थान कोठें होतें हेंहि अनिश्चित आहे त्याच्या ग्रंथाच्या मुखपृष्ठावरून 'ग्विडो ॲरेटिनस' अथवा नुसतें 'ॲरेटिनस' असें नांव आढळतें पाँपोसा येथील मठांत तो गायनशिक्षकाचें काम करीत असे व त्याच ठिकाणीं त्यानें संगीत शास्त्रासंबंधीं एक नवीन संगीतलेखनपद्धतीचा शोध लाविला जें शास्त्र शिकण्यास पूर्वी दहा वर्षे लागत असत तें शास्त्र आपल्या पद्धतीनें पांच महिन्यांत सहज अवगत होईल असें तो म्हणत असे ग्विडोबद्दल पुढें लोकांचा मत्सर वाढूं लागला व त्यामुळें त्यास पाँपोसा येथील मठ सोडून जाणें प्राप्त झालें नंतर तो अरेझो येथें जाऊन राहिला १०३० मध्यें त्याला पोपकडून निमंत्रण आलें व तो रोम येथें गेला त्या ठिकाणीं असतांना पाँपोसा येथील मठाकडे पुनः परत जाण्याबद्दल त्यास विनंति करण्यांत आली १७ मे १०५० रोजीं ग्विडोनें इहलोक सोडला १८८८ सालीं सांपडलेल्या जुन्या कागदपत्रावरून असें दिसतें कीं, ग्विडो हा फ्रान्स देशांत सेंट मेअर देस फॉसेस नामक मठांत रहात असे व तेथेंच त्यानें आपल्या संगीतलेखनपद्धतीचा शोध लाविला ग्विडोच्या पद्धतीला, आधुनिक गीतलेखन पद्धतीच्या इतिहासांत मोठें महत्त्व प्राप्त झालें आहे. यूरोपियन संगीतांतील पहिले सहा स्वर त्यानें शोधून काढले आहेत त्या स्वरांचीं नांवें सेंट जॉन, बॅप्टिस्ट यास उद्देशून केलेल्या एका स्तोत्राच्या ओळींचीं आद्याक्षरें आहेत

**ग्वाश्चिआर्डीनी फ्रान्सिस्को** (१४८३–१५४०)—हा प्रसिद्ध इटालियन इतिहासकार व मुत्सद्दी फ्लॉरेन्स येथें १४८३ मध्यें जन्मला त्याचें घराणेंहि उच्च व सुप्रसिद्ध असून त्याच्या अनेक पूर्वजांनीं मोठमोठ्या सरकारी हुद्यावर कामें केलीं होतीं फ्रान्सिस्कोनें ग्रीक व लॅटिन भाषांचें प्राथमिक शिक्षण झाल्यावर त्यानें फेरारा व पडुआ या दोन युनिव्हर्सिटींत इ स १५०५ पर्यंत अभ्यास केला ख्रिस्तीधर्मसंस्थेतील कार्डिनलची जागा पटकावी असा त्याचा हेतु होता, परंतु त्याच्या बापाला ती गोष्ट पसंत नव्हती व पांच मुलांपैकीं कोणालाहि धर्मखात्यांत शिरूं द्यावयाचें नाहीं असें त्यानें ठरविलें होतें यामुळें फ्रान्सिस्कोनें पुढें कायद्याचा अभ्यास करून वकीली सुरू केली व त्यांत इतकी कीर्ति मिळविली कीं त्याला स्पेनचा राजा फर्डिनंड दि कॅथॉलिक याच्या दरबारीं वकील म्हणून पाठविण्यांत आलें व तेव्हांपासून त्याच्या राजकारणी व मुत्सद्दि आयुष्यक्रमाचा प्रारंभ झाला ग्वीश्चिआर्डीनी मूळचा महत्त्वाकांक्षी, लोभी व अधिकारलोलुप होताच व स्पेनच्या कामगिरींत त्याच्या अंगचे तत्कालीन राजकारणी पुरुषास लागणारे सर्व गुण निदर्शनास आले विरुद्ध पक्षाचे कट फिसकटवून प्रतिकट रचणें, विश्वासघातक्यानांहि फसविणें, मानवीप्राणी अत्यंत नीच हेतूनीं प्रेरित असतो असें धरून चालणें आणि अत्यंत घोर गुन्ह्याची सुद्धां त्यांतील चातुर्याबद्दल तारीफ करणें या गोष्टी राजकारणी बुद्धिमत्तेच्या उच्च कोटींत गणल्या जात असत या गुणामुळें रोमचा १० वा लिओ व पुढील एक दोघांनीं त्याला पोपच्या राज्यांतील प्रांतावर गव्हर्नर नेमलें या नोकरीचा राजीनामा त्यानें १५३४ मध्यें दिला या नोकरींतील अनुभवानें पोपच्या वर्तनाबद्दल त्याच्या मनांत पक्का तिटकारा उत्पन्न होऊन पुढें तो लूथरच्या प्रॉटेस्टंट पंथाचा अनुयायी बनला पुढें फ्लॉरेन्स संस्थानचा प्रमुख वझीर होऊन राज्यकारभार पहावा असा त्याचा हेतु होता पण तो साधला नाहीं म्हणून तो आपल्या गांवीं अप्रसिद्धपणात काळ घालवीत राहिला तो १५४० मध्यें मरण पावला

**ग्वीलोटीन किंवा गीलोटीन**—हें १७८९ च्या फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं फांशीची शिक्षा झालेल्या लोकांचा शिरच्छेद करण्याकरितां मुद्दाम तयार केलेलें यंत्र होय या यंत्राची रचना अशी होती कीं, दोन उभ्या खांबावर एक आडवें लाकूड बसविलें होतें तें असें कीं, त्यायोगानें एक मोठा सुरा वरखालीं करतां येत असे व त्या सुऱ्याच्या वर इतकें मोठें वजन बसविलें होतें कीं,तो सुरा दोरी सैल करताच एकदम झटकन खालीं पडत असे हें यंत्र मूळ इराणी लोकांनीं तयार केलें असें कांहींजण म्हणतात पण एवढें मात्र खरें कीं फ्रान्समध्यें त्याचा विशेष दुर्लौकिक होण्यापूर्वीहि

तें मेटब्रिटन व इतर यूरोपीय देशांत उपयोगात आणलें जात होतें. स्कॉटलंडातील एडिनबरोच्या म्यूझियममध्यें 'मेडन' नावाचें एक जुनें यंत्र असून तें गीलोटीनच्या सारखेंच आहे. जर्मनीमध्यें हॅचेल नांवाचें असलेंच यंत्र होतें. आणि इटालींत मन्नाइआ नावाचें असलें यंत्र उच्च घराण्यांतील गुन्हेगारांना फाशी देण्याकरितां वापरीत असत.तथापि फ्रेंच राज्यक्रांतीच्या सुमारें एक शतकभर हीं जुन्या काळांतील यंत्रें रद्द पडलीं होतीं. पण गीलोटीन नावाच्या कॉन्स्टिट्यूट असेंब्लीमधील सभासदानें १७८९ मध्यें या यंत्राचा उपयोग करावा अशी सूचना आणली. त्या सूचनेवर बराच वादविवाद होऊन अखेर १७९१ मध्यें असेंब्लीनें एक कमिटी नेमली व कमिटीचा पडलेला अनुकूल अभिप्राय पसंत करून एका जर्मन कारागिराकडून तसलीं यंत्रें तयार करविलीं. १७९२ पासून १७९५ पर्यंत या यंत्रानें हजारों इसमांचीं डोकीं धडापासून झपाझप वेगळीं केलीं. आणि फ्रेंच राज्यक्रांतीच्या भयानक स्वरूपात या यंत्रानें मोठीच भर घातली. पुढें या यंत्राविरुद्ध फार गवगवा झाल्यामुळें इतर देशांत त्याचा उपयोग कोणी केला नाहीं. तथापि १८५३ मध्यें सॅक्सनीच्या राज्यात तें उपयोगात आणण्यात आलें. आणि तेव्हांपासून फ्रान्स, बेल्जम व जर्मनीचा कांहीं भाग यांतहि तें फाशी देण्याच्या कामीं वापरण्यांत येऊं लागलें. या यंत्राचा खुद्द उत्पादक डॉ. गीलोटीनहि त्याला बळी पडला, असे मधूनमधून उल्लेख दृष्टीस पडतात पण ते चुकीचे होत. कारण तो पुढें १८१४पर्यंत जगून नैसर्गिक कारणांनीच मरण पावला.

**ग्वेनेव्हीअर**—ऑर्थर राजासंबंधी असलेल्या अद्भुत कथेवरून पहातां, ग्वेनेव्हीअर ही ऑर्थरची पत्नी होय. जिओफ्रे ऑफ मनमाउथच्या मतें ती एक रोमन स्त्री होती. परंतु दंतकथेवरून पहाता ती लिओडेग्रॅन्स नामक राजाची कन्या असून तिचा जन्म कॉर्नवाल येथें झाला. जिओफ्रेचें मत व उपर्युक्त दंतकथा वॅसे यास ठाऊक असल्यामुळें त्यानें दोहोंचाहि उपयोग आपलें मत बनवितांना केला आहे. ग्वेनेव्हीअरसंबंधी वेल्स व फ्रान्समध्यें असलेल्या दंतकथा अत्यंत गुंतागुंतीच्या आहेत. इंग्लंडमध्यें ग्वेनेव्हीअरची माहिती लोकांना आहे. पण ती लान्सेलॉटशीं नीतिबाह्य संबंध ठेवणाऱ्या ग्वेनेव्हीअरचीच होय. मॅलोरी व टेनिसन या प्रतिभाशाली लेखकाच्या कल्पनासृष्टींत या स्त्रीचीं हृदयस्पर्शी व चित्तोहर अशीं भिन्न चित्रें पहावयास सापडतात. फ्रान्समध्यें प्रचलित असलेल्या अद्भुत कथानकावरून पाहतां, आर्थर व ग्वेनेव्हीअर यांच्या कथानकांत लान्सेलॉटचा उल्लेख आढळत नाहीं. या कथानकांत लान्सेलॉटचा संबंध फार मागाहून जोडण्यांत आला आहे. मॉरड्रेडचा शेवटीं पराजय झाल्यानंतर ती जोगिण बनली. आर्थरच्या अद्भुत कथेंतील ग्वेनेव्हीअर ही एक व्यभिचारी स्त्री होती व लान्सेलॉटसारख्या परदाराशीं प्रेमसंबंध ठेवणें तत्कालीन परिस्थिति पाहतां मोठें पाप गणलें जात होतें किंवा नव्हतें या मुख्य मुद्यावरूनच लान्सेलॉटचें चारित्र्य ठरविलें पाहिजे. ग्वेनेव्हीअरची गोष्ट दृष्टान्त स्वरूपाची आहे.

**ग्वेरिक, आटोव्हान**—हा एक जर्मन प्रायोगिक तत्ववेत्ता होऊन गेला. याचा जन्म प्रशिअन साक्सनींतील माग्डेबर्ग नावाच्या गावीं तारीख २० नोव्हेंबर १६०२ रोजीं झाला. प्रथमतः त्यानें कायदा, गणित, यंत्रशास्त्र व भूमिति यांचा अभ्यास केला सन १६४६ सालीं तो माग्डेबर्गचा मेयर होता. त्यानें फावल्या वेळांत शास्त्रीय विषयाकडे लक्ष्य पुरविलें विशेषेंकरून वायुशास्त्राकडे त्यानें जास्त लक्ष्य दिलें. ग्यालिलिओ, पास्कल आणि टारेसेली यांनीं निर्वात स्थल करण्यासंबंधानें जे प्रयोग केले ते ऐकून त्यानें त्या दिशेनें प्रयोग करून एक वाताकर्षक यंत्र तयार केलें. दोन पोकळ अर्धगोलक घेऊन ते एकमेकांवर बरोबर बसतील अशा रितीनें साफ करून त्याच्यातील हवा काढून घेतली; नंतर त्या अर्धगोलकाच्या दोहों अंगास पंधरा पंधरा घोडे जोडून त्यांच्या सहायानें ते अर्धगोल वेगळे करण्याचा प्रयत्न करण्यात आला, परंतु ते गोल वेगळे करता आले नाहींत. हा प्रयोग त्यानें तिसऱ्या फर्डिनान्ड बादशहासमक्ष करून दाखविला. या वाताकर्षक यंत्राखेरीज त्यानें एक विद्युद्यंत्र तयार केलें. याकरितां त्यानें गंधकाचा एक गोलक वापरला. खगोलशास्त्रांतहि त्यानें कांहीं शोध लावले आहेत. धूमकेतूंचें पुनःपुनः आगमन होतें असें त्यानें दाखवून दिलें. तारीख १० मे १६९ रोजीं तो ह्यम्सबर्ग येथें मरण पावला.

**ग्वेर्नसे**—ब्रिटनच्या ताब्यांत असलेल्या 'चॅनेल बेटां' पैकीं हें एक बेट आहे. त्याचा आकार त्रिकोणासारखा असून या बेटाची लोकसंख्या १९०१ सालीं ४०४४६ इतकी होती. ग्वेर्नसेचें क्षेत्रफळ १५६९१ एकर अथवा २४.५ चौरस मैल इतकें आहे. पूर्व किनाऱ्यालगत, सेंटपीटर पोर्ट नांवाचें एक प्रसिद्ध शहर आहे. दक्षिण किनाऱ्याकडील वनश्री फार प्रेक्षणीय असल्यामुळें, उन्हाळ्यात बरेच लोक ह्या ठिकाणीं जातात. तो सर्व प्रदेश अत्यंत खडकाळ असून तेथें पेटिट बॉट, सेंट्स व मालिन ह्यूएट नावाचे उपसागर आहेत. त्या ठिकाणीं मोठाल्या दऱ्या व कडे आहेत. कोबो व पॅझॉन नामक उपसागर पश्चिम किनाऱ्याच्या बाजूस आहेत. पूर्व किनाऱ्याकडे सेंटपीटर पोर्ट नांवाचें शहर आहे. या बेटाचा अन्तर्भाग मोठाल्या दऱ्यामुळें व विविध वनस्पतींमुळें फारच शोभिवंत दिसतो. भाजीपाला, बटाटे, द्राक्षें व फुलें इत्यादि वस्तू येथून बाहेर पाठविण्यात येतात. सेंट सॅंपसन शहरांतून ग्रॅनाइट जातीच्या दगडांची निर्गत होते. राज्यव्यवस्थेच्या सोयीसाठीं हें बेट, ॲलडर्नी, सार्क व हर्म या बेटांशीं जोडण्यात आलें आहे. या बेटाचे दहा भाग पाडण्यात आले असून प्रत्येक ठिकाणीं एक धर्मगुरु असतो. ग्वेर्नसेमध्यें बऱ्याच पुराणवस्तू असून सेंट मिचेल व्हेल व पीटरपोर्ट येथील चर्चच्या जुन्या इमारती प्रेक्षणीय आहेत.